# अनुक्रमणिका

**दशक सातवा चौदाब्रह्मांचा (३६८ - ४३९)**

समास १ मंगलाचरण (३६८-३७७) २. ब्रह्मनिरुपण (ज्ञानदर्शन) (३७७-३८३) ३. चतुर्दशब्रह्म (३८३-३८९) ४.विमलब्रह्म(३८९-३९६) ५.द्वैतकल्पनानिरसन (३९६-४०२) ६.बद्धमुक्तनिरुपण (४०२-४११) ७.साधनप्रतिष्ठा (अलिप्तलक्षण) (४१२-४२०) ८. श्रवणनिरुपण (४२०-४२६) ९. श्रवणनिरुपण (४२६-४३३) १०.देहांतनिरुपण (देहातीतलक्षण) (४३३-४३९)

**दशक आठवा ज्ञानदशक (४४० - ५१८)**

समास १.देवदर्शन(४४०-४४७) २.सूक्ष्मआशंका(४४७-४५४)३.सूक्ष्मआशंका(४५४-४६३)४.सूक्ष्मपंचभूते(४६३-४७०)५.स्थूळ पंचमहाभुते स्वरुपाकाश भेदोनाम (भेदाकाशनाम)(४७०-४७८)६.दुश्चितनिरुपण (४७८-४८५) ७.मोक्षलक्षण(४८५-४९३) ८.आत्मदर्शन(४९३-५०१) ९.सिध्दलक्षण(५०१-५०८)१०.शून्यत्वनिरुपण (५०८-५१८)

**दशक नववा गुणरूपाचा (५१८ - ५७८)**

समास १.आशंका(५१८-५२२) २.ब्रह्मनिरुपण(५२२-५२८)३.निसंगदेहनिरुपण(५२८-५३४)४.जाणपणनिरुपण(५३४-५४०)5.अनुमाननिरसन)(५४०-५४६)६.गुणनिरुपण(५४६-५५४)७.विकल्पनिरुसन(५५४-५६२)८.देहांतनिरुपण(५६२-५६७) ९.संदेहवारण(५६९-५७३)१०. स्थितिनिरुपण (५७३-५७८)

**दशक दहावा जगज्योतीचा (५७८ - ६२९)**

समास १.अंतःकरणयेकनाम(५७८-५८३) २. देहआशंका (५८३-५८७) ३.देहआशंकाशोधन(५८७-५९०) ४. बीजलक्षण (गुणनिरुपण) (५९०-५९६) ५.पंचप्रलय(५९६-६००) ६.भ्रमनिरुपण(६००-६०६) ७.सगुणभजन(६०६-६१०) ८.प्रचितनिरुपण(६१०-६१५)९.प्रकृतीपुरुष (प्रचीतनिरुपण) (६१५-६१९) १०.चळाचळनिरुपण(६१९-६२९)

**दशक अकरावा भीमदशक (६२९ - ६७६)**

समास १. सिद्धांतनिरुपण(६२९-६३६) २.चत्वारदेवपणनिरुपण(६३६-६४२)३.सिकवणनिरुपण(६४२-६४७) ४.सारविवेक (विवेकनिरुपण) (६४७-६५२) ५.राजकारण(६५२-६५६)६.महंतलक्षण(६५६-६६०)७.चंचळनदी(६६०-६६४)८. अंतरात्माविवरण(६६४-६६८)९.उपदेशनिरुपण(६६८-६७२)१०.निस्पृहवर्तणूक(६७२-६७६)

**दशक बारावा विवेकवैराग्यनाम (६७६ - ७२२)**

समास १.विमळलक्षण(६७६-६८०)२.प्रत्ययनिरुपण (६८०-६८५) ३. भक्तिनिरुपण (देवभक्तिनिरुपण) (६८५ - ६९०)४.विवेकवैराग्य (६९०-६९३)५. आत्मनिवेदन(६९३-६९७) ६.सृष्टीक्रम(६९७ -७०१) ७.विषयत्याग(७०१ -७०६) ८.काळरूप(७०६-७११) ९. यत्नसिकवण (यत्न निरुपण)(७११-७१६) १०. उत्तमपुरुष (७१६-७२२)

**दशक तेरावा नामरूप (७२२ - ७६८)**

समास १.आत्मानात्मविवेक(७२२-७२७)२.सारासारविवेक(७२७-७३२)३.उभारणी(७३२-७३५)४.प्रळय(७३५-७३९) ५.कहाणी (७३९-७४३)६.लघुबोध(७४३-७४८) ७. प्रत्ययविवरण (७४८-७५३) ८. कर्तानिरुपण(७५३-७५८) ९. आत्मविवरण(७५८-७६४)१०. सिकवण(७६४-७६८)

**दशक चौदावा अखंडध्याननाम (७६९ - ८३०)**

समास १. निस्पृहलक्षण (७६९-७८०) २. भिक्षा (७८०-७८४) ३.कवित्वकळालक्षण (७८४-७९२) ४.कीर्तनलक्षण(७९२-७९८) ५.कथानिरुपण (७९८-८०४) ६.चातुर्यलक्षण (८०४-८०८) ७.युगधर्म (८०८-८१४) ८.अखंडध्यान (८१४-८२२) ९.शाश्र्वतनिरुपण (८२२-८२६) १०.मायानिरुपण (८२६-८३०)

**दशक पंधरावा आत्मदशक (८३० - ८८४)**

समास १.चातुर्यलक्षण (८३०-८३६) २.निस्पृहव्यापलक्षण (८३६-८४१) ३.श्रेष्ठअंतरात्मा (८४१-८४६) ४.शाश्र्वतब्रह्म (८४६-८५०) ५.चंचळलक्षण (८५०-८५६) ६. चातुर्यविवरण (८५६-८६१) ७.अघोर्ध्वनिरुपण (८६१-८६७) ८.सूक्ष्मजीवनिरुपण (८६७-८७३) ९.पिण्डोत्पत्तिनिरुपण (८७३-८७८) १० सिद्धांतनिरुपण (८७८-८८४)

**दशक सोळावा सप्ततिन्वयाचा (८८४ - ९२८)**

समास १. वाल्मीकस्तवन (८८४-८८७) २.सूर्यस्तवन (८८७-८९०) ३.पृथ्वीस्तवन (८९०-८९५) ४.आपनिरुपण (८९५-८९९) ५.अग्निनिरुपण (८९९-९०३) ६.वायोस्तवन (९०३-९०८) ७.महद्भूतनिरुपण (९०८-९१४) ८.आत्मारामनिरुपण (९१४-९१८) ९.नाना उपासना (९१८-९२३) १०.गुणभूतनिरुपण (९२३-९२८)

**दशक सतरावा प्रकृतीपुरुषाचा (९२८ - ९७३)**

समास १. देवबळात्कार (९२८-९३२) २.शिवशक्तिनिरुपण (९३२-९३७) ३. श्रवणनिरुपण(९३७-९४१) ४.अनुमाववक्तृत्वनिरुपण (९४२-९४६) ५.अजपानिरुपण (९४६-९५०) ६.देहात्मानिरुपण (९५०-९५५) ७.जगज्जीवननिरुपण (९५५-९६०) ८.तत्वनिरुपण (९६०-९६५) ९.तनुचतुष्ट (९६५-९६८)१०.टोपणसिद्धलक्षण (९६८-९७३)

**दशक अठरावा बहुजिनसी (९७३ - १०१५)**

समास १.बहुदेवस्थान (९७३-९७६) २.सर्वज्ञसंग (९७६-९८०) ३. निस्पृहसिकवण (९८०-९८३) ४.देहदुर्लभनिरुपण (९८३-९८८) ५.करंटपरीक्षा (९८८-९९४) ६. उत्तमपुरुष(९९४-९९७) ७. जनस्वभाव (९९७-१०००) ८. अंतर्देवनिरुपण (१०००-१००४) ९.निद्रानिरुपण (१००४-१००७) १०.श्रोताभवलक्षण (१००७-१०१५)

**दशक एकोणिसावा शिकवणनाम (१०१५-१०६०)**

समास १.लेखनक्रिया(१०१५-१०१९) २.विवरण (१०१९-१०२३) ३. करंटलक्षण (१०२३-१०२७) ४.सदेवलक्षण (१०२७-१०३२) ५. देहमान्यनिरुपण (१०३२-१०३६) ६.बुद्धिवादनिरुपण (१०३६-१०४१) ७.यत्ननिरुपण (१०४१-१०४६) ८. उपाधिलक्षण (१०४६-१०५०) ९. राजकारण (१०५०-१०५५) १०.विवेकलक्षण (१०५५-१०६०)

**दशक विसावा पूर्णदशक (१०६० - ११०४)**

समास १.पुर्णापूर्णनिरुपण (१०६०-१०६५) २.त्रिविधसृष्टिनिरुपण (१०६५-१०६९) ३.सूक्ष्मनामाभिधान (१०७०-१०७४) ४. आत्मानिरुपण (शिवभक्तिनिरुपण) (१०७४-१०७९) ५. चत्वारजिनस (१०७९-१०८३) ६. आत्मागुणनिरुपण (आत्मनिरुपण) (१०८३-१०८६) ७. आत्मनिरुपण (१०८६-१०९०) ८. देहक्षेत्रनिरुपण (देहयंत्रनिरुपण) (१०९०-१०९५) ९. देहसूक्ष्मनिरुपण (१०९५-१०९९) १०. विमलब्रह्मनिरुपण (१०९९-११०४)

## श्रीसमर्थकृत सोलीवसुख

जयजयाजी सद्गुरुवर्या । पुर्णब्रह्म प्रतापसूर्या ।तुज नमोजी आचार्या । करुणासिंधो ।।१।।

१-पुर्णब्रह्मस्वरुप प्राप्त केलेल्या अशा प्रतापसूर्य करुणासागर सद्गुरुंचा जयजयकार असो,व त्यांना नमन असो.

जे भवसमुद्रीं पोळले । विषयामंदे अंध जाहले ।चौ-याशींत वाहूं लागले । मार्ग सुचेना तयांसी ।।२।।

२- चौ-याऐशींलक्ष योनींच्या महापुरात,असंख्य जीव,भवसुद्रात पोळले किंवा विषयांत अंध जाहले त्यांना मार्ग सुचेनासा झाला,

ऐसे विश्र्व बहुत बुडाले । मी जीव म्हणोनि धांवू लागले ।मुळीचें स्मरण विसरलें ।मी कोण ऐसे ।।३।।

३- मुळचे (स्मरण) विसरल्यामुळे ,मी जीव म्हणो लागले,मी कोण ते न समजल्यामुळे अनेक जीव बुडावयास (मायेत) लागले.अशा तऱ्हेने सर्व विश्र्वात परिस्थिति उद्भवली.

तयासी मुक्त करावया पूर्ण । तूं बा उतरलासि ज्ञानघन । रोगीया औषधी देऊन । भवमोचन करिशी ।।४।।

४- त्यांना मुक्त करण्यास,(भवरोग झालेल्यांना औषध देऊन भवमुक्त करण्यास) ज्ञानरुप (सद्गुरुं) अवतरले,

ऐसे औदार्य तुझे सघन । म्हणोनी आलो मी शरण ।दयार्णवा कृपा करुन । मज दातारें तारावें ।।५।।

५- अशी आपली ख्याती ऐकोनी,मी आपणाला (सद्गुरुंना) शरण आलो आहे,कृपा करुन मजला तारावें.

आपण आपणातें पावे । ऐसें माझे मनीं बोलावें ।तें दातारे गोचर करावें । रोकडे ब्रह्म ।।६।।

६- मला योगज्ञानाने आपले स्वरुप प्रत्यक्ष कसे पाहाता येईल ते मनोगत सांगावे.

ऐसा शिष्याचा प्रश्र्न ऐकोनी । ज्ञानाचे भरते आले स्वामीलागोनी ।आसन सांडोनिया तये क्षणीं । कडकडोन भेटले ।।७।।

७- असा शिष्याचा प्रश्र्न ऐकोनी सद्गुरुंना ज्ञानाचे भरते आलें,त्यावेळी आसना वरुन उठून(शिष्या स)कडकडुन भेटलें.

रे बाळका ! ऐक निर्धार । तुझा प्रश्न तो वाग्दोर ।माझे कंठी बैसला साचार । बरें घेई निजवस्तु ।।८।।

८- अे,शिष्या (बालका), तुझा प्रश्नरुपी दोर (म्हणजे लगाम) त्याचे उत्तर माझ्या कंठाने ऐक.

मग स्नेहाळे नवल केलें । वोसंगासी शिष्या घेतलें ।अर्धमात्रा रस काढिले । पूर्ण फुंकिले कर्णरंध्रीं ।।९।।

९- स्नेहाने मांडीवर घेऊन अ ऊ म़ मात्रांचे रसायन (तीन मात्रांचा ओंकार त्याचे म्ह.-प्रणवाचे सार ज्यास महाकारण देह म्हणतात)कानांत ओतले.

खडतर औषधी दिव्य रसायन । नयनी झोंबले जाऊनडोळियाचा डोळा फोडून । चित्सूर्य भेदिले ।।१०।।

१०-कानांत ओतलेले ते दिव्य रसायन त्याच्या नेत्रात उतरले,त्याला दिव्यदृष्टी आली व सुर्याच्याद्वारे वरील आकाशांत भेद करु लागली.

पुर्ण अंश गगनी भेदिला । अर्क तो पिंडीमाजी उतरला ।।त्रिकूट श्रीहाट चुरडा केला । सेखीं भरला गगनगर्भी ।।११।।

११-त्या दिव्याकाशात सोSहंचा उदय होऊन त्याच्या जीवरुप अंशाने सर्व विराट प्रकाशित झालें व त्रिकूट श्रीहाट हे नाहींसे होऊन सोSहं सर्वत्र दिसू लागलें.

उग्र तेज लखलखाट । तेथें जाला चौदेहांचा आटं ।।भ्रांति पडली बळकट । तेव्हा बाळ निचेष्टित पडे ।।१२।।

१२- (त्या उग्र तेजाच्या लखलखाटात) स्थूल,सुक्ष्म,कारण व महाकारण हे चारही देह विरुन गेले व देहभानविर्वजीत झाले (भ्रांतीं पडली व शिष्य निचेष्टीत पडला.)शिष्य स्वरुपस्थितींत लीन झाला.

ऐसे पाहोनि सद्गुरुनाथ । पद्महस्त मस्तकीं ठेवित ।वत्सा सावध त्वरित । निजरुप पहा आपुलें ।।१३।।

१३- ते पाहुन (हात डोक्यावर ठेऊन,सावध केले, देहभानावर आणुन ) ह्याच स्वरुपानंदी (निजरुपी)सावध होऊन रममाण हो.

जागृत करोनि ते वेळी।अजपाची दोरी देऊनी जवळी।विहंगम डोल्हारीं तयेवेळीं ।अलक्ष्यलक्षीं बैसविले ।।१४।।

१४- (देहभानावर) जागृत करुन,स्वरुपानीसंधान बळकट ठेऊन(अजपाची दोर देऊन),विहंगममार्गानें नेऊन अलक्ष्याच्या पलिकडचे निर्वाण पद त्यास करुन सोडले.

धैर्याचे आसन बळकट ।आणि इंद्रियें ओढोनि सघट ।धरे उध्वपंथे वाट नीट ।अढळपदीं लक्ष लावी ।।१५।।

१५-धैर्य धरुन(धैर्याचे आसन बळकट करुन),इंद्रियांचा पुर्ण संयम करुन जो उर्ध्व सत्यपथ,त्या मार्गाने जाऊन स्वरुपी स्थिर राहा असे सांगितले.

पुढे करोनिया जाणिव । मागे सारोनि नेणिव ।जे जे जाणीव अभिनव ।ते तु नव्हेसी तत्वता ।।१६।।

१६- जाणीवेच्या साहयाने (नेणीव मागे टाकून) पुढे जा,जाणीव ही तु नव्हेस हे तत्वता लक्षात घे.

तैं मार्गाची करुं नव्हाळी। प्रथम घंटानादाची नवाळी ।दुसरी किंकिणीची मोवाळी । तिसरी अनुहतकोल्हाळ ।।१७।।

१७- घंटा,किंकणी,व तिसरा अनाहत असे नाद त्याला दाखविले.

आतां अग्रीं लक्ष लावी । काय दिसेल तें न्याहाळी ।चंद्रज्योती प्रकाशली । व्युह बांधिला बळकट ।।१८।।

१८- वरच्या बाजुस लक्ष लावून पाहातां चंद्र चमकला व ब्रह्मसर्गाचा सारा व्यूह उभा रहिला.

ते सुख अंतरी घेऊनी । पुढें चाल करी संगमीं ।तेथे विजुऐसा कामिनी । चमकताती सुवर्णरंग ।।१९।।

१९-ते सुख अंतरीं दृढ धरुन व स्वरुपानुसंधान कायम ठेवून हळूहळू वर प्रवेश कर म्ह. सुवर्णवर्णाच्या अनंत विजा चमकल्याप्रमाणे होईल.

तेही जाणोनी मागें सारी । पुढे सूर्यबिंब अवधारी ।ज्वाळा निघती परोपरी । डंडळू नको कल्पांती ।।२०।।

२०- पुढें सूर्यबिंब दिसायला लागून त्याच्या चहूंकडून ज्वाळा पसरतील,पण तूं मात्र ढळूं नकोस,त्यांत गुरफटून राहूं नकोस.

वायोर्मुख करोनि तेथें । गिळी वेगें सूर्यकिरणांते ।मग देखसी आनंदमार्तंडातें । तेजोमय मम पुत्रा ।।२१।।

२१- तो ऊर्ध्वमुख झालेला श्वास त्या ठिकाणीं काकींमुखांतून वर नेऊन सभोंवार पसरलेलीं सूर्यकिरणें नाहींशीं करुन टाक म्ह.आनंदसूर्यच सर्वत्र भरुन राहील.

अनंत भानु तेज अद्भुत । खदिरांगार ज्वाळा उसळत ।धारिष्ट तेथें न निभत । दुर्घट व्युह तेथीचा ।।२२।।

२२- तेथील अदभुत अशा अनंत सूर्य व अनंत अग्नींच्या तेजाने धारीष्ट डळमळते,(दुर्घट व्युह तेथचा)

तेथे हुशारीचें काम । अग्रीं लक्ष लावोनि नेम ।तीरें लावोनि सुगम । मागें सारी सूर्यातें ।।२३।।

२३- तेथे अत्यंत हुशारीने आपले स्वरुप धारणेचे निशाण बळकट धर व तो सूर्य मागे टाक.

पुढें दिसेल जें नवल ।तें पाही हंसमेळ ।चंद्रकिरण शीतळ । पाहसी तूं मम वत्सा ।।२४।।

२४- पुढे गेल्यावर सत्यस्वरुप परमात्मा पाहाशील व त्याचा चंद्राप्रमाणे प्रकाश पडेल.

तेव्हा मागील दाह शमेल । शीतळाई सर्वांग होईल ।चंद्राची प्रभा सुढाळ । फडफडीत चांदणे ।।२५।।

२५-तेव्हा मागील दाह शमुन तूंही चंद्राप्रमाणे कांतियुक्त व शितल होऊन राहशील.

तेचि डोळियाचा डोळा पाही । देहातीत वर्म विदेहीं ।चिन्मय सुखाची बवाई । भोगी आपुलें की गा ।।२६।।

२६-तोच देहातीत परमात्मा होय,तोच तूं होऊन, त्याच्या अपरिमीत सुखाचा भोग घे.

अनुभवाची शीग भरली । आग्रापरी उसळली ।भूमंडळी प्रभा पडली । कर्पूरवर्ण नभ जालें ।।२७।।

२७-त्याचा स्वानुभावप्रकाश सर्वत्र व्यापून राहिला व आकाश श्र्वेतवर्ण झाले.

तया मध्यभागी सघन । अढळपद दैदिप्यमान ।उर्वरित ब्रह्म जाण । ध्रुव बैसला अढळ ते ।।२८।।

२८- त्याच्या मध्यभागीं घनदाट अढळ परमात्मा-सर्व ब्रह्मांडाच्याही पलीकडचा आहें.

ते तुझे स्वरुप नेटेबोटें । जेंथे समस्त जाणणे आटे । ऐकें जालासी धिटे । बळकटपणें बलाढ्य ।।२९।।

२९-तें तुझे शुध्द स्वरुप आहे,तेथे सर्व ज्ञानाचीं आटणी होते.

ऐसें सुख योगीया लाधलें । तेव्हां देहाचे मरण गेलें ऐकणें मुरालें । एकत्वपणें एकचि।।३०।।

३०- ते सुख योगीयांनाच कळते,ज्याने (एकत्वपणाने) देहाचे मरण गेले व सांगणे ऐकणे मुरुन गेलें

शांती येऊनि माळ घाली । अलक्ष्यसेजे निर्जली ।हंसपदे ऐक्य जाली । सुख सुखातें निमग्न ।।३१।।

३१- त्या अखंड आत्मतृप्तिने अलक्ष्य सेजेवर वरिले व त्या स्वरुपानुभवांत शांतीचे व तुझे लग्न लागुन तुं तिशीं समरसता पावलास.

तेथील अनुभव घेऊनी । स्वानुभव पाहे कलटूनी ।आला मार्ग ते क्षणीं । दिसेनासा जाला कीं ।।३२।।

३२- तेथील अनुभव घेऊन मागे पाहिल्यावर ज्या मार्गाने आलो तो नाहीसा झाला.

त्रिकूट श्रीहाट गोल्हाट । बुडालें तें औटपीठ । इडा पिंगळा सुषुम्नातट । विराले ते स्वात्मसुखें ।।३३।।

३३- येथवर येतांना त्रिकुट,श्रीहाट,गोल्हाट,औटपिठ,इडा,पिंगळा,सुषुन्मा जे जें काहीं वाटेंत लागेल तें तें सर्व स्वात्मसुखाच्या मुळपदीं आल्यावर मागें राहिले-नाहीसे झालें.

स्थूळ सूक्ष्म कारण । नेणों काय जालें महाकारण ।इंद्रिये चुबकलीं जाण । धांव मोडली तयांची ।।३४।।

३४- स्थूळ,सुक्ष्म,कारण,महाकारण ह्या देहांचे (अदृश्य) काय झाले ते जाण ?(ते नाहीसे झाले),इंद्रियांची धाव मोडली.

पंचभूतांचे खवलें । तयांचे ठावचि पुसले ।अपरिमित आनंदले । निमग्न जाले सुखांत ।।३५।।

३५- त्या अफाट आत्मसुखाच्या भूमिकेवर(पंचभुतांचा ठाव नाहीसा झाला).

सखोल भूमिके ऐसै जालें । सुख सुखासी घोटलें ।स्वयें आत्मत्व प्रकटलें । माझे देहीं रोकडें ।।३६।।

३६- सखोलपणे,सुख सुखाशी मिळाले,आत्मत्व(स्वतः) प्रकटले,माझे देही.

मग सहज समाधि जिरवून । शिष्य उठला घाबरा होऊन ।हें सद्गुरुंचे देणें । काय उत्तीर्ण म्यां व्हावें ।।३७।।

३७- मग सहज समाधीतुन बाहेर आल्यावर,सद्गुरुचे ऋण मी कसे फेडावे या विचाराने शिष्य घाबरा झाला ?

जरी स्तुती तयाची करावी । माझी मती नाहीं बरवी ।अर्नीर्वाच्य गती बोलावी । परा वाचा कुंठित ।।३८।।

३८- स्तुती करावी तर माझी बुध्दी ती किती ? अनिर्वाच्य गतीने बोलावे तर परा वाचा कुंठीत होते(सद्गुरुची स्तुति त्या पलीकडची आहे).

आतां जी मी लडिवाळपणें । तुमचे कृपेनें करितों स्तवन ।सूर्यापुढें खद्योत जाण । तैशापरी बोल हे ।।३९।।

३९- तरीपण अत्यंत प्रेमाने व तुमच्या (सद्गुरुंच्या) कृपेने मी ती करतो,माझी स्तुती ही सूर्यापुढे काय असणार ?(सद्गुरुची स्तुति करणे कठीण आहे ?)

जयजयाजी करुणासिधूं । जयजयाजी भवरोगवैदू ।जयजयाजी बाळबोध । कृपाघना समर्था ।।४०।।

४०- करुणासिंधु,भवरोगवैदु,(शिष्याला) बाळबोध देणा-या,कृपाधन समर्था.

जयजयाजी अविनाशा । जयजयाजी परेशा ।जयजयाजी अध्यक्षा । दयार्णवा ।।४१।।

४१- अविनाशी,परेश,अध्यक्ष,दयानिधी

जयजयाजी पूर्णचंद्रा । जयजयाजी अलक्ष्यविहारा ।जयजयाजी भवसिंधुभास्करा । आनंद प्रभु ।।४२।।

४२- पूर्णचंद्रा,अलक्षविरा,भवसिंधुभास्कर,आनंद प्रभु

तुझी स्तुती करितां सांग । वेदस्तुती जाले अव्यंग ।तेथे प्राकृत मी कांग । वर्णावया योग्य नव्हे ।।४३।।

४३-जेथे वेद तुझे वर्णन करण्यास असमर्थ आहेत तेथे या प्राकृतातुन मी काय सांगणार ?

कल्याण म्हणे जी रामदासा । माझा मुकेपणाचा ठसा ।ते माडोनि वसोसा । मज आपणाऐसे केलें ।।४४।।

४४-कल्याणस्वामी म्हणतात,मी काही सांगण्यास असमर्थ असताना आपणाप्रमाणे केले.

ऐकोन मृदुवचन । कुरवाळलें तयालागुन ।गुरुशिष्य हें बालणें । उरलें नाही ते वेळीं ।।४५।।

४५- तेव्हा आनंदाने त्यास कुरवाळीले तेव्हा गुरु शिष्य भेदही नाहीसा झाला.

एकेपणें एकचि जालें । ऐक्यरुपीं सम मिळालें ।करुनियां सुख उसळलें । नाहींपण जाऊनी ।।४६।।

४६- सर्व नाहीपण जाऊन,सर्व एकच झाले (ऐक्य जाहले) व सुख उसळले.

सुगरिणीचा पाक जाहला । नभाभाजनीं वाढिला ।अक्षयपदीं सुगरावला । संत जेवती स्वानंदें ।।४७।।

४७- सुगरणी सारखा मधुर (चविष्ठ) योग जुळला,आकाशासारखा वाढला,अढळपदी पोहोचला,संताना तो आनंद (अस्वाद) प्राप्त झाला.

अनिर्वाच्य बोल बोलिले । साधकाचे उपेगा आलें ।सिध्द तरी डोलों लागले । बध्द मुमुक्षु होताती ।।४८।।

४८- हे अनिर्वाच्य बोल साधकांच्या उपयोगी आलें,सिध्दांना समाधान झाले,बध्द मुमुक्ष झाले.

यापरतें आन नाही बोलणें । श्रीराम दाशरथीची आण ।एकपत्नी तो सुजाण । आपुले पद दे दासा ।।४९।।

४९- अजून काय बोलावे ? तो एक पत्नी राम सर्व जाणणारा आहें,जो एकपत्नी व आपल्या पदि दासाला बसविणारा आहे.

इति श्रीदासबोधग्रंथ । त्यांतील हा सोलीव अर्थ ।।श्राते ऐकतां यथार्थ । समाधिस्थ होती ।।५०।।

५०- अशा या दासबोध ग्रंथातील गर्भित अर्थ श्रोत्यांनी ऐकल्यास (नीट समजल्यास) ऐकणारा समाधीस्थ होईल.

प्रस्तावना: समर्थ रामदास हे महाराष्ट्रातील थोर संतांपैकी एक आहेत त्यांनी अनेक प्रकारचे धार्मिक लिखाण केले दासबोध हा त्यापैकी एक असून ह्यात प्रश्नोत्तर रूपाने ज्ञान(भक्ती मार्ग) सांगितले आहे.व ओवीनुरूप अर्थ करून त्यास सुलभ वाचनासाठी हा उपलब्ध केला आहे.ह्यात अनेक तृटी असण्याची शक्यता आहे तरी वाचकांनी “आहे ते गोड मानून घ्यावे.”

---

## सार्थ_श्रीदासबोध_दशक पहिला - स्तवनांचा

**समास पहिला ग्रंथारंभलक्षण(मंगलाचरण) ॥ श्रीराम ॥**

श्रोते पुसती कोण ग्रंथ । काय बोलिलें जी येथ । श्रवण केलियानें प्राप्त । काय आहे ॥ १॥

श्रोते विचारतात, महाराज हा ग्रंथ कोणता,ह्यात काय सांगितले आहे, आणि ह्याच्या श्रवणाने कोणता लाभ होतो.

ग्रंथा नाम दासबोध । गुरुशिष्यांचा संवाद । येथ बोलिला विशद । भक्तिमार्ग ॥ २॥

(वक्ता उत्तर देतो) या ग्रंथाचे नांव दासबोध आहे.ह्यात गुरुशिष्य संवादाच्या रुपानें भक्तिमार्ग स्पष्ट करुन सांगितला आहे.

नवविधा भक्ति आणि ज्ञान । बोलिलें वैराग्याचें लक्षण । बहुधा अध्यात्म निरोपण । निरोपिलें ॥ ३॥

ह्या मध्ये नवविधा भक्ति,ज्ञान व वैराग्य यांचीं लक्षणें सांगितली आहेत आणि बहुतेक अध्यात्मविषयांचेंच निरुपण केलें आहे.

भक्तिचेन योगें देव । निश्चयें पावती मानव । ऐसा आहे अभिप्राव । ईये ग्रंथीं ॥ ४॥

(अभिप्राव-अभिप्राय)

भक्तीच्या योगाने मनुष्यांना देवाची प्राप्ती निश्चितपणें होते,असा ह्या ग्रंथाचा आशय(रहस्य) आहे.

मुख्य भक्तीचा निश्चयो । शुद्धज्ञानाचा निश्चयो । आत्मस्थितीचा निश्चयो । बोलिला असे ॥ ५॥ शुद्ध उपदेशाचा निश्चयो । सायोज्यमुक्तीचा निश्चयो । मोक्षप्राप्तीचा निश्चयो । बोलिला असे ॥ ६॥ शुद्धस्वरूपाचा निश्चयो । विदेहस्थितीचा निश्चयो । अलिप्तपणाचा निश्चयो । बोलिला असे ॥ ७॥ (विदेहस्थिती- देह असून नसल्यासारखी स्थिति)

मुख्य भक्ति,शुध्द ज्ञान,आत्मस्थिती,शुध्द उपदेश,सायुज्यमुक्ति, मोक्षप्राप्ती,शुध्द स्वरुप, विदेहस्थिती अलिप्तपणा, यांविषयीं निश्चयात्मक सांगितले आहे.

मुख्य देवाचा निश्चयो । मुख्य भक्ताचा निश्चयो । जीवशिवाचा निश्चयो । बोलिला असे ॥ ८॥ मुख्य ब्रह्माचा निश्चयो । नाना मतांचा निश्चयो । आपण कोण हा निश्चयो । बोलिला असे ॥ ९॥ मुख्य उपासनालक्षण । नाना कवित्वलक्षण । नाना चातुर्यलक्षण । बोलिलें असे ॥ १०॥

मुख्य देव कोणता,मुख्य भक्त कोणता,जीव व शिव यांचा संबंध व स्वरुप,मुख्य ब्रह्म,व तत्संबंधीं अनेक मतें,आपण कोण,तसेंच मुख्य उपासना अनेक प्रकारचे कवित्व व चातुर्य यांचीं लक्षणे निश्चित स्वरुपात सांगितली आहेत.

मायोद्भवाचें लक्षण । पंचभूतांचे लक्षण । कर्ता कोण हें लक्षण । बोलिलें असे ॥ ११॥

(मायोद्भव - मायेची उत्त्पत्ती)

मायेचा उद्भव,पंचभूते,कर्ता कोण यांची लक्षणे सांगीतली आहेत.

नाना किंत निवारिले ॥ नाना संशयो छेदिले । नाना आशंका फेडिले । नाना प्रश्न ॥ १२॥

अनेक शंका,आशंका व संशय यांचे निरसन करुन अनेक प्रश्नांची उत्तरे दिली आहेत.

ऐसें बहुधा निरोपिलें । ग्रंथगर्भी जें बोलिलें । तें अवघेंचि अनुवादलें । न वचे किं कदा ॥ १३॥

असे या ग्रंथामध्ये अनेक प्रकारचे जे निरुपण केले आहे त्या सर्वांचाच उल्लेख (स्पष्टीकरण) येथे करणे शक्य नाहीं.

तथापि अवघा दासबोध । दशक फोडून केला विशद । जे जे दशकींचा अनुवाद । ते ते दशकीं बोलिला ॥ १४॥

तथापि सगळ्या दासबोधाचे दशकवार निरनिराळे भाग पाडले असुन प्रत्येक दशकाचा विषय त्या त्या दशकात विषद करुन सांगितला आहे.

नाना ग्रंथांच्या समती । उपनिषदें वेदांत श्रुती । आणि मुख्य आत्मप्रचीती । शास्त्रेंसहित ॥ १५॥

ह्या ग्रंथाला उपनिषदें,वेदांत,श्रुति इत्यादि अनेक ग्रंथांचे आधार घेतले आहेंत.आणि मुख्य आधार शास्त्राधारयुक्त अशा स्वानुभवाचा आहे.

नाना समतीअन्वये । म्हणौनी मिथ्या म्हणतां नये । तथापि हें अनुभवासि ये । प्रत्यक्ष आतां ॥ १६॥
(समती अन्वये - आधारानुसार)

या ग्रंथाला अनेक आधार असल्यामुळे ह्याला खोटे म्हणता येणार नाही.तथापि यांचा आंता पुढील निरुपंणात प्रत्यक्ष अनुभव येणार आहे

मत्सरें यासी मिथ्या म्हणती । तरी अवघेचि ग्रंथ उछेदती । नाना ग्रंथांच्या समती । भगवद्वाक्यें ॥ १७॥

मत्सराने याला कोणी खोटे म्हणतील तर सगळेच ग्रंथ खोटे पडतील! अनेक ग्रंथ व भगवद्वचने यांचा याला आधार आहे.

शिवगीता रामगीता । गुरुगीता गर्भगीता । उत्तरगीता अवधूतगीता । वेद आणी वेदांत ॥ १८॥ भगवद्गीता ब्रह्मगीता । हंसगीता पाण्डवगीता । गणेशगीता येमगीता । उपनिषदें भागवत ॥ १९॥ इत्यादिक नाना ग्रंथ । समतीस बोलिले येथ । भगवद्वाक्ये येथार्थ । निश्चयेंसीं ॥ २०॥

शिवगीता,रामगीता गुरुगीता,गर्भगीता,उत्तरगीता अवधुतगीता,वेद आणि वेदांत,भगवद्गीता,हंसगीता,ब्रह्मगीता पांडवगीता,गणेशगीता,यमगीता,उपनिषदे,भागवत इत्यादि ग्रंथांचे आधार यांत घेतले आहेत.हे सर्व ग्रंथ म्हणजे खरोखरी भगवद्वचनें यथार्थ(सत्य)आहेत,यांत शंका नाहीं.

भगवद्वचनीं अविश्वासे । ऐसा कोण पतित असे । भगवद्वाक्याविरहित नसे । बोलणे येथीचें ॥ २१॥

भगवद्वचनांवर अविश्र्वास ठेवील असा पतित कोण आहे?,भगद्वचनांवाचूनं या ग्रंथांत दुसरे तिसरें कांहींही सांगितलेले नाही.

पूर्णग्रंथ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । तो दुरात्मा दुराभिमान । मत्सरें करी ॥ २२॥

समग्र ग्रंथ पाहिल्याशिवाय उगीचच जो ग्रंथाला दोष लावील तो दुरात्मा मत्सराने दुराभिमान(दुराग्रह) धरतो,(दुराग्रहानेंच दोष देतो) असे म्हटले पाहिजे.

अभिमानें उठे मत्सर । मत्सरें ये तिरस्कार । पुढें क्रोधाचा विकार । प्रबळे बळें ॥ २३॥

(प्रबळे--- प्रबळ् होतो, बळे्-बळामुळे,बळाने,सामर्थ्याने)

अभिमानाच्या योगाने मत्सर उत्पन्न होतो,मत्सरामुळे दुस-याच्या सांगण्याविषयीं तिरस्कार येतो व पुढे क्रोधाचा विकार जोराने बळावतो.

ऐसा अंतरी नासला । कामक्रोधें खवळला । अहंभावे पालटला । प्रत्यक्ष दिसे ॥ २४॥

(नासला–बिघडला, अंतरी् - मनामध्ये, अहंभावे-- अहंकाराने)

या प्रकारे काम व क्रोध ह्यांनीं ज्याला खवळून सोंडलें व अहंकाराने ज्याच्या वृत्तींत बदल केला आहे,तो अंतःकरणात बिघडला आहे हें प्रत्यक्ष दिसतें.

कामक्रोधें लिथाडिला । तो कैसा म्हणावा भला । अमृत सेवितांच पावला । मृत्य राहो ॥ २५॥

(लीथाडला - बरबटला)

कामक्रोधांनीं बरबटलेल्यास चांगला कसा म्हणावा?,अमृत हे मृत्यु टाळणारे खरें,पण,(देवांच्या पंक्तित अमृत वाढीत असतां पोंटी कपट ठेवून बसलेल्या) राहुसारख्या विकारी व दुष्ट दैत्यानें सेवन करतांच त्या अमृतामुळे त्याला मृत्यु आला.(श्रीविष्णूनें त्याचे कपट ओळखुन त्याचा शिरच्छेद केला.) (त्याचप्रमाणें कामक्रोधादि विकार पोटात ठेवून जो कोणी ग्रंथ वाचील किंवा ऐकेल त्याला त्यांतील उपदेश-अमृत पटणार नाहींच व उलट तो आपल्या पापाने मरेल मात्र.)

आतां असो हें बोलणें । अधिकारासारिखें घेणें । परंतु अभिमान त्यागणें । हें उत्तमोत्तम ॥ २६॥

आतां हे (मत्सरी श्रोत्यांविषयीं) बोलणे पुरें. जो तो आपल्या अधिकाराप्रमाणें यांतील उपदेशाचें ग्रहण करील; तथापि अभिमानाचा त्याग करणें हें उत्तमांत उत्तम आहे.

मागां श्रोतीं आक्षेपिलें । जी ये ग्रंथीं काय बोलिलें । तें सकळहि निरोपिलें । संकळीत मार्गे ॥ २७॥

(मागां--या आधी,,श्रोतीं-श्रोत्यांनी, आक्षपिले-विचारले,जी ये ग्रंथी - या ग्रंथामध्ये, सकळही – सर्वकाही,संकळीत–सर्व एकत्र करून सारांशरूपाने,थोडक्यात)

महाराज या ग्रंथात काय सांगितले आहे; असे श्रोत्यांनी पुर्वी विचारलें होतें ते सगळेच येथपर्यंत थोडक्यांत सांगितले.

आतां श्रवण केलियाचें फळ । क्रिया पालटे तत्काळ । तुटे संशयाचें मूळ । येकसरां ॥ २८॥

(येकसरां- एकूणसारे, सारांशाने,)

हा ग्रंथ श्रवण केल्याची फलप्राप्ती सांगतों. सर्व संशय एकदम नाहीसे होऊन क्रियेमध्ये (आचारामध्ये) ताबडतोव फरक पडतों.

मार्ग सांपडे सुगम । न लगे साधन दुर्गम । सायोज्यमुक्तीचें वर्म । ठांइं पडे ॥ २९॥

सायुज्यमुक्तींचे रहस्य कळून येऊन तिच्या प्राप्तीचा सुलभ मार्ग सांपडतो,दुस-या बिकट साधनांचे कारण पडत नाहीं.

नासे अज्ञान दुःख भ्रांती । शीघ्रचि येथें ज्ञानप्राप्ती । ऐसी आहे फळश्रुती । ईये ग्रंथीं ॥ ३०॥

अज्ञान दुखः व भ्रांति यांचा नाश होऊन तात्काळ ज्ञानाचा लाभ होतो,अशी या ग्रंथाची फलश्रुति आहे.

योगियांचे परम भाग्य । आंगीं बाणे तें वैराग्य । चातुर्य कळे यथायोग्य । विवेकेंसहित ॥ ३१॥

योग्यांचे परम भाग्य असें वैराग्य अंगामध्ये बाणतें, विवेक व चातुर्य यथायोग्य प्राप्त होतें,

भ्रांत अवगुणी अवलक्षण । तेंचि होती सुलक्षण । धूर्त तार्किक विचक्षण । समयो जाणती ॥ ३२॥

(भ्रांत - गैरसमजूती असलेले लोक  अवगुणी - दुर्गुणी, अवलक्षण - वाईट लक्षणांचे , सुलक्षण् - चांगली लक्षणं तार्किक - तर्क चालवून सूक्ष्म विचार करणारे ,विचक्षण - चतुर हुशार, समयो - वेळेवर, जाणती - जाणू शकणारी होतात.)

जे कोणी संशयग्रस्त अवगुणी व अवलक्षणी असतील ते सुलक्षणी,धुर्त,तत्ववेत्ते,चतुर व समयज्ञ होतील

आळसी तेचि साक्षपी होती । पापी तेचि प्रस्तावती । निंदक तेचि वंदू लागती । भक्तिमार्गासी ॥ ३३॥

(साक्षपी -उद्योगी,पापी - अवैध/निद्य कर्मात गुतलेले, प्रस्तावती - पश्चाताप पावतात, निंदक - निंदा करणारे )

आळशी असतील ते उद्योगी होतील,पाप्यांना पश्र्चाताप होऊन ते शुध्द होतील आणि भक्तिमार्गाचे निंदक असतील तेही भक्तिमार्गाला वंदन करुं लागतील.

बद्धची होती मुमुक्ष । मूर्ख होती अतिदक्ष । अभक्तची पावती मोक्ष । भक्तिमार्गें ॥ ३४॥

(बद्ध-संसारात गुतुन पडलेले, मुमुक्ष- ईश्वर दर्शनाची इच्छा असणारे मूर्ख- बेसावध, बेशिस्त, दक्ष- सावध,)

बध्दांचेच मुमुक्ष होतील व मूर्ख अतिदक्ष होतील. अभक्तांना भक्तिमार्गाच्या योगाने मोक्ष मिळेल.

नाना दोष ते नासती । पतित तेचि पावन होती । प्राणी पावे उत्तम गती । श्रवणमात्रें ॥ ३५॥

(दोष -चुकीचे व्यवहार, गैरव्यवहार, दुर्गुण नासती - निराकरण/निरसन होते, पतित - वाम मार्गी , सन्मार्गावरुन घसरलेले,प्राणी-मनुष्यप्राणी)

अनेक दोषांचा नाश होऊन पतित असतील तेच पावन होतील,तात्पर्य,हा ग्रंथ ऐकल्यानें प्राण्याला उत्तम गती मिळेलं.

नाना धोकें देहबुद्धीचे । नाना किंत संदेहाचे । नाना उद्वेग संसाराचे । नासती श्रवणें ॥ ३६॥

(देहबुद्दी - मी देह आहे" अशी समजूत , किंत- शंका)

देहबुध्दिमुळे येणारे अनेक प्रकारचे धोके,संशयाचे अनेक धागेदोरे,संसारातील अनेक उद्वेग हा ग्रंथ ऐकल्यानें नाश पावतील.

ऐसी याची फळश्रुती । श्रवणें चुके अधोगती । मनास होय विश्रांती । समाधान ॥ ३७॥

हा ग्रंथ ऐकल्यानें अधोगति चुकून मनास विश्रांति व समाधान मिळेल,अशी या ग्रंथाची फलश्रुति आहे.

जयाचा भावार्थ जैसा । तयास लाभ तैसा । मत्सर धरी जो पुंसा । तयास तेंचि प्राप्त ॥ ३८॥

(पुसा- पुरुष)

ज्याचा भावार्थ जसा असेल तसे त्याला फळ(लाभ) मिळेल.जो पुरुष (मनुष्य) मत्सर धरील त्याला तसलेंच (कुचकट) फळ मिळेल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे ग्रंथारंभलक्षणनाम समास पहिला ॥ १॥**

**समास दुसरा : गणेशस्तवन समास दुसरा : गणेशस्तवन ॥ श्रीराम ॥**

ॐ नमोजि गणनायेका । सर्व सिद्धिफळदायेका । अज्ञानभ्रांतिछेदका । बोधरूपा ॥ १॥

सर्व सिध्दिंचें फळ देणा-या,अज्ञानजन्य भ्रांतीचा (अज्ञानाच्या आवरणाचा) नाश करणा-या,ज्ञानस्वरुपा प्रणवरुपा अशा गणनायका,(मूळमायेंतील पुरुषा)महाराजा,तुला नमस्कार असो.

माझिये अंतरीं भरावें । सर्वकाळ वास्तव्य करावें । मज वाग्सुंन्यास वदवावें । कृपाकटाक्षेंकरूनी ॥ २॥

माझ्या अंतःकरणात व्यापून राहून तेथेंच नित्य वस्ती करुन रहा.तुझ्या कृपाकटाक्षाच्या योगाने मला मुक्याला आणि मुखदुर्बळाला बोलते करावें.

तुझिये कृपेचेनि बळें । वितुळती भ्रांतीचीं पडळें । आणी विश्वभक्षक काळें । दास्यत्व कीजे ॥ ३॥

तुझ्या कृपेच्या सार्मथ्यानें भ्रांतीचे (अज्ञानाचे) ढग वितळून जातात आणि सर्वभक्षक काळही दास्य करु लागतो.

येतां कृपेची निज उडी । विघ्नें कापती बापुडीं । होऊन जाती देशधडी । नाममात्रें ॥ ४॥

तू आपल्या कृपेची उडी घातलीस की विघ्ने दुबळीं होउन चळाचळा कापूं लागतात आणि तुझे नांव ऐकतांच देशोधडी पळतांत.

म्हणौन नामें विघ्नहर । आम्हां अनाथांचे माहेर । आदिकरूनी हरीहर । अमर वंदिती ॥ ५॥

म्हणून तुला विघ्नहर्ता म्हणतात. आम्हा अनाथांचे तू माहेर (ऊगमस्थान) आहेस.हरिहरादिक देव तुला नमस्कार करतात.

वंदूनियां मंगळनिधी । कार्य करितां सर्वसिद्धी । आघात अडथाळे उपाधी । बाधूं सकेना ॥ ६॥

तू मंगळनिधी म्ह. कल्याणाचा सागर आहेस अशा तुला नमस्कार करुन कार्य आरंभिल्यास तें सर्व सिध्दीस जाते. आघात, अडथळे,उपाधी यांचि पीडा होउ शकत नाही.

जयाचें आठवितां ध्यान । वाटे परम समाधान । नेत्रीं रिघोनियां मन । पांगुळे सर्वांगी ॥ ७॥

तुझ्या स्वरुपाचे ध्यान करताच अत्यंत प्रसंन्न वाटतें.मन इतर सर्व इंद्रिंयातून निघून फक्त डोळ्यांत येऊन बसतें.

सगुण रूपाची टेव । माहा लावण्य लाघव । नृत्य करितां सकळ देव । तटस्त होती ॥ ८॥

(टेव - ऐट,रुबाब)

तुझ्या स्वरुपाची ठेवण (तुझे सगुणरुप) अत्यंत लावण्यसंपन्न असून तूं कौशल्यानें किंवा चपलतेने (लाघवानें) नृत्य करु लागलास म्हणजे सर्व देव चकित होतात.

सर्वकाळ मदोन्मत्त । सदा आनंदे डुल्लत । हरूषें निर्भर उद्दित । सुप्रसन्नवदनु ॥ ९॥

(निर्भर उद्दित - अतिशय उल्हसित)

तूं सदा ब्रह्मानंदाने मस्त होउन डुलत असतोस. अतिशय आनंदामुळे तूं उल्हासयुक्त व प्रसंन्नवदन असतोस (तुझे मुख उल्हसित व प्रसन्न असतें).

भव्यरूप वितंड । भीममूर्ति माहा प्रचंड । विस्तीर्ण मस्तकीं उदंड । सिंधूर चर्चिला ॥ १०॥

तुझें वितंड म्हणजे गजाचे (हत्तींचे) स्वरुप भव्य आहे. अत्यंत प्रचंड अशी तुझी भयंकर मूर्ती आहे. तुझ्या विशाल मस्तकावर शेंदूर पुष्कळ माखलेला आहे.

नाना सुगंध परिमळें । थबथबा गळती गंडस्थळें । तेथें आलीं षट्पदकुळें । झुंकारशब्दें ॥ ११॥

(थबथबा -थबथबलेली,गच्च भरून वाहणारी,षटपद्कुले -संतसमूह (षटपद - भुंगे), झंकार शब्दे -घोंगावत)

तुझ्या गंडस्थळातून जो अत्यंत सुगंधयुक्त मदाचा स्त्राव होत असतो,तेथे भुंग्यांच्या झुंडी गुंजारव करीत येत असतात.

मुर्डीव शुंडादंड सरळे । शोभे अभिनव आवाळें । लंबित अधर तिक्षण गळे । क्षणक्षणा मंदसत्वी ॥ १२॥

(मुर्डीव शुंडादंड - मुरडलेली् सोटायुक्त सोंड , लंबित - लोंबणारा, अधर - खालचा ओठ, तिक्षण- उग्र् गंध, आवाळें - गंडस्थळ , मंदस्तवी - मंदपणे, हळूहळू, थोडावेळ )

तुझा मुरडलेला शुंडादंड (सोंड) सरळ होतो तेव्हा शोभतों, तसेच तुझें मनोहर गंडस्थळ व तुझा लोंबलेला अधरोष्ठ हे शोभायमान दिसतात.त्या गंडस्थळातून तीक्ष्ण मदस्त्राव क्षणोक्षणी ठिपकत असतो.

चौदा विद्यांचा गोसांवी । हरस्व लोचन ते हिलावी । लवलवित फडकावी । फडै फडै कर्णथापा ॥ १३॥

(हरस्व लोचन - बारीक् डोळे, हिलावी- उघडझाप करतो , लवलवित - लवचिक , कर्णथापा- कानाच्या पाळ्या , चौदा विद्यांचा - ४वेदविद्या , ६वेदांगशस्त्रे , ४ न्याय ,मीमांसा, पुराणे,धर्मशास्त्र)

तूं चौदा विद्यांचा स्वामी असून तूं (आपल्या बुध्दिमत्तेचे द्योतक असे) आपले डोळे हालवितोस (डोळ्यांची उघडझाप करतोस आणि लवलवीत असलेलें कान फडफडावीत असतोस.).

रत्नखचित मुगुटीं झळाळ ।नाना सुरंग फांकती कीळ । कुंडलें तळपती नीळ । वरी जडिले झमकती॥ १४॥

( मुगुटीं - मुकुटामध्ये , झळाळ - चमकतात, सुरंग - मनमोहक रंगीत , कीळ - नेत्रसुखद , झगमगाट , नयनमनोहर प्रकाश , नीळ - निळसर प्रकाश , झमकती - चकमक करतात.)

तुझ्या रत्नखचित मुकुटांची प्रभा,अनेक रंगांचे त्यांचे फाकणारे तेज,तेजस्वी नीळ ज्याच्यावर जडले आहेत अशा तुझ्या कुंडलांचे तळपणें.

दंत शुभ्र सद्दट । रत्नखचित हेमकट्ट । तया तळवटीं पत्रें नीट । तळपती लघु लघु ॥ १५॥

(सद्दट - घट्ट , हेमकट्ट - सुवर्णकडे , तळवटीं - तळाला )

तुझे पांढरे सफेत व घट्ट दांत,त्यावर बसविलेलीं सोन्याचीं व रत्नखचित कडीं,दातांच्याखालीं लावलेल्या झिरमिळ्यांचे तळपणे.

लवथवित मलपे दोंद । वेष्टित कट्ट नागबंद । क्षुद्र घंटिका मंद मंद । वाजती झणत्कारें ॥ १६॥

(लवथवित - थुलथुलीत , मलपे दोंद - हलते-विशाल पोट , वेष्टित - वेढलेला, कट्ट - कमरेला , नागबंद - नागाचा पट्टा , क्षुद्र घंटिका -लहान घुंगरु , झणत्कारें - झुणझुण आवाज करीत.)

तुझें थलथलीत हालणारें पोट, कमरेला कडदो-याप्रमाणे असलेले नागाचें वेष्टन,मंजुळ मंजुळ झणत्कार करणा-या (कमरेच्या किंवा पायांतील) बारीक घाग-या.

चतुर्भुज लंबोदर । कासे कासिला पितांबर । फडके दोंदिचा फणीवर । धुधूकार टाकी ॥ १७॥ डोलवी मस्तक जिव्हा लाळी । घालून बैसला वेटाळी । उभारोनि नाभिकमळीं । टकमकां पाहे ॥ १८॥
( कासे - कमरेला , कासिला - घट्ट कासोटा घातला , दोदीचा - पोटा धुधूकार -फुत्कार, जिव्हा- लाळी )

तुझ्या चार भुजा (हात) व विशाळ उदर,कमरेला कास घातलेला पीतांबर,तुझ्या पोटावरचा फूत्कार टाकीत डोलणारा व जिव्हा बाहेर काढून वेटोळे घालून बसलेला व नाभिकमळाच्या ठिकाणी फडा वर करुन टकामकां पाहणारा नाग (अशा तुझ्या सगुण रुपाचें वर्णन किती करावें).

नाना याति कुशुममाळा । व्याळपरियंत रुळती गळां । रत्नजडित हृदयकमळा- । वरी पदक शोभे ॥ १९॥

(नानायाती - विविध प्रकारच्या , कुशम - फुलाच्या , व्याळपरियंत - नागपट्ट्यापर्यंत ,

अनेक प्रकारच्या पुष्पमाळा तुझ्या सगळ्या नाभिस्थानाच्या सर्पापर्यंत लांब अशा तुझ्या गळ्यांत लोंबत आहेत.तुझ्या वक्षस्थळावर रत्नखचित पदक शोभत आहे.

शोभे फरश आणी कमळ । अंकुश तिक्षण तेजाळ । येके करीं मोदकगोळ । तयावरी अति प्रीति ॥ २०॥

( अंकुश तिक्षण तेजाळ - टोकदार तेजस्वी अंकुश, येके करीं - एकाहातावर )

तुझ्या एका हातात परशु,दुस-या हातात कमळ,तिस-या हातांत तीक्ष्ण धारेचा व चकाकणारा अंकुश असुन चवथ्या हातात तुझ्या अत्यंत  आवडीचा असा मोदक आहे.

नट नाट्य कळा कुंसरी । नाना छंदें नृत्य करी । टाळ मृदांग भरोवरी । उपांग हुंकारे ॥ २१॥

(भरोवरी - सामुग्री , उपांग हुंकारे - नृत्याचे वेळी होणाऱ्या हुंकारास नृत्याचे उपांग म्हणतात.)

हावभाव व कलाकौशल्य यांनीं तालयुक्त असें तालसुरांसहित अनेकप्रकारचें नृत्य तूं करतोस. टाळमृदंगादि वादनसामुग्रीही भरपूर असते,व नृत्याच्या वेळी हुंकार उठत असतों.

स्थिरता नाहीं येक क्षण । चपळविशईं अग्रगण । साजिरी मूर्ति सुलक्षण । लावण्यखाणी ॥ २२॥–

(चपळविशईं - चपळाइत)

क्षणभरहि तुझा पाय अगर अंगप्रत्यंग एके ठिकाणीं ठरत नाहीं,असा तूं चपळपणात श्रेष्ठ आहेस.तुझी सुंदर मूर्ति सुलक्षणी व लावण्याची केवळ खाण अशी आहे.

रुणझुणा वाजती नेपुरें । वांकी बोभाटती गजरें । घागरियासहित मनोहरें । पाउलें दोनी ॥ २३॥

( नेपुरे - नुपुरे , वांकी बोभाटती - दंडातील वाक्यांचा मोठा आवाज होतो.)

तुझ्या पायांतील नूपुरें (घाग-यांचे चाळ) रुणझुण वाजत आहेत,वाळ्यांचा मोठ्यानें नाद होत आहे आणि पायांतील घाग-यांमुळे ठेक्याने पडणारीं तुझी दोन्ही पावलें मनोहर दिसत आहेत.

ईश्वरसभेसी आली शोभा । दिव्यांबरांची फांकली प्रभा । साहित्यविशईं सुल्लभा । अष्टनायका होती ॥ २४॥

( दिव्यांबरांची - दिव्यवस्त्राचे , साहित्यविशईं सुल्लभा - साहित्य निर्मितीसाठी लाभदायक )

अशा तुझ्या ह्या (मनोवेधक) नृत्यामुळें ईश्वराच्या (शंकराच्या) सभेला मोठी शोभा आली आहे. तुझ्या दिव्य वस्त्रांचा प्रकाश सर्वत्र पसरलेला आहे. तुला सर्व प्रकारचे साहित्य सिध्द करुन देण्याविषयी अष्टनायिका तयार आहेत.

ऐसा सर्वांगे सुंदरु । सकळ विद्यांचा आगरु । त्यासी माझा नमस्कारु । साष्टांग भावें ॥ २५॥

( आगरु - स्वामी )

अशा सर्वांगसुंदर व सर्वविद्यांची खाण अशा गणेशा,तुला माझा भक्तिभावपूर्वक साष्टांग नमस्कार असो.

ध्यान गणेशाचें वर्णितां । मतिप्रकाश होये भ्रांता । गुणानुवाद श्रवण करितां । वोळे सरस्वती ॥ २६॥

( वोळे - प्रसन्न )

गणपतीच्या ध्यानाचें वर्णन केल्यानें वेड्याला-अज्ञान्याला सुध्दा उत्तम बुध्दि मिळेल आणी त्याचे गुणांनुवादन ऐकल्यानें सरस्वती प्रसन्न होईल.

जयासि ब्रह्मादिक वंदिती । तेथें मानव बापुडे किती । असो प्राणी मंदमती । तेहीं गणेश चिंतावा ॥ २७॥

ब्रह्मादिक देवही ज्याला नमस्कार करतात तेथे बिच्या-या माणसांचा काय पाड,असो. जे मंदबुध्दि असतील त्यांनी गणेशाचें चिंतन करावें-करीत जावे.

जे मूर्ख अवलक्षण । जे कां हीणाहूनि हीन । तेचि होती दक्ष प्रविण । सर्वविशईं ॥ २८॥

जे मुर्ख,कुलक्षणी,अत्यंत हीन असतील तेही सर्व विषयांमध्यें प्रविण व पारंगत होतील.

ऐसा जो परम समर्थ । पूर्ण करी मनोरथ । सप्रचीत भजनस्वार्थ । कल्लौ चंडीविनायेकौ ॥ २९॥

( सप्रचीत - अनुभवसिद्ध , कल्लौ - कलियुगात )

असा गणेश परम समर्थ असून,भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारा आहे.त्यांचे भजन केल्यास अनुभव तात्काळ मिळतो,म्हणून त्याचें भजन करणें हाच आपला स्वार्थ होय,कलौ चंडीविनायकौ म्हणजे कलियुगांत चंडी (देवी शारदा) व (देव) गणेश हीं दोन दैवतें जागृत आहेत,हे वचन प्रसिध्दच आहे. (ह्यांचे भजन जीवांना परम हितप्रत होतें ही गोष्ट अनुभवसिध्द आहे.)

ऐसा गणेश मंगळमूर्ती । तो म्यां स्तविला येथामति । वांछ्या धरूनि चित्तीं । परमार्थाची ॥ ३०॥

( येथामति - बुद्धीनुसार ,  वांछ्या - इच्छा)

मीं अंतःकरणांत परमार्थप्राप्तीचीं ईच्छा धरुन ह्या मंगलमुर्ति श्री गणेशाचें यथामति स्तवन केंलें आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गणेशस्तवननाम समास दुसरा ॥ २॥**

**समास तिसरा : शारदास्तवन**

शुध्द ब्रह्माच्या ठिकाणी एकोऽहं अशी जी मूळ स्फूर्ति झाली ती दोन प्रकारची आहे.वायो जाणीव मिळोन मेळा।मूळमाया बोलिजे। वायु व जाणिव मिळून मूळमाया,वायूला प्रकृति किंवा शारदा म्हणतात व जाणिवेचा जो अंश तो पुरुष किंवा गणेश होय,या उभयतांपासुन पूढे त्रिगुण झाले (सत्व रज तम) व त्रिगुणांचे ब्रह्मदेव विष्णु व शंकर हे देव झाले.त्यापुढें सृष्टि उत्पन्न झाली.

**समास तिसरा : शारदास्तवन ॥ श्रीराम ॥**

आतां वंदीन वेदमाता । श्रीशारदा ब्रह्मसुता । शब्दमूल वाग्देवता । माहं माया ॥ १॥

आतां श्रीशारदेला नमस्कार करतों. शारदा ही सर्व शब्दसृष्टीचें मूळ म्हणून ती वेंदांची माता व वाणीची देवता होय,मूळमाया तीच होय.मूळब्रह्माच्या एकोऽहं या संकल्पाबरोबर ही मूळमाया शारदा झाली, म्हणून तिला ‘ब्रह्मसुता’ म्हटले आहे.

जे उठवी शब्दांकुर । वदे वैखरी अपार । जे शब्दाचें अभ्यांतर । उकलून दावी ॥ २॥

(अभ्यांतर - अंतरंग, शब्दांकुर - सूक्ष्मनाद)

तीं परमवाणीच्या रुपानें शब्दांचे स्फूरण उठवून वैखरीरुपानें असंख्य शब्दांचा उच्चार करविते व शब्दांचे रहस्य उकलून दाखविते.(परा,पश्यंती,मध्यमा व वैखरी हे वाणींचे चार प्रकार होत).

जे योगियांची समाधी । जे धारिष्टांची कृतबुद्धी । जे विद्या अविद्या उपाधी । तोडून टाकी ॥ ३॥

ती योग्यांची समाधी होय.(योगी तेथे विश्रांति पावतात.)-धैर्यवंतांची (स्थितप्रज्ञांची) निश्र्चयी बुध्दि तीच होय.(तिच्या साह्याने बुध्दि स्थिर असते)ती विद्या म्हणजे ज्ञान व अविद्या म्हणजे अज्ञान या दोन्ही उपाधी तोडून टाकते.

जे माहापुरुषाची भार्या । अति सलग्न अवस्था तुर्या । जयेकरितां महत्कार्या । प्रवर्तले साधु ॥ ४॥

प्रकृति रुप शारदेला पुरुषरुप गणेशाची स्त्री मानतात.ती महापुरुष गणेशाची भार्या आहे.तुर्यावस्थेला ती फार जवळ आहे,तिच्या सत्तेंनें साधु,सत्पुरुष हे श्रेष्ठ कार्यास प्रवृत्त झाले आहेत.

जे महंतांची शांती । जे ईश्वराची निज शक्ती । जे ज्ञानियांची विरक्ती । नैराशशोभा ॥ ५॥

तिच्यामुळेंच महंतांना शांति मिळते,ती ईश्र्वर जो गणेश त्याची बीजशक्ति होय,ज्ञानी पुरुषांचे वैराग्य तिच्याचमुळे आहे. नैराश्याची शोभा तीच.

जे अनंत ब्रह्मांडें घडी । लीळा विनोदेंचि मोडी । आपण आदिपुरुषीं दडी । मारून राहे ॥ ६॥

असंख्य ब्रह्मांडें ती लीलेनें घडविते (उत्पन्न करते.) व मोडूनही टाकते (लय करतें) आणि स्वतः मूळपुरुषाचे ठिकाणीं लीन होते.

जे प्रत्यक्ष पाहातां आडळे । विचार घेतां तरी नाडळे । जयेचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥ ७॥

पहावयास गेलें तर (तिचें कार्य जी सृष्टि) ती दिसते,पण विचारानें तिचा शोध घेतल्यास ती सांपडत नाही.(तिच्या मागाहून उत्पन्न झालेल्या) ब्रह्मादिक देवांनाहि तिचा थांगपत्ता लागत नाही.

जे सर्व नाटक अंतर्कळा । जाणीव स्फूर्ती निर्मळा । जयेचेनी स्वानंदसोहळा । ज्ञानशक्ती ॥ ८॥

प्राणिमात्रांच्या सर्व चेष्टांची (नाटक) ती अंर्तकळा(प्रेरकशक्ति) आहे. शुध्द स्फूर्तिरुप जाणीव तीच.ती ज्ञानशक्ति असल्यामुळें तिच्याच योगानें सर्वांना ब्रह्मानंदाचा सोहळा भोगावयास मिळतो.

जे लावण्यस्वरूपाची शोभा ।जे परब्रह्मसूर्याची प्रभा । जे शब्दीं वदोनि उभा । संसार नासी॥ ९॥

( जे शब्दीं वदोनि- जी नादब्रह्माच्या आवाजाने)

ती लावण्याचें लावण्य आहें,परब्रह्म सुर्याची प्रभा आहे. तत्वमस्यादि महावाक्यांचा आधार घेऊन ती संसाराचा हां हां म्हणतां नाश करते (ती संसारभ्रमाचे निरसन करते.)

जे मोक्षश्रिया माहांमंगळा । जे सत्रावी जीवनकळा। हे सत्त्वलीळा सु-सीतळा ।लावण्यखाणी ॥१०॥

(जीवनकळा -ब्रह्मरंद्रन्ध्रातून पाझरणारा रस, सत्त्वलीळा--सत्वशील, सुसीतळा-शांतप्रधान,सुशांता, जे मोक्षश्रिया - मोक्षाचे वैभव , सत्रावी-जीवन हे ५ ज्ञानेंद्रिये,५ कर्मेंद्रिये,५ प्राण व अंतःकारण अशा १६ कलांचे असते आणि या सर्वांना चेतना देणारी शारदा ही सतरावी कळा)

ती अत्यंत मंगल (कल्याणप्रद) अशी आहे,मोक्षरुप लक्ष्मी आहें. ब्रह्मरंध्रातून स्त्रवणारी सत्रावी जीवनकला ती आहे ती परमसत्वस्वरुप,शांतिरुप व लावण्याची खाण अशी आहे.

जे अवेक्त पुरुषाची वेक्ती।विस्तारें वाढली इच्छाशक्ती ।जे कळीकाळाची नियंती।सद्‌गुरुकृपा॥११॥

(वेक्ती-व्यक्त करणारी,निर्माती,जननी)

अव्यक्त पुरूष (गणेश) तिच्याच द्वारे व्यक्तित्वाला येतो-सगुण साकार होतो (अव्यक्त परब्रह्माची व्यक्त दशा तीच होय)त्याच्या ईच्छाशक्तिचा विस्तार करुन जगदरुपाने तीच वाढली.कळिकाळाचे नियमन करणारी सद्गुरु (परब्रह्म) स्वरुपाला पोहचविणारी तीच होय.

जे परमार्थमार्गींचा विचार-। निवडून, दावी सारासार। भवसिंधूचा पैलपार । पाववी शब्दबळें ॥ १२॥

(निवडून, दावी सारासार- आत्मानात्मविवेकाने सार-असार याची निवड करते.)

ती परमार्थमार्गातील सारासार विचार निवडून दाखविते,आणि शब्दांचे साहाय्यानें भवसमुद्राचे पैलतीराला नेऊन पोचविते.

ऐसी बहुवेषें नटली । माया शारदा येकली । सिद्धचि अंतरी संचली । चतुर्विधा प्रकारें ॥ १३॥

( चतुर्विधा - ४ प्रकारची वाणी)

या प्रमाणें ही एकटी मायारूप शारदा अनेंक रुपानें नटलेली आहे,चार वाणींच्या रुपानें ती या पिंडामध्ये (देहामध्ये) प्रत्यक्ष उभी आहे.

तींहीं वाचा अंतरीं आलें । तें वैखरिया प्रगट केलें । म्हणौन कर्तुत्व जितुकें जालें । तें शारदागुणें ॥ १४॥

अंतःकरणामध्ये तीन वाणींच्या योगानें जी कल्पना उत्पन्न होईल ती वैखरीवाणी बोलून प्रकट करते;म्हणून जगांत जे जे कार्य होते तें शारदेमुळे होतें. (कर्तृत्वाचें मूळ मूळमायारुप शारदाच होय.)

जे ब्रह्मादिकांची जननी । हरीहर जयेपासुनी । सृष्टिरचना लोक तिनी । विस्तार जयेचा ॥ १५॥

हरि-हर ब्रह्मादिक यांची ती जन्मदाती माता असून (सत्व-रज-तमात्मक) त्रैलोक्यांतील सृष्टिरचना हा तिचाच विस्तार आहें.

जे परमार्थाचें मूळ । नांतरी सद्विद्याची केवळ । निवांत निर्मळ निश्चळ । स्वरूपस्थिती ॥ १६॥

( नांतरी - इतकेच नव्हे तर)

ती परमार्थाचें (मोक्षाचें) मूळ किंबहुना ती केवळ ब्रह्मविद्याच होयं. निंवांत,निर्मळ व निश्र्चळ अशी आत्मस्थिति म्हणजे शारदा.

जे योगियांचे ध्यानीं । जे साधकांचे चिंतनीं । जे सिद्धांचे अंतःकर्णी । समाधिरूपें ॥ १७॥

योगीं तिचेच ध्यान करतातं (योग्यांचे ध्यान ते तिचेंच रुप),साधकांचे चिंतनात जें असतें तें तिचेच रुप,सिध्दांच्या अंतकःरणातील समाधि तें तिचेंच रुप.

जे निर्गुणाची वोळखण । जे अनुभवाची खूण । जे व्यापकपणें संपूर्ण । सर्वांघटीं ॥ १८॥

( व्यापकपणें-सर्वाना व्यापून राहिलेली)

निर्गुणरुप अमुक प्रकारचे आहे असें वाटणें हें तिचेच रुपं. अनुभवाची खूण-अमुक हें कळणें-हे तिचेंच रुप ती सर्व प्राणिमात्रांमध्यें व्यापकपणानें परिपूर्ण भरलेली आहें.

शास्त्रें पुराणें वेद श्रुति । अखंड जयेचें स्तवन करिती । नाना रूपीं जयेसी स्तविती । प्राणीमात्र ॥ १९॥

( शास्त्रें - पूर्वमिमांसा,उत्तरमिमांसा,न्याय,सांख्य,वैशेषिक,योग)

शास्त्रे,पुराणें,वेद-श्रुति हीं तिचें अखंड स्तवन करीत असतातं.सर्व प्राणी अनेक रुपांनीं (अनेक उपास्यें कल्पून)तिचीच स्तुति करतात.

जे वेदशास्त्रांची महिमा । जे निरोपमाची उपमा । जयेकरितां परमात्मा । ऐसें बोलिजे ॥ २०॥

वेदशास्त्रें शारदेंचे स्तवन करितात म्हणून वेदशास्त्रांची थोरवी हें तिचेंच रुप,निरुपम परब्रह्माची उपमा तीच,तिच्या सापेक्षतेमुळेंच निर्नाम अशा परब्रह्माला परमात्मा असें नांव दिले जातें.

नाना विद्या कळा सिद्धी । नाना निश्चयाची बुद्धी । जे सूक्ष्म वस्तूची शुद्धी । ज्ञेप्तीमात्र ॥ २१॥

(ज्ञेप्तीमात्र - केवळ ज्ञानमय शुद्ध जाणीवेने,संवेदनेने,ज्ञान स्वरूपाने)

अनेक (चौदा) विद्या,चौसष्टकला. अष्ट महासिध्दी,तसेच बुध्दींतील अनेक प्रकारचें निश्र्चय,केवळ जाणीवस्वरुप असें परमात्मवस्तुंचें सूक्ष्मज्ञान हीं सर्व तिंचींच स्वरुपे होत.

जे हरिभक्तांची निजभक्ती । अंतरनिष्ठांची अंतरस्तिथी । जे जीवन्मुक्तांची मुक्ती । सायोज्यता ते ॥ २२॥

भगवद्भक्तांची आत्मरतिरुप भक्ति, अंर्तर्निष्ठांची आत्मनिष्ठा,जीवनमुक्तांची सायुज्यमुक्ति (मुक्तस्थिती) हीं तिचीच स्वरुपें होत.

जे अनंत माया वैष्णवी । न कळे नाटक लाघवी । जे थोराथोरासी गोवी । जाणपणें ॥ २३॥—

( नाटक लाघवी - मनमोहक अभिनयाने रचलेले, थोराथोरासी - मोठ्या ज्ञानी समजल्या जाणा-या, जाणपणें - ज्ञानाभिमानामुळे )

मोठमोठ्यांना ज्ञानाभिमानांत गुंतवणारी अशी ती वैष्णवी माया अनंत आहे.तिचें लीलालाघव-थोरांथोरांस-कोणासही कळावयाचें नाहीं.

जें जें दृष्टीनें देखिलें । जें जें शब्दें वोळखिलें । जें जें मनास भासलें । तितुकें रूप जयेचें ॥ २४॥

तात्पर्य दृष्टीला दिसणारें,शब्दांनें ओळखिलें जाणारें व मनाला भासणारे जें जें काहीं आहें तें तें सर्व तिचेच रुप होय.

स्तवन भजन भक्ति भाव । मायेंवाचून नाहीं ठाव । या वचनाचा अभिप्राव । अनुभवी जाणती ॥ २५॥

( ठाव - आधार,मदत)

स्तवन,भजन,भक्तिभाव इत्यादि काहींही साधन करावयांचें असले तरी तें मायेवाचून कोणाचेही (कोणालाही) करता येत नाही,या म्हणण्यांतील आशय किंवा वर्म अनुभवी असतील तेंच जाणतील.

म्हणौनी थोराहुनि थोर । जे ईश्वराचा ईश्वर । तयेसी माझा नमस्कार । तदांशेंचि आतां ॥ २६॥

( तयेसी - त्या शारदेला , तदांशेंचि - शारदा हिच माया, त्या शारदेच्या) अंशरूपाने तादात्म्य पावून )

यास्तव हरिहरादिंक जें थोर त्यांपेक्षाही थोर जी ईश्र्वराचा ईश्र्वर अशा शारदेला मी तिचाच अंश तिच्याशी तन्मय होऊन नमस्कार करतों.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शारदास्तवननाम समास तिसरा ॥ ३॥**

### समास चवथा : सद्‌गुरुस्तवन ॥ श्रीराम ॥

आतां सद्‌गुरु वर्णवेना । जेथें माया स्पर्शों सकेना । तें स्वरूप मज अज्ञाना । काये कळे ॥ १॥

आता सद्गुरुचे स्तवन करावयाचे पण त्या (ब्रह्म) स्वरुपाला माया स्पर्शही करु शकत नाहीं.(मायेच्या पलिकडचें तें आहें) तें स्वरुप मला अज्ञान्याला कसें कळणार ?, म्हणून मला सद्गुरुस्वरुपाचे वर्णन कसे करता येईल ?

न कळे न कळे नेति नेति । ऐसें बोलतसे श्रुती । तेथें मज मूर्खाची मती । पवाडेल कोठें ॥ २॥

( श्रुती - वेद, पवाडेल-आकलन करेल. )

नेति नेति म्हणजे असें नव्हे कळत नाही कळत नाही असे श्रुति ज्या स्वरुपाबद्दल म्हणत आहें त्या ठिकाणीं मजसारख्या मूर्खाच्या बुध्दीचा प्रवेश कोठुन होणार ?

मज न कळे हा विचारु । दुर्‍हूनि माझा नमस्कारु । गुरुदेवा पैलपारु । पाववीं मज ॥ ३॥

कसे वर्णन करावे हे मला कळत नाहीं म्हणून मी येथूनच ( लांबून,देहबुध्दींतूनच ) नमस्कार करतो आणि प्रार्थना करतों की,गुरुदेवा,मला संसारातून पलीकडे न्या.

होती स्तवनाची दुराशा । तुटला मायेचा भर्वसा । आतां असाल तैसे असा । सद्‌गुरु स्वामी ॥ ४॥

( दुराशा - अशक्य अपेक्षा)

सद्गुरुचें स्तवन करीन,अशी अवास्तव खोटी इच्छा मला होती, पण मायेचा आधार तुटला.तेव्हा सदगुरु महाराज,आपण असाल तसे असा (एवढेंच म्हणतो)

मायेच्या बळें करीन स्तवन । ऐसें वांछित होतें मन । माया जाली लज्यायमान । काय करूं ॥ ५॥

मायेच्या आश्रयाने तुमचें स्तवन करावें अशी वासना होती पण ती मायाच (तुम्हाला पाहुन-तुमचें नाव घेंताच)लज्जित झाली,आतां काय करावे ?

नातुडे मुख्य परमात्मा । म्हणौनी करावी लागे प्रतिमा । तैसा मायायोगें महिमा । वर्णीन सद्‌गुरूचा ॥ ६॥

( नातुडे - आकलन होत नाही.)

मुख्य परमात्मा सांपडत नाहीं (त्याचें यथार्थ आकलन होत नाही.) म्हणून (उपासनेसाठीं) त्याची प्रतिमा करावी लागतें, त्याप्रमाणे ( सद्गुरुस्वरुप अगम्य आहे तरी ) मायेंच्या आश्रयानें सद्गुरुस्वरुप मी वर्णन करतो.

आपल्या भावासारिखा मनीं । देव आठवावा ध्यानीं । तैसा सद्‌गुरु हा स्तवनीं । स्तऊं आतां ॥ ७॥

आपल्या मनांत जसा भाव असेल तशा प्रकारचें देवाचें ध्यान आपण करतों. त्याप्रमाणेंच (आपल्या भावार्थानुरुप) मी आतां सदगूरुची स्तुति करतों.

जय जया जि सद्‌गुरुराजा । विश्वंभरा बिश्वबीजा । परमपुरुषा मोक्षध्वजा । दीनबंधु ॥ ८॥

सद्गुरुराज,महाराजा! तुझा जयजयकार असों. तूं विश्र्वाचें मूळ कारण आहेस व विश्र्वाचें पोषणहि तूचं करतोस.तूं परम पुरुष व दीनबंधु असून, मोक्षध्वज (शरण आलेल्यांना मोक्ष देण्याचें ब्रीद आहें-मोक्ष ज्याच्या ध्वजावर आहे असा) आहेस.

तुझीयेन अभयंकरें । अनावर माया हे वोसरे । जैसें सूर्यप्रकाशें अंधारें । पळोन जाये ॥ ९॥

तुझा अभयहस्त शरणागताचें माथ्यावर पडला म्हणजें सूर्यप्रकाशानें काळोख जसा ताबडतोब नाहींसा होतों,तद्वत हीं अनावर माया पार नाहीशी होतें.

आदित्यें अंधकार निवारे । परंतु मागुतें ब्रह्मांड भरे । नीसी जालियां नंतरें । पुन्हां काळोखें ॥ १०॥

( नीसी - रात्र )

सूर्योदय झाला की अंधार नाहींसा होतो,परंतु अस्तमानी रात्र झाली की काळोंखानें पुन्हा सारें ब्रह्मांड भरुन जातें.

तैसा नव्हे स्वामीराव । करी जन्ममृत्य वाव । समूळ अज्ञानाचा ठाव । पुसून टाकी ॥ ११॥

( वाव - अंतर,दूर करतो,मुक्त करतो)

तसा (सूर्याप्रमाणें उदयास्त-जन्ममृत्यु भोगणारा) सद्गुरुस्वामी नाहीं. तोंच दुस-याच्या अज्ञानाचा समूळ नायनाट करुन टाकून,त्याचे जन्ममृत्यु चुकवितों.(जन्म-मृत्युरुप संसार सद्गुरुंनी एकदा पुसुन टाकला,कीं मायेचीं रात्र पुन्हा कधींही यायचीच नाहीं.)

सुवर्णाचें लोहो कांहीं । सर्वथा होणार नाहीं । तैसा गुरुदास संदेहीं । पडोंचि नेणे सर्वथा ॥ १२॥

(परिसाचे योगाने एकदा लोखंडाचे सोने झालें की) त्या सोन्याचें लोखंड कधींही व्हावयाचे नाहीं त्याप्रमाणे जो गुरुदास (सद्गुरुकृपेने ब्रह्मस्वरुप ) झाला तों पुन्हां (जीवपणाच्या) संशयात कधींहिं पडावयाचा नाहीं.

कां सरिता गंगेसी मिळाली। मिळणी होतां गंगा जली। मग जरी वेगळी केली। तरी होणार नाहीं सर्वथा॥ १३॥

किंवा,सामान्य नदी गंगेला मिळाली म्हणजे संगमानंतर ती गंगाच होते,मग तिला गंगेपासून वेगळी करावयाची म्हटलें तरी ती कधींही वेगळी करता येत नाहीं.

परी ते सरिता मिळणीमागें । वाहाळ मानिजेत जगें । तैसा नव्हे शिष्य वेगें । स्वामीच होये ॥ १४॥

( वाहाळ - ओढा,नाला)

परंतु संगमाच्या मागें त्या नदीला लोक ओढा (सामान्य नदी) म्हणूनच मानतात. सद्गुरुंना शरण गेलेल्या शिष्याचें तसे नाहीं.तो गुरुकृपेला पात्र झाला कीं त्याचे शिष्यत्व जाऊन तो स्वामीच होतो.

परीस आपणा ऐसें करीना । सुवर्णे लोहो पालटेना । उपदेश करी बहुत जना । अंकित सद्गुरूचा ॥ १५॥

(परिसाच्या दृष्टांतातही आणखी एक उणेपणा आहे) परीस लोखंडाचे सोने करतो पण आपले परिसत्व देत नाहीं म्हणजे लोखंडाच्या बनलेल्या त्या सोन्याच्या योगानें दुस-या लोखंडाचे सोने होत नाही,परंतु सद्गुरुंचा जो सेवक (शिष्य) असतो तो अनेक लोकांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश करतों.

शिष्यास गुरुत्व प्राप्त होये । सुवर्णे सुवर्ण करितां न ये । म्हणौनी उपमा न साहे । सद्गुरूसी परिसाची ॥ १६॥

म्हणून सद्गुरुकृपेंनें शिष्याला सद्गुरुत्व प्राप्त होते, परंतु सोन्याने लोखंडाचे सोने करता येत नाहीं.ह्यासाठी सद्गुरुंना परिसाची उपमा शोभत नाहीं.

उपमे द्यावा सागर । तरी तो अत्यंतची क्षार । अथवा म्हणों क्षीरसागर । तरी तो नासेल कल्पांतीं ॥ १७॥

( क्षीरसागर - दुधाचा समुद्र )

सद्गुरुंना समुद्राची उपमा द्यावी तर तो अतिशयच खारट,(आणि सद्गुरु अमृत-मोक्ष-स्वरुप,आणि सद्गुरु अमृतरुप म्हणून) त्यांना क्षीरसागराची उपमा द्यावी तर तो कल्पांतीं नाश पावणारा आहें (सद्गुरुस्वरुप शाश्वत आहें).

उपमे द्यावा जरी मेरु । तरी तो जड पाषाण कठोरु । तैसा नव्हे कीं सद्गुरु । कोमळ दिनाचा ॥ १८॥

(श्रेष्ठपणासाठीं) मेरुची उपमा द्यावी ते तो जड व कठोर असा पाषाण! सद्गुरु तसे नाहींत,ते दीनांविषयीं अत्यंत कोमल आहेत.

उपमे म्हणों गगन । तरी गगनापरीस तें निर्गुण । या कारणें दृष्टांत हीण । सद्‌गुरूस गगनाचा ॥ १९॥

(व्यापकपणास्तव किंवा गांभीर्यास्तव) आकाशाची उपमा द्यावी तर आकाशापरताही सद्गुरु निर्गुण (सगुण-निर्गुणातीत) आहें. (आकाश निर्गुण खरें परंतु तें पंचभूतांपैकी एक असल्यामुळें अखेर गुणांतच येंतें व अशाश्वत ठरतें) यासाठीं सद्गुरुंना आकाशाचा द्दष्टांत अनुचित आहें.

धीरपणे उपमूं जगती । तरी हेहि खचेल कल्पांतीं । म्हणौन धीरत्वास दृष्टांतीं । हीण वसुंधरा ॥ २०॥

( खचेल - नाश पावेल, धीरत्वास - सद्‌गुरुस)

धैर्य व सोशिकता यासाठीं पृथ्वीची उपमा द्यावी तर ती पृथ्वीही कल्पांतीं नाश पावणारी आहे. (आणि सद्गुरुस्वरुप नित्य शाश्वत) म्हणून सद्गुरुंच्या धैर्याला पृथ्वीचा द्दष्टांत कमीच.

आतां उपमावा गभस्ती । तरी गभस्तीचा प्रकाश किती । शास्त्रें मर्यादा बोलती । सद्‌गुरु अमर्याद ॥ २१॥

( गभस्ती - सूर्य )

आतां तेजास्तव सुर्याची उपमा द्यावी तर सुर्याचा प्रकाश तो किती! त्याच्या प्रकाशाला मर्यादा आहेत असे शास्त्रे सांगतात.आणि सद्गुरुंचा ज्ञानप्रकाश अमर्याद आहे.

म्हणौनी उपमे उणा दिनकर ।सद्‌गुरुज्ञानप्रकाश थोर ।आतां उपमावा फणीवर ।तरी तोहि भारवाही ॥२२॥

( फणीवर - शेषनाग)

यासाठी सद्गुरुंचा ज्ञानप्रकाश अतिशय मोठा असल्यामुळे सूर्यसुध्दा उपमेला कमी पडतों. त्यांना शेषाची उपमा द्यावी तर तो भारवाही आहे. ( आणि सद्गुरु शिष्यांचा भार उतरतात.) वेगळेपणा उरत नाही म्हणून भारच नाहीं ,तर भारवाहक तरी कसे ?

आतां उपमे द्यावें जळ । तरी तें काळांतरीं आटेल सकळ । सद्‌गुरुरूप तें निश्चळ । जाणार नाहीं ॥ २३॥

आता जळांची उपमा द्यावी तर तें सुध्दा कालांतरानें आटून जाणारें आहे. आणि सद्गुरुस्वरुप निश्र्चळ (स्थिर,न आटणारें) आहें.ते कधीहि आटून जावयाचे नाहीं.

सद्‌गुरूसी उपमावे अमृत । तरी अमर धरिती मृत्यपंथ । सद्‌गुरुकृपा यथार्थ । अमर करी ॥ २४॥

सद्गुरुंना अमृताची उपमा द्यावी तर तें अमृत पिणारें देव मृत्यु पावतात आणि सद्गुरुकृपा शिष्याला खरोखरीच अमर (मरणरहित) करतें.

सद्‌गुरूसी म्हणावें कल्पतरु । तरी हा कल्पनेतीत विचारु । कल्पवृक्षाचा अंगिकारु । कोण करी ॥ २५॥

सद्गुरुंना कल्पतरु म्हणावें तर (कल्पतरु कल्पिलेलेंच-इच्छिलेंलें तेवढेच देतों आणि सद्गुरु) कल्पनेचा अंत करुन निर्विकल्पपद देतात.मग त्या कल्पवृक्षांचा अंगीकार कोण करील ?

चिंता मात्र नाहीं मनीं । कोण पुसे चिंतामणी । कामधेनूचीं दुभणीं । निःकामासी न लगती ॥ २६॥

( दुभणीं - धार काढणे, निःकाम - निरिच्छ )

(सद्गुरुकृपेने) मनामध्यें अजिबात चिंता मुळीच उरत नाही. तर चिंतामणीला कोण पुसतो ?आणि निष्काम (निरिच्छ) झालेल्यांना कामधेनूच्या दुभत्याची किंवा पान्ह्याची गरज नसते.

सद्‌गुरु म्हणों लक्ष्मीवंत । तरी ते लक्ष्मी नाशिवंत । ज्याचे द्वारीं असे तिष्टत । मोक्षलक्ष्मी ॥ २७॥

सद्गुरुंना लक्ष्मीवंत म्हणावे तर ती लक्ष्मी नाशिवंत आहे.सद्गुरुंच्या द्वारीं मोक्षलक्ष्मी (आज्ञेची वाट पहात) बसली आहें.

स्वर्गलोक इंद्र संपती । हे काळांतरीं विटंबती । सद्‌गुरुकृपेची प्राप्ती । काळांतरीं चळेना ॥ २८॥

स्वर्गलोक, इंद्राची संपत्ति ही कालांतराने नाश पावणारीं  सद्गुरुंकृपेने प्राप्त होणारे फळ हे कधींही ढळणारें नाहीं.

हरीहर ब्रह्मादिक । नाश पावती सकळिक । सर्वदा अविनाश येक । सद्‌गुरुपद ॥ २९॥

हरिहरब्रह्मादिक सर्व नाश पावणारे आहेत. आणि सर्वकाळ अविनाशी असे एक सद्गुरुंपद आहें.

तयासी उपमा काय द्यावी । नाशिवंत सृष्टी आघवी । पंचभूतिक उठाठेवी । न चले तेथें ॥ ३०॥

( आघवी - सगळी )

सगळी सृष्टि ही नाश पावणारी आहें,तेव्हा तेथील पदार्थांची त्यांना उपमा कशी द्यावी ? पंचभूतांचा (पंचभौतिक सृष्टींतील पदार्थांचा )खटाटोप त्या सद्गुरुंपदापुढे चालत नाहीं.

म्हणौनी सद्‌गुरु वर्णवेना । हे गे हेचि माझी वर्णना । अंतरस्थितीचिया खुणा । अंतर्निष्ठ जाणती ॥ ३१॥

( हे गे - हेच सद्गुरूचे वर्णन , अंतर्निष्ठ - अंतःकरणात निष्ठा असलेले )

म्हणुन सदगुरुंचे वर्णन करता येत नाहीं. ही-हीच माझी स्तुती (त्यांच्या चरणीं) अर्पण असो ही अंतः स्थितीची खूण अंतर्निष्ठ पुरुषच जाणतील.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सद्गुरुस्तवननाम समास चवथा ॥ ४॥**

**समास पांचवा : संतस्तवन ॥ श्रीराम ॥**

आतां वंदीन सज्जन । जे परमार्थाचें अधिष्ठान । जयांचेनि गुह्यज्ञान । प्रगटे जनीं ॥ १॥

परमार्थाला आधारभूत अशा सत्पुरुषांना आंता मी नमस्कार करतों.जनांना गुप्त असलेलें आत्मज्ञान त्यांच्यामुळे प्रकट होते.

जे वस्तु परम दुल्लभ । जयेचा अलभ्य लाभ । तेंचि होये सुल्लभ । संतसंगेकरूनी ॥ २॥

( वस्तु - सद्वस्तु,परब्रह्म )

अत्यंत दुर्लभ असणारें व ज्याचा लाभ झाला म्हणजें मोठे अपूर्व वाटतें असे परब्रह्म सत्संगतीच्या योगानें सुलभ होंतें.

वस्तु प्रगटचि असे । पाहातां कोणासीच न दिसे । नाना साधनीं सायासें । न पडे ठाईं ॥ ३॥

परब्रह्मवस्तु तर प्रकटच आहें,पण पहावयाला जावें तर स्थूलदृष्टीच्या कोणालाच ती दिसत नाहीं,अनेक साधनांचे कष्ट केले तरी प्राप्त होत नाहीं.

जेथें परिक्षवंत ठकले । नांतरी डोळसचि अंध जाले । पाहात असताअंचि चुकले । निजवस्तूसी ॥ ४॥

मोठमोठे परीक्षक येथे चुकतात किंवा चांगले डोळस असून आंधळे बनतात,ते आत्मवस्तु पहात असताना ती आत्मवस्तु त्यांना सांपडत नाही.

हें दीपाचेनि दिसेना । नाना प्रकाशें गवसेना । नेत्रांजनेंहि वसेना । दृष्टीपुढें ॥ ५॥

दिव्याच्या योगानें ती आत्मवस्तु दिसत नाहीं. किंवा दुस-या कोणत्याही प्रकाशाने ती सांपडत नाहीं किंवा डोळ्यांत अंजन घातले तरी ती दिसत नाहीं.

सोळां कळी पूर्ण शशी । दाखवू शकेना वस्तूसी । तीव्र आदित्य कळारासी । तोहि दाखवीना ॥ ६॥

सोळा कलांचा पुर्णचंद्र किंवा कलाराशि असा प्रखर सूर्य हे दोघेही ती वस्तु दाखवूं शकत नाहींत.

जया सुर्याचेनि प्रकाशें । ऊर्णतंतु तोहि दिसे । नाना सूक्ष्म पदार्थ भासे । अणुरेणादिक ॥ ७॥ चिरलें वाळाग्र तेंहि प्रकासी । परी तो दाखवीना वस्तूसी । तें जयाचेनि साधकांसी । प्राप्त होये ॥ ८॥

( वाळाग्र - केसाचे टोक)

ज्याच्या प्रकाशाने लोकरीचा बारीक धागा (कोळ्याच्या जाळ्यातील बारीक तंतु ) अथवा अणुरणुसारखे सूक्ष्म पदार्थ दिसतात,फार काय ? केसाचे चिरलेले टोकसुध्दा दिसतें,असा सूर्य आहें; पण तोसुध्दां परमसुक्ष्म अशी परमात्मवस्तु दाखवुं शकत नाहीं.अशी परमात्मवस्तु साधुसंतांच्या योगानें साधकांना प्राप्त होतें.

जेथें आक्षेप आटले । जेथें प्रेत्न प्रस्तावले । जेथें तर्क मंदावले । तर्कितां निजवस्तूसी ।९। वळे विवेकाची वेगडी । पडे शब्दाची बोबडी । जेथें मनाची तांतडी । कामा नये ॥ १०॥

(प्रेत्न - प्रयत्न, वेगडी` - लुळा पडतो.)

ज्या आत्मवस्तुच्या प्राप्तीसाठी अनुमान संपले,प्रयत्न थकले व तर्क मंदावले, विवेकाची खोकडी वळली,(विवेकाचें बळ चालत नाहीं) व शब्दाची बोबडी वळली;मनाचा चपळपणा कामास येत नाहीं;

जो बोलकेपणें विशेष । सहस्र मुखांचा जो शेष । तोहि सिणला निःशेष । वस्तु न संगवे ॥ ११॥

सहस्त्रमुखांचा शेष भाषण करण्यात मोठा पटाईत पण तोसुध्दा ज्या वस्तुचें वर्णन करतां करतां थकुन गेला. व तिचें वर्णन त्याला साग्र करतां येईनां.

वेदे प्रकाशिलें सर्वही । वेदविरहित कांहीं नाहीं । तो वेद कोणासही । दाखवूं सकेना ॥ १२॥

सर्व ज्ञान कांही वेंदांने प्रकट केलें,वेदाहून वेगळे कोणतेच ज्ञान नाहीं असा तो वेद,पण तो सुध्दा ती वस्तु कोणालाच दाखवु शकत नाहीं.

तेचि वस्तु संतसंगें । स्वानुभवें कळों लागे । त्याचा महिमा वचनीं सांगे । ऐसा कवणु ॥ १३॥

( कवणु - कोण)

अशी वस्तु संतसंगतीच्या योगानें स्वानुभवानें कळुन येतें.अशा त्या सतसंगाचा महिमा शब्दांनीं वर्णन करील असा कोण आहे ?

विचित्र कळा ये मायेची । परी वोळखी न संगवे वस्तूची । मायातीता अनंताची । संत सोये सांगती ॥ १४॥

या मायेची कला (शक्ति) मोठी आश्र्चर्यकारक आहें. पण तिलासुध्दा वस्तुची ओळख करुन देंता येंत नाहीं. अशा त्या मायातीत अनंत परमात्म्याचा मार्ग संत दाखवितात.

वस्तूसी वर्णिलें नवचे । तेंचि स्वरूप संतांचें । या कारणे वचनाचें । कार्य नाही ॥ १५॥

सारांश,वस्तुचें वर्णन करता येणें शक्य नाहीं आणि ती परमात्मवस्तु म्हणजें संतांचे स्वरुप होय, म्हणून संतांचेही वर्णन करणें कठीण आहें.(तथापि संतांचे काहीं वर्णन करु)

संत आनंदाचें स्थळ । संत सुखचि केवळ । नाना संतोषाचें मूळ । ते हे संत ॥ १६॥ संत विश्रांतीची विश्रांती । संत तृप्तीची निजतृप्ती । नांतरी भक्तीची फळश्रुती । ते हे संत ॥ १७॥

संत आनंदाचे स्थान आहेत.केवळ सुखरुप आणि अनेक प्रकारच्या संताषाचें मूळ,तसेच विश्रांतीची विश्रांति तृप्तीची निज तृप्ति किंवा भक्तीची फलश्रुति असे  हे संत आहेंत.

संत धर्माचें धर्मक्षेत्र । संत स्वरूपाचें सत्पात्र । नांतरी पुण्याची पवित्र । पुण्यभूमी ॥ १८॥  संत समाधीचें मंदिर । संत विवेकाचें भांडार । नांतरी बोलिजे माहेर । सायोज्यमुक्तीचें ॥ १९॥

संत धर्माचें धर्मक्षेत्र (धर्म पिकविणारे) आहेंत.स्वस्वरुपाची ओळख संतांच्या ठिकाणीं करुन घ्यावी. किंवा पुण्याची पवित्रमय अशी पुण्यभूमि, समाधानाचे असे पवित्र मंदिर,विवेकाचा खजिना किंवा सायुज्यमुक्तीचें माहेर हे संत आहेत असे म्हटलें तरी चालेल.

संत सत्याचा निश्चयो । संत सार्थकाचा जयो । संतप्राप्तीचा समयो । सिद्धरूप ॥ २०॥ मोक्षश्रिया आळंकृत । ऐसे हे संत श्रीमंत । जीव दरिद्री असंख्यात । नृपती केले ॥ २१॥

सत्याचा मुर्तिमंत निश्र्चय,जन्मसाफल्याचे द्दश्यस्वरुप,आत्मप्राप्तीचा परिपक्व समय, आणि मोक्षाच्या ऐश्र्वर्यानें विभूषित असें हें संत इतकें श्रीमंत आहेत,की अगणित दरिद्री जीवांना (परमार्थाचे) राजे करुन सोडतात.

जे समर्थपणें उदार । जे कां अत्यंत दानशूर । तयांचेनि हा ज्ञानविचार । दिधला न वचे ॥ २२॥

जे महान समर्थ असून उदार आहेत,जे अत्यंत दानशूर आहेत अशा श्रीमंतानांही संतांसारखे आत्मज्ञानाच्या विचाराचें दान करता येत नाही.

माहांराजे चक्रवर्ती । जाले आहेत पुढें होती । परंतु कोणी सायोज्यमुक्ती । देणार नाहीं ॥ २३॥

मोठे मोठे चक्रवर्ती महाराजें पुर्वी झाले,हल्ली आहेत व नंतरही होतील,परंतु त्यापैकी कुणालाही सायुज्यमुक्ति देंता येत नाही.(हे औदार्य संतांपाशीच असतें)

जें त्रैलोकीं नाहीं दान । तें करिती संतसज्जन । तयां संतांचें महिमान । काय म्हणौनी वर्णावें ॥ २४॥–

फार काय,त्रैलोक्यांत जें दान असूं शकणार नाही असें आत्मस्वरुपाचें दान संतच करु शकतात.त्या संतांचा महिमा किती म्हणुन वर्णन करावा ?

जें त्रैलोक्याहून वेगळें । जें वेदश्रुतीसी नाकळे । तेंचि जयांचेनि वोळे । परब्रह्म अंतरीं ॥ २५॥

( जयांचेनि वोळे - ज्याचामुळे प्रयत्न कमी पडतो.)

जें परब्रह्म त्रैलोक्याहुन निराळें,जें वेदश्रुतीला आकलन होत नाहीं,असें ते ह्या संतांच्या कृपेनें अंतःकरणांत प्रकट होतें.

ऐसी संतांची महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा । जयांचेनि मुख्य परमात्मा । प्रगट होये ॥ २६॥

असा संतांचा महिमा आहें. जी जी उपमा द्यावी ती ती कमीच पडतें. त्यांच्या कृपाप्रसादानें मुख्यपरमात्माच अंतःकरणामध्यें प्रकट होतों.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे संतस्तवननाम समास पांचवा ॥ ५॥**

**समास सहावा : श्रोतेजनस्तवन ॥ श्रीराम् ॥**

आतां वंदूं श्रोते जन । भक्त ज्ञानी संत सज्जन । विरक्त योगी गुणसंपन्न । सत्यवादी ॥ १॥

आता भक्त,ज्ञानी,संतसज्जन,विरक्त,योगी,गुणी,सत्यनिष्ठ अशा अनेक प्रकारच्या अधिकारी श्रोत्यांना नमस्कार करुं.

येक सत्वाचे सागर । येक बुद्धीचे आगर । येक श्रोते वैरागर । नाना शब्दरत्नांचे ॥ २॥

( वैरागर - खाण आगर )

कोणी सत्वाचें समुद्र, कोणी महा बुध्दिमान,कोणी अनेक शब्दरत्नांची खाण आहेंत.

जे नाना अर्थांमृताचे भोक्ते । जे प्रसंगीं वक्तयाचे वक्ते । नाना संशयातें छेदिते । निश्चै पुरुष ॥ ३॥

कोणी अनेक प्रकारच्या अर्थरुपी अमृताचें भोक्ते आहेंत,तर कोणी प्रसंगीं वक्यांचें वक्ते (वक्त्याला सुचविणारे स्फुर्ति देणारे )तसेंच अनेक प्रकारच्या संशयाचें निरसन करणारे निश्र्चयी पुरुष (निश्र्चयाचें मेंरु) असे श्रोतें असतात.

ज्यांची धारणा अपार । जे ईश्वराचे अवतार । नांतरी प्रत्यक्ष सुरवर । बैसले जैसे ॥ ४॥

ज्यांची ग्रहणशक्ति अचाट आहें,जें ईश्र्वराचें अवतार आहेंत किंवा प्रत्यक्ष देवच (सभेंत) येऊन बसले आहेत.

किं हे ऋषेश्वरांची मंडळी । शांतस्वरूप सत्वागळी । जयांचेनि सभामंडळीं । परम शोभा ॥ ५॥

( सत्वागळी - सत्वगुनात्मक)

अथवा शांत व सत्वस्थ अशा ऋषिश्र्वरांचा समुदाय बसला असून त्यांच्यामुळें सभेंला फार शोभा आली आहें.

हृदईं वेदगर्भ विलसे । मुखीं सरस्वती विळासे । साहित्य बोलतां जैसे । भासती देवगुरु ॥ ६॥

त्यांच्या अंतःकरणांत वेदरहस्य विलसत आहें,मुखामध्ये सरस्वती विराजमान आहें आणि ज्ञान-चर्चा बोलू लागलें म्हणजें ते बृहस्पतीच भासतात.

जे पवित्रपणें वैश्वानर । जे स्फूर्तिकिरणाचे दिनकर । ज्ञातेपणें दृष्टीसमोरे । ब्रह्मांड न ये ॥ ७॥

अग्नीसारखे पवित्र,स्फुर्तिरुप किरणांचें सूर्य,त्यांचें ज्ञान ब्रह्मांडाहून विशाळ आहें.

जे अखंड सावधान । जयांस त्रिकाळाचें ज्ञान । सर्वकाळ निराभिमान । आत्मज्ञानी ॥ ८॥

ते आत्मस्वरुपी अखंड सावधान (जागृत),भूत-भविष्य वर्तमान (त्रिकाल)जाणणारें,सदासर्वदा निराभिमानी व आत्मनिष्ठ असतात.

ज्यांचे दृष्टीखालून गेलें । ऐंसें कांहींच नाहीं उरलें । पदार्थमात्रांसी लक्षिलें । मनें जयांच्या ॥ ९॥

त्यांच्या पहाण्यातून काहीं काहीं निसटलें असें काहींहीं शिल्लक राहिलें नाहीं. प्रत्येक पदार्थाचा विचार त्यांनी आपल्या मनांत करुन ठेविला आहें.

जें जें कांहीं आठवावें । तें तें तयांस पूर्वीच ठावें । तेथें काये अनुवादावें । ज्ञातेपणेंकरूनी ॥ १०॥

जें जें काही मनांत आणावें तें तें त्यांना पूर्वीच माहीत असतें अशा (सर्वगुणसंपन्न) श्रोत्यांपुढें जाणतेपणानें मी काय बोलावें!

परंतु हे गुणग्राहिक । म्हणौन बोलतों निःशंक । भाग्यपुरुष काये येक । सेवीत नाहीं ॥ ११॥

तथापि हें गुणज्ञ (गुणांचे चहातें) आहेंत म्हणून त्याच्यापुढे निःशंकपणानें बोलतों. थोर लोक कशाकशाचा संग्रह करीत नाहीत?(सर्वांचाच करतात.)

सदा सेविती दिव्यान्नें । पालटाकारणें आवेट अन्नें । तैसींच माझीं वचनें । पराकृतें ॥ १२॥

( आवेट अन्नें - साधे अन्न , पराकृतें - पराकृते )

नित्य दिव्य-पंचपक्वानांचें भोजन करणारे लोक तोंड-पालट करण्यासाठीं अवीट अन्ने (साधी भाजी-भाकरी) कधीं कधीं खातात.तशीच माझी ही प्राकृत वचनें आहेंत,(तीं सज्जन श्रोते गोड करुन घेतीलच.)

आपुले शक्तिनुसार । भावें पुजावा परमेश्वर । परंतु पुजूं नये हा विचार । कोठेंचि नाहीं ॥ १३॥

आपल्या शक्तीप्रमाणें भक्तिपूर्वक परमेश्वराची पूजा करावी,परंतु (सामुग्री कमी आहे म्हणून ) पूजा करुच नयें,असें कोठेहीं सांगितलें नाहीं.

तैसा मी येक वाग्दुर्बळ । श्रोते परमेश्वरचि केवळ । यांची पूजा वाचाबरळ । करूं पाहे ॥ १४॥

( वाचाबरळ - ओबडधोबड बोल.)

त्याप्रमाणे मी एक वाग्दुर्बळ (वाचेचा दरिद्री) असुन, श्रोते साक्षात परमेश्वर आहेंत. काही तरी बडबडणारा मी त्यांची पूजा करु पहात आहें.

वित्पत्ती नाहीं कळा नाहीं।चातुर्य नाहीं प्रबंद नाहीं।भक्ति ज्ञान वैराग्य नाहीं ।गौल्यता नाहीं वचनाची ॥५॥

( प्रबंद - निट मांडलेला विषय, गौल्यता - सुंदर शब्द रचना )

व्युत्पत्ति (पध्दतशीर शास्त्राध्ययन,विद्वत्ता), कला,चातुर्य,कवित्व, भक्ति,ज्ञान,वैराग्य,बोलण्याची माधुरी यांपैकीं मला एकही गुण नाहीं.

ऐसा माझा वाग्विळास । म्हणौन बोलतों सावकाश । भावाचा भोक्ता जगदीश । म्हणौनियां ॥ १६॥

अशा प्रकारचा माझा वाग्विलास (भाषण) आहें,तथापि जगदीश हा भावाचा भोक्ता आहें हे जाणुन मी अघळपघळ बोलत आहें.

तुम्ही श्रोते जगदीशमूर्ति । तेथें माझी वित्पत्ती किती । बुद्धिहीन अल्पमती । सलगी करितों ॥ १७॥

श्रोतेहो,तुह्मी प्रत्यक्ष जगदीश्वराच्या मुर्ती आहांत,तुमच्या पुढे माझी विद्वत्ता ती किती ? मी निर्बुध्द व मतिमंद आहें,पण तुमच्याशी सलगीनें बोलु पहात आहें.

समर्थाचा पुत्र मूर्ख जगीं । परी सामर्थ्य असे त्याचा आंगीं । तुम्हां संतांचा सलगी । म्हणौनि करितों ॥ १८॥

जगामध्ये एखाद्या थोराचा मुलगा मूर्ख असला तरी बापाच्या बळावर त्याच्या अंगी काहीतरी सामर्थ्य असतेंच, (त्याप्रमाणें सलगी करतां करतां तुम्हा संतांचाच झालों म्हणजें संतपणा माझ्यात काहीतरी येईल.)

व्याघ्र सिंह भयानक । देखोनि भयाचकित लोक । परी त्यांचीं पिलीं निःशंक । तयांपुढे खेळती ॥ १९॥

व्याघ्र-सिंहादि भयंकर प्राणी पाहून इतर लोक भिऊन जातात,परंतु त्यांची पिले त्यांच्यासमोर निःशंकपणे खेळत असतात.

तैसा मी संतांचा अंकित । तुम्हां संतांपासीं बोलत । तरी माझी चिंता तुमचे चित्त । वाहेलच कीं ॥ २०॥

त्याप्रमाणें मी संतांचा अंकित (लेकरु) असून तुम्हा संतांपुढेच बोलत आहें,तेव्हा माझी काळजी तुमच्या मनांत राहीलच.

आपलेंची बोले वाउगें । त्याची संपादणी करणें लागे । परंतु काहीं सांगणें नलगे । न्यून तें पूर्ण करावें ॥ २१॥

आपलेच (लेकरु किंवा मनुष्य) काहीं कमीजास्त बाललें तर वाडवडिलांना त्याची संपादणी करावी लागतें.परंतु येथे काही कमी पडले तर तें पुरें करुन घ्या,हें सांगण्याची काही जरुर नाहीं.

हें तों प्रीतीचें लक्षण । स्वभावेंची करी मन । तैसे तुम्ही संतसज्जन । मायेबाप विश्वाचे ॥ २२॥

हें तर प्रेमाचें लक्षणच आहें,मन आपोआपच करतें (तुमचें प्रेम मजवर आहें त्यामुळें तुम्ही माझें उणें सहजच पुरें करुन घ्याल),त्याचप्रमाणें तुम्हीं संतसज्जन विश्र्वाचें मायबाप आहात (व मी तुमचें) लेंकरुं आहें.

माझा आशय जाणोनी जीवें ।आतां उचित तें करावें ।पुढें कथेसि अवधान द्यावें ।म्हणे दासानुदास॥२३॥

माझा हेतु लक्षात घेऊन काय योग्य वाटेल ते करा.आतां पुढील कथेकडे लक्ष द्यावें ही दासानुदासाची प्रार्थना आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे श्रोतेस्तवननाम समास सहावा ॥ ६॥**

### समास सातवा : कवेश्वरस्तवन ॥ श्रीराम् ॥

आतां वंदूं कवेश्वर । शब्दसृष्टीचे ईश्वर । नांतरी हे परमेश्वर । वेदावतारी ॥१॥

शब्दसृष्टीचे ईश्र्वर किंवा वेदरुपी परमेश्र्वर अशा कवीश्र्वरांना आतां नमस्कार करतों.

कीं हे सरस्वतीचें निजस्थान । कीं हे नाना कळांचें जीवन । नाना शब्दांचें भुवन । येथार्थ होये ॥ २॥

कवि हें सरस्वतीचें वसतिस्थान,अनेक कलांचें जीवन किंवा अनेक शब्दांचें मंदिर यथार्थतेंनें होत.

कीं हे पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्व । नाना लाघवें सत्कीर्तीस्तव । निर्माण कवी ॥ ३॥

हे पुरुषार्थाचें (मोक्षाचें) वैभव,जगदीश्वराचें महत्व होंत. त्याची अगाध लीला आणि सत्कीर्ति यांचें वर्णन करण्यासाठीं कवि निर्माण झालें आहेंत.

कीं हे शब्दरत्नाचे सागर । कीं हे मुक्तांचे मुक्त सरोवर । नाना बुद्धीचे वैरागर । निर्माण जाले ॥ ४॥
शब्दरत्नांचें समुद्र,मुक्तरुपी मोत्यांचे सरोवर अथवा अनेक प्रकारच्या बुध्दीच्या खाणी कविरुपांनें निर्माण झाल्या आहेंत.

अध्यात्मग्रंथांची खाणी । कीं हे बोलिके चिंतामणी । नाना कामधेनूचीं दुभणीं । वोळलीं श्रोतयांसी ॥ ५॥

कवि अध्यात्मग्रंथाची खाण किंवा बोलके चिंतामणि आहेंत. अथवा कामधेनूच्या पान्हाचा ओघ कविरुपांनें श्रोत्यांवर आला आहें.

कीं हे कल्पनेचे कल्पतरु । कीं हे मोक्षाचे मुख्य पडीभरु । नाना सायोज्यतेचे विस्तारु । विस्तारले ॥ ६॥

( पडीभरु - भांडार )

हें मनोरथ पूर्ण करणारे कल्पवृक्ष, किंवा मोक्षाचा मुख्य आश्रय (ऐश्वर्य) होत,किंवा सायुज्यमुक्तीचा विस्तार कविरुंपाने पसरला आहें.

कीं हा परलोकींचा निजस्वार्थु।कीं हा योगियांचा गुप्त पंथु । नाना ज्ञानियांचा परमार्थु।रूपासि आला॥ ७॥

हें जींवांचें परलोकींचें स्वहित किंवा योग्यांचा गुप्त मार्ग होय. अथवा ज्ञानी पुरुषांचा परमार्थ कविरुपानें अवतार घेऊन प्रकट झाला.

कीं हे निरंजनाची खूण । कीं हे निर्गुणाची वोळखण । मायाविलक्षणाचे लक्षण । ते हे कवी ॥ ८॥

( निरंजनाची - परब्रह्माची खुण , मायाविलक्षणाचे - मायेपासून भिन्न असे परब्रह)

निर्गुण व निरंजन (मायातीत) परब्रह्माची खूण किंवा ओळख आणि मायेहून भिन्न अशा परमात्म्याचें स्वरुप हें तें कवि होतं

कीं हा श्रुतीचा भावगर्भ।कीं हा परमेश्वराचा अलभ्य लाभ। नातरी होये सुल्लभ । निजबोध कविरूपें ॥९॥

वेंदांचें रहस्य किंवा परमेश्वराचा अलभ्य लाभ अथवा आत्मबोध कविरुपानें सुलभ झाला आहे.

कवि मुमुक्षाचें अंजन । कवि साधकांचें साधन । कवि सिद्वांचें समाधान । निश्चयात्मक ॥ १०॥

कवि हे मुमुक्षूचें डोळे उघडणारे अंजन आहें. हे साधकांना साधनमार्ग दाखवितात.किंवा सिध्दांचें निश्र्चयात्मक समाधान कवि होंत.

कवि स्वधर्माचा आश्रयो । कवि मनाचा मनोजयो । कवि धार्मिकाचा विनयो । विनयकर्ते ॥ ११॥

कवि हे स्वधर्माची जागृति करणारे ठेवणारें असल्यामुळें स्वधर्माचा आश्रय मनोजयाचा मार्ग मनाला दाखविणारे,धार्मिकांचा विनय सांगून तो इतरत्र वाढविणारे असें हें कवि होतं.

कवि वैराग्याचें संरक्षण । कवि भक्तांचें भूषण । नाना स्वधर्मरक्षण । ते हे कवी ॥ १२॥

कवि हे वैराग्याचें संरक्षण व भक्तांचें भूषण होंत,अथवा स्वधर्मांचे रक्षण कवींमुळें होत असतें.

कवि प्रेमळांची प्रेमळ स्थिती।कवि ध्यानस्थांची ध्यानमूर्ति । कवि उपासकांची वाड कीर्ती। विस्तारली ॥१३॥

प्रेमळांची प्रेमळस्थिति,ध्यान धरणा-यांची ध्यानमुर्ति किंवा उपासकांची महत्कीर्ति कवि ह्या जगांत विस्तारतांत.

नाना साधनांचे मूळ । कवि नाना प्रेत्नांचें फळ । नाना कार्यसिद्धि केवळ । कविचेनि प्रसादें ॥ १४॥

अनेक साधनांचें बीज व अनेंक प्रयत्नांचें फळ (कवि वर्णीत असल्यामुळें) कवींच्या प्रसादाच्या योगानेंच मोठमोठीं कार्ये सिध्द होतात.

आधीं कवीचा वाग्विळास । तरी मग श्रवणीं तुंबळे रस । कविचेनि मतिप्रकाश । कवित्वास होये ॥ १५॥

( तुंबळे - भरपूर , रस - भाव )

अगोदर कवींचा वाग्विलास (उत्तम उत्तम काव्यें) सुरु झाला म्हणजें श्रोत्यांचे कर्ण विविधविविध रसास्वादानानें तृप्त होतात. (जुन्या व श्रेष्ठ) कवींच्या काव्यामुळें काव्य करण्याचें ज्ञान नवीन कवींना होतें.

कवि वित्पन्नाची योग्यता।कवि सामर्थ्यवंतांची सत्ता ।कवि विचक्षणाची कुशळता। नाना प्रकारें ॥१६॥

विद्वानाची योग्यता, सामर्थ्यवंतांची सत्ता व चतुर पुरुषांचे कौशल्यही कवि अनेंक प्रकारें वर्णन करितांत.

कवि कवित्वाचा प्रबंद । कवि नाना धाटी मुद्रा छंद । कवि गद्यपद्यें भेदाभेद । पदत्रासकर्ते ॥ १७॥

( पदत्रासकर्ते - पदरचना करतात. )

कवित्वाचें नानाविध प्रकार,अनेंक प्रकारच्या चाली,रचना-वृतें,गद्यपद्मादिक भेद,पदप्रास इत्यादिकांचें जनक कविच होत.

कवि सृष्टीचा आळंकार । कवि लक्ष्मीचा शृंघार । सकळ सिद्धींचा निर्धार । ते हे कवी ॥ १८॥

ईशसृष्टीचा अलंकार,लक्ष्मीचा शृंगार व सर्व सिध्दींचा निर्धार (विश्र्वास) हें कवि होतं.

कवि सभेचें मंडण । कवि भाग्याचें भूषण । नान सुखाचें संरक्षण । ते हे कवी ॥ १९॥

कवींमुळें सभेला शोभा येतें,भाग्याचें भूषण व सुखांचें संरक्षण हें कवि होत.

कवि देवांचे रूपकर्ते । कवि ऋषीचें महत्ववर्णिते । नाना शास्त्रांचें सामर्थ्य ते । कवि वाखणिती ॥ २०॥

कवि हें देवांना नामरुप देणारें व ऋषींचा महिमा गाणारे असून शास्त्रांचे सामर्थ्य हें वर्णन करितात.

नस्ता कवीचा व्यापार । तरी कैंचा अस्ता जगोद्धार । म्हणौनि कवि हे आधार । सकळ सृष्टीसी ॥ २१॥

महाकवींनी उत्तमोत्तम काव्यें लिहिंलीं नसतीं तर जगाचा उध्दार कसा झाला असतां ? म्हणून कवि हे सा-या सृष्टीला आधारभुत आहेंत.

नाना विद्या ज्ञातृत्व कांहीं । कवेश्वरेंविण तों नाहीं । कवीपासून सर्वही । सर्वज्ञता ॥ २२॥

अनेंक विद्या व ज्ञान कवींश्र्वरांवाचून प्राप्त होणार नाहीं,सर्व विषयांचें ज्ञान कवींपासूनच होते.

मागां वाल्मीक व्यासादिक । जाले कवेश्वर अनेक । तयांपासून विवेक । सकळ जनासी ॥ २३॥

पूर्वी व्यास-वाल्मिंकासारखें अनेंक कवि झालें,त्यांच्यापासून सर्व जनांना विवेकाची प्राप्ति झाली.

पूर्वीं काव्यें होतीं केलीं । तरीच वित्पत्ती प्राप्त झाली । तेणे पंडिताआंगीं बाणली । परम योग्यता ॥ २४॥

मोठमोठया कवींनी पूर्वी महाकाव्यें करुन ठेंवलीं होतीं, म्हणूनच पंडितांना व्युत्पत्ति प्राप्त होऊन त्यांची योग्यता फार वाढली.

ऐसे पूर्वीं थोर थोर । जाले कवेश्वर अपार । आतां आहेत पुढें होणार । नमन त्यांसी ॥ २५॥

असे पूर्वी मोठमोठे कवीश्र्वर होऊन गेलें, हल्ली आहेंत व पुढें होतील त्या सर्वांना माझा नमस्कार असों.

नाना चातुर्याच्या मूर्ती । किं हे साक्षात् बृहस्पती । वेद श्रुती बोलों म्हणती । ज्यांच्या मुखें ॥ २६॥

कवि हे चातुर्याच्या मूर्ति किंवा साक्षात् बृहस्पतीच होतं. वेदश्रुतिसुध्दा त्यांच्याच मुखानें आपण प्रकट व्हावे असें म्हणतात.

परोपकाराकारणें । नाना निश्चय अनुवादणें ॥ सेखीं बोलीले पूर्णपणें । संशयातीत ॥ २७॥

केवळ परोपकारासाठींच ह्यांनीं अनेक निश्र्चयांचे स्पष्टीकरण केले आहें आणि शेवटी पूर्णपणें निःसंदेह (सिध्दांत) सांगितलें आहेंत.

कीं हे अमृताचे मेघ वोळले । कीं हे नवरसाचे वोघ लोटले । नाना सुखाचे उचंबळले । सरोवर हे ॥ २८॥

( नवरसाचे - श्रुंगार-रती,हास्य - आनंद ,करूण - शोक, रौद्र - क्रोध , वीर - उत्साह , भयानक - भय, भीभस्त - घृणा , अद्भुत - विस्मय , शांत - शम)

कविरुंपानें जगावर अमृतानें भरलेले मेघच वृष्टि करीत आहेंत. किंवा हें नवरसांचें प्रवाह वाहत चालले आहेंत,किंवा त्यांच्या रुपानें सुखाचें सरोवरच उचंबळलें आहें.

कीं हे विवेकनिधीचीं भांडारें । प्रगट जालीं मनुष्याकारें । नाना वस्तूचेनि विचारें । कोंदाटले हे ॥ २९॥

कवि हें मनुष्यरुपानें विवेकाच्या ठेव्याचें खजिनेंच प्रकट झालें आहेंत,अथवा जणु काय ब्रह्मविचारानें हें भरलेंलें आहेंत.

कीं हे आदिशक्तीचें ठेवणें । नाना पदार्थास आणी उणें। लाधलें पूर्व संचिताच्या गुणें । विश्वजनासी ॥३०॥

( आदिशक्तीचें ठेवणें - आदिमायेची खास निर्मिती (हे कवी) )

हें कवीश्र्वर म्हणजें आदिशक्तीचें (मुळमायेंचें) ठेवणें.(ठेवणीचा बहुमोलाचा जिन्नस) इतक्या योग्यतेचें आहें की ईतर पदार्थ त्यांच्यापुढें तृच्छ होत. सर्व लोकांची पुण्याई मोठी म्हणून त्यांना ह्या कवींचा लाभ होतो.

कीं हे सुखाचीं तारुवें लोटलीं । आक्षै आनंदे उतटलीं । विश्वजनास उपेगा आलीं । नाना प्रयोगाकारणे॥३१॥

( तारुवें - तारवे , आक्षै - अक्षय , उतटलीं - काठोकाठ भरून वाहणारी )

किंवा हे कवि म्हणजे ब्रह्मसुखाची जहाजेंच अखंड आनंदानें भरुन वाहात आलीं असून अनेक प्रकारांनी सर्व लोकांच्या उपयोगी पडत आहेंत.

कीं हे निरंजनाची संपत्ती । कीं हे विराटाची योगस्थिती । नांतरी भक्तीची फळश्रुती । फळास आली ॥३२॥

कवि हें निंरंजन ब्रह्माची संपत्ति व विराटपुरुषाची योगस्थिति असून भक्तीची फलश्रुतीच कविरुपानें फळास आली आहें.

कीं हा ईश्वराचा पवाड । पाहातां गगनाहून वाड । ब्रह्मांडरचनेहून जाड । कविप्रबंदरचना ॥३३॥

( पवाड - दिव्य किर्ती , जाड - अतिविशाल,भव्य )

कवि म्हणजें आकाशापेक्षांही मोठा असा ईश्र्वराचा पराक्रमच होय. महाकवींची काव्यरचना ईश्र्वराच्या ब्रह्मांडरचनेंपेक्षाही श्रेष्ठ आहें.

आतां असो हा विचार । जगास आधार कवेश्वर । तयांसी माझा नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३४॥

आतां हें वर्णन पुरें सर्व जगास आधारभूत अशा कवीश्र्वरांना मीं साष्टांगभावानें नमस्कार करतों.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कवेश्वरस्तवननाम समास सातवा ॥ ७॥**

**समास आठवा : सभास्तवन ॥ श्रीराम् ॥**

अतां वंदू सकळ सभा । जये सभेसी मुक्ति सुल्लभा । जेथें स्वयें जगदीश उभा । तिष्ठतु भरें ॥१॥

ज्या सभेमध्यें स्वतः जगदीश्र्वर प्रेमभरानें तिष्ठत उभा असतो, व म्हणून जेथे मुक्ति सुलभ असतें.अशा कीर्तन-पुराण-निरुपणांच्या सर्व सभांना आता नमस्कार करु.

श्लोक ॥ नाह । म् वसामि वैकुंठे योगिनां हृदये रवौ । मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद ॥

नाहीं वैकुंठीचा ठाईं । नाहीं योगियांचा हृदईं । माझे भक्त गाती ठाईं ठाईं ।तेथें मी तिष्ठतु नारदा ॥२॥

भगवान स्वतः सांगतात,की, ”हे नारदा मी एक वेळ वैकुंठात सापडणार नाहीं, योग्यांच्या ह्रदयांत सापडणार नाहीं किंवा सुर्यबिंबात असणार नाहीं,पण ज्या ज्या ठिकाणी माझे प्रेमळ भक्त गात असतात,तेथे मी हटकून सांपडेन“,(असे देव देवर्षि नारदाजवळ स्वतःच बोलले आहेत.)

याकारणें सभा श्रेष्ठ । भक्त गाती तें वैकुंठ । नामघोषें घडघडाट । जयजयकारें गर्जती ॥ ३॥

ह्यासाठी भक्त ज्या ठिकाणीं भगवंताचें गुणानुवादन गातात व त्याच्या नामाचा घोष करतात, ती सभा श्रेष्ठ होय,“ते प्रत्यक्ष वैकुंठच होय.“

प्रेमळ भक्तांचीं गायनें । भगवत्कथा हरिकीर्तनें । वेदव्याख्यान पुराणश्रवणें । जेथें निरंतर ॥ ४॥
परमेश्वराचे गुणानुवाद । नाना निरूपणाचे संवाद । अध्यात्मविद्या भेदाभेद । मथन जेथे ॥ ५॥

(अशा सभांतून) निरंतर प्रेमळ भक्तांचीं गायनें,भगवत्कथा,हरिकीर्तने,वेदांचें व्याख्यान,पुराणश्रवण, परमेश्वराचें गुणानुवाद,अध्यात्मनिरुपणाचें (सुख-) संवाद व अध्यात्मशास्त्रांतील भिन्न भिन्न विषयांची चर्चा चालू असतें.

नाना समाधानें तृप्ती । नाना आशंकानिवृत्ती । चित्तीं बैसे ध्यानमूर्ति । वाग्विलासें ॥ ६॥

अनेक प्रकारच्या आशंकांचें निरसन होऊन समाधान व तृप्ति होतें. तेथील भक्तांच्या संभाषणचार्तुयामुळें चित्तामध्यें ध्यानमुर्ति स्थिर होतें.

भक्त प्रेमळ भाविक । सभ्य सखोल सात्विक । रम्य रसाळ गायक । निष्ठावंत ॥ ७॥ कर्मसीळ आचारसीळ । दानसीळ धर्मसीळ । सुचिस्मंत पुण्यसीळ । अंतरशुद्ध कृपाळु ॥ ८॥ योगी वीतरागी उदास । नेमक निग्रह तापस । विरक्त निस्पृह बहुवस । आरण्यवासी ॥ ९॥ दंडधारी जटाधारी । नाथपंथी मुद्राधारी । येक बाळब्रह्मचारी । योगेश्वर ॥ १०॥

( सुचिस्मंत - शुद्ध,पवित्र,शुचिर्भूत , उदास -भोगाबद्दल उदासीन, नेमक - नियमाने वागणारा वीतरागी - विरक्त)

(यां सभांतून अनेक गुणी सज्जनांचें दर्शन-संभाषण सुख मिळतें) भक्त प्रेमळ,भाविक,सभ्य,सखोल,(गंभीर किंवा तीक्ष्ण बुध्दीचें) सात्विक,रम्य,रसाळ,गवई,निष्ठावंत,कर्मनिष्ठ,आचारशील, दानशूर,धर्मनिष्ठ,पवित्र, पुण्यवान,निर्मळ अंतःकरणाचें,कृपाळू,योगी,वैराग्यशील,उदास(अलिप्त), नित्यनेमी (नेमक),निग्रही, तपस्वी,विरक्त,निःस्पृह,बहुधा अरण्यांत राहणारे,संन्यासी (दंडधारी) जटाधारी,नाथपंथीं,मुद्राधारण करणारे (वैष्णव),बाळब्रह्मचारी,महायोगी असे अनेक सभासद असतात.

पुरश्चरणी आणी तपस्वी । तीर्थवासी आणी मनस्वी । माहायोगी आणी जनस्वी । जनासारिखे ॥ ११॥ सिद्ध साधु आणी साधक । मंत्रयंत्रशोधक । येकनिष्ठ उपासक । गुणग्राही ॥ १२॥ संत सज्जन विद्वज्जन । वेदज्ञ शास्त्रज्ञ माहाजन । प्रबुद्ध सर्वज्ञ समाधान । विमळकर्ते ॥ १३॥ योगी वित्पन्न ऋषेश्वर । धूर्त तार्किक कवेश्वर । मनोजयाचे मुनेश्वर । आणी दिग्वल्की ॥ १४॥

(मनस्वी - मनावर ताबा ठेवणारे, जनस्वी - लोकांच्या कलाने वागून लोकांवर नियंत्रण ठेवणारे , विमळकर्ते - निर्मळ,संशय निरसन करणारे , दिग्वल्की - दिगंबर )

(गायत्री-) पुरश्चरण करणारे,तपस्वी,तीर्थयात्रा करणारे,मनाला जिंकणारे महायोगी,जनासारखे वागणारे,जनस्वी,सिध्द,साधु,साधक मंत्रयंत्राचा शोध करणारे ,निष्ठावंत उपासक,गुणग्रहण करणारे, संत, सज्जन, विद्वान लोक,वेदवेत्ते,शास्त्र जाणणारे, महात्मे,हूशार (जागृत),सर्वज्ञ,निर्मल समाधान करणारे,योगी,व्युत्पन्न,ऋषीश्वर,धूर्त (दूरदर्शी),तार्किक (तत्ववेत्ते),कवीश्वर,मनोजय करणारे, मुनीश्वर,नग्न राहणारे (दिगंबर) असे सज्जन तेथें असतात.

ब्रह्मज्ञानी आत्मज्ञानी । तत्त्वज्ञानी पिंडज्ञानी । योगाभ्यासी योगज्ञानी । उदासीन ॥ १५॥ पंडित आणी पुराणिक । विद्वांस आणी वैदिक । भट आणी पाठक । येजुर्वेदी ॥ १६॥ माहाभले माहाश्रोत्री । याज्ञिक आणी आग्नहोत्री । वैद्य आणी पंचाक्षरी । परोपकारकर्ते ॥ १७॥ भूत भविष्य वर्तमान । जयांस त्रिकाळाचें ज्ञान । बहुश्रुत निराभिमान । निरापेक्षी ॥ १८॥ शांति क्ष्मा दयासीळ । पवित्र आणी सत्वसीळ । अंतरशुद्ध ज्ञानसीळ । ईश्वरी पुरुष ॥ १९॥

( माहाश्रोत्री - वेदांचे ज्ञानी )

ब्रह्मज्ञानी,आत्मज्ञानी,तत्वज्ञानी,पिंडज्ञानी,योगाभ्यासी,योगज्ञानी,उदासीन,पंडित,पुराणिक, विद्वान, वैदिक,भट,यर्जुवेदी पाठक (ज्योतिषि),फार चांगले मोठे श्रोत्रिय (वेदवेत्ते ब्राह्मण),याज्ञिक,अग्निहात्री,वैद्य, पंचाक्षरी,परोपकार करणारे,भूत-भविष्य-वर्तमान अशा तिन्हि कालांचे ज्ञान असणारे,बहुश्रुत,निराभिमानी, निरपेक्षी,शांति-दया-दयाशील,पवित्र,सत्वस्थ,शुध्दचित्त,ज्ञानी असे ईश्र्वरी (ईश्र्वरतुल्य किंवा ईश्र्वरास वाहिलेले.) पुरुष असतात.

ऐसे जे कां सभानायेक । जेथें नित्यानित्यविवेक । त्यांचा महिमा अलोलिक । काय म्हणोनि वर्णावा ॥२०॥

अशा या सभांमधून नित्यानित्य विवेक करणारे असे प्रमुख सभासद असतात,त्यांचा महिमा अपूर्व आहें,तो किती म्हणून वर्णन करावा ?

जेथें श्रवणाचा उपाये । आणी परमार्थसमुदाये । तेथें जनासी तरणोपाये । सहजचि होये ॥ २१॥

जेंथें परमार्थं करणा-यांचें समुदाय जमतात, व श्रवणाचा मार्ग सर्वांना मिळतो,त्या ठिकाणीं लोकांचा सहजच उध्दार होतो.

उत्तम गुणाची मंडळी । सत्वधीर सत्वागळी । नित्य सुखाची नव्हाळी । जेथें वसे ॥ २२॥—

( सत्वधीर - धैर्यशील)

ह्या सभांतून अनेक गुणांची सत्वशील मंडळी भेटतें. ही मंडळी सत्वधीर,विशेष सत्वशील असते.त्या ठिकाणी निरंतर सुख प्राप्त होतें.

विद्यापात्रें कळापात्रें । विशेष गुणांची सत्पात्रें । भगवंताचीं प्रीतिपात्रें । मिळालीं जेथें ॥ २३॥

विद्या कला इत्यादि विशेष चांगल्या गुणांनी युक्त व भगवंतांचे लाडके असें अनेंक भक्त तेथे जमलेले असतात.

प्रवृत्ती आणी निवृत्ती । प्रपंची आणी परमार्थी । गृहस्ताश्रमी वानप्रहस्ती । संन्यासादिक ॥ २४॥ वृद्ध तरुण आणी बाळ । पुरुष स्त्रियादिक सकळ । अखंड ध्याती तमाळनीळ । अंतर्यामीं ॥ २५॥

( तमाळनीळ - श्रीराम,यमधर्म)

त्यांत प्रवृत्ति व निवृत्ति मार्गानें जाणारे (प्रांपंचिक व परमार्थी),गृहस्थाश्रमी,वानप्रस्थाश्रमी,संन्यासी आदिकरुन वृध्द,तरुण,बाळ सर्व लहानमोठी,स्त्री पुरूष,सगळे मेघश्यामसुंदराचे अंतःकरणात अखंड ध्यान करितात.

ऐसे परमेश्वराचे जन । त्यांसी माझें अभिवंदन । जयांचेनि समाधान । अकस्मात बाणें ॥ २६॥

असे हें परमेश्र्वराचें भक्त कीं ज्यांच्या संगतीनें अकस्मात समाधानवृत्ति बाणते,त्यांना माझा नमस्कार असो.

ऐंसिये सभेचा गजर । तेथें माझा नमस्कार । जेथें नित्य निरंतर । कीर्तन भगवंताचें ॥ २७॥

ज्या ठिकाणीं सदासर्वकाळ भगवंताचे कीर्तन चालतें. अशा सभांना व तेथील भगवज्जनांना माझा नमस्कार असों.

जेथें भगवंताच्या मूर्ती । तेथें पाविजे उत्तम गती । ऐसा निश्चय बहुतां ग्रंथीं । महंत बोलिले ॥ २८॥

जेंथें प्रत्यक्ष भगवत्स्वरुप झालेले संत असतात,तेंथें जीवांना उत्तम गति मिळतें असा निर्णय अनेक ग्रंथात संतांनी केलेला आहें.

कल्लौ कीर्तन वरिष्ठ । जेथें होय ते सभा श्रेष्ठ । कथाश्रवणें नाना नष्ट । संदेह मावळती ॥ २९॥

( कल्लौ  - कलियुगात )

कलियुगामध्ये सर्व साधनांत कीर्तन श्रेष्ठ आहें व असें वरिष्ठ कीर्तन ज्या सभेत होतें. ती सभा इतर सभांहून श्रेष्ठ होय,कारण कथा ऐकल्यानें अनेंक नष्ट (मिथ्या,वाईट) संशय नाहींसें होतात.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सभास्तवननाम समास आठवा ॥ ८॥**

## समास नववा : परमार्थस्तवन ॥ श्रीराम् ॥

आतां स्तऊं हा परमार्थ । जो साधकांचा निजस्वार्थ । नांतरी समर्थामध्ये समर्थ । योग हा ॥ १॥

आतां या परमार्थाचें स्तवन करु.(परमार्थ म्हणजे अध्यात्म,मोक्ष) परमार्थ हा साधकांचे स्वहित आहें सर्व योगांत अत्यंत श्रेष्ठ असा हा योग आहें.

आहे तरी परम सुगम । परी जनासी जाला दुर्गम । कां जयाचें चुकलें वर्म । सत्समागमाकडे ॥ २॥

तसें पाहिले तर परमार्थ अत्यंत सुलभ आहें.पण लोकांना संत समागमाचे वर्म् (महत्व) न समजल्यामुळें (सत्समागम न घडल्यामुळें) फार अवघड होऊन बसला आहें.

नाना साधनांचे उधार । हा रोकडा ब्रह्मसाक्षात्कार । वेदशास्त्रीं जें सार । तें अनुभवास ये ॥ ३॥

इतर अनेक साधनें उधारीचीं (कालांतरानें फलद्रुप होणारीं) आहेंत.पण परमार्थामध्ये ब्रह्मसाक्षात्कार तात्काळ घडतो.वेद व शास्त्र यांत जे सार (आत्मज्ञानाचें रहस्य) सांगितलें. आहें. तें प्रत्यक्ष अनुभवास येंतें.

आहे तरी चहूंकडे । परी अणुमात्र दृष्टी न पडे । उदास परी येकीकडे । पाहातां दिसेना ॥ ४॥

परब्रह्म तर चहूंकडे आहें,पण तें लेशमात्रही चर्मचक्षूंना दिसत नाही,तें सर्वांहून अलिप्त आहें,म्हणुन त्यास एका बाजुला पहावयास जावें तर दिसत नाही.(तें सर्वांत अलिप्तपणानें असून,एकदेशीपणानें पाहिल्यास कोठेंच दिसत नाही.)

आकाशमार्गी गुप्त पंथ । जाणती योगिये समर्थ । इतरांस हा गुह्यार्थ । सहसा न कळे ॥ ५॥

परमार्थ म्हणजें आकाश मार्गातील एक गुप्त पंथ आहें,(परम सूक्ष्म अशा आकाशतत्वांतून विवेकांनें अहंभावरहित होऊन पैलपार जाण्याचा मार्ग आहें.) परम श्रेष्ठ योग्यांना हा मार्ग माहीत असतो,इतरांना हे रहस्य सहसा उमजत नाहीं.

साराचेंहि निजसार । अखंड अक्षै अपार । नेऊं न सकती तश्कर । कांही केल्या ॥ ६॥

परमार्थ त्तव हे सारांतले सार,उत्तमातलें उत्तम आहें.ते अखंड अक्षय व अपार आहें,चोरांनी काही केले तरी त्यांना ते नेतां यावयाचे नाहीं.

तयास नाहीं राजभये । अथवा नाहीं अग्निभये । अथवास्वापदभये । बोलोंच नये ॥ ७॥

त्याला राजाचें,अग्नीचें किंवा श्वापदांचें मुळींच भय नाहीं,या भयांचें नावसुध्दा त्याच्यापुढे ठरु शकणार नाही.

परब्रह्म तें हालवेना । अथवा ठावही चुकेना । काळांतरी चळेना । जेथीचा तेथें ॥ ८॥

परब्रह्माला जाग्यावरुन उचलुन नेंता येंत नाहीं किंवा ते आपली जागाही सोडत नाहीं. कितीही काळ लोटला तरी तें चळत नाहीं ढळत नाहीं (तें अचळ व अढळच राहतें).

ऐसें तें निज ठेवणें । कदापि पालटों नेणे । अथवा नव्हे आदिक उणें । बहुतां काळें ॥ ९॥

असा तो प्रत्येकाचा निज ठेवा आहें.तो कधींहीं पालटावयांचा नाहीं, अनंत काळ गेला तरी त्याच्यात कमी जास्त व्हावयांचें नाहीं.

अथवा तें घसवटेना । अथवा अदृश्य होयेना । नांतरी पाहातां दिसेना । गुरुअंजनेविण ॥ १०॥

( गुरुअंजनेविण-गुरूच्या आशीर्वादाशिवाय)

किंवा तो झिजत नाहीं , अदृश्यही होत नाहीं,तथापि गुरुकृपेचे अंजन डोळ्यात पडल्यावांचून तो (चांगल्या डोळसांनाही) दिसत नाहीं.

मागां योगिये समर्थ । त्यांचाहि निजस्वार्थ । यासि बोलिजे परमार्थ । परमगुह्य म्हणौनि ॥ ११॥

पूर्वी सामर्थ्यवंत योगी होऊन गेलें त्यांच्याही जिवांचें जे साध्य किंवा ध्येय त्यालाच परम गुह्य म्हणून परमार्थं असें म्हणतात.

जेंही शोधून पाहिला । त्यासी अर्थ सांपडला । येरां असोनी अलभ्य जाला । जन्मोजन्मीं ॥ १२॥

ज्यांनी हा परमार्थाचा निजठेवा शोधून पाहिला त्यांनाच तो सापडला आहें,इतरांना असून जन्मोजन्मीं दुर्लभ झाला आहें.

अपूर्वता या परमार्थाची । वार्ता नाहीं जन्ममृत्याची । आणी पदवी सायोज्यतेची । सन्निधचि लाभे ॥ १३॥

या परमार्थांची अपूर्वता काय सांगावी ? त्याचा लाभ झाला असता,जन्ममृत्यूचे नांवही ऐकूं यावयाचें नाहीं (जन्ममृत्यूची यातायात चुकेलं.) आणि सायुज्यपद आपलें आपल्याशींच सापडंतें.(जवळच सापडतें).

माया विवेकें मावळे । सारासारविचार कळे । परब्रह्म तेंहि निवळे । अंतर्यामीं ॥ १४॥

विवेकाच्या योगानें मायेचें निरसन होतें,सारासार विचार कळूं लागतो, आणि परब्रह्मही अंतकःरणात स्पष्ट दिसू लागतें.

ब्रह्म भासले उदंड । ब्रह्मीं बुडालें ब्रह्मांड । पंचभूतांचें थोतांड । तुछ्य वाटे ॥ १५॥

ब्रह्म उदंड (जिकडे तिकडे) दिसूं लागते.व त्या ब्रह्मभांसांत सर्व ब्रह्मांड बुडून जातें,पंचभूतांचें बंड तृच्छ वाटूं लागतें.

प्रपंच वाटे लटिका । माया वाटे लापणिका । शुद्ध आत्मा विवेका- । अंतरीं आला ॥ १६॥

( लापणिका - कल्पनामय, लटिका - खोटा )

प्रपंच खोटा वाटतो,माया काल्पनिक किंवा मिथ्या वाटतें आणि विवेकांमुळें शुध्द आत्मा अंतःकरणात प्रकट होतो.

ब्रह्मस्थित बाणतां अंतरीं । संदेह गेला ब्रह्मांडाबाहेरीं । दृश्याची जुनी जर्जरी । कुहिट जाली ॥ १७॥

( कुहिट-कुजट,विचकट)

ह्याप्रमाणें ब्रह्मस्थिति अंगात बाणली म्हणजें सर्व संशय ब्रह्मांडाबाहेर निघून जातात.दृश्य सृष्टीची जुनी जीर्ण झालेली गोधडी विटून (कुजून) नाहीशी होतें.

ऐसा हा परमार्थ । जो करी त्याचा निजस्वार्थ । आतां या समर्थास समर्थ । किती म्हणौनि म्हणावें ॥१८॥

असा हा परमार्थं जो करील त्याला साधणारा आहें,अशा या समर्थ अध्यात्माला समर्थ म्हणून किती वेळां म्हणावें ?

या परमार्थाकरितां । ब्रह्मादिकांसि विश्रामता । योगी पावती तन्मयता । परब्रह्मीं ॥ १९॥

ह्या परमार्थामुळे ब्रह्मादिकांना विश्रांति मिळतें व योगी ब्रह्मस्वरुपाच्या ठिकाणीं तन्मय होतात.

परमार्थ सकळांस विसांवा । सिद्ध साधु माहानुभावां । सेखीं सात्विक जड जीवां । सत्संगेंकरूनी ॥ २०॥

( सेखीं सात्विक - सत्वशिल सर्वसामान्य जीवना शेवटी /सत्संगामुळे विसावा लाभतो.)

परमार्थ हा सिध्द,साधु,महात्मे ह्या सर्वांचें विश्रांतिस्थान आहें हा शेवटी जड (अज्ञानी) परंतु सात्विक जीवांना सत्संगतीच्या योंगानें मिळणारा विसावा आहें.

परमार्थ जन्माचें सार्थक । परमार्थ संसारीं तारक । परमार्थ दाखवी परलोक । धार्मिकासी ॥ २१॥

परमार्थं हें जन्माचें सार्थक आहें,परमार्थच संसारातून तारणारा आहें व धार्मिकांना परलोक दाखविणारा आहें.

.परमार्थ तापसांसी थार । परमार्थ साधकांसी आधार । परमार्थ दाखवी पार । भवसागराचा ॥ २२॥

तपस्व्यांचा व साधकांचा आधार असा हा परमार्थ भवसमुद्राचा पैलतीर जीवाला दाखवितों.

परमार्थी तो राज्यधारी । परमार्थ नाहीं तो भिकारी । या परमार्थाची सरी । कोणास द्यावी ॥ २३॥

परमार्थ ज्याला साध्य झाला तोच खरा राजा होय.ज्याला हा परमार्थ साधला नाही तो भिकारी.ह्या परमार्थाची योग्यता कोणास येणार आहे ?

अनंत जन्मींचें पुण्य जोडे । तरीच परमार्थ घडे । मुख्य परमात्मा आतुडे । अनुभवासी ॥ २४॥

( आतुडे - साक्षात)

अनंत जन्मांचे पुण्य पदरीं असेल तरच हा परमार्थ घडतो.मुख्य परमात्मतत्वच अनुभवाला येंते.

जेणें परमार्थ वोळखिला । तेणें जन्म सार्थक केला । येर तो पापी जन्मला । कुलक्षयाकारणें ॥ २५॥

ज्यानें हा परमात्मा ओळखला त्यानें आपल्या जन्माचें सार्थक केलें आणि ज्यानें हा परमात्मा ओळखला नाहीं तो पापी केवळ कुळाचा क्षय करण्यासाठींच जन्माला आला असें समजावें.

असो भगवत्प्राप्तीविण । करी संसाराचा सीण । त्या मूर्खाचें मुखावलोकन । करूंच नये ॥ २६॥

असो. भगवंताची प्राप्ति करुन न घेतां,जो केवळ संसाराच्याच खटाटोपांत जन्म घालवितो त्या मूर्खाचें तोंडही पाहू नयें,

भल्यानें परमार्थी भरावें । शरीर सार्थक करावें । पूर्वजांस उद्धरावें । हरिभक्ती करूनी ॥ २७॥

( परमार्थी भरावें - पारमार्थिक जीवनाचा स्वीकार करावा)

तात्पर्य,शहाणा असेलं त्यांनें परमार्थाला लागावें. शरीर सार्थकीं लावावें व भगवद्भजनानें पूर्वजांचा उध्दार करावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे परमार्थस्तवननाम समास नववा ॥ ९॥**

**समास दहावा : नरदेहस्तवननिरूपण ॥ श्रीराम् ॥**

धन्य धन्य हा नरदेहो । येथील अपूर्वता पाहो । जो जो कीजे परमार्थलाहो । तो तो पावे सिद्धीतें ॥ १॥

नरदेह हा अत्यंत श्रेष्ठ होय.ह्याची अपूर्वता तर पहा! परमार्थासंबंधानें जी जी इच्छा धरावी,ती ती नरदेहांत सफळ होते.

या नरदेहाचेनि लागवेगें । येक लागले भक्तिसंगें । येकीं परम वीतरागें । गिरिकंदरें सेविलीं ॥ २॥

( लागवेगें - तत्काळ )

ह्या नरदेहाच्या आश्रयांनें कोणी ताबडतोब भक्तिमार्गाला लागलें,कोणी कडकडीत वैराग्य धारण करुन गिरीकंदरात जाऊन बसलें.

येक फिरती तिर्थाटणें । येक करिती पुरश्चरणें । येक अखंड नामस्मरणें । निष्ठावंत राहिले ॥ ३॥

कोणी तीर्थयात्रा करतात,तर कोणी पुरश्चरणें करतात,कोणी नामस्मरणावर निष्ठा ठेवून देवाचे अखंड नामस्मरण करीत राहिलें.

येक तपें करूं लागले । येक योगाभ्यासी माहाभले । येक अभ्यासयोगें जाले । वेदशास्त्री वित्पन्न ॥ ४॥

कोणी तप,तर कोणी योगाभ्यास करतात,कोणी अध्ययन करून वेदशास्त्रज्ञ झालें.

येकीं हटनिग्रह केला । देह अत्यंत पीडिला । येकीं देह ठाईं पाडिला । भावार्थबळें ॥ ५॥

देवाच्या प्राप्तीसाठीं कोणीं धरणें,उपवास इत्यादि प्रकारानें हटनिग्रह करुन देह झिजविला,तर कोणी भावार्थाच्या जोरावर देवाची प्राप्ती करुन घेतलीं.

येक माहानुभाव विख्यात । येक भक्त जाले ख्यात । येक सिद्ध अकस्मात । गगन वोळगती ॥ ६॥

( वोळगती - संचार करतो)

कोणी प्रसिध्द महात्में होतात.,तर कोणी सिध्दि प्राप्त करुन घेऊन आकाशांत संचार करुं लागतांत.

येक तेजीं तेजचि जाले । येक जळीं मिळोन गेले । येक ते दिसतचि अदृश्य जाले । वायोस्वरूपीं ॥ ७॥

कोणी तेजोरुप होऊन तेंजांत मिळुन जातात,तर कोणी पाण्यांत मिळून जातात,तर कोणी (तुकोंबांसारखे) पाहाता पाहता वायुरुप होऊन अद्दृश्य होऊन जातात.

येक येकचि बहुधा होती । येक देखतचि निघोनि जाती । येक बैसले असतांची भ्रमती । नाना स्थानीं समुद्रीं ॥ ८॥

कोणी एकच असून अनेक रुप होतात,कोणी पाहता पाहतांच निघून जातात.(गुप्त होतात),कोणी एके ठिकाणी बसले असतांच समुद्रामध्ये व अनेक ठिकाणीं हिंडून येतात.

येक भयानकावरी बैसती । एक अचेतनें चालविती । येक प्रेतें उठविती । तपोबळेंकरूनी ॥ ९॥

कोणी व्याघ्रादि हिंस्त्र पशूंवर (चांगदेवांप्रमाणे) बसतात,तर कोणी ज्ञानदेवांप्रमाणे जड भिंती चालवितात,कोणी आपल्या तप:सामर्थ्यानें प्रेतें उठवितात.

येक तेजें मंद करिती । येक जळें आटविती । येक वायो निरोधिती । विश्वजनाचा ॥ १०॥

कोणी चंद्रसूर्यादिकांची तेजे मंद करतात,तर कोणी (अगस्तीसारखें) समुद्राचे पाणी आटवून टाकतात. कोणी सगळ्या-जगाचा-लोकांचा वायू कोंडून धरतात.

ऐसे हटनिग्रही कृतबुद्धी । जयांस वोळल्या नाना सिद्धी । ऐसे सिद्ध लक्षावधी । होऊन गेले ॥ ११॥

( कृत - निश्र्च्यी)

ज्यांनीं अनेक सिध्दि प्राप्त करुन घेतल्या आहेंत असें हठनिग्रही द्दढनिश्रयी लाखों सिध्द कृतार्थ होऊन गेलें.

येक मनोसिद्ध येक वाचासिद्ध।येक अल्पसिद्ध येक सर्वसिद्ध ।ऐसे नाना प्रकारीचे सिद्ध। विख्यात जाले ॥१२॥

कोणाला मनःसिध्दिः (मनांत आणलेले घडुन येणें),कोणाला वाचासिध्दि (बोललेले खरे होणें), कोणाला सगळ्या सिध्दि,तर कोणाला थोड्या सिध्दि असे अनेक प्रकारचे सिध्द प्रसिध्द झाले आहेंत.

येक नवविधाभक्तिराजपंथें।गेले,तरले परलोकींच्या निजस्वार्थे ।येक योगी गुप्तपंथें।ब्रह्मभुवना पावले॥१३॥

कोणी नवविधा भक्तीच्या राजमार्गाने जाऊन परलोकींचे हिंत साधून घेतलें व ते तरून गेले,तर कोणी योगी गुप्तमार्गानें ब्रह्मपदी गेलें.

येक वैकुंठास गेले । येक सत्यलोकीं राहिले । येक कैळासीं बैसले । शिवरूप होऊनी ॥ १४॥

आपपल्या उपासनेप्रमाणें कोणी वैकुंठास गेले,कोणी सत्यलोकीं (ब्रह्मलोकी जाऊन) राहिले.कोणी कैलासामध्यें शंकररुप होऊन बसलें.

येक इंद्रलोकीं इंद्र जाले । येक पितृलोकीं मिळाले । येक ते उडगणी बैसले । येक ते क्षीरसागरी ॥ १५॥

( उडगणी - नक्षत्र)

कोणी इंद्रलोकातं गेले व इंद्र झालें,कोणाला पितृलोक मिळाला,कोणी नक्षत्रलोंकात जाऊन राहिलें,कोणी क्षीरसागरांत गेलें.

सलोकता समीपता । स्वरूपता सायोज्यता । या चत्वार मुक्ती तत्वतां । इच्छा सेऊनि राहिले ॥ १६॥

सलोकता (देवलोकी रहाणे) समीपता (देवाजवळ रहाणें) सरुपता (देवरुप पाप्त होणे.),सायुज्यता (ब्रह्मरुप होणें) अशा या चार मुक्तींपैकीं ज्याला जी आवडली ती तीच घेऊन कोणी राहीलें.

ऐसे सिद्ध साधू संत । स्वहिता प्रवर्तले अनंत । ऐसा हा नरदेह विख्यात । काय म्हणौन वर्णावा ॥ १७॥

ह्याप्रमाणें असंख्य साधुसंत व सिध्द नरदेहाच्या योगानें आपापल्या कल्याणाला लागलें असा हा नरदेह प्रख्यात आहें यांचे किती वर्णन करावें ?

या नरदेहाचेनि आधारें । नाना साधनांचेनि द्वारें । मुख्य सारासारविचारें । बहुत सुटले ॥ १८॥

या नरदेहाच्या आश्रयाच्या योगानें अनेक साधनें करुन पण मुख्यत: सारासार विचार करुन पुष्कळ लोक मुक्त झालें.

या नरदेहाचेनि संमंधें । बहुत पावले उत्तम पदें । अहंता सांडून स्वानंदे । सुखी जाले ॥ १९॥

या नरदेहाशीं संबंध जडल्यामुळें अनेक जण अहंकाराचा त्याग करुन स्वानंदसुख भोक्ते झालें व उत्तम पदें प्राप्त करुन घेते झाले (उत्तम गतीला पोचलें)

नरदेहीं येऊन सकळ । उधरागती पावले केवळ । येथें संशयाचें मूळ । खंडोन गेलें ॥ २०॥

ज्यांनी म्हणून आपला उध्दार करुन घेतलां ते ते नरदेहांत येऊनच कृतकार्य झालें.तेव्हा आंता नरदेहाच्या श्रेष्ठतेविषयीं संशयच राहात नाहीं.

पशुदेहीं नाहीं गती । ऐसे सर्वत्र बोलती । म्हणौन नरदेहींच प्राप्ती । परलोकाची ॥ २१॥

पशुदेहांमध्ये असलेल्यांना सद्गति मिळत नाहीं,असें सर्व ग्रंथात सांगितले आहें,म्हणून परलोकाची प्राप्ती नरदेहामध्येच व्हायची.

संत महंत ऋषी मुनी । सिद्ध साधू समाधानी । भक्त मुक्त ब्रह्मज्ञानी । विरक्त योगी तपस्वी ॥ २२॥

संत,महंत,ऋषि, मुनि,सिध्द,साधु,समाधानी,भक्त,मुक्त,ब्रह्मज्ञानी,विरक्त,योगी,तपस्वी

तत्त्वज्ञानी योगाभ्यासी । ब्रह्मच्यारी दिगंबर संन्यासी । शडदर्शनी तापसी । नरदेहींच जाले ॥ २३॥

तत्ववेत्ते,योगाभ्यासी,ब्रह्मचारी,दिगंबर,संन्यासी, षड्दर्शनांचा अभ्यास करणारे तापसी इत्यादि अनेक थोर थोर नरदेहामध्येच झाले आहेत.

म्हणौनी नरदेह श्रेष्ठ । नाना देहांमध्यें वरिष्ठ । जयाचेनि चुके आरिष्ट । येमयातनेचें ॥ २४॥

म्हणून नरदेह श्रेष्ठ आहें,सर्व देहांमध्ये नरदेह श्रेष्ठ आहे. त्याच्या योगानें यमयातनेंचें (जन्ममृत्युचें) अरिष्ट टळते.

नरदेह हा स्वाधेन । सहसा नव्हे पराधेन । परंतु हा परोपकारीं झिजऊन । कीर्तिरूपें उरवावा ॥ २५॥

नरदेह हा स्वाधीन आहें,सहसा पराधीन होणारा नाही,परंतु याला परोपकारामध्ये झिजवून कीर्तिरुपाने उरवला पाहिजें.

अश्व वृषभ गाई म्हैसी । नाना पशु स्त्रिया दासी । कृपाळूपणें सोडितां त्यांसी । कोणी तरी धरील ॥ २६॥

घोडे ,बैल,गाई,म्हशी, इत्यादि अनेक पशु, स्त्रिया, दासी यांना कृपा करुन कोणी मोकळे सोडलें तर दुसरा एखादा धरील.

तैसा नव्हे नरदेहो । इछा जाव अथवा रहो । परी यास कोणी पाहो । बंधन करूं सकेना ॥ २७॥

तसा हा नर (पुरुष) देह नाहीं.पुरुषाची देहावरची इच्छा (आसक्ति) असो अगर नसो परंतु त्याला (देहाला) कोणी बंधन करु शकत नाही.

नरदेह पांगुळ असता । तरी तो कार्यास न येता । अथवा थोंटा जरी असता ।तरी परोपकारास न ये ॥२८॥

हा नरदेह पांगळा असला तर कामाला येतं नाहीं, थोटा असेल तर परोपकार घडत नाहीं

नरदेह अंध असिला । तरी तो निपटचि वायां गेला । अथवा बधिर जरी असिला ।तरी निरूपण नाहीं ॥२९॥

आंधळा असेल अगदींच वाया गेलां,बहिरा असेल तर निरुपण ऐकावयास मिळणार नाही,

नरदेह असिला मुका । तरी घेतां न ये आशंका । अशक्त रोगी नासका । तरी तो निःकारण ॥ ३०॥

नरदेह मुका असला तर शंका घेतां येत नाहीं.तसाच अशक्त,रोगी,किंवा बिघडलेला असला तर तो निरर्थकच..

नरदेह असिला मूर्ख । अथवा फेंपर्या समंधाचें दुःख । तरी तो जाणावा निरार्थक । निश्चयेंसीं ॥ ३१॥

मुर्ख,फेफरे येणारा,समंधाची बाधा असलेला असा असला तर तोही खात्रींने फुकट जाणार.

इतकें हें नस्तां वेंग । नरदेह आणी सकळ सांग । तेणें धरावा परमार्थमार्ग । लागवेगें ॥ ३२॥

यांपैकी कोणतेही व्यंग नसून अगदी अव्यंग असा नरदेह प्राप्त झालां असेंल त्यांनें तात्काळ परमार्थ मार्ग धरावा.

सांग नरदेह जोडलें । आणी परमार्थबुद्धि विसर्ले । तें मूर्ख कैसें भ्रमलें । मायाजाळीं ॥ ३३॥

निर्व्यंग नरदेह प्राप्त होऊनही जो परमार्थाचा विचार करण्याचें विसरतों,तो किती मूर्ख म्हणून सांगावा ? तो मायाजालात गुरफटला म्हणून समजावें.

मृत्तिका खाणोन घर केलें । तें माझें ऐसें दृढ कल्पिलें । परी तें बहुतांचें हें कळलें । नाहींच तयासी ॥३४॥

हा माती खणून तिचें घर करतो व ते माझे असे ममत्व धरतो,पण हे अनेकांचे आहें,हें त्या मुर्खाला कळतच नाही.

मुष्यक म्हणती घर आमुचें । पाली म्हणती घर आमुचें । मक्षिका म्हणती घर आमुचें । निश्चयेंसीं ॥३५॥ कांतण्या म्हणती घर आमुचें । मुंगळे म्हणती घर आमुचें । मुंग्या म्हणती घर आमुचें । निश्चयेंसीं ॥३६॥ विंचू म्हणती आमुचें घर । सर्प म्हणती आमुचें घर । झुरळें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥३७॥

उंदीर,पाली,माश्या,कातण्या,मुंगळे,मुंग्या,विंचु,साप,झुरळें, हीं सगळी आमचें घर असे म्हणतात.

भ्रमर म्हणती आमुचें घर । भिंगो-या म्हणती आमुचें घर । आळीका म्हणती आमुचें घर। काष्ठामधें॥३८॥

( भिंगोर्या - भुंग्याची अळी)

भुंगे,भिंगो-या (कुंभारणी),आळ्या हीं सगळीं म्हणतात की आमचें घर लांकडांत आहें.

मार्जरें म्हणती आमुचें घर । श्वानें म्हणती आमुचें घर । मुंगसें म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥ ३९॥

माजरें,कुत्रीं,मुंगसे, हीं म्हणतात कीं हे आमचेच घर आहें.

पुंगळ म्हणती आमुचें घर । वाळव्या म्हणती आमुचें घर । पिसुवा म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥४०॥ ढेकुण म्हणती आमुचें घर । चांचण्या म्हणती आमुचें घर । घुंगर्डी म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥४१॥ पिसोळे म्हणती आमुचें घर । गांधेले म्हणती आमुचें घर । सोट म्हणती आमुचें घर । आणी गोंवी ॥४२॥ बहुत किड्यांचा जोजार । किती सांगावा विस्तार । समस्त म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥४३॥ पशु म्हणती आमुचें घर । दासी म्हणती आमुचें घर । घरीचीं म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥ ४४॥ पाहुणे म्हणती आमुचें घर । मित्र म्हणती आमुचें घर । ग्रामस्त म्हणती आमुचें घर । निश्चयेंसीं ॥ ४५॥

( पुंगळ - काळा पाद्रा किडा ,चांचण्या- बारीक डास,लाल्मुग्या )

पुंगळा(पाद्रेकिडे),वाळव्या,पिसवा,ढेकूण,चांचण्या(चांचड,तावडे,मुंगळे),घुरघुंडीं,पिसोळें,गांधीलमाश्या,सोट (जंतु), गोमी  अशा पुष्कळ किड्यांचा त्रास याचा विस्तार म्हणून किती सांगावा ?असे हे सगळेच किडे तसेच पशु,दासी,घरांतील माणसें,पाहुणें,मित्र गावकरी हे सगळेच म्हणतांत की खात्रीपुर्वक आमचेंच हे घर आहे.

तश्कर म्हणती आमुचें घर ।राजकी म्हणती आमुचें घर ।आग्न म्हणती आमुचें घर। भस्म करूं ॥४६॥

चोंर म्हणतातं आमचेंच घर,सरकारी अधिकारी म्हणतात आमचें घर अग्निही म्हणतो आमचेच घर आहें,मी वाटेल तेव्हा जाळून टाकीन.

समस्त म्हणती घर माझें । हें मूर्खहि म्हणे माझें माझें । सेवट जड जालें वोझें । टाकिला देश ॥ ४७॥

याप्रमाणे ही सारींच 'हे माझे घर' असें म्हणतात.आणि हा मुर्खही त्याच घराला माझे घर म्हणतों. आणि अखेरीस संसाराचे ओझे कठीण झाले म्हणजे तर तें घरच नव्हें,तर तो गांव,देशसुध्दा टाकून पोटासाठीं दूर देशीं निघुन जातों.

अवघीं घरें भंगलीं । गांवांची पांढरी पडिली । मग तें गृहीं राहिलीं । आरण्यस्वापदें ॥ ४८॥

गांवांतील अशीं सगळी घरे मोडून किंवा पडून जातात आणि गावांची पांढर पडते (गांव ओस पडतो),मग त्या घरांतून कोल्ही,कुत्री,येऊन राहूं लागतात.

किडा मुंगी वाळवी मूषक । त्यांचेंच घर हें निश्चयात्मक । हें प्राणी बापुडें मूर्ख । निघोन गेलें ॥ ४९॥

किडा,मुंगी,वाळवी,उंदीर ह्या प्राण्यांचेच खरोखरी तें घर आहें (कारण त्यामध्यें आधीं व मग तेंच राहातात) माझे म़ाझे म्हणणारा बिचारा हा मूर्ख प्राणी तें घर सोडून निघून जातो.

ऐसी गृहांची स्थिती । मिथ्या आली आत्मप्रचीती । जन्म दों दिसांची वस्ती । कोठें तरी करावी ॥ ५०॥

घरावरील ममत्व मिथ्या आहें,हे स्वानुभवानें कळलें.यासाठीं जन्म म्हणजें दोन दिवसांची वस्ती ती कोठेतरी करावीं.

देह म्हणावें आपुलें । तरी हें बहुतांकारणें निर्मिलें । प्राणीयांच्या माथां घर केलें। वा मस्तकीं भक्षिती॥ ५१॥

( वा - उवा)

आता देह आपला म्हणावा तर तो अनेकांसाठी उत्पन्न झाला आहें. (कसा तो पहाः) माणसाच्या डोक्यावर घर करुन उवा रक्त खातात.

रोमेमुळी किडे भक्षिती । खांडुक जाल्यां किडे पडती । पोटामध्ये जंत होती । प्रत्यक्ष प्राणियांच्या ॥ ५२॥

केसांच्या बुडाशीं राहून जंतु निर्वाह करतात,खांडूक झाल्यास त्यांत किडे पडतात,प्राण्याच्या पोटांत जंत होतात हे तर प्रत्यक्षच आहें.

कीड लागे दांतासी । कीड लागे डोळ्यांसी । कीड लागे कर्णासी । आणी गोमाशा भरती ॥ ५३॥

दांत,डोळे व कान ह्यांना किड लागते. व कानांत गोमाशाही शिरतात.

गोचिड अशुद्ध सेविती । चामवा मांसांत घुसती । पिसोळे चाऊन पळती । अकस्मात ॥ ५४॥

गोचिड्या रक्त खातात, चामवा मासांत घुसतात आणि पिसोळे एकदम चावून पळून जातात.

भोंगें गांधेलें चाविती । गोंबी जळवा अशुद्ध घेती । विंचू सर्प दंश करिती । कानटें फुर्सीं ॥ ५५॥

भुंगे गांधील माशा चावतात,गोमी,जळवा रक्त पितात,विंचु,साप,घोणस,फुरशी इ.दंश करतात.

जन्मून देह पाळिलें । तें अकस्मात व्याघ्रें नेलें । कां तें लांडगींच भक्षिलें । बळात्कारें ॥ ५६॥

जन्मभर वाढविलेला देह वाघ एकाएकीं घेऊन जातों,किंवा झडप घालून लांडगा खाऊन टाकतो.

मूषकें मार्जरें दंश करिती । स्वानें अश्वें लोले तोडिती । रीसें मर्कटें मारिती । कासावीस करूनी ॥ ५७॥

( लोले - लचके )

उंदीर,मांजरे चावतात,कुत्रीं व घोडीं लचकें तोडतात अस्वलें व माकडें कासावीस करुन मारतात.

उष्टरें डसोन इचलिती । हस्थी चिर्डून टाकिती । वृषभ टोचून मारिती । अकस्मात ॥ ५८॥

( उष्टरें - उंट )

उंट डसतात व उचलून फेकतात, हत्ती पायांखालीं चिरडतांत,बैल एकदम शिंगें भोसकून मारतात.

तश्कर तडतडां तोडिती । भूतें झडपोन मारिती । असो या देहाची स्थिती । ऐसी असे ॥ ५९॥

चोर तडातड तुकडें करतातं,भुतें झडपून (पछाडून) मारतात.असो.या देहाची स्थिती अशी आहें.

ऐसें शरीर बहुतांचें । मूर्ख म्हणे आमुचें । परंतु खाजें जिवांचें । तापत्रें बोलिलें ॥ ६०॥

( खाजें - खाद्य )

ह्या प्रमाणे हे शरीर अनेकांचे असतांही मूर्ख त्याला माझें माझें म्हणून कवटाळतों,पण हे अनेक जीवांचा खाऊ (खाद्य) आहें,हे पुढे तात्पर्य-निरुपणांत सागितलें जाणार आहें.

देह परमार्थीं लाविलें । तरीच याचें सार्थक जालें । नाहीं तरी हें वेर्थची गेलें । नाना आघातें मृत्यपंथें ॥६१॥

हा देह परमार्थांत लावला तर त्याचें सार्थक होतें,नाहीतर अनेक अपघातांनीं मरण पावून व्यर्थ जातो.

असो जे प्रपंचिक मूर्ख।ते काये जाणती परमार्थसुख ।त्या मूर्खांचें लक्षण कांहीं येक। पुढे बोलिलें असे ॥६२॥

असो.जे प्रपंचासक्त मुर्ख आहेत,त्यांना परमार्थाचें सुख काय कळणार ?त्या मूर्खांचीं लक्षणें पुढील समांसात सांगितलीं आहेंत.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नरदेहस्तवननिरूपणनाम समास दहावा ॥ १०॥ ॥ दशक पहिला समाप्त ॥**

# श्रीसार्थ दासबोध दशक दुसरा मूर्खलक्षणांचा



## ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक दुसरा : मूर्खलक्षणांचा समास पहिला : मूर्खलक्षण

॥ श्रीराम ॥ ॐ नमोजि गजानना । येकदंता त्रिनयना । कृपादृष्टि भक्तजना अवलोकावें ॥ १॥

हे प्रणवरूप (औंकाररूप) गजानना,एकदंता,त्रिनयना,आपणास नमस्कार असो,(आम्हा श्रोत्यावक्त्यांकडे) आम्हांकडे कृपादृष्टीने पहावे.

तुज नमूं वेदमाते ॥ श्रीशारदे ब्रह्मसुते । अंतरी वसे कृपावंते । स्फूर्तिरूपें ॥ २॥

हे वेदमाते (वेदाची किंवा ज्ञानाची उत्पत्ति जिच्यापासून आहे), श्री शारदे, ब्रह्मसुते (ब्रह्मापासून उत्पन्न झाली म्हणून),कृपावंते स्पुर्तीरुपाने (एकोऽहंबहुस्याम! अथवा बहु स्यां प्रजायजे! ही मूळ ब्रह्माचे ठायी झालेली स्पुर्ती अथवा प्रत्येक प्राण्याच्या ठिकाणी “अहं” असे जे स्पुरण होते ते तुझेच स्वरूप आहे.) माझ्या अंतःकरणांत वास कर.(अहं-स्पुरण-रूपानें प्राणिमात्रांमध्यें असलेली मजमध्येंही जरी सामान्यत्वेंकरून तूं आहेस, तरी ज्ञानस्वरूपानें विशेषत्वानें प्रकट हो म्हणून प्रार्थना.)

वंदून सद्गुरुचरण । करून रघुनाथस्मरण । त्यागार्थ मूर्खलक्षण । बोलिजेल ॥ ३॥

सद्गुरूचरणांना नमस्कार करून व उपास्य रघुनाथयांचे स्मरण करून मूर्खलक्षणे सांगतों,हेतु हा कीं,लोकांनीहीं ऐकोन त्याचा त्याग करावा.(सद्गुरूचरणांना नमस्कार का करावयाचा?

**साधकभावे नमस्कार घाली । त्याची चिंता साधुस लागली ।।**

येक मूर्ख येक पढतमूर्ख । उभय लक्षणीं कौतुक । श्रोतीं सादर विवेक । केला पाहिजे ॥ ४॥

दोष जसे दोन प्रकारचे ज्ञात व अज्ञात,तसे मूर्खही दोन प्रकारचे मूर्ख व पढतमूर्ख. शहाणपणाची मशाल हातात घेऊन खड्यात पाडणारे त्यांच्या लक्षणांचा विचार श्रोत्यांनीं अगत्य केला पाहिजे.त्यावाचून त्याग व्हायचा नाही.

पढतमूर्खाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण । साअवध होऊनि विचक्षण । परिसोत पुढें ॥ ५॥

पढतमूर्खाचे लक्षण पुढे (१० व्या समासात सांगीतले आहे.ते विचक्षण श्रोत्यांनी पुढे लक्ष देऊन एकावें.

आतां प्रस्तुत विचार । लक्षणें सांगतां अपार । परि कांहीं येक तत्पर । होऊन ऐका ॥ ६॥

प्रस्तुत मूर्ख लक्षणे सांगावयाची ती पुष्कळच आहेत. त्यापैकी ठळकठळक सांगतो. ती तत्पर होऊन ऐका.

जे प्रपंचिक जन । जयांस नाहीं आत्मज्ञान । जे केवळ अज्ञान । त्यांचीं लक्षणें ॥ ७॥

ज्यास आत्मज्ञान नाहीं,जे केवळ प्रपंच्यात दंग व ( त्या प्रपंच्याविषयीं) असे अज्ञानी(मूर्ख) त्यांची ही लक्षणे आहेत.(ही लक्षणें समासाच्या शेवटपर्यंत सांगितली आहेत.)

जन्मला जयांचे उदरीं । तयासि जो विरोध करी । सखी मनिली अंतुरी । तो येक मूर्ख ॥ ८॥

ज्या आईबापांचे पोटी जन्मास आला त्यांच्याशी आपल्या बायकोचे सांगण्यावरून वाकडेपणा धरून व बायकोला सखी किवा मैत्रीण मानून तिजजवळ गुप्त गोष्टी सांगणे.

सांडून सर्वही गोत । स्त्रीआधेन जीवित । सांगे अंतरींची मात । तो येक मूर्ख ॥ ९॥

सर्व गोतांचा (आप्तेष्टांचा) सबंध सोडून बाईलबुध्द्या होणे.तिलाच आपले हितगुज सांगणे.

परस्त्रीसीं प्रेमा धरी । श्र्वशुरगृही वास करी । कुळेंविण कन्या वरी । तो येक मूर्ख ॥ १०॥

परस्त्रीशी लघळपणा करणे,नित्य सासूरवाडीस जाऊन राहाणे,कुलशिलाची परीक्षा केल्याशिवाय केवळ सौंदर्याकडे लक्ष देऊन शरीरसंबंध (लग्नसंबध) करणे.ही मूर्खपणाचीं लक्षणे होत.

समर्थावरी अहंता । अंतरीं मानी समता । सामर्थ्येंविण करी सत्ता । तो येक मूर्ख ॥ ११॥

आपल्यापेक्षा श्रेष्ठ पुरुषाशी अहंकाराने बरोबरी करणे(आपली श्रेष्ठता दाखविणे),मनात बरोबरी करुं जाणे,बाहेर लोकांमध्ये आपली श्रेष्ठता दाखविणे,सामर्थ्य नसता सत्ता गाजविणे हा मूर्खपणा होय.

आपली आपण करी स्तुती । स्वदेशीं भोगी विपत्ति । सांगे वडिलांची कीर्ती । तो येक मूर्ख ॥ १२॥

आपल्याच तोंडाने आपली स्तुती करणे,पुरुषार्थाच्या गोष्टी सांगत स्वदेशात (स्वदेहात) हालअपेष्टा भोगणे.व तोंडाने वडिलांची कीर्ती गाणे.(उदा-सध्याचा हिंदुस्थान),(स्वतःचा नाकर्तेपणा प्रकट असता आमचे वडील असे मोठे होते व आमचे घराणे इतक्या योग्यतेचे आहे,अशा उगाच फुशारक्या मारणे),हे मूर्खपणाचे होय.

अकारण हास्य करी । विवेक सांगतां न धरी । जो बहुतांचा वैरी । तो येक मूर्ख ॥ १३॥

कारणावाचून उगीचच हसणारा,कोणी विवेक-विचार-सांगितला-असतां-न मानणारा अनेकांशी शत्रुत्व असणारा (बहुतांशी वाकडे असणारा) तो मूर्ख होय.

आपुलीं धरूनियां दुरी । पराव्यासीं करी मीत्री । परन्यून बोले रात्रीं । तो येक मूर्ख ॥ १४॥

आपल्या माणसांशी फटकून वागणारा व परक्यांशी मैत्री करणारा,परदोषांची काथ्याकूट रात्री (पश्चात) करणारा तो मूर्ख होय.

बहुत जागते जन । तयांमध्यें करी शयन । परस्थळीं बहु भोजन- । करी, तो येक मूर्ख ॥ १५॥

पुष्कळ जागते (शहाणे) लोकांत जो निजून राहतो  (अज्ञान पांघरतो,दुर्लक्ष करतो),(इतर माणसे जागत असतां मध्येच हातपाय ताणून घोरत पडतो), परक्या ठिकाणी फार जेवतो तो मूर्ख होय.

मान अथवा अपमान । स्वयें करी परिच्छिन्न । सप्त वेसनीं जयाचें मन । तो येक मूर्ख ॥ १६॥

आपला मान किवा अपमान स्वतःच्या तोंडाने उघड करणे.(आपल्या वागणुकीमुळे आपला बोज मुळीच राहु न देणे),द्यूत,वेश्यागमन,चोरी,चाहाडी, परदारा रमण,लघुपक्षीं क्रीडा  (कबुतरे,बुलबुल,तित्तीर वगैरेचे खेळ), किन्नरगायन (कोल्हाटीणीचे गाणे) ही सात अथवा पंच विषय व परद्रव्य-दारा ही सात व्यसने ह्यात रममाण होणारा तो मूर्ख.

धरून परावी आस । प्रेत्न सांडी सावकास । निसुगाईचा संतोष- । मानी, तो येक मूर्ख ॥ १७॥

दुसऱ्याच्या साह्याची आशा धरून स्वतः काहीही प्रयत्न न करणारा व आळशीपणाचा आनंद मानणारा तो मूर्ख.

घरीं विवेक उमजे । आणि सभेमध्यें लाजे । शब्द बोलतां निर्बुजे । तो येक मूर्ख ॥ १८॥

घरात शहाणपणाच्या गोष्टी सुचून सभेत (चारचौघात) लाजतो ,व बोलताना घाबरतो तो मूर्ख होय.

आपणाहून जो श्रेष्ठ । तयासीं अत्यंत निकट । सिकवेणेचा मानी वीट । तो येक मूर्ख ॥ १९॥

आपल्यापेक्षा श्रेष्ठ पुरुषांशी सलगीने वागतो व कोणी शहाणपण शिकविले तरी ते लक्षात घेत नाही.-त्याचा कंटाळा करतो तो मूर्ख होय.

नायेके त्यांसी सिकवी । वडिलांसी जाणीव दावी । जो आरजास गोवी । तो येक मूर्ख ॥ २०॥

आपले जो ऐकत नाही त्यास शिकवितो,वडीलजंनापुढे शहाणपणा मिरवतो श्रेष्ठ लोकांना (आर्यांना) घोटाळ्यात पाडण्यासारखे वर्तन करतो. मूर्ख होय.

येकायेकीं येकसरा । जाला विषईं निलाजिरा । मर्यादा सांडून सैरा- । वर्ते, तो येक मूर्ख ॥ २१॥

( सैरावर्ते - बेलगाम वर्तन करणे.)

विषयोपभोगाचे सेवन एकाएकी,म्हणजे विचार न करता, करतो आणि नित्य निर्लल्ज्यपणे अमर्याद वागतो तो मूर्ख होय.

औषध न घे असोन वेथा । पथ्य न करी सर्वथा । न मिळे आलिया पदार्था । तो येक मूर्ख ॥ २२ ।।

रोग असून औषध न घेणे व घेतल्यास पथ्य मुळीच (कधीही)न सांभाळणे,प्राप्त स्थितीत संतोष न मानणे.(सहज मिळालेल्या पदार्थास आवडून न घेणे), ते मूर्खपण होय.

संगेंविण विदेश करी । वोळखीविण संग धरी । उडी घाली माहापुरीं । तो येक मूर्ख ॥ २३॥

सोबतीवांचून परदेशात हिडतो,स्वभावाचा परिचय झाल्यावाचून संगत करतो.महापुरात उडी घालतो तो मूर्ख होय.

आपणास जेथें मान । तेथें अखंड करी गमन । रक्षूं नेणे मानाभिमान । तो येक मूर्ख ॥ २४॥

आपला मान जेथे होतो तेथे नित्य जातो,आपला मान किवा स्वाभिमान राखता येत नाही तो मूर्ख होय.

सेवक जाला लक्ष्मीवंत । तयाचा होय अंकित । सर्वकाळ दुश्चित्त । तो येक मूर्ख ॥ २५॥

(दुश्चित्त- संसाराविषयी चिंताग्रस्त)

सेवक भाग्यास चढला की त्याच्या अंकित (गुलाम) होऊन राहाणे,सर्वकाळ दुश्र्चित्त ( कुढ्या मनाचा किवा चांचल्लचित्त) असणे हे मूर्खपणाचे लक्षण होय.

विचार न करितां कारण । दंड करी अपराधेंविण । स्वल्पासाठीं जो कृपण । तो येक मूर्ख ॥ २६॥

( कृपण - कंजूष )

कारणांचा विचार न करता किंवा अपराधावाचून दंड करणे,क्षुल्लक गोष्टीत कृपणपणा दाखविणे.हे मूर्खपण होय.

देवलंड पितृलंड । शक्तिवीण करी तोड । ज्याचे मुखीं भंडउभंड । तो येक मूर्ख ॥ २७॥

( देवलंड पितृलंड - देवाविषयी मनात भीती असूनही (मानमर्यादा न राखणारा) , शक्तिवीण करी तोड - कुवत न ओळखता अमर्यादपणे वाचाळ , भंडउभंड - अश्लील बडबड)

देवलंड-कुळधर्मादि देवकार्य न करणारा,पितृलंड- श्राद्धपक्षादि न करणारा,शक्ती नसता तोंड (उलट डाव किंवा उपाय) करणारा, (तोंड असा पाठ: असा ताकद नसताना मध्येच तोंड घालून बोलणारा किवा शिव्या देणारा,वायफळ बडबड करणारा) तो मूर्ख होय.

घरीच्यावरी खाय दाढा । बाहेरी दीन बापुडा । ऐसा जो कां वेड मूढा । तो येक मूर्ख ॥ २८॥

घरच्या माणंसावर दात खातो.(रागावतो) व (घरच्यांना वाघोबा) बाहेर गोगलगाय बनतो असा जो वेडमूढ तो मूर्ख होय.

नीच यातीसीं सांगात । परांगनेसीं येकांत । मार्गें जाय खात खात । तो येक मूर्ख ॥ २९॥

( नीच याती - नीच वृत्तीचे लोक, मार्गें - उभ्याने,रस्त्याने)

हलक्या जातीच्या माणसांशी दोस्ती करतो. परस्त्रीशी एकांत करतो. रस्त्याने खातखात जातो तो मूर्ख होय.

स्वयें नेणे परोपकार । उपकाराचा अनोपकार । करी थोडें बोले फार । तो येक मूर्ख ॥ ३०॥

स्वतः उपकाराचे नाव ज्याला ठाऊक नाही.कोणी याचेवर केला तर त्याची परतफेड अपकाराने करतो,करणे थोडे पण बोलतो फार तो मूर्ख होय.

तपीळ खादाड आळसी । कुश्चीळ कुटीळ मानसीं । धारीष्ट नाहीं जयापासीं । तो येक मूर्ख ॥ ३१॥

( तपीळ - तापट, कुश्चीळ-दुर्वर्तनी ,कुटीळ - कपटी )

तापट (तपीळ),खादाड,आळशी,घाणेरडा,कुटील मनाचा धारीष्टशून्य हे सर्व लोक मूर्ख होत.

विद्या वैभव ना धन । पुरुषार्थ सामर्थ्य ना मान । कोरडाच वाहे अभिमान । तो येक मूर्ख ॥ ३२॥

विद्या,वैभव (ऐश्वर्य),संपत्ती,पराक्रम,सामर्थ्य ह्यापैकी काहीच नसतां कोरडा अभिमान वाहणारा तो मूर्ख होय.

लंडी लटिका लाबाड । कुकर्मी कुटीळ निचाड । निद्रा जयाची वाड । तो येक मूर्ख ॥ ३३॥

( निचाड - निर्लज्य , लंडी - उद्धट )

भित्रा (लंडी),खोटा,लबाड,वाईट कर्मे करणारा,कुटिल,निलाजरा (निचाड),फार (वाड) झोपाळू तो तो मूर्ख होय.

उंचीं जाऊन वस्त्र नेसे । चौबारां बाहेरी बैसे । सर्वकाळ नग्न दिसे । तो येक मूर्ख ॥ ३४॥

( चौबारां - चव्हाट्यावर )

उंचावर जाऊन वस्त्र नेसतो (किवा,उंची म्हणजे श्रीमंती जाऊन वस्त्र नेसतो.) चव्हाट्यावर शौचविधीस जाऊन बसतो (रहदारीच्या मार्गावर शौचविधी अथवा लघुशंका करतो.),सदा नग्नप्राय दिसतो. तो मूर्ख होय.

दंत चक्षु आणी घ्राण । पाणी वसन आणी चरण । सर्वकाळ जयाचे मळिण । तो येक मूर्ख ॥ ३५॥

(पाणी - हात , वसन - कपडे)

दातं,डोळे आणि नाक,हात (पाणी),पाय आणि वस्त्र ज्याची नित्य मलीन असतात तो मूर्ख होय.

वैधृति आणी वितिपात । नाना कुमुहूर्तें जात । अपशकुनें करी घात । तो येक मूर्ख ॥ ३६॥

( वैधृति आणी वितिपात - ह्या वाईट मुहूर्तांची,उपग्रह ज्योतिषातील नावे )

वैधृति आणि व्यतिपात वगैरे अनेक कुमुहुर्तावर प्रवासाला निघतो व अपशकुन झाले तरी ते न मानंता आपले नुकसान करून घेतो तो मूर्ख होय.

क्रोधें अपमानें कुबुद्धि । आपणास आपण वधी । जयास नाहीं दृढ बुद्धि । तो येक मूर्ख ॥ ३७॥

क्रोधाने अपमान झाला असे वाटून अथवा दुर्बुद्धीने आत्महत्या करतो,ज्याला स्थिरबुद्धि नाही तो मूर्ख होय.

जिवलगांस परम खेदी । सुखाचा शब्द तोहि नेदी । नीच जनास वंदी । तो येक मूर्ख ॥ ३८॥

मायेच्या माणसाना सुखाचा शब्दहि न देता छळणारा व नीच लोकांशी नमुन असणारा तो मूर्ख होय.

आपणास राखे परोपरी । शरणागतांस अव्हेरी । लक्ष्मीचा भरवसा धरी । तो येक मूर्ख ॥ ३९॥

हरप्रकारे (अनेक प्रकारांनी) आपल्या देहास जपणारा,शरणांगतांस झिडकारणांरा,संपत्ति सर्वकाळ टिकेल असे मानणारा तो मूर्ख होय.

पुत्र कळत्र आणी दारा । इतुकाचि मानुनियां थारा । विसरोन गेला ईश्वरा । तो येक मूर्ख ॥ ४०॥

( कळत्र - कुटुंब )

स्त्रीपुत्र व कुटुंब एवढाच आश्रय मानून परमेश्वराला विसरणारा तो मूर्ख होय

जैसें जैसें करावें । तैसें तैसें पावाअवें । हे जयास नेणवे । तो येक मूर्ख ॥ ४१॥

जसे जसे पाप अगर पुण्यकर्म करावे तसे त्याचे फळ-दुःख अगर सुख-भोगावे लागते (करावे तसे भरावे) हे ज्यास कळत नाही तो मूर्ख होय.

पुरुषाचेनि अष्टगुणें । स्त्रियांस ईश्वरी देणें । ऐशा केल्या बहुत जेणें । तो येक मूर्ख ॥ ४२॥

( अष्टगुणें - आठपट )

**(१) स्त्रीणांमष्टगुणः कामः। ह्या न्यायाने ज्यास (ईश्वरी) स्वाभविक काम अधिक असतो,अशा अनेक स्त्रियांशी जो विवाह करतो तो मूर्ख होय. (२-) पुरषांपेक्षा स्त्रियांना आठपट कामवासना असते हा ईश्वरी नियम असता पुष्कळ स्त्रियांशी विवाह करतो तो मूर्ख होय.(३) पुरुषांचे आठपट स्त्रियांस ऐश्वर्य असून त्यांचा बडेजाव वाढविणारा तो मूर्ख (४) स्त्रिया पुरुषांपेक्षा स्वाभाविक मोहक किवा लाघवी असतात अशा अनेक स्त्रियांशी विवाह करणारा तो मूर्ख होय.**

दुर्जनाचेनि बोलें । मर्यादा सांडून चाले । दिवसा झांकिले डोळे । तो येक मूर्ख ॥ ४३॥

दुर्जनांच्या बोलण्याप्रमाणे वागून अमर्यादपणा करणारा,विचार न करता वाटेल ती पापे दिवसा ढवळ्या करणारा तो मूर्ख होय.

देवद्रोही गुरुद्रोही । मातृद्रोही पितृद्रोही । ब्रह्मद्रोही स्वामीद्रोही । तो येक मूर्ख ॥ ४४॥

देव,गुरु,मातापिता ब्राह्मण व स्वामी यांच्याशी व्देशाचरण (कपाटाचरण,द्रोह) करणारा तो मूर्ख होय.

परपीडेचें मानी सुख । पससंतोषाचें मानी दुःख । गेले वस्तूचा करी शोक । तो येक मूर्ख ॥ ४५॥

दुस-यास पीडा झाली की सुख मानणारा व दुसऱ्यास सुख झाले की दुःख मानणारा  व हरवलेल्या (गेल्या) वस्तूचा शोक करणारा तो मूर्ख होय.

आदरेंविण बोलणें । न पुसतां साअक्ष देणें । निंद्य वस्तु आंगिकारणें । तो येक मूर्ख ॥ ४६॥

ऐकणा-याचा आदर नसला तरी बोलणारा न विचारता साक्ष देणारा,निंद्य वस्तूंचा (मद्य,परस्त्री इ.) स्वीकार करणारा तो मूर्ख होय.

तुक तोडून बोले । मार्ग सांडून चाले । कुकर्मी मित्र केले । तो येक मूर्ख ॥ ४७॥

( तुक तोडून - सरळ , मर्यादा अनुमान सोडुन )

आपले किवा दुसऱ्याचे महत्व (तुक) कमी होईल असे (तोडून) बोलणारा,सन्मार्ग टाकून (आडमार्गाने) जाणारा.  वाईट कामे कारणां-याशी मैत्री करणारा. तो मूर्ख होय..

पत्य राखों नेणें कदा । विनोद करी सर्वदा । हासतां खिजे पेटे द्वंदा । तो येक मूर्ख ॥ ४८॥

( पत्य - पत , महत्व , खिजे - चिडतो )

ज्याला आपली पत साभाळता येत नाही नेहमी जो थट्टामस्करी करतो व ती करताना दुसऱ्यांनीं थट्टा केली तर (हसतां) चिडतो व वरदळीस येतो तो मूर्ख होय.

होड घाली अवघड । काजेंविण करी बडबड । बोलोंचि नेणे मुखजड । तो येक मूर्ख ॥ ४९॥

( होड - पैज , काजेंविण - कामकाजाशिवाय,विनाकारण , बोलोंचि - बोलीने जरूर असते त्यावेळी, मुखजड - अबोल )

अवघड (न झेंपण्यासारखी) पैज-हौड-मारतो,कामावाचून (काम नसतां) बडबडतो व जरूर तेथे मुखदुर्बलता धरतो तो मूर्ख होय.

वस्त्र शास्त्र दोनी नसे । उंचे स्थळीं जाऊन बैसे । जो गोत्रजांस विश्वासे । तो येक मूर्ख ॥ ५०॥

( गोत्रजांस - गोतावाल्यावर )

अंगावर उंची वस्त्र,किंवा मुखात शास्त्र (ज्ञान) अगर हातात शस्त्र ही नसताना सभेत श्रेष्ठ स्थानी (पहिल्या रांगेत) जाऊन बसतो व भाऊबंदांवर विश्वास ठेवतो तो मूर्ख होय.

तश्करासी वोळखी सांगे । देखिली वस्तु तेचि मागे । आपलें आन्हीत करी रागें । तो येक मूर्ख ॥ ५१॥

तस्करास ओळखी सांगे (१) - चोरास ओळखिले तरी ओळखिले असे दाखवु नये. ओळखीचा चोर जीवानिशी मारी. अशी म्हण आहे. पण जो चोराला ओळख (माहिती) सांगतो,दृष्टीस पडलेली वस्तू मागतो व रागाच्याभरात नुकसान करून घेतो तो मूर्ख होय.

हीन जनासीं बरोबरी । बोल बोले सरोत्तरीं । वामहस्तें प्राशन करी । तो येक मूर्ख ॥ ५२॥

( सरोत्तरीं - बरोबरीने प्रतुतर )

हलक्या लोकांशी बरोबरी करणारा, चढेलपणाने किंवा बरोबरीने बोलणारा,डाव्या हाताने पाणी,दुध इ. पिणारा (डाव्या हाताने पाणी प्यायल्यास-पांथरी होते असे काही वैद्दय म्हणतात.) तो मूर्ख होय.

समर्थासीं मत्सर धरी । अलभ्य वस्तूचा हेवा करी । घरीचा घरीं करी चोरी । तो येक मूर्ख ॥ ५३॥

( समर्थासीं - आर्थिक व शारीरिक बलवान )

आपल्यापेक्षा श्रेष्ठ मनुष्याचा मत्सर करतो,आपल्या योग्यतेस न झेपणाऱ्या अगर दुष्प्राप्य वस्तूंचा हेवा करतो. घरच्या घरीच चोरी करतो तो मूर्ख होय.

सांडूनियां जगदीशा । मनुष्याचा मानी भर्वसा । सार्थकेंविण वेंची वयसा । तो येक मूर्ख ॥ ५४॥

( वेंची वयसा - वाया दवडतो.)

परमेश्वर सर्व सत्ताधारी असता त्यास सोडून (विसरून) आयुष्याचा भरवसा धरणारा, नरजन्माचे (आयुष्याचे-वयसा-वय) सार्थक न करता ते फुकट दवडणारा तो मूर्ख होय.

संसारदुःखाचेनि गुणें । देवास गाळी देणें । मैत्राचें बोले उणें । तो येक मूर्ख ॥ ५५॥

संसारात दुःखे आली असता देवास शिव्या देतो व मित्रांचे उणेपुरे झांकावयाचे सोडून (गुह्यं च गुह्यती गुणांना प्रकट करितो) उणेपणा काढतो तो मूर्ख होय.

अल्प अन्याय क्ष्मा न करी । सर्वकाळ धारकीं धरी । जो विस्वासघात करी । तो येक मूर्ख ॥ ५६॥

( धारकीं - धरी )

लहानशा अपराधाचीही क्षमा करीत नाही,सर्वकाळ तलवारीच्या धारेवर धरल्याप्रमाणे दुसऱ्यास छळतो. विश्वास घात करतो तो मूर्ख होय..

समर्थाचे मनींचे तुटे । जयाचेनि सभा विटे । क्षणा बरा क्षणा पालटे । तो येक मूर्ख ॥ ५७॥

( समर्थाचे  - वडीलधार्यांच्या , तुटे - मनातून उतरलेला, क्षणा बरा क्षणा पालटे - चंचलवृत्ती )

थोरांच्या मर्जीतून उतरलेला,ज्याच्यामुळे सभेचा रंगभंग होतो (सभाजनांना वीट आणतो) क्षणात बरा क्षणात उलट वागणारा असा क्षणिक वृतीचा तो मूर्ख होय.

बहुतां दिवसांचे सेवक । त्यागून ठेवी आणिक । ज्याची सभा निर्नायेक । तो येक मूर्ख ॥ ५८॥

पुष्कळ दिवसांचे जुने नोकर काढून नवे ठेवतो,ज्याच्या सभेला अध्यक्ष (पुढारी,नायक) नाही तो मूर्ख होय.

अनीतीनें द्रव्य जोडी । धर्म नीति न्याय सोडी । संगतीचें मनुष्य तोडी । तो येक मूर्ख ॥ ५९॥

पापमार्गाने द्रव्य मिळवणारा धर्म न्याय नीति सोडुन वागणारा व संगतीचे मनुष्य तोडणारा तो मूर्ख होय.

घरीं असोन सुंदरी । जो सदांचा परद्वारी । बहुतांचे उच्छिष्ट अंगीकारी । तो येक मूर्ख ॥ ६०॥

( उच्छिष्ट - उष्टे )

घरी सुंदर स्त्री (बायको) असून जो नित्य परव्दार (परस्त्रीगमन) (वेश्यागमन) करतो तो मूर्ख होय.

आपुलें अर्थ दुसर्यापासीं । आणी दुसर्याचें अभिळासी । पर्वत करी हीनासी । तो येक मूर्ख ॥ ६१॥

(अभिळासी - हावरट, पर्वत - देवघेव करणारा.)

आपली वस्तू (आपले धन ) दुसऱ्याकडे ठेउन तिसऱ्याच्या वस्तूचा (धनाचा) अभिलाष करणारा,हलकटा बरोबर (हलक्या लोकांबरोबर) (व्यवहार-पर्वत) देवघेव करणारा (हलकटास थोरपणा देणारा) तो मूर्ख होय.

अतिताचा अंत पाहे । कुग्रामामधें राहे । सर्वकाळ चिंता वाहे । तो येक मूर्ख ॥ ६२॥

(अतिताचा - पाहुण्यास मदत करण्यास कचरणारा)

अतिथीस छळणारा, कुग्रामात वस्ती करणारा,नित्य चिंतातुर तो मूर्ख होय.

**अतिथी: न विद्द्यते तिथीर्यस्य स:। न विद्द्यते द्वितीया तिथीर्यस्य स:। एक रात्र राहणारा.**

**कुग्राम-धनिक: श्रोत्रियो राजा नदी वैद्द्यस्तू पंचम: । एते यत्र न विद्द्यन्ते न तत्र दिवसं वसेत।।१।।**

**चिन्ता चिंता चिंता समाख्याता बिन्दुमात्र विशेषता: । सजीवं दहते चिंन्तां निर्जीवं दहते चिंता ।।२।। )**

दोघे बोलत असती जेथें । तिसरा जाऊन बैसे तेथें । डोई खाजवी दोहीं हातें । तो येक मूर्ख ॥ ६३॥

दोघे बोलत असतां "आपण तेथे" तिसरा जाऊन बसणारा दोन्ही हातांनी (दुसऱ्यासमोर) डोके खाजविणारा तो मूर्ख.

उदकामधें सांडी गुरळी । पायें पायें कांडोळी । सेवा करी हीन कुळीं । तो येक मूर्ख ॥ ६४॥

( गुरळी - चूळ टाकणे. कांडोळी - खाजाविणे )

पाण्यात चूळ (गुरळी) टाकणारा,पायाने पाय खाजविणारा,हिन कुळात सेवा करणारा (कुलीन नव्हे अशाची नोकरी करणारा) तो मूर्ख.

स्त्री बाळका सलगी देणें । पिशाच्या सन्निध बैसणें । मर्यादेविण पाळी सुणें । तो येक मूर्ख ॥ ६५॥

( मर्यादेविण पाळी सुणें - शिस्तिशियाय कुत्रे पाळतो)

स्त्री व मुले यांना डोकीवर चढविणे,पिशाच्यासन्निध (पिशाचाजवळ) बसणारा,कुत्र्याला अमर्यादपणे पाळणारा तो मूर्ख.

परस्त्रीसीं कळह करी । मुकी वस्तु निघातें मारी । मूर्खाची संगती धरी । तो येक मूर्ख ॥ ६६॥

( निघातें - निर्दयपणे,शस्त्राने )

परस्त्रीशी भाषणही करावयाचे नसताना जो भांडण करण्यास तयार होतो,जनावरास (मुक्या प्राण्यास) क्रूरपणाने अथवा शस्त्राने मारणारा,मुर्खांची संगती करणारा तो मूर्ख.

कळह पाहात उभा राहे । तोडविना कौतुक पाहे । खरें अस्ता खोटें साहे । तो येक मूर्ख ॥ ६७॥

भांडण तंटा पहात उभा राहतो,तो सोडवत नाही व मजा पाहतो,खरे माहित असता खोटे सहन करतो तो मूर्ख.

लक्ष्मी आलियावरी । जो मागील वोळखी न धरी । देवीं ब्राह्मणीं सत्ता करी । तो येक मूर्ख ॥ ६८॥

संपत्ति प्राप्त झाली असता मागील ओळख विसरतो, देवाब्राहमणावर सत्ता गाजवतो, तो मूर्ख.

आपलें काज होये तंवरी । बहुसाल नम्रता धरी । पुढीलांचें कार्य न करी । तो येक मूर्ख ॥ ६९॥

आपले कार्य होईपर्यत मात्र नम्रतेने वागणारा पण दुसऱ्याचे कार्य न करणारा (प्रत्युपकाराची वेळ चुकविणारा) तो मूर्ख.

अक्षरें गाळून वाची । कां तें घाली पदरिचीं । नीघा न करी पुस्तकाची । तो येक मूर्ख ॥ ७०॥

अक्षरे गाळून अगर पदरची घालून वाचणारा,पुस्तके काळजीने न जपणारा (तैलात रक्षते जालात !) तो मूर्ख.

आपण वाचीना कधीं । कोणास वाचावया नेदी । बांधोन ठेवी बंदीं । तो येक मूर्ख ॥ ७१॥

आपण स्वतः पुस्तक वाचत नाहीच,दुसऱ्यास वाचायला ते देत नाहीत.बांधून ठेवतो तो मूर्ख

ऐसीं हें मूर्खलक्षणें । श्रवणें चातुर्य बाणे । चीत्त देउनियां शहाणे । ऐकती सदा ॥ ७२॥

( चीत्त देउनियां - मान लाऊन )

अशी ही मूर्खलक्षणे जो ऐकेल त्यास (ती टाकायची बुद्धी होऊन),चातुर्य बाणेल,म्हणून शहाणे पुरुष ती लक्ष देऊन ऐकतात.

लक्षणें अपार असती । परी कांहीं येक येथामती । त्यागार्थ बोलिलें श्रोतीं । क्ष्मा केलें पाहिजे ॥ ७३॥

मूर्खलक्षणे पुष्कळ आहेत,त्यातील थोडी टाकण्यासाठी यथामति सांगितली.त्याबद्दल श्रोत्यांनी क्षमा करावी.

उत्तम लक्षणें घ्यावीं । मूर्खलक्षणें त्यागावीं । पुढिले समासी आघवीं । निरोपिलीं ॥ ७४॥

उत्तम लक्षणे घेऊन ही वर्णिलेली मूर्खलक्षणे टाकावी,सर्व उत्तम लक्षणे पुढील समासात सागितली आहेत. जीवाने मूर्ख लक्षणांचा त्याग करावा.म्हणुन हा समास सांगितला.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मूर्खलक्षणनाम समास पहिला ॥ १॥**

**समास दुसरा : उत्तम लक्षण ॥ श्रीराम् ॥**

**जे प्रापंचिक जन । जयास** ,ही ह्या समासाची सारभूत ओवी आहे.

श्रोतां व्हावें सावधान । आतां सांगतों उत्तम गुण । जेणें करितां बाणे खुण । सर्वज्ञपणाची ॥ १॥

श्रोत्यांनी सावध व्हावे.आता उत्तम गुण सांगतो (कोणत्या गुणांना उत्तम लक्षणे म्हणतात ते सांगतो).ते ऐकल्याने सर्वज्ञपणा म्हणजे काय ते समजेल.(य: गुणान्वेत्ति । अवगुणानपि वेत्ति । स: सर्वज्ञ:)

वाट पुसल्याविण जाऊं नये । फळ वोळखिल्याविण खाऊं नये । पडिली वस्तु घेऊं नये । येकायेकीं ॥ २॥

ह्या समासात शेवटपर्यंत सर्व निषेधपर वर्णन आहे,त्यावरून त्यातही दोष कथन आहे असा भास होतो.परंतु वर्णन दोन प्रकारचे–विधिरूप (**अहरह: संध्यामुपासित ।** ) व निषेधरूप (**कलिंगं न भक्षयेत ।**) निषेधात दोषत्यागानंतर सर्व गुण राहातील,त्याचे ग्रहण,(वाट-परमार्थाची) सद्गुरुना किवा व्यवहारातील जाणत्यांना वाट पुसल्यावाचून कोठे जाऊ नये,  गेल्यास श्रम,काळ,द्रव्य,ह्यांची हानि,शिवाय कार्यनाश ब गबाळेपणा येतो.फळ ओळखल्यावाचून (शाश्वत किवा अशास्वत) खाऊ नये खाल्यास प्राणास अपाय होण्याचा संभव,पडलेली वस्तू तिची पूर्ण चौकशी केल्याशिवाय एकाएकी घेऊ नये. (घेतल्यास नसती चोरी व संकटे प्राप्त होतील.)(फळ ओळखणे,कडु,वृंदावन,अफूचे शेत,सृष्टीरुपी बाग सर्व फळांनी बहरली आहे.त्यातील शाश्वत-अशास्वत फळांचा विचार करून ती सेवावी.यज्ञ,दान,तीर्थव्रतादि काम्यकर्मे अशास्वत फळे देतात.जन्म-मरणाचा फेरा लागतो.)

अति वाद करूं नये । पोटीं कपट धरूं नये । शोधल्याविण करूं नये । कुळहीन कांता ॥ ३॥

(ह्या समासात सावधानतेच्या सूचना श्री समर्थानी केल्या आहेत) अतिशय वाद करू नये,वाद केल्यास त्याचा परिणाम तोंड न पाहण्याइतका होतो.(तुटे वाद संवाद तो हितकारी । वाद संवाद नाही तो वाद गुरोस्तु **मौनंम । काशीच्या दत्त-पादुका**) पोटात कपट धरू नये व कुलशिलाची चौकशी न करता कुलहीन स्त्री करून नये,नाहीतर मागाहून पश्र्चातापाची पाळी यावयाची?

विचारेंविण बोलों नये । विवंचनेविण चालों नये । मर्यादेविण हालों नये । कांहीं येक ॥ ४॥

( विवंचनेविण - सर्वकश काळजी , विचारकेल्याशिवाय )

बोलणे,चालणे,वागणे करावयाचे ते पूर्ण विचार केल्याशिवाय (विवंचनेविण) करू नये.आणि वेद,शास्त्र,व्यवहार ह्याची मर्यादा सोडु नये.

प्रीतीविण रुसों नये । चोरास वोळखी पुसों नये । रात्री पंथ क्रमूं नये । येकायेकीं ॥ ५॥

आपल्या संबंधाचे प्रेम असल्याशिवाय कोणावर रागवू नये.(प्रेमावाचून रागावलात तर तुमच्या प्रेमाला विचारतो कोण? चोराला ओळख विचारू नये,रात्री एकट्याने प्रवास करून नये.

जनीं आर्जव तोडूं नये । पापद्रव्य जोडूं नये । पुण्यमार्ग सोडूं नये । कदाकाळीं ॥ ६॥

( आर्जव - सरळपणा )

लोकांमध्ये वागताना सरळपणा (आर्जव)-लीनता-सोडु नये.अनीती,कुदान,वगैरेचे,मिळालेले ,द्रव्य घेऊ नये. आणि केव्हाही पुण्यमार्ग टाकू नये.

निंदा द्वेष करूं नये । असत्संग धरूं नये । द्रव्यदारा हरूं नये । बळात्कारें ॥ ७॥

[ निंदा-(परस्वभावं कर्माणि न प्रशंसेन्न गर्हयेत। विश्वमेकात्मकं पश्यन प्रकृत्या पुरुषेण च।।),द्वेष करू नये.(रामकृष्ण बोला वाचा रे। त्याग यांचा रे । याची पंथे जाता भय नाही रे । निश्चये बोलती चारी साही रे।। ),दुष्ट वाईट संगती करू नये (सतसंग करा वेगी । वृत्ती जडे पांडुरंगी।) (द्रव्यं,द्वारा ह्यांच्या हरणाचा परिणाम -रामायण,महाभारत पहा,म्हणुन ) त्यांचा अपहार करू नये.

वक्तयास खोदूं नये । ऐक्यतेसी फोडूं नये । विद्याअभ्यास सोडूं नये । कांहीं केल्या ॥ ८॥

वक्त्याचा मानभंग होईल अशा प्रकारे त्यास खोदू नये.(त्याला अडवणुकीचे प्रश्र्न करू नयेत). प्रपंच-परमार्थास अवश्य अशी ऐक्यता नाहीशी करू नये. (सभेत एक विचार होत असेल तर विचारांचे फाटे फोडून सभा मोडु नये). विद्दयाभ्यास केव्हाही सोडु नये.

तोंडाळासि भांडों नये । वाचाळासी तंडों नये । संतसंग खंडूं नये । अंतर्यामीं ॥ ९॥

तोंडाळ-फार बोलणारा (गहर्य नव्हे ते) याच्याशी व वाचाळ-वाचालो बहु गहर्यवाक !--अपशब्द फार बोलणारा-अशांशी भांडणतंटा करू नये. संत किवा सत्स्वरूप (परब्रम्ह) ह्यांच्यासंबंधाने अंतर्यामी (अंतरंगातील) प्रेम कमी होऊ देऊ नये.

अति क्रोध करूं नये । जिवलगांस खेदूं नये । मनीं वीट मानूं नये । सिकवणेचा ॥ १०॥

अतिशय क्रोध करू नये. आप्त प्रेमातील मंडळीस दु:ख देऊ नये,कोणी शहाणपण शिकविण्यास लागले तर त्याचा कंटाळा करू नये.( वालादपी सुभाषितम ग्राह्यम। ) (कोणी चागल्या गोष्टी किवा सदुपदेश सांगत असेल तर तो ऐकावा. नवीन असेल तर फायदाच आहे.माहित असेलेलेच तो सांगत असेल तर नवी जागृति असे मनात आणुन ऐकायला कंटाळा करू नये.)

क्षणाक्षणां रुसों नये । लटिका पुरुषार्थ बोलों नये । केल्याविण सांगों नये । आपला पराक्रमु ॥ ११॥

प्रेम असले तरी पावलोपावली रूसू नये. आपली आपण स्तुति करणे बरे नाही.तथापि सांगणे असेल तर खरे असेल तेवढे तरी बोलावे. खोटे बोलू नये. पराक्रम गाजविल्यावाचून फुशारकी सांगणे चांगले नाही.

बोलिला बोल विसरों नये । प्रसंगी सामर्थ्य चुकों नये । केल्याविण निखंदूं नये । पुढिलांसि कदा ॥ १२॥

( प्रसंगी सामर्थ्य चुकों नये - वेळप्रसंगी बळाचा वापर करावा, निखंदूं - निष्क्रियतेबद्दल उपहास )

आपल्या पूर्वीच्या बोलण्याचे स्मरण-अनुसंधान असावे.कोणाला काय सांगितले व काय सांगावयाचे आहे ह्याची आठवण असावी.(जसे,रामवचन बिभीषणास),वेळप्रसंगी जरूर असेल तेव्हा सामर्थ्य सोडू नये.(समुद्रोल्लघनप्रसंगी सर्व वानर स्वपराक्रमाच्या गोष्टी बोलत बसले.परंतु मारुतिरायांनी उड्डाण करून सीताशोध केला).स्वतः केल्यावाचुन त्याचा तिरस्कार व उपहास करू नये (निखंदू नये).किवा दुसऱ्याने काही अप्राध केल्याचे सिद्ध झाल्यावाचून त्याचा तिरस्कार करू नये.

आळसें सुख मानूं नये । चाहाडी मनास आणूं नये । शोधिल्याविण करूं नये । कार्य कांहीं ॥ १३॥

आळसाने बसून राहाणे,जांभया देणे वगैरेचे सुख मानू नये. कोणी कोणाची चाहाडी सांगितली तरी ती मनावर घेऊ नये (स्वबुद्धीने न्यायान्याय पाहून ठरवावे). पक्का शोध (चौकशी) केल्यावाचून कोणतेही काम करू नये.

सुखा आंग देऊं नये । प्रेत्न पुरुषें सांडूं नये । कष्ट करितां त्रासों नये । निरंतर ॥ १४॥

निरंतर सुखाला लालचाऊ नये (तामस व राजस सुखाकडे इंद्रिये जाऊन देऊ नये ) पुरुषाने प्रयत्न करणे टाकुन देऊ नये.(पण जलताडनवत निष्फळ प्रयत्न करू नये) प्रपंचाचे कष्ट तर जीव करतोच आहे.पण परोपकाराचे-सत्कार्याचे सदोदित कष्ट करिताना त्रास मानू नये.त्याचप्रमाणे हट्टाला पेटून पैज मारू नये.

सभेमध्यें लाजों नये । बाष्कळपणें बोलों नये । पैज होड घालूं नये । काहीं केल्या ॥ १५॥

सभेमध्ये बोलताना लाजू नये. पण बाष्कळ बडबड करून नये,त्याचप्रमाणे हट्टाला पेटून पैज मारू नये.

बहुत चिंता करूं नये । निसुगपणें राहों नये । परस्त्रीतें पाहों नये । पापबुद्धी ॥ १६॥

( निसुगपणें - आळसात.)

फार चिंता करू नयें,तसेच(निसुगपणा म्हणजे आळस) निरोद्योगीपणाने किवा आळसाने राहू नये. आणि परस्त्रीकडे पापबुद्धीने पाहू नये.

**(भोजनाच्छादने चिन्तां वृथा (नैव) कुर्वन्ति वैष्णवा:योऽसौ विश्र्व्मभरो देवः स्वभक्तान्किमुपेक्षते ।१। जगी पाहता देव हा अन्नदाता)(सर्व काही चिंता केली भगवंताने । आपुले चिंतेने काय होते।१।)**

कोणाचा उपकार घेऊं नये । घेतला तरी राखों नये । परपीडा करूं नये । विस्वासघात ॥ १७॥

आपली स्वतंत्रता मोडते,म्हणुन आपणावर स्वतःचा उपकार करून घेऊच नये.पण प्रसंगाने घेतलाच तरी पर्यायाने तो फेडल्याशिवाय राहु नये.दुसऱ्यास पीडा करून नये. किवा कोणाचा विश्वासघात करू नये.

शोच्यैंविण असों नये । मळिण वस्त्र नेसों नये । जणारास पुसों नये । कोठें जातोस म्हणौनी ॥ १८॥

( शोच्यैंविण - स्वच्छतेशिवाय , जणारास पुसों नये - विचारश्रुखला खंडित होते म्हणुन )

शुचिर्भूतपणा सोडु नये,मळके वस्त्र वापरू नये.बाहेर जाणा-यास कोठे जातोस म्हणुन विचारू नये.

**(वस्त्रांणा शुभ्रतया विराजिते।पुसो नये - पुसता ज्ञाता पुढे पद न ठेवी।।)**

व्यापकपण सांडूं नये । पराधेन होऊं नये । आपलें वोझें घालूं नये । कोणीयेकासी ॥ १९॥

व्यापकपणा,सर्व कामात कुशलता व परमार्थातही दक्षता सोडू नये,परतंत्र होऊ नये. आपला( प्रापंचिक) भार दुसऱ्या कोणावर घालू नये.(व्यापकपणा म्ह.- मोठ्या मनाने सर्व बाजूंचा विचार करून बहु उद्योग करावा.)

पत्रेंविण पर्वत करूं नये । हीनाचें रुण घेऊं नये । गोहीविण जाऊं नये । राजद्वारा ॥ २०॥

( पत्रेंविण पर्वत - दस्तावेजाशिवाय देवघेव , गोहीविण - साक्षीपुराव्याशिवाय )

(लेखा) रोख्यावाचून (पत्रेवीण) देवघेव (पर्वत) करू नये,हलक्या माणसाकडून कर्ज घेऊ नये.(अपमान होईल,तो थोडक्यासाठी आपली बाजू चव्हाट्यावर आणेल) गोही-ग्वाही-बोलावणे अथवा साक्ष असल्याशिवाय (साक्षीदार बरोबर घेतल्यावाचून) सरकारदरबारात जाऊ नये.

लटिकी जाजू घेऊं नये । सभेस लटिकें करूं नये । आदर नस्तां बोलों नये । स्वभाविक ॥ २१॥

( लटिकी जाजू - खोटी हुज्जत)

कोणावर आळ (जाजू) घेऊ नये,(खोटी बाजु (कज्जा-जाजू-) अंगावर घेऊ नये).सभेच्या निर्णयाला मान द्यावा,बहुमताला स्वमतासाठी खोटे पाडू नये,मध्ये तोंड घालू नये व आपल्या बोलण्याला मान नसेल तर उगीच बोलु नये.

आदखणेपण करूं नये । अन्यायेंविण गांजूं नये । अवनीतीनें वर्तों नये । आंगबळें ॥ २२॥

(आदखणेपण- महत्वाच्यागोष्टीकडे दुर्लक्ष ,आंगबळें - स्वसामर्थ्याच्या बळावर)

आदखणेपणा-अदेखणेपणा-पाहिल्या न पाहिल्यासारखे-हयगय करू नये.(देखो न सकणे-मत्सर करू नये.) कोणाचा अन्याय असल्याशिवाय त्यास दंड (छळणा) करू नये.शरीरबाळाच्या जोरावर अनीतीने-अन्यायाने वागू नये.

बहुत अन्न खाऊं नये । बहुत निद्रा करूं नये । बहुत दिवस राहूं नये । पिसुणाचेथें ॥ २३॥

( पिसुणाचेथें - दुष्टांकडे )

फार अन्न खाऊ नये,(अन्न-भक्षणाचे प्रमाण: दोन भाग अन्न,एक भाग पाणी,एक भाग वायू ),फार झोप घेऊ नये (दुष्ट,चहाडखोर,निंदक ह्याचे म्हणजे) पिशुनाचे येथे मुळीच राहु नये. तशी वेळ आली तर जरुरी पुरते राहावे,अधिक राहु नये,

आपल्याची गोही देऊं नये । आपली कीर्ती वर्णू नये । आपलें आपण हांसों नये । गोष्टी सांगोनी ॥ २४॥

आपल्या इसमाची माहिती-साक्ष देऊ नये (त्याचा कैवार आग्रहाने घेऊ नये.) (त्याची गोही-ग्वाही देऊ नये. नि:पक्षपातीपणा ठेऊन खऱ्या-खोट्याचा निवाडा करावा.) आपली कीर्ती आपल्या तोंडाने वर्णन करू नये (आपली आपण स्तुती करू नये) आपण गोष्ट सांगून आपले आपण हसू नये.

धूम्रपान घेऊं नये । उन्मत्त द्रव्य सेवूं नये । बहुचकासीं करूं नये । मैत्री कदा ॥ २५॥

( बहुचकासीं - चोबडा,वाचाळ)

विडी,चिलीम,गांजा वैगेरे कफ उत्पन करण्याऱ्या (उन्मत्त पदार्थांचे सेवन करूं नये,बहुचक-बहोचक-चोंबडा,अशांशी मैत्री करू नये.

कामेंविण राहों नये । नीच उत्तर साहों नये । आसुदें अन्न सेऊं नये । वडिलांचेंहि ॥ २६॥

( आसुदें अन्न - आयते मिंधेपणाने)

निरोद्योगीपणाने राहु नये.(नित्य उद्योगात असावे.) आपल्या अवगुणांमुळे दुसरा आपणास टाकुन बोलेल असे वागू नये,प्रसंगी एखादा बोललाच तर वीरश्री धरून अवगुण टाकण्याचा प्रयत्न करावा.आसुदे म्हणजे,मिंधेपणाने वडिलांचेही अन्न खाऊ नये.आयतोबा होऊ नये,(काम करून स्वकष्टार्जित अन्न खावे.त्यात तेज राहते.

तोंडीं सीवी असों नये । दुसर्यास देखोन हांसों नये । उणें अंगीं संचारों नये । कुळवंताचे ॥ २७॥

तोंडात शिवी अपशब्द असू नये.कोणाचे उणे पाहून हसू नये.भल्याचे दोष मनात आणू नयेत. भल्या कुलवांताचे अंगी दोष लावू नयेत अथवा लाऊ देऊ नयेत,

देखिली वस्तु चोरूं नये । बहुत कृपण होऊं नये । जिवलगांसी करूं नये । कळह कदा ॥ २८॥

दृष्टीस पडलेली वस्तू चोरून घेऊ नये, फार कृपणपणा (चिक्कूपणा) धरू नये,स्नेहयासोबत्यांशी कधी भांडण करू नये,(कृपण-चमडी जाय मगर दमडी न जाय।.अशा वृतीचा मनुष्य, कलह - अनुव्देगकर वाक्यं सत्यं प्रियहितं च यत । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाडमयम तप उच्यते।।)

येकाचा घात करूं नये । लटिकी गोही देऊं नये । अप्रमाण वर्तो नये । कदाकाळीं ॥ २९॥

कोणाचा घात-विश्वासघात किवा खून करू नये,खोटी साक्ष-बातमी (गोही) देऊ नये,केव्हाही मर्यादा सोडून (अप्रमाण) वागू नये.

चाहाडी चोरी धरूं नये । परद्वार करूं नये । मागें उणें बोलों नये । कोणीयेकाचें ॥ ३०॥

चहाडी चोरी धरून देऊ नये,तो चोर चाहाडखोर मनुष आपला शत्रु होईल,किवा चोरीच्या खटल्यात स्वतःलाच अडकावे लागेल. व्यभिचार (परस्त्रीगमन) करू नये.कोणाचे उणे-निदान त्याच्या पश्चात तरी बोलु नये.(समक्ष बोलण्यात तिखटमीठ घालुन भर घातली जात नाही. किवा ज्याचे उणे बोलायचे त्याचे कानी जे आपण बोलु तेवढेच जाईल,पराचा कावळा होणार नाही).

समईं यावा चुकों नये । सत्वगुण सांडूं नये । वैरियांस दंडूं नये । शरण आलियां ॥ ३१॥

( समईं यावा - प्रसंग पडेल तेव्हा मदत )

प्रसंगी धैर्य (यावा-धारिष्ट) खर्चू देऊ नये,सत्वगुण टाकु नये व शरण आलेल्या शत्रूस शिक्षा करू नये.

अल्पधनें माजों नये । हरिभक्तीस लाजों नये । मर्यादेविण चालों नये । पवित्र जनीं ॥ ३२॥

थोडक्या धनाने उन्मत्त वा पुष्कळ उन्मत्त पण होऊ नये,हरीभक्ती करण्यास लाजू नये,पवित्र लोकांशी किंवा पवित्र लोकांमध्ये कोणी एकाने अमर्यादपणे वागु नये.(त्याची मर्यादा राखावी).

मूर्खासीं संमंध पडों नये । अंधारीं हात घालूं नये । दुश्चितपणें विसरों नये । वस्तु आपुली ॥ ३३॥

मूर्खांशी संबंध (शक्यतोंवर) येऊ देऊ नये. अंधारात हात घालू नयें. दुश्र्चितपणे (गैरसावधपणे),आपली वस्तू विसरू नये.

स्नानसंध्या सांडूं नये । कुळाचार खंडूं नये । अनाचार मांडूं नये । चुकुरपणें ॥ ३४॥

स्नानसंध्या टाकू नये,कुळाचार सोडु नये व कुचरपणाने,आळसाने अनाचार (वाईट आचार) करू नये.

हरिकथा सांडूं नये । निरूपण तोडूं नये । परमार्थास मोडूं नये । प्रपंचबळें ॥ ३५॥

प्रपंचातील अडचणीने हरीकथा निरुपण (ऐकणे व करणे) सोडू नये,निरुपणात खंड पाडू नये व परमार्थ बिघडवू नये.

देवाचा नवस बुडऊं नये । आपला धर्म उडऊं नये । भलते भरीं भरों नये । विचारेंविण ॥ ३६॥

( भलते भरीं भरों - भलते काम करण्यास भरी पडणे)

देवाचा नवस फेडल्याशिवाय राहु नये.आपल्या धर्माचे खंडण करू नये. पूर्णविचार केल्याशिवाय भलत्या मार्गास वाहवू बहकूं नये (हट्टास पेटूं नये).

निष्ठुरपण धरूं नये । जीवहत्या करूं नये । पाउस देखोन जाऊं नये । अथवा अवकाळीं ॥ ३७॥

निर्दयीपणा करू नये,कोणा जीवाची हिंसा करू नये.पाऊस पडत असता किवा रात्री बेरात्री (सकाळी कुमुहुर्तावर) प्रवास करू नये.

सभा देखोन गळों नये । समईं उत्तर टळों नये । धिःकारितां चळों नये । धारिष्ट आपुलें ॥ ३८॥

सभा पाहून गोंधळू नये,प्रसंगी समर्पक उत्तर देण्याचे टाळू नये.कोणी आपला धिक्कार केला तरी आपले धैर्य कमी होऊ देऊ नये.

गुरुविरहित असों नये । नीच यातीचा गुरु करूं नये । जिणें शाश्वत मानूं नये । वैभवेंसीं ॥ ३९॥

( जिणें शाश्वत मानूं नये - ऐश्वर्ययुक्त जीवनाचा भरवसा धरू नये.)

गुरु केल्याशिवाय राहू नये,तथापि आपल्या जातीपेक्षा कमीजातीचा गुरुकेल्याशिवाय राहु नये. आणि वैभव आयुष्य ह्यांची शाश्वती मानू नये.

सत्यमार्ग सांडूं नये । असत्य पंथें जाऊं नये । कदा अभिमान घेऊं नये । असत्याचा ॥ ४०॥

सत्यमार्ग टाकू नये,खोट्या मार्गाने जाऊ नये.खोट्याचा अभिमान केव्हाही धरू नये.

अपकीर्ति ते सांडावी । सद्कीर्ति वाढवावी । विवेकें दृढ धरावी । वाट सत्याची ॥ ४१॥

जेणे करून अपकीर्ती होईल अशी कामे करू नयेत,सत्कीर्ती होईल अशी कार्ये करीत जावी.विचारपूर्वक सत्यमार्गाने वागावे,

नेघतां हे उत्तम गुण । तें मनुष्य अवलक्षण । ऐक तयांचे लक्षण । पुढिले समासीं ॥ ४२॥

जो ही उत्तम लक्षणे घेणार नाही तो अवलक्षणी समजावा.त्याचे लक्षण पुढील समासात सांगितले आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उत्तामलक्षणनाम समास दुसरा॥ २॥**

**समास तिसरा : कुविद्या लक्षण ॥ श्रीराम् ॥**

**उत्तम लक्षण:मूर्खपण सांडावे दूरी। उत्तम गुणांची आवडी अंतरी। म्हणोनि कृपाळूपणे बोले उत्तरी। श्रीमदाचार्य शिकवण।।-(कुबडी)**

पूर्व समासात प्रापंचिकांची शबल लक्षणे त्यागार्थ सांगितली आणि ह्या समासात प्रापंचिकांची शुद्ध लक्षणे अशा प्रकारे सांगितली आहेत.की त्यांचा अभ्यास करता करताच जीव परमार्थाधिकारी व्हावा आणि ह्या उत्तम लक्षणांचा अव्हेर करणाऱ्या कुलक्षणी मनुष्याचे वर्णन पुढील समासात केले आहे.

ऐका कुविद्येचीं लक्षणें । अति हीनें कुलक्षणें । त्यागार्थ बोलिलीं ते श्रवणें । त्याग घडे ॥ १॥

त्याग करावा (टाळावी) म्हणुन अतिशय हिन-वाईट कुलक्षणे-कुविद्येची लक्षणे सांगतो ती ऐका. ती ऐकली असता त्यांचा त्याग करण्याची बुद्धी होते,(कुबुद्धित्यागेविण काही । सुबुद्धि लागणार नाही।).

ऐका कुविद्येचा प्राणी । जन्मा येऊन केली हानी । सांगिजेल येहीं लक्षणीं । वोळखावा ॥ २॥

ऐका कुविद्येच्या लक्षणांनी युक्त असणारा प्राणी आपल्या जन्माचे मातेरे करून घेतो.(कुविद्येचा प्राणी नरदेह व्यर्थ दवडतो,) त्याची लक्षणे पुढे सांगितली आहेत,त्यावरून त्यास ओळखावे

कुविद्येचा प्राणी असे । तो कठिण निरूपणें त्रासे । अवगुणाची समृद्धि असे । म्हणौनियां ॥३॥

कुविद्येच्या माणसाच्या अंगी फार अवगुण असतात,म्हणुन त्यास कठीण-अवघड किवा संन्मार्गाच्या गोष्टी ऐकून त्रास वाटतो.(कारण त्यात त्याचे दोष,वर्मे निघतात),(त्याला सद्विद्येचे ग्रंथ ऐकणे संकट वाटते,वेद,वेदांत,उपनिषदे अशा जन्मासाफल्याचा मार्ग दाखविणाऱ्या ग्रंथांचे निरुपण त्यास त्रासदायक वाटते! मात्र नाटक कादंबऱ्यादि ग्रंथ तो मिटक्या मारत वाचतो. व ऐकतो. तो स्वतः दोषाची खाण असतो म्हणुन त्याचे परमार्थग्रंथ श्रवणाने डोके उठते.

**मेद्स्किप् श्लोक ॥ दंभो दर्पो । अभिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च । अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥**

मेद्स्किप् काम क्रोध मद मत्सर।लोभ दंभ तिरस्कार ।गर्व ताठा अहंकार ।द्वेष विषाद विकल्पी ॥४॥

(दोष कोणते आहेत म्हणाल तर दंभ,दर्प,अभिमान,क्रोध,कठोरता,अज्ञान,काम(-वासना,विषयेच्छा),क्रोध,(-राग संताप),मद(-धुंदी,उन्माद,द्रव्यादिकांचा),मत्सर (मोह)(-हेवा),लोभ(-हाव) हे सहा रिपु दंभ(-दांभिकपणा), तिरस्कार(अनादर,निंदा) ,गर्व(उद्दामपणा),ताठा,अहंकार,द्वेष(-वैर),विषाद(रडकेपणा,खेद),विकल्प(-तर्क-वितर्क करणे,संशयखोरपणा-संशय-भेद वाढणा-या कल्पना करणे).

आशा ममता तृष्णा कल्पना । चिंता अहंता कामना भावना । असूय अविज्ञा ईषणा वासना । अतृप्ती लोलंगता ॥ ५॥

( ईषणा - इच्छा , लोलंगता - आसक्ती )

आशा,ममता(माझेपण,आवड),तृष्णा (विषयवासना),कल्पना(विषयाचे संकल्प),चिंता(काळजी) अहंता(-मीपण),कामना(-इच्छा),भावना(-कल्पना,विषयचिंतन),असुया(-मत्सर,निंदा) अविद्या, वांच्छा,ईषणा(-इच्छा),वासना ,अतृप्ति,(-अतृप्तता,हाव),लोलंगता,(-लंपटपणा,विषयासक्ति)

इछ्या वांछ्या चिकिछ्या निंदा । आनित्य ग्रामणी मस्ती सदा । जाणीव अवज्ञा विपत्ती आपदा । दुर्वृत्ती दुर्वासना ॥ ६॥

( आनित्य ग्रामणी - अनिती ,गुंडगिरी )

इच्छा,वांच्छा(जोड शब्द),चिकित्सा(-किस काढणे), निंदा,अनित्य(अनिती),ग्रामणी, (गावगुंडपणा, गावकुटाळकी) मस्ती(माजोरीपणा,मस्तपणा),जाणतेपणाचा अहंकार, आज्ञा मोडणे-अवहेलना करणे, हि संकटे,दृष्टी,वृत्ती,वाईट,वासना.

स्पर्धा खटपट आणि चटचट । त-हे झटपट आणी वटवट । सदा खटपट आणी लटपट । परम वेथा कुविद्या ॥ ७॥

स्पर्धा(चढाओढ,मत्सर-बरोबरी),खटपट(भानगडी),चटपट (हुरहूर) तऱ्हे, (तऱ्हेवाईकपणा) झटपट (बडबड्या स्वभाव),वटवट (व्यर्थ बडबड),खटपट(चिडचिडेपणा),लटपट(लबाडी) , परमव्यथा(अत्यंत रोगी) व कुविद्येच्या लक्षणांनी भरलेला(नाना खटपटीत आणि लटपतीत,सदा मग्न असणे.इ.कुविद्येची आसुरी संपत्तीची लक्षणे त्याच्या अंगी असतात).{आणि हा शब्द “**असून ह्या अर्थी”** पुढील समासात ८ ते २० मोठ्या चातुर्याने योजला आहे ){आळशी आणि (असून) खादाड,स्वतः उद्योगरत असून पुष्कळ मिळवून यथेच्छ खात असेल तर फारसा दोष नाही,बरे आळशी असून खाण्यापिण्याचा कोणाला त्रास होत नसेल तरी फारसे बिघडत नाही,पण स्वतः आळशी म्ह.कष्ट करून पैसे मिळवायला नकोत व जेवायला मात्र चारी ठाव चमचमीत पाहिजे मग त्या दोषाला काय म्हणावे? दुर्बळ आणि लाताड म्ह.तिरसट,कजाग,दुर्बळ असून गरिबीने वागणारा असेल त्याला लोक मिळवून घेतात.सबळ असून लाथाड असेल तर चार लाथा देईल व चार लाथा खाईल.बरोबरीने तरी वागेल.पण शक्ति नाही म्हणुन दुर्बळ आणि त्यात पुन्हा लाथाड,मग त्याचे क्लेश काय वर्णावे?}

कुरूप आणी कुलक्षण । अशक्त आणी दुर्जन । दरिद्री आणी कृपण । आतिशयेंसीं ॥ ८ ॥

कुरूप असून व अवलक्षणी,अशक्त असून दुष्टपणा करणारा गरीब असून अतिशय कृपण

आळसी आणी खादाड । दुर्बळ आणी लाताड । तुटक आणी लाबाड । आतिशयेंसीं ॥ ९॥

( लाताड - वसवस करणारा )

अति आळशी असून अतिखादाड,अतिदुबळा असून वसवस करणारा (पायपोसखाऊ) अति तुसडा आणि लबाड.

मूर्ख आणी तपीळ । वेडें आणी वाचाळ । लटिकें आणी तोंडाळ । आतिशयेंसीं ॥१०॥

मूर्ख असून अतितापट(तपीळ),वेडा असून(मध्ये मध्ये) अति तोंड घालणारा,खोटा असून अति शिव्या देणारा (तोंडाळ).

नेणे आणी नायके । न ये आणी न सीके । न करी आणी न देखे । अभ्यास दृष्टी ॥ ११॥

स्वतः समजत नाही आणि शिकत नाही,इतकेच नव्हे तर अभ्यास करण्याच्या दृष्टीने पाहात नाही.

अज्ञान आणी अविस्वासी । छळवादी आणी दोषी । अभक्त आणी भक्तांसी । देखों सकेना ॥ १२॥

स्वतः अज्ञानी (कळत नाही आणि दुसऱ्यावर विश्वास ठेवत नाही.स्वतः दोषी दुर्गुणी आणि दुसऱ्याचा (त्याचे ठिकाणी असलेल्या दोषास्तव) छळ करणारा,स्वतः देवाची भक्ति करीत नाही दुसरा कोणी करत असेल तर ते पाहवत नाही.

पापी आणी निंदक । कष्टी आणी घातक । दुःखी आणी हिंसक । आतिशयेंसीं ॥ १३॥

स्वतः पापी असून दुसऱ्याची (पुण्यवान माणसांची) अति निंदा करतो,स्वतः कष्टात असून दुसऱ्याचा अतिघात करतो,स्वतः दुखः भोगीत असून दुसऱ्याची अति हिंसा करतो.

हीन आणी कृत्रिमी । रोगी आणी कुकर्मी । आचंगुल आणी अधर्मी । वासना रमे ॥ १४॥

( आचंगुल - आचंगुळ )

हिन असून डौली,नटव्या,ढोंगी (कृत्रिम),रोगी असून जेणे करून रोग होईल अशी दुष्कर्मे करणारा,कृपण (आचंगुल) असून ज्याची वासना अधर्मात वावरत आहे असा (पापवासना असणारा)

हीन देह आणी ताठा । अप्रमाण आणी फांटा । बाष्कळ आणी करंटा । विवेक सांगे ॥ १५॥

रूपगुणादिकांनी हीन असून रिकामा ताठा बाळगणारा,लबाड-अविश्र्वासी(अप्रमाणी) असून फाटे फोडणारा,स्वच्छंद,अमर्याद(बाष्कळ) आणि स्वतः करंटा असून लोकांना ज्ञान सांगतो.(परोपदेशी)

लंडी आणी उन्मत्त । निकामी आणी डुल्लत । भ्याड आणी बोलत । पराक्रमु ॥ १६॥

( लंडी - भित्रा, डुल्लत - डौल मिरविणारा )

भित्रा (लंडी) असून माजोरी (उद्धट),निरुपयोगी (किवा निरोद्योगी) आणि गर्वाने डोलणारा,भ्याड असून पराक्रमाच्या बाता मारणारा,

कनिष्ठ आणी गर्विष्ठ । नुपरतें आणी नष्ट । द्वेषी आणी भ्रष्ट । आतिशयेंसीं ॥ १७॥

( नुपरतें आणी नष्ट - विषयासक्त व व्यसनी)

विद्याविनयादिकांनी हिन पण गर्विष्ठ,विषयासक्त (नुपरते) असून व्यसनी (किवा कृपण,नष्ट),दुसऱ्याचा द्वेष करतो पण स्वतः अतिशय भ्रष्ट.

अभिमानी आणी निसंगळ । वोडगस्त आणी खळ । दंभिक आणी अनर्गळ । आतिशयेंसीं ॥ १८॥

( निसंगळ - बंधनहीन,मोकाट ,निर्लज्ज, खळ - दुष्ट)

अभिमानी असून अति निर्लज्य,नेहमी ओढाताण झालेली देण्याघेण्याने तारांबळ झाली असून अति दुष्ट ढोंगी आणि अमर्याद (अनर्गळ)

वोखटे आणी विकारी । खोटे आणी अनोपकारी । अवलक्षण आणी धिःकारी । प्राणिमात्रांसी ॥ १९॥

( वोखटे - वाईट )

घाणेरडा आणि कामक्रोधादी विकारांनी भरलेला,खोटा आणि कोणावर उपकार न करणारा (उष्ट्या हाताने कावळा सुद्धा न हंकालणारा),अवलक्षणी आणि प्रत्येक प्राण्याचा धिःकार करणारा.

अल्पमती आणी वादक । दीनरूप आणि भेदक । सूक्ष्म आणी त्रासक । कुशब्दें करूनि ॥ २०॥

( वादक - वाद घालणारा, दीनरूप - भिकारी , भेदक - कपटी , त्रासक - त्रासदायक)

स्वतः मंदबुद्धी आणि वादविवाद करणारा,आपण दीनरूप असून दुस-याकडे दोषदृष्टीने पाहणारा (भेदक),(लहान मोठा असा भेद करणारा),चिडचिड्या (सूक्ष्म) पण इतरांना अपशब्दांनी ताडन करणारा.

कठिणवचनी कर्कशवचनी । कापट्यवचनी संदेहवचनी । दुःखवचनी तीव्रवचनी । क्रूर निष्ठुर दुरात्मा॥ २१॥
न्यूनवचनी पैशून्यवचनी । अशुभवचनी अनित्यवचनी । द्वेषवचनी अनृत्यवचनी । बाष्कळवचनी धिःकारु ॥ २२॥

( न्यूनवचनी - व्यंगावर बोलणारा , अनित्यवचनी - बोलणे बदलणारा, अनृत्यवचनी- खोटारडा )

(ह्या दोन ओव्यात वाणीचे दोष सांगितले आहेत:) कठीण (कठोर),कर्कश , कपटी,संशय उत्पन्न करणारे,दु:खदायक,झोंबणारे,क्रूर,निष्ठुर,दुष्ट,दुसऱ्याचे उणे काढणारे,पैशून्य (निंदेचे) चहाडखोरपणाचें किंवा ठकबाजीचे ,अमंगळ- अशुभदर्शक,अनीतीचे ,द्वेशात्मक,खोटे,बाष्कळ,तुच्छंतादर्शक असे भाषण हे कुविद्येचे लक्षण.

कओअटी कुटीळ गाठ्याळ । कुर्टे कुचर नट्याळ । कोपी कुधन टवाळ । आतिशयेंसीं ॥ २३॥

( गाठ्याळ नट्याळ - आतल्या गाठीचा,नाठाळ व खोडसाळ , कुर्टे - क्षुद्र वृतीचा, कुचर - अंगचोर,कठोर )

मनाचा कपटी,कुटाळक्या करणारा,आतल्या गाठीचा(गाठ्यांळ),मनात कुढणारा,(कृरटा-क्षुद्र मनाचा),अंगचोर(कुचर),नाटकी(नटणारा),रागीट,अनीतीने द्रव्य जोडणारा,टवाळक्या करणारा ही लक्षणे ज्याच्या अंगी अतिशयेकरून आहेत.

तपीळ तामस अविचार । पापी अनर्थी अपस्मार । भूत समंधी संचार । आंगीं वसे ॥ २४॥

तापट,तामसी विचार न करणारा,पाप करणारा,फेफरे येणारा,भूतसमंधादिक बाधा ज्याच्या अंगी आहेत.

आत्महत्यारा स्त्रीहत्यारा । गोहत्यारा ब्रह्महत्यारा । मातृहत्यारा पितृहत्यारा । माहापापी पतित ॥ २५॥

आत्महत्या करणारा,स्त्री,आईबाप,गाय,ब्राह्मण ह्यांची हत्या करणारा जो महापातकी अधोगतीस गेला.

उणें कुपात्र कुतर्की । मित्रद्रोही विस्वासघातकी । कृतघ्न तल्पकी नारकी । अतित्याई जल्पक ॥ २६॥

( कुतर्की - वाईट तर्क करणारा, तल्पकी - परस्त्रीरत , नारकी - नरकात जाण्यायोग्य, जल्पक - निंदक,बडबड्या )

सर्व सद्गुणांनी किवा चांगल्या लक्षणांनी हीन,अनाधिकारी,कुर्तक करीत बसणारा,मित्राशीं द्रोह करणारा,विश्वासघात करणारा,केलेले उपकार विसरणारा,मात्रागमनी,नरकास योग्य अशी वागणूक ठेवणारा.अहोरकृत्ये करणारा (आततायी-बडबड्या)

किंत भांडण झगडा कळहो । अधर्म अनराहाटी शोकसंग्रहो । चाहाड वेसनी विग्रहो । निग्रहकर्ता ॥ २७॥

(किंत -संशय,कळहो - कलहप्रिय, अनराहाटी - जनरींत , शोकसंग्रहो - शोकग्रस्त,शोकाकुल, विग्रहो - भेद निर्माता)

किंतु (संशयविपरीत भावना),भांडणतंटा,बखेडा,अधर्म,लोकराहाटीच्या विरुद्ध वागणे.(विक्षिप्तपणा),शोक,संग्रही-हव्यास (हावरेपणा),चहाडखोर,व्यसनी,विग्रह-भेद-भांडण उत्पन करणे,(निग्रहकर्ता) अरेरावीपणा,हट्ट करणारा.

द्वाड आपेसी वोंगळ । चाळक चुंबक लच्याळ । स्वार्थी अभिळासी वोढाळ । आद्दत्त झोड आदखणा ॥२८॥

( लच्याळ - लोचट , आद्दत्त - घट्ट मुठीचा,कृपण , झोड - शिरजोर,कोडगा , आदखणा -परहित न आवडणारा)

द्वाड,अपेशी,घाणेरडा,चाळविणारा,कृपण,लोचट,(लाच्चाळ),स्वार्थी,लोभी,ओढाळ(अदत्त) कवडींचुबंक-कुदान घेणारा,कोडगा,(अदखणा) मत्सरी.

शठ शुंभ कातरु । लंड तर्मुंड सिंतरु । बंड पाषांड तश्करु । अपहारकर्ता ॥ २९॥

( शठ - लबाड , शुंभ कातरु - मठ्ठ व भित्रा , लंड तर्मुंड सिंतरु - बेपर्वा,लुडबुड्या,लफंगा, बंड पाषांड - उन्मत्त , पाखंडी )

(शठ) कपटी-लुच्चा,शुंभ,मठ्ठ,(कातरू),भ्याड,(लंड) धसमुसळ्या-वळूसारखा (तुर्मुंड) डोईखुपशा(सिंतरू) फसव्या,(बंड)आडदांड,पाखंडी,चोर,अपहारकर्ता,

धीट सैराट मोकाट । चाट चावट वाजट । थोट उद्धट लंपट । बटवाल कुबुद्धी ॥ ३०॥

( सैराट - स्वैर, थोट, बटवाल - कुभांडी,बाटगा )

(धीट) साहसी,(सैराट),बेबंद वागणारा(मोकाट) अनर्गल-मुक्तमनाचा (चाट) बडबड्या,(चावट),वात्रट,वादाड्या (वाजट), (थोंट) कुभांडी,उध्दट,विषयलंपट,(वटवाल), भ्रष्ट,कुबुद्धी,.

मारेकरी वरपेकरी । दरवडेकरी खाणोरी । मैंद भोंदु परद्वारी । भुररेकरी चेटकी ॥ ३१॥

( दरवडेकरी - लुटारु , खाणोरी - घरात घुसून धन शोधणारा, मैंद - घातकी, भुररेकरी - भुरळ पडून लबाडी करणारा )

मारेकरी,लुटारु(वरपेकरी),दरोडा घालणारा,(खाणोरी) खादाड-काळीजखाऊ,(-प्राण घेणारा),मैद(फसव्या),भोंदू ,व्यभिचारी(भुररेकरी) भुरळ पडणारा,भुते घालणारा,चेटूक करणारा.

निशंक निलाजिरा कळभंट । टौणपा लौंद धट उद्धट । ठस ठोंबस खट नट । जगभांड विकारी ॥ ३२॥

( कळभंट - कळलाव्या, लौंद ठस ठोंबस - पुष्ठ,चिवट,अशिक्षित , खट जगभांड विकारी - खट्याळ,भांडकुदळ,विकारवश )

निःशंक,निलाजरा,भांडकुदळ (कळभंट),टोणपा,(लोंद),गलेलठ्ठ,(धट) धटिंगणा,उद्धट,(ठस) दडप्या-निर्भीड,(ठोंबस) ठोब्या-अक्षरशत्रु,(खटनट) अति वाईट, सगळ्या जगाशी भांडणारा,विकारी

अधीर आळिका अनाचारी । अंध पंगु खोकलेंकरी । थोंटा बधिर दमेकरी । तऱ्ही ताठा न संडी ॥ ३३॥

( आळिका - आळ घेणारा,हावरा , बधिर - बहिरा )

उतावळा -हावरा,(आळिका),खोटा,अनाचारी,आंधळा,पांगळा,खोकलेकरी,थोटा,बहिरा, दमेकरी,तरीपण,ताठा मात्र,सोडीत नाही,

विद्याहीन वैभवहीन । कुळहीन लक्ष्मीहीन । शक्तिहीन सामर्थ्यहीन । अदृष्टहीन भिकारी ॥ ३४॥

( अदृष्टहीन - भाग्यहीन )

विद्या वैभव कुल संपत्ति,शक्ति,सामर्थ्य,दैव (अदृष्ट),ह्यांनी हीन (रहित) (अदृष्टहीन-कपाळकरंटा) असा दरिद्री.

बळहीन कळाहीन । मुद्राहीन दीक्षाहीन । लक्षणहीन लावण्यहीन । आंगहीन विपारा ॥ ३५॥

( विपारा - विद्रूप )

(बळ)तेज व कळा नसलेला,(मुद्रा) संप्रदायलक्षण नसलेला,(दीक्षाहीन) धर्मविधी व्रत वगैरे न करणारा,कुलक्षणी,कुरूप,विरूप,आंगहीन म्हणजे जन्मतः एखादा अवयव नसणारा,विपारा-जन्मतः एखादा अवयव जास्त असणारा (ते मुल विपारी जन्मले असा शब्दपयोग सातारा प्रांती खेड्यापाडयातील लोकांच्या बोलण्यात येतो)

युक्तिहीन बुद्धिहीन । आचारहीन विचारहीन । क्रियाहीन सत्वहीन । विवेकहीन संशई ॥ ३६॥

युक्ति,बुद्धि,आचार-विचार,क्रिया,(सत्व) धैर्य-उत्साह इ. सद्गुण नसलेला,विवेक इत्यादिकांनी रहित,संशयखोर (तात्पर्य:-सर्वहीन शुल्कक असा कुविद्येचा प्राणी असतो),

भक्तिहीन भावहीन । ज्ञानहीन वैराग्यहीन । शांतिहीन क्ष्माहीन । सर्वहीन क्षुल्लकु ॥ ३७॥

भक्ती,(प्रेम) भाव (निष्ठा-विश्वास),ज्ञान,वैराग्य,शांति,क्षमा ह्या सर्व दैवी संपत्तीच्या गुणांनी हीन असून क्षुद्र मनोवृतीचा,

समयो नेणे प्रसंग नेणे । प्रेत्न नेणे अभ्यास नेणे । आर्जव नेणे मैत्री नेणे । कांहींच नेणे अभागी ॥ ३८॥

समय,काळ,(प्रसंग),स्थिति,प्रयत्न,अभ्यास,(आर्जव),लीनता-सरळपणा,मैत्री ही ज्यास काही कळत नाही असा अभागी,

असो ऐसे नाना विकार । कुलक्षणाचें कोठार । ऐसा कुविद्येचा नर । श्रोतीं वोळखावा ॥ ३९॥

अशा प्रकारे अनेक विकार कुलक्षणांचे केवळ कोठार (कोठीच) यांनी भरपूर असा कुविद्येचा प्राणी असतो.ह्या लक्षणांवरून श्रोत्यांनी त्याला ओळखावा,

ऐसीं कुविद्येचीं लक्षणें । ऐकोनि त्यागची करणें । अभिमानीं तऱ्हें भरणें । हें विहित नव्हें ॥ ४०॥

अशी कुविद्येची लक्षणे ऐकून त्यांचा त्यागच करावा.त्यांचा त्याग न करितां अभिमानी स्वभावाने,त्याच कुलक्षणांच्या भरीं भरणे योग्य नाही.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कुविद्यालक्षणनाम समास तिसरा ॥ ३॥**

**समास चवथा : भक्ति निरूपण ॥ श्रीराम् ॥**

**कुविद्येचा प्राणी असे** ही या ओवी समासातील वर्णनाचे सूत्र होय.

नाना सुकृताचें फळ । तो हा नरदेह केवळ । त्याहिमधें भाग्य सफळ । तरीच सन्मार्ग लागे ॥ १॥

अगोदर हा नरदेह म्हणजेच पूर्वजन्मीच्या बहुत पुण्याईचे (सत्कृत्यांचे) फळ होय. आणि त्यातही सन्मार्ग लागला तर परमभाग्य,पूर्वपुण्य सफळ झाले असे समजावे.

नरदेहीं विशेष ब्राह्मण । त्याहीवरी संध्यास्नान । सद्वासना भगवद्भजन । घडे पूर्वपुण्यें ॥ २॥

त्या नरदेहात विशेष योग्यतेचा ब्राह्मणदेह आहे. आणि त्यातही स्नानसंध्यादि सत्कर्मे करणे.चांगली वासना भगवद्भजन ह्या गोष्टी पूर्वपुण्याईनेच घडतात.{ब्राह्मणस्य हि देहोऽयं क्षुद्रकामाय नेष्यते।कृच्छ्राय तपसे चेह प्रेत्यानंतसुखाय च। भाग. तप,परोपकार करणे,ही त्या ब्राह्मण देहाची कर्तव्ये.}

भगवद्भक्ति हे उत्तम । त्याहिवरी सत्समागम । काळ सार्थक हाचि परम । लाभ, जाणावा ॥ ३॥

त्याचप्रमाणे भगवद्भक्ति ही उत्तम आहे आणि त्यात सत्संगती मिळून आयुष्याचे सार्थक झाले तर तो परमलाभ समजावा.

प्रेमप्रीतीचा सद्भाव । आणी भक्तांचा समुदाव । हरिकथा मोहोत्साव । तेणें प्रेमा दुणावे ॥ ४॥

अत्यंत आवडीची सदभावना (देवाविषयी सद्भावाची प्रेमप्रीती) अंतःकरणात अगोदर उत्पन्न झालेली,तशात भगवद्भक्तांचा मेळा जमला (भक्तसमागमाची जोड मिळाली ) त्यात तिथी-पर्वणीचा महोत्सव अथवा (भग्वद्गुणानुवाद) हरिकथा सुरु झाली म्हणजे हरिप्रेम वाढीस लागते.

नरदेहीं आलियां येक । कांही करावें सार्थक । जेणें पाविजे परलोक । परम दुल्लभ जो ॥ ५॥

(अश्या ह्या महत्वाच्या) नरदेहांत आल्यानंतर त्या नरदेहाचे कांहींतरी सार्थक होईल असे वागावे, की ज्या योगे अत्यंत दुर्लभ असा परलोक (प्रकृति-पलीकडचे निजस्वरूप) प्राप्त होईल,

विधियुक्त ब्रह्मकर्म । अथवा दया दान धर्म । अथवा करणें सुगम । भजन भगवंताचें ॥ ६॥

त्या परलोक प्राप्तीसाठी शास्त्रोक्त (विधियुक्त) ब्रह्मकर्म,दया,दान,धर्म,ह्यापैकी काहीतरी करावे,निदान अगदी सोपे असे भगवंताचे भजन करावे,(पुढील साधनांना विधियुक्त असे विशेषण लावावे ओवी १३ पर्यंत)

अनुतापें करावा त्याग । अथवा करणें भक्तियोग । नाहीं तरी धरणें संग । साधुजनाचा ॥ ७॥

( अनुतापें - पश्याताप )

पश्चातापयुक्त त्याग करावा,भक्तियोगाचे साधन करावे अथवा साधुसंताची संगती धरावी,

नाना शास्त्रें धांडोळावीं । अथवा तीर्थे तरी करावीं । अथवा पुरश्चरणें बरवीं । पापक्षयाकारणें ॥ ८॥

अनेक शास्त्रांचा (सर्वान्धर्मान शास्त्रिति शास्त्रं) अभ्यास करावा (नानाशास्त्र ग्रंथ पाहावेत): कायाशुद्धीसाठी तीर्थयात्रा कराव्या, अथवा पापनाशनार्थ (गायत्रीची) पुरच्श्ररणे करावीत.

अथवा कीजे परोपकार । अथवा ज्ञानाचा विचार । निरूपणीं सारासार । विवेक करणें ॥ ९॥

अथवा परोपकार करावा,किवा अध्यात्मज्ञानाचा विचार करावा (संत-गुरु-मुखाने) ऐकलेल्या निरुपणाच्या सहाय्याने सारासार विचार करावा.

पाळावी वेदांची आज्ञा । कर्मकांड उपासना । जेणें होइजे ज्ञाना- । आधिकारपात्र ॥ १०॥

वेदाज्ञा पाळून व त्याप्रमाणे कर्म व उपासना ह्यांचे आचरण करून ज्ञानाचा अधिकार प्राप्त होईल असे वागावे.(वेदाज्ञेप्रमाणे कर्मकांड उपासनाकांड ह्या मार्गाने जाऊन ज्ञानाधिकार प्राप्त करून घ्यावा)

काया वाचा आणी मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें । कांहीं तरी येका भजनें । सार्थक करावें ॥११॥

कायावाचामने करून पत्र,पुष्प,फळ,पाणी (पत्रं पुष्पं फलं तोयं।) ह्यापैकी जे अनुकूल असेल ते देवास अर्पण करून कोणत्याही भक्तीने देह सार्थकी लावावा.

जन्मा आलियाचें फळ । कांहीं करावें सफळ । ऐसें न करितां निर्फळ । भूमिभार होये ॥ १२॥

( निर्फळ - व्यर्थ )

तात्पर्य: नरजन्मास आल्यासारखे काहीतरी पदरात पाडून घ्यावे,(जन्म सफल होय ते करावे) तसे न केल्यास नरदेह निष्फळ व नुसता भूमीला भार होईल.

नरदेहाचे उचित । कांहीं करावें आत्महित । येथानुशक्त्या चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावें ॥ १३॥

काही आत्महित करणे.निदान शक्तीप्रमाणें चित्त,परमेश्र्वराचे सेवेस-भजनास लावावे. हेच नरदेहास योग्य होय.(नरदेहाचे साफल्य होय.)

हें कांहींच न धरी जो मनीं । तो मृत्यप्राय वर्ते जनीं ।जन्मा येऊन तेणें जननी । वायांच कष्टविली ॥१४॥

यापैकी काहीतरी करण्याचे जो मनातही आणत नाही तो जगात वर्तत असून मृतप्रायच समजावा.(तो जिवंत असून मेल्यासारखा होय.) त्याने जन्मास येऊन आपल्या जन्मदात्रीस (गर्भधारणेचे व प्रसूतिवेदनेचे) कष्ट विनाकारण दिले.

नाहीं संध्या नाहीं स्नान । नाहीं भजन देवतार्चन । नाहीं मंत्र जप ध्यान । मानसपूजा ॥ १५॥

ना स्नान ना संध्या,भजन,पूजन,मंत्रजप (मंत्र घेतला नाही किवा घेतला असल्यास जप करीत नाही), मानसपूजा ह्यापैकी जो काही करत नाही.

नाहीं भक्ति नाहीं प्रेम । नाहीं निष्ठा नाहीं नेम । नाहीं देव नाहीं धर्म । अतीत अभ्यागत ॥ १६॥

देवावर भक्ति,प्रेम,निष्ठा नाही,नित्यनेम,देवधर्म,अथवा अतीत,अभ्यागताचा सत्कार ह्यापैकी काही नाही.

नाहीं सद्बुद्धि नाहीं गुण । नाहीं कथा नाहीं श्रवण । नाहीं अध्यात्मनिरूपण । ऐकिलें कदां ॥ १७॥

सुबुद्धि नाही,चांगला गुण नाही,कधी हरिकथा माहित नाही.कधी कोणाचे (पुराण) ऐकले नाही (हरिकथा श्रवण नाही.) किवा कधी अध्यात्म निरुपण ऐकले नाही.

नाहीं भल्यांची संगती । नाहीं शुद्ध चित्तवृत्ती । नाहीं कैवल्याची प्राप्ती । मिथ्यामदें ॥१८॥

( मिथ्यामदें - खोट्या अहंकाराने )

चांगल्याची संगति नाही,चित्तवृत्ति शुद्ध नाही आणि नसता अहंकार धरून फुगून बसलेला.त्यामुळे मोक्षही मिळत नाही,(खोट्या अहंकाराने डोलत राहून मोक्षप्राप्तीचा मार्ग पहात नाही.)

नाहीं नीति नाहीं न्याये । नाहीं पुण्याचा उपाये । नाहीं परत्रीची सोये । युक्तायुक्त क्रिया ॥ १९॥

निती,न्याय काही पुण्यमार्ग ह्यापैकी काही नाही.योग्यायोग्याचा (विधिनिषेधाचा) विचार नाही.जेणेकरून परलोक(परत्रीची सोय) अशी काहीच सोय करीत नाही.

नाहीं विद्या नाहीं वैभव । नाहीं चातुर्याचा भाव । नाहीं कळा नाहीं लाघव । रम्यसरस्वतीचें ॥ २०॥

विद्या,वैभव,चातुर्य,कला,कौशल्य,विद्वत्ता,(रम्य अशा विद्यादेवीचे कौशल्य-विद्वत्ता,पांडित्य) ह्यापैकी काही नाही,

शांती नाहीं क्ष्मा नाहीं । दीक्षा नाहीं मैत्री नाहीं । शुभाशुभ कांहींच नाहीं । साधनादिक ॥ २१॥

शांति,क्षमा नाही,दीक्षा किवा मैत्री नाही कोणत्याही प्रकारचे शुभाशूभ साधन नाही.

सुचि नाहीं स्वधर्म नाहीं । आचार नाहीं विचार नाहीं ।आरत्र नाहीं परत्र नाहीं । मुक्त क्रिया मनाची ॥२२॥

( सुचि - पावित्र्य, आरत्र- इहलोक )

शुद्धता,स्वधर्म,आचारविचार,इहलोक(आरत्र),परलोक(परत्र) ह्यापैकी कशाचेही बंधन न पाळता मोकाटपणे वागतो,(अनर्गळपणे मनाला येईल तसे वागतो),

कर्म नाहीं उपासना नाहीं । ज्ञान नाहीं वैराग्य नाहीं । योग नाहीं धारिष्ट नाहीं । कांहीच नाहीं पाहातां॥ २३॥

कर्म,उपासना,ज्ञान,वैराग्य,योग,धारिष्ट्य यापैकी कोणतेही साधन करीत नाही.

उपरती नाहीं त्याग नाहीं । समता नाहीं लक्षण नाहीं । आदर नाहीं प्रीति नाहीं । परमेश्वराची ॥ २४॥

उदासीनता (पश्र्चाताप-उपरति),त्याग,समता,चांगले लक्षण,परमेश्र्वराविषयी आदर किवा प्रेम (हरीप्रेम) त्याचेजवळ नाही.

परगुणाचा संतोष नाहीं । परोपकारें सुख नाहीं । हरिभक्तीचा लेश नाहीं । अंतर्यामीं ॥ २५॥

( परगुणाचा - इतरांचे गुण )

दुसऱ्याचे ठिकाणी गुण असलेले पाहून संतोष होत नाही. परोपकार करण्याचे सुख वाटत नाही,अंतःकरणात लेशमात्र हरीभक्ति नाही !

ऐसे प्रकारीचे पाहातां जन । ते जीतचि प्रेतासमान । त्यांसीं न करावें भाषण । पवित्र जनीं ॥ २६॥

अशाप्रकारचे जे लोक जिवंत असले तरी प्रेततुल्य (जिवंत असून मेल्यासारखेच ) जाणा,त्यांच्याशी पवित्र पुरुषांनी (देवाच्या दासांनी) भाषण सुद्धा करू नये.

पुण्यसामग्री पुरती । तयासीच घडें भगवद्भक्ती । जें जें जैसें करिती । ते पावती तैसेंचि ॥ २७॥

ज्याच्या जवळ भरपूर पुण्याई (पुण्याचा साठा) असेल त्यासच हरिभक्ति घडते जे जे जसे करतात त्यांना तसेच फळ मिळते,

**नशीब अनुकूल असेल तरच बहुत पुण्याईने मिळालेल्या ह्या नरदेहाला सन्मार्ग (परमार्थाला अनुकूल असा) मिळेल.**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे भक्तिनिरूपणणनाम समास चवथा ॥ ४॥**

## समास पाचवा : रजोगुण लक्षण ॥ श्रीराम् ॥

**जे जैसे करती । ते पावती तैसेची ।**

मुळीं देह त्रिगुणाचा । सत्त्वरजतमाचा । त्यामध्यें सत्त्वाचा । उत्तम गुण ॥ १॥

रज,सत्व व तम ह्या तीन गुणांचाच मुळी देह बनलेला आहे. त्यात सत्वगुण उत्तम होय.

सत्वगुणें भगवद्भक्ती । रजोगुणें पुनरावृत्ती । तमोगुणें अधोगती । पावति प्राणी ॥ २॥

सत्वागुणाच्या योगाने भगवद्भक्ति (उत्तमगती) प्राप्त होते. रजोगुणाने जन्ममरणाचे फेरे फिरावे. लागतात.तमोगुणाने प्राण्यास अधोगती भोगावी लागते. श्लोक- सत्वगुणी लोक ऊर्ध्व (स्वर्गवैकुंठादिक) गतीला जातात. रजोगुणीलोक मध्ये (भूलोकात) मनुष्य देहातच राहतात. जघन्य-शेवटचा जो तमोगुण त्यायोगे युक्त असलेले लोक अधोगती म्हणजे नीच गतीला (तिर्यक योनीला) जातात.

**श्लोक ॥ ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः । जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥**

त्यांतहि शुद्ध आणी सबळ । तेहि बोलिजेति सकळ । शुद्ध तेंचि जें निर्मळ । सबळ बाधक जाणावें ॥३॥

त्यांतही ह्या तिन्ही गुणांमध्ये शुद्ध व शबल असे दोन भेद आहेत. त्यांचेही लक्षण सांगतो.शुद्ध निर्मळ तो परमार्थी असतो व शबलगुणांनी वृत्ति संसारात वळते.

शुद्धसबळाचें लक्षण । सावध परिसा विचक्षण । शुद्ध तो परमार्थी जाण । सबळ तो संसारिक ॥ ४॥

शुद्ध व शबल गुणांचे लक्षण सांगतो ते चतुरांनी सावधपणे ऐकावे.शुद्ध परमार्थी व शबल संसारिक असतो. (परमार्थसाधन करणारा तो शुद्ध व संसारात गुंतुन पडलेला तो शबल).

तयां संसारिकांची स्थिती । देहीं त्रिगुण वर्तती । येक येतां दोनी जाती । निघोनियां ॥ ५॥

त्या संसारी लोकांची स्थिति अशी असते की त्यांच्या देहात तिन्ही गुण वास करीत असतात, मात्र एक गुण वाढला की बाकीचे (दुसरे दोन) गुण दाबुन राहतात,(हटतात)

रज तम आणी सत्व । येणेंचि चाले जीवित्व । रजोगुणाचें कर्तृत्व । दाखऊं आता ॥ ६॥

रज तम व सत्व ह्यांच्यामुळेच (त्रिगुणानेच),देहाचे व्यवहार चालतात,आता ह्या समासात रजोगुणाची कामगिरी दाखवूं.

रजोगुण येतां शरिरीं । वर्तणुक कैसी करी । सावध होऊनी चतुरीं । परिसावें ॥ ७॥

रजोगुणाचा संचार शरीरात झाला म्हणजे त्याची वागणुक कशी असते ते सांगतो.चतुर श्रोत्यांनी ती ऐकावी.

माझें घर माझा संसार । देव कैंचा आणिला थोर । ऐसा करी जो निर्धार । तो रजोगुण ॥ ८॥

हे घर माझे,हा सगळा संसार माझा,देव थोर कुठला आणला आहे?(देव थोर नाही-मीच थोर आहे.) असा मनाचा निश्चय रजोगुणामुळे होतो.

माता पिता आणी कांता । पुत्र सुना आणी दुहिता । इतुकियांची वाहे चिंता । तो रजोगोण ॥ ९॥

( दुहिता - कन्या )

आई,बाप,बायको,मुलगे,सुना मुलगी इत्यादिकांची (एवढ्या निकटसंबंधी जनांचीच) काळजी वाहतो तो रजोगुण.

बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । दुसर्याचें अभिळाषावें । तो रजोगोण ॥ १०॥

( बरें खावें बरें जेवावें - खायला प्यायला उत्तम मिळावे अशी इच्छया )

चांगले जेवण असावे व ईतरही जेवणाचे पदार्थ चागलेच असावेत (अलंकार) नेसायला-पांघरायला चागले असावे, तसेच दुसऱ्याच्या वस्तुचा अभिलाष चित्तात असतो तो रजोगुण

कैंचा धर्म कैंचें दान । कैंचा जप कैंचें ध्यान । विचारीना पापपुण्य । तो रजोगुण ॥ ११॥

दान,धर्म,जप,ध्यान,पापपुण्य ह्यांचा काहीच विचार जेथे नाही (परमार्थाच्या कोणत्याच भावनांना थारा न देणे) तो रजोगुण.

नेणे तीर्थ नेणे व्रत । नेणे अतीत अभ्यागत । अनाचारीं मनोगत । तो रजोगोण ॥ १२॥

तीर्थव्रत किवा अतीत अभ्यागत जो जाणत नाही व ज्याच्या मनाचा कल नेहमी अनाचारकडे असतो तो रजोगुण.

धनधान्याचे संचित । मन होये द्रव्यासक्त । अत्यंत कृपण जीवित्व । तो रजोगोण ॥ १३॥

धनधान्य साठवावे अशी इच्छा होते,मन धनलुब्ध असते आणि जो अतिशय कृपण असतो तो रजोगुण.

मी तरुण मी सुंदर । मी बलाढ्य मी चतुर । मी सकळांमध्ये थोर- । म्हणे, तो रजोगुण ॥ १४॥

मी तरुण मी सुंदर मी बलवान मी चतुर मी सर्वात थोर असे जो म्हणतो (देहाभिमान धरतो) तो रजोगुण.

माझा देश माझा गांव । माझा वाडा माझा ठाव । ऐसी मनीं धरी हांव । तो रजोगोण ॥ १५॥

माझा देश,माझा गावं,माझा वाडा,माझी जागा-जमीन अशी ज्याच्या मनात हाव असते तो रजोगुण (माझा देश,माझे घर,माझे कुटुंब व मी ह्याप्रमाणे मी व माझे ह्यांच्या अभिमानात व ह्यांच्या चिंतेत व सुखदुंखात गुंग होऊन राहतो तो रजोगुण)

दुसर्यांचें सर्व जावें । माझेचेंचि बरें असावें । ऐसें आठवे स्वभावें । तो रजोगोण ॥ १६॥

दुसऱ्याचे सर्वस्वी नुकसान होऊन आपले मात्र कल्याण व्हावे असे विचार मनात येणे हे रजोगुणाचे लक्षण.

कपट आणी मत्सर । उठे देहीं तिरस्कार । अथवा कामाचा विकार । तो रजोगोण ॥ १७॥

कपट,मत्सर,तिरस्कार व काम हे विकार उत्पन्न होणे हे रजोगुणाचे लक्षण होय.

बाळकावरी ममता । प्रीतीनें आवडे कांता । लोभ वाटे समस्तां । तो रजोगोण ॥ १८॥

मुलाबाळांवर ममता करणे,स्त्रीवर अतिशय प्रेम असणे व सर्वांबद्दल लोभ असणे हा रजोगुण.

जिवलगांची खंती । जेणें काळें वाटे चित्तीं । तेणें काळें सीघ्रगती । रजोगुण आला ॥ १९॥

ज्यावेळी जीवलगाचेसाठी खंत (ममता व चिंता ) उत्पन्न होते त्या वेळी रजोगुण लगोलग आला. म्हणुन समजावे,

संसाराचे बहुत कष्ट । कैसा होईल सेवट । मनास आठवे संकट । तो रजोगोण ॥ २०॥

संसारात अनेक कष्ट भोगीत आहे, तरीपण असा हा संसार सुखरूप कसा होईल अशाबद्दल जो काळजी करतो तो रजोगुण.

कां मागें जें जें भोगिलें । तें तें मनीं आठवलें । दुःख अत्यंत वाटलें । तो रजोगोण ॥ २१॥

मागे जे जे (सुखदुंखात्मक) भोग भोगिले त्यांची आठवण होऊन अतिशय दुःख वाटणे हा रजोगुण

वैभव देखोनि दृष्टी । आवडी उपजली पोटीं । आशागुणें हिंपुटी- । करी, तो रजोगुण ॥ २२॥

( हिंपुटी - दुःख )

(दुसऱ्याचे) वैभव पाहून चित्तांत त्याविषयी लोभ उत्पन्न होणे,आणि ती पूर्ण झाली नाही म्हणुन कष्टी-खिन्न (हिपुटी),होणे हे रजोगुणाचे लक्षण.

जें जें दृष्टी पडिलें । तें तें मनें मागितलें । लभ्य नस्तां दुःख जालें । तो रजोगोण ॥ २३॥

जी जी चांगली वस्तू दिसेल ती मनाला हवीशी वाटते आणि ती मिळाली नाही की दुःख होते ते रजोगुणाचे लक्षण होय.

विनोदार्थी भरे मन । शृंघारिक करी गायेन । राग रंग तान मान । तो रजोगोण ॥ २४॥

हास्यविनोदात काळ घालविणे,शृंगारिक(नाच,तमाशे,नाटके) गायन करणे आणि नाचरंग गाणे वगैरेत दंग असणे हे रजोगुणाचे लक्षण.

टवाळी ढवाळी निंदा । सांगणें घडे वेवादा । हास्य विनोद करी सर्वदा । तो रजोगोण ॥ २५॥

(टवाळी) थट्टा,(ढवाळी) कुचेष्टा-कुताळकी,निंदा करणे,वादविवाद वगैरे करणे,आणि नित्य हास्यविनोद करणे हे रजोगुणाचे लक्षण.

आळस उठे प्रबळ । कर्मणुकेचा नाना खेळ । कां उपभोगाचे गोंधळ । तो रजोगोण ॥ २६॥

अतिशय आळस येतो व नाना प्रकारच्या करमणुकीच्या खेळात मग्न असतो.(अश्याप्रकारे) दिवसाचा वेळ जातो आणि (रात्री),अनेकप्रकारच्या अनेक प्रकारच्या विषयभोगाच्या गोंधळात वेळ जातो हे रजोगुणाचे लक्षण.

कळावंत बहुरूपी । नटावलोकी साक्षेपी । नाना खेळी दान अर्पी । तो रजोगोण ॥ २७॥

अनेक (वैषयिक) कलात तरबेज,अनेक ढंग करणारा अथवा दिवसातून अनेक प्रकारचे थाटाचे पोशाख करणारा,संसारकामात गुंतलेला,नानाप्रकारच्या करमणुकीच्या खेळात देणग्या देणारा तो रजोगुणी.

उन्मत्त द्रव्यापरी अति प्रीती । ग्रामज्य आठवे चित्तीं । आवडे नीचाची संगती । तो रजोगुण ॥ २८॥

मादक द्रव्यावर अतिशय प्रेम करणे,ग्राम्य विषयांचे स्मरण नित्य होणे,(ग्रामज्य-मैथुन),हलकट लोकांची संगत आवडणे तो रजोगुण.

तश्करविद्या जीवीं उठे । परन्यून बोलावें वाटे । नित्यनेमास मन विटे । तो रजोगुण ॥ २९॥

चोरी करण्याची इच्छा होणे,दुसऱ्याचे उणे बोलावेसे वाटणे,नित्यनेमाचा कंटाळा येणे तो रजोगुण.

देवकारणीं लाजाळु । उदरालागीं कष्टाळु । प्रपंची जो स्नेहाळु । तो रजोगुण ॥ ३०॥

देवाच्या कामास (कथेत टाळी वगैरे वाजविण्यास) लाजतो,पोटासाठी वाटेल ती कामे करतो,प्रपंच्यात ज्याचे प्रेम लागलेले असते (प्रपंची स्नेहाळू) तो रजोगुण(देवकार्यी लाजाळु उदरकार्यी कष्टाळू व प्रपंची स्नेहाळू) तो रजोगुण.

गोडग्रासीं आळकेपण । अत्यादरें पिंडपोषण । रजोगुणें उपोषण । केलें न वचे ॥ ३१॥

( आळकेपण - आवड, न वचे - सहन होत नाही )

रजोगुणाला उपासतापास नको असतात,गोड पदार्थांची अतिशय आवड असणे,(आळकेपण,हपापणे) आणि शरीरपोषणाकडे इतके लक्ष की (पंधरवड्यातून एकादशीसारखा) एखादा उपवासही करवत नाही.तो रजोगुण होय.

शृंगारिक तें आवडे । भक्ती वैराग्य नावडे । कळालाघवीं पवाडे । तो रजोगुण ॥ ३२॥

( कळालाघवीं पवाडे - कलाकौशल्यात मन रमते )

जे जे म्हणुन शृंगारिक ते ते सर्व मनापासून आवडते,कलाकौशल्यात(कलालाघवीं),ज्याचे मन शिरतें (पवाडे) व भक्ति आणि वैराग्य ही ज्यास आवडत नाहीत तो रजोगुण.

नेणोनियां परमात्मा । सकळ पदार्थी प्रेमा । बळात्कारें घाली जन्मा । तो रजोगुण ॥ ३३॥

सर्व पदार्थास अंतर्बाह्य व्यापून असणारा जो परमात्मा त्याचे ज्ञान करून न घेता जो केवळ त्या पदार्थावरच प्रेम करतो व ज्या योगे जन्ममृत्यूच्या फेऱ्यात मुद्दाम सापडतो तो रजोगुण.

असो ऐसा रजोगुण । लोभें दावी जन्ममरण । प्रपंची तो सबळ जाण । दारुण दुःख भोगवी ॥ ३४॥

असो,असा हा रजोगुण लोभामुळे जन्ममृत्यू भोगावयास लावतो.ह्या प्रपंचात्मक शबल रजोगुणामुळे भयंकर दु:ख भोगावे लागते.(परमात्म्याविषयी नावड व इतर सर्वपदार्थां विषयी आवड,असला हा रजोगुण जन्ममृत्यूच्या फेऱ्यात घालतो.)

आतां रजोगुण हा सुटेना । संसारिक हें तुटेना । प्रपंचीं गुंतली वासना । यास उपाय कोण ॥ ३५॥

आता हा असला रजोगुण सुटत नाही,संसारातील,गोवा-पाश तुटत नाही. प्रपंचात वासना गुंतली आहे. ह्या सर्वातून सुटण्यास कोणता उपाय करावा?

उपाये येक भगवद्भक्ती । जरी ठाकेना विरक्ती । तरी येथानुशक्ती । भजन करावें ॥ ३६॥

प्रपंचवासना पेटवणा-या रजोगुणापासून सुटकेचा उपाय भगवद्भक्ती हाच आहे.(ती भक्ति वैराग्ययुक्त असली पाहिजे) जर प्रपंचत्याग संपूर्ण घडून वैराग्य करवत नसेल तर यथाशक्ति भजन करावे.

काया वाचा आणी मनें । पत्रें पुष्पें फळें जीवनें । ईश्वरीं अर्पूनियां मनें । सार्थक करावें ॥ ३७॥

यथाशक्ति म्हणजे कायावाचामने भजन करून पत्र,पुष्प,फल आणि पाणी इत्यादी पैकी काहीतरी परमेश्वरास मनःपूर्वक अर्पण करावे आणि देहसार्थक करावे.

येथानुशक्ती दानपुण्य । परी भगवंतीं अनन्य । सुखदुःखें परी चिंतन । देवाचेंचि करावें ॥ ३८॥

यथाशक्ति दानपुण्य काही करीत जावे,पण भगवंताशी अनन्य असावे,सुखात अथवा दु:खात असता देवाचे चिंतन करीत जावे.(सुखदु:खे प्रारब्धानुसार येतील ती भोगावीत,पण देवाचे चिंतन करावे.)

आदिअंती येक देव । मध्यैंचि लाविली माव । म्हणोनियां पूर्ण भाव । भगवंतीं असावा ॥ ३९॥

( माव - माया )

आरंभी व शेवटी एक देवच खरा शाश्वत आहे, आणि मध्येचही माया पाठीमागे लाविली आहे, ह्यासाठी भगवंतावर पूर्ण निष्ठा असावी.(आदिअंती देव एक आहे मध्येच प्रपंच भासत असून त्या विषयी ममत्व वाटत असते.म्हणुन आदि-मध्यावसानी एकपणे असणारा जो देव त्यावर निष्ठेने प्रेम ठेवावे.)

ऐसा सबळ रजोगुण । संक्षेपें केलें कथन । आतां शुद्ध तो तूं जाण । परमार्थिक ॥ ४०॥

अशाप्रकारे शबल रजोगुणाचे थोडक्यात वर्णन केले,(तो केवळ प्रपंचरूप असतो.) आता परमार्थाला कारणीभूत असा शुद्ध रजोगुण सांगतो. तो तू समजून घे.(शुद्ध रजोगुण परमार्थिक आहे. त्याची ओळख सत्वगुण वर्णनात करून घ्यावी.)

त्याचे वोळखीचें चिन्ह । सत्वगुणीं असे जाण । तो रजोगुण परिपूर्ण । भजनमूळ ॥ ४१॥

( रजोगुण परिपूर्ण  भजनमूळ - प्रवृत्ती निर्मिती हे रजोगुणाचे कार्य जर हा रजोगुण सत्वागुणाच्यामागे उभा राहिला तर सज्जांनास ईश्वर भजनाकडे वळवतो)

त्या (शुद्ध) रजोगुणाच्या ओळखीचे चिन्ह सत्वगुणांमध्ये असुन तो भजनाचे सर्वस्वी मूळ कारण आहे.(कां कि रजकर्माणि वर्तते।-कर्म तेवढे रजोगुणाचे कार्य आहे. पण रजोगुण सत्वागुणात मिसळुन त्याचे कार्य करू लागला की शुद्ध होय.

ऐसा रजोगुण बोलिला । श्रोतीं मनें अनुमानिला । आतां पुढें परिसिला । पाहिजे तमोगुण ॥ ४२॥

अशाप्रकारे रजोगुण सांगितला तो श्रोत्यांच्या मनात उतरला असेलच,आता पुढे तमोगुणांचे वर्णन ऐकावे.(सारांश :परमार्थ किवा सन्मार्ग उत्तम असून सर्वांनाच तो का आवडत नाही तर त्याचे कारण त्रिगुण:-- सत्व,रज,तम यापैकी ज्या गुणाचे प्राबल्य प्रकृतीत जास्त असेल तदनुरूप जीवाचे आचरण घडत असते.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे रजोगुणलक्षणनाम समास पांचवा ॥ ५॥**

**समास सहावा : तमोगुण लक्षण ॥ श्रीराम् ॥**

मागां बोलिला रजोगुण । क्रियेसहित लक्षण । आतां ऐका तमोगुण । तोहि सांगिजेल ॥ १॥

मागच्या समासात लक्षणासहित रजोगुणाचे कार्य सांगितले,आता तमोगुणाचीही लक्षणे सांगतो. ऐका.(रजोगुणाचे क्रियेसहित लक्षण सांगितले,आता तमोगुणाचे लक्षण ऐका)

संसारीं दुःखसंमंध । प्राप्त होतां उठे खेद । कां अद्भुत आला क्रोध । तो तमोगुण ॥ २॥

संसारदु:खामुळे चित्तास उद्विग्नता येते. किवा अतिशय क्रोध उत्पन्न होतो. ते तमोगुणाचे लक्षण होय.

शेरीरीं क्रोध भरतां । नोळखे माता पिता । बंधु बहिण कांता । ताडी, तो तमोगुण ॥ ३॥

अंगात क्रोधाचा संचार झाला की कोणाची ओळख नाही.आई,बाप,भाऊ,बहिण,बायको,जो तडाक्यात सापडेल,त्यास मारतो(मारावयास उठतो) ते तमोगुणाचे लक्षण होय,

दुसर्याचा प्राण घ्यावा । आपला आपण स्वयें द्यावा । विसरवी जीवभावा । तो तमोगुण ॥ ४॥

दुसऱ्यास ठार मारावे,किवा आपली स्वतःची हत्या करावी.(दुसऱ्याचा प्राण घेणे किवा आपला देणे.),आपण कोण वगैरेची ओळख न राहण्याइतके बेफाम व्हावे हे तमोगुणाचे कार्य होय.

भरलें क्रोधाचें काविरें । पिश्याच्यापरी वावरे । नाना उपायें नावरे । तो तमोगुण ॥ ५॥

( काविरें - वारे )

क्रोधाचा संचार अंगात झाला की पिशाच्यासारखा थैमान घालतो,कोणत्याही उपायाने आवरत नाही. तो तमोगुण होय.

आपला आपण शस्त्रपात । पराचा करी घात । ऐसा समय वर्तत । तो तमोगुण ॥ ६॥

आपला आपण शस्त्राने घात करून घ्यावा, किवा दुसऱ्याचा करावा अशी पाळी येणे हे तमोगुणाचे चिन्ह होय.

डोळा युध्यचि पाहवें । रण पडिलें तेथें जावें । ऐसें घेतलें जीवें । तो तमोगुण ॥ ७॥

डोळ्यांनी युद्ध पाहावे,रणभुमीवर प्रेते पडली असतील तेथे मौज पाहण्याकरिता स्वतः जावे अशी आवड तमोगुणामुळे उत्पन्न होते.

अखंड भ्रांती पडे । केला निश्चय विघडे । अत्यंत निद्रा आवडे । तो तमोगुण ॥ ८॥

(**१)जगसत्यभ्रांती** -नामरुपी जग खरे वाटणे,२)**कर्तुत्वभोक्तुभ्रांती** - निष्क्रिय आत्म्याच्या सत्तेवर बुद्धीचे व्यवहार चालतात म्हणुन आत्माच कर्ता असा भ्रम, जास्वंदी - स्पटिक दृष्टांत,**३) भेदभ्रांती** - आत्मबिंबाचे आभासरूप प्रतिबिंब बुद्धीत पडल्याने आत्मा व जीव असा भेद भाव होतो.इति प्रतिबिंबवाद ४) **संगभ्रांती** - घटाकाशाचा घटाशी कधीच संबंध होत नसतो,घट फुटला तरी आकाश जसेच्या तसे राहाते तद्वत देह मरण पावला तरी आत्मा आहे तसाच राहतो अज्ञानाने आत्मा मेला असे वाटते.५) **विकारभ्रांती** - देहाचे सहा विकार आत्म्याचे आहेत असा भ्रम तो जातो तेव्हा **आत्मज्ञान होते**.)

नेहमी भ्रमिष्टासारखा असतो,त्यामुळे केलेला निश्र्चय टिकत नाही.(निरंतर भ्रमिष्ठासारखे अनिश्चित वागतो.) झोप अतिशय आवडते ते तमोगुणाचे वर्णन होय.

क्षुधा जयाची वाड । नेणे कडु अथवा गोड । अत्यंत जो कां मूढ । तो तमोगुण ॥ ९॥

ज्याची भूक फार मोठी (वाड) आहे. त्यामुळे गोड किवा कडु वगैरे ज्याला कळत नाही,जो अतिशय मूर्ख तो तमोगुण.

प्रीतिपात्र गेलें मरणें । तयालागीं जीव देणें । स्वयें आत्महत्या करणें । तो तमोगुण ॥ १०॥

आवडते माणूस मरण पावले म्हणजे त्याच्या शोकाने स्वतः जीव देणे,अथवा स्वतःची आत्महत्या करणे. हे तमोगुण लक्षण होय.

किडा मुंगी आणी स्वापद । यांचा करूं आवडे वध । अत्यंत जो कृपामंद । तो तमोगुण ॥ ११॥

किडा मुंगी किवा अन्य प्राणी ह्यांची (पशुपक्षांची किवा मनुष्यांची हिसा करण्याची आवड असते आणि ज्याला दया कसली ती नसते. हे तमोगुण लक्षण होय.

स्त्रीहत्या बाळहत्या । द्रव्यालागीं ब्रह्मत्या । करूं आवडे गोहत्या । तो तमोगुण ॥ १२॥

स्त्री किवा बालक यांचा प्राण घेणे, द्रव्यासाठी ब्राह्मणाचा जीव घेणे, गोहत्या करणे वगैरे कृत्ये ज्यास आवडतात. हे तमोगुण लक्षण होय.

विसळाचेनि नेटें । वीष घ्यावेंसें वाटे । परवध मनीं उठे । तो तमोगुण ॥ १३॥

( विसळाचेनि नेटें - ईर्षेने,अहंकाराच्या दबावाखाली ,

(इसाळा-) चेव,चीड येऊन विष घेण्याची इच्छा होते,दुसऱ्याचा नाश करण्याच्या कल्पना मनात येतात तो तमोगुणी होय.

अंतरीं धरूनि कपट । पराचें करी तळपट । सदा मस्त सदा उद्धट । तो तमोगुण ॥ १४॥

अंतःकरणात कपट ठेऊन दुसऱ्याचे वाटोळे करतो,(अंतरी कपट धरून दुसऱ्यांचे तळपट करतो.) जो नेहमी मस्त व उन्मत्त असतो हे तमोगुण लक्षण होय.

कळह व्हावा ऐसें वाटे । झोंबी घ्यावी ऐसें उठे । अन्तरी द्वेष प्रगटे । तो तमोगुण ॥ १५॥

भांडणतंटे व्हावेत असें वाटणे,कुस्ती खेळावी असे वाटते,(कलहाची मारामारीची हौस वाटते), अंतःकरणात व्देष उत्पन्न होतो हे तमोगुणाचे लक्षण होय.

युध्य देखावें ऐकावें । स्वयें युध्यचि करावें । मारावें कीं मरावें । तो तमोगुण ॥ १६॥

युद्ध पाहावे,युद्धाच्या गोष्टी ऐकाव्या,स्वतः युद्ध करावे,दुसऱ्याला मारावे किवा स्वतः मरावे असे वाटते.(असे वारे अंगात भरते) हे तमोगुण लक्षण होय.

मत्सरें भक्ति मोडावी । देवाळयें विघडावीं । फळतीं झाडें तोडावीं । तो तमोगुण ॥ १७॥

मत्सराने दुसऱ्याच्या भजनपूजनात,विघ्न करावे,देवळे फोडावीं,फलपुष्पांची(फळे-फुले देणारी) झाडे तोडावी हे तमोगुण लक्षण होय.

सत्कर्मे ते नावडती । नाना दोष ते आवडती । पापभय नाहीं चित्ती । तो तमोगुण ॥ १८॥

चांगली(पुण्याची) कामे आवडत नाहीत,अनेक प्रकारचे दोष करण्याची आवड असते. पाप करण्याची भीति चित्ताला वाटत नाही. हे तमोगुण लक्षण होय.

ब्रह्मवृत्तीचा उच्छेद । जीवमात्रास देणें खेद । करूं आवडे अप्रमाद । तो तमोगुण ॥ १९॥

( करूं आवडे अप्रमाद - मोठ्या चुका मुद्दाम कराव्याश्या वाटणे.)

ब्रह्मवृत्तीचा उच्छेद करणे. म्ह. ब्राह्मणास पुर्वजांनी दिलेली वतने,अग्रहार,वर्षासने बंद पाडणे.ब्राह्मणाची वृत्ति (वतन-पोषणाचे मार्ग) बुडवणे,प्रत्येक प्राण्यास दु:ख देणे.(खोडी-अपराध चुका) प्रमाद करावासा वाटणे. हे तमोगुण लक्षण होय.

आग्नप्रळये शस्त्रप्रळये । भूतप्रळये वीषप्रळये । मत्सरें करीं जीवक्षये । तो तमोगुण ॥ २०॥

आगी लावणे,शस्त्रे घेऊन हाणामा-या करणे,दुसऱ्यावर भुते घालणे किवा विषप्रयोग करणे. मत्सराने जीवांचा नाश करणे हे तमोगुण लक्षण होय.

परपीडेचा संतोष । निष्ठुरपणाचा हव्यास । संसाराचा नये त्रास । तो तमोगुण ॥ २१॥

दुसऱ्यास पीडा झाली की संतोष होणे.क्रूर कर्मे करण्याची (निर्दयपणाची) हौस असणे,संसार करण्याचा कधी कंटाळा न येणे हे तमोगुण लक्षण होय.

भांडण लाऊन द्यावें । स्वयें कौतुक पाहावें । कुबुद्धि घेतली जीवें । तो तमोगुण ॥ २२॥

भांडण नसेल तेथे भांडण लाऊन द्यावे किवा ती मजा आपण पहावी,अशी कुबुध्दि उत्पन्न होणे हे तमोगुण लक्षण होय.

प्राप्त जालियां संपत्ती । जीवांस करी यातायाती । कळवळा नये चित्तीं । तो तमोगुण ॥ २३॥

संपत्ति मिळाल्यावर तिचा उपयोग दुसऱ्या जींवास पीडा (हिंसा-क्लेश-यातायाती) करण्याकडे होतो.चित्तात दया उत्पन्न होत नाही हे तमोगुण लक्षण होय.

नावडे भक्ति नावडे भाव । नावडे तीर्थ नावडे देव । वेदशास्त्र नलगे सर्व । तो तमोगुण ॥ २४॥

भक्ति,भाव,तीर्थ किवा देव काहीही आवडत नाही.तसेच वेद्शास्त्र ह्यांचीही काही जरुरी नसते. हे तमोगुण लक्षण होय.

स्नानसंध्या नेम नसे । स्वधर्मी भ्रष्टला दिसे । अकर्तव्य करीतसे । तो तमोगुण ॥ २५॥

स्नानसंध्या नित्यनेम वगैरे काही नाही.स्वतः धर्माचा आचार पाळत नाही,करू नयेत अशी कर्मे करतो. हे तमोगुण लक्षण होय.

जेष्ठ बंधु बाप माये । त्यांचीं वचनें न साहे । सीघ्रकोपी निघोन जाये । तो तमोगुण ॥ २६॥

आई,बाप,वडील,बंधू ह्यांची बोलणी (सद्बोध) ज्यास खपत नाहीत,जो तत्काळ रागावतो व घरातून निघून जातो. हे तमोगुण लक्षण होय.

उगेंचि खावें उगेंचि असावें । स्तब्ध होऊन बैसावें । कांहींच स्मरेना स्वभावें । तो तमोगुण ॥ २७॥

खाऊन,पिऊन उगीच स्वस्थपणे (काही उद्योग न करता) काळ कंठावा (स्वस्थ असावे),कोणत्याही गोष्टीचे स्मरण राहात नाही हे तमोगुण लक्षण होय.

चेटकविद्येचा अभ्यास । शस्त्रविद्येचा हव्यास । मल्लविद्या व्हावी ज्यास । तो तमोगुण ॥ २८॥

(रजोगुण बळावल्यास चेटूकविद्येचा) चेडाचेटकाचा अभ्यास करणे,शस्त्रविद्या प्राप्त करून घेण्याची उत्कंठा असणे.मल्लविद्या यावीशी वाटणे हे तमोगुण लक्षण होय.

केले गळाचे नवस । रडिबेडीचे सायास । काष्ठयंत्र छेदी जिव्हेस । तो तमोगुण ॥ २९॥

( रडिबेडीचे सायास - आगीतून चालण्याचे प्रयास )

गळ टोचून घेणे,निखाऱ्यावरून चालणे,बेडी(देवाचे नवसाची) घालणे.(राडिबेडीचे सायास),जिभेला टोचून घेणे.वगैरे घोर प्रकारचे नवस करणे हे तमोगुण लक्षण होय.

भदें मस्तकीं जाळावें । पोतें आंग हुरपळावें । स्वयें शस्त्र टोचून घ्यावें । तो तमोगुण ॥ ३०॥

( भदें मस्तकीं जाळावें - डोक्यावर खापर ठेऊन निखारे जाळणे)

मस्तकावर भदें जाळावे,(भदे म्ह. खापर की ज्यात सरक्या पेटवून जे डोक्यावर घेतात.),(पोतानें) पेटलेल्या काकडानें अंग भाजून घ्यावे किवा आपल्या हाताने शस्त्रे टोचून घ्यावे हे तमोगुण लक्षण होय.

देवास सिर वाहावें । कां तें आंग समर्पावें । पडणीवरून घालून घ्यावे । तो तमोगुण ॥ ३१॥

( पडणीवरून घालून -आपला आपण कडेलोट )

(रावणाप्रमाणे) देवाला मस्तक (सिर-शिर) तोडुन वाहाणे,सबंध शरीर अर्पण करणे,किवा कडेलोट(पडणी) करून घेणे हे तमोगुण लक्षण होय.

निग्रह करून धरणें । कां तें टांगून घेणें । देवद्वारीं जीव देणें । तो तमोगुण ॥ ३२॥

देवापुढे आग्रहाने धरणे धरून बसणे. किवा टांगून घेणे, देवाच्या दारात जीव देणें हे तमोगुण लक्षण होय.

निराहार उपोषण । पंचाग्नी धूम्रपान । आपणास घ्यावें पुरून । तो तमोगुण ॥ ३३॥

कामनिक उपोषणे निराहार करणे ,पंचाग्नि-साधन करणे,धूम्रपान करणे(धूर पिऊन राहणे,झाडास उलटे टांगून घेणे व धूर पिणे) अथवा स्वतःस (भूमीत) पुरून घेणे. हे तमोगुण लक्षण होय.

सकाम जें का अनुष्ठान । कां तें वायोनिरोधन । अथवा राहावें पडोन । तो तमोगुण ॥ ३४॥

चित्तांत प्रापंचिक कामना धरून कोणतेही अनुष्ठान करणे,श्वासोच्छवास कोंडून धरणे. अथवा उगीच पडून असणे हे तमोगुण लक्षण होय.

नखें केश वाढवावे । हस्तचि वर्ते करावे । अथवा वाग्सुंन्य व्हावें । तो तमोगुण ॥ ३५॥

( वाग्सुंन्य - अबोल )

केवळ नखे व केस वाढवणे,हात वर(वर्ते) करून वाळविणे,अथवा मौन धरणे हे तमोगुण लक्षण होय.

नाना निग्रहें पिडावें । देहदुःखें चर्फडावें । क्रोधें देवांस फोडावें । तो तमोगुण ॥ ३६॥

(देहाविषयी निष्ठुरपणा धरून) अनेक प्रकारचे निग्रह करून देहाला पीडा द्यावी, नंतर देहास दुःख होऊ लागले म्हणजे चडफडत बसावे, किवा संतापाने देवास फोडावे. हे तमोगुण लक्षण होय.

देवाची जो निंदा करी । तो आशाबद्धि अघोरी । जो संतसंग न धरी । तो तमोगुण ॥ ३७॥

देवाची जो निंदा करतो तो आशाबद्ध (आशाळभूत) व अघोरी होय.तसेच जो सतसंग धरत नाही, हे तमोगुण लक्षण होय.

ऐसा हा तमोगुण । सांगतां जो असाधारण । परी त्यागार्थ निरूपण । कांहीं येक ॥ ३८॥

असा हा तमोगुण सांगावा तितका थोडा आहे.परंतु तो टाकण्यासाठी म्हणून थोडासा सांगितला.

ऐसें वर्ते तो तमोगुण । परी हा पतनास कारण । मोक्षप्राप्तीचें लक्षण । नव्हे येणें ॥ ३९॥

अशाप्रकारे तमोगुणांची वागणुक असते.पण याने अधोगति प्राप्त होते,ह्याचे योगाने मोक्षप्राप्ति होणार नाही.

केल्या कर्माचें फळ । प्राप्त होईल सकळ । जन्म दुःखाचें मूळ । तुटेना कीं ॥ ४०॥

तमोगुणास अनुसरून जी जी कर्मे होतील त्यांची फळे भोगावी लागतील.त्यांचे योगाने दुःखाचे मूळ जो जन्म तो चुकणार नाही.

व्हावया जन्माचें खंडण । पाहिजे तो सत्वगुण । तेंचि असे निरुपण । पुढिले समासीं ॥ ४१॥

जन्म चुकविण्यासाठी सत्वगुण पाहिजे (जन्ममरणाचे खंडन करणारा तो सत्वगुण)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तमोगुणलक्षणनाम समास सहावा ॥ ६॥**

## समास सातवा : सत्त्वगुण लक्षण ॥ श्रीराम् ॥

मागां बोलिला तमोगुण । जो दुःखदायक दारुण । आतां ऐका सत्वगुण । परम दुल्लभ ॥ १॥

मागिल समासात दु:खदायक असा व भयंकर असा तमोगुण सांगितला.आता अत्यंत दुर्लभ असा सत्वगुण ऐका,

जो भजनाचा आधार । जो योगियांची थार । जो निरसी संसार । दुःखमूळ जो ॥ २॥

भजनाला व योगीजनांचा आधार (थारा) आणि दु:खास कारणीभुत अशा संसाराचा नाश करणारा तो सत्वगुण होय.(दु:खमूळ संसाराचे हा निरसन करतो.)

जेणें होये उत्तम गती । मार्ग फुटे भगवंतीं । जेणें पाविजे मुक्ती । सायोज्यता ते ॥ ३॥

ज्याच्या योगाने (**यं गत्वा न निवर्तन्ते** । अशी) अविनाशी उत्तम गति मिळते.भगवंताच्या मार्गात प्रवेश होतो (देवाकडे जाणारा मार्ग दिसतो.) आणि सायुज्यमुक्ति मिळते. तो सत्वगुण होय.

जो भक्तांचा कोंवसा । जो भवार्णवींचा भर्वसा । मोक्षलक्ष्मीची दशा । तो सत्वगुण ॥ ४॥

( कोंवसा - आधार , भवार्णवींचा - भवसागर )

जो भक्तांचा रक्षक (आधार-कोवसा) भवसमुद्रातून तरुण जाण्याचा आश्रय (नौका) (भवसमुद्रातून पार जाणे ह्याच्या भरवशावर शक्य असतें.) आणि मोक्षलक्ष्मी प्राप्त होण्याचे चिन्ह (मोक्षलक्ष्मीचे बाह्यचिन्ह) असा तो सत्वगुण होय.

जो परमार्थाचें मंडण । जो महंतांचें भूषण । रजतमाचें निर्शन । तो सत्वगुण ॥ ५॥

( मंडण - सौंदर्य , निर्शन - निरसन )

परमार्थाला दुजोरा देणारा (मंडण-पोषक),महंतास भूषणभूत व रजतमांचा नाश करणारा तो सत्वगुण होय.

जो परमसुखकारी । जो आनंदाची लहरी । देऊनियां, निवारी- । जन्ममृत्य ॥ ६॥

जो अत्यंत सुखकर असून चित्तात आनंदाच्या लहरी (उर्मी) वाढविणारा व जन्ममृतूभय नाहीसे करणारा तो सत्वगुण होय.

जो अज्ञानाचा सेवट । जो पुण्याचें मूळ पीठ । जयाचेनि सांपडे वाट । परलोकाची ॥ ७॥

सत्वगुणामुळे अज्ञान संपते. तो पुंण्याचे उगमस्थान आहे. आणि याचे योगाने परलोकास जाण्याचा सुगम मार्ग (परमार्थ मार्ग) मिळतो.

ऐसा हा सत्वगुण । देहीं उमटतां आपण । तये क्रियेचें लक्षण । ऐसें असे ॥ ८॥

असा हा सत्वगुण देहांत प्रकट झाला असता (त्याची लक्षणे कशी असतात) त्या पुरुषाचे वागणे कसे असते ते आता सांगतो.

ईश्वरीं प्रेमा अधिक । प्रपंच संपादणे लोकिक । सदा सन्निध विवेक । तो सत्वगुण ॥ ९॥

(सत्वगुणाचे मुख्य लक्षण असे की चार लोकाप्रमाणे बाह्यत: प्रपंच करीत असताना) परमेश्वराच्या ठिकाणी अतिशय प्रेम असते (प्रारब्धयोगाने) प्रपंच असला तरी प्रापंचिक कार्य लौकिका पुरतेच (जरुरी पुरते चार लोकाप्रमाणे) करीत असतो आणि त्याचा आत्मानात्म विवेक (-विचार सदा) जागा असतो.

संसारदुःख विसरवी । भक्तिमार्ग विमळ दावी । भजनक्रिया उपजवी । तो सत्वगुण ॥ १०॥

सत्वगुण संसारदु:खाचा विसर पाडतो,निर्मळ भक्तिमार्ग दाखवितो. आणि हातून भजनादि कार्ये घडवितो.

परमार्थाची आवडी । उठे भावार्थाची गोडी । परोपकारीं तांतडी । तो सत्वगुण ॥ ११॥

परमार्थाची आवड उत्पन होते,भावार्थ गोड वाटू लागतो.परोपकार करण्याची त्वरा असते (परोपकारांत तत्पर असतो) तो सत्वगुण

स्नानसंध्या पुण्यसीळ । अभ्यांतरींचा निर्मळ । शरीर वस्त्रें सोज्वळ । तो सत्वगुण ॥ १२॥

स्नानसंध्यादि वर्णाश्रमविहित कर्मे करणे,पुण्य मार्गाचे आचरण करणे,अंतःकरण निर्मळ शुद्ध असणे,वस्त्रे व शरीर स्वच्छ असणे.(अंतरी शुद्ध विचार व बाह्यता: शरीर-वस्त्रे सोज्वळ अशी शुचिता असणे.) तो सत्वगुण होय.

येजन आणी याजन । आधेन आणी अध्यापन । स्वयें करी दानपुण्य । तो सत्वगुण ॥ १३॥

( येजन आणी याजन - यज्ञ करणे,करविणे , आधेन - अध्ययन , )

ब्राह्मणाची षड्कर्मे म्हणजे १. यज्ञयाग स्वतः करणे. २. व करविणे ३. स्वतः अध्ययन करणे ४. दुसऱ्यास शिकवणे.५. स्वतः दान करणे (व ६.दुस-यांनी दिलेली दाने घेणे.) ही सर्व कर्मे सत्वगुणाची आहेत.

निरूपणाची आवडी । जया हरिकथेची गोडी । क्रिया पालटे रोकडी । तो सत्वगुण ॥ १४॥

हरिकथा व निरुपण स्वतः करण्याची आवड असणे,व दुसऱ्याचे ऐकण्याची गोडी असणे व ऐकलेल्याचे मनन करून ते लगेच आचरणात आणणे हे सत्वगुणाचे चिन्ह होय.

अश्वदानें गजदानें । गोदानें भूमिदानें । नाना रत्नांचीं दानें- । करी, तो सत्वगुण ॥ १५॥
धनदान वस्त्रदान । अन्नदान उदकदान । करी ब्राह्मणसंतर्पण । तो सत्वगुण ॥ १६॥

घोडे,हत्ती,गाई,जमीन,अनेक रत्ने ह्यांची दाने देणे.तसेच द्रव्य,वस्त्र,अन्न,पाणी,ह्यांचे दान करणे. किवा ब्राह्मणभोजने घालणे (अशा दान कर्माविषयी प्रेम वाटणे.) हे सत्वगुणाचे लक्षण होय.

कार्तिकस्नानें माघस्नानें । व्रतें उद्यापनें दानें । निःकाम तीर्थें उपोषणे । तो सत्वगुण ॥ १७॥

कार्तिकस्नान,माघस्नान,व्रते व त्यांची उद्यापने,दाने,तीर्थयात्रा,उपासतापास ही सर्व (शरीरमन:शुद्धिपर कर्मे) निष्काम बुद्धीने करणे. तो सत्वगुण होय.

सहस्रभोजनें लक्षभोजनें । विविध प्रकारींचीं दानें । निःकाम करी सत्वगुणें । कामना रजोगुण ॥ १८॥

त्याचप्रमाणे सहस्त्रभोजने लक्ष भोजने घालणे,अनेक प्रकारची दाने देणे हे निष्काम मनाने करणे हे सत्वगुणाचे लक्षण व सकाम चित्ताने करणे हे रजोगुणांचे लक्षण आहे.

तीर्थीं अर्पी जो अग्रारें । बांधे वापी सरोवरें । बांधे देवाळयें सिखरें । तो सत्वगुण ॥ १९॥
देवद्वारीं पडशाळा । पाईरीया दीपमाळा । वृंदावनें पार पिंपळा- । बांधे, तो सत्वगुण ॥ २०॥

( अग्रारें - अग्रहार (गरीबांना जमीन दान करणे )

तीर्थाचे ठिकाणी अग्रहार म्हणजे जमीन,इनामे अर्पण करणे,विहिरी,तलाव,किवा सरोवरे बांधणे,देवळे वा देवळांची शिखरे बांधणे,देवळाच्या शेजारी चौसोपी (पड्व्या) ,तसेच पायऱ्या,दिपमाळा,तुळशीची वृदांवने,पिंपळाचे पार बांधणे तो सत्वगुण होय.

लावीं वनें उपवनें । पुष्पवाटिका जीवनें । निववी तापस्यांचीं मनें । तो सत्वगुण ॥ २१॥

वने (झाडे),उपवने (फळपुष्पांच्या बागा),बगीचे लावणे,त्यास पाणी घालणे व त्यायोगे तपस्वी पुरुषांची अंतःकरणे प्रसन्न करणे.(तपस्वी जनांचा संतोष करणे) तो सत्वगुण होय.

संध्यामठ आणि भुयेरीं । पाईरीया नदीतीरीं । भांडारगृहें देवद्वारीं । बांधें, तो सत्वगुण ॥२२॥

नदीतीरी संध्येसाठी मठ बांधणे,(एकांतास्तव),भुयारे तयार करणे,नदीकाठी घाट बांधणे,देवळास्तव कोठ्या (स्वयंपाकघरे) बांधणे हे सत्वगुणाचे चिन्ह होय,

नाना देवांचीं जे स्थानें । तेथें नंदादीप घालणें । वाहे आळंकार भूषणें । तो सत्वगुण ॥ २३॥

देवस्थानास देवाच्या मंदिरातून नंदादिप सुरु करणे,तसेच दागदागिने शोभेचे अनेक जिन्नस (वस्त्रालंकार) अर्पण करणे तो सत्वगुण होय.

जेंगट मृदांग टाळ । दमामे नगारे काहळ । नाना वाद्यांचे कल्लोळ । सुस्वरादिक ॥ २४॥
नाना समग्री सुंदर । देवाळईं घाली नर । हरिभजनीं जो तत्पर । तो सत्वगुण ॥ २५॥

( जेंगट - झेंगट (वाद्य) , दमामे - मोठे नगारे , काहळ - मोठे ढोल )

घोष करणारी तास,पखवाज,दमामे,नगारे,कर्णे,वगैरे वाद्ये,अनेक प्रकारची सुस्वर तंतुवाद्ये किवा सनया,वाजंत्री वगैरे अनेक प्रकारची सुस्वर तंतुवाद्ये किवा सनया,वाजंत्री वगैरे अनेक प्रकारची सुंदर सामग्री व नाना प्रकारची उपकरणे देवालयास अर्पण करणे.आणि हरिभाजनासही तत्पर असणे.(देवाची निष्काम सेवा करणे) तो सत्वगुण होय.

छेत्रें आणी सुखासनें । दिंड्या पताका निशाणें । वाहे चामरें सूर्यापानें । तो सत्वगुण ॥ २६॥

( सूर्यापानें - अब्दागिऱ्या )

छत्र्या,पालख्या,मेणे,दिंड्या,पताका,निशाणे,(अर्पण करणे अथवा) स्वतः वाहाणे,देवावर चौ-या,अबदागिरी (सूर्यापाने) धरणे. तो सत्वगुण होय.

वृंदावनें तुळसीवने । रंगमाळा संमार्जनें । ऐसी प्रीति घेतली मनें । तो सत्वगुण ॥ २७॥

(सत्पुरुषांच्या समाधीच्या) वृंदावनापुढे (किवा तुळसीवृंदावनापुढे) सडासंमार्जन करणे,रांगोळ्या घालणे,ह्या विषयी अंतःकरणात आवड उत्पन होणे तो सत्वगुण होय.

सुंदरें नाना उपकर्णें । मंडप चांदवे आसनें । देवाळईं समर्पणें । तो सत्वगुण ॥ २८॥

देवालयास अतिशय सुंदर अशी पूजा साहित्याची भांडी (उपकरणे),तसेच मंडपाचे सामान,चांदण्या (छत्रे),बैठका वगैरे अर्पण करणे.

देवाकारणें खाद्य । नाना प्रकारीं नैवेद्य । अपूर्व फळें अर्पी सद्य । तो सत्वगुण ॥ २९॥

त्याचप्रमाणे देवासाठी खाण्याचे (पंचखाद्यादि) पदार्थ,(पक्वान्ने वगैरे) नाना प्रकारचे उंची नैवेद्द्य आणि दुर्मिळ उत्तमोत्तम फळे अर्पण करणे. तो सत्वगुण होय.

ऐसी भक्तीची आवडी । नीच दास्यत्वाची गोडी । स्वयें देवद्वार झाडी । तो सत्वगुण ॥ ३०॥

ह्या ओवीचे दोन अर्थ संभवतात (१) वर लिहिल्याप्रमाणे अनेक वस्तू अर्पण करणे,देवाची भक्ति करण्याची आवड उत्पन झालेली असते. आणि देवाच्या द्वारी झाडलोटी सारखी हलकी कामे स्वतः करण्याचीहि तयारी असते. तो सत्वगुण होय.(२) देवाची भक्ति करण्याचे असे प्रेम उत्पन्न झालेले असते की झाडलोट करण्यासारखे कामही स्वतः करू लागतो. तो सत्वगुण होय.

तिथी पर्व मोहोत्साव । तेथें ज्याचा अंतर्भाव । काया वाचा मनें सर्व- । अर्पी, तो सत्वगुण ॥ ३१॥

विशेष तिथी,पर्वणी,नित्यनैमित्तिक महोत्सव ह्यांच्याठायी,ज्याची मनापासुन आवड असते आणि त्यासाठी कायावाचामनेकरून जो झटतो तो सत्वगुण होय.

हरिकथेसी तत्पर । गंधें माळा आणी धुशर । घेऊन उभीं निरंतर । तो सत्वगुण ॥ ३२॥
नर अथवा नारी । येथानुशक्ति सामग्री । घेऊन उभीं देवद्वारीं । तो सत्वगुण ॥ ३३॥

( माळा आणी धुशर - माळा,बुक्का )

भगवत्कथेला जो अगदी तत्पर असतो.मग ती कोणीही स्त्री अगर पुरुष असो हातात गंध अथवा सुवासिक द्रव्ये,फुलांच्या माळा,बुक्का (धूशर) इत्यादीपैकी यथाशक्ति साहित्य घेऊन तो देवाव्दारी उभा असतो.(अथवा स्वतःहरिकथा करण्याची आवड असते व शिवाय वरिल प्रकारचे साहित्य घेऊन जो दुसऱ्याच्या कथा कीर्तनास तत्पर असतो.) तो सत्वगुण होय.

महत्कृत्य सांडून मागें । देवास ये लागवेगें । भक्ति निकट अंतरंगें । तो सत्वगुण ॥ ३४॥
थोरपण सांडून दुरी । नीच कृत्य आंगीकारी । तिष्ठत उभा देवद्वारीं । तो सत्वगुण ॥ ३५॥

स्वतःचे प्रापंचिक महत्वाचे काम असले तरी ते बाजूस ठेऊन त्वरेने येतो.अशी ज्याच्या अंतःकरणात जिव्हाळ्याची भक्ति आहे. आणि जो स्वतःचा थोरपण बाजूस ठेऊन देवाची हलकीसलकी कामेसुद्धा करतो व (पडेल ती सेवा करण्यास) देवव्दारीसारखा उभा असतो.(मोठेपण विसरून हलकी कामे भक्तिपूर्वक करतो) तो सत्वगुण होय.

देवालागीं उपोषण । वर्जी तांबोल भोजन । नित्य नेम जप ध्यान- । करी, तो सत्वगुण ॥ ३६॥
शब्द कठीण न बोले । अतिनेमेसी चाले । योगू जेणें तोषविले । तो सत्वगुण ॥ ३७॥

देवाप्रीत्यर्थ उपवास करणे. किवा विडा जेवण वर्ज्य करणे जप-ध्यान वगैरे नित्यनेम करणे.तसेच कोणासही (दु:शब्द) कठोर शब्द न करणे (देवाच्या भक्तीमुळे देवदासाशी मृदु बोलणे.) योगी लोकही मान डोलावतील अशा प्रकारे अतिशय नियमितपणाने (मर्यादेने) चालणे तो सत्वगुण होय.

सांडूनिया अभिमान । निःकाम करी कीर्तन । श्वेद रोमांच स्फुरण । तो सत्वगुण ॥ ३८॥
अंतरीं देवाचें ध्यान । तेणें निडारले नयन । पडे देहाचें विस्मरण । तो सत्वगुण ॥ ३९॥
हरिकथेची अति प्रीति । सर्वथा नये विकृती । आदिक प्रेमा आदिअंतीं । तो सत्वगुण ॥ ४०॥
मुखीं नाम हातीं टाळी । नाचत बोले ब्रीदावळी । घेऊन लावी पायधुळी । तो सत्वगुण ॥ ४१॥

अभिमान टाकून देऊन चित्ताने जो अशी हरीकथा करतो की त्याचे आंगी घाम येणे,रोमांच उभे राहाणे इत्यादि अष्टसात्विक भाव उत्पन्न होतात, (अष्टसात्विक भावांसह कीर्तने ऐकतात. व अंतःकरणात भगवंताचे ध्यान प्रकट होऊन त्यामुळे डोळ्यातून प्रेमाश्रु वाहू लागतात.(निडारले नयन),देहाचा विसर पडतो देहभाव विसरतो व नेत्र प्रेमाश्रूंनीं वाहतात. हरिकथेची इतकी उत्कट प्रिति उत्पन होते की तिचा कधीच कंटाळा येत नाही.किर्तनाच्या आरंभापासून अखेर पर्यंत सर्वकाळ चढते वाढते प्रेम असते.मुखाने नामघोष करीत असतो,हातांनी टाळ्या वाजवितो,नाचतो,तोंडाने भगवंताचे गुणानुवाद गात असतो.भगवतभक्तांची पायधूळ मस्तकी लावतो तो सत्वगुण होय.

देहाभिमान गळे । विषईं वैराग्य प्रबळे । मिथ्या माया ऐसें कळे । तो सत्वगुण ॥ ४२॥

देहाभिमान गळून जातो,विषयासंबंधी उत्पन झालेले वैराग्य अधिक वाढू लागते.माया खोटी आहे असे कळून येते तो सत्वगुण होय.

कांहीं करावा उपाये । संसारीं गुंतोन काये । उकलवी ऐसें हृदये । तो सत्वगुण ॥ ४३॥

जन्मासार्थकाचा अथवा परलोक प्राप्तीचा काहीतरी उपाय करावा उगीच संसारात खितपत पडून काय होणार? अशाप्रकारचे विचार अंतःकरणात उद्भवू लागून मन परमार्थाकडे सन्मुख होऊ लागते.

संसारासी त्रासे मन । कांहीं करावें भजन । ऐसें मनीं उठे ज्ञान । तो सत्वगुण ॥ ४४॥

संसाराला मन त्रासू लागते.काहीतरी काळ देवाच्या भजनात घालवावा असे वाटू लागते. तो सत्वगुण होय.

असतां आपुले आश्रमीं । अत्यादरें नित्यनेमी । सदा प्रीती लागे रामीं । तो सत्वगुण ॥ ४५॥

घरदार,बायकामुलें असतानाही नित्यनेम आदरपूर्वक पाळतो,श्रीरामाच्या ठाई अखंड प्रेम लागत जाते.

सकळांचा आला वीट । परमार्थी जो निकट । आघातीं उपजे धारिष्ट । तो सत्वगुण ॥ ४६॥

सर्व प्रापंचिक संबंधांचा कंटाळा येऊ लागतो आणि परमार्थाविषयी तत्पर असतो,अशाप्रकारे वागत असता मोठमोठाली संकटे आली तरी न डगमगता धैर्य धरून राहतो (हरिप्रेमाच्या बळावर आघात आले तर भक्त धैर्याने त्यांना तोंड देतो) तो सत्वगुण होय.

सर्वकाळ उदासीन । नाना भोगीं विटे मन । आठवे भगवद्भजन । तो सत्वगुण ॥ ४७॥

संसारासंबंधी सर्वकाळ उदासीन असतो.म्हणजे संसारिक उपभोगात मन लागत नाही,विटून जाते किवा हरिभजन करावेसे वाटते.

पदार्थी न बैसे चित्त । मनीं आठवे भगवंत । ऐसा दृढ भावार्थ । तो सत्वगुण ॥ ४८॥

(प्रपंच्यातील कोणतेही पदार्थ शाश्र्वत नाहीत असे वाटू लागल्यामुळे) त्यांच्या ठिकाणी चित्त लागत नाही आणि परमात्मा आठवू लागतो अश्या प्रकारची मनाची दृढता असते तो सत्वगुण होय.

लोक बोलती विकारी । तरी आदिक प्रेमा धरी । निश्चय बाणे अंतरीं । तो सत्वगुण ॥ ४९॥

लोक अनेक प्रकारे नावे ठेऊ लागतात तरी परमार्थाविषयीचे प्रेम अंतःकरणात वाढतच असते आणि अंगीकारलेल्या परमार्थाच्या मार्गासंबंधाने निश्र्चय बळावतो तो सत्वगुण होय. (लोक म्हणतात की, हा भ्रमिष्ट झाला,तरी हयाचे प्रेम वाढतच असते - प्रेमाचा निश्र्चय दृढतर होतो तो सत्वगुण होय.

अंतरीं स्फूर्ती स्फुरे । सस्वरूपीं तर्क भरे । नष्ट संदेह निवारे । तो सत्वगुण ॥ ५०॥

अंतःकरणात देव कोण ह्याविषयी कल्पना स्फुरू लागतात व स्वरूपासंबंधी (श्रुतिशास्त्रसंमत) तर्क वाढू लागतो आणि तद्विषयक(श्रुतिशास्त्रविरुद्ध) जे खोटे-दुष्ट संशय असतात.ते मावळू लागतात. तो सत्वगुण होय.अंतरात हरिस्फूर्ति भरुन राहते.बुद्धी स्वरुपाकार होते व सकळ संदेह मावळतात.

शरीर लावावें कारणीं । साक्षेप उठे अंतःकर्णी । सत्वगुणाची करणी । ऐसी असे ॥ ५१॥

(सत्वगुणाचा उदय झाल्यामुळे हा हरिमय झाला आता संसारात स्वतःशी व कुटुंबीयांशी व इतरांशी वागणे कसे होते. ते पहा) देवाच्या सेवेंत किवा परोपकारामध्ये शरीर झिजवावे अशाप्रकारे प्रयत्न (साक्षेप किवा उद्योग) करावासा वाटणे तो सत्वगुण होय.

शांति क्ष्मा आणि दया । निश्चय उपजे जया । सत्वगुण जाणावा तया । अंतरीं आला ॥ ५२॥

शांति,क्षमा,दया व सर्वत्र परमात्मभावाचा निश्र्चय उत्पन्न होतो,त्याच्या अंतःकरणात सत्वगुण आला असे समजावे,

आले अतीत अभ्यागत । जाऊं नेदी जो भुकिस्त । येथानुशक्ती दान देत । तो सत्वगुण ॥ ५३॥

अतीत अभ्यागत (पाहुणे) कोणी आले तर त्यांना भुकेलेले जाऊ न देता,यथाशक्ति काहीतरी दान देतो तो सत्वगुण.

तडितापडी दैन्यवाणें । आलें आश्रमाचेनि गुणें । तयालागीं स्थळ देणें । तो सत्वगुण ॥ ५४॥

( तडितापडी - साधू संत )

कोणी गरीब,भिक्षा मागून निर्वाह करणारे तपस्वी वैरागी (तडी,तापडी-यात्रेकरू),भिक्षा मागून फिरणारे भिकारी आपल्या आश्रमात आले तर त्यास उतरण्यास जागा देतो, तो सत्वगुण होय.

आश्रमीं अन्नाची आपदा । परी विमुख नव्हे कदा । शक्तिनुसार दे सर्वदा । तो सत्वगुण ॥ ५५॥

स्वतःचे खाण्यापिण्याचे हाल असले तरी पण कोणासही आपल्या आश्रमातून विमुख जाऊ देत नाही.त्यास (खाण्यापिण्यास) यथाशक्ति देत असतो (शक्तिनुसार परामर्श घेतो,विमुख जाऊ देत नाही.) तो सत्वगुण होय.

जेणें जिंकिली रसना । तृप्त जयाची वासना । जयास नाहीं कामना । तो सत्वगुण ॥ ५६॥

ज्याने आपली जिव्हा (स्वाद,रुची) जिकली,वासना ज्याची तृप्त आहे,आणि कोणत्याही प्रकारची कामनाही ज्याला नाही,

होणार तैसें होत जात । प्रपंचीं जाला आघात । डळमळिना ज्याचें चित्त । तो सत्वगुण ॥ ५७॥
येका भगवंताकारणें । सर्व सुख सोडिलें जेणें । केलें देहाचें सांडणें । तो सत्वगुण ॥ ५८॥

ज्यावेळी जे बरे वाईट व्हावयाचे ते होईल अशा विचाराने प्रपंचातील संकटात ज्याचे चित्त डळमळत नाही,एका भगवंतासाठी त्याने सर्व सुखे सोडली,(फार काय,ज्या देहाने सुखोपभोग घ्यावयाचा तो) देहही ईश्वरार्पण करतो तो सत्वगुण होय.

विषईं धांवे वासना । परी तो कदा डळमळिना । ज्याचें धारिष्ट चळेना । तो सत्वगुण ॥ ५९॥

प्रसंगोप्राप्त विषयांकडे वासना गेली तर चित्त स्थिर राखतो (कुकर्माकडे जात नाही) व धैर्य खचू देत नाही.(वासना विषयांकडे धावली तरी हा ती आवरतो.)

देह आपदेनें पीडला । क्षुधे तृषेनें वोसावला । तरी निश्चयो राहिला । तो सत्वगुण ॥ ६०॥

देहाचे रोगादिकांनी हाल झाले,तहानभुकेचे कष्ट झाले.(क्षुधा,तृषा ह्यामुळे देह गळाला-वोसावला तरी आत्मनिश्र्चय दृढ धरून राहतो,तरीपण (नित्यनेमांचा),साधनांचा किवा समाधानाचा किवा आत्मत्वाचा ज्याचा निश्र्चय कधी ढळत नाही तो सत्वगुण होय.

श्रवण आणी मनन । निजध्यासें समाधान । शुद्ध जालें आत्मज्ञान । तो सत्वगुण ॥ ६१॥

(ब्रह्मज्ञानाचे श्रवण मनन करून निदिध्यासाने (सतत चिंतनाने) ज्याचे पूर्ण समाधान झाले आहे. तो सत्वगुण होय.

जयास अहंकार नसे । नैराशता विलसे । जयापासीं कृपा वसे । तो सत्वगुण ॥ ६२॥

आत्मज्ञानास विघ्न करणारा अहंकार ज्यास मुळीच नाही,ज्याची आशा कोठेही गुंतलेली नाही (आणि अपराध्यावरही जो कृपाच करतो.

सकळांसीं नम्र बोले । मर्यादा धरून चाले । सर्व जन तोषविले । तो सत्वगुण ॥ ६३॥

अबालवृद्धांशी जो नम्र वागतो (वेदशास्त्र सदाचार ह्यांची) मर्यादा सांभाळून वागतो व जो सर्वांस संतुष्ट राखतो.

सकळ जनासीं आर्जव । नाहीं विरोधास ठाव । परोपकारीं वेची जीव । तो सत्वगुण ॥ ६४॥

सर्वलोकांशी(आर्जव) सरळपणाने (लीनतेने) वागतो. कोणाशीही ज्याचा विरोध नसतो,परोपकारामध्ये देह झिजवतो तो सत्वगुण

आपकार्याहून जीवीं । परकार्यसिद्धी करावी । मरोन कीर्ती उरवावी । तो सत्वगुण ॥ ६५॥

स्वतःच्या कार्यापेक्षा दुसऱ्याचे कार्य करण्याविषयी अधिक दक्षता असणे व देह पडला तरी मागे सत्किर्ती ठेवणे तो सत्वगुण होय.

पराव्याचे दोषगुण । दृष्टीस देखे आपण । समुद्राऐसी साठवण । तो सत्वगुण ॥ ६६॥

( समुद्राऐसी साठवण- दुसऱ्याचे गुणदोष जाणून पोटात घालणे हा सत्वगुण)

दुसऱ्याचे गुणदोष ओळखतो,पण समुद्राप्रमाणे सर्व पोटात साठवून ठेवतो.(कोणाचाही उच्चार करीत नाही)(परदोष न पाहता समुद्रासारखे मोठे मन करतो.) तो सत्वगुण होय.

नीच उत्तर साहाणें । प्रत्योत्तर न देणें । आला क्रोध सावरणें । तो सत्वगुण ॥ ६७॥

कोणी उणा शब्द बोलला तरी सहन करून त्यास उलट उत्तर देत नाही,क्रोधाच्या उर्मी आल्या तरी त्या जिरवतो.

अन्यायेंवीण गांजिती । नानापरी पीडा करिती । तितुकेंहि साठवी चित्तीं । तो सत्वगुण ॥ ६८॥

आपला अन्याय नसता आपला कोणी छळ केला,अनेक प्रकारे त्रास दिला तरी ते सर्व सहन करतो.

शरीरें घीस साहाणें । दुर्जनासीं मिळोन जाणें । निंदकास उपकार करणें । हा सत्वगुण ॥ ६९॥

शरीर दुसऱ्यासाठी झिजवतो (स्वतः घस सोसतो)(सन्मार्ग न सोडता) दुर्जनास प्रिय होतो.(दुर्जनास मिळून जातो,निंदकांवर उपकार करतो) तो सत्वगुण होय.

मन भलतीकडे धावें । तें विवेकें आवरावें । इंद्रियें दमन करावें । तो सत्वगुण ॥ ७०॥

मन(ओढाळ गुरांप्रमाणे) सैरावैरा विषयांकडे धाव घेत असते.(गुरुकृपेने) विवेकरूप दाव्याने आवरुन धरावे. व इद्रियांचे दमन करावे.(विवेकानी मन व इंद्रिये आवरावी) तो सत्वगुण होय.

सत्क्रिया आचरावी । असत्क्रिया त्यागावी । वाट भक्तीची धरावी । तो सत्वगुण ॥ ७१॥

चांगली कर्मे करावी,वाईट कर्मांचा त्याग करावा,भक्तिमार्गाने जावे. तो सत्वगुण होय.

जया आवडे प्रातःस्नान । आवडे पुराणश्रवण । नाना मंत्रीं देवतार्चन । करी, तो सत्वगुण ॥ ७२॥

(सत्क्रिया व भक्तिमार्ग यांचे आचरण कसे करावे ते पुढे ८५ व्या ओवीपर्यंत सांगितले आहे.) प्रातःस्नान करणे,पुराण ऐकणे.मंत्रोपचारयुक्त देवपूजा करणे अशी कामे आवडू लागली (स्नान,भजन,पूजन इत्यादिविषयी प्रेम उत्पन्न झाले.) की तो सत्वगुण होय.

पर्वकाळीं अतिसादर । वसंतपूजेस तत्पर । जयंत्यांची प्रीती थोर । तो सत्वगुण ॥ ७३॥

ग्रहणादि पर्वकाळाची विधिविधाने आदरपूर्वक करतो, वसंतपूजा तत्परतेने करतो.तसेच रामकृष्णादि जयंत्याही मोठ्या आवडीने पाळतो.(जयंत्यादिपर्वे उत्साहाने करतो.) तो सत्वगुण होय.

विदेसिं मेलें मरणें । तयास संस्कार देणें । अथवा सादर होणें । तो सत्वगुण ॥ ७४॥

परदेशात कोणी अकस्मात मरणाने मेल्यास (अनाथ प्रेत असल्यास) त्याचा अग्निसंस्कार करतो किंवा सहाय्य करतो. तो सत्वगुण होय.

कोणी येकास मारी । तयास जाऊन वारी । जीव बंधनमुक्त करी । तो सत्वगुण ॥ ७५॥

एखाद्यास कोणी मारीत असल्यास त्यास सोडवितो कोणी जीव बंधनात पडला असल्यास त्यास सोडवतो,(दु:ख व बंधन यापासून जीव सोडवितो.)

लिंगें लाखोलीं अभिशेष । नामस्मरणीं विश्वास । देवदर्शनीं अवकाश । तो सत्वगुण ॥ ७६॥

पार्थिव लिंगे (कोटी-लिंगार्चन),बिल्वादिकांची लाखोली वाहणे,अभिषेक करणे नामस्मरणावर विश्र्वास असणे,देव दर्शनास (प्रापंचिक अडचणी न जुमानता) मोकळा वेळ देतो. तो सत्वगुण होय.

संत देखोनि धावें । परम सुख हेलावे । नमस्कारी सर्वभावें । तो सत्वगुण ॥ ७७॥

संतास पाहताच त्याच्या दर्शनासाठी (मोठ्या आनंदाने धावत जातो) मोठ्या सुखाने तल्लीन होतो.व त्यास कायावाचा मने करून नमस्कार करतो.(साधुसंताविषयी परम आदर व प्रेम इ. गुण ह्याचे ठिकाणी सहजच प्रकट झालेले दिसतात.) तो सत्वगुण होय.

संतकृपा होय जयास । तेणें उद्धरिला वंश । तो ईश्वराचा अंश । सत्वगुणें ॥ ७८॥

जो संतकृपेला पात्र झाला त्याने आपल्या वंशाचा उद्धार केला,सत्वागुणामुळे तो परमेश्वराचाच अंश होय.

सन्मार्ग दाखवी जना । जो लावी हरिभजना । ज्ञान सिकवी अज्ञाना । तो सत्वगुण ॥ ७९॥

लोकांना सन्मार्ग दाखवतो, भगवद्भजनाला लावतो आणि अज्ञानी जीवांना ज्ञान शिकवतो तो सत्वगुण होय.

आवडे पुण्य संस्कार । प्रदक्षणा नमस्कार । जया राहे पाठांतर । तो सत्वगुण ॥ ८०॥

(पुण्यसंस्कार (गर्भाधानादि देहाशुध्यर्थ होणारे) अथवा चित्तशुद्धयर्थ होणाऱ्या पुण्यकर्माचे मनावर घडणारे संस्कार आवडतात,देवास किवा सद्‌गुरुस नमस्कार,प्रदक्षिणा घालणे,पुष्कळ पाठांतर असणे. तो सत्वगुण होय.

भक्तीचा हव्यास भारी । ग्रंथसामग्री जो करी । धातुमूर्ति नानापरी । पूजी, तो सत्वगुण ॥ ८१॥

भक्तीचा एकसारखा अतिशय छंद लागला आहे.म्हणून भक्तिशास्त्राची ग्रंथसामुग्री करतो आहे.(स्वतः नवीन ग्रंथ रचणे,किवा दुसऱ्याने केलेले लिहुन आपल्या संग्रही ठेवणे) अनेक प्रकारच्या भगवतप्रतिमेच्या पूजा करतो आहे. अनेक प्रकारच्या साहित्याने (प्रतिमापूजा करतो आहे)

झळफळित उपकर्णें । माळा गवाळी आसनें । पवित्रे सोज्वळें वसनें । तो सत्वगुण ॥ ८२॥

( गवाळी - गोमुख )

स्वच्छ लखलखीत अशी उपकरणी,माळा,संबळ्या (गवाळी),आसनें,वस्त्रे ही सर्व शुद्ध व स्वच्छ असतात(ही त्याला स्वच्छ आवडतात) तो सत्वगुण होय.

परपीडेचें वाहे दुःख । परसंतोषाचें सुख । वैराग्य देखोन हरिख- । मानी, तो सत्वगुण ॥ ८३॥

दुसऱ्यास पीडा झाली की ज्यास दुःख होते व दुसऱ्यास संतोष झाला की ज्यास सुख वाटते (जो परदुःखे दुःखी व परसुखे सुखी होतो) वैराग्य पाहून ज्याला आनंद वाटतो. तो सत्वगुण.

परभूषणें भूषण । परदूषणें दूषण । परदुःखें सिणे जाण । तो सत्वगुण ॥ ८४॥

दुसऱ्यास भूषण मिळाले की ज्यास स्वतःला भूषण मिळाल्याप्रमाणे आनंद होता. आणि दुसऱ्याला लागलेल्या दुषणानें स्वतःला लागल्याप्रमाणे दु:ख होते.एकंदरीत (दुसऱ्याच्या दु:खाने ज्याला कष्ट होतात. तो सत्वगुण होय.

आतां असों हें बहुत । देवीं धर्मी ज्याचें चित्त । भजे कामनारहित । तो सत्वगुण ॥ ८५॥

असो आता हा विचार पुष्कळ झाला तात्पर्य हेच की ज्याचे चित्त देवाधर्मात असते व जो निष्कामपणे देवाची सेवा,भक्ति करतो तो सत्वगुण.

ऐसा हा सत्वगुण सात्विक । संसारसागरीं तारक । येणें उपजे विवेक । ज्ञानमार्गाचा ॥ ८६॥

असा हा सत्वगुण सात्विकपणामुळे म्हणजे स्वाभाविकपणामुळे संसारसमुद्रातून तरुन नेणारा असून त्याच्या योगाने ज्ञानमार्गाचा विचार उत्पन होतो.(असा हा सत्वगुण संसारी तारक आहे.ज्ञान विवेक ह्याने स्फुरतो.)

सत्वगुणें भगवद्भक्ती । सत्वगुणें ज्ञानप्राप्ती । सत्वगुणें सायोज्यमुक्ती । पाविजेते ॥ ८७॥

ह्या सत्वगुणामुळे भगवतभक्ति नंतर आत्मज्ञान व तद्नंतर सायुज्यमुक्ति क्रमाने प्राप्त होतात.ह्या सत्वगुणामुळें भक्तिसुख मिळते,सायुज्यमोक्ष अखेर हाच देतो.असे हे सत्वगुणाचे वर्णन यथाशक्ती केले आहे.

ऐसी सत्वगुणाची स्थिती । स्वल्प बोलिलें येथामती । सावध होऊन श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ८८॥

अशी सत्वागुणाची स्थिति थोडक्यात यथाशक्ती सांगितली श्रोत्यांनी सावध होऊन पुढील निरुपण ऐकावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सत्वगुणनाम समास सातवा ॥ ७॥**

## समास आठवा : सद्विद्या निरूपण ॥ श्रीराम् ॥

ऐका सद्विद्येचीं लक्षणें । परम शुद्ध सुलक्षणें । विचार घेतां बळेंचि बाणे । सद्विद्या आंगीं ॥ १॥

(मागे कुविद्येची लक्षणे सांगितली. आता येथे सद्विद्येची लक्षणे सांगतो.) आता अत्यंत शुद्ध व चांगली सद्विद्येची लक्षणे ऐका. ह्याचा विचार करता करता ती लक्षणेच पुरुषाच्या ठिकाणी आपोआप उद्भवूं लागतात.

सद्विद्येचा जो पुरुष । तो उत्तमलक्षणी विशेष । त्याचे गुण ऐकतां संतोष । परम वाटे ॥ २॥

सद्विद्येच्या पुरुषाच्या ठिकाणी उत्तम लक्षणे अधिक असतात व त्या गुणांचे वर्णन ऐकले म्हणजे चित्तास संतोष वाटतो.

भाविक सात्विक प्रेमळ । शांति क्षमा दयासीळ । लीन तत्पर केवळ । अमृतवचनी ॥ ३॥

(सद्विद्येचा पुरुष) भाविक-श्रद्धाळू,सत्वशील,प्रेमळ तसेच शांती,क्षमा व दया ह्यांनी युक्त (सर्वाभूतीं) लीन,सत्कार्यास तत्पर,अमृतासारखे मधुर भाषण करणारा असतो.

परम सुंदर आणी चतुर । परम सबळ आणी धीर । परम संपन्न आणी उदार । आतिशयेंसीं ॥ ४॥

अतिशय रूपवान असून बुद्धिमान (चतुर) परमशक्तिमान असून धीम्मा (धीर) धैर्यशाली,पुष्कळ श्रीमंत असून तसाच उदार

परम ज्ञाता आणी भक्त । माहा पंडीत आणी विरक्त । माहा तपस्वी आणी शांत । आतिशयेंसीं ॥ ५॥

मोठा ज्ञाता असून भक्त,मोठा पंडित असून वैराग्यशील मोठा तपस्वी पण अतिशय शांत.

वक्ता आणी नैराशता । सर्वज्ञ आणी सादरता । श्रेष्ठ आणी नम्रता । सर्वत्रांसी ॥ ६॥

( वक्ता आणी नैराशता - वक्ता असून निर्लोभी / विरक्त )

वक्ता असून निर्लोभी (आशारहित),स्वतः सर्व जाणत असून दुसऱ्यांचेही आदरपूर्वक ऐकण्यास तयार (सर्वज्ञ असून श्रवणतत्पर ) सर्व गुणांनी श्रेष्ठ पण सर्वांशी नम्रपणे वागणारा.

राजा आणी धार्मिक । शूर आणी विवेक । तारुण्य आणी नेमक । आतिशयेंसीं ॥ ७॥

सत्ताधीश असून धर्माने वागतो,शूर असून विवेकी,तरुण असून अतिशय नियमबद्धतेनें वागतो.(**आणि** च्या **ऐवजी असून** शब्द) जगात **ज्ञान व भक्ति यांचे सहचर्य क्वचित दिसते**.ज्ञाता असेल तर भक्त नसतो. तो भक्तीला एक प्रकारचे खूळ समजतो. पण भक्त हा ज्ञान व ज्ञानाहंकार एकच समजुन ज्ञानाची हेळणा करतो.पण सद्विद्येचा पुरुष ज्ञान न भक्ति ह्यांचे वर्म समजत असल्यामुळे ज्ञाता व भक्त दोन्ही असतो.त्याच्या ठिकाणी ज्ञान व भक्ति एकरूपाने नांदतात.(हे ज्ञाता व भक्ति पदाचे वर्म आहे.) **तसाच प्रकार तपस्वी व शांत या पदांचा आहे** तपस्वी बहुधा रागीट असतो. व जगाच्या ठोकरा खाऊन चेचट बनलेला पुरुष बाह्यत: तरी शांत असतो पण तपस्वी नसतो,म्हणून तपस्वी असून शांत ह्या पदात दुहेरी सौदर्य आहे.**तसेच वक्ता आणि आशारहित किवा पंडित आणि विरक्त** पंडित व वक्ता हे बहुधा धनमानाचे लोभी असतात. व विरक्त आणि आशारहित पुरुष हे पंडित आणि वक्ते असतातच असा नियम नाही.म्हणून पांडित्य आणि वैराग्य किवा वक्तृत्व व नैराश्य ह्या **उभय गुणांचे एकत्रीकरण अत्यंत गौरवास्पद होय.**

वृधाचारी कुळाचारी । युक्ताहारी निर्विकारी । धन्वंतरी परोपकारी । पद्महस्ती ॥ ८॥

( युक्ताहारी - माफक भोजन करणारा, पद्महस्ती - हातावर कमळ चिन्ह असलेला / यशस्वी माणूस )

वाडवडिलांच्या श्रेष्ठांच्या रिती पाळणारा,कुळाचार सांभाळणार,परमार्थास अत्यंत सहाय्यभूत होईल अशा बेताचा आहार करणारा,शुद्ध विकार रहित अंतःकरण,अत्यंत कुशल वैद्य- धन्वंतरी असून वैद्यकशास्त्राचा उपयोग परोपकारार्थ करणारा, म्हणून तो यशस्वी परोपकारी व यशस्वी गुणांचा (पद्महस्ती)

कार्यकर्ता निराभिमानी । गायक आणी वैष्णव जनी । वैभव आणी भगवद्भजनी । अत्यादरें ॥ ९॥

कार्य करणारा पण निराभिमानी,गवई,भगवद्भक्त,वैभव पुष्कळ असून देवाच्या भजनी आदर (-संपन्न असून भक्त)

तत्वज्ञ आणी उदासीन । बहुश्रुत आणी सज्जन । मंत्री आणी सगुण । नीतिवंत ॥ १०॥

तत्वज्ञ असून अनासक्त बहुश्रुत असून सज्जन (कोणाचे न्यून न पहाणारा) कारभारी (मंत्री) असून सद्गुणी वा नीतिमान.

साधु पवित्र पुण्यसीळ । अंतरशुद्ध धर्मात्मा कृपाळ । कर्मनिष्ठ स्वधर्मे निर्मळ । निर्लोभ अनुतापी ॥ ११॥

सज्जन,पवित्र,पुण्यवान,शुद्ध अंतःकरणाचा,धर्मनिष्ठ (दानशील),कृपाळू,कर्मावर निष्ठा असणारा,धर्मदृष्ट्या शुद्ध,लोभरहित,साधन किवा सार्थक ह्याकामी आयुष्याचा उपयोग झाला नाही .म्हणून पश्र्चातापाने कळवळणारा.

गोडी आवडी परमार्थप्रीती । सन्मार्ग सत्क्रिया धारणा धृती । श्रुति स्मृती लीळा युक्ति । स्तुती मती परीक्षा ॥ १२॥

(गोडी,आवडी,प्रीति,हे तिन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत,सर्वांचा मिळून अर्थ हा की) परमार्थाची पराकाष्ठेची चढती प्रीति परमार्थाचा शुद्ध मार्ग व शुद्ध आचरण,ध्येयावर वृत्ति स्थिर करणे (धारणा) धैर्य,श्रुतिस्मृतीचे अध्ययन,लीला,युक्ती,(चातुर्य),स्तुति,(परमेश्र्वराची करणे किवा आपली होईल असे आचरण ठेवणे.),उत्तम बुद्धि, अंतःकरण परीक्षा,

दक्ष धूर्त योग्य तार्किक । सत्यसाहित्य नेमक भेदक । कुशळ चपळ चमत्कारिक । नाना प्रकारें ॥ १३॥

तत्पर,दूरदर्शी,योग्य तार्किक (श्रुतिशास्त्रसंमत तर्क करणारा),सत्य साहित्य म्हणजे सामुग्री किवा काव्य नियमबद्ध वागणारा,(भेदक म्हणजे) मर्मज्ञ,कलाकौशल्यात कुशल,चपळ,ज्याच्या गुणांचे लोकास आश्र्चर्य वाटते असा (नाना प्रकारी ह्याचा अन्वय पुर्वीच्या सर्व विशेषणांशी लावावा.)

आदर सन्मान तार्तम्य जाणे ।प्रयोगसमयो प्रसंग जाणे ।कार्याकारण चिन्हें जाणे ।विचक्षण बोलिका ॥१४॥

कोणाचा आदर,सन्मान कसा ठेवायचा,हे तारतम्याने जाणणे,प्रयोग (नाटक बसविणे,ओषधी इलाज करणे,कारस्थान,सामादामादि उपाय,योजना,अनुष्ठान इ.),वेळप्रसंग जाणणे,कार्य कोणते,अकार्य कोणते ह्याची लक्षणे जाणणे.कुशल वक्तृत्व असणे हे सद्विद्येचे लक्षण.

सावध साक्षेपी साधक । आगम निगम शोधक । ज्ञानविज्ञान बोधक । निश्चयात्मक ॥ १५॥

( आगम निगम शोधक - वेद वेदांताचा सूक्ष्म अभ्यासक, ज्ञानविज्ञान बोधक - वास्तव चैतन्य ब्रह्माविषयीचे ज्ञान (अविद्या) व आत्मस्वरुपाविषयी ज्ञान (विज्ञान) याची बोधानुभूती घेतलेला )

(मरणाचे स्मरण ठेऊन) सावध (दीर्घप्रयत्नी) साक्षेपी,साधन करणारा वेदशास्त्रांचा शोध घेणारा,संशयरहित परोक्ष व अपरोक्ष ज्ञानाचा दृढतेने बोध करणारा.

पुरश्चरणी तीर्थवासी । धृढव्रती कायाक्लेसी । उपासक, निग्रहासी- । करूं जाणे ॥ १६॥

( कायाक्लेसी - व्रत वैकल्यासाठी कायाक्लेश घेणारा )

पुरश्र्चरण करणारा,तीर्थवास करणारा,कोणतेही व्रत निश्र्चयाने करणारा,परोपकारार्थ वा परमार्थासाठी शरीरास कष्ट देणारा,उपासना करणारा आणि कोणत्याही सत्कृत्यांत मन व इंद्रिये ह्यांस कसे ताब्यात ठेवावे हे ज्यास कळते असा.

सत्यवचनी शुभवचनी । कोमळवचनी येकवचनी । निश्चयवचनी सौख्यवचनी । सर्वकाळ ॥ १७॥

ज्याचे भाषण नेहमी खरे,कल्याणकारक,कोमल,(श्रीरामचंद्राप्रमाणे) एकवचनी,निश्रायात्मक आणि श्रोत्यावक्त्यास सुखकर असे असते.

वासनातृप्त सखोल योगी । भव्य सुप्रसन्न वीतरागी ।सौम्य सात्विक शुद्धमार्गी । निःकपट निर्वेसनी॥ १८॥

(ज्ञान झाल्यामुळे) ज्याच्या वासना तृप्त झाल्या आहेत,ज्याच्या स्थितिगतीची कल्पना कोणासही करता येत नाही.असा योगी,भव्य (विशाल भावनेचा) नेहमी प्रसन्न मुद्रेने असणारा,वैराग्यशील शांत (मुद्रा व स्वभाव),सत्वशील,शास्त्रशुद्ध आचरण करणारा,निष्कपटी,निर्व्यसनी

सुगड संगीत गुणग्राही । अनापेक्षी लोकसंग्रही । आर्जव सख्य सर्वहि । प्राणीमात्रासी ॥ १९॥

( सुगड - चतुरपणाने केलेले काम )

(सुगड) चतुर,अथवा (सुगडसंगीत) गायनाची ज्यास चांगली माहिती आहे असा,दुस-याच्या सद्गुणांचा आदर करणारा,ज्यास स्वतःची कोणतीही अपेक्षा नाही असा,पण लोकसंग्रह करणारा आणि सर्व प्राण्यांशी आर्जवाने (नम्रतेने,सरळपणाने) व मैत्रीने वागतो असा (तो सर्वांशी सख्यत्वाने वागणारा असा.) लोकसंग्रही असतो.

द्रव्यसुची दारासुची । न्यायसुची अंतरसुची । प्रवृत्तिसुची निवृत्तिसुची । सर्वसुची निःसंगपणें ॥ २०॥

( द्रव्यसुची दारासुची - पैसा व स्त्रीबाबत पवित्र वर्तन , न्यायसुची - नीतिमान, अंतरसुची - निर्मळ मनाचा सर्वसुची - सर्व जीवन अंतर्बाह्य निर्मळ असलेला )

द्रव्य,स्त्री,न्याय,अंतःकरण,प्रवृत्ती व निवृत्ती ह्या सर्वांमध्ये जो शास्त्रशुद्ध मार्गाने वागत असल्याने (सूची-शुची) व्यवहारता व नि:संगपणाने परमार्थतः शुद्ध असतो.(तो निसंग आणि निर्मळ असतो)

मित्रपणें परहितकारी । वाग्माधुर्य परशोकहारी । सामर्थ्यपणें वेत्रधारी । पुरूषार्थे जगमित्र ॥ २१॥

( वेत्रधारी - संरक्षक )

सर्वांच्या ठिकाणी मित्रत्व ठेऊन हित करणारा.(मित्र म्हणुन परहित करणारा),मधुर भाषणाने दुसऱ्याचा शोक नाहीसा करणारा. सर्वांचे रक्षण करण्याचे सामर्थ्य किवा सत्ता ज्याचे जवळ आहे. असा आणि असा पराक्रमी आहे की ज्या पराक्रमामुळे सगळे जग मित्र झाले आहे असा (सामर्थ्य असून लोकांचा सेवक-वेत्रधारी,काठी धारण करणारा असा असून आपल्या पराक्रमाने (पुरुषार्थे) सर्व जगाला आपल्या भजनी लावणारा असा)

संशयछेदक विशाळ वक्ता । सकळ क्लृप्त असोनी श्रोता । कथानिरूपणीं शब्दार्था । जाऊंच नेदी ॥ २२॥

( सकळ क्लृप्त - सर्व जाणणारा,शंकासमाधान , शब्दार्था जाऊंच नेदी - शब्दार्थाकडे बारीक लक्ष ठेऊन )

सर्वप्रकारच्या संशयाचे निरसन करणारा असा बुद्धिमान वक्ता,स्वतः सर्वज्ञ असतांही दुसऱ्याचे म्हणणे ऐकून घेण्यास तयार असतो. व कथा निरूपणाचे-किर्तनाचे प्रसंगी अर्थांची फोड केल्याशिवाय एकही शब्द सोडीत नाही.

वेवादरहित संवादी । संगरहित निरोपाधी । दुराशारहित अक्रोधी । निर्दोष निर्मत्सरी ॥ २३॥

वादविवाद टाळून संवाद करतो (तो सुखसंवाद करतो पण वादाचे बंड उभारू देत नाही) ,ज्याला संग किंवा उपाधि कोणत्याही प्रकारची नाही, कसलीही दुराशा ज्याला नाही, क्रोध,द्वेष,मत्सर इत्यादि विकार ज्याच्या ठिकाणी नाहीत असा.

विमळज्ञानी निश्चयात्मक । समाधानी आणी भजक । सिद्ध असोनी साधक । साधन रक्षी ॥ २४॥

निश्र्चयात्मक असे शुद ज्ञान झाल्यामुळे चित्त पूर्ण समाधान पावले आहे,तरी पण देवाचे भजन करतो,सिद्ध असला तरी साधकाप्रमाणे वागून साधन सांभाळतो.(तो स्वतः आत्मसमाधान पावलेला असून देवाचे भजन करून साधनमार्गाचे रक्षण करतो.)

सुखरूप संतोषरूप । आनंदरूप हास्यरूप । ऐक्यरूप आत्मरूप । सर्वत्रांसी ॥ २५॥

सर्वांशी सुख संतोष आनंद हास्य (मधुर-स्मित) ऐक्य व आत्मरूपाने वागतो,

भाग्यवंत जयवंत । रूपवंत गुणवंत । आचारवंत क्रियावंत । विचारवंत स्थिती ॥ २६॥

भाग्य,जय,रूप,गुण,आचार,क्रिया,व विचार ह्यांनी युक्त ज्याची स्थिति आहे.

येशवंत किर्तिवंत । शक्तिवंत सामर्थ्यवंत । वीर्यवंत वरदवंत । सत्यवंत सुकृती ॥ २७॥
विद्यावंत कळावंत । लक्ष्मीवंत लक्षणवंत । कुळवंत सुचिष्मंत । बळवंत दयाळु ॥ २८॥
युक्तिवंत गुणवंत वरिष्ठ । बुद्धिवंत बहुधारिष्ट । दीक्षावंत सदासंतुष्ट । निस्पृह वीतरागी ॥ २९॥

( लक्षणवंत - ऐश्वर्य संपन्न )

यश,किर्ती,शक्ति,व वर देण्याचे सामर्थ्य,,वीर्य,वर देण्याचे सामर्थ्य,सत्य,पुण्यशीलत्व,विद्या,कळा,लक्ष्मी, चांगली लक्षणे,कुल,पवित्रता,बल,दया,युक्ति,श्रेष्ठगुण,बुद्धि,मोठे धैर्य,संप्रदाय(दीक्षा),नित्य,संतुष्टता, निरिच्छता,वैराग्य,इत्यादी सद्‌गुणांनी युक्त असा असतो.

असो ऐसे उत्तम गुण । हें सद्‌विद्यचें लक्षण । अभ्यासाया निरूपण । अल्पमात्र बोलिलें ॥ ३०॥

असो. अश्या प्रकारचे उत्तम गुण अंगी असणे,हे सद्‌विद्येचे लक्षण होय.ह्या गुणांचा श्रोत्यांनी अभ्यास करावा.म्हणून थोडक्यात ही लक्षणे सांगितली आहेत.

रूपलावण्य अभ्यासितां न ये।सहजगुणास न चले उपाये । कांहीं तरी धरावी सोये ।अगांतुक गुणाची ॥३१॥

रूप,लावण्य ही अभ्यास करून अंगी आणता येण्यासारखी नाहीत,कारण उपजत गुण कोणत्याही उपायांनी पालटत नाहीत.ह्यासाठी काहीतरी नवीन (आगंतुक) सद्‌गुणांचा अभ्यास करावा,

ऐसी सद्‌विद्‌या बरवी । सर्वत्रांपासी असावी । परी विरक्तपुरुषें अभ्यासवी । अगत्यरूप ॥ ३२॥

अशी ही (चांगल्या प्रकारची) सद्‌विद्‌या सर्वाजवळ असावी,त्यातल्या त्यात विरक्त पुरुषाने तिचा अभ्यास अगत्यपूर्वक करावा.(हे सद्‌विद्येचे गुण सर्वापाशी असलेले चांगले.तथापि विरक्त म्हणजे निस्पृह लोककार्यकर्त्या पुरुषांनी ह्या गुणांचा अभ्यास करून हे अगत्य अंगी आणले पाहिजेत.आता अशा विरक्तांची लक्षणे काय आहेत ते पुढच्या समासात पाहू)

**(त्रिगुण,तिन्ही गुण बंधनकारक आहेत.आळस,निद्रा,प्रमाद हे तमोगुणाचे बंधन,कामक्रोध वासानादि व्दंव हे रजोगुणांचे बंधन आहे. व मी सुख देणारा परोपकार करणारा हे सत्वगुणाचे बंधन आहे.(गुण-दोरी),रजतमाचे निरसन सत्वगुण करतो व सत्वाचेही निरसन करण्यास सद्‌विद्‌या पाहिजे,काट्याने काटा काढावयाचा व दोन्ही काटे फेकून द्‌यावयाचे,त्याप्रमाणे सत्व व सव्दिद्‌या ह्यांचाही पुढे त्याग करावयाचा)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सद्‌विद्‌यानिरूपणनाम समास आठवा ॥ ८॥**

## समास नववा : विरक्त लक्षण ॥ श्रीराम् ॥

ऐका विरक्तांची लक्षणें । विरक्तें असावें कोण्या गुणें । जेणें आंगीं सामर्थ्य बाणें । योगियाचें ॥ १॥

आता विरक्तांची लक्षणे ऐका,विरक्तांचे अंगी कोणते गुण असावेत की ज्या योगे त्यास योग्याचे सामर्थ्य (आंगी योगसामर्थ्य बाणेल.) प्राप्त होईल.(अथवा ज्या गुणांच्या अभ्यासाने योग्यांनाही सामर्थ्य लाभेल.)

जेणें सत्कीर्ति वाढे । जेणें सार्थकता घडे । जेणेंकरितां महिमा चढे । विरक्तांसी ॥ २॥

ज्या लक्षणांच्या अभ्यासामुळे विरक्ताची सत्कीर्ति वाढेल.सार्थकता होईल व त्याचा महिमा वाढेल.

जेणें परमार्थ फावे । जेणें आनंद हेलावे । जेणें विरक्ति दुणावे । विवेकेंसहित ॥ ३॥

( आनंद हेलावे - स्वानंद उचंबळे)

परमार्थ करण्यास फुरसत मिळेल.(त्याचा परमार्थ सफल होईल, आनंद उचंबळेल,विवेकयुक्त वैराग्य व्दिगुणीत होईल,

जेणें सुख उचंबळे । जेणें सद्‌विद्‌या वोळे । जेणें भाग्यश्री प्रबळे । मोक्षेंसहित ॥ ४॥

( सद्‌विद्‌या वोळे - स्वस्वरुपानुभव येतो )

सुख भरपूर मिळेल,सद्‌विद्‌या प्रसन्न होईल.निश्रयेस (मोक्षासह ऐहिक भाग्य-अभ्युदय) वाढेल.

मनोरथ पूर्ण होती । सकळ कामना पुरती । मुखीं राहे सरस्वती । मधुर बोलावया ॥ ५॥

परमेश्वरप्राप्तीचे मनोरथ व त्यासाठी करीत असलेल्या साधनासंबंधी इच्छा परिपूर्ण होऊन जिव्हेवर मधुर भाषण करीत सरस्वतीच (जणू काय) नांदेल हे आता सांगतो.

हे लक्षणें श्रवण कीजे । आणी सदृढ जीवीं धरिजे । तरी मग विख्यात होईजे । भूमंडळीं ॥ ६॥

ही लक्षणे ऐकावी व (मननंपूर्वक) अभ्यासाने आचरणात आणावी. म्हणजे सर्व जगांत त्याची किर्ती दुमदुमून जाईल.(विरक्ताने पुढील लक्षणे चित्तात धारावीत म्हणजे तो भूमंडळावर विख्यात होईल)

विरक्तें विवेकें असावें । विरक्तें अध्यात्म वाढवावें । विरक्तें धारिष्ट धरावें । दमनविषईं ॥ ७॥

विरक्ताने नेहमी विवेकपूर्ण वागावे,अध्यात्मविद्‌येचा अभ्यास वाढवावा इंद्रियांचे दमन करण्याविषयी धैर्य धरावे.

विरक्तें राखावें साधन । विरक्तें लावावें भजन । विरक्तें विशेष ब्रह्मज्ञान । प्रगटवावें ॥ ८॥

(स्वतःचे जपतपादि) साधन सांभाळून (दुसऱ्यास) परमेश्वर भक्तीचे मार्गास लावावे. व विशेष करून ब्रह्मज्ञान असावे.(प्रकट करण्याकडे रोख असावा)(विरक्ताने साधनामार्ग म्ह. ब्रह्मज्ञान व सगुणभक्ति प्रकट करावी)

विरक्तें भक्ती वाढवावी । विरक्ते शांती दाखवावी । विरक्तें येत्नें करावी । विरक्ती आपुली ॥ ९॥

(आपले व इतरांचे ) भक्तिप्रेम वाढवावे' (अभ्यासू साधकास शांतीचा नमुना आपल्या आचरणावरून पहावयास मिळेल अशी) अगाध शांति आपल्या आचरणांत विरक्ताने दाखवावी आणि एकदा उत्प्पन्न झालेले वैराग्य अधिक प्रयत्न करून वाढीस लावावे (आपली विरक्ति वाढवावी)

विरक्तें सद्क्रिया प्रतिष्ठावी । विरक्तें निवृत्ति विस्तारावी । विरक्तें नैराशता धरावी ।सदृढ जिवेंसीं ॥१०॥

(लुप्त झालेल्या) सतक्रियतेचा पुनरुद्धार करावा,निवृत्ती मार्गाचा विस्तार करावा पण ते करीत असता कसल्याही इच्छेत गुंतून राहु नये,(अत्यंत नैराश्य धरावे).

विरक्तें धर्मस्थापना करावी । विरक्तें नीति आवलंबावी । विरक्तें क्ष्मा सांभाळावी । अत्यादरेंसी ॥ ११॥

विरक्ताने धर्मस्थापना करावी.निती-क्षमा ह्यांचे अवलंबन अतिशय आदरपूर्वक करावे.(नीतीने चालावे व क्षमावृतींने सर्वांची मने आकर्षून घ्यावी.)

विरक्तें परमार्थ उजळावा । विरक्तें विचार शोधावा । विरक्तें सन्निध ठेवावा । सन्मार्ग सत्वगुण ॥ १२॥

मलिन झालेला परमार्थ शुद्धतेने प्रकट करावा व विचारपूर्वक सन्मार्ग व सत्वगुण नित्यजवळ ठेवावा (त्यास विसरू नये)

विरक्तें भाविकें सांभाळावीं । विरक्तें प्रेमळें निववावीं । विरक्तें साबडीं नुपेक्षावीं । शरणागतें ॥ १३॥

( साबडीं - भोळीबाबडी )

विरक्ताने भाविक साधकांचा सांभाळ करावा.प्रेमळ असतील त्यांचे समाधान करावे व भोळेभाबडे (साबडे ) शरण येतील त्यांची उपेक्षा करू नये.(भाविक प्रेमळ व साबडे म्ह.भोळे लोक हयांना सांभाळून घ्यावे व सुखवावे)

विरक्तें असावें परम दक्ष । विरक्तें असावें अंतरसाक्ष । विरक्तें वोढावा कैपक्ष । परमार्थाचा ॥ १४॥

सर्व कामे दक्षतेने (हुशारीने,चातुर्याने) करावी. दुसऱ्याची अंतकरणे जाणावी, आणि परमार्थाचा कैवार घ्यावा,(परमार्थमार्गाचा पुरस्कार करावा.)

विरक्तें अभ्यास करावा । विरक्तें साक्षेप धरावा । विरक्तें वकृत्वें उभारावा । मोडला परमार्थ ॥ १५॥

(परमार्थाच्या सर्वबाजूंचा) अभ्यास करावा,(साक्षेप) दिर्घोद्योग करावा,आणि मोडकळीस आलेला परमार्थ आपल्या (क्रियायुक्त) वक्तृत्व शैलीने(शक्तीने) पुन्हा उभा करावा

विरक्तें विमळज्ञान बोलावें । विरक्तें वैराग्य स्तवीत जावें । विरक्तें निश्चयाचें करावें । समाधान ॥ १६॥

शुद्धज्ञान सांगावे वैराग्याची स्तुति करीत जावी.आणि आत्मानिश्र्चय बाणवून समाधान करावे.(त्याने ज्ञान-वैराग्य सांगावे. व सर्वास निश्र्चयाचे समाधान द्यावे.)

पर्वें करावीं अचाटें । चालवावी भक्तांची थाटे । नाना वैभवें कचाटें । उपासनामार्ग ॥ १७॥

मोठेमोठे उत्सव महोत्सव टोलेजंग (अचाट) करीत जावे, (थाटे) भक्तमंडळ तयार करावे. आणि अनेक प्रकारे खटपट करून (कचाटे) मोठ्या वैभवाने उपासना मार्ग चालवावा.

हरिकीर्तनें करावीं । निरूपणें माजवावीं । भक्तिमार्गे लाजवावीं । निंदक दुर्जनें ॥ १८॥

सगुण भगवतकथा कराव्या,अध्यात्मनिरुपणे खूप वाढवावी,(अध्यात्म निरूपणांची गर्दी उसळावी,) आणि भक्ति मार्गाचा प्रसार असा दणक्याने करावा की निंदक दुर्जन आपोआप लाजतील.

बहुतांस करावे परोपकार । भलेपणाचा जीर्णोद्धार । पुण्यमार्गाचा विस्तार । बळेंचि करावा ॥ १९॥

अनेकांवर उपकार करावे,चांगुलपणा वाढवावा.(सत्कर्माचा जीर्णोधार करावा.),(युगमानाने विघ्ने येतील पण त्यास न भितां) जबरदस्त प्रयत्न करून पुण्यमार्गाचा प्रसार करावा.(पुण्यमार्गाचा प्रसार बुद्धिपुरस्सर बळेचि करावा.)

स्नान संध्या जप ध्यान । तीर्थयात्रा भगवद्भजन । नित्यनेम पवित्रपण । अंतरशुद्ध असावें ॥ २०॥

स्नान,संध्या,जप,ध्यान तीर्थयात्रा,भगवद्भजन इत्यादिकांचे नित्यनेम पवित्रपणें सांभाळून अंत:करण निर्मळ राखावे.

दृढ निश्चयो धरावा । संसार सुखाचा करावा । विश्वजन उद्धरावा । संसर्गमात्रें ॥ २१॥

मी आत्मा हा निश्चय बळकट धरावा, आणि त्याच्या योगाने संसार (जन्मापासून मृत्यूपर्यंत होणारे व्यवहार) परमेश्वरार्पण करून सुखमय करावा. आणि आपल्या संगतीस येणाऱ्या सर्वांचा उद्धार करावा.(सकळ लोक-विश्वजन संसर्गमात्राने म्ह.समागमाने उद्धरावे.)

विरक्तें असावें धीर । विरक्तें असावें उदार । विरक्तें असावें तत्पर । निरूपणविषईं ॥ २२॥

(ऐहिक व पारमार्थिक संकटकाळी) धैर्य धरावे व (ऐहिक वा पारमार्थिक वैभव प्राप्त झाले असतां) ते लोकास देण्याचे कामी उदार असावे, आणि निरुपण करणे किवा ऐकणे ह्याविषयी तत्पर असावे.

विरक्तें सावध असावें । विरक्तें शुद्ध मार्गें जावें । विरक्तें झिजोन उरवावें । सद्कीर्तीसी ॥ २३॥

आपला मार्ग न चळण्याविषयी सावधगिरी ठेऊन वेदशास्त्रप्रतिपादित शुद्धमार्गाने जावे, आणि परोपकारात देह चंदनाप्रमाणे झिजवून सत्कीर्ति मागे उरवावी.

विरक्तें विरक्त धुंडावे । विरक्तें साधु वोळखावे । विरक्तें मित्र करावे । संत योगी सज्जन ॥ २४॥

चांगले वैराग्ययुक्त लोक कोठे आहेत त्याचा शोध घ्यावा,साधुसंत ओळखावे. आणि संत,योगी,सज्जन ह्यांच्या बरोबर मैत्री करावी.

विरक्तें करावीं पुरश्चरणें । विरक्तें फिरावीं तीर्थाटणें । विरक्तें करावीं नानास्थानें । परम रमणीय ॥२५॥

विरक्ताने पुराश्चरणे करावी,तीर्थयात्रा कराव्या व (सात्विक भाव उत्पन्न करणारी) परम रमणीय अशी अनेक स्थळे निर्माण करावी.

विरक्तें उपाधी करावी । आणि उदासवृत्ति न संडावी । दुराशा जडो नेदावी । कोणयेकविषईं ॥ २६॥

विरक्ताने उपाधि करावी (पण सर्व परमेश्वराचे आहे व करता करविताही तोच आहे असा विवेक करून) आपला अलिप्तपणा कायम राखावा आणि कोणत्याही विषयाची दुराशा चित्ताला लागू देऊ नये.(आपली उदासीनता सोडू नये., व कोठेच आशेचा दास बनू नये.)

विरक्तें असावें अंतरनिष्ठ । विरक्तें नसावें क्रियाभ्रष्ट । विरक्तें न व्हावें कनिष्ठ । पराधेनपणें ॥ २७॥

विरक्ताने (सर्वच रामरूप आहे अशी कल्पना करून) अंतर्निष्ठ असावे,पण अनाचार मात्र करू नये.(विरक्त क्रियाभ्रष्ट नसावा) आणि दुसऱ्याच्या आधीन न होता विरक्ताने आपले महत्व कमी होऊन देऊ नये.(विरक्त सदाही स्वतंत्र असावा)

विरक्तें समय जाणावा । विरक्तें प्रसंग वोळखावा । विरक्त चतुर असावा । सर्वप्रकारें ॥ २८॥

कोणत्याही कामात वेळप्रसंग पाहून सर्वप्रकारे चातुर्याने वागावे.

विरक्तें येकदेसी नसावें । विरक्तें सर्व अभ्यासावें । विरक्तें अवघें जाणावें । ज्याचें त्यापरी ॥ २९॥

एकदेशी (एकलकोंडे,एकमार्गी) नसावे. सर्व विषयांचा अभ्यास करावा. आणि प्रत्येक विषयाचे स्वरूप यथार्थ जाणावे.

हरिकथा निरूपण । सगुणभजन ब्रह्मज्ञान । पिंडज्ञान तत्वज्ञान । सर्व जाणावें ॥ ३०॥

सगुण हरिकथा व अध्यात्मनिरुपण (सगुण भजन व ब्रह्मज्ञान),शरीराचे ज्ञान,तत्वाचे ज्ञान हे सर्व त्याने जाणावे.(सगुण हरिकथा व ब्रह्मज्ञाननिरुपण या दोहोत तो निष्णात असावा,त्याला पिंडब्रह्मांडाचे व तत्वांचे ज्ञान असावे. म्ह. पंचीकरणविद्दया त्याला अवगत असावी)

कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग । सकळ जाणावें ॥ ३१॥

कर्म,उपासना,ज्ञान,गुरुप्रचीती (श्रुतिसंमत संशयरहित मार्ग) त्याचप्रमाणे प्रवृत्ति,निवृत्ती हे सर्व मार्ग त्याने समजुन घ्यावे,

प्रेमळ स्थिती उदास स्थिती ।योगस्थिती ध्यानस्थिती । विदेह स्थिती सहज स्थिती ।सकळ जाणावें ॥३२॥

प्रेमळस्थिति (भगवद्गूणानुवाद ऐकतांना प्रेम उत्पन्न होऊन नेत्रातून अश्रू वाहणे इत्यादि सात्विक भाव उत्पन्न होणे.),उदासस्थिति (अलिप्तपणाने वागणे),योग (हठराजयोगदि),ध्यान,विदेहस्थिति,(देहभावना समूळ नाहीशी होणे) सहजस्थिति (प्राप्त स्थितीत समाधानाने वागणे) हे सर्व त्याने जाणले पाहिजे,

ध्वनी लक्ष मुद्रा आसनें । मंत्र यंत्र विधी विधानें । नाना मतांचें देखणें । पाहोन सांडावें ॥ ३३॥

ध्वनि (अनाहतादि दहा नाद),लक्ष (वृत्ती-स्थिरत्वासाठी नाटकादी प्रकार),मुद्रा, (खेचरी,भूचरी,चाचरी, अगोचरी),आसने(सिद्धासनादि),मंत्र,यंत्र व त्यांची विधिविधाने तसेच अनेकप्रकारच्या मतमतांतरांवरील वर्मे त्याने पाहून ठेवावी.

विरक्तें असावें जगमित्र । विरक्तें असावें स्वतंत्र । विरक्तें असावें विचित्र । बहुगुणी ॥ ३४॥

सर्व जगाशी मित्रत्वाने वागावे,पण आपला (आत्मतंत्र) स्वतंत्रपणा सोडू नये.(पराधीन होऊ नये) बहुगुणी व विचित्र (आश्र्चर्यकारक) असा विरक्त असावा.(विरक्त जगमित्र असावा स्वतंत्र म्ह.आत्मतंत्र असावा.बहुगुणी असावा.)

विरक्तें असावें विरक्त । विरक्तें असावें हरिभक्त । विरक्तें असावें नित्यमुक्त । अलिप्तपणें ॥ ३५॥

विरक्ताने वैराग्यशील असावे,हरिभक्ति करावी व अलिप्तपणाने वागून नित्यमुक्त व्हावे.(कोठेही वासना गुंतूवू नये.)(सर्व करून असंग असावे.)

विरक्तें शास्त्रें धांडोळावीं । विरक्तें मतें विभांडावीं । विरक्तें मुमुक्षें लावावीं । शुद्धमार्गें ॥ ३६॥

( विभांडावीं - (मते) खोडवीत )

त्याने शास्त्रग्रंथ शोधावे,मतमतांतराचे खंडन करावे, व मुमुक्षूंना शुद्ध परमार्थमार्गाकडे लावावे.

विरक्तें शुद्धमार्ग सांगावा । विरक्तें संशय छेदावा । विरक्तें आपला म्हणावा । विश्वजन ॥ ३७॥

परमार्थाचा शुद्ध मार्ग लोकांना सांगावा व त्यांचे संशय नाहीसे करावे, व सर्व लोकांशी आपलेपणाने वागावे.

विरक्तें निंदक वंदावें । विरक्तें साधक बोधावे । विरक्तें बद्ध चेववावे- । मुमुक्षनिरूपणें ॥ ३८॥

( बद्ध चेववावे - प्रापंचीकास जागे करावे. )

त्याने निंदकांसही वंदावे,साधकास आत्मबोध करावा व मुमुक्षूचे निरुपण करून बद्धास जागे करावे,(संसार-मायापाश बद्ध असतील त्यांना पूर्ण बोध करावा.)

विरक्तें उत्तम गुण घ्यावे । विरक्तें अवगुण त्यागावे । नाना अपाय भंगावे । विवेकबळें ॥ ३९॥

( अपाय भंगावे - वाईट गोष्टींचा बिमोड करावा )

तात्पर्य,विरक्ताने उत्तम गुण घ्यावे.,अवगुण (दोष) टाकुन द्दयावेत, व विवेकाच्या योगाने घातक विघ्ने नाहीशी करावी.(विवेक बळावर अपाय दूर करावेत)

ऐसीं हे उत्तम लक्षणें । ऐकावीं येकाग्र मनें । याचा अव्हेर न करणें । विरक्त पुरुषें ॥ ४०॥

अशी ही उत्तम लक्षणे विरक्ताने एकाग्रमनाने ऐकावी,त्याचा अव्हेर (त्याग) करू नये.

इतुकें बोलिलें स्वभावें । त्यांत मानेल तितुकें घ्यावें । श्रोतीं उदास न करावें । बहु बोलिलें म्हणौनी ॥४१॥

हे एवढे ओघास आले म्हणुन पुष्कळ सांगितले,तरी त्याचा कंटाळा करू नये,जेवढी लक्षणे पटतील तेवढी घ्यावी.

परंतु लक्षणें ने घेतां । अवलक्षणें बाष्कळता । तेणें त्यास पढतमूर्खता । येवों पाहे ॥ ४२॥

( अवलक्षणें बाष्कळता - अवलक्षणाचा निरर्थक अवलंब )

परंतु ही चांगली लक्षणे व घेतली तर वाईट लक्षणामुळे स्वेच्छाचारीपणा (चावटपणा) माजेल व त्यामुळे पढत मूर्खता पदरात येईल,

त्या पढतमूर्खाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण । बोलिलें असे सावधान- । होऊन ऐका ॥ ४३॥

तो पढतमूर्ख कसा असतो ते पुढील समासात सांगितले आहे ते सावध चित्ताने ऐका.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विरक्तलक्षणनाम समास नववा ॥ ९॥**

**समास दहावा : पढतमुर्ख लक्षण ॥ श्रीराम् ॥**

मागां सांगितलीं लक्षणें । मूर्खाआंगी चातुर्य बाणे । आतां ऐका शाहाणे- । असोनि, मूर्ख ॥ १॥

पूर्वी उत्तम लक्षणे सांगितली त्यायोगे मूर्खांच्या अंगी चातुर्य येईल (मागे सद्विद्येची लक्षणे सांगितली ती ऐकून मूर्खही चतुर होतील.) आता शहाणे असून मूर्ख कसे असतात ते ऐका.

तया नांव पढतमूर्ख । श्रोतीं न मनावें दुःख । अवगुण त्यागितां , सुख- । प्राप्त होये ॥ २॥

शहाणे असून मूर्ख त्यांना पढतमूर्ख म्हणतात श्रोत्यांनी ह्या बोलण्याचे दु:ख मानू नये.(पढतमूर्खांचे अवगुण ऐकून श्रोत्यांनी वाईट वाटू देऊ नये) कारण अवगुण टाकुन दिले असता सुख प्राप्त होते.

बहुश्रुत आणि वित्पन्न । प्रांजळ बोले ब्रह्मज्ञान । दुराशा आणि अभिमान । धरी, तो येक पढतमूर्ख ॥ ३॥

बहुश्रुत विव्दान व ब्रह्मज्ञान चांगले सांगणारा,पण दुराशा व अभिमान जर त्याचेजवळ असतील तर तो पढतमूर्ख.

मुक्तक्रिया प्रतिपादी । सगुणभक्ति उछेदी । स्वधर्म आणि साधन निंदी । तो येक पढतमूर्ख ॥४॥

(मुक्तावस्था प्राप्त झाली तरी) मुक्त पुरुषाप्रमाणें स्वच्छंदाने (मुक्त क्रिया) यथेष्ट आचरण करावे असे प्रतिपादतो.(ज्ञानाच्या गोष्टी सांगून) सगुण भक्तिचे खंडन करतो,स्वधर्माची व साधना मार्गाची निंदा करतो तो पढतमूर्ख.

आपलेन ज्ञातेपणें । सकळांस शब्द ठेवणें । प्राणीमात्राचें पाहे उणें । तो येक पढतमूर्ख ॥ ५॥

आपल्या ज्ञानाच्या घमेंडीने जो सर्वांना नावे ठेवतो जो सर्वांना नावे ठेवतो व प्रत्येकाचे (प्राणीमात्राचे) उणे पाहतो तो पढतमूर्ख.

शिष्यास अवज्ञा घडे । कां तो संकटीं पडे । जयाचेनि शब्दें मन मोडे । तो येक पढतमूर्ख ॥ ६॥

अवज्ञा करण्याची(आज्ञा मोडण्याची) किवा संकटात पडण्याची शिष्यावर पाळी येईल. अशी कठिण आज्ञा करणारा किवा लोकांची मने दुखावतील असे बोलणारा, तो पढतमूर्ख.

रजोगुणी तमोगुणी । कपटी कुटिळ अंतःकर्णी । वैभव देखोन वाखाणी । तो येक पढतमूर्ख ॥ ७॥

( वाखाणी - स्तुती कौतुक )

रजतमाच्या लक्षणांनी भरलेला,अंतःकरणाचा कपटी,कुटील अशा माणसाचीही केवळ श्रीमंत आहे म्हणुन जो वाखाणणी करतो.(दुसऱ्याचे वैभव पाहिलें की स्तुति करायला लागतो.) तो पढतमूर्ख.

समूळ ग्रंथ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । गुण सांगतां अवगुण । पाहे तो येक पढतमूर्ख ॥८॥

कोणताही ग्रंथ (विषय,गोष्ट,कार्य) साद्यंत पहाण्याच्या अगोदरच त्याला उगीच नावे ठेवणे,कोणी गुण सांगू लागल्यास तिकडे लक्ष न देता अवगुणाकडे लक्ष्य देणें. तो पढतमूर्ख.

लक्षणें ऐकोन मानी वीट । मत्सरें करी खटपट । नीतिन्याय उद्धट । तो येक पढतमूर्ख ॥ ९॥

चांगली लक्षणे कोणी सांगितल्यास त्यांचा कंटाळा करतो,आणि उलट मत्सरग्रस्त होऊन (सद्गुणी माणसांची निंदा नाचक्की होईल अशी) खटपट करतो.(सद्गुणांचा वीट मानतो, मत्सराने भल्याचा पाडाव करण्यास उत्सुक होतो) नीतिन्याय न जुमानतां उद्धटपणाने वागतो.( उद्धटपणाने नितिमार्ग मानत नाही.)तो पढतमूर्ख.

जाणपणें भरीं भरे । आला क्रोध नावरे । क्रिया शब्दास अंतरे । तो येक पढतमूर्ख ॥ १०॥

( जाणपणें भरीं भरे - ज्ञानी समजुन घेमेंडीने फुगणे )

शहाणपणाच्या अभिमानानें हट्टास पेटतो.(इरेस पेटतो) क्रोधाचा वेग आवरणार नाही इतका संतापी असतो. व बोलण्याप्रमाणे ज्याचे वागणे नसते तो पढतमूर्ख.

वक्ता अधिकारेंवीण । वग्त्रृत्वाचा करी सीण । वचन जयाचें कठीण । तो येक पढतमूर्ख ॥ ११॥

लोकास उपदेश करण्याची पात्रता नसतां,जो उपदेश करण्याचे सायास करतो व ज्याचे बोलणे कठोर तो पढतमूर्ख,

श्रोता बहुश्रुतपणें । वक्तयास आणी उणें । वाचाळपणाचेनि गुणें । तो येक पढतमूर्ख ॥ १२॥

बहुश्रुतपणाच्या व वाचाळपणाच्या योगाने वक्त्याचा मानभंग करून त्याला कमीपण आणणारा (वक्त्याचा पाडाव करणारा) श्रोता तो पढतमूर्ख

दोष ठेवी पुढिलांसी । तेंचि स्वयें आपणापासीं । ऐसें कळेना जयासी । तो येक पढतमूर्ख ॥ १३॥

दुसऱ्यास ज्या दोषांबद्दल नावे ठेवतो तेच आपणा स्वतःजवळ आहेत.हे ज्यास कळत नाही तो पढतमुर्ख

अभ्यासाचेनि गुणें । सकळ विद्या जाणे । जनास निवऊं नेणें । तो येक पढतमूर्ख ॥ १४॥

( निवऊं - समाधान, शांत करणे., नेणें - जाणत नाही )

विद्याभ्यास चांगला केला असल्यामुळे सर्व विद्या अवगत आहेत पण ज्याचा उपयोग लोकांचे समाधान करण्याकडे ज्याला करता येत नाही तो पढतमूर्ख

हस्त बांधीजे ऊर्णतंतें । लोभें मृत्य भ्रमरातें । ऐसा जो प्रपंची गुंते । तो येक पढतमूर्ख ॥१५॥

( हस्त -हत्ती , ऊर्णतंतें - कोळीष्टकच्या तंतूने )

हत्तीला कोळ्याच्या जाळ्याने बांधावे, किवा लोकरीच्या धाग्याने बांधावे) भुंग्याने कमळात गुंतून (कमळातील रसाला भुलून त्यात) मरावे. तसा जो स्नेहाने प्रपंच्यात गुंतून पडतो तो पढतमूर्ख.

स्त्रियांचा संग धरी । स्त्रियांसी निरूपण करी । निंद्य वस्तु आंगिकारी । तो येक पढतमूर्ख ॥१६॥

स्त्रियांची संगती धरतो,त्यांच्याशीच कथानिरुपण करीत बसतो (त्यांना उपदेश देतो),(आपणास कमीपणा येईल ह्याचा न विचार करता), मद्यमासादि निंद्य गोष्टींचा अंगीकार करतो. तो पढतमूर्ख

जेणें उणीव ये आंगासी । तेंचि दृढ धरी मानसीं । देहबुद्धि जयापासीं । तो येक पढतमूर्ख ॥१७॥

ज्या गोष्टीमुळें आज कमीपणा येईल तेच चित्तांत दृढ धरतो,देहच मी आहे अशी ज्याची बुद्धी आहे तो पढतमूर्ख

सांडूनियां श्रीपती । जो करी नरस्तुती । कां दृष्टी पडिल्यांची कीर्ती- । वर्णी, तो येक पढतमूर्ख ॥ १८॥

लक्ष्मीपति नारायणाला टाकून जो मनुष्याची स्तुती करतो किंवा जे दृष्टीस पडेल त्याची स्तुति करीत सूटतो. तो पढतमूर्ख

वर्णी स्त्रियांचे आवेव । नाना नाटकें हावभाव । देवा विसरे जो मानव । तो येक पढतमूर्ख ॥ १९॥

जो स्त्रियांच्या अवयवांचे वर्णन करतो अथवा नाटकी हावभाव करतो,जो देवाला विसरतो तो पढतमूर्ख

भरोन वैभवाचे भरीं । जीवमात्रास तुछ्य करी । पाषांडमत थावरी । तो येक पढतमूर्ख ॥ २०॥

( भरोन वैभवाचे भरीं - ऐश्वर्याच्या घेमेंडीत , थावरी - सांभाळी )

वैभवाच्या डोलाने इतरास तृच्छ लेखतो व पाखंडी (नास्तिक) मतांचे प्रतिपादन करतो तो पढतमूर्ख.

वित्पन्न आणी वीतरागी । ब्रह्मज्ञानी माहायोगी । भविष्य सांगों लागे जगीं । तो येक पढतमूर्ख ॥ २१॥

पंडित,ब्रह्मज्ञानी,वैराग्यशील,मोठा योगी (तात्पर्य,सर्वज्ञ) असा असून (प्रतिष्ठेसाठी) लोकांस भविष्य सांगत सुटतो. तो पढतमूर्ख.

श्रवण होतां अभ्यांतरीं । गुणदोषाची चाळणा करी । परभूषणें मत्सरी । तो येक पढतमूर्ख ॥ २२॥

(कथापुराणादी) ऐकत असता मनांत वक्त्याच्या गुणदोषांचा विचार करत बसतो. दुसऱ्याचा आदर सत्कार झालेला पाहिला की त्यासंबंधी ज्याला मत्सर वाटतो तो पढतमूर्ख.

नाहीं भक्तीचें साधन । नाहीं वैराग्य ना भजन । क्रियेविण ब्रह्मज्ञान- । बोले, तो येक पढतमूर्ख ॥ २३॥

भक्ति,वैराग्य,भजनादि साधने करीत नाही.आणि सत्क्रिया हातून घडत नसतां ब्रह्मज्ञानाच्या पोकळ गप्पा मारतो तो पढतमूर्ख.

न मनी तीर्थ न मनी क्षेत्र ।न मनी वेद न मनी शास्त्र ।पवित्रकुळीं जो अपवित्र ।तो येक पढतमूर्ख ॥२४॥

तीर्थ,क्षेत्र,वेद,शास्त्र ह्यासंबंधी चित्तात,आदर ठेवीत नाही व पवित्र कुळात जन्मून अपवित्रपणाने वागतो. तो पढतमूर्ख.

आदर देखोनि मन धरी । कीर्तीविण स्तुती करी । सवेंचि निंदी अनादरी । तो येक पढतमूर्ख ॥२५॥

( सवेंचि - लगेच )

आपला जे लोक आदर करतात त्यांचे मन सांभाळण्यास झटतो,(किवा त्यांच्याविषयी चित्तात आदर धरतो,),ज्याचा काही लौकिक नाही अशा मनुष्याची (त्याजपासून काही मिळेल ह्या आशेने) स्तुति करतो.व काही मिळाले नाही की) लगेच त्याची निंदा व अनादर करू लागतो. तो पढतमूर्ख

मागें येक पुढें येक । ऐसा जयाचा दंडक । बोले येक करी येक । तो येक पढतमूर्ख ॥ २६॥

तोंडासमोर एक व पश्र्चात निराळेच बोलतो,बोलतो एक व करतो तिसरेच अशी ज्याची वागण्याची पध्दत (दंडक) तो पढतमूर्ख

प्रपंचविशीं सादर । परमार्थीं ज्याचा अनादर । जाणपणें घे अंधार । तो येक पढतमूर्ख ॥ २७॥

( जाणपणें घे अंधार  - जाणूनबुजून अविद्येच्या / अज्ञानाच्या अंधारात राहणारा )

प्रपंचाची कामे मन लाऊन (आदरपूर्वक) करतो. आणि परमार्थाच्या कार्याविषयी (कुलधर्म कुलाचारादिका विषयी) मनात नुसता आदरही ठेवीत नाही.(मग ते करणे दूरच) कळत असून अंधाराच्या मार्गाने,आडवाटेने जातो.(पाठभेद:आधार) प्रमाणे घेऊन आपल्या दोषांवर पांघरून घालतो.

येथार्थ सांडून वचन । जो रक्षून बोले मन । ज्याचें जिणें पराधेन । तो येक पढतमूर्ख ॥ २८॥

(यथार्थ) खरे न बोलता मनधरणी होईल असे बोलतो व ज्याचे जीवित (अगदी) पराधीन आहे तो पढतमूर्ख

सोंग संपाधी वरीवरी । करूं नये तेंचि करी । मार्ग चुकोन भरे भरीं । तो येक पढतमूर्ख ॥ २९॥

वरवर सोंगाची संपादणी करून, करू नयेत असली दुष्कृत्ये करतो,सन्मार्ग चूकलेला असतो पण त्या चुकीच्याच मार्गाचा हट्ट धरून बसतो. तो पढतमूर्ख

रात्रंदिवस करी श्रवण । न संडी आपले अवगुण । स्वहित आपलें आपण । नेणे तो येक पढतमूर्ख ॥३०॥

रात्रंदिन कथा,पुराणे,ऐकतो पण आपले अवगुण मात्र टाकीत नाही,आपले हित कशात आहे हे ज्याचे त्याला कळत नाही.

निरूपणीं भले भले । श्रोते येऊन बैसले । क्षुद्रें लक्षुनी बोले । तो येक पढतमूर्ख ॥ ३१॥

थोरथोर लोक (श्रोते) निरुपणास येऊन बसले असता (त्यांना तृच्छ मानून बोलतो),दुसऱ्याच्या क्षुद्र गोष्टी किवा वर्मे ह्यांस अनुलक्षून बोलतो.

शिष्य जाला अनधिकारी । आपली अवज्ञा करी । पुन्हां त्याची आशा धरी । तो येक पढतमूर्ख ॥ ३२॥

शिष्य अनाधिकारी झाला किवा अवज्ञा करू लागला तरी पुन्हा (तो आपली सेवा वगैरे करेल काय अशी) त्याची आशा धरतो तो पढतमूर्ख

होत असतां श्रवण । देहास आलें उणेपण । क्रोधें करी चिणचिण । तो येक पढतमूर्ख ॥ ३३॥

(कथानिरुपणादि) ऐकत असता (वक्ता करीत असलेल्या भाषणांत) आपल्या दुर्गुणांचे वर्णन ऐकून जो रागाने आंतल्या आंत चरफडतो.(देहाला काही उणेपण आले-वायू सरणे,ओक येणे इ.-तर रागाने फणफण करतो)

भरोन वैभवाचे भरीं । सद्गुरूची उपेक्षा करी । गुरुपरंपरा चोरी । तो येक पढतमूर्ख ॥ ३४॥

श्रीमंतीच्या घमेंडीने सद्गुरुस तृच्छ लेखणे,कमीपणा येतो म्हणुन गुरुपरंपरा चोरणे.

ज्ञान बोलोन करी स्वार्थ । कृपणा ऐसा सांची अर्थ । अर्थासाठीं लावी परमार्थ । तो येक पढतमूर्ख ॥ ३५॥

वेदांताच्या गोष्टी तोंडाने बोलून प्रापंचिक स्वार्थ-साधनांकडे लक्ष ठेवणे.किंबहुना कृपणासारखा धनसंचय करणे,परमार्थाचा उपयोग द्रव्यप्राप्ती करिता करणे. तो पढतमूर्ख.

वर्तल्यावीण सिकवी । ब्रह्मज्ञान लावणी लावी । पराधेन गोसावी । तो येक पढतमूर्ख ॥ ३६॥

स्वतः वर्तन केल्याशिवाय दुसऱ्याला शिकवतो (परत ऐहिक मोबदला मिळेल ह्या हेतूने,) ब्रह्मज्ञानाची धन्याप्रमाणे लागवड करतो.गोसावी (इंद्रियदमन करणारा) म्हणवितो व पराधीनपणे वागतो.

भक्तिमार्ग अवघा मोडे । आपणामध्यें उपंढर पडे । ऐसिये कर्मीं पवाडे । तो येक पढतमूर्ख ॥ ३७॥

( उपंढर - अस्ताव्यस्त,अव्यवस्ता, आपणामध्यें उपंढर पडे - स्वतःचे जीवन विस्कळीत )

सगळा भक्तिमार्ग मोडून जाईल व आप-आपणात अव्यवस्थता माजेल अशा कामात सरसावतो,(कामात मग्न होतो) जेणेकरून भक्तिमार्ग मोडतो किवा आपल्या राहणीतली अव्यवस्था अगर ढोंग-उपंढर प्रकट होते. अशी कर्मे अंगावर घेतो (आशा कामात मग्न होतो.)

प्रपंच गेला हातीचा । लेश नाहीं परमार्थाचा । द्वेषी देवां ब्राह्मणाचा । तो येक पढतमूर्ख ॥ ३८॥

सारांश,(आयुष्य संपले म्हणून) प्रपंच हातचा गेला,(जेथल्या तेथेच राहिला) आणि परमार्थ किंचितही घडला नाही,देवा ब्राह्मणांचा व्देष मात्र पदरांत पडला.(करीत राहिला) तो पढतमूर्ख होय.

त्यागावया अवगुण । बोलिलें पढतमूर्खाचें लक्षण । विचक्षणें नीउन पूर्ण । क्ष्मा केलें पाहिजे ॥ ३९॥

( विचक्षणें नीउन - विचारांती न्यून, विचक्षण - चतुर,विचारवंत )

अवगुण सुटावे म्हणून ही पढतमूर्खांची लक्षणे सांगितली आहेत,विव्दान,(दक्ष) पुरुषांनी त्यात काही उणे पुरे झाले असल्यास क्षमा करावी.

परम मूर्खामाजी मूर्ख । जो संसारीं मानी सुख । या संसारदुःखा ऐसें दुःख । आणीक नाहीं ॥४०॥

(मूर्खांची व पढतमुर्खांची लक्षणे सांगितली पण) जो या (दु:खमय) संसारात सुख मानतो,तो अगदी मूर्खातला मूर्ख होय. कारण संसारदु:खासारखे तापदायक दुसरे दु:खच नाही.

तेंचि पुढें निरूपण । जन्मदुःखाचें लक्षण । गर्भवास हा दारुण । पुढें निरोपिला ॥ ४१॥

त्याचेच म्हणजे जन्ममरणगर्भवासादि दारूण (भयंकर) दु:खाचे निरुपण पुढे केले आहे.

(प्रथम कु-लक्षणांचा त्याग करून शब्दज्ञान शिकला व वरवर विरक्ति दाखविली आणि अंतःकरणात ज्ञानाभिमान माजला म्हणजे काय स्थिति होते ते सांगितले,तात्पर्य ह्या लक्षणांचा त्याग झाला पाहिजे.)

**ज्ञान विज्ञाने भरली भंडारे । नेणीवेपल्याड वसे तो मुरारी रे ।।श्र्वसनी उच्छवास भरीला विश्र्वभरे ।रमणीय भासे हा सारा संसार रे ।**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पढतमूर्खलक्षणनाम समास दहावा ॥१०॥॥ दशक दुसरा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक तिसरा - सगुणपरीक्षा



**ज्ञान विज्ञाने भरली भंडारे । नेणिवेपल्याड वसे तो मुरारी रे ।। श्र्वसनी उच्छवास भरीला विश्र्वंभरे। रमणीय भासे हा सारा संसार रे।।**

**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ ॥ स्वगुणपरीक्षानाम दशक तिसरा ॥ ॥ समास पहिला : जन्मदु:ख निरूपण ॥ ॥ श्रीराम ॥**

जन्म दु:खाचा अंकुर । जन्म शोकाचा सागर । जन्म भयाचा डोंगर । चळेना ऐसा ॥ १॥

जेव्हा दु:खाचा मोड (अंकुर),शोकाचा समुद्र व न चळणारा भयाचा डोंगर आहें.

जन्म कर्माची आटणी । जन्म पातकाची खाणी । जन्म काळाची जाचणी । निच नवी ॥ २॥

( आटणी - मूस , निच नवी - नित्य नूतन )

जन्म ही कर्माची मूस (फेरे),पातकाची खाण व काळाचा नित्य नवा जाच आहें.

जन्म कुविद्येचें फळ । जन्म लोभाचें कमळ । जन्म भ्रांतीचें पडळ । ज्ञानहीन ॥ ३॥

( पडळ - पडदा )

जन्म हे कुविद्येचे फळ अथवा लोभाचें कमळ किंवा अज्ञानजन्य भ्रांतीचा पडदा आहें.

जन्म जिवासी बंधन । जन्म मृत्यासी कारण । जन्म हेंचि अकारण । गथागोवी ॥ ४॥

( गथागोवी - गुंतावळ , गुरफटणे )

जन्म हें जीवाचें बंधन,मृत्यूचे कारण व जीवाच्यामागें निष्कारण कटकट (गथागोवी-गुंतागुंत) लागली आहें.

जन्म सुखाचा विसर । जन्म चिंतेचा आगर । जन्म वासनाविस्तार । विस्तारला ॥ ५॥

स्वसुखाची विस्मृति,काळजीचें (माहेर) घर,किंवा (अनंत) वासनांचा विस्तार म्हणजें जन्म.

जन्म जीवाची आवदसा । जन्म कल्पनेचा ठसा । जन्म लांवेचा वळसा । ममतारूप ॥ ६॥

( लांवेचा वळसा - डाकीणीचे झपाटणे )

जन्म म्हणजे जीवांच्यामागें लागलेली दुर्दशा-साडेसाती,कल्पनेचा छाप (व्यक्तरुप) आणि ममतारुप डांकिणीचा फेरा (भोवरा) आहें.

जन्म मायेचे मैंदावें । जन्म क्रोधाचें विरावें । जन्म मोक्षास आडवें । विघ्न आहे ॥ ७॥

( मैंदावें - कपट / लबाडी , क्रोधाचें विरावें - रागक्रोध याचे विरपण )

जन्म ही मायेची फसवणुक आहे. क्रोधाचें शौर्य (तें गाजविण्याची जागा) अथवा मोक्षाच्या वाटेंत आडवें विघ्न म्हणजें जन्म.

जन्म जिवाचें मीपण । जन्म अहंतेचा गुण । जन्म हेंचि विस्मरण । ईश्वराचें ॥ ८॥

जीवाचें मीपण (देह मी अशी बुध्दि),अहंतेचे कार्य किंवा परिणाम (मुर्तरुप) व परमेश्र्वराचें विस्मरण म्ह. जन्म होय.

जन्म विषयांची आवडी । जन्म दुराशेची बेडी । जन्म काळाची कांकडी । भक्षिताहे ॥ ९॥

( विषय - ज्या ठिकाणी इंद्रिये व मन बुडून जातात मग्न होतात असे पदार्थ म्हणजे इंद्रियभोग )

शब्दस्पर्शादि पंचविषयांचें प्रेम,दुष्ट आशेची (पायांत पडलेली) बेडी, व मृत्यूची कांकडी असून तो तिला खात आहें.(जन्म म्हणजे काळाच्या हातातली खावयाची कांकडी!)

जन्म हाचि विषमकाळ । जन्म हेंचि वोखटी वेळ । जन्म हा अति कुश्र्चीळ । नर्कपतन ॥ १०॥

( वोखटी - वाईट )

जन्म हाच उलटा काळ,जन्म ही अत्यंत वाईट वेळ व अतिशय घाणेरडा असा नरकवास आहें (नानाविध पातंकांमुळे देहाची उत्पत्ती होतें व जन्मापासून नानाविध दु:खपापें जीवांच्या मागे लागतात.)

पाहातां शरीराचें मूळ । या ऐसें नाहीं अमंगळ । रजस्वलेचा जो विटाळ । त्यामध्यें जन्म यासी ॥ ११॥

ह्या शरीराच्या मुळाचा विचार केला असतां ह्याच्याइतका अमंगळ दुसरा कोणताही पदार्थ नाहीं असे वाटेल.रजस्वला स्त्रीच्या विटाळापासून हें शरीर निर्माण झालें.

अत्यंत दोष ज्या विटाळा । त्या विटाळाचाचि पुतळा । तेथें निर्मळपणाचा सोहळा । केवी घडे ॥ १२॥

जे आर्तव (असा जो विटाळ) अतिशय अशुध्द त्याचाच हा पुतळा बनलेला,तेव्हा येथें निर्मळपणा कोठचा?

रजस्वलेचा जो विटाळ । त्याचा आळोन जाला गाळ । त्या गळाचेंच केवळ । शरीर हें ॥ १३॥

रजस्वला स्त्रीचें आर्तव आळून (घट्ट होऊन) जो चिखल (गाळ) झाला त्याचें हे शरीर बनलें.असा अशुध्दापासून झालेला हा देह. याला शुध्दपणाचा सोहळा कसला घडणार?

वरी वरी दिसे वैभवाचें । अंतरीं पोतडें नर्काचें । जैसें झांकणें चर्मकुंडाचें । उघडितांच नये ॥ १४॥

हें शरीर वरवर वस्त्रालंकारांनीं शोभिवंत दिसलें तरी आंत पाहिलें तर नरकांचे पोतडेंच आहें,चांभाराच्या येथील कातडी कुजत घालण्याचें कुंड उघडलें कीं जशी घाण बाहेर पडतें तसेंच ह्या शरीराचें आहे.

कुंड धूतां शुद्ध होतें । यास प्रत्यईं धुईजेतें । तरी दुर्गंधी देहातें । शुद्धता नये ॥ १५॥

( प्रत्यईं धुईजेतें - दररोज धुतले तरी )

तथापि कुंड धुतले कीं स्वच्छ होईल (कुंड धुता तरी येते) पण ह्या देहांस रोज धुतलें तरी याची दुर्गंधी जात नाही हा काही शुध्द होत नाहीं,

अस्तीपंजर उभविला । सीरानाडीं गुंडाळिला । मेदमांसें सरसाविला । सांदोसांदीं भरूनी ॥ १६॥

हाडांचा पिंजरा उभा करुन त्याला शिरा नाड्या गुंडाळल्या आहेत. व मधले खांचखळगे मेदमांसाच्या योगानें सारखें केले आहेत.

अशुद्ध शब्दें शुद्ध नाहीं । तेंहि भरलें असे देहीं । नाना व्याधी दुःखें तेंहि । अभ्यांतरी वसती ॥ १७॥

( अशुद्ध शब्दें शुद्ध नाहीं - जे शुद्ध नाही असे ते रक्त )

ज्याचें नावच अशुध्द म्हणजें शुध्द नव्हे तें असे जें रक्त तेंही ह्या देहांत आहें,अनेक रोग दुखणी ह्यांचेही ठाणें आहेच.

नर्काचें कोठार भरलें । आंतबाहेरी लिडीबिडिलें । मूत्रपोतडें जमलें । दुर्गंधीचें ॥ १८॥

नरकाचें कोठार शरिरात भरलेलेंच आहें व बाहेरुन (गर्भाचें) सर्वांग नरकानें बरबटलेले आहें. दुर्गंधयुक्त मूत्राची पिशवी जवळ आहेच.

जंत किडे आणी आंतडी । नाना दुर्गंधीची पोतडी । अमुप लवथविती कातडी । कांटाळवाणी ॥ १९॥

जंत,किडे,आतंडीं म्हणजेंच अनेक प्रकारच्या दुर्गंधाच्या पिशव्या आणि किळस आणणारी असंख्य कातडीं लोंबत आहेंत.

सर्वांगास सिर प्रमाण । तेथें बळसें वाहे घ्राण । उठे घाणी फुटतां श्रवण । ते दुर्गंधी नेघवे ॥ २०॥

( बळसें - नाक )

सर्व शरीरात शिर मुख्य,त्यांत नाकातून शेंबूड वाहातो,कान फुटला म्हणजे घाण घेववत नाही.

डोळां निघती चिपडें । नाकीं दाटतीं मेकडें । प्रातःकाळीं घाणी पडे । मुखीं मळासारिखी ॥२१॥

डोळ्यांत चिपडें निघतात,नाकांत मेकडें दाटतात,व सकाळी अंथरुणावरुन उठल्यावर तोडातून नरकासारखी

घाण बाहेर पडतें.

लाळ थुंका आणी मळ ।पीत श्लेष्मा प्रबळ । तयास म्हणती मुखकमळ ।चंद्रासारिखें॥२२॥

लाळ,थुंका,घाण,पित्त,कफ (श्र्लेष्मा) ज्यांत भरपूर भरलीं आहेंत असे घाणेरडे तोंड आणि अशा मुखाला कवि चंद्रासारखें मुख-कमळ म्हणून उपमा देतात.

मुख ऐसें कुश्चीळ दिसे । पोटीं विष्ठा भरली असे । प्रत्यक्षास प्रमाण नसे । भूमंडळीं ॥ २३॥

मुख असे घाणीने भरलेलें,पोटात विष्ठा भरलेली ह्या प्रत्यक्ष गोष्टी आहेत,ह्यांना दुसरे प्रमाण जगात नाहीं.

पोटीं घालितां दिव्यान्न । कांहीं विष्ठा कांहीं वमन । भागीरथीचें घेतां जीवन । त्याची होय लघुशंका ॥ २४॥

पोटात दिव्य अन्न घातलें तरी त्याची विष्ठा किंवा वांती होणार,अत्यंत पवित्र असें गंगोदक प्यालें तरी त्याचीही लघवीच होणार.

एवं मळ मूत्र आणी वमन । हेंचि देहाचें जीवन । येणेंचि देह वाढे जाण । यदर्थीं संशय नाहीं ॥ २५॥

एकंदरींत विष्ठा मूत्र व ओक ह्यांच्यामुळेच देह जगतो व वाढतो ह्यांत शंका नाहीं.(असा मळ-मूत्र-वमनांचा हा देह मळ-मूत्र-वमनांनेच वाढणारा!)

पोटीं नस्तां मळ मूत्र वोक । मरोन जाती सकळ लोक । जाला राव अथवा रंक । पोटीं विष्ठा चुकेना ॥ २६॥

पोटात मळ-मूत्र-ओक नसतील तर सगळे लोक मरुन जातील. राजा रंक कोणीही असो पोटांत विष्ठा ही असावयाचीच.

निर्मळपणें काढूं जातां । तरी देह पडेल तत्वतां । एवं देहाची वेवस्था । ऐसी असे ॥ २७॥

देह निर्मळ करण्याकरतां सर्व विष्ठा काढूं म्हणेल तर तात्काळ देहच पडेलं अशी ह्या देहाची स्थिति आहें.

ऐसा हा धड असतां । येथाभूत पाहों जातां । मग ते दुर्दशा सांगतां । शंका बाधी ॥ २८॥

शरीर धडधाकट (निरोगी) असतां ह्यांचें यथातथ्य वर्णन पाहू गेलें असतां तें असें आहें मग तें शरीर बिघडल्यास त्याची काय दशा होतें.हे सांगावयला मनही माघार घेंते!

ऐसिये कारागृहीं वस्ती । नवमास बहु विपत्ती । नवहि द्वारें निरोधती । वायो कैंचा तेथें ॥ २९॥

अशा कैदखान्यांत नऊ महिनें वस्ती करुन फार हाल सोसलें,(गर्भाच्या) शरीराचीं नऊ द्वारें म्ह.इंद्रियें बंद होतात.श्र्वासापुरतां वायूसुध्दा पुरतां मिळत नाहीं.(जीव गुदमरतो).

वोका नरकाचे रस झिरपती । ते जठराग्नीस्तव तापती । तेणें सर्वहि उकडती । अस्तिमांस ॥ ३०॥

आईच्या पोटांत ओका नरकाचे पाझर झिरपतात,तें जठराग्नीमुळें तापलेले असतात,त्यामुळें गर्भाचीं हाडें व मांस हीं शिजून पोळून निघतात.

त्वचेविण गर्भ खोळे । तंव मातेसी होती डोहळे । कटवतिक्षणें सर्वांग पोळे । तया बाळकाचें ॥ ३१॥

(त्वचेविण गर्भ खोळे - अपूर्ण वाढलेला गर्भ हालचाल(खोळे)करतो, कटवतिक्षणें - कडु व तीक्ष्ण रसामुळे )

त्वचा नसलेला तो गर्भ हालचाल करुं लागतों,त्यामुळें त्यावेळीं आईस डोहाळें लागतातं. तेव्हा मातेंनें खालेल्या कडू व तिखट (कढत) पदार्थांमुळे त्या बालकाचें सर्वांग पोळत असतें.

बांधलें चर्माचें मोटाळें । तेथें विष्ठेचें पेटाळें । रसौपाय वंकनाळें । होत असे ॥ ३२॥

( वंकनाळें - वक्रवर,नाळ )

(गर्भाची स्थिति म्हणजें) चामड्याच्या मोटळ्याला विष्ठा लपेटलेली (पेटोळें) असतें आणि (मातनें खालेल्या) अन्नाचा रस नाळेच्याद्वारें पोंचून तों जगतों.

विष्ठा मूत्र वांती पीत । नाकीं तोंडीं निघती जंत । तेणें निर्बुजलें चित्त । आतिशयेंसीं ॥ ३३॥

विष्ठा मूत्र वांती,पित्त हें सर्व लपेटलेलें आणि तशांत नाकी तोंडीं निघणारे जंत ह्यामुळें गर्भस्थ बालकांचें चित्त अतिशय घाबरुन जातें.

ऐसिये कारागृहीं प्राणी । पडिला अत्यंत दाटणीं । कळवळोन म्हणे चक्रपाणी । सोडवीं येथून आतां ॥ ३४॥

अशा बंदीखान्यांत अडचणीमध्ये तो गर्भवासी प्राणी सांपडला असतां कळवळून देवाची प्रार्थना करतों कीं,हे चक्रपाणी! आतां मला येथून सोडीव.

देवा सोडविसी येथून । तरी मी स्वहित करीन । गर्भवास हा चुकवीन । पुन्हां न ये येथें ॥३५॥

देवा,मला येथुन सोडवशील तर हा गर्भवास चुकवून मी आपलें कल्याण करुन घेईन,पुन्हा गर्भवासात येणार नाहीं.

ऐसी दुखवोन प्रतिज्ञा केली । तंव जन्मवेळ पुढें आली । माता आक्रंदों लागली । प्रसूतकाळीं ॥ ३६॥

गर्भवासांतील दु:खानें कष्टी होऊन अशा प्रकारची प्रतिज्ञा केली,इतक्यांत पुढें जन्माची वेळ येऊन पोचली,प्रसुतीसमयी वेदनांमुळे माता आक्रोश करु लागली.

नाकीं तोंडीं बैसलें मांस । मस्तकद्वारें सांडी स्वास । तेंहि बुजलें निशेष । जन्मकाळीं ॥ ३७॥

अगोदरच तोडात मांस बसले असल्यामुळें अत्यंत मृदु अशा मस्तकाद्वारानें श्र्वासोच्छ्वास चालला होता.जन्माचें वेळी तेही द्वार बुजलें.(ती टाळूही जन्मकाळीं बुजून गेली.)

मस्तकद्वार तें बुजलें । तेणें चित्त निर्बुजलें । प्राणी तळमळूं लागलें । चहूंकडे ॥ ३८॥

हें मस्तकद्वार (विद्दति अथवा ब्रह्मरंध्र) बंद झाल्यामुळे चित्त अगदी गुदमरुन गेंलें व तो बापडा जीव वाट दिसेना म्हणून चोहोकडून कासावीस झाला.

स्वास उस्वास कोंडला । तेणें प्राणी जाजावला । मार्ग दिसेनासा जाला । कासावीस ॥ ३९॥

श्वासोश्वास कोंडला ज्यानें जीव घाबरला व वाट दिसेना म्हणून कासांवीस झाला.

चित्त बहु निर्बुजलें । तेणें आडभरीं भरलें । लोक म्हणती आडवें आलें । खांडून काढा ॥ ४०॥

चित्त फार घाबरलें (निर्बुजलें-कासावीस झालें),त्यामुळे प्राणी आडमार्गाला शिरला,लोक म्हणू लागलें,आडवे आले ते कापून काढा.

मग ते खांडून काढिती । हस्तपाद छेदून घेती । हातां पडिलें तेंचि कापिती । मुख नासिक उदर ॥ ४१॥

मग ते त्या गर्भाचे तुकडे करु लागतात,हात पाय तोडतात,नाक पोट इत्यादी पैकी जो अवयव हातीं सापडेल तो कापून घेतात.

ऐसे टवके तोडिले । बाळकें प्राण सोडिले । मातेनेंहि सांडिलें । कळिवर ॥ ४२॥

( कळिवर - देह , सांडिलें - सोडले )

अखेरीस असे टवके निघाल्यावर बालकाचाही प्राण जातो व आईही मरुन जातें.

मृत्य पावला आपण । मतेचा घेतला प्राण । दु:ख भोगिलें दारुण । गर्भवासीं ॥ ४३॥

आपण मरण पावला व आईचाही प्राण घेतला, आणि गर्भवासांत भयंकर यातना सोसल्या त्या वेगळ्याच (गर्भवासाचें दारुण दु:ख भोगून शेवटी स्वत: मेला व आईचाही प्राण घेतला)

तथापी सुकृतेंकरूनी । मार्ग सांपडला योनी । तऱ्हीं आडकला जाउनी । कंठस्कंदीं मागुता ॥ ४४॥

( ह्या प्रमाणें लक्षावधि प्राणी गर्भातच मरतात) तथापी (असे न घडता) पूर्वपुण्याईमुळें जन्मद्वारातूंन मार्गसरळ मिळाला तरी त्यांत पुन्हा त्यांचें खांदे,गळा हे अवयव अडकूं लागतात.

तये संकोचित पंथीं । बळेंचि वोढून काढिती । तेणें गुणें प्राण जाती । बाळकाचे ॥ ४५॥

मग त्या संकुचित मार्गातून त्याला बळेंच ओढून काढतात,त्यामुळे त्या बालकाचें प्राण जातात.

बाळकाचे जातां प्राण । अंतीं होये विस्मरण । तेणें पूर्वील स्मरण । विसरोन गेला ॥ ४६॥

बालकांचे प्राण जातात त्यावेळी (गर्भात असता परमेश्वराचे जे स्मरण होतें),त्याचें विस्मरण होतें,त्यामुळें पूर्वीचे ज्ञान (सोऽहं चें स्मरण) सर्व विसरुन गेला.(प्राण जाणाच्या वेळी पुन्हां भूल पडून मध्येंच देंवाचें झालेले स्मरण हा विसरुन जातो)

गर्भी म्हणे सोहं सोहं । बाहेरी पडतां म्हणे कोहं । ऐसा कष्टी जाला बहु । गर्भवासीं ॥ ४७॥

गर्भात असतांना सोऽहं सोऽहं (तो परमेश्वर मी आहें) म्हणत होता,तोच बाहेर आल्यावर कोऽहंकोऽह (मी कोण ?,मी कोण ?) म्हणूं लागला,असे गर्भात अनेक कष्ट सासलें.

दुःखा वरपडा होता जाला । थोरा कष्टीं बाहेरी आला । सवेंच कष्ट विसरला । गर्भवासाचे ॥ ४८॥

त्याप्रमाणें (गर्भात) अतिशय दुःख भोगीत होता,तो मोठया कष्टानें बाहेर आला की लगेंच गर्भवासाच्या सर्व कष्टांची-दुःखांची आठवण विसरतो.

सुंन्याकार जाली वृत्ती । कांहीं आठवेना चित्तीं । अज्ञानें पडिली भ्रांती । तेणें सुखचि मानिलें ॥ ४९॥

वृत्ती अगदी शून्य होतें (काहीं सुचेना),त्याला चित्तांत काही (सोऽहं चें स्मरण) आठवत नाहीं आणि अज्ञानाने भ्रांति उत्पन्न होऊन तेंच त्याला सुख वाटू लागतें.(वृत्ती शुन्याकार होऊन स्मरणांचे विस्मरण होतें व अज्ञानभ्रांतीने जीव त्यातंच सुख मानू लागतों.)

देह विकार पावलें । सुखदुःखें झळंबळे । असो ऐसें गुंडाळलें । मायाजाळीं ॥ ५०॥

देहाला(षड्) विकार होऊं लागतात.(बाल्य,तारुण्य,इ.विकार लागतात) सुखदुःखानें चित्त व्याप्त होतें. असो,अशाप्रकारे तो प्राणी मायाजाळांत गुंतत पडतो.

ऐसें दुःख गर्भवासीं । होतें प्राणीमात्रांसीं । म्हणोनियां भगवंतासी । शरण जावें ॥ ५१॥

अशा प्रकारचें गर्भवासाचें दुःख प्रत्येक प्राण्यास भोगावें लागतें म्हणून (ते दुखःचुकविण्यासाठीं) भगवंताला शरण जावें.

जो भगवंताचा भक्त । तो जन्मापासून मुक्त । ज्ञानबळें विरक्त । सर्वकाळ ॥ ५२॥

जों भगवंताचा भक्त असतो तो जन्मा-(मरणा-)पासूनच मुक्त होतो.आत्मज्ञानाच्या बळावर तों सर्वदा सर्वांपासून अलिप्त (उदासीन) राहातो.

ऐशा गर्भवासीं विपत्ती । निरोपिल्या येथामती । सावध होऊन श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ५३॥

गर्भवासांतील दुःखें अशा प्रकारें यथामति सांगितली. आतां श्रोत्यांनीं पुढील विषयांकडे सावधपणें लक्ष द्यावें (ह्यापुढचें जीवाचें चरित्र श्रोत्यांनी सावधान चित्ताने ऐकावे.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे जन्मदुःखनिरूपणनाम समास पहिला ॥ १॥**

## समास दुसरा : स्वगुणपरीक्षा (अ) ॥ श्रीराम् ॥

संसार हाचि दुःखमूळ । लागती दुःखाचे इंगळ । मागां बोलिली तळमळ । गर्भवासाची ॥ १॥

( इंगळ -निखारे )

संसार हाच सर्व दुःखाचे उगमस्थान (मूळ) आहें.(एकसारखे) दुःखाचे चटके बसतात. मागच्या समांसात गर्भवासामध्ये जीवाची कशी तळमळ होते ती सांगितली (आतां पुढचा मार्ग पाहू).

गर्भवासीं दुःख जालें । तें बाळक विसरलें । पुढें वाढों लागलें । दिवसेंदिवस ॥ २॥

गर्भवासात झालेले दुःख बालक विसरलें आणि पुढें दिवसेंदिवस मोठें होऊं लागलें.

बाळपणीं त्वचा कोंवळी । दुःख होतांचि तळमळी । वाचा नाहीं तये काळीं । सुखदुःख सांगावया ॥ ३॥

बाळपणी अंगावरची कातडी ओली असते. त्यामुळें थोडेसें दुःख होतांच बालक तळमळू लागतें. त्यावेळचे सुखदुःख सांगायला वाचा नसते.

देहास कांहीं दुःख जालें । अथवा क्षुधेनें पीडलें । तरी तें परम आक्रंदलें । परी अंतर नेणवे ॥ ४॥

देहाला काहीं दु:ख झालें अथवा भुकेची पीडा झाली तर तें नुसतें मोठमोठ्यानें रडतें,परंतु त्याचें अंतःकरण कोणाला कळत नाही.

माता कुरवाळी वरी । परी जे पीडा जाली अंतरीं । ते मायेसी न कळे अभ्यांतरीं । दुःख होये बाळकासीं॥५॥

आई वरवर कुरवाळते पण त्या बालकाच्या देहाचे किंवा मनांतलें दुःख किंवा पीडा तिला कळत नाहीं.

मागुतें मागुतें फुंजे रडे । माता बुझावी घेऊन कडे । वेथा नेणती बापुडें । तळमळी जीवीं ॥ ६॥

( फुंजे - हुंदके )

तें वरचेवर स्फुंदत असतें  व  रडत असतें,आई त्याला कडेवर घेऊन समजावीत असतें.त्याला होत असलेली व्यथा तिला कळत नाही त्या व्यथेने ते बापडे तळमळत असतें.

नानाव्याधीचे उमाळे । तेणें दुःखें आंदोळे । रडे पडे कां पोळे । अग्निसंगें ॥ ७॥

अनेक व्याधि उत्पन्न होऊन त्या दुःखानें तें कापतें,(ओरडते) रडतें,पडतें किंवा विस्तवानें भाजते.

शरीर रक्षितां नये । घडती नाना अपाये । खोडी अधांतरीं होये । आवेवहीन बाळक ॥ ८॥

आपल्या देहाचे रक्षण त्याला करतां येंत नाही,अनेक अपघात घडत असतात, खोड्या केल्यामुळें मध्येच एखादा अवयव व्यंग होतो.

अथवा अपाय चुकले । पूर्णपुण्य पुढें ठाकलें । मातेस ओळखों लागलें । दिवसेंदिवस ॥ ९॥

अथवा पूर्वपुण्याईने हे सर्व अपघात चुकले,मग तें दिवसेंदिवस आईस ओळखू लागतें.(बरें,त्यातून निभावलेंच तर तें बालक आईला ओळखूं लागते)

क्षणभरी मातेस न देखे । तरी आक्रंदें रुदन करी दुःखें । ते समई मातेसारिखें। आणीक कांहिंच नाहीं॥१०॥

क्षणभर आई दिसली नाहीं कीं ओरडूं लागतें,दुःखानें रडतें,त्यावेळी आईसारखे कोणीच प्रिय वाटत नाहीं.

आस करून वास पाहे । मातेविण कदा न राहे । वियोग पळमात्र न साहे । स्मरण जालियां नंतरें ॥११॥

( वास पाहे - वाट पाहते )

तें बालक तिची मोठया आशेनें वाट (वास) पाहातें,आईवाचून कधी रहात नाही,तिची आठवण झाली की तिचा वियोग त्याला पळभर सोसवत नाहीं.

जरी ब्रह्मादिक देव आले । अथवा लक्ष्मीने अवलोकिलें । तरी नवचे बुझाविलें ।आपले मातेवांचूनी ॥१२॥

ब्रह्मादिक देव आलें अथवा प्रत्यक्ष लक्ष्मीनें त्याच्याकडे कृपादृष्टीने पाहिलें तरी आपल्या आईवाचून त्याची समजूत होत नाही.

कुरूप अथवा कुलक्षण । सकळांहूनि करंटेपण । तरी नाहीं तीसमान । भूमंडळीं कोणी ॥ १३॥

ती आई कुरुप,दुर्गुणी,सगळ्यांपेक्षा करंटी असली तरी तिच्यासारखें (प्रियतम) या जगांत दुसरें कोणी नाहीं असे त्यांस वाटते.

ऐसें तें केविलवाणें । मातेविण दिसे उणें । रागें परतें केलें तिनें । तरी आक्रंदोनी मिठी घाली ॥ १४॥

अशा प्रकारें आईवेगळें ते केविलवाणें म्हणजे दीन व पोरके दिसतें. रागानें तिनें झिडकारलें तरी तें परत रडत रडत तिच्याच गळ्यास मिठी घालतें.

सुख पावे मातेजवळी । दुरी करितांचि तळमळी । अतिप्रीति तयेकाळीं । मातेवरी लागली ॥ १५॥

आईजवळ आली की त्यांस सुख वाटते.तिने दुर केलें की तें तळमळूं लागतें, (अशा प्रकारे) लहानपणी आईची बाळावर प्रीती असतें.

तंव ते मातेस मरण आलें । प्राणी पोरटें जालें । दुःखें झुर्णी लागलें । आई आई म्हणोनी ॥ १६॥

( दुःखें झुर्णी - दुःखाने खंगणे )

इतक्यांत आई मरण पावली व तें मूल पोरकें झालें,आई,आई म्हणून दुःखाने झुरणीस लागते.

आई पाहातां दिसेना । दीनरूप पाहे जना । आस लागलिसे मना । आई येईल म्हणोनी ॥ १७॥

चोहींकडे ते पाहते पण आई कोठें दिसत नाहीं. म्हणून दीनवाणें होऊन लोंकांकडे पाहूं लागतें, आई येईल अशी आशा त्याच्या मनाला लागते.

माता म्हणौन मुख पाहे । तंव ते आपुली माता नव्हे । मग हिंवासलें राहे । दैन्यवाणें ॥ १८॥

( हिंवासलें - हिरमुसले )

आई म्हणून कोणा स्त्रीच्या तोंडाकडे पाहावें तों ती आपली आई नाही असें दिसंताच हिरमुसलें व केविलवाणें होतें.

मातावियोगें कष्टलें । तेणें मानसीं दुःख जालें । देहहि क्षीणत्व पावलें । आतिशयेंसीं ॥ १९॥

अशा प्रकारे आईच्या वियोगाने कष्टी होत असल्यामुळें त्याच्या मनास दुःख होतें व त्याचा देहही अतिशय खंगतो.

अथवा माताहि वांचली । मायलेंकुरा भेटी जाली । बाळदशा ते राहिली । देवसेंदिवस ॥ २०॥

अथवा आई जगली,मायलेकारांची भेट झाली,पुढे दिवसेंदिवस तान्हेपण कमी होत जातें.(बाल्य संपून तें शहाणें होऊ लागतें)

बाळपण जालें उणें । दिवसेंदिवस होये शाहाणें । मग ते मायेचें अत्यंत पेरूणें । होतें, तें राहिलें ॥ २१॥

( मायेचें अत्यंत पेरूणें - आईचा अत्यंत लळा )

तान्हेपण जसजसें कमी होतं जातें,तसतसे तें शहाणे होऊ लागते,मग आईचा अतिशय छंद होता तो कमी होतो.

(शहाणपणाची पहिली खूण हीं आईची वाट पाहाणें-पेखणें संपते)

पुढें लो लागला खेळाचा । कळप मेळविला पोरांचा । आल्यगेल्या डायाचा । आनंद शोक वाहे ॥ २२॥

( लो - नाद )

पुढें खेळाचा नाद-छंद (लो) लागतो. मग पोरांचा समुदाय करुन (घोळका जमवून) आल्यागेल्या डावाचा हर्ष-शोक वाहूं लागतो.(डाव जिंकला किंवा हरला की आनंद किंवा खेद मानावा हाच नाद.)

मायेबापें सिकविती पोटें । तयाचें परम दुःख वाटे । चट लागली न सुटे । संगती लेंकुरांची ॥ २३॥

( चट - चटक )

आईबाप पोटींच्या कळवळ्यानें त्याला शिकवूं लागतातं. त्यांचे त्यास दुःख वाटतें,मुलांत खेळावयाची चटक लागल्यामुळे त्यांची संगती सोडवत नाहीं.

लेंकुरांमध्यें खेळतां । नाठवे माता पिता । तंव तेंथेहि अवचिता । दुःख पावला ॥ २४॥

पोरांत खेळत असतां आईबापांचे स्मरण होत नाही,(इतका दंग झाला) तों तेथेही त्याला अकस्मात दुःख प्राप्त होते.

पडिले दांत फुटला डोळा । मोडले पाय जाला खुळा । गेला माज अवकळा । ठाकून आली ॥ २५॥

( गेला माज - मस्ती गेली )

दांत पडतात,डोळा फुटतो,पाय मोडून लुळा-लंगडा हातो,अंगातील मस्ती जिरुन दुर्दशा प्राप्त होते.

निघाल्या देवी आणी गोवर । उठलें कपाळ लागला ज्वर । पोटसुळीं निरंतर । वायगोळा ॥ २६॥

देवीं,गोवर निघते (येतें),डोके दुखू लागते,ताप येतो,वायुगोळ्यामूळे  पोटशूळ उठतो.

लागलीं भूतें जाली झडपणी । जळीच्या मेसको मायेराणी । मुंज्या झोटिंग करणी । म्हैसोबाची ॥ २७॥

( जळीच्या मेसको मायेराणी - जलदेवता )

भुतेखेतें झडपतात. पाण्यांतील मेसको,मायराणी वगैरे दैवतें (जलदेवता),मुंजा,झोटिंग,अथवा म्हसोबा.

वेताळ खंकाळ लागला । ब्रह्मगिऱ्हो संचरला । नेणों चेडा वोलांडिला । कांहीं कळेना ॥ २८॥

( ब्रह्मगिऱ्हो - ब्रह्मसमंध, चेडा - मंतरलेली वस्तू )

वेताळ,खंकाळ (दुष्ट) अथवा ब्रह्मसमंध ह्यांपैकी कोणी लागतो,अथवा चेंडे-चेटूक ओलांडलें जातें,काय झाले असते ते कळत नाहीं (ह्यापैकी काही ना काही पाठीस लागून ह्याला पीडा होते.)

येक म्हणती बीरे देव । येक म्हणती खंडेराव । येक म्हणती सकळ वाव । हा ब्राह्मणसमंध ॥ २९॥

(लोकही नाना संबंध जोडतात) बीर किंवा खंडोबा लागला असें कोणी म्हणतात, अथवा हे सर्व खोटें (वाव) असून ह्याला ब्रह्मसमंध लागला आहे असें कोणी म्हणतात.

येक म्हणती कोणें केलें । आंगीं देवत घातले । येक म्हणती चुकलें । सटवाईचें ॥ ३०॥

कोणी म्हणतात,ह्याला करणी केली,कोणाचे तरी दैवत ह्याच्या आंगी घातलें आहें,कोणी सांगतात,काहीतरी सटवाईचे चुकलें आहें.

येक म्हणती कर्मभोग । आंगीं जडले नाना रोग । वैद्य पंचाक्षरी चांग । बोलाऊन आणिले ॥ ३१॥

कोणी म्हणतात कर्मभोगामुळे ह्याला अनेक रोग जडले आहेत,मग चांगले वैद्य व पंचाक्षरी बोलविले.

येक म्हणती हा वांचेना । येक म्हणती हा मरेना । भोग भोगितो यातना । पापास्तव ॥ ३२॥

त्यात काहीजण सांगतात की हा जगणार नाही, व दुसरे म्हणतात हा मरणार नाही,ह्याचें पूर्वपाप संपेपर्यंत हा दुःखभोग ह्याला भोगला पाहिजे.

गर्भदुःख विसरला । तो त्रिविधतापें पोळला । प्राणी बहुत कष्टी जाला । संसारदुःखें ॥ ३३॥

गर्भवासाचें दुःख विसरला होता तो त्रिविधतापानें पोळून निघाला.ह्याप्रकारे संसारातील दुःखांनी प्राणी अगदीं बेजार झाला.

इतुकेंहि चुकोन वांचला । तरी मारमारूं शाहाणा केला । लोकिकीं नेटका जाला । नांव राखे ऐसा ॥ ३४॥

इतकी हीं दुःखे चुकलीं तरी (आईबापांनी व पंतोजीनीं अभ्यासासाठी) त्याला मारुन ठोकून शहाणा केला आणि नांवलौकिक जगांत राखील असा तो चांगला हुशार झाला

पुढें मायबापीं लोभास्तव । संभ्रमें मांडिला विव्हाव । दाऊनियां सकळ वैभव । नोवरी पाहिली ॥ ३५॥

( संभ्रमें मांडिला विव्हाव - संसारलोभात गुंतुन विवाह )

पुढें मायबापांनी पुत्रप्रेमानें धांदल करुन (थाटामाटाने-संभ्रमें) त्याच्या लग्नाची तयारी केली, आणि आपला सर्व बडेजाव दाखवून नोवरी पाहिली.

वऱ्हाडीवैभव दाटलें । देखोन परमसुख वाटले । मन हें रंगोन गेलें । सासुरवाडीकडे ॥ ३६॥

लग्नांतील वऱ्हाड्यांची  गर्दी व थाटमाट पाहून त्याला फार सुख वाटलें. त्याचे मन सासुरवाडीकडेच गर्क झालें.( हाही वऱ्हाड व वस्त्रपात्र पाहून सुखावला,सासुरवाडीकडें मन रंगून गेलें)

मायबापीं भलतैसें असावें । परी सासुरवाडीस नेटकें जावें । द्रव्य नसेल तरी घ्यावें । रुण कळांतरें ॥ ३७॥

( कळांतरें - व्याजाने )

आईबापांनी वाटेल त्या स्थितीत असावें .आपण मात्र सासुरवाडीस नटून सजून (नेटके) जावें,त्यासाठी खर्चास पैसे नसलें तरी व्याजानें (कळांतरे) कर्ज घ्यावें.

आंतर्भाव ते सासुरवाडीं । मायेबापें राहिलीं बापुडीं । होताती सर्वस्वें कुडकुडीं । तितुकेंच कार्य त्यांचें ॥ ३८॥

( आंतर्भाव - मनातून , सर्वस्वें कुडकुडीं - सगळी कडून नाडले जाणे )

मनाचा सगळा ओढा (अंतर्भाव) सासुरवाडीकडेच,आईबाप दीन (वस्त्रहीन कष्टी होऊन) राहातात. तीं त्यास तृच्छ वाटूं लागतात त्यांचा जीव ह्याच्यासाठी तुटतो पण ह्याला त्यांची गरज नसते. त्यांच्याशी हा जितक्यास तितकाच वागतो.

नोवरी आलियां घरा । अती हव्यास वाटे वरा । म्हणे मजसारिखा दुसरा । कोणीच नाहीं ॥ ३९॥

नवरी घरी आल्यावर नव-याला संसाराची अतिशय हाव सुटतें,माझ्यासारखा (सुखी,भाग्यवान धन्य) दुसरा कोणी नाही असे म्हणू लागतों.

मायबाप बंधु बहिणी । नोवरी न दिसतां वाटे काणी । अत्यंत लोधला पापिणीं ।अविद्येनें भुलविला ॥४०॥

( लोधला - भुलून गेला )

बायको दृष्टीस पडली नाही की आई,बाप,भाऊ,बहिणी, हीं सारी त्याला नकोशीं होतात,क्लेशदायक-तृच्छ (कोणी) वाटतात. असा हा स्त्रीच्या ठिकाणीं अत्यंत लुब्ध झाला. पापिणी अविद्येनें त्याला अशी भूरळ घातली.(अविद्येनें भुरळ घातल्यामुळे हा स्त्री-प्रेमात गुरफटला गेला.)

संभोग नस्तां इतुका प्रेमा ।योग्य जालिया उलंघी सीमा । प्रीती वाढविती कामा। करितां प्राणी गुंतला॥४१॥

( कामा - कामवासना )

संभोग झाला नाही तोंच इतकें प्रेम! आणि संभोग झाल्यावर सर्व मर्यादा ( लाजलज्जा) सोडतो. कामजन्य सुखामुळे परस्पर प्रीती जडते,व कामपाशांत हा प्राणी गुंतून जातो.

जरी न देखे क्षण येक डोळां । तरी जीव होय उताविळा । प्रीतीपात्र अंतर्कळा । घेऊन गेली ॥ ४२॥

बायको क्षणभर दृष्टीस पडली नाहीं की ह्याचा जीव घाबरा होतो.अशी ती प्रेमपात्र स्त्री ह्यांचे चित्तसर्वस्व (अंर्तकळा) हरण करुन नेते.

कोवळे कोवळे शब्द मंजुळ । मर्यादा लज्या मुखकमळ । वक्त्रलोकनें केवळ । ग्रामज्याचे मैंदावें ॥ ४३॥

( ग्रामज्याचे मैंदावें - ग्राम्य वृतीने भूलवणे )

तिचे कोवळे व मंजुळ असे शब्द,मर्यादाशील व लज्जायुक्त वागणें,सुंदर मुखकमल (असा तिचा थाट),त्यांत तोंड व डोळे हें कामाचें जाळे होयं (ह्यांच्यामुळे ग्रामज्य-त्याची पशुवासना बळावतें)

कळवळा येतां सांवरेना । शरीर विकळ आवरेना । अनेत्र वेवसाईं क्रमेना । हुरहुर वाटे ॥ ४४॥

( अनेत्र वेवसाईं क्रमेना - अन्यत्र व्यवसायात मन लागेना )

तिच्याविषयी आलेले प्रेम आवरुन धरवत नाहीं, कामविव्हळ झालेलें आपलें शरीर त्याला सावरुन धरवत नाही.दुस-या व्यवसायांत त्याला करमत नाहीं हुरहूर वाटतें.(क्षणभर वियोग सोसत नाही,असा हा कामुक बनतो)

वेवसाय करितां बाहेरी । मन लागलेंसे घरीं । क्षणाक्षणां अभ्यांतरीं । स्मरण होये कामिनीचें ॥ ४५॥

बाहेर उद्योग करीत असला तरी मन घरी (बायकोपाशी) असतें,प्रत्येक क्षणाला मनांत तिची आठवण होत असते.(सर्वकाळ चिंतन कामिनीचे)

तुम्हीं माझिया जिवांतील जीव । म्हणौनी अत्यंत लाघव । दाऊनियां चित्त सर्व । हिरोन घेतलें ॥ ४६॥

तुम्ही माझ्या जिवाचें जीव इत्यादि अत्यंत लाघवाचें शब्द बोलून (प्रेम दाखवून) त्यांचे सर्व चित्त स्त्रीने हरण केलें.

मैद सोइरीक काढिती । फांसे घालून प्राण घेती । तैसें आयुष्य गेलियां अंतीं । प्राणीयांस होये ॥ ४७॥

( मैद - लबाड,भुरळ )

ठक लोक भैद (फसवेगिरीचे) लग्नाचे बालणे लावतात व आयत्यावेळी गळफास लावून जीव घेतात व नागवतात (ठक लोक नसती नाती जुळवून पाशांत अडकवून प्रवाशाचा प्राण घेतात) तशाच प्रकारें आयुष्य संपले म्हणजें ह्या प्राण्याची स्थिती होते.

प्रीति कामिनीसीं लागली । जरी तयेसी कोणी रागेजली । तरी परम क्षिती वाटली ।मानसीं गुप्तरूपें ॥४८॥

( रागेजली - रागावले )

बायकोंचे प्रेम असे त्यांस लागते,की जर तिच्यावर कोणी रागावलें तर हा मनांत जळफळतो (ह्याच्या मनांत जळफळाट होतो.)

तये भार्येचेनि कैवारें । मायेबापासीं नीच उत्तरें । बोलोनियां तिरस्कारें । वेगळा निघे । ४९॥

बायकोंचा कैवार घेऊन हा प्राणी आईबापांना वाईट शब्द बोलतो व शेवटी त्यांचा धिक्कार करुन (उर्णी उत्तरे बोलून संतापानें) वेगळा निघतो .

स्त्रीकारणें लाज सांडिली । स्त्रीकारणें सखीं सोडिलीं । स्त्रीकारणें विघडिलीं । सकळहि जिवलगें ॥ ५०॥

स्त्रीच्या(मर्जी)साठी स्नेह व लाज सोडून सख्खे भाऊ वगैरे जिवलग (आप्तेष्टादि,स्नेही) ह्या सर्वांस सोडतो (ह्यांशी वाकडा होतो)

स्त्रीकारणें देह विकिला । स्त्रीकारणें सेवक जाला । स्त्रीकारणें सांडविला । विवेकासी ॥ ५१॥

तिच्यासाठी (तिच्यापाई आपला देह विकून-कामांध होऊन-तिचा दास बनतो),आपला देह (दुस-याच्या गुलामगिरीत ) विकतो,दुस-याचा चाकर होतो.(नरदेहाच्या सार्थकाचा )विवेक त्याच्या ठिकाणी राहात नाहीं.

स्त्रीकारणें लोलंगता । स्त्रीकारणें अतिनम्रता । स्त्रीकारणें पराधेनता । अंगिकारिली ॥ ५२॥

( लोलंगता - लंपटपणा )

तिच्यासाठी अतिशय लीनता व लंपटपणा स्वीकारतो,पराधीनपणा अंगीकारतो (तिच्यासाठी दुस-याचा ताबेदार होतो)

स्त्रीकारणें लोभी जाला । स्त्रीकारणें धर्म सांडिला । स्त्रीकारणें अंतरला । तीर्थयात्रा स्वधर्म ॥ ५३॥

तिच्यामुळे लोभी बनला,तिच्यापायी दानधर्म,तीर्थयात्रा,स्वधर्म ह्या सर्वांस आचवला.

स्त्रीकारणें सर्वथा कांहीं । शुभाशुभ विचारिलें नाहीं । तनु मनु धनु सर्वही । अनन्यभावें अर्पिलें ॥ ५४॥

(तिच्या आसक्तीमुळें) कोणत्याही प्रकारें ब-यावाइटाचा विचार पाहिला नाहीं,तनमनधन सर्वस्व तिच्यापायीं अगदी अनन्यभावानें अर्पण केलें.

स्त्रीकारणें परमार्थ बुडविला । प्राणी स्वहितास नाडला ।ईश्वरीं कानकोंडा जाला ।स्त्रीकारणें कामबुद्धी ॥५५॥

स्त्रिविषयक आसक्तीमुळे परमार्थ बुडविला,ख-या स्वहिताला मुकला.परमेश्र्वराजवळ जायला त्याला तोंड राहिले नाहीं.

स्त्रीकारणें सोडिली भक्ती।स्त्रीकारणें सोडिली विरक्ती ।स्त्रीकारणें सायोज्यमुक्ती ।तेहि तुच्छ मानिली॥५६॥

(तिच्यापायी) भक्ति व विरक्ति सोडली,ईतकेंच नव्हे तर सायुज्यमुक्तीसुध्दां तृछय मानतों (मानली)

येके स्त्रियेचेनि गुणें । ब्रह्मांड मानिलें ठेंगणें । जिवलगें तीं पिसुणें । ऐसीं वाटलीं ॥ ५७॥

एका बायकोमुळें सगळें ब्रह्मांड त्याला ठेंगणें (तृछय) वाटूं लागते. जीवलग होते ते त्यांस (पिंसुणें) शत्रूप्रमाणें वाटूं लागलें.

ऐसी अंतरप्रीति जडली । सार्वस्वाची सांडी केली । तंव ते मरोन गेली । अकस्मात भार्या ॥ ५८॥

अशाप्रकारे स्त्रीसंबंधी त्यास प्रीती उत्पन्न झाली.तिच्यापायी त्याने सर्वस्वाची हानी करुन घेतली,इतक्यात ती स्त्री एकाएकी मरण पावली.

तेणें मनीं शोक वाढला । म्हणे थोर घात जाला । आतां कैंचा बुडाला । संसार माझा ॥ ५९॥

त्यामुळे शोकाकुळ होऊन म्हणूं लागला,की माझा मोठा घात झाला,आतां कसला संसार ? गेला,बुडाला माझा संसार!

जिवलगांचा सोडिला संग । अवचिता जाला घरभंग । आतां करूं मायात्याग । म्हणे दुःखें ॥ ६०॥

हिच्यासाठीं जिवलगांची संगत सोडली, आणि आतां माझे घर बसलें. आतां ह्या संसाराचा त्याग करुं असे दुःखाने म्हणून ,

स्त्री घेऊन आडवी । ऊर बडवी पोट बडवी । लाज सांडून गौरवी । लोकां देखतां ॥ ६१॥

स्त्रीचें प्रेत (आडवें) मांडीवर घेऊन छाती व पोट बडवून घेऊं लागतो, आणि लाजलज्जा सोडून लोकांदेखत तिचे गुण गाऊ लागतों.

म्हणे माझें बुडालें घर । आतां न करी हा संसार । दुःखें आक्रंदला थोर । घोर घोषें ॥ ६२॥

माझें घर बुडालें, मी आतां संसारात पडणार नाहीं,असे म्हणत मोठमोठ्यानें आक्रोश करू लागतो.

तेणें जीव वारयावेघला । सर्वस्वाचा उबग आला । तेणें दुःखें जाला । जोगी कां महात्मा ॥ ६३॥

( वारयावेघला - वात झाल्याप्रमाणे भ्रमिष्ट वागणे )

तिच्या वियोगामुळे त्याचा जीव वारेभरी झाला.(त्याचा जीव वायुचक्रासारखां भ्रमण करु लागला) त्याचे मन संसाराला विटलें.(उबग आला.) त्या दु:खामुळे तों जोगी किंवा महात्मा झाला.

कां तें निघोन जाणें चुकलें । पुन्हां मागुतें लग्न केलें।तेणें अत्यंतचि मग्न जालें।मन द्वितीय संमंधीं॥६४॥

अथवा संसारातून निघून न जाता पुन्हां दुसरे लग्न केलें. त्यायोगें दुस-या बायकोच्या ठिकाणी त्याची फारच प्रीती जडली.

जाला द्वितीय संमंध । सवेंचि मांडिला आनंद । श्रोतीं व्हावें सावध । पुढिले समासीं ॥ ६५॥

दुसरे लग्न झाल्यानें पुन्हां आनंदाला सुरवात झाली. (द्वितीय संबंध करुन आनंदानें संसारात पडल्यावर पुढे काय प्रकार होतो ते पुढील समासात)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्वगुणपरीक्षानाम समास दुसरा ॥२॥**

### समास तिसरा : स्वगुणपरीक्षा (ब) ॥ श्रीराम् ॥

द्वितीय संमंध जाला । दुःख मागील विसरला । सुख मानून राहिला । संसाराचें ॥ १॥

दुसरे लग्न झाल्यानें हा मागचें सगळें दु:ख विसरला,संसारात सुख मानून वागू लागला.

जाला अत्यंत कृपण । पोटें न खाय अन्न । रुक्याकारणें सांडी प्राण । येकसरा ॥ २॥

( रुक्या - पैसा )

(पुर्वी उधळ्या होता,दुस-या संबंधानंतर कृपण झाला) मग अतिशय कंजूष झाला. पोटात अन्न खाईना.पै,पैशासाठी प्राण द्यायला तयार झाला.

कदा कल्पांतीं न वेची । सांचिलेंचि पुन्हा सांची । अंतरीं असेल कैंची । सद्वासना ॥ ३॥

( कदा कल्पांतीं न वेची - कठीण प्रसंगीही (जगबुडी) पैसा खर्च न करणे , सांचिलेंचि पुन्हा सांची - साठवलेल्या धनात भर )

कसल्याही प्रसंगी खर्च म्हणून करत नाही,एकसारखा संचय करीत सुटतों (साठविलेलेच पुन्हा साठवितो) अशा ठिकाणी चांगली वासना कोठून असणार ?

स्वयें धर्म न करी । धर्मकर्त्यासहि वारी । सर्वकाळ निंदा करी । साधुजनाची ॥ ४॥

स्वतः दानधर्म तर करीत नाहीच पण दुसरा करु लागल्यास त्याला अडथळा आणतो, (धर्म न करितां धर्म करणा-यासही निवारुं लागतों) आणि नेहमी साधुसंतांची निंदा करतों.

नेणे तीर्थ नेणे व्रत । नेणे अतित अभ्यागत । मुंगीमुखींचें जें सीत । तेंही वेंचून सांची ॥ ५॥

तीर्थ,व्रत,अतीत,अभ्यागत वगैरे तो काही जाणत नाही.मुंगीच्या मुखातलें शीत देखील वेंचून काढून साठवितो(इतका तो नष्ट बनतो)

स्वयें पुण्य करवेना । केलें तरी देखवेना । उपहास्य करी मना- । नये म्हणौनी ॥ ६॥

स्वतः पुण्यकर्म करवत नाहीं.दुस-यानें केलेले पाहावत नाहीं,व तें आवडत नाहीं.(मनाला पटत नाहीं) म्हणून त्याची निंदा करतों,

देवां भक्तांस उछेदी । आंगबळें सकळांस खेदी । निष्ठुर शब्दें अंतर भेदी । प्राणीमात्रांचें ॥ ७॥

देवाभक्तांचा समूळ नाश करतों व शक्तीच्या जोरावर सर्वांना त्रास देतो.आणि कठोर शब्द बोलून प्रत्येक प्राण्याच्या अंतःकरणास त्रास देतो.(प्राण्यांचा मर्मभ़ेद करतों)

नीति सांडून मागें । अनीतीनें वर्तों लागे । गर्व धरून फुगे । सर्वकाळ ॥ ८॥

नीति टाकून अनीतीच्या मार्गांनें वागतों, आणि नेहमी ताठयाने फुगलेला असतो.

पूर्वजांस सिंतरिलें । पक्षश्राद्धहि नाहीं केलें । कुळदैवत ठकिलें । कोणेपरी ॥ ९॥

( सिंतरिलें - फसवले )

पितरांना (वाडवडिलांना) फसवितो.(सिंतरितो),त्यांचे श्राध्दपक्षही काही करत नाहीं. व कुळदैवताला कसे फसवितो ते पहा.

आक्षत भरिली भाणा । दुजा ब्राह्मण मेहुणा । आला होता पाहुणा । स्त्रियेस मूळ ॥१०॥

( भाणा - बहिण,भांडे )

बहिणीला (भाणा) सुवासिनी म्हणून बसविलें व तिला न्यावयास (मूळ) आलेला तिचा नवरा (म्हणजे आपला मेहुणा) ह्याला ब्राह्मण समजून (कुळदैवत बोळविलें)

कदा नावडे हरिकथा । देव नलगे सर्वथा । स्नानसंध्या म्हणे वृथा । कासया करावी ॥ ११॥

हरिकथा कधी आवडत नाहीं,देवाची आवश्यक्ता त्याला नसतें,आणि तो म्हणतो की विनाकारण स्नानसंध्या कशाला करायची ?

अभिळाषें सांची वित्त । स्वयें करी विस्वासघात । मदें मातला उन्मत्त । तारुण्यपणें ॥ १२॥

दुस-याच्या वस्तूचा अपहार करुन धन साठवितों,(त्यासाठी बेडरपणानें) विश्र्वासघातही करतो.तारुण्याच्या मदाने उन्मत्त होतों.

तारुण्य आंगीं भरलें । धारिष्ट न वचे धरिलें । करूं नयें तेंचि केलें । माहापाप ॥ १३॥

आंगात तारुण्याचा मद संचारला. इंद्रिय निग्रह करवत नाहीं (नवचें धारिलें) (मन आवरत नाहीं.) म्हणून करु नयें  तसलें महापाप करतों.

स्त्री केली परी धाकुटी । धीर न धरवेचि पोटीं । विषयलोभें सेवटीं । वोळखी सांडिली ॥ १४॥

दुसरी बायको केली तर ती लहान,त्यामुळें त्यास दम निघेना.शेवटी विषयासक्तीमुळें जातगोताची किंवा वडील-धाकटेपणाची ओळख विसरला.

माये बहिण न विचारी । जाला पापी परद्वारी । दंड पावला राजद्वारीं । तऱ्हीं पालटेना ॥ १५॥

आईबहिणीचा विचार ठेवला नाहीं परद्वार करणारा पापी बनला. ह्या पापकृत्याबद्दल राजशासनही भोगलें,तरीपण दुष्कृत्य करण्याचें सोडीत नाहीं.

परस्त्री देखोनि दृष्टीं । अभिळाष उठे पोटीं । अकर्तव्यें हिंपुटी । पुन्हां होये ॥ १६॥

( अकर्तव्यें हिंपुटी - प्राप्त न झाल्याने दु:खी झाला )

परस्त्री पाहतांच तिजविषयी पापबुध्दी मनांत उत्पन्न होतें,आणि दुष्टकर्मामुळें (शासन पावून परोपरीचे दंड भोगून) पुन्हा कष्टी होतो.

ऐसें पाप उदंड केलें । शुभाशुभ नाहीं उरलें । तेणें दोषें दुःख भरलें । अकस्मात आंगीं ॥ १७॥

अशाप्रकारे पुष्कळ पाप केंलें,शुभाशुभ (चागलें वाईट) काहीं पाहीलें नाहीं,त्यामुळे शरीरात एकदम दु:खे उद्भवलीं (नाना व्याधी ऊद्भवल्या)

व्याधी भरली सर्वांगीं । प्राणी जाला क्षयरोगी । केले दोष आपुले भोगी । सीघ्र काळें ॥ १८॥

स्वतः केलेले दोष त्याला लवकरच भोगावे लागून सर्वांग रागग्रस्त झालें,तो क्षयरोगी झाला.

दुःखें सर्वांग फुटलें । नासिक अवघेंचि बैसलें । लक्षण जाऊन जालें । कुलक्षण ॥ १९॥

सगळे आंग दुःखाने फुटलें (सर्वांगावर व्याधि फुटली) नाक बसलें सुरुप होता तो विद्रूप झाला.

देहास क्षीणता आली । नाना वेथा उद्भवली । तारुण्यशक्ती राहिली । खंगला प्राणी ॥ २०॥

देह क्षीण झाला,अनेक दुःखे उद्भवली,तरुणपणाची शक्ति जाऊन प्राणी अगदी खंगून गेला.

सर्वांगीं लागल्या कळा । देहास आली अवकळा । प्राणी कांपे चळचळां । शक्ति नाहीं ॥ २१॥

प्राण्याच्या सर्व अंगास कळा लागल्या,देहाची अवकळा झाली,शक्ति नाहीशी झाल्यामुळें तो चळचळ कापू लागला.

हस्तपादादिक झडले । सर्वांगीं किडे पडिले । देखोन थुंकों लागले । लाहानथोर ॥ २२॥

हातपाय इत्यादि अवयव झडलें,सगळ्या आंगभर किडे पडले.,तें पाहून सर्व लहानथोर माणसें त्याची छीः थूः करु लागली.,(लोक तोंडावर थोर थुंकू लागलें).

जाली विष्टेची सारणी । भोवती उठली वर्ढाणी । अत्यंत खंगला प्राणी । जीव न वचे ॥ २३॥

( वर्ढाणी - घाण )

त्याच्याभावती विष्ठेचे असे सारवण झालें.(अन्नपचन होईनासें झाल्यामुळें त्याला अतिसार झाला),त्यामुळें अतिशय दुर्गंधी(वर्ढाणी) सुटलीं,असा तो अगदी खंगून गेला,तरी जीव जाईना.

आतां मरण दे गा देवा । बहुत कष्ट जाले जीवा । जाला नाहीं नेणों ठेवा । पातकाचा ॥ २४॥

अरे,देवा,आता मरण दे रे,जीवाला फार कष्ट झालें,माझ्या पूर्वपातकांचा ठेवा अजून संपला नाही का ?(प्राण जाईना तेव्हा देवांपाशी मरण मागू लागला.)

दुःखें घळघळां रडे । जों जों पाहे आंगाकडे । तों तों दैन्यवाणें बापुडें । तळमळी जीवीं ॥ २५॥

(असें शोकानें म्हणत दुःखाने घळघळां) रडू लागतो, आणि वरचेवर  आपल्या देहाकडें पाहून दीनवाणा होऊन मनांतल्या मनांत तळमळत असतों.

ऐसे कष्ट जाले बहुत । सकळ जालें वाताहात । दरवडा घालून वित्त । चोरटीं नेलें ॥ २६॥

शरीराच्या अशा आपदा झाल्या,घरादाराची वाताहात झाली, चोरांनी दरवडा घालून सगळे द्रव्य नेलें,

जालें आरत्र ना परत्र । प्रारब्ध ठाकलें विचित्र । आपला आपण मळमूत्र । सेविला दुःखें ॥ २७॥

प्रपंच ना परमार्थ अशी ह्या प्राण्याची स्थिति झालीं प्रारब्धाचा तर असा विचित्र भोग उभा राहिला,स्वतःची हग-मूत स्वतःच काढावी (अगर त्यातच लोळत पडावे) अशी स्थिती झाली. ( ना स्वार्थ ना परमार्थ,प्रारब्धाची विचित्र कळा,आपलें मळ-मूत्र आपणच सेवू लागला.)

पापसामग्री सरली । देवसेंदिवस वेथा हरली । वैद्यें औषधें दिधलीं । उपचार जाला ॥ २८॥

(हजारों प्राण्यांची इतिश्री यथेंच होतें) असो. पापाचा सांठा सपंत आला तसतशी व्याधिही दिवसेंदिवस कमी होऊ लागली,वैद्यांनें औषध दिल्यानें बरे वाटू लागलें.

मरत मरत वांचला । यास पुन्हां जन्म जाला । लोक म्हणती पडिला । माणसांमध्यें ॥ २९॥

मरतां मरतां वाचला त्याचा पुर्नजन्म झाला,आतां हा माणसांत आला असे लोक म्हणू लागले.

येरें स्त्री आणिली । बरवी घरवात मांडिली । अति स्वार्थबुद्धी धरिली । पुन्हां मागुती ॥ ३०॥

( बरवी घरवात - संसाराची सामग्री )

त्या प्राण्याने आपल्या बायकोस (माहेराहून घरी आणलें),पुन्हा (घरवात) प्रपंच थाटला.पुन्हा स्वार्थबु ध्दी पहिल्याप्रमाणें धरलीं.

कांहीं वैभव मेळविलें । पुन्हां सर्वही संचिलें । परंतु गृह बुडालें । संतान नाहीं ॥ ३१॥

काहीं वैभव मिळविलें,सर्व (प्रपंचसामग्री ) पुन्हा जमा केली. पण मूळबाळ नसल्यामुळें घर बुडालें (असें वाटू लागलें)

पुत्र संताअन नस्तां दुःखी । वांज नांव पडिलें लोकिकीं । तें न फिटे म्हणोनी लेंकी । तरी हो आतां॥३२॥

पुत्रसंतान नसल्यामुळे स्वतःला दुःख झालें, शिवाय त्यास लोक वांझोटा म्हणू लागलें.तेव्हा ते वांझपण जावें म्हणून एखादी मुलगी निदानची झालीं,तर बरी (असें म्हणू लागलां.)

म्हणोन नाना सायास । बहुत देवास केले नवस । तीर्थें व्रतें उपवास । धरणें पारणें मांडिलें ॥ ३३॥

ह्यांसांठी अनेक सायास सुरु केंलें ,अनेक देवांस नवस केलें,तीर्थे,व्रते,उपवास, धरणेधारणें,इत्यादि करु लागला.

विषयसुख तें राहिले । वांजपणें दुःखी केलें । तंव तें कुळदैवत पावलें । जाली वृद्धी ॥ ३४॥

(विषयसुखास्तव दुसरे लग्न केलें पण) तें विषयसुख बाजुला राहून वांझपणानें दुःख होऊ लागलें,इतक्यात कुलदैवत पावलें,व (त्याच्या प्रसादानें) एक मूल झालें (वंशाची वृध्दी झाली)

त्या लेंकुरावरी अतिप्रीति । दोघेहि क्षण येक न विशंभती । कांहीं जाल्या आक्रंदती । दीर्घस्वरें ॥ ३५॥

त्या नवरा बायकोची त्या लेकरांवर अतिशय प्रीती जडली,एक क्षणभरही त्याला विसंबेनासे झालें,त्यांस (लेकरांच्या प्रकृतीस)जरा कमीजास्त झालें की दोघेही मोठमोठयानें आक्रोश करु लागत.

ऐसी ते दुःखिस्ते । पूजीत होती नाना दैवतें । तंव तेंहि मेलें अवचितें । पूर्व पापेंकरूनी ॥ ३६॥

अशी ती नवराबायकों दोघेही नित्य चिंतामग्न होऊन (मुलास बरे रहावें म्हणून) अनेंक दैवत पूजीत होती,इतक्यांत पूर्वपातकानें ते पोरही एकाएकी मरण पावलें.

तेणें बहुत दुःख जालें । घरीं आरंधें पडिलें । म्हणती आम्हांस कां ठीविलें । देवें वांज करूनी ॥ ३७॥

( घरीं आरंधें पडिलें - अनपत्यत्वदु:खामुळे घरात जणू अंधार पडला )

त्यामुळें उभयतां फार दुःखी झालीं, घरात दुःखाचा कोलाहल (आरंधें-शोक) माजून राहिला (निपुत्रिकत्व आलें) देवांने आम्हास का वांझ केले ? असे म्हणू लागलीं.

आम्हांस द्रव्य काये करावें । तें जावें परी अपत्य व्हावें । अपत्यालागी त्यजावें । लागेल सर्व ॥ ३८॥

आम्हाला ही संपत्ती काय करावयाची आहें ? ही गेली तरी हरकत नाहीं पण मूल झाले पाहिजे. मुलासाठी सर्व सोडण्याची पाळी आली तरी सोडुं.

वांजपण संदिसें गेलें । तों मरतवांज नांव पडिलें । तें न फिटे कांहीं केलें । तेणें दुःखें आक्रंदती ॥ ३९॥

नुकतेंच (संदिसे) वांझपण गेले होते तोच परत लोक वांझ म्हणून नावें ठेऊ लागली.ते काही केल्या जाईना म्हणून दुःखानें धाय मोकलू लागली.

आमुची वेली कां खुंटिली । हा हा देवा वृत्ती बुडाली । कुळस्वामीण कां क्षोभली । विझाला कुळदीप ॥४०॥

आमच्या वंशाचा वेल का बरे खुंटला ? हाय रे देवा ! ही वृत्ति आतां बुडायला लागली, कुळदेवतां अशी का रागावली ? आमचा कुळदीपक विझून गेला.

आतां लेंकुराचें मुख देखेन । तरी आनंदें राडी चालेन । आणी गळही टोंचीन । कुळस्वामिणीपासीं ॥ ४१॥

( राडी - निखारे )

आतां लेकराचे मुख पहावयाला मिळेल तर आनंदानें राठीतून (निखा-याच्या खाईतूनं) चालेन  व कुलदैवतापुढे गळ टोचून घेईन.

आई भुता करीन तुझा । नांव ठेवीन केरपुंजा । वेसणी घालीन, माझा- । मनोरथ पुरवी । ४२॥

आई जगदंबें,मला मुलगा होऊं दें म्हणजे त्याला तुझा (भुत्या) आराधी-सेवक-करीन त्याचें नांव केरपुंजा ठेऊन,तुझ्या नांवाची वेसण (नथणी) त्याच्या नाकांत घालीन,एवढा माझा हेतु पूर्ण कर,

बहुत देवांस नवस केले । बहुत गोसावी धुंडिले । गटगटां गिळिले । सगळे विंचू ॥ ४३॥

असो अशा प्रकारचे नवस अनेक देवांस केलें,पुष्कळ गोसाव्यांची पायधरणी केली,फार काय,सबंधच्या सबंध विंचू  गिळून टाकले.

केले समंधास सायास । राहाणे घातलें बहुवस । केळें नारिकेळें ब्राह्मणास । अंब्रदानें दिधलीं ॥ ४४॥

( राहाणे घातलें - अंगात दैवत घालणे,गोंधळ घालणे.)

समंधाची पूजा केली,पुष्कळ ठिकाणी आंगात दैवतें आणवून (रहाणें) त्यांस विचारलें,केळी नारळ,आंबे वगैरे,फळांची दानें-वायनें -(आपणास पुत्रफळ मिळावें म्हणून) ब्राह्मणांस दिली.

केलीं नाना कवटालें । पुत्रलोभें केलीं ढालें । तरी अदृष्ट फिरलें । पुत्र नाहीं ॥ ४५ ॥

( कवटालें ढालें - पिशाच्य विद्येची साधना, अदृष्ट - दैव,नशीब )

असे जादूटोणा,चेडचेटकें,वगैरे (कौटाळे) नानाप्रकार व व्रताभिषेकादि (ढाळे) (पुत्रलाभासाठी) केलीं. तरी दैव उलटे असल्यामुळे मुलगा होईना.

वृक्षाखालें जाऊन नाहाती । फळतीं झाडें करपती । ऐसे नाना दोष करिती । पुत्रलोभाकारणें ॥ ४६॥

झाडांखाली जाऊन आमावस्येच्या रात्री नग्नस्नानें केलीं,त्यायोगे फळें येणारी झाडें वठली (करपली) पुत्राच्या लोभामुळें अशी अनेंक पापें केली.

सोडून सकळ वैभव । त्यांचा वारयावेधला जीव । तंव तो पावला खंडेराव । आणी कुळस्वामिणी ॥ ४७॥

( वारयावेधला - जीव सैरभैर होणे )

सर्व वैभवाविषयी ती उदासीन झाली. त्यांचा जीव वा-यावर टांगल्यासारखा (वारयावेधला) झाला.शेवटी एकदाचा खंडोबा पावला कुलदेवताही पावली.

आतां मनोरथ पुरती । स्त्रीपुरुषें आनंदती । सावध होऊन श्रोतीं । पुढें अवधान द्यावें ॥ ४८॥

आतां त्या स्त्रीपुरूषांचे मनोरथ पुरलें, स्त्रीपुरुष काहीं काळ आनंदानें संसार करु लागलीं तो कथाभाग श्रोत्यांनी पुढील समासात सावधपणानें ऐकावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्वगुणपरीक्षानाम समास तिसरा ॥ ३॥**

**समास चवथा : स्वगुणपरीक्षा (क) ॥ श्रीराम् ॥**

लेंकुरें उदंड जालीं । तों ते लक्ष्मी निघोन गेली । बापडीं भिकेसी लागलीं । कांहीं खाया मिळेना ॥ १॥

मुलेबाळें व्हावयाला लागली तेव्हां पुष्कळ झालीं, पण इतक्यांत योग असा आला कीं संपत्ति नाहींशी झालीं,बापड्यांना खाण्यासाठीं भीक मागायची पाळी आली.

लेंकुरें खेळती धाकुटीं । येकें रांगती येकें पोटीं । ऐसी घरभरी जाली दाटी । कन्या आणी पुत्रांची ॥ २॥

धाकटी पोरें खेळत आहेत,तान्ही रांगत आहेत,पोटातं आहेच (स्त्री गरोदर आहें) अशी घरात मुलामुलींची गर्दी झालीं.

देवसेंदिवसा खर्च वाढला । यावा होता तो खुंटोन गेला । कन्या उपवरी जाल्या, त्यांला- । उजवावया द्रव्य नाहीं ॥ ३॥

( यावा - मिळकत, येणी )

दिवसेंदिवस खर्च वाढु लागला.यावा प्राप्ति खुंटली,मुली लग्नाच्या झाल्या.पण त्यांच्या उजवण्या करायला (लग्नाला) द्रव्य नाहीं.

मायेबापें होतीं संपन्न । त्यांचें उदंड होतें धन । तेणें करितां प्रतिष्ठा मान । जनीं जाला होता ॥ ४॥

आईबाप श्रीमंत होते,त्यांच्याजवळ पुष्कळ धन होतें,त्यायोगे जगांत नावलौकीक वाढलां होता.

भरम आहे लोकाचारीं । पहिली नांदणूक नाहीं घरीं । देवसेंदिवस अभ्यांतरीं । दरिद्र आलें ॥ ५॥

त्या वेळच्या मोठेपणाचा लोंकात भ्रम मात्र राहिला,पहिली श्रीमंतीची राहणी आतां राहिली नाही.दिवसेंदिवस घरांत गरीबी वाढत चालली.

ऐसी घरवात वाढली । खातीं तोंडें मिळालीं । तेणें प्राणीयांस लागली । काळजी उद्वेगाची ॥ ६॥

असा घर प्रपंच वाढला,खाणारी पुष्कळ झालीं.त्यामुळे त्या प्राण्याला काळजीने व उद्वेगानें ग्रासुन टाकलें.

कन्या उपवरी जाल्या । पुत्रास नोवर्या आल्या । आतां उजवणा केल्या । पहिजेत कीं ॥ ७॥

मुली लग्नाच्या झाल्या,पुत्रास नोव-या सांगुन आल्या,आतां लग्ने झाली पाहीजेत.(ह्या सा-या लग्नाना पैसे तर पाहिजेत.)

जरी मुलें तैसींच राहिलीं । तरी पुन्हां लोकलाज जाली । म्हणती कासया व्यालीं । जन्मदारिद्र्यें ॥ ८॥

मुलें जर तशींच राहीलीं तर लोकांत लज्जेनें तोंड काढतां येणार नाही,ह्या जन्म-दरिद्र्यानीं एवढा पोरवडा कशाला करुन ठेवला ? असे लोक म्हणतील.

ऐसी लोकलाज होईल । वडिलांचें नांव जाईल । आतां रुण कोण देईल । लग्नापुरतें ॥ ९॥

असा लौकिकातं कमीपणा येईल.वाडवडिलांच्या नांवास बट्टा लागेल,आता लग्नाच्या खर्चापुरते तरी कर्ज कोण देईल ?(ही चिंता)

मागें रुण ज्याचें घेतलें । त्याचें परतोन नाहीं दिल्हें । ऐसें आभाळ कोंसळलें । उद्वेगाचें ॥ १०॥

पूर्वी ज्यांचे कर्ज घेतलें त्याची परतफेड  केली नसल्यामुळें (पत कमी झाली) काळजीनें चोहोकडून आभाळ फाटल्यासारखें झालें.

आपण खातों अन्नासी । अन्न खातें आपणासीं । सर्वकाळ मानसीं । चिंतातुर ॥ ११॥

आपण खातों अन्नाला,पण अन्न खाते आपणाला अशी त्यांस रात्रंदिवस काळजी लागून राहिली.

पती अवघीच मोडली । वस्तभाव गाहाण पडिली । अहा देवा वेळ आली । आतां डिवाळ्याची ॥ १२॥

( पती - पत, अवघीच मोडली - राहिली नाही , डिवाळ्याची - दिवाळे निघण्याची )

पत सगळी मोडून गेली,जवळचें किडूकमिडूक सर्व गहाण पडलें. देवा आतां दिवाळे निघण्याची वेळ आलीं.

कांहीं केला ताडामोडा । विकिला घरींचा पाडारेडा । कांहीं पैका रोकडा । कळांतरें काढिला ॥ १३॥

काहीं मोडतोड केली,काही खोड रेडे विकलें व काहीं रोकड पैसा कर्जाऊ (कळांतरे) काढला.

ऐसें रुण घेतलें । लोकिकीं दंभ केलें । सकळ म्हणती नांव राखिलें । वडिलांचें ॥ १४॥

असे कर्ज काढून लोकांत (लग्नाचा थाट करुन) श्रीमंतीचा डौल मिरविलां.वडिलांचें नांव राखलें असे सर्व लोक म्हणूं लागलें!

ऐसें रुण उदंड जालें । रिणाइतीं वेढून घेतलें । मग प्रयाण आरंभिलें । विदेशाप्रती ॥ १५॥

( रिणाइतीं - सावकार )

ह्या प्रकारें कर्जाचा बोजा खूप वाढला,सावकारांनी त्याला (तगादे कर करुन) वेढून घेतलें,मग परदेशात जायला निघाला (देशांतर केंलें)

दोनी वरुषें बुडी मारिली । नीच सेवा अंगीकारिली । शरीरें आपदा भोगिली । आतिशयेंसीं ॥ १६॥

तिकडे दोन वर्षे बुडी दिली (तोड चुकविलें),हलकट नोकरी पत्करली (परदेशी हलकी कामें केली), शरीरानें नानाप्रकारचे अतिशय हाल सोसलें. (शरीरकष्ट फार सोसलें)

कांहीं मेळविलें विदेशीं । जीव लागला मनुष्यांपासीं । मग पुसोनियां स्वामीसी । मुरडता जाला ॥ १७॥

परदेशांत काहीं द्रव्य संचय केला,पण लक्ष घरच्या माणसांकडें लागले होतें. म्हणून मालकास विचारुन घराकडे परत फिरला (मुरडता जाला.)

तंव तें अत्यंत पीडावलीं । वाट पाहात बैसलीं । म्हणती दिवसगती कां लागली । काये कारणें देवा ॥१८॥

( काये कारणें - काय करावे )

घरी येऊन पाहतो तों इकडें घरच्या माणसाचेही गरिबीमुळें हाल होत होते,ह्याची एकसारखी वाट पहात ती बसली होतीं ह्याला इतकें दिवस का लागलें ?देवा आतां आम्ही काय करावे असे म्हणत होतीं.

आतां आम्ही काये खावें । किती उपवासीं मरावें । ऐसियाचे संगतीस देवें । कां पां घातलें आम्हांसी ॥१९॥

आंता आम्ही काय खावें ?उपाशी तरी किती मरावें ?(आम्ही उपासमार किती सोसावी ?) अशा करंट्याच्या संगतीला देवाने आम्हाला कशाला घातले ?

ऐसें आपुलें सुख पाहाती ।परी त्याचें दुःख नेणती । आणी शक्ती गेलियां अंतीं।कोणीच कामा न येती॥२०॥

असे जें ते आपले सुख पाहतात. पण त्यांचे दुःख जाणीत नाहीत.(पण त्यांच्या दुःखाची जाणीव कोणाला होती ?)(शक्ति असतांना ही दशा) आणि शक्ति गेल्यावर तर कोणीही उपयोगी पडत नाहीं.

असो ऐसी वाट पाहतां । दृष्टीं देखिला अवचिता । मुलें धावती, ताता । भागलास म्हणौनी ॥२१॥

अशी वाट पहाता पहाता (परदेशाहून आलेला) हा (घरचा कर्ता मनुष्य) एकाएकी दृष्टीस पडलां,मुले बाबा,दमलां बरे तुम्ही! असें म्हणून त्यांस भेटावयाला धावलीं.

स्त्री देखोन आनंदली । म्हणे आमुची दैन्यें फिटली । तंव येरें दिधली । गांठोडी हातीं ॥ २२॥

त्याला पहातांच त्याच्या बायकोला आतां आपले दैन्य दूर झालें असे वाटून आनंद झाला. इतक्यात त्यानें पैक्याची गांठोडी स्वाधीन केली.

सकळांस आनंद जाला ।म्हणती आमुचा वडील आला । तेणें तरी आम्हांला ।आंग्या टोप्या आणिल्या ॥२३॥

सर्वांना मोठा आनंद झाला,आमचा बाबा आला,त्याने आम्हांस आंगडीटोपडी आणलीं.(असें म्हणूं लागली.)

ऐसा आनंद च्यारी देवस।सवेंच मांडिली कुसमुस।म्हणती हें गेलियां आम्हांस । पुन्हां आपदा लागती॥ २४॥

( कुसमुस - कुरबुर )

हा आनंद चार दिवस होतो न होतो तोच पुन्हां कुरकुर सुरु झालीं,कीं हें द्रव्य संपलें तर आमचें पुनरपि हाल होतील.

म्हणौनी आणिलें तें असावें । येणें मागुतें विदेशास जावें ।आम्ही हें खाऊं न तों यावें ।द्रव्य मेळऊन ॥२५॥

म्हणून आतां आणलेले द्रव्य तसेंच आमचेजवळ असावें आणि ह्यांनें पुन्हां परदेशांत जाऊन आमच्या जवळचें संपण्याच्या आंत अधिक द्रव्य मिळवुन आणावें.

ऐसी वासना सकळांची । अवघीं सोईरीं सुखाचीं । स्त्री अत्यंत प्रीतीची । तेहि सुखाच लागली ॥ २६॥

ही स्त्रीसुध्दा ,सर्वांची इच्छा  सगळी सोयरीं सुखाचींच असतातं.अत्यंत प्रीतीची जी बायको ती सुध्दा स्वत:च्या सुखाच्या मागे लागली.

विदेसीं बहु दगदला । विश्रांती घ्यावया आला । स्वासहि नाहीं टाकिला । तों जाणें वोढवलें ॥ २७॥

परदेशात फार हाल सोसून विश्रांतीसाठी हा घरी आला,पण घरी येऊन उसासा टाकतो न टाकतो तोच पुन्हा जाण्याची वेळ आलीं.

पुढें अपेक्षा जोसियांची । केली विवंचना मुहूर्ताची । वृत्ति गुंतली तयाची । जातां प्रशस्त न वटे ॥ २८॥

पुढें (जोसिया) जोश्याचेकडे जाऊन चांगला मुहूर्त पाहिला.पण मन घरांत गुंतल्यामुळे जावेंसे वाटेना.

माया मात्रा सिद्ध केली । कांहीं सामग्री बांधली । लेंकुरें दृष्टीस पाहिलीं । मार्गस्त जाला ॥ २९॥

काहीं वाटखर्ची (मायामात्र किंवा पडशी सिध्द केलीं) व फराळाचें बरोबर घेतलें.थोडासा शिधाही घेतला,मुलाबाळांना एकदा डोळे भरुन पाहिलें व वाटेला लागलां.

स्त्रियेस अवलोकिलें । वियोगें दुःख बहुत वाटलें । प्रारब्धसूत्र तुकलें । रुणानबंधाचें ॥ ३०॥

बायकोकडे पाहिले पण वियोग दुःखाने कंठ भरुन आला. एके ठिकाणी राहण्याचा ऋणानुबंध होता तो प्रारब्धाने तुटलां असे वाटतें.

कंठ सद्‌गदित जाला । न संवरेच गहिवरला । लेंकुरा आणी पित्याला । तडातोडी जाली ॥ ३१॥

गळा दाटून आला गहिवर आवरेना.बापलेकांची ताटातूट झालीं.

जरी रुणानुबंध असेल । तरी मागुती भेटी होईल । नाहीं तरी संगती पुरेल । येचि भेटीनें तुमची ॥३२॥

ऋणानुबंध असेल तर पुन्हा भेट होईल,नाहीतर हिच आमची-तुमची शेवटची भेट!

ऐसीं बोलोन स्वार होये । मागुता फीरफिरों पाहे । वियोगदुःख न साहे । परंतु कांहीं न चले ॥३३॥

असे बोलून घोड्यावर स्वार झाला,फिरुन फिरुन मागे पहातो.वियोगाचे दुःख सहन होत नाही,पण काही उपाय नाही.

आपुला गांव राहिला मागें । चित्त भ्रमलें संसारौद्वेगें । दुःखवला प्रपंचसंगें । अभिमानास्तव ॥ ३४॥

आपला गांव मागे राहिला,संसारदुःखाने चित्त भ्रमिष्ट झालें,(देह-गेह) अभिमानामुळें प्रपंच्याच्या संगतीने असे दुःख झालें.

ते समईं माता आठवली।म्हणे म्हणे धन्य ते माउली ।मजकारणें बहुत कष्टली।परी मी नेणेंचि मूर्ख ॥३५॥

त्यावेळी त्याला आईची आठवण झाली व तो म्हणतों,धन्य धन्य ती माउली! माझ्यासाठी तिने किती कष्ट सोसलें ? पण म्या मुर्खानें त्यावेळी काही जाणलें नाहीं.

आजी जरी ते असती । तरी मजला कदा न विशंभती।वियोग होतां आक्रंदती । ते पोटागि वेगळीच॥ ३६॥

( पोटागि - अंतःकरणातील कळकळ )

आज जर हयात असती तर ती मला कधी विसंबली नसती (मुळीच दूर जाऊ देती ना)वियोग होतांच मोठ्याने रडत बसली असती (माझा वियोग होतांच तिनें हंबरडा फोडला असता!) तो (पोटच्या पोराबद्दलचा) मायेचा उमाळा (पोटाग्नि-तो पोटाचा जाळ) काहीं वेगळाच आहें.

पुत्र वैभवहीन भिकारी । माता तैसाचि अंगिकारी । दगदला देखोन अंतरीं । त्याच्या दुःखें दुःखवे ॥ ३७॥

( दगदला - दगदग झाली )

मुलगा ऐश्वर्यहीन अगदी दरिद्री असला तरी आईला तो हवासा वाटतो. तो थकला भागला तर त्याच्या दुःखाने तिला अपार दुःख होतें.

प्रपंच विचारें पाहातां । हें सकळ जोडे न जोडे माता । हें शरीर जये करितां । निर्माण जालें ॥ ३८॥

ह्या एकंदर प्रपंचाचा विचार केला. तर सर्व काही मिळेल,पण जन्मदाती (जिच्यापासून हें शरीर जन्माला आलें) ती आईमात्र (एकदा गेली की) पुन्हा मिळणार नाही.

लांव तरी ते माया । काय कराविया सहश्र जाया । परी भुलोन गेलों वायां । मकरध्वजाचेनी ॥ ३९॥

( लांव - दुष्ट , मकरध्वजाचेनी - कामविकाराने )

कैदाशीण असली तरी आई ती आईच हजार बायका जरी असल्या तरी त्या काय कामाच्या ?पण मी कामलंपट होऊन (व्यर्थ भुललों) भुलून वायां गेलो.

या येका कामाकारणें । जिवलगांसिं द्वंद घेणें । सखीं तींच पिसुणें । ऐसीं वाटतीं ॥ ४०॥

ह्या एका कामाजीपंतांसाठी (कामवासनेपायी) जिवलगांशी भांडलो,वेगळा निघालो.सखे होते ते शत्रूसारखे वाटलें.(खरे मित्र होते त्यांनाच शत्रु करुन बसलो.)

म्हणौन धन्य धन्य ते प्रपंची जन ।जे मायेबापाचें भजन । करिती न करिती, मन। निष्ठुर जिवलगांसीं ॥४१॥

म्हणून जें प्रपंची लोक आईबापांची सेवाचाकरी करितात व जिवलगाशी निष्ठुरपणे वागत नाहीत तेच धन्य!

संगती स्त्रीबाळकाची । आहे साठी जन्माची । परी मायेबापीं कैंचीं । मिळतील पुढें ॥ ४२॥

( साठी - सोबत )

स्त्री-बालकांची संगती जन्मभर लागलीच आहें.पण आईबाप कोठून मिळतील ?

ऐसें पूर्वी होतें ऐकिलें । परी ते समईं नाहीं कळलें । मन हें बुडोन गेलें । रतिसुखाचा डोहीं ॥ ४३॥

हें सारे पूर्वी ऐकलेच होतें,पण त्यावेळी ते उमजलें नाहीं.तेव्हा मन रतिसुखाच्या (विषयसुखाच्या)डोहांत बुडून गेलें होते. (मन रतीसुखाच्या डबक्यांत बुडून मी आंधळा झालो.)

हे सखीं वाटती परी पिसुणें । मिळाली वैभवाकारणें । रितें जातां लाजिरवाणें । अत्यंत वाटे ॥ ४४॥

हीं (बायकापोरे)सख्खी जिवलग वाटतात.,परंतु वैभवाच्या लालचीनें जमलेली ही ठक (लबाड-पिसुनें) होत. त्यांच्याकडे रिकाम्या हाताने जायला फार लाज वाटतें.

आता भलतैसें करावें । परि द्रव्य मेळऊन न्यावें । रितें जातां स्वभावें । दुःख आहे ॥ ४५॥

आतां वाटेल ते हाल सोसून (वा नीच कामें करुन) पैका मिळवूनच परत घरीं जावें हे बरें.(रिकामें गेलो तर लोकांत फजिती होऊन दुःखाला तें कारण होईल).

ऐसी वेवर्धना करी । दुःख वाटलें अंतरीं । चिंतेचिये माहापुरीं । बुडोन गेला ॥ ४६॥

( ऐसी वेवर्धना करी - असे विचार मनात येऊ लागले )

अशी विवंचना (वेर्वधना) करतां करतां त्याला फार दुःख झालें. व तो अतिशय चिंताग्रस्त झाला.(चिंतेच्या महापुंरात बुडून गेला.)

ऐसा हा देह आपुला । असतांच पराधेन केला । ईश्वरीं कानकोंडा जाला । कुटुंबकाबाडी ॥ ४७॥

( कानकोंडा जाला - (देवकार्यासाठी) भिडस्त झाला , कुटुंबकाबाडी - कुटूबासाठी कष्ट )

असा हा नरदेह आपला स्वतंत्र असता तों त्याने पराधीन केला देवाशी विमुख (कानकोंडा) होऊन कुटुंबासाठी वाटेल ते काबाडकष्ट करायला तयार झाला (कुटुंबाचा ताबेदार झाला.)

या येका कामासाठीं । जन्म गेला आटाटी । वय वेचल्यां सेवटीं । येकलेंचि जावें ॥ ४८॥

ह्या एका कामामुळें सगळा जन्म ओढाताणीत (कष्टांत-आटाटी) गेलां. आणि आयुष्य संपल्यावर शेवटी जीवाला एकटेंच जावें लागणार.

ऐसा मनीं प्रस्तावला । क्षण येक उदास जाला । सवेंचि प्राणी झळंबला । मायाजाळें ॥ ४९॥

( झळंबला - गुरफटला )

अशा प्रकारे पश्र्चाताप होऊन क्षणभर तो प्राणी उदास झाला,पण लगेच पुन्हा मायाजाळात गुरफटला गेला.

कन्यापुत्रे आठवलीं । मनींहुनि क्षिती वाटली । म्हणे लेंकुरें अंतरलीं । माझीं मज ॥ ५०॥

मुलामुलींची आठवण होऊन मनास दु:ख झालें. आणि माझींच लेंकरे मला अंतरली हो,असे म्हणू लागला.

मागील दुःख आठवलें । जें जें होतें प्राप्त जालें । मग रुदन आरंभिलें । दीर्घ स्वरें ॥ ५१॥

पूर्वी जी जी दु:खे भोगावी लागली त्या सगळ्यांची आठवण झाली.मग मोठा गळा काढून रडावयास सुरवात केली.

आरुण्यरुदन करितां । कोणी नाहीं बुझाविता । मग होये विचारिता । आपुले मनीं ॥ ५२॥

परंतु अरण्यात रडून आक्रोश केला तरी समजूत घालण्यास (बुझविता) कोण येणार! पुन्हा आपल्याच मनाशी विचार करु लागला.

आतां कासया रडावें । प्राप्त होतें तें भोगावें । ऐसे बोलोनिया जीवें । धारिष्ट केलें ॥ ५३॥

आतां रडून काय उपयोग ?प्रारब्धात असेल ते भोगावे.असा मनाशीं विचार करुन जिवाचा धडा केला.

ऐसा दुःखें दगदला । मग विदेशाप्रती गेला । पुढे प्रसंग वर्तला । तो सावध ऐका ॥ ५४॥

असा दु:खानें गांजून गेला पुढे परदेशाला जाता झाला.(दु:खाने दगदगलेल्या त्या जिवाचे परदेशात पुढे काय काय झाले ते पुढील समासात सांवधपणे ऐका!

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्वगुणपरीक्षानाम समास चवथा ॥ ४॥**

**समास पाचवा : स्वगुणपरीक्षा ( ड ) ॥ श्रीराम् ॥**

पुढें गेला विदेशासी । प्राणी लागला व्यासंगासी । आपल्या जिवेसीं सोसी । नाना श्रम ॥ १॥

पुढे परदेशांत जाऊन आपल्या उद्योगधंद्याला लागला.अनेक प्रकारचे कष्ट स्वत:च्या जिवाला सोसूं लागला.

ऐसा दुस्तर संसार । करितां कष्टला थोर । पुढें दोनी च्यारी संवत्सर । द्रव्य मेळविलें ॥ २॥

असा हा दुस्तर संसार करतां करतां त्याला फार कष्ट सोसावे लागले,दोन चार वर्षे परदेशात काढून पैसा मिळविला.

सर्वेचि आला देशासी । तों आवर्षण पडिलें देसीं । तेणें गुणें मनुष्यांसी । बहुत कष्ट जाले ॥ ३॥

नंतर आपल्या गांवी येऊन पाहतो तर तो सा-या देशांत अवर्षणाने दुष्काळ पडलेला असून त्यायोगे माणसाचे फार हाल होत चालले आहेत (घरची माणसे अत्यंत हालात होती.)

येकांच्या बैसल्या अमृतकळा । येकांस चंद्री लागली डोळां । येकें कांपती चळचळा । दैन्यवाणीं ॥ ४॥

( बैसल्या अमृतकळा - गालफाडे बसली , चंद्री लागली डोळां - डोळे निस्तेज झाले )

एकाची गालफडे बसली होती तर एकाने डोळे पांढरे केले (एकाचे प्राण डोळ्यांत आले) होते. एक केविलवाणी अशी थरथर कांपू लागली होतीं.

येकें दीनरूप बैसलीं । येकें सुजलीं येकें मेलीं । ऐसीं कन्यापुत्रें देखिलीं । अकस्मात डोळां ॥ ५॥

एक दीन होऊन बसली आहेत, एक सुजलें, एक मेलेले अशी कन्यापुत्रांची झालेली दशा त्याच्या द्दष्टीस एकदम पडली.

तेणें बहुत दुःखी जाला । देखोनिया उभड आला । प्राणी आक्रंदों लागला । दैन्यवाणा ॥ ६॥

( उभड - भडभडू )

असा देखावा पाहून त्याचा दुःखाने गळा भरुन आला, व दीन होऊन तो ओक्साबोक्शी रडूं लागला.

तंव तीं अवघीं सावध जालीं । म्हणती बाबा बाबा जेऊं घाली ।अन्नालागीं मिडकलीं । झडा घालिती ॥७॥

( अन्नालागीं मिडकलीं  झडा घालिती - अन्नासाठी हपापलेल्या मुलांनी अंगावर झडप घातली )

(त्याचा आवाज ऐकतांच मुलें सावध झाली),बाबा,जेवायला घाला,खायला द्या,असे म्हणून अन्नासाठी हपापलेली ती मुले गाठोड्याशी झेप घेऊ लागली.

गांठोडें सोडून पाहाती । हातां पडिलें तेंचि खाती । कांहीं तोंडीं कांहीं हातीं । प्राण जाती निघोनी ॥ ८॥

गाठोंडे सोडून पाहून जें हाती लागेल ते ती खाऊ लागली,एक घास तोंडात व एक घास हातात अशा स्थितीत काहींचे प्राण गेलें.

तांतडी तांतडी जेऊं घाली । तों तें जेवितां जेवितां कांहीं मेलीं ।कांहीं होतीं धादावलीं। तेंहि मेलीं अजीर्णें॥९॥

( धादावलीं - अतिभूकेली )

घाईघाईने हा कोणाकोणाला खायला घालू लागला. ते खातांखातांच काही मेली. काहीनीं अधाशीपणाने फार खाल्यानें (धाधावलीं) त्यांना अजीर्ण होऊन तीहीं मेलीं.

ऐसीं बहुतेकें मेलीं । येक दोनीं मुलें उरलीं । तेंहि दैन्यवाणीं जालीं । आपलें मातेवांचुनी ॥ १०॥

अशा प्रकारें बहुतेक मुलें मेली.एक दोन मुले राहिलीं तीही आई नसल्यामुळे (आई मरण पावल्यामुळे) पोरकी दिसू लागली.

ऐसे आवर्षण आलें । तेणें घरचि बुडालें । पुढें देसीं सुभिक्ष जालें । आतिशयेंसी ॥ ११॥

अशाप्रकारें दुष्काळानें त्यांचे घर बसविलें.पुढे पाऊसपाणी   होऊन,देशात अतिशय सुबत्ता झाली.

लेकुरां नाहीं वाढवितें । अन्न करावें लागे आपुलेन हातें । बहु त्रास घेतला चित्तें । स्वयंपाकाचा ॥ १२॥

पण लेकरांना सांभाळण्यास घरी कोणी नाही.आपल्या हाताने स्वयंपाक करायची पाळी आली.पुढे स्वयंपाक करण्याचा मनाला फार त्रास वाटू लागला.

लोकीं भरीस घातलें । पुन्हां मागुतें लग्न केलें । द्रव्य होतें तें वेचलें । लग्नाकारणें ॥ १३॥

तशांत लोकांनीही भर दिल्यामुळे पुन्हा (तिसरे) लग्न केले,आणि बरोबर आणलेले सर्वद्रव्य खर्चून टाकलें.

पुन्हां विदेशासी गेला । द्रव्य मेळऊन आला । तव घरीं कळहो लागला । सावत्र पुत्रांसी ॥ १४॥

पुन्हा परदेशात द्रव्य मिळवून परत घरी येतो तों बायकोचे व तिच्या सवतीच्या मुलाचे (तिच्याच वयाच्या मुलाचें) भांडण सुरु होते.

स्त्री जाली न्हातीधुती । पुत्र देखों न सकती । भ्रताराची गेली शक्ती । वृद्ध जाला ॥ १५॥

ती स्त्री वयांत आली,मुलांचे व तिचे बिनसलेले व हा  स्वत: म्हातारा व अशक्त झालेला.

सदा भांडण पुत्रांचें । कोणी नायकती कोणाचें । वनिता अति प्रीतीचें । प्रीतिपात्र ॥ १६॥

मुलांच्या कलागती नेहमी चाललेल्या,कोणी कोणास जुमानीत नाहीं.बायकोवर अतिशय प्रेम (तिचा पक्ष घ्यावा तर मुले ऐकत नाहीत,मुलांचा पक्ष घ्यावा तर बायकोवरील प्रेमाने तसे करवत नाहीं.)

किंत बैसला मनां । येके ठाई पडेना । म्हणोनियां पांचा जणा । मेळविलें ॥ १७॥

तात्पर्य,उभयपक्षीं मनात अढी (किंत) बसल्यामुळे एकत्र राहाणें  जमेना म्हणून पांच पंच बालाविलें.

पांच जण वांटे करिती । तों ते पुत्र नायेकती । निवाडा नव्हेचि अंतीं- । भांडण लागलें ॥ १८॥

पंचांनी करुन दिलेले वाटे मुलांस पटेनांत,त्यामुळे तंट्याचा निकाल लागेना, म्हणून भांडण जोरात जुंपलें.

बापलेकां भांडण जालें । लेंकीं बापास मारिलें । तंव ते मातेनें घेतलें । शंखतीर्थ ॥ १९॥

( शंखतीर्थ - बोंब मारली )

बापलेकांचे भांडण होऊन मुलांनी बापास ठोकलें.तेव्हा आईनें शंखवाद्य सुरु केलें.

ऐकोनि मेळले लोक । उभे पाहाती कौतुक । म्हणती बापास लेक । कामा आले ॥ २०॥

तें ऐकून लोकांची गर्दी जमली (लोक तमाशा पाहू लागलें),भोवतीं सगळेजण मजा पहात ऊभे राहून म्हणू लागलें की,म्हातारपणी बापाला मुले चांगली उपयोगी पडली!

ज्या कारणें केले नवस । ज्या कारणें केले सायास । ते पुत्र पितीयास । मारिती पहा ॥ २१॥

अहो ज्यांच्यासाठी (ज्या लेकरांसाठी नवस सायास केले) तीच मुले बापाला म्हातारपणी मारत आहेत पहा.!

ऐसी आली पापकळी । आश्चिर्य मानिलें सकळीं । उभे तोडिती कळी । नगरलोक ॥ २२॥

( पापकळी - पापामुळे कलह )

असा हा पापरुपी कलीचा (पापाच्या काळाचा किंवा पापरुपी कलहाचा) प्रताप पाहून सर्वांस मोठे आश्र्चर्य वाटलें. उभ्या असलेल्या गांवक-यांनी भांडण सोडविलें.

पुढें बैसोन पांच जण । वांटे केले तत्समान । बापलेंकांचें भांडण । तोडिलें तेहीं ॥ २३॥

नंतर पांचजणांनी जमून सर्वांचे समाधान होईल असे वाटें केले व बापलेकांचे भांडण मिटवले.

बापास वेगळें घातलें । कोंपट बांधोन दिधलें । मन कांतेचें लागलें । स्वार्थबुद्धी ॥ २४॥

बापाला वेगळे काढून त्याला झोपडी बांधून दिली.तेथे (रहात असतां)त्याची बायको संसारस्वार्थ पाहू लागली.

कांता तरुण पुरुष वृद्ध । दोघांस पडिला संमंध । खेद सांडून आनंद । मानिला तेहीं ॥ २५॥

बायको तरुण व नवरा वृध्द तथापि अशा स्थितीत दोघेही आनंद मानून राहू लागली.

स्त्री सांपडली सुंदर । गुणवंत आणी चतुर । म्हणे माझें भाग्य थोर । वृद्धपणीं ॥ २६॥

तो नवरा म्हणू लागला की माझे भाग्य मोठे थोर म्हणून म्हातारपणी मला अशी रुपवान गुणवान व चतुर बायको मिळाली.

ऐसा आनंद मानिला । दुःख सर्वही विसरला । तंव तो गल्बला जाला । परचक्र आलें ॥ २७॥

झालेले असे दुःख विसरुन संसारात असा आनंद मानतो तोच परचक्र आल्याची हूल उठली.

अकस्मात धाडी आली । कांता बंदीं धरून नेली । वस्तभावही गेली । प्राणीयाची ॥ २८॥

( वस्तभाव - चिजवस्तू )

एकदम याच्या घरावर हल्ला आला,बायको चोरट्यांनी पकडून नेली.आणि याच्या घरातल्या जिनसापानसाही लुटल्या गेल्या.(ह्याची चिजवस्तु व बायको घेऊन शत्रु गेलें!)

तेणें दुःख जालें भारीं । दीर्घ स्वरें रुदन करी । मनीं आठवे सुंदरी । गुणवंत ॥ २९॥

(केवढा दुःखाचा प्रसंग) त्यामुळे शोकाकुल होऊन मोठ्यानें गळा काढून मनांत बायकोचे रुप व गुण आठवुन रडू लागलां.

तंव तिची वार्ता आली । तुमची कांता भ्रष्टली । ऐकोनियां आंग घाली । पृथ्वीवरी ॥ ३०॥

तो तिला भ्रष्ट केली अशी बातमी ऐकुन शोकानें जमिनीवर गडबडा लोळू लागला.

सव्य अपसव्य लोळे । जळें पाझरती डोळे । आठवितां चित्त पोळे । दुःखानळें ॥ ३१॥

( सव्य अपसव्य लोळे - डावे उजवे गडबडा लोळे )

ह्या कुशीवरुन त्या कुशीवर सारखा लोळण घेत आहे.डोळ्यात दुःखाश्रु वाहात आहेत व बायकोचे स्मरण होतांच अंतःकरणाला भाजल्याप्रमाणें दुःखाचे चटके बसूं लागलें.

द्रव्य होतें मेळविलें । तेंही लग्नास वेचलें । कांतेसिही धरून नेलें । दुराचारी ॥ ३२॥

तो म्हणू लागला की,पैका मिळवून आणला होता तो लग्नास (बायकोपायी) खर्च केलां व (बायकोपरी बायको गेली)बायकोलाही दुष्टांनी धरुन नेलें.

मजही वृद्धाप्य आलें । लेंकीं वेगळें घातलें । अहा देवा वोढवलें । अदृष्ट माझें ॥ ३३॥

मला म्हातारपण आलें,पोरांनी वेगळे घातले. अरेरे,काय देवा, काय माझे दुदैव ओढवले हें!

द्रव्य नाहीं कांता नाहीं । ठाव नाहीं शक्ति नाहीं । देवा मज कोणीच नाहीं । तुजवेगळें ॥ ३४॥

पैसा नाही,स्त्री नाही,घर (आश्रय) नाहीं.आंगात शक्ति नाहीं.देवा,आतां तुझ्यावाचून मला कोणी नाहीं.

पूर्वी देव नाहीं पुजिला । वैभव देखोन भुलला । सेखीं प्राणी प्रस्तावला । वृद्धपणीं ॥ ३५॥

पूर्वी (तारुण्यांत) (तारुण्याची रग आंगात असंता ऐश्वर्याला भुलून ) देवाचें भजनपुजन केलें नाही.त्यावेळी वैभवाला भुलला आणि शेवटी म्हातारपणी त्याला (आतां) पश्र्चाताप करण्याची पाळी आली.

देह अत्यंत खंगलें । सर्वांग वाळोन गेलें । वातपीत उसळलें । कंठ दाटला कफें ॥ ३६॥

(म्हातारपणाच्या यातना काय वर्णाव्यात ?) अतिशय खंगला,सगळे अंग वाळून गेले,वातपित्ताचे विकार वाढले.व कफाने गळा दाटून आला.

वळे जिव्हेची बोबडी । कफें कंठ घडघडी । दुर्गंधी सुटली तोंडीं । नाकीं स्लेष्मा वाहे । ३७॥

जिभेची बोबडी वळली,कफामुळे कंठ अगदी घरघर वाजू लागला.तोंडाला घाण सुटली व नाकातुन शेंबूड वाहू लागला.

मान कांपे चळचळां । डोळे गळती भळभळां । वृद्धपणीं अवकळा । ठाकून आली ॥ ३८॥

मान चळचळा (लटपट) कापूं लागली,डोळ्यांस पाण्याची धार लागली (डोळे चिघळू लागलें) म्हातारपणी अशी दुर्दशा येऊन उभी राहिली.

दंतपाटी उखळली । तेणें बोचरखिंडी पडिली । मुखीं लाळ गळों लागली । दुर्गंधीची ॥ ३९॥

बत्तिशी पडल्यामुळे तोंडाचें बोडकें झालें,त्यामुळे तोंडातून घाणेरडी (दुर्गंध) लाळ वाहूं लागली.

डोळां पाहातां दिसेना । कानीं शब्द ऐकेना । दीर्घ स्वरें बोलवेना । दमा दाटे ॥ ४०॥

डोळ्यांनी दिसेना,कानांनी ऐकूं येईना,मोठ्यानें बोलावयास जावें तर दमा लागतो (दम्याने बेजार झाला)

शक्ती पायांची राहिली । बैसवेना मुरुकुंडी घाली । बृहती वाजों लागली । तोंडाच ऐसी ॥ ४१॥

( बृहती वाजों लागली - गुदद्वारातून वारा सुरु झाला )

पायांची शक्ति संपली,चालवेना,नुसतें नीट बसतां सुध्दा येईना,मुरकुंडी घालून पडतो,तोंडातसारखी बृहत्ती वाजू लागली.

क्षुधा लागतां आवरेना । अन्न समई मिळेना । मिळालें तरी चावेना । दांत गेले ॥ ४२॥

भूक आवरत नाहीं,(जिभेला) भुकेच्या वेळी अन्न मिळेना. व मिळाले तरी दांत गेल्यामुळे तें चावंता येईना (दांत कोठे होते ?)

पित्तें जिरेना अन्न । भक्षीतांच होये वमन । तैसेचि जाये निघोन । अपानद्वारें ॥ ४३॥

(कसेबसें) गिळले तर पित्ताने अन्न जिरेना खातांच वांती होऊन तें उलटून पडतें,अथवा अपानद्वाराने तसेच निघून जातें.

विष्टा मूत्र आणि बळस । भोवता वमनें केला नास । दुरून जातां कोंडे स्वास । विश्वजनाचा ॥४४॥

विष्ठा,मूत्र,बडके,ओक ह्या सर्वांची सभोवती घाण झालेली,लोक दुरुन जाऊ लागलें तरी त्यांस नाक दाबून धरावें लागतें (इतर लोक दुरुनच कासावीस होतात)

नाना दुःखें नाना व्याधी । वृद्धपणीं चळे बुद्धी । तऱ्हीं पुरेना आवधी । आयुष्याची ॥ ४५॥

म्हातारपणी अशी अनेक दुःखें व रोग भोगावे लागतात.बुध्दि चळते पण आयुष्य संपत नाही.

पापण्या भवयाचे केंश । पिकोन झडले निःशेष । सर्वांगीं लोंबलें मांस । चिरकुटासारिखें ॥ ४६॥

पापण्यांचे व भुवयांचे केंस पिकून झडून गेलें, सा-या अंगभर चिरगुटा सारखे मांस लोंबू लागलें.

देह सर्व पारिखें जालें । सवंगडे निःशेष राहिले । सकळ प्राणीमात्र बोले । मरेना कां ॥ ४७॥

देह सगळा पराधीन (पारिखें) झाला,स्नेहीसोबती कोणीही राहिला नाही.सगळे म्हणू लागलें, की हा आतां मरत का नाही ?

जें जन्मून पोसलीं । तेंचि फिरोन पडिलीं । अंतीं विषम वेळ आली । प्राणीयांसी ॥ ४८॥

जन्मापासून ज्यांचे पालनपोषण केलें तीच मुले-बाळे उलटून पडलीं.शेवटी त्या प्राण्यावर असा दुर्धर प्रसंग ओढवला.

गेलें तारुण्य गेलें बळ । गेलें संसारीचें सळ । वाताहात जालें सकळ । शरीर आणी संपत्ती ॥ ४९॥

तारुण्य गेलें बळ गेलें.संसार करण्याची उकळी (वेड) (सळ) जिरली,सर्व वाताहात होऊन शरीर व संपत्ति नाहीशी झाली.

जन्मवरी स्वार्थ केला । तितुकाहि वेर्थ गेला । कैसा विषम काळ आला । अंतकाळीं ॥ ५०॥

जन्मभर (माझेपणा धरुन,माझे माझे करुन) स्वार्थीपणाने जे मिळविले ते सर्व व्यर्थ गेलें.अंतकाळी असा कठीणपणा आला पाहा!

सुखाकारणें झुरला । सेखीं दुःखें कष्टी जाला । पुढें मागुता धोका आला । येमयातनेचा ॥ ५१॥

सुखासाठी शरीर पण शेवटी झिजवलें,दुःखाने कष्टी झाला व मरणानंतर भोगाव्या लागणा-या यमयातनांचे भय उभे राहीलें.(अखेर यमयातना सोसण्याचा कठीण प्रसंग आला)

जन्म अवघा दुःखमूळ । लागती दुःखाचे इंगळ । म्हणोनियां तत्काळ । स्वहित करावें ॥ ५२॥

एकंदरीत जन्मच सगळ्या दुःखाचे मूळ आहें,(दुःख ज्यांचे मूळ आहें) जन्मापासुन दुःखाचे निखारे प्राण्याला पोळीत असतात.म्हणून ताबडतोब आपल्या जन्माचे कल्याण करण्याच्या मार्गास लागावें. (तात्काळ जीवानें आत्महित करावें).

असो ऐसें वृद्धपण । सकळांस आहे दारुण । म्हणोनियां शरण । भगवंतास जावें ॥ ५३॥

असो,असे हे भयंकर म्हातारपण सर्वांस भोगावे लागणार आहें (कोणास चुकत नाही),म्हणून देवाला शरण जावें.

पुढें वृद्धीस तत्वतां । गर्भीं प्रस्तावा होता । तोचि आला मागुता । अंतकाळीं ॥ ५४॥

( वृद्धीस - वृद्धास )

गर्भात असता जो पश्र्चाताप त्या वृध्द आईच्या उदरांत असतांनाच प्राण्याला होत होता,तोच पुढे (म्हातारपणीं) वृध्दिंगत झाला.(तोच पश्र्चातापाचा प्रसंग पुन्हा अंतःकाळी ओढवला).

म्हणौनि मागुतें जन्मांतर । प्राप्त मातेचें उदर । संसार हा अति दुस्तर । तोचि ठाकून आला ॥ ५५॥

म्हणून पुन्हा जन्म,पुन्हा आईच्या उदरांत गर्भवास (जननी-जठर) प्राप्त होऊन दुस्तर (दुःखरुप) असा जो संसार तोच पुन्हाः पुढे येऊन उभा राहिला.(संसारदुःखाची दुसरी आवृत्ति निघाली.)

भगवद्भजनावांचुनी । चुकेना हे जन्मयोनी । तापत्रयांची जाचणी । सांगिजेल पुढे ॥ ५६॥

( तापत्रय - त्रिविध ताप )

भगवंताच्या भजनाशिवाय (भगवद्भक्तीवाचून) हे जन्ममरण चुकावयचे नाहीं.(ही जन्म मरणाची यातायात टळत नाही.).

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्वगुणपरीक्षानाम समास पाचवा ॥ ५॥**

**समास सहावा : आध्यात्मिक ताप ॥ श्रीराम् ॥**

तापत्रयाचें लक्षण । आतां सांगिजेल निरूपण । श्रोतीं करावें श्रवण । यकाग्र होऊनी ॥ १॥

आता तापत्रयाच्या लक्षणांचे निरुपण सांगू. ते श्रोत्याने एकाग्रतेने एकावें.

जो तापत्रैं पोळला । तो संतसंगें निवाला । आर्तभूत तोषला । पदार्थ जेवी ॥ २॥

( आर्तभूत तोषला - आतुर /लोभी संतोष पावला , पदार्थ जेवी - हवी असलेली वस्तू )

आतुर (आशाळभूत-अंर्तभूत) मनुष्य इच्छित पदार्थाच्या प्राप्तीने जसा संतोषित होतो तसा त्रिविध तापांनी पोळलेला मनुष्य शेवटीं संतसंगतीने शांत होतो.

क्षुधाक्रांतास मिळे अन्न । तृषाक्रांतास जीवन । बंदीं पडिल्याचें बंधन- । तोडिनां, सुख ॥ ३॥

भुकेलेल्यास अन्न,तान्हेलेल्यास पाणी व बंदिस्तास मुक्तता मिळाली (बंधन तुटलें) म्हणजे सुख होते.

माहापुरें जाजावला । तो पैलतीरास नेला । कां तो स्वप्नींचा चेइला । स्वप्नदुःखी ॥ ४॥

(माहापुरें जाजावला - महापुरात सापडून घाबरलेला , चेइला - जागे झाला , स्वप्नदुःखी - स्वप्नात दु:खी)

महापुरांत सांपडून घाबरलेल्या मनुष्यास (बुडत्यास) पलीकडच्या काठांस नेलें अथवा स्वप्नांतील दुःखाने दुःखी झालेल्यास जागें केले.(जागृति)

कोणी येकासी मरण- । येतां, दिलें जीवदान । संकटास निवारण । तोडितां सुख ॥ ५॥

कोणी एकास मृत्युच्या दाढेतून वाचविले.(जीवदान दिलें),संकटग्रस्तांना संकटापासून मुक्त केले म्हणजें सुख होतें.

रोगियास औषध । सप्रचित आणी शुद्ध । तयासी होये आनंद । आरोग्य होतां ॥ ६॥

रोग्याला अनुभवाचे व शुध्द औषध देऊन आरोग्य मिळालें असतां आनंद होतो.

तैसा संसारें दुःखवला । त्रिविधतापें पोळला । तोचि येक अधिकारी जाला । परमार्थासी ॥ ७॥

त्याचप्रमाणे ज्याला संसारात दुःख झालें व त्रिविध तापाचे चटके बसले,तोच एकटा परमार्थाला अधिकारी (योग्य) होतो.ज्याला जेव्हा जें पाहिजें त्याला तेव्हा तें मिळाल्यानें जसा अत्यंत आनंद होतो,त्याचप्रमाणे तापत्रयसंप्तास सत्संगतीपासून परमानंद प्राप्त होतो.संसारदुःखाने व तापत्रयाने जो पोळला जातो तोच परमार्थाचा अधिकारी होतो.

ते त्रिविध ताप ते कैसे । आतां बोलिजेत तैसे । येविषईं येक असे । वाक्याधार ॥ ८॥

(असो.आतां तापत्रयाचीं लक्षणें ग्रंथ वचनाधारें सांगतों.) ते त्रिविधताप कसलें,तें यथातथ्य सांगतो ह्याविषयीं ग्रंथवचनांचा आधार देंतो.

(श्लोक ॥ देहेंद्रियप्राणेन सुखं दुःखं च प्राप्यते । इममाध्यात्मिकं तापं जायते दुःक देहिनाम् ॥ १ ॥ सर्वभूतेन संयोगात् सुखं दुःखं च जायते । द्वितीयतापसंतापः सत्यं चैवाधिभौतिकः ॥ २ ॥ शुभाशुभेन कर्मणा देहांते यमयातना । स्वर्गनरकादिं भोक्तव्यमिदं चैवाधिदैविकम् ॥ ३ ॥ )

येक ताप आध्यात्मिक । दुजा तो आदिभूतिक । तिसरा आदिदैविक । ताप जाणावा ॥ ९॥

अध्यात्मिक,आधिभौतिक व आधिदैविक असे तीन प्रकारचें ताप आहेत.(त्यांची लक्षणे यथाक्रम ३ समांसात सांगतो)

आध्यात्मिक तो कोण । कैसी त्याची वोळखण । आदिभूतिकांचें लक्षण । जाणिजे कैसें ॥ १०॥

अध्यात्मिक ताप कोणता ?तो कसा ओळखावा ?आधिभौतिकाचें लक्षण कसें समजावें ?

आदिदैविक तो कैसा । कवण तयाची दशा । हेंहि विशद कळे ऐसा । विस्तार कीजे ॥ ११॥

आधिदैविक ताप कसा असतो ? त्याची स्थिती काय ?हे सर्व स्पष्ट कळेल असें सविस्तर सांगावे ?

हां जी म्हणोनि वक्ता । जाला कथा विस्तारिता । आध्यात्मिक ताप आतां । सावध ऐका ॥ १२॥

त्यावर वक्त्याने ठीक आहे असे म्हणून,निरुपण सुरु केलें,आतां अध्यात्मिक ताप सावध ऐका.

देह इंद्रिय आणी प्राण । यांचेनि योगें आपण । सुखदुःखें सिणे जाण । या नांव आध्यात्मिक ॥ १३॥

देह,इंद्रियें आणि प्राण (मन) ह्यांच्या संयोगानें सुखदुःखाचे कष्ट होतात त्यांस आध्यात्मिक ताप म्हणतात.

देहामधून जें आलें । इंद्रियें प्राणें दुःख जालें । तें आध्यात्मिक बोलिलें । तापत्रईं ॥ १४॥

देहांम धून जे येतें व इंद्रिये प्राण यांच्यायोगाने जे दुःख होतें त्यास तापत्रयातील आध्यात्मिक ताप असे म्हणतात.

देहामधून काये आलें । प्राणें कोण दुःख जालें । आतां हें विशद केलें । पाहिजे कीं ॥ १५॥

देहाम धून काय येतें व प्राणानें कोणते दुःख होते.हे आतां स्पष्ट करुन सागितले पाहिजे.

खरुज खवडे पुळिया नारु । नखरुडें मांजर्या देवि गोवरु । देहामधील विकारु । या नांव आध्यात्मिक ॥१६॥

खरुज,खवडे(डोक्यातील खरुज),पुळ्या,नारु,नखुरडें(नखाला वस्तरा लागून होणारे. ताप) खांकमांज-या,देवी,गोंवर इत्यादि जे देहांतील ताप त्यास अध्यात्मिक ताप म्हणतात.

काखमांजरी केशतोड । वोखटें वर्ण काळफोड । व्याधी मूळव्याधी माहाजड । या नांव आध्यात्मिक ॥१७॥

( वोखटें वर्ण काळफोड - वाईट पण सडणारा व्रण व काळपुळी, माहाजड - अतिदुःखदायक )

काखमांजरी,केसतोड,वाईटव्रण (वाईट डाग,काळाठ्ठिक्कर पडणें),काळाफोड,व्याधि (महारोग),(महाजड) दुःसह असा मूळव्याध-रोग.

अंगुळवेडे गालफुगी । कंड लागे जे वाउगी । हिरडी सुजे भरे बलंगी । या नांव आध्यात्मिक ॥ १८॥

( अंगुळवेडे - बोटांचे नखुरडे , भरे बलंगी - दाताातील खुसपट )

कांडरु,गालफुगी (गालगुंड),उगीच खाज सुटणें, हिरडी सुजणें,बाजरीच्या निंबु-याचें कसपट तोंडांत सलणें (कळा निघणें)(भरे-दांतात भरे,बलंगी-कळा निघणें)

वाउगे फोड उठती । कां ते सुजे आंगकांती । वात आणी तिडका लागती । या नांव आध्यात्मिक ॥ १९॥

उगीच आंगावर फोड उठतात,शरीर सुजतें,वात शिरुन कळा लागतांत.

नाइटे अंदु गजकर्ण । पेहाचे पोट विस्तीर्ण । बैसलें टाळें फुटती कर्ण । या नांव आध्यात्मिक ॥ २०॥

( अंदु - हाडयाव्रण , पेहाचे पोट - जलोदर , पोटफुगी , बैसलें टाळें - कानठळ्या बसणे )

नायटे,(अदुं) हाड्याव्रण,गजकर्ण,(पेंहाचें पोट) पोटफुगी,कानठळ्या बसणें,कान फुटणें,

कुष्ट आणि वोला कुष्ट । पंड्यारोग अतिश्रेष्ठ । क्षयरोगाचे कष्ट । या नांव आध्यात्मिक ॥ २१॥

( वोला कुष्ट - कुष्टरोग.महारोग , पंड्यारोग - रक्तक्षय )

फोड,(वोला कुष्ट-महारोग) गलितकुष्ठ,दुःसाध्य पंडुरोग,क्षयरोगाच्या यातना;

वाटी वटक वायेगोळा । हातीं पाईं लागती कळा । भोवंडी लागे वेळोवेळां । या नांव आध्यात्मिक ॥ २२॥

( वाटी वटक वायेगोळा - पेटके,वांती,गुबारा )

गुडघी (वाट-गांठ सरकणें),(वटक) डबा (लहानमुलांच्या पोटांत दुधाच्या गांठी बनणें),वायुगोळा,हातपायांस कळा लागणें.वरचेवर घे-या (भोंवडी) येणें.

वोलांडा आणी वळ । पोटसुळाची तळमळ । आर्धशिसी उठे कपाळ । या नांव आध्यात्मिक ॥ २३॥

( वोलांडा आणी वळ - गर्मी गाठ )

उपदंश (वोलांडा-उपदंश झालेल्याची लघवी ओलाडून गेल्यानें होणारा विकार),बद (वळ),पोटशूळाचें तळमळणें,अर्धशिशिने कपाळ दुखणें.

दुःखे माज आणि मान । पुष्ठी ग्रीवा आणि वदन । अस्तिसांदे दुःखती जाण । या नांव आध्यात्मिक॥२४॥

( माज - कंबर, पुष्ठी ग्रीवा - पाठ व गळा )

कंबर (माज),मान,पाठ,गळा,तोंड,हाडांचे सांधें इत्यादि,दुखणें.

कुळिक तरळ कामिणी । मुरमा सुंठरें माळिणी । विदेसीं लागलें पाणी । या नांव आध्यात्मिक ॥२५॥

(मुरमा सुंठरें माळिणी - मुरूम, गळवे , नाकातील फोड , कुळिक तरळ कामिणी - मोडशी,अजीर्ण,कावीळ )

मोडशी (कुळिक),अजीर्णामुळें होणारी हागओक (तरळ),कावीळ (कामिणी),मुरमाच्या पुटकुळ्या,ओलांडा फोड (पिंवळ्या फडक्यांत पांच किंवा सात जोंधळे बांधून फोडावरुन उतरुन रस्त्यांत टांकतात.,ते ओलांडल्यापासून होणारीं गळवें),माळीण(नांकातील गळवे) परदेशाचें पाणी बाधणे,ह्यायोगें दुःख होणे.

जळसोस आणी हिवारें । गिरीविरी आणी अंधारें । ज्वर पाचाव आणी शरें । या नांव आध्यात्मिक ॥ २६॥

( जळसोस - जलशोष, कोरड , हिवारें - हिवताप , गिरीविरी - चक्कर , अंधारें - अंधारी येणे , पाचाव - दृष्ट लागून दुखणे उलटणे, शारें - थंडी )

पाण्याचा शोष पडणें,हिंवतांप (हिंवारें),भोवळ,डोळ्यापुढें अंधा-या येणें,ताप उलटलेले दुखणें (ज्वरपाचाव),अंगावर शहारें येंणें (शारे)

शैत्य उष्ण आणी तृषा । क्षुधा निद्रा आणी दिशा । विषयतृष्णेची दुर्दशा । या नांव आध्यात्मिक ॥ २७॥

( तृषाक्षुधा - तहानभूक , दिशा - हगवण )

शैत्य (सर्दी),उष्णता,तहान भुक,झोंप,परसाकडेंस जाण्याची व्यथा (दिशा-आमांश),विषयवासनेंमुळें होणारी दुर्दशा.

आळसी मूर्ख आणी अपेसी ।भय उद्भवे मानसीं । विसराळु दुश्चित्त आहिर्निशी। या नांव आध्यात्मिक॥२८॥

आळशी,मुर्ख,अपेशी,भित्रा,विसराळू,रात्रंदिवस दुश्चित (असणें)

मूत्रकोड आणी परमें । रक्तपिती रक्तपरमें । खडाचढाचेनि श्रमे । या नांव आध्यात्मिक ॥ २९॥

( मूत्रकोड - लघवी अडणे , खडाचढाचेनि - मूतखड्यामुळे वेदना )

लघवी कोडणें,परमा,रक्तपिती,रक्तपरमा,मूतखडा-(अगर-खडाचढा-शौचास खडा होणें) चढून होणा-या यातना.

मुरडा हागवण उन्हाळे । दिशा कोंडतां आंदोळे । येक वेथा असोन न कळे । या नांव आध्यात्मिक ॥ ३०॥

( दिशा कोंडतां आंदोळे - शौच कोंडल्यामुळे जीवाची तगमग )

मुरडा,हगवण,उन्हाळे,शौच बंद झाल्यामुळे तडफडणें (आंदोळे) व्याधि असून न समजणें.

गांठी ढळली जाले जंत । पडे आंव आणी रक्त । अन्न तैसेचि पडत । या नांव आध्यात्मिक ॥ ३१॥

( गांठी ढळली - गाठ सरकली )

वाट सरकणें,जंत होणें,आंव व रक्त पडणें,अन्न तसेच पडणें (अन्नातिसार)

पोटफुगी आणी तडस । भरला हिर लागला घांस । फोडी लागतां कासावीस । या नांव आध्यात्मिक ॥ ३२॥

( भरला हिर लागला घांस - ठसका व घास लागणे, फोडी लागतां - फोडास धक्का लागता )

पोट फुगणें,तडस लागणें,उसण (हिर-लचक) भरणें,घांस लागणें,फोडानें (फोडी-लहान फोड),जीव कासावीस होणें.

उचकी लागली उसित गेला । पीत उसळलें उलाट झाला । खरे पडसा आणी खोंकला । या नांव आध्यात्मिक ॥ ३३॥

( उसित गेला - घाशाखाली घास अडकला , उलाट झाला - वांती झाली, खरे पडसा - तोंड येऊन पडसे येणे.)

उचकी लागणें,(उसित) मानेंत घास अडकणें (ठसका लागणें),पित्त उसळणें,वांत्या (उलाट-उलटी) होणें,जिभेला काटे येणें (खरे),पडसें,खोकला,

उसळला दमा आणी धाप।पडजिभ ढासि आणी कफ । मोवाज्वर आणी संताप।या नांव आध्यात्मिक॥३४॥

दमा उसळणें,धाप लागणें,पडजीभ वाढणें,ढांस कफ,(एक प्रकारचा मोना) ताप संताप,

कोणी सेंदूर घातलाअ । तेणें प्राणी निर्बुजला । घशामध्ये फोड जाला । या नांव आध्यात्मिक ॥३५॥

कोणी शेंदूर घातल्यामुळे आवाज बसणें (निर्बुजणें),घशांत फोड येंणें.

गळसोट्या आणी जीभ झडे । सदा मुखीं दुर्गंधी पडे । दंतहीन लागती किडे । या नांव आध्यात्मिक ॥३६॥

( गळसोट्या आणी जीभ झडे - गालगुंड,घटसर्प,जिभेचा कर्करोग )

घटसर्प (गळसोट्या),जीभ झडणें,तोंडास नेहमी दुर्गंधि येणें,दांत नसणें,अथवा असल्यास किडके असणें.

जरंडी घोलाणा गंडमाळा । अवचिता स्वयें फुटे डोळा ।आपणचि कापी अंगुळा ।या नांव आध्यात्मिक ॥३७॥

( जरंडी - पाणथरी, घोलाणा - घोळणा , अंगुळा - बोट )

पानथरी (जरंडी),घोळणा (घोणा) फुटणें,गंडमाळा,एकाएकीं डोळाच फुटणे,आपल्या हातानें बोटे कापणें.

कळा तिडका लागती । कां ते दंत उन्मळती । अधर जिव्हा रगडती । या नांव आध्यात्मिक ॥ ३८॥

( अधर जिव्हा रगडती - ओठ,जीभ चावली जाते.)

कळा-तिडका लागणें,दांत उमळणें,दांतांखाली जीभ सापडणें.

कर्णदुःख नेत्र दुःख । नाना दुःखें घडे शोक । गर्भांध आणी नपुश्यक । या नांव आध्यात्मिक ॥ ३९॥

( गर्भांध - जन्मांध )

कानाचे रोग,डोळ्याचे रोग,नाना प्रकारच्या दु:खामुळे शोक होणें,गर्भांध (जन्मांध),नपुंसक.

फुलें वडस आणी पडळें । कीड गर्ता रातांधळें ।दुश्चित्त भ्रमिष्ट आणी खुळें । या नांव आध्यात्मिक ॥४०॥

( फुलें - फुल पडणे, पडळें - मोती/काच बिंदू, गर्ता - अंधळा )

डोळ्यांत फुलें,वडस,पडदा (मोतीबिंदू),कीड लागणें,डोळ्यांच्या खांचा होंणें,रातांधळे लागणें,दुश्चित असणें,भ्रम होणें,वेड लागणें.

मुकें बधीर राखोंडें । थोटें चळलें आणी वेडें । पांगुळ कुरें आणी पावडे । या नांव आध्यात्मिक ॥ ४१॥

( राखोंडें - ओठ तुटके , कुरें आणी पावडे - कुबडे व आखूड पायाचे )

मुका,बहिरा,जन्मतःच ओंठ-तुटका (राखोंडे),थोटा चळलेला,वेडा,पांगळा,कुबडा (कु-हे),एका पायानें आंखूड (पावडे-पायतुटका),

तारसें घुलें काणें कैरें । गारोळें जामुन टाफरें । शडांगुळें गेंगाणें विदरें । या नांव आध्यात्मिक ॥ ४२॥

( तारसें घुलें- तारवटलेले,वाकड्माने, काणें कैरें - काणे तिरळे , गारोळें जामुन टाफरें - घारे,ठेंगू,ठेचकाळे, शडांगुळें - सहा बोटांचे , विदरें - वेडेविद्रे,विद्रूप )

तारवटलेल्या डोळ्यांचे (तारसे),मांन वाकडी करुन (घुले) पाहणें,काणें,तिरकें (कैरे-तिवरें),घारेडोळें,बुटका (जामुन) ठेंचाळत चालणारें (टाफरें),सहा बोंटांचें,गेंगाणे,कुरुप (विंदरें),

दांतिरें बोचिरें घानाळ । घ्राणहीन श्रोत्रहीन बरळ । अति कृश अति स्थूळ । या नांव आध्यात्मिक ॥ ४३॥

( दांतिरें बोचिरें - मोठ्या,पुढे दात , घानाळ - लांब नाकाचे )

फारोळ्या दातांचे,पुढलें दांत पडलेले,मोठ्या (लांब) नाकाचें (घानाळ-लांबनाक्या),नकटें,कान नसणें,बडबड्या (आपल्याशींच बडबडणारा),रोडका,स्थूलदेही

तोंतरें बोंबडें निर्बळ । रोगी कुरूप कुटीळ । मत्सरी खादाड तपीळ । या नांव आध्यात्मिक ॥ ४४॥

( कुटीळ, तपीळ - हलकट व तापट )

तोतरें,बोबडें,अशक्त,रोगी,कुरुप,कुटिळ-मत्सरी,खादाड,तापट (तपीळ-रागीट)

संतापी अनुतापी मत्सरी । कामिक हेवा तिरस्कारी । पापी अवगुणी विकारी । या नांव आध्यात्मिक ॥४५॥

संतापी,पश्र्चाताप करणारा,मत्सरी,कामुक,हेवेखोर,तिरस्कार करणारा,पापी,अवगुणी,विकारी.

उठवणें ताठा करक । आवटळे आणी लचक । सुजी आणी चालक । या नांव आध्यात्मिक ॥ ४६॥

( उठवणें ताठा करक - उठता बसता न येणे, अंग ताठणे , अवघडणे, आवटळे आणी लचक - अवघडणेव लचकणे, सुजी आणी चालक - सूज आणि पायाचा संधिवात , सल - न वाढणारा गर्भ )

उठवणीला येंणें,ताठा असणें,उसण भरणें,मान अवटळणें (आवटळें),लचक भरणें ,सूज येणें,पायांचे सांधे धरणें,चाळक बाऊ होणें.

सल आडवें गर्भपात । स्तनगुंते सनपात । संसारकोंडे आपमृत्य । या नांव आध्यात्मिक ॥ ४७॥

( आडवें - आडवा आलेला गर्भ , स्तनगुंते - स्तनाचे रोग, सनपात - सन्निपात )

सल (न वाढणारा गर्भ),मूल आडवें येणें,गर्भपात होणें,स्तनांत गांठी होणें (स्तनगुंते),सन्निपात (ज्वर-ताप),संसारातील संकटे,अपमृत्यु,

नखविख आणी हिंगुर्डें । बाष्ट आणी वावडें । उगीच दांतखीळ पडे । या नांव आध्यात्मिक ॥ ४८॥

( नखविख आणी हिंगुर्डें - नखातील विष,नाखूर्डे , बाष्ट आणी वावडें - शिळे आणि वर्ज्य )

नखांचे विष बांधणें, हिंगुरडें (कान टोंचल्यामुळे होणारी जखम बळावून तिची गांठ बनणें),तुटक-ओशट (बासट-शिळे-) खाऊन किंवा कुपथ्यानें बळावलेली व्याधि,उगीच दातखिळी बसणें.

झडती पातीं सुजती भवया । नेत्रीं होती राझणवडीया । चाळसी लागे प्राणियां ।या नांव आध्यात्मिक ॥४९॥

( झडती पातीं - डोळांच्या भुवया झडणे )

पांपण्या झडणें,भुवयां सुजणें,डोळ्यांत रांजणवाड्या होणें,डोळ्याला चाळिशी (चष्मा) लागणें.

वांग तिळ सुरमें लांसें । चामखिळ गलंडे मसें । चुकुर होइजे मानसें । या नांव आध्यात्मिक ॥ ५०॥

( वांग तिळ सुरमें लांसें - काळ्या पुळ्या, तीळ,पाढरे व काळे चट्टे, गलंडे मसें - गालगुंड,मास वाढणे , चुकुर होइजे मानसें - मनाला भ्रम होणे )

त्वचेवर काळासर डाग (-पुळ्या-वोंग) पडणे,तीळ,सुरमा,लांसरें (लांसें-शिबें,पांढरे चट्टे),चामखीळ,खांडूक (गालंडे-बेड),मसें (व्रण),मन भ्रमिष्ट(चुकुर) होणे.

नाना फुग आणी आवाळें । आंगीं दुर्गंधी प्रबळे । चाईचाटी लाळ गळे । या नांव आध्यात्मिक ॥ ५१॥

( चाईचाटी - केसाला चाई लागणे,चाट पडणे )

शरीराचा भाग सुजणें,आवाळूं,आंगाला दुर्गंधी सुटणें,केस (रोगानें,चाईने)(घाईचाटी) गळून पडणें,लाळ गळूं लागणें.

नाना चिंतेची काजळी । नाना दुःखें चित्त पोळी । व्याधीवांचून तळमळी । या नांव आध्यात्मिक ॥ ५२॥

नाना प्रकारच्या काळजींने काळा पडणें,अनेकविध दु:खाने चित्त होरपळणे,व्याधी नसतांना,तळमळणें.

वृद्धपणीच्या आपदा । नाना रोग होती सदा । देह क्षीण सर्वदा । या नांव आध्यात्मिक ॥ ५३॥

म्हातारपणचे हाल,नेहमी अनेक दुखणी येणें (सदा दुखणाईत),देह नित्य अशक्त असणें.

नाना व्याधी नाना दुःखें । नाना भोग नाना खांडकें । प्राणी तळमळी शोकें । या नांव आध्यात्मिक ॥५४॥

( नाना खांडकें - अनेक जखमा )

अनेक व्याधि,अनेक दु:खे,अनेक भोग,खांडकें,शोक ह्यांमुळे तळमळणें,हे सर्व अध्यात्मिक तापाचे लक्षण.

ऐसा आध्यात्मिक ताप । पूर्वपापाचा संताप । सांगतां सरेना अमूप । दुःखसागर ॥ ५५॥

असा हा (शरिराच्या व्याधि व मनाच्या व्याधि मिळून) आध्यात्मिक ताप आहें,हे पूर्वीच्या पातकांचे फळ होय.दुखाःचा अथांग समुद्र भरला आहें,तो सांगून संपणार नाही.

बहुत काय बोलावें । श्रोतीं संकेतें जाणावें । पुढें बोलिजे स्वभावें । आदिभूतिक ॥ ५६॥

फार काय सांगावें ?श्रोत्यांनी थोडक्यांत समजावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आध्यात्मिकतापनिरूपणनाम समास सहावा ॥६॥**

**समास सातवा : आधिभौतिक ताप ॥ श्रीराम् ॥**

मागां जालें निरूपण । आध्यात्मिकाचें लक्षण । आतां आदिभूतिक तो कोण । सांगिजेल ॥ १॥

मागील समासात अध्यात्मिक तापाचे लक्षण सांगितले.आता आधिभौतिक ताप कोणता ते सांगू

(श्लोक ॥ सर्वभूतेन संयोगात् सुखं दुःखं च जायते । द्वितीयतापसंतापः सत्यं चैवाधिभौतिकः ॥ )

सर्व भूतांचेनि संयोगें । सुखदुःख उपजों लागे । ताप होतां मन भंगे । या नांव आदिभूतिक ॥ २॥

( सर्व भूतांचेनि संयोगें - पंचभूतानीयुक्त बाह्य पदार्थांच्या कारणाने )

सगळ्या पंचभूतांच्या संयोगानें (किंवा प्राणिमात्रांपासून) सुखदु:ख उत्पन्न होतें,त्रास झाला असता मन दुखवतें,त्याचे नाव आधिभौतिक.

तरी या आदिभूतिकाचें लक्षण । प्रांजळ करूं निरूपण । जेणें अनुभवास ये पूर्ण । वोळखी तापत्रयाची ॥३॥

जेणेकरुन तिन्हि तापांचे लक्षण पूर्णपणे अनुभवास पटेल,अशा त-हेने या आधिभौतिक तापाचे लक्षण स्पष्टपणें सांगू.

ठेंचा लागती मोडती कांटे।विझती शस्त्रांचे धायटे । सला सिलका आणी सरांटे । या नांव आदिभूतिक ॥४॥

( विझती - वाजती,ठणकतात , सला सिलका आणी सरांटे - कास्पट , चोयट्या , सराटे बोचणे.)

ठेंचा लागणें,कांटे मोडणे,शस्त्रांचे घाव (घायटे-घायवटा-जखम) पडणें,शरिरात सडी (सल धस शिरणें) व चोया (सिलका भरणें),सरोटे बोचणें.

अंग्या आणी काचकुहिरी । आवचटा लागे शरीरीं । गांधील येऊन दंश करी । या नांव आदिभूतिक ॥ ५॥

( अंग्या आणी काचकुहिरी - अंगाची आग , खाज खुजली , आवचटा - अचानक )

आग्या खाजकुजली,अंगाची आग करणारी वनस्पति),कांचकुयरी (अंगाला खाज आणणारी शेंग) एकाएकी शरीरास लागणें,कुंभारमाशी चावणें.

मासी गोमासी मोहळमासी । मुंगी तेलमुंगी डांस दसी । सोट जळू लागे यासी । आदिभूतिक बोलिजे ॥ ६॥

( सोट - रक्तपिपासू,किडा )

माशी,गोमाशी,मधमाशी,मुंगी,तेलमुंगी किवा डांस चावणें,सोट(एक चावरा किंडा), व जळवा लागणें,

पिसा पिसोळे चांचण । कुसळें मुंगळे ढेंकुण । विसीफ भोवर गोंचिड जाण । या नांव आदिभूतिक ॥ ७॥

( विसीफ भोवर - इसबाचे जंतू आणि भुंगे )

पिसा,पिसाळे,चांचण (चांचड),कुसळें (कुसाने चावणारे मुंगळे),ढेकूण,इसब (विसीफ),भुंगा,गोंचीड चावणें,

गोंबी विंचु आणी विखार । व्याघ्र लांडिगे आणी शूकर । गौसायळ सामर । या नांव आदिभूतिक ॥ ८॥

( विखार - विषारी साप , गौसायळ - साळू , सामर - सांबर )

गोमी (गोंबी),विंचू,विषारी साप (विखार),वाघ लांडगें,(रान)डूकरे (सुसरें),सायाळ पक्षी,सांबर चावणें,

रानगाई रानम्हैसे । रानशकट्ट आणी रीसें । रानहाती लांवपिसें । या नांव आदिभूतिक ॥ ९॥

( रानशकट्ट आणी रीसें - रानबैल , अस्वल, लांवपिसें - पक्षाची पिसे )

रानगाई,रानटोणगे (गवे),रानशकटें,अस्वलें (रिसें),जंगली हत्ती, ह्या श्र्वापदांपासून होणारी पीडा,

डां किर्णींपासून लागणारे वेड (लांबपिसें)

सुसरीनें वोढून नेलें । कां तें आवचितें बुडालें । आथवा खळाळीं पडिलें । या नांव आदिभूतिक ॥ १०॥

( खळाळीं - ओढ्यात )

सुसरीनें घेऊन जाणें,पाण्यांत एकदम बुडणें, अथवा खडकाळ खळखळणा-या ओढ्याच्या पाण्यांत (खळाळी पडणें).

नाना विखारें आजगर । नाना मगरें जळचर । नाना वनचरें अपार । या नांव आदिभूतिक ॥ ११॥

अनेक प्रकारचे साप,अजगर,मगर,अनेक जळचरें,असंख्य त-हेची वनचरें,

अश्व वृषभ आणी खर । स्वान शूकर जंबुक मार्जर । ऐसीं बहुविध क्रूर । या नांव आदिभूतिक ॥ १२॥

( खर - गाढव )

घोडा,बैल,गाढव,कुत्रीं,डुकरें,कोल्हें,मांजर,अशा अनेक त-हेच्या क्रूर प्राण्यांकडून ताप होणें,

ऐसीं कर्कशें भयानकें । बहुविध दुःखदायकें । दुःखें दारुणें अनेकें । या नांव आदिभूतिक ॥ १३॥

असे अनेक प्रकारे दुःख देणारे कर्कश्य व भयंकर प्राणी ह्यांपासून होणारी पीडा आणि अनेक भयंकर दुःखे ह्यांचे नांव आधिभौतिक.

भिंती माळवंदे पडती । कडे भुयेरीं कोंसळती । वृक्ष आंगावरी मोडती । या नांव आदिभूतिक ॥ १४॥

भिंती,माळवदें,(धार्बी),कडे,भुयारं कोसळून अंगावर पडतात,

कोणी येकाचा श्राप जडे । कोणी येकें केले चेडे । आधांतरी होती वेडे । या नांव आदिभूतिक ॥ १५॥

( चेडे - जादूटोणा , आधांतरी- अचानक )

कोणी एक शाप देतो तो आपणांस नडतों,कोणी चेटूक करतो,एकदम वेडा होतो,

कोणी येकें चाळविलें । कोणी येकें भ्रष्टविले । कोणी येकें धरून नेलें । या नांव आदिभूतिक ॥ १६॥

कोणी एक चळ लावतों,कोणी भ्रष्ट करतो,कोणी धरुन नेतो,

कोणी येकें दिलें वीष । कोणी येकें लाविले दोष । कोणी येकें घातलें पाश । या नांव आदिभूतिक ॥ १७॥

कोणी एकानें विष दिलें,नावें ठेवलीं (आळ घेतला),कोणी गळफास घातला.

अवचिता सेर लागला । नेणो बिबवा चिडला । प्राणी धुरें जाजावला । या नांव आदिभूतिक ॥ १८॥

( सेर - शेराचा चिक )

एकाएकी शेर उतला,किंवा बिब्बा चिडला,धुराने प्राणी बेजार झाला ह्यांस आधिभौतिक (दु:ख ताप) म्हणतात.

इंगळावरी पाय पडे । शिळेखालें हात सांपडे । धावतां आडखुळे पडे । या नांव आदिभूतिक ॥ १९॥

(इंगळ अग्नी) निखा-यावर पाय पडला.दगडाखालीं हात सापडला,धांवताना अडखळून पडला,

वापी कूप सरोवर । गर्ता कडा नदीतीर । आवचितें पडे शरीर । या नांव आदिभूतिक ॥ २०॥

विहिरी,आड,सरोंवरें,गर्ता (खड्डा),कडा,नदीकाठ ह्या ठिकाणीं अकल्पित शरीर पडणें,

दुर्गाखालें कोंसळती । झाडावरून पडती । तेणें दु:खे आक्रंदती । या नांव आदिभूतिक ॥ २१॥

किल्यावरुन कोंसळल्यानें किंवा झाडावरुन पडल्यानें होणा-या दु:खामुळें आक्रोश करणें,

सीतें वोठ तरकती । हात पाव टांका फुटती । चिखल्या जिव्हाळ्या लागती । या नांव आदिभूतिक ॥२२॥

( सीतें वोठ तरकती - थंडीने ओठ तडकती , टांका - टाचा )

थंडीने (सीतें) ओंठ तडकणें,हातपाय व टांचा फुटणें,चिखल्या होणें,जिव्हाळ्या लागणें. (चिखल्या-बोटांच्या सांधीमधील जागा सतत पाणी लागल्यामुळें सडून पांढरी होते,त्याला चिखली म्हणतात.)

अशनपानाचिये वेळे । उष्ण रसें जिव्हा पोळे । दांत कस्करे आणी हरळे । या नांव आदिभूतिक ॥ २३॥

( अशनपाना - खातापिता , हरळे - दातात फटी )

खाण्यापिण्याच्या वेळेस कढत पदार्थाने तोंड (जीभ) भाजणें,दांताने (जीभ किंवा गालफड) चावणें,(दाताखालीं) खडा लागणें, (किंवा हरळे दांतांत फटी पडणें)

पराधेन बाळपणीं । कुशब्दमारजाचणी । अन्नवस्त्रेंवीण आळणी । या नांव आदिभूतिक ॥ २४॥

बाळपणाच्या परतंत्रेमुळें शिव्या,मार व जांच सहन करणें-(१- अन्नवस्त्र देत नाहीत अळणीं खाऊ लागतात , २- अन्नवस्त्रांवाचून आळणी म्ह. सुकणें,झिजत जाणें,३-अन्नवस्त्रांवाचून आळणी म्हणजें अहाळणी,त्रास,दुःख ह्यांचे नांव आधिभौतिक)

सासुरवास गालोरे । ठुणके लासणें चिमोरे । आलें रुदन न धरे । या नांव आदिभूतिक ॥ २५॥

( गालोरे - गालगुच्चे , ठुणके - ठोसे , लासणें - डागणे , चिमोरे - चिमटे)

सासुसवास,गालगुच्च (गालोरे),ठोंसे मारणें,डागणें,चिमटे घेणें,त्यामुळे आलेंले रडें न आवरणें (हे सासुरवासिनींच्या छळाचे प्रकार)

चुकतां कान पिळिती । कां तो डोळा हिंग घालिती । सर्वकाळ धारकीं धरिती । या नांव आदिभूतिक॥२६॥

( धारकीं - धारेवर धरणे, त्रास देणे )

चुकी झाल्यास कान पिरगळतात,किंवा डोळ्यात,हिंग घालतात,नेहमी धारेवर (धारकीं) धरल्याप्रमाणें कडक जांच करणें.

नाना प्रकारीचे मार । दुर्जन मारिती अपार । दुरी अंतरे माहेर । या नांव आदिभूतिक ॥ २७॥

दुष्ट लोक अनेक प्रकारें अत्यंत मारतात,माहेर दूर राहतें (तंट्यामुळे माहेरचा संबंध तुटतो.)

कर्णनासिक विंधिलें । बळेंचि धरून गोंधिलें । खोडी जालिया पोळविलें । या नांव आदिभूतिक ॥ २८॥

( विंधिलें - भोके पडणे )

कानाला व नाकाला भोकें पाडलीं,जबरदस्तीने धरुन गोदलें,खोडीसाठी पोळविंलें ह्यांस आधिभौतिक-ताप म्हणतात

परचक्रीं धरून नेलें । नीच यातीस दिधलें । दुर्दशा होऊन मेलें । या नांव आदिभूतिक ॥ २९॥

शत्रुंनी (परचक्री) पकडुन नेऊन हलक्या जातीस (गुलाम म्हणून) विकलें (तिकडे) हालहाल होऊन मृत्यु आला.

नाना रोग उद्भवले । जे आध्यात्मिकीं बोलिले । वैद्य पंचाक्षरी आणिले । या नांव आदिभूतिक ॥ ३०॥ नाना वेथेचें निर्शन । व्हावया औषध दारुण । बळात्कारें देती जाण । या नांव आदिभूतिक ॥ ३१॥ नाना वल्लीचे रस । काडे गर्गोड कर्कश । घेतां होये कासावीस । या नांव आदिभूतिक ॥ ३२॥ ढाळ आणी उखाळ देती । पथ्य कठीण सांगती । अनुपान चुकतां विपत्ती । या नांव आदिभूतिक ॥ ३३॥

( काडे गर्गोड कर्कश - कडु, काढे,चाटण , ढाळ आणी उखाळ - जुलाब व वांती )

आध्यात्मिक तापाच्या निरुपणांत सागितलेंले अनेक रोग झालें ते बरे करण्यासाठी वैद्य,पंचाक्षरी बोलवून आणलें,तो रोग बरा होण्यासाठीं ते जळजळीत (कडक) औषध बलात्कारानें देतात,अनेक वनस्पतींचे रस,काढे,तिखट गरगटें ही औषधें घेतांना जीव कासावीस होतो,जुलाब,वांत्या होण्याचीं औषधें (उखाळ) देतात, कठीण पथ्य करण्यांस सांगतात.औषधांचे अनुपान चुकलें की रोग्यांचे हाल होतात,ह्यांस आधिभौतिक ताप असे म्हणतात.

फाड रक्त फांसणी । गुल्लडागांची जाचणी । तेणें दुःखें दुःखवे प्राणी । या नांव आदिभूतिक ॥ ३४॥

शरीर फाडून रक्त काढतात.(फांसणी-शस्त्रानें बेंडावर किंवा गांठीवर चिरा पाडणें),तुंबड्या लावणे,चोचे देणें (गुल्ल डाग),इत्यादिकांच्यामुळे प्राण्यास पीडा होते.

रुचिक बिबवे घालिती । नाना दुःखें दडपे देती । सिरा तोडिती जळा लाविती । या नांव आदिभूतिक ॥३५॥

रुईचा चीक (रुचिक) किंवा विब्बे घालतात,अनेक दुःखे देतात,धाक (दडपे) दाखवतात (अनेक प्रकारच्या डागण्या देतात),शिरा तोडतात,जळवा लावतात.

बहु रोग बहु औषधें । सांगतां अपारें अगाधें । प्राणी दुखवे तेणें खेदें । या नांव आदिभूतिक ॥ ३६॥

अनेक-रोग-अनेक औषधे, (तीं सर्व) सांगू गेल्यास असंख्य आहेत,त्यांच्या त्रासाने प्राण्यास दुःख होते,ह्यांचे नांव आधिभौतिक.

बोलाविला पंचाक्षरी । धूरमार पीडा करी । नाना यातना चतुरीं । आदिभूतिक जाणिजे ॥ ३७॥

पंचाक्षरी बोलविल्यानंतर तो धुरी देतो,मारतो,पीडा करतो,त्या वेळी अनेक यांतना होतात,त्या चतुरांनी अधिभौतिक समजाव्या.

दरवडे घालूनियां जना । तश्कर करिती यातना । तेणें दुःख होये मना । या नांव आदिभूतिक ॥ ३८॥

दरवडे घालून चोर माणसांना छळतात,त्या योंगानें मनाला दु:ख होतें तें आधिभौतिक होय.

अग्नीचेनि ज्वाळें पोळे । तेणें दुःखें प्राणी हरंबळे । हानी जालियां विवळे । या नांव आदिभूतिक ॥ ३९॥

अग्नीच्या ज्वाळेने पोळल्यामुळें झालेल्या दु:खानें प्राणी तळमळतो (हरंबळे),किंवा नुकसान (हानी) झाल्यास विव्हळत बसतों.

नाना मंदिरें सुंदरें । नाना रत्नांचीं भांडारें । दिव्यांबरें मनोहरें । दग्ध होती ॥ ४०॥

अनेक सुंदर घरे,अनेक रत्नाचीं भांडारें,सुंदर उंची वस्त्रें जळून जातात.

नाना धान्यें नाना पदार्थ । नाना पशु नाना स्वार्थ । नाना पात्रें नाना अर्थ । मनुष्यें भस्म होती ॥ ४१॥

अनेंक धान्यें,अनेक वस्तु,अनेक पशु,अनेक प्रकारचा सांठा (स्वार्थ-संग्रह),अनेक भाडीं.संपत्ती व माणसें भस्म होऊन जातात.

आग्न लागला सेती । धान्यें बणव्या आणी खडकुती । युक्षदंड जळोन जाती । अकस्मात ॥ ४२॥

( युक्षदंड - ऊस )

शेंतात (पिकास) आग लागल्यामुळें धान्यें,गवताच्या गंजी (वणव्या) आणि भुसकट (धान्य मळून नेल्यांवर शेंतात उरलेंले कुटार),ऊंस (इक्षुदंड) हीं अकस्मात जळून जातात.

ऐसा आग्न लागला । अथवा कोणी लाविला । हानी जाली कां पोळला । या नांव आदिभूतिक ॥ ४३॥

अशी आग (आपोआप) लागली किंवा कोणी लावली,त्यायोगें नुकसान झालें अथवा प्राणी भाजला,

ऐसें सांगतां बहुत । होती वन्हीचे आघात । तेणे दुःखें दुःखवे चित्त । या नांव आदिभूतिक ॥ ४४॥

असें आगीचे अपघात सागावयांस लागलें तर पुष्कळ आहेंत.त्यांच्या योंगाने चित्त दु:खी होणें ह्याचे नांव आधिभौतिक.

हारपे विसरे आणी सांडे । नासे गाहाळ फुटे पडे । असाध्य होये कोणीकडे । या नांव आदिभूतिक ॥ ४५॥

( हारपे सांडे - हरवते,सांडते )

(आपली वस्तु) हरवतें,आपण ती विसरतो,किंवा ती सांडते,नासते,गहाळ होते,फूटते,पडते,कोणीकडें मिळनाशी होतें,

प्राणी स्थानभ्रष्ट जालें । नाना पशूतें चुकलें । कन्यापुत्र गाहाळले । या नांव आदिभूतिक ॥ ४६॥

प्राणी आपल्या ठिकाणाहून निघून गेला (अधिकारपदावरुन खालीं आला).गुरेढारे चुकली,मुलेबाळे हरवली.

तश्कर अथवा दावेदार । आवचितां करिती संव्हार । लुटिती घरें नेती खिल्लार ।या नांव आदिभूतिक ॥४७॥

चोर किंवा दावेदार एकदम (येऊन) नाश करतात,घरें लुटतात,गाईगुरांचे कळप घेऊन जातात.

नाना धान्यें केळी कापिती।पानमळां मीठ घालिती ।ऐसे नाना आघात करिती ।या नांव आदिभूतिक ॥४८॥

पिंकें,केळीच्या बागा कापतात,पानमळ्यांत मीठ घालतात,अशा प्रकारे अनेक अपघाती उपाय करतात ह्यांचे नांव आधिभौतिक

मैंद उचले खाणोरी । सुवर्णपंथी भुररेकरी । ठकु सिंतरु वरपेकरी । वरपा घालिती ॥ ४९॥

( मैंद - लुटारु , खाणोरी - घर खणून चोरी , सुवर्णपंथी भुररेकरी - किमयागारी चोरटे , वरपेकरी - चोर दरोडेखोर, व - फसविणे )

(सभ्यपणा बाहेर दाखवून ),गळेकापू, (-पणा करणारा) (ठक),उचले,सर्वभक्षक (खाणोरी-काळीजखाऊ,खाणचोर,खादाड किंवा (ठेवी उकरुन नेणारे),किमया करणारे (सुवर्णपंथी),भूल करणारे (भुररेकरी),ठग,फसव्या,किंवा (वरपेकरी) लुटारु लुटतात.

गठीछोडे द्रव्य सोडिती । नाना आळंकार काढिती । नाना वस्तु मूषक नेती । या नांव आदिभूतिक ॥५०॥

( गठीछोडे - गाठोडे चोर )

भामटे गाठोडी सोडून द्रव्य नेतात,(गठ्ठीचोर),दागदागीने काढून नेतात (गठ्ठीचोर),दागदागिने, काढून घेतात,अथवा उंदिर पदार्थ घेऊन जातात.

वीज पडे हिंव पडे । प्राणी प्रजंनी सांपडे । कां तो माहापुरीं बुडे । या नांव आदिभूतिक ॥ ५१॥

( प्रजंनी - पावसात )

वीज पडते,(कडका थंडी पडते,प्राणी वावटळीत (प्रभ़ंजनी) सापडतो, किंवा महापुरांत बुडतो.

भोवरें वळणें आणी धार । वोसाणें लाटा अपार । वृश्चिक गोंबी आजगर । वाहोन जाती ॥ ५२॥तयामधें प्राणी सांपडला । खडकी बेटीं आडकला । बुडत बुडत वांचला । या नांव आदिभूतिक ॥ ५३॥

( वोसाणें लाटा - जलप्रवाहा बरोबर वाहत येणारा ओंडका केर कचरा )

भोव-यात,पाण्याच्या वळणांत,किंवा धारेत,पाण्यातून वाहात येणा-या  केरकच-यांत (वोंसाणें),मोठमोठ्या लाटांत अथवा पुरांत वाहुन येणा-या विंचू,गोमी,अजगर वगैरेच्या तडाख्यांत सांपडला अथवा खडकांत किंवा बेंटांत अडकला व बुडतां बुडतां वाचला ह्यांचे नांव आधिभौतिक.

मनासारिखा नसे संसार । कुरूप कर्कश स्त्री क्रूर । विधवा कन्या मूर्ख पुत्र । या नांव आदिभूतिक ॥५४॥

संसार मनासारखा नसतो,स्त्री कुरुप,कर्कश्य,व क्रुर असतें,मुलगी विधवा व मुलगा मूर्ख असतो.

भूत पिशाच्च लागलें । आंगावरून वारें गेलें । अबद्धमंत्रे प्राणी चळलें । या नांव आदिभूतिक ॥ ५५॥

( अबद्ध - चुकीच्या )

भूतपिशाच्य लागतें,आंगावरुन वारें जातें (अर्धांग),(पिशाच्यादि साधनांच्या) मंत्रोच्चारात चूक होऊन (अबध्द मंत्रे ) वेड लागतें.

ब्राह्मणसमंध शरीरीं । बहुसाल पीडा करी । शनेश्वराचा धोका धरी । या नांव आदिभूतिक ॥ ५६॥

आंगात ब्रह्मसमंध शिरुन वारंवार फार पीडा करतो,शनीच्या साडेसातीचे भय लागतें,ह्यांचे नांव आधिभौतिक.

नाना ग्रहे काळवार । काळतिथी घातचंद्र । काळवेळ घातनक्षत्र । या नांव आदिभूतिक ॥ ५७॥

अनेक (विरुध्द) ग्रह,घातवार,घाततिथी,घातचंद्र,घातवेळ,घातनक्षत्र

सींक पिंगळा आणी पाली । वोखटें होला काक कलाली । चिंता काजळी लागली।या नांव आदिभूतिक ॥५८॥

( कलाली -एक पक्षी )

शिंक,पिंगळा,पाली,वोखटें (अशुभ किंवा घुबड),होला (कवडा),कावळा,कुलकुल करणारा पक्षी (कलाली) ह्यांच्या (ह्या अशुभ पक्षांच्या ) दुश्चिन्हांमुळे चिंतेनें झुरणीस लागला.

दिवटा सरवदा भाकून गेला । अंतरीं धोका लागला । दुःस्वप्नें जाजावला । या नांव आदिभूतिक ॥ ५९॥

( दिवटा सरवदा - मशालीच्या प्रकाशात भविष्य ज्योतिष सांगणारा )

(कुडबुड्या जोशी) दिवटा,सरोदा (वाईट) भविष्य सांगून गेल्यामुळे अंतःकरणाला धक्का बसला,वाईट स्वप्नाने घाबरला (जाजावला-जागा झाला.)

भालु भुंके स्वान रडे । पाली अंगावरी पडे । नाना चिन्हें चिंता पवाडे । या नांव आदिभूतिक ॥ ६०॥

भालू (कोल्ही-कोल्ह्याची खानदेशांतील एक जात ) भुंकते,कुत्रे रडते,पाल अंगावर पडते अशा अनेक चिन्हांनी चिंता वाढते.

बाहेरी निघतां अपशकून । नाना प्रकारें विछिन्न । तेणें गुणें भंगे मन । या नांव आदिभूतिक ॥ ६१॥

घराबाहेर पडंताच अपशकुन होणे,अनेक प्रकारे अडथळे उत्पन्न होऊन त्यामुळे अंत:करण दुखवणें ह्यांचे नांव आधिभौतिक.

प्राणी बंदी सांपडला । यातने वरपडा जाला । नाना दुःखें दुःखवला । या नांव आदिभूतिक ॥ ६२॥

( वरपडा - गांजुन )

प्राणी कैदेत पडून अनेक यातना सोसण्याची त्याला पाळी आली (वरपडा-आश्रयभूत,पात्र) अनेक दु:खांनी दु:खी झाला,

प्राणी राजदंड पावत । जेरबंद चाबुक वेत । दरेमार तळवेमार होत । या नांव आदिभूतिक ॥ ६३॥

( दरेमार - दरीत ढकलणे , तळवेमार - तापलेल्या तव्यावर उभे करून मारणे )

राजांने शिक्षा दिली,जेरबंद,चाबुक,वेत ह्यांचा मार बसतो,दरीत लोटून देऊन मारतात,तापलेल्या तव्यावर अनवाणी उभे करतात.(तळव्यावर फटके मारतात-तळवेमार)

कोरडे पारंब्या फोक । बहुप्रकारें अनेक । बहुताडिती आदिभूतिक । या नांव बोलिजे ॥ ६४॥

कोरडे,पारंब्या,फोक ह्यांनी अनेक प्रकारें सपाटून मारणें.

मोघरीमार बुधलेमार । चौखुरून डंगारणेमार । बुक्या गचांड्या गुढघेमार । या नांव आदिभूतिक ॥ ६५॥

मोघरी - लाकडी सोट्याने , बुधले - दारूच्या बुधल्यास बांधून , डंगारणे - चारीबाजूस ताणून,बडगे हाणून.: गुढघे - गुडघ्याने )

अपानद्वारी मेखा ठोकतात (मोघरीमार)दारु भरलेल्या बुदल्याशी बांधून पेटवितात (बुधलेमार),दोरांनी चोहोंकडून हातपाय ताणून बडग्यांनीं मारतात,गचांड्या देतात,गुडघे (गुडघ्यांवर) मारतात.

लाता तपराखा सेणमार । कानखडे दगडमार । नाना प्रकारींचे मार । या नांव आदिभूतिक ॥ ६६॥

( तपराखा - चपराग , सेण  - शेण , कानखडे - कानात खडे खुपसणे )

लाथा मारतात,चपराका मारतात,शेणमार करतात,कानाला खडे लावून कान पिरगळतात.दगडांनी मारतात,असे नाना प्रकारचे मार बसतात.

टांगणें टिपर्या पिछोडे । बेडी बुधनाल कोलदंडे । रक्षणनिग्रह चहूंकडे । या नांव आदिभूतिक ॥ ६७॥

( टिपर्या पिछोडे - चाप लावणे , मागे हात बांधणे , बुधनाल - झाडाच्या बुंध्याला नालाप्रमाणे  वाकवून )

टांगून घालतात,चाप (टिप-या) लावतात.मागें हात वळवून बांधतात (पिछोडे),बेडी घालतात,झाडाच्या बुंध्याशीं नालाप्रमाणें बांधणें (बुधनाल),कोलदांडा घालणें,पाहा-यांत अडकवून ठेवणें (रक्षकनिग्रह) ह्यांचे नांव आधिभौतिक.

नाकवणी चुनवणी । मीठवणी रायवणी । गुळवण्याची जाचणी । या नांव आदिभूतिक ॥ ६८॥

नाकांत ओतण्यांचे (नाकवणी)( तीक्ष्ण) रस,चुन्यांचें पाणी,मिठाचें पाणी,मोह-यांचे पाणी (रायवणी),गुळाचें पाणी इ. घालून जाच करणें.

जळामध्यें बुचकळिती । हस्तीपुढें बांधोन टाकिती ।हाकिती छळिती यातायाती ।या नांव आदिभूतिक॥६९॥

पाण्यात बुचकळून काढणें,हत्तीपुढें बांधून टाकणें,(गुराप्रमाणें) हाकतांत,परोपरीने छळून यातनां देतात.

कर्णछेद घ्राणछेद । हस्तछेद पादछेद । जिव्हाछेद अधरछेद । या नांव आदिभूतिक ॥ ७०॥

कान,नाक,हात,पाय,जीभ,ओंठ कापणें (ह्यांचा छेद करणें.)

तीरमार सुळीं देती । नेत्र वृषण काढिती । नखोनखीं सुया मारिती । या नांव आदिभूतिक ॥७१॥

(आंगावर) बाण मारणें,सुळीं देंणे,डोळे किंवा वृषण काढणें,सर्व नखांतून सुया रोंवणें,

पारड्यामध्यें घालणें । कां कडेलोट करणें । कां भांड्यामुखें उडवणें । या नांव आदिभूतिक ॥ ७२॥
( भांड्यामुखें - तोफेच्या )

प्रतिदिवशीं वजन कमी होत जाईल असे हाल करणें (पारड्यामध्यें घालणें),कडेलोट करणें,तोफेच्या तोंडास (भाड्यांमुखें) (शरीर) बांधून उडविणें,

कानीं खुंटा आदळिती । अपानीं मेखा मारिती । खाल काढून टाकिती । या नांव आदिभूतिक ॥ ७३॥

कानांत खुंट्या मारणें,गुदद्वारीं मेखा मारणें,आंगाचे कातडे सोलून काढणें.

भोत आणी बोटबोटी । अथवा गळ घालणें कंठीं । सांडस लावून आटाटी । या नांव आदिभूतिक ॥ ७४॥

( भोत - पोते , बोटबोटी - बोटे ठेचणे/ तोडणे , सांडस लावून आटाटी - तप्त सांडशी स्तनास लाऊन )

नखशिखांत आंगाचें कातडें काढणें. (भोत) (सूज येइपर्यंत मारणे,पोत्यांत घालून मारणें.)टोचून मारणें (बोटे पाठीमागे दुमडून कंठात गळ आंवळणें,बोटबोटी),अडकविणें,सांडसानें आंगातील मांसाचें तुकडे काढून यातना (आटाटी) करणें.

सिसें पाजणें वीष देणें । अथवा सिरछेद करणें । कां पायातळीं घालणें । या नांव आदिभूतिक ॥ ७५॥

शिसें पाजणें,वीज देंणें,मस्तक तोडणें,(घराच्या) पायांत पुरणें.

सरड मांजरें भरिती । अथवा फांसीं नेऊन देती । नानापरी पीडा करिती । या नांव आदिभूतिक ॥ ७६॥

(माणसाला विजार नेसवुन व ती सर्व बाजूंनी बंद करुन आणि माणसाचे हातपाय बांधून) विजारींत सरडा सोडणें (सरड भरणें.) संतापलेल्या मांजरास व माणसास एका खोलींत कोंडणें (मांजर भरणें) (त्या मांजरा कडून मनुष्य मारविणें.),अथवा फाशीं देणे (फासांवर लटकावणें) अशी अनेक प्रकारची पीडा देतात.

स्वानप्रळये व्याघ्रप्रळये । भूतप्रळये सुसरीप्रळये । शस्त्रप्रळये विझप्रळये । या नांव आदिभूतिक ॥ ७७॥

( विझ - वीज )

कुत्रे,वाघ,भुतें,सुसरी,शस्त्रें,वीज,यांच्यापासून (प्रळय) मृत्यु येंणे.

सीरा वोढून घेती । टेंभें लाउन भाजिती । ऐशा नाना विपत्ती । या नांव आदिभूतिक ॥ ७८॥

शिरा काढून घेतात,टेंभे (मशाली,काकडे)लावून भाजतात अशा नाना प्रकारच्या विपत्ती,

मनुष्यहानी वित्तहानी । वैभवहानी महत्वहानी । पशुहानी पदार्थहानी । या नांव आदिभूतिक ॥ ७९॥

मनुष्य,द्रव्य,वैभव,महत्व,पशु,पदार्थ ह्यांची हानी (हे नाहीसे होणे) ह्यांचे नांव आधिभौतिक.

बाळपणीं मरे माता । तारुण्यपणीं मरे कांता । वृद्धपणीं मृत्य सुता । या नांव आदिभूतिक ॥ ८०॥

लहानपणी आई,तारुण्यांत बायको व म्हातारपणी मुलगा मरणें.

दुःख दारिद्र आणी रुण । विदेशपळणी नागवण । आपदा अनुपत्ति कदान्न । या नांव आदिभूतिक ॥ ८१॥

( आपदा - संकट , अनुपत्ति - विपत्ती )

दुःख गरिबी व कर्ज असणें परदेशात पळून जाणे भाग पडणें,सर्वतोपरी नागवण (फसवणूक) होंणें,हाल (अनुपत्ति) व दारिद्रय भोगणे,कदान्न (वाईट अन्न) खावें लागणें.

आकांत वाखाप्रळये । युद्ध्य होतां पराजये । जिवलगांचा होये क्षये । या नांव आदिभूतिक ॥ ८२॥

( आकांत वाखाप्रळये - पटकिच्या साथीने )

अनर्थ कोसळणें,महामारीचा (वाखा)प्रलय होणे,युध्दात पराजय होणें,जिवलगांचा नाश होणें.

कठीण काळ आणी दुष्काळ।साशंक आणी वोखटी वेळ । उद्वेग चिंतेचे हळाळ ।या नांव आदिभूतिक ॥८३॥

कठिण वेळ,दुष्काळ,भयप्रद व वाईट वेळ,उद्वेगामुळें किंवा चिंतेमुळे मनाला हळहळ लागणें ह्यांचें नांव आधिभौतिक.

घाणा चरखीं सिरकला । चाकाखालें सांपडला । नाना वन्हींत पडिला । या नांव आदिभूतिक ॥ ८४॥

तेलाच्या पाण्यांत किंवा उंसाच्या चरकांत सांपडणें,चाकाखाली सापडणें,अथवा आगींत पडणें,

नाना शस्त्रें भेदिला । नाना स्वापदीं भक्षिला । नाना बंदीं पडिला । या नांव आदिभूतिक ॥ ८५॥

अनेक प्रकारच्या शस्त्रांनी तोडणें,श्र्वापदांनी खाणें अथवा बंदित पडणें.

नाना कुवासें निर्बुजे । नाना अपमानें लाजे । नाना शोकें प्राणी झिजे । या नांव आदिभूतिक ॥ ८६॥

( कुवासें निर्बुजे - वाईट वासाने जीव गुदमरतो )

अनेक प्रकारच्या घाणींने कोडमारा होंणें. अनेक प्रकारच्या अपमानाने लाजणें,नाना प्रकारच्या अपमानाने लाजणें,नाना प्रकारच्या शोकांनी प्राणी झिजणें.

ऐसें सांगतां अपार । आहेत दुःखाचे डोंगर । श्रोतीं जाणावा विचार । आदिभूतिकाचा ॥ ८७॥

असे ताप सांगायला लागले तर दुः खाचे डोंगर आहेंत,श्रोत्यांनी एवढ्यावरुन आधिभौतिक तापांचा विचार मनात जाणावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आदिभौतिकतापनिरूपणनाम समास सातवा ॥ ७॥**

**समास आठवा : आधिदैविक ताप ॥ श्रीराम् ॥**

मागां बोलिला आध्यात्मिक । त्याउपरीं आदिभूतिक । आतां बोलिजेल आदिदैविक । तो सावध ऐका ॥ १॥

मागच्या समांसात प्रथम आध्यात्मिक व आधिभौतिक दोन ताप सांगितले.आता तिसरा आधिदैविक ताप सांगतो तो (त्यांचे लक्षण) सावधपणें ऐका.

श्लोक: शुभाशुभेन कर्मणा देहांते यमयातना । स्वर्गनरकादि भोक्तव्यमिदं चैवाधिदैविकं ॥

शुभाशुभ कर्मानें जना । देहांतीं येमयातना । स्वर्ग नर्क भोग नाना । या नांव आधिदैविक ॥ २॥

प्राण्यांना आपापल्या ब-यावाईट कर्मांमुळे (पुण्यकर्में -पापकर्में जी केली असतील त्या कर्मानुसार देहपातानंतर) देहाच्या अंती स्वर्गभोग किंवा नरकयातना भोगाव्या लागतात त्यांचे नांव आदिदैविक ताप हें होय.

नाना दोष नाना पातकें । मदांधपणें अविवेकें । केलीं, परी तें दुःखदायकें । येमयातना भोगविती ॥ ३॥

प्राणी उन्मत्तपणानें व अविचाराने अनेक दोष (धर्मबाह्य आचरण) व पातकें करतो,ती परिणामीं दुःखदायक होऊन,यमयातना भोगायला लावतात.

आंगबळें द्रव्यबळें । मनुष्यबळें राजबळें । नाना सामर्थ्याचेनि बळें । अकृत्य करिती ॥ ४॥

आंगातल्या मस्तीनें,द्रव्याच्या जोरावर,मनुष्यांच्या बळावर व राजाश्रयाच्या जोरावर अशा अनेक प्रकारच्या सामर्थ्यबळांच्या योगानें प्राणी ती (वाईट) कर्में करतात.

नीती सांडूनियां तत्वतां । करूं नये तेंचि करितां । येमयातना भोगितां । जीव जाये ॥ ५॥

खरोखर (विचार करतां) निति सोडून जें करु नयें तेंच केंले तर मग मरणतुल्य वेदना ज्यायोगें होतील अशा यमयातना भोगतांना परम दुःखी होतात.

डोळे झांकून स्वार्थबुद्धीं । नाना अभिळाश कुबुद्धीं । वृत्ति भूमिसीमा सांधी । द्रव्य दारा पदार्थ ॥ ६॥

( अभिळाश - लोभ , भूमिसिमा - जमिनीचे संबंधी )

स्वार्थबुध्दीनें डोळे झांकून (अविचारी होऊन) अनेक प्रकारचें अभिलाष व दुष्ट बुध्दि धरुन दुस-याची वृत्ति (परंपरागत वतन,निर्वाहाचे साधन) जी जमीन,शेताची वगैरे हद्द गिळंकृत करतात आणि द्रव्य,स्त्री,पदार्थ इत्यादि हरण करतात.(आपलीं बायकापोरें,संपत्ति व अनेक पदार्थ यांचा भोग घेतात.)

मातलेपणें उन्मत्त । जीवघात कुटुंबघात । अप्रमाण क्रिया करीत । म्हणौन येमयातना ॥ ७॥

मस्तीनें तुफान होऊन जीवघात,कुटुंबघात किंवा खोटीनाटी कर्मे करतो,त्या करतां यमयातना आहेंत.(मदोन्मत्तपणानें दुस-याचें प्राण घेणें किंवा त्यांच्या कुटुंबाचा नाश करणें ह्यांत कांही वाटत नाहीं व अशा गैरवर्तनानें शेवटी यमयातना भोगतों).

मर्यादा सांडूनि चालती । ग्रामा दंडी ग्रामाधिपती । देशा दंडी देशाधिपती । नीतिन्याय सांडितां ॥ ८॥

मर्यादा (कायदा,नेम) सोडुन एखांदे गांव वागू लागल्यांस त्यांस त्या गावाचा अधिकारी (पाटील) शिक्षा करतों. देश न्यायनीति सांडून वागू लागल्यास त्यास देशाधिपती (देशमुख) शिक्षा करतो.

देशाधिपतीस दंडिता रावो । रायास दंडिता देवो । राजा न करितां नीतिन्यावो । म्हणौन येमयातना ॥ ९॥

देशाधिकारी चुकल्यास त्याला राजा दण्ड (शिक्षा) करतो व राजा नीतिन्याय न पाहील तर राजाला शिक्षा करणारा देव आहे.(अशा रीतीने अनीतीनें वागतात).म्हणून यमयातना भोगाव्या लागतात.

अनीतीनें स्वार्थ पाहे । राजा पापी होऊन राहे । राज्याअंतीं नर्क आहे । म्हणौनियां ॥ १०॥

राजा निति सांडून स्वार्थावर नजर देतो व पापी होऊन बसतो,म्हणून राज्याअंती नरक (यमयातना) असें म्हटले  आहें,ह्यांच अर्थाने राज्यांती नरक भोगावा लागतो.

राजा सांडितां राजनीति । तयास येम गांजिती । येम नीति सांडितां धावती । देवगण ॥ ११॥

राजानें नीति सोडल्यांस त्याला यम गांजतो,यमाने नीती सोडल्यास त्याला शिक्षा लावणारे देवगण धावून येतांत.

ऐसी मर्यादा लाविली देवें । म्हणौनि नीतीनें वर्तावें । नीति न्याय सांडितां भोगावें । येमयातनेसी ॥ १२॥

अशी मर्यादा देवानेंच घालुन दिलेली आहें म्हणून नीतीने वागावें, नीतिन्याय सोडल्यास यमयातना भोगाव्या लागतील.

देवें प्रेरिले येम । म्हणौनि आदिदैविक नाम । तृतीय ताप दुर्गम । येमयातनेचा ॥ १३॥

देंवानें यमाला पाठविलें (देवानें यमाला दंडनिति सागितली),(त्याच्या यातनेला) ह्या घोर तापाला आधिदैविक असें नांव आहे.यमयातनेचा हा तिसरा ताप फार कठिण आहें.

येमदंड येमयातना । शास्त्रीं बोलिले प्रकार नाना । तो भोग कदापि चुकेना । या नांव आदिदैविक ॥ १४॥

यमदंड व यमयातना ह्यांचे अनेक प्रकार शास्त्रांत सांगितले आहेत. तो भोग कधींही कोणाला टळत नाहीं,ह्यांचे नांव आधिदैविक.

येमयातनेचे खेद । शास्त्रीं बोलिले विशद । शरीरीं घालून, अप्रमाद- । नाना प्रकारें ॥ १५॥

यमयातनेची दु:खे शास्त्रांत स्पष्ट सागितलीं आहेत,पापपुण्यात्मक शरीरांत अनेक प्रकारचे गैरसावधपणाचें दोष (अप्रमाद) घातले आहेंत.

पापपुण्याचीं शरीरे । स्वर्गी असती कळिवरें । त्यांत घालून नाना प्रकारें । पापपुण्य भोगविती ॥ १६॥

पापपुण्य भोगण्याचे स्थूळदेह स्वर्गी (पुण्याचे-स्वर्गांत व पापाचें यमलोकांत) असतात,त्यांत जीवाच्या लिंगदेहास घालून पापपुण्य भोगीवतात.

नाना पुण्यें विळास । नाना दोषें यातना कर्कश । शास्त्रीं बोलिलें अविश्वास- । मानूंच नये ॥ १७॥

अनेंक पुण्यकर्मे केली म्हणजे अनेक विलास भोगावयाला मिळतात,आणि अनेक दोष (पापकर्म केली) म्हणजे भयंकर यातना भोगाव्या लागतात.असे शास्त्रांत सांगितलें आहें,त्यावर अविश्र्वास ठेवतां कामा नयें (त्यावर विश्र्वास ठेवावा).

वेदाज्ञेनें न चालती । हरिभक्ती न करिती । त्यास येमयातना करिती । या नांव आदिदैविक ॥ १८॥

जें वेंदांच्या आज्ञेप्रमाणें चालत नाहीत,हरिभक्ति करीत नाहीत त्यांस यमयातना भोगाव्या लागतात,ह्यांचे नांव आधिदैविक.

अक्षोभ नर्कीं उदंड जीव । जुनाट किडे करिती रवरव। बांधोन टाकिती हातपाव ।या नांव आदिदैविक॥१९॥

ह्या यातनांचे काहीं प्रकार पाहा:अक्षोभ नामक (रटरट शिजणा-या) नरकांत-जेथे जुनाट किडे रवरव करीत असतात त्यांत असंख्य (पापी) जीवांना हातपाय बांधून टाकतात.(अक्षोभ नामक नरकांत अनंत किडे हातपाय बांधुन टाकल्यामुळे रवरव करीत असतात.)

उदंड पैस लाहान मुख । कुंभाकार कुंड येक । दुर्गंधी उकाडा कुंभपाक ॥ या नांव आदिदैविक ॥ २०॥

( कुंभपाक - लहान तोंडाचे मोठे भांडे )

लहान तोंडाचे पण ज्याच्या आंत मोकळी जागा पुष्कळ असतें त्यात घागरीच्या आकाराचें (कुंभाकार) एक कुंड असतें.दुर्गंधी व उकाडा (अतिशय) असतो. त्याला कुंभपाक नरक म्हणतात.

तप्तभूमिका ताविती । जळत स्तंभ पोटाळविती । नाना सांडस लाविती । या नांव आदिदैविक ॥ २१॥

( तप्तभूमिका ताविती - तप्त जमिनीवरून , पोटाळविती - पोटावरून फिरवतात )

तापलेल्या जमिनीवर लोळवितात (तापत टाकतात.),जळत्या खांबास मिठ्या मारावयास लावतात.सांडसानी तुकडे काढतात.(अनेक चिमटे-सांडस आंगाला लावतात.)

येमदंडाचे उदंड मार । यातनेची सामग्री अपार । भोग भोगिती पापी नर । या नांव आदिदैविक ॥ २२॥

यमाचे शासन करण्याचे प्रकार पुष्कळ आहेंत,व शिक्षा करण्याचीही (यातनेची) सामुग्री पुष्कळ (अपार आहें.).पापी जीवांस ते भोग भोगावे लागतात.

पृथ्वीमध्यें मार नाना । त्याहून कठीण येमयातना । मरितां उसंतचि असेना । या नांव आदिदैविक ॥ २३॥

मनुष्यलोकीं अनेक प्रकारचे मार आहेंत,पण त्यांहून यमाचा मार फार कठिण! त्याला मारतांना खळ म्हणून नाहींच.(यमदुतांना फुरसत नसतें) यांचे नांव आधिदैविक.

चौघे चौंकडे वोढिती । येक ते झोंकून पाडिती । ताणिती मारिती वोढूनि नेती । या नांव आदिदैविक ॥२४॥

चोघे चार बाजूस ओढतात,कोणी हिसका देऊन पाडतात.ताणतात,मारतात,फरफटत नेतात.

उठवेना बसवेना । रडवेना पडवेना । यातनेवरी यातना । या नांव आदिदैविक ॥ २५॥

जीवांना उठवत नाहीं,रडवत नाही,पडवत नाहीं,सारखा छळावर छळ चाललेला असतो.(यातनेवर यातना असा सारखा क्रम चालू असतों)

आक्रंदे रडे आणि फुंजे । धकाधकीनें निर्बुजे । झुरझुरों पंजर होऊन झिजे । या नांव आदिदैविक ॥ २६॥

प्राणी ओरडतो,रडतो,हुंदके देतो (स्फुंदतो),धकाधकीनें गोंधळून जातो (कासावीस होतो-निर्बुजें),झुरणीस लागून झिजून त्याचे अस्थिपंजर उरतात.

कर्कश वचनें कर्कश मार । यातनेचे नाना प्रकार । त्रास पावती दोषी नर । या नांव आदिदैविक ॥ २७॥

कठोर भाषण,दु:सह मार असे छळण्याचें अनेक प्रकार,त्यामुळे पापी जीव बेजार होतात,भय पावतात ह्यांचे नांव आधिदैविक.

मागां बोलिलां राजदंड । त्याहून येमदंड उदंड । तेथील यातना प्रचंड । भीमरूप दारुण ॥ २८॥

पूर्वी राजदंड सांगितला,त्यापेक्षा यमदंड मोठा,तेथील यातना भयंकर,दु:सह व कठोर असतात.

आध्यात्मिक आदिभूतिक । त्याहूनि विशेष आदिदैविक । अल्प संकेतें कांहींयेक । कळावया बोलिलें ॥२९॥

अध्यात्मिक व आधिभौतिक तापांपेक्षा आधिदैविक ताप फार मोठा.तो कळावा म्हणून थोडक्यांत सांगितला.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आदिदैविकतापनिरूपणनाम समास आठवा ॥ ८॥**

**समास नववा : मृत्युनिरूपण ॥ श्रीराम् ॥**

संसार म्हणिजे सवेंच स्वार । नाहीं मरणास उधार । मापीं लागलें शरीर । घडीनें घडी ॥ १॥

( सवेंच स्वार - सतत धावणारा स्वार )

संसार म्हणजे प्राण्याच्या जन्मापासूनच त्याच्या पाठोपाठ आलेला मृत्यूचा दूत (स्वार) असतों,मरणाला उधारी नाही.प्रत्येक घटकेंचे माप शरीरास लागलें आहें.

नित्य काळाची संगती । न कळे होणाराची गती । कर्मासारिखे प्राणी पडती । नाना देसीं विदेसीं ॥ २॥

शरीराला काळाची संगति नित्य आहें.पुढे काय होईल ते कळत नाही.कर्माप्रमाणे प्राणी स्वदेशी किंवा विदेशी पडतात (मृत्यु पावतात).

सरतां संचिताचें शेष । नाहीं क्षणाचा अवकाश । भरतां न भरतां निमिष्य । जाणें लागे ॥ ३॥

( संचिताचें शेष - पूर्वजन्माचे साठलेले )

आयुष्याची शिल्लक संपली की (संचीत कर्म संपताक्षणीच ) क्षणांचा अवकाश लागत नाही.निमिष भरतें न भरते तोंच जावे लागतें.

अवचितें काळाचे म्हणियारे । मारित सुटती येकसरें । नेऊन घालिती पुढारें । मृत्युपंथे ॥ ४॥

( म्हणियारे - दूत )

काळाचे दूत (म्हणियारे) मालकाचा हुकूम सुटतांच एकदम येऊन त्याला एकसारखे मारीत सुटतात.आणि नेऊन पुढे मृत्युपंथात ढकलतात.

होतां मृत्याची आटाटी । कोणी घालूं न सकती पाठीं । सर्वत्रांस कुटाकुटी । मागेंपुढें होतसे ॥ ५॥

( आटाटी - वेढा, कुटाकुटी - कुटून संपविणे )

मृत्यूचा धिंगाणा (ओढाताण,आटाटी) सुरु झाला कीं कोणीही त्याला पाठीशीं घालूं शकत नाहीं,कारण सर्वांनाच मागेपुढे मृत्यु कुटतों,(चेंदा करतो)(सर्वांना त्याचा मारा खावाच लागतो.)

मृत्युकाळ काठी निकी । बैसे बळियाचे मस्तकीं । माहाराजे बळिये लोकीं । राहों न सकती ॥ ६॥

( काठी निकी - निश्चित फटका बसणार )

मृत्यु ही काळाची बळकट (नियमितपणे येणारी) काठी आहें,ती बलवंतांच्याही डोक्यात बसते.मोठे राजे अथवा बलाढ्य हे जगांत राहू शकत नाहीत.(मृत्यूचा सोटा मोठमोठ्या बलिष्ठांच्या मस्तकी पडल्यावर तेही क्षणभरसुध्दा राहु शकत नाहीत.)

मृत्य न म्हणे किं हा क्रूर । मृत्य न म्हणे हा जुंझार । मृत्य न म्हणे संग्रामशूर । समरांगणीं ॥ ७॥

मृत्यु सर्वाच्याच पाठीमागें लागला आहें,त्याला हा कोण हा विचार नाही. हा क्रूर,हा झुंझार (योध्दा ,मल्ल) किंवा समरांगणावर युध्दात पराक्रमी आहें.

मृत्य न म्हणे किं हा कोपी । मृत्य न म्हणे हा प्रतापी । मृत्य न म्हणे उग्ररूपी । माहांखळ ॥ ८॥

( माहांखळ - दुष्ट )

हा रागीट प्रतापी क्रूररुपाचा किंवा मोठा दुष्ट आहें,

मृत्य न म्हणे बलाढ्य । मृत्य न म्हणे धनाढ्य । मृत्य न म्हणे आढ्य । सर्व गुणें ॥ ९॥

( आढ्य - सर्वगुणसंपन्न )

हा बलाढ्य अथवा धनाढ्य वा सर्वगुणांनी युक्त आहें.

मृत्य न म्हणे हा विख्यात । मृत्य न म्हणे हा श्रीमंत । मृत्य न म्हणे हा अद्भुत । पराक्रमी ॥ १०॥

हा प्रसिध्द किंवा श्रीमंत अथवा अद्भुत पराक्रम करणारा आहें.

मृत्य न म्हणे हा भूपती । मृत्य न म्हणे हा चक्रवती । मृत्य न म्हणे हा करामती । कैवाड जाणे ॥ ११॥

( कैवाड - मंत्रयुक्त युक्त्या )

हा राजा,चक्रवर्ती (सार्वभौम राजा) अथवा करामती (चमत्कार) करणारा (कलाकुशल) किंवा युक्त्या (कैवाड) जाणणारा आहे.

मृत्य न म्हणे हा हयपती । मृत्य न म्हणे गजपती । मृत्य न म्हणे नरपती । विख्यात राजा ॥ १२॥

( हयपती - घोडेवाला , नरपती - राजा )

हा पागेदार (हय-घोडे त्यांचा स्वामी),गजपति,अथवा प्रसिध्द नरश्रेष्ठ राजा आहें असे मृत्यु म्हणत नाही.

मृत्य न म्हणे वरिष्ठ जनीं । मृत्य न म्हणे राजकारणी । मृत्य न म्हणे वेतनी । वेतनधर्ता ॥ १३॥

( वेतनी - वतनदार )

हा लोंकात श्रेष्ठ आहे,हा राजकारणी आहें,अथवा पगारी नोकरी किंवा वडिलोपार्जित नोकरी असणारा (वतन असणारा)

मृत्य न म्हणे देसाई । मृत्य न म्हणे वेवसाई । मृत्य न म्हणे ठाई ठाई । पुंडराजे ॥ १४॥

हा देसाई उद्योगी किंवा हे पुंडपणा करणारे ठिकठिकाणचे राजे.

मृत्य न म्हणे मुद्राधारी । मृत्य न म्हणे व्यापारी । मृत्य न म्हणे परनारी । राजकन्या ॥ १५॥

हा सांप्रदायी (किंवा राजाची ) मुद्रा धारण करणारा,व्यापारी,ही परस्त्री,किंवा ही राजकन्या आहें (ह्या सर्वांवर मृत्यूचा तडाखा बसतो.)

मृत्य न म्हणे कार्याकारण । मृत्य न म्हणे वर्णावर्ण । मृत्य न म्हणे हा ब्राह्मण । कर्मनिष्ठ ॥ १६॥

कार्य किंवा कारण,वर्ण किंवा वर्णबाह्य (अवर्ण),किंवा कर्मनिष्ठ ब्राह्मण अशा प्रकारे मृत्यु कोणालाही ओळखत नाहीं.

मृत्य न म्हणे वित्पन्न । मृत्य न म्हणे संपन्न । मृत्य न म्हणे विद्वज्जन । समुदाई ॥ १७॥

व्युत्पत्ति जाणणारा (पंडित),श्रीमंत,लोकांत विद्वान् (विद्वान किंवा समुदाय करणारा पंडित)

मृत्य न म्हणे हा धूर्त । मृत्य न म्हणे बहुश्रुत । मृत्य न म्हणे हा पंडित । माहाभला ॥ १८॥

धूर्त,बहुश्रुत,मोठा चांगला पंडिंत

मृत्य न म्हणे पुराणिक । मृत्य न म्हणे हा वैदिक । मृत्य न म्हणे हा याज्ञिक । अथवा जोसी ॥ १९॥

पुराणिक.वैदिक,याज्ञिक अथवा जोशी

मृत्य न म्हणे अग्निहोत्री । मृत्य न म्हणे हा श्रोत्री । मृत्य न म्हणे मंत्रयंत्री । पूर्णागमी ॥ २०॥

( पूर्णागमी - वेदाभ्यासी )

अग्निहोत्री,श्रोतिय (श्रुति जाणणारा-वेदवेत्ता),मंत्रयंत्र करणारा (आगमी) शास्त्रांत पुर्ण निष्णात याचा विचार मृत्यु करत नाहीं.

मृत्य न म्हणे शास्त्रज्ञ । मृत्य न म्हणे वेदज्ञ । मृत्य न म्हणे सर्वज्ञ । सर्व जाणे ॥ २१॥

शास्त्रज्ञ,वेदवेत्ता,सर्व काहीं जाणणारा,अंर्तज्ञानी (सर्वज्ञ)

मृत्य न म्हणे ब्रह्महत्या । मृत्य न म्हणे गोहत्या । मृत्य न म्हणे नाना हत्या । स्त्रीबाळकादिक ॥ २२॥

ब्रह्महत्या,गोहत्या किंवा स्त्रीबालकादि अनेक हत्या मृत्यु पहात नाही.(मृत्युला ब्रह्महत्येचे भय वाटत नाही,तो गोहत्येला भित नाही.स्त्री बालकांदिकांची त्याला करुणा येत नाही.)

मृत्य न म्हणे रागज्ञानी । मृत्य न म्हणे ताळज्ञानी । मृत्य न म्हणे तत्वज्ञानी । तत्ववेत्ता ॥ २३॥

रागरागिण्या व ताल जाणणारा,किंवा तत्त्वज्ञानी (शब्दज्ञानी),तत्त्ववेत्ता (अनुभवी),

मृत्य न म्हणे योग्याभ्यासी । मृत्य न म्हणे संन्यासी । मृत्य न म्हणे काळासी । वंचूं जाणे ॥ २४॥

( काळासी वंचूं जाणे - काळास फसविणारा )

योगाचा अभ्यास करणारा,संन्यासी.किंवा (चांगदेवांप्रमाणें) काळाच्या हातावर तुरी देणारा (काळवंचक-योगाभ्यासानें मरण पुढे ढकलणारा)

मृत्य न म्हणे हा सावध । मृत्य न म्हणे हा सिद्ध । मृत्य न म्हणे वैद्य प्रसिद्ध । पंचाक्षरी ॥ २५॥

सावध,सिध्द,प्रसिध्द वैद्य किंवा पंचाक्षरी (देवरुषी),

मृत्य न म्हणे हा गोसावी । मृत्य न म्हणे हा तपस्वी । मृत्य न म्हणे हा मनस्वी । उदासीन । २६॥

गोसावी,तपस्वी,मनोनिग्रही किंवा उदासीन,

मृत्य न म्हणे ऋषेश्वर । मृत्य न म्हणे कवेश्वर । मृत्य न म्हणे दिगंबर । समाधिस्थ ॥ २७॥

ऋषीश्वर,कवीश्वर,दिगंबर (नग्नावस्थेत राहाणारा सिध्द) समाधीत बसलेला.

मृत्य न म्हणे हठयोगी । मृत्य न म्हणे राजयोगी । मृत्य न म्हणे वीतरागी । निरंतर ॥ २८॥

हा हठयोगी,राजयोगी,किंवा नित्य वैराग्यशाली आहे हें मृत्यु पहात नाहीं.

मृत्य न म्हणे ब्रह्मच्यारी । मृत्य न म्हणे जटाधारी । मृत्य न म्हणे निराहारी । योगेश्वर ॥ २९॥

ब्रह्मचारी, जटाधारणा करणारा किंवा निराहार करणारा, योगेश्र्वर,

मृत्य न म्हणे हा संत । मृत्य न म्हणे हा महंत । मृत्य न म्हणे हा गुप्त । होत असे ॥ ३०॥

संत,महंत,किंवा गुप्त होणारा.

मृत्य न म्हणे हा स्वाधेन । मृत्य न म्हणे हा पराधेन । सकळ जीवांस प्राशन । मृत्युचि करी ॥ ३१॥

स्वतंत्र व परतंत्र (यजमान व नोकर यांच्यात तो भेद करीत नाही.) ह्या सर्वांना मृत्यूच पिऊन टाकतो (ग्रास करुन टाकतो,गट्ट करतो).

येक मृत्युमार्गी लागले । येकीं आर्ध पंथ क्रमिले । येक ते सेवटास गेले । वृद्धपणीं ॥ ३२॥

कोणी मृत्युच्या मार्गाला लागलेले असतात,कोणी अर्धी वाट चालून गेलेले असतात.कोणी म्हातारपणी मृत्यूच्या मुक्कामास पोंचतात,

मृत्य न म्हणे बाळ तारुण्य । मृत्य न म्हणे सुलक्षण । मृत्य न म्हणे विचक्षण । बहु बोलिका ॥ ३३॥

बाळ,सुलक्षणी,तरूण किंवा मोठा बोलणारा शहाणा आहें,(बाल्य,तारुण्य,वार्धक्य ह्या दशा मृत्यु जाणत नाही).

मृत्य न म्हणे हा आधारु । मृत्य न म्हणे उदारु । मृत्य न म्हणे हा सुंदरु । चतुरांग जाणे ॥ ३४॥

( चतुरांग - ज्ञान संपन्न )

हा (अनेक जीवांचा) आधार,(शे-दोनशेंचा पाशिंदा) किंवा उदार आहें,अथवा सुंदर आहें,सर्व कामात निष्णात आहें.

मृत्य न म्हणे पुण्यपुरुष । मृत्य न म्हणे हरिदास । मृत्य न म्हणे विशेष । सुकृती नर ॥ ३५॥

हा पुण्यपुरुष,हा हरिदास,किंवा हा विशेष चांगली कार्ये करणारा ह्याचा विचार मृत्यु करीत नाही.

आतां असो हें बोलणें । मृत्यापासून सुटिजे कोणें । मागेंपुढें विश्वास जाणें । मृत्युपंथें ॥ ३६॥

आतां हें बोलणें असो,मृत्युपासून कोण सुटणार ? मागेंपुढें सगळ्या विश्र्वालाच मृत्युमार्गाने जावयाचे आहें.(मागेपुढे सर्वांसच मृत्यु घेऊन जातो)

च्यारी खाणी च्यारी वाणी । चौर्यासी लक्ष जीवयोनी । जन्मा आले तितुके प्राणी । मृत्य पावती ॥ ३७॥

चारी खाणी,चारी वाणी,चौ-यांशी लक्ष जीवयोनि,जन्माला म्हणून जितके प्राणी आलें आहेत ते सर्व मरणारच (सर्व प्राणी मृत्यू वश आहेंत ते सर्व मरणारच (सर्व प्राणी मृत्युवश आहेत).

मृत्याभेणें पळों जातां । तरी मृत्य सोडिना सर्वथा । मृत्यास न ये चुकवितां । कांहीं केल्या ॥ ३८॥

मृत्यूच्या भयानें पळून गेले तरी मृत्यु कधीही सोडणार नाहीं,काही केले तरी मृत्यु चुकवितां येणार नाही. (मृत्यूच्या भयाने कोणालाही कोठेही पळुन जाता येत नाही,त्याला गुंगारा देणे अगदी अशक्य आहें).

मृत्य न म्हणे हा स्वदेसी । मृत्य न म्हणे हा विदेसी । मृत्य न म्हणे हा उपवासी । निरंतर ॥ ३९॥

हा स्वदेशी किंवा परदेशी आहें किंवा नित्य उपवासी आहे.

मृत्य न म्हणे थोर थोर । मृत्य न म्हणे हरिहर । मृत्य न म्हणे अवतार । भगवंताचे ॥ ४०॥

थोर थोर हरिहर किंवा भगवंतांचे अवतार आहेत असे मृत्यु म्हणत नाही (फार काय सांगावे ?हरिहर व भगवंतांचे अवतार हेही मृत्यु चुकवू शकत नाहीत).

श्रोतीं कोप न करावा । हा मृत्यलोक सकळांस ठावा । उपजला प्राणी जाईल बरवा । मृत्यपंथें ॥ ४१॥

श्रोत्यानीं रागावू नये,हा मृत्युलोक आहे हे सर्वांना ठाऊक आहे.येथे जन्मलेला प्राणी खचित मृत्युपंथाला जाणार (जन्मला तो निश्र्चयानें मेलाच पाहिजें)

येथें न मनावा किंत । हा मृत्यलोक विख्यात । प्रगट जाणती समस्त । लहान थोर ॥ ४२॥

ह्याबद्दल शंका घेऊ नये,हा मृत्युलोक प्रसिध्दच आहें,लहानथोर ह्याला पक्के ओळखतात.

तथापी किंत मानिजेल । तरी हा मृत्यलोक नव्हेल । याकारणें नासेल । उपजला प्राणी ॥ ४३॥

( नव्हेल - बदलत नाही )

संशय घेतला तरी हा मृत्युलोक नाहीं असें होत नाही,ह्यास्तव उपजलेला प्राणी नाश पावेलच.

ऐसें जाणोनियां जीवें । याचें सार्थकचि करावें । जनीं मरोन उरवावें । कीर्तिरूपें ॥ ४४॥

हें जाणूनच जीवानें देहाचें सार्थकच होईल असें करावें (जन्माचे साफल्य करावें) आणि जगांत आपली किर्ती राहील असे करावें.(जन्माचे साफल्य करावे) आणि जगांत आपली कीर्ति राहील असें वागावें.(व मागे लोक सत्कीर्ती गात राहतील असे वागावें).

येरवीं प्राणी लहान थोर । मृत्य पावती हा निर्धार । बोलिलें हें अन्यथा उत्तर । मानूंची नये ॥ ४५॥

ऐरवीं प्राणी लहान असो,थोर असो तो मृत्यु पावणारच,हें जे सांगितले ते खोटे मानतांच कामा नये.(लहानथोर सर्वांना मृत्यु आहेच आहे.)

गेले वहुत वैभवाचे । गेले बहुत आयुष्याचे । गेले अगाध महिमेचे । मृत्यपंथें ॥ ४६॥

पुष्कळ वैभवाचें,आयुष्याचे,तसेच कीर्तिमान होते ते सर्व गेले (भव्य वैभव भोगणारे,दीर्घायुषी गेले.थोर माहात्म्य संपादन करणारे गेले).

गेले बहुत पराक्रमी । गेले बहुत कपटकर्मी । गेले बहुत संग्रामी । संग्रामसौरे ॥ ४७॥

( संग्रामसौरे - संग्रामात शूर )

पराक्रमी,कपट करणारे,युध्द करणारे,(संग्रामशूर) युध्दकला जाणणारे गेले.

गेले बहुतां बळांचे । गेले बहुतां काळांचे । गेले बहुतां कुळांचे । कुळवंत राजे ॥ ४८॥

पुष्कळ बळाचे,काळाचे,अनेक कुळातलें कुळवंत राजें गेले.

गेले बहुतांचे पाळक । गेले बुद्धीचे चाळक । गेले युक्तीचे तार्किक । तर्कवादी ॥ ४९॥

पुष्कळांचे पालक,बुध्दीचे चालक,युक्तीने तर्क लढवून तर्कवाद करणारे गेलें.

गेले विद्येचे सागर । गेले बळाचे डोंगर । गेले धनाचे कुबेर । मृत्यपंथे ॥ ५०॥

विद्येचे समुद्र,बळांचे पर्वत,कुबेरासारखे धनवान.

गेले बहुत पुरुषार्थाचे । गेले बहुत विक्रमाचे । गेले बहुत आटोपाचे । कार्यकर्ते ॥ ५१॥

बहुत पुरुषार्थ करणारे,मोठे पराक्रमी,पुष्कळ व्याप सांभाळणारे (आटोप,कामाचा उरक असणारे) असे कार्यकर्ते गेले.

गेले बहुत शस्त्रधारी । गेले बहुत परोपकारी । गेले बहुत नानापरी । धर्मरक्षक ॥ ५२॥

शस्त्रे धारण करणारे,परोपकार करणारे व अनेक प्रकारें धर्मरक्षण करणारे असे अनेक जण गेलें.

गेले बहुत प्रतापाचे । गेले बहुत सत्कीर्तीचे । गेले बहुत नीतीचे । नीतिवंत राजे ॥ ५३॥

बहुत प्रतांपाचे सत्कीर्तीचे गेले,बहुत नितीमान राजेही गेले.

गेले बहुत मतवादी । गेले बहुत कार्यवादी । गेले बहुत वेवादी । बहुतांपरीचे ॥ ५४॥

अनेक मतवादी,अनेक कार्यवादी,तसेंच अनेक प्रकारे वादविवाद करणारे गेले.

गेलीं पंडितांची थाटें । गेलीं शब्दांचीं कचाटें । गेलीं वादकें अचाटें । नाना मतें ॥ ५५॥

( शब्दांचीं कचाटें - शब्दच्छल करणारे, वैयाकरणी , वादकें अचाटें - वादविवाद पटू )

पंडितांचे समुदाय (थांटे),शब्दच्छल करणारे (वैय्याकरणी),नाना मतांचे अचाट वाद करणारे गेले.

गेले तापस्यांचे भार । गेले संन्यासी अपार । गेले विचारकर्ते सार । मृत्यपंथे ॥ ५६॥

तपस्व्यांचे मेळे,अपार संन्यासी व सारासार विचार करणारे मृत्यूच्या मार्गांने गेले.

गेले बहुत संसारी । गेले बहुत वेषधारी । गेले बहुत नानापरी । नाना छंद करूनी ॥ ५७॥

अनेक संसारी,अनेक वेषधारी,अनेक प्रकारचे अनेक छंद करुन पुष्कळ जण गेले.(नाना छंदाचे लोक आले आणि गेले),

गेले ब्राह्मणसमुदाये । गेले बहुत आचार्य । गेले बहुत सांगों काये । किती म्हणौनि ॥ ५८॥

ब्राह्मणांचे समुदाय (विद्वान ब्राह्मण),अनेक आचार्य (धमाधिकारी) असे असंख्य गेले,काय व किती गेले म्हणून सांगावे ?

असो ऐसे सकळहि गेले । परंतु येकचि राहिले । जे स्वरुपाकार जाले । आत्मज्ञानी ॥ ५९॥

असे सगळे गेले.परंतु जे आत्मज्ञानी स्वरुपाकार झाले तेवढेच राहिलें.(असो सारेच गेले आहेत,पण एक मात्र राहिले आहेत,स्वरुपाकार झालेले,आत्मज्ञानी तेवढे मृत्यूला मारुन उरलें आहेत!).

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मृत्यनिरूपणनाम समास नववा ॥ ९॥**

**समास दहावा : वैराग्य निरूपण ॥ श्रीराम् ॥**

संसार म्हणिजे माहापूर । माजीं जळचरें अपार । डंखूं धावती विखार । काळसर्प ॥ १॥

( माजीं - त्यामध्ये )

संसार म्हणजे महापुर (महासागर) असून त्यांत विकाराची असंख्य जलचरे आहेत. काळरुप विषारी सर्प चावण्याकरितां धावत आहेत.(विषारी काळसर्प जागोजाग दंश करायला टपलें आहेत).

आशा ममता देहीं बेडी । सुसरी करिताती तडातोडी । नेऊन दुःखाचे सांकडी- । माजीं घालिती ॥२॥

आशा ममता ह्या (देहांत-देहबुध्दीमध्ये घालणा-या बेड्या आहेत) देहाच्या खोड्यांत अडकविणा-या सुसरी असून (पदार्थांशी किंवा ईश्र्वराशीं) वियोग सोसायला लावतात, व दुःखाच्या खबदडींत (संकटात नेऊन टाकतात).

अहंकारनक्रें उडविलें । नेऊनि पाताळीं बुडविलें । तेथुनियां सोडविलें । न वचे प्राणी ॥ ३॥

( न वचे - वाचत नाही )

अहंकाररुपी नर्काने (ह्या जीवाला) वर उंच उडवून लगेच पाताळांत (अधोगतींत) बुडवून ठेंविले आहें. तेथून प्राण्याची सुटका होत नाहीं.

काम मगरमिठी सुटेना । तिरस्कार लागला तुटेना । मद मत्सर वोहटेना । भूलि पडिली ॥ ४॥

( वोहटेना - उणावत नाही )

कामरुप मगराची बळकट मिठी सुटत नाहीं,तिरस्कार (द्वेशभाव) लागलेला तुटत (हटत) नाहीं,मदमत्सरांना ओहोटी लागत नाहीं(ओसरत नाहीत), भूल पडतें.

वासनाधामिणी पडिली गळां । घालून वेंटाळें वमी गरळा । जिव्हा लाळी वेळोवेळां । भयानक ॥ ५॥

( वमी गरळा - गरळ वामन करतो )

वासनारुपी धामीण गळ्यांत विळखा घालून पडली असून (तिच्या पकडींत हा साप सापडला आहें) व ती विष ओकते आहे, आणि वारंवार जीभ लळलळा बाहेर काढून जिभ़ल्या चाटीत आहें (ती भयंकर जीभ आंतबाहेर काढून विष ओकीत आहें.)

माथां प्रपंचाचें वोझें । घेऊन म्हणे माझें माझें । बुडतांही न सोडी, फुंजे । कुळाभिमानें ॥ ६॥

(अशाहीं स्थितीत कैचींत असता) मनुष्य डोक्यावर प्रपंचाचे ओझे घेऊन तें माझे माझे म्हणत असतो,बुडू लागला तरी तो भार सोडत नाहीं,व कुळाच्या अभिमानाने (फुंजे) फुगतच राहातो.

पडिलें भ्रांतीचें अंधारें । नागविलें अभिमानचोरें । आलें अहंतेचें काविरें । भूतबाधा ॥ ७॥

भ्रांतीचा-भ्रमाचा गडद अंधःकार पडून त्यात अभिमानरुप चोर नागवितो आहे.आणि मीपणरुप भूतबाधेचा चळ (भ्रम कांविरे) भरतो.(अहंकार चोराने ह्याला नागविलें आहें मीपणरुप भुताची बाधा झाल्यामुळें त्याच भ्रमांत हा बुडाला आहें),

बहुतेक आवर्ती पडिले । प्राणी वाहातचि गेले । जेंहिं भगवंतासी बोभाईलें । भावार्थबळें ॥ ८॥ देव आपण घालूनि उडी । तयांसी नेलें पैलथडी । येर तें अभाविकें बापुडीं । वाहातचि गेलीं ॥ ९॥

( आवर्ती पडिले - भोवर्यात सापडले , बोभाईलें भावार्थ बळे - भावभक्तीच्या जोरावर धावा )

असे बहुतेक प्राणी ह्या भोव-यांत (आवर्ती) सांपडून वाहात गेले,पण ज्यांनी भावभक्तीने भगवंताचा धावा केला.(बोभाईले),त्यांना भक्तवत्सल देवानें स्वतः उडी टाकून संसारसमुद्राच्या पैलतीराला नेले,बाकीचे अभाविक-अभक्त प्राणी-असतात ते बापडें वाहातच गेले आहेत.

भगवंत भावाचा भुकेला । भावार्थ देखोन भुलला । संकटीं पावे भाविकाला । रक्षितसे ॥ १०॥

भगवान भावभक्तीचा भुकेला आहे, भावार्थ पाहिला की तो भुलतो, भक्तांना संकटात पावून त्यांचे रक्षण करतो.(देव भक्तीचा भुकेला आहे,तो भावाला भुलतो जडभारी पडतांच भाविकांना संकटात पावतो).

जयास भगवंत आवडे । तयाचें देवासीं सांकडें । संसारदुःख सकळ उडे । निजदासाचें ॥ ११॥

ज्याला भगवंत आवडतो त्याचा संकटनिवारणाचा भार देवावर पडतो.भक्तांचे सगळेच संसार दुःख नाहीसे होते.

जे अंकित ईश्वराचे । तयांस सोहळे निजसुखाचे । धन्य तेचि दैवाचे । भाविक जन ॥ १२॥

जे देवाचे दास अंकित झालें,त्यांनाच स्वानंदसुखाचा सोहळा भोगावयास मिळतों. ते भाविक लोक दैववान होत.धन्य त्यांची! (तात्पर्य भाविकजन परमधन्य होत,दैवाचे पुतळे तेच)

जैसा भाव जयापासीं । तैसा दैव तयासी । जाणे भाव अंतरसाक्षी । प्राणीमात्रांचा ॥ १३॥

जसा ज्याला भाव तसा त्याला देव,तो अंतरसाक्षी परमात्मा प्रत्येक प्राण्याच्या मनांतील भाव (कोणाचा भाव कसा आहे हे ) जाणतो.

जरी भाव असिला माईक । तरी देव होये माहा ठक । नवल तयाचें कौतुक । जैशास तैसा ॥ १४॥

भाव लबाडीचा असेल तर देवही महाठक बनतों.जशास तसे व्हावयांचे हे त्याचे आश्र्चर्य व कौतुक आहे.(देवाचे कौतुक हेच की तो जशास तसा आहें)

जैसें जयाचें भजन । तैसेंची दे समाधान । भाव होतां किंचित न्यून । आपणहि दुरावे ॥ १५॥

जो जसें त्याचे भजन करतो तसेच तो त्याला समाधान देतो.भाव यत्किंचिंत कमी झाला कि तो दूर होतो.

दर्पणीं प्रतिबिंब दिसे । जैशास तैसें भासे । तयाचें सूत्र असे । आपणाच पासीं ॥ १६॥

आरशात प्रतिबिंब दिसतें तें (मूळ बिंब) जसे असते तसे दिसते.(बिंब असेल तसेच आरशांत प्रतिबिंब पडते).(चांगले किंवा वाईट) दिसण्याचे सुत्र आपल्याचजवळ आहें.

जैसें आपण करावें । तैसेंचि तेणें व्हावें । जरी डोळे पसरूनि पाहावें । तरी तेंही टवकारे ॥ १७॥

जसे आपण करावे तसेंच ते होते! (आपण जसे हावभाव करु तसेच ते आरशांत उमटतात) आपण डोळे वटारुन पांहू लागलों तर तें प्रतिबिंबही टवकारुन-डोळे वटारुन पाहू लागते.

भृकुटीस घालून मिठी । पाहातां क्रोधें तेंहि उठी । आपण हास्य करितां पोटीं । तेंहि आनंदे ॥ १८॥

भुवयांस आंठ्या घालून भुवया चढवून-आपण पाहिलें तर तेंही रागावलेलें दिसते व आपण हंसलो तर त्यालाही आनंद झालासा दिसतो (तेंही हसतें).

जैसा भाव प्रतिबिंबला । तयाचाचि देव जाला । जो जैसें भजे त्याला । तैसाचि वोळे ॥ १९॥

अशा प्रकारचा भाव (भक्तांच्या अंत:करणात) बिंबतो त्याचाच (भावानुरुप) देव त्याला भेटतो.जो त्याचे जसे भजन करील तसाच तो त्याला प्रसन्न होतो.(भावाचे प्रतिबिंबच देवरुपानें प्रत्यक्ष होतें,जो जसा भजतो तसा देव त्याला वोळतो)

भावें परामार्थाचिया वाटा । वाहाती भक्तीचिया पेंठा । भरला मोक्षाचा चोहाटा । सज्जनसंगें ॥ २०॥

( चोहाटा - चव्हाटा )

भावाने परमार्थाच्या वाटेला लागला की सगळे मार्ग भक्तीच्या पेठेंत नेऊन सोडतात व संतसंगतीने आपण नेमके मोक्षाच्या चौकांत जाऊन पोंचतो.

भावें भजनीं जे लागले । ते ईश्वरी पावन जाले । भावार्थबळें उद्धरिले । पूर्वज तेहीं ॥ २१॥

जे भावार्थाने भक्तिमार्गाला लागले,ते स्वत: ईश्र्वरस्वरुपी पोचून पावन होतात,व आपल्या भावार्थबळानें पूर्वजांचा उध्दार करतात.

आपण स्वयें तरले । जनासहि उपेगा आले । कीर्तिश्रवणें जाले । अभक्त, भावार्थी ॥ २२॥

ते आपण स्वतः तरतात व लोकांच्याही उपयोगास येतात,त्यांची कीर्ति ऐकून (किंवा त्यांच्यामुखे भगवत्कीर्ती ऐकून) अभक्तही भावार्थी भाविक होतात.

धन्य तयांची जननी । जे लागले हरिभजनीं । तेहिंच येक जन्म जनीं । सार्थक केला ॥ २३॥

जे हरिभजनास लागतात.त्यांची मातोश्री धन्य होय.जगांत त्यांनीच आपल्या जन्माचे सार्थक केले.

तयांची वर्णूं काय थोरी । जयांचा भगवंत कैवारी । कासे लाऊन उतरी । पार दुःखाचा ॥ २४॥

( कासे लाऊन - निर्धाराने )

ज्यांचा कैवारी साक्षात भगवान  व ज्यांना देव आपल्या कासेंस लावून संसारदुःखाच्या पैलतीराला पोंचवितो त्यांची थोरवी किती वर्णन करावी ?

बहुतां जन्मांचे सेवटीं । जेणें चुके अटाटी । तो हा नरदेह भेटी । करी भगवंतीं ॥ २५॥

( अटाटी - यातायात )

अनेक जन्मांच्या शेवटीं यातायात (अटाटी) चुकवून भगवंताची भेट करवून देणारा हा नरदेह आहें.

म्हणौन धन्य ते भाविक जन । जेंहिं जोडिलें हरिनिधान । अनंत जन्मांतरींचें पुण्य । फळासि आलें ॥२६॥

म्हणून भगवंताचा ठेवा ज्यांनीं भावबळानें प्राप्त करुन घेतला,ते भाविक लोक धन्य होत. त्यांचें अनंत जन्मांचे पुण्य फळाला आलें,असेच म्हटलें पाहिजे.

आयुष्य हेचि रत्नपेटी । माजीं भजनरत्नें गोमटीं । ईश्वरीं अर्पूनिया लुटी । आनंदाची करावी ॥ २७॥

आयुष्यरुपी रत्नपेंटीत भजनरुप सुंदर रत्नें ठेवून ती (पेटी) परमेश्र्वरास अर्पण करुन स्वानंदाची लूट करावी.

हरिभक्त वैभवें कनिष्ठ । परी तो ब्रह्मादिकां वरिष्ठ । सदा सर्वदा संतुष्ट । नैराशबोधें ॥ २८॥

( नैराशबोधें - विरक्त बोधाने )

हरिभक्त हा लौकिकी वैभव जवळ नसल्यांने कनिष्ठ दिसला तरी सदासर्वदा वैराग्य व ज्ञान ह्या योंगानें तो संतुष्ट असल्यामुळें ब्रह्मादिदेवांपेक्षाही तो श्रेष्ठ असतों,(कां कीं वैराग्यशिरोमणि नैराश्यबोंधानें संतुष्ट असतो.)

धरून ईश्वराची कास । केली संसाराची नैराश । तयां भाविकां जगदीश । सबाह्य सांभाळी ॥ २९॥

ईश्वराची कांस धरुन ज्या भाविकांनीं संसाराची आशा सोडली (संसारतृच्छ केला) त्यांना जगदीश अंतर्बाह्य (आंत षड्रिपु व बाहेर जग ह्यांपासून) सांभाळतो.

जया संसाराचें दुःख । विवेकें वाटे परम सुख । संसारसुखाचेनि पढतमूर्ख । लोधोन पडती ॥ ३०॥

( लोधोन पडती - तुटून पडतात, झोंबतात )

विवेक जागा असल्यामुळें संसारदुःखच त्यांना विवेकाचे परम सुख वाटतें. पढतमूर्ख असतात ते संसाराला लुब्ध होऊन पडतात.(इतर पामर मूर्ख संसारसुखावरच लुब्ध होऊन पडतात.)

जयांचा ईश्वरीं जिव्हाळा । ते भोगिती स्वानंदसोहळा । जयांचा जनावेगळा । ठेवा आक्षै ॥ ३१॥

ईश्वराकडे ज्यांच्या अंतःकरणाचा ओढा असतो ते स्वानंदसुखाचा सोहळा भोगतात.त्याचा (भगवत्कृपेचा) ठेवा अक्षय व जनांच्या (नाशिवंत) ठेव्याहून वेंगळा असतों. (त्यांना हरिनिधान अक्षय प्राप्त होतें,हें सामान्य जनांच्या कपाळीं कोठून असणार ?)

ते आक्षै सुखें सुखावले । संसारदुःखें विसरले । विषयेरंगी वोरंगले । श्रीरंगरंगीं ॥ ३२॥

( वोरंगले - तृच्छ मानू लागले )

असे भक्त शाश्वतसुखानें सुखरुप होतात,संसारांतील दुःखें पार विसरतात आणि विषयरंगास पूर्ण विटून श्रीहरीच्या रंगात रंगून जातात.(हे श्रीरंगात रंगलेले श्रीरंगरंगी पुण्यात्मे विषयांच्या रंगाविषयी-विषयसुखाविषयीं-पूर्ण विरक्त,निरिच्छ-असतात-वोंरंगलें.)

तयांस फावली नरदेह पेटी । केली ईश्वरेंसिं साटी । येरें अभाविकें करंटीं । नरदेह गेला ॥ ३३॥

( येरें अभाविकें करंटीं - इतर दुर्दैवी अभक्त )

त्यांनाच ही नरदेहरुपी (रत्न) पेटी मिळाली असें म्हटलें पाहिजे,कीं ज्यांनी ज्या पेटीचा सवदा (देवघेव) परमेश्वराशीं केला.(त्यांनी ती देऊन ईश्वर जोडला.साटी-अदलाबदल,देवधेव),बाकीचे अभाविक करंटे होत,त्यांनी नरदेह फुकट दवडला हेच खरे

आवचटें निधान जोडलें । तें कवडिच्या बदल नेलें । तैसें आयुष्य निघोनि गेलें । अभाविकाचें ॥ ३४॥

( आवचटें निधान जोडलें - योगायोगाने रत्नांचा लाभ )

अकल्पित (अवचटे) ठेंवा सांपडावा (रत्न मिळावें) व तो कवडीच्या मोबदल्यांत देऊन टाकावा,तसें नरदेहाचे अमोल आयुष्य अभक्त (अभाविक) लोक व्यर्थ दवडतात.

बहुता तपाचा सांठा । तीणें लाधला परीस गोटा । परी तो ठाईंचा करंटा । भोगूंच नेणे ॥ ३५॥

पुष्कळ तपश्र्चर्येच्या प्रभावानें परीस हाती आला,पण मूळचा कपाळ करंटा असेल तर त्या माणसाला त्याचा उपभोग घेतां येत नाहीं.

तैसा संसारास आला । मायाजाळीं गुंडाळला । अंतीं येकलाचि गेला । हात झाडुनी ॥३६॥

त्याप्रमाणें अमोल दुर्लभ नरदेह घेऊन अभाविक-अभक्त जन्माला (संसाराला) येतो,पण (मिथ्या) मायाजाळात गुरफटून जाऊन शेवटीं हात हालवीत एकटाच आला तसा निघून जातों.

या नरदेहाचेनि संगतीं । बहुत पावले उत्तम गती । येकें बापुडी यातायाती । वरपडी जालीं ॥३७॥

ह्या नरदेहाच्या योगानें अनेक जण उत्तम गतीला गेलें (उध्दरुन गेलें) आहेत आणि कोणी बिचारे जन्ममरणाच्या कचाटींत सापडलें आहेत.(फे-यातं सापडले आहेत.)

या नरदेहाचेनि लागवेगें । सार्थक करावे संतसंगें । नीचयोनीं दुःख मागें । बहुत भोगिलें ॥३८॥

( नीचयोनीं दुःख मागें - यापूर्वी नीच योनीत दुःख भोगले )

हा नरदेह आता मिळाला आहे तर याच्यायोगानें (लागवेंगे) सत्संगतींत (राहून) त्वरित सार्थक करुन घ्यावे.कारण मागें नीच योनि व त्यांत होणारे दुःख फार भोगलें आहें.

कोण समयो येईल कैसा । याचा न कळे किं भर्वसा । जैसे पक्षी दाही दिशा । उडोन जाती ॥ ३९॥

कोण वेळ कशी येईल त्याचा नेंम नाहीं हें जाणून सावध व्हावें.जसे रिंगणात एकत्र जमलेले पक्षी दाही दिशांना उडून जातात.

तैसें वैभव हें सकळ । कोण जाणे कैसी वेळ । पुत्रकळत्रादि सकळ । विघडोन जाती ॥ ४०॥

तसेंच हे ह्या लोकांचे वैभव उडून जाईल व पुढें कशी वेळ का येईल तें कोणीं सांगावें ?स्त्रीपुरुषादिकांची जोड फुटून जाईल (जोड केव्हा फुटेल ह्याचा काय नेम आहे ?)

पाहिली घडी नव्हे आपुली । वयसा तरी निघोन गेली । देह पडतांच ठेविली- । आहे नींच योनी ॥ ४१॥

जी घटका भोगून संपली ती आपली नव्हे. आयुष्य-वय तर संपत आलें आणि हा नरदेह पडला कीं लगेच नीच योनि पुढे ठेवलेलीच आहें.

स्वान शुकरादिक नीच याती । भोगणें घडे विपत्ती । तेथे कांहीं उत्तम गती । पाविजेत नाहीं ॥ ४२॥

कुत्रे डुक्कर इत्यादिंक नीच योनींमध्यें जाऊन तेथील विपत्ती भोगाव्या लागतील.त्या योनींमध्ये ऊध्दाराचा मार्ग (माक्षोपाय) मिळणार नाहीं,हें मनात आणा.

मागा गर्भवासीं आटाटी । भोगितां जालासि रे हिंपुटी । तेथुनियां थोरा कष्टीं । सुटलासि दैवें ॥ ४३॥

( हिंपुटी - निराश )

पुर्वी गर्भवासांतील यातायाती सोसतांना तुला फार कष्ट झालें आणि तेथून मोठ्या कष्टानें सुदैवानें तुझी सुटका झालीं.

दुःख भोगिलें आपुल्या जीवें । तेथें कैचिं होतीं सर्वें । तैसेचि पुढें येकलें जावें । लागेल बापा ॥ ४४॥

तें (गर्भवासाचे) दु:ख तुझ्या एकट्याच्याच जीवाला भोंगावे लागलें,तेथे ही सगळीं कोठें होती ?तसेंच पुढेंही तुल्या, बाबा एकट्यालाच जावें लागेल.

कैंचि माता कैंचा पिता । कैंचि बहिण कैंचा भ्राता । कैंचीं सुहृदें कैंची वनिता । पुत्रकळत्रादिक ॥ ४५॥

(ह्या संसारात कोण कुणाची आहेत ?) आई कोठली ? व बाप कोठला ?भाऊबहिण तरी कोठले ?मित्र कोठचे आणि बायको कोठची ?पोरेबाळे तरी कोणाची ?

हे तूं जाण मावेचीं । आवघीं सोइरीं सुखाचीं । हे तुझ्या सुखदुःखाचीं । सांगाती नव्हेती ॥ ४६॥

( मावेचीं - ममत्वाची )

ही सगळी मायेचीं (पैशाची)आहेत,हे लक्षात ठेव.ही सर्व सोयरी सुखाचीं (साथी-वाटेंकरी) आहेत,(दुखाःची वाटेकरी नव्हेत).तुझ्या स्वतःच्या सुखदु:खाचे वोटेकरी कोणी नाहीत.

कैंचा प्रपंच कैंचे कुळ । कासया होतोसी व्याकुळ । धन कण लक्ष्मी सकळ । जाइजणें ॥ ४७॥

( जाइजणें - अशास्वत )

कोठचा प्रपंच व कोठले कुळ (घेऊन बसलास) ? कां ह्यांच्यासाठी उगाच व्याकुळ होतोस ? हे धनधान्य व संपत्ति वगैरे सर्व जाणारें (जाईजणें-क्षणभंगुर) आहे.

कैंचें घर कैंचा संसार । कासया करिसी जोजार । जन्मवरी वाहोन भार । सेखीं सांडून जासी ॥ ४८॥

( सेखीं सांडून -शेवटी सोडुन )

घर कसचें व प्रपंच कसचा ?ही धडपड (जोजार) कशाला करतोस ?(का त्यासाठी व्याकुळ होतोस बरें ?) जन्मभर ओंझें वाहून शेवटी (सेखी) सर्व टाकून जाशील.

कैंचें तारुण्य कैंचे वैभव । कैंचें सोहळे हावभाव । हें सकळहि जाण माव । माईक माया ॥ ४९॥

तारुण्य वैभव विलास, डामडौल, हे सगळें काय घेऊन बसलास ?ही सर्व मायिक इंदजाळाप्रमाणें खोटीं (व क्षणभंगुर ) आहेत.

येच क्षणीं मरोन जासी । तरी रघुनाथीं अंतरलासी । माझें माझें म्हणतोसी । म्हणौनियां ॥ ५०॥

ह्याच क्षणी मेलास तर "माझे माझे" जे म्हणतोस ते सर्व फुकट जाऊन रामाला अंतरशील,ह्याचा विचार कर.

तुवां भोगिल्या पुनरावृत्ती । ऐसीं मायबापें किती । स्त्री कन्या पुत्र होती । लक्षानलक्ष ॥ ५१॥

तूं अनेक जन्म मागे भोगलेस त्यात असे आईबाप कितीतरी झाले आहेत.स्त्री कन्या पुत्र तर लक्षावधि झाली आहेत.

कर्मयोगें सकळ मिळालीं ।येके स्थळीं जन्मास आलीं । तें तुवां आपुलीं मानिलीं।कैसीं रे पढतमूर्खा ॥५२॥

आपापल्या कर्माप्रमाणे ती सर्व एके ठिकाणी जन्मास आली-एकत्र मिळालीं,त्यांना रे पढतमूर्खा ,आपली म्हणून मानतोस ?

तुझें तुज नव्हे शरीर । तेथें इतरांचा कोण विचार । आतां येक भगवंत साचार । धरीं भावार्थबळें ॥ ५३॥

पण हे शरीर सुध्दा तुझे नव्हे,तर बाकीच्यांचे काय विचारतोस ? तेथे इतरांचा काय पाड ?आतां खरोखर भावभक्तीने भगवंतास आपलासा कर (आता तरी सावध होऊन भगवंत भावबळें आपलासा करुन घे.)

येका दुर्भराकारणें । नाना नीचांची सेवा करणें । नाना स्तुती आणी स्तवनें । मर्यादा धरावी ॥ ५४॥

( दुर्भराकारणें - पोटासाठी )

भरण्यास अत्यंत कठिण (दुर्भर-कितीही मिळविले तरी न भरणारें) अशा पोटासाठी अनेक (श्रेष्ठ-कनिष्ठ मानवांची ) नीचांची सेवा करावी,त्यांची स्तुति-स्त्रोत्रे गावीं,त्यांची अदबी (मर्यादा) राखावी.

जो अन्न देतो उदरासी ।शेरीर विकावें लागे त्यासी। मां जेणें घातलें जन्मासी ।त्यासी कैसें विसरावें ॥५५॥

जो पोटास घासभर अन्न देतों त्याला ह्याप्रमाणे शरीर विकावें लागतें.मग (मी) ज्या परमेश्र्वरानें जन्मास घालून हा अमोलिक देह दिला त्याला कसा विसरतोस ?

अहिर्निशीं ज्या भगवंता ।सकळ जिवांची लागली चिंता ।मेघ वरुषे जयाची सत्ता ।सिंधु मर्यादा धरी ॥५६॥

ज्या भगवंताला रात्रंदिवस सर्व जीवांची काळजी लागली आहें,ज्याच्या सत्तेने मेघ पाऊस पाडतात,समुद्र मर्यादा धरुन वाहातो.

भूमि धरिली धराधरें । प्रगट होईजे दिनकरें । ऐसी सृष्टी सत्तामात्रें । चालवी जो कां ॥ ५७॥

शेषांने आपल्या मस्तकावर पृथ्वी धारण केली,सूर्य (नियमित वेळी) उदयाला येतो-प्रकाश देतो.अशाप्रमाणे नुसत्या सत्तेने-सत्तामात्रानें जो सृष्टीचा कारभार (सारे ब्रह्मांड) चालवतो,

ऐसा कृपाळु देवाधिदेव । नेणवे जयाचें लाघव । जो सांभाळी सकळ जीव । कृपाळुपणें ॥ ५८॥

ज्याच्या (लाघवाचा) कौशल्याचा व चातुर्याचा थांग लागत नाहीं व सर्व जीवांचा सदयपणानें जो सांभाळ करतो असा तो देवाधिदेव कृपाळू आहें.

ऐसा सर्वात्मा श्रीराम- । सांडून, धरिती विषयकाम । ते प्राणी दुरात्मे अद्घम । केलें पावती ॥ ५९॥

अशा सर्वांतर्यामी राहणा-या श्रीरामाला सोडून जे प्राणी विषयवासना धरतात-चित्तांत विषयांचे ध्यान करितात-ते दुरात्मे (दूर आत्मा अंतरला जया-दुरात्मा)व अधम होत.करतील तसे भोगतील.

रामेविण जे जे आस । तितुकी जाणावी नैराश । माझें माझें सावकाश । सीणचि उरे ॥ ६०॥

रामांवाचून जी जी म्हणून आशा धरावी ती ती निराशाच (दुराशा) होणार असे समजावें,माझे माझे म्हणत शीण मात्र पदरात पडेल,(फुकट शीण होईल)(फळ क्लेष मिळायचेच)

जयास वाटे सीण व्हावा । तेणें विषयो चिंतीत जावा । विषयो न मिळतां जीवा । तगबग सुटे ॥ ६१॥

ज्याला कष्ट पाहिजे असतील त्याने विषयांचे खुशाल चिंतन करावें कारण विषय मिळाला नाही कीं जीवाला तळमळ लागते.

सांडून राम आनंदघन । ज्याचे मनीं विषयचिंतन । त्यासी कैंचें समाधान । लोलंगतासी ॥ ६२॥

आनंदघन असा राम सोडून विषयांचे चिंतन करणा-या विषय लंपटाला समाधान (समाधि-सुख) कोठून मिळेल ?

जयास वाटे सुखचि असावें । तेणें रघुनाथभजनीं लागावें । स्वजन सकळही त्यागावे ।दुःखमूळ जे॥६३॥

केवळ सुखच मिळावे असे ज्यांस वाटेल ,त्याने श्रीराम भजनाला लागावें,आणि दु:खाचे मूळ अशी जी स्वजनांची संगती ती सोडून द्यावी.

जेथें वासना झोंबोन पडे । तेणेंचि अपायें दुःख जडे । म्हणौनि विषयवासना मोडे । तो येक सुखी ॥ ६४॥

ज्या वस्तुसंबंधाने (विषय) वासना (आसक्ति) गुंतून राहाते त्या योगानेंच अपाय (विघ्ने) व दुःख उत्पन्न होतें.म्हणून विषयवासना मोडून काढणाराच एकटा सुखी होतो.(वासना झोंबून गळी पडली की तिच्या संगतीनेच विघ्ने व दुःख प्राप्त होतात,म्हणून ज्याची विषयवासना समूळ गेली.तोच खरा सुखी होय)

विषयजनित जें जें सुख । तेथेंचि होतें परम दुःख । पूर्वी गोड अंतीं शोक । नेमस्त आहे ॥ ६५॥

विषयांपासून विषयसंगतीत होणारे जे जे सुख तें तें पुढे अत्यंत दुःखरुप होतें,आरंभी गोड व मागाहून शोककारक असेंच विषयसुखाचे स्वरुप निश्र्चयांने आहें (सेवन करितांना आरंभी सुख व शेवटी दुःख असा विषयसुखाचा अनुभव निश्र्चित आहें.)

गळ गिळितां सुख वाटे । वोढून घेतां घसा फाटे । कां तें बापुडें मृग आपटे । चारा घेऊन पळतां ॥ ६६॥

माशाला गळ गिळतांना गोड वाटतें पण तोंच गळ ओढला (पण तो गळच त्याला ओढू लागला.) कीं घसा फाटून तो प्राणाला मुकतो,किंवा (पारध्याने पसरलेल्या) जाळ्यांतील चारा घेंताना हरणाला आनंद वाटतो,पण चारा घेऊन ते पळू लागलें कीं फासांत गुंतून आपटतें.(पण गाणें कानांवर पडलें कीं नादलुब्धतेमुळे तें खोड्यात पडतें.)

तैसी विषयसुखाची गोडी । गोड वाटे परी ते कुडी । म्हणौनियां आवडी । रघुनाथीं धरावी । ६७॥

त्याप्रमाणेंच विषयसुखाच्या गोडीचा प्रकार आहें.ते प्रथम गोड वाटते पण पुढे परिणामी फारच वाईट (कुडी),ह्यास्तव श्रीरामाच्या ठिकाणीं आवड धरावी.(रामभजनाची गोडी धरावी)

ऐकोनि बोले भाविक । कैसेनि घडे जी सार्थक । सांगा स्वामी येमलोक । चुके जेणें ॥ ६८॥

हे सर्व निरुपण ऐकुन भाविक श्रोता म्हणतों,महाराज सार्थक कशाने होईल ?माझा यमलोक वास जेणें करुन चुकेल असा उपाय सांगा.

देवासी वास्तव्य कोठें । तो मज कैसेंनि भेटे । दुःखमूळ संसार तुटे । कोणेपरी स्वामी ॥ ६९॥

देव कोठें रहातो ?तो मला कशाने भेटेल ? आणि दुःखाला मूळ असा हा माझ्यामागचा संसार कोणत्या उपायांनी तुटेल ?

धडपुडी भगवत्प्राप्ती- । होऊन, चुके अधोगती । ऐसा उपाये कृपामूर्ती । मज दीनास करावा ॥ ७०॥

( धडपुडी - धडधडीत ,खरोखर )

हे कृपामूर्ति,भगवत प्राप्ती होऊन माझी अधोगती चुकेल अशा प्रकारचा उपाय आपण मज गरिबाकडून करवावा.(हा दुखःमूळ संसार व यमयातना चुकून जन्मसाफल्य कसें होतें,हे सर्व कृपाकरुन मला सांगावें.)

वक्ता म्हणे हो येकभावें । भगवद्भजन करावें । तेणें होईल स्वभावें । समाधान ॥ ७१॥

तेव्हा स्वामी म्हणाले,एकनिष्ठेने भगवद्भजन करावें म्हणजे अनायासें (सर्व दुःखे नाहीशी होऊन तुला पाहिजे असणारे) समाधान होईल.

कैसें करावें भगवद्भजन । कोठें ठेवावें हें मन । भगवद्भजनाचें लक्षण । मज निरोपावें ॥ ७२॥

श्रोता पुन्हा म्हणतो,तर मग भगवद्भजन कसें करावें ?हें मन कोठे ठेवावे ?भगवद्भजनांचे लक्षण काय ते मला सांगावे.

ऐसा म्लानवदनें बोले । धरिले सदृढ पाऊलें । कंठ सद्गदित, गळे । अश्रुपात दुःखें ॥ ७३॥

( म्लानवदनें - खिन्न चेहेऱ्याने )

असे श्रोता दीनवाणे बोलू लागला.(शिष्यभावानें) त्याने पाय घट्ट धरलें,त्याचा कंठ गहिंवरला व दुःखाने त्याच्या डोळ्यातून अश्रुधारा वाहू लागल्या.

देखोन शिष्याची अनन्यता । भावें वोळला सद्गुरु दाता । स्वानंद तुंबळेल आतां । पुढिले समासीं ॥७४॥

( तुंबळेल - उचंबळेल )

शिष्याचा अनन्यभाव पाहून सदगुरु कैवल्यदाता त्याच्या भक्तिला वश झाला(व त्यानें नवविधाभक्तीचे निरुपण केलें).

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे वैराग्यनिरूपणनाम समास दहावा ॥ १०॥॥ दशक तीसरा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक चवथा नवविधा भक्ति

## ॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ ॥ नवविधा भक्तिनाम दशक चवथा ॥ ४॥

### समास पहिला : श्रवणभक्ति ॥ श्रीराम ॥

जयजय जी गणनाथा । तूं विद्यावैभवें समर्था । अध्यात्मविद्येच्या परमार्था । मज बोलवावें ॥ १॥

गजानन महाराजा आपला जयजयकार असो.तू विद्या,वैभव ह्यांनी (विद्येच्या ऐश्वर्याने) समर्थ (संपन्न) आहेस. अध्यात्मविद्येचें रहस्य मजकडून (माझ्या मुखानें) बोलवावें.

नमूं शारदा वेदजननी । सकळ सिद्धि जयेचेनी । मानस प्रवर्तलें मननीं । स्फूर्तिरूपें ॥ २॥

सर्व सिध्दि प्राप्त करुन देणारी जी वेदमाता शारदा तिला आतां नमस्कार करु. तिच्या कृपेनेंच मनाला मनन करण्याची स्फुर्ति उत्पन्न झाली.

आतां आठऊं सद्गुरु । जो पराचाहि परु । जयाचेनि ज्ञानविचारु । कळों लागे ॥३॥

( पराचाहि परु - परमात्म्याचाही परमात्मा,परसुक्ष्म,परश्रेष्ठ )

जो ईश्र्वराचा ईश्र्वर, व ज्याच्या कृपेनें ज्ञानविचार कळू लागतो अशा सदगुरुचें आता स्मरण करु.

श्रोतेन पुसिलें बरवें । भगवद्भजन कैसें करावें । म्हणौनि बोलिलें स्वभावें । ग्रंथांतरीं ॥ ४॥

श्रोत्यांनी योग्य विचारलें की भगवद्भजन कसे करावें ? म्हणून इतर ग्रंथात ह्याविषयीं जे सांगितलें तें आतां सांगतो.

सावध होऊन श्रोतेजन ।ऐका नवविधा भजन ।सच्छास्त्रीं बोलिले, पावन ।होईजे येणें ॥५॥

(श्रीमदभागवत हें सच्छास्त्र आहें. त्यात प्रल्हादमुखानें भक्तीचे नवविधा प्रकार सांगितले आहेत तें पुढे स्पष्ट करुन सांगतो.एकाग्रतेने ऐकावें) आता श्रोत्यांनी सावध होऊन चांगल्या शास्त्रग्रंथात सांगितलेले नऊ प्रकारच्या भक्तींचे निरुपण ऐकावें.त्यायोगे पावन व्हाल.

**श्लोक ॥ श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् । अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥**

नवविधा भजन बोलिलें । तेंचि पुढें प्रांजळ केलें । श्रोतीं अवधान दिधलें । पाहिजे आतां ॥ ६॥ प्रथम भजन ऐसें जाण । हरिकथापुराणश्रवण । नाना अध्यात्मनिरूपण । ऐकत जावें ॥ ७॥

नऊ प्रकारची भक्ति आतां स्पष्ट करुन सांगतो.श्रोत्यांनी लक्ष द्यावें,श्रवण,किर्तन, विष्णुस्मरण,पादसेवन, अर्चन,वंदन,दास्य,सख्य व आत्मनिवेदन असे नऊ प्रकार तेथें सांगितले आहेत.हरिकथा व पुराण तसेंच

अध्यात्मनिरुपण ऐकणे. ही पहिली भक्ति-श्रवणभक्ति होय.(परमात्मा सगुण र्निगुण ऊभयरुप असल्यामुळें त्याच्या सगुणलीला ऐकाव्यात व अध्यात्म ऐंकावें म्हणजे सगुणचरित्रश्रवणानें भक्तींचे ऊद्दीपन होतें व अध्यात्मश्रवणानें ज्ञानबोध होतो व ह्याप्रमाणें ज्ञान-भक्तीचा लाभ होतो. ही श्रवणभक्ति होय.)

कर्ममार्ग उपासनामार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । योगमार्ग वैराग्यमार्ग । ऐकत जावे ॥ ८॥

कर्ममार्ग,उपासनामार्ग,ज्ञानमार्ग,गुरुभक्तिमार्ग,योगमार्ग,वैराग्यमार्ग हे सर्व ऐकत जावें.

नाना व्रतांचे महिमे । नाना तीर्थांचे महिमे । नाना दानांचे महिमे । ऐकत जावे ॥ ९॥

अनेक व्रते,तीर्थे,दानें ह्यांचे महिमे,

नाना माहात्म्यें नाना स्थानें । नाना मंत्र नाना साधनें । नाना तपें पुरश्चरणें । ऐकत जावीं ॥ १०॥

अनेक स्थानें व त्यांची माहात्में,अनेक मंत्र व साधनें,तपें व पुरश्र्चरणें ह्यांचे अनेक प्रकार हे सर्व ऐकावें.

दुग्धाहारी निराहारी । फळाहारी पर्णाहारी । तृणाहारी नानाहारी । कैसे ते ऐकावे ॥ ११॥

निराहारी तसेच दूध ,फळे,पाने,गवत असे अनेक प्रकारचे आहार करुन कसे राहातात.

उष्णवास जळवास । सीतवास आरण्यवास । भूगर्भ आणी आकाशवास । कैसे ते ऐकावे ॥१२॥
ऊन,पाणी,थंडी, अरण्य,जमिनीच्या पोटांत (पुरुन घेऊन साधन करणें) ,आकाशात कसे राहातात,ते ऐकावें.

जपी तपी तामस योगी । नाना निग्रह हटयोगी । शाक्तआगम आघोरयोगी । कैसे ते ऐकावे ॥१३॥

( शाक्त - शक्ति उपासक,मद्यपान करणारे )

जपी,तपी,तमोगुणी साधनें करणारे योगी,खाण्यापिण्याचे वगैरे निग्रह करणारे हठयोगी,शाक्तमार्गी,आगम मांत्रिक (भूतप्रेतसमंधादि साधन करणारे) अघोरपंथी हे कसे असतात ते ऐकावे.

नाना मुद्रा नाना आसनें । नाना देखणीं लक्षस्थानें । पिंडज्ञानें तत्वज्ञानें । कैसीं तें ऐकावीं ॥ १४॥

अनेक मुद्रा व आसनें (परमार्थाच्या नावाखाली) करणारे,चमत्कार (श्र्वेदपीतादि प्रकाश), लक्ष ठेवण्याचीं स्थानें,शरीरज्ञानें,तत्त्वज्ञानें कशी आहेत तें ऐकावें.

नाना पिंडांची रचना । नाना भूगोळरचना । नाना सृष्टीची रचना । कैसी ते ऐकावी ॥ १५॥

अनेक प्रकारची शरीरे (पिंडज्ञान),भूगोलरचना,नानाविध सृष्टीरचनेचे प्रकार.

चंद्र सूर्य तारामंडळें । ग्रहमंडळें मेघमंडळें ।येकवीस स्वर्गे सप्त पाताळें।कैसीं ते ऐकावीं ॥१६॥

चंद्र,सूर्य,नक्षत्र,तारका,ग्रह,मेघ इत्यादिं मंडळें,एकवीस स्वर्ग,सप्त पाताळे कशी आहेत,(त्यांचे वर्णन करणारे नानाविध ग्रंथ)

ब्रह्माविष्णुमहेशस्थानें । इन्द्रदेवऋषीस्थानें । वायोवरुणकुबेरस्थानें । कैसीं ते ऐकावीं ॥१७॥

ब्रह्मदेव,विष्णु,शंकर,इंद्र,देव,ऋषि,वायु,वरुण,कुबेर,ह्यांची स्थानें कशी आहेत,

नव खंडे चौदा भुवनें । अष्ट दिग्पाळांची स्थानें । नाना वनें उपवनें गहनें । कैसीं ते ऐकावीं ॥ १८॥

( दिग्पाळांची - रक्षक )

नवखंडे,चौदा भुवने,आठ दिक्पाळांची स्थानें,अनेक वने,बागा कशा असतात तें सर्व ऐकावें (त्यांची वर्णने ऐकावीत),

गण गंधर्व विद्याधर । येक्ष किन्नर नारद तुंबर । अष्ट नायका संगीतविचार । कैसा तो ऐकावा ॥ १९॥

गण,गंधर्व,विद्याधर,यक्ष,किन्नर,नारद,तुंबर,अष्टनायक (ह्या अतिमानुष योनींची वर्णने)- ह्यांचे गायन कसे असतें,

रागज्ञान ताळज्ञान । नृत्यज्ञान वाद्यज्ञान । अमृतवेळ प्रसंगज्ञान । कैसें तें ऐकावें ॥ २०॥

राग,ताल,नाचणें,वाजविणें,अमृत (शुभ) वेळा,प्रसंग ह्यांचे ज्ञान कसें असतें,

चौदा विद्या चौसष्टी कळा । सामुद्रिक लक्षणें सकळ कळा । बत्तीस लक्षणें नाना कळा । कैशा त्या ऐकाव्या ॥२१॥

चौदा विद्या,चौसष्ट कला,सामुद्रिक लक्षणांची सर्व आंगे,बत्तीस लक्षणें इत्यादिक अनेक कला आहेत, त्याचे ज्ञान करुन घ्यावे,(त्यांचे वर्णन ऐकावे)

मंत्र मोहरे तोटके सिद्धी । नाना वल्ली नाना औषधी । धातु रसायण बुद्धी । नाडिज्ञानें ऐकावीं ॥ २२॥

मंत्र,माहोरे (औषधी) वनस्पति व औषधि,धातुंची रसायनें तयार करण्याचे ज्ञान,नाडीज्ञान कसें आहे ते ऐकावें.

कोण्या दोषें कोण रोग ।कोणा रोगास कोण प्रयोग । कोण्या प्रयोगास कोण योग ।साधे तो ऐकावा ॥२३॥

कोणत्या दोषाने कोणता रोग होतो,कोणत्या रोगाला कोणता उपाय,कोणत्या उपायाला कोणतें साधन हे सर्व ऐकत जावें.

रवरवादि कुंभपाक । नाना यातना येमेलोक । सुखसुःखादि स्वर्गनर्क । कैसा तो ऐकावा ॥ २४॥

( रवरवादि कुंभपाक - रवरवादि नरक)

यमलोकींच्या रौरव व कुंभीपाकादि नाना यातना,आणि स्वर्ग-नरकांतील सुखदुःखे कशी असतात,(तात्पर्य चौदा विद्या चौसष्ट कला,सर्व काही ऐकावें)

कैशा नवविधा भक्ती । कैशा चतुर्विधा मुक्ती । कैसी पाविजे उत्तम गती । ऐसें हें ऐकावें ॥ २५॥

नवविधा भक्ति व चर्तुविधा मुक्ति कशा असतात व उत्तम गति कशी मिळेल हे घ्यावें ऐकुन  घ्यावें.

पिंडब्रह्मांडाची रचना । नाना तत्वविवंचना । सारासारविचारणा । कैसी ते ऐकावी ॥ २६॥

पिंडब्रह्मांडाची रचना,अनेक तत्वांचे विवेचन व सारासार विचार कसा असतो.(म्ह.ब्रह्ममाया निरुपण कसें असते), असे हे सर्व ऐकावें,

सायोज्यता मुक्ती कैसी होते । कैसें पाविजे मोक्षातें । याकारणें नाना मतें । शोधित जावीं ॥ २७॥

सायुज्यमुक्ति कशी होते,मोक्ष कसा मिळतो हे कळण्यासाठी नाना मतें शोधीत जावी.

वेद शास्त्रें आणी पुराणें । माहावाक्याचीं विवरणें । तनुचतुष्टयनिर्शनें । कैसीं ते ऐकावीं ॥ २८॥

( तनुशतुष्टयनिर्शनें - सूक्ष्म,स्थूल,कारण,महाकारण देहाचे निरसन )

वेद,शास्त्रें,पुराणें पाहावीं,महावाक्यांची विवरणें व चारी देहांचे निरसन (देहाहून मी वेगळा हें) कसें असते ते ऐकावें,

ऐसें हें अवघेंचि ऐकावें ।परंतु सार शोधून घ्यावें ।असार तें जाणोनि त्यागावें ।या नांव श्रवणभक्ति ॥२९॥

असो,हे सर्व काही ऐकावें,परंतु त्यातलें सार शोधून घेऊन असार असेल तें समजून टाकावें,ह्यांचे नांव श्रवणभक्ति.

सगुणाचीं चरित्रें ऐकावीं । कां तें निर्गुण अध्यात्में शोधावीं । श्रवणभक्तीचीं जाणावीं । लक्षणें ऐसीं ॥३०॥

सगुण (स्वरुपाचीं) चरित्रें ऐकावीं आणि र्निगुण-स्वरुपाच्या अध्यात्मविचाराचा शोध घ्यावा.अशी हीं श्रवणभक्तिचीं लक्षणें आहेत हें ध्यानात घ्यावे.

सगुण देवांचीं चरित्रें । निर्गुणाचीं तत्वें यंत्रें । हे दोनी परम पवित्रें । ऐकत जावीं ॥ ३१॥

सगुण अवतारांच्या कथा,व निर्गुणासंबंधी खोल (यंत्रे) तात्विक विषय हीं दोन्ही फार पवित्र आहेत तीं ऐकावीं.

जयंत्या उपोषणें नाना साधनें । मंत्र यंत्र जप ध्यानें । कीर्ति स्तुती स्तवनें भजनें ।नानाविधें ऐकावीं ॥३२॥

जयंत्या,उपोषणें,मंत्र,यंत्र,जप,ध्यान,कीर्ति,स्तुतिस्तोत्रें अशी अनेक प्रकारचीं भजनाची साधने ऐकावीं.

ऐसें श्रवण सगुणाचें । अध्यात्मनिरूपण निर्गुणाचें । विभक्ती सांडून भक्तीचें । मूळ शोधावें ॥ ३३॥

हीं सगुणस्वरुपाची श्रवणभक्ति होय,अध्यात्मशास्त्राचें निरुपण ऐकणें ही निर्गुणाची श्रवनभक्ति होय.(कोणतेही श्रवण केले तरी) देवाशी झालेला वेगळेपणा (विभक्ती) टाकून देऊन भक्तींचें (तादात्म्याचें) मूळ शोधावे.

श्रवणभक्तीचें निरूपण । निरोपिलें असे जाण । पुढें कीर्तन भजनाचें लक्षण । बोलिलें असे ॥३४॥

श्रवणभक्तिचे निरुपण ह्याप्रमाणे सांगितले असून पुढील समासात किर्तनभजनाचें लक्षण (किर्तनभक्ति) सांगण्यात येईल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे श्रवणभक्तिनिरूपणनाम समास पहिला ॥ १॥**

**समास दुसरा : किर्तन भक्ति ॥ श्रीराम् ॥**

श्रोतीं भगवद्भजन पुसिलें । तें नवविधा प्रकारें बोलिलें । त्यांत प्रथम श्रवण निरोपिलें । दुसरें कीर्तन ऐका ॥१॥

श्रोत्यांनी विचारलेल्या भगवद्भजनाचे नऊ प्रकार आहेत,त्यांतील पहिले श्रवण सांगितलें.आतां कीर्तन ऐका.

सगुण हरिकथा करावी । भगवत्कीर्ती वाढवावी । अक्षंड वैखरी वदवावी । येथायोग्य ॥२॥

सगुण हरीची कथा करावी,भगवंताची कीर्ति वाढवावी,वाणीनें नेहमीं भगवदगुण यथार्थ गात जावें (हरीनामगुणकीर्तन करावें,ही कीर्तनभक्ति होय),

बहुत करावें पाठांतर । कंठीं धरावें ग्रन्थांतर । भगवत्कथा निरंतर । करीत जावी ॥ ३॥

पुष्कळ पाठांतर करावें, व त्याचा (निरुप्य विषयाचा) अर्थ अगदीं कंठात ठेवावा, व (असा अभ्यास दृढ झाला म्हणजें) नेहमी भगवंताची कथा करीत जावी (कीर्तनास उभें राहावें.)

अपुलिया सुखस्वार्था । केलीच करावी हरिकथा । हरिकथेवीण सर्वथा । राहोंचि नये ॥ ४॥

आपल्या शाश्वतसुखाच्या स्वार्थासाठीं एकदा केलेलीच हरीकथा पुन्हां करावी. हरिकथा केल्याशिवाय मात्र कधीं राहूच नयें.

नित्य नवा हव्यास धरावा । साक्षेप अत्यंतचि करावा । हरिकीर्तनें भरावा । ब्रह्मगोळ अवघा ॥ ५॥

( ब्रह्मगोळ - विश्व )

रोज नवीन (हरिकीर्तन) उद्योगाचा छंद धरावा,खूप उद्योग करुन हरिकीर्तनानें ब्रह्मांड भरुन टाकावें (नित्य नवा अभ्यास ठेवावा,बहु उद्योग करुन हव्यास धरुन कीर्तनसाहित्य संपादावे व हरिकीर्तनानें ब्रह्मांड भरुन टाकावें).

मनापासून आवडी । जीवापासून अत्यंत गोडी । सदा सर्वदा तांतडी । हरिकीर्तनाची ॥ ६॥

हरिकीर्तनाची मनापासून आवड धरावी. त्याची जिवाभावाची (चित्तांत) अत्यंत गोडी असावी व सर्वकाळ उत्कंठा (तत्परता) असावी (कीर्तनास अति तत्पर असावें).

भगवंतास कीर्तन प्रिये । कीर्तनें समाधान होये । बहुत जनासी उपाये । हरिकीर्तनें कलयुगीं ॥ ७॥

कीर्तन भगवंताला आवडतें,कीर्तनानें (श्रोता,वक्ता व देव ह्यांचे समाधान होतें),कलियुगामध्यें हरिकीर्तनच बहुत जनांना (उध्दाराचा) उपाय आहें. (हे तीनही लाभ ह्या कलियुंगात किर्तनानें होतात.)

विविध विचित्रें ध्यानें । वर्णावीं आळंकार भूषणें । ध्यानमूर्ति अंतःकरणें- । लक्षून, कथा करावी ॥ ८॥

भगवंताचीं नाना प्रकारचीं विचित्र ध्यानें व अनेक प्रकारचीं अलंकार-भूषणें ह्यांचे वर्णन करावें आणि तेंच ध्यान किंवा तीच मूर्ति आपल्या अंतःकरणात रेखून कथा करावी. (कीर्तनांत देवाची अनेक ध्यानें वर्णावीत.देवाच्या आंगावर सुंदर वस्त्रालंकार घालून त्याचे रम्यरुप ध्यानी धरुन व तें लक्षून बोलावें),

येश कीर्ति प्रताप महिमा । आवडीं वर्णावा परमात्मा । जेणें भगवद्भक्तांचा आत्मा । संतुष्ट होये ॥ ९॥

परमात्म्याचें यश,कीर्ति,प्रताप व महिमा अशा आवडीनें वर्णन करावा,कीं तेणेकरुन भगवद्भक्तांचे अंतःकरण संतुष्ट होईल.(तो महिमा ऐकुन भगवतभक्तांना सुखाचा डोल यावा).

कथा अन्वय लापणिका । नामघोष करताळिका । प्रसंगें बोलाव्या अनेका । धात माता नेमस्त ॥ १०॥

( कथा अन्वय लापणिका - कथानक सुसंगत शब्द्कोट्यायुक्त भाषण , करताळिका - टाळ्या , धात माता - बोधकथा, बिरभाटीव - विररास (हंसकोष) )

पूर्वकथेचा संबंध (अन्वय-धागा-न-सोडतां) भाषण (लापणिका-शब्द) करणें,नामघोष,टाळ्यांचा गजर (करावा व करवावा) व प्रसंगोपात्त (मधून-मधून) कल्पित (घात) व घडलेल्या (मात) गोष्टी बेताबेतानें (थोडक्यात) सांगाव्या,त्या गोष्टीत वाहवू नयें.

ताळ मृदांग हरिकीर्तन । संगीत नृत्य तान मान । नाना कथानुसंधान । तुटोंचि नेदावें ॥ ११॥

हरिकिर्तनांत,ताल,मृदुंग,संगीत,गायन,नृत्य,ताना वगैरे सर्व असावें,पण कथेचे अनुसंधान तुटूं देऊ नये.

करुणा कीर्तनाच्या लोटें । कथा करावी घडघडाटें । श्रोतयांचीं श्रवणपुटें । आनंदें भरावीं ॥ १२॥

प्रेमभरित होऊन देवाची करुणा भाकावी व त्या प्रेमाच्या प्रवाहांत घडघडाटानें कीर्तन चालवून श्रोत्यांना आनंदात तल्लीन-तन्मय करावें.

कंप रोमांच स्फुराणें । प्रेमाश्रुसहित गाणें । देवद्वारीं लोटांगणें । नमस्कार घालावे ॥ १३॥

चित्त कोरडे नसावें,प्रेमाने शरीरास कंप उद्भवेल,अंगावर रामांच उभे राहतील व आवेश उत्पन्न होईल अशा रीतीनें प्रेमाश्रुसहित गायन करावें,(गुणानुवाद करावें) आणि देवाच्या द्वांरात (देवापुढें) लोटांगणें,नमस्कार घालावें.

पदें दोहडें श्लोक प्रबंद । धाटी मुद्रा अनेक छंद । बीरभाटिंव विनोद । प्रसंगें करावे ॥ १४॥

कीर्तनाच्या ओघांत अनेक प्रेमळ पदें,दोहे,श्लोक,गद्य (प्रवंद) अनेक पध्दतीचे व छंदाचे म्हणावेत आणि प्रसंगानुसार वीरश्रींचे (वीररसात्मक) भाषण (वीरभाटीव) व सभ्य विनोदही करावा.

नाना नवरसिक श्रृंघारिक । गद्यपद्याचें कौतुक । नाना वचनें प्रस्ताविक । शास्त्राधारें बोलावीं ॥ १५॥

श्रृंगारादि नवरसात्मक गद्यपद्यात्मक चमत्कारीक वचनें वैराग्य उत्पन्न होईल अशाप्रकारे (प्रस्ताविक, किंवा प्रस्तावना करतांना) शास्त्राधारें बोलावी.

भक्तिज्ञान वैराग्य लक्षण । नीतिन्यायस्वधर्मरक्षण । साधनमार्ग अध्यात्मनिरूपण । प्रांजळ बोलावें ॥ १६॥

कीर्तनप्रसंगी भक्ति,ज्ञान व वैराग्य ह्यांची लक्षणें काय आहेत ? नीतीन्याय व स्वधर्म ह्यांचे रक्षण कसें करावें तें सांगून साधनमार्ग व अध्यात्माचें निरुपण स्पष्टपणें (प्रांजळ) सांगावें.

प्रसंगें हरिकथा करावी । सगुणीं सगुणकीर्ति धरावी । निर्गुणप्रसंगें वाढवावी । अध्यात्मविद्या ॥ १७॥

सगुणप्रसंगीं सगुणाचे गुणानुवाद व निर्गुणप्रसंगीं अध्यात्मशास्त्रांचे निरुपण अशाप्रकारे प्रसंग पाहून हरिकथा करावी.

पूर्वपक्ष त्यागून, सिद्धांत- । निरूपण करावें नेमस्त । बहुधा बोलणें अव्यावेस्त । बोलोंचि नये ॥ १८॥

शंका (पूर्वपक्ष) मोडून-त्यांचे निरसन करुन-सिध्दांताचे स्पष्ट निरुपण करावें,पण नेमस्त बोलावें (बहकूं नये).होता होईल तों अस्ताव्यस्त-अव्यवस्थित भाषण कधींच करु नयें.

करावें वेदपारायेण । सांगावें जनासी पुराण । मायाब्रह्मीचें विवरण । साकल्य वदावें ॥ १९॥

वेदांचे पारायण करावें,लोकांस पुराण सांगावें,माया व ब्रह्म ह्यांचे विवरण यथातथ्य-संपूर्ण-करावें.

ब्राह्मण्य रक्षावें आदरें । उपासनेचीं भजनद्वारें । गुरुपरंपरा निर्धारें । चळोंच नेदावी ॥ २०॥

बोलतांना ब्राह्मणधर्माचें आदरपूर्वक रक्षण करावें,गुरुपरंपरागत उपासनेच्या भजनाचे मार्ग निश्र्चयेंकरुन चळू देऊ नयेत (उपासनामार्ग चालवावे व निष्ठेने गुरूपरंपरा साभाळावी)

करावें वैराग्यरक्षण । रक्षावें ज्ञानाचें लक्षण । परम दक्ष विचक्षण । सर्वहि सांभाळी ॥ २१॥

वैराग्याचें रक्षण करावें (वैराग्यापासून चळू नयें) व  ज्ञानाचें लक्षण साभाळावें (ज्ञानलक्षणें आंगी बाणवावीं).जो अत्यंत दक्ष व शहाणा  असतो तो हें सर्व सांभाळतो.

कीर्तन ऐकतां संदेह पडे । सत्य समाधान तें उडे । नीतिन्यायसाधन मोडे । ऐसें न बोलावें ॥ २२॥

कीर्तन ऐकून श्रोता संदेहात पडेल व त्यांचें खरें समाधान नाहीसें होईल. नीतिन्याय व साधन ह्यांचा बिघाड होईल असें कीर्तनांत काहीही बोलू नयें.

सगुणकथा या नांव कीर्तन । अद्‌वैत म्हणिजे निरूपण । सगुण रक्षून निर्गुण । बोलत जावें ॥ २३॥

देवाचीं सगुण चरित्रें गाणे ह्याचे नांव हरिकीर्तन,व अद्वैत-प्रतिपादन ह्यांचे नांव निरुपण,
सगुणभक्तीचें संरक्षण करुन निर्गुणांचे प्रतिपादन करावें.(अद्वैत सांगतांनाही सगुण प्रेम सोडू नयें).

असो वत्कृत्वाचा अधिकार । अल्पास न घडे सत्योत्तर । वक्ता पाहिजे साचार । अनुभवाचा ॥ २४॥

असो,वकृत्वाचें अधिकाराचें काम हलक्यासलक्यांस झेंपणारें नाही.वक्ता हा खरोखरीचा (आचारसंपन्न व) अनुभवाचा (म्हणजे परमात्मवस्तूच्या व्यवहाराचा अनुभव घेतलेला) पाहिजें.(वकृत्वाचा अधिकार फार मोठा आहें.तो खचित लहान माणसाचा नाहीं. वक्ता अनुभवाचाच पाहिजें)

सकळ रक्षून ज्ञान सांगे । जेणें वेदज्ञा न भंगे । उत्तम सन्मार्ग लागे । प्राणीमात्रांसी ॥ २५॥

(म्हणजे तो) सर्व बाजू सांभाळून  अशा पध्दतीनें ज्ञान सांगेल कीं जेणेकरुन वेदाज्ञेचा भंग न होता मनुष्यमात्रांस सन्मार्ग लागेल.

असो हें सकळ सांडून । करावें गुणानुवादकीर्तन । या नांव भगवद्भजन । दुसरी भक्ती ॥२६॥

(असो.अधिकारयुक्त वक्तृत्व ज्याला नसेंल त्यानें) ह्यां भानगडींत न पडतां देवाचे गुणानुवाद प्रेमानें गावें. तें (सुध्दां) दुस-या (कीर्तन) भक्तिचेंच लक्षण होय.

कीर्तनें माहादोष जाती । कीर्तनें होये उत्तमगती । कीर्तनें भगवत्प्राप्ती । येदर्थी संदेह नाहीं ॥ २७॥

कीर्तनाने मोठाले दोष जातात (महापातकें नष्ट होतात),उत्तम गति मिळते,भगवत्प्राप्ती होते ह्यांत संशय नाही.

कीर्तनें वाचा पवित्र । कीर्तनें होये सत्पात्र । हरिकीर्तनें प्राणीमात्र । सुसिळ होती ॥ २८॥

कीर्तनानें वाणी पवित्र होते,सत्पात्रता आंगी येते (मनुष्याची पात्रता वाढते),प्राणिमात्र सुशील होतात.

कीर्तनें अवेग्रता घडे । कीर्तनें निश्चये सांपडे । कीर्तनें संदेह बुडे । श्रोतयांवक्तयांचा ॥ २९॥

( अवेग्रता - अव्यग्रता , एकरूपता )

चित्तव्यग्रता मोडून चित्त एकाग्र होतें,आत्मबुध्दीचा निश्र्चय सापडतो,(श्रोत्यावक्त्यांचा)संशय नाहीसा होतो (श्रोते-वक्ते नि:संदेह होतात)

सदा सर्वदा हरिकीर्तन । ब्रह्मसुत करी आपण । तेणें नारद तोचि नारायेण । बोलिजेत आहे ॥ ३०॥

ब्रह्मदेवाचे पुत्र नारद हे सदोदित हरिगुण गातात,त्यामुळे लोक त्यांना (प्रत्यक्ष) नारायण म्हणतात (नारद सर्वकाळ कीर्तन करीत असल्यामुळेंच नारायणरुप मानलें जातात.

म्हणोनि कीर्तनाचा अगाध महिमा । कीर्तनें संतोषे परमात्मा । सकळ तीर्थें आणी जगदात्मा । हरिकीर्तनीं वसे ॥३१॥

म्हणून कीर्तनाचा महिमा अगाध आहें.कीर्तनाने परमात्मा संतुष्ट होतो व हरिकीर्तनांत सर्व तीर्थे व जगदात्मा (देव) वास करतो.(सर्वं तीर्थे व देव कीर्तनांत खडे असतात)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कीर्तनभजननिरूपणनाम समास दुसरा ॥ २॥**

**समास तिसरा : नामस्मरणभक्ति ॥ श्रीराम् ॥**

मागां निरोपिलें कीर्तन । जें सकळांस करी पावन । आतां ऐका विष्णोःस्मरण । तिसरी भक्ती ॥ १॥

सर्वांना पावन करणारी कीर्तनभक्ति मागील समासात सांगीतली,आता तिसरी भक्ति जें विष्णुस्मरण तें ऐका.(तिसरी नामस्मरणभक्ति होय.)

स्मरण देवाचें करावें । अखंड नाम जपत जावें । नामस्मरणें पावावें । समाधान ॥ २॥

देवाच्या स्वरुपाचे वर्णन करावें,त्याचे नांव खंड पडू न देतां जपावें,अशा प्रकारे नामयुक्त स्मरणानें समाधान पावावें.(नामीचे म्ह. ज्याचे नामस्मरण करायचे त्या देवाचे स्मरण करावे,त्याचे नाम अखंड गावें व समाधान पावावें ही स्मरणभक्ति होय)

नित्य नेम प्रातःकाळीं । माध्यानकाळीं सायंकाळीं । नामस्मरण सर्वकाळीं । करीत जावें ॥३॥

नामस्मरणाचा नित्यनेम असावा व ह्याशिवाय सकाळीं,दोनप्रहरी,संध्याकाळी,(फार काय) सर्वकाळ नामस्मरण करावें.

सुख दुःख उद्वेग चिंता । अथवा आनंदरूप असतां । नामस्मरणेंविण सर्वथा । राहोंच नये ॥ ४॥

सुख,दुःख,उद्वेग,चिंता,आनंद ह्यापैकीं कोणत्याही स्थितीत असतां नामस्मरणाशिवाय मुळीच राहू नयें.

हरुषकाळीं विषमकाळीं । पर्वकाळीं प्रस्तावकाळीं । विश्रांतिकाळीं निद्राकाळीं । नामस्मरण करावें ॥ ५॥

( हरुषकाळीं - संतोषसमयी , विषमकाळीं - संकट समयी , प्रस्तावकाळीं - पश्यातापवेळी )

आनंद किंवा विषाद (संकट),त्याचप्रमाणें पर्व,उपरति,विश्रांति किंवा झोप ह्यापैकी कोणत्याही समयीं नामस्स्मरण करावें.

कोडें सांकडें संकट । नाना संसारखटपट । आवस्ता लागतां चटपट । नामस्मरण करावें ॥ ६॥ चालतां बोलतां धंदा करितां ।खातां जेवितां सुखी होतां । नाना उपभोग भोगितां ।नाम विसरों नये ॥७॥

( आवस्ता लागतां चटपट - अस्वस्थ मनस्थितीत )

चालतांना,बोलताना,धंदा करताना,फराळ करताना,जेवतांना,सुखांत असतांना,किंवा अनेक उपभोग भोगीत असतांनाही नामाचा विसर पडूं देऊं नये.

संपत्ती अथवा विपत्ती । जैसी पडेल काळगती । नामस्मरणाची स्थिती । सांडूंच नये ॥८॥

कालगतीप्रमाणे संपत्ति असो वा विपत्ति असो परंतु नामस्मरण मात्र सोडूंच नये.(काळचक्राप्रमाणें संपत्काळ येवो वा विपत्काळ येवो,नामस्मरणाची स्थिती कधीच सोडूं नयें)

वैभव सामर्थ्य आणी सत्ता । नाना पदार्थ चालतां । उत्कट भाग्यश्री भोगितां ।नामस्मरण सोडूं नये ॥९॥

वैभव(ऐश्र्वर्य),सामर्थ्य,सत्ता(अधिकार),किंवा अनेक पदार्थ ह्यांची अनुकूलता असतां,अथवा विपुल ऐश्र्वर्य भोगीत असतांही नामस्मरण सोडूं नये.

आधीं आवदसा मग दसा ।अथवा दसेउपरी आवदसा । प्रसंग असो भलतैसा ।परंतु नाम सोडूं नये॥१०॥

( आवदसा - वाईट दिवस )

आधीं दारिद्र्य मग श्रीमंती अथवा आधीं श्रीमंती मग दारिद्र्य (आधी सुस्थिती मग दु:स्थिति) कोणताही प्रसंग आला तरी नामस्मरण मात्र सोडूं नये.

नामें संकटें नासतीं । नामें विघ्नें निवारती । नामस्मरणें पाविजेती । उत्तम पदें ॥ ११॥

परमेश्र्वराच्या नामानें संकटे व विघ्ने नाहीशीं होतात. व उत्तम पदें प्राप्त होतात.

भूत पिशाच्च नाना छंद । ब्रह्मगिऱ्हो ब्राह्मणसमंध । मंत्रचळ नाना खेद । नामनिष्ठें नासती ॥१२॥

नामावर निष्ठा ठेवल्यानें भूतपिशाच्च,अनेक प्रकारचे चळ,ब्रह्मराक्षस,ब्रह्मसमंध,मंत्रचळ म्ह. मंत्रप्रयोगातल्या चुकीमूळें लागणारे वेड,अनेक प्रकारचे खेद नाहीसे होतात. (नाना प्रकारची व्यग्रता नामनिष्ठेने नाहीशी होऊन जातें.)

नामें विषबाधा हरती । नामें चेडे चेटकें नासती । नामें होये उत्तम गती । अंतकाळीं ॥ १३॥

नामानें विषबाधा हरतें,चेंडेचेटके नाहीशी होतात, व अंतकाळी उत्तमगति (सदगति) प्राप्त होते.

बाळपणीं तारुण्यकाळीं । कठिणकाळीं वृधाप्यकाळीं । सर्वकाळीं अंतकाळीं । नामस्मरण असावें ॥ १४॥

बाळपण,तारुण्य,संकटकाळ,म्हातारपण,अंतकाळ ह्या सर्वकाळी नामस्मरण करीत असावें.

नामाचा महिमा जाणे शंकर । जना उपदेसी विश्वेश्वर । वाराणसी मुक्तिक्षेत्र । रामनामेंकरूनी ॥ १५॥

नामाचा महिमा शंकरास माहीत आहें.काशीक्षेत्रीं ते विश्र्वेश्र्वररुपानें लोंकास रामनामाचा उपदेश करुन (संसारपाशातून) सोडवतात व म्हणूनच वाराणसीला (काशीला) मुक्तिक्षेत्र (मोक्षपुरी) म्हणतात.

उफराट्या नामासाठीं । वाल्मिक तरला उठाउठी । भविष्य वदला शतकोटी । चरित्र रघुनाथाचें ॥ १६॥

"रा मा" ऐवजीं "मरामरा" असें उफराटें-उलटें नाम घेऊनही वाल्मीक हां हां म्हणतां उध्दरला (वाल्ह्या कोळ्याचे वाल्मीकि ऋषि झालें) आणि त्यांनी श्रीरामरायाचें शतकोटि चरित्र रामअवतारापूर्वीच सांगून ठेविले.

हरिनामें प्रल्हाद तरला । नाना आघातापासून सुटला । नारायेणनामें पावन जाला । अजामेळ ॥ १७॥

हरिनामानें प्रल्हाद तरला व अनेक अपघातांपासून त्याची सुटका झाली,(महापापी) अजामेळही नारायणनामानें पावन झाला.

नामें पाषाण तरले । असंख्यात भक्त उद्धरले । माहापापी तेचि जाले । परम पवित्र ॥ १८॥

नारायण(राम) नामाने सेतुबंधप्रसंगीं समुद्रावर जड पाषाण तरलें,असंख्य भक्तांचा उध्दार झाला व महापापी तेच अत्यंत पवित्र (पुण्यवान)झालें.

परमेश्वराचीं अनंत नामें । स्मरतां तरिजे नित्यनेमें । नामस्मरण करितां, येमें । बाधिजेना ॥ १९॥

परमेश्र्वरचीं नामें अनंत आहेत. त्यांपैकीं कोणतेंही नित्यनेमानें घेतलें असतां उध्दार होईल,नामस्मरण केले असतां यमयातना होत नाहीत.

सहस्रा नामामधें कोणी येक । म्हणतां होतसे सार्थक । नाम स्मरतां पुण्यश्लोक । होईजे स्वयें ॥ २०॥

(देवाच्या) सहस्त्र नामांपैकी कोणतेही एक घेतलें असतां (कोणत्याही एका नामाचा जप केला तरी) सार्थक होईल,नामस्मरण केलें असता भक्त स्वतः पुण्यश्र्लोक होतो.(त्याची कीर्ति गाइली-ऐकिली असतां श्रोतेवक्ते पुण्यवान होतील.)

कांहींच न करूनि प्राणी । रामनाम जपे वाणी । तेणें संतुष्ट चक्रपाणी । भक्तांलागीं सांभाळी ॥ २१॥

उध्दारास्तव दुसरें काहीं साधन न करितां नुसत्या रामनामाचा जप तोडानें केला तरी तेवढ्यानेंही परमात्मा संतुष्ट होऊन हातांत चक्र घेऊन भक्तांचा सांभाळ करतो.

नाम स्मरे निरंतर । तें जाणावें पुण्यशरीर । माहादोषांचे गिरिवर । रामनामें नासती ॥ २२॥

निरंतर नामस्मरण करतें तें पुण्यशरीर आहें असे समजावें,कारण मोठमोठ्या पातकांचे डोंगर राममामानें नाहीसे होतात.(दोषांचे डोंगर पूर्वी झाले असलें तरी तें नामप्रतापानें भस्म होऊन जातात).

अगाध महिमा न वचे वदला । नामें बहुत जन उद्धरला । हळहळापासून सुटला । प्रत्यक्ष चंद्रमौळी ॥ २३॥

( चंद्रमौळी- शंकर )

नामाचा महिमा अगाध आहें,तो बोलून दाखविता येणार नाहीं (न वचे) नामाच्या योगानें पुष्कळांचा उध्दार झाला. प्रत्यक्ष च्रंद्रमौळी शंकरही हलाहल विषाच्या तापापासून नामानेंच मुक्त झालें.

चहुं वर्णां नामाधिकार । नामीं नाहीं लाहानथोर । जढ मूढ पैलपार । पावती नामें ॥ २४॥

नामस्मरण करण्याचा अधिकार चारी वर्णांना आहें,नामाच्या ठिकाणी लहानथोर हा भेद नाहीं,जड व मुढ असतात तेही नामानेंच संसारसमुद्राच्या पार निघून जातात.

म्हणौन नाम अखंड स्मरावें । रूप मनीं आठवावें । तिसरी भक्ती स्वभावें । निरोपिली ॥ २५॥

म्हणून नामाचें स्मरण अखंड असावें व (त्याबरोबरच) देवाचें रुप मनांत आठवावें.अशी ही तिसरी (नाम) भक्ति सहज ह्याप्रमाणें सांगितली.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नामस्मरणभक्तिनिरूपणनाम समास तिसरा ॥३॥**

**समास चवथा : पादसेवन भक्ति ॥ श्रीराम् ॥**

मागां जालें निरूपण । नामस्मरणाचें लक्षण । आतां ऐका पादसेवन । चौथी भक्ती ॥ १॥

मागील समासांत नामस्मरणाचें लक्षण सांगितलें.आता चौथीभक्ति-पादसेवन-ऐका.

पादसेवन तेंचि जाणावें । कायावाचामनोभावें । सद्गुरूचे पाय सेवावे । सद्गतिकारणें ॥ २॥

कायावाचामनेकरुन मोक्षप्राप्तींसाठी सद्गुरुची चरणसेवा करणें ह्याचेंच नांव पादसेवन भक्ति.

या नांव पादसेवन । सद्गुरुपदीं अनन्यपण । निरसावया जन्ममरण । यातायाती ॥ ३॥

जन्ममरणाची यातायात चुकविण्यासाठीं सद्गुरुचरणीं अनन्यभाव ठेंवणें ह्याच पादसेवन.

सद्गुरुकृपेविण कांहीं । भवतरणोपाव तों नाहीं । याकारणें लवलाहीं । सद्गुरुपाय सेवावे ॥ ४॥

संसारांतून तरुन जाण्याला सद्गुरुंच्या कृपेशिवाय दुसरा उपाय नाहीं,ह्यासाठीं सद्गुरुचरणसेवा करण्यास तात्काळ (उठाठेवी) लागावें.

सद्वस्तु दाखवी सद्गुरु । सकळ सारासारविचारु । परब्रह्माचा निर्धारु । अंतरीं बाणे ॥ ५॥

( सद्वस्तु - परब्रह्म )

सद्गुरु आधीं सत्यवस्तु जें परब्रह्म तें दाखवितात,नंतर (सकलसृष्टीचा) सारासारविचार सांगतात, आणि शेवटीं सर्व ब्रह्मस्वरुप आहें हा निश्र्चयही (शिष्याच्या) अंतःकरणांत बाणवितात.(ब्रह्मस्वरुपाची ओळख सद्गुरुंच करवितात,सारासारविचार त्यांच्या कृपेनें होऊन परब्रह्मवस्तूचा निर्धार बाणतो).

जे वस्तु दृष्टीस दिसेना । आणी मनास तेहि भासेना । संगत्यागेंविण येना । अनुभवासी ॥ ६॥

( संगत्यागेंविण - अहंकार अभिमान व देहबुद्धी यांचा त्याग )

ती परमात्मवस्तु डोळ्याला (चर्मचक्षूला) दिसत नाही.व मनाला भासत नाहीं (मीपणाचा-देहबुध्दीचा) संग सोडल्याशिवाय-असंग झाल्यावाचूंन-अनुभवही येत नाहीं.

अनुभव घेतां संगत्याग नसे । संगत्यागें अनुभव न दिसे । हें अनुभवी यासीच भासे ।येरां गथागोवी ॥७॥

इतर वस्तूप्रमाणें परमात्मवस्तूचा अनुभव घेऊं गेलें असतां, अनुभव दिसणार तो अहंबुध्दीचा (संगाचा) त्याग घडत नाहीं (कारण अनुभव घेताना अनुभव,अनुभविता व अनुभाव्य ही त्रिपुटी शिल्लक असल्याशिवाय अनुभव घेंता येंत नाही.)आणि अहंबुध्दीचा विशेष त्याग झाला तर (अनुभव घेणारा "अहं" वेगळा न राहिल्यामुळें) अनुभव दिसणार नाही. हे प्रतिपादन अनुभवी असेल त्यालाच कळेल इतरांना गोंधळ (गथागोवी) वाटेल.

संगत्याग आणी निवेदन।विदेहस्थिती अलिप्तपण ।सहजस्थिती उन्मनी विज्ञान ।हे सप्तहि येकरूप ॥८॥

संगत्याग (अहंपणा टाकणें),निवेदन(स्वात्मार्पण करणें),विदेहस्थिती (देहातीत अवस्था),अलिप्तपणा (कमलपत्राप्रमाणे संसारात असून नसल्यासारखे प्रारब्धओघाने राहाणें.),सहजावस्था (प्रारब्धकर्मांप्रमाणें देहाचे व्यवहार चालत असतांना त्यांत कर्तुत्वाचा अहंकार न राहाणे.) ,उन्मनी(मनाचा मनपणा मोंडणे),विज्ञान (ज्ञानाची उर्मी नाहीशी होऊन केवळ ज्ञानरुपच राहतें तें) ही सांतही नावें एकाच अर्थी आहेत.

याहिवेगळीं नामाभिधानें । समाधानाचीं संकेतवचनें । सकळ कांहीं पादसेवनें । उमजों लागे ॥९॥

ह्याशिवाय आणखीही नांवे आहेत तीं सर्व समाधानाचीं म्हणजें समाधिसुख किंवा स्वरुपस्थिति ह्याची दर्शक शिवाय आणखींही नांवे आहेत तीं सर्व समाधानाचीं म्हणजे समाधिसुख किंवा स्वरुपस्थिति ह्यांची दर्शक अशी संकेतचिन्हें आहेत.(एका समाधानाचींच हीं सात नांवे आहेत.) हे सर्वसद्गुरु पादसेवेने कळू लागते.

वेद वेदगर्भ वेदांत । सिद्ध सिद्धभावगर्भ सिद्धांत । अनुभव अनुर्वाच्य धादांत । सत्य वस्तु ॥ १०॥

हींच नावे काय पण वेद,वेदांचा अभिप्राय (वेदगर्भ),उपनिषदें (वेंदांत),सिध्दभाव,सिध्दलक्षणांचा अभिप्राय (गर्भसिध्दांत),अनुभव (रहस्य) ,अर्निवाच्यपणा,स्वानुभव (उघडा- धादांत-अनुभव) हींही इतर नांवे सद्वस्तु ओळखण्याचींच चिन्हे आहेत.

बहुधा अनुभवाचीं आंगें । सकळ कळती संतसंगें । चौथे भक्तीचे प्रसंगें । गोप्य तें प्रगटे ॥ ११॥

अशीं हीं अनुभवाचीं सर्वं आंगे सत्संगतीनें समजतात,चौथी भक्ति पादसेवन हिच्या योंगानें (कोणत्याही विद्येतलें)रहस्य (गौप्य-गुह्य) असतें तें उकलतें-कळूं लागतें.

प्रगट वसोनि नसे । गोप्य असोनि भासे । भासाअभासाहून अनारिसे । गुरुगम्य मार्ग ॥ १२॥

परब्रह्म उघड असून नसल्यासारखें,गुप्त असूनही भासतें,पण भास व अभास ह्यांहून निराळें असलें (भासाभासाहूनि अनारिसे) तरी त्याच्या प्राप्तीचा मार्ग गुरुकृपेनेंच कळणारा आहें.(म्हणून याला गुरुगम्यमार्ग म्हणतात)

मार्ग होये परी अंतरिक्ष । जेथें सर्वहि पूर्वपक्ष । पाहों जातां अलक्ष । लक्षवेना ॥ १३॥

( अंतरिक्ष - गुप्त )

मार्ग आहें. खरा पण गुप्त म्हणजे आंत पाहात पाहात जाण्याचा आहें. जेथे (दृष्टीला दिसणारे व भासणारे) सर्व काहीं मायेंत (खोट्यांत) येंते. त्याला (पहाणारा मी शिल्लक- ठेवून)पाहायला गेले असतां तें लक्षातीत असल्यामुळें त्यास पाहाता येंत नाही.(हा मार्ग आहे पण हा अंतरिक्ष मार्ग आहे म्ह.आतं-आंत पाहाता-पाहाता ईक्ष दिसत जाणारा आहें अंतरिक्ष म्ह.आकाश ह्यालाच पूर्वी "आकाश मार्गी गुप्त पंथ" असे म्हटले आहें.)स्थूळांत सूक्ष्म,सूक्ष्मांत कारण,कारणाच्या पलीकडे ज्ञान,त्यापलीकडे द्रष्टा व त्याच्याही पलीकडे सद्वस्तु असा आंत विवेकदृष्टीने पहातां -पहातां आढळणारा हा मार्ग आहें,म्हणून ह्याला अंतरिक्ष पंथ किंवा आकाशमार्गी गुप्त पंथ असें म्हटले आहें. जेथून पाहातां,शास्त्र-साधनें सर्वही पूर्वपक्षांत येतात.तो साक्षी होऊन पाहूं जाता अलक्ष्य आहें.म्हणजे लक्षिला जात नाहीं.)

लक्षें जयासी लक्षावें । ध्यानें जयासी ध्यावें । तें गे तेंचि आपण व्हावें । त्रिविधा प्रचिती ॥ १४॥

( त्रिविधा - शास्त्र,गुरु,आत्मा या तीन प्रचिती )

लक्ष्यांचे जे लक्ष व ध्यानाचें जे ध्येय तेंच वेदशास्त्र-आत्म (ह्या त्रिविध) प्रचीतीनें आपणच होऊन जावयांचे आहें.(शास्त्रसिध्दांत,गुरुचा उपदेश व स्वतःचा अनुभव हे तिन्ही एकवटलें म्हणजें त्रिविध प्रचीति झाली).

असो हीं अनुभवाचीं द्वारें । कळती सारासारविचारें । सत्संगेंकरून सत्योत्तरें । प्रत्ययासि येतीं ॥ १५॥

असो.हीं अनुभवाचीं द्वारे सत्संगतीच्या योगानें व (स्वतःच्या)सारासार विचारानें निश्र्चयेंकरुन अनुभवाला येतात.

सत्य पाहातां नाहीं असत्य । असत्य पाहातां नाहीं सत्य । सत्याअसत्याचें कृत्य । पाहाणारापासीं ॥ १६॥

सत्य म्ह.ब्रह्म पाहूं गेले असतां असत्य म्ह.माया नाहीशी होते व माया पाहात बसलें की ब्रह्म प्राप्त होत नाहीं म्हणून माया किंवा ब्रह्म अनुभवाला येंणे हे पहाण्यावरच अवलंबून आहें.

पाहाणार पाहाणें जया लागलें । तें तद्रूपत्वें प्राप्त जालें । तरी मग जाणावें बाणलें । समाधान ॥ १७॥

( पाहाणार पाहाणें - द्रष्टा,दृश्य,दर्शन पाहणाऱ्याच्या ठिकाणी लीन झाले की समाधान लाभते )

पाहाणारा म्हणजे द्रष्टा व पहाण्याची क्रिया म्ह.दर्शन हीं ज्याच्या म्ह. द्रष्ट्याच्या अधिष्ठानावर आहेत त्याच्याशीं (अधिष्ठ्यात्याशीं)तादात्म्य झालें की-त्रिपुटी मावळली कीं-समाधान तात्काळ बाणलेंच म्हणून समजावें.

नाना समाधानें पाहातां । बाणती सद्‌गुरु करितां । सद्‌गुरुविण सर्वथा । सन्मार्ग नसे ॥ १८॥

अनेक प्रकारचीं साधने वास्तविक पाहातां सद्गुरुकृपेनेंच बाणणारीं आहेत.सदगुरुंवाचून कधीही सन्मार्ग मिळणार नाहीं,(अनेक साधने केली ती सदगुरुसंगतींतच सफल होतात,सदगुरुवाचून सन्मार्ग अन्य नाहीं.)

प्रयोग साधनें सायास । नाना साक्षेपें विद्याअभ्यास । अभ्यासें कांहीं गुरुगम्यास । पाविजेत नाहीं ॥१९॥

गुरुकृपेनें जो लाभ होतो तो प्रयोग,साधनें,सायास,उद्योग,विद्या,अभ्यास इत्यादिकांनी होत नाहीं.

जें अभ्यासें अभ्यासितां न ये । जें साधनें असाध्य होये । तें हें सद्‌गुरुविण काये । उमजों जाणे ॥२०॥

अभ्यासाला व साधनांना जें असाध्य आहे तें सदगुरुशिवाय कसे मिळेल ?

याकारणें ज्ञानमार्ग- । कळाया, धरावा सत्संग । सत्संगेंविण प्रसंग । बोलोंचि नये ॥ २१॥

म्हणून ज्ञानमार्ग (सन्मार्ग) कळण्यासाठीं संतसंगति धरावी.सत्संगाशिवाय परमार्थप्राप्तीचे नांवच नको.

सेवावे सद्‌गुरूचे चरण । या नांव पादसेवन । चौथे भक्तीचें लक्षण । तें हें निरोपिलें ॥ २२॥

सद्गुरुचरणांची सेवा करणें ह्यांचे नांव पादसेवन,अशाप्रकारें चौथ्या भक्तीचें हें लक्षण सागितलें.

देव ब्राह्मण माहानुभाव । सत्पात्र भजनाचे ठाव । ऐसिये ठाईं सद्भाव । दृढ धरावा ॥ २३॥

आतां देव,ब्राह्मण,महात्मे,पूज्य पुरुष हींही सेवा करण्याचीं स्थानें आहेत.(ह्याच्या ठायी हरिभजनोपाय सापडतो),त्यांच्याही ठिकाणीं शुध्दभाव बळकट ठेवावा.(ह्यांच्या ठायीं सद्भावच ठेविला पाहिजें)

हें प्रवृत्तीचें बोलणें । बोलिलें रक्षाया कारणें । परंतु सद्‌गुरुपाय सेवणें । या नांव पादसेवन ॥ २४॥

पण हें जनरुढीचें-लोकाचाराचें-बोलणें लोकव्यवहार सांभाळला जावा म्हणून सांगितलें,खरे बोलावयाचें म्हणजे सदगुरुचरणसेवा याचेच नाव पादसेवन (भक्ति).

पादसेवन चौथी भक्ती । पावन करितसे त्रिजगतीं । जयेकरितां सायोज्यमुक्ती । साधकास होये ॥२५॥

चौथी भक्ति पादसेवन त्रैलोक्यास पावन करते व हिच्या योगानें साधकास सायुज्यमुक्ति मिळतें.

म्हणौनि थोराहून थोर । चौथे भक्तीचा निर्धार । जयेकरितां पैलपार । बहुत प्राणी पावती ॥ २६॥

ह्यासाठीं ही चौथी भक्ति थोरांहून थोर निश्र्चये करुन आहें,हिच्यायोगाने अनेक प्राणी भवसमुद्रांतून पार गेले आहेंत.(भवनदीपार गेले आहेत.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पादसेवनभक्तिनिरूपणनाम समास चवथा ॥ ४॥**

**समास पाचवा : अर्चनभक्ति ॥ श्रीराम् ॥**

मागां जालें निरूपण । चौथे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । पांचवी भक्ती ॥ १॥

मागे चौथ्या भक्तीचे लक्षण सांगितले,आता पांचवी(अर्चन)भक्ति सावधपणानें ऐका.

पांचवी भक्ती तें आर्चन । आर्चन म्हणिजे देवतार्चन । शास्त्रोक्त पूजाविधान । केलें पाहिजे ॥ २॥

( आर्चन - पूजा )

पांचवी अर्चनभक्ति होय. अर्चन म्हणजें देवदेवतांची पूजा.ती पूजा शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें केली

पाहिजें.

नाना आसनें उपकर्णें । वस्त्रें आळंकार भूषणें । मानसपूजा मूर्तिध्यानें । या नांव पांचवी भक्ती ॥ ३॥

(सोंवळ्यांत देवास किंवा आपणास बसण्यासाठीं) अनेक प्रकारची दर्भें-मृगचर्मादिकांची आसनें, उपकरणीं,वस्त्रें,दागदागिने,शोभेचे पदार्थ,(हे देवास किंवा आपणास बसण्यासाठी),(हे देवास यथाशक्ति अर्पण करावें अथवा काहीच अनुकूल नसल्यास) मूर्तीचे ध्यान करणें (मानसपूजा) हें सर्व विधिपूर्वक करावें,ह्यांचे नाव पांचवी अर्चनभक्ति.

देवब्राह्मणाग्नीपूजन । साधुसंत अतीतपूजन । इति महानुभाव गाइत्रीपूजन । या नांव पांचवी भक्ती ॥ ४॥

( महानुभाव - यती , महाअनुभवी )

देव,ब्राह्मण,अग्नि,साधु,संत,अतीत (अतिथि),संन्यासी,महात्मा,गाय ह्यांचा यथोचित पूजासत्कार करावा.

धातुपाषाणमृत्तिकापूजन । चित्र लेप सत्पात्रपूजन । आपले गृहींचें देवतार्चन ।या नांव पांचवी भक्ती॥५॥

( चित्र लेप - तसबीर )

धातु,दगड,माती ह्यांच्या देवांच्या मूर्ति किंवा पूज्य तसबिरी,व घरातील देंवता ह्यांचे आदरपुर्वक पूजन करावें.

सीळा सप्तांकित नवांकित ।शालिग्राम शकलें चक्रांकित । लिंगें सूर्यकांत सोमकांत ।बाण तांदळे नर्बदे॥६॥

( सीळा शकलें - शिळा,दगड,तुकडे , सप्तांकित नवांकित - सात,नऊ गुणांनी युक्त )

सप्तांकित,नवांकित,चक्रांकित शिला,शाळिग्राम,किंवा त्यांची  शकलें,लिंगे,सुर्यकांत, चंद्रकांत, बाण,तांदळे,नर्मदेतील (बाण किंवा गणपति-नर्वदे) इत्यादि शिळा ह्यांची पूजा करावी.

भैरव भगवती मल्लारी । मुंज्या नृसिंह बनशंकरी । नाग नाणी नानापरी । पंचायेत्नपूजा ॥ ७॥

भैरव,देवी,(मल्हारी) खंडोबा,मुंजा,नरसोबा,बनशंकरी,नाग,अनेक प्रकारचीं नाणीं,पंचायतने (इ.आपल्या घरीं ज्या देवतांना वाड-वडील पूजीत आले आहेत त्यांचें पूजन करावें ही अर्चनभक्ति होय.

गणेशशारदाविठलमूर्ती । रंगनाथजगंनाथतांडवमूर्ती । श्रीरंगहनुमंतगरुडमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ८॥

गणपति,सरस्वती,विठोबा,रंगनाथ,जगन्नाथ,तांडवमूर्ति (शंकर),श्रीरंग (विष्णु),हनुमान,गरुड,

मत्छकूर्मवऱ्हावमूर्ती । नृसिंहवामनभार्गवमूर्ती । रामकृष्णहयग्रीवमूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥ ९॥

मत्स्य, कूर्म,वराह,नरसिंह,वामन,परशुराम,राम,कृष्णादि दशावतार,हयग्रीव्ह,

केशवनारायणमाधवमूर्ती । गोविंदविष्णुमधुसूदनमूर्ती । त्रिविक्रमवामनश्रीधरमूर्ती । रुषीकेश पद्मनाभि ॥ १०॥

केशव,नारायण,माधव,गोविंद,विष्णु,मधुसूदन,त्रिविक्रम वामन,श्रीधर,हृषीकेष,पद्मनाभ

दामोदरसंकर्षणवासुदेवमूर्ती । प्रद्युम्नानुरधपुरुषोत्तममूर्ती । अधोक्षजनारसिंहाच्युतमूर्ती । जनार्दन आणी उपेंद्र ॥११॥

दामोदर,संकर्षण,वासुदेव,प्रद्युम्न,अनिरुध्द,पुरुषोत्तम,अधोक्षज, नरसिंह,अच्युत,जनार्दन,
उपेंन्द्र इत्यादि(चोवीस)मूर्तींची पूजा करावी.

हरिहरांच्या अनंत मूर्ती । भगवंत जगदात्माजगदीशमूर्ती । शिवशक्तीच्या बहुधा मूर्ती । देवतार्चनीं पूजाव्या ॥१२॥

अशा हरिहरांच्या असंख्य  मूर्ति,भगवंत,जगदात्मा,जगदीश ह्याच्या मूर्ति,शिवशक्तीच्या अनेक मूर्ति देवपूजेच्या वेळी पूजाव्या.

अश्वत्थनारायेण सूर्यनारायेण । लक्ष्मीनारायेण त्रिमल्लनारायेण । श्रीहरीनारायण आदिनारायण । शेषशाई परमात्मा ॥ १३॥

अश्र्वत्थनारायण (पिंपळ), सूर्य,लक्ष्मीनारायण,त्रिमल्लनारायण,श्रीहरिनारायण,आदिनारायण,शेषशायी परमात्मा.

ऐश्या परमेश्वराच्या मूर्ती । पाहों जातां उदंड असती । त्यांचें आर्चन करावें, भक्ती- । पांचवी ऐसी ॥ १४॥

अशा परमेश्र्वराच्या मूर्ति पाहू गेलें तर पुष्कळ आहेत.त्यांचे पुजन भक्तिने करावे ही पांचवी भक्ति.

याहि वेगळे कुळधर्म । सोडूं नये अनुक्रम । उत्तम अथवा मध्यम । करीत जावें ॥ १५॥

ह्याशिवाय घरी जे परंपरागत उत्तम व मध्यम प्रकारचे कुळधर्म व कुळाचार आहेत. ते सर्व यथास्थित पाळावे.

जाखमाता मायराणी । बाळा बगुळा मानविणी । पूजा मांगिणी जोगिणी । कुळधर्में करावीं ॥ १६॥

जाखमाता (जाखाईदेवी),मायराणी,बाळा, बगुळा,मानविणी,मांगिणी,जोगिणी इत्यादींची पूजा व अनेक प्रकारचे कुळधर्म करावे,

नाना तीर्थांक्षत्रांस जावें । तेथें त्या देवाचें पूजन करावें । नाना उपचारीं आर्चावें । परमेश्वरासी ॥ १७॥

अनेक तीर्थक्षेत्रांस जाऊन तेंथें त्या त्या देंवांचे पूजन करावें व अशा प्रकारे अनेक उपचारांनी परमेश्र्वरास पूजावें.

पंचामृतें गंधाक्षतें । पुष्पें परिमळद्रव्यें बहुतें । धूपदीप असंख्यातें । नीरांजनें कर्पुराचीं ॥ १८॥ नाना खाद्य नैवेद्य सुंदर । नाना फळें तांबोलप्रकार । दक्षणा नाना आळंकार । दिव्यांबरें वनमाळा ॥ १९॥

ते उपचार असे-पंचामृत,गंध,अक्षता,फुलें,सुवासिक द्रव्यें,धूप,दीप,कापूरात्या कापराचीं (किंवा-तुपाच्या वातीचीं) असंख्य निरांजने पंचखाद्यादि अनेक सुंदर खाद्यपदार्थांचे नैवेद्य,त-हेत-हेचीं फळे,अनेक प्रकारचे विडे,दक्षिणा,अनेक दागिने,उंची वस्त्रे,पायापर्यंत लोंबणा-या माळा.

सिबिका छत्रें सुखासनें । माहि मेघडंब्रें सूर्यापानें । दिंड्या पताका निशाणें । टाळ घोळ मृदांग ॥ २०॥

( सिबिका - पालख्या, माहि मेघडंब्रें सूर्यापानें - छत्रि , उंचछत्रि , अब्दागीर )

पालखी छत्रें,मेणे,छत्री,उंच छत्री, व अबदागिरी,दिंडी नावांचीं तंतुवाद्ये,पताका निशाणें,टाळघोळ,(करणढोल) मृदंग,

नाना वाद्यें नाना उत्साव । नाना भक्तसमुदाव । गाती हरिदास सद्भाव- । लागला भगवंतीं ॥ २१॥

अशी नाना वाद्यें (ह्या साहित्यात चुकू नयें),अनेक मंडळ्या (भक्तभाविकांचे समुदाय),मिळवून अनेक उत्साह महोत्सव करावे.ज्यांत हरिदास गात आहेत,हे सर्व करीत असतां देवाच्या ठायी सद्भाव राहातो.(भगवंताचे गुणानुवाद सद्भावे गावें).

वापी कूप सरोवरें । नाना देवाळयें सिखरें । राजांगणें मनोहरें । वृंदावनें भुयरीं ॥ २२॥

( राजांगणें - पटांगणे )

मंदिराभोवती विहीरी,आड ,सरोवरें,अनेक देवळे,शिखरें,मनोहर अशी मोठी पटांगणे,वृंदावने,भुयारें.

मठ मंड्या धर्मशाळा । देवद्वारीं पडशाळा । नाना उपकर्णें नक्षत्रमाळा । नाना वस्त्र सामुग्री ॥ २३॥

मठ,मंडप,धर्मशाळा,देवळाशेजारी पडव्या,अनेक उपकरणीं,नक्षत्रमाळा,अनेक प्रकारची वस्त्रसामुग्री (वासनासंकट नाना वस्त्रे),

नाना पडदे मंडप चांदोवे । नाना रत्नघोष लोंबती बरवे । नाना देवाळईं समर्पावे ।हस्थि घोडे शक्कटें॥ २४॥

अनेक पडदे मंडपांचे चांदवे,त्यांना अनेक रत्नांचे घोंस लोंबत आहेत,हत्ती घोडे,गाड्या,जें जें अनुकूल असेल ते ते देवळास अर्पण करावें.

आळंकार आणि आळंकारपात्रें ।द्रव्य आणी द्रव्यपात्रें । अन्नोदक आणी अन्नोदकपात्रें।नाना प्रकारीचीं ॥२५॥

अलंकार,वस्त्रे,अन्नपाणी हीं व हीं ठेवण्याची अनेक साधने (लहान-मोठी-भांडी) देवालयाला अर्पण करावी.

वनें उपवनें पुष्पवाटिका । तापस्यांच्या पर्णकुटिका । ऐसी पूजा जगन्नायका । येथासांग समर्पावी ॥ २६॥

देवालयाभोवतीं सुंदर वनें,उपवने,फुलांच्या बागा,तपस्व्यांच्या पर्णकुट्या हीं जशी पाहिजेत तशीं उभारावी.सर्व साधनांनी युक्त अशी पूजा जगन्नायकाला अर्पावी.

शुक शारिका मयोरें । बदकें चक्रवाकें चकोरें । कोकिळा चितळें सामरें । देवाळईं समर्पावीं ॥ २७॥

( शुक शारिका मयोरें - पोपट,साळुंख्या,मोर )

पोपट,मैना (साळुंक्या),मोर,बदकें,चक्रवाक,चकोर,कोकिळा इ.पक्षी व चितळे,सांबरे .

सुगंधमृगें आणी मार्जरें । गाई म्हैसी वृषभ वानरें । नाना पदार्थ आणी लेंकुरें । देवाळईं समर्पावीं ॥ २८॥

( सुगंधमृगें - कस्तुरीमृग )

कस्तूरीमृग,जवादिमांजर,गाई,म्हशी,बैल,वानरे इ.पशु आणि मुलें (लेंकुरे) देवालयाला अर्पण करावीं.

काया वाचा आणी मनें । चित्तें वित्तें जीवें प्राणें । सद्भावें भगवंत आर्चनें । या नांव आर्चनभक्ती ॥२९॥

अशाप्रकारे देह,वाणी,मन,चित्त,द्रव्य,जीव,प्राण ह्यांनी उत्तम भ़ावनापूर्वक परमेश्वराचे पूजन करावें ही अर्चनभक्ति होय.

ऐसेंचि सद्गुरूचें भजन- । करून,असावें अनन्य । या नांव भगवद्भजन । पांचवी भक्ती ॥ ३०॥

अशी देवांप्रमाणेंच  सद्गुरुंची सेवा करुन त्यांच्या चरणी अनन्य असणें ही ही पांचवीं अर्चनभक्ति होय.

ऐसी पूजा न घडे बरवी । तरी मानसपूजा करावी । मानसपूजा अगत्य व्हावी । परमेश्वरासी ॥ ३१॥

अशी पूजा करतां येत नसेल तर मानसपूजा करावीं (मानसपूजा करुन वरील सर्व पदार्थ मनाने देवाला अर्पावेत),परमेश्र्वराला मानसपूजाही अगत्त्य (विशेष) आवडते,

मनें भगवंतास पूजावें । कल्पून सर्वहि समर्पावें । मानसपूजेचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ३२॥

मनानेच कल्पना करुन सर्व पूजा उपचार देवास अर्पण करुन जी पूजा करणें तिचें नाव मानसपूजा,

जें जें आपणांस पाहिजे । तें तें कल्पून वाहिजे । येणें प्रकारें कीजे । मानसपूजा ॥ ३३॥

आपल्या आवडीप्रमाणें जे जें देवास अर्पण करावेसे वाटेल त्याची त्यांनी कल्पना करुन देवाला वाहावें,अशाप्रकारे मानसपूजा करावी.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आर्चनभक्तिनाम समास पंचवा ॥५॥**

**समास सहावा : वंदनभक्ति ॥ श्रीराम् ॥**

मागां जालें निरूपण । पांचवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । साहावी भक्ती ॥ १॥

पूर्वी पाचव्या भक्तीचे लक्षण सांगितलें,आतां एकाग्रतेनें सहावी भक्ति ऐका.

साहावी भक्ती तें वंदन । करावें देवासी नमन । संत साधु आणी सज्जन । नमस्कारीत जावे ॥ २॥

देव,संत,साधु,सज्जन ह्यांना नमस्कार करुणें हीं वंदनभक्ति होय.

सूर्यासि करावे नमस्कार । देवासि करावे नमस्कार । सद्गुरूस करावे नमस्कार । साष्टांग भावें ॥ ३॥

सूर्य,देव, सद्गुरु यांना भावनापूर्वक साष्टांग नमस्कार घालावे.

साष्टांग नमस्कारास अधिकारु । नानाप्रतिमा देव गुरु । अन्यत्र नमनाचा विचारु । अधिकारें करावा ॥ ४॥

अनेक देवांच्या प्रतिमा व गुरु (देव प्रतिमा व गुरू) हेंच साष्टांग नमस्कार घालण्यास योग्य होत,इतरांना नमस्कार करणे,तो त्यांचा अधिकार पाहून करावा.

छपन्न कोटी वसुमती । मधें विष्णुमूर्ती असती । तयांस नमस्कार प्रीतीं । साष्टांग घालावे ॥ ५॥

छप्पन कोटी योजनें विस्तृत अशा पृथ्वीवर अनेक विष्णुमुर्ति आहेंत.त्यांसही मोठ्या प्रेमाने साष्टांग नमस्कार घालावें.

पशुपति श्रीपति आणी गभस्ती । यांच्या दर्शनें दोष जाती ।तैसाचि नमावा मारुती ।नित्य नेमे विशेष ॥६॥

( गभस्ती - सूर्य )

शंकर,विष्णु व सूर्य ह्यांच्या दर्शनाने दोष जातात(म्हणून त्यांना) त्याचप्रमाणे मारुतीला नित्यनेमाने नमस्कार करावा त्यांत विशेष (फल) आहें.

**श्लोक ॥ शंकरः शेषशायी च मार्तंडो मारुतिस्तथा । एतेषां दर्शनं पुण्यं नित्यनेमे विशेषतः ॥**

भक्त ज्ञानी आणी वीतरागी । माहानुभाव तापसी योगी । सत्पात्रें देखोनि वेगीं । नमस्कार घालावे ॥ ७॥

भक्त,ज्ञानी,वैराग्यशील पुरुष,महानुभाव (महात्मे),तापसी,योगी इत्यादि अत्यंत योग्य असे पुरुष पाहिले कीं त्यांस साष्टांग नमस्कार घालावे.

वेदज्ञ शास्त्रज्ञ आणी सर्वज्ञ।पंडित पुराणिक आणी विद्वज्जन ।याज्ञिक वैदिक पवित्रजन। नमस्कारीत जावे ॥ ८॥

वेद जाणणारे,शास्त्र, जाणणारे,सर्वज्ञ, पंडित,पुराणिक,विद्वान,याज्ञिक,वैदिक अशा पवित्र जनांना नमस्कार करावें.

जेथें दिसती विशेष गुण । तें सद्गुरूचें अधिष्ठान । याकारणें तयासी नमन । अत्यादरें करावें ॥ ९॥

जेथें जेथें काहीं विशेष गुण दिसून येतील तें सदगुरुचें स्वरुप होय,म्हणून त्यांना अति आदरपूर्वक नमस्कार करावे.

गणेश शारदा नाना शक्ती । हरिहरांच्या अवतारमूर्ती । नाना देव सांगों किती । पृथकाकारें ॥ १०॥

गणेश,शारदा, अनेक शक्ति,हरिहर व त्यांच्या अवतारांच्या मूर्ति  असे अनेक देव वेगवेगळे किती सांगावे ?

सर्व देवांस नमस्कारिलें । ते येका भगवंतास पावलें । येदर्थीं येक वचन बोलिलें- । आहे, तें ऐका ॥ ११॥

ह्या सर्व देवांस (देवांपैकी कोणा एकास) नमस्कार केला तरी तो एका परमात्म्यालाच पोचतो.ह्या विषयी एक वचन सांगीतले आहे.तें ऐका.(श्र्लोकःआकाशातून पडलेले पाणी जसे समुद्राला जाऊन मिळते,त्याप्रमाणे सर्व देंवांना केलेला नमस्कार केशवाला पोचतो.)

**श्लोक ॥ आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरं । सर्वदेवनमस्कारः केशवं प्रतिगच्छति ॥**

याकारणें सर्व देवांसी । नमस्कारावें अत्यादरेंसीं । अधिष्ठान मानितां, देवांसी- । परम सौख्य वाटे ॥ १२॥

ह्यासाठी सर्व देवांना अतिशय आदरपूर्वक नमस्कार करावा,देवांना अधिष्ठान म्हणजे परमात्मस्वरुप मानल्यास (भक्ताला)अत्यंत समाधान होईल (देवस्थानाला मान दिल्यास देवांना तत्-स्थानाभिमानी देवतांना-परमसुख होईल).

देव देवाचीं अधिष्ठानें । सत्पात्रें सद्गुरूचीं स्थानें । या कारणें नमस्कार करणें । उभय मार्गीं ॥ १३॥

देव हे भगवंताची म्हणजे परमात्म्याचीं अधिष्ठानें व सत्पात्रें म्हणजें अधिकारी सत्पुरुष,हें सद्गुरुंची अधिष्ठाने होत,ह्यास्तव ह्या दोंघांसही नमस्कार करावा.

नमस्कारें लीनता घडे । नमस्कारें विकल्प मोडे । नमस्कारें सख्य घडे । नाना सत्पात्रासीं ॥ १४॥

नमस्कारामुळें लीनपणा आंगी येतो,विकल्प मोडतो व अनेक सज्जनांशी, साधुसंतांशी सख्य होतें.

नमस्कारें दोष जाती । नमस्कारें अन्याय क्ष्मती । नमस्कारें मोडलीं जडतीं । समाधानें ॥ १५॥

नमस्कारानें चित्ताचे दोष नाहीसे होतात.(घडलेल्या) अन्यायांची क्षमा होते आणि समाधान बिघडलें असल्यास तें पुन्हा प्राप्त होते.

सिसापरता नाहीं दंड । ऐसें बोलती उदंड । याकारणें अखंड । देव भक्त वंदावे ॥ १६॥

( सिसापरता - मस्तकाहून (सारखा) सर्वश्रेष्ठ )

मस्तक (सिस-शीर्ष) नमविण्यापेक्षां दुसरी (मोठी) शिक्षा (दंड) नाहीं असें अनेक जण म्हणतात,ह्यास्तव देवाभक्तांना नेहमी नमस्कार करीत असावें.

नमस्कारें कृपा उचंबळे । नमस्कारें प्रसन्नता प्रबळे । नमस्कारें गुरुदेव वोळे । साधकांवरीं ॥ १७॥

नमस्कारानें साधकांवर गुरु-देव ह्यांची कृपा व प्रसन्नता वाढत जाते.

निशेष करितां नमस्कार । नासती दोषांचे गिरिवर । आणी मुख्य परमेश्वर । कृपा करी ॥ १८॥

( निशेष - मनापासुन )

अहंभाव किंचिंतही न ठेवता (निःशेष) नमस्कार केल्यास दोषांचे डोगरचे डोंगर नाहीसे होतात (भस्म होतात) व मुख्य परमेश्र्वराची कृपा होते.

नमस्कारें पतित पावन । नमस्कारें संतांसी शरण । नमस्कारें जन्ममरण । दुरी दुऱ्हावे ॥ १९॥

पतित असतात ते नमस्कारानें पावन होतात, व नमस्कार-(लीनता-)पूर्वक संतांना शरण गेल्यास जन्ममरण पार दूर जाते.

परम अन्याय करुनि आला । आणी साष्टांग नमस्कार घातला । तरी तो अन्याये क्ष्मा केला । पाहिजे श्रेष्ठीं ॥२०॥

एखादा मोठा अन्याय (थोर अपराध) करुन आला व त्यांनें साष्टांग नमस्कार घातला तर श्रेष्ठांनी त्या अन्यायाची क्षमा करावयास पाहिजे.

याकारणें नमस्कारापरतें । आणीक नाहीं अनुसरतें । नमस्कारें प्राणीयातें । सद्बुद्धि लागे ॥ २१॥

( आणीक नाहीं अनुसरतें - यासारखे आणखीन काही इष्ट /योग्य ते काय सांगावे )

म्हणून साधकास (परमार्थासाठी) नमस्कारापेक्षा दुसरा मार्ग नाही,नमस्काराने प्राण्याला सदबुध्दि उत्पन्न होते.

नमस्कारास वेचावें नलगे ।नमस्कारास कष्टावें नलगे । नमस्कारांस कांहींच नलगे ।उपकर्ण सामग्री ॥२२॥

नमस्कारास काही खर्चावे लागत नाहीं,काही दुःख सहन करावे लागत नाही अथवा उपकरणी किंवा बाह्य साधनें ह्यांची आवश्यकत्ता नसते.

नमस्कारा ऐसें नाहीं सोपें । नमस्कार करावा अनन्यरूपें । नाना साधनीं साक्षपें । कासया सिणावें ॥ २३॥

नमस्कारासारखे सोपे (साधन) काहीं नाहीं,मात्र तो नमस्कार अनन्यपणाने (एकनिष्ठेनें-वेगळेपणा टाकून किंवा निष्कपटपणानें) करावा.अनेक साधनांचे प्रयत्न करुन (साक्षेपें) उगीच कां कष्ट सोसावे (सिणावे) ?

साधक भावें नमस्कार घाली । त्याची चिंता साधूस लागली । सुगम पंथे नेऊन घाली ।जेथील तेथें ॥२४॥

साधकांने भावभक्तिपूर्वक नमस्कार घातला कीं त्याची काळजी साधूला लागून तो त्याला सोप्या मार्गाने (जेथून जीव प्रथम घसरला तेथें म्हणजें)स्वस्वरुपीं नेऊन पोंचवितो.

याकारणें नमस्कार श्रेष्ठ । नमस्कारें वोळती वरिष्ठ । येथें सांगितली पष्ट । साहावी भक्ती ॥ २५॥

( पष्ट - स्पष्ट )

म्हणून नमस्कार हें साधन श्रेष्ठ आहें,त्या योगाने थेराथोरांची कृपा होते.(श्रेष्ठ प्रसन्न होतात).अशी सहावी भक्ति ह्या ठिकाणी स्पष्ट करुन सांगितली.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे वंदनभक्तिनाम समास सहावा ॥ ६॥**

**समास सातवा : दास्यभक्ति ॥ श्रीराम् ॥**

मागां जालें निरूपण । साहवें भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । सातवी भक्ती ॥ १॥

मागें सहाव्या भक्तीचे लक्षण सांगितले,आतां सातवी भक्ती सावधपणे ऐका.

सातवें भजन तें दास्य जाणावें । पडिलें कार्य तितुकें करावें । सदा सन्निधचि असावें । देवद्वारीं ॥ २॥

सदासर्वदा देवद्वारासन्निध राहून जें जें कार्य पडेल तें तें करीत जावें. ही सातवी दास्यभक्ति.

देवाचें वैभव संभाळावें । न्यूनपूर्ण पडोंचि नेदावें । चढतें वाढतें वाढवावें । भजन देवाचें ॥ ३॥

देवांचे ऐश्वर्य रक्षण करुन त्यांत उणें पडू देऊ नयें,अशाप्रकारें चढत्यावाढत्या प्रमाणांत देवाचें भजन करावें,(देवाच्या भजनाचा रंग वाढवावा.)

भंगलीं देवाळयें करावीं । मोडलीं सरोवरें बांधावीं । सोफे धर्मशाळा चालवावीं । नूतनचि कार्यें ॥ ४॥

जीर्ण झालेलीं देवळे नीट करावी.(देवालयांचा,जीर्णोध्दार करावा),सरोवरे,सोपे व धर्मशाळा हीं पडलीं असल्यास बांधावीं व नवीनही करावीं,(नवीन बांधून द्यावींत व मोडतोड झाली असेल तीं नवी करावीं).

नाना रचना जीर्ण जर्जर । त्यांचे करावे जीर्णोद्धार । पडिलें कार्य तें सत्वर । चालवित जावें ॥ ५॥

मोडकळीस आलेल्या इमारतींचे जीर्णोध्दार करावें,नडलेंलें कार्य असेंल तें करीत जावें.

गज रथ तुरंग सिंहासनें । चौकिया सिबिका सुखासनें । मंचक डोल्हारे विमानें । नूतनचि करावीं ॥ ६॥

( चौकिया - चौरंग )

हत्ती,रथ,घोडे,सिंहासने,चौक्या (चौरंगं),पालख्या,मेणें,पलंग,डोल्हारे(झोंपाळे),विमानें वरचेवर नवीन करावींत.

मेघडंब्रें छत्रें चामरें । सूर्यापानें निशाणें अपारें । नित्य नूतन अत्यादरें । सांभाळित जावीं ॥ ७॥

मेघडंब-या,छत्र,चामरें, अबदागिरी,निशाणें ही सामुग्री नित्यनवी व पुष्कळ करुन आदरपूर्वक सांभाळीत जावीं.

नाना प्रकारीचीं यानें । बैसावयाचीं उत्तम स्थानें । बहुविध सुवर्णासनें । येत्नें करीत जावीं ॥ ८॥

अनेक प्रकारचीं वहानें,बसवायचीं उत्तम ठिकाणें,तह्रेतह्रेचीं (सिहासनादि) सुवर्णाचीं आसनें यत्नपूर्वक करावी.

भुवनें कोठड्या पेट्या मांदुसा ।रांझण कोहळीं घागरी बहुवसा ।संपूर्ण द्रव्यांश ऐसा ।अति येत्नें करावा ॥९॥

( रांझण कोहळीं - मोठे रांजण , मोठी भांडी , मांदुसा - पेटारे )

घरें,कोठड्या,पेट्या,तिजो-या (मांदुसा),शीतलोदकाचें रांजण,कोहळे,घागरी अशीं द्रव्य सांठविण्याचीं अनेक पात्रें तयार करुन त्यांत (देवासाठीं) द्रव्य दीर्घोद्योगानें मिळवून सांठवून ठेवावें.

भुयेरीं तळघरें आणी विवरें । नाना स्थळें गुप्त द्वारें । अनर्घ्ये वस्तूंचीं भांडारें ।येत्नें करीत जावीं ॥१०॥

( अनर्घ्ये - दान द्यावयाच्या नसतील अश्या अमूल्य वस्तू )

भुयारें,तळघरें,विवरें,अशीं अनेक गुप्त स्थळें व त्यांस असणा-या गुप्त वाटा तयार करुन अमोल वस्तु ठेवण्यासाठीं भांडारें प्रयत्नपुर्वक करावीं.

आळंकार भूषणें दिव्यांबरें । नाना रत्नें मनोहरें । नाना धातु सुवर्णपात्रें । येत्नें करीत जावीं ॥११॥

अलंकार,भूषणें,उत्तम वस्त्रें,अनेक मनोहर रत्नें,सुवर्णादि अनेक धातूंची नाना पात्रें तयार करुन अमोल वस्तु ठेवण्यासाठीं भांडारे प्रयत्नपूर्वक (संपादन) करावीं. (ह्या सर्व प्रकारांनी देवमंदिराचे ऐश्वर्य वाढवावे).

पुष्पवाटिका नाना वनें । नाना तरुवरांचीं बनें । पावतीं करावीं जीवनें । तया वृक्षांसी ॥ १२॥

( पावतीं करावीं जीवनें - जगण्यासाठी उपयुक्त होतील अशी करावीत )

देवालयाभोंवती रम्य पुष्पवाटिका-फुलबागा,अनेक वनें व उपवनें उभारावीं त्या झाडांना-वृक्षवेलींना पाणी पोहोचेल असे पाट सोडावें.

नाना पशूंचिया शाळा । नाना पक्षी चित्रशाळा । नाना वाद्यें नाट्यशाळा । गुणी गायेक बहुसाल ॥१३॥

अनेक पशुशाळा,पक्षिशाळा,चित्रशाळा बांधाव्यां,अनेक वाद्ये वा नाट्य-(नृत्यगीतादिकांची) शाळा तयार करुन अनेक गुणी व गवई लोकांच्या नेमणुका करुन द्याव्या.

स्वयंपाकगृहें भोजनशाळा । सामग्रीगृहें धर्मशाळा । निद्रिस्तांकारणें पडशाळा । विशाळ स्थळें ॥ १४॥

स्वयंपाकगृहे,भोजनशाळा,सामानाच्या कोठ्या,धर्मशाळा,निद्रिस्तांसाठी (झोपण्यासाठी) पडव्या,मोठमोठीं पटांगणे,इ.स्थळे विशाळ बांधावी.

नाना परिमळद्रव्यांचीं स्थळें।नाना खाद्यफळांचीं स्थळें । नाना रसांचीं नाना स्थळें ।येत्नें करीत जावीं॥१५॥

तेलें,अत्तरे,केशर-कस्तुरी वगैरे सुगंधी द्रव्यें ठेवण्याच्या जागा,खाद्यफळांच्या जागा,दहीं-दुधादि अनेक रस ठेवण्याचीं अनेक ठिकाणें मोठ्या यत्नानें उभारावींत,

नाना वस्तांची नाना स्थानें । भंगलीं करावीं नूतनें । देवाचें वैभव वचनें । किती म्हणौनि बोलावें ॥ १६॥

अनेक वस्तु ठेवण्याचीं अनेक ठिकाणें मोडलीं असल्यास नवीन-दुरुस्त-करावी,नसतील तर नवी बांधावींत अशाप्रकारे देवाचें वैभव हरत-हेनें वाढवावें,तें शब्दांनीं कोठवर सांगावें ?

सर्वां ठाई अतिसादर । आणी दास्यत्वासहि तत्पर । कार्यभागाचा विसर । पडणार नाहीं ॥ १७॥

तात्पर्य,सर्वं कार्ये करण्यास तयार राहून सेवा करण्यास तत्पर असावें.(मोठेपणा विसरुन सर्व प्रकारचे दास्य करावें.) आणि कोणत्याहि कामाचा विसर पडू नये.

जयंत्या पर्वे मोहोत्साव । असंभाव्य चालवी वैभव । जें देखतां स्वर्गींचे देव । तटस्त होती ॥१८॥

जयंत्या,पर्वे इत्यादि महोत्सव अशा अपूर्व थाटानें फार मोठ्या प्रमाणावर करावें की तें पाहून स्वर्गीचे देवही सानंदाश्र्चर्यभरित व्हावे.

ऐसें वैभव चालवावें । आणी नीच दास्यत्वहि करावें । पडिले प्रसंगीं सावध असावें । सर्वकाळ ॥ १९॥

असें देवाचें वैभव चालवावे आणि शिवाय हलकी सेवा काहीं असल्यास तीही करावीं. सर्वकाळ येईल तो प्रसंग सांभाळण्याविषयीं सावध असावें.

जें जें कांहीं पाहिजे । तें तें तत्काळचि देइजे । अत्यंत आवडीं कीजे । सकळ सेवा ॥ २०॥

ज्या प्रसंगी जे पाहिजे ते तात्काळ द्यावें.अशाप्रकारे सर्व सेवा अत्यंत प्रेमपूर्वक करावी.(जेव्हा जे लागेल ते प्रेमानें व तत्परतेने पुढे करावें.)

चरणक्षाळणे स्नानें आच्मनें । गंधाक्षतें वसनें भूषणें । आसनें जीवनें नाना सुमनें ।धूप दीप नैवेद्य ॥२१॥

पाय धुण्यास,स्नानास व आचमनास पाणी,गंध,अक्षता,वस्त्रें,भूषणें,आसनें,पाणी,अनेक फुलें,धूप, दीप,नैवेद्य.( पूजनाचें,स्नान-आचमन-गंधाक्षतादि व धूप-दीप-नैवेद्यादि साहित्य पुरवावे).

शयेनाकारणें उत्तम स्थळें । जळें ठेवावीं सुसीतळें । तांबोल गायनें रसाळें । रागरंगें करावीं ॥ २२॥

(देवास) निजण्यासाठीं उत्तम जागा (असावी),तेथें गार व चांगलें सुवासिक पाणी भरुन ठेवावे,विडा द्यावा आणि रागरंगाचे रसाळ गाणें करावें (रम्य गायनें करावी.)

परिमळद्रव्यें आणी फुलीलीं । नाना सुगंधेल तेलें । खाद्य फळें बहुसालें । सन्निधचि असावीं ॥ २३॥

( फुलीलीं - अत्तरे )

सुगंधी द्रव्यें,(फुलेलें) फुलांची अत्तरें-सुवासिक तेलें,खाण्याचीं पुष्कळ तेलें,खाण्याची पुष्कळ फळें देवाजवळ नेहमी असावी.

सडे संमार्जनें करावीं । उदकपात्रें उदकें भरावीं । वसनें प्रक्षालून आणावीं । उत्तमोत्तमें ॥२४॥

( वसनें प्रक्षालून - वस्त्रे स्वच्छ धुऊन )

सडा-संमार्जन करावें,पाण्याचीं भांडी भरुन ठेवावीं,उंची वस्त्रें अगदीं उत्तम प्रकारें धुवून आणावीं.

सकळांचें करावें पारपत्य । आलयाचें करावें आतित्य । ऐसी हे जाणावी सत्य । सातवी भक्ती ॥ २५॥

जे जे लोक येतील त्या सर्वांचा परामर्ष घेऊन जो येईल त्याचा सत्कार करावा.(पारपत्य करावें म्ह.सप्रेम समाचार घेऊन आतिथ्य करावें) अशी खरोखर ही सातवी भक्ति आहें.

वचनें बोलावीं करुणेचीं । नाना प्रकारें स्तुतीचीं । अंतरें निवतीं सकळांचीं । ऐसें वदावें ॥२६॥

सर्वांचीं अंतःकरणें समाधान पावतील अशा प्रकारें करुणायुक्त व स्तुतिपर भाषण करावें (देवापुढे करुणास्तोत्रे म्हणावीं की जीं ऐकून सर्वांची अंतरे प्रसन्न व्हावीं. अशाप्रकारे दास्यभक्ति करावी).

ऐसी हे सातवी भक्ती । निरोपिली येथामती । प्रत्यक्ष न घडे तरी चित्तीं । मानसपूजा करावी ॥२७॥

अशी ही सातवी भक्ति यथामति सांगितली.ही प्रत्यक्ष करण्याचा योग न आला तर मानसपूजा तरी अशा प्रकारें करावी.

ऐसें दास्य करावें देवाचें । येणेंचि प्रकारें सद्गुरूचें । प्रत्यक्ष न घडे तरी मानसपूजेचें । करित जावें ॥२८॥

अशाप्रकारे देवाची सेवा करावी व तशीच सद्गुरुंचीही करावी. न घडेल तर मानसपूजेंत तरी करावी.
**दास्यसख्यभक्तिमिसें । संतसंगे श्रवण होतसे ।। अर्थास जीवीं धरीजे मानसें । या नांव श्रध्दा. ।।**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दास्यभक्तिनाम समास सातवा ॥ ७॥**

### समास आठवा : सख्यभक्ति ॥ श्रीराम् ॥

मागां जालें निरूपण । सातवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । आठवी भक्ती ॥ १॥

मागे सातव्या भक्तीचे लक्षण सांगितले.आता आठवी सख्यभक्ति सावधपणें ऐका.

देवासी परम सख्य करावें । प्रेम प्रीतीनें बांधावें । आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ २॥

देंवाशीं अत्यंत सख्य असें करावें की त्याला प्रेमाने व प्रीतीनें बांधून टाकावें.असे आठव्या भक्तीचे लक्षण आहें.(देवाशी परमसख्य करावें,त्याला प्रेमसूत्रानें बांधून टाकावें.)

देवास जयाची अत्यंत प्रीती । आपण वर्तावें तेणें रीतीं । येणें करितां भगवंतीं । सख्य घडे नेमस्त ॥ ३॥

देवांस जें फार आवडत असेंल तसेच आपण वागावें,असे वागलें असता निश्र्चयें करून देवाशीं सख्य होईल.(हे सख्य भक्तीचे लक्षण होय.)

भक्ति भाव आणी भजन । निरूपण आणी कथाकीर्तन । प्रेमळ भक्तांचें गायन । आवडे देवा ॥ ४॥

(देवाला प्रिय काय आहे ?) भक्ति,भाव,भजन,निरुण,कथाकीर्तन, आणि प्रेमळ भक्तांचे गाणे देवाला आवडतें (म्हणून आपण हेंच करावें).

आपण तैसेंचि वर्तावें । आपणासि तेंच आवडावें । मनासारिखें होतां स्वभावें । सख्य घडे नेमस्त ॥५॥

आपण तसेंच वागावें,आपणालाही त्याचीच आवड असावीं(देवाच्या) मनाप्रमाणें वागलें असतां निश्र्चयेंकरुन सहज सख्य होते.(कोणाच्याही मनासारखे झालें म्हणजे निश्र्चयाने सख्य घडतें)

देवाच्या सख्यत्वाकारणें । आपलें सौख्य सोडून देणें । अनन्यभावें जीवें प्राणें । शरीर तेंहि वेंचावें ॥ ६॥

देवाशीं सख्य होण्यासाठीं आपल्या सर्व सुखांवर पाणी सोडलें पाहिजें.एकनिष्ठपणानें मनापासून व अंतःकरणापासून,प्रसंगी शरीरसुध्दां देवासाठीं खर्ची घालावें (वेंचावे.)

सांडून आपली संसारवेथा।करित जावी देवाची चिंता ।निरूपण कीर्तन कथा वार्ता।देवाच्याचि सांगाव्या ॥७॥

आपली संसारदुःखे बाजूला ठेऊन देवाच्याच कार्यांची काळजी वाहावी.आणि निरुपण, कीर्तन,कथा,वार्ता सागणें असतील त्या देवाच्याच सांगाव्या (संसाराची चिंता न करितां देवाचेच चिंतन करावे,कथावार्ता देवाच्याच सांगाव्या.)

देवाच्या सख्यत्वासाठीं । पडाव्या जिवलगांसी तुटी । सर्व अर्पावें, सेवटीं । प्राण तोहि वेचावा ॥८॥

देवांशी सख्य होण्यासाठीं जिवलग तुटावें,सर्व अर्पण करावें आणि शेवटी प्राणही अर्पण करावां (देवाच्या सख्यत्वासाठीं जिवलगांशीं विरोध झाला तरी पत्करावा,सर्वांचा त्याग करावा व शेवटी प्राणही अर्पावा.)

आपुलें आवघेंचि जावें । परी देवासी सख्य राहावें । ऐसी प्रीती जिवें भावें । भगवंतीं लागावी ॥ ९॥

आपले सर्व जावे पण देवाशीं सख्य राहावे अशी देवावर जिवाभावाची प्रीती लागावीं.(आपल्या सर्वस्वाची हानी झाली तरी पत्करावीं,पण देवाशी सख्य रहावें अशा परम प्रीतीने देव वश करावा).

देव म्हणिजे आपुला प्राण । प्राणासी न करावें निर्वाण । परम प्रीतीचें लक्षण । तें हें ऐसें असे ॥ १०॥

( निर्वाण - नाश )

देवाला आपला प्राण समजावा,त्यास दुःख होईल असे करु नयें,(देव हाच आपला प्राण करुन त्याशीं कधींही अंतर- निर्वाण-पाडूं नये.) अत्यंत प्रीतीचें लक्षण असें असते.

ऐसें परम सख्य धरितां ।देवास लागे भक्ताची चिंता । पांडव लाखाजोहरीं जळतां ।विवरद्वारें काढिले॥११॥

(असा सख्य भक्तीने देव बांधून ठेवावा म्हणजे तो भक्ताची चिंता वाहातो) देवाशी असे अत्यंत सख्य जडलें असतां भक्ताची काळजी देवाला लागतें ,पाहा बरें! पांडव लाक्षागृहात जळत असता त्यानें त्यांस विवरद्वारानें बाहेर काढून वांचविलें.

देव सख्यत्वें राहे आपणासी ।तें तों वर्म आपणाचि पासी ।आपण वचनें बोलावीं जैसीं ।तैसीं येती पडसादें ॥१२॥

देव आपल्याशीं सख्यत्वाने कसा राहील ह्यांचे वर्म आपल्याच जवळ आहें.आपण जसें (बरे वाईट) बोलावें तसेच पडसादांत उमटतें (तसाच प्रतिध्वनि होतो.)

आपण असतां अनन्यभावें । देव तत्काळचि पावे । आपण त्रास घेतां जीवें । देवहि त्रासे ॥ १३॥

म्हणून आपण देवाशी अनन्य भावाने वागलों कीं देवही ताबडतोब पावतो,आपण देवाचा मनातून कंटाळा केला कीं तोही आपला कंटाळा करतो-उदासीन राहातो.

**श्लोक ॥ ये यथा मां प्रपद्यंते तांस्तथैव भजाम्यहम् ।**

जैसें जयाचे भजन । तैसाचि देवहि आपण । म्हणौन हें आवघें जाण । आपणाचि पासीं ॥ १४॥

जसें उत्कटतेनें ज्याचें भजन असतें तसाच देवही स्वतः प्रेम करतो. म्हणून (देव आपलासा होणें),हें सगळे आपल्याच हाती आहें.(जसे आपले भजन तसा देवही वळतो,म्हणून हे सर्व आपल्याकडेंच येते)

आपुल्या मनासारिखें न घडे । तेणें गुणें निष्ठा मोडे । तरी गोष्टी आपणांकडे । सहजचि आली ॥१५॥

आपल्या मनासारखे घडलें नाही कीं त्यामुळे आपली देवावरची निष्ठा नाहींशी होते. तेव्हा स्वभावतःच ही गोष्ट आपल्याकडे येते.(आपली निष्ठा स्थिर असावीं.)

मेघ चातकावरी वोळेना । तरी चातक पालटेना । चंद्र वेळेसि उगवेना । तऱ्ही चकोर अनन्य ॥ १६॥

मेघानें वेळेला चातकावर वर्षाव न केला तरी चातक पालटत नाहीं (मेघाची वाट पहाण्याचे टाकत नाहीं),चंद्र रोज नियमितपणें न उगवला तरी चकोराची त्याच्यावर अनन्य निष्ठा असते. असे देवाचे सख्य अढळ असावे.

ऐसें असावें सख्यत्व । विवेकें धरावें सत्व । भगवंतावरील ममत्व । सांडूंचि नये ॥ १७॥

ह्याप्रमाणें सख्यत्व असावें,विचाराने धैर्य धरुन भगवंतावरील प्रेम यत्किंचितहि कमी होऊ देऊ नयें.

सखा मानावा भगवंत । माता पिता गण गोत । विद्या लक्ष्मी धन वित्त । सकळ परमात्मा ॥ १८॥

भगवंताला मित्र मानावें,(फार काय) आईबाप गणगोत,विद्या,वैभव,संपत्ति इत्यादि सर्व काहीं परमात्मा आहें,असे मानावे(सर्व काही देव व्हावा.)

देवावेगळें कोणीं नाहीं । ऐसें बोलती सर्वहि । परंतु त्यांची निष्ठा कांहीं । तैसीच नसे ॥ १९॥

देवांवाचून कोणीच नाही असे सर्वच म्हणतात,पण त्यांची निष्ठा मात्र तशी नसतें.

म्हणौनी ऐसें न करावें । सख्य तरी खरेंचि करावें । अंतरीं सदृढ धरावें । परमेश्वरासी ॥ २०॥

म्हणून असें करु नये. देवाशीं सख्य करणें तें खरोखरीचें करावें,परमेश्वराला अंतःकरणात बळकट धरावें.

आपुलिया मनोगताकारणें । देवावरी क्रोधास येणें । ऐसीं नव्हेत किं लक्षणें । सख्यभक्तीचीं ॥ २१॥

आपले ऐहिक मनोरथ पूर्ण झाले नाहीत-आपल्या मनोरथाचा भंग झाला-म्हणून देवावर रागावणें हें काही सख्य भक्तीचे लक्षण नव्हे.

देवाचें जें मनोगत । तेंचि आपुलें उचित । इच्छेसाठीं भगवंत । अंतरूं नये कीं ॥ २२॥

(ज्या वेळेस जें घडून येईल) तें देवाच्या इच्छेनें होतें (असें मानून) त्यातच आपलें हित आहें,(देवांचे जे मनोगत तेंच आपले उचित आहें असें समजावें.) त्याहून वेगळी अशी इच्छा धरुन अंतर पाडू नये.

देवाचे इच्छेनें वर्तावें । देव करील तें मानावें । मग सहजचि स्वभावें । कृपाळु देव ॥ २३॥

आपली वेगळी इच्छा न ठेवता देवाच्या इच्छेने वागावें,तो जें करील तें शिरसावंद्य मानावे.अशाप्रकारे वागले असतां देव सहजच कृपा करील  (दयाळू देव ह्या अनन्यतेला भुलून सहजच वळतो.)

पाहातां देवाचे कृपेसी । मातेची कृपा कायेसी । माता वधी बाळकासी । विपत्तिकाळीं ॥ २४॥

पाहू गेंलें असता देवाच्या कृपेपुढें आईचें प्रेम ते किती ?कठीण प्रसंगी एखादी आई आपल्या बालकाचा वध करतें.

देवें भक्त कोण वधिला । कधीं देखिला ना ऐकिला । शरणागतांस देव जाला । वज्रपंजरु ॥ २५॥

( वज्रपंजरु - बळकट आधार )

पण देंवानें एखाद्या भक्तास मारल्यांचे कधीं पाहाण्यांत किंवा ऐकण्यांत नाहीं. शरण आलेल्यांचें वज्राच्या कवचाप्रमाणें देव रक्षण करतो.(अनन्यभक्ताला देव वज्रपंजर होतो)

देव भक्तांचा कैवारी । देव पतितांसि तारी । देव होये साहाकारी । अनाथांचा ॥२६॥

देव भक्तांचा कैवार घेतो,देव पतितांना तारतो,व देव अनाथांस साहाय्य करतो.

देव अनाथांचा कैपक्षी । नाना संकटांपासून रक्षी । धांविन्नला अंतरसाक्षी । गजेंद्राकारणें ॥ २७॥

( कैपक्षी - कैवारी )

अनाथांचा पक्ष घेऊन (कैपक्षी) अनेक संकटापासून देव त्यांचे रक्षण करतों,-देव अनाथांचा,पतितांचा वाली आहे,तो अंतरसाक्षी आहें.गजेंद्रासारख्या पशूसाठींसुध्दां ऐन प्रसंगी तो धावत गेला.

देव कृपेचा सागरु । देव करुणेचा जळधरु । देवासि भक्तांचा विसरु । पडणार नाहीं ॥ २८॥

देव कृपेचा सागर आहें,करुणेचा मेघ आहें,देवास भक्तांचा विसर कधीं पडणार नाही.

देव प्रीती राखों जाणे । देवासी करावें साजणें । जिवलगें आवघीं पिसुणें । कामा न येती ॥ २९॥

( जिवलगें आवघीं पिसुणें - निकटवर्तीय अत्यंत स्वार्थी , साजणें -मित्र )

प्रेम कसे राखावे हे देवाला कळतें,म्हणून त्याच्याशींच मैत्री करावी-देवाशींच सख्य करावे.जितके जिवाचे जिवलग तितके सगळे (खरोखरी) वैरी-दुर्जन-खल आहेत कोणी उपयोगी पडावयाचे नाही.( जिवाचे जिवलग कोणी कामास येत नाहीत,)

सख्य देवाचें तुटेना । प्रीति देवाची विटेना । देव कदा पालटेना । शरणागतांसी ॥ ३०॥

देवाचे सख्य कधी तुटत नाहीं,त्यावेळचे प्रेम कधीं विटत नाहीं, आणि शरणांगतांशी तो कधी पालटत नाहीं.

म्हणौनि सख्य देवासी करावें । हितगुज तयासी सांगावें । आठवे भक्तीचें जाणावें । लक्षण ऐसें ॥ ३१॥

म्हणून देवाशींच सख्य करावें,आपले हितगुज त्यालाच सांगावे.हे आठव्या सख्य भक्तीचे लक्षण समजावें.

जैसा देव तैसा गुरु । शास्त्रीं बोलिला हा विचारु । म्हणौन सख्यत्वाचा प्रकारु । सद्‌गुरूसीं असावा ॥ ३२॥

जसें देवाला तसेंच गुरुलाही मानावें असे शास्त्रांत सांगितले आहें. म्हणून सदगुरुंशीही असेच अनन्य सख्यत्वाने वागावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सख्यभक्तिनाम समास आठवा ॥ ८॥**

## समास नववा : आत्मनिवेदन ॥ श्रीराम् ॥

मागां जालें निरूपण । आठवे भक्तीचें लक्षण । आतां ऐका सावधान । भक्ति नवमी ॥ १॥

आठव्या भक्तीचें लक्षण मागें सांगीतले,आतां नवव्या भक्तीचें लक्षण सावधपणे ऐका.

नवमी निवेदन जाणावें । आत्मनिवेदन करावें । तेंहि सांगिजेल स्वभावें । प्रांजळ करूनि ॥ २॥

आत्मनिवेदन करणें ही नववी (निवेदन) भक्ति होय,तेंच निरुपण ओघात आलें म्हणून आतां स्पष्ट करुन सांगतो.

ऐका निवेदनाचें लक्षण । देवाअसि वाहावें आपण । करावें तत्त्वविवरण । म्हणिजे कळे ॥ ३॥

निवेदनाचें लक्षण ऐका,देवाला आपण अर्पण व्हावे,(ते कसे व्हावे हें) तत्वविचार केला असता कळेल.(आत्मनिवेदन म्हणजे "देवासी वाहावे आपण",देव कोण,आपण कोण व वहावें कसें ? करावे तत्वविवरण म्हणजे कळे!)

मी भक्त ऐसें म्हणावें । आणी विभक्तपणेंचि भजावें । हें आवघेंचि जाणावें । विलक्षण ॥ ४॥

म्हणायचें मी "भक्त" आणि विभक्तपणानें (वेगळेपणानें) भजन करायचें हे सारेच विलक्षण होय.

लक्षण असोन विलक्षण । ज्ञान असोन अज्ञान । भक्त असोन विभक्तपण । तें हें ऐसें ॥ ५॥

अशा भक्ताच्या ठिकाणीं भक्तीचे लक्षण असतांही द्वैतामुळें त्याची भक्ति विपरीत लक्षणाची (विलक्षण) होते.त्याला जें देवांचे ज्ञान असतें ते अशा वेगळेपणामुळें अज्ञान होतें.भक्त असून विभक्तपणा म्हणतात तो हा असा असतो.

भक्त म्हणिजे विभक्त नव्हे । आणी विभक्त म्हणिजे भक्त नव्हे । विचारेंविण कांहींच नव्हे । समाधान ॥ ६॥

भक्त म्हणजे विभक्त नव्हे,आणि विभक्त म्हणजे भक्त ऐक्य पावलेला नव्हे.विचार केल्यांवाचून समाधान काहीं होणार नाहीं-हे काहींच उमगावयांचे नाहीं.

तस्मात् विचार करावा । देव कोण तो वोळखावा । आपला आपण शोध घ्यावा । अंतर्यामीं ॥ ७॥

म्हणून विचार करावा,देव कोणता तो ओळखावा आणि आपण कोण ह्याचाही शोध आपल्या अंतःकरणात घ्यावा.

मी कोण ऐसा निवाडा । पाहों जातां तत्वझाडा । विचार करितां उघडा । आपण नाहीं ॥ ८॥

आंता तत्वांचे पृथक्करण करुन "मी कोण" ह्याचा उलगडा करु लागले असता विचारांती उघड दिसते की,आपण म्हणून काहींच नाहीं आता "मी कोण" ह्याचा निश्र्चय करतांना ज्या तत्वांचा पिंडब्रह्मांड-विस्तार झाला आहे त्यांचा विचार करावा,व ज्या ज्या तत्वांचा पिंड बनला आहे तीं तीं तत्वे त्या त्या मूळ तत्वात मिळवावीं म्हणजे आपण ती तत्वे नाही "मी" त्या तत्वांत नाही-असे स्वच्छ समजते.तत्वझाडा झाला म्हणजे मी ती तत्वे नाही,तत्वाहुन "मी" म्हणावयाला वेंगळे काहींच नाही असे कळते.

तत्वें तत्व जेव्हां सरे । तेव्हां आपण कैंचा उरे । आत्मनिवेदन येणेंप्रकारें । सहजचि जालें ॥ ९॥

( तत्वें तत्व जेव्हां सरे - आत्मस्वरूपाचे ज्ञान झाल्यावर पंचभूतात्मक तत्वे आत्मतत्वात लय पावतात )

ज्या तत्वांपासून जें तत्व निर्माण होतें ते पुन्हा त्यांतच लीन होऊन तद्रुपतेमुळें सर्व तत्वे जेव्हा संपतात तेव्हा आपण म्हणून कोठें उरतों ?(ह्याप्रमाणें पिंडातलीं तत्वें मूळ तत्वांत विवेक सोडून दिलीं कीं "मी" उरत नाही व) ह्याप्रमाणे आत्मनिवेदन सहजच होते.

तत्वरूप सकळ भासे । विवेक पाहातां निरसे । प्रकृतिनिरासें आत्मा असे । आपण कैंचा ॥ १०॥

प्रकृति सर्व तत्वरुप भासते.तिचा विचार केला असतां ती नाहींशी होते.(हा दृश्य जगदाकार तत्वरुप आहें,विवेकानें त्याचा निरास होतो.) प्रकृतीचा निरास झाला असतां ऐकमेवाद्वितीय आत्मा तेवढा उरतो,मग आपण कोण ?तेथे मी म्हणावयाला कोण आहे ?

येक मुख्य परमेश्वरु । दुसरी प्रकृति जगदाकारु । तिसरा आपण कैंचा चोरु । आणिला मधें ॥ ११॥

एक मुख्य परमेश्वर असून व जगताच्या आकारानें असणारी प्रकृति दुसरी (हीं दृश्याचा प्रपंच लावण्यासाठीं केवळ मानिली आहें.),असे असतां "आपण" म्हणजे "मी" हा तिसरा चोर कोठून आणिला ?

ऐसें हें सिद्धचि असतां । नाथिली लागे देहअहंता । परंतु विचारें पाहों जातां । कांहींच नसे ॥ १२॥

( नाथिली - लटकी,मिथ्या )

असे हें मुळचेच असतां खोटीच (नसती-मिथ्या-नाथिली), देहअहंता (देह मी असा अहंकार) पाठीमागें लागतें,पण विचाराने पाहिले असता मी अहं "आपण" म्हणून काहींच नाही.

पाहातां तत्त्वविवेचना । पिंडब्रह्मांडतत्वरचना । विश्वाकारें वेक्ती, नाना । तत्वें विस्तारलीं ॥ १३॥

तत्वविचार व पिंडब्रह्मांडरचना ह्याचा शोध घेतां विश्वाच्या आकारानें अनेक व्यक्ति हीं तत्वेंच विस्तारली आहेंत (असे दिसुन येईल),तत्वांच्याच व्यक्ति झाल्या आहेंत असे ठरते).

तत्वें साक्षत्वें वोसरतीं । साक्षत्व नुरे आत्मप्रचिती । आत्मा असे आदिअंतीं । आपण कैंचा ॥ १४॥

मी तत्वांचा साक्षी (पाहाणारा-तत्वांहून वेगळा) असा आहे.अशा भावनेने पाहिले असतां तत्वांचा निरास होतो,आणि आत्मप्रचितींचे पाहाणाऱ्याचें साक्षित्व (निराळेपण)नाहीसे होऊन आदिअंती,एक आत्माच उरतो, मग आपण म्हणजे मी कोठचा आला ?(मी तत्वांचा साक्षी आहें,अर्थात् त्याहून निराळा आहें व निराळेपण-साक्षित्व-सुध्दां तत्वरुप असल्यामुळें,आत्मप्रचीतींत शिल्लक राहात नाहीं).

आत्मा एक स्वानंदघन । आणी अहमात्मा हें वचन । तरी मग आपण कैंचा भिन्न । उरला तेथें ॥१५॥

तात्पर्य,आदिअंती (सर्वत्र) एक आत्माच आनंदरुप आहें आणि अहं आत्मा मी तो आत्मा असे श्रुतिवाक्य आहें, मग त्या ठिकाणीं वेगळा मी कोठे राहिला ?

सोहं हंसा हें उत्तर । याचें पाहावें अर्थांतर । पाहतां आत्मयाचा विचार । आपण कैंचा तेथें ॥ १६॥

सोऽहं अहं सः-तो (परमात्मा) मी व मी तो ह्या श्रुतिवचनांचा अर्थ पाहावा आणि आत्म्याचा विचार करावा,मग तेथे आपण कोठें राहीला ?

आत्मा निर्गुण निरंजन । तयासी असावें अनन्य । अनन्य म्हणिजे नाहीं अन्य । आपण कैंचा तेथें ॥१७॥

आत्मा निर्गुण व निरंजन (मायाविरहित) असा आहें.त्याशीं अनन्य म्हणजे तद्रुप असावें,अनन्य म्हणजे दुसरा नव्हे तो.मग अशा ठिकाणी आपण कोठला ?

आत्मा म्हणिजे तो अद्वैत । जेथें नाहीं द्वैताद्वैत । तेथें मीपणाचा हेत । उरेल कैंचा ॥ १८॥

आत्मा म्हणजे केवळ अद्वैत आहें, त्याच्या ठिकाणी द्वैत व अद्वैत ही दोन्ही नाहीत. तेथे मी-पणाचा उगम (संबंध-हेत) कोठून राहील.

आत्मा पूर्णत्वें परिपूर्ण । जेथें नाहीं गुणागुण । निखळ निर्गुणी आपण । कोण कैंचा ॥ १९॥

आत्म्याचें पूर्णत्व (व्यापकत्व) सर्वत्र परिपुर्ण भरलेले आहें त्याच्या ठिकाणी गुणत्व किंवा निर्गुणत्व नाही.अशा शुध्द (निखळ) निर्गुणाच्या ठिकाणीं आपण कोण व कुठला ?

त्वंपद तत्पद असिपद । निरसुनि सकळ भेदाभेद । वस्तु ठाईंची अभेद । आपण कैंचा ॥ २०॥

( त्वंपद तत्पद - या तत्वमसी वाक्यातील भेद असी पदाने काढुन "ते तू आहेस " असे ऐक्य होऊन अविशिष्ट शुद्ध परब्रहम उरते.)

तत्वमसि ह्या महावाक्यातील त्वं पद म्हणजे जीवात्मा व तत्पद म्हणजे परमात्मा ह्यांच्यातील भासमान होणारा भेद असि आहेस ह्या पदाने नाहीसा करुन सर्व भेदाभेदांचा निरास केल्यावर मुळींच  अभेदरुप असणारी वस्तूच उरते,मग आपण कोठचा ?

निरसितां जीवशिवउपाधी । जीवशिवचि कैंचे आधी । स्वरूपीं होतां दृढबुद्धि । आपण कैंचा ॥ २१॥

जीव व शिव ह्यांची उपाधि काढून टाकली तर जीव कोठचा व शिव कोठचा ?बुध्दि स्वरुपामध्ये स्थिर झाल्यावर (ऐक्य पावल्यावर) आपण कोठचा ?

आपण मिथ्या, साच देव । देव भक्त अनन्यभाव । या वचनाचा अभिप्राव । अनुभवी जाणती ॥ २२॥

आपण मिथ्या असून देव खरा आहें, आणि देवभक्त दोघेही एकरुप आहेत,ह्या वचनाचे रहस्य अनुभवीच जाणतील.

या नांव आत्मनिवेदन । ज्ञानियांचें समाधान । नवमे भक्तींचे लक्षण । निरोपिलें ॥२३॥

ह्याला "आत्मनिवेदन" म्हणतात,ज्ञानी जनांचे समाधान तें हेच.अशा प्रकारे नवव्या भक्तीचें लक्षण सांगितले.

पंचभूतांमध्यें आकाश । सकळ देवांमधें जगदीश । नवविधा भक्तीमध्यें विशेष । भक्ति नवमी ॥२४॥

पंचभूतांमध्ये आकाश मुख्य,किंवा सर्व देवांमध्ये जगदीश(परमेश्र्वर) मुख्य त्याप्रमाणें नवविधा भक्तीमध्ये नववी आत्मनिवेदनभक्ति मुख्य होय.

नवमी भक्ती आत्मनिवेदन । न होतां न चुके जन्ममरण । हें वचन सत्य, प्रमाण- । अन्यथा नव्हे ॥२५॥

अशी ही नववी भक्ति "आत्मनिवेदन" घडली नाही तर जन्ममरण चुकणार नाही हे वचन सत्य व प्रमाण आहे खोटे नव्हें.

ऐसी हे नवविधा भक्ती । केल्यां पाविजे सायोज्यमुक्ती । सायोज्यमुक्तीस कल्पांतीं । चळण नाहीं ॥२६॥

अशी ही नवविधा भक्ति केल्यानें सायुज्यमुक्ति मिळतें त्या मुक्तीला कल्पांतींही नाश नाहीं.

तिहीं मुक्तींस आहे चळण।सायोज्यमुक्ती अचळ जाण । त्रैलोक्यास होतां निर्वाण। सायोज्यमुक्ती चळेना ॥२७॥

बाकीच्या तिन्ही मुक्तींस-सलोकता,समीपता, सरुपता ह्या चंचल अर्थात नाशिवंत आहेत.सायुज्यमुक्ति तेवढी अढळ आहे. त्रैलोक्याचा नाश झाला तरी सायुज्यमुक्तींचा नाश होणार नाही.

आवघीया चत्वार मुक्ती । वेदशास्त्रें बोलती । तयांमध्यें तीन नासती । चौथी ते अविनाश ॥ २८॥

( चत्वार - चार )

वेदशास्त्रांमध्ये सगळ्या मिळून चार मुक्ति सांगितल्या आहेत,त्यांत तीन नाश पावतात. चौथी सायुज्यमुक्तीं नाश न पावणारी आहे.

पहिली मुक्ती ते स्वलोकता । दुसरी ते समीपता । तिसरी ते स्वरूपता । चौथी सायोज्यमुक्ती ॥ २९॥

पहिली सलोकता,दुसरी समीपता,तिसरी सरुपता,चौथी मुक्ति सायुज्यता.

ऐसिया चत्वार मुक्ती ।भगवद्भजनें प्राणी पावती । हेंचि निरूपण प्रांजळ श्रोतीं ।सावध पुढें परिसावें ॥३०॥

भगवतभजनानें यथाधिकार ह्या चार (चत्वार) मुक्ति प्राणी मिळवितात. तेंच निरुपण पुढें स्पष्ट करुन सांगितले आहें,

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मनिवेदनभक्तिनाम समास नववा ॥ ९॥**

**जे का भक्तींनिवेदन । त्यांसीच म्हणावे समाधान ।।**

## समास दहावा : मुक्तिचतुष्टय ॥ श्रीराम् ॥

मुळीं ब्रह्म निराकार । तेथें स्फूर्तिरूप अहंकार । तो पंचभूतांचा विचार । ज्ञानदशकीं बोलिला ॥ १॥

निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं प्रथम (ऐकोऽहं बहुस्याम् ।) ह्या स्फूर्तिरुपानें अहंकार उत्पन्न झाला.तो अहंकार पंचभूतात्मक व कसा आहे (तेथुन पंचभूते प्रथम सूक्ष्म व नंतर स्थूळ उत्पन्न झालीं इ.) विचार ज्ञानदशकांत म्ह. आठव्या दशकांत सागितला आहें.

तो अहंकार वायोरूप । तयावरी तेजाचें स्वरूप । तया तेजाच्या आधारें आप । आवर्णोदक दाटलें ॥ २॥

तो अहंकार प्रथम वायुरुप,नंतर तेजोरुप व त्यामागून आपरुप झाला. तें आवरणोदक सर्वत्र भरुन राहिले.

तया आवर्णोदकाच्या आधारें । धरा धरिली फणिवरें । वरती छपन्न कोटी विस्तारें । वसुंधरा हे ॥३॥

त्या आवरणोदकाच्या (आपाच्या-पाण्याच्या) आधारानें शेषांने छप्पन कोटी योजनें विस्ताराची ही पृथ्वी आपल्या मस्तकीं धारण केलीं.

इयेवरी परिघ सप्त सागर । मध्य मेरू माहां थोर । अष्ट दिग्पाळ तो परिवार ।अंतरें वेष्टित राहिला ॥४॥

त्या पृथ्वीला सात समुद्रांचे वेढे असून मध्यभागी मोठा थोर मेरुपर्वत आहे. त्याच्याभोवती अष्ट-दिक्पाळ आठ दिशांना व्यापून राहिले आहेत.

तो सुवर्णाचा माहा मेरू । पृथ्वीस तयाचा आधारु । चौरुआसी सहस्र विस्तारु । रुंदी तयाची ॥ ५॥

तो महा मेरुपर्वत सोन्याचा असून पृथ्वीला त्याचा आधार आहें त्याची रुंदी ८४ हजार योंजने पसरली आहें.

उंच तरी मर्यादेवेगळा । भूमीमधें सहस्र सोळा । तया भोवता वेष्टित पाळा । लोकालोक पर्वताचा ॥६॥

उंचीला तर मर्यादाच नाही,पृथ्वीच्या पोटांत (खोली) १६ हजार योजने शिरला आहें,त्याच्या भोवती लोकालोक पर्वतांचा वेढा पडलेला आहे.

तया ऐलिकडे हिमाचळ । जेथें पांडव गळाले सकळ । धर्म आणी तमाळनीळ । पुढें गेले ॥७॥

( तमाळनीळ - यमधर्म )

त्याच्या (लोकालोक पर्वताच्या) अलिकडे हिमालय पर्वत आहें. त्या ठिकाणी सर्व पांडव गळून गेलें (पांडवांनी देहत्याग केला.) फक्त धर्म व श्रीकृष्ण (तमाळानीळ) एवढेच दोघे त्या बर्फातून पुढे गेले.

जेथें जावया मार्ग नाहीं । मार्गी पसरले माहा अही । सितसुखें सुखावले ते ही । पर्वतरूप भासती ॥८॥

( माहा अही - मोठाले सर्प )

त्या ठिकाणीं जावयाला मार्ग नाहीं,कारण वाटेंत मोठमाठे सर्प पसरले आहेत.तेथील थंड हवेंने (थंडगार वायूच्या सेवनानें) सुखावून ते पर्वतासारखे प्रचंड पडलेले आहेत.

तया ऐलिकडे सेवटीं जाण । बद्रिकाश्रम बद्रिनारायण । तेथें माहां तापसी, निर्वाण। देहत्यागार्थ जाती ॥९॥

त्याच्या अगदी अलिकडे बद्रिकाश्रम व बद्रिनारायण हे प्रसिध्द आहेत. तेथे मोठमोठे तापसी शेवटीं देहत्यागासाठीं जात असतात.

तया ऐलिकडे बद्रिकेदार । पाहोन येती लहानथोर । ऐसा हा अवघा विस्तार । मेरुपर्वताचा ॥ १०॥

त्याच्या अगदी अलिकडे बद्रिकेदार असून तें लहानथोर मंडळी पाहून येतात,असा हा मेरुपर्वताचा विचार आहे.

तया मेरुपर्वतापाठारीं । तीन श्रृंगे विषमहारी । परिवारें राहिले तयावरी । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ११॥

( श्रृंगे - शिखरे , विषमहारी - वाकड्यातिकड्या ओळीत )

त्या मेरुपर्वताच्या पठारावर लहानमोठीं-वाकडीतिकडी-(विषम) तीन शिखरें ओळींनें (हारी) आहेत त्या शिखरांवर ब्रह्मा,विष्णु,व महेश आपल्या परिवारांसह (अनुचरांसह) राहिले आहेत.

ब्रह्मश्रृंग तो पर्वताचा । विष्णुश्रृंग तो मर्गजाचा । शिवश्रृंग तो स्फटिकाचा । कैळास नाम त्याचें ॥ १२॥

( मर्गज - पाचू )

ब्रह्मदेंवाचे शिखर पर्वतांचे (मेरुपर्वत ज्या द्रव्याचा बनला आहें त्याचे म्हणजे सोन्याचें) आहे.(हा सत्यलोक होय) विष्णूंचे शिखर पांचेचे (मर्गजाचे) आहे (हा वैकुंठ लोक) व शंकराचे शिखर स्फटिकाचें (सारें शुभ्र स्फटिकमय) आहें त्याला कैलास म्हणतात.

वैकुंठ नाम विष्णुश्रृंगाचें । सत्यलोक नाम ब्रह्मश्रृंगाचें । अमरावती इंद्राचें । स्थळ खालतें ।।१३॥

विष्णूंच्या शिखराला वैकुंठ व ब्रह्मदेवाच्या शिखराला सत्यलोक म्हणतात.त्याच्या खालचे बाजूस इंद्राचे अमरावती नावांचे स्थान आहें.

तेथें गण गंधर्व लोकपाळ । तेतिस कोटी देव सकळ । चौदा लोक, सुवर्णाचळ- । वेष्टित राहिले ॥१४॥

तेथे गण,गंधर्व,अष्ट लोकपाल,तेहतीस कोटि देव (कोटि -जाति भेद- ८वसु,१२-आदित्य, ११- रुद्र ,१- प्रजापति व १- वषट्कार) आणि सप्त स्वर्ग व सप्त पाताळें असे चौदा लोक त्या सुवर्ण पर्वताला (मेरु पर्वताला) वेष्टून आहेत.

तेथें कामधेनूचीं खिलारें । कल्पतरूचीं बनें अपारें । अमृताचीं सरोवरें । ठाईं ठाईं उचंबळतीं ॥ १५॥

तेथे कामधेनूंचे कळपचे कळप आहेत. कल्पतरुंचीं असंख्य अरण्ये आहेत.अमृताची सरोवरे ठिकठिकाणीं तुडुंब भरलेली-पसरलेली आहेत.

तेथें उदंड चिंतामणी । हिरे परिसांचियां खाणी । तेथें सुवर्णमये धरणी । लखलखायमान ॥ १६॥

तेथें पुष्कळ चिंतामणि,हिरे व परिस ह्यांच्या खाणी असून सर्व जमीन सोन्याची (दैदीप्यमान) लखलखीत आहे.

परम रमणीये फांकती किळा । नव्वरत्नाचिया पाषाणसिळा । तेथें अखंड हरुषवेळा । आनंदमये ॥१७॥

तेथील पाषाण,शिळा नवरत्नांच्या असून त्यांची प्रभा फार मनोहर अशी फाकलेलीं असते तेथे निरंतर आनंदमय असा हर्षाचा काल असतो (तेथे सर्वांचा सर्वकाळ आनंदातच जात असतो.)

तेथें अमृतांचीं भोजनें । दिव्य गंधें दिव्य सुमनें । अष्ट नायका गंधर्वगायनें । निरंतर ॥ १८॥

तेथे अमृताचे जेवण करितात.दिव्य अशीं सुगंधी द्रव्यें,सुवासिक पुष्पें भरलेली आहेत.अष्टनायिका व गंधर्व ह्यांचे गायन निरंतर चालू असतें,(अमृतांची भोजनें,दिव्य परिमळानें दरवळलेलीं,गंधसुमनें,अष्ट नायकांची मधुर गायनें ह्यांची तेथे रेलचेल आहे.)

तेथें तारुण्य वोसरेना । रोगव्याधीहि असेना । वृधाप्य आणी मरण येना । कदाकाळीं ॥ १९॥

तेथें तारुण्य कमी होत नाही.रोग व्याधींचे तर नांवच नको.म्हातारपण व मरण कोणाला कधीच नाहीं.

तेथें येकाहूनि येक सुंदर । तेथें येकाहूनि येक चतुर । धीर उदार आणी शूर । मर्यादेवेगळे ॥ २०॥

तेथे एकापेक्षां एक सुंदर व चतुर आहेत,धैर्यशाली,उदार व शूरही आहेत कीं त्यांच्या त्या गुणांस मर्यादा नाहीं.

तेथें दिव्यदेह ज्योतिरूपें । विद्युल्यतेसारिखीं स्वरूपें । तेथें येश कीर्ति प्रतापें । सिमा सांडिली ॥२१॥

त्यांचे देह दिव्य व तेजोमय असून विंजेप्रमाणें प्रकाशमान आहेत.तेथील यशकिर्ती प्रतापाला मर्यादा नाही.असे त्या स्वर्गलोकाचे ऐश्र्वर्य आहे.

ऐसें तें स्वर्गभुवन । सकळ देवांचें वस्तें स्थान । तयां स्थळाचें महिमान । बोलिजे तितुकें थोडें ॥ २२॥

असा तो स्वर्गलोक देवांचे राहाण्याचे ठिकाण आहें,त्या स्थळाचा महिमा वर्णन करावा तेवढा थोडाच आहें.

येथें ज्या देवाचें भजन करावें । तेथें ते देवलोकीं राहावें । सलोकता मुक्तीचें जाणावें ।लक्षण ऐसें॥२३॥

येथें (मृत्युलोकीं) ज्या देवांचे भजन करावें त्या देवाच्या लोकांत स्वर्गी जाऊन राहावें हे सलोकता मुक्तीचें लक्षण होय.

लोकीं राहावें ते सलोकता।समीप असावें ते समीपता । स्वरूपचि व्हावें ते स्वरूपता-। तिसरी मुक्ती ॥२४॥

त्या देवांच्या लोकात राहावें ती सलोकता,त्या देवाच्याजवळ रहावें ही समीपता आणि त्या देवासारखे रुप प्राप्त व्हावे ही सरुपता तिसरी मुक्ति,(सलोकता व सरुपता ह्यांत द्वैत उघडच आहे,सरुपता ही द्वैतातील आहे.)

देवस्वरूप जाला देही । श्रीवत्स कौस्तुभ लक्ष्मी नाहीं । स्वरूपतेचें लक्षण पाहीं । ऐसें असे ॥ २५॥

देही म्हणजे जीव देवस्वरुप झाला तरी त्यास त्या देवाची ऐश्वर्य चिन्हे मिळणार नाहीत, उदा.विष्णूचे स्वरुप प्राप्त झाले तरी श्रीवत्सलांछन,कौस्तुभ व लक्ष्मी मिळणार नाहीत.असे हे स्वरुपतेचे लक्षण आहें.

सुकृत आहे तों भोगिती । सुकृत सरतांच ढकलून देती । आपण देव ते असती । जैसे तैसे ॥ २६॥

पुण्य आहे तोवर देवलोकींचे भोग भोगू देतात,पुण्य संपले की गचांडी मिळते व मर्त्यलोकीं यावे लागते.देवमात्र जसेच्या तसेच असतात.

म्हणौनि तिनी मुक्ति नासिवंत । सायोज्यमुक्ती ते शाश्वत। तेहि निरोपिजेल सावचित्त ।ऐक आतां ॥२७॥

म्हणून या तिन्ही मुक्ति नाशवंत आहेत. एकटी सायुज्यमुक्ति तेवढी अविनाशी व शाश्वत आहें तिचे निरुपण आतां करु.सावधपणे ऐका.

ब्रह्मांड नासेल कल्पांतीं ।पर्वतासहित जळेल क्षिती ।तेव्हां अवघेच देव जाती ।मां मुक्ति कैंच्या तेथें॥२८॥

( क्षिती - पृथ्वी )

कल्पांताच्या वेळी सर्व ब्रह्मांड नाहीसे होईल पर्वता सहवर्तमान सर्व पृथ्वी जळून जाईल. त्यावेळी देवही सर्व नाहीसे होतील,मग मुक्ति कशा राहातील ?(महाप्रळयी ब्रह्मांड बुडेल,तेव्हा पृथ्वी,तीवरचा मेरुपर्वत,ते देव त्यांचे लोक व त्यांच्या मुक्ति सर्वकाही नाहीसे होतील,हे सर्व चंचळ जाईल)

तेव्हां निर्गुण परमात्मा निश्चळ ।निर्गुण भक्ती तेहि अचळ । सायोज्यमुक्ती ते केवळ ।जाणिजे ऐसी॥ २९॥

सारांश,निर्गुण परमात्मा मात्र अचळ-शाश्वत असून निर्गुण त्याची जी भक्ति ती ही न चळणारी आहें (त्यांशी अनन्यता म्ह.सायुज्यता ही शाश्र्वत आहें) शुध्द सायुज्यमुक्ति ती अशी.

निर्गुणीं अनन्य असतां । तेणें होये सायोज्यता । सायोज्यता म्हणिजे स्वरूपता । निर्गुण भक्ती ॥३०॥

निर्गुणाच्या ठिकाणीं एकरुपता असल्यामुळें सायुज्यमुक्ति प्राप्त होते.सायुज्यता म्हणजे निर्गुणाच्या भक्तीने प्राप्त होणारी तदाकारता.

सगुण भक्ती ते चळे । निर्गुण भक्ती ते न चळे । हें अवघें प्रांजळ कळे । सद्गुरु केलियां ॥ ३१॥

सगुणभक्ति (सगुण व त्याची भक्ति चंचळ)(तिंचे फळ) चंचळ असून निर्गुण भक्ति व (तिचे फळ) निश्र्चळ आहे. हे सर्व सद्गुरु केला असता (सद्गुरुला शरण गेल्याने) स्पष्ट समजेल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मुक्तिचतुष्टयेनाम समास दहावा ॥ १०॥**

**॥दशक चवथा समाप्त ॥**

# सार्थ श्रीदासबोंध पंचम दशक मंत्रांचा

**दशक पाचवा मंत्रांचा (२४२-३१४)**

समास १.गुरुनिश्र्चय(२४२-२४९) २.गुरुलक्षण(२४९-२५८) ३.शिष्यलक्षण(२५८-२७२) ४.उपदेशलक्षण(२७२-२७६) ५.बहुज्ञाननिरुपण(२७६-२८०) ६.शुद्धज्ञाननिरुपण(२८०-२९०) ७.बद्धलक्षण(२९०-२९६) ८.मुमुक्षुलक्षण(२९६-३०१)९.साधकलक्षण(३०१-३०९) १०.सिद्धलक्षण(३०९-३१४)

**॥ श्रीरामसमर्थ ॥॥ श्रीमत् दासबोध ॥ ॥ मंत्रांचा पंचम दशक ॥५॥समास पहिला : गुरुनिश्चय ॥ श्रीराम ॥**

( मनानात त्रायते इति मंत्र : विचार केला असता तरुन जाण्याची सामग्री पुरवतो तो मंत्र )

जय जज जी सद्‌गुरु पूर्णकामा । परमपुरुषा आत्मयारामा । अनुर्वाच्य तुमचा महिमा ।वर्णिला न वचे॥ १॥

( पूर्णकामा - वासनातृप्त पुरुष , आत्मयारामा - आत्मस्वरुपा )

हे सद्गुरु पूर्णकामा,परमपुरुषा,आत्मारामा,आपला जयजयकार असो. आपला महिमा बोलण्याला अशक्य आहें.त्यांचे वर्णन करतां येत नाहीं.तुमची थोरवी शब्दांनी सांगता येत नाही.

जें वेदांस सांकडें । जें शब्दासि कानडें । तें सत्शिष्यास रोकडें । अलभ्य लाभे ॥ २॥

( सांकडें - कोडे , कानडें - त्यापलीकडे )

वेंदांस जे (कळण्यास) कठिण,शब्दाला जें दुर्बोध (कानडें),असें जें अलभ्य (परब्रह्म) तें सच्छिष्यास (आपल्या कृपेनें) तात्काळ मिळतें.

जें योगियांचें निजवर्म । जें शंकराचें निजधाम । जें विश्रांतीचें निजविश्राम । परम गुह्य अगाध ॥ ३॥

( निजवर्म - रहस्य )

जें योग्यांच्या अंतरंगातील ह्रदत-निजधाम,जें शंकराचे आत्मस्थान-विश्रांतिस्थान,विश्रांतीलाही विश्रांति,देणारे स्थान  असें अत्यंत गुह्य व अपार (खोल) आहे.

तें ब्रह्म तुमचेनि योगें । स्वयें आपणचि होईजे आंगें । दुर्घट संसाराचेनि पांगें । पांगिजेना सर्वथा ॥ ४॥

(आपणचि होईजे आंगें - स्वतः त्याच्याशी तदाकार होतो, पांगें पांगिजेना -पांगुळपणामुळे पंगु होत नाही.)

असें जें परब्रह्म तें तुमच्या योग्यांने-तुमची कृपा झाली असतां (शिष्यास) स्वतःच होंता येतें, व दुर्घट संसाराच्या जंजाळामध्ये तो अडकून पडत नाहीं.

आतां स्वामिचेनि लडिवाळपणें । गुरुशिष्यांचीं लक्षणें । सांगिजेती तेणें प्रमाणें । मुमुक्षें शरण जावें ॥५॥

आतां स्वामीच्या प्रेरणेनें लडिवाळपणानें गुरुशिष्यांची लक्षणें सांगतों,त्यांवरुन मुमुक्षूनें शिष्याधिकार ओळखून (सद्गुरु  ओळखून त्यांस शिष्यभावाने) शरण जावें.

गुरु तों सकळांसी ब्राह्मण । जर्‍हीं तो जाला क्रियाहीन । तरी तयासीच शरण । अनन्यभावें असावें ॥ ६॥

गुरु तर सर्वांस सर्व ज्ञातींस असला पाहिजे,मग ब्राह्मणच तो क्रियाहीन म्हणजे कर्महिन झाला तरी त्यालाच अनन्यभावानें शरण जावे.

अहो या ब्राह्मणाकारणें । अवतार घेतला नारायेणें । विष्णूनें श्रीवत्स मिरविणें । तेथें इतर ते किती ॥ ७॥

अहो,ह्या ब्राह्मणासाठीं तर नारायणानें अवतार घेतला.प्रत्यक्ष विष्णुही भृगुलत्तेचे चिन्ह "श्रीवत्स" आपल्या ह्रदयावर मिरवतात,तेथें इतरांची काय कथा ?

ब्राह्मणवचनें प्रमाण । होती शूद्रांचे ब्राह्मण । धातुपाषाणीं देवपण । ब्राह्मणचेनि मंत्रें ॥ ८॥

ब्राह्मणांची वचने प्रमाणभूत मानतात,त्यांच्या मंत्रामुळेच शुद्रांचे (जन्मना जायते शुद्रः।) ब्राह्मण होतात. त्यांच्या मंत्रामुळेच धातु-पाषाणादिकांच्या मूर्तीच्या ठिकाणीं देवपणा येतों.

मुंजीबंधनेंविरहित । तो शूद्रचि निभ्रांत । द्विजन्मी म्हणोनि सतंत । द्विज ऐसें नाम त्याचें ॥ ९॥

( सतंत - निराळे )

मौजीबंधनाशिवाय राहिला तर तो निःसंशय शूद्र होतो.(मौजीबंधन होईपर्यंत जो शुद्र असतो तो लगेंच द्विज म्हणून प्रतिष्ठा पावतो,त्याचे दोन जन्म होतात (एक मातेच्या उदरांतुन येण्याच्या वेळचा व दुसरा उपनयन संस्काराचा)म्हणून त्यास  "द्विज" अशी वेगळी संज्ञा प्राप्त होते.

सकळांसि पूज्य ब्राह्मण । हे मुख्य वेदाज्ञा प्रमाण । वेदविरहित तें अप्रमाण । अप्रिये भगवंता ॥ १०॥

ब्राह्मण हे सर्वांनाच पूज्य होत,अशी मुख्य वेदाज्ञा आहे. ती प्रमाण मानली पाहिजे,वेद विरहित ते अप्रमाण,तें भगवंताला,आवडत नाहीं,

ब्राह्मणीं योग याग व्रतें दानें । ब्राह्मणीं सकळ तीर्थाटणें । कर्ममार्ग ब्राह्मणाविणें । होणार नाहीं ॥ ११॥

योग,यज्ञ,व्रतें,दानें,सर्व तीर्थयात्रा,ऐकंदरींत सगळा कर्मभाग ब्रह्माणाशिवाय होणार नाहीं.

ब्राह्मण वेद मूर्तिमंत । ब्राह्मण तोचि भगवंत । पूर्ण होती मनोरथ । विप्रवाक्येंकरूनी ॥ १२॥

ब्राह्मण हा मूर्तिमंत वेद-वेदोनारायण होय,तो प्रत्यक्ष भगवंत आहें त्याच्या आर्शीवादानें सर्व मनोरथ पूर्ण होतात.

ब्राह्मणपूजनें शुद्ध वृत्ती- । होऊन, जडे भगवंतीं । ब्राह्मणतीर्थे उत्तम गती । पावती प्राणी ॥ १३॥

ब्राह्मणाची पूजा केली असता वृत्ति शुध्द होऊन भगवंताच्या ठिकाणी लागतें आणि त्याचे तीर्थ घेतले असतां प्राण्यांना उत्तम गति मिळतें.(ब्राह्मणस्वरुप तीर्थांत प्राण्यांस उत्तम सद्गति मिळते.)

लक्षभोजनीं पूज्य ब्राह्मण । आन यातिसि पुसे कोण । परी भगवंतासि भाव प्रमाण ।येरा चाड नाहीं ॥१४॥

( आन यातिसि - इतर/अन्य लोकांना पाठभेद )

लक्ष भोजन घालावयांचे असल्यास,ब्राह्मणच मानले पाहिजेत.इतर जातींना तेथे कोण विचारतो ?तरी पण भगवंताला भाव पाहिजे-भाव प्रिय आहें,दुस-या कशाची गरज नाहीं, दुसरें काही तो पाहात नाही.

असो ब्राह्मणा सुरवर वंदिती । तेथें मानव बापुडें किती । जरी ब्राह्मण मूढमती ।तरी तो जगद्वंद्य ॥१५॥

असो,ब्राह्मणाला मोठेमोठे देव नमस्कार करतात,तेथें गरीब माणसाचा काय पाड ? जरी तो मूर्ख असला तरी तो सर्व जगाला वंद्य आहे.

अंत्येज शब्दज्ञाता बरवा । परी तो नेऊन काये करावा । ब्राह्मणासन्निध पुजावा ।हें तों न घडे कीं ॥१६॥

अंत्यज मोठा विद्वान असला तरी त्याला घेऊन काय करावयाचें आहे ?ब्राह्मणाच्या जवळ बसवून त्याची पूजा करावी असें घडणार नाहीं,

जें जनावेगळें केलें । तें वेदें अव्हेरिलें । म्हणोनि तयासि नाम ठेविलें । पाषांडमत ॥ १७॥

बरें,कोणीं तसें केलें तरी लौकिसास-जनरुढीस (सज्जनांच्या पध्दतीस) सोडून जें जें केलें त्याचा वेंदानें अव्हेर केला आहें,म्हणून त्यास पाखंड मत म्हणतात,

असो जे हरिहरदास । तयास ब्राह्मणीं विश्र्वास । ब्राह्मणभजनें बहुतांस । पावन केलें ॥ १८॥

जे हरिहरांचे भक्त असतात त्यांचा ब्राह्मणांच्या ठिकाणी विश्र्वास असतो,ब्राह्मणांच्या भक्तीने अनेकांना पावन केले आहें.

ब्राह्मणें पाविजे देवाधिदेवा ।तरी किमर्थ सद्गुरु करावा ।ऐसें म्हणाल तरी निजठेवा ।सद्गुरुविण नाहीं॥ १९॥

(ब्राह्मणें पाविजे देवाधिदेवा तरी - ब्राह्मणाला पूज्य मानुन देव प्राप्त होत असेल तर, किमर्थ - कशाला)

आता ब्राह्मणांच्या सेवेंमुळें जगदीश्र्वर पावतो मग सद्गुरु कां करावा असें म्हणाल तर त्याला उत्तर असें कीं ब्रह्मज्ञान हें मात्र सद्गुरुशिवाय प्राप्त होणारच नाहीं.

स्वधर्मकर्मी।म् पूज्य ब्राह्मण।परी ज्ञान नव्हे सद्गुरुविण । ब्रह्मज्ञान नस्तां सीण।जन्ममृत्य चुकेना ॥२०॥

आपल्या धर्मकर्मांत ब्राह्मणांस पूज्य मानावें पण आत्मज्ञान सद्गुरुवांचून होत नाहीं आणि ब्रह्मज्ञान होत नाही तो पर्यंत जन्ममृत्यूचा त्रास चुकत नाहीं.

सद्‌गुरुविण ज्ञान कांहीं । सर्वथा होणार नाहीं । अज्ञान प्राणी प्रवाहीं । वाहातचि गेले ॥ २१॥

सद्गुरु(कृपे)वांचून आत्मज्ञान मुळींच होणार नाहीं,आत्मज्ञान ज्यांस झाले नाही असे अज्ञानी जीव संसाराच्या प्रवाहात वाहात जातात.

ज्ञानविरहित जें जें केलें । तें तें जन्मासि मूळ जालें । म्हणौनि सद्‌गुरूचीं पाऊलें । सुधृढ धरावीं ॥ २२॥

(आत्म-)ज्ञानांवाचून जे जे (साधन) करावें ते ते (जन्ममरणाच्या फे-यातुन सोडवीत नाहीं,उलट),जन्मास कारण होतें,म्हणून सदगुरुचे पाय घट्ट धरावें.

जयास वाटे देव पाहावा । तेणें सत्संग धरावा । सत्संगेंविण देवाधिदेवा । पाविजेत नाहीं ॥ २३॥

देवांचे प्रत्यक्ष दर्शन व्हावे अशी ज्याची इच्छा असेल त्याने संतसंगति करावी संतसंगति केल्याशिवाय देवाधिदेव मिळणार नाही.(संत- सद्गुरुकृपेवांचून देव जोडत नाहीं.)

नाना साधनें बापुडीं । सद्‌गुरुविण करिती वेडीं । गुरुकृपेविण कुडकुडीं । वेर्थचि होती ॥ २४॥

( कुडकुडीं - श्रम )

वेडे बिचारे जीव सद्गुरु(कृपे)ला सोडून अनेक साधने करतात आणि गुरुकृपेचा आधार नसल्यामुळें त्यांची विनाकारण कुचंबणा होते.(व ती साधने फुकट जातात.)

कार्तिकस्नानें माघस्नानें । व्रतें उद्‌यापनें दानें । गोरांजनें धूम्रपानें । साधिती पंचाग्नी ॥ २५॥

कार्तिकस्नानें,माघ-स्नानें हीं प्रातःस्नानें,व्रतें, व त्यांचीं उद्यापनें,दानधर्म,देवाप्रीत्यर्थ आंग जाळून घेणें (गोरांजनें), धूम्रपानें (झाडाला-उलटें टांगून घेऊन व खालीं धूर केलेला पिऊन तप करणें) पंचाग्निसाधनें (चार बाजूस चार धुन्या चार कुंडात अग्नि पेटवून व वरुन सूर्याचा ताप अशा पांच अग्नींच्या तापांत राहून तप करणें)

हरिकथा पुराणश्रवण । आदरें करिती निरूपण । सर्व तीर्थें परम कठिण । फिरती प्राणी ॥ २६॥

हरिकथा पुराण ऐंकणें,आदरपूर्वक अद्वैतनिरुपण करणें,अत्यंत कठिण अशीं सगळी तीर्थें हिंडणें.

झळफळित देवतार्चनें । स्नानें संध्या दर्भासनें । टिळे माळा गोपीचंदनें । ठसे श्रीमुद्रांचे ॥२७॥

( झळफळित - झगमगाटात )

सर्व प्रकारची पूजासाहित्ये जमवून संपूर्ण पुजाविधि करणें, थाटामाटाची देवाची  पूजा,स्नानसंध्या, दर्भासनें,टिळे,माळा,गोपीचंदन,श्रीमुद्रांचे ठसे.

अर्घ्यपात्रें संपुष्ट गोकर्णें । मंत्रयंत्रांचीं तांब्रपर्णें । नाना प्रकारीचीं उपकर्णें । साहित्यशोभा ॥ २८॥

( संपुष्ट - छोटा करंडा )

अर्घ्यपात्रें,संपुष्ट,गोकर्ण,मंत्र-यंत्र काढलेले तांब्याचे पत्रे,अशी अनेक प्रकारची उपकरणे व सुंदर साहित्य.

घंटा घणघणा वाजती । स्तोत्रें स्तवनें आणी स्तुती । आसनें मुद्रा ध्यानें करिती ।प्रदक्ष्णा नमस्कार ॥२९॥

घंटा घणघणा वाजतात,स्तोत्रें,स्तवनें,स्तुति (त्यांचे घोष चाललेले आहेत),सिध्दासनादि आसनें,खेचरी आदिकरुन मुद्रा धारण करुन ध्यान करतात,प्रदक्षणा नमस्कार घालतात.

पंचायेत्न पूजा केली । मृत्तिकेचीं लिंगें लाखोली । बेलें नारिकेळें भरिली । संपूर्ण सांग पूजा ॥ ३०॥

कोणी पंचायतन पूजा करतात,कोणी पार्थिवर्लिंगे करतात,कोणी लाखोली वाहातात,बेल नारळ इत्यादिकांनीं सर्व पूजा यथासांग करतात.

उपोषणें निष्ठा नेम । परम सायासीं केलें कर्म । फळचि पावती, वर्म- । चुकले प्राणी ॥ ३१॥

उपोषणें,नेमनिष्ठा नित्यनेमाचे देहकष्ट इत्यादिकांनी मोठ्या श्रमाने कर्मे करतात,पण शेवटीं प्राणी त्या कर्माचे फल पावतात व खरे वर्म चुकतात.

येज्ञादिकें कर्मे केलीं । हृदईं फळाशा कल्पिली । आपले इछेनें घेतली । सूति जन्मांची ॥ ३२॥

( सूति - विसार )

यज्ञयागादि कर्मे करतात,पण पोटांत फळाची इच्छा धरतात,त्यामुळे आपल्याच इच्छेनें पुनर्जन्माची सुति-पुनर्जन्माचा विसार (बयाणा) घेऊन ठेवतात.

करूनि नाना सायास । केला चौदा विद्यांचा अभ्यास । रिद्धि सिद्धि सावकास । वोळल्या जरी ॥ ३३॥

अनेक कष्ट करुन चौदा विद्यांचा (४-वेद,४-उपवेद,६-शास्त्रे ) अभ्यास केला व हव्या तितक्या ऋध्दिसिध्दि प्रसन्न झाल्या (रिध्दी-सिध्दीही वश केल्या.)

तरी सद्गुरुकृपेविरहित । सर्वथा न घडे स्वहित । येमेपुरीचा अनर्थ । चुकेना येणें ॥ ३४॥

तरी सद्गुरुकृपेशिवाय कधींच आत्महित (मोक्षलाभ) होणार नाही व यमयातना टळावयाच्या नाहीत.

जंव नाहीं ज्ञानप्राप्ती । तंव चुकेना यातायाती । गुरुकृपेविण अधोगती । गर्भवास चुकेना ॥ ३५॥

जों पर्यंत आत्मज्ञान होत नाही,तो पर्यंत जन्ममरणाची यातायात चुकत नाहीं,गुरुकृपेवाचून अधोगती व गर्भवास चुकावयाचा नाही. यातायात टळते ज्ञानानेच व ज्ञानदाता सद्गुरुंवाचुन कोणी नाहीं.

ध्यान धारणा मुद्रा आसन ।भक्ती भाव आणी भजन ।सकळहि फोल ब्रह्मज्ञान ।जंव तें प्राप्त नाहीं ॥३६॥

जो पर्यंत ब्रह्मज्ञान होत नाही,तोपर्यंत ध्यान,धारणा,मुद्रा,आसन,भक्ति,भाव,भजन इत्यादि सर्व काही फुकट आहें.(ध्यान,धारणा,मुद्रा,आसन साधलें व शाब्दिक ज्ञान झालें तरी सारें सद्गुरुकृपेवीण व्यर्थ आहे

सद्गुरुकृपा न जोडे । आणी भलतीचकडे वावडे । जैसें आंधळें चाचरोन पडे । गारीं आणी गडधरां ॥ ३७॥

( वावडे - भटकतो, गारीं आणी गडधरां - चिखल आणि खड्यात )

आंधळा जसा सरळ मार्ग सोडून चाचपडत जातो व (इच्छा नसतानाही) शेणखळीत (गारींत किंवा खाड्यात), गडदरी (खांचखळग्यात) पडतो,तसाच (अज्ञानी) जीवही गुरुकृपेचा सरळ व सोपा मार्ग टाकून अन्य साधनांत भटकतो (वृथा साधनांच्या कचाट्यांत सापडतो.)

जैसें नेत्रीं घालितां अंजन । पडे दृष्टीस निधान । तैसें सद्गुरुवचनें ज्ञान- । प्रकाश होये ॥ ३८॥

(पायाळाच्या) डोळ्यांत अंजन घातलें म्हणजे जसें त्यास गुप्त धन दिसतें,तसें सद्गुरुवचनाचें अंजन (साधकांने आपल्या) डोळ्यास लाविलें की त्यास आत्मज्ञानाचा प्रकाश दिसूं लागतो (सद्गुरुवचनाबरोबर शिष्याच्या अंतरी ज्ञानप्रकाश पडतों.)

सद्गुरुविण जन्म निर्फळ । सद्गुरुविण दुःख सकळ । सद्गुरुविण तळमळ । जाणार नाहीं ॥ ३९॥

(म्हणून) सद्गुरुवांचून जन्म फुकट,सर्व काहीं दुःखच,आणि तळमळही नाहींशी होणार नाही,( सद्गुरुप्रसाद न झाल्यास जन्म फुकट जातो,तळमळ नाहीशी होत नाहीं.)

सद्गुरुचेनि अभयंकरें । प्रगट होईजे ईश्वरें । संसारदुःखें अपारें । नासोन जाती ॥ ४०॥

( अभयंकरें - अभयवचनामुळे )

सद्गुरुंचा वरदहस्त मस्तकीं पडला कीं ईश्वर प्रकट होतो,आणि संसारातील असंख्य दुःखे नाहींशी होतात.

मागें जाले थोर थोर । संत महंत मुनेश्वर । तयांसहि ज्ञानविज्ञानविचार । सद्गुरुचेनी ॥ ४१॥

पूर्वी मोठमोठे संतमहंत मुनीश्वर होऊन गेले त्यांसही ज्ञानविज्ञानाचा विचार सद्गुरुकृपेंनेच कळला.

श्रीरामकृष्ण आदिकरूनी । अतितत्पर गुरुभजनीं । सिद्ध साधु आणी संतजनीं । गुरुदास्य केलें ॥ ४२॥

श्रीराम-कृष्णदिक भगवंताचे अवतारही गुरुसेंवेस अतिशय तत्पर होतें,सिध्दसाधुसंत ह्या सर्वांशी गुरुसेवा केली.

सकळ सृष्टीचे चाळक । हरिहरब्रह्मादिक । तेहि सद्गुपदीं रंक । महत्वा न चढेती ॥ ४३॥

सकळ सृष्टीचे प्रवर्तक जे शंकर,विष्णु.ब्रह्मदेव आदिकरुन देवही सदगुरुचरणांचे किंकर असून (त्यांच्या कृपेशिवाय) महत्पदाला चढले नाहींत.

असो जयासि मोक्ष व्हावा । तेणें सद्‌गुरु करावा । सद्‌गुरुविण मोक्ष पावावा । हें कल्पांतीं न घडे ॥ ४४॥

असो,ज्यास मोक्ष पाहिजे असेल त्यानें सद्गुरु करावा. सद्गुरुशिवाय कल्पांतींही मोक्ष मिळणार नाहीं.

आतां सद्‌गुरु ते कैसे । नव्हेति इतरां गुरु ऐसे । जयांचे कृपेनें प्रकाशे । शुद्ध ज्ञान ॥ ४५॥

आंता ते सदगुरु कसे असतात ?तर ते इतर सामान्य गुरुसारखे नसतात,त्यांच्या कृपेनें शुध्दज्ञान प्रकाशतें (ब्रह्मज्ञानाचा लाभ होतो )

त्या सद्‌गुरूची वोळखण । पुढिले समासीं निरूपण । बोलिलें असे श्रोतीं श्रवण । अनुक्रमें करावें ॥ ४६॥

त्या सद्गुरुच्या ओळखीचें निरुपण पुढील सामासांत केलें आहें,श्रोत्यांनी क्रमाक्रमाने ते सर्व ऐकावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गुरुनिश्चयेनाम समास पहिला ॥१॥**

## समास दुसरा : गुरुलक्षण ॥ श्रीराम् ॥

जे करामती दाखविती । तेहि गुरु म्हणिजेती । परंतु सद्‌गुरु नव्हेती । मोक्षदाते ॥ १॥

( करामती - विलक्षण क्रिया )

अद्भुत चमत्कार दाखविणांरासही  करामती दाखवून रंजन करणा-यासही गुरु म्हणतात,पण ते मोक्ष देणारे सद्गुरु नव्हेत.

सभामोहन भुररीं चेटकें । साबरमंत्र कौटालें अनेकें । नाना चमत्कार कौतुकें । असंभाव्य सांगती ॥२॥

( भुररीं - भुरळ घालणे )

सभा मोडून टाकणें,सभेची नजरबंदी करणें,भुरळ घालणें,चेटुक (चेंडीं-चेटकें) करणें,शाबरीमंत्र अशा अनेक,कौटाळांच्या योगानें अनेक असंभवनीय चमत्काराच्या व कौतुकाच्या गोष्टी सांगतात.

सांगती औषधीप्रयोग । कां सुवर्णधातूचा मार्ग । दृष्टिबंधनें लागवेग । अभिळाषाचा ॥ ३॥

( सुवर्णधातूचा मार्ग - इतर धातूपासून सोने बनविण्याची रीत , दृष्टिबंधनें - नजरबंदी करून त्वरित इच्छा पूर्तीचा मार्ग )

औषधींचे प्रयोग,सोंने करण्याचा मार्ग-सोन्याची धातु बनविण्याचा उपाय,नजरबंदी-नुसत्या द्दष्टीनें इच्छीत वस्तु प्राप्त करुन घेण्याचा शीघ्र मार्ग सांगतात.

साहित संगीत रागज्ञान । गीत नृत्य तान मान । नाना वाद्यें सिकविती जन । तेहि येक गुरु ॥४॥

(साहित्य) अलंकारशास्त्र,संगीतशास्त्र,रागरागिण्यांचे ज्ञान,गायन,नृत्य,तालसूर,अनेक प्रकारचीं वाद्यें इत्यादि जें लोक शिकवतात ते ही गुरु होत.

विद्या सिकविती पंचाक्षरी । ताडेतोडे नानापरी । कां पोट भरे जयावरी । ते विद्या सिकविती ॥५॥

पंचाक्षरी (पिशाच्ये काढण्यांची) विद्या,अनेक प्रकारचे(ताडे-तोडगे)तात्पर्य,पोट भर विद्या शिकवितात.नाना व्यापार शिकविणारे गुरु बहुत आहेंत.

जो यातीचा जो व्यापार । सिकविती भरावया उदर । तेहि गुरु परी साचार- । सद्गुरु नव्हेती ॥ ६॥

( साचार - खरा )

ज्या जातीचा जो व्यापार असेल तो पोट भरण्यासाठी शिकवितात.ते ही गुरू पण ते खरोखर सद्गुरु नव्हेत.(मोक्षदाता सद्गुरु ह्या सर्वांहुन अगदी वेगळा आहे.)

आपली माता आणी पिता । तेहि गुरुचि तत्वतां । परी पैलापार पावविता । तो सद्गुरु वेगळा ॥७॥

फार काय ?आपले आईबाप हे ही वास्तविक गुरुच,पण भवसागराच्या पैलतीरास नेणारा सद्गुरुं वेगळाच.

गाईत्रीमंत्राचा उचारू । सांगे तो साचार कुळगुरु । परी ज्ञानेंविण पैलपारु । पाविजेत नाहीं ॥ ८॥

गायत्रीमंत्राचा उच्चार सांगणारा तो कुलगुरुही गुरु खरा,पण आत्मज्ञानाशिवाय संसार-समुद्रांतून पलीकडे जाता येत नाहीं ( पण भवपार नेणारे ज्ञानदाते सद्गुरु निराळे आहेंत)

जो ब्रह्मज्ञान उपदेसी । अज्ञानांधारें निरसी । जीवात्मयां परमात्मयांसी । ऐक्यता करी ॥ ९॥

आंता सद्गुरु ओळखण्यांची खूण सागतों,जो ब्रह्मज्ञानाचा उपदेश करुन अज्ञान-(अविद्या-)रुप अंधकाराचा नाश करतो आणि जीवात्म्याचें परमात्म्याशीं ऐक्य करतों,

विघडले देव आणी भक्त । जीवशिवपणें द्वैत । तया देवभक्तां येकांत- । करी, तो सद्गुरु ॥१०॥

( विघडले देव आणी भक्त - देव आणी भक्त यांचा वियोग )

जीवपणा व शिवपणा असें द्वैत उत्पन्न होऊन देव व भक्त ह्यांचा बिघाड (वेगळेपणा) झाला आहे तो काढून टाकून देवभक्तांचे ऐक्य करतो तो सदगुरु होय.

भवव्याघ्रें घालूनि उडी । गोवत्सास तडातोडी । केली, देखोनि सीघ्र सोडी । तो सद्गुरु जाणावा ॥११॥

( भवव्याघ्रें - संसाररुपी वाघ )

संसाररुप व्याघ्राने उडी टाकून देवरुपी गाय व भक्तरुपीं वासरुं ह्यामध्ये ताटातूट केली आहे असे पाहून जो त्यांची सुटका करतो तो सद्गुरु जाणावा.(भवव्याघ्राने मध्येच उडी घालून जीव वत्साला भिववून शिवस्वरुप गायींपासून दूर केलें असतां त्यांची गाठ घालून देणारा सद्गुरु होय.)

प्राणी मायाजाळीं पडिलें । संसारदुःखें दुःखवलें । ऐसें जेणें मुक्त केलें । तो सद्गुरु जाणावा ॥ १२॥

मायाजाळांत गुरफटलेले,संसारदु:खाने गांजलेले अशा प्राण्यांची जो मुक्तता करतो तो सद्गुरु होय.

वासनानदीमाहांपुरीं । प्राणी बुडतां ग्लांती करी । तेथें उडी घालूनि तारी । तो सद्‌गुरु जाणावा ॥ १३॥

( ग्लांती - गटांगळ्या खाणे )

वासनारुपी नदीच्या महापुरांत सापडून बुडत असतां जो प्राणी गयावया करतो (गटांगळ्या खात असतो) त्यामुळें दीन झालेल्या जीवास त्यांत (महापुरांत) उडी टाकून जो तारतो तो सदगुरु.

गर्भवास अति सांकडी । इछाबंधनाची बेडी । ज्ञान देऊन सीघ्र सोडी । तो सद्‌गुरु स्वामी ॥ १४॥

अत्यंत अडचणीचा गर्भवास व इच्छारुप बंधनाची बेडी ह्यांतून जो आत्मज्ञान देऊन तात्काळ सोडवितो तो सदगुरू समजावा (गर्भवासाच्या दु:खापासून नानाविध वासंनाच्या मागें लागून घाबरलेल्या जीवांस ज्ञान देऊन सद्गुरु बंधमुक्त करितात)

फोडूनि शब्दाचें अंतर । वस्तु दाखवी निजसार । तोचि गुरु माहेर । अनाथांचें ॥ १५॥

(परमात्मनिदर्शक अशा संकेत-) शब्दांच्या अर्थाची फोड करुन सारभूत अशी आत्मवस्तु दाखवितो तोच अनाथांचे माहेर-मायबाप असा सद्गुरु होय.

जीव येकदेसी बापुडें । तयास ब्रह्मचि करी रोकडें । फेडी संसारसांकडे । वचनमात्रें ॥ १६॥

( सांकडे - संकट )

एकदेशीपणाच्या कल्पनेनें दीन झालेल्या जीवांचे संसाररुप संकट केवळ शब्दांनीच नाहीसे करुन-जीवांस "तत्वमसि" ह्या महावाक्याचें रहस्य पटवून-साक्षात् ब्रह्मरुप करुन सोडतो-ब्रह्मरुपता देणारा-तो सद्गुरु होय.

जें वेदांचे अभ्यांतरीं । तें काढून अपत्यापरी । शिष्यश्रवणीं कवळ भरी । उद्‌गारवचनें ॥ १७॥

वेदांच्या अंतरंगात गूढ असलेल्या परमामृताचे घांस आपल्या वचनांनें लेंकरांप्रमाणे शिष्याचे कानांत (सद्गुरु)भरवितात.(वेंदांच्या अंतरंगात गूढ असलेल्या परमामृताचें शिष्याला वचनमात्रानें पान करविणारे सद्गुरुवाचून दुसरे कोण आहेत ?)

वेद शास्त्र माहानुभाव । पाहातां येकचि अनुभव । तोचि येक गुरुराव । ऐक्यरूपें ॥ १८॥

वेदं शास्त्रे व संत यांचा अनुभव पाहू गेले असतां एकच आहे, व त्या अनुभवाशीं ऐक्य करुन देणारा तोच एक गुरुराज होय.

संदेह निःशेष जाळी ॥ स्वधर्म आदरें प्रतिपाळी । वेदविरहित टवाळी । करूंच नेणे ॥ १९॥

( वेदविरहित टवाळी - आत्मज्ञानाशिवाय मिथ्या बोलणे करत नाही )

सद्गुरु संशय अजिबात जाळून टाकतात.स्वतः स्वधर्माचे प्रतिपालन आदरपूर्वक करतात आणि वेदबाह्य बाष्कळपणा करण्याचें त्यांस माहीत नसतें (असें श्रीगुरुंचें आचरण असतें.)

जें जें मन अंगिकारी । तें तें स्वयें मुक्त करी । तो गुरु नव्हे, भिकारी- । झडे आला ॥ २०॥

ज्या ज्या (शास्त्रबाह्य) गोष्टींकडे मन धावतें त्या मोकाट करतो (काहींच धरबंध ठेवीत नाही.)-शास्त्र बाजूला ठेवून तसें मोकाट वागणारा-तो गुरु नव्हे,तर भिका-याची धाडच आली (तो विषयलालची भिकारी होय.)

शिष्यास न लविती साधन।न करविती इंद्रियेंदमन ।ऐसे गुरु आडक्याचे तीन ।मिळाले तरी त्यजावे ॥२१॥

जे शिष्याला शमदमादि साधनें करण्यास सांगत नाहींत,त्याजकडून इंद्रियनिग्रह करवीत नाहींत,असलें गुरु पैशाला तीन मिळाले तरी टाकावे!

जो कोणी ज्ञान बोधी । समूळ अविद्या छेदी । इंद्रियेंदमन प्रतिपादी । तो सद्गुरु जाणावा ॥ २२॥

जो कोणी आत्मज्ञानाचा बोध करुन अविद्या समूळ नाहींशी करतो व इंद्रियांचा निग्रह करावयास लावतो तोच सद्गुरु होय.

येक द्रव्याचे विकिले । येक शिष्याचे आखिले । अतिदुराशेनें केले । दीनरूप ॥ २३॥

( विकिले - लाचार , आखिले - आधीन, अतिदुराशेनें - अतिवासनेच्या आहारी गेल्याने )

कोणी द्रव्याला विकलेले असतात,कोणी शिष्याचे अंकित झालेले (आखिले) असतात,(विषयादिकांच्या) दुराशेंनें (ते गुरु) अगदीं केविलवाणे झालेले असतात.

जें जें रुचे शिष्यामनीं । तैसीच करी मनधरणी । ऐसी कामना पापिणी । पडली गळां । २४॥

त्यामुळें शिष्याच्या मनाला जें जें आवडतें तशाच प्रकारें (त्याची) मर्जी सांभाळण्याकरितां बोलतात (वागतात).अशा प्रकारें ही दुराशारुपी चांडाळीण अशा गुरुंच्या गळ्यांत पडते.

जो गुरु भीडसारु । तो अद्धमाहून अद्धम थोरु । चोरटा मंद पामरु । द्रव्यभोंदु ॥ २५॥

( भीडसारु - आग्रहास बळी पडणारा )

(शिष्याची) भीड धरणारा (भीडसारु) गुरु अधमांपेक्षाही अधम होय. थो चोरटा,मैंद,क्षुद्र व द्रव्यभोंदूच होय.

जैसा वैद्य दुराचारी । केली सर्वस्वें बोहरी । आणी सेखीं भीड करी । घातघेणा ॥ २६॥

( बोहरी - नागविणे,लुबाडणे,राखरांगोळी करणे , सेखीं - शेवटी , घातघेणा - सर्वस्वी घात )

ज्याप्रमाणे दुराचारी वैद्य रोग्यांचे सर्वस्व नागवून अखेर भिडभिडेनेंच त्याच्या घातास-कारणीभूत होतो,तद्वत्

तैसा गुरु नसावा । जेणें अंतर पडे देवा । भीड करूनियां, गोवा- । घाली बंधनाचा ॥ २७॥

( गोवा बंधनाचा - देहबुद्धीच्या बंधनात )

अशा प्रकारचा गुरु नसावा की ज्यामुळे देवही अंतरतो व भिडेभिडेनें बंधनाच्या घोंटाळ्यांत पडावें लागते.

जेथें शुद्ध ब्रह्मज्ञान । आणी स्थूळ क्रियेचें साधन । तोचि सद्‌गुरु निधान । दाखवी डोळां ॥ २८॥

ज्यापाशीं शुध्द ब्रह्मज्ञान व बाह्य आचरणाचा साधनमार्गही स्वच्छ आहें,तोच सद्गुरु आत्मस्वरुपाच्या ठेव्याचें दर्शन करविण्यास समर्थ आहें (स्वसुखनिधान जें परब्रह्म त्यांशी ऐक्य करण्यास समर्थ आहें.)

देखणें दाखविती आदरें । मंत्र फुंकती कर्णद्‌वारें । इतुकेंच ज्ञान, तें पामरें।अंतरलीं भगवंता ॥२९॥

आदरपूर्वक भपका (द्दश्य चमत्कार)-बाहेरचा भपका (दैखणे) दाखवितात, किंवा कानांत मंत्र फुंकतात एवढेच ज्यांचे ज्ञान तीं बिचारी (गुरुशिष्य) देवाला अंतरतात.

बाणे तिहींची खूण । तोचि गुरु सुलक्षण । तेथेंचि रिघावें शरण । अत्यादरें मुमुक्षें ॥ ३०॥

( बाणे तिहींची खूण - शास्त्रप्रचिती,गुरुप्रचिती,आत्मप्रचिती यांचा संगम ती सद्‌गुरूंची खुण )

म्हणून आत्मशास्त्र-गुरुप्रचीति व आत्मप्रचीति ह्या तिहींचा अनुभव ज्याच्या ठिकांणी बाणलेला असतो-तीनही प्रचीति ज्याच्या ठिकाणी ऐक्य पावलेल्या आहेत,तोंच गुरु उत्तम होय,अशालाच मुमुक्षूने आदरपूर्वक शरण जावे.

अद्‌वैतनिरूपणीं अगाध वक्ता । परी विषईं लोलंगता । ऐसिया गुरूचेनि सार्थकता । होणार नाहीं ॥ ३१॥

अद्वैताचे निरुपण करण्यांत मोठा दांडगा वक्ता असतो पण चित्त मात्र विषयासक्त आहे अशा सद्गुरुमुळे सार्थक होणार नाही.

जैसा निरूपणसमयो । तैसेंचि मनहि करी वायो । कृतबुद्धीचा जयो । जालाच नाहीं ॥ ३२॥

( तैसेंचि मनहि करी वायो - प्रसंगानुरूप मनात वायफळ कल्पना येतात , कृत - आत्म )

आत्मसंबंधानें (अनुभव नसल्यामुळें) स्वतःचा निश्चय काहीच झाला नसल्यामुळें जसाजसा निरुपणांत विषय येईल तसेतसे आपले मन विनाकारण पालटीत जातो.(प्रसंग येईल तसे मन लाचार-वायो-करुन आवडेलसें निरुपण करणारा व स्वतः निश्चयरुप न झालेला गुरु कामाचा नाही.)

निरूपणीं सामर्थ्य सिद्धी । श्रवण होतां दुराशा बाधी । नाना चमत्कारें बुद्धी । दंडळूं लागे ॥ ३३॥

( दंडळूं - डळमळू )

निरुपणप्रसंगीं सिध्दि व सामर्थ्य ह्यांचे वर्णन ऐकिलें कीं दुराशेची बाधा होते,(आणि) (सिध्दिच्या) अनेक चमत्कारांमुळें बुध्दि (आत्मनिश्र्चयापासून) डळमळूं लागते. (निरुपण-सामर्थ्य व वक्तृत्व शक्ति अप्रतिम आहें. पण साधुसंतांचे चमत्कार करण्याची सामर्थ्यसिध्दि मला कधीं प्राप्त होईल अशा आशेने भरलेला व त्यामुळे मन अस्वस्थ झालेला गुरु उपयोगाचा नाही.)

पूर्वी ज्ञाते विरक्त भक्त । तयांसि सादृश्य भगवंत । आणी सामर्थ्यहि अद्भुत । सिद्धीचेनि योगें ॥३४॥

पूर्वी भगवंताच्या बरोबरीचे असे मोठमोठे ज्ञानी, व वैराग्यशील भक्त होऊन गेले त्यांच्या ठिकाणी सिध्दीच्या योगाने अद्भुत सामर्थ्य सुध्दा होतें.(सिध्दिचमत्कार करण्याचें सामर्थ्य होते)

ऐसें तयांचें सामर्थ्य । आमुचें ज्ञानचि नुसदें वेर्थ । ऐसा सामर्थ्याचा स्वार्थ । अंतरीं वसे ॥ ३५॥

असें त्यांचे सामर्थ्य होतें आणि आमचें पोकळ ज्ञान व्यर्थ होय,कारण ह्याची पाहिजे तशी दुस-यावर छाप बसत नाहीं,अशाप्रकारें सामर्थ्याचा स्वार्थ अंतःकरणांत (गुप्त) असतो. त्याला (भगवतप्राप्ती होत नाहीं)

निशेष दुराशा तुटे । तरीच भगवंत भेटे । दुराशा धरिती ते वोखटे । शब्दज्ञाते कामिक ॥ ३६॥

( निशेष दुराशा - वासनेचा समूळ नाश )

ज्याच्या चिंत्तातून दुराशा निखालस नाहींशी होईल त्यालाच भगवंत भेटेल,जे दुराशा धरतात ते (खोटे,द्वाड) शाब्दिक ज्ञाते व लोभिष्ट होत.(दुराशा धरणारे शब्दज्ञाते कामिक गुरु काय कामाचे ?)

बहुत ज्ञातीं नागवलीं । कामनेनें वेडीं केलीं । कामना इच्छितांच मेलीं । बापुडीं मूर्खें ॥ ३७॥

(विषयलालसेच्या) इच्छेनें वेंडें केल्यामुळें पुष्कळ ज्ञानी माणसांची नागवणूक झाली आहें. मुर्ख बिचारी इच्छा धरुन कामनांचे चिंतन करता करताच-फुकट मेली आहेत.(जन्ममरणाच्या तडाक्यात सापडली आहेंत.)

नि:शेष कामनारहित । ऐसा तो विरुळा संत । अवघ्यांवेगळें मत । अक्षै ज्याचें ॥ ३८॥

पूर्ण निरीच्छ असा संत क्वचितच आढळावयाचा,त्यांचे मत नेंहमी सर्वांहुन-विषयी पामर जनांहून-अगदी वेंगळे असतें.(त्यांना देवावेगळी कसलीच लवमात्रही कामना नसते.)

अक्षै ठेवा सकळांचा । परी पांगडा फिटेना शरीराचा । तेणें मार्ग ईश्वराचा । चुकोनि जाती ॥ ३९॥

( पांगडा - ममत्व )

परमात्मस्वरुपाचा ठेवा सर्वकाळ सर्वांच्या जवळच आहें,पण(जीवांच्यामागे लागलेला),देहाचा (देहबुध्दीचा) पराधीनपणा (पांगडा-ममत्व) न सुटल्यामुळें (साधक) परमार्थाचा मार्ग चुकतात.(देवाचा मार्ग चुकून भलतीकडे जातात.हे विरळ संत मात्र अक्षय निजधन सांभाळून असतात,म्हणून गुरुत्वाचे अधिकारी हेच होत.)

सिद्धि आणी सामर्थ्य जालें । सामर्थ्यें देहास महत्त्व आलें । तेणें वेंचाड वळकावलें । देहबुद्धीचें ॥ ४०॥

( वेंचाड - अहंकार (देहाबुधीचा) )

सिध्दीनें सामर्थ्य येते व सामथ्याने (फार तर),देहांचे महत्व वाढतें व त्यामुळें देहबुध्दीचें (मी देह अशा भावनेचें) जुंबाड(बेंचाड-जाळें) अधिक बळकट होत जातें,

सांडूनि अक्षै सुख । सामर्थ्य इछिती ते मूर्ख । कामनेसारिखें दुःख । आणीक कांहींच नाहीं ॥ ४१॥

शाश्वत (निज) सुख सोडून सामर्थ्याची इच्छा करणारे मूर्ख होत.इच्छेसारखें दुसरें कोणतेंही दुःख नाहीं.(कामना ही दुःखाचे कोठार आहे,कामनेसारखे दुःख कोणतेच नाही)

ईश्वरेंविण जे कामना । तेणींचि गुणें नाना यातना । पावती, होती पतना । वरपडे प्राणी ॥ ४२॥

ईश्र्वराच्या प्राप्तीच्या इच्छेशिवाय जी जी (दुसरी)इच्छा धरावी,तिजमुळे प्राण्यंास अनेक यातना होऊन त्यांचे अधःपतन होतें,(कामना ईश्र्वराचीच धरावी,अन्यविषयक कामना यातना मात्र देतात व प्राणी पतनाला प्राप्त-वरपडे होतात.)

होतां शरीरासी अंत । सामर्थ्यहि निघोन जात । सेखीं अंतरला भगवंत । कामनागुणें ॥ ४३॥

शरीर संपले की त्याबरोबरच सामर्थ्यही निघून जाते आणि कामनेमुळे शेवटी (सेखी) देवही अंतरतो.(सामर्थ्य मोठ्या अट्टाहासाने मिळविले तरी देहाचा अंत होतांच सामर्थ्यही निघून जाते व कामनेमुळे हा देवाला मात्र अंतरतो.

म्हणोनि निःकामताविचारु । दृढबुद्धीचा निर्धारु । तोचि सद्गुरु पैलपारु । पाववी भवाचा ॥ ४४॥

ताप्तर्य,निष्कामता पूर्ण बाणलेला व आत्मबुध्दि दृढ असलेलाच पुरुष सद्गुरु होय व तोच संसारसमुद्र उतरुन नेईल.

मुख्य सद्गुरूचें लक्षण । आधीं पाहिजे विमळ ज्ञान । निश्चयाचें समाधान । स्वरूपस्थिती ॥ ४५॥

सद्गुरुचे मुख्य लक्षण हे आहें की त्याच्याजवळ प्रथम शुध्दज्ञान असते,तसेंच आत्मनिश्र्चयजन्य समाधान व अखंड स्वरुपकारताही असते.

याहीवरी वैराग्य प्रबळ । वृत्ति उदास केवळ । विशेष आचारें निर्मळ । स्वधर्मविषईं ॥ ४६॥

ह्याशिवाय त्यांचे वैराग्य कडकडीत असतें,त्याची वृत्ति पूर्ण उदास-कामनारहित-(अनासक्त) असते. विशेषतः स्वधर्माचा आचार तो निर्मळपणे पाळतो.

याहिवरी अध्यात्मश्रवण । हरिकथा निरूपण । जेथें परमार्थविवरण । निरंतर ॥ ४७॥

ह्याखेरीज त्याच्याजवळ-सद्गुरुसन्निध-अध्यात्मश्रवण,हरिकथानिरुपण (सगुणलीलांचे श्रवण व अध्यात्माचें विवरण म्ह.परमार्थाचे विवरणच होत असतें.)

जेथें सारासारविचार । तेथें होये जगोद्धार । नवविधा भक्तीचा आधार । बहुता जनासी ॥ ४८॥

ज्याच्या ठिकाणीं सारासार विचार चालतो त्या ठिकाणीं लोकांना उध्दाराचा मार्ग सापडतों आणि नवविधाभक्तीच्या योंगानें बहुत जन उध्दरतात.

म्हणोनि नवविधा भजन । जेथें प्रतिष्ठलें साधन । हें सद्गुरूचें लक्षण । श्रोतीं वोळखावें ॥ ४९॥

म्हणून ज्या ठिकाणीं नववीधाभजन असतें व स्वरुपस्थितीचा साधनमार्ग सांभाळला जातो,तेच सद्गुरुचे लक्षण श्रोत्यांनी ओळखावे.

अंतरीं शुद्ध ब्रह्मज्ञान । बाह्य निष्ठेचें भजन । तेथें बहु भक्त जन । विश्रांति पावती ॥ ५०॥

अंतःकरण शुध्दब्रह्मज्ञानाने रंगलेले व बाहेर निष्ठापूर्वक भजन,म्हणजे क्रिया व ज्ञान ह्या दोहींचा जेथे मिलाफ होतो,तेथेच अनेक भक्तभाविकांना विश्रांति मिळते.

नाहीं उपासनेचा आधार । तो परमार्थ निराधार । कर्मेंविण अनाचार । भ्रष्ट होती ॥ ५१॥

ज्या परमार्थाला उपासनेचा आधार नाही तो निराधार होय,तसेच (ज्या परमार्थात) सत्कर्माचरण नसेल तेथे अनाचार,भ्रष्टपणा माजतो.(अनाचार माजुन प्राणी भ्रष्ट होतात)

म्हणोनि ज्ञान वैराग्य आणि भजन । स्वधर्मकर्म आणि साधन । कथा निरूपण श्रवण मनन । नीति न्याये मर्यादा ॥ ५२॥ यामधें येक उणें असे । तेणें तें विलक्षण दिसे । म्हणौन सर्वहि विलसे । सद्गुरुपासीं ॥ ५३॥

म्हणून सद्गुरुंच्याजवळ शुध्द आत्मज्ञान,(धगधगीत) वैराग्य,निष्ठेने भजन,स्वधर्माचरण,(शमदमादी-) साधन,सगुणकथा व अध्यात्मनिरुपण (स्वतःकरणें व) ह्यांचे श्रवणमनन करणें,न्यायनिति-मर्यादेचें वर्तन हे सर्व प्रकार असतात.त्यांत एखादे कमी असेल तर तितका न्यूनपणाच होय-तो परमार्थ तेवढ्यानेच चमत्कारिक दिसेल.

तो बहुतांचें पाळणकर्ता । त्यास बहुतांची असे चिंता । नाना साधनें समर्था । सद्गुरुपासीं ॥ ५४॥

समर्थ सदगुरु हे अनेकांचे पालन करणारे असतात,व त्यांस अनेकांची काळजी असते,म्हणून (शिष्यांच्या अधिकारांप्रमाणे त्यांना मार्ग दाखविण्याचीं) त्यांच्याजवळ अनेक साधनें असतात.

साधनेंविण परमार्थ प्रतिष्ठे । तो मागुतां सवेंच भ्रष्टे । याकारणे दुरीद्रष्टे । माहानुभाव ॥ ५५॥

साधनांवांचून परमार्थाची मांडणी केली तर तो परमार्थ तितकाच लवकर मोडून जातो-तेथें तात्काळ भ्रष्टाचार माजतो,म्हणून महानुभाव,मोठे अनुभवी ज्ञाते,दूरद्दष्टीने वागतात.(दूरदर्शीप्रमाणे सर्व साधनें जवळ ठेवतात.)

आचार उपासना सोडिती । ते भ्रष्ट अभक्त दिसती । जळो तयांची महंती । कोण पुसे ॥ ५६॥

जे स्वधर्माचा आचार व उपासना सोडतात व परमार्थाची प्रतिष्ठा करु पाहातात ते भ्रष्ट व अभक्त असतात त्यांच्या महतीस आग लागो! कोण (जाणता) त्यांना विचारतो ?ती महंती तृच्छ होय.

कर्म उपासनेचा अभाव । तेथें भकाधेसि जाला ठाव । तो कानकोंडा समुदाव । प्रपंची हांसती ॥ ५७॥

( भकाधेसि - बहकण्यास , कानकोंडा - ओशाळवाणा,मिंधा )

कर्म व उपासना नसलीं की तेथे बहकण्यास (भकाधेसि) सुरवात होते.(असला परमार्थाचा) समुदाय जगात लाजिरवाणा (कानकोंडा-चोरटा) होतो,त्याचा प्रापंचिक लोकसुध्दा उपहास करतात.(अशा सांप्रदायास प्रपंची जनही तृच्छतेने हंसतात व मग हे सांप्रदयी कानकोंडे होऊन राहातात.)

नीच यातीचा गुरु । तोही कानकोंड विचारु । ब्रह्मसभेस जैसा चोरू । तैसा दडे ॥ ५८॥

हलक्या जातीचा गुरुकेल्यास त्यातही लाजिरवांणे होते,कारण त्यामुळें (अशा गुरुला ब्रह्मसभेत) उच्चवर्णाच्या सभेंत चोरट्यासारखे लपून बसावे लागतें.(-अशा गुरुला ब्रह्मसभेस उजळ माथ्याने जाता येत नाही.हा चोरासारखा अंग चोरीतच जातो).

ब्रह्मसभे देखतां । त्याचें तीर्थ नये घेतां । अथवा प्रसाद सेवितां । प्राश्र्चित पडे ॥ ५९॥

उच्च(स्व)वर्णाच्या लोकांदेखत त्या गुरुचे तीर्थ घेता येत नाही. किंवा त्याचा प्रसाद भक्षण करितां येत नाही,केल्यास प्रायश्र्चित्त घ्यावे लागतें.

तीर्थप्रसादाची सांडी केली । तेथें नीचता दिसोन आली । गुरुभक्ति ते सटवली । येकायेकी ॥ ६०॥

( सटवली - क्षय पावली )

(असल्या गुरुचा) तीर्थ-प्रसाद टाकावा तर (गुरुभक्तीला) कमीपणा दिसून येतो अशा रीतीने गुरुभक्ति उत्पन्न होते न होते तोंच एक मरुन जाते (सटवते)(तीर्थप्रसाद न घेतल्यास गुरुची निचता शिष्यांनी प्रकट केली,असे होऊन गुरुभक्तीचा क्षय होतो व घेतल्यास ब्राह्मणक्षोभ होतो.

गुरुची मर्यादा राखतां । ब्राह्मण क्षोभती तत्वतां । तेथें ब्राह्मण्य रक्षूं जातां । गुरुक्षोभ घडे ॥ ६१॥

गुरुची मर्यादा राखावयाला जावे तर ब्राह्मण रागावतात व आपल्या ब्राह्मण्याचे रक्षण करु पाहावें तर गुरुचा क्षोभ होतो.

ऐसीं सांकडीं दोहींकडे । तेथें प्रस्तावा घडे । नीच यातीस गुरुत्व न घडे । याकारणें ॥ ६२॥

असें दोन्हीकडून संकट पडल्यामुळे पश्र्चाताप करीत बसावें लागतें,ह्यासाठी आपल्यापेक्षा नीच जातीच्या माणसाला गुरु करु नये.

तथापि आवडी घेतली जीवें । तरी आपणचि भ्रष्टावें । बहुत जनांसी भ्रष्टवावें । हें तों दूषणचि कीं ॥६३॥

तथापि,(हलक्या जातीचा गुरु करण्याची एखाद्याला) उत्कंठा असली तर त्यानें एकट्यानें भ्रष्टावे,अनेक लोकांना भ्रष्ट करणें हा दोषच आहे.

आतां असो हा विचारू । स्वयातीचा पाहिजे गुरु । नाहीं तरी भ्रष्टाकारु । नेमस्त घडे ॥ ६४॥

असो.(ब्राह्मणानें) आपल्याच जातीचा गुरु करावा,नाहीतर निश्चये करुन भ्रष्टाकार होईल.

जे जे कांहीं उत्तम गुण ॥ तें तें सद्गुरूचें लक्षण । तथापि संगों वोळखण । होये जेणें ॥ ६५॥

जे जे म्हणून उत्तम गुण आहेत तेंच ते सद्गुरुचे लक्षण होय.तथापि जेणेंकरुन त्यांची ओळख पटेल अशी लक्षणें सांगू (सर्व उत्तम गुणांचा आगर सद्गुरुच होय,नुसते गुरु अनेक असतात सामान्यतः १७ प्रकारचे गुरु आहेतः)

येक गुरु येक मंत्रगुरु । येक यंत्रगुरु येक तांत्रगुरु । येक वस्तादगुरु येक राजगुरु । म्हणती जनीं ॥ ६६॥

एक गुरु (अक्षरओळख करुन देणारा), एक मंत्र गायत्री वगैरे देणारा गुरु (गायत्री मंत्र किंवा रामकृष्णादि नाममंत्र सांगणारा गुरू),एक यंत्र-यांत्रिक (सांगणारा) गुरु (यंत्रविद्या सुतारकामादि शिकविणारा गुरु),एक तंत्र (सांगणारा)(तांत्रिक यंत्रातील क्रियाकलापादि शिकविणारा) गुरु,एक वस्ताद-मल्ल -गुरु,एक राजगुरु (राजा प्रजांचा पिता ह्या दृष्टीने राजगुरु हा सर्वांचा गुरु होय)

येक कुळगुरु येक मानिला गुरु । येक विद्यागुरु येक कुविद्यागुरु । येक असद्गुरु येक यातिगुरु । दंडकर्ते ॥ ६७॥

एक कुळगुरु (कुळाचे उपाध्याय),एक मानलेला गुरु (आपल्या बुध्दीने एकलव्याने द्रोणाचार्यांस गुरु मानले तसा),विद्यागुरु (शब्दशास्त्र शिकविणारा),एक कुविद्या (साबरी मंत्रादि) देणारा गुरु,एक असद्गुरु (कुमार्गाला लावणारा), एक जातीला दंड करणारा गुरु (जातिपंचायतीचा अध्यक्ष सरपंच).

येक मातागुरु येक पितागुरु । येक राजागुरु येक देवगुरु । येक बोलिजे जगद्गुरु । सकळकळा ॥ ६८॥

एक माता-गुरु,एक पिता-गुरु (राजा हाच गुरु),एक देव(गुरु) तसेच एक सर्वकलासंपन्न जगद्गुरु (शंकराचार्यांसारखा).

ऐसे हे सत्रा गुरु । याहिवेगळे आणीक गुरु । ऐक तयांचा विचारु । सांगिजेल ॥ ६९॥

असे सतरा गुरु आहेत,ह्याशिवाय आणखी गुरु आहेत तेही सागतों,

येक स्वप्नगुरु येक दीक्षागुरु । येक म्हणती प्रतिमागुरु । येक म्हणती स्वयें गुरु । आपला आपण ॥ ७०॥

एक स्वप्नांत उपदेश देणारा (किंवा स्वप्नांचा अर्थ सांगणारा) गुरु असतो,तसाच एक सांप्रदायिक दीक्षा देणारा गुरु असतो,कोणी प्रतिमेलाच गुरु म्हणतात,एक म्हणतो,“आमचे आम्हीच गुरु आहोत“ !

जे जे यातीचा जो व्यापारु । ते ते त्याचे तितुके गुरु । याचा पाहातां विचारु । उदंड आहे ॥ ७१॥

ज्या ज्या जातीचा जो जो धंदा असतो तो तो शिकविणाराही गुरुच,अर्थात जितके धंदे तितके गुरु,हे पहावयास लागले तर पुष्कळच आहेत,

असो ऐसे उदंड गुरु । नाना मतांचा विचारु । परी जो मोक्षदाता सद्गुरु । तो वेगळाचि असे ॥ ७२॥

निरनिराळ्या मतांचा विचार पाहिला तर असे अनेक गुरु आहेत. पण मोक्ष देणारा सद्गुरु ह्या सर्वांहून निराळाच असतों,

नाना सद्विद्येचे गुण । याहिवरी कृपाळूपण । हें सद्गुरूचें लक्षण । जाणिजे श्रोतीं ॥ ७३॥

सद्वविद्येचे अनेक गुण असून शिवाय कृपाळुपणा हें सद्गुरुंचे लक्षण श्रोत्यांनी ध्यांनात ठेवावे (ज्याच्या आंगी सद्विद्येचे अनेक गुण असून जो शिष्यवत्सल आहे तोच सद्गुरु होय.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गुरुलक्षणनाम समास दुसरा ॥ २॥**

### समास तिसरा : शिष्यलक्षण ॥ श्रीराम् ॥

मागां सद्गुरूचें लक्षण । विशद केलें निरूपण । आतां सच्छिष्याची वोळखण । सावध ऐका ॥ १॥

मागे सद्गुरुचे लक्षण स्पष्ट करुन सांगितले आतां सच्छिष्यांची लक्षणे सावधपणे ऐका.

सद्गुरुविण सच्छिष्य । तो वायां जाय नि:शेष । कां सच्छिष्येंविण विशेष । सद्गुरु सिणे ॥२॥

सच्छिष्य असला तरी सद्गुरुवांचून तो अजिबात वाया जातो अथवा सच्छिष्यांवाचून सद्गुरुंनाही फार-त्रास शीण पडतो.

उत्तमभूमि शोधिली शुद्ध । तेथें बीज पेरिलें किडखाद । कां तें उत्तम बीज परी समंध । खडकेंसि पडिला ॥ ३॥

जमीन उत्तम,ती चांगली तयार करुन घेतली,पण तिच्यांत बी पेंरलें तें किडकें पेरलें,अथवा बीं उत्तम आहें पण तें खडकावर पडलें (तर जसे व्यर्थ),

तैसा सच्छिष्य तें सत्पात्र । परंतु गुरु सांगे मंत्र तंत्र । तेथें अरत्र ना परत्र । कांहिंच नाहीं ॥ ४॥

तसेच सच्छिष्य (परमार्थाचा) योग्य अधिकारी आहें पण गुरु त्याला क्षुद्र मंत्रतंत्र सांगू लागला तर त्या शिष्याला ना इहलोक ना परलोक,अशी दोहींकडून नागवण होईल.

अथवा गुरु पूर्ण कृपा करी । परी शिष्य अनाधिकारी । भाग्यपुरुषाचा भिकारी । पुत्र जैसा ॥ ५॥

अथवा सदगुरु पूर्ण कृपा करायला तयार आहेंत पण भाग्यपुरुषाचा पुत्र भिकारी निपजावा त्याप्रमाणें शिष्य पडला अनाधिकारी,तर ते ही व्यर्थ होय.

तैसें येकाविण येक । होत असे निरार्थक । परलोकींचें सार्थक । तें दुऱ्हावे ॥ ६॥

तसेंच सदगुरुवांचून सच्छिष्य किंवा सच्छिष्यावाचून सदगुरु असे हे एकांवाचून एक व्यर्थ होतात.परलोकीचे सार्थक तेथे दुरावते.

म्हणौनि सद्‌गुरु आणी सच्छिष्य । तेथें न लगती सायास । त्यां उभयतांचा हव्यास । पुरे येकसरा ॥ ७॥

म्हणून सद्गुरु व सच्छिष्य यांची जोड जमली कीं तेथें कष्ट न होतां त्या दोघांचेही सारे मनोरथ एकदम पूर्ण होतात.(दोन्ही एकत्र मिळाल्यावाचून परमार्थाची मौज नाही)

सुभूमि आणी उत्तम कण । उगवेना प्रजन्यैंविण । तैसें अध्यात्मनिरूपण । नस्तां होये ॥ ८॥

जमीन चांगली व बींही चागलें आहे,पण तें पावसाशिवाय उगवत नाहीं तसे सद्गुरु व सच्छिष्य आहेत.पण तेथें अध्यात्मनिरुपण नसेल तर काहीं उपयोग नाहीं.

सेत पेरिलें आणी उगवलें । परंतु निगेविण गेलें । साधनेंविण तैसें जालें । साधकांसी ॥ ९॥

चौथा विचार,शेतांत बी पेरलें,पाऊस पडून तें उगवलेंही पण त्याची निगा राखिली नाहीं,तर आलेलें पीक हातचें जाईल,त्याचप्रमाणें सद्गुरु,सच्छिष्य व अध्यात्मनिरुपण ही त्रयी जमून ब्रह्मज्ञानाचे पीक शिष्याच्या मनोभूमीवर उगवलें,परंतु शिष्यांने पुढे काहीं साधन केले नाही तर ब्रह्मज्ञानाचे उगवलेले पीक नाहीसे होईल.

जंवरी पीक आपणास भोगे । तंवरी अवघेंचि करणें लागे । पीक आलियांहि, उगें । राहोंचि नये ॥ १०॥

( उगें- - निवांत )

पीक आपल्या हातीं येईपर्यंत त्याचे (रक्षणांचे)सर्वच काम आपल्यास करावें लागतें,आणि पीक आल्यावरही स्वस्थ बसू नये.

तैसें आत्मज्ञान जालें । परी साधन पाहिजे केलें । येक वेळ उदंड जेविलें । तऱ्हीं सामग्री पाहिजे ॥ ११॥

तसे आत्मज्ञान झालें (समजलें) तरी अभ्यास (साधन) हा केलाच पाहिजे,एकदा आकंठ जेवण केलें तरी दुस-या वेळेसाठीं शिधा जवळ ठेविलाच पाहिजे.(पीक एकवार पदरांत पडल्यावरही हयगय करितां येत नाहीं,एकवार जेवण झालें तरी सामग्रीचा त्याग उचित नाहीं.)

म्हणौन साधन अभ्यास आणी सद्‌गुगु । सच्छिष्य आणी सच्छास्त्रविचारु । सत्कर्म सद्‌वासना, पारु । पाववी भवाचा ॥ १२॥

म्हणून स्वरुपानुसंधान (साधन),अंतर्मुखतेचा अभ्यास,सदगुरु,सछिष्य,सच्छास्त्र- विचार, वर्णाश्रमकर्म,शुध्दवासना हें सर्व संसाराच्या पार नेंते (ह्या सर्वांचा समुच्चय झाला तरच भवतरणोपाय सापडतो.)

सदुपासना सत्कर्म । सत्क्रिया आणी स्वधर्म । सत्संग आणी नित्य नेम । निरंतर ॥ १३॥

शुध्द (मूळपुरुषाची) उपासना,वर्णाश्रमोक्त कर्म,सदाचार,स्वधर्म संतसंग व नित्यनेम.

ऐसें हें अवघेंचि मिळे । तरीच विमळ ज्ञान निवळे । नाहीं तरी पाषांड संचरे बळें । समुदाईं ॥ १४॥

ह्या सहा गोष्टी एकत्र जमल्या-असें हे सगळेंच मिळालें तर शुध्दज्ञान उदय पांवते,नाहींतर समाजांत-समुदायांत-पाखंड मत जोरानें फैलावतें,

येथें शब्द नाहीं शिष्यासी । हें अवघें सद्गुरुपासीं । सद्गुरु पालटी अवगुणासी । नाना येत्नें करूनी ॥१५॥

ह्यांत शिष्यांकडे दोष नाहीं,हे सर्व सद्गुरुंवर अवलंबून आहे,कारण ते अनेक प्रयत्न करुन शिष्यांचे अवगुण नाहींसे करतात (शिष्यापेक्षा गुरुची जबाबदारी अधिक आहे.)

सद्गुरुचेनि असच्छिष्य पालटे ।परंतु सच्छिष्यें असद्गुरु न पालटे ।कां जें थोरपण तुटे ।म्हणौनिया ॥१६॥

असच्छिष्य असला तरी त्याला सद्गुरु सुधारतात.असच्छिष्य मात्र असद्गुरुला पालटू शकत नाहीत,कारण शिष्यामुळे गुरुमध्ये पालट झाला तर त्यांत गुरुचा कमीपणा होतो म्हणून.

याकरणें सद्गुरु पाहिजे । तरीच सन्मार्ग लाहिजे । नाहिं तरी होईजे । पाषांडा वरपडे ॥ १७॥

ह्यास्तव (खरे) सदगुरु पाहिजेत,तरच शिष्याला सन्मार्ग लागेल,नाहीतर तो पाखंडाच्या मार्गाकडें झुकण्याचा संभव असतो.

येथें सद्गुरुचि कारण । येर सर्व निःकारण । तथापि सांगो वोळखण । सच्छिष्याची ॥ १८॥

तात्पर्य,मुख्य गुरु चांगले पाहिजेत बाकी सर्व व्यर्थ होय.तथापि सच्छिच्यांचीं काहीं लक्षणे सांगतों,

मुख्य सच्छिष्याचें लक्षण । सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण । अनन्यभावें शरण । त्या नांव सच्छिष्य ॥१९॥

सच्छिष्यांचें मुख्य लक्षण हें कीं त्यांचा सद्गुरुंच्या वचनांवर पूर्ण विश्र्वास पाहिजें,सद्गुरुंला जो अनन्यभावानें शरण असतो त्याचेंच नाव सच्छिष्य.(त्याच्या आंगी सद्विद्येचे सर्व गुण असलें पहिजेत).

शिष्य पाहिजे निर्मळ । शिष्य पाहिजे आचारसीळ । शिष्य पाहिजे केवळ । विरक्त अनुतापी ॥ २०॥

शिष्य (मनाचा) निर्मळ व सदाचारसंपन्न,तसाच पूर्ण विरक्त व अनुतापी (संसारात आयुष्य गेले म्हणून पस्तावलेला),असा असावा.

शिष्य पाहिजे निष्ठावंत । शिष्य पाहिजे सुचिष्मंत । शिष्य पाहिजे नेमस्त । सर्वप्रकारीं ॥ २१॥

तो निष्ठावंत(अंर्तबाह्य) शुध्द व सर्व प्रकारें युक्त किंवा मर्यादेनें वागणारा नेमस्त (व्यवस्थित) असावा.

शिष्य पाहिजे साक्षपी विशेष । शिष्य पाहिजे परम दक्ष । शिष्य पाहिजे अलक्ष । लक्षी ऐसा ॥२२॥

( अलक्ष - ब्रह्म )

विशेष दीर्घोद्योगी (साक्षेपी-साधनाभ्यास करणारा),मोठा चतुर आणि अलक्ष्य जें परब्रह्म तें लक्षात आणील असा असावा.

शिष्य पाहिजे अति धीर । शिष्य पाहिजे अति उदार । शिष्य पाहिजे अति तत्पर । परमार्थविषईं ॥२३॥

शिष्य अत्यंत धैर्यवान उदार व परमार्थाविषयी आतुर-समुत्सक असावा.

शिष्य पाहिजे परोपकारी । शिष्य पाहिजे निर्मत्सरी । शिष्य पाहिजे अर्थांतरीं । प्रवेशकर्ता ॥२४॥

तो परोपकारी,निर्मत्सरी आणि अर्थग्रहण करण्याविषयीं कुशल-मनानें अर्थरहस्य काढणारा असावा.

शिष्य पाहिजे परम शुद्ध । शिष्य पाहिजे परम सावध । शिष्य पाहिजे अगाध । उत्तम गुणांचा ॥ २५॥

तो अत्यंत शुध्द व सावध,मोठा खोल व उत्कृष्ट गुणांचा असावा.

शिष्य पाहिजे प्रज्ञावंत । शिष्य पाहिजे प्रेमळ भक्त । शिष्य पाहिजे नीतिवंत । मर्यादेचा ॥ २६॥

तो प्रज्ञावंत,प्रेमळ भक्त,नीतिमान व मर्यादाशील असावा.

शिष्य पाहिजे युक्तिवंत । शिष्य पाहिजे बुद्धिवंत । शिष्य पाहिजे संतासंत । विचार घेता ॥ २७॥

( संतासंत - सत्सत , नित्यानित्य )

शिष्य युक्तिवान,बुध्दिमान व नित्यानित्याचा विचार जागरुक ठेवणारा असावा.

शिष्य पाहिजे धारिष्टाचा । शिष्य पाहिजे दृढ व्रताचा । शिष्य पाहिजे उत्तम कुळीचा । पुण्यसीळ ॥२८॥

तो धारिष्टवान,द्दढव्रताचा (अंगीकारलेलें व्रत द्दढनिश्र्चयाने पाळणारा) व उत्तम कुंळातील असून पुण्यवान पाहिजे.

शिष्य असावा सात्विक । शिष्य असावा भजक । शिष्य असावा साधक । साधनकर्ता ॥ २९॥

तो सात्विक वृत्तीचा,सेवा करणारा (भक्तिमान) व साधनांचा अभ्यास करणारा साधक असावा.

शिष्य असावा विश्वासी । शिष्य असावा कायाक्लेशी । शिष्य असावा परमार्थासी । वाढऊं जाणे ॥३०॥

शिष्य गुरुवाक्यांवर विश्र्वास ठेवणारा (गुरुंसाठीं किंवा परमार्थासाठी) मागेपुढें न पाहातां शरीर झिजविणारा,(कायाक्लेशी म्ह.शरीरकष्टाला न डरणारा) व परमार्थाची वाढ कशी करावी हें ज्यांस कळते असा असावा.

शिष्य असावा स्वतंत्र । शिष्य असावा जगमित्र । शिष्य असावा सत्पात्र । सर्व गुणें ॥ ३१॥

तो स्वतंत्र (गुरुहून दुस-या कोणाचा ताबेदार नसावा),जगमित्र आणि सर्व गुणांनी सत्पात्र असावा.

शिष्य असावा सद्विद्येचा । शिष्य असावा सद्भावाचा । शिष्य असावा अंतरींचा । परमशुद्ध ॥ ३२॥

तो सद्विद्येचा सद्भावाचा आणि अंतःकरणाचा अत्यंत शुध्द असावा.

शिष्य नसावा अविवेकी । शिष्य नसावा गर्भसुखी । शिष्य असावा संसारदुःखी । संतप्त देही ॥ ३३॥

( गर्भसुखी - गर्भश्रीमंत )

तो अविचारी व गर्भसुखी (गर्भश्रीमंत) नसावा,(सुखांत लोळावयाची संवय झालेला मनुष्य गुरुसेंवेत व नित्यनेंमात टिकावयाचा संभव कमी),तर संसारदुःखे भोगभोगुन अंतःकरणात पोळलेला-गांजलेला असावा.

जो संसारदुःखें दुःखवला । जो त्रिविधतापें पोळला । तोचि अधिकारी जाला । परमार्थविषीं ॥ ३४॥

संसारदुःखामुळे गांजलेला आणि त्रिविध तापांनी जो पोळलेला असेल तोच शिष्य परमार्थाला अधिकारी (योग्य) होतो.

बहु दुःख भोगिलें जेणें । तयासीच परमार्थ बाणे । संसारदुःखाचेनि गुणें । वैराग्य उपजे ॥ ३५॥

असें कां,तर ज्यानें अतोनात दुःख भोगिलें असेल,त्याच्याच आंगी खरा परमार्थ बाणेल,संसारदुःखाच्या योगाने त्याला वैराग्य उत्पन्न होतें.(वैराग्यावांचून अनन्य शरणागति होत नाहीं व ज्ञान टिकत नाहीं)

जया संसाराचा त्रास । तयासीच उपजे विस्वास । विस्वासबळें दृढ कास । धरिली सद्गुरूची ॥ ३६॥

ज्याला संसाराचा त्रास वाटतो त्याच्याच सद्गुरुंच्या ठिकाणीं विश्र्वास जडतो.आणि त्या विश्र्वासाच्या जोरावर तो सद्गुरुंची कांस बळकट धरतो.

अविस्वासें कास सोडिली । ऐसीं बहुतेक भवीं बुडालीं । नाना जळचरीं तोडिलीं । मध्येंचि सुखदुःखें ॥३७॥

अविश्र्वास व संशय ह्यामुळें ज्यांनी सदगुरुंचा त्याग केला असे बहुतेक लोक संसारातच गटांगळ्या खातात.सुखदुःखरुपी जळचरें त्यांस तोडतोडून घेतात.

याकारणें दृढ विस्वास । तोचि जाणावा सच्छिष्य । मोक्षाधिकारी विशेष । आग्रगण्यु ॥ ३८॥

ह्यास्तव (सदगुरुवर) द्दढविश्र्वास ठेवील तोच सच्छिष्य समजावा. सर्वांत अग्रगण्य व मोक्षाचा अधिकारी तोच होय.

जो सद्गुरुवचनें निवाला । तो सयोज्यतेचा आंखिला । सांसारसंगे पांगिला । न वचे कदा ॥३९॥

( सयोज्यतेचा आंखिला - सायुज्यमुक्तीसाठी लायक , आंखिला - चिन्हांकित झाला,निवडला, पांगिला - लोभिला , आसक्त कधीही लायक सत्शिष्य होत नाही.)

म्हणून सदगुरुंवचनीं विश्र्वास पूर्ण हे सच्छिष्यांचे मुख्य लक्षण सागितले आहें. सद्गुरुवर व त्याच्या वचनांवर पूर्ण विश्र्वास असेल तरच मोक्षाचा अधिकारी होऊन संसारदुःखांपासून सुटेल. ज्यास सद्गुरुवचनाने समाधान प्राप्त झालें त्यालाच सायुज्यमुक्ति निश्र्चित मिळते,संसाराच्या अडचणीच्या जाळ्यांत तो कधीं गुरफटत नाहीं.

सद्गुरुहून देव मोठा । जयास वाटे तो करंटा । सुटला वैभवाचा फांटा । सामरथ्यपिसें ॥ ४०॥

सद्गुरुपेक्षां देव मोठा आहे असे शिष्याला वाटते,तो करंटा होय.कां की त्याला (देवांच्या ठिकाणी वर्णिलेल्या)सामर्थ्याचा छंद लागून (त्याचा ख-या परमार्थाचा मार्ग सुटतो आणि) तो वैभवाच्या मार्गाला लागतो(व गुरुसेवेला मुकतो)

सद्गुरुस्वरूप तें संत । आणी देवांस मांडेल कल्पांत । तेथें कैचें उरेल सामर्थ्य । हरिहरांचें ॥ ४१॥

( मांडेल कल्पांत - कल्पांती नाश )

सद्गुरुस्वरुप (कालत्रयाबाधित असें) शाश्र्वत(संत)आहे,आणि हरीहरादि देव कल्पांतकाळीं मुळमायेत लीन होणारे आहेत(नाश पावणार),तेथे त्यांचे सामर्थ्य कोठून शिल्लक राहील ?(त्यांचे सामर्थ्यही अशाश्वत आहे)

म्हणौन सद्गुरुसामर्थ्य आधीक ।जेथें आटती ब्रह्मादिक । अल्पबुद्धी मानवी रंक ।तयांसि हें कळेना ॥ ४२॥

म्हणून सद्गुरुचे सामर्थ्य अधिक आहे,त्यांत (शुध्दब्रह्स्वरुपांत)(गुणमायेपासून झालेले)हरिहरब्रह्मादिक देव लोपून जातात (देव गुणमायेच्या पोटी झालेले असल्यामुळे व गुणमाया मूळमायेंत व मूळमाया शुध्द स्वरुपांत लीन होत असल्यामुळे शुध्द स्वरुप अनादि शाश्र्वत आहें व तेंच सद्गुरुचे स्वरुप आहे गरीब बिचा-या मतिमंद माणसाला ते कळत नाही.

गुरुदेवांस बराबरी- । करी तो शिष्य दुराचारी । भ्रांति बैसली अभ्यांतरीं । सिद्घांत नेणवे ॥ ४३॥

( भ्रांति बैसली अभ्यांतरीं - (सिद्धांताच्या अज्ञानामुळे) भ्रम अंतरंगात ठाण मांडून बसतो)

(सद्गुरुपेंक्षा देव मोठा नाही,इतकेच नव्हे तर) सद्गुरुच्या बरोबरीनें देवास कोणी शिष्य मानील तर तो शिष्य दुराचारी होय,त्याच्या अंतःकरणात भ्रांति घर करुन बसल्यामुळें (सर्व देवादिकांहून सद्गुरुच श्रेष्ठ असा वेदशास्त्रांचा)सिध्दांत त्यास समजत नाही,(त्यांचे चित्त भ्रांतिवश झाल्यामुळें त्यांना सत्यार्थांचे आकलन होत नाही.)

देव मनिषीं भाविला । मंत्रीं देवपणासि आला । सद्गुरु न वचे कल्पिला । ईश्वराचेनि ॥ ४४॥

इतर देव,मनुष्यांनी कल्पिलेले व मंत्रांनी देवपणाला आणिलेले असतात आणि सद्गुरुस्वरुप (निर्विकल्प असल्यामुळे देवाचा देव जो)ईश्वर(मूळमाया) यालाही कल्पितां येत नाहीं,(कां की ते निर्विकल्प आहे.)

म्हणौनि सद्गुरु पूर्णपणें । देवाहून आधीक कोटिगुणें । जयासि वर्णितां भांडणें । वेदशास्त्रीं लागलीं ॥ ४५॥

म्हणून सद्गुरु देवांपेक्षा कोटिपटींने अधिक व परिपूर्ण आहेत,त्यांचे वर्णन करताना वेदशास्त्रांची भांडणे लागलीं आहेत.( सद्गुरुचें स्वरुप वेदशास्त्रांसही वर्णवत नाहीं)

असो सद्गुरुपदापुढें । दुजें कांहींच न चढे । देवसामर्थ्य तें केवढें । मायाजनित ॥ ४६॥

असो, सद्गुरुपदाहून श्रेष्ठ असे दुसरे काहींच नाहीं,मायेपासुन झालेले देवांचे सामर्थ्य  सद्गुरुसामर्थ्यापुढे काय होय ?

अहो सद्गुरुकृपा जयासी । सामर्थ्य न चले तयापासीं । ज्ञानबळें वैभवासी । तृणतुछ केलें ॥४७॥

अहो,ज्यावर  सद्गुरुकृपा झाली आहे त्याच्यापुढें कोणाचेंही सामर्थ्य-बळ चालणार नाही,कारण ( सद्गरु सद्गुरुकृपाप्राप्त झालेला) तो शिष्य आत्मज्ञानाच्या बळावर सृष्टीतल्या सगळ्या वैभवाला कस्पटासमान मानतो.

अहो सद्गुरुकृपेचेनि बळें । अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें । मायेसहित ब्रह्मांड सगळें । दृष्टीस न यें ॥ ४८॥

( अपरोक्षज्ञानाचेनि उसाळें - मी ब्रह्म आहे याची अनुभूती मनात दृढ धरून स्वानंद ऊमळतो )

सद्गुरुकृपेच्या आश्रयानें आणि स्वस्वरुपाच्या अनुभवाच्या जोरावर उल्हासानें (सच्छिष्यांचे ऐश्र्वर्य अपरंपार वाढते कीं)तो सच्छिष्य मूळमायेसह सगळे ब्रह्मांड खातरजमेत धरीत नाहीं.

ऐसें सच्छिष्याचें वैभव । सद्गुरुवचनीं दृढ भाव । तेणें गुणें देवराव । स्वयेंचि होती ॥ ४९॥

असें सच्छिष्याचे वैभव असतें, सद्गुरुवचनांवर त्याचा दृढ विश्र्वास असल्यामुळें तो स्वतःच सद्गुरुस्वरुप (देवराव)होतो.

अंतरीं अनुतापें तापले । तेणें अंतर शुद्ध जालें । पुढें सद्गुरुवचनें निवाले । सच्छिष्य ऐसे ॥ ५०॥

प्रथम अनुतापाने तापल्यामुळे (सर्व वासनामल नाहीसे होऊन) अंतःकरण निर्मळ झाल्यावर,पुढे (सद्गुरुंना शरण जाऊन) त्यांच्या वचनांने निवळले असे सच्छिष्य.

लागतां सद्गुरुवचनपंथें । जालें ब्रह्मांड पालथें । तरी जयाच्या शुद्ध भावार्थें । पालट न धरिजे ॥ ५१॥

सद्गुरुंनी उपदेशिलेल्या मार्गानें जाऊ लागले म्हणजे ब्रह्मांड कोसळून पडलें तरी त्यांच्या शुध्द भावर्थात बदल होत नाही-त्यांचा विश्र्वास ढळत नाहीं.

शरण सद्‌गुरूस गेले । सच्छिष्य ऐसे निवडले । क्रियापालटें जाले । पावन ईश्वरीं ॥ ५२॥

( क्रियापालटें - सर्व आचार विचार बदलल्यामुळे )

सद्गुरुंना शरण गेल्यावर (वरील गुणांनी )सच्छिष्य म्हणून कसोटीस उतरले आणि त्यांच्या पूर्वक्रिया पालटून ईश्र्वराच्या ठिकाणीं-स्वरुपाकार पावन झाले.

ऐसा सद्भाव अंतरीं । तेचि मुक्तीचे वाटेकरी । येर माईक वेषधारी । असच्छिष्य ॥ ५३॥

( येर माईक - इतर सारे मायाबद्ध,ढोंगी )

असा सद्भाव ज्यांच्या अंतःकरणात असतो,तेच सायुज्य-मुक्तीचे वांटेकरी (हिस्सेकरी) होतात (असे शिष्य परम दुर्लभ होत.),इतर जे असतात ते लबाड,ढोगी असच्छिष्य होत. (इतर देखोदेखी नुसते वरचे रंग पाहून लौकिकार्थ शरण गेलेले शिष्य अमित आहेत.)

वाटे विषयांचे सुख । परमार्थ संपादणे लौकिक । देखोवेखीं पढतमूर्ख । शरण गेले ॥ ५४॥

( देखोवेखीं - दिखाऊ )

त्यांना विषयांत सुख वाटत असतें,त्यांना परमार्थ लोकिकासाठी करावयाचा असतो.(दुसरा कोणी गुरुला शरण गेला म्हणून) त्यांचे (देखोवेखी) पाहून हाही पढतमूर्ख (गुरुला) शरण जात असतो.

जाली विषईं वृत्ति अनावर । दृढ धरिला संसार । परमार्थचर्चेचा विचार । मळिण झाला ॥ ५५॥

परंतु विषयामध्यें वृत्ति अनावरपणें गुंतल्यामुळे तो संसारालाच गच्च मिठी मारतो,आणि (त्याचा परमार्थाचा मोड जळून जातो,परमार्थविचार दृढ होत नाहीत),परमार्थाची चर्चा करण्याचा त्याचा विचार मलिन होतो,(त्याच्या मनांत सुध्दा येत नाहीं)

मोड घेतला परमार्थाचा । हव्यास धरिला प्रपंचाचा । भार वाहिला कुटुंबाचा । काबाडी जाला ॥ ५६॥

त्याला परमार्थाचा आळस (मोड-कंटाळा) येतो व तो प्रपंचाचा हव्यास धरतो,(इतका कीं) कुटुंबाचा भारवाहक हमाल बनतो.(प्रपंचाचे काबाड कष्ट करीत एके दिवशी मरुन जातो.)

मानिला प्रपंचीं आनंद । केला परमार्थी विनोद । भ्रांत मूढ मतिमंद । लोधला कामीं ॥ ५७॥

( लोधला कामीं - कामवासनेत अडकला )

तो प्रपंचात आनंद मानतो व थट्टेवारी परमार्थ नेतो,कामलुब्ध झाल्यामुळें भ्रांतिष्ट,मूर्ख व बेअकली बनतो.(मनांत कामविषय अनावर,त्यांना परमार्थचर्चा हा विनोदाचा विषय होतो.)

सूकर पूजिलें विलेपनें । म्हैसा मर्दिला चंदनें । तैसा विषई ब्रह्मज्ञानें । विवेकें बोधिला ॥ ५८॥

डुकराच्या अंगाला उटी लावून त्याची पूजा करावी किंवा टोमण्याला-रेड्याला चंदनाचा-लेप करावा (म्हणजे जसे निरुपयोगी),त्याप्रमाणे विषयी माणसाला ब्रह्मज्ञानाचा व आत्मानात्मविवेकाचा बोध.केला (तरी तो निष्फळ)

रासभ उकिरडां लोळे । तयासि परिमळसोहळे । उलूक अंधारीं पळे । तया केवी हंसपंगती ॥ ५९॥

( उलूक - घुबड )

उकिरड्यात लोळणा-या गाढवाला सुगंधाचा सोहळा कसा मिळणार ? आंधारात लपणा-या घुबडाला हंसाच्या पंक्तीचा लाभ कसा होईल ?

तैसा विषयदारींचा बराडी । घाली अधःपतनीं उडी । तयास भगवंत आवडी । सत्संग कैंचा ॥ ६०॥

( बराडी - भिकारी,आशाळभूत )

त्याप्रमाणे विषयांच्या दारातले आशाळभूत भिकारी (बराडी)(नीच योनीच्या) अधोगर्तेतच उडी घालून खिचपत पडायचे,त्यांना भगवंताची आवड किंवा सत्संग कोठून मिळणार ?(विषयासक्तांना ब्रह्मबोध निरुपयोगी होतो.)

वर्ती करून दांताळीं । स्वानपुत्र हाडें चगळी । तैसा विषई तळमळी । विषयसुखाकारणे । ॥ ६१॥

कुत्र्याचे पिल्लू (कुत्रे)वरती दांतांड करुन हाडूक चघळीत बसतें,त्याप्रमाणे विषयी माणूस विषयासाठीं हायहाय करतो.

तया स्वानमुखीं परमान्न । कीं मर्कटास सिंहासन । तैसें विषयशक्तां ज्ञान । जिरेल कैंचें ॥ ६२॥

त्या कुत्र्याला चांगले पक्वान्न खाऊ घातलें किंवा एकाद्या माकडाला सिंहासनावर नेऊन बसविले तरी ते त्याला जिरणार नाहीं,त्याचप्रमाणे विषयलंपट जीवाला ब्रह्मज्ञान पचणार नाहीं(मनांत विषयांचे चर्वण करणा-या विषय लोलुपांना परमार्थ,सत्संग,देव हे काहीं मनांत भरत नाहीं.)

रासभें राखतां जन्म गेला । तो पंडितांमध्यें प्रतिष्ठला । न वचे, तैसा आसक्ताला।परमार्थ नाहीं ॥ ६३॥

गाढवें वळण्यांत ज्याचा जन्म गेला,त्याला कोणी पंडितांमध्ये नेऊन बसविणार नाहीं(तो पंडितांच्या सभेत शोभत नाहीं),तद्वत विषयासक्त माणसाला (कोणीं) परमार्थ (सांगणार)नाहीं.

मिळाला राजहंसांचा मेळा । तेथें आला डोंबकावळा । लक्षून विष्ठेचा गोळा । हंस म्हणवी ॥ ६४॥

राजहंसांचा कळप जमला,त्यांत स्वतःला हंस म्हणविणारा डोमकावळाही आला,पण त्याचे लक्ष विष्ठेच्या गोळ्याकडेच राहाणार.(गुरुभक्त सज्जन राजहंसाच्या समाजांत विषयविष्ठेचा अपवित्र-अमेध्य-गोळा लक्षून शिरणारा विषयी डोमकावळा साजत नाहीं).

तैसे सज्जनाचे संगती । विषई सज्जन म्हणविती । विषय आमेद्य चित्तीं । गोळा लक्षिला ॥ ६५॥

( आमेद्य - अपवित्र )

त्याप्रमाणे सज्जनाच्या मेळ्यांत स्वत:स सज्जन म्हणविणारे विषयलुब्ध आले तरी त्यांचे चित्त अपवित्र अशा विषयाच्या गोळ्यावरच घोटाळावयांचे.

काखे घेऊनियां दारा । म्हणे मज संन्यासी करा । तैसा विषई सैरावैरा । ज्ञान बडबडी ॥ ६६॥

बायकोला कडेवर घेऊन आला आहे(इतका स्त्रीलंपट) आणि तोंडाने म्हणतो मला संन्यास द्या,त्याप्रमाणे विषयी माणूस अद्वातद्वा ज्ञानाच्या गप्पा मारतो.(बायको काखेत आणि म्हणतो मला संन्यास द्या,तसा विषय चित्तांत आणि बडबडतो ब्रह्मज्ञान ?काय उपयोग त्याचा ?)

असो ऐसे पढतमूर्ख । ते काय जाणती अद्‌वैतसुख । नारकी प्राणी नर्क । भोगिती स्वइच्छा ॥ ६७॥

असो.अशा पढतमूर्खांना अद्वैताचें सुख काय समजणार ? नरकातले किडे (नारकी ) ते,ते स्वेच्छेनें नरक भोगीत राहावयाचे.(नरकातले किडे नरक भोगणारे हे पढतमूर्ख,ह्यांना अद्वैतसुख काय होय ?)

वैषेची करील सेवा । तो कैसा मंत्री म्हणावा । तैसा विषयदास मानावा । भक्तराज केवी ॥ ६८॥

( वैषेची - वेश्या,विषयवासनेत गुरफटलेले )

स्वत:वेश्येची गुलामगिरी करतो त्याला मंत्री म्हणजे वशीकरण मंत्र येतो,असे कां म्हणावे ? त्याप्रमाणें विषयाचा किंकर-दास-बनला त्याला भक्तराज कसे म्हणावे ?(वेश्यासक्त पुरूष जसा मांत्रिक होणे नाही-मांत्रिक निर्मळ असावा लागतो-तसा विषयांचा दास आहे हा देवाचा दास केव्हांही होणें नाही.)

तैसे विषई बापुडे । त्यांस ज्ञान कोणीकडे । वाचाळ शाब्दिक बडबडे । वरपडे जाले ॥ ६९॥

( वरपडे - मिरवते )

त्याप्रमाणें बिचा-या विषयी जीवांना ज्ञान काय होय ? ते वाचाळपंचविशीला व शाब्दिक बडबडीलाच योग्य होत.(शाब्दिक ज्ञानाची बडबड करणारे विषयी त्यांस ज्ञानप्राप्ती कधीहिं व्हावयाची नाही.)

ऐसे शिष्य परम नष्ट । कनिष्ठांमधें कनिष्ठ । हीन अविवेकी आणी दृष्ट । खळ खोटे दुर्जन ॥ ७०॥

गुरुचे उपदेशी,असले शिष्य परम (अत्यंत) नष्ट,कनिष्ठांमध्ये कनिष्ठ,हीन,अविचारी,दुष्ट,खळ,खाटे व दुर्जन होत.

ऐसे जे पापरूप । दीर्घदोषी वज्रलेप । तयांस प्राश्चीत, अनुताप- । उद्भवतां ॥ ७१॥

असे जे शिष्य महादोषी व पापाचे पुतळे आहेत त्यांचे पाप वज्रलेप झालेलें असतें,तथापि त्यांना पश्र्चाताप होणे हेंच प्रायश्र्चित्त होय.

तेंहि पुन्हां शरण जावें । सद्गुरूस संतोषवावें । कृपादृष्टी जालियां व्हावें । पुन्हां शुद्ध ॥ ७२॥

त्यांनीं पुन्हां (ख-या पश्र्चात्तापाने) सद्गुरुस शरण जाऊन संतुष्ट करावें आणि त्यांची कृपादृष्टि करुन घेऊन पुनरपि शुध्द व्हावें.

स्वामीद्रोह जया घडे । तो यावश्चंद्र नरकीं पडे । तयास उपावचि न घडे । स्वामी तुष्टल्यावांचुनी ॥ ७३॥

स्वामीद्रोहाचें पातक ज्याच्या हातून घडतें,तो च्रंद्रसूर्य आहेत तोपर्यंत नरकांत पडतो,स्वामीला(सद्गुरुला) संतुष्ट करण्यावाचून त्याला दुसरा तरणोपायच नाहीं.

स्मशानवैराग्य आलें । म्हणोन लोटांगण घातलें । तेणें गुणें उपतिष्ठले- । नाहीं ज्ञान । ७४॥

एखादे वेळीं स्मशान (क्षणिक) वैराग्य आलें आणि त्याच्या भरांत सद्गुरुंना शरण जाऊन लोटांगण घातलें,पण तेवढ्या लोटांगणाने काही ज्ञानप्राप्ति होणार नाही.

भाव आणिला जायाचा । मंत्र घेतला गुरूचा । शिष्य जाला दो दिसांचा । मंत्राकारणें ॥ ७५॥

( जायाचा - उसना )

उसनी(क्षणिक) भावभक्ति आणून गुरुचा मंत्र घेतला,दोन दिवस टुरटुर केली,अर्थात मंत्रासाठीच तो शिष्य झाला म्हणावयाचा,

ऐसे केले गुरु उदंड । शब्द सिकला पाषांड । जाला तोंडाळ तर्मुंड । माहापाषांडी ॥ ७६॥

( तोंडाळ तर्मुंड - बडबड्या,शिरजोर )

असे त्यानें अनेक गुरु केले,तो पाखंडी बडबड शिकला,शेवटी तोंडाळ,लुडबुड्या (तर्मुंडी),महानास्तिक बनला.

घडी येक रडे आणी पडे । घडी येक वैराग्य चढे । घडी येक अहंभाव जडे । ज्ञातेपणाचा ॥ ७७॥

घटकेंत रडतो,घटकेंत पडतो (नमस्कार घालतो),घटकेंत वैराग्याचा आव आणतो.घटकेत ज्ञातेपणाच्या अभिमानानें फुगतो.

घडी येक विस्वास धरी । सवेंच घडी येक गुर्गुरी । ऐसे नाना छंद करी । पिसाट जैसा ॥ ७८॥

घटकेत विश्र्वास धरतो,लगेच दुस-या घटकेला गुरुगुरायला लागतो,माथेफिरुप्रमाणें अशा अनेक त-हा करतो.

काम क्रोध मद मत्सर । लोभ मोह नाना विकार । अभिमान कापट्य तिरस्कार । हृदईं नांदती ॥ ७९॥

काम,क्रोध,मद,मत्सर,लोभ,मोह,अभिमान,कापट्य,तिरस्कार असे अनेक विचार त्याच्या ह्रदयांत राहातात.

अहंकार आणी देहपांग । अनाचार आणी विषयसंग । संसार प्रपंच उद्वेग । अंतरीं वसे ॥ ८०॥

( पांग - आवड )

अहंकार,देह ममत्व,अनाचार,विषयसंग,संसाराची व प्रपंचाची काळजी हीं त्याच्या अंतःकरणात असतात.

दीर्घसूत्री कृतघ्न पापी । कुकर्मी कुतर्की विकल्पी । अभक्त अभाव सीघ्रकोपी । निष्ठुर परघातक ॥ ८१॥

चेंगट (दीर्घसुत्री) किंवा कृष्णकारस्थानी,कृतघ्न,पापी,कुकर्मी,कुतर्की,विकल्पी,अभक्त,अभाविक, शिघ्रकोपी(त्वरीत रागावणारा),निष्ठुर,दुस-यांचा घात करणारा,

हृदयेंसुन्य आणी आळसी । अविवेकी आणि अविस्वासी । अधीर अविचार, संदेहासी- । दृढ धर्ता ॥ ८२॥

निर्दय,आळशी,अविवेकी,अविश्वासी,अधीर,अविचारी, आणि अतिशय शंकेखोर.

आशा ममता तृष्णा कल्पना । कुबुद्धी दुर्वृत्ति दुर्वासना । अल्पबुद्धि विषयकामना । हृदईं वसे ॥ ८३॥

आशा,तृष्णा,ममता,कल्पना, दुर्बुध्दि दुर्वृत्ति दुर्वासना,अल्पबुध्दि आणि विषयेच्छा ह्रदयांत असणारा,

ईषणा असूया तिरस्कारें । निंदेसि प्रवर्ते आदरें । देहाभिमानें हुंबरे । जाणपणें ॥ ८४॥

( ईषणा - पुत्रेषणा,दारेषणा,लोकेषणा,वितेषणा या चार ईषणा ( हाव,इच्छा )

ईषणा (कामना-लोकेषणा,दारेषणा,द्रव्येषणा),मत्सर,तिरस्कार, येणे करुन निंदा करायला पाय नेहमीं पुढे, आणि देहाभिमानानें ज्ञातेपणाच्या घमेंडीने फुरफुरणारा.

क्षुधा तृष्णा आवरेना । निद्रा सहसा धरेना । कुटुंबचिंता वोसरेना । भ्रांति पडिली ॥ ८५॥

भुक तहान व झोप आवरत नाहीं,कुटुंबाची चिंता कमी होत नाहीं,मन भ्रमिष्ट झालेले असतें,

शाब्दिक बोले उदंड वाचा । लेश नाहीं वैराग्याचा । अनुताप धारिष्ट साधनाचा । मार्ग न धरी ॥ ८६॥

तोडानें परमार्थाविषयी शब्दपांडित्य मात्र भरपूर,पण अंतःकरणात वैराग्याचा गंध सुध्दा नाही,पश्र्चातापही होत नाहीं,धैर्य नाहीं किंवा काही साधनमार्गही धरीत नाहीं,

भक्ति विरक्ति ना शांती । सद्वृत्ति लीनता ना दांती । कृपा दया ना तृप्ती । सुबुद्धि असेच ना ॥ ८७॥

( दांती -दमन )

भक्ति,वैराग्य,शांति,सद्गति,लीनता,(दांती) इंद्रियनिग्रह,कृपा,दया,संतुष्टता,सुबुध्दि,ह्यापैकी,काहीं नाहीं.

कायाक्लेसीं शेरीरहीन । धर्मविषईं परम कृपण । क्रिया पालटेना कठिण । हृदये जयाचें ॥ ८८॥

रोगादिकांनीं कष्टी झालेला,अवयवहीन,धर्म करण्यांत कंजूष,क्रिया कधी पालटत नाहीं,असे त्याचे ह्रदय कठिण असतें,

आर्जव नाहीं जनासी । जो अप्रिये सज्जनासी । जयाचे जिवीं आहिर्णेसीं । परन्यून वसे ॥ ८९॥

( आहिर्णेसीं - अहर्निश,दिनरात )

जो लोकांशी आर्जवानें (सरळपणानें,विनयांने) वागत नाहीं,जो सज्जनाला आवडत नाहीं ज्याच्या मनांत दुस-याचे छिद्र (उणे) रात्रंदिवस घोळत असते.

सदा सर्वकाळ लटिका । बोले माईक लापणिका । क्रिया विचार पाहतां, येका । वचनीं सत्य नाहीं ॥ ९०॥

नेहमीं लबाड व खोट्या थापा मारणारा (माईक लापणिका),करणें व बालणें पाहिलें तर एकाहीं शब्दांत खरेपणा मिळायचा नाही.

परपीडेविषईं तत्पर । जैसे विंचु आणि विखार । तैसा कुशब्दें जिव्हार । भेदी सकळांचें ॥ ९१॥

जो दुस-यास पीडा देण्यात पटाईत,विंचू व साप ह्याप्रमाणें कठोर भाषणानें सगळ्यांच्या काळजाला दंश करतो.

आपले झांकी अवगुण । पुढिलांस बोले कठिण । मिथ्या गुणदोषेंविण । गुणदोष लावी ॥ ९२॥

आपल्या अवगुणांवर पांघरुण घालून (त्याच अवगुणांबद्दल) दुस-यास कठोरतेनें रागें भरतो,एखाद्याच्या आंगी गुण किंवा दोष नसतां त्याजवर लटक्या गुणांचा किंवा दोषांचा आरोप करतो.

स्वयें पापात्मा अंतरीं । पुढिलांचि कणव न करी । जैसा हिंसक दुराचारी । परदुःखें शिणेना ॥ ९३॥

ज्याप्रमाणें हिंसक,दुराचारी मनुष्य दुस-याच्या दुःखाने न कळवळणारा असा असतो,त्याचप्रमाणें स्वतः अंतःकरणात पापानें परिपुर्ण भरलेला (अर्थात पापाचें फळ म्हणून अनेक आधिव्याधींच्या हालअपेष्टा भोगतो. आहे),पण दुस-याविषयीं दयामाया काहीं दाखवत नाहीं,(दुस-याचे हाल कमी करण्याचे प्रयत्न करीत नाहीं. किंवा ते हाल वाढतील असा हेतु!)

दुःख पराव्याचें नेणती । दुर्जन गांजिलेचि गांजिती । श्रम पावतां आनंदती । आपुले मनीं ॥ ९४॥

दुर्जन दुस-याचें दुःख जाणीत नाहीत,गांजलेल्यांनाच गांजतात आणि त्यांचे-गांजलेल्यांचे-कष्ट पाहून आपल्या चित्तांत आनंद मानतात.

स्वदुःखें झुरे अंतरीं । आणी परदुःखें हास्य करी । तयास प्राप्त येमपुरी । राजदूत ताडिती ॥ ९५॥

स्वतःच्या दुःखाने झुरणीस लागतो आणि दुस-याचें दुःख पाहून (आनंदानें)त्याला हंसूं येते.अशाला यमलोक प्राप्त होऊन यमदूतांचा मार खावा लागेल.

असो ऐसें मदांध बापुडें । तयांसि भगवंत कैंचा जोडे । जयांस सुबुद्धि नावडे । पूर्वपातकेंकरूनी ॥ ९६॥

असो.पूर्व पातकांमुळे ज्याला सदबुध्दि आवडत नाहीं अशा बिचा-या मदांधाना भगवंताची प्राप्ति कशी होणार ?

तयास देहाचा अंतीं । गात्रें क्षीणता पावती । जिवलगें वोसंडिती । जाणवेल तेव्हां ॥ ९७॥

( वोसंडिती - दूर जातात )

देह पडण्याच्या वेळी सर्व अवयव शिथिल होतील व जिवलग टाकून देतील. तेव्हा हें सर्व त्याला कळून येईल.(संसाराचा फजिता व परमार्थाची हानी होऊन त्याला जिवलग सोडतात व भगवंत जोडत नाहीं)

असो ऐसे गुणावेगळे । ते सच्छिष्य आगळे । दृढभावार्थें सोहळे । भोगिती स्वानंदाचे ॥ ९८॥

असो,अशा अवगुणांनीं रहित जे असतात तेच श्रेष्ठ (आगळे) सच्छिष्य होत,त्यांस निस्सिम भक्तीमुळें निजानंदाचे सोहळे भोगावयास मिळतात.कुशिष्यांची गोष्ट पुरी झाली.(सत्वगुणसंपन्न सच्छिष्य वैराग्य व दृढविश्र्वास ह्या निर्मळ गुणांनीं स्वानंदसोहळे भोगतात.)

जये स्थळीं विकल्प जागे । कुळाभिमान पाठीं लागे । ते प्राणी प्रपंचसंगें । हिंपुटी होती ॥ ९९॥

ज्यांच्या ठिकाणीं विकल्प जागा असतो, व ज्यांच्या पाठीमागें कुळाभिमान लागलेला आहें.ते प्राणी प्रपंच्याच्या संगतीनें कष्टी (हिंपुटी) होतात.

जेणेंकरितां दुःख जालें । तेंचि मनीं दृढ धरिलें । तेणें गुणें प्राप्त जालें । पुन्हां दुःख ॥ १००॥

ज्या (अवगुणां-)मुळे दुःख झालें तेंच मनांत बळकट धरलें,त्यामुळे दुःखच प्राप्त झालें,(दुःख होण्याची पाळी आली.)

संसारसंगें सुख जालें । ऐसें देखिलें ना ऐकिलें । ऐसें जाणोन अनहित केलें । ते दुःखी होती स्वयें ॥ १०१॥

संसारांत सुख प्राप्त झाल्याचें (कोणी कधीं)पाहिलें नाहीं व ऐकलेही नाहीं,हे माहीत असून (जे त्याच्या नादीं लागून) आपलें अकल्याण करून घेतात त्यांस पुन्हां दुःखच भोगावें लागतें.

संसारीं सुख मानिती । ते प्राणी मूढमती । जाणोन डोळे झांकिती । पढतमूर्ख ॥ १०२॥

संसारात सुख आहें असें जे मानतात ते मूर्ख होत, आणि हें सगळे समजून उमजून जे डोळेझांक करतात ते पढतमूर्ख होत.

प्रपंच सुखें करावा । परी कांहीं परमार्थ वाढवावा । परमार्थ अवघाचि बुडवावा । हें विहित नव्हे ॥ १०३॥

प्रपंच खुशाल करावा पण त्याबरोबरच थोडाबहुत परमार्थही वाढवावा,परमार्थ अजीबांत बुडवून टाकणें बरे नाही.

मागां जालें निरूपण । गुरुशिष्यांची वोळखण । आतां उपदेशाचें लक्षण । सांगिजेल ॥ १०४॥

येथपर्यंत गुरुशिष्य-लक्षणें सांगितली.आता उपदेशाचीं लक्षणें सांगू.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शिष्यलक्षणनाम समास तिसरा ॥ ३॥**

### समास चवथा : उपदेशलक्षण ॥ श्रीराम् ॥

ऐका उपदेशाचीं लक्षणें । बहुविधें कोण कोणें । सांगतां तें असाधारणें । परी कांहीं येक सांगों ॥ १॥

अनेक प्रकारची उपदेशांची लक्षणे कोणकोणती आहेत तीं ऐका.सांगायला लागले तर ती असंख्य आहेत,पण त्यातली कांही थोडी सांगू.

बहुत मंत्र उपदेशिती । कोणी नाम मात्र सांगती । येक ते जप करविती । वोंकाराचा ॥ २॥

नाना मंत्रांचे उपदेश देणारे गुरु अनेक सांपडतात.बहुतेक जण मंत्रांचा उपदेश करतात,कोणी नाममंत्र सांगतात,कोणी ओंकाराचा- प्रणवाचा -जप करवितात.

शिवमंत्र भवानीमंत्र । विष्णुमंत्र माहाल्क्ष्मीमंत्र । अवधूतमंत्र गणेशमंत्र । मार्तंडमंत्र सांगती ॥ ३॥

कोणी शिव,भवानी,विष्णु,महालक्ष्मी,अवधूत,गणेश व मार्तंड (सूर्य,खंडोबा) ह्यांचे मंत्र देतात.

मछकूर्मवऱ्हावमंत्र । नृसिंहमंत्र वामनमंत्र । भार्गवमंत्र रघुनाथमंत्र । कृष्णमंत्र सांगती ॥ ४॥

मस्य,कूर्म,वराह,नरसिंह,वामन,परशुराम,राम,कृष्ण,

भैरवमंत्र मल्लारिमंत्र । हनुमंतमंत्र येक्षिणीमंत्र । नारायेणमंत्र पांडुरंगमंत्र । अघोरमंत्र सांगती ॥ ५॥

भैरव,मल्हारी,हनुमान,यक्षिणी,नारायण,पांडुरंग,तसेंच अघोर मंत्र.

शेषमंत्र गरुडमंत्र । वायोमन्त्र वेताळमंत्र । झोटिंगमंत्र बहुधा मंत्र । किती म्हणौनि सांगावे ॥ ६॥

शेष,गरुड,वायु,वेताळ,झोटींग,असे (अनेक देवतांचे) अनेक मंत्र किती म्हणून सांगावे ?

बाळामंत्र बगुळामंत्र । काळिमंत्र कंकाळिमंत्र । बटुकमंत्र नाना मंत्र । नाना शक्तींचे ॥ ७॥

बाळा,बगुळा,काळी,कंकाळी,बटुक अशा अनेक शक्तींचे अनेक मंत्र आहेत.

पृथकाकारें स्वतंत्र । जितुके देव तितुके मंत्र । सोपे अवघड विचित्र । खेचर दारुण बीजाचे ॥ ८॥

जितक्या आकाराचे निरनिराळे देव आहेत,तितके मंत्रही आहेत.अनेक देवतांचे अनेक मंत्र आहेत,जितके देव तितके मंत्र आहेत,काही सोपे काही अवघड काही विचित्र व कित्येक विचित्र व कित्येक खेचर इत्यादि भयंकर (जाज्वल्य) बिजांचे आहेत.(काहींची अर्थववेदांतील मंत्रांप्रमाणे बिजे दारूण आहेत)

पाहों जातां पृथ्वीवरी । देवांची गणना कोण करी । तितुके मंत्र वैखरी । किती म्हणौनि वदवावी ॥९॥

सगळ्या पृथ्वीवरचे देव पाहूं गेलें तर त्यांची गणती कोण करील ? जितके देव तितके मंत्र आहेत,वाणीने (वैखरी) ते किती म्हणून सांगावे ?

असंख्यात मंत्रमाळा । येकाहूनि येक आगळा । विचित्र मायेची कळा । कोण जाणे ॥ १०॥

एकीहून चढ अशा असंख्य मंत्रमाळा आहेत,अशी ही मायेची कळा विचित्र आहें ती कोणाला कळणार ?

कित्येक मंत्रीं भूतें जाती । कित्येक मंत्रीं वेथा नासती । कित्येक मंत्रीं उतरती । सितें विंचू विखार ॥ ११॥

(सितें विंचू विखार - हिव,साप व विचवाचे विष उतरविणे )

काहीं मंत्रांनी भुते जातात,कित्येकांमुळे रोग दूर होतात, व काहींच्या योगानें हिंव (थंडी),विचू,साप वगैरे उतरतात.

ऐसे नाना परीचे मंत्री । उपदेशिती कर्णपात्रीं । जप ध्यान पूजा यंत्री । विधानयुक्त सांगती ॥ १२॥

असे अनेक प्रकारचे मांत्रिक शिष्याच्या कानात आपापले मंत्र सांगतात व त्या मंत्रांचा जप ध्यान,यंत्रपूजा इत्यादि सर्व विधान सांगतात.

येक शिव शिव सांगती ॥ येक हरि हरि म्हणविती । येक उपदेशिती । विठल विठल म्हणोनी ॥ १३॥

शिव,हरि,विठ्ठल

येक सांगती कृष्ण कृष्ण । येक सांगती विष्ण विष्ण । येक नारायण नारायण ।म्हणौन उपदेशिती ॥१४॥

कृष्ण,विष्णु,नारायण.

येक म्हणती अच्युत अच्युत । येक म्हणती अनंत अनंत । येक सांगती दत्त दत्त । म्हणत जावें ॥१५॥

अच्युत,अनंत,दत्त म्हणत जावें असे सांगतात.

येक सांगती राम राम । येक सांगती ओं ओं म । येक म्हणती मेघशाम । बहुतां नामीं स्मरावा ॥ १६॥

राम,ओम,मेघश्याम (अनेक नामांनी स्मरावा )

येक सांगती गुरु गुरु । येक म्हणती परमेश्वरु । येक म्हणती विघ्नहरु । चिंतीत जावा ॥ १७॥

गुरु,परमेश्र्वर,विघ्नहर,ह्यांचे चिंतन करावें.

येक सांगती शामराज । येक सांगती गरुडध्वज । येक सांगती अधोक्षज । म्हणत जावें ॥ १८॥

शामराज,गरुडध्वज,अधोक्षज असें म्हणत जावें असे सांगतात.

येक सांगती देव देव । येक म्हणती केशव केशव । येक म्हणती भार्गव भार्गव । म्हणत जावें ॥ १९॥

कोणी सांगतात देव,केशव,भार्गव असें म्हणत जावें.

येक विश्वनाथ म्हणविती । येक मल्लारि सांगती । येक ते जप करविती । तुकाई तुकाई म्हणौनी ॥२०॥

विश्र्वनाथ,मल्लारी,तुकाई, ह्यांचा जप कोणी करवितात.

हें म्हणौनी सांगावें । शिवशक्तीचीं अनंत नांवें । इछेसारिखीं स्वभावें । उपदेशिती ॥ २१॥

असे किती म्हणून सांगावे ?शिवभक्तींचीं नावें अनंत आहेत. त्यापैकी आपापल्या इच्छेप्रमाणें व स्वभावाप्रमाणें उपदेश करतात.

येक सांगती मुद्रा च्यारी । खेचरी भूचरी चाचरी अगोचरी । येक आसनें परोपरी । उपदेशिती ॥ २२॥

(मुद्रा म्हणजे बाह्य विषयावरचें लक्ष उडविण्यासाठी एकविषयीं द्दष्टी लावणें) खेचरी(भूमध्यावरुन सतत आकाशाकडे पाहाणें), भूचरी(नासिकाग्रावरुन भूमिकडे नजर लावणें),चाचरी(पापण्यांच्या चलनवलनावरुन भ्रूमध्यावर पाहाणें), अगोचरी(अंतरात पहाण्याची मुद्रा,प्रत्यग्वृत्ति)अशा चार मुद्रा कोणी सांगतात,कोणी निरनिराळीं आसनें सांगतात.

येक दाखविती देखणी । येक अनुहातध्वनी । येक गुरु पिंडज्ञानी । पिंडज्ञान सांगती ॥ २३॥

( दाखविती देखणी - अपूर्व पदार्थ दाखवितात , अनुहातध्वनी - प्राणांच्या देहात १० प्रकारचे ध्वनी सतत चालू असतात जे आघाताने उत्पन्न होतात)

कोणी चमत्कार (देखणी,अपूर्व द्दश्ये) दाखवितात,कोणी अनाहत ध्वनि (ह्रदयांत आघातावाचून होणारे दहा प्रकारचे नाद (योगधारणेने ऐकूं येतात ते) ऐकवितात,शरीराचे ज्ञान (पिंडज्ञान) ज्यांना आहे असे गुरु शरीरज्ञानाचा उपदेश करतात.

येक संगती कर्ममार्ग । येक उपासनामार्ग । येक सांगती अष्टांग योग । नाना चक्रें ॥ २४॥

कोणी कर्ममार्ग,उपासनामार्ग,अष्टांगयोग (योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध,यम, नियम,आसन, प्राणयाम, प्रत्याहार,धारणा,ध्यान,समाधि ह्यांचा क्रमाने अभ्यास सांगतात.)व त्यासाठी षड्चक्रे शरिरांत गुदद्वारापासून तों ब्रह्मरंध्रापर्यंत (मूलाधार,स्वाधिष्ठान,मणिपुर,अनाहत,विशुध्द,अग्नि किंवा आज्ञा अशीं) सहा चक्रे आहेत त्यांचा उपदेश करतात.

येक तपें सांगती । येक अजपा निरोपिती । येक तत्वें विस्तारिती । तत्वज्ञानी ॥ २५॥

तप करावें,अजपा गायत्रीचा जप करावा असे कोणी सांगतात,अथवा तत्वज्ञानी तत्वांची फोड करुन सांगतात.(अजपा गायत्री-प्राण्याच्या श्र्वासोच्छ्वासाबरोबर सतत सोहं शब्द उत्पन्न होत असतो त्याला अजपा गायत्री म्हणतात.)

येक सांगती सगुण । येक निरोपिती निर्गुण । येक उपदेशिती तीर्थाटण । फिरावें म्हणूनी ॥ २६॥

सगुण किंवा निर्गुण ह्यांची भक्ति करावी अथवा तीर्थयात्रा कराव्या असें कोणी सांगतात.

येक माहावाक्यें सांगती । त्यांचा जप करावा म्हणती । येक उपदेश करिती । सर्व ब्रह्म म्हणोनी ॥ २७॥

( माहावाक्यें - प्रज्ञान ब्रह्म, अहं ब्रह्मास्मि , तत्वमसी अयमात्मा )

(चार वेदांची,प्रज्ञानं ब्रह्म-ऋग्वेद,अहं ब्रह्मास्मि-यर्जुवेद,तत्वमंसि-सामवेद व अयमात्मा ब्रह्म-अर्थववेद अशी हीं चार महावाक्ये आहेत.) तत्वमस्यादि महावाक्ये सांगून त्यांचा जप करावा असें कोणी सांगतात.कोणी सर्व ब्रह्माचा उपदेश करतात.

येक शाक्तमार्ग सांगती । येक मुक्तमार्ग प्रतिष्ठिती । येक इंद्रियें पूजन करविती । येका भावें ॥ २८॥

कोणी शाक्तमार्ग (शक्ति उपासना),कोणी मुक्तमार्ग ह्यांचा उपदेश करतात,कोणी एकनिष्ठेनें आपलीच आपण पूजा करावयाचा-ईंद्रियपूजनाचा मार्ग सांगतात.(ही पाखंड मते असुन सर्व ब्रह्ममतांत ह्यांचा समावेश होत असल्यामुळे सर्व ब्रह्ममतांचे खंडन दासबोधात पुढे येणार आहें)

येक सांगती वशीकर्ण । स्तंबन मोहन उच्चाटण । नाना चेटकें आपण । स्वयें निरोपिती ॥ २९॥

वशीकरण,स्तंभन ,मोहन,उच्चाटन अशी अनेक चेटके कोणी स्वतःच सांगतात.

ऐसी उपदेशांची स्थिती । पुरे आतां सांगों किती । ऐसे हे उपदेश असती । असंख्यात । ३०॥

असे उपदेशाचे प्रकार आहेत ते पुरेत,ते किती सांगावे ?असे असंख्य उपदेश आहेत.

ऐसे उपदेश अनेक । परी ज्ञानेविण निरार्थक । येविषईं असे येक । भगवद्‌वचन ॥ ३१॥

असे हे अनेक उपदेश असले तरी तें(आत्म-)ज्ञानावाचून व्यर्थ होत,ह्याविषयी भगवंताचे एक वचन आहें (श्र्लोकाचा अर्थः-मानवानें अनेक शास्त्रांचे पठण केलें,अनेक दैवते पुजिली,तरी हे अर्जूना !आत्मज्ञानाशिवाय त्यांचे सर्व कर्म व्यर्थ होय,शैव,शाक्त,आगम इत्यादि जी अनेक मते आहेत ती ज्यांच्या चित्ताला भ्रांति झाली आहें,अशा जीवांचा अपभ्रंश-अवनति करणारीच आहेत,आत्मज्ञानासारखे दुसरे पवित्र व उत्तम असें काहीहि नाहीं)

**श्लोक ॥ नानाशास्त्रं पठेल्लोको नाना दैवतपूजनम् । आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् ॥ शैवशाक्तागमाद्या ये अन्ये च बहवो मताः । अपभ्रंशसमास्ते । अपि जीवानां भ्रांतचेतसाम् ॥ न हि ज्ञानेन सद्दशं पवित्रमिदमुत्तमम् ॥**

याकारणें ज्ञानासमान । पवित्र उत्तम न दिसे अन्न । म्हणौन आधीं आत्मज्ञान । साधिलें पाहिजे ॥ ३२॥

( पवित्र उत्तम न दिसे अन्न - ब्रह्मज्ञानासारखे दुसरे पवित्र शुद्ध अन्य काही नाही (अन्न- अन्य ) )

अशा-स्तव ,आत्मज्ञानांसारखे पवित्र व उत्तम असें दुसरे काहीं दिसत नाहीं म्हणून अगोदर आत्मज्ञान मिळविले पाहिजे.

सकळ उपदेशीं विशेष । आत्मज्ञानाचा उपदेश । येविषईं जगदीश । बहुतां ठाईं बोलिला ॥ ३३॥

सगळ्या उपदेशांमध्ये आत्मज्ञानाचा उपदेश श्रेष्ठ आहें ह्याविषयीं भगवंतांनी अनेक ठिकाणीं सांगितले आहें.

श्लोक ॥ यस्य कस्य च वर्णस्य ज्ञानं देहे प्रतिष्ठितम् । तस्य दासस्य दासोहं भवे जन्मनि जन्मनि ॥

आत्मज्ञानाचा महिमा । नेणे चतुर्मुख ब्रह्मा । प्राणी बापुडा जीवात्मा । काये जाणे ॥ ३४॥

आत्मज्ञानाचा महिमा चार मुखांच्या ब्रह्मदेवाला कळला नाहीं,तर प्राणी बिचारा जिवात्मा काय जाणणार ?

सकळ तीर्थांची संगती । स्नानदानाची फळश्रुती । त्याहूनि ज्ञानाची स्थिती । विशेष कोटिगुणें ॥ ३५॥

सर्व तीर्थाच्या ठिकाणीं स्नाने-दानें करुन जें फळ मिळणार त्यापेक्षां आत्मज्ञानाचे महात्म्य कोटिपटींनें अधिक आहें (सकल तीर्थांच्या स्नानांपेक्षा आत्मज्ञानाच्या गंगेचे स्नान कोटिपटीनें श्रेष्ठ आहें)

श्लोक: ॥ पृथिव्यां यानि तीर्थानि स्नानदानेषु यत्फलम् । तत्फलं कोटिगुणितं ब्रह्मज्ञानसमोपमम् ॥

म्हणौनि जें आत्मज्ञान । तें गहनाहूनि गहन । ऐक तयाचें लक्षण । सांगिजेल ॥ ३६॥

म्हणून आत्मज्ञान जें आहे ते समजण्याला अत्यंत कठिण आहें, तें गहनातलें गहन आहें त्यांचे लक्षण सांगतो ते ऐका.(पण ते सांगण्यापूर्वी बहुधा ज्ञानाचा निरास करणें अगत्य आहें)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उपदेशनाम समास चवथा ॥ ४॥**

**समास पाचवा : बहुधाज्ञान निरूपण ॥ श्रीराम् ॥**

जंव तें ज्ञान नाहीं प्रांजळ । तंव सर्व कांहीं निर्फळ । ज्ञानरहित तळमळ । जाणार नाहीं ॥ १॥

जोंपर्यंत हे ज्ञान स्वच्छपणें झालें नाहीं,तोपर्यंत सर्व काहीं व्यर्थ होय.ज्ञांनावाचून तळमळ जाणार-थांबणार-नाहीं.

ज्ञान म्हणतां वाटे भरम । काये रे बा असेल वर्म । म्हणौनि हा अनुक्रम । सांगिजेल आतां ॥ २॥

ज्ञान म्हटलें की हें काय गूढ आहें असें वाटून मनुष्य भ्रमांत,घोटाळ्यांत पडतो आणि बाबा,ह्यातलें वर्म काय असावें बरे ?असे म्हणतो,म्हणून (ज्ञान नसून ज्यांस लोक समजतात तें प्रथम सांगून मग शुध्द) ज्ञान सांगू (ज्ञानांत कोणत्या गोष्टी येत नाहींत हें प्रथम सांगून मग ज्ञान कोणते तें सांगू)

भूत भविष्य वर्तमान । ठाऊकें आहे परिछिन्न । यासीहि म्हणिजेत ज्ञान । परी तें ज्ञान नव्हे ॥ ३॥

( परिछिन्न - बरोबर माहित असणे )

भूतभविष्यवर्तमान अशा त्रिकालाचें ज्ञान सांगतां येणे त्यालाही ज्ञान म्हणतात,पण तें शुध्द ज्ञान नव्हे.

बहुत केलें विद्यापठण । संगीतशास्त्र रागज्ञान । वैदिक शास्त्र वेदाधेन । हेंहि ज्ञान नव्हे ॥ ४॥

संगीतशास्त्र,रागज्ञान इत्यादि विद्या पढला,वैदिक झाला,शास्त्र,वेद ह्यांचे अध्ययन केलें,पण तें शुध्द ज्ञान नव्हें.

नाना वेवसायाचें ज्ञान । नाना दिक्षेचें ज्ञान । नाना परीक्षेचें ज्ञान । हें ज्ञान नव्हे ॥ ५॥

अनेक उद्योगधंदे,संप्रदायदीक्षा (अनेक दीक्षांचे ज्ञान),परीक्षा,ह्यांचे ज्ञान ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना वनितांची परीक्षा । नाना मनुष्यांची परीक्षा । नाना नरांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ६॥

अनेक स्त्रिया माणसे पुरुष ह्यांची परीक्षा,ह्यांचे ज्ञान ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना अश्वांची परीक्षा । नाना गजांची परीक्षा । नाना स्वापदांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ७॥

घोडें,हत्ती,श्वापदें ह्यांची परीक्षा,ह्यांचे ज्ञान ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना पशूंची परीक्षा । नाना पक्षांची परीक्षा । नाना भूतांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ८॥

पशु,पक्षी,भुतें ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना यानांची परीक्षा । नाना वस्त्रांची परीक्षा । नाना शस्त्रांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ९॥

अनेक वाहनें (यानें),वस्त्रें,शस्त्रें. ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना धातूंची परीक्षा । नाना नाण्यांची परीक्षा । नाना रत्नांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १०॥

धातु,नाणीं,रत्न ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना पाषाण परीक्षा । नाना काष्ठांची परीक्षा । नाना वाद्यांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ ११॥

पाषाण,लांकडें,वाद्यें ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना भूमींची परीक्षा । नाना जळांची परीक्षा । नाना सतेज परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १२॥

भूमी,पाणी,तेजस्वी पदार्थ, ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना रसांची परीक्षा । नाना बीजांची परीक्षा । नाना अंकुर परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १३॥

रस,बीजें,अंकुर ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना पुष्पांची परीक्षा । नाना फळांची परीक्षा । नाना वल्लींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १४॥

फुलें,फळें,वेली ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना दुःखांची परीक्षा । नाना रोगांची परीक्षा । नाना चिन्हांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १५॥

दुःखे,रोग,चिन्हे (लक्षणे,शकुन) ह्यांची परीक्षा असणें हें शुध्द ज्ञान नव्हे.

नाना मंत्रांची परीक्षा । नाना यंत्रांची परीक्षा । नाना मूर्तींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १६॥

मंत्र,यंत्र,मुहुर्त ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना क्षेत्रांची परीक्षा । नाना गृहांची परीक्षा । नाना पात्रांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १७॥

अनेंक क्षेत्रे,घरे,पात्रे (भांडी) ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना होणार परीक्षा । नाना समयांची परीक्षा । नाना तर्कांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १८॥

भविष्य (होणारे),प्रसंग,तर्क. ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना अनुमान परीक्षा । नाना नेमस्त परीक्षा । नाना प्रकार परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ १९॥

अनुमान,निश्र्चय (सिध्दांत) अनेक गोष्टी. ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना विद्येची परीक्षा । नाना कळेची परीक्षा । नाना चातुर्य परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २०॥

विद्या,कला,चातुर्य. ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना शब्दांची परीक्षा । नाना अर्थांची परीक्षा । नाना भाषांची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २१॥

शब्द,अर्थ,भाषा, ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना स्वरांची परीक्षा । नाना वर्णांची परीक्षा । नाना लेक्षनपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २२॥

स्वर,वर्ण,लेखन, ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना मतांची परीक्षा । नाना ज्ञानांची परीक्षा । नाना वृत्तींची परीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २३॥

मतें,ज्ञानें,वृत्ति, ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना रूपांची परीक्षा । नाना रसनेची परीक्षा । नाना सुगंधपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २४॥

सुप,रसना (चव),सुगंध. ह्यांची परीक्षा ते शुध्द ज्ञान नव्हे.

नाना सृष्टींची परीक्षा । नाना विस्तारपरीक्षा । नाना पदार्थपरीक्षा । हें ज्ञान नव्हे ॥ २५॥

जारज अंडजादि चर्तुविध सृष्टि,विस्तार,पदार्थ ह्यांची परीक्षा असणें ते शुध्द ज्ञान नव्हे.

नेमकेचि बोलणें । तत्काळचि प्रतिवचन देणें । सीघ्रचि कवित्व करणें । हें ज्ञान नव्हे ॥ २६॥

नेमकें (मित व मार्मिक) बोलणें,(समयसूचकता) समयोचित उत्तर देणें (हजरजबाबी असणें), शीघ्र कवित्व करणें,

नेत्रपालवी नादकळा । करपालवी भेदकळा । स्वरपालवी संकेतकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २७॥

नेत्रसंकेताची भाषा (नेत्रपल्लवी) निरनिराळे आवाज काढून खुणा करणें,करपल्लवी,अंतःकरणातील जाणणें अथवा प्रतिपक्षांत फूट पाडण्याची कला,स्वरपल्लवी,अनेक प्रकारच्या चिन्हांनी खुणा करणें.

काव्यकुशळ संगीतकळा । गीत प्रबंद नृत्यकळा । सभाच्यातुर्य शब्दकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २८॥

काव्य (करण्याचें) कौशल्य,संगीत कला,गायन,नाटकरचना,नृत्यकला,सभाचातुर्य,वकृत्व,

वग्विळास मोहनकळा । रम्य रसाळ गायनकळा । हास्य विनोद कामकळा । हें ज्ञान नव्हे ॥ २९॥

मोहं पाडणारें गोड भाषण करणें,रम्य व रसाळ गायनकला,हास्यविनोदादि चतुरता,

नाना लाघवें चित्रकळा । नाना वाद्यें संगीतकळा । नाना प्रकारें विचित्र कळा । हें ज्ञान नव्हे ॥ ३०॥

अनेक प्रकारची चित्रकला,अनेक वाद्यें वाजविण्यांत कुशलता,संगीतकला अशा अनेक प्रकारच्या विचित्र कला,

आदिकरूनि चौसष्टि कळा । याहि वेगळ्या नाना कळा । चौदा विद्या सिध्दि सकळा । हें ज्ञान नव्हे ॥३१॥

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चौदा विद्या व चौसष्ट कला,आणि त्यांच्या सिध्दि हें काहीं ज्ञान नव्हे. त्याशिवाय आणखी अनेक कला असतील,पण हें सर्व काहीं शुध्द ज्ञान नव्हें.

असो सकळ कळाप्रवीण । विद्यामात्र परिपूर्ण । तरी ते कौशल्यता, परी ज्ञान- । म्हणोंचि नये ॥३२॥

असो सगळ्या कलांमध्ये निपुण व सर्व विद्यांमध्ये पारंगत झाला तरी ते कौशल्य होय म्हणून त्याला ज्ञान म्हणू नयें.

हें ज्ञान होयेसें भासे । परंतु मुख्य ज्ञान तें अनारिसें । जेथें प्रकृतीचें पिसें । समूळ वाव ॥ ३३॥

( अनारिसें - वेगळेच , प्रकृतीचें पिसें - मायानिर्मित भ्रम )

हें ज्ञान आहेसे वाटते पण मुख्य-शुध्द-ज्ञान तें वेगळेच आहें.त्या ठिकाणीं मायेचे वेड सर्व मिथ्या ठरते.तेथे प्रकृति व तिचे कार्य सारें लय पावतें तें खरे ज्ञान होय.

जाणावें दुसर्याचें जीवीचें । हे ज्ञान वाटे साचें । परंतु हें आत्मज्ञानाचें । लक्षण नव्हे ॥ ३४॥

दुस-या च्या मनांतील ओळखणें हे खरे ज्ञान वाटतें पण हें आत्मज्ञानांचे लक्षण नव्हे.

माहानुभाव माहाभला । मानसपूजा करितां चुकला । कोणी येकें पाचारिला । ऐसें नव्हे म्हणोनी ॥३५॥

उदाहरणार्थ,कोणी एक मोठा महात्मा मानसपूजा करतांना चुकला,इतक्यांत दुस-यानें तें अंर्तज्ञानाने ओळखून "असे नव्हें तुम्ही येथे चुकला",असे म्हणून त्या महात्म्यास तसे स्पष्ट सांगितलें,ह्या अंर्तज्ञानाला आत्मज्ञान म्हणतां येत नाही.)

ऐसी जाणे अंतरस्थिती । तयासि परम ज्ञाता म्हणती । परंतु जेणें मोक्षप्राप्ती । तें हें ज्ञान नव्हे ॥३६॥

असें जो मनांतले जाणतो त्यांस हा मोठा ज्ञानी आहे असे म्हणतात,पण ज्या ज्ञानानें मोक्ष मिळतो ते हे ज्ञान नव्हे.

बहुत प्रकारींची ज्ञानें । सांगों जातां असाधारणें । सायोज्यप्राप्ती होये जेणें । तें ज्ञान वेगळें ॥ ३७॥

अशीं अनेक प्रकारचीं असाधारण ज्ञानें जगात आहेत. सांगू गेले तर ती संपावयाची नाहीत,पण जेणे करुन सायुज्यमुक्ति मिळेल तें ज्ञान वेंगळे.

तरी तें कैसें आहे ज्ञान । समाधानाचें लक्षण । ऐसें हें विशद करून । मज निरोपावें ॥ ३८ ॥

तेव्हा तें ज्ञान व त्यापासून होणारें समाधान कसे आहें हे मला स्पष्ट करुन सागावें.

ऐसें शुद्ध ज्ञान पुसिलें । तें पुढिले समासीं निरोपिलें । श्रोतां अवधान दिधलें । पाहिजे पुढें ॥ ३९॥

अशाप्रकारे श्रोत्यांने शुध्दज्ञान विचारलें तें पुढील समासांत सांगितलें आहें तिकडे आता एकाग्र लक्ष द्यावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बहुधाज्ञाननाम समास पंचवा ॥ ५॥**

**समास सहावा : शुद्धज्ञान निरूपण ॥ श्रीराम् ॥**

ऐक ज्ञानाचें लक्षण । ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान । पाहावें आपणासि आपण । या नांव ज्ञान ॥ १॥

आतां (शुध्द)ज्ञानाचे लक्षण ऐक,ज्ञान म्हणजे आत्मज्ञान मी "कोण" हें ओळखणें ह्याचें नांव (आत्म-)ज्ञान. (आपणांस आपण पहावें ह्यांचे नांव ज्ञान)

मुख्य देवास जाणावें । सत्य स्वरूप वोळखावें । नित्यानित्य विचारावें । या नांव ज्ञान ॥ २॥

मुख्य देवाला ओळखावें सत्यस्वरुप समजून घ्यावें. नित्य काय व अनित्य काय याचा विचार करावा,(मुख्य देवांस जाणावें,म्ह.नित्यानित्यविचारानें अनित्याचा त्याग करुन नित्य शाश्वत स्वरुप ओळखावें) त्याचें नावं ज्ञान.

जेथें दृश्य प्रकृति सरे । पंचभूतिक वोसरे । समूळ द्वैत निवारे । या नांव ज्ञान ॥ ३॥

( वोसरे - नाहीसे होते )

ज्या ठिकाणीं दृश्याकार प्रकृतीचा लय होतो,पंचभूतांचे खेळ सगळे नाहीसें होतात आणि द्वैतही सर्व समूळ मावळून जाते.त्यास ज्ञान म्हणतात.

मनबुद्धि अगोचर । न चले तर्काचा विचार । उल्लेख परेहुनि पर । या नांव ज्ञान ॥ ४॥

( परेहुनि पर -परावाणीच्या पलीकडे (ब्रह्म) , नाभिस्थानी - परा , हृदयस्थानी - पश्यंती,कंठस्थानी - मध्यमा , बाहेर पडणारी - वैखरी )

मनाला व बुध्दीला जे कळत नाही (ज्याचे ज्ञान होत नाही,मन-बुध्दि जेथें पोहोचत नाहींत) तर्क करुन जे जमणार नाही(तर्क जेथे मागे सरतो) आणि (नाभिस्थानी असणा-या स्फुरणरुप)परावणीच्या पलिकडे आहे असे ज्याचें वर्णन (उल्लेख, निर्देश) करतात त्यांचे नाव ज्ञान.

जेथें नाहीं दृश्यभान । जेथें जाणीव हें अज्ञान । विमळ शुद्ध स्वरूपज्ञान । यासि बोलिजे ॥५॥

( जा (जागृती),स्व (स्वप्न),सु (सुषुप्ती) ,तू (तुर्या) या ४ अवस्था यात सुषुप्तीत मन व इंद्रिये याचा अज्ञानात लय होतो व तुर्येत जीवाला स्वस्वरूपाचे सोपाधिक ज्ञान होते व उन्मानीत मनाचाही लय होऊन निर्विकल्प समाधी लागते, जाणीव शिलक असणे हे अज्ञान समजले जाते,भगवंत स्वरूपी जाणीव व नेणीव नाही )

जेथें दृश्याचें भानही राहात नाहीं व जेथे मी ब्रह्म आहे हि जाणिवही अज्ञानाचे लक्षण समजले जाते असे जे निर्मल व शुध्द (आत्म-)स्वरुप त्यांस ज्ञान म्हणतात.

सर्वसाक्षी अवस्ता तुर्या । ज्ञान ऐसें म्हणती तया । परी तें जाणिजे वायां । पदार्थज्ञान ॥६॥

सर्वसाक्षिणी जी तुर्या अवस्था (जाणे ब्रह्म जाणे माया )किंवा जागृति,स्वप्न,सुषुप्ति अशा तिन्ही अवस्थांस जाणणारी चौथी महाकारण देहाची अवस्था किंवा वृत्ति),तिलाही ज्ञान म्हणतात.पण ते पदार्थज्ञान होय तेहीं मिथ्याच.

दृश्य पदार्थ जाणिजे । त्यास पदार्थज्ञान बोलिजे । शुद्ध स्वरूप जाणिजे । या नांव स्वरूपज्ञान ॥ ७॥

कारण दृश्य पदार्थ जाणणे ह्यास पदार्थज्ञान म्हणतात आणि शुध्दस्वरुप जाणणे ह्याचे नाव स्वरुपज्ञान.

जेथें सर्वचि नाहीं ठाईंचें । तेथें सर्वसाक्षत्व कैंचें । म्हणौनि शुद्ध ज्ञान तुर्येचें । मानूंचि नये ॥ ८॥

जेथे सर्व (दृश्य) म्हणून मुळींच काहीं नाहीं,तेथें त्या सर्वांचे साक्षित्व तरी कसलें ? ह्यांसाठीं तुर्येला शुध्दज्ञान म्हणतां येत नाहीं,(जेथे काहीच ठिकाणावर नाहीं-अरे जे झालेचि नाही-तेथे "सर्व"कोठचे व त्याचें "साक्षित्व" कोठचे ?म्हणून तुर्येला ज्ञान म्हणता कामा नयें)

ज्ञान म्हणिजे अद्‌वैत । तुर्या प्रत्यक्ष द्‌वैत । म्हणौनि शुद्ध ज्ञान सतंत । वेगळेंचि असे ॥ ९॥

ज्ञान म्हणजे अद्वैत (एकटी आत्मवस्तूच) आणि तुर्या ही तर उघड द्वैतातील आहे म्हणुन शुध्द स्वरुपज्ञान हें नेहमीं तुर्येहून वेगळें आहें. कारण तेथे काही दृश्य व त्याचा द्रष्टा असा भेदभाव असतो. म्हणजे शुध्द ज्ञान साक्षित्वाहून वेगळे आहें.

ऐक शुद्ध ज्ञानाचें लक्षण । शुद्ध स्वरूपचि आपण । या नांव शुद्ध स्वरूपज्ञान । जाणिजे श्रोतीं ॥ १०॥

शुध्दस्वरुपच आपण (आहोंत) हें शुध्द ज्ञानाचें लक्षण होय,त्यालाच शुध्द स्वरुपज्ञान असे म्हणतात.हें श्रोत्यांनी लक्षांत ठेवावें.

माहावाक्यौपदेश भला । परी त्याचा जप नाहीं बोलिला । तेथीचा तो विचारचि केला ।पाहिजे साधकें॥ ११॥

"तत्वमसि" ह्या महावाक्याचा उपदेश चांगला खरा,पण त्या महावाक्याचा जप करावयास कोठे सांगितला नाहीं,साधकानें त्या वाक्याचा विचारच करावयास पाहिजें.

माहावाक्य उपदेशसार । परी घेतला पाहिजे विचार । त्याच्या जपें, अंधकार । न फिटे भ्रांतीचा ॥ १२॥

महावाक्य हे सर्व उपदेशांचे सार आहें,पण त्याचा विचार ग्रहण करावयास पाहिजें,त्याच्या नुसत्या जपानें भ्रांतीचा अंधःकार दूर होणार नाहीं.

माहावाक्याचा अर्थ घेतां । आपण वस्तुचि तत्वतां । त्याचा जप करितां वृथा । सीणचि होये ॥ १३॥

महावाक्याचा अर्थ घेत गेले तर साधक खरोखरच ब्रह्म बनेल,पण त्याचा जप करीत बसलें तर फुकट श्रम होतील.

माहावाक्याचे विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण । शुद्ध लक्ष्यांचें आपण । वस्तुच आहे ॥ १४॥

महावाक्याचे विवरण करणें हें शुध्दज्ञानाचें लक्षण होय,त्याचा (महावाक्याचा) शुध्द लक्ष्यांश पाहिला तर आपण (वस्तुच) ब्रह्मरुपच आहोंत.

आपला आपणासि लाभ । हें ज्ञान परम दुल्लभ । जें आदिअंतीं स्वयंभ । स्वरूपचि स्वयें ॥ १५॥

जें आरंभी व शेवटीं स्वयंभू स्वरुप आहें,तेंच आपण आहोत,अशा प्रकारे ज्यायोगें आपलाच आपल्याला लाभ होतो तें ज्ञान अत्यंत दुर्लभ होय.(स्वरुपाच्या लाभापेक्षा ज्ञान दुसरे कोणते ? अनादि स्वयंसिध्द वस्तुच आपण आहोत हा परमलाभ परम दुर्लभ होय.)

जेथून हें सर्व ही प्रगटे । आणि सकळही जेथें आटे । तें ज्ञान जालियां फिटे । भ्रांति बंधनाची ॥ १६॥

जेथून हा विश्र्वाकार उत्पन्न होतो व जेथे त्याचा लय होतो ते ज्ञान (-स्वरुप) झाल्यावर बंधनाची (मी जीव,मज बंधन) भ्रांति नाहीशी होते.

मतें आणी मतांतरें । जेथें होती निर्विकारें । अतिसूक्ष्म विचारें । पाहातां ऐक्य ॥ १७॥

( होती निर्विकारें - विरून जातात )

(आणि मग) तेथे सर्व मतांमतांतरे दुबळीं (लटकीं) पडतात,अतिसूक्ष्म विचारानें पाहिलें असतां सर्वत्र ऐक्यरुपच दिसतें.

जे या चराचराचें मूळ । शुद्ध स्वरूप निर्मळ । या नांव ज्ञान केवळ । वेदांतमतें ॥ १८॥

ह्या चराचराचें मूळ असें जें शुध्द व निर्मल (स्वरुप) ब्रह्म-विमल ब्रह्म-त्यालाच वेंदांत मताप्रमाणें केवल (शुध्द) ज्ञान म्हणतात.

शोधितां आपलें मूळ स्थान । सहजचि उडे अज्ञान । या नांव म्हणिजे ब्रह्मज्ञान । मोक्षदायेक ॥ १९॥

अशा त्या आपल्या मूळच्या स्थानाचा (जुनें ठेवणें) शोध केला असतां अज्ञान आपोआपच नाहीसें होतें. ह्यालाच स्वस्वरुपाच्या लाभालाच-मोक्षदायक ब्रह्मज्ञान म्हणतात.

आपणासि वोळखों जातां । आंगीं बाणे सर्वज्ञता । तेणें येकदेसी वार्ता । निशेष उडे ॥ २०॥

आपली आपणास पुर्ण ओळख झाली कीं सर्वज्ञता (सर्व ब्रह्ममय असून ते ब्रह्म मीच आहे असे ज्ञान) आंगात बिंबते. त्यामुळे एकदेशी (आकुंचितपणाच्या) सर्व गोष्टी समूळ नाहींशा होतात.

मी कोण ऐसा हेत । धरून, पाहातां देहातीत । आवलोकितां नेमस्त । स्वरूपचि होये ॥ २१॥

मी कोण असा हेतु धरुन शोधायला लागलें म्हणजे मी देहाहून वेगळा आहें आणि निश्र्चय धरुन अधिक शोध घेतला की आत्मस्वरुपाची प्राप्ति होते,मी स्वत: आत्मस्वरुपच होय.

असो पूर्वीं थोर थोर । जेणें ज्ञानें पैलपार । पावले, ते साचार । ऐक आतां ॥ २२॥

असो,पूर्वी ह्या ज्ञानांमुळे मोठमोठे संसारसागरातून खरोखर पार पडले अशांची नावें आता ऐका.

व्यास वसिष्ठ माहामुनी । शुक नारद समाधानी । जनकादिक माहाज्ञानी । येणेंचि ज्ञानें ॥ २३॥

महर्षि व्यास आणि वसिष्ठ,शुक,नारदासारखे समाधानी,जनकासारखे महाज्ञाते याच ज्ञानाने तरुन गेलें.

वामदेवादिक योगेश्वर । वाल्मीक अत्रि ऋषेश्वर । शोनिकादि अध्यात्मसार । वेदांतमतें ॥ २४॥

वामदेवादि योगेश्र्वर,वाल्मीक,अत्रि आदिकरुन ऋषिवर,तसेच वेदांतमताप्रमाणे अध्यात्माचे सार जाणणारे (शुनक भार्गवाचे पुत्र व अश्र्वलायनांचे गुरु) शौनक आदिकरुन,

सनकादिक मुख्यकरूनी । आदिनाथ मीन गोरक्षमुनी । आणीक बोलतां वचनी । अगाध असती ॥२५॥

सनकादिक,मुख्य मुख्य धरुन आदिनाथ,मीन (मत्स्येंद्रनाथ),गोरक्षनाथ आणखीही सांगु लागलो तर असंख्य आहेत.

सिद्ध मुनी माहानुभाव । सकळांचा जो अंतर्भाव । जेणें सुखें माहादेव । डुल्लत सदा ॥ २६॥

हे सर्व थोर थोर सिध्दमुनि व महात्मे ह्याच ज्ञानाने धन्य झालें,आणि ह्याच ज्ञानानंदानें महादेव सदा डोलत असतात.

जें वेदशास्त्रांचें सार । सिद्धांत धादांत विचार । ज्याची प्राप्ती भाग्यानुसार । भाविकांस होये ॥२७॥

वेदशास्त्रांचे रहस्य,गुरुप्रचीति व आत्मप्रचीति ह्यांचा विचार हाच होय आणि त्याची प्राप्ति भांविकांस भाग्यानुसार होते.

साधु संत आणी सज्जन । भूत भविष्य वर्तमान । सर्वत्रांचें गुह्य ज्ञान । तें संगिजेल आतां ॥ २८॥

तसेच पुर्वीचे,हल्लीचे व पुढे होणारे जे संत,साधु,सज्जन ह्या सगळ्यांचे गुह्यज्ञान तें आता सांगतो.

तीर्थें व्रतें तपें दानें । जें न जोडे धूम्रपानें । पंचाग्नी गोरांजनें । जें प्राप्त नव्हे ॥ २९॥

तीर्थे,व्रते,तपें,दानें,धूम्रपान (धूर पिऊन तप करणे),पंचाग्निसाधन (चार बाजूंना अग्नि पेटवून व मस्तकावर सूर्याचा ताप घेऊन केलेले तप),गोरांजन (स्वत:स जाळून घेणें) इत्यादि साधनांनी जें मिळत नाहीं.असे हे शुध्द ज्ञान आहें.

सकळ साधनाचें फळ । ज्ञानाची सिगचि केवळ । जेणें संशयाचें मूळ । निशेष तुटे ॥ ३०॥

( सिगचि - परमावधी,शिखरअवस्था )

सर्वं साधनांचे फळ व ज्ञानाचे केवळ शिखर असे हे आत्मज्ञान आहें.(हे झालें असता सर्व संशयांचे मूळ पार तुटून जातें(सर्व संशय दूर होतात.)

छपन्न भाषा तितुके ग्रंथ । आदिकरून वेदांत । या इतुकियांचा गहनार्थ । येकचि आहे ॥ ३१॥

छप्पन भाषांतील सर्व मोठे ग्रंथ व वेदांतादि सर्व शास्त्रे ह्यांचे रहस्य हे एकच आहें.

जें नेणवे पुराणीं । जेथें सिणल्या वेदवाणी । तेंचि आतां येचि क्षणीं । बोधीन गुरुकृपें ॥ ३२॥

जे पुराणांना समजत नाही, जेथे वेदांनी हात टेकलें,ते रहस्य सद्गुरुकृपेनेंच आतांच सांगतो.

पाहिलें नस्तां संस्कृतीं । रीग नाहीं मऱ्हाष्ट ग्रंथीं । हृदईं वसल्या कृपामुर्ती । सद्गुरु स्वामी ॥ ३३॥

संस्कृत पाहिले नाही. (संस्कृत ग्रंथात माझा प्रवेश झाला नाहीं) व मराठी ग्रंथात माझी गति नाहीं,पण ह्रदयांत कृपामुर्ती सदगुरुस्वामी बसलें आहेत.

आतां नलगे संस्कृत । अथवा ग्रंथ प्राकृत । माझा स्वामी कृपेसहित । हृदईं वसे ॥ ३४॥

आता संस्कृत प्राकृत ग्रंथांची आवश्यकता नाही.आता माझा स्वामी (सद्गुरुनाथ) कृपेसह माझ्या ह्रदयांत येऊन राहिला आहें.

न करितां वेदाभ्यास । अथवा श्रवणसायास । प्रेत्नेंविण सौरस । सद्‌गुरुकृपा ॥ ३५॥

( प्रेत्नेंविण सौरस - प्रयत्नाशिवाय मधुरस )

वेदाभ्यास,किंवा श्रवणाची यातायात न करतां म्हणजे कोणत्याही प्रयत्नांवाचून (केवळ) सदगुरुकृपा जें देते तें गोड (प्रसादरुप) असतें.(माझ्या प्रयत्नांवाचून सदगुरुकृपेचा प्रसाद जोडला आहें.)

ग्रंथ मात्र मर्‍हाष्ट । त्याहून संस्कृत श्रेष्ठ । त्या संस्कृतामधें पष्ट । थोर तो वेदांत ॥ ३६॥

सगळ्या मराठी ग्रंथांपेक्षा संस्कृत ग्रंथ श्रेष्ठ संस्कृतग्रंथांतही वेदांत थोर.

त्या वेदांतापरतें कांहीं । सर्वथा श्रेष्ठ नाहीं । जेथें वेदगर्भ सर्वही । प्रगटजाला ॥ ३७॥

वेदरहस्य ज्यांत प्रकट झाले आहे त्या वेंदांतापेक्षा दुसरे काहीही-कोणतेही-शास्त्र श्रेष्ठ नाहीं कारण त्यात वेदांचे सर्व रहस्य प्रकट झाले आहें,(वेंदांताचाही अर्क असा हा परमार्थ आहे.)

असो ऐसा जो वेदांत । त्या वेदांताचाहि मथितार्थ । अतिगहन जो परमार्थ । तो तूं ऐक आतां ॥३८॥

अस्तु असा जो वेदांत त्याचाही अत्यंत गूढ असा सारांश असा जो परमार्थ-तो-तूं-आता ऐक.

अरे गहनाचेंही गहन । तें तूं जाण सद्‌गुरुवचन । सद्‌गुरुवचनें समाधान । नेमस्त आहे ॥ ३९॥

अरे गहनांचेही गहन तेंच सद्गुरुवचन हें तू ध्यांनात ठेव. त्या सद्गुरुवचनानें निश्र्चयेकरुन समाधान होतें.

सद्‌गुरुवचन तोचि वेदांत । सद्‌गुरुवचन तोचि सिद्धांत । सद्‌गुरुवचन तोचि धादांत । सप्रचीत आतां ॥४०॥

वेदांत,सिध्दांत,धादांत सर्व काहीं सद्गुरुवचन आहें.हेंच आता तुझ्या अनुभवाला येत आहें.

जें अत्यंत गहन । माझ्या स्वामीचें वचन । जेणें माझे समाधान । अत्यंत जालें ॥ ४१॥

माझ्या सद्गुरुनाथांचे वचन जें अत्यंत गहन व ज्याच्या योगानें माझें परिपूर्ण समाधान झालें,

तें हें माझें जीवीचें गुज । मी सांगैन म्हणतों तुज । जरी अवधान देसी मज ॥तरी आतां येच क्षणीं ॥४२॥

तें हें माझ्या अंत:करणातले रहस्य (माझ्या जीवाचें गुज),तूं जर मजकडे लक्ष देशील तर,आतां ह्याच क्षणाला तुला सांगेन म्हणतों.

शिष्य म्लान वदनें बोले । धरिले सदृढ पाउले । मग बोलों आरंभिलें । गुरुदेवें ॥ ४३॥

(हें ऐकून) शिष्यानें दीनवाणें तोंड करुन सद्गुरुचरण घट्ट धरले व प्रार्थना केली. तेव्हा सद्गुरुंनी बोलण्यास आरंभ केला.

अहं ब्रह्मास्मि माहांवाक्य । येथीचा अर्थ अतर्क्य । तोही सांगतों, ऐक्य । गुरुशिष्य जेथें ॥४४॥

अहं ब्रह्मास्मि म्हणजे मी ब्रह्म आहें ह्या (यर्जुवेदांतर्गत) महावाक्याचा विचार तर्काने कळणें कठिण आहें,तेथे (ब्रह्म) सद्गुरु व (अहम्) शिष्य असा भेद नाहीसा होऊन ऐक्य होतें,तोही प्रकार सांगतों,(तो गुरुशिष्यांच्या एकांतातला प्रकार सांगतों.)

ऐक शिष्या येथीचें वर्म । स्वयें तूंचि आहेसि ब्रह्म । ये विषईं संदेह भ्रम । धरूंचि नको ॥ ४५॥

गुरु सांगतात-शिष्या! ह्यांतील रहस्य ऐक, तू स्वतः ब्रह्म (-स्वरुप) आहेस,ह्याविषयीं शंका किंवा भ्रम ठेवूं नकोस.

नवविधा प्रकारें भजन । त्यांत मुख्य तें आत्मनिवेदन । तें समग्र प्रकारें कथन । कीजेल आतां ॥४६॥

नऊ प्रकारच्या भक्तींमध्ये आत्मनिवेदन मुख्य आहें ते आतां सविस्तर सांगण्यात येईल.(नवविधा भजनांतले मुख्य भजन म्हणजे आत्मनिवेदन होय)

निर्माण पंचभूतें यीयें । कल्पांतीं नासतीं येथान्वयें । प्रकृति पुरुष यीयें । तेही ब्रह्म होती ॥ ४७॥

हीं उत्पन्न झालेली पंचभूते कल्पप्रळयाच्या वेळी (कल्पांती) (ज्या क्रमाने उत्पन्न झालीं त्याच्या उलट म्हणजें पृथ्वी आपांत इत्यादि )ह्या क्रमानें नाश पावतील आणि (हीं पंचभुते ज्यापासून झाली तें),प्रकृति-पुरुषही परब्रह्मांत लीन होतात.

दृश्य पदार्थ आटतां । आपणहि नुरे तत्वतां । ऐक्यरूपें ऐक्यता । मुळींच आहे ॥ ४८॥

सगळे दृश्य (भासासह) विवेकांने नाहीसें झालें,की द्रष्टा म्हणजें-अहं-मीही उरत नाही,कां की,ब्रह्माहून तो मुळींच भिन्न नाहीं त्यांचे मुळचेंच ऐक्य आहें.

सृष्टीची नाहीं वार्ता । तेथें मुळींच ऐक्यता । पिंड ब्रह्मांड पाहों जातां । दिसेल कोठें ॥ ४९॥

तेथे सृष्टीचे दृश्याचे नावही राहात नाहीं,मुळचींच ऐक्यता आहें (सृष्टि म्ह.दृश्य उडालें की ऐक्य मूळचेच आहें) मग त्या ऐक्याच्या दृष्टीनें पाहू गेलें असता पिंड-ब्रह्मांड दिसणार तरी कोठचें ?

ज्ञानवन्ही प्रगटे । तेणें दृश्य केर आटे । तदाकारें मूळ तुटे । भिन्नत्वाचें ॥ ५०॥

ज्ञानाग्नि भडकला कीं सगळा दृश्याचा केर जळून जातो आणि (ब्रह्माशी) तदाकारता झाली की भिन्नत्वाचें मूळ (अहं)तुटून जातें.

मिथ्यत्वें वृत्ति फिरे । तों दृश्य असतांच वोसरे । सहजचि येणें प्रकारें । जालें आत्मनिवेदन ॥५१॥

दृश्यभास सर्व मिथ्या आहे हे जाणून वृत्ति (स्वरुपाकडे) परत फिरली (द्दश्य सृष्टी मिथ्या आहे, हे जाणून वृत्ति माघारली),कि दृश्य असुनही नसल्यासारखे होते.अशाप्रकारे आत्मनिवेदन सहजच घडतें.

असो गुरूचे ठाईं अनन्यता । तरी तुज कायेसी रे चिंता । वेगळेंपणें अभक्ता । उरोंचि नको ॥ ५२॥

अस्तु ,(ब्रह्मस्वरुप अशा) सद्गुरुचे ठिकाणीं अनन्यभाव ठेवलास तर मग तुला काळजी कशाला करायला हवी ? ह्यासाठीं,हे अभक्ता (गुरुपासून वेगळा पडलेल्या) तूं (सद्गुरुशीं) भिनत्वानें राहूच नकोस,(त्याच्या इच्छेशी समरस होऊन जा)(शुध्द स्वरुप हेंच गुरुपद आहें,त्याशी अनन्य हो,त्याहून वेगळा उरु नकोस).

आतां हेंचि दृढीकर्ण- । व्हावया, करीं सद्गुरुभजन । सद्गुरुभजनें समाधान । नेमस्त आहे ॥ ५३॥

आतां हेंच (ऐक्य) पक्के होण्यासाठीं सद्गुरुसेवा कर, सद्गुरुसेवेच्या योगाने खात्रीने समाधान मिळेल.(हा निश्र्चय सद्गुरुभजनांत दृढ कर).

या नांव शिष्या आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान । भवभयाचें बंधन । समूळ मिथ्या ॥ ५४॥

शिष्या,ह्याचेच नांव आत्मनिवेदन,ह्याने तुझे समाधान होईल, व मग संसारभयाचे बंधन सर्वस्वी लटके पडेल.(आत्मज्ञान हें होय.तेथें भव कोणाचा व बंधन कोठचे ? "अहं ब्रह्मास्मि" ह्याचा अनुभव असा आहें).

देह मी वाटे ज्या नरा । तो जाणावा आत्महत्यारा । देहाभिनानें येरझारा । भोगिल्याच भोगी ॥ ५५॥

गुरु आणखी म्हणतात,ज्या माणसाला "मी म्हणजे हा देह" असें वाटतें तो आत्मघातकी होय,देहाभिमानाच्या योगाने,देहाभिमानाच्या योगानें जन्ममृत्यूचे आजपर्यंत भोगलेले फेरे पुन्हा भोगावे लागतील.( "मी ब्रह्म" ह्या अनुभवानें जसें जीवाचे साफल्य होतें,तसे "मी देह" म्हटल्यानें जीवाचें पतन होतें,देहाभिमानी जीव आत्मघातकी होय,तो जन्ममृत्यु पुन्हा पुन्हा भागतो)

असो चहूं देहावेगळा । जन्मकर्मासी निराळा । सकळ आबाळगोबळा । सबाह्य तूं ॥ ५६॥

( आबाळगोबळा - एकूण या चित्रविचित्र सृष्टीत )

अस्तु,शिष्या! तू चारी देहांहून वेगळा,जन्मकर्माहून निराळा आणि एकंदर चराचरास अंर्तबाह्य व्यापलेला असा आहेस.(तूं चारही देहांच्या पलीकडला आहेस,जन्मकर्माचा तुझा संबंध नाही. तू सर्वांच्या आतबाहेर भरलेले ब्रह्मच आहेंस)

कोणासीच नाहीं बंधन । भ्रांतिस्तव भुलले जन । दृढ घेतला देहाभिमान । म्हणौनियां ॥ ५७॥

(वास्तविक पाहाता) कोणालाच बंधन नाहीं.पण देह मी असा अभिमान बळकट धरल्यामुळें भ्रांतीने हे लोक भुलले आहेत.

शिष्या येकांतीं बैसावें । स्वरूपीं विश्रांतीस जावें । तेणें गुणें दृढावे । परमार्थ हा ॥ ५८॥

शिष्या! ऐकांतात (बाह्य एकांत-सदा सेविं आरण्य-तारुण्यकाळी।अंतरंग एकांत-मिळेना कदा कल्पनेचेनि मेळी। असा दोन्ही प्रकारचा एकांत पाहिजे) स्वरुपाच्या ठिकाणी लीन हो,म्हणजे तुझा हा परमार्थ दृढ होत जाईल.( तू एकांती बसून स्व-स्वरुपीं विश्रांति सुख भोगू लाग म्हणजे हा परमार्थ दृढ होत जाईल.)

अखंड घडे श्रवणमनन । तरीच पाविजे समाधान । पूर्ण जालियां ब्रह्मज्ञान । वैराग्य भरे आंगीं ॥ ५९॥

अध्यात्माचें श्रवणमनन सदोदित घडलें तरच समाधान मिळतें, आणि मग ब्रह्मज्ञान पूर्णपणें झाल्यावर (खरें) वैराग्य (नको म्हणतां) आंगात बाणतें.

शिष्या मुक्तपणें अनर्गळ । करिसीं इंद्रियें बाष्कळ । तेणें तुझी तळमळ । जाणार नाहीं ॥ ६०॥

( अनर्गळ - निर्बंध,मनसोक्त )

शिष्या! मी मुक्त आहें अशा घमेंडीत स्वैर वागशील, व इंद्रियांना मोकळे सोडशील (चावट करशील) तर त्यायोगें तुझ्या अंतःकरणाची तळमळ जाणार नाहीं.

विषईं वैराग्य उपजलें । तयासीच पूर्ण ज्ञान जालें । मणी टाकितांचि लाधलें । राज्य जेवीं ॥ ६१॥

मणी होतां सीगटाचा । लोभ धरूनिया तयाचा । मूर्खपणें राज्याचा । अव्हेर केला ॥ ६२॥

विषयांसंबंधी (तीव्र) वैराग्य ज्याला उत्पन्न होईल,त्यालाच आत्मज्ञान पूर्णपणे बाणेल,नाहीं तर एखाद्या वेड्यानें शिंगाच्या क्षुद्र मण्याचा लोभ धरुन चालत आलेल्या राज्यपदास मूर्खपणाने लाथाडावें (त्याप्रमाणे विषयांच्या मण्याचा लोभ धरुन ब्रह्मसाम्राज्यास मुकावें) पण तो क्षुद्र मणी टांकतांच राज्यपद मिळावें (विषय टांकताच ब्रह्मपद मिळावें) असें होईल.(एकाद्या शिंगाच्या क्षुद्र मण्याच्या लोभाने राजाने राज्य गमवावे त्याप्रमाणे विषयांच्या भरी भरुन आत्मसमाधान सोडूं नकोंस)

ऐक शिष्या सावधान । आतां भविष्य मी सांगेन । जया पुरुषास जें ध्यान । तयासि तेंचि प्राप्त ॥६३॥

शिष्या !तुला आतां मी एक भविष्य सागतो,सावध होऊन ऐक,ज्या पुरूषाला जे ध्यान लागून राहाते त्याला तेंच प्राप्त होते.(ज्याचे ध्यान करावें तेच प्राप्त होतें,असा नियम आहें)(अविद्येचे म्हणजे संसाराचे ध्यान करावयाचे सोडून ब्रह्मविद्येचा संग करावा म्हणजें ब्रह्मपदप्राप्ति होईल.)

म्हणोनि जे अविद्या । सांडून धरावी सुविद्या । तेणें गुणें जगद्वंद्या । पाविजे सीघ्र ॥ ६४॥

म्हणून जी अविद्या (देह मी अशी बुध्दि) आहे ती टाकून सद्विद्या (मी देह नसून सच्चिदानंदपरमात्मा आहे अशी बुध्दि )हिचा अभ्यास करावा,त्यायोगें जगद्वंद्य परमात्माप्रत तूं लवकर पाहोंचशील.

सन्यपाताचेनि दुःखें । भयानक दृष्टीस देखे । औषध घेतांचि सुखें । आनंद पावे ॥ ६५॥

सन्निपाताच्या व्याधींमुळें (ज्वराच्या योगानें अंगात ताप भरला की) भयंकर देखावे दृष्टी पुढे दिसतात.(व मनुष्य भिऊन जातो) पण त्यावर औषध घेतलें कीं सहजच (व्याधि नाहीशी होऊन ताप उतरला की) आनंद होतो.

तैसें अज्ञानसन्यपातें । मिथ्या दृष्टीस दिसतें । ज्ञानाओषध घेतां तें । मुळींच नाहीं ॥ ६६॥

त्याप्रमाणे अज्ञानरुप सन्निपाताच्या व्याधींमुळें काहीतरी खोटेच डोळ्यास दिसू लागते(मिथ्या सृष्टी दृष्टीला दिसून खरिशीं वाटते,) पण त्यावर आत्मज्ञानरुपी औषध घेतलें की (जे मुळीच नव्हे) तें नाहीसे होते.(सृष्टी दृष्टीसमोर ठरतच नाहीं)

मिथ्या स्वप्नें वोसणाला । तो जागृतीस आणिला । तेणें पूर्वदशा पावला । निर्भय जे ॥ ६७॥

खोट्या स्वप्नाने जो घाबरुन ओरडूं लागला (वोसणला) त्याला जागें केले कीं,त्याची जी पूर्वीची निर्भय स्थिति त्याला (सहजच) प्राप्त होते.

मिथ्याच परी सत्य वाटलें । तेणें गुणें दुःख जालें । मिथ्या आणी निरसलें । हें तों घडेना ॥ ६८॥

( मिथ्या आणी निरसलें - स्वप्न मिथ्या हे खरेच पण त्याचा मनावर परिणाम झाल्यावाचून विरून गेले असे घडत नाही.)

स्वप्न खोटेंच पण निजलेल्यास तें खरें वाटलें म्हणून त्याला दु:ख झालें,(स्वप्न मूळचे) मिथ्या असलें तथापि स्वप्नवश माणसाला त्याचा नाश करतां येत नाहीं.(स्वप्न हा पदार्थच खोटा-वांझेचा पुत्र,किंवा गंधर्वनगरातलें सैन्य ह्याप्रमाणें अशा खोट्या पदार्थाचा नाश काय करावयाचा ?)(मिथ्या सृष्टि सत्य वाटल्यामुळेंच तिच्या संगाने दु:ख होतें.ती सत्य वाटते तोवर तिचा निरास होत नाही.)

मिथ्या आहे जागृतासी । परी वेढा लाविलें निद्रिस्तांसी । जागा जालियां तयासी । भयेंचि नाहीं॥ ६९॥

( वेढा लाविलें - भुलविले )

जागा असेल त्यास (जागृत झालेल्या पुरुषास) स्वप्न खोटें वाटतें पण तें झोपलेल्यास निद्रितास भुलवितें. तोच जागा झाला कीं तें भय (व त्यांचे कारण ह्यांसह) खोटें पडते.(जागृति आल्यावर तो निर्भयता पावतो.)

परी अविद्याझोंप येते भरें । भरे सर्वांगी काविरें । पूर्ण जागृती श्रवणद्वारें- । मननें करावी ॥ ७०॥

( भरें - भ्रम , काविरें - कापरे )

त्याचप्रमाणें जीवाला अविद्यारुपी झोंप गाढ (भरें) लागली असल्यामुळें त्याचें सर्वांग भ्रमानें व्यापिलें जातें (जीव भयानें व्याप्त असतो) ह्यास्तव अध्यात्म-श्रवण मननाच्या योंगानें त्याला पूर्ण जागें करावें.(श्रवणमननाद्वारे जागृतीस यावें.)

जागृतीची वोळखण । ऐक तयाचें लक्षण । जो विषईं विरक्त पूर्ण । अंतरापासुनी ॥ ७१॥

(जागृताची लक्षणें सागतों) जागा झाल्याची खूण ही की तो अंतःकरणापासून विषयांविषयी पुर्ण विरक्त असतो,हें त्याचे लक्षण ध्यानांत ठेव.

जेणें विरक्तीस न यावें । तो साधक ऐसें जाणावें । तेणें साधन करावें । थोरीव सांडुनी ॥ ७२॥

असें वैराग्य ज्याला येत नाहीं तो साधक आहें असें समजावें आणि त्यांने (आपली सिध्दपणाची) थोरवी (आली नसल्यास टाकून देऊन साधन करावयास लागावें.( जो विरक्त झाला नाही त्यानें अभिमान सोडून साधन करावें.)

साधन न मने जयाला । तो सिद्धपणे बद्ध जाला । त्याहूनि मुमुक्ष भला । ज्ञानाधिकारी ॥ ७३॥

साधन करणें ज्याला पटत नाहीं त्याला त्याचा सिध्दपणाच बंधनाला कारण होतो. त्याच्यापेक्षां मुमुक्षुही ज्ञानाचा अधिकारी-होय.(विरक्त नसून साधनही ज्याला करवत नाहीं तो स्वतःस सिध्द समजत असला तरी त्याचें हें समजणेंच त्याला मोंठे घातक असें बंधन होतें,सिध्दपणें बध्द अशांपेक्षा मुमुक्षु बरा,कां की तो ज्ञानाचा अधिकारी असतो.

तंव शिष्यें केला प्रश्न । कैसें बद्धमुमुक्षाचें लक्षण । साधक सिद्ध वोळखण । कैसी जाणावी ॥ ७४॥

तेव्हां शिष्यांने प्रश्न केला कीं बध्द,मुमुक्षु,साधक व सिध्द ह्यांचीं लक्षणें काय आहेतं ?ते कसे ओळखावें ?

याचें उत्तर श्रोतयांसी । दिधलें पुढिलीये समासीं । सावध श्रोतीं कथेसी । अवधान द्यावें ॥ ७५॥

ह्यांचे उत्तर श्रोत्यांना पुढील समांसात दिलें आहें,तिकडे त्यांनी लक्ष द्यावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शुद्धज्ञाननिरूपणनाम समास सहावा ॥ ६॥**

**समास सातवा : बद्धलक्षण ॥ श्रीराम् ॥**

सृष्टी जे कां चराचर । जीव दाटले अपार । परी ते अवघे चत्वार । बोलिजेती ॥ १॥

चराचर सृष्टीमध्यें अनंत जीव भरलेले आहेत,तथापि त्यांचे चारच वर्ग आहेत असे म्हणतात.

ऐक तयांचें लक्षण । चत्वार ते कोण कोण । बद्ध मुमुक्ष साधक जाण । चौथा सिद्ध ॥२॥

ते चार वर्ग कोणते ते ऐका १- बध्द २-मुमुक्षु ३- साधक ४-सिध्द

यां चौघांविरहित कांहीं । सचराचरीं पांचवा नाहीं । आतां असो हें सर्वही । विशद करूं ॥३॥

ह्या चौघांशिवाय पाचवावर्ग म्हणून चराचरांत कोणी नाहीं,ते असो. आतां ह्या सगळ्यांचे स्पष्टीकरण करू.

बद्ध म्हणिजे तो कोण । कैसें मुमुक्षाचें लक्षण । साधकसिद्धवोळखण । कैसी जाणावी ॥ ४॥

बध्द म्हणजे कोण,मुमुक्षुचें लक्षण काय,साधक व सिध्द कसे ओळखावें ?

श्रोतीं व्हावें सावध । प्रस्तुत ऐका बद्ध । मुमुक्ष साधक आणि सिद्ध । पुढें निरोपिले ॥ ५॥

श्रोत्यांनी सावध होऊन प्रथम बध्दाचें लक्षण ऐकावें,मुमुक्षु,साधक व सिध्द ह्यांची लक्षणे पुढें सांगितलीं आहेंत.

आतां बद्ध तो जाणिजे ऐसा । अंधारींचा अंध जैसा । चक्षुविण दाही दिशा । सुन्याकार ॥ ६॥

आंधळा असून अंधारात चालणा-या माणसाला दाही दिशा ज्याप्रमाणें शुन्य असतात,तसा बध्द असतो.

भक्त ज्ञाते तापसी । योगी वीतरागी संन्यासी । पुढें देखतां दृष्टीसी । येणार नाहीं ॥ ७॥

( वीत- गेलेला ,रागी - विषयावरील प्रेम )

भक्त,ज्ञाते,तापसी,योगी,विरक्त,संन्यासी पुढें आले असतांही त्याच्या दृष्टीला दिसत नाहींत.

न दिसे नेणे कर्माकर्म । न दिसे नेणे धर्माधर्म । न दिसे नेणे सुगम । परमार्थपंथ ॥८॥

कर्म कोणतें व अकर्म कोणतें,धर्म कोणता व अधर्म कोणता,तसेंच परमार्थाचा सोपा मार्ग कोणता हें त्याला दिसत नाहीं व समजत नाहीं.

तयास न दिसे सच्छास्त्र । सत्संगति सत्पात्र । सन्मार्ग जो कां पवित्र । तो ही न दिसे ॥ ९॥

सच्छास्त्र,सत्संगति,सत्पात्र (सज्जन) मनुष्य,पवित्र असा सन्मार्ग ह्यातले त्याला काहींच दिसत नाहीं.

न कळे सारासार विचार । न कळे स्वधर्म आचार । न कळे कैसा परोपकार । दानपुण्य ॥ १०॥

बध्दाला सारासार विचार,स्वधर्माचा आचार,किंवा दान,पुण्य,परोपकार ह्यापैकीं कांहीं कळत नाहीं.

नाहीं पोटीं भूतदया । नाहीं सुचिष्मंत काया । नाहीं जनासि निववावया । वचन मृद ॥ ११॥

पोटांत भूतदया नाहीं,बाहेर शरिरही शुध्द नाहीं किंवा लोकांचे समाधान करील असें मृदु भाषणही बध्दापाशीं नाहीं.

न कळे भक्ति न कळे ज्ञान । न कळे वैराग्य न कळे ध्यान । न कळे मोक्ष न कळे साधन । या नांव बद्ध ॥ १२॥

न कळे भक्ति,न कळे ज्ञान,वैराग्य,ध्यान,मोक्ष व त्यांचे साधन काहीं नाहीं.

न कळे देव निश्चयात्मक । न कळे संतांचा विवेक । न कळे मायेचें कौतुक । या नांव बद्ध ॥ १३॥

निश्र्चयात्मक मुख्य देव ठाऊक नाहीं,साधुसंतांचा विवेक माहीत नाहीं,मायेचे कौतुक पाहिले नाहीं.

न कळे परमार्थाची खूण । न कळे अध्यात्मनिरूपण । न कळे आपणासि आपण । या नांव बद्ध ॥ १४॥

परमार्थाची खूण कळत नाहीं,अध्यात्माचे निरुपण ऐंकलें नाही,आपलें (मूळ) स्वरुप (आपणास आपण) ओळखत नाहीं.

न कळे जीवाचें जन्ममूळ । न कळे साधनाचें फळ । न कळे तत्वतां केवळ । या नांव बद्ध ॥ १५॥

जीवाचें जन्माचे मूळ शोधलें नाही, साधनांचे फळ समजलें नाहीं तत्वता केवळ म्हणजे  खरोखर किंवा शुध्द तत्वांचा विचार केला नाहीं.ह्याचें नाव बध्द.

न कळे कैसें तें बंधन । न कळे मुक्तीचें लक्षण । न कळे वस्तु विलक्षण । या नांव बद्ध ॥ १६॥

( विलक्षण - लक्षण न करता येण्यासारखे )

बंधन कसे असतें,मुक्तीचें लक्षण काय,लक्षणरहित-त्याहून निराळी अशी वस्तु म्हणजें परब्रह्म कळत नाहीं.

न कळे शास्त्रार्थ बोलिला । न कळे निजस्वार्थ आपुला । न कळे संकल्पें बांधला । या नांव बद्ध ॥ १७॥

कोणी शास्त्रार्थ सांगितला तर तो कळत नाहीं आपला स्वतःचा खरा स्वार्थ समजत नाहीं,आपण संकल्पाने बांधलो गेलो आहोत हे ज्याला कळत नाहीं ह्याचें नाव बध्द.

जयासि नाहीं आत्मज्ञान । हें मुख्य बद्धाचें लक्षण । तीर्थ व्रत दान पुण्य । कांहींच नाहीं ॥ १८॥

आत्मज्ञान नसणें हें बध्दाचे मुख्य लक्षण होय,तीर्थ,व्रत,दान,पुण्य हें तो काहीं जाणत नाहीं.

दया नाहीं करुणा नाहीं । आर्जव नाहीं मित्रि नाहीं । शांति नाहीं क्ष्मा नाहीं । या नांव बद्ध ॥ १९॥

दया,करुणा,आर्जव,मैत्री,शांति,क्षमा हें ज्याला नाहीं तो बध्द.

जें ज्ञानविशिं उणें । तेथें कैचीं ज्ञानाचीं लक्षणें । बहुसाल कुलक्षणें । या नांव बद्ध ॥ २०॥

ज्ञानच जेथें नाहीं तेथें ज्ञानांचीं लक्षणें कसली ?अनेक प्रकारचे दुर्गुण (अज्ञानाची सर्व कुलक्षणें) मात्र असतात तो बध्द.

नाना प्रकारीचे दोष । करितां, वाटे परम संतोष । बाष्कळपणाचा हव्यास । या नांव बद्ध ॥ २१॥

अनेक त-हेचें दोषाचरण करतांना फार मजा वाटतें, आणि चावटपणा करण्याची हौस असतें त्यांचे नांव बध्द.

बहु काम बहु क्रोध । बहु गर्व बहु मद । बहु द्वंद बहु खेद । या नांव बद्ध ॥ २२॥

( द्वंद - कलह )

काम,क्रोध,गर्व,मद,झगडा (द्वंद्व,द्वेष),खेद.

बहु दर्प बहु दंभ । बहु विषये बहु लोभ । बहु कर्कश बहु अशुभ । या नांव बद्ध ॥ २३॥

दर्प,दंभ,विषय,लोभ,कर्कश्यपणा,अवलक्षणें,

बहु ग्रामणी बहु मत्सर । बहु असूया तिरस्कार । बहु पापी बहु विकार । या नांव बद्ध ॥ २४॥

( ग्रामणी - हरामी )

गांवगुंडपण.(ग्रामीणी),मत्सर,असूया (नसतें दोषारोप करण्याची बुध्दि,हेवा),तिरस्कार,पाप,विकार,व

बहु अभिमान बहु ताठा । बहु अहंकार बहु फांटा । बहु कुकर्माचा सांठा । या नांव बद्ध ॥ २५॥

( फांटा - व्यर्थ कल्पना )

अभिमान (सूक्ष्मदेंहात),ताठा,(स्थूळ शरीरांत) अहंकार,फंाटे फोडणारा (बडबड्या),दुष्कर्मांचा सांठा.

बहु कापट्य वादवेवाद । बहु कुतर्क भेदाभेद । बहु क्रूइर कृपामंद । या नांव बद्ध ॥ २६॥

कापट्य,वादविवाद,कुतर्क,भेदाभेद,क्रूरता,दयाहीनता (निर्दयता).

बहु निंदा बहु द्वेष । बहु अधर्म बहु अभिळाष । बहु प्रकारीचे दोष । या नांव बद्ध ॥ २७॥

निंदा,द्वेष,अधर्म,अभिलाष,अनेक प्रकारचे दोष.

बहु भ्रष्ट अनाचार । बहु नष्ट येकंकार । बहु आनित्य अविचार । या नांव बद्ध ॥ २८॥

भ्रष्टपणा,अनाचार,नष्टपणा,एकंकार (सवगोलंकार) करणें,अनीति,अविचार हे दुर्गुण ज्याच्याजवळ पुष्कळ प्रमाणांत आहेत तो बध्द.

बहु निष्ठुर बहु घातकी । बहु हत्यारा बहु पातकी । तपीळ कुविद्या अनेकी । या नांव बद्ध ॥ २९॥

निष्ठुर,घातकी,हत्यारा (खुनशी),पातकी,तापट (तपीळ),अनेक कुविद्या आंगी असलेला तो बध्द.

बहु दुराशा बहु स्वार्थी । बहु कळह बहु अनर्थी । बहु डाईक दुर्मती । या नांव बद्ध ॥ ३०॥

( डाईक - खुनशी , डूख धरणारा )

दुराशा मनांत असलेला,स्वार्थी,तंटेखोर,अनर्थ करणारा,दावा धरणारा (डाईक),दुर्मति तो बध्द होय.

बहु कल्पना बहु कामना । बहु तृष्णा बहु वासना । बहु ममता बहु भावना । या नांव बद्ध ॥ ३१॥

कल्पना,कामना,तृष्णा,वासना,ममता,भावना हीं बध्दाची लक्षणें.

बहु विकल्पी बहु विषादी । बहु मूर्ख बहु समंधी । बहु प्रपंची बहु उपाधी । या नांव बद्ध ॥ ३२॥

विकल्पी,विषादी,मूर्ख,समंधी (समंधाची बाधा असणारा,संबंधी जनांचा हव्यास असणारा,अनेकांशी संबंध ठेवणारा),प्रापंचिक,अनेक उपाधि लावून घेणारा.

बहु वाचाळ बहु पाषंडी । बहु दुर्जन बहु थोतांडी । बहु पैशून्य बहु खोडी । या नांव बद्ध ॥ ३३॥

( पैशून्य - लबाड )

वाचाळ,पाखंडी,दुर्जन,थोतांडी,उणें (दुस-याचें) पाहाणारा-दुर्जन,खोडकर तो बध्द होय.

बहु अभाव बहु भ्रम । बहु भ्रांति बहु तम । बहु विक्षेप बहु विराम । या नांव बद्ध ॥ ३४॥

नास्तिकपणा,भ्रम,भ्रांति,तम (अज्ञान),(विक्षेप) चंचलता,(विराम) आळस हीं बध्दाचीं लक्षणें.

बहु कृपण बहु खंदस्ती । बहु आदखणा बहु मस्ती । बहु असत्क्रिया व्यस्ती । या नांव बद्ध ॥ ३५॥

( खंदस्ती - झोटिंगपणा , आदखणा - दुष्ट,कुरूप )

कृपण, (खंदस्ती) दांडगा,(अ-देखणा) मत्सरी,मस्तीखोर,दुष्कर्मी,व्यस्ती (उलटे किंवा अस्ताव्यस्त वागणारा) हें अनेक अवगुण असणें ह्याचे नाव बध्द.

परमार्थविषईं अज्ञान । प्रपंचाचें उदंड ज्ञान । नेणे स्वयें समाधान । या नांव बद्ध ॥ ३६॥

परमार्थांचे अज्ञान,पण प्रपंचाचे ज्ञान मात्र भरपूर,स्वतःच्या चित्ताला समाधान देण्याचें समजत नाहीं.

परमार्थाचा अनादर । प्रपंचाचा अत्यादर । संसारभार जोजार । या नांव बद्ध ॥ ३७॥

परमार्थाचा अनादर व प्रपंचाचा पूर्ण आदर,संसाराचें ओझें घेऊन कष्ट (जोजार) करतो.

सत्संगाची नाहीं गोडी । संतनिंदेची आवडी । देहेबुद्धीची घातली बेडी । या नाव बद्ध ॥ ३८॥

संतसंगाची गोडी नाही,पण संत निंदेची आवड,देहबुध्दीची बेडी पायांत अडकवून घेतलेली (देहबुध्दीने बांधलेला तो बध्द होय.)

हातीं द्रव्याची जपमाळ । कांताध्यान सर्वकाळ । सत्संगाचा दुष्काळ । या नांव बद्ध ॥ ३९॥

हातात जपमाळ द्रव्याची,चित्तांत नेहमी ध्यान बायकोचें, संतसंगतीचा दुष्काळ हीं लक्षणें ज्याच्या अंगी असतात तो बध्द होय.

नेत्रीं द्रव्य दारा पाहावी । श्रवणीं द्रव्य दारा ऐकावी । चिंतनीं द्रव्य दारा चिंतावी । या नांव बद्ध ॥ ४०॥

डोळ्यांनी द्रव्य दारेचे दर्शन घ्यावें,कानांनी द्रव्य दारेच्या कथा ऐकाव्या आणि चित्ताने चिंतनही द्रव्य दारेचेच करावें.

काया वाचा आणि मन । चित्त वित्त जीव प्राण । द्रव्यदारेचें करी भजन । या नांव बद्ध ॥ ४१॥

काया,वाचा,मन,चित्त,वित्त (द्रव्य),जीव,प्राण सर्व काहीं अर्पण करुन त्यायोगें (अनन्यभावानें) द्रव्य दारेचे भजन करतो.

इंद्रियें करून निश्चळ । चंचळ होऊं नेदी पळ । द्रव्यदारेसि लावी सकळ । या नांव बद्ध ॥ ४२॥

सर्वं ईंद्रिये स्थिर करुन त्यांना पळभरही इकडे तिकडे (देवाकडे वगैरे) जाऊ न देता द्रव्यदारेच्याच कामीं तीं सर्व झिजवतो.

द्रव्य दारा तेंचि तीर्थ । द्रव्य दारा तोचि परमार्थ । द्रव्य दारा सकळ स्वार्थ । म्हणे तो बद्ध ॥ ४३॥

तिर्थ,परमार्थ,सगळा स्वार्थ हें सर्व काहीं द्रव्य दाराच आहें असे म्हणतो तो बध्द होय.

वेर्थं जाऊं नेदी काळ । संसारचिंता सर्वकाळ । कथा वार्ता तेचि सकळ । या नांव बद्ध ॥ ४४॥

वेळ फुकट न दवडतां संसार-चिंतनात घालवितो,कथावार्ता सारें काय तें तेच अशी स्थिति ज्याची असते तो बध्द होय.

नाना चिंता नाना उद्वेग । नाना दुःखाचे संसर्ग । करी परमार्थाचा त्याग । या नांव बद्ध ॥ ४५॥

अनेक चिंता वाहात बसतो,नाना प्रकारची तळमळ करतो,अनेक दु:खांची लचांडे पाठीमागे लावून घेतो व परमार्थ टाकतो तो बध्द होय.

घटिका पळ निमिष्यभरी । दुश्चीत नव्हतां अंतरीं । सर्वकाळ ध्यान करी । द्रव्यदाराप्रपंचाचें ॥ ४६॥

घटका,पळ फार काय एक निमिषभर सुध्दा अंत:करणात दुश्चितपणा येऊ न देता सदोदित द्रव्य,दारा व प्रपंच ह्याचेच ध्यान करीत असतों

तीर्थ यात्रा दान पुण्य । भक्ति कथा निरूपण । मंत्र पूजा जप ध्यान । सर्वही द्रव्य दारा ॥ ४७॥

तीर्थ ,यात्रा,दान,पुण्य,भक्ति,क था -निरुपण,मंत्र,पूजा,जप,ध्यान सर्व काहीं द्रव्य-दारा

जागृति स्वप्न रात्रि दिवस । ऐसा लागला विषयेध्यास । नाहीं क्षणाचा अवकाश । या नांव बद्ध ॥ ४८॥

जागतेपणीं,स्वप्नांत,रात्री,दिवसा असा सर्वकाळ विषयांचा ध्यास लागलेला असतो,कीं त्यातून क्षणाचीही फुरसत मिळत नाहीं त्यांचे नांव बध्द होय.

ऐसें बद्धाचें लक्षण । मुमुक्षपणीं पालटे जाण । ऐक तेही वोळखण । पुढिलीये समासीं ॥ ४९॥

असो.असें हे बध्दाचें लक्षण असतें,पण तें मुमुक्षुपणांत पालटतें,बध्दाचा पालट मुमुक्षुपणांत होतो हें लक्षात ठेवा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बद्धलक्षणनाम समास सातवा ॥ ७॥**

## समास आठवा : मुमुक्षलक्षण ॥ श्रीराम् ॥

संसारमदाचेनि गुणें । नाना हीनें कुलक्षणें । जयाचेनि मुखावलोकनें । दोषचि लागे ॥१॥

संसाराचा मद चढल्यानें अनेक हीन लक्षणें आंगीं जडतात,अशा कुलक्षणी माणसाचें तोंड पाहण्यानेंही दोष लागतो.

ऐसा प्रणी जो कां बद्ध । संसारीं वर्ततां अबद्ध । तायस प्राप्त जाला खेद । काळांतरीं ॥ २॥

असो, अशा प्रकारचा बध्द प्राणी संसारांत मूर्खपणानें वागत असतां काहीं काळ लोटल्यावर त्याला खेद उत्पन्न होतो.

संसारदुःखें दुखवला । त्रिविधतापें पोळला । निरूपणें प्रस्तावला । अंतर्यामीं ॥३॥

बध्द संसारदुःखांनी होरपळून निघाला-संसारातील दुःखांनी त्रस्त झाला,त्रिविध तापांनी होरपळला, आणि काहीं कथा निरुपण ऐकून अंतःकरणांत पश्र्चाताप उत्पन्न झाला.

जाला प्रपंचीं उदास । मनें घेतला विषयत्रास । म्हणे आतां पुरे सोस । संसारींचा ॥ ४॥

त्यायोगें प्रपंचाविषयीं उदास होऊन (संसाराला पूर्ण विटून) विषयाचा त्रास वाटूं लागतो आणि म्हणतो,कीं आता संसाराचा सोस पुरे झाला.

प्रपंच जाईल सकळ । येथील श्रम तों निर्फळ । आतां कांहीं आपुला काळ । सार्थक करूं ॥५॥

प्रपंच हा सगळा जाणारा (नाशवंत) आहे,त्यासाठीं केलेले श्रम सर्व निष्फळ होतात.आतां आपला काहीं काळ सार्थकात तरी घालवू.

ऐसी बुद्धि प्रस्तावली । पोटीं आवस्ता लागली । म्हणे माझी वयेसा गेली । वेर्थचि आवघी ॥ ६॥

( पोटीं आवस्ता - अंतःकरणात आस्था निर्माण झाली )

असा बुध्दीला पश्र्चाताप झाला,अंतःकरणास चुटपूट लागली आणि म्हणू लागला,कीं माझें सगळे आयुष्य फुकट गेलें.

पूर्वी नाना दोष केले । ते अवघेचि आठवले । पुढें येउनि उभे ठेले । अंतर्यामीं ॥ ७॥

पूर्वी केलेल्या अनेक पातकांची सर्व आठवण होऊन तीं सगळी अंतःकरणात येऊन पुढें उभीं राहिलीं (त्याला पूर्वकर्मस्मरणानें पुरा अनुताप झाला.)

आठवे येमाची यातना । तेणें भयेचि वाटे मना । नाहीं पापासि गणना । म्हणौनियां ॥८॥

तीं पातकें असंख्य असल्यामुळें यमयातनांची आठवण होऊन भय वाटूं लागतें (केलेल्या पातकांची आठवण झाली व यमाच्या दरबारच्या शिक्षा मनांत आल्या.)

नाहीं पुण्याचा विचार । जाले पापाचे डोंगर । आतां दुस्तर हा संसार । कैसा तरों ॥ ९॥

पुण्याचा विचार केला नाही पापाचे डोंगर वाढले,आतां हा दुस्तर संसार तरु तरी कसा ? (पुण्याची बाजू कोरी असल्यानें ह्या भवांतून कसे तरुं अशी घोर चिंता लागली.)

आपले दोष आछ्यादिले । भल्यांस गुणदोष लाविले । देवा म्यां वेर्थच निंदिले । संत साधु सज्जन ॥१०॥

मागचें दोष आठवलें.स्वतःच्या दोषांवर पाघरूण घालून भल्याभल्यांवर दोषारोप केलें,देवा साधुसंत-सज्जन ह्यांची मी विनाकारण निंदा केली.

निंदे ऐसे नाहीं दोष । तें मज घडले कीं विशेष । माझे अवगुणीं आकाश । बुडों पाहे ॥११॥

निंदेसारखें पाप नाहीं,तें तर माझ्याहातून फारच घडलें,माझ्या अवगुणांच्या (समुद्रा-)मध्यें आकाश (सुध्दां) बुडून जाईल.

नाहीं वोळखिले संत । नाहीं अर्चिला भगवंत । नाहीं अतित अभ्यागत । संतुष्ट केले ॥ १२॥

संतांस ओळखलें नाहीं,देवाची पूजा केली नाहीं,अतीत अभ्यांगताचा संतोष केला नाहीं.

पूर्व पाप वोढवलें । मज कांहींच नाहीं घडलें । मन अव्हाटीं पडिलें । सर्वकाळ ॥ १३॥

( मन अव्हाटीं पडिलें - सर्व काळ मान आडमार्गाने (कुमार्ग) गेले )

पुर्वजन्मीचे पाप पुढें (आडवें येऊन) ऊभे राहिलें,त्यामुळें माझ्या हातून काहीं (सत्कर्म) घडलें नाहीं,मन नेहमी आडवाटेलाच (अव्हाटीं) शिरत गेलें.

नाहीं कष्टविलें शेरीर । नाहीं केला परोपकार । नाहीं रक्षिला आचार । काममदें ॥ १४॥

शरीराला झिजवून काहीं परोपकार केला नाहीं,काम,मदानें आचारहीं राखला नाहीं,(काम-क्रोध-मद-मत्सरांना बळी पडलों.)

भक्ति माता हे बुडविली । शांति विश्रांति मोडिली । मूर्खपणें म्यां विघडिली । सद्बुद्धि सद्वासना ॥१५॥

भक्तिरुप मातेला बुडविलें,शांतिरुप विश्रांति मोडून टाकलीं,मूर्खपणाने सद्बुध्दि,सदवासना यांना बिघडून टाकलें,(धर्मलंडपणाने वागून भगवंताचे भजन-अर्चन बिलकूल केलें नाही.)

आतां कैसें घडे सार्थक । दोष केले निरार्थक । पाहों जातां विवेक । उरला नाहीं ॥ १६॥

निरर्थक दोष केलें(अनेक पातके केली),पहावयास गेले तर विवेक शिल्लक राहिला नाहीं,आतां सार्थक कशाने होईल ?

कोण उपाये करावा । कैसा परलोक पावावा । कोण्या गुणें देवाधिदेवा । पाविजेल ॥ १७॥

आतां काय उपाय करावा ? परलोक कसा मिळेल ? कोणत्या उपायानें मी देवाधिदेवाजवळ जाईन ?(आता देव कसा पावेल असा विचार मनीं स्पुरुं लागला.)

नाहीं सद्भाव उपजला । अवघा लोकिक संपादिला । दंभ वरपंगें केला । खटाटोप कर्माचा ॥१८॥

( दंभ वरपंगें - उथळ कर्मकंड )

अंतःकरणात सद्भाव उत्पन्न झाला नाहीं,सर्व काही लौकिकासाठीं केलें,कर्माचा खटाटोप केला तो दांभिकपणांने वरकरणी केला.(काहीं देवतार्जन केलें असेलच तर तें केवळ दंभासाठी व लौकिकासाठी केलें.)

कीर्तन केलें पोटासाठीं । देव मांडिले हाटवटीं । आहा देवा बुद्धि खोटी । माझी मीच जाणें ॥ १९॥

( हाटवटीं - बाजारात )

देव बाजारांत (हाटवंटीं) मांडून पोटासाठीं कथा केल्या,हाय रे देवा,माझी खोटी बुध्दि मलाच ठाऊक,

पोटीं धरूनि अभिमान । शब्दीं बोले निराभिमान । अंतरीं वांछूनियां धन । ध्यानस्त जालों ॥ २०॥

पोटांत अभिमान ठेऊन बाहेर निराभिमानपणाच्या गप्पा मारल्या,पोटांत द्रव्याची इच्छा धरुन ध्यानस्थ झालों (आंत अहंकाराचा राक्षस उभा करुन बाहेर निराभिमानाची भाषा बोलत आलों अंतरी द्रव्यार्जनाचा लोभ ठेवून ध्यान धरुन बसलो)

वित्पत्तीनें लोक भोंदिले । पोटासाठीं संत निंदिले । माझे पोटीं दोष भरले । नाना प्रकारींचे ॥ २१॥

( वित्पत्तीनें - शास्त्र ज्ञानाने,विद्वत्तेने )

पांडित्यांने लोकांना भुलविलें,स्वतःच्या पोटाची खांच भरण्यासाठीं संतांची निंदा केली. असे माझ्या अंतःकरणांत अनेक प्रकारचे दोष भरले.(असे नाना दोष आंत असतांना उदरंभरणासाठीं अनेक वाईट कामें केलीं)

सत्य तेंचि उछेदिलें । मिथ्य तेंचि प्रतिपादलें । ऐसें नाना कर्म केलें । उदरंभराकारणें ॥ २२॥

सत्याचा उच्छेद करुन असत्याचें प्रतिपादन केलें,पोट भरण्यासाठी अशी नानाप्रकारची कर्मे केलीं.

ऐसा पोटीं प्रस्तावला । निरूपणें पालटला । तोचि मुमुक्ष बोलिला । ग्रंथांतरीं ॥ २३॥

असा अंतःकरणात पश्र्चाताप होऊन निरुपणाच्या योगानें,कथानिरुपणें ऐकतां ऐकतां अंतर्यामी पुरा पालटला,म्हणजें त्यालाच मुमुक्षु असें ग्रथांतरीं म्हटलें आहें.

पुण्यमार्ग पोटीं धरी । सत्संगाची वांछा करी । विरक्त जाला संसारीं । या नांव मुमुक्ष ॥ २४॥

जो अंतःकरणात पुण्यमार्गाची आवड धरतो,संतसंगतीची इच्छा धरतो,संसारात विरक्त होतो तो मुमुक्षु.

गेले राजे चक्रवर्ती । माझें वैभव तें किती । म्हणे धरूं सत्संगती । या नांव मुमुक्ष ॥ २५॥

चक्रवर्ती राजें (रसातळास) गेलें,तेथे माझ्या (एवढ्याश्या) वैभवाचा काय पाड ? आता संतसंगतीच्या मार्गास लागूं असे म्हणतो.

आपुले अवगुण देखे । विरक्तिबळें वोळखे । आपणासि निंदी दुःखें । या नांव मुमुक्ष ॥ २६॥

आपलें अवगुण जो पाहूं लागतो,आणि त्या अवगुणांस वैराग्याच्या जोरावर ओळखून जो आपली स्वतःची दुःखाने निंदा करतो (ज्याला आपले सर्व अवगुण दिसतात व वैराग्यबळानें तें ओळखून जो आपली स्वतःची दुःखाने निंदा करतो ) तो मुमुक्षु.

म्हणे मी काये अनोपकारी । म्हणे मी काय दंभधारी । म्हणे मी काये अनाचारी । या नांव मुमुक्ष ॥ २७॥

मीं कोणावर उपकार केला नाही,ढोंग मात्र माजविलें,अनाचार केला.

म्हणे मी पतित चांडाळ । म्हणे मी दुराचारी खळ । म्हणे मी पापी केवळ । या नांव मुमुक्ष ॥ २८॥

मीं पतित,चांडाळ,दुराचारी,दुष्ट,केवळ पापी.

म्हणे मी अभक्त दुर्जन । म्हणे मी हीनाहूनि हीन । म्हणे मी जन्मलो पाषाण । या नांव मुमुक्ष ॥ २९॥

मी अभक्त,दुर्जन,हीनांपेक्षां हीन,नुसता दगड जन्माला आलों असें म्हणू लागतो तो मुमुक्षु.

म्हणे मी दुराभिमानी । म्हणे मी तपीळ जनीं । म्हणे मी नाना वेसनी । या नांव मुमुक्ष ॥ ३०॥

मी दुराभिमानी,सा-या मुलखांतला तापट (तपिळ),अनेक प्रकारचा व्यसनी.

म्हणे मी आळसी आंगचोर । म्हणे मी कपटी कातर । म्हणे मी मूर्ख अविचार । या नांव मुमुक्ष ॥ ३१॥

( कातर - भित्रा )

आळशी,चुकार,कपटी,भित्रा (कातर),मुर्ख,अविचारी.

म्हणे मी निकामी वाचाळ । म्हणे मी पाषांडी तोंडाळ । म्हणे मी कुबुद्धि कुटीळ । या नांव मुमुक्ष ॥ ३२॥

निरुपयोगी,वाचाळ,नास्तिक,दुस-यांवर तोंड टाकणारा,कुबुध्दि,कुटिल,

म्हणे मी कांहींच नेणे । म्हणे मी सकळाहूनि उणें । आपलीं वर्णी कुलक्षणें । या नांव मुमुक्ष ॥ ३३॥

मला काहीं कळत नाहीं,मी सर्वांपेक्षा कनिष्ठ अशी आपली कुलक्षणें वर्णन करणारा तो मुमुक्षु.

म्हणे मी अनाधिकारी । म्हणे मी कुश्चिळ अघोरी । म्हणे मी नीच नानापरी । या नांव मुमुक्ष ॥ ३४॥

मी अनाधिकारी,गलिच्छ (कुश्र्चिळ),अघोरी,अनेक प्रकारे नीच.

म्हणे मी काये आपस्वार्थी । म्हणे मी काये अनर्थी । म्हणे मी नव्हे परमार्थी । या नांव मुमुक्ष ॥ ३५॥

मी अप्पलपोट्या आणि अनर्थ करणारा,मी परमार्थी नव्हे.

म्हणे मी अवगुणाची रासी । म्हणे मी वेर्थ आलों जन्मासी । म्हणे मी भार जालों भूमीसी । या नांव मुमुक्ष ॥ ३६॥

मी अवगुणांची रास,फुकट जन्मास आलों,भूमीला भार झालों,असे म्हणणारा तो मुमुक्षु

आपणास निंदी सावकास । पोटीं संसाराचा त्रास । धरी सत्संगाचा हव्यास । या नांव मुमुक्ष ॥३७॥

अशी आपली निंदा यथेच्छ करतो, पोटात संसाराचा तिटकारा करतो,संतसंगाचा हव्यास धरतो तो मुमुक्षु

नाना तीर्थे धुंडाळिलीं । शमदमादि साधनें केलीं । नाना ग्रन्थांतरें पाहिलीं । शोधूनियां ॥ ३८॥

आणि मग (जन्मसार्थकासाठी) अनेक तीर्थे धुंडली,(मनोजय व इंद्रियदमनादि) शमदमादि साधनें केलीं,अनेक ग्रंथातील अर्थ शोधून पाहिला.(परमार्थग्रंथाचे मनन केले),इतके करुनही.

तेणें नव्हे समाधान । वाटे अवघाच अनुमान । म्हणे रिघों संतांस शरण । या नांव मुमुक्ष ॥ ३९॥

त्याचे समाधान होईना,सगळा गोंधळ वाटू लागला,ह्यास्तव (निश्चय होण्यासाठीं) साधुसंतांना शरण जाऊ, असे म्हणू लागला,तो मुमुक्षु.

देहाभिमान कुळाभिमान । द्रव्याभिमान नानाभिमान । सांडूनि, संतचरणीं अनन्य-।या नांव मुमुक्ष ॥४०॥

देह,कुळ,द्रव्य इत्यादि अनेक प्रकारचे अभिमान सोडून संतांच्या पायीं अनन्य भावांने शरण जातो तो मुमुक्षु

अहंता सांडूनि दूरी । आपणास निंदी नानापरी । मोक्षाची अपेक्षा करी । या नांव मुमुक्ष ॥ ४१॥

अहंकार दूर टाकून स्वतःस परोपरीनें निंदतो आणि मोक्षाची इच्छा धरतो तो मुमुक्षु

ज्याचें थोरपण लाजे । जो परमार्थाकारणें झिजे । संतापाईं विश्वास उपजे । या नांव मुमुक्ष ॥ ४२॥

(संतांच्या येथील परमार्थाचा थाट पाहुन) ज्याचा थोरपणाचा अभिमान लाजतो (जिरतो) व स्वतः परमार्थासाठी (चंदनाप्रमाणे) झिजू लागतों आणि संतांच्या चरणीं ज्याचा विश्र्वास उत्पन्न होतो तो मुमुक्षु

स्वार्थ सांडून प्रपंचाचा । हव्यास धरिला परमार्थाचा । अंकित होईन सज्जनाचा । म्हणे तो मुमुक्ष ॥ ४३॥

तात्पर्य,प्रपंचाचा स्वार्थ सोडून परमार्थाचा हव्यास धरतो आणि मी सज्जनांचा दास होईन असे म्हणतो तो मुमुक्षु.

ऐसा मुमुक्ष जाणिजे । संकेतचिन्हें वोळखिजे । पुढें श्रोतीं अवधान दीजे । साधकलक्षणीं ॥ ४४॥

मुमुक्षु असा असतो,ह्या लक्षणांवरुन त्यास ओळखावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मुमुक्षलक्षणनाम समास आठवा ॥ ८॥**

**समास नववा : साधकनिरूपण ॥ श्रीराम् ॥**

मागां मुमुक्षाचें लक्षण । संकेतें केलें कथन । आतां परिसा सावधान । साधक तो कैसा ॥ १॥

मागें मुमुक्षूचें लक्षण थोडक्यांत सागितले,आता साधक कसा असतो ते सावधपणें ऐका.

अवगुणाचा करूनि त्याग । जेणें धरिला संतसंग । तयासि बोलिजे मग । साधक ऐसा ॥२॥

अनुतापतप्त होऊन अवगुणांचे त्याग करुन त्यानें (मुमुक्षूनें) संत-संगती धरली. म्हणजे मग त्याला साधक म्हणतात.

जो संतांसि शरण गेला । संतजनीं आश्वासिला । मग तो साधक बोलिला । ग्रन्थांतरीं ॥ ३॥

संतांस पूज्य भावानें शरण जाऊन त्यांनी त्यास आश्र्वासन दिलें म्हणजें मग त्यास ग्रंथांतरी साधक असे म्हणतात.

उपदेशिलें आत्मज्ञान । तुटलें संसारबंधन । दृढतेकारणें करी साधन । या नांव साधक ॥ ४॥

संतांनी त्यास आत्मज्ञानाचा ऊपदेश केला म्हणजें त्यांचे संसाराचें बंधन तुटतें आणि मग तें आत्मज्ञान द्दढ होण्यासाठीं तो साधन करुं लागतो तेव्हा त्यास साधक म्हणावें.

धरी श्रवणाची आवडी । अद्वैतनिरूपणाची गोडी । मननें अर्थांतर काढी । या नांव साधक ॥५॥

( अर्थांतर - अर्थांतील मर्म )

सगुणकथाश्रवणाची फार आवड धरतो,संत्संगात अद्वैतनिरुपणाची गोडी त्यास लागत जातें आणि ऐकलेल्याचें मनन करुन त्यांतील अर्थरहस्य (लक्षार्थ) ध्यानीं आणतो.

होतां सारासार विचार । ऐके होऊनि तत्पर । संदेह छेदूनि, दृढोत्तर- । आत्मज्ञान पाहे ॥६॥

सारासार विचार चालला असतां तो आदरपूर्वक ऐकतो, आणि (पूर्व) संशय सर्व नाहीसे करुन आत्मज्ञान निश्र्चयानें पाहू लागतो.

नाना संदेहनिवृत्ती- । व्हावया, धरी सत्संगती । आत्मशास्त्रगुरुप्रचीती । ऐक्यतेसी आणी ॥ ७॥

(परमार्थासंबंधी) असलेल्या अनेक शंकांचे निरसन होण्यासाठीं संतसंगति धरतो,शास्त्रप्रचीति,गुरुप्रचीति व आत्मप्रचीति (म्ह. शास्त्रसिध्दांत,गुरुपदेश व स्वानुभव) ह्या तिन्ही प्रति एकच आहेत असा अनुभव घेतो.

देहबुद्धि विवेकें वारी । आत्मबुद्धि सदृढ धरी । श्रवण मन केलेंचि करी । या नांव साधक ॥ ८॥

( वारी - दूर करणे )

आत्मानात्मविवेकानें देहबुध्दींचे निवारण करतो,(देहबुध्दींची भ्रांति-संदेह-उडवून) मी आत्मा अशी धारणा बळकट धरतो (आत्मज्ञान पाहातो),पुन:पुन्हा तेंच ते ऐकतो व त्याचें निरंतर मनन करतो.

विसंचूनि दृश्यभान । दृढ धरी आत्मज्ञान । विचारें राखे समाधान । या नांव साधक ॥९॥

( विसंचूनि - दृश्य नाहीसे करून )

दृश्याचे भान नाहींसे करुन (विसंचूनि-विसरुन) आत्मभाव बळकट धरतो व (सर्वत्र आत्मा आहें) ह्या विचारानें समाधान राखतो (आत्मसाधन राखतो) तो साधक.

तोडूनि द्वैताची उपाधी । अद्वैत वस्तु साधनें साधी । लावी ऐक्यतेची समाधी । या नांव साधक ॥१०॥

द्वैताची (वेगळेपणाची) उपाधिं तोडून टाकून अद्वैतवस्तूच्या (परब्रह्माच्या) सांधनात तो असतो,(परब्रह्माशी एकरुप होऊन) स्वरुपाकारतेची समाधि लावतो तो साधक.

आत्मज्ञान जीर्ण जर्जर । त्याचा करी जीर्णोद्धार । विवेकें पावे पैलपार । या नांव साधक ॥११॥

जीर्ण व जर्जर झालेल्या (विषयसंगतीमुळे अनेक जन्मीं विसरुन गेलेल्या) आत्मज्ञानाचा जीर्णोध्दार करतो,(म्हणजे त्या स्वयंसिध्द ज्ञानासही सद्दढ जींवीं धरतो) आणि विचारानें भवसागराच्या पैलतीराला जातो (जन्ममरणापासुन सूटतो),हा विवेकबळांने उगमाशी जातों.

उत्तमें साधूचीं लक्षणें । आंगिकारी निरूपणें । बळेंचि स्वरूपाकार होणें । या नांव साधक ॥ १२॥

निरुपणांत जी साधूंची उत्तम लक्षणें निघतील त्यांचा स्वीकार करतो,बळेंच (आगांतुकाप्रमाणें आपण होऊन) मी स्वस्वरुप आहें असा भाव धरतो त्यास साधक म्हणावें.(हा बळेचिं स्वरुपाकार होतो म्ह.जन्मोजन्मीं जडलेला विषयसंबंध तोडून प्रयत्नपूर्वक अट्टाहासानें हा स्वरुपीं लगटतो-साधकाला प्रयत्नसाध्य पण सिध्दाला सहजच सुलभ असा हा आत्मलाभ आहें)

असत्क्रिया ते सोडिली । आणी सत्क्रिया ते वाढविली । स्वरूपस्थिती बळावली । या नांव साधक ॥ १३॥

वाईट कर्मे,असत-मिथ्या कर्मे टाकून दिलीं,सत्कर्मे पुष्कळ केली,अशा प्रकारे आत्मस्थिति दृढतर करीत चालला.

अवगुण त्यागी दिवसेंदिवस ।करी उत्तम गुणाचा अभ्यास ।स्वरूपीं लावी निजध्यास ।या नांव साधक॥१४॥

दिवसेंदिवस अवगुण टाकून देऊन उत्तम गुणांचा अभ्यास करुं लागला (सदगुण वाढविलें),स्वस्वरुपाचा निदिध्यास चित्ताला लावला.

दृढ निश्चयाचेनि बळें । दृश्य असतांच नाडळे । सदा स्वरूपीं मिसळे । या नांव साधक ॥ १५॥

( दृश्य असतांच नाडळे - दिसत असून स्वरूपी लक्ष नाही असा तो कधी आढळत नाही )

(१) आत्मस्वरुपाचा निश्र्चय (मी देह नसून आत्मा आहें हा निश्र्चय) बळकट असल्यामुळें दृश्य जगत जगपणानें त्याला दिसत नाहीं, (तर आत्मरुपच दिसतें) आणि तों स्वरुपीं समरस होऊन जातो.(२)

आत्मनिश्र्चयाच्या बळावर द्दश्य पदार्थ असूनही तिकडे लक्ष नसतें (३) तो स्वतः द्दश्य (दिसतो) खरा,पण आत्मनिश्र्चयामुळें स्वरुपीं लक्ष नाहीं,असा तो कधीच आढळत नाहीं,आत्मस्वरुपात लीन होतो.

प्रत्यक्ष माया अलक्ष करी । अलक्ष वस्तु लक्षी अंतरीं ।आत्मस्थितीची धारणा धरी ।या नांव साधक ॥१६॥

माया (द्दश्यभासात्मक जगत,सृष्टि) प्रत्यक्ष (डोळ्यांस दिसत) असून तिच्याकडे दुर्लक्ष करतो व अलक्ष्य वस्तु (लक्षांत घेता येत नाहीं असें परब्रह्म) अंतःकरणाच्या योगाने लक्षितो,मी आत्मा हे चित्ताचे ध्यान स्थिर करतो.त्याचें नाव साधक.

जें या जनासि चोरलें । मनास न वचे अनुमानलें । तेंचि जेणें द्दढ केलें । या नांव साधक ॥ १७॥

जें ह्या (सामान्य) लोंकांस गुप्त आहें (चोरलें),मनाला ज्यांचे अनुमान करतां येत नाहीं तेच (परब्रह्म) ज्यांने चित्तात बळकट धरलें.

जें बोलतांचि वाचा धरी । जें पाहातांचि अंध करी । तें साधी नाना परी । या नांव साधक ॥ १८॥

( वाचा धरी - वाणी कुंठीत झाली )

जें बोलायला जावे तर वाणी कुंठित करतें,पहायला जावे तर द्दष्टि आंधळी होते,ते युक्तिप्रयुक्तीने साध्य करतो.

जें साधूं जाता साधवेना । जें लक्षूं जातां लक्षवेना । तेंचि अनुभवें आणी मना । या नांव साधक ॥१९॥

साधायला जावें तर जें साध्य होत नाहीं,पहायला जावें तर दिसत नाहीं,असले स्वरुप स्वतःच्या अनुभवाला आणतो.

जेथें मनचि मावळे । जेथे तर्कचि पांगुळे । तेंचि अनुभवा आणी बळें । या नांव साधक ॥ २०॥

जेथे मनाचा मनपणा मावळून जातो (उन्मन होतें),तर्क पांगळा होतो त्या वस्तूचा मोठ्या प्रयत्नपूर्वक अनुभव घेतो.

स्वानुभवाचेनि योगें । वस्तु साधी लागवेगें । तेंचि वस्तु होये आंगें । या नांव साधक ॥ २१॥

स्वानुभवाच्या योगेंकरुन जो हां हां म्हणतां वस्तु (परब्रह्म) साध्य करतो व स्वतःतदाकार बनतो.

अनुभवाचीं आंगें जाणे । योगियांचे खुणे बाणे । कांहींच नहोन असणें । या नांव साधक ॥ २२॥

( नहोन - नसून )

अनुभवाचे प्रकार (भेद) जाणतो,योग्यांची खूण जो आत्मसाक्षात्कार तो ज्याला बाणतो,(एकदेशीपणानें न उरतां,अहंकार मुळीच न राहू देतां) काहींच नसता जो असतो तो साधक (साधकाला योगाची आंगे माहीत असतात तो काहींच नसून असतो,म्ह.विशेषत्वाला न येतां आत्मरुपीच असतो.)

परती सारून उपाधी । असाध्य वस्तु साधनें साधी । स्वरूपीं करी दृढ बुद्धी । या नांव साधक ॥२३॥

देहादि उपाधि बाजूला टाकून असाध्य वस्तु जें परब्रह्म तें साधनानें साध्य करतो,आत्मस्वरुपाच्या ठिकाणीं बुध्दि द्दढ करतो,

देवाभक्ताचें मूळ । शोधून पाहे सकळ । साध्यचि होये तत्काळ । या नांव साधक ॥ २४॥

देव आणि भक्त ह्यांचे मूळ सारें शोधून पाहातो,साध्य जें शुध्द परब्रह्मतत्व तद्रूप तात्काळ होऊन जातों.

विवेकबळें गुप्त जाला । आपेंआप मावळला । दिसतो, परी देखिला । नाहींच कोणीं ॥२५॥

नित्य कोणतें व अनित्य कोणतें ह्याचा विचार करणें ह्याचें नाव विवेक,अशा विवेकानें अनित्य जें देहाहिक त्यांचा त्याग करुन नित्य जें आत्मस्वरुप त्यांत बुडी देऊन राहातो, व त्यांतच आपोआप विरुन जातो (लय पावतो) तेथेच स्थिरता पावतो- व स्थूळ देंहानें लोकांस दिसला तरी त्यांचे अंतःस्वरुप कोणासही पाहातां येत नाहीं (आकलन होत नाहीं.)

मीपण मागें सांडिलें । स्वयें आपणास धुंडिलें । तुर्येसहि वोलांडिलें । या नांव साधक ॥ २६॥

मीपण-अहंकार मागें टाकून स्वतः आपलें स्वरुप शोधून काढतो,तुर्यावस्थेस ओलांडून पलीकडे गेला.

पुढें उन्मनीचा सेवटीं । आपली आपण अखंड भेटी । अखंड अनुभवीं ज्याची दृष्टी । या नांव साधक॥२७॥

पुढें उन्मनी अवस्थेच्या शेवटीं आत्मस्वरुपाची अखंड भेट होते,व त्या अनुभवावार त्याची द्दष्टि (वृत्ति)नित्य स्थिर राहाते.(त्या अखंड आनंदाचा भोग घेत राहातो)

द्वैताचा तटका तोडिला । भासाचा भास मोडिला । देहीं असोनि विदेह जाला । या नांव साधक ॥ २८॥

( द्वैताचा तटका - दृष्यमय द्वैताचा संबंध तोडुन , तटका - संबंध )

(द्दश्यामुळें) उत्पन्न होणा-या द्वैताचा संबंध तोडून टाकला,भासाचा भास पार मोडून टाकला.देहांत (सामान्य चार लोकांप्रमाणे व्यवहारांत) असूनही विदेहाप्रमाणें (देहभावातीत) होऊन वागतो.(द्वैत-भासाचा संबंध तोडून तो देहींच विदेहस्थितीचा अनुभव घेतो.)

जयास अखंड स्वरूपस्थिती । नाहीं देहाची अहंकृती । सकळ संदेहनिवृत्ती । या नांव साधक ॥ २९॥

ज्याची अखंड स्वरुपाकार स्थिति आहें,ज्यास देहाचा अहंकार किंचितही नाहीं,आणि ज्याचे सर्व संशय दूर होऊन गेले (सर्व संशयरहित होऊन अखंड स्वरुपानुभावांत निमग्न होऊन गेला),तो साधक.

पंचभूतांचा विस्तार । जयासि वाटे स्वप्नाकार । निर्गुणीं जयाचा निर्धार । या नांव साधक ॥ ३०॥

पंचभुतांचा हा सर्व विश्र्वाकार ज्यास स्वप्नासारखा खोटा वाटतो व ज्याचा निश्र्चय निर्गुणाच्या ठिकाणी बसलेला आहें,(पांचभौतिक त्याला स्वप्नवत् होऊन जातें व तो निर्गुणीं अनन्य होतो.)

स्वप्नीं भये जें वाटलें । तें जागृतास नाहीं आलें । सकळ मिथ्या निर्धारिलें । या नांव साधक ॥ ३१॥

स्वप्नांत वाटलेले भय जागृतावस्थेत नसतें,त्याप्रमाणें आत्मजागृतीमुळें हें सर्व दृश्य मिथ्या आहें असा ज्याचा निश्र्चय झाला(स्वप्नींचे भय जागृतींत उरत नाहीं ह्याप्रमाणें आत्मजागृतीनें संसारभय नाहींसे होतें)

मायेचें जें प्रत्यक्षपण । जनास वाटे हें प्रमाण । स्वानुभवें अप्रमाण । साधकें केलें ॥ ३२॥

माया,जी डोळ्यांस दिसते व मनास भासते,ती लोकांस खरीशी वाटतें,पण ह्याने तिला आपल्या अनुभवानें खोटी ठरविली,(पण हा स्वानुभवानें तिचें मिथ्यात्व प्रचितीस आणतो)

निद्रा सांडूनि चेइरा जाला । तो स्वप्नभयापासून सुटला । माया सांडून तैसा गेला । साधक स्वरूपीं ॥३३॥

( चेइरा - जागृती )

झोपेतून जो जागा(चेइरा) झाला तो स्वप्नातील भयापासून सुटतो,त्याप्रमाणें मायेच्या झोपेंतून जागा होतो (त्यास संसार स्वप्नांतील भय नाहिसे होतें),तो त्या मायेला टाकून स्वरुपाच्या जागृतावस्थेंत स्थिर होतो.

ऐसि अंतरस्थिती बाणली । बाह्य निस्पृहता अवलंबिली । संसारउपाधी त्यागिली । या नांव साधक ॥ ३४॥

अशी स्वरुपाकार स्थिति ज्याच्या अंत:करणात भिनून गेली आणि बाह्यत: (वैराग्य) नि:स्पृहता ज्यानें राखिली आणि संसाराच्या उपाधीचा त्याग केला त्यांचे नांव साधक.

कामापासून सुटला । क्रोधापासूनि पळाला । मद मत्सर सांडिला । येकीकडे ॥ ३५॥

कामाच्या तडाक्यांतून सुटला,क्रोधापासून पळाला व मदमत्सरांना एका बाजूस टाकलें.

कुळाभिमानासि सांडिलें । लोकलाजेस लाजविलें । परमार्थास माजविलें । विरक्तिबळें ॥३६॥

कुळाभिमान टाकला,लोकलज्जेला लाज आणली,-लोकलाज सांडली व वैराग्याच्या बळावर परमार्थ वाढविला.

अविद्येपासूनि फडकला । प्रपचापासूनि निष्टला । लोभाचे हातींचा गेला । अकस्मात ॥ ३७॥

अविद्येपासून फटकून निघाला,प्रपंचाच्या हातून निसटला,आणि लोभाच्या हातून एकदम निघून गेला.

थोरपणासि पाडिलें । वैभवासि लाथाडिलें । महत्वासि झिंजाडिलें । विरक्तिबळें ॥ ३८॥

थोरपणास पालथे पाडलें,वैभवाला लाथ मारिली,विरक्तीच्या बळावर महत्वाला झिडकारुन टाकलें.

भेदाचा मडगा मोडिला । अहंकार सोडून पाडिला । पाईं धरूनि आपटिला । संदेहशत्रू ॥ ३९॥

( मडगा - घर,मडके )

(मडघा) भेदांचे घर मोडून टाकलें,अहंकार (चिकटला होता तो) सोडून खालीं पाडला व संशयरुप शत्रूला तंगडी धरुन आपटला.

विकल्पाचा केला वधु । थापें मारिला भवसिंधू । सकळ भूतांचा विरोधु । तोडूनि टाकिला ॥ ४०॥

( थापें - थप्पड )

विकल्पाला ठार मारलें,भवसमुद्राला थापटीसारखें उडवून दिलें,सर्व भूतांचे वैर तोडून टाकलें.

भवभयासि भडकाविलें । काळाचें टांगें मोडिलें । मस्तक हाणोनि फोडिलें । जन्ममृत्याचें ॥ ४१॥

संसारभयाचा भडका उडवून दिला (किंवा त्याच्या थोबाडीत मारली),काळाची तंगडी मोडून टाकली आणि जन्म-मृत्युचें डोके ठेंचून टाकलें.

देह समंधावरी लोटला । संकल्पावरी उठावला । कल्पनेचा घात केला । अकस्मात ॥ ४२॥

देह-समंधावर हल्ला केला,संकल्पावर चाल केली व कल्पनेचा एकदम फडशा उडवून दिला.

अपधाकासि ताडिलें । लिंगदेहासि विभांडिलें । पाषांडासि पछाडिलें । विवेकबळें ॥ ४३॥

( अपधाक - दचकणे,असुरक्षित भावना , विभांडिलें - जिंकले )

आपल्या (अपधाक) भीतीला मारलें,वासनात्मक सूक्ष्म देहाला जिंकलें, व विवेकाच्या बळावर नास्तिकपणास घेरुन टाकलें,

गर्वावरी गर्व केला । स्वार्थ अनर्थीं घातला । अनर्थ तोही निर्दाळिला । नीतिन्यायें ॥४४॥

गर्वावर गर्व केला,स्वार्थ अनर्थामध्ये नाहीसा केला (स्वार्थाच्या ठिकाणी अनर्थ दाखविला आणि) अधोगतीच्या अनर्थासही नीतिन्यायानें नाहीसे केले.

मोहासि मध्येंचि तोडिलें । दुःखासि दुःधडचि केलें । शोकासि खंडून सांडिलें । एकीकडे ॥ ४५॥

मोहाला मध्येंच (त्याचा परिणाम होण्याचे अगोदर) तोडून टाकलें,दुःखाचे (दुधड) दोन तुकडे केलें आणि शोकाच्या ठिक-या उडवून त्यांस फेकून दिलें.

द्वेष केला देशधडी । अभावाची घेतली नरडी । धाकें उदर तडाडी । कुतर्काचे ॥ ४६॥

( अभावाची - नास्तिकपणाची )

साधकानें द्वेषास देशांतरी पिटाळलें,अभावाचें (नास्तिकपणाचें) नरडें फोडलें,त्याच्या धाकानें कुर्तर्काचें पोट तडातड उकललें (मेंगलेले,तडा गेला)(परमार्थाच्या शत्रूंचा त्यानें पुरा निःपात केला)

ज्ञानें विवेक माजला । तेणें निश्चयो बळावला । अवगुणांचा संहार केला । वैराग्यबळें ॥ ४७॥

आत्मज्ञानयुक्त विवेक वाढला,त्यायोगें परमार्थाचा निश्र्चय बळकट झाला आणि वैराग्याच्या जोरावर अवगुणांचा संहार केला.

अधर्मास स्वधर्में लुटिलें । कुकर्मासि सत्कर्में झुगटिलें । लांटून वाटा लाविलें । विचारें अविचारासी ॥४८॥

( झुगटिलें - झुगारीले )

स्वधर्माच्या योंगानें अर्धमास लुटलें,सर्त्कमाच्या द्वारें कुकर्मास (झुगारिलें) झुगारुन दिलें व विचारानें अविचाराला ढकलून बाहेर घातलें,

तिरस्कार तो चिरडिला । द्वेष खिरडूनि सांडिला । विषाद अविषादें घातला । पायांतळीं ॥ ४९॥

तिरस्कारास चिरडलें,द्वेषास मुळांपासून उपटून (खिरडूनि) टाकलें,निरुत्साहतेला  उत्साहानें पायांखालीं तुडविलें.

कोपावरी घालणें घातलें । कापट्य अन्तरीं कुटिलें । सख्य आपुलें मानिलें । विश्वजनीं ॥ ५०॥

रागावर (घालणें) घाला घातलां,कपटाला आंतले आंत ठेंचलें व सर्व लोकांशी आपलें सख्य मानलें,

प्रवृत्तीचा केला त्याग । सुहृदांचा सोडिला संग । निवृत्तिपंथें ज्ञानयोग । साधिता जाला ॥ ५१॥

प्रवृत्तीचा त्याग केला,जिवलगांची संगती सोडली, आणि निवृत्तीच्या मार्गाने जाऊन ज्ञानयोग साध्य करुन घेतला.

विषयमैंदासि सिंतरिलें । कुविद्येसी वेढा लाविलें । आपणास सोडविलें । आप्ततस्करांपासूनी ॥ ५२॥

विषयरुप ठकाला ठकविलें (मैंदास सिंतरलें),कुविद्येला वेड लावलें व आत्मरुपी चोरांच्या तडाख्यातून स्वतःची सुटका करुन घेतली.

पराधीनतेवरी कोपला । ममतेवरी संतापला । दुराशेचा त्याग केला । येकायेकीं ॥ ५३॥

पराधीनपणावर रागावला,ममत्वावर संतापला व दुराशेचा त्याग एकदम केला.(माया,ममता,दुराशा त्याच्याजवळ येत नाहीत)

स्वरूपीं घातलें मना । यातनेसि केली यातना । साक्षेप आणि प्रेत्ना । प्रतिष्ठिलें ॥ ५४॥

मनाला स्वरुपाकार केले,यातनेच्या मागे यातना लाऊन दिल्या व दीर्घोद्योग व प्रयत्न ह्यांची स्थापना केलीं.

अभ्यासाचा संग धरिला । साक्षपासरिसा निघाला । प्रेत्न सांगातीं भला । साधनपंथें ॥ ५५॥

( साक्षपासरिसा - दिर्घोद्योगाबरोबर )

अभ्यासाची सोबत धरली,साधनाच्या मार्गानें प्रयत्नांची चांगली सोबत धरुन दीर्घोद्योगाला बरोबर घेऊन निघाला.

सावध दक्ष तो साधक । पाहे नित्यानित्यविवेक । संग त्यागूनि एक । सत्संग धरी ॥ ५६॥

सावध व दक्ष असून नित्यानित्यविवेक पाहाणारा,सर्व (अनित्याचा) संग टाकून देऊन एक संतसंगती मात्र धरणारा,तो साधक होय.

बळेंचि सारिला संसार । विवेकें टाकिला जोजार । शुद्धाचारें अनाचार । भ्रष्टविला ॥ ५७॥

जबरीने संसार बाजूला ढकलला व (तत्संबंधी)(जोजार) खटपट विवेकानें टाकून दिलीं.वेदशास्त्र विहीत कर्मे करुन अनाचार नाहिसा केला.

विसरास विसरला । आळसाचा आळस केला । सावध नाहीं दुश्चित्त झाला । दुश्चित्तपणासी ॥ ५८॥

(स्वस्वरुपाच्या) विस्मरणाला विसरला (म्ह.स्मरणस्वरुपच झाला),आळसाचा कंटाळा केला,(साधनविषयी नित्य तत्पर राहिला),दुश्चितपणाविषयी दुश्चित असतो,सावध नसतो (दुश्चितपणा न येऊ देण्याविषयी सावध असतो)(तात्पर्य बळेंच अवघ्यांचा त्याग करुन तो स्वरुपीं रमतो.)

आतां असो हें बोलणें । अवगुण सांडी निरूपणें । तो साधक ऐसा येणें प्रमाणें । बुझावा ॥ ५९॥

असो आता हे बोलणें पुरे,तात्पर्य हे की निरुपण ऐकून जो आपले सर्व अवगुण टाकतो,तो साधक होय असे समजावें (बुझावा)

बळेंचि अवघा त्याग कीजे । म्हणोनि साधक बोलिजे । आतां सिद्ध तो जाणिजे । पुढिले समासीं ॥ ६०॥

आपण होऊन मुद्दाम सर्वांचा त्याग करतो म्हणून अशाला साधक म्हणावें,आता सिध्द कसा असतो तें पुढच्या समासांत समजेल.

येथें संशयो उठिला । निस्पृह तोचि साधक जाला । त्याग न घडे संसारिकाला । तरि तो साधक नव्हे कीं ॥ ६१॥

येथे एक शंका आली.जो निःस्पृह म्हणजे त्यागी तोच साधक (असें वरील बोलण्यावरुन दिसतें) आणि संसारी माणसाला तर काहीं त्याग घडत नाहीं.तेव्हा तो संसारीक साधक नव्हे काय ?

ऐसें श्रोतयाचें उत्तर । त्याचें कैसें प्रत्युत्तर । पुढिले समासीं तत्पर । होऊनि ऐका ॥ ६२॥

असे श्रोत्यांनी विचारलें,त्याचे उत्तर पुढील समासात देऊन नंतर सिध्दलक्षणांचा विचार सांगितला आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे साधकलक्षणनिरूपण नाम समास नववा ॥ ९॥**

## समास दहावा : सिद्धलक्षण निरूपण ॥ श्रीराम् ॥

मागां बोलिला संसारिक । त्यागेंविण नव्हे कीं साधक । ऐका याचा विवेक । ऐसा असे ॥ १॥

(त्याग घडल्यावांचून साधक होत नाहीं व सांसारिकाला त्याग घडत नाहीं,मग संसारिक साधक होतो की नाही ? ह्या प्रश्नाला उत्तर देतांना समर्थांनी "त्याग" शब्दाचा अर्थ सांगून निःस्पृहपणाप्रमाणें सांसारिकही साधक होतो. असें सांगितलें आहें,निस्पृहाला अंतस्त्याग व बहिस्त्याग दोन्ही घडतात,सांसारिकाला अंतस्त्याग घडून बहिस्त्याग काहीं-काहीं व हळूहळू घडतो),सांसारिक जो आहें तो त्यागाशिवाय साधक होत नाही असे पूर्वी सांगितलें त्याचा विचार असा आहें तो ऐका.

सन्मार्ग तोचि जीवीं धरणें । अन्मार्गाचा त्याग करणें । संसारिका त्याग येणें । प्रकारें ऐसा ॥ २॥

( अन्मार्गाचा - असन्मार्गाचा )

सन्मार्ग असेल त्याचें मनःपूर्वक आचरण करावें, आणि वाईट मार्गाचा त्याग करावा असा हा संसारी जनांचा त्याग असतो.

कुबुद्धित्यागेंविण कांहीं । सुबुद्धि लागणार नाहीं । संसारिकां त्याग पाहीं । ऐसा असे ॥ ३॥

कुबुध्दीचा त्याग केल्याशिवाय सदबुध्दि लागत नाहीं असा हा संसारी लोकांचा त्याग आहे हे ध्यानात ठेव.

प्रपंचीं वीट मानिला । मनें विषयेत्याग केला । तरीच पुढें अवलंबिला । परमार्थमार्ग ॥ ४॥

मनानें प्रपंचाचा तिटकारा करुन विषयांचा त्याग केला तरच पुढें परमार्थमार्ग लागतो.

त्याग घडे अभावाचा । त्याग घडे संशयाचा । त्याग घडे अज्ञानाचा । शनै शनै ॥ ५॥

( शनै शनै - हळूहळू )

अभाव,संशय व अज्ञान ह्यांचा त्याग घडला पाहिजे व तो दोघांनाही हळूहळू होतो.

ऐसा सूक्ष्म अंतर्त्याग । उभयतांस घडे सांग । निस्पृहास बाह्य त्याग । विशेष आहे ॥ ६॥

( अंतर्त्याग - अंतरंगात होणारा सूक्ष्म त्याग , सांग - समग्र )

असा हा सूक्ष्म अंतःस्थ (अवगुणांचा) त्याग निःस्पृह व संसारिक ह्या दोघांसही यथासांग घडतो इतकेंच की निःस्पृहाला बाह्यत्याग अधिक घडतो.

संसारिका ठाईं ठाईं । बाह्य त्याग घडे कांहीं । नित्य नेम श्रवण नाहीं । त्यागेंविण ॥ ७॥

सांसारिकालाही बाह्य त्याग प्रसंगानुसार थोडाबहुत होतच असतो,कारण नित्यनेम,श्रवण हीं बाह्य त्यांगावाचून घडत नाहींत.(आत्मा भावरुप आहें व माया किंवा देहादि संबंध अभावरुप आहेत,आत्मा नित्य शाश्वत वस्तु आहें व माया अभावरुप आहें,त्या मायेचा त्याग घडतो,तिच्याविषयींचे संशय उच्छिन्न होतात,अज्ञान हें तिचेच रुप असल्यामुळें त्याचें निराकारण होतें.उच्छिन्न ढगाचा त्याग होतो, सूर्याचा

नाहीं.आत्मा सूर्यासारखा स्वयंभू व भावरुप आहें.तर मायेचा,अज्ञानाचा,संशयाचा त्याग हा मुख्य आहें ह्याला अंतस्त्याग म्हणतात, व हा निःस्पृह व सांसारिक ह्या दोघांनाही घडला तर दोघेही साधक आहेत ह्यांत संदेह नाही.

फिटली आशंका स्वभावें । त्यागेंविण साधक नव्हे । पुढें कथेचा अन्वय । सावध ऐका ॥ ८॥

अर्थातच शंका फिटली त्याग केल्याशिवाय साधक होतच नाहीं (हे निश्चित झालें) तात्पर्य,त्यांगावाचून साधक नाहीं ह्या सिध्दांताला कोणताच बाध येत नाहीं आता पुढील कथानुसंधान एकाग्रचित्तानें ऐका.

मागां झालें निरूपण । साधकाची वोळखण । आतां सांगिजेल खूण । सिद्धलक्षणाची ॥ ९॥

असो पूर्वीच्या निरुपणांत साधकाची ओळख सागितली (मागे साधकांची लक्षणें सांगीतली),आतां सिध्दलक्षणांची खूण सांगतो.

साधु वस्तु होऊनि ठेला । संशयें ब्रह्मांडाबाहेरी गेला । निश्चयें चळेना ऐसा झाला । या नांव सिद्ध ॥१०॥

साधु ब्रह्मस्वरुप (वस्तु) होऊन राहिला,त्याचा संशय ब्रह्मांडाच्या बाहेर गेला (अजिबात नाहीसा झाला) आत्मस्थितीचा निश्र्चय ढळेनांसा झाला ह्यांचे नांव सिध्द.

बद्धपणाचे अवगुण । मुमुक्षुपणीं नाहीं जाण । मुमुक्षुपणाचें लक्षण । साधकपणीं नाहीं ॥११॥

बध्दपणातलें अवगुण मुमुक्षुपणांत नसतात व मुमुक्षुपणाचें लक्षण साधकपणांत,असत नाहीं,(मुमुक्षुलक्षणें मागें टाकून साधक पुढें गेलेला असतो व)

साधकासि संदेहवृत्ति । पुढें होतसे निवृत्ती । या कारणें निःसंदेह श्रोतीं । साधु वोळखावा ॥१२॥

साधकाची वृत्ति प्रथम संशयी असतें,पण पुढे तिचे निरसन होत जाते,म्हणून निःसंदेही असतो तो साधु हें श्रोत्यांनी ओळखावें.

संशयरहित ज्ञान । तेंचि साधूचें लक्षण । सिद्धाआंगीं संशयो हीन । लागेल कैसा ॥ १३॥

संशयरहित जें ज्ञान तें साधुचें लक्षण होय.क्षुद्र संशय सिध्दाच्या आंगी लागेल कसा ?

कर्ममार्ग संशयें भरला । साधनीं संशय कालवला । सर्वांमध्यें संशये भरला । साधु तो निःसंदेह ॥१४॥

कर्ममार्ग सगळा संशयानें भरलेला आहें,सांधनातही पदोपदीं शंका येतात.असा सर्वत्र संशय भरला आहें.साधु मात्र निःसंदेही असतो, तात्पर्य,संदेहरहित ज्ञान,निश्र्चळ वस्तुरुपता हें सिध्दाचें मुख्य लक्षण होय,निःसंदेह तो सिध्द,कर्ममार्ग संशयानीं भरला आहें साधनमार्गातही पदोपदी संशय येतात पण सिध्द निःसंशय असतो.

संशयाचें ज्ञान खोटें । संशयाचें वैराग्य पोरटें । संशयाचें भजन वोखटें । निर्फळ होय ॥ १५॥

संशय सर्वस्वीं खोटा.संशयाचे ज्ञान खोटे असतें,संशयाचे वैराग्य पोरकट असतें आणि संशयाचे भजनही खोटे.हें सर्व निश्फळ होय,

व्यर्थ संशयाचा देव । व्यर्थ संशयाचा भाव । व्यर्थ संशयाचा स्वभाव । सर्व कांही ॥ १६॥

संशयाचा देव,भाव,स्वभाव सर्व काहीं व्यर्थ होय.

व्यर्थ संशयाचें व्रत । व्यर्थ संशयाचें तीर्थ । व्यर्थ संशयाचा परमार्थ । निश्चयेंवीण ॥ १७॥

निश्चयांवांचून संशयाचे व्रत,तीर्थ,परमार्थ व्यर्थ होय.

व्यर्थ संशयाची भक्ती । व्यर्थ संशयाची प्रीती । व्यर्थ संशयाची संगती । संशयो वाढवी ॥ १८॥

संशयाची भक्ति,प्रीति, व संगति व्यर्थ असून त्यापासून संशय वाढतो.

व्यर्थ संशयाचें जिणें । व्यर्थ संशयाचें धरणें । व्यर्थ संशयाचें करणें । सर्व कांहीं ॥ १९॥

संशयाचें जिणें,शंकेखोराचे धरणे (निश्चय,निग्रह) आणि सर्व काहीं करणे व्यर्थ होय.

व्यर्थ संशयाची पोथी । व्यर्थ संशयाची वित्पत्ती । व्यर्थ संशयाची गती । निश्चयेंविण ॥ २०॥

निश्चयावांचून संशय उत्पन्न करणारा ग्रंथ,संशयी विद्वता (व्युत्पत्ति),संशयाची गति (चालणें,मरण) व्यर्थ होय.

व्यर्थ संशयाचा दक्ष । व्यर्थ संशयाचा पक्ष । व्यर्थ संशयाचा मोक्ष । होणार नाहीं ॥ २१॥

शंकेखोराची दक्षता व शंकेखोराचा पक्ष (बाजू) व्यर्थ,संशयिताला मोक्षही व्यर्थ (मोक्ष मिळणार नाहीं)

व्यर्थ संशयाचा संत । व्यर्थ संशयाचा पंडित । व्यर्थ संशयाचा बहुश्रुत । निश्चयेंविण ॥ २२॥

संत,पंडित किंवा बहुश्रुत असूनही अंतःकरणांत निश्चय उत्पन्न न होतां संशयच राहील तर व्यर्थ.

व्यर्थ संशयाची श्रेष्ठता । व्यर्थ संशयाची व्युत्पन्नता । व्यर्थ संशयाचा ज्ञाता । निश्चयेंविण ॥२३॥

निश्चयावांचून संशयाची श्रेष्ठता,विद्वता व ज्ञातेपणा व्यर्थ होय.

निश्चयेंविण सर्व कांहीं । अणुमात्र तें प्रमाण नाहीं । व्यर्थचि पडिले प्रवाहीं । संदेहाचे ॥२४॥

निश्चयावांचून कोणतेही काहीं लवमात्रसुध्दा खरे मानता येत नाही,संशयाच्या प्रवाहात लोक व्यर्थ पडतात.

निश्चयेंविण जें बोलणें । तें अवघेंचि कंटाळवाणें । बाष्कळ बोलिजे वाचाळपणें । निरर्थक ॥ २५॥

निश्चयांवाचून जें भाषण तें सगळेच कंटाळवाणे होय (बोलणे व्यर्थ )बाष्कळपणानें बडबड करायची तिच्यांत काही अर्थ नाहीं.

असो निश्चयेंविण जे वल्गना । ते अवघीच विटंबना । संशयें काहीं समाधाना । उरी नाहीं ॥ २६॥

निश्र्चयावाचून जी बडबड ती वक्त्याची निव्वळ विटंबना होय,संशयाचे समाधान म्हणून काहीं राहात नाहीं.

म्हणोनि संदेहरहित ज्ञान । निश्चयाचें समाधान । तेंचि सिद्धाचें लक्षण । निश्चयेंसीं ॥ २७॥

म्हणून संशयरहित (स्वरुप-) ज्ञान व निश्र्चयात्मक समाधान हेंच सिध्दांचे निश्र्चयेंकरुन लक्षण होय.(म्हणून नि:संदेहता व समाधान हीं सिध्दांची मुख्य लक्षणें होत.)

तंव श्रोता करी प्रश्न । निश्चय करावा कवण । मुख्य निश्चयाचें लक्षण । मज निरूपावें ॥ २८॥

तेव्हा श्रोत्याने प्रश्र्न केला,कीं सिध्दांपाशी निश्र्चयात्मक ज्ञान असतें म्हणून म्हणतां तर निश्र्चय कोणता करावा ? निश्र्चयांचे मुख्य लक्षण मला सांगावे (ह्यास समर्थ उत्तर देतात तें ऐका.)

ऐक निश्चय तो ऐसा । मुख्य देव आहे कैसा । नाना देवांचा वळसा । करूंचि नये ॥ २९॥

( वळसा - घोटाळा )

तर निश्र्चय तो असा आहें,ऐक.अनेक देवांच्या व साधनांच्या घोंटाळ्यात (वळसा) न पडतां मुख्य देवाचा व मुख्य साधनाचाच निश्र्चय (विचार) करावा.

जेणें निर्मिलें सचराचर । त्याचा करावा विचार । शुद्ध विवेकें परमेश्वर । ओळखावा ॥ ३०॥

ज्यांने हें सर्व चराचर विश्र्व निर्माण केले त्या परमेश्र्वराचा विचार करावा आणि शुध्दविवेकानें त्याची ओळख करुन घ्यावीं (जेथून हें चराचर विश्र्व र्निमाण झालें त्या उगमाशी जाऊन मुख्य देव पहावा)

मुख्य देव तो कोण । भक्तांचें कैसें लक्षण । असत्य सांडून वोळखण । सत्याची धरावी ॥ ३१॥

मुख्य देव कोणता ? भक्तांचे लक्षण काय ?(त्याचा विचार करतांना) असत्य टाकून देऊन सत्याचा शोध घेत जावें (सत्यांची खूणगाठ मनांत ठेवावी).

आपुल्या देवास वोळखावें । मग मी कोण हें पहावें । संग त्यागून रहावें । वस्तुरूप ॥ ३२॥

आधीं आपण जो देव मुख्य परमात्मा-मानला असेल-त्यांचे सत्य स्वरुप ओंळखावें,मग मी (भक्त) कोण हें पहावें,आणि (हें सर्व करीत असतां “ मी “ पणाचा) संग टाकून देवरुप (ब्रह्मरुप) होऊन राहावें.

तोडावा बंधनाचा संशयो । करावा मोक्षाचा निश्चयो । पहावा भूतांचा अन्वयो । वितिरेकेंसीं ॥३३॥

( वितिरेकेंसीं - व्यतिरेक (जे अनुभवास येते ते स्वानंद सागरातील बुडबुडे आहेत अशा मिथ्या भावनेने चाराचाराकडे पाहणे )

बंधन झाल्याचा संशय पडला आहें तो काढून टाकावा,मी मुक्त आहे असा निश्र्चय करावा,(मी बध्द हा संशय टाकून मी मुक्त हा निश्र्चय करावा) अन्वय-व्यतिरेकानें (उभारणी-संहारणीचा) विचार करुन भूतें नाशवंत कशीं आहेंत तें पहावें.

पूर्वपक्षेंसि सिद्धांत । पहावा प्रकृतीचा अंत । मग पावावा निवांत । निश्चयो देवाचा ॥ ३४॥

अष्टधा प्रकृतीचा (पूर्वपक्षाचा) निरास करुन (त्रिगुण-पंचभूतातीत) देव ओळखून (तोच मी असा) निश्र्चय (सिध्दांत) निवांत करावा.

देहाचेनि योगें संशयो । करी समाधानाचा क्षयो । चळों नेदावा निश्चयो । आत्मत्वाचा ॥ ३५॥

देहा(च्या अभिमाना)मुळे नाना संशय उत्पन्न होतात व ते समाधानाचा नाश करतात म्हणून (मी आत्मा आहे,अशा) आत्मबुध्दीचा निश्र्चय ढळूं देऊ नयें.(आपल्या आत्मत्वाचा निश्र्चय करावा)

सिद्ध असतां आत्मज्ञान । संदेह वाढवी देहाभिमान । याकारणें समाधान । आत्मनिश्चयें राखावें ॥३६॥

आत्मज्ञान हें मूळचेंच सिध्द असतां देहाभिमानामुळें संशय वाढतो,म्हणून "मी आत्मा आहें" अशा निश्र्चयांने समाधान राखावें (आत्मज्ञान स्वतःसिध्द आहें,संशयाचे मेघ वोसरलें कीं निश्र्चयाची बुध्दि बळावते)

आठवतां देहबुद्धी । उडे विवेकाची शुद्धी । याकारणें आत्मबुद्धी । सदृढ करावी ॥ ३७॥

"देह मी" अशावृत्तीची (देहबुध्दीची) आठवण झाली की आत्मानात्म-विवेक करण्याचे भान राहात नाही. आणि म्हणून "मी आत्मा आहें" अशी भावना बळकट धरावी.

आत्मबुद्धी निश्चयाची । तेचि दशा मोक्षश्रीची । अहमात्मा हें कधींचि । विसरों नये ॥ ३८॥

मी आत्मा आहें अशी निश्र्चयात्मक बुध्दि हीच मोक्षलक्ष्मीची स्थिति आहें,अहमात्मा मी आत्मा आहे हे कधींही विसरु नये.

निरोपिलें निश्चयाचें लक्षण । परी हें न कळे सत्संगेंविण । संतांसी गेलिया शरण । संशये तुटती ॥३९॥

निश्र्चयाचें लक्षण हे सांगितले,पण हें संतसंगतीवांचून कळणार नाहीं,संतांस शरण गेले म्हणजे सर्व संशय नाहीसे होतात.( "अहमात्मा" हे कधींच विसरु नये. व संशय तुटण्यासाठी सत्संग धरावा)

आतां असो हें बोलणें । ऐका सिद्धाचीं लक्षणें । मुख्य निःसंदेहपणें । सिद्ध बोलिजे ॥४०॥

आतां हें बोलणे असो.सिध्दांची लक्षणे ऐका.निःसंदेहपणा (संशयरहित ज्ञान) हेंच सिध्दाचे मुख्य लक्षण होय.

सिद्धस्वरूपीं नाहीं देहो । तेथें कैंचा हो संदेहो । याकारणें सिद्ध पाहो । निःसंदेही ॥ ४१॥

सिध्दस्वरुपाच्या ठिकाणी देहच नाही तर संदेह कोठचा ?म्हणून सिध्द नेहमी निःसंदेहीच असतो हे लक्षात आणावे.

देहसमंधाचेनि गुणें । लक्षणासि काये उणें । देहातीतांचीं लक्षणें । काय म्हणोनि सांगावीं ॥ ४२॥

देहदृष्टीनें सिध्दाकडे पाहिल्यास त्याच्या ठिकाणीं लक्षणास काय कमी आहें ?(सर्व उत्तमोत्तम गुणच त्याच्या ठिकाणीं असतात) पण त्याची देहातीत अवस्था लक्षांत घेतां त्याची लक्षणें काहीच सांगता येत नाहीत.

जें लक्षवेना चक्षूंसी । त्याचीं लक्षणें सांगावीं कैसीं । निर्मळ वस्तु सिद्ध त्यासी । लक्षणें कैंसीं ॥ ४३॥

जें सिध्दांचे स्वरुप डोळ्यालाच आकलन होत नाही त्याची लक्षणें सांगावी तरी कशी ?सिध्द म्हणजे निर्मळ परब्रह्म,त्याची लक्षणे कशी सांगणार ?

लक्षणें म्हणिजे केवळ गुण । वस्तु ठाईंची निर्गुण । तेंचि सिद्धांचें लक्षण । वस्तुरूप ॥ ४४॥

लक्षणे म्हणजें केवळ गुण,आणि वस्तु-परब्रह्म-मूळचें निर्गुण आणि ब्रह्मस्वरुपाचे लक्षण तेंच सिध्दाचें लक्षण होय.(अलक्ष,अर्निवचनीय सिध्द वस्तु हेंच सिध्दांचे स्वरुप होय )

तथापि ज्ञानदशकीं बोलिलें । म्हणोनि वक्तृत्व आटोपिलें । न्यून पूर्ण क्ष्मा केलें । पाहिजे श्रोतीं ॥४५॥

तथापि ज्ञानदशकामध्ये तींही लक्षणें सांगितलीं जातील,म्हणून येथील विवेचन आटोपतें घेतलें, न्युनाधिक्याबद्दल श्रोत्यांनी क्षमा करावी.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सिद्धलक्षणनिरूपणनाम समास दहावा ॥ १०॥**

**॥ दशक पांचवा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक सहावा - देवशोधनाचा



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ ॥ षष्ठ दशक ॥ ॥ श्रीराम ॥ समास पहिला : देवशोधन**

चित्त सुचित करावें । बोलिलें तें जीवीं धरावें । सावध होऊन बैसावें । निमिष एक ॥ १॥

(ह्यापुढें अध्यात्मनिरुपण व्हावयांचे असल्यामुळे) चित्त स्थिर-सावध-करुन (आतां) जे सांगेन तें नीट ध्यांनात धरावे,सावध होऊन क्षणभर (निरुपण ऐकण्यास) बसावें.

कोणी एके ग्रामीं अथवा देशीं । राहणें आहे आपणासी । न भेटतां तेथिल्या प्रभूसी । सौख्य कैंचें ॥२॥

आपल्याला एखाद्या गावांत किंवा देशात राहावयाचें झालें तर तेथील सत्ताधीशांची भेट घेतल्याशिवाय आपणांस सुख कसें लागेल ?

म्हणौनि ज्यास जेथें राहणें । तेणें त्या प्रभूची भेटी घेणें । म्हणिजे होय श्लाघ्यवाणें । सर्व कांहीं ॥ ३॥

( श्लाघ्यवाणें - चांगले )

म्हणून ज्याला ज्या ठिकाणीं राहावयाचे असेल त्या ठिकाणीं तेथल्या प्रभूची भेट त्यांने घेतली तरच काहीं कल्याणकारक होईल.

प्रभूची भेटी न घेतां । तेथें कैंची मान्यता । आपुलें महत्व जातां । वेळ नाहीं ॥ ४॥

प्रभूची भेट घेतली नाहीं तर तेथें आपली मान्यता कशी होणार ?आपले महत्व (मोठेपणासुध्दां) जायला वेळ लागावयाचा नाही.

म्हणौनि रायापासूनि रंक । कोणी एक तरी नायेक । त्यास भेटणें हा विवेक । विवेकी जाणती ॥५॥

म्हणून राजापासून रंकापर्यंत जो कोणी (नायेक-नायक) प्रमुख असेल त्याला भेटावे हा विचार विचारशील माणसांना ठाऊक असतो.

त्यास न भेटतां त्याचे नगरीं । राहतां धरितील बेगारी । तेथें न करितां चोरी । आंगी लागे ॥ ६॥

( बेगारी - वेठीस )

त्यास (पुढा-यास) न भेटतां त्याच्या नगरांत राहिल्यास (खालचे कामगार) आपणांस वेठीला धरतील, आणि तेंथे चोरी न करतांही आंगी लागेल.

याकारणें जो शहाणा । तेणें प्रभूसी भेटावें जाणा । ऐसें न करितां दैन्यवाणा । संसार त्याचा ॥ ७॥

ह्यास्तव शहाणा असेल त्यांने प्रभूला भेटांवें हें लक्षांत ठेवा,तसे न केल्यास त्याच्या संसाराची दैना उडेल.

ग्रामीं थोर ग्रामाधिपती । त्याहूनि थोर देशाधिपती । देशाधिपतीहूनि नृपती । थोर जाणावा ॥ ८॥

गावांत ग्रामाधिपति म्हणजें पाटील मोठा,त्याहून देशाधिपति (सुभेदार) मोठा व त्यांपेक्षा राजा मोठा.

राष्ट्राचा प्रभु तो राजा । बहुराष्ट्र तो महाराजा । महाराजांचाही राजा । तो चक्रवर्ती ॥ ९॥

एका राष्ट्राचा प्रभु तो राजा,पुष्कळ राष्ट्रांचा मालक तो महाराजा आणि अनेक महाराजांचा स्वामी तो चक्रवर्ती.

एक नरपती एक गजपती । एक हयपती एक भूपती । सकळांमध्ये चक्रवर्ती । थोर राजा ॥ १०॥

( चक्रवर्ती - सार्वभोम )

कोणी नरपति,कोणी गजपति,कोणी अश्र्वपति,कोणी राजा असतो,त्या सर्वांहून चक्रवर्ती राजा थोर होय.(ह्या सर्वांवर अंमल सम्राटांचा चालतो)

असो ऐशिया समस्तां । एक ब्रह्मा निर्माणकर्ता । त्या ब्रह्म्यासही निर्मिता । कोण आहे ॥ ११॥

असो,ह्या सगळ्यांना उत्पन्न करणारा एक ब्रह्मदेव आहे,तो ह्या सर्वांत मोठा.त्या ब्रह्मदेवासही उत्पन्न करणारा कोण आहें ?

ब्रह्मा विष्णु आणि हर । त्यांसी निर्मिता तोचि थोर । तो ओळखावा परमेश्वर । नाना यत्नें ॥ १२॥

ब्रह्मदेव,विष्णु व शंकर ह्यांस ज्या परमेश्र्वरानें उत्पन्न केले तो सर्वात मोठा,त्याची हरप्रयत्नानें ओळख करुन घेतली पाहिजें.

तो देव ठायीं पडेना । तरी यमयातना चुकेना । ब्रह्माण्डनायका चोजवेना । हें बरें नव्हे ॥ १३॥

( चोजवेना - जाणवत नाही )

त्या देवाची प्राप्ति होत नाहीं (ठाई पडेना) तोंपर्यंत यमयातना कायमच्या चुकावयाच्या नाहीत,ब्रह्मांडनायकाची ओळख होत नाही(चोजवेना) हें चांगले नाही.

जेणें संसारीं घातलें । आवघें ब्रह्माण्ड निर्माण केलें । त्यासी नाहीं वोळखिलें । तोचि पतित ॥ १४॥

ज्या परमेश्र्वरानें आपणास संसारात (जन्मास) घातलें व हें सगळें ब्रह्मांड उत्पन्न केले त्याला ज्यानें ओळखलें नाही तो पतितच होय.

म्हणोनि देव ओळखावा । जन्म सार्थकचि करावा । न कळे तरी सत्संग धरावा । म्हणिजे कळे ॥ १५॥

म्हणून देवाला ओळखून जन्म-सार्थक करावें.देव न ओळखतां आला तर संतांची संगति धरावी म्हणजे देवाची ओळख होते.

जो जाणेल भगवंत । तया नांव बोलिजे संत । जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥ १६॥

(आता संत कसा ओळखावा ? देव जाणतो तोच संत) शाश्वत कोणतें व अशाश्र्वत कोणतें ह्याचा निवाडा करुन जो भगवंतास जाणतो त्यास संत म्हणावें.

चळेना ढळेना देव । ऐसा ज्याचा अंतर्भाव । तोचि जाणिजे महानुभाव । तोचि साधू ॥ १७॥

देव चळत नाही, ढळत नाहीं अशी त्याची अंर्तनिष्ठा आहें तोच महानुभाव (मोठा अनुभवी,थोर अंतःकरणाचा) संत साधु जाणावा.

जो जनांमध्ये वागे । परी जनांवेगळी गोष्टी सांगे । ज्याचे अंतरीं ज्ञान जागे । तोचि साधू ॥ १८॥

जो जनांमध्ये वागतो,पण लोकांविरुध्द गोष्टी सांगतो (जनांस ठाऊक नाहीं अशी पलीकडची-देवाची गोष्ट सांगतो)(लोक सांगतातः-चक्षुर्वै सत्यम् । आणि तो म्हणतोःयद्दष्टं तन्नष्टम्।),ज्याच्या अंतःकरणात आत्मज्ञान जागृत असतें,तोच साधु,तात्पर्य, निर्गुण परमात्म्याची ज्याला ओळख आहें तो संत.

जाणिजे परमात्मा निर्गुण । त्यासींच म्हणावें ज्ञान । त्यावेगळें तें अज्ञान । सर्व कांहीं ॥ १९॥

निर्गुण परमात्मा ओळखणें त्यालाच ज्ञान म्हणावें,त्यावाचून बाकीचें सर्व अज्ञान होय.

पोट भरावयाकारणें । नाना विद्या अभ्यास करणें । त्यास ज्ञान म्हणती परी तेणें । सार्थक नव्हे ॥२०॥

पोट भरण्यासाठी अनेक विद्यांचा अभ्यास करणें ह्याला ज्ञान म्हणतात,पण त्या ज्ञानानें काही जन्मसार्थक होणार नाहीं.

देव ओळखावा येक । तेंचि ज्ञान तें सार्थक । येर अवघेंचि निरार्थक । पोटविद्या ॥ २१॥

(म्हणून) एक परमात्मा (एक मुख्य देव आहें हें) ओळखणें हेंच ज्ञान व हेंच सार्थक,बाकी सारे व्यर्थ होय,केवळ पोट भरण्यासाठी विद्या.

जन्मवरी पोट भरिलें । देहाचें संरक्षण केलें । पुढें अवघेंचि वेर्थ गेलें । अंतकाळीं ॥ २२॥

जन्मभर पोट भरुन देहांचे रक्षण केलें पण देहाच्या अंतःकाळी सगळे फुकट गेलें.

येवं पोट भरायाची विद्या ।तियेसी म्हणों नये सद्विद्या ।सर्वव्यापक वस्तु सद्या ।पाविजे तें ज्ञान॥२३॥

( सद्या - प्रत्यक्ष )

तात्पर्य,पोट भरण्याची जी विद्या तिला सद्विद्या म्हणू नयें,सर्वव्यापक परमात्मवस्तूची तात्काळ (याचि जन्मी येणेंचि काळे) प्राप्ति ज्यायोंगे होते तें ज्ञान.

ऐसें जयापाशीं ज्ञान । तोचि जाणावा सज्जन । तयापासीं समाधान । पुसिलें पाहिजे ॥ २४॥

असे वस्तु-ज्ञान ज्याच्याजवळ असेल त्यालाच सज्जन समजावें आणि त्याच्याजवळ समाधान विचारावें,(-तो संत व त्याचा संग करावा म्हणजें देव भेटतो,समाधान मिळतें)

अज्ञानास भेटतां अज्ञान । तेथें कैंचें सांपडेल ज्ञान । करंट्यास करंट्याचें दर्शन । होतां भाग्य कैंचें ॥२५॥

(वरकंडांच्या संगतीचा उपयोग नाही) अज्ञान्याला अज्ञानी भेटला तर तेथे ज्ञान कोठून सापडणार ?करंट्यास करंटा (देवहीन दरिद्री) भेटला तर तेथें भाग्य कोठले ?(-भाग्य उदयास कसचें येते ?)

रोग्यापासी रोगी गेला । तेथें कैंचें आरोग्य त्याला । निर्बळापाशीं निर्बळाला । पाठी कैंची ॥२६॥

रोग्याजवळ दुसरा रोगी आला तर त्याला आरोग्य कोठून मिळणार ? दुबळ्याजवळ दुबळ्याला (पाठी) थारा कसा मिळणार ?(निर्बळाला निर्बळ काय पाठीशी घालणार ?)

पिशाच्यापाशीं पिशाच्य गेलें ।तेथें कोण सार्थक जालें ।उन्मत्तास उन्मत्त भेटलें।त्यास उमजवी कवणु ॥२७॥

पिशाचाजवळ पिशाच्य गेलें तर तेथें सार्थक कोठचे ? उन्नत्ताउन्मत्तांची भेट झाली तर त्यांस शुध्दीवर कोणी आणावें ?( मद्यादिकांचा अम्मल करणारा (उन्मत्त) एक अंमली दुस-या अंमली मनुष्याशी गेला तर त्यांस शुध्दीवर आणणे कसे होईल ?)

भिका-यापासी मागतां भिक्षा । दीक्षाहीनापासी दीक्षा । उजेड पाहतां कृष्णपक्षा । पाविजे कैंचा ॥२८॥

भिका-याजवळ भिका-यानें भीक मागणें,दीक्षाहीनाजवळ दीक्षा घेण्यास जाणें व्यर्थ होय.कृष्णपक्षाजवळ उजेड मागितला तर कोठून मिळेल ?

अबद्धापाशीं गेला अबद्ध । तो कैसेनि होईल सुबद्ध । बद्धास भेटतां बद्ध । सिद्ध नव्हे ॥ २९॥

( अबद्ध - विसंगत )

गैरशिस्त (अबध्द-अव्यवस्थित) मा़णसाला गैरशिस्त माणसाजवळ शिस्त कशी लागणार ? हे जसे निरुपयोगी होय (अन्धेनैव नीयमाना यथान्धाः-कठोपनिषद)

देहापासी गेला देही । तो कैसेनी होईल विदेही । म्हणोनि ज्ञात्यावांचून नाहीं । ज्ञानमार्ग ॥३०॥

देहबुध्दीच्या मनुष्यापाशीं दुसरा देही गेला तर तो विदेही कसा होईल ? (-होणार नाही) म्हणून ज्ञानीं पुरुषांची संगति धरल्यावांचून ज्ञानमार्ग मिळणार नाहीं.

याकारणें ज्ञाता पहावा । त्याचा अनुग्रह घ्यावा । सारासारविचारें जीवा । मोक्ष प्राप्त ॥ ३१॥

ह्यास्तव ज्ञाता (आहें असें) पाहून त्याचा अनुग्रह घ्यावा (म्हणजे सत्संग करावा) म्हणजे (त्याच्या संगतीत) सारासारविचार केल्यास मोक्ष मिळतो.(सारासारविचार होऊन देव जोडतो व जीव मुक्त होतो.)

**हरि ॐ तत्सत् । इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके देवशोधननिरूपणं नाम प्रथमः समासः ॥१॥**

**जय जय रघुवीर समर्थ ॥ समास दुसरा : ब्रह्मपावननिरूपण श्रीराम ॥**

ऐका उपदेशाचीं लक्षणें । सायुज्यप्राप्ति होय जेणें । नाना मतांचें पेखणें । कामा नये सर्वथा ॥१॥

( पेखणें - पाहणे )

जेणेकरुन सायुज्यमुक्ति होते असा उपदेश ऐका,(आतां सायुज्यता देणारा कोणता उपदेश सत्संगात होतो तो पाहूं) अनेक मतमतांतरे पाहात बसणें (पेंखणे,प्रेक्षणें) मुळींच उपयोगास येत नाहीं.

ब्रह्मज्ञानावीण उपदेश । तो म्हणों नये विशेष । धान्येविण जैसें भूस । खातां नये ॥ २॥

धान्य टाकून जसे भुस खातां येत नाही तसें ब्रह्मज्ञानाखेरीज इतर उपदेश व्यर्थ होय.

नाना काबाड बडविलें । नातरी तक्रचि गुसळिलें । अथवा धुवणचि सेविलें । सावकाश ॥ ३॥

( धुवणचि सेविलें - तांदुळाचे धुवण सेवन केले , काबाड - वैरण,पाचोळा )

कणसाशिवाय नुसत्या कडव्याची मळणी केलीं,(काबाड किंवा पेढा बडविला),(लोणी काढलेलें) ताक घुसळीत बसलें अथवा तांदळाचे धुवण यथेच्छ पीत बसलें,

नाना साली भक्षिल्या । अथवा चोइट्या चोखिल्या । खोबरें सांडून खादल्या । नरोट्या जैशा ॥ ४॥

नुसतीं सालपाटे खाल्ली,अथवा चोयट्या चोखीत बसलें,किंवा खोबरें टाकून नरोट्या खात बसलें म्हणजे जशी फलप्राप्ती होत नाहीं,नुसते कष्टच,

तैसें ब्रह्मज्ञानाविण । नाना उपदेशांचा शीण । सार सांडून असार कोण । शहाणा सेवी ॥ ५॥

त्याप्रमाणें ब्रह्मज्ञानावाचून इतर उपदेश नुसते कष्टच होतील.असा कोणता शहाणा आहें कीं जो सार (तत्व टाकून असार (फोलकट) सेवन करील ?(ब्रह्मज्ञान सोडून इतर विषयज्ञानांच्या मागे लागणे व्यर्थ होय.)

आतां ब्रह्म जें कां निर्गुण । तेंचि केलें निरूपण । सुचित करावें अंतःकरण । श्रोतेजनीं ॥ ६॥

आतां निर्गुण ब्रह्माचे निरुपण करुं श्रोते हो,अंत:करण स्वस्थ (सुचित) करुन ऐकावें.

सकळ सृष्टीची रचना । तें हें पंचभौतिक जाणा । परंतु हें तगेना । सर्वकाळ ॥ ७॥

सर्व सृष्टीची रचना पंचभूतात्मक आहें हें ध्यानात ठेवा पण ही सर्वकाळ टिकत नाही.(तगेना अशाश्र्वत आहें)

आदि अंतीं ब्रह्म निर्गुण । तेचि शाश्वताची खूण । येर पंचभौतिक सगुण । नासिवंत ॥ ८॥

निर्गुण ब्रह्म हेंच (विश्र्वाच्या) आरंभी व शेवटी असते,हीच शाश्र्वताची खूण होय,बाकीचा पंचभूतात्मक दृश्याकार नाशवंत आहें.

ये-हवीं हीं पाहतां भूतें । देव कैसें म्हणावें त्यांतें । भूत म्हणतां मनुष्यांतें । विषाद वाटे ॥ ९॥

बाकीचीं पाहू गेलें तर सगळी भुतेंच आहेत,त्यांना देव कसे म्हणावे ?माणसालाही भूत म्हटलें तर वाईट वाटतें.

मा तो जगज्जनक परमात्मा । त्यासि आणि भूतउपमा । ज्याचा कळेना महिमा । ब्रह्मादिकांसी ॥१०॥

मग (मां) तो तर जगाचा पिता परमात्मा,त्याचा महिमा ब्रह्मदिदेवांसही कळत नाहीं,त्याला भुताची उपमा द्यावयाची! (केवढे आश्र्चर्य!)

भूतां ऐसा जगदीश । म्हणतां उत्पन्न होतो दोष । याकारणें महापुरुष । सर्व जाणती ॥ ११॥

भूतासारखाच जगदिश आहें असें म्हटल्यास दोष उत्पन्न होतो,म्हणून महापुरुषांना सर्व ठाऊक असतें.

पृथ्वी आप तेज वायो आकाश । यां सबाह्य जगदीश । पंचभूतांस आहे नाश । आत्मा अविनाशरूपी॥१२॥

पृथ्वी,आप,तेज,वायु व आकाश ह्या पंचभूतांच्या अंर्तबाह्य परमात्मा व्यापलेला,पंचभूते नाशवंत व आत्मा अविनाशी आहें.

जें जें रूप आणी नाम । तो तो अवघाचि भ्रम । नामरूपातीत वर्म । अनुभवें जाणावें ॥ १३॥

जेवढे म्हणून नामरुपात्मक आहें तो सर्व भ्रम होय,आणि ब्रह्मनामरुपाच्या पलीकडे आहें,हे मर्म स्वानुभवानें ओळखावें.

पंचभूतें आणि त्रिगुण । ऐशी अष्टधा प्रकृति जाण । अष्टधा प्रकृतीस नामाभिधान । दृश्य ऐसें ॥ १४॥

पांच भूतें व तीन गुण ही अष्टधा प्रकृति व याच अष्ठधा प्रकृतीलाच द्दश्य असें म्हणतात.

तें हें दृश्य नाशिवंत । ऐसें वेद श्रुति बोलत । निर्गुण ब्रह्म शाश्वत । जाणती ज्ञानी ॥ १५॥

हें द्दश्य नाशवंत आहे असे वेदश्रुति सांगतात,ब्रह्मदृश्याहून निराळे आहें,निर्गुण ब्रह्म तेंवढे शाश्र्वत आहें,हें ज्ञानी लोक जाणतात.

जें शस्त्रें तोडितां तुटेना । जें पावकें जाळितां जळेना । जें कालवितां कालवेना । आपेंकरूनी ॥ १६॥

तें शस्त्रानें तोडूं गेल्यास तुटत नाहीं,अग्नीनें जाळूं गेल्यास जळत नाहीं,पाण्यात(आपे) कालवूं म्हटलें तर कालवलें जात नाहीं (पाण्याने भिजत नाही.)

जें वायूचेनि उडेना । जें पडेना ना झडेना । जें घडेना ना दडेना । परब्रह्म तें ॥ १७॥

तें वायूनें उडविलें जात नाहीं,ते पडत नाहीं,झडत (झिजत) नाही,घडत नाही,लपत नाहीं असे परब्रह्म आहें.

ज्यासि वर्णचि नसे । जें सर्वांहूनि अनारिसें । परंतु असतचि असे । सर्वकाळ ॥ १८॥

( असतचि असे - निरंतर असणे )

ज्यास रंग (वर्ण) नाहीं,जे सर्वाहून वेगळे (अनारिसें),पण सर्वकाळ तें जसेच्या तसेच असतें.

दिसेना तरी काय जालें । परंतु सर्वत्र संचलें । सूक्ष्मचि कोंदाटलें । जेथें तेथें ॥ १९॥

ते दिसले नाही म्हणून काय झालें ?परंतु सूक्ष्मरुपानें तें जेथें तेथें सर्वत्र दाट भरलेले आहें.

दृष्टीस लागली सवे । जें दिसेल तेंचि पाहावें । परंतु गुज तें जाणावें । गौप्य आहे ॥ २०॥

( सवे - सवय )

जें दिसेल तेंवढेंच पाहावें अशी द्दष्टीला संवय (सवे) लागली आहें,पण (ब्रह्म) गुज गुप्त आहें हें लक्षात ठेवावें (ते गुप्त व गूढ आहे हे समजुन घ्यावें)(तें गुप्त विवेकानेंच जाणावें).

प्रगट तें जाणावें असार । आणि गुप्त तें जाणावें सार । गुरुमुखें हा विचार । उमजों लागे ॥ २१॥

प्रकट दृश्य-आहें तें असार आहें व गुप्त-अव्यक्त -हें सार आहें हें ध्यानात ठेवावें.गुरुमुखानें (ऐकल्यास) ह्या विचारांची उमज पडू लागेल.

जे उमजेना तें उमजावें । दिसेना तें पाहावें । जें कळेना तें जाणावें । विवेकबळें ॥ २२॥

विवेकाच्या बळावर जें (गुह्य,ब्रह्म) उमजत नाहीं ते उमजून घ्यावें,जें दिसत नाही ते पहावें व जें कळत नाहीं ते समजून घ्यावें.

गुप्त तेंचि प्रगटवावें । असाध्य तेंचि साधावें । कानडेंचि अभ्यासावें । सावकास ॥ २३॥

गुप्त आहे तेंच प्रकट करावें,जें असाध्य तें साध्य करुन घ्यावें व कानडें म्हणजें दुर्बोध असेल (जाणण्यास कठिण वाटतें) त्याचा हळूहळू (यथाशक्ति) अभ्यास करावा.

वेद विरंचि आणि शेष । जेथें शिणले निशेष । तेंचि साधावें विशेष । परब्रह्म तें ॥ २४॥

( वेद विरंचि - वेद,ब्रह्मदेव )

(ज्याचा शोध करताना) वेद,ब्रह्मदेव व शेष हें अगदीं थकून गेलें तें परब्रह्म विशेषेंकरुन साधावें.

तरी तें कवणें तर परी साधावें । तेंचि बोलिलें स्वभावें । अध्यात्मश्रवणें पावावें । परब्रह्म तें ॥ २५॥

तर ते कोणत्या मार्गाने साध्य करुन घ्यावें ? तेंच आता ओघाओघानें सांगतों,अध्यात्मश्रवणाने तें परब्रह्म प्राप्त करुन घ्यावें ?

पृथ्वी नव्हे आप नव्हे । तेज नव्हे वायु नव्हे । वर्णवेक्त ऐसें नव्हे । अव्यक्त तें ॥ २६॥

( वर्णव्यक्ति - वर्ण व्यक्त , वर्णाक्षराने व्यक्त )

पृथ्वी,आप,तेज,वायु ह्यापैकीं ह्यासारखें ते नव्हे. रंगाने ते स्पष्ट करण्यासारखें नाही,कारण तें अव्यक्त आहें.(पृथिव्यादि तत्वें व्यक्त आहेत व तें अव्यक्त आहें)

तयास म्हणावें देव । वरकड लोकांचा स्वभाव । जितुके गांव तितुके देव । जनांकारणें ॥२७॥

( वरकड - अज्ञानी )

तें परब्रह्म म्हणावें,(तें गुरुमुखानें अध्यात्मश्रवणानें साध्य करावें) बाकीचा सारा लोकांचा स्वभाव,लोकांना जितके गाव तितके देव आहेत.(सामान्य लोकांच्या नादी लागाल तर जितके गांव तितके देव आहेत,ते सोडून हा निर्गुण,शाश्वत,अव्यक्त देव साधावा.)

ऐसा देवाचा निश्चयो जाला । देव निर्गुण प्रत्यया आला । आतां आपणचि आपला । शोध घ्यावा ॥२८॥

ह्याप्रमाणें  देवाचा निश्र्चय होऊन देव निर्गुण आहें हे अनुभवाला आलें,आतां आपण भक्त कोण ह्याचा स्वत:च शोध करावा.(आपण आपला शोध करावा)

माझें शरीर ऐसें म्हणतो ।तरी तो जाण देहावेगळाचि तो ।मन माझें ऐसें जाणतो।तरी तो मनही नव्हे॥२९॥

माझे शरीर असे म्हणतो अर्थात तो (म्हणणारा) देहाहून निराळाच आहें हे निश्र्चित त्याचप्रमाणे माझे मन म्हणतो म्हणून तो मनही नाहीं.

पाहतां देहाचा विचार । अवघा तत्त्वांचा विस्तार । तत्त्वें तत्त्व झाडितां सार । आत्माचि उरे ॥३०॥

देहाचा विचार पाहिला असतां देह म्हणजें तत्वांचा पसारा आहे,(देह हे तत्वांचे गाठोडे आहें) असे दिसून येईल त्या एकुणएक तत्वांचा (एका ब्रह्मांडाच्या तत्वात दुस-या तत्वांचा)लय केला असतां. (पिंडातील तत्वे ब्रह्मांडाच्या तत्वांशी मिळविली तर सकल तत्वांहून भिन्न असा) बाकी शिल्लक असा सारभूत आत्माच राहातो.

आपणासी ठावचि नाहीं । तेथें पाहणें नलगे कांहीं । तत्त्वें ठाईचा ठाई । विभागून गेलीं ॥ ३१॥

आपला म्हणजे मी चा ठावठिकाणाच नाही,तेव्हा तेथे पाहाण्याचे कारणही राहिले नाही.तत्वे जागच्या जागी विभागून जातात.

बांधली आहे तों गांठोडी । जो कोणी विचारें सोडी । विचार पाहतां ही गांठोडी । आडळेना ॥ ३२॥

बांधली आहे तो पर्यंत गाठोडी आहें,विचारानें कोणी एखाद्याने ही गांठोडी सोडल्यावर मग कांहीं ती आढळणार नाहीं.

तत्त्वांचें गांठोडें शरीर । याचा पाहतां विचार । एक आत्मा निरंतर । आपण नाहीं ॥ ३३॥

शरीर हे पंचतत्वांचे गांठोडे आहे. त्याचा विचार केल्यास एक आत्माच निरंतरचा आहें,आपण म्हणून काहींच नाही.

आपणासी ठावचि नाहीं । जन्म मृत्य कैंचे काई । पाहतां वस्तुचा ठाई । पाप पुण्य नसे ॥ ३४॥

( वस्तूच्या ठायीं - सद्वस्तुच्या ठिकाणी )

आपण-मी-च जाग्यावर नाही,मग मला जन्मावयांचे व मरावयांचे हें तरी कोठचे ?परब्रह्माच्या ठिकाणी पाहावयास गेलें तर पापही नाही व पुण्यही नाहीं.

पापपुण्य यमयातना । हें निर्गुणीं तों असेना । आपण तोचि तरी जन्ममरणा । ठाव कैंचा ॥ ३५॥

पाप,पुण्य,यमयातना इत्यादि गोष्टी निर्गुणाच्या ठिकाणीं मुळींच नाहीत आपण तें निर्गुण परब्रह्मच आहोंत तर आपल्यास तरी जन्ममरण कोठचे ?

देहबुद्धीनें बांधला । तो विवेकें मोकळा केला । देहातीत होतां पावला । मोक्षपद ॥ ३६॥

देहबुध्दींने बांधला होता तो विवेकानें मोकळा केला आणि तो देहावेगळा झाला कीं त्याला मोक्षपद मिळतें,(मी आत्म्याहून भिन्न नाहीं हा बोध होतो,मोक्ष हाच)

जालें जन्माचें सार्थक । निर्गुण आत्मा आपण येक । परंतु हा विवेक । पाहिलाच पहावा ॥ ३७॥

निर्गुण आत्मा व आपण एकच ,असें झालें कीं तें जन्मास आल्याचें सार्थक झालें पण हा विवेक एकदा केलेलाच पुन्हा:पुन्हां करावा.(हा विवेक नेहमी जागृत ठेवावा)

जागें होतां स्वप्न सरे । विवेक पाहतां दृश्य वोसरे । स्वरूपानुसंधानें तरे । प्राणीमात्र ॥ ३८॥

जागें झाले की स्वप्न संपतें,तसे विवेक उत्पन्न झाला कीं दृश्य नाहींसे होतें,आणि मग आत्मस्वरुपाच्या अनुसंधानानें (मी आत्मा आहें,त्याहुन भिन्न नाही ह्याच्या अखंड चिंतनानें) प्राणिमात्र ऊध्दरुन जातो.

आपणास निवेदावें । आपण विवेकें नुरावें । आत्मनिवेदन जाणावें । याचें नांव ॥ ३९॥

स्वत:लाच (देवाच्या रुपी) अर्पण करावें,म्हणजे विचारानें ( मीपणाच) आपणच राहू नयें.ह्याला आत्मनिवेदन म्हणतात.

आधीं अध्यात्मश्रवण । मग सद्गुरुपादसेवन । पुढें आत्मनिवेदन । सद्गुरुप्रसादें ॥ ४०॥

प्रथम आत्मानात्मविवेकांचे (अध्यात्माचें) श्रवण करावें,नंतर सद्गुरुचरणसेवा करावी आणि मग सद्गुरुकृपेच्या प्रसादानें आत्मनिवेदन होते.

आत्मनिवेदना उपरी । निखळ वस्तु निरंतरी । आपण आत्मा हा अंतरीं । बोध जाला ॥ ४१॥

आत्मनिवेदन झाल्यावर शुध्द शाश्वत वस्तु जो आत्मा तोच आपण,हा बोध अंत:करणात उत्पन्न होतो.

त्या ब्रह्मबोधें ब्रह्मचि जाला । संसारखेद तो उडाला । देहो प्रारब्धीं टाकिला । सावकाश ॥ ४२॥

त्या ब्रह्मज्ञानाच्या योंगानें हा ब्रह्मरुपच होऊन जातो,मग संसारदु:ख सर्व नाहींसे होतें, व हा खुशाल प्रारब्धावर देह टाकून देतो.

यासि म्हणिजे आत्मज्ञान । येणें पाविजे समाधान । परब्रह्मीं अभिन्न । भक्तचि जाहला ॥ ४३॥

ह्याला आत्मज्ञान म्हणतात,ह्याच्यामुळे समाधान होतें,परब्रह्माशी अभिन्न म्हणजें एकरुप असा भक्तच बनून राहतो.

आतां होणार तें होयेना कां । आणि जाणार तें जायेना कां । तुटली मनांतील आशंका । जन्ममृत्यूची ॥४४॥

आतां व्हावयांचे ते खुशाल होईना आणि जावयांचे असेल तें खुशाल जाईना,जन्ममरणाची भिती मनांत होती ती नाहीशी झाली.

संसारीं पुंडावें चुकलें । देवां भक्तां ऐक्य जालें । मुख्य देवास वोळखिलें । सत्संगेंकरूनी ॥ ४५॥

( संसारीं पुंडावें चुकलें - संसारातील खस्ता,त्रास,दगदग )

संतसंगतीच्या योगानें मुख्य देवाची ओळख झाली की देवाभक्तांचे ऐक्य होतें व संसारातील ओढाताण संपते.(ह्याप्रमाणे ह्या भक्ताचा देह प्रारब्धाधीन होतो व हा अभेदभावाचे स्वात्मसुख भोगितो.

**हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके ब्रह्मप्रतिपादननिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २॥**

**समास तिसरा : मायोद्भवनिरूपण श्रीराम ॥**

निर्गुण आत्मा तो निर्मळ । जैसें आकाश अंतराळ । घन दाट निर्मळ निश्चळ । सदोदित ॥१॥

आकाश जसे घनदाट (सर्वत्र संचलेले),पोकळ,निर्मळ व सर्वकाळ निश्र्चळ असतें तसा आत्माही आहें.तो निर्गुण व निर्मळ आहें.

जें खंडलेंचि नाहीं अखंड । जें उदंडाहूनि उदंड । जें गगनाहूनि वाड । आणि सूक्ष्म ॥ २॥

कधीं खंड (भाग) पडला नसल्यामुळें जें अखंड आहें,जे अत्यंत अपरंपार आहें,जें आकाशाहून मोठे (वाड-मोठें,बृहत म्हणून ब्रह्म) व सुक्ष्म (बारिक) आहे.

जें दिसेना ना भासेना । जें उपजेना ना नासेना । जें येईना ना जाईना । परब्रह्म तें ॥ ३॥

जें (ब्रह्म डोळ्यांस) दिसत नाहीं,(व मनास) भासत नाहीं,जे उपजत नाही,नासत नाहीं (त्याला उपजणें,मरणें नाही),जे येत नाही जात नाही असे ते परब्रह्म आहें.

जें चळेना ना ढळेना । जें तुटेना ना फुटेना । जें रचेना ना खचेना । परब्रह्म तें ॥ ४॥

जें चळत नाही,ढळत नाहीं,तुटत नाहीं,फुटत नाही,रचत नाहीं,खचत नाहीं असे ते परब्रह्म आहें.

जें सन्मुखचि सर्वकाळ । जें निष्कलंक आणि निखळ । सर्वांतर आकाश पाताळ । व्यापूनि असे ॥ ५॥

जें सर्वकाळ सन्मुखच असून निष्कलंक,शुध्द (निखळ),आकाशपासून पाताळापर्यंत व्यापलेलें आणि सर्वांच्या अंतःकरणात भरलेले आहें.

अविनाश तें ब्रह्म निर्गुण । नासे तें माया सगुण । सगुण आणि निर्गुण । कालवलें ॥ ६॥

जें अविनाशी आहें तें निर्गुण ब्रह्म व जें नाशवंत आहें तें सगुण दृश्य (माया) आहें. सगुण व निर्गुण हीं एकमेकांत मिश्र झालेंलीं आहेत.(ब्रह्म अविनाशी व निर्गुण आहे,आणि माया नाशवंत व सगुण आहें,दोघांचा कर्दम झाला आहें म्ह.एकमेकात ती कालवली आहेत.)

या कर्दमाचा विचार । करूं जाणती योगेश्वर । जैसें क्षीर आणि नीर । राजहंस निवडिती ॥ ७॥

( कर्दमाचा - मिश्रण )

तथापि दूध व पाणी जसे राजहंस वेगळे काढतात,तसेच ह्या (निर्गुण-सगुण) मिश्रणाचा विचार कसा करावा ते योगीश्र्वरांना माहीत असतें.(-तसेच जड सबळ म्ह.मिश्र व पांचभौतिक ह्या सर्वांत व्यापून असलेला आत्मा त्याहून वेगळा आहें हे नित्यानित्यविवेकाने ज्ञानी जाणतात.)

जड सकळ पंचभौतिक । त्यामध्यें आत्मा व्यापक । तो नित्यानित्यविवेक । पाहतां कळे ॥ ८॥

जड (अचेतन) हें शबल म्हणजे उपाधियुक्त व पंचभूतात्मक असून त्यांत आत्मा (सर्वत्र) व्यापक आाहें,तो नित्य काय व अनित्य काय ह्याचा विवेक पाहिल्यास कळतो.

उंसामधील घेईजे रस । येर तें सांडिजे बाकस । तैसा जगामध्यें जगदीश । विवेकें वोळखावा ॥ ९॥

( बाकस - चोइट्या )

ऊसांतला रस घेऊन बाकीच्या चोयट्या (बांकस) टाकून द्याव्या, त्याप्रमाणें जगातला जगदीश विवेकानें ओळखून घ्यावा. (आणि पांचभौतिक व त्रिगुण टाकून द्यावें)

रस नाशवंत पातळ । आत्मा शाश्वत निश्चळ । रस अपूर्ण आत्मा केवळ । परिपूर्ण जाणावा ॥ १०॥

परंतु रस पातळ व नाशवंत असून आत्मा शाश्र्वत व निश्र्चळ आहें.तसेच रस अपूर्ण आहे व आत्मा परिपूर्ण आहे असे समजावें.

आत्म्यासारिखें एक असावें । मग तें दृष्टांतासि द्यावें । दृष्टांतमिसे समजावें । कैसें तरी ॥ ११॥

आत्म्यासारखी एखादी वस्तु असेल तर तिची उपमा देतां येईल,(पण तशी वस्तु नसल्यानें)द्दष्टांताच्या निमित्ताने कसे तरी समजून घ्यावें.(आत्म्यासारखी वस्तु नाही त्यामुळेंच असेंच अपूर्ण द्दष्टांत द्यावे लागतात,नाहीतर रस कोठे व आत्मा कोठे ?काही अधिक कळावे म्हणून द्दष्टांत घेतला जातो.)

ऐशी आत्मस्थिति संचली । तेथें माया कैशी झाली । जैशी आकाशीं वाहिली । झुळूक वायोची ॥ १२॥

अशी आत्मस्थिति (घनदाट) भरलेली (संचली) असतांना,तेंथे माया कशी झाली ?(असा प्रश्र्न विचारतात त्यास उत्तरः)तर आकाशांत (स्तब्ध असतां) जशी वायुची झुळूक उत्पन्न झाली. तशी!

वायोपासूनि तेज जालें । तेजापासूनि आप निपजलें । आपापासूनि आकारलें । भूमंडळ ॥ १३॥

पुढे वायूपासून आप (पाणी),आपापासून (भूगोळ) पृथ्वी निर्माण झालीं,

भूमंडळापासून उत्पत्ती । जीव नेणों झाले किती । परंतु ब्रह्म आदि अंतीं । व्यापून आहे ॥ १४॥

पृथ्वीपासून किती जीव उत्पन्न झाले तें सांगताच येत नाहीं,तथापि (ह्या सर्वांस) आदिअंती ब्रह्म व्यापलेलेंच आहें.(हें विसरु नये),

जें जें कांहीं निर्माण झालें । तें तें अवघेंचि नासलें । परी मुळीं ब्रह्म तें संचलें । जैसें तैसें ॥ १५॥

जें जें उत्पन्न होतें ते ते नाश पावतें पण मूळचें ब्रह्म मात्र जसेंच्या तसेंच भरलेलें असते.

घटापूर्वी आकाश असे । घटामध्येंही आकाश भासे । घट फुटतां न नासे । आकाश जैसें ॥ १६॥

(उदाहरण:) ज्याप्रमाणें घागर (घट) फुटल्यावरही आकाश आहेंच-तें काहीं फुटत नाहीं.

तैसें परब्रह्म केवळ । अचळ आणि अढळ । मध्यें होत जात सकळ । सचराचर ॥ १७॥

त्याचप्रमाणें परब्रह्म हें (सदा सर्वकाळ) अचळ व अढळ असतें. मध्येंच हें चराचर जग होतें व जातें.

जें जें कांहीं निर्माण जालें । तें तें आधीं ब्रह्में व्यापिलें । सर्व नाशतां उरलें । अविनाश ब्रह्म ॥ १८॥

जे जे उत्पन्न होते ते ते अगोदरच ब्रह्मानें व्यापलेलें असतें आणि (उत्पन्न झालेलें) सर्व अविनाशी ब्रह्म शिल्लक राहतेंच.

ऐसें ब्रह्म अविनाश । तें सेविती ज्ञाते पुरुष । तत्त्वनिरसनें आपणास । आपण लाभे ॥ १९॥

असें हें ब्रह्म अविनाशी आहें.त्याचेंच ग्रहण ज्ञानी पुरुष करीत असतात तत्वांचा निरास (लय) केला म्हणजे (ह्या) आपल्या स्वरुपाचा आपणांस लाभ होतो.

तत्त्वें तत्त्व मेळविलें । त्यासी देह ऐसें नाम ठेविलें । तें जाणते पुरुषीं शोधिलें । तत्त्वें तत्त्व ॥२०॥

एका तत्वांत दुसरें तत्व मिळवून पंचभूतांचे गांठोडें बनलें त्यास देह असे नांव ठेविलें,पण ज्ञानी पुरुषांनी त्यातील एकुण एक तत्वांचा शोध घेतला.

तत्त्वझाडा निःशेष होतां । तेथें निमाली देहअहंता । निर्गुण ब्रह्मीं ऐक्यता । विवेकें जाहली ॥ २१॥

तत्वांचा झाडा (झडती,शोध) पूर्णपणें झाला,कीं (मी देह अशी वृत्ति) देहाचा अहंकार गळून जातो, आणि अशा त-हेने विवेकानें निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणीं एकरुपता होतें,(ह्याप्रमाणें देहातीत होऊन ज्ञाते ब्रह्माशी एकरुप होतात.आपला आपणासी लाभ तो हाच)

विवेकें देहाकडे पाहिलें । तों तत्त्वें तत्व वोसरलें । आपण कांहीं नाहीं आलें । प्रत्ययासी ॥ २२॥

विवेकानें देहाकडे पाहिले,कीं एकुण एक तत्वे मावळून जातात (तत्वझाडा होतो),व आपण म्हणून काही (वस्तु) नाही असें अनुभवास येते.(आपली तो मायिक वार्ता-आपण काहींच नाही-निर्गुण ब्रह्म उरतें व त्याचा ते प्रत्यय घेतात.)

आपला आपण शोध घेतां । आपुली तों मायिक वार्ता । तत्त्वांतीं उरलें तत्वता । निर्गुण ब्रह्म ॥ २३॥

आपला आपण शोध घ्यावयास लागलें म्हणजे आपण-मी-खोटा आहें (असें आढळून येतें),कारण तत्वांचा लय झाला म्हणजें वास्तविक निर्गुण ब्रह्मच तेवढें उरतें.

आपणाविण निर्गुण ब्रह्म । हेंचि निवेदनाचें वर्म । तत्त्वासरिसा गेला भ्रम । मीतूंपणाचा ॥ २४॥

(आपणावीण निर्गुण ब्रह्म म्ह.) आपलेपणा -मी-मीपणा सोडून निर्गुण ब्रह्माशीं अभिन्न होणें,एकरस होणें,हेंच आत्मनिवेदनाचें वर्म आहें, तत्वे नाहिशी झाली,की त्याबरोबरच मी-तुपणाचा भ्रमही नाहीसा होतो.

मीपण पाहतां आढळेना । निर्गुण ब्रह्म तें चळेना । आपण तेंचि परी कळेना । सद्‌गुरूविण ॥ २५॥

मी कोण हें पाहूं गेलें असतां सांपडत नाही, व निर्गुण ब्रह्म तें चळत नाहीं,तें (निर्गुण) आपण,पण हें ज्ञान सद्गुरुशिवाय कळत नाहीं.

सारासार अवघें शोधिलें । तों असार तें निघून गेलें । पुढें सार तें उरलें । निर्गुण ब्रह्म ॥ २६॥

सार व असार ह्या सर्वांचा शोध घेतला,तेव्हा असार होतें ते निघून गेलें,पुढे सार असे निर्गुण ब्रह्म तेवढे उरलें,

आधीं ब्रह्म निरोपिलें । तेंचि सकळामध्यें व्यापिलें । सकळ आवघेंचि नासलें । उरलें तें केवळ ब्रह्म ॥२७॥

अगोदर ब्रह्म कसें आहें तें सांगितलें,तेच सर्वांस व्यापलेले ब्रह्म आहें,पण सर्वांचा पूर्ण नाश होतो व बाकी शुध्द ब्रह्म तेवढें राहातें.

होतां विवेकें संव्हार । तेथें निवडे सारासार । आपला आपणासि विचार । ठाई पडे ॥ २८॥

विवेक-प्रळयांने तत्वांचा संहार (लय) झाला म्हणजे सार काय व असार काय ह्याचा निवाडा होतो,व आपण कोण ह्याचा विचार आपणास कळतो.

आपण कल्पिलें मीपण । मीपण शोधितां नुरे जाण । मीपण गेलिया निर्गुण । आत्माचि स्वयें ॥ २९॥

"मी" पण हे आपण कल्पिलेलें असते,त्याचा विचार केला,कीं मी पण म्हणून काहींच राहात नाहीं. "मी" पणा नाहीसा झाला म्हणजे आपण तोच स्वतः निर्गुण आत्मा होय.

जालिया तत्त्वांचें निर्शन । निर्गुण आत्मा तोचि आपण । कां दाखवावें मीपण । तत्त्वनिर्शनाउपरी ॥ ३०॥

तत्वांचा निरास (लय) झाला कीं निर्गुण आत्मा तोच आपण (अशी खात्री होते) मग तत्वनिरसन झाल्यानंतर (उगीच) मीपण का मिरवावे ?(असार निरसनाअंती सार उरलें तें निर्गुण ब्रह्म व तेंच आपण)

तत्त्वांमध्यें मीपण गेलें । तरी निर्गुण सहजचि उरलें । सोहंभावें प्रत्यया आलें । आत्मनिवेदन ॥ ३१॥

तत्वे लय पावलीं,त्याबरोबर मीपणही गेलें,तर मग निर्गुण तेवढें सहजच बाकी उरलें, आणि तेंच मी (सः अह्म- तो मी) या भावनेंने आत्मनिवेदनाचा अनुभव आला.

आत्मनिवेदन होतां । देवभक्तांस ऐक्यता । साचार भक्त विभक्तता । सांडूनि जाला ॥ ३२॥

आत्मनिवेदन झालें कीं देवभक्तांची एकरुपता होते व विभक्तता म्हणजे वेगळेपणा टाकून खराखुरा भक्त (एकरुप) होतो.

निर्गुणासि नाहीं जन्ममरण।निर्गुणासि नाहीं पापपुण्य। निर्गुणीं अनन्य होतां आपण ।मुक्त जाला॥ ३३॥

निर्गुणला जन्ममरण व पापपुण्य काहीं नाही,त्याच्या ठिकाणीं अनन्य (एकरुप) झाला की आपण मुक्त होतो.(अशी अनन्यता हीच सायुज्यमुक्ति).

तत्वी वेंटाळूनि घेतला । प्राणी संशयें गुंडाळला । आपणास आपण भुलला । कोहं म्हणे ॥ ३४॥

तत्वांनी वेढले की प्राणी संशयात घोटाळून (भ्रमांत पडून) त्यास आपल्या (ख-या) स्वरुपाची (विस्मरण) भूल पडतें व मी कोण (कोऽहं) म्हणू लागतो.

तत्वी गुंतला म्हणे कोहं । विवेकें पाहतां म्हणे सोहं । अनन्य होतां अहं सोहं । मावळलीं ॥ ३५॥

तत्वांत गुंतला आहे (देहबुध्दि आहे) तो पर्यंत (कोऽहं) मी कोण असे म्हणतो तोच विवेक करुन देहांतता सुटली की सोऽहं निर्गुण ब्रह्म-परमात्मा मीच-असे म्हणू लागतो आणि ब्रह्मस्वरुपीं अनन्य (लीन)-निर्गुण ब्रह्माशी समरस झाला की अहं-सोऽहं हि दोन्ही नाहीशी होतात.

याउपरी उर्वरित । तेंचि स्वरूप संत । देहीं असोनि देहातीत । जाणिजे ऐसा ॥ ३६॥

( तेंचि स्वरूप संत - त्रिकालाबाधित ब्रह्म )

ह्यानंतर जें उर्वरित (शेष) राहाते तेंच संत शाश्र्वतस्वरुप-ब्रह्मच होय.देहामध्ये असून देहातीत होतो तो असा होतो.(ह्या उप्पर शाश्र्वत ब्रह्मच उरतें व त्यांशी अभिन्न असा हा देही असून देहातीत आहे असा जनांस प्रत्यय येतो.)

संदेहवृत्ति ते न भंगे । म्हणोनि बोलिलेंचि बोलावें लागे ॥ आम्हांसी हें घडलें प्रसंगें । श्रोतीं क्ष्मा करावे ॥३७॥

संशयाची (मी कोण ब्रह्म कोण इत्यादिकांची) निवृत्ती होत नाही.(श्रोत्यास पुन्हा पुन्हा मी कोण,ब्रह्म कोण व त्याशी अभिन्न व्हावयांचे कसें असा संदेह पडतो) म्हणून एकदा सांगितले तेंच पुन्हा सांगावें लागतें,आतां आम्हासही प्रसंगानुसार तसे करावे लागलें ह्याबद्दल श्रोत्यांनी क्षमा करावी.

**हरिॐतत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके मायोद्भवनिरूपणं नाम तृतीयः समासः ॥ ३॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

**समास चवथा : ब्रह्मनिरूपण श्रीराम ॥**

कृतयुग सत्रा लक्ष अठ्ठावीस सहस्र । त्रेतायुग बारा लक्ष शाहाणौसहस्र । द्वापरयुग आठ लक्ष चौसष्ट सहस्र । आतां कलियुग ऐका ॥ १॥

कृतयुग सतरालक्ष अठ्ठावीस हजार वर्षे,त्रेतायुग बारालक्ष शहाण्णव हजार वर्षे,द्वापारयुग आठ लक्ष चौसष्ट हजार वर्षे,आता कलियुगाचे मान ऐका.

कलियुग चार लक्ष बत्तीस सहस्र । चतुर्युगें त्रेचाळीस लक्ष वीस सहस्र । ऐशीं चतुर्युगें सहस्र । तो ब्रह्मयाचा येक दिवस ॥ २॥

कलियुग चार लक्ष बत्तीस हजार वर्षे,चारी युगें मिळून त्रेचाळीस लक्ष वीस हजार वर्षे,अशी चार युगे हजारवेळां जातात तेव्हा ब्रह्मदेवाचा एक दिवस होतो,

ऐसे ब्रह्मे सहस्र देखा । तेव्हां विष्णूची एक घटिका । विष्णू सहस्र होतां ऐका । पळ एक ईश्वराचें ॥ ३॥

असे ब्रह्मदेव हजार झालें म्हणजे विष्णूची एक घटका होते,विष्णु हजार झाले म्हणजे ईश्र्वराचें (महेश्र्वराचे) एक पळ होतें.

ईश्वर जाये सहस्र वेळ । तैं शक्तीचें अर्द्ध पळ । ऐशी संख्या बोलिली सकळ । शास्त्रांतरीं ॥ ४॥

ईश्र्वर हजार गेलें म्हणजे तें आदिशक्तीचें अर्धपळ होतें, अशी सर्व संख्या (कालगणना-) शास्त्रांत सांगितली आहें.

चतुर्युगसहस्राणि दिनमेकंपितामहम् । पितामहसहस्राणि विष्णोर्घटिकमेव च ॥ विष्णोरेकः सहस्राणि पलमेकं महेश्वरम् । महेश्वरसहस्राणि शक्तेरर्धं पलं भवेत् ॥

ऐशा अनन्त शक्ती होती । अनंत रचना होती जाती । तरी अखंड खंडेना स्थिति । परब्रह्माची ॥ ५॥

अशा अनंत आदिशक्ती होतात,अनंत (ब्रह्मांडांच्या) रचना होतात व लयास जातात,तरी परब्रह्माच्या स्थितीत खंड पडत नाही. ती अखंड असते (अनंत काळपर्यंत ह्या घडामोडी होत राहिल्या तरी परब्रह्माची स्थिति खंड पावत नाही.)

परब्रह्मासि कैंची स्थिती । परी ही बोलावयाची रीती । वेदश्रुती नेति नेति म्हणती । परब्रह्मीं ॥ ६॥

परब्रह्माला स्थिती तरी कसली पण ही बोलण्याची पध्दत आहें इतकेच.परब्रह्माचे वर्णन करताना वेदश्रृतिसुध्दा न इति.-न इति (तें असे नव्हे) असेंच म्हणतात.(परमात्मस्वरुपाला कालपरिच्छेद तसाच दिक्परिच्छेद नाहीं,म्हणूनच त्याला दिकालाद्यनवच्छिन्न असे भृर्तृहरीनें म्हटलें आहें.)

च्यारि सहस्र सातसे साठी । इतुकी कलियुगाची राहाटी । उरल्या कलियुगाची गोष्टी । ऐसी असे ॥ ७॥

आताशीं चारहजार सातशे साठ (४७६०) इतकीं कलीचीं वर्षे (शक १५८१) गेली,कितीतरी वर्षे अजून उरली आहेत.

च्यारि लक्ष सत्तावीस सहस्र । दोनिसे चाळीस संवछर । पुढें अन्योविण्य वर्णसंकर । होणार आहे ॥ ८॥

चार लक्ष सत्तवीस हजार दोनशें चाळीस वर्षे कलींची राहिली आहेत,पुढे सरसकट वर्णसंकर होणार आहें,(होण्यांची चिन्हे दिसू लागली आहेंत!)

ऐसें रचलें सचराचर । येथें येकाहूनि येक थोर । पाहतां येथींचा विचार । अंत न लगे ॥ ९॥

असे हे चराचर जग रचलें ह्यात एकापेक्षा एक थोर आहेत,येथला विचार पाहू लागलें तर अंत लागावयाचा नाहीं.

येक म्हणती विष्णु थोर । येक म्हणती रुद्र थोर । येक म्हणती शक्ति थोर । सकळांमध्यें ॥ १०॥

कोणी विष्णूला कोणी रुद्राला कोणी शक्तीला सर्वांमध्ये थोर मानतात.

ऐसे आपुलालेपरी बोलती । परंतु अवघेंचि नासेल कल्पांतीं । यद्दृष्टं तन्नष्टं हें श्रुति । बोलतसे ॥ ११॥

लोक आपल्या उपासनेच्या अभिमानानें असें म्हणत असतात-आपआपल्यापरीने असे बोलत असतात.पण कल्पांताच्या वेळी हे सर्वंच नाश पावणारे आहें,यद्दृष्टं तन्नष्टं (जे दिसतें ते नाहिसे होते) असें श्रृतींचेच म्हणणें आहें (जेवढे दृश्यांत आले तेवढें नाशिवंत आहे व हें सारें चराचर मायिक आहें)

आपुलाली उपासना । अभिमान लागला जनां । याचा निश्चयो निवडेना । साधुविण ॥ १२॥

लोकांस आपापल्या उपासनेचा अभिमान लागलेला आहें,(म्हणून कोण थोर) ह्याचा निर्णय साधूशिवाय होत नाही.

साधु निश्र्चय करिती येक । आत्मा सर्वत्र व्यापक । येर हें अवघेंचि मायिक । सचराचर ॥ १३॥

साधूंचा एकच (ठाम) निश्र्चय असतो कीं एकच आत्मा सर्वत्र व्यापलेला असून अविनाशी आहें,बाकीचें चराचर सगळेंच खोटें आहें.

चित्रीं लिहिली सेना । त्यांत कोण थोर कोण साना । हें कां तुम्ही विचाराना । आपुलें ठायीं ॥ १४॥

चित्रामध्ये काढलेल्या सैन्यात लहान कोण व मोठा कोण ह्याचा तुम्हीच आपल्या ठिकाणीं विचार करा ना ?

स्वप्नीं उदंड देखिलें । लहान थोरही कल्पिलें । परंतु जागें झालिया झालें । कैसें पहा ॥ १५॥

स्वप्नांत पुष्कळ वस्तु पाहिल्या,त्यांत अमूक थोर असेंही मानिलें तरी जागे झाल्यावर त्यांचे काय होते ते पहा.

पाहतां जागृतीचा विचार । कैंचें लहान कैंचें थोर । जाला अवघाचि विचार । स्वप्नरचनेचा ॥ १६॥

जागृतींचा विचार केला म्हणजे लहान कोण व थोर कोण ? तो सारा विचार स्वप्नरचनेंतील होय.

अवघाचि मायिक विचार । कोण लहान कोण थोर । लहानथोराचा हा निर्धार । जाणती ज्ञानी ॥ १७॥

तद्वत हा सगळा मायेचा विचार खोटा,त्यात लहान कसला व थोर कसला ?लहान थोरांचा निश्र्चय ज्ञात्यांना माहीत आहें.(स्वप्नांत पाहिलेल्या माणसांतला राजा व रंक जागृतीत आल्यावर सारखेंच मिथ्या आहेत. हे अज्ञान्यांस कळत नसलें तरी ज्ञात्यांस कळतें.)

जो जन्मासी येऊन गेला। तो मी थोर म्हणतांच मेला । परी याचा विचार पाहिला ।पाहिजे श्रेष्ठीं ॥१८॥

जन्मास आलेला प्रत्येक प्राणी मी थोर मी थोर असे म्हणत म्हणतच मरतो ! पण (खरा थोर कोण) ह्याचा विचार श्रेष्ठांनी पाहिला पाहिजें.

जयांसि जालें आत्मज्ञान । तेचि थोर महाजन । वेद शास्त्रें पुराण । साधु संत बोलिले ॥ १९॥

ज्यांस आत्मज्ञान झालें तेच थोर महात्मे होत असें वेद,शास्त्रे,पुराणें,साधुसंत ह्यांनी सांगितले आहें.

एवं सकळांमध्यें थोर । तो येकचि परमेश्वर । तयामध्यें हरिहर । होति जाती ॥ २०॥

तात्पर्य,सगळ्यांमध्यें थोर तो एक परमेश्र्वरच होय.त्याच्यामध्ये हरि-हर (कित्येक) होतात व जातात (त्यांत हरि-हरादि येऊन जातात)

तो निर्गुण निराकार । तेथें नाहीं उत्पत्ति स्थिति संहार । स्थानमानांचा विचार । ऐलिकडे ॥ २१॥

तो परमात्मा निर्गुण व निराकार आहें.तेथे उत्पत्ति,स्थिति व लय हीं नाहींत (-त्यांचा प्रश्र्नच नाहीं),स्थान (दिशा किंवा जागा ठरविणें) व मान (लांबी,रुंदी, व उंचीचें माप घेंणे) ह्यांचा विचार त्याच्या अलिकडचा (स्थानमानाचा विचार-कालगणनेच्या विचाराप्रमाणें अलीकडचा आहें)

नांव रूप स्थानमान । हा तों अवघाचि अनुमान । तथापि होईल निदान । ब्रह्मप्रळयीं ॥ २२॥

नांव,रुप,स्थान,मान (मर्यादा) हें सर्व अनुमानाचें बालणे आहें,तथापि ब्रह्मप्रळयाच्या वेळी (ब्रह्मदेवाची १०० वर्षे भरली म्हणजे) ह्या सगळ्याचा अंत (शेवट) होईल.(ह्या गोष्टी नाशिवंत आहेत असें जें आज अनुमान आहें त्याचा निर्णय ब्रह्मप्रळयाच्या वेळी होईल.)(नांव-रुप,स्थान-मान-स्थानविचार व मानविचार-दिशा किंवा स्थान ठरविणें,व लांबी-रुंदी-उंचीचे माप घेणें,हें सर्व अनुमानाचे आहें. तथापि सर्व विचारांचा अंत ब्रह्मप्रलयी होइल,(ब्रह्मप्रळय म्हणजें ब्रह्मसाक्षात्कारसमयीं जो अशेष.कल्पनांचा लय होतो तो)

ब्रह्म प्रळयावेगळें । ब्रह्म नामरूपानिराळें । ब्रह्म कोणी येका काळें । जैसें तैसें ॥ २३॥

ब्रह्माला नांव-रुप नाहीं,तसा प्रळयाचा धोकाही नाहीं,ब्रह्म ह्या सर्वांहून निराळें (अलग) आहें.कोणत्याही काळी ब्रह्म जसेंच्या तसे असतें (ब्रह्म सर्वकाळी एकरसात्मक आहें)

करिती ब्रह्मनिरूपण । जाणती ब्रह्म संपूर्ण । तेचि जाणावे ब्राह्मण । ब्रह्मविद ॥ २४॥

जें ह्या ब्रह्माचें संपूर्ण स्वरुप जाणतात व ब्रह्माचें (लोकोध्दारार्थ) निरुपण करतात तेंच ब्रह्मवेत्ते ब्राह्मण होत.

**हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके ब्रह्मनिरूपणं नाम चतुर्थः समासः ॥ ४॥**

**समास पांचवा : मायाब्रह्मनिरूपण श्रीराम ॥**

श्रोते पुसती ऐसें । मायाब्रह्म तें कैसें । श्रोत्या वक्त्याचे मिसे । निरूपण ऐका ॥ १॥

माया कशी असतें ब्रह्म कसे असतें असें श्रोत्यांनीं विचारलें,तेव्हां श्रोत्यावक्त्यांच्या निमित्तानें निरुपण ऐका.

ब्रह्म निर्गुण निराकार । माया सगुण साकार । ब्रह्मासि नाहीं पारावार । मायेसि आहे ॥ २॥

(जें जें ब्रह्माविषयीं म्हणावें त्याच्या उलट मायेंविषयी म्हणांवे लागतें) ब्रह्म निर्गुण निराकार तर माया सगुण व साकार आहें.ब्रह्माला अंत-पार नाही,मायेला आहें(ब्रह्म अनंत तर माया सांत)

ब्रह्म निर्मळ निश्चळ । माया चंचळ चपळ । ब्रह्म निरुपाधि केवळ । माया उपाधिरूप ॥ ३॥

ब्रह्म निर्मळ व निश्र्चळ तर माया चपळ व चंचळ,ब्रह्म अगदीं (निरुपाधिक) उपाधिरहित तर माया उपाधिरुप आहें.

माया दिसे ब्रह्म दिसेना । माया भासे ब्रह्म भासेना । माया नासे ब्रह्म नासेना । कल्पांतकाळीं ॥ ४॥

माया दिसते,ब्रह्म दिसत नाहीं.माया भासतें,ब्रह्म भासत नाहीं.कल्पांत समयी मायेचा नाश होतो पण ब्रह्माचा नाश होत नाहीं.

माया रचे ब्रह्म रचेना । माया खचे ब्रह्म खचेना । माया रुचे ब्रह्म रुचेना । अज्ञानासी ॥ ५॥

माया आकाराला येते,ब्रह्म आकाराला येते नाही.मायेचा लय होतो,ब्रह्माचा होत नाहीं,माया अज्ञानी जीवाला आवडते,ब्रह्म आवडत नाहीं.

माया उपजे ब्रह्म उपजेना । माया मरे ब्रह्म मरेना । माया धरे ब्रह्म धरेना । धारणेसी ॥ ६॥

( धारणेसी - बुद्धीला मायेचे आकलन होते,ब्रह्माचे होत नाही )

माया उत्पन्न होते,ब्रह्म होत नाहीं,माया मरते,ब्रह्म मरत नाही,मायेचे आकलन बुध्दीला होते,ब्रह्माचें होत नाही.

माया फुटे ब्रह्म फुटेना । माया तुटे ब्रह्म तुटेना । माया विटे ब्रह्म विटेना । अविट तें ॥ ७॥

माया फुटते,ब्रह्म फुटत नाही,माया तुटते,ब्रह्म तुटत नाहीं,माया विटते,ब्रह्म विटत नाहीं ते अविनाशी आहें.

माया विकारी ब्रह्म निर्विकारी । माया सर्व करी ब्रह्म कांहींच न करी । माया नाना रूपें धरी । ब्रह्म तें अरूप ॥ ८॥

माया विकारी,ब्रह्म निर्विकारी,माया सर्व काही करत्ये,ब्रह्म काहींच करत नाही.(माया सर्व करी ब्रह्म काहींच न करी)माया अनेंक रुपे धारण करतें,ब्रह्माला कोणतेच रुप नाही.

माया पंचभूतिक अनेक । ब्रह्म तें शाश्वत एक । मायाब्रह्माचा विवेक । विवेकी जाणती ॥ ९॥

माया पंचभूतात्मक असून अनेक रुपी आहें,ब्रह्म शाश्वत व एकच आहें,विवेकी असतात ते माया ब्रह्माचा विचार जाणतात.

माया लहान ब्रह्म थोर । माया असार ब्रह्म सार । माया अर्ति पारावार । ब्रह्मासी नाहीं ॥ १०॥

(अर्ति - अलीकडे ,पार - अंत,माया अलीकडे असून अन्तवत आहे.)

माया लहान,ब्रह्म मोठे,माया असार,ब्रह्म सार आहें,माया अलीकडची (अर्ति) आहें,ब्रह्माला पारावार (हें तीर ते तीर) नाहीं.

सकळ माया विस्तारली । ब्रह्मस्थिति आच्छादली । परी ते निवडून घेतली । साधुजनीं ॥ ११॥

(असा दोहोंत भेद असून) माया सर्वत्र पसरलेली आहें व तिनें ब्रह्मास झांकून टाकले आहें,पण तें साधु लोकांनी निवडून घेतलें आहें.

गोंडाळ सांडून नीर घेइजे । नीर सांडून क्षीर सेविजे । माया सांडूनि अनुभविजे । परब्रह्म तैसें ॥ १२॥

( गोंडाळ सांडून - शेवाळ सारून)

(गोंडाळ) शेवाळ बाजूला सारुन पाणी घ्यावें,किंवा पाणी टाकून दूध (तेंवढेंच) घ्यावें,त्याप्रमाणें मायेचा त्याग करुन ब्रह्माचा अनुभव घ्यावा (-मायेचा पडदा दूर सारून ब्रह्म घ्यावें)

ब्रह्म आकाशा ऐसें निवळ । माया वसुंधरा डहुळ । ब्रह्म सूक्ष्म केवळ । माया स्थूळरूप ॥ १३॥

ब्रह्म आकाशासारखें निर्मळ व माया पृथ्वी-(माती)प्रमाणें गढूळ (डहुळ) आहें.ब्रह्म अगदीं सूक्ष्म आहें,माया स्थूळरुपी आहें.

ब्रह्म तें अप्रत्यक्ष असे । माया ते प्रत्यक्ष दिसे । ब्रह्म तें समचि असे । माया ते विषमरूपी ॥ १४॥

ब्रह्म अप्रत्यक्ष-दृष्टीला न दिसणारे-नेत्रादि इंद्रियांस न गवसणारें व माया दृष्टीला दिसणारी म्हणजे इंद्रियगोचर आहें,ब्रह्म हें सदा सम-सर्वत्र सारखें,तर माया विषम-अनियमित म्ह.नानात्व पावणारी आहें.

माया लक्ष्य ब्रह्म अलक्ष्य । माया साक्ष ब्रह्म असाक्ष । मायेमध्यें दोनि पक्ष । ब्रह्मीं पक्षचि नाहीं ॥१५॥

माया लक्ष्य (कळण्याजोगी) व ब्रह्म (दुर्ज्ञेय,समजण्यास कठिण),माया साक्षी (पाहाणारी),ब्रह्म असाक्षीं,मायेंत (पूर्व व उत्तर) दोन पक्ष आहेंत,ब्रह्मांत पक्षच नाहीं.

माया पूर्वपक्ष ब्रह्म सिद्धांत । माया असत् ब्रह्म सत् । ब्रह्मासि नाहीं करणें हित । मायेसि आहे ॥ १६॥

( पूर्वपक्ष - (माया) खंडनक्षम )

माया पूर्वपक्ष (खंडणमंडणांतील) असून ब्रह्म सिध्दांतरुप (खंडणमंडणातलें नव्हें असे.) आहें,माया अनित्य,ब्रह्म नित्य,ब्रह्माला काहीं हेतु नाहीं,मायेला आहें.

ब्रह्म अखंड घनदाट । माया पंचभूतिक पोंचट । ब्रह्म तें निरंतर निघोट । माया ते जुनी जर्जरी ॥ १७॥

( निरंतर निघोट - कायम परिपूर्ण घनदाट )

ब्रह्म अखंड व घनदाट भरलेलें तर माया पंचभूतात्मक व पोंचट आहें.ब्रह्म सदोदित परिपूर्ण(निघोट)असून माया जुनी व जीर्ण झालेली (गोधडी) आहें.

माया घडे ब्रह्म घडेना । माया पडे ब्रह्म पडेना । माया विघडे ब्रह्म विघडेना । जैसें तैसें ॥ १८॥

माया घडतें,पडते व बिघडते,ब्रह्म घडत नाही,पडत नाही व बिघडत नाहीं,ते जसेच्या तसेंच असतें.

ब्रह्म असतचि असे । माया निरसितांच निरसे । ब्रह्मास कल्पांत नसे । मायेसि आहे ॥ १९॥

ब्रह्म सदासर्वकाळ अस्तित्वांत आहेच,मायेचा निरास केला असतां ती नाहीशीं होते,ब्रह्माला कल्पांत नाहीं,मायेला आहें.

माया कठिण ब्रह्म कोमळ । माया अल्प ब्रह्म विशाळ । माया नासे सर्वकाळ । ब्रह्मचि असे ॥२०॥

माया कठिण,ब्रह्म कोमळ,माया थोडी (लहान),ब्रह्म विशाल(अफाट,विस्तीर्ण),माया नासते ब्रह्म सर्वकाळ आहेंच.

वस्तु नव्हे बोलिजे ऐसी । माया जैशी बोलिजे तैशी । काळ पावेना वस्तुसी । मायेसी झडपी ॥ २१॥

ब्रह्म (वस्तु) शब्दांनी सागता येण्यासारखे नाहीं,माया सांगता येते,ब्रह्माविषयीं अबोलणें (मौनच) उचित,मायेविषयीं बोलाल तितकें कमी आहें,काळ ब्रह्माकडे जाऊ शकत नाहीं,तर मायेला झडपतो.

नाना रूप नाना रंग । तितुका मायेचा प्रसंग । माया भंगे ब्रह्म अभंग । जैसें तैसें ॥ २२॥

( मायेचा प्रसंग - मायेचा संबंध )

अनेक रंग व अनेक रुपें आहेत तीं सर्व मायेचीं,त्या मायेचा नाश होतो,ब्रह्म जसेंच्या तसे अभंग आहें(नाना रुपें,नाना रंग,नाना कल्पना सा-या मायेच्या,माया भंगते,ब्रह्म अभंग)

आतां असो हा विस्तार । चालत जातें सचराचर । तितुकी माया परमेश्वर । सबाह्य अभ्यंतरीं ॥२३॥

आता हे सविस्तर वर्णन पुरे झालें.स्थावरजंगमात्मक जेंवढें म्हणून अस्तित्वांत आहें तेवढी माया व हिच्यांत अंतर्बाह्य परमेश्र्वर व्यापलेला आहें.(तात्पर्य,चराचरास होतें जातें ते सारें मायेतलें,ब्रह्म सर्वाच्या अंतर्बाह्य आहें)

सकळ उपाधींवेगळा । तो परमात्मा निराळा । जळीं असोन नातळे जळा । आकाश जैसें ॥२४॥

( नातळे - स्पर्श न करणे )

ज्याप्रमाणें आकाश पाण्यांत असूनही पाणी त्याला स्पर्श करु शकत नाही,त्याप्रमाणें सर्व उपाधींत तो परमात्मा त्यां उपाधीहून तो अलिप्त आहें.

मायाब्रह्मांचें विवरण । करितां चुके जन्ममरण । संतांसि गेलिया शरण । मोक्ष लाभे ॥ २५॥

माया ब्रह्माचें विवरण केलें म्हणजें जन्ममरण चुकतें व संतास शरण जाऊन मोक्ष मिळतो.

अरे या संतांचा महिमा । बोलावया नाहीं सीमा । जयांचेनि जगदात्मा । अंतरचि होय ॥ २६॥

अरें,ह्या संतांचा महिमा सांगावा तेवढा थोडाच आहें त्यांच्या कृपेनें परमात्माच अंतःकरणात प्रकट होतो.जीवच ब्रह्म होतो.

**हरिॐतत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके मायाब्रह्मनिरूपणं नाम पंचमः समासः ॥ ५॥ जय जय रघुवीर समर्थ ॥**

**समास सहावा : सृष्टीकथन श्रीराम ॥**

सृष्टीपूर्वी ब्रह्म असे । तेथें सृष्टि मुळींच नसे । आतां सृष्टि दिसत असे । ते सत्य कीं मिथ्या ॥१॥

ब्रह्म हे सृष्टीच्या पलिकडले आहें व तेथें सृष्टि मुळीच नव्हती,पण सृष्टि (तर आम्हास प्रत्यक्ष) दिसतें ती खरी की खोटी (ती सत्य आहें कीं मिथ्या आहें ?)

तुम्ही सर्वज्ञ गोसावी । माझी आशंका फेडावी । ऐसा श्रोता विनवी । वक्तयासी ॥ २॥

तुम्ही सर्वज्ञ समर्थ आहांत,तेव्हा माझ्या ह्या शंकेचे निरसन करावें अशी श्रोत्यांनीं वक्त्यास विनंति केली.

आतां ऐका प्रत्योतर । कथेसि व्हावें तत्पर । वक्ता सर्वज्ञ उदार । बोलता जाला ॥ ३॥

तेव्हा सर्वज्ञ व उदार असा वक्ता बोलू लागला कीं आतां कथा ऐकण्यास तत्पर होऊन ह्यांचे उत्तर ऐका.

जीवभूतः सनातनः । ऐसें गीतेचें वचन । येणें वाक्यें सत्यपण । सृष्टीस आलें ॥ ४॥

( सनातनः - अविनाशी,शाश्वत )

जीवः भूतःसनातनः(ममैवांशो--गीता अध्याय) ह्या गीतावचनावरुन सृष्टीला सत्यपण येतें.

यद्दृष्टं तन्नष्टं येणें- । वाक्यें सृष्टि मिथ्यापणें । सत्य मिथ्या ऐसें कोणें । निवडावें ॥५॥

यद्दृष्टं तन्नष्टं। ह्या श्रुतिवचनावरुन सृष्टि खोटी आहें असें ठरतें,तेव्हा ह्यांत (-हीं दोन्ही वाक्ये प्रमाण असल्यानें) ख-याखोट्याचा निवाडा कोणी करावा ?

सत्य म्हणों तरी नासे । मिथ्या म्हणों तरी दिसे । आतां जैसें आहे तैसें । बोलिजेल ॥ ६॥

सृष्टी सत्य म्हणावी तर दिसतें.(तात्पर्य काय,कीं सृष्टि सत्यही म्हणतां येत नाहीं व मिथ्याही म्हणतां येत नाहीं,तर ती ब्रह्माप्रमाणेंच अर्निवचनिय आहें.) आतां ह्यातील यथातथ्य विचार (खरे काय आहें तें) सांगतों.

सृष्टीमध्यें बहु जन । अज्ञान आणि सज्ञान । म्हणोनियां समाधान । होत नाहीं ॥ ७॥

ह्या सृष्टित अज्ञानी व सज्ञानी (ज्ञानी) असें दोन वर्ग (दोन प्रकारचें पुष्कळ लोक) आहेत,त्यांची अनेक मतें असतात. म्हणून ऐकणा-यांचे समाधान होत नाहीं.

ऐका अज्ञानाचें मत । सृष्टि आहे ते शाश्वत । देव धर्म तीर्थ व्रत । सत्यचि आहे ॥ ८॥

(प्रथम) अज्ञान्यांचे मत ऐका (तो असे म्हणतो कीं) सृष्टि ही शाश्वत आहें,देव, तीर्थ,धर्म,व्रत सर्व काही खरे आहें.

बोले सर्वज्ञांचा राजा । मूर्खस्य प्रतिमापूजा । ब्रह्मप्रळयाच्या पैजा । घालूं पाहे ॥ ९॥

( मूर्खस्य प्रतिमापूजा - अज्ञान्यास मूर्तीपूजा असते असे ज्ञानी म्हणतात.)

ह्याच्या उलट सर्वज्ञाचा राजा म्हणजें मोठा ज्ञानी असें म्हणतो कीं प्रतिमापूजा मूर्खांची (अज्ञानाची) आहें(त्यांना आवडली तरी) ब्रह्मप्रळयांचे वेळी ती सर्व सृष्टि पैजेनें टिकणार नाहीं तर पूजा कशी टिकणार ?

तंव बोले तो अज्ञान । तरी कां करिसी संध्या स्नान । गुरुभजन तीर्थाटन । कासया फिरावें ॥ १०॥

तेव्हा अज्ञानी म्हणतो (सृष्टि सर्व मिथ्या आहें तर) स्नानसंध्या कां करतोस ?गुरुभजन कां करावें ? तीर्थयात्रा करीत कशासाठी हिंडावें ?

**तीर्थे तीर्थे निर्मलं ब्रह्मवृन्दम् । वृन्दे वृन्दे तत्त्वचिन्तानुवादः । वादे वादे जायते तत्त्वबोधः । बोधे बोधे भासते चन्द्रचूडः ॥ १॥**

चन्द्रचूडाचें वचन । सद्गुरूचें उपासन । गुरुगीतानिरूपण । बोलिलें हरें ॥ ११॥

( चन्द्रचूडाचें - शिव)

(ज्ञानी उत्तर करतो) तीर्थातीर्थाचे ठिकाणीं ब्रह्मवृंदाच्या समुदायांत तत्वचर्चा चालतें,व त्या चर्चेत तत्वबोध होऊन शंकराचे दर्शन होतें(असें)शंकराचे वचन आहें आणि गुरुगीतेमध्ये शंकरांनीं सद्गुरुच्या उपांसनेचें विवेचन केलें आहें.

गुरूसि कैसें भजावें । आधीं तयासि वोळखावें । त्याचें समाधान घ्यावें । विवेकें स्वयें ॥ १२॥

गुरुंचे भजन कसें करावें म्हणशील तर आधीं गुरुचें खरे स्वरुप (ब्रह्मानंद या श्लोकात वर्णिल्याप्रमाणें) ओळखून त्यांच्या ठिकाणी असणारी समाधानवृत्ति विवेकांने आपल्या ठिकाणी बाणवून घ्यावीं

**ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिम् द्वन्द्वातीतं गगनसदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् । एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतम् भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ १॥**

गुरुगीतेचें वचन । ऐसें सद्गुरूचें ध्यान । तेथें सृष्टि मिथ्या भान । उरेल कैंचें ॥ १३॥

असे सद्गुरुंचे ध्यान गुरुगीतेंत सांगीतलें आहें,त्या ठिकाणीं सृष्टीचें मिथ्या भान राहील कोठून?

ऐसें सज्ञान बोलिला । सद्गुरु तो ओळखिला । सृष्टि मिथ्या ऐसा केला । निश्चितार्थ ॥ १४॥

अशाप्रकारेचें भाषण करुन सद्गुरुंस्वरुपाची ओळख ज्ञान्यानें सांगितली व सृष्टि मिथ्या आहें असे निश्र्चय पूर्वक प्रस्थापिलें.

श्रोता ऐसें न मनी कदा । अधिक उठिला वेवादा । म्हणे कैसा रे गोविंदा । अज्ञान म्हणतोसी ॥ १५॥

श्रोत्यांस हें काहीं केल्या पटेना,तो अधिक वाद करु लागला,तो म्हणाला,तुम्ही भगवंताला अज्ञानी कसे म्हणतां?

जीवभूतः सनातनः । ऐसें गीतेचें वचन । तयासि तूं अज्ञान । म्हणतोसि कैसा ॥ १६॥

'जीवभूत:सनातन:' असे भगवद्गीतेचे वचन असतां तुम्ही त्यास अज्ञानी कसें म्हणतां?

ऐसा श्रोता आक्षेप करी । विषाद मानिला अंतरीं । याचें प्रत्युत्तर चतुरीं । सावध परिसावें ॥ १७॥

श्रोत्याला मनांत खेद होऊन त्याने अशी शंका काढली.सुज्ञांनी त्या शंकेचे उत्तर सावधपणानें ऐकावें.

गीतेंत बोलिला गोविंद । त्याचा न कळे तुज भेद । म्हणोनियां व्यर्थ खेद । वाहतोसि ॥ १८॥

गीतेंत भगवंतानी जें सागितलें त्याचा भावार्थ तुला कळला नाहीं,म्हणून तुला व्यर्थ वाईट वाटतें.

**अश्वत्थः सर्ववृक्षाणां ।**

माझी विभूती पिंपळ । म्हणोनि बोलिला गोपाळ । वृक्ष तोडितां तत्काळ । तुटत आहे ॥ १९॥

पिंपळ (अश्र्वत्थ) ही माझी विभूति आहें असें गोपाळानें (श्रीकृष्णानें गीतेंत) सांगितले आहें,पण तो वृक्ष तोडावयास लागलें की तात्काळ तुटतो.

**नैनं छिंदंति शस्त्राणि नैनं दहति पावकः । न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ १॥**

शस्त्रांचेनि तुटेना । अग्नीचेनि जळेना । उदकामध्यें कालवेना । स्वरूप माझें ॥ २०॥

आणि शस्त्रानें तुटत नाहीं,अग्नीनें जळत नाहीं,पाण्यांत कालवलें जात नाही, हें माझें स्वरुप असेंही त्यांचेच म्हणणें आहें.

पिंपळ तुटे शस्त्रानें । पिंपळ जळे पावकानें । पिंपळ कालवे उदकानें । नाशवंत ॥ २१॥

पिंपळ तर शस्त्रानें तुटतो,अग्नींने जळतो व पाण्यांत मिसळला जातो असा नाशवंत आहें.

तुटे जळे बुडे उडे । आतां ऐक्य कैसें घडे । म्हणोनि हें उजेडे । सद्गुरुमुखें ॥ २२॥

जो तुटतो,जळतो,बुडतो व उडतो (वुडे) असा जो पिंपळ व भगवंताचे रुप हीं एक आहेत असें कसें म्हणतां येईल ? आतां ह्याचा उलगडा सद्गुरुंच्या मुखानें होईल (त्यांच्याच मुखानें ह्या वचनांचे खरे मर्म म्हणतां येईल ?आतां ह्याचा उलगडा सद्गुरुंच्या मुखानें होईल(त्यांच्याच मुखानें ह्या वचनांचा खरे मर्म कळून विराधाभास उडून जातों.)

इन्द्रियाणां मनश्चास्मि' । कृष्ण म्हणे मन तो मी । तरी कां आवरावी ऊर्मी । चंचळ मनाची ॥ २३॥

(दुसरे उदाहरण:) तसेंच 'इंद्रियांणा मनश्र्च्यास्मि' म्हणजे इंद्रियांमध्ये मन मी आहें असे कृष्णांनीं म्हटलें आहें मग ह्या चंचळ मनाचे (चंचल हि मनः कृष्ण।) संकल्प तरी का आवरावें ?

ऐसें कृष्ण कां बोलिला । साधनमार्ग दाखविला । खडे मांडूनि शिकविला । वोनामा जेवीं ॥ २४॥

( ओनामा - सुरवात , जेवीं - ज्याप्रमाणे ,खडे मांडून वर्णाक्षरे शिकविण्यास सुरवात)

असे कृष्णांनीं कां म्हटले ? तर खडे मांडून जसा ओनामा शिकवितात तसाच हा साधनामार्ग त्यांनी दाखविला आहें.

ऐसा आहे वाक्यभेद । सर्व जाणे तो गोविंद । देहबुद्धीचा विवाद । कामा नये ॥ २५॥

( वाक्यभेद - विविध निर्णय )

असा वचनांवचनांमध्ये भेद आढळतो (पण त्यातील वर्म) सर्व गोविंद (भगवंत) जाणतो.अशा ठिकाणी देहबुध्दीने होणारा वादविवाद उपयोगाचा नाहीं.

वेद शास्त्र श्रुति स्मृती । तेथें वाक्यभेद पडती । ते सर्वही निवडती । सद्‌गुरूचेनि वचनें ॥ २६॥

वेद,शास्त्र,श्रुति,स्मृति इत्यादिकांच्या वचनांमध्ये असाच परस्परविरोध दिसून येतों ह्या सर्वांची एकवाक्यता गुरुमुखांने होते.

वेदशास्त्रांचें भांडण । शस्त्रें तोडी ऐसा कोण । हें निवडेना साधुविण । कदा कल्पांतीं ॥ २७॥

वेदशास्त्रांचा वाद शस्त्रानें तोडणारा असा कोण आहें ?(तो शस्त्रानें तुटत नाही) साधूशिवाय (इतरांकडून) ह्याचा निर्णय कधी कल्पांतींसुध्दा व्हावयाचा नाहीं.

पूर्वपक्ष आणि सिद्धांत । शास्त्रीं बोलिला संकेत । याचा होय निश्चितार्थ । साधुमुखें ॥ २८॥

( संकेत-अभिप्राय )

पूर्वपक्ष (शंका,माया) व सिध्दांत (समाधान, ब्रह्म) ह्यांच्यासंबंधीं शास्त्रांमध्ये (अनेक) उल्लेख आहेत.पण ह्यांच्या अर्थांचा निश्र्चय साधूच्या मुखांने होतो.

येऱ्हवीं वादाचीं उत्तरें । एकाहूनि एक थोरें । बोलो जातां अपारें । वेदशास्त्री ॥ २९॥

एरवीं वादाचें भांषण करायला लागलें तर अशीं वाक्यें वेदशास्त्रांत एकाहून एक वरचढ अशीं असंख्य आहेत.

म्हणोनि वादवेवाद । सांडूनि कीजे संवाद । तेणें होय ब्रह्मानंद । स्वानुभवें ॥ ३०॥

म्हणून वादविवाद टाकून देऊन जेंणेकरुन ब्रह्मानंद स्वतःच्या अनुभवाला येईल असा संवाद करावा.

एके कल्पनेचे पोटीं । होती जाती अनंत सृष्टी । तया सृष्टीची गोष्टी । साच केवीं ॥ ३१॥

एका कल्पनेंच्या पोटांत असंख्य सृष्टि उत्पन्न होतात लय पावतात.त्या (काल्पनिक) सृष्टीची गोष्ट खरी कशी मानावी ?

कल्पनेचा केला देव । तेथें झाला दृढ भाव । देवालागीं येतां खेव । भक्त दुःखें दुखवला ॥ ३२॥

( देवालागीं येतां खेव - देवाच्या मूर्तीस अपाय , खेव - अपाय )

कल्पनेने देव उभा करुन त्याच्या ठिकाणीं बळकट भाव धरला.त्या देवाला काहीं अपाय (खेव) झाला कीं भक्त दु:खाने विव्हळ होतो.

पाषाणाचा देव केला । एके दिवशीं भंगोन गेला । तेणें भक्त दु:खवला । रडे पडे आक्रंदे ॥ ३३॥

पाषाणाचा (दगडाचा) देव केला होता तो एखाद्या दिवशीं भंगून गेला की त्यांयोगें भक्ताला शोक होऊन तो रडतो,लोळण घेतो,हंबरडा फोडतो.

देव हारपला घरीं । एक देव नेला चोरीं । एक देव दुराचारीं । फोडिला बळें ॥ ३४॥

एक देव घरातल्या घरातच हरवतो.एकाला चोरानें नेलें,एकाला दुष्टांनीं जबरदस्तीनें फोडलें.

एक देव जापाणिला । एक देव उदकीं टाकिला । एक देव नेऊन घातला । पायांतळीं ॥ ३५॥

( जापाणिला - भ्रष्ट केला )

एक देव भ्रष्ट केला (जापाणिला),एक देव पाण्यांत टाकला,एका देवाला नेऊन (इमारतीच्या) पायांत पुरलें.

काय सांगों तीर्थमहिमा । मोडोनि गेला दुरात्मा । थोर सत्व होतें तें मा । काय जाहलें कळेना ॥ ३६॥

तीर्थांचे माहात्म्य केवढें होतें काय सागांवें ? पण दुष्टानें सगळें (तीर्थ) मोडून टाकलें (तिथले सामर्थ्य) सत्व मोठें होतें,(पण) मग (त्यावेळी) काय झालें तें कळत नाहीं.

देव घडिला सोनारीं । देव ओतिला वोतारीं । एक देव घडिला पाथरीं । पाषाणाचा ॥ ३७॥

( ओतिला ओतारीं - लोहाराने धातू ओतून , पाथरीं - पाथर वटाने )

एक देव सोनारानें तयार केलां,एकाची (मूर्ति) ओता-यानें ओतून तयार केलीं,दगडाचा देव पाथरवटांनी घडविला.

नर्मदा गंडिकातीरीं । देव पडिले लक्षवरी । त्यांची संख्या कोण करी । असंख्यात गोटे ॥ ३८॥

नर्मदा व गंडिका ह्या नद्यांचे काठी लाखो देंव आहेत,कोण त्यांची गणती करणार ?असंख्य गोटे आहेत.

चक्रतीर्थी चक्रांकित । देव असती असंख्यात । नाहीं मनीं निश्चितार्थ । एक देव ॥ ३९॥

( चक्रतीर्थी - गोमती नदीत )

चक्रतीर्थांमध्यें चक्रांकित देव (शाळिग्राम) असंख्य आहेत,देव एक आहें असा मनांत निश्र्चयच नाहीं.

बाण तांदळे ताम्रनाणें । स्फटिक देव्हारां पूजणें । ऐसे देव कोण जाणे । खरे कीं खोटे ॥ ४०॥

देव्हा-यामध्ये बाण,तांदळे,तांब्याची नाणीं,स्फटिक ह्यांची पूजा होतें,असे हे देव खरे की खोटे कोणास ठाऊक ?

देव रेशिमाचा केला । तोही तुटोनियां गेला । आतां नवा नेम धरिला । मृत्तिकेच्या लिंगाचा ॥ ४१॥

रेशमाचा देव (अनंत) केला,तो सुध्दां तुटून गेलां,आतां मातीचा देव (पार्थिव लिंगे) करण्याचा नवीन नेम धरला.

आमचा देव बहु सत्य । आम्हांस आकांतीं पावत । पूर्ण करी मनोरथ । सर्वकाळ ॥ ४२॥

आमचा देव फार खरा,तो आम्हाला आणीबाणीचे वेळी पावतो,व नेहमी आमचें मनोरथ पूर्ण करतों.

आतां याचें सत्त्व गेलें । प्राप्त होतें तें झालें । प्राक्तन नवचे पालटिलें । ईश्वराचेनि ॥ ४३॥

(पण) आतां त्यांचे सामर्थ्य नाहीसे झालें,नशिबांत होते ते झालें,प्रारब्धात असेल ते देवाच्याने सूध्दा टळत नाहीं,

धातु पाषाण मृत्तिका । चित्रलेप काष्ठ देखा । तेथें देव कैंचा मूर्खा । भ्रांति पडिली ॥ ४४॥

धातु,पाषाण,माती,चित्रें,लांकडें इत्यादिकांत देव कोठला ? मूर्खास (रे,मुर्खा तुला) उगीच भ्रम पडला.

हे आपुली कल्पना । प्राप्ता-ऐशीं फळें जाणा । परी त्या देवाचिया खुणा । वेगळ्याचि ॥ ४५॥

(देंवानें माझे अमूक अमूक केलें असे वाटणें) हीं कल्पना आपली आहें(वास्तविक पाहांता) आपल्याला कृतकर्मानुरुप आपणांस बरीवाईट फळें मिळत असतात,पण देवाच्या खुणा त्या वेगळ्याच असतात.

**नानाशास्त्रविदो लोका नानादैवतपूजकाः । आत्मज्ञानं विना पार्थ सर्वकर्म निरर्थकम् ॥ १॥**

म्हणोनि हें माया भ्रमणें । सृष्टि मिथ्या कोटिगुणें । वेद शास्त्रें पुराणें । ऐशींच बोलती ॥ ४६॥

म्हणून (सृष्टि खरी वाटणें) हा मायेचा भ्रम आहें,सृष्टिमिथ्या हा सिध्दांत कोटिवेळ खरा आहें,वेद,शास्त्रे, पुराणें असेंच सांगतात.

साधु संत मानुभाव । त्यांचा ऐसाचि अनुभव । पंचभूतातीत देव । सृष्टि मिथ्या ॥ ४७॥

साधु,संत,महात्मे ह्यांचाही पण अनुभव असाच आहें,की देव पंचभूतांहून वेगळा असून (पंचभूतात्मक) सृष्टि खोटी आहें)

सृष्टीपूर्वी सृष्टि चालतां । सृष्टि अवघी संव्हारतां । शाश्वत देव तत्त्वतां । आदि अंतीं ॥ ४८॥

सृष्टीच्या अगोदर, सृष्टि  चालत असतां, व सृष्टीचा नाश झाल्यानंतरही,तात्पर्य आदिअंती देव सदोदित शाश्र्वत आहें ,तो खरा,

ऐसा सर्वांचा निश्चयो । यदर्थीं नाहीं संशयो । वीतरेक आणि अन्वयो । कल्पनारूप ॥ ४९॥

असा सगळ्यांचा निश्र्चय आहें,ह्यांत संशय नाही.(उभारणी,संहारणी) अन्वय-व्यतिरेक हा सर्व काल्पनिक आहें.

येके कल्पनेचे पोटीं । बोलिजेती अष्ट सृष्टि । तये सृष्टीची गोष्टी । सावध ऐका ॥ ५०॥

एका कल्पनेच्या पोटात आठ सृष्टी आहेंत असें म्हणतात,त्यांचे प्रकार  नीट लक्षपूर्वक ऐका.

येक कल्पनेची सृष्टी । दुजी शाब्दिक सृष्टी । तिजी प्रत्यक्ष सृष्टी । जाणती सर्व ॥ ५१॥

(१) कल्पनासृष्टि (मनोराज्य) २ शब्दसृष्टि ३ डोळ्यांस दिसणारी सृष्टि सर्वांस माहीत आहें.

चौथी चित्रलेप सृष्टी । पांचवी स्वप्नसृष्टी । साहावी गंधर्वसृष्टी । ज्वरसृष्टी सातवी ॥ ५२॥

४ चित्रलेखन-चित्रलेप सृष्टि ५ स्वप्नसृष्टि ६ गंधर्वसृष्टि (आकाशात अनेक जीवाकृती ढग) ७ ज्वरसृष्टि (तापांचे भ्रमात दिसतें ती)

आठवी दृष्टिबंधन । ऐशा अष्ट सृष्टि जाण । यांमध्ये श्रेष्ठ कोण । सत्य मानावी ॥ ५३॥

८ द्दष्टीबंधन सृष्टि (नजरबंदी) अशा आठ सृष्टि आहेत. ह्यांच्यामध्ये श्रेष्ठ व खरी कोणती मानावीं. ?

म्हणोन सृष्टी नासिवंत । जाणती संत महंत । सगुणी भजावा निश्चित । निश्चयालागीं ॥ ५४॥

म्हणून सृष्टि नाशवंत आहे हें संत-महंतांस माहीत आहें.तथापि हें जाणण्यासाठी सगुणाचीच उपासना केली पाहिजें.

सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें । सारासारविचारें । संतसंगें ॥ ५५॥

सगुण उपासनेच्या आश्रयांनें सारासारविचार करुन संतसंगतीच्या योगानें निर्गुणपद निश्र्चयेंकरुन प्राप्त होतें.

आतां असो हें बहुत । संतसंगें कळे नेमस्त । येरवीं चित्त दुश्चित । संशयीं पडे ॥ ५६॥

आतां हा विस्तार पुरे संतसंगतीमध्ये (राहिले असता) सर्व काही निश्र्चयात्मक समजतें,नाहीतर चित्त संशयात पडून दुश्चित होतें.

तंव शिष्यें आक्षेपिलें । सृष्टी मिथ्या ऐसें कळलें । परी हें दृश्य अवघें नाथिलें । तरी दिसतें कां ॥५७॥

( अवघें नाथिलें - संपूर्ण मिथ्या )

ह्यावर शिष्यानें शंका घेतली,की सृष्टि मिथ्या हें मला समजलें,पण ही सगळी सृष्टि मिथ्या आहें तर ती दिसतें कां ?

दृश्य प्रत्यक्ष दिसतें । म्हणोनि सत्यचि वाटतें । यासि काय करावें तें । सांगा स्वामी ॥ ५८॥

द्दश्य हें प्रत्यक्ष दिसतें म्हणून तें खरें वाटतें,महाराज याला काय करावे ते सांगा ना!

याचें प्रत्युत्तर भलें । पुढिले समासीं बोलिलें । श्रोतीं श्रवण केलें । पाहिजे पुढें ॥ ५९॥

ह्या शंकेचे योग्यसें (समर्पक) उत्तर पुढील समांसात सांगितलें आहें, ते श्रोत्यांनी पुढे श्रवण करावें.

एवं सृष्टि मिथ्या जाण । जाणोनि रक्षावें सगुण । ऐशी हे अनुभवाची खूण । अनुभवी जाणती ॥ ६०॥

तात्पर्य सृष्टि मिथ्या आहें हे लक्षांत ठेऊन सगुण उपासनेच्या मार्गाचे संरक्षण करावें,अशी ही अनुभवाची खूण आहें,ती अनुभवी लोकांना माहित आहें(असते) (म्हणून संशय सोडून सृष्टि मिथ्या आहे हे संतांपाशी राहून शीक सगुणाची निंदा केली असे समजू नकोस,निश्चय द्दढ होण्यासाठी सगुणास अवश्य भजावें,सगुणाच्या आधाराने सारासार विचाराच्या बळानें सत्संगतीत शाश्वत ब्रह्म ओळखावें व तद्रुप व्हावें.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सृष्टिकथानिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६॥**

### समास सातवा : सगुणभजन श्रीराम ॥

ज्ञानें दृश्य मिथ्या जालें । तरी कां पाहिजे भजन केलें । तेणें काय प्राप्त झालें । हें मज निरूपावें ॥१॥

द्दश्य मिथ्या आहें असे ज्ञानाने ठरवल्यावर (सगुण हें द्दश्यातलें-मिथ्या वस्तूतलें-असतां त्या सगुणाचें भजन कां केलें पाहिजें ? त्यामुळें काय प्राप्त होतें ते मला सांगा.

ज्ञानाहूनि श्रेष्ठ असेना । तरी कां पाहिजे उपासना । उपासनेनें जनां । काय प्राप्त ॥ २॥

ज्ञानाहून श्रेष्ठ दुसरें काही नाहीं तर मग उपासना कशाला पाहिजें ? उपासनेंमुळें लोकांस काय मिळतें ?

मुख्य सार तें निर्गुण । तेथें दिसेचिना सगुण । भजन केलियाचा गुण । मज निरूपावा ॥ ३॥

निर्गुण हें मुख्य व श्रेष्ठ आहें तेथे सगुण दिसतच नाही,ह्यासाठी भजन केल्याचे फळ काय तें मला सांगावें ?

जें समस्त नासिवंत । त्यासि भजावें किंनिमित्त । सत्य सांडून असत्य । कोणें भजावें ॥ ४॥

जें सगळे नाशवंत आहें त्याचे भजन कोणत्या कारणास्तव करावें ? खरें टाकून देऊन खोट्यांचें भजन कोणी करावें ?

असत्याचा प्रत्यये आला । तरी मग नेम कां लागला । सत्य सांडून गल्बला । कासया करावा ॥५॥

सगुण-द्दश्य असत्य आहें असा अनुभव (प्रत्यय) आल्यावर मग (असत्याचें-द्दश्याचें भजन करावें) असा नियम कशाला पाहिजें ?सत्य टाकून (गलबला) रिकामी खटपट कां करावी ?

निर्गुणानें मोक्ष होतो । प्रत्यक्ष प्रत्यय येतो । सगुण काय देऊं पाहतो । सांगा स्वामी ॥ ६॥

निर्गुणानें मोक्ष मिळतो असा अनुभव आहें,महाराज,सगुणापासुन काय फळ मिळण्याचा संभव आहें ते सांगा बरे !

सगुण नासिवंत ऐसें सांगतां । पुनः भजन करावें म्हणतां । तरी काशासाठीं आतां । भजन करूं ॥७॥

सगुण द्दश्य नाशवंत आहें असें सांगता व पुन्हा (त्याचेच) भजन करावें असें म्हणतां !तर हें भजन कशासाठीं करावयाचें तें सांगा.

स्वामीचे भिडेनें बोलवेना । येऱ्हवीं हें कांहींच मानेना । साध्यचि झालिया साधना । कां प्रवर्तावें ॥ ८॥

महाराजांच्या भिडेने बोलवत नाही,बाकी ही कोणतीच गोष्ट पटत नाहीं,साध्यच (ब्रह्मच) आपण झाल्यानंतर मग साधनांस कां म्हणून लागावे ?

ऐसें श्रोतयाचें बोलणें । शब्द बोले निर्बुजलेपणें । याचें उत्तर ऐकणें । म्हणे वक्ता ॥ ९॥

( निर्बुजले - गोंधळ )

असे श्रोत्यांचे म्हणणे पडलें,गोंधळ झाल्यासारखे (निर्बुजलेपणें- अर्धवट समजल्यासारखें) त्याचे शब्द निघूं लागलें,तेव्हा वक्ता म्हणाला,'ह्यांचे उत्तर ऐक'.

सद्गुरु वचन प्रतिपाळण ।हें मुख्य परमार्थाचें लक्षण । वचनभंग करितां विलक्षण।सहजचि जालें ॥१०॥

गुरुच्या वचनाचा प्रतिपाळ करणें (गुरुच्या आज्ञेनुसार तंतोतंत वागणें) हें परमार्थाचें मुख्य लक्षण होय.वचनाचा भंग केला म्हणजें अर्थातच विलक्षण (परमार्थाविरुध्द) होतें.

म्हणोनि आज्ञेसि वंदावें । सगुण भजन मानावें । श्रोता म्हणे हें देवें । कां प्रयोजिलें ॥११॥

म्हणून गुर्वाज्ञा शिरसावंद्य करुन सगुण-भजन करावें ह्यावर श्रोता म्हणतो,गुरुंनी(देवे) तरी असें कां सागितलें ?

काय मानिला उपकार । कोण जाला साक्षात्कार । किंवा प्रारब्धाचें अक्षर । पुसिलें देवें ॥ १२॥

( प्रारब्धाचें अक्षर - नशिबात लिहिलेले )

'(सगुण देंवानें) असा आमच्यावर कोणता उपकार केला आहें' की त्याबद्दल कृतज्ञतेंनें आम्हीं त्याचें भजन करावें ? अथवा त्याचा कोणता साक्षात्कार झाला आहें ?किंवा प्रारब्धाची रेषा पुसून टाकलीं आहें ?

होणार हें तों पालटेना । भजनें काय करावें जना । हें तों पाहतां अनुमाना । कांहींच न ये ॥१३॥

होणारे जर चुकत नाहीं तर भजनानें लोकांचे काय (बरेवाईट) होणार ?ह्याचा विचार केला म्हणजें कोणतीच गोष्ट संयुक्तिक दिसत नाहीं.

स्वामीची आज्ञा प्रमाण । कोण करील अप्रमाण । परंतु याचा काय गुण । मज निरूपावा ॥ १४॥

'स्वामींची आज्ञा मान्य आहें. तिचे उल्लंघन कोण करील ?परंतु ह्यांचे (सगुण भजनाचें) फल काय तें मला सांगावें'.

वक्ता म्हणे सावधपणें । सांग ज्ञानाची लक्षणें । तुज कांहीं लागे करणें । किंवा नाहीं ॥ १५॥

(ह्यावर) वक्ता म्हणाला,"ज्ञान झाल्याची लक्षणें" नीट सांग पाहू.तुला काही करावे लागतें की नाहीं ?

करणें लागे भोजन । करणें लागे उदकप्राशन । मळमूत्रत्यागलक्षण । तेंही सुटेना ॥ १६॥

भोजन करावें लागतें,पाणी प्यावें लागतें,मलमूत्रत्याग हाही सुटत नाहीं.

जनाचें समाधान राखावें । आपुलें पारिखें ओळखावें । आणि भजनचि मोडावें । हें कोण ज्ञान ॥ १७॥

लोकांची मनधरणी करावीं,आपपरभाव जाणावा,(हें सर्व दृश्य-मिथ्या असलें तरी करावें) आणि भजन मात्र मोडून टाकावें हें ज्ञान कोठलें ?

ज्ञान विवेकें मिथ्या जालें । परंतु अवघें नाहीं टाकिलें । तरी मग भजनेंचि काय केलें । सांग बापा ॥१८॥

आत्मज्ञानानें व सारासार विचारानें सर्व काही मिथ्या झालें,(असें म्हणतोस),पण ह्या सगळ्या क्रिया टाकल्या नाहींस,तर मग बाबा एकट्या भजनानेंच काय (पाप)केलें तें सांग बरें!

साहेबास लोटांगणीं जावें । नीचासारिखें व्हावें । आणि देवास न मनावें । हें कोण ज्ञान ॥ १९॥

धन्यास अधिका-यास लोटांगणे घालावीं,नीचासारखें (त्याच्यापुढें) वागावें आणि देवाला मात्र मानूं नयें हें ज्ञान कोठचें ?(वरिष्ठांच्या पायां पडून नीचसेवा पोटासाठीं करावयांचें सोडीत नाहींस आणि भजन मात्र सोडतोस हें काय ज्ञान ?)

हरि हर ब्रह्मादिक । हे जयाचे आज्ञाधारक । तूं येक मानवी रंक । भजेसिना तरी काय गेलें ॥२०॥

हरिहर ब्रह्मादिक देव ज्याच्या आज्ञेंत वागतात त्या देवाधिदेवांचे तूं य:कश्र्चित् माणसानें भजन केलें नाहींस म्ह णून त्याचें काय नुकसान होणार आहे ?(परमज्ञानी असें हरिहर ब्रह्मादिकही भजन सोडीत नाहीत आणि तूं एक य:कश्र्चित मनुष्य!तूं देवाधिदेवाचें भजन केलें नाहींस म्हणून काय झालें ?)

आमुचे कुळीं रघुनाथ । रघुनाथ आमुचा परमार्थ । जो समर्थाचाही समर्थ । देवां सोडविता ॥ २१॥

(दुसरे असें की) आमचें कुलदैवत रघुनाथ आहें त्याच्या कृपेनें आमचा परमार्थ चालला आहें. तो (सर्व) समर्थांचा समर्थ असून त्यांनें देंवांना (बंदितून) सोडवलें.

त्याचे आम्ही सेवकजन । सेवा करितां जालें ज्ञान । तेथें अभाव धरितां पतन । पाविजेल कीं ॥२२॥

( अभाव धरितां - अविश्वास दाखविता )

त्या रघुनाथाचें आम्ही सेवक-दास आहोत,त्याची सेवा-उपसना-केल्यांनेच आम्हास हें ब्रह्मज्ञान प्राप्त झालें,(अर्थात उपासनेच्या योगानें आत्मज्ञानाचा लाभ होतो हा आमचा अनुभव आहें) ह्यावर जो अविश्र्वास करील तो पतन पावेंल.(दुर्गतीला जाईल).

सद्‌गुरु सांगती सारासार । त्यास कैसें म्हणावें असार । तुज काय सांगणें विचार । शाहाणे जाणती ॥२३॥

सारासार विचार करुन गुरु जें (निश्र्चयात्मक) ज्ञान सांगतात.त्याला असार कसें म्हणावें ?ते सर्व शहाण्यास माहीत असतें,तुला काय सांगावें ?

समर्थाचे मनींचें तुटे । तेंचि जाणावें अदृष्ट खोटें । राज्यपदापासून करंटें । चेवलें जैसें ॥ २४॥

( समर्थाचे मनींचें तुटे - थोरांच्या मनातून उतरून, चेवलें - दूर झाले )

राज्यपदापासून च्युत व्हावें त्याप्रमाणे थोरांच्या मनांतून उतरणें हें करंटेपणाचें लक्षण होय.

मी थोर वाटे मनीं । तो नव्हे ब्रह्मज्ञानी । विचार पाहतां देहाभिमानी । प्रत्यक्ष दिसे ॥२५॥

मी थोर (ब्रह्म) आहें असें ज्याला मनांत वाटतें तो ब्रह्मज्ञानी नव्हे,विचार करुन पाहिलें तर तो देहाभिमानी,असें दिसून येंते.

वस्तु भजन करीना । ना न करीं ऐसेंही म्हणेना । तरी हे जाणावी कल्पना । दडोन राहिली ॥ २६॥

( वस्तु भजन - आत्मवस्तू  चिंतन )

वस्तु (ब्रह्म) स्वतः भजन (उपासना) करीत नाहीं व “मी करीत नाहीं” असेही म्हणत नाही.(पण ज्या अर्थी ‘मी आतां ब्रह्म झालो  म्हणून भजन करीत नाही असें तु म्हणतोस त्या अर्थी तुला ब्रह्मप्राप्ति झाली नाहीं) तर (मी भजन करीत नाही असे म्हणणारी ही तुझी) कल्पनाच लपून बसलेली (बोलत) आहें.असें समजावें (ब्रह्म बोलत नाहीं) २)(हा आक्षेपक श्रोता) निराकार ब्रह्माची उपासना करीत नाहीं,व करीत नाहीं असेही म्हणत नाही.(संशयरहित ज्ञान ह्याला झालें नसल्यानें) मनांत कल्पना लपून बसलेली आहें असें समजावें.

ना तें ज्ञान ना तें भजन । उगाचि आला देहाभिमान । येथें नाहीं कि अनुमान । प्रत्यय तुझा ॥ २७॥

(असली संशय स्थिति) हें धड ज्ञानही नव्हें, व धड भजनही नव्हें,उगीच देहाभिमान वाढला आहें झालें! ह्यांत काहीं अनुमान नाहीं,हा प्रत्यक्ष तुझा  अनुभव आहें.

तरी आतां ऐसें न करावें । रघुनाथभजनीं लागावें । तेणेंचि ज्ञान बोलावें । चळेना ऐसें ॥ २८॥

तर आतां असे करु नकोस रामभजन करायला लाग,म्हणजें त्या योगें निश्र्चळ असें ज्ञान बोंलतां (सांगता) येईल.(म्हणून असें न करितां रामभजनीं लागावें व निःसंदेह असे ज्ञान मग सांगावें.)

करी दुर्जनांचा संहार । भक्तजनांचा आधार । ऐसा हा चमत्कार । रोकडा चाले ॥ २९॥

(श्रीरामांचे भजन केलें असतां) तो भक्त जनांस आश्रय देऊन (पाठीशीं घालून) दुष्टांचा नाश करतो असा त्याचा चमत्कार(सर्वांच्या) अनुभवास येतो (येत आहें) (आपण (महाराष्ट्रिय लोक) रामाचीं भक्ति करु लागलों,तों लगेंच श्रीरामानें (शिवाजीप्रभुतींना उठवून) दुर्जनांचा संहार चालविला ही गोष्ट प्रत्यक्ष डोळ्यांसमार घडतांना तूं पाहात आहेंस की नाहीं ?)

मनीं धरावें तें होतें । विघ्न अवघेंचि नासोनि जातें । कृपा केलिया रघुनाथें । प्रचीति येते ॥३०॥

श्रीरामानें कृपा केली म्हणजें मनांत जें धरावें तें घडतें व सर्व विघ्नें पार नाहीशीं होतात,असें अनुभवास येतें (आत्मानुभव होतो).

रघुनाथभजनें ज्ञान जालें । रघुनाथभजनें महत्व वाढलें । म्हणौनिया तुवां केलें । पाहिजे आधीं ॥ ३१॥

(आम्हास ज्ञान झालें ते श्रीरामभजनानें झालें,त्याचें भजन आम्हीं केले म्हणूनच आमचें महत्व जगांत वाढलें,म्हणूनच तें तू अगोदर केलें पाहिजेस (म्हणून तुला रामाची भक्तीच आधीं केली पाहिजें.)

हें तों आहे सप्रचीत । आणि तुज वाटेना प्रचित । साक्षात्कारें नेमस्त । प्रत्ययो करावा ॥३२॥

हें तर सर्व माझ्या अनुभवाचें (स-प्रचित) आहें आणि तुला खरें वाटत नसेल तर तूं स्वतः साक्षात्कार करुन घेऊन निश्र्चयाचा अनुभव पाहा.

रघुनाथ स्मरोनि कार्य करावें । तें तत्काळचि सिद्धि पावे । कर्ता राम हें असावें । अभ्यांतरीं ॥ ३३॥

सर्वकार्यकर्ता श्रीराम आहें हें अंत:करणात ठसवून व श्रीरामांचे स्मरण करुन कार्यास आरंभ करावा,म्हणजें तें तात्काळ यशस्वी होतें.

कर्ता राम मी नव्हे आपण । ऐसें सगुण निवेदन । निर्गुणीं तें अनन्य । निर्गुणचि होइजे ॥ ३४॥

श्रीराम कर्ता आहें, मी म्हणून कोणी नाहीं हें सगुण निवेदन होय, आणि निर्गुणाच्या ठिकाणी अनन्य म्हणजें निर्गुण स्वरुपाकारच होंणें हें निर्गुण निवेदन होय. (दोन्ही प्रकारें अहंकार उरत नाहीं)

मी कर्ता ऐसें म्हणतां । कांहींच घडेना सर्वथा । प्रचित पाहसी तरी आतां । सीघ्रचि पाहे ॥ ३५॥

'मी कर्ता आहें' असें म्हटलें की कोणतेंही कार्य मुळींच होत नाहीं,(प्रचीती पहावयाची असेल तर आतांच्या आतांच पाहां)

मी कर्ता ऐसें म्हणसी । तेणें तूं कष्टी होसी । राम कर्ता म्हणतां पावसी । यश कीर्ति प्रताप ॥ ३६॥

'मी कर्ता आहें' असें तू म्हणतोस म्हणून तूं कष्टी होतोस. तेंच राम कर्ता आहें असें म्हणू लागलास (असें म्हणून कार्य करु लागलास) कीं तुला यश,किर्ती,प्रताप हीं मिळतील.

येके भावनेसाठीं । देवासि पडे तुटी । कां ते होय कृपादृष्टी । देव कर्ताभावितां ॥ ३७॥

(व्यवहारांत-कार्यपध्दतींत काहीं फरक करावयाचा नाहीं फक्त राम कर्ता ही भावनां ठेवावयची आहें) ती भावना नसलीं म्हणजें देवांशी अंतर पडतें,(एका भावनेंसाठीं देव कां सोडावा?)आणि देव कर्ता आहें अशी भावना केल्यास देवाची देवाची कृपादृष्टि तुझ्याकडे वळेल.

आपण आहे दों दिवसांचा । आणि देव बहुतां काळांचा ।आपण थोडे ओळखीचा ।देवास त्रैलोक्य जाणे ॥३८॥

आपण मनुष्य दोन दिवसांचा आणि देव अनंत कालाचा आहें,आपली माणसाची ओळख थोडी व देवाला सर्व त्रैलोक्य ओळखतें, (आपली ओळख चार लोकांची व  देवाला सर्व त्रैलोक्य ओळखतें )

याकारणें रघुनाथ भजन । त्यासि मानिती बहुत जन । ब्रह्मादिक आदिकरून । रामभजनीं तत्पर ॥ ३९॥

ह्या कारणांस्तव श्रीरामाच्या भजनाला पुष्कळ लोक मान देतात.(ह्यास्तव श्रीरामभजन केले पाहिजें,जो श्रीराम भजन करतो त्यास पुष्कळ लोंक मानतात) फार काय ? ब्रह्मादिदेव  सुध्दा श्रीराम भजनाला तत्पर असतात.(अशां रामाचे भक्त होण्यानें जनांची मनेही रामाकडें व आपल्या सत्कार्याकडें ओढली जातात.)

ज्ञानबळें उपासना । अम्ही भक्त जरी मानूं ना । तरी या दोषाचिया पतना । पावों अभक्तपणें ॥ ४०॥

ज्ञानाच्या अहंकारानें आम्ही जर उपासना (करणार) मानणार नाहीं तर अभक्त होऊन त्या दोषांनें पतन पावूं (दुर्गतीला जाऊं)-अहंभावानें सर्व हानीच आहें,ज्ञानाहंकाराने आम्ही भक्त जर उपासना करणार नाहीं तर अभक्त होऊन पतन पावूं.

देव उपेक्षी थोरपणें । तरी मग त्याचें तोचि जाणे । अप्रमाण तें श्लाघ्यवाणें । नव्हेचि कीं श्रेष्ठा ॥४१॥

( श्लाघ्यवाणें - भुषणावह )

(१) (भक्तानें देवावर निष्ठा ठेवली) पण देंवानें थोरपणांनें भक्ताची उपेक्षा केली तर त्यांचे थोरपण

त्याच्याजवळ (भक्तानें आपलें कर्तव्य करावें,परंतु देवाकडून असे होणार नाहीं,कारण 'न मे भक्ता:प्रणश्यति ।तेषांमहं समुध्दर्ता। अशी भगवंताचींच वचनें आहेत,तीं खोटीं पडतील) असा खोटेपणा-अप्रामाणिकपणा हा श्रेष्ठांना भूषणास्पद नाहीं. (२) भक्तानें आपल्याकडे थोरपणा (कर्तेपणा,ज्ञातेपणा) घेतला,कीं देव त्याची उपेक्षा करतो (मग देंवानें हातचें सोडल्यावर आपला काय परिणाम होईल हें भक्तानें) आपल्या ठिकाणीं समजून असावें परंतु श्रेष्ठ (म्हणवणा-या) भक्ताला हा (उपास्यांशी) अप्रामाणिकपणा भूषणास्पद नाहीं ज्ञानाच्या घमेंडीत भक्तानें देवाची उपेक्षा केली तर मात्र काय परिणाम होईल.

देहास लागली उपासना । आपण विवेकें उरेना । ऐसी स्थिति सज्जना । अंतरींची ॥ ४२॥

संतसज्जनांच्या अंत:करणातील स्थिती अशी असते कीं ते देह उपासनेला लावून देतात आणि आपण विवेकानें (अहंकार सोडून) उरत नाहीत (राममय होतात)-अशी संतसज्जनांची परंपरा आहें.

सकळ मिथ्या होऊन जातें । हें रामभजनें कळों येतें । दृश्य ज्ञानियांचें मतें । स्वप्न जैसें ॥ ४३॥

हें दृश्य स्वप्नवत आहें असें ज्ञान्यांचे (शब्दज्ञान्यांचे) मत असतें आणि हें सर्व द्दश्य मिथ्या आहें हें रामभजनानें भक्ताच्या ठिकाणीं बिंबतें.

मिथ्या स्वप्नविवंचना । तैशी हे सृष्टिची रचना । दृश्य मिथ्या साधुजनां । कळों आलें ॥ ४४॥

स्वप्नांतील विचाराप्रमाणें सृष्टीची रचना सर्व मिथ्या आहें. द्दश्य सृष्टी मिथ्या आहें हें साधुजनांस-ज्ञानी भक्त जे आहेत त्यांनाच-यथार्थ कळून यॆतें.

आक्षेप झाला श्रोतयांसी ।मिथ्या तरी दिसतें कां आम्हासीं ।याचें उत्तर पुढिलें समासीं ।बोलिलें असे॥ ४५॥

ह्यावर श्रोत्यांनी शंका घेतली कीं द्दश्य मिथ्या असतां तें आम्हाला दिसतें का ? ह्याचें उत्तर पुढील समासात.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सगुणभजननिरूपणं नाम सप्तमः समासः ॥ ७॥**

**समास आठवा : द्दश्यनिरूपण श्रीराम ॥**

मागां श्रोतीं पुसिलें होतें । दृश्य मिथ्या तरी कां दिसतें । त्याचें उत्तर बोलिजेल तें । सावधान ऐका ॥१॥

द्दश्य मिथ्या आहें तर ते दिसते का ?(सृष्टी मिथ्या तर ती दिसते का ?) ह्यांचे उत्तर आतां श्रोत्यांनी सावधपणें ऐकावें.

देखिलें तें सत्यचि मानावें । हें ज्ञात्याचें देखणें नव्हे । जड मूढ अज्ञान जीवें । हें सत्य मानिजे ॥२॥

पाहिले तें (पुर्ण विचार न करतां) खरेंच मानावें हें ज्ञात्यांचे पहाणें नव्हें,जड,मूढ व अज्ञानी जीव मात्र त्याला (द्दष्टीस त्या वस्तूला) खरें मानतात.

एका देखिल्यासाठीं । लटिक्या कराव्या ग्रंथकोटी । संतमहंतांच्या गोष्टी । त्याही मिथ्या मानाव्या ॥३॥

आपल्यास दिसतें एवढ्यावरुन केवळ कोट्यावधि ग्रंथांस खोटे करावें आणि संतमहंतांच्या (स्वानुभावाच्या) गोष्टी लबाडीच्या मानाव्या का ?

माझें दिसतें हेंचि खरें । तेथें चालेना दुसरें । ऐशिया संशयाच्या भरें । भरोंचि नये ॥ ४॥

मला दिसतें हेंच खरे,येथे दुस-याचें चालावयांचे नाही,अशा दुराग्रहाच्या (संशयाच्या) भरीस कधीं पडूच नयें.

मृगें देखिलें मृगजळ । तेथें धांवे तें बरळ । जळ नव्हे मिथ्या सकळ । त्या पशूस कोणें म्हणावें ॥५॥

( बरळ - वेड्यासारखे,भ्रमिष्ट )

(केवळ दिसतें एवढ्यांनें कोणतीही वस्तु खरी मानणें किती चुकीचें आहें पहा) मृगजळ पाहून,तें सत्य मानून त्याच्यामागें वेडें (बरळ) हरीण धांवत जातें.पण हें पाणी नसून सर्व खोटे आहें ( जलाशय भासतो) असें त्या पशूला कोणी म्हणावें ?

रात्रौ स्वप्न देखिलें । बहुत द्रव्य सांपडलें । बहुत जनांसि वेव्हारिलें । तें खरें कैसेनि मानावें ॥६॥

आपणांस भरपूर द्रव्य सांपडलें आणि त्यांची देवघेव अनेक लोकांशी केली असें रात्री स्वप्न पाहिलें,तर ते खरे कसे मानावें ?(पण त्या स्वप्नदृष्ट द्रव्यांतील फुटकी कवडी तरी जागृतीच्या व्यवहारास उपयोगी पडेल काय ?)

कुशळ चितारी विचित्र । तेणें निर्माण केलें चित्र । देखतां उठे प्रीति मात्र । परंतु तेथें मृतिका ॥७॥

एखाद्या कुशल चित्ता-यानें अशी अद्भुत पुतळी तयार केली कीं पाहातांच तिच्याविषयीं प्रीति उत्पन्न व्हावी,पण ती असतें माती !(कुशल चिता-यानें सुंदर स्त्रीचे चित्र काढलें व तें पाहून एखादा कामुक पुरुष त्या स्त्रीला आलिंगावयास धांवला तर त्याच्या हातीं मातींशिवाय काय लागेल ?)

नाना वनिता हस्ती घोडे । रात्रौ देखतां मन बुडे । दिवसा पाहतां कातडें । कंटाळवाणें ॥८॥

( कातडें - फोलपणा )

अनेक स्त्रिया हत्ती घोडे इत्यादि (-कांची चित्रे) रात्री पाहिली तर मन गर्क होतें पण तेथें दिवसां पहिलें तर कंटाळवाणे कातडे दिसूं लागतें.

काष्ठी पाषाणी पुतळ्या । नाना प्रकारें निर्मिल्या । परम सुंदर वाटल्या । परंतु तेथें पाषाण ॥९॥

लांकडी,दगडी अशा अनेक नयनमनोहर (ठकारे) पुतळ्या निर्माण करतात. त्या दिसण्यांत फारच सुंदर असतात. परंतु त्या असतात दगड (किंवा लाकडे) !

नाना गोपुरीं पुतळ्या असती । वक्रांगें वक्रदृष्टीं पाहती ।लाघव देखता भरे वृत्ती ।परंतु तेथें त्रिभाग ॥१०॥

( त्रिभाग - चुना,वाळू,ताग )

किंवा गोपुरावर (देवालयाच्या पुढील दरवाज्याजवळ मजलें असतात त्यांवर) पुतळ्या असतात.त्या वाकडी अंगे करुन वाकड्या अंगानें दृष्टीनें पाहातात (-शा दिसतात),तें त्यांचे हावभाव पाहून मन तल्लीन होतें (तेथे पाषाण नाही तर) त्रिभाग (चुना,वाळू व ताग ह्यांचा गोळा) असतो.

खेळतां नेटके दशावतारी । तेथें येती सुंदर नारी । नेत्र मोडिती कळाकुसरीं । परी ते अवघे धटिंगण ॥११॥

दशावतारी (बहुरुपी) चांगलें खेळ (नाटकें) करतात.त्यांत सुंदर स्त्रिया येतात,त्या मोठ्या कौशल्याने नेत्र कटाक्ष फेकतात,परंतु ते सगळे धटिंगण (दाडगे पुरुष) असतात.

सृष्टि बहुरंगी असत्य । बहुरूपाचें हें कृत्य । तुज वाटे दृश्य सत्य । परी हे जाण अविद्या ॥ १२॥

सृष्टि नानारंगी व असत्य आहें,बहुरुपी (जी माया) तिंचे हें सगळे कृत्य आहें.तुला हें दृश्य सत्य वाटते,पण ती अविद्या होय,हे लक्षांत ठेव.(ही सृष्टि दिसली तरी अविद्याकृत आहें म्हणून मिथ्या असून सत्यशी वाटतें.)

मिथ्या साचासारिखें देखिलें ।परी तें पाहिजे विचारिलें ।दृष्टि तरळतां भासलें ।तें साच कैसें मानावें ॥१३॥

खोटे असलेले ख-याप्रमाणें दिसलें तरी त्याचा (पुर्ण) विचार केला पाहिजें,नजर चळली म्हणजें जे दिसते तें खरे कसे मानावे ?(ज्ञाताच्या दृष्टीला सृष्टि दिसत नाही व अज्ञान्याची दृष्टी तरळली-चंचल झाली म्हणजें तिला मात्र भासतें)

वरी पाहतां पालथें आकाश । उदकीं पाहतां उताणें आकाश । मध्यें चांदण्याचाही प्रकाश । परी तें अवघें मिथ्या ॥१४॥

वरतीं पाहिलें तर आकाश पालथें दिसतें व पाण्यांत पाहिलें कीं ते उताणे दिसतें व (पाण्यातच) मध्यंतरीं चांदण्याचा प्रकाश दिसतो,पण तें सगळें खोटें.

नृपतीनें चितारी आणिले । ज्याचे त्या ऐसे पुतळे केले । पाहतां तेचि ऐसे गमले । परी ते अवघे मायिक ॥१५॥

राजानें चितारी आणून ज्यांच्या त्यांच्यासारखे पुतळे केले,ते पाहातांच तीं तीं माणसेंच प्रत्यक्ष उभीं आहेत असे वाटतें पण तें सर्व खोटे.

नेत्रीं कांहीं बाहुली नसे । जेव्हां जें पहावें तेव्हां तें भासे । डोळां प्रतिबिंब दिसे । तें साच कैसेनी ॥१६॥

डोळ्यांत काहीं बाहुली म्हणजे प्रतिबिंब दिसतें ते खरे कशावरुन ?

जितुके बुडबुडे उठती । तितुक्यांमध्यें रूपें दिसती । क्षणामध्यें फुटोनि जाती । रूपें मिथ्या ॥१७॥

जितके बुडबुडे उठतात तितक्यांमध्ये रुपें (प्रतिबिंबे) दिसतात,क्षणांत तें बुडबुडे फुटून जातात,अर्थात् (त्यांत दिसणारीं) प्रतिबिंबेही खोटी पडतात.

लघुदर्पणें दोनि चारी होतीं । तितुकीं मुखें प्रतिबिंबती । परी तीं मिथ्या आदिअंतीं । येकचि मुख ॥१८॥

( लघुदर्पणें - लहान आरसे )

दोन चार लहान आरसे हातांत घेऊन पाहिलें तर जितकें आरसे तितकीं तोंडाचीं प्रतिबिंबे दिसतात,(आरसे महालांत एकच मुख असून अनेक मुखें दिसतात) पण तें दिसणें खोटे. आरंभी व शेवटी एकच तोंड काय ते खरें.

नदीतीरे भार जातां । दुसरा भार दिसे पालथा । कां पडसादाचा अवचितां । गजर उठे ॥ १९॥

नदीच्या काठानें समुदाय जात असला म्हणजें दुसरा समुदाय (नदींत) उलटा दिसतो,किंवा (आपण बोललो म्हणजें) त्याच्या प्रतिध्वनीचा नाद अकस्मात् घुमू लागतों.

वापी सरोवरांचें तीर । तेथें पशु पक्षी नर वानर । नाना पत्रें वृक्ष विस्तार । दिसे दोहीं सवां ॥ २०॥

विहीर,सरोवरे ह्यांच्या काठीं उभें राहून पशु,पक्षी,माणसें,वानर,अनेक भांडी किंवा झाडांचे विस्तार ह्यांची प्रतिबिंबे दुतर्फा (दोन्ही तीरांस) दिसतात,(हे पदार्थ-खालीं प्रतिबिंब व वर बिंब असे दोन्ही बाजूंस दिसतात).

एक शस्त्र झाडूं जातां । दोन दिसती तत्त्वतां । नाना तंतु टणत्कारितां । द्विधा भासती ॥२१॥

एक शस्त्र (तरवार किंवा पट्टा) फिरवू लागलें म्हणजें तेथें दोन दिसत आहेत  असे वाटतें.अथवा दोरीचा टणत्कार केला म्हणजें दोन दो-या आहेतशा भासतात.

कां ते दर्पणाचे मंदिरीं । बैसली सभा दिसे दुसरी । बहुत दीपांचिये हारीं । बहुत छाया दिसती ॥२२॥

आरसे महालांत (एक सभा बसली असली तर शेजारीं) दुसरी सभा बसली आहेसें दिसतें. किंवा दिव्यांच्या अनेक रांगा लावलेल्या असल्या म्हणजें त्यांच्या पडछायाही अनेक दिसतात.

ऐसें हें बहुविध असे । साचासारिखें दिसे । परी हें सत्य म्हणोन कैसें । विश्वासावें ॥२३॥

ख-याप्रमाणेंच दिसणारे भास असें अनेक आहेत,पण जाणत्यांने खरे म्हणून त्यावर विश्र्वास कसा ठेवावा ?(सृष्टि बहुरंगी असत्य आहें हेंच खरे).

माया मिथ्या बाजीगिरी । दिसे साचाचिये परी । परी हे जाणत्यानें खरी । मानूंचि नये की ॥२४॥

( बाजीगिरी - गारुडी विद्या )

त्याचप्रमाणें माया खोटी आहें,गारुडी विद्या (बाजीगिरी) आहें,परंतु जाणत्यानें तिला खरी मानू नयें.

लटिकें साचा ऐसे भावावें । तरी मग पारखी कासया असावें । येवं ये अविद्येचे यावें ।ऐसेचि असती ॥२५॥

खोटे ख-यासारखें मानावें (भावावें),मग परीक्षक कशाला व्हावें ?तात्पर्य ह्या अविदयेची कृति (यावे अशीच) असते.

मनुष्यांची बाजीगिरी । बहुत जनां वाटे खरी । शेवट पाहतां निर्धारीं । मिथ्या होये ॥ २६॥

माणसाची गारुडी विद्या पुष्कळ लोकांना खरी वाटतें,अखेरीस पाहिलें तर ती निश्र्चयें करुन खोटीच ठरतें.

तैशीच माव राक्षसांची । देवांसही वाटे साची । पंचवटिकेसि मृगाची । पाठी घेतली रामें ॥ २७॥

तशीच राक्षसांची माया देवांनाही खरी वाटतें,पंचवटींत सुवर्णमृगाच्या मागें राम लागलें.

पूर्वकाया पालटिती । एकाचेचि बहुत होती । रक्तबिंदींच जन्मती । रजनीचर ॥ २८॥

(हे राक्षस) आपला पहिला (राक्षसी) देह पालटतात,एकाचेच अनेक होतात.रक्तबिंदुपासुनही राक्षस उत्पन्न होतात.

नाना पदार्थ फळेंचि जाले । द्वारकेमध्यें प्रवेशले । कृष्णें दैत्य किती वधिले । कपटरूपी ॥२९॥

(जैमिनी भारतांत वत्सलाहरणाच्या वेंळी) अनेक पदार्थ,फळें ह्यांची रुंपे घेऊन राक्षसांनीं द्वारकेंत प्रवेश केला.कृष्णानें कितीतरी कपटवेषी राक्षस मारिलें.(असे कित्येक प्रकार पुरांणातून वर्णिले आहेंत)

कैसें कपट रावणाचें । सिर केलें मावेचें । काळनेमीच्या आश्रमाचें । अपूर्व कैसें ॥ ३०॥

रावणांचे कपट कसें ते पाहा,रामलक्ष्मणांची शिरें (खोटीं) करुन सीतेस त्यांने फसविलें,कालनेमीच्या आश्रमाचा अपूर्वपणा तरी तो कसा!

नाना दैत्य कपटमती । जे देवांसही नाटोपती । मग निर्माण होऊन शक्ती । संहार केला ॥३१॥

असें अनेक कपटबुध्दि दैत्य देंवांसही आटोपेनासे झालें तेव्हां शक्तीनें अवतार घेऊन त्यांचा संहार केला.

ऐसी राक्षसांची माव । जाणों न शकती देव । कपटविद्येचें लाघव । अघटित ज्यांचें ॥३२॥

देंवांनाही समजणें शक्य नाहीं अशी ही राक्षसांची माया,त्यांची कपटविद्येची कुशलता अघटितच!

मनुष्यांची बाजीगिरी । राक्षसांची वोडंबरी । भगवंताची नानापरी । विचित्र माया ॥ ३३॥

मनुष्यांची बाजीगरी (गारुडी विद्या),राक्षसांची वोडंबरी,त्याचप्रमाणें भगवंताची मायाही अनेक प्रकारची विचित्र आहें.

हे साचासारिखीच दिसे । विचारितांचि नसे । मिथ्याचि आभासे । निरंतर पाहता॥ ३४॥

ही ख-याप्रमाणेंच दिसतें,शोधायला गेलें कीं नाहीशीं होतें.हि आहें खोटी पण नेहमीं भासतें मात्र.

साच म्हणावी तरी हे नासे । मिथ्या म्हणावी तरी हे दिसे । दोहीं पदार्थी अविश्वासे । सांगतां मन ॥३५॥

खरी म्हणावी तर नाश पावतें खोटी म्हणावी तर दिसतें,दोन्ही पक्ष (बाजू) सांगायला लागलें तर मनाचा विश्र्वास बसत नाही,

परंतु हें नव्हे साचार । मायेचा मिथ्या विचार । दिसतें हें स्वप्नाकार । जाण बापा ॥ ३६॥

पण ती माया खरी नव्हे,(माया दिसतें हा) मायेचा विचार खोटा आहें,बाबा,दिसते ते सर्व स्वप्नवत आहें हें ध्यानांत असू दें.

तथापि असो तुजला । भासचि सत्य वाटला । तरी तेथें चुका पडिला । ऐक बापा ॥ ३७॥

असो, तथापि हा भास तुला खरा वाटत असेल तर.,बाबा तेथे एक चूक झालेली आहें ती ऐक.

दृश्यभास अविद्यात्मक । तुझाही देह तदात्मक । म्हणोनि हा अविवेक । तेथें संचरला ॥ ३८॥

जें जें दिसतें (द्दश्य) व जे जे भासते (भास) तें सर्व अविद्यात्मक आहें.तसेच तुझाही देह अविद्यात्मक आहें. म्हणून (द्दश्याभास खरा वाटणें) हा विचार येथें (तुझ्या मनांत) शिरला.

दृष्टीनें दृश्य देखिलें । मन भासावरी बैसलें । तरी तें लिंगदेह झालें । अविद्यात्मक ॥ ३९॥

दृष्टीनें दृश्य पाहाण्याची व मनाने आभासात गुंतण्याची सवय झाली (पण दृश्याभास खोटा असल्याने) वासनात्मक लिंग (-सूक्ष्म) देहच अविद्येचा बनलेला आहें.

अविद्येनें अविद्या देखिली । म्हणोन गोष्टी विश्वासली । तुझी काया अवघी संचली । अविद्येची ॥४०॥

आणि तुझा सारा देह अविद्येचा बनला आहें.त्या (देहरुप) अविद्येनें (द्दश्यभासात्मक) अविद्या पाहातो,म्हणून (दोन्ही सजातीय असल्यामुळें) ती (पाहिलेली) अविद्या सत्यच आहें असा विश्र्वास पटतों.

तेचि काया मी आपण । हें देहबुद्धीचें लक्षण । येणेंकरितां झालें प्रमाण । दृश्य अवघें ॥४१॥

(अविद्येची बनलेली) तीच काया मी आहें असें वाटणें हे देहबुध्दीचे लक्षण होय,ह्यामुळेंच सगळे द्दश्य खरे वाटतें.

इकडे सत्य मानिला देहो । तिकडे दृश्य सत्य हा निर्वाहो । दोंहींमध्यें हा संदेहो । पैसावला बळें ॥४२॥

( पैसावला - पसरला )

एकीकडे देह खरा आहे असें धरुन बसतो आणि दुसरीकडे द्दश्य सत्य आहें असे ठाम ठरवितो. (ह्या दोन्ही असत्यांवरील निश्र्चयानें) मध्यंतरी (द्दश्य खोटे तर दिसते का ?)हा मोठा संशय बळेच वाढला चालला.

देहबुद्धी केली बळकट । आणि ब्रह्म पाहों गेला धीट । तों दृश्यानें रोधिली वाट । परब्रह्माची ॥ ४३॥

"मी देह" अशी बुध्दि बळकट धरुन दांडगेपणानें ब्रह्म पहावयास गेला तों परब्रह्मकडे जाण्याची वाट द्दश्यांने अडवून धरलीं.

तेथें साच मानी दृश्याला । निश्चयचि बाणोनि गेला । पहा हो केवढा चुका पडिला । अकस्मात ॥ ४४॥

(द्दश्यानें वाट कशी अडवली ?तर) द्दश्याला खरे मानतो,इतकेच नव्हे तर (द्दश्य खरे आहें) असा पक्का निश्र्चयच चित्ताचा झाला आहें.पहा बरे एकाएकी केवढी चूक झाली ती! (द्दश्य सत्य वाटणें ही केवढी मोठी चूक आहे.)

आतां असो हें बोलणें । ब्रह्म न पाविजे मीपणें । देहबुद्धीची लक्षणें । दृश्य भाविती ॥४५॥

आतां हें बालणें पुरे!  तात्पर्य,मीपणाने ब्रह्मप्राप्ति होणार नाहीं (तुझ्या ठिकाणी) देहबुध्दीची लक्षणें(आहेत ती) दृश्य खरें आहे अशी कल्पना करतात,

अस्थींच्या देहीं मांसाचा डोळा । पाहेन म्हणे ब्रम्हाचा गोळा ।तो ज्ञाता नव्हे आंधळा ।केवळ मूर्ख ॥४६॥

हाडांच्या देहातील मांसांच्या डोळ्यानें ब्रह्माचा गोळा (काहीं आहें तो मी) पाहीन असे जो म्हणतो तो ज्ञाता नव्हें,तो आंधळा अगदी मूर्ख होय.

दृष्टीस दिसे मनास भासे । तितुकें काळांतरीं नासे । म्हणोनि दृश्यातीत असे । परब्रह्म तें ॥ ४७॥

जे जे दृष्टीला दिसतें व मनाला भासतें ते तें सर्व कालांतरानें नाश पावतें,म्हणून परब्रह्म दृश्याहून वेगळें आहें.

परब्रह्म तें शाश्वत । माया तेचि अशाश्वत । ऐसा बोलिला निश्चितार्थ । नाना शास्त्रीं ॥ ४८॥

परब्रह्म शाश्वत असून,माया अशाश्वत आहें,असे अनेक शास्त्रांत निश्र्चयात्मक सांगितले आहें.

आतां पुढें निरूपण । देहबुद्धीचें लक्षण । चुका पडिला तो मी कोण । बोलिलें असे ॥ ४९॥

( चुका पडिला - घोटाळा चुका करणारा कोण ?)

आता देहबुध्दीचें लक्षण काय आहें व ज्याच्या योगानें (दृश्य खरे वाटण्याची) चूक झाली तो मी कोण ह्याचें विवरण पुढील समांसात केलें आहें.

मी कोण हें जाणावें । मीपण त्यागूनि अनन्य व्हावें । मग समाधान तें स्वभावें । आंगीं बाणे ॥ ५०॥

मी कोण हें ओळखून,मीपणा टाकून (परब्रह्माशीं) अनन्य (एकरुप) व्हावें म्हणजें समाधान सहजच आंगी बाणतें.(देहबुध्दीची-मीपणाची चूक कशी दुरुस्त करावी हे सत्संगतीत कळून येते  व अनन्यतेने ब्रह्मरुपता प्राप्त होते.

**हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके दृश्यनिरसनं नाम अष्टमः समासः ॥ ८॥**

**श्री रघुवीर समर्थ ॥ समास नववा : सारशोधन श्रीराम ॥**

प्रश्र्न-साधुनांच ब्रह्मप्राप्तीचा उपाय का पुसावा ? उत्तर-ह्या सृष्टीत ज्ञानी आणि अज्ञानी सभाग्य आणि अभागी,उत्तम आणि हीन असे दोन कोटीचें जीव आहेंत.

गुप्त आहे उदंड धन । काय जाणती सेवकजन । तयांस आहे तें ज्ञान । बाह्याकाराचें ॥ १॥

श्रीमंतांच्या तळघरांत पुष्कळ द्रव्य-असंख्य अमूल्य जडजवाहिर-गुप्त ठेंवलेले असतें,सेवकांना ते काय ठाऊक ?त्यांना माहिती असतें ती बाहेरच्या गोष्टींची असते.

गुप्त ठेविले उदंड अर्थ । आणि प्रगट दिसती पदार्थ । शहाणे शोधिति स्वार्थ । अंतरीं असे ॥२॥

पुष्कळ अर्थ (डबोलें,ठेव) पुरलेला असतो,आणि (घरांत) अनेक पदार्थ बाहेर दिसत असतात,पण शहाणे असतात ते समजतात कीं स्वार्थ-खरा ठेवा-आहें,तो आंतच पुरलेला आहें.

तैसें दृश्य हें मायिक । पाहत असती सकळ लोक । परी जयांस ठाउका विवेक । ते तदनंतर जाणती ॥३॥

त्याप्रमाणें हें सगळ्या लोंकास मायिक (खोटे) द्दश्य दिसत असतें.पण जे नित्यानित्य विवेक करुन जाणतात,त्यांस त्यातील रहस्य माहीत असतें.

द्रव्य ठेऊन जळ सोडिलें । लोक म्हणती सरोवर भरलें । तयाचें अभ्यंतर कळलें । समर्थ जनांसी ॥४॥

सरोवरांत अगणित द्रव्य ठेऊन त्यावर (मोटांनी) पाणी सोडलेले असतें,(लोक म्हणतात. ,हें सरोवर भरलेले आहें),परंतु त्या सरावराची अंतःस्थ माहिती श्रेष्ठ मंडळींना (सर्मथांना) असते.

तैसे ज्ञाते ते समर्थ । तेहीं ओळखिला परमार्थ । इतर ते करिती स्वार्थ । दृश्य पदार्थांचा ॥ ५॥

तसें समर्थ ज्ञाते असतात तें परमार्थ ओळखतात,आणि इतर (अज्ञानी) लोक द्दश्य पदार्थांचा स्वार्थ करीत बसतात.

काबाडी वाहती काबाड । श्रेष्ठ भोगिती रत्नें जाड । हें जयांचें त्यांस गोड । कर्मयोगें ॥ ६॥

( काबाडी - मजूर )

हमाल (काबाडी) ओझी वाहातात, आणि थोर लोक उत्तम रत्नें (इत्यादि सुखविलास) भोगतात, हें प्रारब्ध कर्माच्या योगायोगाप्रमाणें ज्याचे त्यास गोड वाटतें.

एक काष्ठस्वार्थ करिती । एक शुभा येकवटिती । तैसे नव्हेत कीं नृपती । सारभोक्ते ॥ ७॥

( शुभा - गोवऱ्या )

कोणी लांकडे जमा करतात कोणी गोव-या (शुभा) वेंचतात,पण संपत्तीचा उपभोग घेणा-या राजांची गोष्ट तशी नसते.

जयांस आहे विचार । ते सुखासनीं जाले स्वार । इतर ते जवळील भार । वाहतचि मेले ॥८॥

( सुखासनीं - सुखासनी,सिहासनी )

ज्यांना विचार आहें तें पालखीपदस्थ होतात आणि इतर लोक जन्मभर आपल्याजवळचीं ओझी वाहात मरतात(ज्यांपाशीं विचारांचे भाडवल आहें ते सुखासनावर आरुढ होतात,व अज्ञानी जीव भार वाहातच आयुष्य कंठितात).

येक दिव्यान्नें भक्षिती । येक विष्ठा सावडिती । आपण वर्तल्याचा घेती । साभिमान ॥९॥

कोणी सुग्रास अन्न खातात,कोणी नरक भोगीत जन्म काढतात (कोणी-भंगी-विष्ठा सावडितात) (पण) दोघेही आपल्या वागणुकीचा अभिमान धरुन असतात.

सार सेविजे श्रेष्ठीं । असार घेइजे वृथापृष्टीं । साराअसाराची गोष्टी । सज्ञान जाणती ॥१०॥

( वृथापुष्टीं - ऐतखाऊ,आळशी )

थोर लोक (श्रेष्ठ) सार ग्रहण करतात,आळशी असार गोळा करतात,ज्ञानवंताना सार काय,असार काय हें माहीत असतें.

गुप्त परिस चिंतामणी । प्रगट खडे काचमणी । गुप्त हेम रत्नखाणी । प्रगट पाषाण मृतिका ॥११॥

परीस,चिंतामणि,गुप्त असतात,खडे,काचेचे मणि हें प्रकट असतात,सोन्याच्या आणि रत्नांच्या खाणी गुप्त असतात (त्या शोधाव्या लागतात),दगडमाती प्रकट असतें (लागेल तेथे उघड दिसतें.)

अव्हाशंख अव्हावेल । गुप्त वनस्पति अमोल । येरंड धोत्रे बहुसाल । प्रगट सिपी ॥१२॥

( अव्हाशंख - दक्षिणीमुख शंख , अव्हावेल - उजव्या बाजूने वाढणारा वेल )

उजवा (अव्हा) शंख,उजवा वेल,मौल्यवान वनस्पति हीं गुप्त असतात,एरंड,धोत्रे,शिंपी (शिंपलें) पुष्कळ प्रकट असतात.

कोठें दिसेना कल्पतरू । उदंड सेरांचा विस्तारू । पाहतां नाहीं मैळियागरू । बोरि बाभळा उदंडी ॥ १३॥

( मैलागरू - मैलगिरी चंदन )

कल्पतरु कोठें दिसत नाहीं,शेरांची दाटी जिकडे तिकडे असतें,मलयगिरी चंदन पहायला मिळत नाहीं,बोरी बाभळी पुष्कळ आहेत.

कामधेनु जाणिजे इंद्रें । सृष्टींत उदंड खिल्लारें । महद्भाग्य भोगिजे नृपवरें । इतरां कर्मानुसार ॥ १४॥

कामधेनु ऐकट्या इंद्रालाच ठाऊक बाकी जगात गाईंची खिल्लारे पुष्कळ आहेत,श्रेष्ठ राजा महदभाग्य भोगीत असतो,इतरांना आपापल्या कर्मानुसार मिळत असतें.

नाना व्यापार करिती जन । अवघेच म्हणती सकांचन । परंतु कुबेराचें महिमान । कोणासीचि न ये ॥१५॥

लोक अनेक व्यवसाय करतात व आपणास श्रीमंत (स-कांचन) म्हणवितात.पण कुबेराची बरोबरी कोणालाच करतां येत नाहीं(कुबेर एकच)

तैसा ज्ञानी योगीश्वर । गुप्तार्थलाभाचा ईश्वर । इतर ते पोटाचे किंकर । नाना मतें धुंडिती ॥ १६॥

त्याप्रमाणे ज्ञानी व योगेश्र्वर असतात ते गुप्त परमार्थाचा लाभ मिळविण्यास समर्थ असतात.बाकीचे पोटबाबू अनेक मतमतांतरे धुंडीत बसतात,(ह्याप्रमाणे नाना मते धुंडणारे पोटबाबू पुष्कळ आढळतात,पण गुप्त परमात्म्याचा लाभ करुन घेणारे ज्ञानयोगी दुर्लभ आहेत.)

तस्मात् सार तें दिसेना । आणि असार तें दिसे जनां । सारासारविवंचना । साधु जाणती ॥ १७॥

म्हणून सार (परब्रह्म)लोकांना दिसत नाही.असार दृश्य तेवढें दिसतें सार काय असार काय ह्याचा विचार साधु जाणतात.

इतरांस हे काय सांगणे । खरे खोटे कोण जाणे । साधुसंताचिये खुणे । साधूसंत जाणती ।।१८।।

इतरांना हे काय सांगावें ?खरे खोटें कोणाला समजणार ?साधुसंतांची खूण साधुसंतांस ठाऊक असतें.(सार ब्रह्मवस्तु गुप्त व दुर्लभ आहें असार माया विपुल व प्रकट आहें ज्ञानी  माणसांच्या खुणा तत्तुल्य असतात तेच जाणतात.)

दिसेना जें गुप्त धन । तयास करणें लागे अंजन । गुप्त परमात्मा सज्जन । संगतीं शोधावा ॥१९॥

जमिनीत पुरलेलें गुप्त धन दिसण्यासाठीं जसें डोळ्यांत अंजन घालावें लागतें,तसे गुप्त परमात्मा शोधण्यासाठी सज्जनांची संगति धरावी.(गुप्त द्रव्य डोळ्यांस दिसत नाहीं,पण तें पाहिजे तर डोळ्यांत अंजन घालावें लागते,त्याचप्रमाणें गुप्त परमात्म्याचा लाभ पाहिजे तर संतसंगतींत ज्ञानांजनच डोळ्यांत पडलें पाहिजें)

रायाचें सान्निध्य होतां । सहजचि लाभे श्रीमंतता । तैसा हा सत्संग धरितां । सद्वस्तु लाभे ॥२०॥

राजाजवळ राहिलें म्हणजें सहजच श्रीमंती येते (राजविलास अनायसें भोगावयास सांपडतात) त्याप्रमाणें सत्संग धरला म्हणजें परमात्म्याची (सद्वस्तूची) प्राप्ति सहजच होतें

सद्वस्तूस लाभे सद्वस्तु । अव्यवस्थासि अव्यावेस्तु । पाहतां प्रशस्तास प्रशस्तु । विचार लाभे ॥२१॥

चांगल्यास चांगली वस्तु मिळेल (सद्वस्तूला अहं ब्रह्मास्मि ह्या ध्यानानें ब्रह्म होऊ पाहाणा-यास ब्रह्मप्राप्ति होईल) अव्यवस्थित माणसाला अव्यवस्था मिळेल(पदार्थमय ज्याचे चित्त झाले आहें त्यास पदार्थच दिसतात),मोठ्या अंतःकरणाच्या पुरुषास प्रशस्त विचाराचा लाभ होतो (मन प्रशस्त-विशाल-करील त्याला विशाल परब्रह्माचा लाभ होतो)

म्हणोनि हें दृश्यजात । अवघें आहे अशाश्वत । परमात्मा अच्युत अनंत । तो या दृष्यावेगळा ॥२२॥

म्हणून जें यच्चयावत द्दश्य तें सगळें अशाश्र्वत (चिरकाल न टिकणारें) आहें,अच्युत,अनंत परमात्मा आहें,तो ह्या द्दश्याहून वेगळा आहें (ब्रह्म शाश्वत आहें)

दृश्यावेगळा दृश्याअन्तरीं । सर्वात्मा तो सचराचरीं । विचार पाहतां अंतरीं । निश्चये बाणे ॥२३॥
संसारत्याग

तो सर्वात्मा दृश्याहून वेगळा,द्दश्याच्या आंत व सर्व चराचरात व्यापलेला आहें,असा विचार केला म्हणजें अंतःकरणात तद्रूपतेचा निश्र्चय बाणतो.

संसार त्याग न  करितां । प्रपंचौपाधि न सांडितां । जनांमध्ये सार्थकता । विचारेंचि होय ॥ २४॥

त्यासाठी संसाराचा त्याग न करतां,प्रपंचाची उपाधि न सोडतां,लोकांमध्ये वागून जन्मसाफल्य होतें.

हें प्रचितीचें बोलणें । विवेकें प्रचित बाणे । प्रचित पाहे ते शाहाणे । अन्यथा नव्हे ॥ २५॥

हें बोलणें अनुभवाचें आहें,विवेक करुन ह्याचा अनुभव घ्यावा,प्रचीति पाहील तो शहाणा,नाहीतर (शहाणा)नव्हें-(वेडा इत्यर्थ,किंवा यांत चूक नाहीं)

सप्रचीत आणी अनुमान । उधार आणि रोकडें धन । मानसपूजा प्रत्यक्ष दर्शन । यास महदंतर ॥ २६॥

अनुभवाचें बालणें व अनुमानाचें बालणें ह्यामध्ये रोख पैसा मिळणें व उधारीनें मिळणें किंवा मानसपूजा व प्रत्यक्ष दर्शन ह्यांसारखे महदंतर आहें.

पुढें जन्मांतरीं होणार । हा तो अवघाच उधार । तैसें नव्हे सारासार । तत्काळ लभे ॥ २७॥

पुढे दुस-या एखाद्या जन्मात मोक्ष मिळणार हें सगळें वायद्याचें (उधारीचें) बोलणें झालें,सारासार विचारांचे तसें नाहीं त्याने तात्काळ मोक्ष मिळतो.

तत्काळचि लाभ होतो । प्राणी संसारीं सुटतो । संशय अवघाचि तुटतो । जन्ममरणांचा ॥२८॥

ह्या विवेकाच्या योगानें तात्काळ (परब्रह्माचा) लाभ होऊन प्राणी संसारातून सुटतो व जन्ममरणाचा सगळा संशय तुटून जातो.

याचि जन्में येणेंचि काळें । संसारीं होइजे निराळें । मोक्ष पाविजे निश्चळें । स्वरूपाकारें ॥२९॥

ह्याच जन्मांत नव्हें ह्यांच घटकेला संसारातून वेगळे होता येईल व निश्र्चळ स्वरुपाशीं (ब्रह्माशीं) तदाकार होऊन मोक्ष प्राप्त करुन घेता येईल (स्वस्वरुपानुसंधान ठेवल्यानें येचि जन्मे येचि काळें मोक्षलाभ होतो. )

ये गोष्टीस करी अनुमान । तो सिद्धचि पावेल पतन । मिथ्या वदे त्यास आण । उपासनेची ॥३०॥

ह्या सांगण्यावर अविश्र्वास ठेविल तो सिध्द असला तरी खात्रीनें पतन पावेल आणि जो वक्ता (मी) खोटें सांगत असेल त्यास त्याच्या उपासनेची शपथ आहें.

हें यथार्थचि आहे बोलणें । विवेकें सीघ्रचि मुक्त होणें । असोनी कांहींच नसणें । जनांमध्यें ॥३१॥

हें बालणें अगदीं यथार्थ आहें म्हणून विवेंकानें तात्काळ मुक्त होऊन लोकांमध्ये वागत असून नसल्यासारखें असावें. (बाह्यात्कारी लोकांसारखें वागून अंतरात निर्मळ स्वरुपाकार व्हावें)

देवपद आहे निर्गुण । देवपदीं अनन्यपण । हाचि अर्थ पाहतां पूर्ण । समाधान बाणे ॥ ३२॥

देव (परब्रह्म) पद निर्गुण  असून त्याच्या ठिकाणीं (साधकाची) एकरुपता (अनन्यभावना) असली पाहिजें,एवढा विचार (नित्य) केला तर पुर्ण समाधान बाणतें.

देहींच विदेह होणें । करून कांहींच न करणें । जीवन्मुक्तांचीं लक्षणें । जीवन्मुक्त जाणे॥३३॥

देहामध्ये असतांनाच विदेहपणा भोगणें,(सर्व काहीं) करीत असून न करणें,ही जीवन्मुक्तांची लक्षणें जो जीवन्मुक्त असेल तोच जाणतो,

येरवीं हें खरें न वाटे । अनुमानेंचि संदेह वाटे । संदेहाचें मूळ तुटे । सद्गुरुवचनें ॥ ३४॥

एरवीं (इतरांना) हें खरें वाटत नाही,अनुमानाने संशय पडतो,परंतु सदगुरुंच्या वचनानें मात्र संशयाचे मूळ तुटतें.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके सारशोधननिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९॥**

**जय जय रघुवीर समर्थ ॥ समास दहावा : अनुर्वाच्यनिरूपण श्रीराम ॥**

समाधान पुसतां कांहीं । म्हणती बोलिजे ऐसें नाहीं । तरी तें कैसें आहे सर्वही । मज निरूपावें ॥ १॥

(प्रश्न)समाधान कसे आहे असे कोणाला विचारलें तर तें काहीं सांगता येत नाहीं असे सर्व म्हणतात,तर तें (समाधान) कसे आहें तें मला सांगा,(समाधान अर्निवाच्य आहें,बोलून दाखविण्यासासारखें नाहीं. )

मुक्यानें गूळ खादला । गोडी न ये सांगाव्याला । याचा अभिप्रायो मजला । निरूपण कीजे ॥२॥

मुक्याने गूळ खाल्ला तर त्याची गोडी त्याला सांगता येत नाहीं.(तसे समाधानाचे आहें.) ह्यांतील भावार्थ मला सांगावा.(तेथील-समाधांनातील गोडी सांगू जातां वाणी मौनावते.)

अनुभवही पुसों जातां । म्हणती न ये कीं सांगतां । तरी कोणापाशीं पुसों आतां । समाधान ॥३॥

(समाधानाचे राहो,पण परमार्थाचा स्वतःचा)अनुभव काय म्हणून विचारलें तर तोही सांगता येत नाही म्हणतात,मग आतां समाधानाबद्दल विचारावें तरी कोणाला ?(अनुभवही सांगता येत नाही.)

जे ते अगम्य सांगती । न ये माझिया प्रचिती । विचार बैसे माझे चित्तीं । ऐसें करावें ॥४॥

प्रत्येक जण म्हणतो की तें (समाधान) अगम्य (जाणण्यास कठिण) आहें.आणि माझ्यातर अनुभवांला येत नाहीं, ह्यास्तव हा विचार माझ्या चित्तांत स्थिर होईल असें करावें,(समाधान अगम्य आहें असे सर्वजण तर सांगतात,समाधान अर्निवाच्य आहें असें का म्हणतात तें सांगा.)

ऐसें श्रोतयाचें उत्तर । याचें कैसें प्रत्युत्तर । निरूपिजेल तत्पर । होऊन ऐका ॥५॥

असे श्रोत्यांचे म्हणणे पडलें,त्याचे उत्तर देतो तें तत्परतेनें ऐका.

जें समाधानाचें स्थळ । कीं तो अनुभवचि केवळ । तेंचि स्वरूप प्रांजळ । बोलून दाऊं ॥ ६॥

(उत्तर-)जें (परब्रह्मस्वरुप) समाधानांचे स्थळ आहें किंवा शुध्द व अनुभवस्वरुप आहें तें आतां स्पष्टपणें बोलुन दाखवू.

जें बोलास आकळेना । बोलिल्याविणही कळेना । जयास कल्पितां कल्पना । हिंपुटी होय ॥७॥

जें शब्दानें आकलन होत नाही,पण बोलल्याशिवाय कळत नाही,ज्याची कल्पना करायला लागले  तर ती कष्टी (खजील-हिंपुटी) होते.

तें जाणावें परब्रह्म । जें वेदांचें गुह्य परम । धरितां संत समागम । सर्वही कळे ॥८॥

आणि जें वेंदातलें परम रहस्य आहें त्यास परब्रह्म असें म्हणतात.पण संतांचा सहवास केला असतां सर्व काहीं समजून येंते.

तेंचि आतां सांगिजेल । जें समाधान सखोल । ऐक अनुभवाचे बोल । अनिर्वाच्य वस्तु ॥९॥

असें जे गूढ समाधान तेच आतां सांगण्यांत येईल,अर्निवाच्य वस्तु जें परब्रह्म त्याच्या विषयींचें माझें अनुभवाचें भाषण ऐक.

सांगतां न ये तें सांगणें । गोडी कळावया गूळ देणें । ऐसें हें सद्‌गुरुविणें । होणार नाहीं ॥१०॥

गोडी कळण्यासाठी प्रत्यक्ष गूळच (गुळाचा खडा) हातावर ठेवण्यांसारखें आहें त्याप्रमाणें जें सांगता येत नाही तें सांगावयाचें (त्याचा प्रत्यक्ष अनुभवच करुन द्यावयाचा) हें कार्य ब्रह्मस्वरुप सद्गुरुशिवाय (इतरांकडून) होणार नाहीं.

सद्‌गुरुकृपा कळे त्यासी । जो शोधील आपणासी । पुढें कळेल अनुभवासी । आपेंआप वस्तु ॥११॥

“मी कोण आहें“ ह्याचा जो शोध घेईल त्याला सद्गुरुकृपा कशी असतें(तिचे फल काय असतें)हें समजेंल आणि पुढें आपोआप ब्रह्मानुभव येईल.

दृढ करूनियां बुद्धि । आधीं घ्यावी आपशुद्धी । तेणें लागे समाधी । अकस्मात ॥१२॥

ह्यास्तव बुध्दीचा द्दढ निश्र्चय करुन मी कोण ह्याचा विचार करावा,त्यायोगानें अकस्मात समाधि लागेल.

आपुलें मूळ बरें शोधितां । आपुली तों मायिक वार्ता । पुढें वस्तुच तत्त्वतां । समाधान ॥१३॥

आपलें (मीं चे) मूळ काय आहें ह्याचा नीट विचार केला तर आपण (मी) अगदीं खोटा आहें (असें दिसून येईल) आणि खरोखरच समाधानारुप असे परब्रह्म (जिकडे तिकडे भरलें आहें असें)अनुभवास येईल.

आत्मा आहे सर्वसाक्षी । हें बोलिजे पूर्वपक्षीं । जो कोणी सिद्वांत लक्षी । तोचि साधु ॥१४॥

आत्मा सर्वसाक्षी आहे हें बोलणें पूर्वपक्षाचें आहें (सर्वसाक्षी हि अवस्था आहें, आणि आत्मा-परमात्मवस्तु-तर अवस्थातीत आहें) म्हणून सर्वसाक्षी किंवा असलें कोणतेंच लक्षण वस्तूला लागत नाही,जो सिध्दांत(परब्रह्म) पाहातो तोच सिध्द होय.

सिद्वांत वस्तु लक्षूं जातां । सर्वसाक्षिणी ते अवस्ता । आत्मा तीहून पर्ता । अवस्थातीत ॥१५॥

सिध्दांत वस्तु म्हणजें परब्रह्म पाहूं गेलें असतां मध्यंतरी सर्वसाक्षिणी अवस्था उत्पन्न होते.परंतु आत्मा तिच्याहून पलीकडे-अवस्थातीत आहें.

पदार्थज्ञान जेव्हां सरे । द्रष्टा द्रष्टेपणें नुरे । ते समयीं उतरे । फुंज मीपणाचा ॥१६॥

पदार्थज्ञान म्हणजें सर्वसाक्षिणी अवस्था जेव्हा नाहीशी होते आणि पाहाणारा "मी पाहाणारा" म्हणून वेगळा उरत नाहीं,तेव्हा  मी पणाचा म्हणजें "मी" जीव किंवा ज्ञाता,द्रष्टा असा (फुंज) अहंभावही गळून जातो.

जेथें मुरालें मीपण । तेचि अनुभवाची खूण । अनिर्वाच्य समाधान । याकारणें बोलिजे ॥१७॥

जेथे अहंभाव (मीपणा) नाहींसा होतो तींच अनुभवाची खूण होय.(अहंभाव आहे तोपर्यंत ब्रह्मसाक्षात्कार होत नाहीं)(आणि मीपणा संपल्यावर अनुभव किंवा समाधान असें आहें म्हणून सांगणार कोण ?)ह्यास्तव समाधान सांगतां येत नाही असें म्हणतात.(सर्वसाक्षित्व,अनुभव,यथार्थज्ञान,त्रिपुटी,वाणी,मन-कशाचाही तेथें हात पोंचत नाहीं,जाणीव आटून जातें,द्रष्टा द्रष्टेपणानें उरत नाहीं,तेव्हांच मी नाहीसा होतो,मीपण निःशेष मुरणें ही अनुभवाची खूण आहें,तेथे अनुभव देणें व सांगणें हें खोटे आहें,म्हणून समाधान अर्नीवाच्य आहें असें म्हणतात.)

अत्यंत विचाराचे बोल । तरी ते मायिकचि फोल । शब्द सबाह्य सखोल । अर्थचि आवघा ॥१८॥

(समाधान अर्निवाच्य आहें असें म्हणावयांचे आणखी एक कारण असे आहें कीं) कितीही विचार करुन शब्द उच्चारलें तरी तें खोंटें,अत एव फोलकटासारखें व्यर्थ होत.शब्दांच्या अंर्तबाह्य सगळा अर्थच भरलेला असतो.

शब्दाकरितां कळे अर्थ । अर्थ पाहतां शब्द वेर्थ । शब्द सांगें तें यथार्थ । परी आपण मिथ्या ॥१९॥

शब्दामुळें अर्थ कळतो,पण अर्थ पाहिला,कीं शब्द व्यर्थ ठरतात (त्यांचे काम संपतें) शब्दांनी दर्शविलेला अर्थ खरा असतो,पण शब्द स्वतः मिथ्या असतात.

शब्दाकरितां वस्तु भासे । वस्तु पाहतां शब्द नासे । शब्द फोल अर्थ असे । घनदाटपणें ॥ २०॥

शब्दाच्या योगानें (ब्रह्म) वस्तु भासतें,आणि वस्तु पाहिली कीं शब्द नाश पावतो.(तात्पर्य) शब्द फोलकट होत.अर्थच घनदाटपणानें भरलेला आहें(शब्द हा मायिक-फोल असल्यामुळें त्याची पोंच अर्थापर्यंत-परमात्मस्वरुपापर्यंत जात नाहीं)

भुसाकरितां धान्य निपजे । धान्य घेऊन भूस टाकिजे । तैसा शब्द भूस जाणिजे । अर्थ धान्य ॥ २१॥

भुसांच्या योगानें धान्य उत्पन्न होतें,पण धान्य घेऊन भूंस टाकून देतात,त्याप्रमाणें शब्द हे भूसाप्रमाणें समजुन टाकावें आणि त्यांतील धान्यरुपी अर्थ घ्यावा.

पोंचटामध्यें घनवट । घनवटीं उडे पोंचट । तैसा शब्द हा फलकट । परब्रह्मीं ॥ २२॥

( फलकट - टाकाऊ,असार )

फोलकटांमध्ये घणसर असें धान्य असतें व तें धान्य घेतलें की फोल उडून बाजूला जातें त्याप्रमाणें शब्दामुळें परब्रह्मांचे ज्ञान होऊ लागतें,पण ब्रह्मस्वरुपांत लय पावल्यांवर शब्द फोल (फलगट होतात.) होतात.

शब्द बोलूनि राहे । अर्थ शब्दापूर्वीच आहे । याकारणें न साहे । उपमा तया अर्थासी ॥ २३॥

तथापि (ही भुसांची व धान्यांची उपमा पूर्ण लागू पडत नाहीं कारण) शब्द उच्चारला कीं संपतो (लय पावतो) आणि अर्थ त्याच्यापूर्वी (व नंतरही) आहें,ह्यास्तव त्या अर्थाला धान्याची (उपमा) शोभत नाही.

भूस सांडून कण घ्यावा । तैसा वाच्यांश त्यजावा । कण लक्ष्यांश लक्षावा । शुद्ध स्वानुभवें ॥२४॥

भूंस टाकून देऊन धान्य घ्यावें त्याप्रमाणें वाच्यांश (शब्द व्याख्या) टाकून देऊन,लक्ष्यांश (अर्थ,वस्तु) रुपी जें धान्य तें शुध्द स्वानुभवानें ग्रहण करावें.

दृश्यावेगळें बोलिजे । त्यास वाच्यांश म्हणिजे । त्याचा अर्थ तो जाणिजे । शुद्ध लक्ष्यांश ॥२५॥

दृश्याहून ब्रह्म वेंगळें आहें असें म्हणणें हा वाच्यांश व त्या म्हणण्याचा अर्थ ध्यांनात आणणें हा शुध्द लक्ष्यांश होय हें समजून घ्यावें.

ऐसा जो शुद्ध लक्ष्यांश । तोचि जाणावा पूर्वपक्ष । स्वानुभव तो अलक्ष्य । लक्षिला न वचे ॥२६॥

(परंतु येथेही लक्षांश पाहाणारा मी उरत असल्यामुळें) हा जो शुध्द लक्ष्यांश तो सुध्दा पूर्वपक्षच (मायिक खोटा) होय.म्हणून (ब्रह्मस्वरुपाचा) स्वानुभव अलक्ष आहें तो पाहातां येत नाहीं.(लक्ष्यांशही पूर्वपक्षांतला म्हणण्याचें कारण असें आहें,की स्वरुपाच्या ठिकाणीं वाच्यांश व लक्ष्यांश दोन्ही नांहीत म्हणून समाधान अलक्ष्य-व-अर्निवाच्य-आहें असें म्हटलें पाहिजें.)

जेथें गाळून सांडिलें नभा । जो अनुभवाचा गाभा । ऐसा तोही उभा । कल्पित केला ॥२७॥

आकाश अतिशय सूक्ष्म आहे व ब्रह्माचा शोध होण्यासाठी त्यास आकाशाची उपमा देतात,पण ज्याला आकांशातूनही गाळून घेतलें आहें असें अनुभवरुप ब्रह्म तरी कल्पनेनेंच उभें केलें आहें.(कल्पना वाढवीत वाढवीत खूप वाढविली तरी ती कल्पनाच ना ?)

मिथ्या कल्पनेपासूनि जाला । खरेंपण कैसें असेल त्याला । म्हणोनि तेथें अनुभवाला ।ठावचि नाहीं ॥२८॥

(असा जो कल्पनेनें उभा केलेला अनुभवाचा गाभा) खोट्या कल्पनेंपासून झालेला,त्याला खरेपणा कोठून असणार ?म्हणून तेथें (परब्रह्माच्या ठिकाणीं) अनुभवास (अनुभव घेण्यास) जागाच नाहीं.

दुजेविण अनुभव । हें बोलणेंचि तों वाव । याकारणें नाहीं ठाव । अनुभवासी ॥२९॥

द्वैतभावाशिवाय अनुभव घेणें हें बालणेंच मुळी व्यर्थ होय,म्हणून अनुभवास थारा नाहीं.

अनुभवें त्रिपुटी उपजे । अद्वैतीं द्वैतचि लाजे । म्हणोनियां बोलणें साजे । अनिर्वाच्य ॥३०॥

अनुभव घेऊं लागलें कीं अनुभविता (अनुभव घेणारा),अनुभाव्य (ज्याचा अनुभव घ्यावयाचा तें) व अनुभव

अशी त्रिपुटी उत्पन्न होतें, आणि अद्वैताच्या ठिकाणी तर द्वैतसुध्दा शिल्लक राहात नाहीं. (मग त्रिपुटी कोठली ?) ह्यास्तव (ब्रह्मप्राप्तीने होणारे समाधान) अर्निवाच्य (न सांगता येण्यासारखें) आहें असे म्हणतात,तें यथार्थ आहें.

दिवसरजनीचें परिमित्य । करावया मूळ आदित्य ।तो आदित्य गेलिया उर्वरित ।त्यासी काय म्हणावें ॥३१॥

( परिमित - परिमित,मर्यादा )

दिवस व रात्र ह्यांची मर्यादा (मोजदाद,परमित्य) ठरविण्यास मूळ सुर्य आहें तो सूर्य नाहीसा झाल्यावर बाकी राहील त्यास काय म्हणावे ?

शब्द मौन्याचा विचार । व्हावया मूळ वोकार । तो वोकार गेलिया उच्चार । कैसा करावा ॥३२॥

शब्द (भाषण) व मौन हें समजण्यास कारण मूळ ॐकार आहें पण तो ॐकारच नाहीसा झाला तर उच्चार कसा करावा ?

अनुभव आणि अनुभविता ।सकळ ये मायेचि करितां । ते माया मुळींच नस्तां ।त्यास काय म्हणावें॥३३॥

तात्पर्य,अनुभव व अनुभव घेण़ारा हे सर्व मायेमुळे झालेले आहेत (त्रिपुटीतलेच आहेत) ती मायाच समूळ नाहीशी झाली तर मग जें राहील त्यास काय म्हणावें ?

वस्तु येक आपण येक। ऐशी असती वेगळिक । तरी अनुभवाचा विवेक । बोलों येता सुखें ॥३४॥

ब्रह्म एक व आपण एक असा भिन्नभाव असता तर अनुभवाचा विचार खुशाल सांगता आला असता.

वेगळेपणाची माता । ते लटिके वंधेची सुता । म्हणूनियां अभिन्नता । मुळींच आहे ॥३५॥

भेदभावाची आई जी माया ती वांझेच्या मुलींप्रमाणे खोटी आहें,म्हणून (जीव व ब्रह्म ह्यांच्यामध्ये) मूळचाच अभिन्नपणा आहें,(म्हणून स्वरुप समाधान बोलण्यात येऊ शकत नाहीं अत एव तें अर्निवाच्य आहें)

अजन्मा होता निजला । तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला । सद्‌गुरूसी शरण गेला । संसारदुःखें ॥३६॥

(आतां स्वरुपाच्या ठिकाणीं जन्म,बंध,मोक्ष इत्यादि काहीं एक नाही,ते स्वयमेव समाधानरुप आहें,हें एका कहाणीच्या रुपांनें सांगतात)(स्वरुप हें सहज अभिन्नत्वाचें आहेंच आहें,त्याला सृष्टीसंसाराची दादही नाहीं)अजन्मा (कधीं जन्मास न आलेला) म्हणून कोणी एक निजलेला होता (मायेची झापड पडली होती) त्याला एक स्वप्न पडलें (कीं मी संसारात आलों हें पहिले स्वप्न) आणि त्या संसारात दुसरे स्वप्न असें की संसारदुःखानें त्रस्त झाल्यामुळें मी सद्गुरुंस शरण गेंलो.

सद्‌गुरुकृपेस्तव । झाला संसार वाव । ज्ञान झालिया ठाव । पुसे अज्ञानाचा ॥ ३७॥

आणि सद्गुरुंकृपेमुळे संसार मिथ्या झाला,मी कोण ह्याचे ज्ञान होऊन माझें अज्ञान पार लयास गेंलें.

आहे तितुकें नाहीं जालें । नाहीं नाहींपणें निमालें । आहे नाहीं जाऊन उरलें । नसोन कांहीं ॥३८॥

स्थूलादिक (पांचभौतिक)द्दश्य आकाररुप सर्व संसार आहेसा वाटत होता,तो विवेकानें नाहीसा झाला,जें काही म्हणजें शून्य किंवा अज्ञान (जेथून सर्व द्दष्य उभारलें) तें नाहीपणांनें (मुळचेच नसल्यामुळे) नाहीसे झालें ह्याप्रमाणे आहे व नाही हि दोन्ही जाऊन जें शुध्द स्वरुप,पण तें नसोन काहीं म्हणजें विशेषत्वानें कोठेंच नाहीं(अर्थात ते अमुक प्रकारचें आहें किंवा अमुक प्रकारचें नाहीं असें वर्णव्यक्तिरुपानें त्याचबद्दल काहींच बोलता येत नाही.(तात्पर्य तें आहें पण अर्निवाच्य आहें).

शून्यत्वातीत शुद्ध ज्ञान । तेणें झालें समाधान । ऐक्यरूपें अभिन्न । सहजस्थिति ॥३९॥

असे शून्याच्या पलिकडले शुध्दज्ञान तें मला झालें,त्यामुळे माझें समाधान होऊन मी परमात्म्याशीं एकरुप झालों व अभिन्न अशी सहजस्थिति मला लाभलीं.

अद्‌वैतनिरोपण होतां । निमाली द्‌वैताची वार्ता । ज्ञानचर्चा बोलों जातां । जागृति आली ॥४०॥

(सद्गुरुमुखानें) अद्वैताचें निरुपण ऐकून द्वैताची सगळी गोष्ट संपली आणि आत्मज्ञानाची चर्चा करु लागल्याबरोबर स्वस्वरुपाची (मी स्वरुप आहें अशी) जागृति आली (असें हें स्वप्नांतलें स्वप्न पडलें)

श्रोता व्हावें सावधान । अर्थीं घालावें मन । खुणे पावतां समाधान । अंतरीं कळे ॥ ४१॥

श्रोत्यांनी सावधान होऊन (ह्या कहाणीच्या) अर्थामध्ये मन घालावें (मननपूर्वक अर्थाचा विचार करावा) खूण पटली म्हणजें समाधान काय आहें ते अंतःकरणास कळू लागलें.

तेणें जितुकें ज्ञान कथिलें । तितुकें स्वप्नावारीं गेलें । अनिर्वाच्य सुख उरलें । शब्दातीत ॥४२॥

तो अजन्मा जितकें ज्ञान बोलला (ज्ञानजागृती,ऐक्यरुप,शून्यत्वातीत,शुध्दज्ञान इत्यादि अनुभवाचें बोल जरी बोलला) तरी तें स्वप्नावारीं गेले (त्याची ही बडबड स्वप्नांतील बरळण्याप्रमाणें झाली.)शब्दातीत अर्नीवाच्य सुख तें वेंगळेच आहें.

तेथें शब्देंविण ऐक्यता । अनुभव ना अनुभविता । ऐसा निवांत तो मागुता । जागृती आला ॥४३॥

त्याचा (सुखाचा) अनुभव नाहीं व अनुभव घेणारा नाही,तेथें शब्दावांचून ऐक्य आहें.असा तो (निःशब्द) होऊन अद्वैतरुप झाला म्हणजे तो पुन्हां खरा जागा होतो.

तेणें स्वप्नीं स्वप्न देखिला । जागा होऊन जागृती आला । तेथें तर्क कुंठित जाहला ।अंत न लगे ॥४४॥

त्या अजन्मानें (वर सांगितलेली) ज्ञानचर्चा केली ती स्वप्नातल्या स्वप्नांप्रमाणें (अर्थात फोल) होय.(ती कहाणी फोल होय).तो स्वरुपी जागा होऊन जेव्हा त्यास खरी जागृती आली.तेव्हा (जागृतीचे वर्णन करण्यास) शब्द कुंठित झाला.(तिचा) अंतच लागत नाही.

या निरूपणाचें मूळ । केलेंच करूं प्रांजळ । तेणें अंतरीं निवळ । समाधान कळे ॥४५॥

ह्या निरुपणाचें रहस्य पूर्वी सांगीतलें आहेंच तेंच पुन्हा स्पष्ट करुन सांगू तेणे करुन अंतःकरणास पूर्ण समाधान होईल.

तंव शिष्यें विनविलें । जी हें आतां निरूपिलें । तरी पाहिजे बोलिलें । मागुतें स्वामी ॥४६॥

तेव्हा शिष्यानेंही विनंति केली,की महाराज आतां जें निरुपण केलें तेंच मला पुन्हां कृपा करुन सांगावें.

मज कळाया कारण । केलेंचि करावें निरूपण । तेथील जे का निजखूण । ते मज अनुभवावी ॥४७॥

मला कळण्यासाठीं पूर्वी सागितलेंलेच निरुपण पुन्हा सांगावें,ह्यांतील जी रहस्याची खूण आहें तिचा मला अनुभव घडवून द्यावा.

अजन्मा तो सांगा कवण । तेणें देखिला कैसा स्वप्न । येथें कैसें निरूपण । बोलिलें आहे ॥४८॥

अजन्मा तो कोण ? त्यानें स्वप्न कसें पाहिलें ? व त्याचें विवरण कसें केले आहें ? ते सांगावें.

जाणोनि शिष्याचा आदर । स्वामी देती प्रत्योत्तर । तेंचि आतां अति तत्पर । श्रोतीं येथें परिसावें ॥४९॥

शिष्याचें असे अगत्य पाहून स्वामींनी जें उत्तर दिलें तें श्रोत्यांनी अत्यंत तत्परतेने ऐकावें.

ऐक शिष्या सावधान । अजन्मा तो तूंचि जाण । तुवां देखिला स्वप्नीं स्वप्न । तोही आतां सांगतों ॥५०॥

शिष्या,आंता सावधपणानें ऐक,अजन्मा (दुसरा कोणी नसून) तूच स्वतः आहेंस.तू स्वप्नांत स्वप्न काय पाहिलेंस तेंही आतां सांगतों.

स्वप्नीं स्वप्नाचा विचार । तो तूं जाण हा संसार । तेथें तुवां सारासार । विचार केला ॥५१॥

स्वप्नांतला संसार हा स्वप्नवत जाणून सारासार विचार केलास.

रिघोनि सद्‌गुरूसी शरण । काढून शुद्ध निरूपण । याची करिसी उणखूण । प्रत्यक्ष आतां ॥५२॥

( उणखूण - वाटाघाटी , चर्चा )

आणि सद्गुरुंना शरण जाऊन त्यांजपासून शुध्दनिरुपण ऐकलेंस. त्याची चर्चा आतां प्रत्यक्ष करीत आहेंसच.

याचाचि घेतां अनुभव । बोलणें तितुकें होतें वाव । निवांत विश्रांतीचा ठाव । ते तूं जाण जागृती ॥५३॥

( वाव - खोटा,मिथ्या )

ह्याच चर्चेचा तूं अनुभव घ्यायला लागलास म्हणजें (तुला कळून येईल कीं) तूं जें बोलतोस तें सारे व्यर्थ आहें.(पूर्ण) निःशब्द अशी जी विश्रांति तीच खरी जागृति होय हें तू ध्यानात ठेव.

ज्ञानगोष्टीचा गल्बला । सरोन अर्थ प्रगटला । याचा विचार घेतां आला । अंतरीं अनुभव ॥५४॥

ज्ञानचर्चेची गडबड संपून अर्थ प्रकट झाला (तू अनुभवरुप झालास) ह्याचा विचार केला असतां अंतःकरणांत अनुभव आला.

तुज वाटे हे जागृती । मज जाली अनुभवप्राप्ती । या नांव केवळ भ्रांती । फिटलीच नाहीं ॥५५॥

तुला वाटेल कीं हींच खरी जागृति.मला अनुभवप्राप्ति झाली,पण हा निव्वळ भ्रम (ही तुझी भ्रांति अद्याप जावयाची आहें)

अनुभव अनुभवीं विराला । अनुभवेंविण अनुभव आला । हाही स्वप्नींचा चेइला । नाहींस बापा ॥५६॥

अनुभव,(अनुभविता) अनुभवीं (अनुभाव्यामध्यें) लय पावला आणि अनुभवेंविण (अनुभाव्यावांचून मी वस्तुरुप झालों असा सूक्ष्म अहंभावही राहिला नाही) असा अनुभव आला(असें वाटणें) हेंही स्वप्नांतून जागे झाल्याचे लक्षण नव्हें (चेईलास नाही)

जागा जालिया स्वप्नऊर्मी । स्वप्नीं म्हणसी अजन्मा तो मी । जागेपणीं स्वप्नऊर्मी ।गेलीच नाहीं ॥५७॥

जागें झाल्यावरही स्वप्नउर्मि म्हणजें स्वप्नांत जें तूं मी अजन्मा आहें असे म्हणतोस तो जागेपणा आला तरी अद्याप गेली नाहीं (जागा झाल्यावरही स्वप्नांचा देखावा आठवून अजन्मा तो मी असें जोंपर्यंत तू म्हणत आहेंस(तुला वाटत आहें) तोंपर्यंत तू खरोखरी जागा झाला नाहीस.

स्वप्नीं वाटे जागेपण । तैशी अनुभवाची खूण । आली परी तें सत्य स्वप्न । भ्रमरूप ॥५८॥

स्वप्नांत जसे जागे झाल्यासारखें वाटतें (पण असतों स्वप्नांतच),तसेंच अनुभव आला असें वाटणें हें ही खरोखर भ्रमरुप स्वप्नच होय,

जागृति यापैलीकडे । तें सांगणें केवीं घडे । जेथें धारणाचि मोडे । विवेकाची ॥५९॥

खरी जागृति ह्याच्यापलीकडें आहें,ती सांगता कशी येईल. ? कारण तेथे विवेकाची ग्रहणशक्तीच खुंटतें (कुंठित होतें)

म्हणोनि तें समाधान । बोलतांचि न ये ऐसें जाण । निःशब्दाची ऐशी खूण । ओळखावी ॥६०॥

म्हणून तें समाधान बोलुन दाखवितां येत नाहीं,हें ध्यानांत असू दें. नि:शब्दांची म्हणजें परब्रह्माची खूण अशी आहें,हें ओळखून ठेव.

ऐसें आहे समाधान । बोलतांच न ये जाण । इतुकेनें बाणली खूण । निःशब्दाची ॥ ६१॥

असें हे समाधान आहें.सांगायला म्हणून येतच नाहीं. येवढ्यानें (हें वर सांगितलें त्यावरुन) नि:शब्द अशा ब्रह्माची खूण पटेंल(समाधान हें बोलताच येत नाहीं,तें अर्निवाच्य आहें)

**हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे षष्ठदशके अनिर्वाच्यनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १०॥**
**॥ दशक सहावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध   दशक सातवा - चौदा ब्रह्मांचा



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ । सप्तम दशक ॥ समास पहिला : मंगलाचरण ॥ श्रीराम ॥**

विद्यावंतांचा पूर्वजु । गजानन येकद्विजु । त्रिनयन चतुर्भुजू । फरशपाणी ॥ १॥

गणेश ज्ञात्यांचा मूळपुरूष (आद्यज्ञाता,ज्ञानस्वरुप),गजमुख,एकदंत,त्रिनेत्र (चंद्र,सूर्य व  अग्नि), चर्तुभज,परशुपाणि (परशु हातात घेतलेला) आहें,

कुबेरापासूनि अर्थ । वेदांपासून परमार्थ । लक्ष्मीपासून समर्थ । भाग्यासी आले ॥ २॥

कुबेरापासून संपत्ती मिळतें,वेदांपासून परमार्थप्राप्ति होतें,समर्थ असतात तें लक्ष्मीच्या योगानें भाग्यवैभवाला चढतात,

तैसा मंगळमूर्ती अद्या । तियेपासूनि जाल्या सकळ विद्या । तेणें कवी लाघवगद्या ।सत्पात्रें जाले ॥३॥

त्याप्रमाणें मंगलमूर्ति-मुळपूरूष गणेश सर्वांचे मूळ होय,आणि त्याच्यापासुंन सर्व विद्या उत्पन्न झाल्या म्हणून कवि (कविता-) कौशल्य व गद्य (-रचना) करुन योग्यतेंस चढलें.

जैसी समर्थांचीं लेकुरें । नाना आळंकारीं सुंदरें । मूळपुरुषाचेनि द्वारें । तैसे कवी ॥ ४॥

श्रीमंतांची लेंकरें (आईबापांच्या आश्रयानें) ज्याप्रमाणें अनेंक दागदागिन्यांच्या योगानें शोभायमान दिसतात,त्यांप्रमाणें मूळपूरुषाच्या-श्री गणेशाच्या आश्रयानें कवि शोभतात.(प्रासादिक कवींच्या वाणीत प्रतिभा-प्रेम-प्रसादादि गुण प्रकट होतात)

नमूं ऐशिया गणेंद्रा । विद्याप्रकाशपूर्णचंद्रा । जयाचेनि बोधसमुद्रा । भरितें दाटे बळें ॥५॥

( बोधसमुद्रा - ज्ञानसागर )

अशा गजाननास मी नमस्कार करतो,तो विद्यारुप प्रकाशाचा पूर्ण (पौर्णिमेचा) चंद्र असून त्यांच्यामुळें बोध (ज्ञान-) रुपी समुद्राला भरती येते.

जो कर्तृत्वास आरंभ । मूळपुरुष मूळारंभ । जो परात्पर स्वयंभ । आदिअंतीं ॥ ६॥

(परात्पर - थोराहून थोर)

हा मूळपुरुष सकल कर्तुत्वाचा मूळ आरंभ होय,(त्याजपासून विश्र्वरचनेंचें कार्य सुरु झालें) तो मायेच्या पलीकडचा व स्वयंभू असून मायेच्या आदिअंती आहें.(अशा गणेशाला वंदन असो.)

तयापासून प्रमदा । इच्छाकुमारी शारदा । आदित्यापासून गोदा । मृगजळ वाहे ॥ ७॥

( प्रमदा - स्त्री)

(१) त्या मूळपुरुषापासून इच्छा (स्फूर्ति) रुपी स्त्री निर्माण झाली,तिलाच कुमारी शारदा असें म्हणतात.पण सूर्यामुळें गोदारुप मृगजळ जसें भासमात्र वाहातसें दिसतें (तशी ती भासमात्र खोटी आहें)

(२) सूर्यापासून गोदा व मृगजळ हीं दोन्हीं उत्पन्न होतात,त्याप्रमाणें मूळपुरुषापासून आपल्या इच्छेंनें कौमार्य धारण करणारी अशी शारदानामक स्त्री उत्पन्न झालीं (सत्यस्वरुप सूर्याच्या योगानें मिथ्या मृगजळ दिसतें त्याप्रमाणें ब्रह्माच्या अधिष्ठानावरुन शारदा मूळमाया मिथ्याच आहें,)

जे मिथ्या म्हणतांच गोंवी । माईकपणें लाघवी । वक्तयास वेढा लावी । वेगळेपणें ॥ ८॥

पण तिला मिथ्या म्हटलें कीं ती अधिक पाशांत गोंवतें ती मोठी मायिक व लाघवी (नाटकी) असून वक्ता ब्रह्मनिरुपण करुं लागला कीं त्यास भुलवून ब्रह्मापासून वेंगळा करतें (आपण नामानिराळी राहून वक्त्याला भुलवितें,)(माया खोटी आहें असें म्हणण्यांतच माया म्हणून काहींतरी कल्पना बोलणा-याच्या चित्तांत उभी राहातें व त्या कल्पनेंनेच तो गोवला जातों)

जे द्वैताची जननी । कीं ते अद्वैताची खाणी । मूळमाया गवसणी । अनंत ब्रह्मांडांची ॥९॥

( गवसणी - व्याप्ती,आच्छादन )

(त्या मूळमायेंपासून द्वैताची उत्पत्ति होत असल्यामुळे ती द्वैताची आई होय आणि तिच्यायोंगानें ब्रह्मप्राप्ति होत असल्यामुळें) स्तवन भजन भक्तिभाव। मायेंवाचूनि नाहीं ठाव।।.) ती द्वैताची खाण आहें तिनें अनंत ब्रह्मांडास अच्छादून टाकून गवसणी घातलीं आहें.(अशी हीं मूळ माया अनंत ब्रह्मांडांना उदरात घेंते.)

कीं ते अवडंबरी वल्ली । अनंत ब्रह्मांडें लगडली । मूळ पुरुषाची माउली । दुहितारूपें ॥ १०।

(मूळपुरुषाची माउली - ब्रह्म ते मुळमाया ते गुणमाया,गुणमाया हीच मूळपुरुष होय. अर्थात मुळमाया हि ब्रह्माची दुहिता असून मूळपुरुषाची माऊली होय.)

किंवा तिच्या पवित्रपणामुळें तिला औदुंबरवल्ली म्हणावेंसे वाटतें,ह्या विशाळ वल्लीला अनंत ब्रह्मांडरुपी फळें लटकलेलीं आहेंत.(अहं-मूळमाया,एकोऽहं-मुळपुरुष-बहुस्याम प्रकृत्ति)मूळमाया ही निश्र्चळ ब्रह्माला पुरुषपद देंते म्हणून त्याची ती आई व ब्रह्मापासून स्फूर्तिरुपानें प्रकटतें म्हणून ती त्याची कन्याही होय.(तिच्यामुळें ब्रह्म पुरुषनामाला (गणेश) आलें म्हणून ती त्यांची आई व ब्रह्माची ती स्फूर्ति म्हणून कन्या इतकें असून मूळ पुरुषाची ती भार्याही-सत्ता,शक्ति-आहें! त्याच्यावाचुन ती नाहीं व तिच्यावाचुन तो नाहीं,असें उभयता पण अन्योन्याश्रयी पण अभिन्न आहेंत)

वंदूं ऐसी वेदमाता । आदिपुरुषाची जे सत्ता । आतां आठवीन समर्था । सद्गुरूसी ॥ ११॥

वेंदांची माता व आदिपुरुषाची सत्ता अशी जी शारदा तिला नमस्कार करु,आता सद्गुरुसमर्थांचे स्मरण करु.

जयाचेनि कृपादृष्टी । होय आनंदाची वृष्टी । तेणें सुखे सर्व सृष्टी । आनंदमय ॥ १२॥

त्या सद्गुरुंच्या कृपादृष्टीच्या योगानें असा आनंदाचा वर्षाव होतो कीं त्यामुळें सुख वाटून सगळीं सृष्टी आनंदमय होतें,

कि तो आनंदाचा जनक । सायुज्यमुक्तीचा नायेक । कैवल्यपददायेक । अनाथबंधु॥ १३॥

कारण तो आनंदाचा जनक,सायुज्यमुक्तीचा नायक,मोक्षपद देणारा व अनाथांचा बंधु आहें.

मुमुक्ष चातकीं सुस्वर । करुणां पाहिजे अंबर । वोळे कृपेचा जलधर । साधकांवरी ॥ १४॥

मात्र मोक्षाची इच्छा करणा-या साधकरुपी चातकानें (सद्गुरु)करुणारुपी आकाशाकडें सुस्वरें (आर्त चित्तानें) पाहिलें की सद्गुरुकृपेचा मेघ त्यावर वर्षाव करतो.

कि तें भवार्णवींचें तारूं । बोधें पाववी पैलपारू । महा आवर्ती आधारू । भाविकांसी ॥ १५॥

( आवर्ती - संकटात )

अथवा तें भाविकास संसारसमुद्रामध्यें जहाजासारखें असून त्यांस ज्ञान देऊन (भवसागरातूंन) पलीकडें नेतात.(जन्ममरणाच्या मोठया भोव-यातून (आवर्ती)(बाहेंर) पडण्यास त्यांचा श्रीगुरु आधार आहें.(श्रीगुरुं हें भवसागरातलें तारूं असून बोधानें पैलपार पाववितात.)

कि तो काळाचा नियंता । नातरी संकटीं सोडविता ।कि ते भाविकांची माता । परम स्नेहाळु ॥ १६॥

अथवा काळाचा शास्ता,अनेक संकटातून पार पाडणारा,किंवा अत्यंत दयाळु अशी भाविकांची आई आहें (काळांचें नियमन करणारे,मृत्युभय उडविणारे,संकटात सोडविणारे श्रीगुरु हीं भाविकांची परमदयाळु माता आहें.)

कि तो परत्रींचा आधारू । कि ते विश्रांतीची थार । नातरी सुखाचें माहेर । सुखस्वरूप ॥ १७॥

किंवा परलोंकातील आधार (आश्रय),विश्रांतीचा थारा किंवा सुखस्वरुप असें सुखाचें माहेर (असें सद्गुरु आहेत).

ऐसा सद्‌गुरु पूर्णपणीं । तुटे भेदाची कडसणी । देहेंविण लोटांगणीं । तया प्रभूसी ॥ १८॥

( कडसणी - दोरी , देहेंविण - जीव व शिवाचे ऐक्य होऊन )

(बटव्याला जशी कडसणी-दोरी-असतें त्याप्रमाणें भेदाला माया असतें) ती मायारूप भेंदांची दोरी ज्यांच्या कृपेंने पूर्णपणें तुटून जातें अशा सद्गुरुनाथांना देंहेविण (जीवशिंवांचे ऐक्य होऊन देहबुध्दि,भेदभावना सोडून)लोंटांगण घालतों.

साधु संत आणी सज्जन । वंदूनियां श्रोतेजन । आतां कथानुसंधान । सावध ऐका ॥ १९॥

साधु,संत आणि सज्जन व श्रोते ह्यांना नमस्कार करुन आतां कथेचें अनुसंधान (व्यवस्था) लावतों ते सावधपणें ऐका,

संसार हाचि दीर्घ स्वप्न । लोभें वोसणाती जन । माझी कांता माझें धन । कन्या पुत्र माझे ॥ २०॥

( वोसणती - बडबडतात )

संसार हेंच एक मोठे (लांबलचक पडणारें दीर्घ) स्वप्न आहें.त्यांत सांपडलेले लोक लोभांमुळें बरळतात (वोसणती) कीं बायको,मुलगें,मुलीं इत्यादि सर्व माझे आहें.

ज्ञानसूर्य मावळला । तेणें प्रकाश लोपला । अंधकारें पूर्ण जाला । ब्रह्मगोळ आवघा ॥ २१॥

ज्ञानाचा सूर्य मावळल्यामुळे सगळा (आत्म-) प्रकाश नाहींसा झाला व (अज्ञानाच्या) अंधारानें सगळें ब्रह्मांड भरुन गेलें.

नाहीं सत्वाचें चांदिणें । कांहीं मार्ग दिसे जेणें । सर्व भ्रांतीचेनि गुणें । आपेंआप न दिसे ॥ २२॥

परमार्थाचा काहीं मार्ग जेंणेकरुन दिसेल अशा सत्वगुणांचें चांदणेही नाहीं. सगळीकडें भ्रांतीचे काळोखें दाटल्यामुळें आपलें (स्वरुप) आपल्याल्याच दिसत नाहीं.

देहबुद्धिअहंकारे । निजले घोरती घोरे । दुःखें आक्रंदती थोरे । विषयसुखाकारणें ॥ २३॥

देहबुध्दीच्या (देहात्मबुध्दीच्या) अहंकारानें व्यापल्यामुळें (मायेंच्या झोपेत) जीव घोरत पडलें आहेंत,आणि विषयसुखासाठीं मोठया दु:खानें आक्रोश करीत आहेंत.

निजले असतांच मेले । पुनः उपजतांच निजेले । ऐसे आले आणी गेले । बहुत लोक ॥ २४॥

मायानिंद्रेत असतांच ते मरतात व पुन्हां उपजतांक्षणीच निजतात,असें बहुतेक जगांत येतात व जातात.

निदसुरेपणेंचि सैरा । बहुतीं केल्या येरझारा । नेणोनियां परमेश्वरा । भोगिले कष्ट ॥ २५॥

( निदसुरेपणें - अज्ञानाची झोप )

झोपेंतच अशा (जन्ममरणाच्या) फे-या अनेंकांनी सैरावैरा केल्या आहेंत,परमेश्र्वरास न ओळखल्यामुळें त्यांना कष्ट भोगावें लागतात.

त्या कष्टांचें निर्शन । व्हावया पाहिजे आत्मज्ञान । म्हणोनि हें निरूपण । अध्यात्मग्रंथ ॥ २६॥

ते कष्ट नाहींसे होण्यासाठीं आत्मज्ञान पाहिजें,म्हणून हें अध्यात्मविषयांचें निरुपण केलें आहें.

सकळ विदयेमध्यें सार । अध्यात्मविद्येचा विचार । दशमाध्याई सारंगधर ।भगवद्गीतेंसि बोलिला ॥२७॥

सर्व विद्यांमध्यें अध्यात्मविद्येचा विचार श्रेष्ठ आहें असें भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायांत श्रीकृष्णानें सांगितलें आहें.

अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥

याकारणें अद्वैतग्रंथ । अध्यात्मविद्येचा परमार्थ । पाहावया तोचि समर्थ । जो सर्वांगें श्रोता ॥ २८॥

ह्यासाठी अद्वैत ग्रंथ व परमार्थविद्येचा परमार्थ (रहस्य) ह्यांची प्राप्ति करुन घेण्यास तोंच समर्थ होय,की जो सर्वांगाचें कान करुन ऐकू शकतों.

जयाचें चंचळ हृदये । तेणें ग्रंथ सोडूंचि नये । सोडितां अलभ्य होय । अर्थ येथींचा ॥ २९॥

ज्याचें चित्त चंचळ आहें त्यानें वाचावयास हा ग्रंथ उघडूंच नयें त्याने उघडल्यास त्यांस त्यांतील अर्थ रहस्य उमगणार नाहीं,(चित्त स्थिर करण्यासाठी हीं रागाची सूचना आहें)

जयास जोडला परमार्थ । तेणें पहावा हा ग्रंथ । अर्थ शोधितां परमार्थ । निश्चये बाणे ॥ ३०॥

ज्याला परमार्थाची गोडी लागली आहें,त्यांनेंच हा ग्रंथ पाहावा.ह्यातील अर्थांचा विचार केल्यास निश्र्चयेंकरुन त्यांचे आंगी परमार्थ भिनेल.

जयासि नाहीं परमार्थ । तयासि नकळे येथींचा अर्थ । नेत्रेंविण निधानस्वार्थ । अंधास कळेना ॥ ३१॥

आंधळ्याला डोळे नसल्यामुळें द्रव्याचा ठेवा जसा प्राप्त होत नाही,त्याप्रमाणें ज्याला परमार्थाचे डोळें नाहींत त्यास ह्यांतील अर्थ कळावयाचा नाहीं (ज्याला परमार्थाची आस्था नाहीं त्याला डोळ्यावांचून आंधळ्यास जसें निधान सांपडत नाहीं त्याप्रमाणें येथील रहस्य उमगणार नाहीं.)

एक म्हणती म-हाटे काये । हें तों भल्यासि ऐकों नये । तीं मूर्खें नेणती सोयें । अर्थान्वयांची ॥ ३२॥

कोणी म्हणेल हा मराठी ग्रंथ ! ह्यात काय आहे ?चांगल्यांनी हा ऐकू सूध्दा नयें त्या मूर्खास अर्थताप्तर्य (संबंध) काहींच कळत नाहीं.

लोहाची मांदूस केली । नाना रत्नें सांठविलीं । तीं अभाग्यानें त्यागिलीं । लोखंड म्हणोनि ॥ ३३॥

( मांदूस - पेटी )

लोखंडाची पेटी (मांदुस) करुन तींत अनेक रत्नें ठेवलीं असलीं तरी तिला लोखंड समजून दुर्दैवी टाकून देतों.

तैशी भाषा प्राकृत । अर्थ वेदांत आणि सिद्धांत । नेणोनि त्यागिती भ्रांत । मंदबुद्धीस्तव ॥ ३४॥

त्याप्रमाणें एखाद्या प्राकृत ग्रंथात शास्त्रप्रचीतीचा व ग्रंथप्रचीतीचा विषय प्रतिपादन केला असला तरी त्या ग्रंथांची प्राकृत भाषा आहें एवद्याच कारणासाठी भ्रमिष्ट मनुष्य (जडात्माच) आपल्या जडबुध्दीमुळे त्या ग्रंथाचा अव्हेर करील.

अहाच सांपडतां धन । त्याग करणें मूर्खपण । द्रव्य घ्यावें सांठवण । पाहोंचि नये ॥ ३५॥

( अहाच - सहजच )

सहजगत्या (आहाच)(भलत्या ठिकाणीं) द्रव्य सांपडलें म्हणून तें टाकून देंणें हें मूर्खपणांचें लक्षण होय त्याच्या सांठवणा-(-च्या भांड्या)कडें लक्ष न देंता द्रव्य घ्यावें.

परिस देखिला अंगणीं । मार्गीं पडिला चिंतामणी । अव्हा वेल महागुणी । कूपामध्यें ॥ ३६॥

अंगणांत परीस असलेला पाहिला, किंवा चिंतामणि रस्त्यांत सांपडला,अथवा मोठा गुण देणारी उजवी वेल (आव्हा वेल-दक्षिणावर्ती वेल) खोल विहींरीत असलेला द्दष्टीस पडला तर जसा अवश्य घ्यावा.

तैसें प्राकृतीं अद्वैत । सुगम आणि सप्रचीत । अध्यात्म लाभे अकस्मात । तरी अवश्य घ्यावें ॥ ३७॥

त्याप्रमाणें प्राकृतभाषेंमध्यें सुलभ (सोपें) व अनुभवाचें अद्वैतात्मक अध्यात्म (परमार्थ) अकस्मात मिळालें,तर तें अवश्य घ्यावें,

न करितां विपत्तीचा श्रम । सकळ शास्त्रार्थ होय सुगम । सत्समागमाचें वर्म । तें हें ऐसें असे ॥३८॥

व्युत्पत्ति शिकण्याचें श्रम न करतां सगळा शास्त्रार्थ सुलभ होतो असें हें संतसमागमाचें फळ आहें.

जें विपत्तीनें न कळे । तें सत्समागमें कळे । सकळ शास्त्रार्थ आकळे । स्वानुभवासी ॥ ३९॥

जें व्युत्पत्ति शिकून कळणार नाहीं ते सत्संगतीनें कळतें (इतकेंच नव्हे तर) सगळा शास्त्रार्थ (शास्त्ररहस्य) स्वानुभवास येतों.

म्हणोनि कारण सत्समागम । तेथें नलगे विपत्तिश्रम । जन्मसार्थकाचें वर्म । वेगळेंचि असे ॥ ४०॥

( व्युत्पत्तिश्रम - न्याय,व्याकरणादी शिकण्याचे श्रम )

म्हणून (ह्या अध्यात्माच्या परमार्थाला) सत्समागम हाच कारण होय,तेथे व्युत्पत्तीचें कष्ट नकोत जन्माचे सार्थक होण्याचें वर्म वेगळेंच आहें(जन्मसाफल्याचें वर्म सत्संगातच समजतें).

**भाषाभेदाश्च वर्तन्ते अर्थ एको न संशयः । पात्रद्वये यथा खाद्यं स्वादभेदो न विद्यते ॥ १॥**

भाषापालटें कांहीं । अर्थ वाया जात नाहीं । कार्यसिद्धि ते सर्वही । अर्थाचपासीं ॥ ४१॥

भाषा बदलली तरी अर्थ वायां जात नाहीं (हें वर्म भाषाभेद झाला तरी पालटत नाहीं) कारण कार्यसिध्दि होतें ती अर्थामुळेंच होतें.

तथापि प्राकृताकरितां । संस्कृताची सार्थकता । येऱ्हवीं त्या गुप्तार्था । कोण जाणे ॥ ४२॥

तथापि प्राकृत भाषा आहें म्हणून संस्कृत भाषेची सार्थकता (थोरवी),नाही तर तो गुढार्थ कोणास समजणार ?

आतां असो हें बोलणें । भाषा त्यागून अर्थ घेणें । उत्तम घेऊन त्याग करणें । सालीटरफलांचा ॥४३॥

आंतां हें बालणें पुरे, साली टरफलें टाकून देऊन आंतील उत्तम रस घेतात त्याप्रमाणें भाषेंचा विचार सोडून अर्थग्रहण करीत जावा.

अर्थ सार भाषा पोंचट । अभिमानें करवी खटपट । नाना अहंतेनें वाट । रुधिली मोक्षाची ॥ ४४॥

अर्थ सार (महत्वाचा) आहें,भाषा पोंचट,(वादविवाद) भाषेची खटपट अभिमानांमुळें होते व अशा अनेक त-हेच्या अभिमानामुळें मोक्षाचा मार्ग अडविला गेला आहें,(भाषेचा अभिमान मोक्षमार्गाच्या आड येणारा म्हणून सोडावा)

शोध घेतां लक्ष्यांशाचा । तेथें आधीं वाच्यांश कैंचा । अगाध महिमा भगवंताचा । कळला पाहिजे ॥४५॥

लक्ष्यांशाचा (परब्रह्माचा-अर्थाचा) शोध घ्यायला लागलें असतां तेथे अगोदर वाच्यांश शब्दच राहातो कोठे ?(मुख्य तात्पर्य हे कीं भाषा कोणतीही असली तरी तिजमुळें) भगवंताचा अगाध महिमा कळला पाहिजें. (अर्थाकडे जायचें आहें तर शब्दांकडे पाहून कर्तव्य काय ? भगवंताचा महिमा हा लक्षार्थ आहें.)

मुकेपणाचें बोलणें । हें जयाचें तोचि जाणें । स्वानुभवाचिये खुणें । स्वानुभवी पाहिजे ॥ ४६॥

हें मुकेपणाचें बोलणें आहें ते ज्याचें त्यालाच माहीत,स्वानुभवाची खूण पटायला स्वानुभवी पाहिजें(मौनाची भाषा ज्याची त्यालाच कळते,स्वानुभवाची खूण स्वानुभवीच पावतों.)

अर्थ जाणे अध्यात्माचा । ऐसा श्रोता मिळेल कैंचा । जयासि बोलतां वाचेचा । हव्यासचि पुरे ॥ ४७॥

अध्यात्माचा अर्थ (रहस्य) जाणणारा व ज्याच्याशी बोलताना वाणीची हौस पुरी होईल असा श्रोता मिळेल कोठून ?

परीक्षवंतापुढें रत्न । ठेवितां होय समाधान । तैसें ज्ञानियापुढें ज्ञान । बोलावें वाटे ॥ ४८॥

रत्नपारख्यापुढें परीक्षेकरतां रत्न ठेवलें असतां जसे (उभयपक्षी) समाधान होते. त्याप्रमाणें ज्ञानी असतील त्यांचेजवळ ज्ञान बोलांवेसे वाटतें (समाधान होते म्हणून)

मायाजाळें दुश्चित होय । तें निरूपणी कामा नये । संसारिका कळे काय । अर्थ येथींचा ॥ ४९॥

मायाजाळामुळें ज्याचें चित्त दुश्र्चित झालें आहें,त्याला निरुपण सांगून काय उपयोग ?(कारण संसारी माणसाला ह्यांतील अर्थ काय समजणार ?

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन । बहुशाखा ह्यनंताश्च बुद्धयोऽअव्यवसायिनाम् ॥ १॥**

वेवसायी जो मळिण । त्यासि न कळे निरूपण । येथें पाहिजे सावधपण । अतिशयेंसीं ॥ ५०॥

(संसारातील) उद्योगधंद्यामुळें (प्रपंचव्यवसायाच्या योगानें) ज्याचें चित्त मलिन झालें आहें,त्यास हें अध्यात्मनिरुपण कळणार नाहीं,ह्या कामीं अतिशय सावधपणा पाहिजें.

नाना रत्नें नाना नाणीं । दुश्चितपणें घेतां हानी । परीक्षा नेणतां प्राणी । ठकला तेथें ॥ ५१॥

अनेक प्रकारची रत्ने किंवा नाणी नीट परीक्षा न करतां गैरसावधपणानें घेतली तर त्यांत माणूस फसतों.

तैसें निरूपणीं जाणा । आहाच पाहतां कळेना । मराठेंचि उमजेना । कांहीं केल्या ॥ ५२॥

त्याचप्रमाणें निरुपणाची गोष्ट आहे,वरवर पाहिल्यांस काहीं कळत नाहीं,साधे मराठी असलें तरी ते काहीं केल्यास उमजत नाहीं.

जेथें निरूपणाचे बोल । आणि अनुभवाची वोल । ते संस्कृतापरी खोल । अध्यात्मश्रवण ॥ ५३॥

जेथें गहन अध्यात्मनिरुपण आहें व जेथे अनुभवाचा ओलावा आहें तें अध्यात्म नुसते ऐकणें हें संकृतापेक्षांही कठीण आहें.

माया ब्रह्म वोळखावें । तयास अध्यात्म म्हणावें । तरी तें मायेचें जाणावें । स्वरूप आधीं ॥ ५४॥

मायेचें व ब्रह्मांचे स्वरुप ओळखणें ह्याला अध्यात्म म्हणतात,त्यांत प्रथम मायेचे स्वरुप समजून घ्यावें (ब्रह्माची खूण पटण्यापूर्वी मायेचे रुप कळलें पाहिजें)

माया सगुण साकार । माया सर्वस्व विकार । माया जाणिजे विस्तार । पंचभूतांचा ॥ ५५॥

सगुण,साकार,सर्व विकार उत्पन्न करणारी, व पंचभूतांचा विस्तार तितकी सर्व माया.

माया दृश्य दृष्टीस दिसे । मायाभास मनासि भासे । माया क्षणभंगुर नासे । विवेकें पाहतां ॥ ५६॥

दृष्टीस दिसणारें दृश्य,मनास भासणारा भास व विवेकपूर्वक पाहिलें असतां जें जें क्षणिक व नाशवंत आढळतें तें तें माया (माया-दृश्य-डोळ्यांस दिसतें व मनास भासतें माया नश्वर असून विवेकदृष्टीनें पाहाता तिचा निरास होतों)

माया अनेक विश्वरूप । माया विष्णूचें स्वरूप । मायेची सीमा अमूप । बोलिजे तितुकी ॥ ५७॥

माया नानात्व पावणारी व विश्वरुप,विष्णुचें स्वरुप (सगुणब्रह्मरुप) आहें,तिला म्हणाल तेवढी (लहान,मोठी) पुष्कळ मर्यादा आहें (माया विष्णूंचे स्वरुप व्यापक निस्सीम-मायोपाधींमुळें शुध्द ब्रह्म सगुण होतें)

माया बहुरूप बहुरंग । माया ईश्वराचा संग । माया पाहतां अभंग । अखिळ वाटे ॥ ५८॥

माया अनेकरुपी,अनेकरंगी,ईश्वराच्या आश्रयांने असणारी(ब्रह्माच्या ठिकाणी ईश्वरत्व आणणारी) संग-अहंकार (ऐकोऽहं बहुस्याम।) आहें तिच्याकडे पाहू लागलें असतां ती अविनाशी व संपूर्ण आहेसे वाटतें,(माया बहुरुपी बहुगुणी माया इश्वराचा संग,माया दैवी-मम माया-मायेंचा निरास शक्यच होणार नाही असें अज्ञ जीवांस वाटतें.

माया सृष्टीची रचना । माया आपुली कल्पना । माया तोडितां तुटेना । ज्ञानेंविण ॥ ५९॥

सृष्टीची रचना व आपली कल्पना ती माया ज्ञानांवाचून इतर साधनांनी तोडू गेल्यास ती तुटत नाहीं (माया सृष्टिरुपांनें व्यक्त माया म्हणजें आपली कल्पना,स्वरुपाच्या ठिकाणीं उठलेला संकल्प आदि कल्पना,अशा ह्या मायेचा निरास आत्मज्ञानाशिवाय होत नाहीं.)

ऐसी माया निरूपिली । स्वल्प संकेतें बोलिली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ ६०॥

अशा त-हेने अति संक्षिप्त रीतीने माया सांगितली,पुढें श्रोत्यांनी नीट लक्ष द्यावें.

पुढें ब्रह्मनिरोपण । निरूपिलें ब्रह्मज्ञान । जेणें तुटे मायाभान । येकसरें ॥ ६१॥

पुढें ब्रह्माचें निरुपण असून ज्या योगानें मायेंचे भान एकदम तुटून जाईल असें ब्रह्मज्ञान सांगतों,

**हरिः ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके मंगलाचरणनिरूपणं नाम प्रथमः समासः॥ १॥**

**जय जय रघुवीर समर्थ ॥ समास दुसरा : ब्रहमनिरूपण श्रीराम ॥**

ब्रहम निर्गुण निराकार । ब्रहम निःसंग निर्वीकार । ब्रहमास नाहीं पारावार । बोलती साधु ॥ १॥

ब्रह्म कसे आहे ? साधु म्हणतात,कीं ब्रह्म निर्गुण,निराकार,निःसंग,निर्विकार असून त्याला अंत नाहीं.

ब्रहम सर्वांस व्यापक । ब्रहम अनेकीं येक । ब्रहम शाश्वत हा विवेक । बोलिला शास्त्रीं ॥ २॥

ब्रह्म सर्वांस व्यापून असणारें,अनेकांमध्यें एकत्वानें राहाणारें व शाश्वत आहें असा विवेक शास्त्रांमध्ये सांगितला आहें.

ब्रहम अच्युत अनंत । ब्रहम सदोदित संत । ब्रहम कल्पनेरहित । निर्विकल्प ॥ ३॥

ब्रह्म हें कधीही च्युत न होणारें,अनंत,सदा संत (स्थिर) असून कल्पनारहीत-केवळ निर्विकल्प आहें,

ब्रहम या दृश्यावेगळें । ब्रहम सुन्यत्वासनिराळें । ब्रहम इन्द्रियांच्या मेळें । चोजवेना ॥ ४॥

( चोजवेना - जाणवत नाही)

ह्या दृष्याहून वेंगळें,शून्यत्वाहून (अज्ञाताहून) निराळें व इंद्रियसमुदायाच्या योगांनें समजलें जात नाहीं असें ब्रह्म आहें,(ब्रह्म-दृश्य प्रकृतिपलीकडचें आहें पण शून्य नव्हें.)

ब्रहम दृष्टीस दिसेना । ब्रहम मूर्खासी असेना । ब्रहम साधुविण येना । अनुभवासी ॥ ५॥

तें दृष्टीला दिसत नाहीं,(म्हणून) मूर्खांना असत नाहीं (नाहींसे वाटतें) व साधुकृपेशिवाय अनुभवाला येणार नाहीं.

ब्रहम सकळांहूनि थोर । ब्रहमा ऐसें नाहीं सार । ब्रहम सूक्ष्म अगोचर । ब्रहमादिकांसी ॥ ६॥

तें सर्वांहून मोठें आहें,त्यांच्यासारखें महत्वाचें काहीं नाहीं,तें इतकें सूक्ष्म आहें कीं ब्रह्मादिकांनाही कळत नाहीं.

ब्रहम शब्दीं ऐसें तैसें । बोलिजे त्याहूनि अनारिसें । परी तें श्रवणअभ्यासें । पाविजे ब्रहम ॥ ७॥

ब्रह्म हें असें आहें तें तसें आहें असें शब्दांनी जे जे वर्णन करावें,त्याहून ब्रह्म वेगळेंच असतें तरीपण वारंवार श्रवण करुन व नित्य अभ्यास करुन त्याची प्राप्ति करुन घेतां येतें.

ब्रहमास नामें अनंत । परी तें ब्रहम नामातीत । ब्रहमास हेतदृष्टांत । देतां न शोभती ॥ ८॥

( हेतदृष्टांत - हेतू व दृष्टांत )

ब्रह्मास अनंत नामें असलीं तरी तें नामातीत आहें. ब्रह्माला कोणताही हेतु किंवा दृष्टांत लागू पडत नाहीं.

ब्रह्मासारिखें दुसरें । पाहतां काय आहे खरें । ब्रह्मीं दृष्टांत उत्तरें । कदा न साहे ॥९॥

पहावयास गेलें असतां ब्रह्मांसारखें खरें दुसरें काय आहें ? ब्रह्माला कोणतेंच दृष्टांताचें भाषण लागूं पडत नाहीं.

**यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ॥**

जेथें वाचा निवर्तती । मनास नाहीं ब्रह्मप्राप्ती । ऐसें बोलिती श्रुती । सिद्धांतवचन ॥ १०॥

ब्रह्माचे वर्णन करतांना वाणी कुंठित होते व मनाला ब्रह्माचें आकलन करतां येत नाहीं,असा सिध्दांत वेदांनीच सांगितला आहें.(ब्रह्म मनाला व वाचेला अगोचर आहें).

कल्पनारूप मन पाहीं । ब्रह्मीं कल्पनाचि नाहीं । म्हणोनि हें वाक्य कांहीं । अन्यथा नव्हे ॥ ११॥

आणि हें वेदांचे म्हणणे खोटे नाही कारण मन हें कल्पनारुप आहें आणि ब्रह्माच्या ठिकाणी कल्पनांच (मुळी) नाहीं (मन म्हणजे कल्पना व ब्रह्म निर्विकल्प)

आतां मनासि जें अप्राप्त । तें कैसेनि होईल प्राप्त । ऐसें म्हणाल तरी कृत्य । सद्‌गुरुविण नाहीं ॥ १२॥

आतां मनालाहीं जें दुर्मिळ तें कसे मिळेल असें विचाराल (तर ह्यांचे उत्तर असें,की) हें काम सद्गुरुवाचूंन होणार नाहीं.

भांडारगृहें भरलीं । परी असती आडकलीं । हातास न येतां किली । सर्वही अप्राप्त ॥ १३॥

खजिने भरलेले आहेत पण तें सर्व कुलपांत अडकलेले (आडकिलीं) जोपर्यंत त्यांची किल्ली हातीं येत नाहीं,तोंपर्यंत तें सगळेंच दुर्लभ .

तरी ते किली कवण । मज करावी निरूपण । ऐसी श्रोता पुसे खूण । वक्तयासी ॥ १४॥

तर मग किल्ली कोणती तें मला सांगा असा श्रोत्यांने वक्त्याला खुणेंचा प्रश्न विचारला.

सद्‌गुरुकृपा तेचि किली । जेणें बुद्धी प्रकाशली । द्वैतकपाटें उघडलीं । एकसरां ॥ १५॥

(वक्ता उत्तर देतो!) सद्गुरुंचीकृपा हीच ती किल्ली होय,तीच्या योगानें द्वैताचें दरवाजें एकदम उघडून बुध्दीवर आत्मज्ञानाचा प्रकाश पडतों.

तेथें सुख असे वाड । नाहीं मनासी पवाड । मनेंविण कैवाड । साधनांचा ॥ १६॥

( कैवाड - नानाप्रकार , पवाड - ठाव किवां गती )

तेथील सुख (ब्रह्मसुख) फार मोठें वाड आहें तेथे मनाचा प्रवेश (पवाड) होत नाहीं (मनाला पराक्रम गाजवायला जागा नाहीं) मनांवाचूंनच (त्याच्या प्राप्तिच्या) साधनांचे प्रयत्न (कैवाड) करावें लागतात.

त्याची मनेविण प्राप्ती । कीं वासनेविण तृप्ती । तेथें न चले विपत्ती । कल्पनेची ॥ १७॥

मनाच्या सहाय्यावांचून त्याची प्राप्ति होतें,कोणतीही वासना नसून तेंथे तृप्तिचे सुख आहें,कल्पनेने उभारलेल्या शास्त्रज्ञाची तेथें गति नाहीं.

तें परेहुनि पर । मनबुद्धीअगोचर । संग सोडितां सत्वर । पाविजेतें ॥ १८॥

तें परा वाणीच्या पलीकडचें आहें,मनाला व बुध्दीला समजण्यासारखें तें नाहीं (अगोचर),(देहबुध्दीची) संगति सोडली तर मात्र त्याची प्राप्ति तात्काळ होतें.

संग सोडावा आपुला । मग पहावें तयाला । अनुभवी तो या बोला । सुखावेल गा ॥ १९॥

आपलेपणाचा संग टाकावा व मग पाहावें (मी सोडून त्याला पाहावें) जो अनुभवी असेल (जो अनुभव घेईल) त्याला हें बालणें ऐकून सुख वाटेल.

आपण म्हणिजे मीपण । मीपण म्हणजे जीवपण । जीवपण म्हणजे अज्ञान । संग जडला ॥ २०॥

आपण म्हणजें मीपणा,मीपणा हाच जीवपणा, व जीवपणा म्हणजेंच अज्ञान हाच संग (जीवास) जडला,

सोडितां तया संगासी । ऐक्य होय निःसंगासी । कल्पनेविण प्राप्तीसी । अधिकार ऐसा ॥ २१॥

हा सोडला की नि:संग जें परब्रह्म त्याच्याशीं ऐक्य होतें, पण कल्पनेशिवाय ब्रह्मप्राप्तीचा अधिकार असा असतों.

मी कोण ऐसें नेणिजे । तया नांव अज्ञान बोलिजे । अज्ञान गेलिया पाविजे । परब्रह्म तें ॥ २२॥

मी कोण आहें हें न समजणें ह्यांचे नांव अज्ञान,हें अज्ञान नाहींसे झालें,की परब्रह्म आहेंच आहें (प्राप्त होतें).

देहबुद्धीचें थोरपण । परब्रह्मीं न चले जाण । तेथें होतसे निर्वाण । अहंभावासी ॥ २३॥

देहबुध्दीचा मोठेपणा परब्रह्माशीं मुळींच चालणार नाहीं,तेथे सगळा अहंभावच नाहीसा होतों,

ऊंच नीच नाहीं परी । रायारंका येकचि सरी । जाला पुरुष अथवा नारी । तरी येकचि पद ॥२४॥

त्याठिकाणी लहान-मोठा हा भेद नाहीं,राजा व रंक ह्या दोघांचीही तेथें बरोबरीच आहें, पुरूष असो अथवा स्त्री असो,सर्वांना तेथें एकच पद आहें.(सर्वांना मिळून एकच ब्रह्म आहें).

ब्राह्मणांचें ब्रह्म तें सोंवळें । शूद्राचें ब्रह्म तें वोवळें । ऐसें वेगळें आगळें । तेथें असेचिना ॥ २५॥

ब्राह्मणाचें ब्रह्म तेवढें सोवळें असतें  व शूद्राचें ब्रह्म तेंवढें ओवळें असतें असा भिन्नपणा,उंचनीचभाव तेथें मुळींच नाहीं.

ऊंच ब्रह्म तें रायासी । नीच ब्रह्म तें परिवारासी । ऐसा भेद तयापाशीं । मुळींच नाहीं ॥ २६॥

उंच ब्रह्म तें राजाला व हलकें ब्रह्म तें नोकर चाकरांना (प्रजेला) असा भेद त्यांच्यापाशीं मुळींच नाहीं,

सकळांसि मिळोन ब्रह्म येक । तेथें नाहीं हे अनेक । रंक अथवा ब्रह्मादिक । तेथेंचि जाती ॥ २७॥

सगळ्यांना मिळून ब्रह्म एकच आहें तेथे अनेकपणा नाहीं रंक असो अगर ब्रह्मादिक देव असोत,सर्वांना शेवटी तेथेंच जावयांचे आहें (सर्वांच्या विश्रांतीचे स्थान एकंच आहें)

स्वर्ग मृत्यु आणि पाताळ । तिहीं लोकींचे ज्ञाते सकळ । सकळांसि मिळोनि येकचि स्थळ।विश्रांतीचें ॥२८॥

स्वर्ग,मृत्यु,पाताळ या तिन्ही लोकांत जेवढें म्हणून ज्ञातें आहेत त्या सर्वांस मिळून ब्रह्म हें एकंच विश्रांतीचे स्थान आहें.

गुरुशिष्यां येकचि पद । तेथें नाहीं भेदाभेद । परी या देहाचा संमंध । तोडिला पाहिजे ॥ २९॥

गुरु,शिष्य ह्या दोघांसही मिळून एकच पद ब्रह्म आहें तेथे भेदाभेद काहीं नाहीं पण ह्या देहाचा संबंध (समंध) मात्र सोडला पाहिजें (देहबुध्दीचा संबंध तोडला पाहिजें).

देहबुद्धीचा अंतीं । सकळांसि एकचि प्राप्ती । येकं ब्रह्म द्वितीयं नास्ति । हें श्रुतीचें वचन ॥ ३०॥

देहबुध्दीचा लय झाला म्हणजे सर्वांस एकच ब्रह्म प्राप्त होणार आहें एकं ब्रह्मं द्वितीय नास्ति ।(ब्रह्म एक आहे दुसरे काही नाहीं) असे श्रुतिवचन प्रसिध्दच आहें.

साधु दिसती वेगळाले । परी ते स्वस्वरूपीं मिळाले । अवघे मिळोनि एकचि जाले । देहातीत वस्तु ॥३१।।

साधु (देहानें) वेगवेगळें दिसलें तरी स्वरुपाच्या ठिकाणीं एकरुप झालेले असतात,सगळे (साधु ) मिळून देहातीत असें जें एक परब्रह्म तेथे तद्रूप झालेले असतात.

ब्रह्म नाहीं नवें जुनें । ब्रह्म नाहीं अदिक उणें । उणें भावील तें सुणें । देहबुद्धीचें ॥ ३२॥

नवे जुने अथवा जास्त कमी असें ब्रह्म नाहीं त्या ठिकाणी उणेपणाची जो कल्पना करील त्यास देहबुध्दीचें कुत्रेंच (सुणें) समजलें पाहिजें.

देहबुद्धीचा संशयो । करी समाधानाचा क्षयो । चुके समाधानसमयो । देहबुद्धियोगें ॥ ३३॥

(मी देह आहें अशी बुध्दि-) त्या देहबुध्दीच्या योगानें जो (मी ब्रह्म आहें किंवा नाहीं असा) संशय उत्पन्न होतो,त्यामुळें समाधानाचा नाश होतो व देहबुध्दीमुळेच समाधानाचा प्रसंग हातचा जातो.

देहाचें जें थोरपण । तेंचि देहबुद्धीचें लक्षण । मिथ्या जाणोन विचक्षण । निंदिती देह ॥ ३४॥

देहाला मोठेपण देणे हेच देहबुध्दीचें लक्षण होय, (पण) देह मिथ्या आहें असें जाणून शहाणें लोक-साधु तर देहाची निंदा करतात,(त्याला निंद्य मानतात)

देह पावे जंवरी मरण । तंवरी धरी देहाभिमान । पुन्हा दाखवी पुनरागमन । देहबुद्धि मागुती ॥ ३५॥

देहास मरण येईपर्यंत (देहबुध्दीमुळें) देहाचा अभिमान (जीव धरतों),व त्या देहबुध्दीमुळेंच पुन्हां जन्माच्या फे-यांत सांपडतो.(देहबुध्दीमुळें जिवंत आहें तोंवर देहाचा अभिमान बाळगणें व पुन्हा जन्म पांवणें हें देहबुध्दीमुळेंच होते.)

देहाचेनि थोरपणें । समाधानासि आलें उणें । देह पडेल कोण्या गुणें । हेंही कळेना ॥ ३६॥

पण देहाच्या मोठेपणांत गुंतल्यामुळें आत्मसमाधान मिळत नाहीं,बरे,तो देहही कोणत्या कारणानें (केव्हां) पडणार हेंही समजत नाही.

हित आहे देहातीत । म्हणोनि निरूपिती संत । देहबुद्धीनें अन्हित । होचि लागे ॥ ३७॥

साधुसंत सांगतात कीं देहाहून वेंगळें होण्यातच जींवाचें कल्याण असून देहबुध्दीमुळें अकल्याणच होतें.

सामर्थ्यबळें देहबुद्धी । योगियांसी तेही बाधी । देहबुद्धीची उपाधी । पैसावों लागे ॥ ३८॥

(पैसावों - बळकट)

देहबुध्दि योग्यांनाही (सिध्दींच्या) सामर्थ्यामुळें बाधा करतें,देहबुध्दीमुळे उपाधी वाढू लागतें.

म्हणोनि देहबुद्धि हे झडे । तरीच परमार्थ घडे । देहबुद्धीनें विघडे । ऐक्यता ब्रह्मींची ॥ ३९॥

म्हणून ही देहबुध्दि झडलीं तरच परमार्थ घडतों,ब्रह्माशी असणारी जीवाची एकरुपता देहबुध्दीमुळेंच बिघडतें.

विवेक वस्तूकडे ओढी । देहबुद्धि तेथूनि पाडी । अहंता लावूनि निवडी । वेगळेपणें ॥ ४०॥

नित्यानित्यविवेक जीवाला ब्रह्माकडें ओढीत असतो व देहबुध्दि त्याला तेथून खालीं ढकलीत असतें व त्याच्या पाठीमागें अहंता लावून त्याला (ब्रह्मस्वरुपाहून) निराळा करतें.

विचक्षणें याकारणें । देहबुद्धि त्यजावी श्रवणें । सत्य ब्रह्मीं साचारपणें । मिळोन जावें ॥ ४१॥

ह्यासाठीं शहाण्या माणसानें अध्यात्मश्रवण करुन देहबुध्दि टाकावी आणि सत्यब्रह्माकडें खरोखरी एकरुप होऊन मिळून जावें,

सत्य ब्रह्म तें कवण । ऐसा श्रोता करी प्रश्न । प्रत्युत्तर दे आपण । वक्ता श्रोतयासी ॥ ४२॥

सत्य ब्रह्म तें काणतें ? असा श्रोत्यांने प्रश्न केला त्यास वक्त्याने उत्तर दिले ते येणेप्रमाणें.

म्हणे ब्रह्म येकचि असे । परी तें बहुविध भासे । अनुभव देहीं अनारिसे । नाना मतीं ॥ ४३॥

वक्ता म्हणतो,ब्रह्म एकच एक आहें,तथापि अनेक मतांमुळें भिन्न देहांत वेगवेगळें अनुभव येतात,म्हणून तें अनेक प्रकारचें आहें असें भासतें.

जें जें जया अनुभवलें । तेंचि तयासि मानलें । तेथेंचि त्याचें विश्वासलें । अंतःकरण ॥ ४४॥

ज्याच्या अनुभवास जें जें आलें तेंच त्याच्या चित्तास पटले व तेथेंच त्याच्या अंतःकरणानें विश्र्वास धरला.

ब्रह्म नामरूपातीत । असोनि नामें बहुत । निर्मळ निश्र्चळ निवांत । निजानंद॥ ४५॥

ब्रह्म नामरुपाहून निराळें (ज्याचें नांव किंवा रुप सांगता येत नाहीं असें) आहें,तरी त्याला पुष्कळ नावें आहेत,निर्मळ,निश्र्चळ,निवांत,निजानंद.

अरूप अलक्ष अगोचर । अच्युत अनंत अपरंपार । अदृश्य अतर्क्य अपार । ऐसी नामें ॥ ४६॥

अरुप,अलक्ष्य,अगोचर,अच्युत,अनंत,अपरंपार,अदृश्य,अर्तक्य,अपार,

नादरूप ज्योतिरूप । चैतन्यरूप सत्तारूप । स्वस्वरूप साक्षरूप । ऐसी नामें ॥ ४७॥

नादरुप,ज्योतिरुप,चैतन्यरुप,सत्तारुप,साक्षिरुप,

सुन्य आणि सनातन । सर्वेश्वर आणि सर्वज्ञ । सर्वात्मा जगज्जीवन । ऐशीं नामें ॥ ४८॥

शून्य,सनातन,सर्वेश्र्वर,सर्वज्ञ,सर्वात्मा,जगजीवन अशी ब्रह्माचीं नावें आहेंत.

सहज आणि सदोदित । शुद्ध बुद्ध सर्वातीत । शाश्वत आणि शब्दातीत । ऐसी नामें ॥ ४९॥

सहज,सदोदित,शुध्द,बुध्द (ज्ञानी),सर्वातीत,शाश्र्वत,शब्दातीत,

विशाळ विस्तीर्ण विश्र्वंभर । विमळ वस्तु व्योमाकार । आत्मा परमात्मा परमेश्वर । ऐशीं नामें ॥५०॥

विशाळ,विस्तीर्ण,विश्र्वंभर,विमळ,वस्तु,व्योमाकार (आकाशाकार),आत्मा,परमात्मा,परमेश्र्वर अशीं त्याला नावें आहेत,

परमात्मा ज्ञानघन । एकरूप पुरातन । चिद्रूप चिन्मात्र जाण । नामें अनाम्याचीं ॥ ५१॥

परमात्मा,ज्ञानघन,एकरुप,पुरातन,चिद्रूप,चिन्मात्र अशीं हीं सर्व नामें अनामी जें परब्रह्म त्याचीं आहेत.(त्यातच निरुपणाच्या आघोत आम्हीं त्यास सत्यब्रह्म म्हटलें),

ऐशीं नामें असंख्यात । परी तो परेश नामातीत । त्याचा करावया निश्र्चितार्थ । ठेविलीं नामें ॥ ५२॥

अशी ही असंख्य नावें असली तरी तो परमेश्वर वस्तुतः नामातीत-नामरुपातीत आहें त्याच्या स्वरुपाचा(कांही एक) निश्र्चय करण्यासाठीं हीं नावें ठेविली आहेत.

तो विश्रांतीचा विश्राम । आदिपुरुष आत्माराम । तें येकचि परब्रह्म । दुसरें नाहीं ॥ ५३॥

तो आदिपुरुष आत्माराम सर्वांच्या विश्रांतीचे स्थान आहें,तेंच एक परब्रह्म होय,त्यावाचूंन दुसरे काही नाहीं.

तेंचि कळावयाकारणें । चौदा ब्रह्मांचीं लक्षणें । सांगिजेती तेणें श्रवणें । निश्चयो बाणे ॥ ५४॥

तेंच मुख्य ब्रह्म कळण्यासाठीं चौदा ब्रह्मांची लक्षणें सांगतो,ती ऐकली म्हणजें मुख्य ब्रह्माचा निश्र्चय अंतःकरणांत बाणेल.

खोटें निवडितां येकसरें । उरलें तें जाणिजे खरें । चौदा ब्रह्में शास्त्राधारें । बोलिजेती ॥ ५५॥

खोटें निवडून टाकलें म्हणजें बाकी जें उरतें तें सर्व खरेच समजावें आतां चौदा ब्रह्मे कशी असतात तें शास्त्राधारानें सांगतो.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके ब्रह्मनिरूपणं नाम द्वितीयः समासः ॥ २॥**

## समास तिसरा : चदुर्ध्शब्रह्मनिरूपण श्रीराम ॥

श्रोतां व्हावें सावधान । आतां सांगतों ब्रह्मज्ञान । जेणें होये समाधान । साधकांचें ॥ १॥

श्रोत्यांनी सावध व्हावें,ज्यायोगें साधकांचें समाधान होईल असें ब्रह्मज्ञान आतां सांगतों.(ब्रह्माचा बोध स्पष्ट व्हावा ह्यासाठीं ब्रह्मासंबंधीच्या खोट्या समजुतीचें निराकारण करणें अवश्य आहें)

रत्नें साधाया कारणें । मृत्तिका लागे येकवटणें । चौदा ब्रह्मांचीं लक्षणें । जाणिजे तैसीं ॥ २॥

रत्ने किंवा सोने काढण्यासाठीं माती गोळा करावी लागतें,त्या (माती एकवटण्या-) प्रमाणेंच ही चौदा ब्रह्मांची लक्षणें आहेत असें समजावें.

पदार्थेंविण संकेत । द्वैतावेगळा दृष्टांत । पूर्वपक्षेंविण सिद्धांत । बोलतांचि नये ॥ ३॥

( पदार्थेंविण संकेत - तुलनेसाठी दुसऱ्या वस्तूचा नाम निर्देश केल्याशिवाय. )

पदार्थावाचून खूण,द्वैताशिवाय द्दष्टांत व पूर्वपक्षाशिवाय (शंकेशिवाय) सिध्दांत बोलतां येणेंच शक्य नाहीं,

आधीं मिथ्या उभारावें । मग तें ओळखोन सांडावें । पुढें सत्य तें स्वभावें । अंतरीं बाणे ॥ ४॥

आधीं खोटें पुढे उभे करावें व मग तें खोटें आहें असें जाणून टाकून द्यावें,नंतर खरे असतें तें सहजच अंतःकरणांत ठसतें,

म्हणोन चौदा ब्रह्मांचा संकेत । बोलिला कळाया सिद्धांत । येथें श्रोतीं सावचित्त ।क्षण एक असावें ॥५॥

म्हणून सिध्दांत कळण्यासाठी चौदा ब्रह्मांची लक्षणें सांगितलीं आहेत. तीं क्षणभर श्रोत्यांनी एकाग्रचित्तानें ऐकावीं (ही चौदा ब्रह्मे नव्हेत तर चौदा भ्रम आहेत व ते दूर केले पाहिजेत.)

पहिलें तें शब्दब्रह्म । दुजें ओमित्येकाक्षरं ब्रह्म । तिसरें खंब्रह्म । बोलिली श्रुती ॥ ६॥

१-शब्दब्रह्म २-ओं(ॐ) इति एकाक्षरब्रह्म ३- खब्रह्म श्रुतींनीं (सांगितलेले),

चौथें जाण सर्वब्रह्म । पांचवें चैतन्यब्रह्म । सहावें सत्ताब्रह्म । साक्षब्रह्म सातवें ॥ ७॥

४-सर्वब्रह्म ५- चैतन्यब्रह्म ६-सत्ताब्रह्म ७-साक्षब्रह्म

आठवें सगुणब्रह्म । नवें निर्गुण ब्रह्म । दहावें वाच्यब्रह्म । जाणावें पैं ॥ ८॥

८-सगुणब्रह्म ९- निर्गुणब्रह्म १०- वाच्यब्रह्म

अनुभव तें अकरावें । आनंदब्रह्म तें बारावें । तदाकार तें तेरावें । चौदावें अनिर्वाच्य ॥९॥

११- अनुभवब्रह्म १२- आनंदब्रह्म १३- तदाकार १४- अनिर्वाच्यब्रह्म

ऐशीं हीं चौदा ब्रह्में । यांचीं निरूपिलीं नामें । आतां स्वरूपांचीं वर्मे । संकेतें दाउं ॥ १०॥

अशी हीं चौदा ब्रह्मांची नावें सांगितली आतां त्यांच्या स्वरुपाच्या खुणा संक्षेपानें सांगतों.

अनुभवेंविण भ्रम । या नां शब्दब्रह्म । आतां ओमित्येकाक्षरं ब्रह्म । तें येकाक्षर ॥ ११॥

ब्रह्माविषयींचे अनुभवशून्य शब्दज्ञान ह्यांचे नांव शब्दब्रह्म (अनुभवेंवीण भ्रम । या नांव शब्दब्रह्म. ब्रह्माचे नुसतें शब्दाज्ञान झालें म्हणजें ब्रह्मज्ञान झालें असें नाहीं,अनुभवशून्य शब्दज्ञान काय कामाचें ?)आतां ॐ असें एकाक्षर त्यास “एकाक्षरब्रह्म“ म्हणतात,(ओमित्येकाक्षरं ब्रह्म । पण जें क्षर ना अक्षर तेथें कैचे ओमित्येकाक्षर,क्षर म्ह.नाशवंत व अक्षर म्हणजें अविनाशी,ब्रह्म क्षर नाहीं व अक्षरहीं नाही. का.की.जेथें नाश नाही तेथें अविनाशी आहें असें म्हणण्यात तरी मतलब काय ?)

खं शब्दें आकाशब्रह्म । महदाकाश व्यापक ब्रह्म । आतां बोलिले सूक्ष्म । सर्वब्रह्म ॥१२॥

“खं“ शब्दानें ”आकाशब्रह्म” किंवा महदाकाशाला व्यापक असें ब्रह्म समजावें (आकाश म्हणजें शून्य शून्याच्या ज्ञानाचा निरास होतो म्हणून तेंथें शाश्वतांचें अधिष्ठान नाहीं)आतां सूक्ष्म असें सर्वब्रह्म सांगतो.

पंचभूतांचें कुवाडें । जें जें तत्त्व दृष्टीस पडे । तें तें ब्रह्मचि चोखडें । बोलिजेत आहे ॥ १३॥

पंचभूतांचे जे जे तत्व (किंवा चमत्कार) दृष्टीला पडेल ते ते निव्वळ ब्रह्मच होय असें म्हणतात.

या नांव सर्वब्रह्म । श्रुतिआश्रयाचें वर्म । आतां चैतन्यब्रह्म । बोलिजेल ॥ १४॥

सर्वं खल्विदं ब्रह्म ह्या श्रुतिवाक्याच्या आधारानें मायेला-(पंचभूतांच्या पसा-याला) सर्व ब्रह्म म्हणतात,(पण तें ब्रह्म नव्हें,ब्रह्मप्रळयांत सर्व भूतांचाच नाश आहें) आतां चैतन्य ब्रह्म सांगूं.

पंचभूतादि मायेतें । चैतन्यचि चेतवितें । म्हणोनियां चैतन्यातें । चैतन्यब्रह्म बोलिजे ॥ १५॥

पंचभूतादि मायेला चेतना देंणारे चैतन्य आहें म्हणून त्या चैतन्यास "चैतन्यब्रह्म" म्हणतात.(पण ज्याला चेंतवावें तें पांचभौतिक नाशवंत ठरल्यावर त्या चेतविणा-या चैतन्याला खरेपणा कोठून येणार ?)

चैतन्यास ज्याची सत्ता । तें सत्ताब्रह्म तत्त्वतां । तये सत्तेस जाणता । या नांव साक्षब्रह्म ॥१६॥

त्या चैतन्यावर ज्याची सत्ता आहें तेंच खरोखर सत्ताब्रह्म होय.(परिवारेंविण सत्ता । तें सत्ताचि नव्हें तत्वता-परिवारच नाही मग सत्ता कोणाची ?) आणि त्या सत्ता ब्रह्मास जें जाणणारे तें साक्षब्रह्म होय.(साक्षीब्रह्म, पदार्थच नाहीं तर मग साक्षित्व कोणते ?)

साक्षित्व जयापासूनी । तेंहीं आकळिलें गुणीं । सगुणब्रह्म हे वाणी । तयासि वदे ॥ १७॥

ज्यापासून साक्षित्व उत्पन्न होतें तें सुध्दा गुणांत येतें म्हणून त्यांस वाणीनें "सगुणब्रह्म" म्हणतात.(गुणांना नाश आहें म्हणून हें ब्रह्म नव्हें)

जेथें नाहीं गुणवार्ता । तें निर्गुणब्रह्म तत्त्वतां । वाच्यब्रह्म तेंही आतां । बोलिजेल ॥ १८॥

जेथें गुणांची वार्ता नाही ते खरोखर "निर्गुण ब्रह्म" होय (जेथें नाही गुणवार्ता तें निर्गुण ब्रह्म,गुणच नाही मग निर्गुण कैचें ?सत्ता चैतन्यता साक्षी। सर्वही गुणापाशी। ठाईंचें निर्गुण त्यासीं ।गुण कैचे ? असें गुणरहित ब्रह्म त्याला निर्गुण हें नाव तरी कशाला पाहिजें ? आतां वाच्यब्रह्म सांगू.

जे वाचे बोलतां आले । ते वाच्यब्रह्म बोलिले । अनुभवासि कथिले । नवचे सर्वथा ।।१९।।

या नांव अनुभवब्रह्म । आनंदवृत्तीचा धर्म । परंतु याचेंही वर्म । बोलिजेल ॥ २०॥

जें वाणीनें बोलता येते ते वाच्यब्रह्म होय (ह्यास नाश आहेच) आणि (ज्याचा अनुभव येतो असें वाटतें,पण तो) अनुभव काय आहें तें सांगता येत नाहीं,ह्यांचे नांव "अनुभव ब्रह्म" (हें त्रिंपुटीतलें असल्यामुळे शुध्द ब्रह्म नाहीं) आनंद हा वृत्तीचा धर्म होय,पण ह्यांचेही वर्म सांगता येईल.

ऐसें हें ब्रह्म आनंद । तदाकार तें अभेद । अनुर्वाची संवाद । तुटोन गेला ॥ २१॥

असें हे आनंद ब्रह्म  आहें, "आनंदाचा अनुभव ।हाही वृत्तीचाच भाव" आनंद ही मनाची वृत्ति आहें,शुध्दब्रह्म वृत्यातीत आहें, "तदाकार" म्हणजें भिन्न नसणें (ऐक्य) बालणेंच जेथें सुटतें तें अनिर्वाच्य ब्रह्म होय. तदाकारब्रह्म  "तदाकारी ठाव। वृत्तीस नाहीं." तदाकार झाल्यावर त्याला अमुक नांव द्यायचें ही वृत्तिच उरत नाहीं,म्हणजें तदाकार ब्रह्म सत्य नाहीं (जेथें संवाद तुटून जातो तें ही उन्मनी स्थिती आहें पण शुध्द ब्रह्म सर्व अवस्थातीत आहें)

ऐशीं हीं चौदा ब्रह्में । निरूपिलीं अनुक्रमें । साधकें पाहतां भ्रमें । बाधिजेना ॥ २२॥

अशी ही चौदा ब्रह्मे अनुक्रमे वर्णिली आहेत,साधकानें ह्यांचा विचार केला असतां त्यास भ्रमाची बाधा होणार नाहीं,ह्याप्रमाणें १४ ब्रह्मांचा निरास करुन समर्थ शुध्द विमळ ब्रह्माची खूण सांगतात.

ब्रह्म जाणावें शाश्वत । माया तेचि अशाश्वत । चौदा ब्रह्मांचा सिद्धांत । होईल आतां ॥ २३॥

ब्रह्म ते शाश्र्वत माया ती अशाश्र्वत अशा दृष्टीनें चौदा ब्रह्मांचाही आतां निश्र्चय होईल.

शब्दब्रह्म तें शाब्दिक । अनुभवेंविण माईक । शाश्वताचा विवेक । तेथें नाहीं ॥ २४॥

शब्दब्रह्म हें शाब्दिक व अनुभवावांचून लटकें होय.त्याच्या ठिकाणीं शाश्र्वतपणाचा विचार नाहीं.

जेथें क्षर ना अक्षर । तेथें कैंचें ओमित्येकाक्षर । शाश्वताचा विचार । तेथें न दिसे ॥ २५॥

जें क्षर (नाशवंत) नाहीं आणि अक्षर (अविनाशी) नाहीं तेथे एकाक्षर ॐ तरी कोठचें ?शाश्र्वतपणाचा विचार तेथेंही दिसत नाहीं.

खंब्रह्म ऐसें वचन । तरी सून्यातें नासी ज्ञान । शाश्वताचें अधिष्ठान । तेथेंहि न दिसे ॥ २६॥

( खं - आकाश,अवकाश )

खं ब्रह्म असें वचन आहें,तथापि खं म्हणजे शून्य,त्या शून्याचा नाश ज्ञानाने होतो अर्थात शाश्र्वतपणाला तेथेंही थारा नाहीं.

सर्वत्रांस होतो अंत । सर्वब्रह्म नासिवंत । प्रळय बोलिला निश्चित । वेदांतशास्त्रीं ॥ २७॥

वेंदांत शास्त्रात प्रलय होणार असें निश्र्चयात्मक सांगितलें आहें,अर्थात सर्वांचा अंत होणार,म्हणून सर्वब्रह्म नाशिवंत आहें,

ब्रह्मप्रळय मांडेल जेथें । भूतान्वय कैंचा तेथें । म्हणोनिया सर्वब्रह्मातें । नाश आहे ॥ २८॥

ब्रह्मप्रलयच जेथे होतो तेथे भूतांचा संबंध कोठचा ?म्हणून सर्वब्रह्माला नाश आहें.

अचळासि आणी चळण । निर्गुणास लावितां गुण । आकारास विचक्षण । मानीतना ॥ २९॥

अचल वस्तूस चलन मानणें,निर्गुणास गुण लावणें किंवा निराकाराचा आकार कल्पिणें हें शहाण्याला पटत नाहीं.

जें निर्माण पंचभूत । तें प्रत्यक्ष नाशवंत । सर्वब्रह्म हे मात । घडे कैंवीं ॥ ३०॥

जें जें म्हणून उत्पन्न झालें तें तें पंचभूतात्मक असून नाशवंत होय हें उघड आहें.मग सर्वब्रह्म हें बालणें कसें शोभेल ?

असो आतां हें बहुत । सर्वब्रह्म नासिवंत । वेगळेपणास अंत । पाहणें कैंचें ॥ ३१॥

आतां हा विचार पुरें,सर्वब्रह्म नाशवंत आहें,तेथें वेगळेपण तरी कोठून राहाणार ? आणि मग पाहाणें कोठून उरलें ?(मग "पाहाणें"ह्यांत वेगळेपणा-द्वैत आलें,पण सर्व नाशवंत म्हटल्यावर हें द्वैत तरी कसें उरणार !)

आतां जयास चेतवावें । तेंचि माईक स्वभावें । तेथें चैतन्याच्या नांवें । नास आला ॥ ३२॥

आतां ज्याला चेतना-चलन द्यावयांचे तेंच स्वभावताःलटकें,म्हणून चैतन्यब्रह्माचाही नाश होतो.

परिवारेंविण सत्ता । ते सत्ता नव्हे तत्त्वतां । पदार्थेविण साक्षता । तेही मिथ्या ॥ ३३॥

परिवार (हातांखाली कोणी) नसतां नुसती सत्ता येणें ही काहीं खरोखरी सत्ता नव्हें,त्याचप्रमाणें पदार्थावाचून साक्षित्व हें तरी खोटेंच.

सगुणास नाश आहे । प्रत्यक्षास प्रमाण काये । सगुणब्रह्म निश्चयें । नासिवंत ॥ ३४॥

सगुणाचा नाश होतो ह्या प्रत्यक्ष गोष्टीला दुसरें प्रमाण कोणतें घ्यावें ? सगुणब्रह्म हें निश्र्चयेंकरुन नाशवंत आहें,

निर्गुण ऐसें जें नांव । त्या नांवास कैंचा ठाव । गुणेंविण गौरव । येईल कैंचें ॥ ३५॥

( गुणेंवीण गौरव - ब्रह्म कधीही हा,हि किवा हे ह्याप्रकारे असे दाखविता येत नाही.)

(ब्रह्माला) निर्गुण असें जें नांव देतात,तें द्यायला जागा कोठें आहें ?गुण नाहीत तर नुसतें नांव देण्यांत काय महत्व ?(गुणांवाचून निर्गुण या नावांची प्रवृत्ति कशी होणार ? गुण मिथ्या आहेंत म्हणून निर्गुण असा ब्रह्माचा नामनिर्देश निरर्थक होय.)

माया जैसें मृगजळ । ऐसें बोलती सकळ । कां तें कल्पनेचें आभाळ । नाथिलेंचि ॥ ३६॥

काल्पनिक आभाळ किंवा मृगजळ जसें खोटें तशींच माया खोटी आहें,असें सर्व जण समजतात.

ग्रामो नास्ति कुतः सीमा । जन्मेंविण जीवात्मा । अद्वैतासी उपमा । द्वैताची ॥ ३७॥

गांव नाही तर गांवकूस कोठचें ? जन्म (जीव) नाहीं तर जीवात्मा कोठून आला ? त्याचप्रमाणें जें मूळचे अद्वैत त्याला द्वैताची उपमा कशी द्यावयाची ?

मायेविरहित सत्ता । पदार्थाविण जाणता । अविद्येविण चैतन्यता । कोणास आली ॥ ३८॥

मायेंशिवाय सत्ता (अस्तित्व),पदार्थांशिवाय जाणणें (जाणता-ज्ञान) अविद्येशिवाय चैतन्यत्व (चेतना स्फुर्तिशक्ति) कोणाला प्राप्त होणार ?

सत्ता चैतन्यता साक्षी । सर्वही गुणांचपासी । ठायींचें निर्गुण त्यासीं । गुण कैंचें ॥ ३९॥

सत्ता,चैतन्यत्व,साक्षित्व हीं सर्वं गुणांपाशीच असतात (हें सर्व गुणच आहेंत),पण (ठाईचें) मूळचें जें निर्गुण त्यास गुण कोठचें ?

ऐसें जें गुणरहित । तेथें नामाचा संकेत । तोचि जाणावा अशाश्वत । निश्चयेंसीं ॥ ४०॥

असें हें गुणरहित आहें त्यास नांवाची संज्ञा (संकेत) देंणें हें ही निश्र्चयेंकरुन अशाश्वत होय.

निर्गुण ब्रह्मासी संकेतें । नामें ठेविलीं बहुतें । तें वाच्यब्रह्म त्यातें । नाश आहे ॥ ४१॥

निर्गुणब्रह्म ओळखण्यासाठी पुष्कळ नांवें दिलेली आहेंत,त्यालाच वाच्यब्रह्म म्हणावें,त्याला नाश आहें.

आनंदाचा अनुभव । हाही वृत्तीचाच भाव । तदाकारीं ठाव । वृत्तीस नाहीं ॥ ४२॥

आनंदाचा अनुभव हाही वृत्तीचाच धर्म आहें, आणि तद्रूप (ब्रह्मस्वरुप) झाल्यावर वृत्ति निराळी उरत नाहीं.

अनिर्वाच्य याकारणें । संकेतवृत्तीच्या गुणें । तया संकेतास उणें । निवृत्तीनें आणिलें ॥ ४३॥

वृत्तीच्या योगानें नामनिर्देश करतां येतो,पण वृत्ति निवृत्त (नाहीशी) झाली म्हणजें त्या नामनिर्देशाला उणेपणा (लटिकेपणा) येतों,ह्यास्तव त्याला अर्निवाच्य म्हणतात.

अनिर्वाच्य ते निवृत्ती । तेचि उन्मनीची स्थिती । निरुपाधि विश्रांती । योगियांची ॥ ४४॥

ती निवृत्ति-स्थिति अर्निवाच्य आहें,योग्याची निरुपाधिक विश्रांति व उन्मनी अवस्था जिला म्हणतात ती तीच.(ह्याप्रमाणें १४ ब्रह्मांचा निराशा करुन शुध्द विमळ ब्रह्माची ही खूण सांगतात)

वस्तु जे कां निरुपाधी । तेचि सहज समाधी । जेणें तुटे आधिव्याधी । भवदुःखाची ॥ ४५॥

उपाधिरहित असें जें ब्रह्म तीच सहजसमाधिं होय,(तेथे सकळ उपाधींचा अंत होतो) ,त्यायोगें संसारदुःखाच्या (अंर्तबाह्य) आधिव्याधि नाहीशा होतात,

जो उपाधीचा अंत । तोचि जाणावा सिद्धांत । सिद्धांत आणि वेदांत । धादांत आत्मा ॥ ४६॥

उपाधींचा शेवट तोच सिध्दांत होय,आत्मशास्त्र गुरुप्रचीतीस येणार.आत्माही तोंच.

असो ऐसें जें शाश्वत ब्रह्म । जेथें नाहीं मायाभ्रम । अनुभवी जाणे वर्म । स्वानुभवें ॥ ४७॥

असों जें शाश्र्वत ब्रह्म तेंथें मायेचा भ्रम (मुळींच) नाहीं हें रहस्य अनुभवी आपल्या अनुभवांनें जाणतों,

आपुलेनि अनुभवें । कल्पनेसि मोडावें । मग सुकाळीं पडावें । अनुभवाचे ॥ ४८॥

स्वरुपाच्या स्वानुभवानें कल्पना नाहींशी करुन टाकावीं आणि मग स्वानुभवांचें सुख यथेच्छ भोंगावें (स्वानुभवानें कल्पनेंस मोडावें व महासुखांचे सकाळीं पडावें)

निर्विकल्पासि कल्पावें । कल्पना मोडे स्वभावें । मग नसोनि असावें । कल्पकोटी ॥ ४९॥

निर्विकल्प अशा परब्रह्माची कल्पना करीत जावीं म्हणजें (अवांतर) कल्पना आपोआप मोडून जातें आणि मग (अहंभाव)नाहींसा झालेला असा (ब्रह्मस्वरुप) होऊन कोट्यावधि कल्प (अनंत काळ) रहावें (निर्विकल्पास कल्पावें,म्हणजें कल्पना मोडे स्वभावें व मग अनंत काळ असून नसावें)

कल्पनेचें एक बरें । मोहरितांच मोहरे । स्वरूपीं घालितां भरे । निर्विकल्पीं ॥ ५०॥

कल्पनेंचा एक स्वभाव चांगला आहें,जिकडें तिला घालावी (शिरकवावी) तिकडे ती जातें,स्वस्वरुपाची कल्पना करुं लागलें,कीं ती कल्पना निर्विकल्पातं शिरतें,(कल्पना वाढता वाढता शुध्दब्रह्मस्वरुपाशी कल्पनांच नाहीशी होतें)

निर्विकल्पास कल्पितां । कल्पनेचि नुरे वार्ता । निःसंगास भेटों जातां । निःसंग होइजे ॥ ५१॥

निर्विकल्प अशी ब्रह्माची कल्पना करावयाला लागलें कीं कल्पनेंचे नावहीं शिल्लक राहात नाहीं,निःसंगास भेटावयाला गेले की भेटणाराही निःसंग होतो,

पदार्था ऐसें ब्रह्म नव्हे । मा तें हातीं धरूनि द्यावें । असो हें अनुभवावें । सद्गुरुमुखें ॥ ५२॥

ब्रह्म काहीं एखादा पदार्थाप्रमाणें नाहीं कीं तें हातांत धरुन देंता येईल,असो ह्याचा अनुभव सद्गुरुमुखानेंच करता येईल,

पुढें कथेच्या अन्वयें । केलाचि करूं निश्चये । जेणें अनुभवासि ये । केवळ ब्रह्म ॥ ५३॥

पुढें विषयाच्या अनुरोधानें एकदा केलेलाच निश्र्चय पुन्हां करुं कीं त्यायोगें केवळ ब्रह्माचा अनुभव येईल.(चौदा ब्रह्मांचा निरास केला,आता सत्य असें जें केवलब्रह्म-कैवल्य-त्यांचे स्वरुप सांगू.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके चतुर्दशब्रह्मनिरूपणं नाम तृतीयःसमासः॥ ३॥**

## समास चवथा : विमलब्रह्मनिरूपण श्रीराम ॥

ब्रह्म नभाहून निर्मळ । पाहतां तैसेंचि पोकळ । अरूप आणी विशाळ । मर्यादेवेगळें ॥ १॥

ब्रह्माचा विचार केला तर तें आकाशापेक्षांहीं निर्मळ असून त्याच्यासारखेंच पोकळ आहें,त्याला रुप नाहीं आणि तें इतकें विशाळ आहें कीं त्याला मर्यादाच नाहीं.

येकवीस स्वर्गें सप्त पाताळ । मिळोन एक ब्रह्मगोळ । ऐसें अनंत तें निर्मळ । व्यापून असे ॥ २॥

एकवीस(२१) स्वर्ग व सात (७) पाताळें मिळून एक ब्रह्मांड होतें,अशा अनंत ब्रह्मांडास तें ब्रह्म व्यापून आहें .

अनंत ब्रह्मांडांखालतें । अनंत ब्रह्मांडांवरुतें । तेणेंविण स्थळ रितें । अणुमात्र नाहीं ॥ ३॥

अनंत ब्रह्मांडाच्या खालीं व वरतीं ब्रह्मावाचूंन रिकामी जागा अणुरेणुइतकीही नाहीं.

जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं । ऐसी वदे लोकवाणी । तेणेंविण रिता प्राणी । एकही नाहीं ॥ ४॥

लोक असें म्हणतात,की जळी,स्थळी,काष्ठी,पाषाणीं (सर्वत्र ब्रह्मच व्यापलेले आहें),त्यावाचून एकही प्राणी नाहीं (पण ब्रह्मांवाचून एक अणुभरही स्थळ नाहीं.)

जळचरांस जैसें जळ । बाह्य अभ्यंतरीं निखळ । तैसें ब्रह्म हें केवळ । जीवमात्रासी ॥ ५॥

जलचरांस असें अंर्तबाह्य पाणीच भरलेले असतें तसें प्रत्येक जीवाच्या आंतबाहेर ब्रह्मच व्यापलेलें आहें,

जळावेगळा ठाव आहे । ब्रह्माबाहेरी जातां नये । म्हणोनि उपमा न साहे । जळाची तया ॥ ६॥

(परंतु) पाण्यावांचून रिकामी जागा आहें आणि (ब्रह्मांवाचून रिकामी जागा नसल्यामुळें) ब्रह्मांच्या बाहेर जांता येत नाहीं,म्हणून त्याला पाण्याची उपमा शोभत नाहीं  (जळाची उपमा अपुरी आहें)

आकाशाबाहेरी पळों जातां । पुढें आकाशचि तत्त्वतां । तैसा तया अनंता । अंतचि नाहीं ॥ ७॥

आकाशाच्या बाहेर पळून जाण्याचें मनांत आणलें तरी जिकडें जांवे तिकडें पुढें खरोखर आकाशच असतें

(म्हणजें आकाशाचा अंत नाहीं),त्याप्रमाणें त्या अनंत ब्रह्मास अंत नाहीं.

परी जें अखंड भेटलें । सर्वांगास लिगटलें । अति निकट परी चोरलें । सकळांसि जें ॥ ८॥

तथापि जीवास त्याची भेट अखंड आहें,तें सर्व आंगास चिकटलेले आहें अगदीं जवळ असूनहीं सर्वांपासून तें चोरुन राहिलें आहें,

तयामध्येंचि असिजे । परी तयासी नेणिजे । उमजे भास नुपजे । परब्रह्म तें ॥ ९॥

त्याच्यामध्येंच (जीव) असतों,पण त्याला जाणत नाहीं ब्रह्म उमजलें असें वाटतें तो भास,तें ब्रह्म काहीं उमजत नाहीं (त्यांत असावे पण त्यांस जाणू नये ही सर्व जीवांची  दशा आहें तें उमजत नाही आणि भास-मिथ्या ,जग,दृश्य-उमजतों)

आकाशामध्यें आभाळ । तेणें आकाश वाटे डहुळ । परी तें मिथ्या निवळ । आकाशचि असे ॥ १०॥

ज्याप्रमाणे आंकाशात अभ्रे आल्यामुळें तें मलिन झालेंसे वाटतें,पण तें खोटे असून आकाश निर्मलच असतें.

नेहार देतां आकाशीं । चक्रें दिसती डोळ्यांसी । तैसें दृश्य ज्ञानियांसी । मिथ्यारूप ॥ ११॥

( नेहार - निरखून )

(किंवा) आकाशाकडें (नेहार) टक लावून पाहिलें कीं डोळ्यांपुढें चक्रे दिसतात (पण ती खोटी),त्याप्रमाणें झाल्यास हें द्दश्य मिथ्यारुप होय,(तसें ब्रह्मी द्दश्य दिसतें पण तें ज्ञात्यांना मिथ्या म्हणून कळतें)

मिथ्याचि परी आभासे । निद्रितांस स्वप्न जैसें । जागा जालिया आपैसें । बुझों लागे ॥ १२॥

( आपैसें बुझों लागे - आपोआप समजू लागते )

स्वप्न हें मिथ्या असून निजलेल्यास जसें खरें भासतें,तसेंच अज्ञानी जीवांस द्दश्य मिथ्या असलें तरी खरें भासतें,तसें जागृति आली कीं आपोआप उमजूं लागतें.

तैसें आपुलेन अनुभवें । ज्ञानें जागृतीस यावें । मग मायिक स्वभावें । कळों लागे ॥ १३॥

तसें आत्मज्ञानाच्या योगानें जागृतीचा आपण अनुभव घ्यावा.( पूर्ण जागे व्हावें) मग मायिक (खोटे) काय आहे हे आपोआपच कळू लागतें (तसे ब्रह्मानुभव घेऊन ज्ञानजागृतीत यावें म्हणजें दृश्याचें मिथ्यत्व समजतें)

आतां असो हें कुवाडें । जें ब्रह्मांडापैलिकडे । तेंचि आतां निवाडें । उमजोन दाऊ ॥ १४॥

असो,ब्रह्माडाच्याही पलिकडे जें गूढ (ब्रह्म) आहें,तेंच आंता उत्तम रीतीनें उघड करुन दाखवूं.

ब्रह्म ब्रह्मांडीं कालवलें । पदार्थमात्रासि व्यापून ठेलें । सर्वांमध्यें विस्तारलें । अंशमात्रें ॥ १५॥

ब्रह्मांडात ब्रह्म मिसळलें असून प्रत्येक पदार्थास व्यापून राहिलें आहें,सर्वांमध्ये तें (संचलेंपणें) परिपुर्ण विस्तारलेले आहें.

ब्रह्मामध्यें सृष्टी भासे । सृष्टीमध्यें ब्रह्म असे । अनुभव घेतां आभासे । अंशमात्रें ॥ १६॥

ब्रह्मांत सृष्टि आहेंसें भासतें आणि सृष्टीमध्ये ब्रह्म व्यापलेले आहें अनुभव घेऊ गेलें असता त्याचा थोडासा (अंशमात्रेकरून) भास होतो.

अंशमात्रें सृष्टीभीतरीं । बाहेरी मर्यादा कोण करी । सगळें ब्रह्म ब्रह्मांडोदरीं । माईल कैसें ॥ १७॥

सृष्टीमध्यें अंशमात्र आहे व बाहेर किती आहें त्याची मर्यादा कोण करणार ? सगळें ब्रह्म ब्रह्मांडाच्या पोटात मावेल कसें ?

अमृतीमध्यें आकाश । सगळें सांठवतां प्रयास । म्हणोन तयाचा अंश । बोलिजेतो ॥१८॥

( अमृती - तीर्थपात्र )

तीर्थंगडीत(-पात्रात,अमृती) सगळें आकाश सांठवून ठेवणें अत्यंत दुष्कर,म्हणून तीर्थपात्रातलें आकाश महादाकाशाचा अंश आहें असे म्हणायचे.

ब्रह्म तैसें कालवलें । परी तें नाहीं हालवलें । सर्वांत परी संचलें । संचलेपणें ॥ १९॥

तसें हें ब्रह्म सगळ्यांत कालवलेले आहें पण त्याला किंचितही धक्का लागला नाहीं,सर्व व्यापकतेने ते सर्वांत साठवलेले आहें (वस्तुतः ब्रह्म हालत नाहीं,जात येत नाहीं,तेथे अंशाशी भाव नाहीं).

पंचभूतीं असे मिश्रित । परंतु तें पंचभूतातीत । पंकीं आकाशीं अलिप्त । असोनि जैसें ॥ २०॥

( पंकीं - चिखलात )

चिखलांत (पंकी) आकाश असूनही तें अलिप्त (वेंगळें) असतें,त्याप्रमाणें पंचभूतांमध्ये ब्रह्म मिसळलेले असूनही पंचभूतांहून तें वेगळें आहें.

ब्रह्मास दृष्टांत न घडे । बुझावया देणें घडे । परी दृष्टांतीं साहित्य पडे । विचारितां आकाश ॥ २१॥

( बुझावया - समजण्यासाठी )

ब्रह्मांस द्दष्टांत सापडत नाहीं,पण उमज पडावा म्हणून (बुझावया) काहींतरी द्दष्टांत द्यावा लागतो,आकाशाचा विचार केला तर त्याच्या ठिकाणी (ब्रह्मास) द्दष्टांत देण्याला काहींशी योग्य अशी सामुग्री (साहित्य) द्दष्टीस पडतें (आकाशाच्या ठिकाणीं शून्यत्व आहें तें ब्रह्मीं नाही एवढांच फरक).

खंब्रह्म ऐशी श्रुती । गगनसदृशं हे स्मृती । म्हणोन ब्रह्मास दृष्टांतीं । आकाश घडे ॥ २२॥

खं ब्रह्म म्ह.आकाश हें ब्रह्म आहें अशी श्रुति व गगनसदृश्य अशी स्मृति आहें,म्हणून ब्रह्मास आकाशाचा दृष्टांत देण्यात येतों.

काळिमा नसतां पितळ । मग तें सोनेंचि केवळ । सुन्यत्व नसतां निवळ । आकाश ब्रह्म ॥ २३॥

पितळेला काळिमा नसेल तर तें निखालस सोंनेंच होय,तसें आकाशाच्या ठिकाणी शून्यत्व नसेंल तर आकाश हेंच ब्रह्म होय,(पितळेला काळिमा चढत नसता तर पितळच सोने म्हटलें असते,तसें आकाश शून्य  नसतें तर आकाशालाच ब्रह्म म्हटलें असतें)

म्हणौनि ब्रह्म जैसें गगन । आणि माया जैसा पवन । आडळे परी दर्शन । नव्हे त्याचें ॥ २४॥

म्हणून हें आकाशासारखें असून माया ही वायूसारखी आहें,वायूच्या (किंवा मायेच्या) अस्तित्वाचें ज्ञान होतें,पण त्याचें दर्शन होत नाहीं आकाश ब्रह्माजवळ आहे म्हणून आकाशाचा दृष्टांत ब्रह्माला देता येतो,आकाशासारखें ब्रह्म आढळतें पण दृश्य नव्हें,आकाशापासून वायु  तशी ब्रह्मी माया.

शब्दसृष्टीची रचना । होत जात क्षणक्षणां । परंतु ते स्थिरावेना । वायूच ऐसी ॥ २५॥

शब्दसृष्टीची रचना प्रत्येक क्षणाला उत्पन्न होतें व नाश पावतें,परंतु ती वायूसारखी (चंचळ) असल्यामुळें स्थिर राहात नाहीं (आकाशीं वायु तशी निःशब्दाविषयी शब्दरचना होत जातें).

असो ऐसी माया माईक । शाश्वत तें ब्रह्म एक । पाहों जातां अनेक । व्यापून आहे ॥ २६॥

असों,अशी ही माया लटकी आहें आणि शाश्र्वत काय तें एक ब्रह्म असून तें अनेंकास व्यापून असतें.

पृथ्वीसि भेदून आहे । परी तें ब्रह्म कठिण नव्हे । दुजी उपमा न साहे । तया मृदुत्वासी ॥ २७॥

तें ब्रह्म पृथ्वीला भेदून जातें,पण तें कठिण नाहीं (तें इतकें मृदु आहें कीं) त्याच्या मृदुपणाला दुसरी उपमाच शोभत नाहीं.

पृथ्वीहूनि मृदु जळ । जळाहूनि तो अनळ । अनळाहूनि कोमळ । वायु जाणावा ॥ २८॥

पृथ्वीपेक्षा पाणी मृदु,पाण्यापेक्षा (अनळ) अग्नि मृदु,अग्नीपेक्षां वायु कोमल,

वायूहूनि तें गगन । अत्यंतचि मृदु जाण । गगनाहूनि मृदु पूर्ण । ब्रह्म जाणावें ॥ २९॥

वायूपेक्षां आकाश अत्यंत मृदु आहें आणि आकाशाहून ब्रह्म तर पूर्ण मृदु आहें.

वज्रास असे भेदिलें । परी मृदुत्व नाहीं गेलें । उपमेरहित संचलें । कठिण ना मृदु ॥ ३०॥

त्या ब्रह्मानें वज्राचाही भेद केला आहें,पण त्यांचे मृदुपण नाहींसे झालें नाहीं,तें कठिण नाहीं व मृदुही नाहीं,त्याला कसलीच उपमा देंता येत नाहीं,असें तें सर्वत्र सांठलेलें आहें.

पृथ्वीमध्यें व्यापून असे । पृथ्वी नासे तें न नासे । जळ शोषे तें न शोषे । जळीं असोनी ॥ ३१॥

तें पृथ्वीमध्यें व्यापून आहें,पण पृथ्वीचा नाश होतो,त्याचा नाश होत नाहीं,पाण्यांत असूनही पाणी आटलें तरी ब्रह्म आटत नाहीं.

तेजीं असे परी जळेना । पवनीं असे तरी चळेना । गगनीं असे परी कळेना । परब्रह्म तें ॥ ३२॥

तेंजात राहूनही तेंजानें तें जळत नाहीं,वायूमध्यें असून चळत (हालत) नाहीं,आकाशांत असूनही कळत नाहीं.

शरीरीं अवघें व्यापलें । परी तें नाहीं आडळलें । जवळिच दुरावलें । नवल कैसें ॥ ३३॥

त्यानें शरीर सर्व व्यापलें-(इतकें जवळ) असूनहीं तें कोठें आढळत नाहीं !जवळ असून दुरावतें हा कसा चमत्कार आहें !

सन्मुखचि चहुंकडे । तयामध्यें पाहणें घडे । बाह्याभ्यांतरीं रोकडें । सिद्धचि आहे ॥ ३४॥

तें चहूकडें भरलें असल्यामुळें ज्याला त्याला समोरच आहें,आपण पाहातों तें त्याच्यामधूनंच पाहातो,तें सर्वांच्या आंतबाहेंर प्रत्यक्ष सिध्दच आहें,

तयांमध्येंचि आपण । आपणां सबाह्य तें जाण । दृश्या वेगळी खूण । गगनासारिखी ॥ ३५॥

आपण त्याच्यामध्येंच आहोत,आणि आपल्या आंतबाहेर तेंच आहें,दृश्यावाचूंन त्याला द्दष्टांत द्यावयाचा झाल्यास तें आकाशासारखें आहें (असें म्हणावें)(द्दश्यावेगळी-अद्दश्य खूण-द्दष्टांत फक्त आकाशाची आहें,म्ह.आकाश अद्दश्य तसें तें आहें)

कांहीं नाहींसें वाटलें । तेथेंचि तें कोंदाटलें । जैसें न दिसें आपलें । आपणासि धन ॥ ३६॥

पुरुन ठेवलेलें आपलें द्रव्य आपणांस दिसत नाहीं,त्याप्रमाणें जेथें काहीं नाहीसे वाटतें तेथेंच तें गच्च भरलेले असतें,(गुप्त धनासारखें आपलें द्रव्य आपणांस दिसत नाहीं)

जो जो पदार्थ दृष्टीस पडे । तें त्या पदार्था ऐलीकडे । अनुभवे हें कुवाडें । उकलावें ॥ ३७॥

जो जो पदार्थ द्दष्टीस पडतो त्याच्या अलीकडचें तें असतें,हें कोडें अनुभवानें उकललें पाहिजें.

मागें पुढें आकाश । पदार्थेंविण जो पैस । पृथ्वीविण भकाश । येकरूप ॥ ३८॥

मागेंपुढें आकाश आहें,मध्यें पृथ्वी आदिकरुन काहीं एक पदार्थ नसून तेंच एकीएक अवकाशरुप भरलेलें आहें (तसें पृथिव्यादि काहीहि नसून त्याचा एकाचाच सारा विस्तार आहें)

जें जें रूप आणी नाम । तो तो नाथिलाच भ्रम । नामरूपातीत वर्म । अनुभवी जाणे ॥ ३९॥

( नाथिलाचि - नसणारा,मिथ्या )

नाम व रुप जितकें आहें तितका सगळा मिथ्या (नाथिलाच) भ्रम आहें तें रहस्य नामरुपाहून वेगळें आहें,अनुभवी तें जाणतात (नामरुपात्मक सृष्टीभ्रमरुप असून नामरुपातीत ब्रह्म अनुभवीच जाणतात.)

नभीं धूम्राचे डोंगर । उचलती थोर थोर । तैसें दावी वोडंबर । मायादेवी ॥ ४०॥

( वोडंबर - गारुडी,मोहिनी )

आकाशामध्यें मोठमाठे वाफचे डोंगर उठतात,त्याप्रमाणें ही मायादेवी आपलें इंद्रजाल (वोडंबर) दाखवितें.

ऐसी माया अशाश्वत । ब्रह्म जाणावें शाश्वत । सर्वांठायीं सदोदित । भरलें असे ॥ ४१॥

अशा प्रकारची माया ही अशाश्र्वत असून,ब्रह्म शाश्र्वत व सर्व ठिकाणी सर्वकाल भरलेले आहें.

पोथी वाचूं जातां पाहे । मातृकामधेंचि आहे । नेत्रीं निघोनि राहे । मृदपणें ॥ ४२॥

( मातृका - वर्णाक्षरे )

हें पहा,पोथी वाचायला लागलें म्हणजें (मातृका) अक्षरांतही तेंच भरलेले असतें व मृदुपणानें डोळ्यातही तेंच शिरुन बसतें,

श्रवणें शब्द ऐकतां । मनें विचार पाहतां । मना सबाह्य तत्त्वतां । परब्रह्म तें ॥ ४३॥

कानानें शब्द  ऐकत असतां (कानांत) आणि मनानें विचार करीत असतां मनाच्या आंतबाहेर तें परब्रह्म आहें.

चरणीं चालतां मार्गीं । जें आडळे सर्वांगीं । करें घेतां वस्तुलागीं । आडवें ब्रह्म ॥ ४४॥

रस्त्यांत पायानें चालत असतां जें सर्वांगास आदळतें-स्पर्श करतें आणि हातांमध्ये पदार्थ घेऊ लागलें असतां जें मध्यें असतें तेंच ब्रह्म होय.

असो इंद्रियसमुदाव । तयामध्यें वर्ते सर्व । जाणों जातां मोडे हांव । इंद्रियांची ॥ ४५॥

असो सर्व इंद्रियांमध्ये तेंच भरलेले आहें त्याला जाणायला जावें तर इंद्रियांची(विषयाकडची) हाव बंद होते.

जें जवळिच असे । पांहों जातां न दिसे । न दिसोन वसे । कांहीं येक ॥ ४६॥

तें जवळचें आहें,पण पाहायला जावें तर दिसत नाही आणि दिसत नाहीं तरीपण तें काहीं आहें (तें जवळ असून दिसत नाहीं,न दिसून एकलें एक आहें)

जें अनुभवेंचि जाणावें । सृष्टीचेनि अभावें । आपुलेनि स्वानुभवें । पाविजे ब्रह्म ॥ ४७॥

सृष्टीचा म्हणजें दृश्याला (विवेकानें) निरास करुन (विसर पडून) तें स्वानुभवांनेंच जाणून घ्यावें (अशाप्रकारें) आपल्या स्वतःच्या अनुभवानें ब्रह्म प्राप्त करुन घ्यावें.

ज्ञानदृष्टीचें देखणें । चर्मदृष्टी पाहों नेणे । अंतरवृत्तीचिये खुणे । अंतरवृत्ति साक्ष ॥ ४८॥

तें ज्ञानदृष्टीनें पाहावयाचें आहें चर्मदृष्टी तें पाहू शकत नाहीं,अंतःकरणाची खूण अंतःकरणास ठाऊक (अंतर्मुखतेची खूण अंर्तमुख संतांनाच ठाऊक)

जाणे ब्रह्म जाणे माया । जाणे अनुभवाच्या ठाया । ते येक जाणावी तुर्या । सर्वसाक्षिणी ॥ ४९॥

ब्रह्म,माया व अनुभवाचें स्थान जाणतें ती सर्वसाक्षिणी तुर्या ही एक अवस्थाच आहें.

साक्षत्व वृत्तीचें कारण । उन्मनी ते निवृत्ति जाण । जेथें विरे जाणपण । विज्ञान तें ॥ ५०॥

साक्षित्व ही वृत्तीची क्रिया आहें आणि उन्मनी तर निवृत्ती आहें त्या ठिकाणी (मी जाणतो असा अहंभाव) जाणपण नाहींसें होतें,तेंच विज्ञान होय.

जेथें अज्ञान सरे । ज्ञान तेंही नुरे । विज्ञानवृत्ति मुरे । परब्रह्मीं ॥ ५१॥

त्या परब्रह्माच्या ठिकाणी अज्ञान नाहींसे होते ज्ञान असतें तेही  उरत नाहीं (फार काय) विज्ञानवृत्ति (अनुभव) सुध्दां मुरुन जातें.

ऐसें ब्रह्म शाश्वत । जेथें कल्पनेसी अंत । योगिजना एकांत । अनुभवें जाणावा ॥ ५२॥

असें हे शाश्वत ब्रह्म आहें त्या ठिकाणी कल्पनेंचा शेवट होतो असा हा योगिजनांचा एकांत अनुभवानें जाणावा.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके विमलब्रह्मनिरूपणं नाम चतुर्थः समासः॥ ४॥**

**समास पांचवा : द्वैतकल्पनानिरसन श्रीराम ॥**

केवळब्रह्म जें बोलिलें । तें अनुभवास आलें । आणि मायेचेंहि लागलें । अनुसंधान ॥ १॥

(प्रश्र्न) केवळ (शुध्द)ब्रह्म म्हणून जें सागितलें त्याचा अनुभव पटला आणि मायेकडेही लक्ष लागलें आहें (मायेंचेही रुप कळलें)

ब्रह्म अंतरीं प्रकाशे । आणि मायाही प्रत्यक्ष दिसे । आतां हें द्वैत निरसे । कवणेपरी हो ॥ २॥

एकीकडे ब्रह्मज्ञान अंतःकरणांत प्रकाश पावतें आणि दुसरीकडें मायाही प्रत्यक्ष दिसते.आतां हें द्वैत कशानें नाहीसें होईल ?

तरी आतां सावधान । एकाग्र करूनियां मन । मायाब्रह्म हें कवण । जाणताहे ॥ ३॥

(उत्तर) तर आता एकाग्र मन करुन सावध हो,माया व ब्रह्म कोण जाणतें ह्याचा विचार कर.

सत्य ब्रह्माचा संकल्प । मिथ्या मायेचा विकल्प । ऐशिया द्वैताचा जल्प । मनचि करी ॥ ४॥

( जल्प - तर्क , ब्रह्माचा संकल्प - कल्पनेने कल्पना मालवते शुद्ध ब्रह्माची कल्पना/ संकल्प ज्याने विकल्पांचा नाश होऊन ब्रह्माची प्राप्ती होते )

ब्रह्माविषयींची कल्पना तो संकल्प (शुध्द कल्पना),तो सत्य आहें आणि मायेंसंबंधीची कल्पना तो विकल्प (शबल किंवा अशुध्द कल्पना) तो मिथ्या आहें,अशी द्वैतभावाची (संकल्पविकल्प संबंधी) बडबड(जल्प) मनच करीत असतें.

जाणे ब्रह्म जाणे माया । ते येक जाणावी तुर्या । सर्व जाणे म्हणोनियां । सर्वसाक्षिणी ॥ ५॥

( तुर्या - एका बाजूने ब्रह्माचे व दुसऱ्या बाजूने मायेचे ज्ञान तीच सविकल्प समाधी )

ब्रह्म व माया दोहोंसही जाणणारी ती तुर्यावस्था होय,ती सर्व जाणतें,म्हणून तिला सर्वसाक्षिणी म्हणतात (तुर्या म्ह.चौथी,जागृती,स्वप्न, व सुषुप्ति ह्यांहून वेगळी म्हणून चौथी  अवस्था)

ऐक तुर्येचें लक्षण । जेथें सर्व जाणपण । सर्वचि नाहीं कवण । जाणेल गा ॥ ६॥

सर्व जाणणें हें तुर्येचे लक्षण ऐक पण तेव्हा सर्वच (नाहीतर) जाणणार कोण (कोणाला) ? (तुर्यावस्था म्हणजें सर्व जाणणारी,पण सर्वच नाही- एक ब्रह्मच आहें त्यावेगळें काहीं नाहीं-तेथे जाणपण कोणाचे ?)

संकल्पविकल्पाची सृष्टी । जाली मनाचियें पोटीं । तें मनचि मिथ्या शेवटीं । साक्षी कवणु ॥ ७॥

मनाच्या पोटांत संकल्प विकल्पाची (कल्पनेंची) सृष्टि उभारली गेलीं,पण शेवटी तें मनच मिथ्या असें ठरतें,(खोट्या मनानें उत्पन्न केलेल्या मिथ्या सृष्टीला) साक्षी म्हणजें पाहाणारा कोण ?

साक्षत्व चैतन्यत्व सत्ता । हे गुण ब्रह्माचिया माथां । आरोपले जाण वृथा । मायागुणें ॥ ८॥

मायेच्याचमुळें साक्षित्व,चैतन्यत्व,सत्ता ह्या गुणांचा ब्रह्मावर विनाकारण आरोप आलेला आहें.(हें गुण ब्रह्मावर मायेंने लादलेले आहेंत,हे खरे नव्हेत,कां.की ब्रह्म मुळीच निर्गुण आहें)

घटामठाचेनि गुणें । त्रिविधा आकाश हें बोलणें । मायेचेनि खरेंपणें । गुण ब्रह्मीं ॥ ९॥

घट व मठ या उपाधींमुळें घटाकाश आणि मठाकाश व महदाकाश असें तीन प्रकारचें आकाश म्हटलें जातें,त्याप्रमाणें माया खरी आहें असें मानलें तर ब्रह्मांवर गुणांचा आरोप करतां येतो (वस्तुतः आकाशाच्या ठिकाणी दोन्ही कल्पना मिथ्यारोप आहेत ,तसे ब्रह्माच्या ठिकाणी गुणांचा वृथा आरोप माया करतें,ब्रह्म निर्गुण निधर्म आहें)

जंव खरेपण मायेसी । तंवचि साक्षत्व ब्रह्मासी । मायेअविद्येचे निरासीं । द्वैत कैंचें ॥ १०॥

जेव्हा (जोपर्यंत) मायेला खरेपणा असेंल (तोपर्यंत) तेव्हाच ब्रह्माकडें साक्षित्व येईल,पण माया (आदिकल्पना-ब्रह्मांड व त्याचा स्वामी शिव ह्यांची कल्पना) व अविद्या (पिंड व पिंडाचा चालक जीव ह्यांची कल्पना) ह्या दोन्ही कल्पनांचा निरास झाल्यावर एक ब्रह्मच उरतें,द्वैत कोठून राहाणार ?

म्हणोनि सर्वसाक्षी मन । तेंचि जालिया उन्मन । मग तुर्यारूप ज्ञान । तें मावळोन गेलें ॥ ११॥

( उन्मन - वृत्तीविरहीत )

म्हणून सर्वसाक्षी जें मन (म्ह.तुर्या) तेंच उन्मन झालें (ईश्र्वररुपी मिळून गेले) म्हणजें तुर्यारुप (सर्वसाक्षित्वाचें) ज्ञान असतें तेही लोपून जातें.(तुर्येचे ज्ञान-ब्रह्म व माया ह्या दोंहींचे जाणपण सहजच मावळून जातें).

जयास द्वैत भासलें । तें मन उन्मन झालें । द्वैताअद्वैतांचें तुटलें । अनुसंधान ॥ १२॥

ज्या मनास द्वैत भासलें तें मनच उन्मन झालें कीं द्वैत व अद्वैत ह्यांचा संबंध तुटून जातो (म्ह.द्वैत संपले व त्याच्या सापेक्षतेनें भासणारें अद्वैतही उरलें नाही.)

येवं द्वैत आणि अद्वैत । होये वृत्तीचा संकेत । वृत्ति जालिया निवृत्त । द्वैत कैंचें ॥ १३॥

तात्पर्य,द्वैत व अद्वैत (भासणें) हें वृत्तीचें लक्षण आहें पण वृत्ती मावळली म्हणजें द्वैत कोठंचें (व त्याच्या सापेक्षतेनें आढळणारे अद्वैत तरी कोठचें ?)(द्वैताद्वैत कल्पना निमाल्या,त्या वृत्तीच्या शाखा आहेंत)

वृत्तिरहित जें ज्ञान । तेंचि पूर्ण समाधान । जेथें तुटे अनुसंधान । मायाब्रह्मींचें ॥ १४॥

(अहं)वृत्ति शून्य झाल्यावर जें (अनुभवाचें)ज्ञान होतें तेंच पूर्ण समाधान होय, त्या ठिकाणी ं माया-ब्रह्म ह्या द्वैताचें अनुसंधान तुटतें)

मायाब्रह्म ऐसा हेत । मनें कल्पिला संकेत । ब्रह्म कल्पनेरहित । जाणती ज्ञानी ॥ १५॥

ही माया व हें ब्रह्म अशी ही मनाची कल्पना आहें,(परंतु) ब्रह्म हें कल्पनेच्या पलीकडे आहें असें ज्ञानी जाणतात.(ब्रह्म कल्पनातीत,निर्विकल्प आहें)

जें मनबुद्धिअगोचर । जें कल्पनेहून पर । तें अनुभवितां साचार । द्वैत कैंचें ॥ १६॥

जें मनाला व बुध्दीला कळत नाही,जें कल्पनेच्या पलीकडें आहें,अशा-(स्वरुपा)चा अनुभव घेतल्यावर द्वैत कोठचें राहील ?(ब्रह्म मन-बुध्दीपलीकडे आहें,तेथें द्वैत कोठचें ?)

द्वैत पाहतां ब्रह्म नसे । ब्रह्म पाहतां द्वैत नासे । द्वैताद्वैत भासे । कल्पनेसी ॥ १७॥

द्वैत पाहायला लागलें असतां ब्रह्माचा अनुभव येत नाहीं आणि ब्रह्म पाहायला लागलें असता द्वैत किंवा अद्वैत दोन्हींही कल्पनेंलाच भासणारीं आहेत (द्वैत पाहातां ब्रह्म नाहीं व ब्रह्म पाहांता द्वैत नाहीं)सारा खेळ कल्पनेंचा आहें.

कल्पना माया निवारी । कल्पना ब्रह्म थावरी । संशय धरी आणि वारी । तेही कल्पना ॥ १८॥

कल्पना मायेंचे निवारण करुन ब्रह्म प्रस्थपित करतें (थावरी),त्याचप्रमाणें संशय धरतें व दूर करतें तीही कल्पनांच होय.

कल्पना करी बंधन । कल्पना दे समाधान । ब्रह्मीं लावी अनुसंधान । तेही कल्पना ॥ १९॥

बंधन करणारी व समाधान देणारी कल्पनाच होय,ब्रह्माकडें लक्ष लावणारीही कल्पनाच होय.

कल्पना द्वैताची माता । कल्पनाचि ज्ञप्ति तत्त्वता । बद्धता आणि मुक्तता । कल्पनागुणें ॥ २०॥

( ज्ञप्ति तत्त्वता - खरोखर ज्ञान )

द्वैताला उत्पन्न करणारी कल्पना ज्ञान हेंही खरोखर कल्पनाच,बध्दपणा व मुक्तपणा हें दोन्ही कल्पनेच्या योगानेंच (बंध व मोक्ष ह्या दोन्ही कल्पनाच ब्रह्माचें अनुसंधान किंवा चिंतन हि ही कल्पनाच कल्पना द्वैताची जननी आहें,ज्ञान ही कल्पनाच आहें)

कल्पना अंतरीं सबळ । नसते दावी ब्रह्मगोळ । क्षण एक ते निर्मळ । स्वरूप कल्पी ॥ २१॥

कल्पना अंतःकरणांत उठली कीं नसलेली (खोटी) व बहुरंगी (शबल) ब्रह्मांडे दाखविते,तीच दुस-या एखाद्या क्षणांत निर्मळ (होऊन) स्वस्वरुपाची कल्पना करतें.(ज्ञान व अज्ञान सापेक्ष आहें,शबल कल्पना मिथ्या ब्रह्मगोळ दाखविते व शुध्द कल्पना स्वरुप कल्पितें)

क्षण एक धोका वाहे । क्षणा एक स्थिर राहे । क्षण एक पाहे । विस्मित हौनी ॥ २२॥

ती क्षणभर काळजी वाहाते,क्षणभर स्थिर राहाते,क्षणभर चकित होऊन विचार करतें,(संसाराचे भय-धोका-वाहाणें,स्थिर होणें (स्वस्वरुपी आश्र्चर्यानें स्वरुपाकडें-पाहाणें).

क्षण येकांत उमजे । क्षण एक निर्बुजे । नाना विकार करिजे । ते कल्पना जाणावी ॥ २३॥

( निर्बुजे - घाबरते,अडखळते )

क्षणांत तिला उमज पडतो,क्षणांत तिला उमजेंनासें होते,असें अनेक प्रकारचें विकार उत्पन्न करणारी ती कल्पनाच समजावी (उमजणें व न उमजणें,ज्ञान व अज्ञान,विंकारांचा पुंज वाढवणें ही सारी कल्पना)

कल्पना जन्माचें मूळ । कल्पना भक्तीचें फळ । कल्पना तेचि केवळ । मोक्षदात्री ॥ २४॥

जन्म होण्याला मूळ कारण कल्पनाच,भक्तिचे फळ म्हणजे साक्षात्कार ही ही कल्पनाच कल्पना हीच केवळ मोक्ष देणारी आहें.

असो ऐशी हे कल्पना । साधनें दे समाधाना । येऱ्हवीं हे पतना । मूळच कीं ॥ २५॥

असो अशी ही कल्पना साधनांनें समाधान देतें एरवी तिच अध:पतनाला कारण होते.

म्हणौन सर्वांचें मूळ । ते हे कल्पनाच केवळ । इचें केलिया निर्मूळ । ब्रह्मप्राप्ती ॥ २६॥

म्हणून सर्वांचे मूळ जें काय आहें तीही कल्पनाच होय,हिला निर्मूळ (समूळ नाहींशी) केली म्हणजें ब्रह्मप्राप्ति होते.

श्रवण आणी मनन । निजध्यासें समाधान । मिथ्या कल्पनेचें भान । उडोन जाय ॥ २७॥

(सद्गुरुमुखानें अध्यात्माचें) श्रवण,मनन व निदिध्यास केल्यास समाधान होतें व मिथ्या कल्पनेंचा भास लयास जातों.

शुद्ध ब्रह्माचा निश्चयो । करी कल्पनेचा जयो । निश्चितार्थे संशयो । तुटोन गेला ॥ २८॥

शुध्दब्रह्माचा निश्र्चय झाला कीं कल्पनेंवर जय मिळतो (कल्पना ताब्यात येतें) आणि संशय खात्रीनें तुटून जातात.(ब्रह्माच्या शुध्द कल्पनेंनें मायेंची मिथ्या कल्पना उडून जातें.शुध्द ब्रह्माचा निश्र्चय झाला कीं संशय-कल्पना उडून जातें)

मिथ्या कल्पनेचें कोडें । कैसें राहे साचापुढें । जैसें सूर्याचेनि उजेडें । नासे तम ॥ २९॥

सूर्याच्या उजेडाच्या योगानें जसा काळोख नाहीसा होतों,तसें ख-या-(ब्रह्मा-) पुढें मिथ्या कल्पनेंची गुंतागुंत कशी टिकेल ?(टिकत नाहीं)

तैसें ज्ञानाचेनि प्रकाशें । मिथ्या कल्पना हे नासे । मग हें तुटे आपैसें । द्वैतानुसंधान ॥ ३०॥

त्याचप्रमाणें आत्मज्ञानाच्या प्रकाशाच्या योगानें खोटी कल्पना नाश पावतें,आणि मग हें द्वैताचें अनुसंधान आपोआप तुटतें.(सूर्यापुढे अंधःकार कसा टिकेल ?तसे शुध्द ज्ञाननिश्र्चयांनें द्वैत कल्पना निरसून जातें).

कल्पनेनें कल्पना उडे । जैसा मृगें मृग सांपडे । कां शरें शर आतुडे । आकाशमार्गी ॥ ३१॥

एका पशूकडून दुसरा पशु पकडावा (बक-याच्या द्वारें वाघ किंवा हत्तिणींकडून हत्ती),किंवा आकाशांत एका बाणांनेंच (शत्रूचा) दुसरा बाण तोडावा,त्याप्रमाणें एका कल्पनेने दुसरी कल्पना उडतें.(कल्पनेनें कल्पना मोडतें)

शुद्ध कल्पनेचें बळ । झालिया नासे शबल । हेंचि वचन प्रंजळ । सावध ऐका ॥ ३२॥

शुध्द (स्वस्वरुपाविषयींची) कल्पना प्रबळ झाली कीं शबल (मात्रेंसंबंधीचीं द्वैताची अशुध्द) कल्पना नाश पावतें,ती गेली की शुध्द कल्पनाच उरतें हेंच म्हणणें अधिक स्पष्ट करुन सांगतों एकाग्रमनानें ऐका.

शुद्ध कल्पनेची खूण । स्वयें कल्पिजे निर्गुण । स्वस्वरूपीं विस्मरण । पडोंचि नेदी ॥ ३३॥

आपण निर्गुण स्वरुप आहों अशी कल्पना करणें ही शुध्द कल्पनेंची खूण होय,जी आपल्या (-आत्म) स्वरुपाचें विस्मरण होऊ देत नाहीं

सदा स्वरूपानुसंधान । करी द्वैताचें निर्शन । अद्वैतनिश्चयाचें ज्ञान । तेचि शुद्ध कल्पना ॥ ३४॥

द्वैताचें निरसन करुन निरंतर स्वरुपाकडें लक्ष ठेवतें (एक परब्रह्मच आहें) असें निश्र्चयात्मक ज्ञान देतें,ती शुध्द कल्पना.

अद्वैत कल्पी ते शुद्ध । द्वैत कल्पी ते अशुद्ध । अबुद्ध तेंचि प्रसिद्ध । सबल जाणावी ॥ ३५॥

अद्वैताची कल्पना करणारी ती शुध्द कल्पना व द्वैताची कल्पना करणारी ती अशुध्द कल्पना म्हणजें शबल कल्पना म्हणून जी प्रसिध्द आहें ती हींच अशुध्द कल्पना होय असें समज.

शुद्ध कल्पनेचा अर्थ । अद्वैताचा निश्चितार्थ । आणी शबल ते व्यर्थ । द्वैत कल्पी ॥ ३६॥

अद्वैताची कल्पना करणें हें शुध्द कल्पनेंतील सार आहें आणि द्वैताची कल्पना करते ती शबल (सबळ) असून व्यर्थ होय.

अद्वैतकल्पना प्रकाशे । तेच क्षणीं द्वैत नासे । द्वैतासरिसी निरसे । सबल कल्पना ॥ ३७॥

(अंतःकरणात) अद्वैतकल्पना प्रकट झाली कीं त्याच क्षणी द्वैत नाश पावतें आणि द्वैताबरोबरच शबल कल्पना नाहीशी होतें.

कल्पनेनें कल्पना सरे । ऐसें जाणावें चतुरें । शबल गेलिया नंतरें । शुद्ध उरली ॥ ३८॥

कल्पनेंने कल्पना नाहीशी होतें ती अशी,हें चतुर माणसांनी ध्यानांत धरावें,शबल कल्पना नाहीशी झाल्यावर शुध्द कल्पना उरतें.

शुद्ध कल्पनेचें रूप । तेंचि कल्पी स्वरूप । स्वरूप कल्पितां तद्रूप । होय आपण ‖ ३९‖

स्वरुपाची कल्पना करणें हे शुध्द कल्पनेंचे रुप होय,स्वरुपाची कल्पना करता करता आपणही शुध्द कल्पनेंशी तद्रूप होतों (आपण नाहीसे होतो)

कल्पनेसी मिथ्यत्व आलें । सहजचि तद्रूप झालें । आत्मनिश्चयें नासिलें । कल्पनेसी ‖ ४०‖

कल्पना खोटी झाली की सहजच तद्रूपता येतें व आत्माच मी ह्या निश्र्चयाच्या योगानें कल्पना नाहींशी होतें (मुळी कल्पना मिथ्या हा निश्र्चय झाला की ब्रह्माशीं सहजच तद्रुपता उरतें)

जेचि क्षणीं निश्चय चळे । तेचि क्षणीं द्वैत उफाळे । जैसा अस्तमानीं प्रबळे । अंधकार ‖ ४१‖

सूर्याच्या अस्तानंतर अंधःकार जसा वाढतो तसेंच आत्मनिश्र्चय ढळला कीं,त्याच क्षणाला द्वैत प्रबळ होतें.

तैसें ज्ञान होतां मळिन । अज्ञान प्रबळे जाण । याकारणें श्रवण । अखंड असावें ‖ ४२‖

तसेंच ज्ञान मलिन झालें की अज्ञान प्रबळ होतें ह्यासाठी अध्यात्माचें श्रवण सतत करावें (म्हणून निश्र्चय द्दढतेंसाठी अखंड श्रवण-मनन असावें)

आतां असो हें बोलणें जालें । आशंका फेडूं येका बोलें । जयास द्वैत भासलें । तें तूं नव्हेसी सर्वथा ‖ ४३‖

द्वैत हें कसे नाहीसें होईल ?असा तुझा प्रश्न ?त्याबद्दल इतके सांगितलें ते पुरे असो,आंता एका वचनानें शंकेचे निरसन करु (तें वचन हें की) ज्याला द्वैत भासले तें (कल्पना आहें) तू नव्हेस.(तू उभय कल्पनातीत आहेस एवढें ओळख.)

मागील आशंका फिटली । इतुकेन ही कथा संपली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ‖ ४४‖

पूर्वीची शंका फिटली,आतां हा विषय येथेंच पुरा झाला,पुढें निरुपण ऐकण्यासाठी श्रोत्यांनी वृत्ति सावध केली पाहिजें.

**हरिॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके द्वैतकल्पनानिरसननिरूपणं नाम पंचमःसमासः ‖ ५‖**

**समास सहावा : बद्धमुक्तनिरूपण श्रीराम ‖**

अद्वैतब्रह्म निरोपिलें । जें कल्पनेरहित संचलें । क्षणएक तदाकार केलें । मज या निरूपणें ‖ १‖

प्रश्न (आंता आणखी एक विचारणें आहें) ज्याविषयी कल्पना करता येत नाही,व जें सर्वत्र भरलें आहें,अशा अद्वैत ब्रह्माविषयीं आपण जें हें निरुपण केलें आहें त्याच्या योगानें मीही क्षणभर तदाकार झालों,

परी म्यां तदाकार व्हावें । ब्रह्मचि होऊन असावें । पुनः संसारास न यावें । चंचळपणें सर्वथा ॥ २॥

परंतु (निरंतर) मी तदाकार व्हावें,ब्रह्मच होऊन असावें,पुन्हा चंचळपणा उत्पन्न होऊन मी संसारात येऊ नयें (ह्याचा उपाय सांगा) (निर्विकल्प ब्रह्म व्हावें आणि तेथून वृत्तीवर कोसळून पडावें हे मला नकों)

कल्पनारहित जें सुख । तेथें नाहीं संसारदुःख । म्हणोनि तेंचि एक । होऊन असावें ॥ ३॥

कल्पनारहित जें सुख आहें,त्यांत संसारदु:खाचा लेशही नाहीं,म्हणून तेंच (सुखच) होऊन मीं असावें,

ब्रह्मचि होइजे श्रवणें । पुन्हां वृत्तिवरी लागे येणें । ऐसें सदा येणें जाणें । चुकेना कीं ॥ ४॥

अध्यात्मश्रवणांनें ब्रह्मरुप व्हावें आणि पुन्हा (देह-) वृत्तीवर यावें असें हें येंणें-जाणें नित्य मागें लागलें आहें तें चुकत नाहीं (जन्ममृत्यूच्या येरझा-या,सुखदु:खाचें धक्कें हा वृत्तिरुप संसार मला नकों)

मनें अंतरिक्षीं जावें । क्षणएक ब्रह्मचि व्हावें । पुन्हां तेथून कोसळावें । वृत्तिवरी मागुती ॥ ५॥

मनानें अंतर्मुख होऊन क्षणभर ब्रह्म व्हावें आणि पुन्हा (पहिल्या) वृत्तीवर (देहभानावर) येऊन आदळावें.

प्रत्यावृत्ति सैरावैरा । किती करूं येरज़ारा । पायीं लावूनियां दोरा । कीटक जैसा ॥ ६॥

( प्रत्यावृत्ति - पुनः पुन्हा )

एखाद्या किड्याच्या पायाला दोरा बांधून टाकला म्हणजें तो वर उडतो व पुन्हा खाली पडतों,त्याप्रमाणें ह्या (येण्याजाण्याच्या) येरझारा आतां किती करुं ?(एखाद्या कीटकाच्या पायाला दोरा बांधून त्याला आकांशात सोडून द्यावें,आणि लगेंच दोरीला हिसका मारुन खालीं पृथ्वीवर खेंचावें असें माझें होत आहें!)

उपदेशकाळीं तदाकार । होतां पडे हें शरीर । अथवा नेणें आपपर । ऐसें जालें पाहिजे ॥ ७॥

आपला उपदेश श्रवण करीत असतां जी तदाकारता होते त्याच स्थितीत (हें शरीर अखंड राहिलें पाहिजें-) असतां हें शरीर पडलें पाहिजें,(मृत्यु यावा अथवा निदान) हें आपलें,हें दुस-याचें असा आपपार भेदभाव नाहींसा होईल असें (तरी) झालें पाहिजें,

ऐसें नसतां जें बोलणें । तेंचि वाटे लाजिरवाणें । ब्रह्म होऊन संसार करणें । हेंही विपरीत दिसे ॥ ८॥

असें काहीं न होतां मी ब्रह्मरुप झालो असें बोलणें हें लाजिरवाणें वाटतें,बरें ब्रह्म झालो (असें म्हणून) पुन्हा संसार करीत बसणें हें ही विरुध्द दिसतें.

जो स्वयें ब्रह्मचि जाला । तो मागुता कैसा आला । ऐसें ज्ञान माझें मजला । प्रशस्त न वटे ॥ ९॥

जो एकदां स्वत: ब्रह्म झाला तो पुन्हा (संसार करायला) आला कसा ?असलें (ब्रह्म) ज्ञान माझें मलाच प्रशस्त वाटत नाहीं.

ब्रह्मचि होऊन जावें । कां तें संसारीच असावें । दोहींकडे भरंगळावें । किती म्हणूनी ॥ १०॥

( दोहींकडे भरंगळावें - गोंधळून दोन्हीकडे ये-जा )

एक ब्रह्मरुप होऊन तरी जांवें,नाहीतर संसारतच असावें,परंतु असें दोन्हीकडें किती घोटाळावें ?

निरूपणीं ज्ञान प्रबळे । उठोन जातां तें मावळे । मागुता काम क्रोध खवळे । ब्रह्मरूपासी ॥ ११॥

निरुपण चाललें असतां ज्ञान वाढतें,पण तेथून उठतांच तें ज्ञान मावळतें आणि मग ब्रह्मरुप झालेला जो मी त्या माझ्या ठिकाणीं कामक्रोध खवळतात.

ऐसा कैसा ब्रह्म झाला । दोहींकडे अंतरला । वोडगस्तपणेंचि गेला । संसार त्याचा ॥ १२॥

( वोडगस्त - ओढाताण )

असलें ब्रह्म होणें कसलें ?(धड संसार नाही धड परमार्थ नाहीं) दोन्ही दुरावतात.(संसार सुटत नसल्यामुळें परमार्थ नीट होत नाहीं व परमार्थाची गोडी लागल्यामुळें संसारात मन लागत नाही,परमार्थ करायला जावे तर संसार मागे खेचतो व संसार करु लागलें तर परमार्थसुख पुढें राहाते.) अशा ओढाताणीत सगळा जन्म गेला.

घेतां ब्रह्मसुखाची गोडी । संसारिक मागें वोडी । संसार करितां आवडी । ब्रह्मीं उपजे मागुती ॥ १३॥

ब्रह्मसुखाची गोडी चाखायला जावें तर संसारसुख मागे  ओढतें व संसार करायला लागलें तर पुन्हा

ब्रह्मसुखाविषयी आवड उत्पन्न होतें.

ब्रह्मसुख नेलें संसारें । संसार गेला ज्ञानद्वारें । दोहीं अपुरीं पुरें । येकही नाहीं ॥ १४॥

संसाराच्या ओढीमुळें ब्रह्मसुख नीट लागत नाहीं व (संसार मिथ्या आहेंसे) ज्ञान झाल्यामुळें संसारही नाहींसा झाला,तात्पर्य संसार व ब्रह्मसुख हीं दोन्हीही अपुरीच राहातात.एकही पुरतेपणी मिळत नाहीं.

याकारणें माझें चित्त । चंचळ झालें दुश्चित । काय करणें निश्चित । एकही नाहीं ॥ १५॥

ह्यामुळें माझें चित्त चंचळ व दुश्चित झालें आहें,एकही निश्चितपणें मिळत नाही ह्याला काय करावें ?

ऐसा श्रोता करी विनंती । आतां रहावें कोणे रीतीं । म्हणे अखंड माझी मती । ब्रह्माकार नाहीं ॥ १६॥

आतां रहावें तरी कशाप्रकारें ?माझी बुध्दि अखंड ब्रह्मरुप होऊन राहात नाहीं,(म्हणून मति अखंड ब्रह्माकार होण्याचा उपाय सांगा.) असें श्रोत्यांनी विनंतीपूर्वक म्हटलें.

आतां याचें प्रत्युत्तर । वक्ता देईल सुंदर । श्रोतीं व्हावें निरोत्तर । क्षण एकयेक आतां ॥ १७॥

आंता वक्ता ह्याचे सुंदर प्रत्युत्तर देईल. तेव्हा श्रोत्यांनी क्षणभर स्तब्ध होऊन बसावें,

ब्रह्मचि होऊन जे पडिले । तेचि मुक्तिपदास गेले । येर ते काय बुडाले । व्यासादिक ॥ १८॥

(उत्तर) जेवढें (अखंड) ब्रह्मस्वरुप होऊन (काष्ठासारखें) पडले तेवढेंच मोक्षाला गेलें आणि बाकीचे व्यासादिक काय बुडालें ?(प्रपंचात राहून कर्मे करीत असतांना काय मुक्ति मिळत नाहीं ?)

श्रोता विनंती करी पुढती । शुक मुक्तो वामदेवो वा हे श्रुती ।दोघेचि मुक्त आदिअंतीं ।बोलत असे ॥ १९॥

(१ प्रतिप्रश्न) ह्यावर श्रोता विनंति करतो कीं शुकोमुक्तो वामदेवो वा (शुक किंवा वामदेवच मुक्त) असे श्रुतिवचन आहें,सगळ्या श्रुतींत अथपासून इतिपर्यंत हे दोघेच काय तें मुक्त म्हणून म्हटलें आहें.

वेदें बद्ध केले सर्व । मुक्त शुक वामदेव । वेदवचनीं अभाव । कैसा धरावा ॥ २०॥

वेंदांनेंच सर्वांना बध्द ठरवून ह्या (शुक व वामदेव) दोघांनाच फक्त मुक्त म्हटलें आहें,त्या वेदवचनांवर अविश्र्वास कसा ठेवावा ?

ऐसा श्रोता वेदाधारें । देता झाला प्रत्योत्तरें । दोघेचि मुक्त अत्यादरें । प्रतिपाद्य केले ॥ २१॥

ह्याप्रमाणें श्रोत्यानें वेदांच्या आधारानें  उत्तर देऊन दोघेच काय तें मुक्त हें आग्रहपूर्वक सिध्द केलें.

वक्ता बोले याउपरी । दोघेचि मुक्त सृष्टीवरी । ऐसें बोलतां उरी । कोणास आहे ॥ २२॥

(१-प्रत्युत्तर) ह्यावर वक्ता म्हणाला,सगळ्या जगांत आतांपर्यंत दोघेच काय ते मुक्त असें म्हटल्यांस (उरी) कमीपणा कोणाला ?

बहु ऋषि बहु मुनी । सिद्ध योगी आत्मज्ञानी । झाले पुरुष समाधानी । असंख्यात ॥ २३॥

अनेंक ऋषि,मुनि,सिध्द,योगी,आत्मज्ञानी असें अगणित पुरुष समाधानीं-मुक्त होऊन गेलें (श्र्लोकाचा अर्थ:)(प्रल्हाद,नारद,पराशर,पुंडरीक,व्यास,अंबरीष,शुक,शौनक,भीष्म,दाल्भ्य,रुक्मानंद,अर्जुन,वसिष्ठ,बिभीषण इत्यादि महाभागवत,तसेंच भागवतात वर्णिलेले कवि,हरी,अंतरिक्ष,प्रबुध्द,पिप्पलायन,आविर्होत्र, द्रुमिल, चमस व करभाजन हें नऊ योगी मुक्त झालें आहेंत)

**प्रऱ्हादनारदपराशरपुंडरीक- व्यासांबरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् । रुक्मांगदार्जुनवसिष्ठविभीषणादीन् पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥ १॥ कविऱ्रिरंतरिक्षः प्रबुद्धः पिप्पलायनः । आविऱोत्रो । अथ द्रुमिलश्चमसः करभाजनः ॥ २॥**

यांहीवेगळे थोर थोर । ब्रह्मा विष्णु महेश्वर । आदिकरून दिगंबर । विदेहादिक ॥ २४॥

ह्यांच्याशिवाय आणखी मोठेमाठे आहेंत,ब्रह्मदेव,विष्णु,शंकर,दत्तात्रेय,जनक आदिकरुन अनेक मुक्त झालें आहेंत.

शुक वामदेव मुक्त जाले । येर हे अवघेचि बुडाले । या वचनें विश्र्वासले । ते पढतमूर्ख ॥ २५॥

शुक व वामदेव हें दोघे तेवढे मुक्त झालें आणि बाकीचें हें सगळेंच बुडालें ह्या अशा म्हणण्यावर जें विश्र्वास ठेवतात तें पढतमूर्ख होत.(२-प्रतिप्रश्न)

तरी वेद कैसा बोलिला । तो काय तुम्हीं मिथ्या केला । ऐकोन वक्ता देता जाला । प्रत्युत्तर ॥ २६॥

(तेव्हा श्रोता विचारतो की) तर मग वेद असें कसे म्हणाला ?त्या वेदाला तुम्ही खोटे ठरविता काय ? हे ऐकून वक्त्यानें प्रत्युत्तर केलें की.

वेद बोलिला पूर्वपक्ष । मूर्ख तेथेंचि लावी लक्ष । साधु आणि वित्पन्न दक्ष । त्यांस हें न मने ॥ २७॥

वेंदानें (उदाहरण) हा पूर्वपक्ष सागितला, मूर्ख असतात तें तेवढेंच धरुन बसतात!साधु पंडित व शहाणें असतात त्यांस हें म्हणणे मान्य होणार नाहीं.

तथापी हें जरी मानलें । तरी वेदसामर्थ्य बुडालें । वेदाचेनि उद्धरिलें । न वचे कोणा ॥ २८॥

तथापि हें तुझें म्हणणे खरे आहें असें क्षणभर मान्य केलें,तर त्यामुळें वेदांचे सामर्थ्य नष्ट झाल्यासारखें होईल,वेंदांच्या योगानें कोणाचा उध्दार होत नाही ?(आणि हा पूर्वपक्ष नसून वेंदांचा सिध्दांतच आहें असे कोणी सिध्द करिल तर मी स्वच्छ सांगेन कीं वेदोनारायणा! तुझें सामर्थ्य बुडालें,तूं कोणालाही उध्दरायला समर्थ नाहीस! आणि)

वेदाअंगीं सामर्थ्य नसे । तरी या वेदासि कोण पुसे । म्हणोनि वेदीं सामर्थ्य असे । जन उद्धरावया ॥ २९॥

जनांस उध्दरायचें सामर्थ्य वेदांच्या ठिकाणी नसेल तर त्या वेदांना विचारतो कोण ? पण असे नाही लोकांना उध्दरायचें सामर्थ्य वेदांच्या आंगी आहें.

वेदाक्षर घडे ज्यासी । तो बोलिजे पुण्यराशी । म्हणोनि वेदीं सामर्थ्यासी । काय उणें ॥ ३०॥

ज्याला वेंदाक्षर प्राप्त होते त्यांला मोठा पुण्यवान समजतात,ह्यास्तव वेंदांच्या आंगी सामर्थ्याला काय कमी आहें ?

वेद शास्त्र पुराण । भाग्यें जालिया श्रवण । तेणें होइजे पावन । हें बोलती साधु ॥ ३१॥

साधु असें सांगतात कीं वेद,शास्त्र,पुराण,कानीं पडेल तर मोठें भाग्य समजावें,त्या योगानें लोक पावन होतात-ऊध्दरुन जातात.

श्लोक अथवा श्लोकार्ध । नाहीं तरी श्लोकपाद । श्रवण होतां येक शब्द । नाना दोष जाती ॥ ३२॥

(त्यातींल) एखादा श्लोक,अर्धा श्लोक,एक चरण,फार काय एखादा शब्द कानीं येईल तरी अनेक दोष नाहींसे होतात (जीव पावन होतो)

वेद शास्त्रीं पुराणीं । ऐशा वाक्यांच्या आइणी । अगाध महिमा व्यासवाणी । वदोनि गेली ॥ ३३॥

( आयणी - ओळी )

वेद,शास्त्रें,पुराणें ह्यांच्यामध्ये अशा वाक्यांच्या मालिका (आईणी) आहेंत,व्यासांनी तर वेंदांचा अगाध महिमा वर्णन करुन ठेवला आहें.

येकाक्षर होतां श्रवण । तात्काळचि होइजे पावन । ऐसें ग्रंथाचें महिमान । ठाइ ठाइ बोलिलें ॥ ३४॥

(फार काय) एक अक्षर कानी येईल तर ताबडतोब मनुष्य पावन होतो,असें(वेद) ग्रंथांचे माहात्म्य अनेक ठिकाणी सांगितलें आहें.

दोहींवेगळा तिजा नुद्धरे । तरी महिमा कैंचा उरे । असो हें जाणिजे चतुरें । येरां गाथागोवी ॥ ३५॥

( तिजा नुद्धरे - तिसरा कोणी नसलेल्यास )

वेंदांच्या योगानें (शुक व वामदेव) ह्या दोघांशिवाय तिस-याचा उध्दार झाला नसता तर त्या वेदाचा इतका महिमा कोठून राहिला असता ?असों,सुज्ञ्यांना हें सर्व कळतें बाकीच्यांस हा गोंधळ (गथागोवी) वाटणार आहें .

वेद शास्त्रें पुराणें । कैशीं होती अप्रमाणें । दोघावांचूनि तिसरा कोणें । उद्धरावा ॥ ३६॥

वेद,शास्त्रें,पुराणें हीं खोटी कशी होतील ?(हीं खोटी मानल्यास शुक व वामदेव ह्या दोघांशिवाय तिस-याचा उध्दार कोणीं करावा ?)

म्हणसी काष्ठ होऊनि पडिला । तोचि एक मुक्त जाला । शुक तोही अनुवादला । नाना निरूपणें ॥ ३७॥

( काष्ठ होऊनि - काष्ठाप्रमाणे )

जो काष्ठाप्रमाणें (चलनवलन-रहित असा) होऊन पडला तोच तेवढा मुक्त झाला असें तुझें म्हणणें असेल तर शुकानें सुध्दा अनेक निरुपणें सांगितली आहेत.

शुक मुक्त ऐसें वचन । वेद बोलिला हें प्रमाण । परी तो नव्हता अचेतन । ब्रह्माकार ॥ ३८॥

(शुकांनी परिक्षितीला स्वमुखानें भागवत सागितलें आहें ह्यावरुन ते काष्ठासारखें अचेतन होऊन पडलें नव्हतें हें स्पष्ट आहें) आणि शुक मुक्त आहें असें वेदानें म्हटलें आहें,ते खरें आहे पण तो काही ब्रह्माकार (तुझ्या समजुतीप्रमाणें) केवळ अचेतन नव्हता.

**प्रल्हादनारदपराशरपुंडरीक व्यासांबरिषशुकशौनकभीष्मदल्भान।रुक्मानंदार्जुनवसिष्ठबिभीषनादिन पुण्यानिमान्परम भागवतान्स्मरामि ।**

अचेतन ब्रह्माकार । असता शुक योगेश्वर । तरी सारासार विचार । बोलणें न घडे ॥ ३९॥

योगीश्र्वर शुक अचेतन ब्रह्माकार (होऊन पाडला) असता तर सारासार विचार बोलणें त्याच्याकडून झालें नसतें.

जो ब्रह्माकार झाला । तो काष्ठ होऊन पडिला । शुक भागवत बोलिला । परीक्षितीपुढें ॥ ४०॥

जो ब्रह्माकार होतो तो काष्ठाप्रमाणें (अचेतन) होऊन पडतो (असें तुझे म्हणणें),पण शुकानें तर परिक्षितीपुढें सगळें भागवत सांगितलें.

निरूपण हें सारासार । बोलिला पाहिजे विचार । धांडोळावें सचराचर । दृष्टांताकारणें ॥ ४१॥

निरुपण म्हटलें, की त्यांत सार काय, असार काय ह्याचा विचार सांगावा लागतो (भागवतनिरुपणांत सारासारविचार आहें,सारासार विचार सांगताना)सगळी चराचर सृष्टि द्दष्टांतासाठी धुंडाळावी लागतें.

क्षणयेक ब्रह्मचि व्हावें । क्षण एक दृश्य धांडोळावें । नाना दृष्टांतीं संपादावें । वक्तृत्वासी ॥ ४२॥

ह्यासाठी क्षणभर (काहीं काल) ब्रह्मस्वरुप होऊन राहावें व क्षणभर द्दश्याचा शोध घेऊन (त्यांतील) अनेक द्दष्टांतानी वकृत्व उभारावें (क्षणैक ब्रह्म व्हावें क्षणैक द्दश्य धुंडाळावें व त्यांतून द्दष्टांन्त घेउन सिध्दांत प्रस्थापित करावा,ह्याप्रमाणें वकृत्व उभारावें हा सर्व निरुपणकारांचा किंवा ग्रंथकारांचा अनुभव आहें)

असो भागवतनिरूपण । शुक बोलिला आपण । तया अंगीं बद्धपण । लावूं नये कीं ॥ ४३॥

असो,शुकानें स्वतः भागवताचे निरुपण केले आहें,पण तेवढ्यावरुन त्याच्या आंगी बध्दपणा लावता येत नाही.शुकाचार्य निरुपण बोलले आहेत व त्यांनाही असेंच करावें लागलें आहें म्हणून त्यांना बध्द म्हणता येईल काय ?

म्हणोनि बोलतां चालतां । निचेष्टित पडिलें नस्तां । मुक्ति लाभे सायुज्यता । सद्गुरुबोधें ॥ ४४॥

म्हणून निचेष्टित पडलें नसता,बोलणें-चालणें (इत्यादि व्यवहार) करीत असतांही सद्गुरुच्या उपदेशानें सायुज्यमुक्ति मिळतें.

येक मुक्त एक नित्यमुक्त । एक जाणावे जीवन्मुक्त । येक योगी विदेहमुक्त । समाधानी ॥ ४५॥

१:मुक्त,नित्यमुक्त,आणि समाधानी असें विदेहमुक्त (असें मुक्त) असतात २-मुक्तांचे प्रकार दोन :मुक्त व नित्यमुक्त आणि मुक्तांतही पुन्हा जीवन्मुक्त व विदेहमुक्त असें दोन भेद.

सचेतन ते जीवन्मुक्त । अचेतन ते विदेहमुक्त । दोहीवेगळे नित्यमुक्त । योगेश्वर जाणावे ॥ ४६॥

सचेतन म्हणजें देहाची शुध्द असलेले-देहाचे व्यवहार करीत असलेले परंतु मुक्त झालेले तें जीवन्मुक्त व अचेतन देहभाव नसलेले व मुक्त झालेले तें विदेहमुक्त होत,ह्या दोहांहून निराळें असें(प्राक्क-कर्माचा भोग ज्याचा संपला आहें,पुन्हा जें कोणत्याही निमित्तानें जन्मास येत नाहीत तें) योगीश्र्वर नित्यमुक्त होत.

स्वरूपबोधें स्तब्धता । ते जाणावी ताटस्तता । ताटस्तता आणि स्तब्धता । हा देहसंमंधु ॥ ४७॥

स्वरुपबोध म्हणजें ब्रह्मज्ञान झाल्यानें जी स्तब्धता येते ती तटस्थता होय असें समजावें. पण तटस्थ किंवा स्तब्ध राहाणें ह्याचा संबंध देहाकडें आहें (हा देह धर्म आहें,त्याचा स्वरुपबोधाशी काही संबंध नाहीं)

येथें अनुभवासी कारण । येर सर्व निःकारण । तृप्ति पावावी आपण । आपुल्या स्वानुभवें ॥ ४८॥

येथें अनुभव (आत्मानुभव हा ) मुख्य होय, बाकी सर्व व्यर्थ होय,आपल्या अनुभवानें आपण आपली तृप्ति करुन घेतली पाहिजें.(आत्मानुभव झाल्यावर कोणी स्तब्ध राहातील,कोणी हालचाल व्यवहार करतील एवढ्याचसाठी कोणी ज्ञान्याला बध्द म्हणत असतील,तर म्हणोत बिचारें!)

कंठमर्याद जेविला । त्यास म्हणती भुकेला । तेणें शब्दें जाजावला । हें तों घडेना ॥ ४९॥

एखादा माणूस आकंठ जेवला व तरी कोणी त्यास भूक लागली आहे असे म्हटलें,तरी त्या म्हणण्यानें त्याला काहीं भुकेची पीडा व्हावयाची नाहीं (जाजावला हें तो घडेना)

स्वरूपीं नाहीं देहो । तेथें कायसा संदेह । बद्ध मुक्त ऐसा भावो । देहाचकडे ॥ ५०॥

स्वरुपाच्या ठिकाणी देहच नाहीं तर संदेह कोठचा ? बध्द-मुक्त हा भाव (हें म्हणणें) देहदृष्टीनें आहें,(ताटस्थ किंवा हालचाल ही दोन्ही देहांकडेंच येतात आणि स्वरुपी देहच नाहीं म्हणून जों स्वरुपाकार झाला अर्थात देहाभिमानापासून सुटला तो बध्द आणि मुक्त ह्यां दोहोपासून मोकळा झाला)

देहबुद्धि धरून चिंतीं । मुक्त ब्रह्मादिक नव्हेती । तेथें शुकाची कोण गती । मुक्तपणाची ॥ ५१॥

मनांत देहबुध्दि धरुन ब्रह्मादिक सुध्दा मुक्त होत नाहींत,तर शुकाच्या मुक्तपणाची गोष्ट कशाला ?

मुक्तपण हेंचि बद्ध । मुक्त बद्ध हें अबद्ध । स्वस्वरूप स्वतःसिद्ध । बद्ध ना मुक्त ॥ ५२॥

मुक्तपणा म्हणजें मी मुक्त असा अहंभाव हाच बध्दपणा होय,मुक्त बध्द हें बोलणेंच असंबध्दपणाचें आहें,कारण स्वस्वरुप हें स्वयंसिध्दच आहें ते बध्द नाहीं वा मुक्तही नाही.

मुक्तपणाची पोटीं शिळा । बांधतां जाईजे पाताळा । देहबुद्धीचा आगळा । स्वरूपीं न संटे ॥ ५३॥

( न संटे - संभवत नाही )

मुक्तपणाचा दगड पोटाशी बांधून (मी मुक्त आहें असा अहंभाव पोटाशी ठेवून) प्राणी पातांळात (अधोगतीला) जातो,ज्याच्या ठिकाणी देहबुध्दि विषेश आहें तो स्वरुपामध्यें प्रवेश करु शकत (सामावत) नाही.(देहबुध्दि बाळगणारा स्वरुपाकार होतच नाहीं)

मीपणापासून सुटला । तोचि एक मुक्त जाहला । मुका अथवा बोलिला । तरी तो मुक्त ॥ ५४॥

ज्याचा मीपणा सुटला तो मुका राहिला किंवा बोलला तरी मुक्तच होय.

जयास बांधावें तें वाव । तेथें कैंचा मुक्तभाव । पाहों जातां सकळ वाव । गुणवार्ता ॥ ५५॥

( वाव - भ्रम , बांधावें - वगळावे )

ज्याला बांधावयाचें तेंच (मुळीं) खोटें तेथे (मुक्तत्व) मुक्त ही भावना कोठली ?विचार केला असतां सर्व त्रिगुणांचा व्यवहार-बांधण्याच्या दोरीची गोष्ट (गुणवार्ता) खोटी होय.

**बद्धो मुक्त इति व्याख्या गुणतो न मे वस्तुतः । गुणस्य मायामूलत्वान्न मे मोक्षो न बंधनम् ॥ १॥**

तत्त्वज्ञाता परमशुद्ध । तयासि नाहीं मुक्त बद्ध । मुक्त बद्ध हा विनोद । मायागुणें ॥ ५६॥

जो परमशुध्द तत्ववेत्ता आहें त्याला मुक्तता -बध्दता दोन्ही नाहीत बंधन व मुक्तता हा मा़येचा विनोद आहे (बध्द व मुक्त ही भाषा मायेंतली आहें)

जेथें नाम रूप हें सरे । तेथें मुक्तपण कैंचें उरे । मुक्त बद्ध हें विसरे । विसरपणेंसी ॥ ५७॥

नाम व रुप ही दोन्ही जेथें नाहींशी होतात,तेथें मुक्तपणा तरी कोठून उरणार ? मुक्त व बध्द ह्यांचा पूर्ण विसर पडून त्या विसरलेपणाची जाणीवहीं ही तेथें नाहींशी होते.

बद्ध मुक्त जाला कोण । तो तरी नव्हे की आपण। बधक जाणावें मीपण । धर्त्यास बाधी ॥ ५८॥

मुक्त व बध्द  कोण झाला ? ( मुक्त व बध्द हा भाव देहयोगाने उत्पन्न होतो) आणि तो देह काहीं आपण नव्हे मीपणा हा बाधक आहें,जो मीपणा धरतो त्याला त्याची बाधा होते.

एवं हा अवघा भ्रम । अहंतेचा जाण श्रम । मायातीत जो विश्राम । सेविला नाहीं ॥ ५९॥

तात्पर्य,मायेच्या पलीकडलें असणारें जे विश्रांतिस्थान-परब्रह्म-ह्यांचे सेवन (प्राप्ति) जोंपर्यंत झाले नाही

तोंपर्यंत हा सगळा भ्रम आहें,सगळा अहंतेचा उपदव्याप.

असो बद्धता आणि मुक्तता । आली कल्पनेच्या माथां । ते कल्पना तरी तत्त्वतां । साच आहे ॥ ६०॥

असो ,बध्दपणा व मुक्तपणा हें कल्पनेच्या माथीं (कल्पनेमुळे) येतात,पण ती कल्पना तरी खरी आहे काय ?

म्हणोनि हें मृगजळ । माया नाथिलें आभाळ । स्वप्न मिथ्या तत्काळ । जागृतीसी होय ॥ ६१॥

म्हणुन हें सारे मृगजळ आहें माया ही आभाळा-(आभा-) सारखी खोटी आहें,जागृति आली की स्वप्न खोटें आहे असें तात्काळ कळून येतें.

स्वप्नीं बद्ध मुक्त झाला । तो जागृतीस नाहीं आला । कैंचा कोण काय जाला । कांहीं कळेना ॥ ६२॥

(ह्या संसाररुपी) स्वप्नामध्यें जो कोणी आपण बध्द किंवा मुक्त आहोंत (बध्द होतो तो मुक्त झालो) असें म्हटलें तो अद्याप जागाच झाला नाही असें समजावें व म्हणून त्याला बध्द कोण? कोठला? व मुक्त कसा झाला याचा उलगडा होत नाहीं.

म्हणोन मुक्त विश्र्वजन । जयांस झालें आत्मज्ञान । शुद्धज्ञानें मुक्तपण । समूळ वाव ॥ ६३॥

म्हणून ज्यांस आत्मज्ञान झाले आहे ते सर्व मुक्तच होत.शुध्दज्ञान झाल्यामुळें मुक्तपणाची कल्पनासुध्दा (वाव,व्यर्थ) उरत नाही(ज्याला शुध्द ज्ञान झालें त्याला सर्व जीव मुक्त आहेंत कोणीच बध्द नाही हेंच दुस-या भाषेंने सांगायचे म्हणजे मुक्तपणच त्याला व्यर्थ-वाव-होय -मुक्तत्वाची कल्पनाच नाहीं,का की तो देहातीत निःसंदेह असतो)

बद्ध मुक्त हा संदेहो । धरी कल्पनेचा देहो । साधु सदा निःसंदेहो । देहातीत वस्तु ॥ ६४॥

कल्पनेचा-(सूक्ष्म) देहच बध्द-मुक्त असा संशय धरीत असतो आणि साधु देहातीत वस्तु-(ब्रह्म)रुप झाल्यामुळें नेहमी संशयरहित असतो.

आतां असो हें पुढती । पुढें रहावें कोणें रितीं । तेंचि निरूपण श्रोतीं । सावध परिसावें ॥ ६५॥

असो हें आता पुरें (मुक्त झाल्यावर) पुढे कोणत्या रीतीनें राहावें ह्याचें निरुपण श्रोत्यांनी पुढील समांसात सावधानतेनें ऐकावे.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके बद्धमुक्तनिरूपणं नाम षष्ठः समासः ॥ ६॥**

**जय जय रघुवीर समर्थ ॥ समास सातवा : साधनप्रतिष्ठानिरूपण श्रीराम ॥**

वस्तूसि जरी कल्पावें । तरी ते निर्विकल्प स्वभावें । तेथें कल्पनेच्या नावें । सुन्याकार ॥ १॥

परब्रह्म वस्तुची कल्पना करायला जावें तर ती मूळचीच कल्पनातीत आहें,तेथे कल्पनेंचे नाव सुध्दा नाहीं

तथापि कल्पूं जातां । न ये कल्पनेच्या हाता । वोळखी ठायीं न पडे चित्ता । भ्रंश पडे ॥ २॥

( भ्रंश - गोंधळ )

तथापि कल्पना करुं लागले तरी तें परब्रह्म कल्पनेच्या हाती काहीं येत नाही,चित्त भ्रमित झाल्यामुळें त्याची ओळख पटत नाही (बळेंच कल्पावी तर जेंथल्या तेथे ओळख न पडतां भ्रमानें भलतीकडेंच लक्ष जातें!)

कांहीं दृष्टीसचि न दिसे । मनास तेही न भासे । न भासे न दिसे । कैंसें ओळखावें ॥ ३॥

दृष्टीलाच काहीं केल्या पडत नाही, व मनाला भासत नाहीं असें न दिसणारे व न भासणारे जें परब्रह्म तें ओळखावे कसे ?

पाहों जातां निराकार । मनासि पडे सुन्याकार । कल्पूं जातां अंधकार । भरला वाटे ॥ ४॥

त्याला पहावयांस जावें तर त्यास आकारच नाही,त्याच्या ठिकाणी मन मावळून जातें,त्याची कल्पना करायला जावें तर (सर्वत्र) अंधःकार भरला आहे असे वाटतें.

कल्पूं जातां वाटे काळें । परी ते काळें ना पिंवळें । आरक्त निळें ना धवळें । वर्णरहित ॥ ५॥

ब्रह्मा-(च्या रंगा) ची कल्पना करावी तर तें काळे आहेसें वाटतें पण ते काळे पिवळें तांबडे निळे पांढरे (धवळें) इत्यादि रंगांपैकी कोणत्याही रंगाचे नाही,त्याला रंगच नाही.

जयास वर्णव्यक्ति नसे । भासाहूनि अनारिसें । रूपचि नाहीं कैसें । वोळखावें ॥ ६॥

( वर्णव्यक्ति - रंगरूप )

ज्याला (वर्ण-व्यक्ति-रंगरुप) रंग किंवा आकार नाहीं भासाहून जें वेगळें (अनारिसें) आहे,ज्याला कोणत्याही प्रकारचें रुपच नाहीं तें कसें ओळखावें ?

न दिसतां वोळखण । किती धरावी आपण । हें तों श्रमासीच कारण । होत असे ॥ ७॥

ज्याला ओळखण्याचें चिन्हच जर काही दिसत नाही तर त्याची ओळख आपण किती धरावी ? त्याला ओळखण्यापायी विनाकारण यातना मात्र होतें.

जो निर्गुण गुणातीत । जो अदृश्य अवेक्त । जो अचिंत्य चिंतनातीत । परमपुरुष ॥ ८॥

जो निर्गुण म्हणजें गुणातीत-गुणाच्या पलीकडचा जो अद्दश्य असल्यामुळें अव्यक्य (प्रकट न होणारा),जो अचिंत्य म्हणजें ज्याचे चिंतन करता येत नाही तोच परमपुरुष होय.

**अचिंत्याव्यक्तरूपाय निर्गुणाय गुणात्मने । समस्तजगदाधारमूर्तये ब्रह्मणे नमः ॥ १॥**

अचिंत्य तें चिंतावें । अव्यक्तास आठवावें । निर्गुणास ओळखावें । कोणेपरी ॥ ९॥

अशा अचिंत्याचे चिंतन करणें,अव्यक्तास आठवणें किंवा निर्गुणास ओळखणें हें कसें करावें ?

जें दृष्टीसचि न पडे । जें मनासही नातुडे । तया कैसें पाहणें घडे । निर्गुणासी ॥ १०॥

( नातुडे - दिसत नाही )

जें निर्गुण द्दष्टीलाच दिसत नाहीं व मनालाहीं आकलन होत नाही (नातुडें),त्याला कसें पाहावें ?

असंगाचा संग धरणें । निरवलंबीं वास करणें । निःशब्दासी अनुवादणें । कोणेपरी ॥ ११॥

असंगाचा संग कसा धरावा ?आधाररहित ठिकाणी (निरावलंबी,आकांशात) कसें राहावें ?शब्दतीताचें प्रतिपादन तरी कसें करावें ?

अचिंत्यासि चिंतूं जातां । निर्विकल्पासि कल्पितां । अद्वैताचें ध्यान करितां । द्वैतचि उठे ॥ १२॥

अचिंत्याचें चिंतन निर्विकल्पाची कल्पना,अद्वैताचें ध्यान करुं लागलें असता द्वैतच उत्पन्न होतें.

आतां ध्यानचि सांडावें । अनुसंधान तें मोडावें । तरी मागुतें पडावें । महासंशई ॥ १३॥

आतां (द्वैत उत्पन्न होतें म्हणून) ध्यान सोडून द्यावें,अनुसंधान ठेऊ नये म्हटले तर पुन्हा महासंशयाच्या फे-यात पडावें लागतें.

द्वैताच्या भेणें अंतरीं । वस्तु न पाहिजे तरी । तेणें समाधाना उरी । कदा असेचिना ॥ १४॥

द्वैताच्या भयानें (भेणें) सर्वांतर्यामी परब्रह्मास न पाहावें तर समाधान म्हणून कधीं राहावयांचे नाही.

सवे लावितां सवे पडे । सवे पडतां वस्तु आतुडे । नित्यानित्यविचारें घडे । समाधान ॥ १५॥

( सवे - सवय )

(ध्यान करण्याची) संवय लावून घेतली म्हणजें लागतें आणि एकदा संवय लागली,की तिच्या योगानें परमात्म्याची प्राप्ति होतें,नित्य (शाश्वत) काय,अनित्य (अशाश्वत) काय ह्याचा विचार केला म्हणजें समाधान होतें.

वस्तु चिंतितां द्वैत उपजे । सोडी करितां कांहींच नुमजे । सुन्यत्वें संदेहीं पडिजे । विवेकेंविण ॥ १६॥

ब्रह्माचे चिंतन करावे तर द्वैत उत्पन्न होते,म्हणून चिंतन सोडावे तर काहींच उमज पडत नाहीं,विवेकावाचूंन शून्यत्व (अज्ञान)व संशय ह्यांत गुरफटून पडावें लागतें.

म्हणोनि विवेक धरावा । ज्ञानें प्रपंच सारावा । अहंभाव वोसरावा । परी तो वोसरेना ॥ १७॥

ह्यासाठी विवेक धरावा,आणि अध्यात्मज्ञानानें प्रपंचाचा निरास (त्याग) करुन अहंभाव असेल तो सोडून द्यावा,पण तो सुटत नाही (उत्तर)

परब्रह्म तें अद्वैत । कल्पितांच उठे द्वैत । तेथें हेत आणि दृष्टांत । कांहींच न चले ॥ १८॥

परब्रह्म हें अद्वैत आहें आणि कल्पना करु जाता द्वैत उठतें,त्या ठिकाणी (कोणत्याही प्रकारचा) तर्क किंवा दृष्टांत लागू पडत नाही (हें तुझे म्हणणें काही खोटे नाही)

तें आठवितां विसरिजे । कां तें विसरोन आठविजे । जाणोनियां नेणिजे । परब्रह्म तें ॥ १९॥

त्याची आठवण (स्मरण) करावी तर त्रिपुटी उभी राहून त्याचा विसर पडतो म्हणून ही त्रिपुटी विसरुन त्यांचे स्मरण करावें (त्याचें स्मरण करतांना अहंभाव विसरावा,अहंभाव विसरुन त्याचे स्मरण करावें ते परब्रह्म जाणून जाणतेपणाचा अहंभाव सुटला पाहिजें.

त्यास न भेटतां होय भेटी । भेटों जातां पडे तुटी । ऐसी हे नवल गोष्टी । मुकेपणाची ॥ २०॥

(तें स्वरुपच आपण असल्यामुळे) त्याला न भेटताच त्याची भेट होते आणि (वेगळेपणानें) भेटावयाला जावें तर त्याची आपली ताटातूट होते,अशी ही मुकेपणाची (बोलता येत नाही अशी) अद्भुत गोष्ट आहें.

तें साधूं जातां साधवेना । नातरी सोडितां सुटेना । लागला संबंध तुटेना । निरंतर ॥ २१॥

ते प्राप्त करुन घ्यावयाला गेले तर प्राप्त होत नाही.आणि सोडावें तर सुटत नाही (इतका त्याचा आपला) नित्याचा संबंध लागला आहे की तो (कधी) तुटत नाही (तें साधूं जावे तर साधतां येत नाही व सोडावें तर सुटत नाही,का की त्याचा नित्य संबंध आहेच आहे)

तें असतचि सदा असे । नातरी पाहतां दुराशे । न पाहतां प्रकाशे । जेथें तेथें ॥ २२॥

तें सदासर्वकाळ आहे तसेच (अस्तित्वात) आहेच मात्र (वेगळेपणानें) पाहूं गेले की दुरावतें,पाहाणारा वेगळा न ठेंवता (म्हणजें एकरुप होऊन) पाहील त्याला तें सर्वत्र प्रकाशमान होईल.

जेथें उपाये तेथें अपाये । आणि अपाये तोचि उपाये । हें अनुभवेंविण कार्य । उमजों जाणे ॥ २३॥

जेथे उपाय कराबयास (पाहाण्यास) जाणे हाच अपाय होतो (तें दुरावते) आणि अपाय (न पाहाणें) हाच उपाय होतो (सर्वत्र प्रकाशतें) अशा ह्या परमात्मवस्तूची अनुभवावाचून उमज कशी पडेल ?(त्याच्या प्राप्तीचा जो उपाय करावा तोच अपाय होतो व अपाय तोच उपाय होतो)

तें नुमजतांचि उमजे । उमजोन कांहींच नुमजे । तें वृत्तिविण पाविजे । निवृत्तिपद ॥ २४॥

तें नुमजतांच(न-उमजतांच)(वृत्तीरहित होऊन उन्मन झालें असतां) त्याचा उमज पडतो,आणि ब्रह्म मला समजलें असे वाटतें त्यास काहीच समजलें नाही,तें निवृत्तिपद वृत्तिरहित होऊन प्राप्त करुन घ्यावें,(तें न उमजून उमजते व उमजून उमजत नाही,न पाहाता प्रकाशते व पाहाता दुरावते,आठवणें व विसरणें,भेदणे व तुटणें,उमजणे व नमुजणे,पाहाणे व न पाहाणे ह्या दोन्ही वृत्ति सोडूनच तें निवृत्तिपद प्राप्त होते)

तें ध्यानीं धरितां नये । चिंतनीं चिंतावें तें काये । मनामध्यें न समाये । परब्रह्म तें ॥ २५॥

ते परब्रह्म मनामध्ये मावत नाही म्हणून त्याचे ध्यान करता येत नाही,मग त्याचें चिंतन तरी कसे करावे ? (तें ध्यानाचा चिंतनाचा विषय होत नाही, ते मनामध्ये मावत नाही,मन एकदेशी व ते सर्वदेशी)

त्यास उपमे द्यावें जळ । तरी तें निर्मळ निश्चळ । विश्व बुडालें सकळ । परी तें कोरडेंचि असे ॥ २६॥

त्याला पाण्याची उपमा द्यावी तर तें पाण्यापेक्षा निर्मळ व निश्चळ आहे.(ब्रह्म-प्रळयाच्या वेळी) सगळें ब्रह्मांड (पाण्यांत) बुडाले तरी तें परब्रह्म कोरंडेच (जसेच्या तसेच) असते.

नव्हे प्रकाशासारिखें । अथवा नव्हे काळोखें । आतां तें कासयासारिखें । सांगावें हो ॥ २७॥

तें प्रकाशासारखे नाहीं व काळोखासारखे नाही आता तें कशासारखे आहे म्हणून सांगावे ?(त्याला कसलाच दृष्टांत देता येत नाही )

ऐसें ब्रह्म निरंजन । कदा नव्हे दृश्यमान । लावावें तें अनुसंधान । कोणे परी ॥ २८॥

(प्रश्न-)असें हें निरंजन (निर्मल) ब्रह्म कधी दृष्टीस पडत नाही,तेव्हा त्याचें अनुसंधान कोणत्या रीतीने ठेवावें ?

अनुसंधान लाऊ जातां । कांहीं नाहीं वाटे आतां । नेणे मनाचिये माथां । संदेह वाजे ॥ २९॥

त्याचें अनुसंधान लावायला जावें तर काही नाही असे वाटते,त्यामुळे मनांत संशयाचा गोंधळ सुरु होतो.

लटिकेंचि काय पहावें । कोठें जाऊन रहावें । अभाव घेतला जीवें । सत्यस्वरूपाचा ॥ ३०॥

त्या खोट्याला (जें दिसत नाही त्याला) काय पहावयाचें आहे,तेथे कोठें जाऊन राहावयाचें ? अशा प्रकारें सत्यस्वरुपाविषयी अंतःकरणात (नास्तिक कल्पना) अभाव उत्पन्न होतो.(लटकेंच काय कोठे पाहावे ? परब्रह्म म्ह.सत्यस्वरुप काही आहेच असे वाटत नाही,त्याचा अभाव आहे ह्याच संशयावर मन आरुढ होते.)(उत्तर)

अभावचि म्हणों सत्य । तरी वेद शास्त्रें कैसें मिथ्य । आणि व्यासादिकांचें कृत्य । वाउगें नव्हे ॥ ३१॥

हा उत्पन्न झालेला (सत्यस्वरुपाविषयींचा) अभावच जर खरा म्हणावा तर (त्या स्वरुपाविषयी वर्णन करणारे) वेदशास्त्रादि ग्रंथ खोटे कसे होतील ? तसेच व्यासादि महर्षि  ह्यांची वचने (वाउगें) व्यर्थ होणार नाहीत का ?

म्हणोनि मिथ्या म्हणतां नये । बहुत ज्ञानाचे उपाय । बहुतीं निर्मिलीं तें काय । मिथ्या म्हणावें ॥ ३२॥

म्हणून (सत्यस्वरुपाला) त्याला खोटें म्हणता येत नाही अनेक जणांनी आत्मज्ञानाचे अनेक (साधने) उपाय निर्माण करुन ठेवलें आहेत ते काय खोटे म्हणावे ?(त्यांना तूं काय मीपणाच्या डौलानें मिथ्या म्हणशील ?)

अद्वैतज्ञानाचा उपदेश । गुरुगीता तो महेश । सांगतां होय पार्वतीश । पार्वतीप्रती ॥ ३३॥

शंकरांनी गुरुगीतेमध्ये पार्वतीला अद्वैतज्ञानाचा उपदेश केला आहे.

अवधूत गीता केली । गोरक्षास निरूपिली । ते अवधूतगीता बोलिली । ज्ञानमार्ग ॥ ३४॥

अवधूतांनी गोरक्षास जो उपदेश केला त्यास अवधूतगीता म्हणतात तिच्यांतही ज्ञानमार्गाचा उपदेश केला आहे.

विष्णु होऊन राजहंस । विधीस केला उपदेश । ते हंसगीता जगदीश । बोलिला स्वमुखें ॥ ३५॥

विष्णूने हंसरुप धरुन ब्रह्मदेवास उपदेश केला ती हंसगीता जगन्नायकानें आपल्या मुखानें सांगितली.

ब्रह्मा नारदातें उपदेशित । चतुःश्लोकी भागवत । पुढें व्यासमुखें बहुत । विस्तारलें ॥ ३६॥

ब्रह्मदेवाने नारदास (द्वितीय स्कंधात) चतुःश्र्लोकी भागवताचा उपदेश केला,त्याचाच पुढे व्यास मुखाने पुष्कळ विस्तार झाला.

वासिष्ठसार वसिष्ठ ऋषी । सांगता झाला रघुनाथासी । कृष्ण सांगे अर्जुनासी । सप्तश्लोकी गीता॥ ३७॥

वसिष्ठ ऋषींनी श्रीरामचंद्रांस वसिष्ठसार (योगवासिष्ठ) सांगितलें.(भीष्मपर्वात) श्रीकृष्णांनी अर्जुनास सप्तश्र्लोकी गीता सांगितली (व ह्याच अद्वैतज्ञानाचा उपदेश केला आहें)

ऐसें सांगावें तें किती । बहुत ऋषि बोलिले बहुतीं । अद्वैतज्ञान आदि अंतीं । सत्यचि असे ॥ ३८॥

असे हें किती सांगावें ?अनेक ऋषींनी अनेक ग्रंथामध्ये अद्वैत तत्वज्ञान सांगितलें आहे. ते अथपासून इतिपासून खरें आहे.

म्हणोन मिथ्या आत्मज्ञान । म्हणतां पाविजे पतन । प्रज्ञेरहित ते जन । तयांस हें कळेना ॥ ३९॥

म्हणून आत्मज्ञान खोंटे म्हटल्यास अधोगति प्राप्त होईल,बुध्दिहीन (मंदबुध्दीच्या) लोकांस हें कळत नाही.

जेथें शेषाची प्रज्ञा मंदली । श्रुतीस मौनमुद्रा पडिली । जाणपणें न वचे वदली । स्वरूपस्थिती ॥ ४०॥

त्या स्वरुपाचें वर्णन करताना शेषांची बुध्दि कुंठीत झाली आणि वेद गप्प बसलें,अशा त्या स्वरुपाचें वर्णन मी जाणतो असा जाणतेपणाचा अभिमान धरुन करतां येणार नाही.

आपणास नुमजे बरवें । म्हणोनि मिथ्या कैसें करावें । नातरी सुदृढ धरावें । सद्गुरुमुखें ॥ ४१॥

आपणास नीट उमजत नसले म्हणून तें मिथ्या असे कसे म्हणावें ? न समजलें तर सद्गुरुमुखानें त्याचा दृढ निश्र्चय करुन घ्यावा.

मिथ्या तेंचि सत्य जालें । सत्य असोनि मिथ्य केलें । संदेहसागरीं बुडालें । अकस्मात मन ॥ ४२॥

तुला (दृश्य,मायिक असें) खोटे खरे वाटू लागलें आणि परब्रह्म खरें असून तू तें खोटे ठरविलेस त्यामुळे तुझे मन एकाएकीं संशय-समुद्रात बुडून गेलें

मनास कल्पायाची सवे । मनें कल्पिलें तें नव्हे । तेणें गुणें संदेह धांवे । मीपणाचेनि पंथें ॥ ४३॥

मनाला कल्पना करण्याची व कल्पनेंत येईल तेवढे सत्य-खरे मानण्याची संवय आहे,व तें (मन) इतर पदार्थाप्रमाणें ब्रह्माचीही कल्पना करावयास धावतें.पण स्वरुपी कल्पना चालत नसल्यामुळे लाजून आपला उणेपणा झाकण्यांसाठी संशयारुढ होऊन मीपणाच्या मार्गास लागते.

तरी तो पथचि मोडावा । मग परमात्मा जोडावा । समूळ संदेह तोडावा । साधूचेनि संगतीं ॥ ४४॥

तरी तो (संशयाचा) मार्ग अजिबात सोडून देऊन नंतर संतांच्या संगतीनें संशय समूळ तोडून टाकून परमात्माची प्राप्ति करुन घ्यावी.

मीपण शस्त्रें तुटेना । मीपण फोडितां फुटेना । मीपण सोडितां सुटेना । कांहीं केल्या ॥ ४५॥

(मीपण म्ह.अहंकार फार कठिण आहे) मी पण शस्त्रानें तुटत नाही,फोडायला लागले तर फुटत नाही,आणि सोडायला गेले तर काहीं केल्यानें सुटत नाही.

मीपणें वस्तु नाकळे । मीपणें भक्ति मावळे । मीपणें शक्ति गळे । वैराग्याची ॥ ४६॥

मीपणामुळे ब्रह्माचें आकलन होत नाही(-ब्रह्मस्वरुप कळत नाही),भक्ति लयास जातें (मावळतें) व वैराग्याची शक्ति (सामर्थ्य) नाहीशी होते. (वैराग्य लुळे होऊन जातें)

मीपणें प्रपंच न घडे । मीपणें परमार्थ बुडे । मीपणें सकळही उडे । यश कीर्ति प्रताप ॥ ४७॥

मीपणानें प्रपंचही नीट (नेटका) होत नाही परमार्थ तर पार बुडतो व यश,किर्ती,प्रताप ही सर्व लयाला जातात.

मीपणें मैत्री तुटे । मीपणें प्रीति आटे । मीपणें लिगटे । अभिमान अंगीं ॥ ४८॥

( लिगटे - चिकटतो (अहंकार) )

मीपणाने मैत्री तुटून जाते,प्रिति आटतें  व आंगामध्ये वृथाभिमान जडतो,

मीपणें विकल्प उठे । मीपणें कळह सुटे । मीपणें संमोह फुटे । ऐक्यतेचा ॥ ४९॥

मीपणाने विकल्प उत्पन्न होतो,तंटा (कलह) वाढतो व ऐक्याची लालसा (प्रेम) कमी होत जाते.

मीपण कोणासिच न साहे । तें भगवंतीं कैसेनि साहे । म्हणून मीपण सांडून राहे । तोचि समाधानी ॥५०॥

मीपणा कोणालाच सहन होत नाही,मग तो भगवंताला तरी कसा सहन होईल ? ह्यास्तव मीपणा सोडून राहातो तोच समाधानी होय.

मीपण कैसे त्यागावें । ब्रह्म कैसें अनुभवावें । समाधान कैसें पावावें । कोणा प्रकारे ॥ ५१॥

(प्रश्न) (असले) मीपण कसे टाकावें,ब्रह्माचा अनुभव कसा घ्यावा आणि कोणत्या प्रकारे व कसें समाधान प्राप्त करुन घ्यावें ?

मीपण जाणोनि त्यागावे । ब्रह्म होऊन अनुभवावे । समाधान ते पावावे । नि:संगपणे ।

(उत्तर) मीपणा (खोटा आहे असा) जाणून टाकावा (खोटा आहे असें जाणले की मीपणा जातो) स्वतः ब्रह्मस्वरुप होउन ब्रह्माचा अनुभव घ्यावा आणि (मीपणाचा) संग टाकून निःसंग होऊन समाधान प्राप्त करुन घ्यावें.

आणिक एक समाधान । मीपणेंविण साधन । करूं जाणे तोचि धन्य । समाधानी ॥ ५३॥

आणखी एक समाधानाची मौज आहे. मीपणाचा त्याग करुन जो साधन करील तोच समाधानी पुरुष धन्य होय.

मी ब्रह्मचि झालों स्वतां । साधन करील कोण आतां । ऐसें मनीं कल्पूं जातां । कल्पनाचि उठे ॥ ५४॥

मी तर स्वतः ब्रह्मच झालो,आता साधन कोणी करावयाचे ?अशी मनांत कल्पना करायला लागल्यास कल्पनाच (अधिक) वाढू लागतील (निर्विकल्पस्थिती होणार नाही)

ब्रह्मीं कल्पना न साहे । तेचि तेथें उभी राहे । तयेसी शोधूनि पाहे । तोचि साधु ॥ ५५॥

कारण ब्रह्माच्या ठिकाणी कोणतीही कल्पना सहन होत नाही (आणि मी स्वतःब्रह्म झालो असे म्हणण्यांत-तेथेही कल्पनाच उभी राहाते),ह्या कल्पनेचा शोध करुन (ही कल्पना म्हणजें ब्रह्म नव्हे हे) जो पाहील तो साधु (ब्रह्मस्वरुपी कल्पना साहत नाही ,तीच बाहेर पंगु होऊन उभी राहाते,कल्पनेला शोधील तोच साधु)

निर्विकल्पासि कल्पावें । परी कल्पिलें तें आपण न व्हावें । मीपणास त्यागावें । येणें रितीं ॥ ५६॥

(कल्पना मूळ उठते,कशी उठते तें पाहावे,मी कल्पिता आहें असा आपला -वेगळेपणाचा संग सोडून निर्विकल्पास कल्पावें) निर्विकल्प ब्रह्माची कल्पना करावी पण ही कल्पना करताना मी कोणी वेगळा आहे अशी कल्पना करुं नये,अशाप्रकारचा मीपणाचा त्याग करावा.

या ब्रह्मविद्येच्या लपणीं । कांहींच न व्हावें असोनी । दक्ष आणि समाधानी । तोचि हें जाणें ॥ ५७॥

ह्या ब्रह्मविद्येच्या लपंडावाच्या खेळांत (लपणी)(प्रपंच पुढे करुन ब्रह्म लपले आहे) आत्मरुपाने राहून देहबुध्दीनें किंचीतही राहू नयें,जो दक्ष व समाधानी असेल त्यालाच हें कळेल.

जयास आपण कल्पावें । तेंचि आपण स्वभावें । येथें कल्पनेच्या नांवें । शून्य आलें ॥ ५८॥

ज्या ब्रह्माची आपण कल्पना करावयाची तेंच आपण मूळचे आहोत,ह्या विचाराने कल्पनेच्या नावानें शून्य होते (कल्पना अगदी नाहीशी होते)

पदींहून चळों नये । करावे साधनउपाये । तरीच सांपडे सोये । अलिप्तपणाची ॥ ५९॥

पदीहून म्हणजे ब्रह्मापदापासून न ढंळता (स्वरुपच्युत न होतां) (परमार्थप्राप्तीची) अनेक साधने व उपाय (साधनसायास) करीत असावें,तरच अलिप्तपणाचा मार्ग सांपडेल,

राजा राजपदीं असतां । उगीच चाले सर्व सत्ता । साध्यचि होऊन तत्त्वतां । साधन करावें ॥ ६०॥

राजा आपल्या गादीवर बसलेला असला म्हणजें त्याची सत्ता सर्वत्र उगीच (काही यत्न न करता) चालते,तद्वत साध्य जे परब्रह्म तद्रूप खरोखर होउन साधकानें साधन करावें-साध्य होऊन साधन करावें.(ती साधनें करताना त्यास अलिप्तपणाचा अभ्यास होईल)

साधन आलें देहाच्या माथां । आपण देह नव्हे सर्वथा । ऐसा करून अकर्ता । सहजचि आहे ॥ ६१॥

साधन देहाच्या माथीं येते (जे जे साधन होते ते देहाने होतें) आणि आपण तर काही मुळीच देह नव्हें अशाप्रकारें सहजच (अनायसे) साधन करुन अकर्ता होतो (करुन अकर्तेपण सहजच येते)

देह आपण ऐसें कल्पावें । तरीच साधन त्यागावें । देहातीत असतां स्वभावें । देह कैंचा ॥ ६२॥

देह आपण आहो अशी कल्पना केली तरच साधन टाकून द्यावें आपण मूळचें देहाहून वेगळे आहो ,तेथे देह कोठला ?( अर्थात देह नाही)

ना तें साधन ना तें देह । आपण आपला निःसंदेह । देहींच असोन विदेह । स्थिति ऐशी ॥ ६३॥

(साधन करीत असतां) त्या देहाशी आपला संबंध नाही आणि साधनाशीही नाही,आपला आपण निःसंशय ब्रह्मरुप देहधारी असतां विदेहस्थिति अशी असते (आपण देहातीत वस्तु आहोत,देह नाही असे जाणून साधन केल्यास आपण ना ते साधन ना तो देह अशी निःसंदेहता येते,ह्यालाच विदेहस्थिति म्हणतात)

साधनेंविण ब्रह्म होतां । लागों पाहे देहममता । आळस प्रबळे तत्त्वतां । ब्रह्मज्ञानमिसें ॥ ६४॥

(प्रश्न-)आपण साध्य होऊन गेल्यावर साधन कशाला ?(उत्तर-)साधन न करतां कोणी ब्रह्मरुप होऊ म्हणेल तर त्याच्या आंगी (ब्रह्मस्थितीच्या ऐवजीं) देहाविषयी ममता जडेल आणि ब्रह्मज्ञानाच्या निमित्तानें आळस मात्र वाढेल.

परमार्थमिसें अर्थ जागे । ध्यानमिसें निद्रा लागे । मुक्तिमिसें दोष भोगे । अनर्गळता ॥ ६५॥

( अर्थ - स्वार्थ , अनर्गळता - स्वैराचार )

परमार्थाच्या निमित्ताने स्वार्थ अंतरी उत्पन्न होतो,ध्यानाच्या निमित्तानें झोप लागतें,आणि मुक्तीच्या निमित्ताने स्वैरपणाचा (अर्नगळता) दोष आंगी जडतो,

निरूपणमिसें निंदा घडे । संवादमिसें विवाद पडे । उपाधिमिसें येऊन जडे । अभिमान अंगीं ॥ ६६॥

निरुपणाच्या निमित्तानें दुस-याची निंदा घडते,संभाषणाच्या निमित्ताने वाद जुंपतो (वितंडवादांत पडतो) किंवा उपाधीच्या निमित्ताने आंगी अभिमान-गर्व-उत्पन्न होतो,

तैसा ब्रह्मज्ञानमिसें । आळस अंतरीं प्रवेशे । म्हणे साधनाचें पिसें । काय करावें ॥ ६७॥

त्याप्रमाणे ब्रह्मज्ञानाच्या निमित्तानें अंतःकरणात आळस शिरतो (व त्यामुळे) साधक म्हणू लागतो की हें साधनाचे वेड (पिसें) घेउन काय करावयाचें आहे ?

**किं करोमि क्व गच्छामि किं गृह्णामि त्यजामि किम् । आत्मना पूरितं सर्वं महाकल्पांबुना यथा ॥ १॥**

वचन आधारीं लाविलें । जैसें शस्त्र फिरविलें । स्वतां हाणोनि घेतलें । जयापरी ॥ ६८॥

ज्याप्रमाणे शस्त्र फिरवून आपल्याच हातानें आपणास मारुन घ्यावें त्याचप्रमाणें (किं करोमि क्व गच्छामि) हें (आत्मनिष्ठेचें) वचन आधाराला घेऊन (साधन टाकतो) आपला घात आपणच करुन घेतो.

तैसा उपायाचा अपाय । विपरीतपणें स्वहित जाय । साधन सोडितां होय । मुक्तपणें बद्ध ॥ ६९॥

त्याचप्रमाणे उपायाचा अपाय होतो,विपरीत वागल्यानें आपलें हित हातचें जातें,साधन सोडल्याने मुक्तपणानें बध्द होतो.(मी मुक्त असा अहंकार वाढतो).

साधन करितांच सिद्धपण । हातींचें जाईल निघोन । तेणेंगुणें साधन । करूंच नावडे ॥ ७०॥

साधन करु लागताच हाती सिध्दपण निघून जाईल अशी कल्पना मनांत येऊन साधन करणें आवडत नाही.

लोक म्हणती हा साधक । हेचि लज्जा वाटे येक । साधन करिती ब्रह्मादिक । हें ठाउकें नाहीं ॥ ७१॥

(कारण) हा साधक आहे असे लोक म्हणतील त्याचीच एकप्रकारे लाज वाटतें,(परंतु) ब्रह्मादिक देवसुध्दा साधनच करीत असतात हे ह्याला माहीत नाही.

आतां असो हे अविद्या । अभ्याससारिणी विद्या । अभ्यासें पाविजे अद्या । पूर्ण ब्रह्म ॥ ७२॥

आतां हे अविद्येचे वर्णन पुरे,विद्या ही अभ्यासानें प्राप्त होतें (त्या सद्विद्येच्या) अभ्यासानेंच अनादि अशा पूर्णब्रह्माची प्राप्ति होते.

अभ्यास करावा कवण । ऐसा श्रोता करी प्रश्न । परमार्थाचें साधन । बोलिलें पाहिजे ॥ ७३॥

अभ्यास कोणता करावा ?परमार्थाचे साधन कोणते सांगावे असें श्रोत्यांनी विचारले,

याचें उत्तर श्रोतयासी । दिधलें पुढिलें समासीं । निरूपिलें साधनासी । परमार्थाच्या ॥ ७४॥

पुढील समासात त्याचें उत्तर देउन परमार्थाचे साधन सांगितले आहे.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके साधनप्रतिष्ठानिरूपणं नाम सप्तमः समासः ॥७॥**

### समास आठवा : श्रवणनिरूपण श्रीराम ॥

ऐका परमार्थाचें साधन । जेणें होये समाधान । तें तूं जाण गा श्रवण । निश्चयेंसीं ॥ १॥

ज्याच्या योगानें समाधान होईल असे परमार्थाचे साधन ऐका,असे साधन श्रवण होय,हें निश्र्चयेंकरुन ध्यानांत ठेव.

श्रवणें आतुडे भक्ती । श्रवणें उद्भवे विरक्ती । श्रवणें तुटे आसक्ती । विषयांची ॥ २॥

( आतुडे - वाढीस लागते )

श्रवणानें भ़क्ति प्राप्त होते (आतुडे),(वैराग्य) विरक्ति उत्पन्न होतें व विषयांची आसक्ति तुटतें.

श्रवणें घडे चित्तशुद्धी । श्रवणें होय दृढ बुद्धी । श्रवणें तुटे उपाधी । अभिमानाची ॥ ३॥

श्रवणानें चित्ताची शुध्दि होते (मल,विक्षेप व आवरण हें मनाचें दोष जातात) व आत्मबुध्दि द्दढ होते व अभिमानाची उपाधि तुटून जातें (ज्या अहंकाराच्या उपाधीने जीव संसाराशी जखडला गेला आहें,ती उपाधि तुटते)

श्रवणें निश्चयो घडे । श्रवणें ममता मोडे । श्रवणें अंतरीं जडे । समाधान ॥ ४॥

श्रवणानें निश्र्चय होतो,ममता मोडते,अंतःकरणाचे समाधान होते.

श्रवणें आशंका फिटे । श्रवणें संशयो तुटे । श्रवण होतां पालटे । पूर्वगुण आपुला ॥ ५॥

श्रवणाने शंका फिटते,संशय तुटतो, आणि आपला पहिला (वाईट) गुण असल्यास त्यांत बदल होतो,

श्रवणें आवरे मन । श्रवणें घडे समाधान । श्रवणें तुटे बंधन । देहबुद्धीचें ॥ ६॥

श्रवणानें मन आवरलें जातें,समाधान प्राप्त होतें व देहबुध्दीचे बंधन तुटून जातें.

श्रवणें मीपण जाय । श्रवणें धोका न ये । श्रवणें नाना अपाये । भस्म होती ॥ ७॥

श्रवणानें मीपणा जातो,भयाचे निवारण होते आणि अनेक प्रकारचे उपाय (विघ्ने) भस्म होऊन जातात.

श्रवणें होय कार्यसिद्धि । श्रवणें लागे समाधी । श्रवणें घडे सर्वसिद्धी । समाधानाची ॥ ८॥

श्रवणानें कार्य सिध्द होतें,समाधि लागतें आणि समाधान मिळतें व सर्व सिध्दि प्राप्त होते.

सत्संगावरी श्रवण । तेणें कळे निरूपण । श्रवणें होइजे आपण । तदाकार ॥ ९॥

सत्संग मिळाला व त्यावर श्रवण घडले म्हणजे निरुपण कळू लागतें व आपण तदाकार होतो.

श्रवणें प्रबोध वोढे । श्रवणें प्रज्ञा चढे । श्रवणें विषयांचे ओढे । तुटोन जाती ॥ १०॥

( वोढे - पाश )

श्रवणाने (यथार्थज्ञान) प्रबोध वाढतो,बुध्दि प्रगल्भ होते (विकास पावते) व विषयांचे ओढे (पाश)ढिले होऊन तुटून जातात.

श्रवणें विचार कळे । श्रवणें ज्ञान हें प्रबळे । श्रवणें वस्तु निवळे । साधकांसी ॥ ११॥

श्रवणानें साधकास (आत्मानात्म-) विचार कळूं लागतो,ज्ञान वाढतें व ब्रह्मस्वरुप (चित्तांत) प्रकाश पावते,

श्रवणें सद्बुद्धि लागे । श्रवणें विवेक जागे । श्रवणें मन हें मागे । भगवंतासी ॥ १२॥

श्रवणानें सदबुध्दि लागतें (वाढतें),विवेक जागा होतो, व मन भगवंताच्या प्राप्तीची इच्छा करु लागते.

श्रवणें कुसंग तुटे । श्रवणें काम वोहटे । श्रवणें धोका आटे । येकसरां ॥ १३॥

( काम ओहटे - कामवासना उणावते )

श्रवणानें वाईट संगति तुटते,काम मागें हटतो (बोहटे)(भय धास्ती) धोका असेल तर तो एकदम नाहीसा होतो.

श्रवणें मोह नासे । श्रवणें स्फूर्ति प्रकाशे । श्रवणें सद्वस्तु भासे । निश्चयात्मक ॥ १४॥

श्रवणानें मोहाचा नाश होतो,स्फूर्ति प्रकट होते व सद्वस्तु म्हणजे परब्रह्म खात्रीनें प्रकट होऊ (भासूं) लागते.

श्रवणें होय उत्तम गती । श्रवणें आतुडे शांती । श्रवणें पाविजे निवृत्ती । अचळपद ॥ १५॥

श्रवणानें उत्तम गति मिळते,शांति मिळते व निवृत्तीचें अढळ प्राप्त होतें,

श्रवणा-ऐसें सार नाहीं । श्रवणें घडे सर्व कांहीं । भवनदीच्या प्रवाहीं । तरणोपाय श्रवणें ॥ १६॥

एकंदरीत श्रवणासारखे श्रेष्ठ दुसरे काहीं नाही,सर्व काही त्याच्या योगानें प्राप्त होते.संसाररुपी नदीच्या प्रवाहामध्ये श्रवणानेंच तरणोपाय होतो,(भवतरणोपाय म्हणजे अध्यात्मश्रवण होय.)

श्रवण भजनाचा आरंभ । श्रवण सर्वीं सर्वारंभ । श्रवणें होय स्वयंभ । सर्व कांहीं ॥ १७॥

नवविधा भजनाचा आरंभ श्रवणापासून होतो, श्रवणापासून होतो (भजनच काय,इतर) सर्वाचाही आरंभ श्रवणापासूनच होतो श्रवणानें सर्व काहीं आपलें आपण (स्वयंभ)घडून येतें.

प्रवृत्ती अथवा निवृत्ती । श्रवणेंविण न घडे प्राप्ती । हे तों सकळांस प्रचिती । प्रत्यक्ष आहे ॥१८॥

प्रवृत्ति (प्रपंच) असो किंवा निवृत्ति (परमार्थ) असो, श्रवणापासून त्याची काही प्राप्ति नाही हा तर सर्वांस उघड अनुभव आहे,

ऐकिल्याविण कळेना । हें ठाउकें आहे जनां । त्याकारणें मूळ प्रयत्ना । श्रवण आधीं ॥ १९॥

(कोणतीही गोष्ट) ऐकल्यावाचून कळत नाही हें तर सर्व लोकांस माहितच आहे,ह्यासाठी पहिला प्रयत्न म्हणजें आधी श्रवण करणे हा होय.

जें जन्मीं ऐकिलेंचि नाहीं । तेथें पडिजे संदेहीं । म्हणोनिया दुजें कांहीं । साम्यता न घडे ॥ २०॥

जें जन्मात कधी ऐकण्यात आले नाही.त्याविषयी संशय उत्पन्न होतो,तो जाऊन निश्र्चयात्मक ज्ञान देणारे श्रवणापरते दुसरे कोणतेही साधन नाही,म्हणून श्रवणाच्या बरोबरीला दुसरे काहीच लागत नाही.

बहुत साधनें पाहतां । श्रवणास न घडे साम्यता । श्रवणेंविण तत्त्वता । कार्य न चले ॥ २१॥

अनेक साधनें पाहिली तरी इतरांना (साधनांना) श्रवणाची बरोबरी येत नाही,आणि वस्तुतः श्रवणाशिवाय कोणतेहि कार्य होत नाही.

न देखतां दिनकर । पडे अवघा अंधकार । श्रवणेंविण प्रकार । तैसा होय ॥ २२॥

सूर्य द्दष्टीस पडत नाही तोपर्यंत सर्व अंधार पडतो ,तसाच प्रकार श्रवण नसले म्हणजें होतो (म्हणून हे मुख्य साधन आहे)

कैसी नवविधा भक्ती । कैशी चतुर्विधा मुक्ती । कैशी आहे सहजस्थिती । हें श्रवणेंविण न कळे ॥ २३॥

नवविधा भक्ति चतुर्विधा मुक्ति किंवा सहजस्थिति कशी असते हें श्रवणाशिवाय कळत नाही.

न कळे षट्कर्माचरण । न कळे कैसें पुरश्चरण । न कळे कैसें उपासन । विधियुक्त ॥ २४॥

( षट्कर्माचरण - यजन ,यजानादी कर्मे)

षट्कर्माचे आचरण,पुरश्र्चरण किंवा विधियुक्त उपासना कशी करावयाची हें (श्रवणाशिवाय) कळत नाही.

नाना व्रतें नाना दानें । नाना तपें नाना साधनें । नाना योग तीर्थाटणें । श्रवणेंविण न कळती ॥ २५॥

अनेक प्रकारची व्रते,दानें,तपे,साधनें,योग,तीर्थयात्रा इत्यादि श्रवणावाचून कळत नाही,

नाना विद्या पिंडज्ञान । नाना तत्त्वांचें शोधन । नाना कळा ब्रह्मज्ञान । श्रवणेंविण न कळे ॥ २६॥

अनेक विद्या,शरीरज्ञान,अनेक तत्वांचा शोध,अनेक कळा,ब्रह्मज्ञान ही श्रवणाशिवाय कळत नाहीत.

अठरा भार वनस्पती । एक्या जळें प्रबळती । येका रसें उत्पत्ती । सकळ जीवांची ॥ २७॥

अठराभार (यच्चयावत) वनस्पति एका पाण्यानेंच वाढतात,एका रसानेंच सर्व जीवांची उत्पत्ति होते,

सकळ जीवांस एक पृथ्वी । सकळ जीवांस येक रवी । सकळ जीवांस वर्तवी । येक वायो ॥ २८॥

सर्व जीवांना पृथ्वी एक,सर्व जीवांना सूर्य एक,आणि सर्व जीवांना (प्राणीमात्रांस) जागविणारा वायुही एकच.

सकळ जीवांस एक पैस । जयास बोलिजे आकाश । सकळ जीवांचा वास । येका परब्रह्मीं ॥ २९॥

जिला आकाश म्हणतात ती सर्व जीवांना एकच मोकळी जागा (पैस पसरण्याची-वावरण्याची जागा) आहे किंवा एका परब्रह्मामध्येच सर्व जींवाचा रहिवास आहें (सर्वांचा वास एका परब्रह्माच्या आधिष्ठानीं आहे)

तैसें सकळ जीवांस मिळोन । सार येकचि साधन । तें हें जाण श्रवण । प्राणिमात्रांसीं ॥ ३०॥

तसे सर्व जीवांना मिळून एकच श्रेष्ठ साधन आहे.तेंच हें प्राणिमात्रांस लावून दिलेले श्रवण होय.

नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें । सर्वांस श्रवणापरतें । साधनचि नाहीं ॥३१॥

पृथ्वीच्या पाठीवर अनेक देश,भाषा व मतें आहेत त्यांची गणती नाही,परंतु त्या सर्वांस श्रवणापेक्षा दुसरे साधन नाही.

श्रवणें घडे उपरती । बद्धाचे मुमुक्षु होती । मुमुक्षूचे साधक अती । नेमेंसिं चालती ॥ ३२॥

श्रवणानें (उपरति) वैराग्य उत्पन्न होतें,श्रवणानें बध्द असतील ते मुमुक्षु होतात,आणि मुमुक्षूंचे साधक होऊन अतिशय नेमाने (नियमांनी) चालतात.

साधकांचे होती सिद्ध । अंगीं बाणतां प्रबोध । हें तों आहे प्रसिद्ध । सकळांस ठाउकें ॥ ३३॥

आंगामध्ये यथार्थ ज्ञान बाणले म्हणजे साधकांचे सिध्द होतात,हे तर प्रसिध्दच आहे,(सर्वास माहीत आहे).

ठाईचे खळ चांडाळ । तेचि होती पुण्यसिळ । ऐसा गुण तत्काळ । श्रवणाचा ॥ ३४॥

जें स्वभावतः (ठाईचें) दुष्ट व चांडाळ असतात तें सुध्दा पुण्यशील होतात असा हा श्रवणाचा तात्काळ (द्दष्टोत्पतीस येणारा) गुण आहे.

जो दुर्बुद्धि दुरात्मा । तोचि होय पुण्यात्मा । अगाध श्रवणाचा महिमा । बोलिला न वचे ॥ ३५॥

जो दुर्बुध्दि व दुरात्मा असतो तोच पुण्यात्मा होतो असा श्रवणाचा महिमा अगाध आहे,तो बोलून दाखविणें शक्य नाही.

तीर्थव्रतांची फळश्रुती । पुढें होणार सांगती । तैसें नव्हे हातींच्या हातीं । सप्रचीत श्रवण ॥ ३६॥

तीर्थे,व्रते वगैरेची फलें पुढें मिळणार असे सांगतात श्रवणाचे तसे नाही,हातोहात त्याचा अनुभव (सप्रचित) येतो,

नाना रोग नाना व्याधी । तत्काळ तोडिजे औषधी । तैशी आहे श्रवणसिद्धी । अनुभवी जाणती ॥ ३७॥

अनेक रोग व व्याधि ओषधानें तात्काळ नाहीशी होतात,तशीच श्रवणाचीही सिध्दि आहे हें अनुभवी लोकांस माहीत आहें.

श्रवणाचा विचार कळे । तरीच भाग्यश्री प्रबळे । मुख्य परमात्मा आकळे । स्वानुभवासी ॥ ३८॥

श्रवणाचा विचार (तत्वनिर्णय)कळेल तरच भाग्य व संपत्ति हीं उदयास येतात आणि फार काय सांगावें-श्रवणानें मुख्य परमात्मस्वरुपाचा अनुभव येतो.

या नांव जाणावें मनन । अर्थालागीं सावधान । निदिध्यासें समाधान । होत असे ॥ ३९॥

अर्थाला सावध असणे ह्यालाच मनन म्हणतात (मननचा निदिध्यास होऊन) निदिध्यासानें समाधान प्राप्त होतें,(श्रवण,मनन,निदिध्यास व साक्षात्कार हा क्रमच आहें)

बोलिल्याचा अर्थ कळे । तरीच समाधान निवळे । अकस्मात अंतरीं वोळे । निःसंदेह ॥ ४०॥

बोललेल्याचा अर्थ कळला तर समाधान प्राप्त होतें व अंतःकरणांत एकदम (मी ब्रह्म आहे अशाविषयी) निंःसंदेहपणा उत्पन्न होतो.

संदेह जन्माचें मूळ । तें श्रवणें होय निर्मूळ । पुढें सहजचि प्रांजळ । समाधान ॥ ४१॥

संदेह (संशय,विकल्प) हें जन्माचें मूळ आहे,ते श्रवणानें पार नाहींसे होतें आणि मग पुढें सहजच सरळपणानें उघड (प्रांजळ) समाधान होतें.

जेथें नाहीं श्रवण मनन । तेथें कैंचें समाधान । मुक्तपणाचें बंधन । जडलें पाई ॥ ४२॥

ज्या ठिकाणी श्रवण,मनन नाही तेथें समाधान कोठून होणार ?(आपण मुक्त आहो,आपणांस श्रवणादि कशाला पाहिजें असे कोणी म्हणेल तर त्याचा) मुक्तपणा हेंच त्याचें पायात अडकलेले बंधन होय.

मुमुक्षु साधक अथवा सिद्ध । श्रवणेंविण तो अबद्ध । श्रवणमननें शुद्ध । चित्तवृत्ति होये ॥ ४३॥

मुमुक्षु,साधक किंवा सिध्द कोणीही असो,श्रवण नसेल तर तो अव्यवस्थित (अबध्द,अनर्गळ) होतो श्रवण-मननानें चित्तवृत्ति शुध्द होते,

जेथें नाहीं नित्य श्रवण । तें जाणावें विलक्षण । तेथें साधकें एक क्षण । क्रमूं नये सर्वथा ॥ ४४॥

जेथे नित्य (वस्तूचें) श्रवण (किंवा,निरंतर श्रवण) नाही तें चमत्कारिक-विपरीत होय,साधकानें एक क्षणभरसुध्दां राहू नये.

जेथें नाहीं श्रवणस्वार्थ । तेथें कैंचा हो परमार्थ । मागें केलें तितुकें व्यर्थ । श्रवणेंविण होय ॥ ४५॥

ज्या ठिकाणी श्रवण करण्याचा स्वार्थ नाही,तेथे परमार्थ कसला ?श्रवण नसेल तर पूर्वी केलेले साधन सुध्दां फुकट जाईल.

तस्मात् श्रवण करावें । साधन मनीं धरावें । नित्य नेमें तरावें । संसारसागरीं ॥ ४६॥

म्हणून श्रवण करावें,साधन मनामध्यें धरावें (अंत:करणपूर्वक साधन करावें)(इतकेच नव्हे तर श्रवणाचा) नित्यनेम धरुन त्यायोगानें संसार-समुद्रातून तरुन जावें.

सेविलेंच सेवावें अन्न । घेतलेंचि घ्यावें जीवन । तैसें श्रवण मनन । केलेंचि करावें ॥ ४७॥

एकदा खाल्लें तरी पुन्हा अन्न खावें,पाणी एक वेळ प्यालें तरी पुन्हा प्यावें,त्याप्रमाणें एकदा ज्या विषयांचे श्रवणमनन केंलें त्याच विषयांचे पुन्हा श्रवणमनन करावें (शरीरपोषणासाठीं अन्नोदक रोज सेवन करावें लागतें त्याप्रमाणे आत्मनिश्चय स्थिर राहावा म्हणून प्रत्यहीं श्रवणमनन करावें)

श्रवणाचा अनादर । आळस करी जो नर । त्याचा होय अपहार । स्वहिताविषई ॥ ४८॥

जो माणूस आळसानें श्रवणाचा अनादर करतो तो आपल्या कल्याणाचा नाश करुन टाकतो.

आळसाचें संरक्षण । परमार्थाची बुडवण । याकारणें नित्य श्रवण । केलेंचि पाहिजे ॥ ४९॥

आळस राखला कीं परमार्थाची बुडवणूक होते,म्हणून श्रवण करायला पाहिजें.श्रवणचा आळस करील तो स्वहिताला मुकेल (आळस नसावा व परमार्थबुध्दि सतत जागृत असावी ह्यासाठी नित्य श्रवण करावे)

आतां श्रवण कैसें करावें । कोण्या ग्रंथास पाहावें । पुढिले समासीं आघवें । सांगिजेल ॥ ५०॥

आतां श्रवण कसें करावें,कोणता मार्ग (ग्रंथ) पहावा हें सर्व पुढील समासात सांगू.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके श्रवणनिरूपणं नाम अष्टमः समासः ॥ ८॥**

**समास नववा : श्रवणनिरूपण श्रीराम ॥**

विषय:श्रवणनिरुपण

आतां श्रवण कैसें करावें । तेंही सांगिजेल अवघे । श्रोतां अवधान द्यावें । येकचित्तें ॥ १॥

आता श्रवण कसें करावें (कोणते ग्रंथ पहावे) ते सर्वही सांगू.श्रोत्यानें एकाग्रचित्तानें लक्ष द्यावें.

एक वक्तृत्व श्रवणीं पडे । तेणें जालें समाधान मोडे । केला निश्चयो विघडे । अकस्मात ॥ २॥

एखादें भाषण कानीं पडलें की (कोणाचें वकृत्व असें असते की) त्याच्या योगाने थोडेफार झालेले समाधान मोडते व केलेला निश्चय एकदम ढासळतो.

तें वक्तृत्व त्यागावें । जें माईक स्वभावें । तेथें निश्चयाच्या नांवें । सुन्याकार ॥ ३॥

ज्या भाषणांत निश्चय म्हणून काहींच नाही(ज्यांत निश्चयात्मक ज्ञान नाही)व जें खोटे आहे (सारेच मायेचे म्हणजे संशयाचे बोलणे अशा वकृत्वाचा) त्या भाषणाचा अव्हेर करावा.

येक्या ग्रंथें निश्चय केला । तो दुजयानें उडविला । तेणें संशयचि वाढला । जन्मवरी ॥ ४॥

एका ग्रंथात काहीं एक सिध्दांत सांगितला असला तर दुसरा त्याचें खंडण करतो त्यायोगानें (म्ह.दोन्ही ऐकणारा किंवा वाचणारा ह्याचा) जन्मभर संशयच वाढत जातो.

जेथें संशय तुटती । होय आशंकानिवृत्ती । अद्वैतग्रंथ परमार्थी । श्रवण करावे ॥ ५॥

ज्याच्या योगेनें संशय जाउन शंकेचे निरसन होइल असे परमार्थविषयक अद्वैताचे ग्रंथ परमार्थीजनांनी श्रवण करावे.

जो मोक्षाचा अधिकारी । तो परमार्थपंथ धरी । प्रीति लागली अंतरीं । अद्वैतग्रंथाची ॥ ६॥

जो मोक्षाचा अधिकारी असतो तो परमार्थाचा मार्ग धरतो (म्हणून त्याला) अंतःकरणात अद्वैत ग्रंथाची आवड असतें.

जेणें सांडिला इहलोक । जो परलोकींचा साधक । तेणें पाहावा विवेक । अद्वैतशास्त्रीं ॥ ७॥

जो इहलोक टाकून देऊन परलोक साधण्याच्या मार्गास लागला,त्यानें अद्वैतशास्त्राचा विचार करावा.(ज्याला संसार नको-परलोकच पाहिजे त्यानें अद्वैतशास्त्रच पहावे.)

जयास पाहिजे अद्वैत । तयापुढें ठेवितां द्वैत । तेणें क्षोभलें उठे चित्त । तया श्रोतयांचें ॥ ८॥

ज्याला अद्वैत पाहिजे त्याच्यापुढे द्वैत मांडले (द्वैताची पोथी सोडली) तर त्यायागें त्याचे चित्त क्षुब्ध होतें व त्यांत मन लागत नाही (त्याला रुचत नाही)

आवडीसारिखें मिळे । तेणें सुखचि उचंबळे । नाहीं तरी कंटाळे । मानस ऐकतां ॥ ९॥

आवडीसारखें (ऐकावयास) मिळालें म्हणजें सुखच वाढत जातें,नाहीतर ऐकताना मन कंटाळते (असा मनुष्यस्वभाव आहें)

ज्याची उपासना जैसी । त्यासि प्रीति वाटे तैसी । तेथें वर्णितां दुजयासी । प्रशस्त न वटे ॥ १०॥

ज्याची जी उपासना असेल तिचीच प्रिति त्याला वाटतें,त्या ठिकाणी दुस-याचें वर्णन करुं लागलें-दुस-याची स्तुति केली तर त्यास बरें नाही.

प्रीतीचें लक्षण ऐसें । अंतरीं उठे अनयासें । पाणी पाणवाटें जैसें । आपणचि धांवे ॥ ११॥

( अनायासें - सहज )

पाणी जसें आपण होऊनच पाणढाळाकडे धावत जाते तशीच प्रिति अंतःकरणात आपोआप उद्भवते असें हें प्रितीचें लक्षण आहे.

तैसा जो आत्मज्ञानी नर । तयास नावडे इतर । तेथें पाहिजे सारासार- । विचारणा ते ॥ १२॥

त्याप्रमाणें जो आत्मज्ञानी पुरुष आहे,त्याला इतर गोष्टी आवडत नाहींत,सारासार विचारच पाहिजे.(आत्मज्ञानी मनुष्याला सारासार विचार सांगितला तरच रुचतो)

जेथें कुळदेवी भगवती । तेथें पाहिजे सप्तशती । इतर देवांची स्तुती । कामा न ये सर्वथा ॥ १३॥

जेथें कुळदैवत भगवतीदेवी आहे तेथे सप्तशती (पोथी-ग्रंथ पाठ) पाहिजे,त्याठिकाणी इतर देंवांच्या स्तुतीचा उपयोग नाही.

घेतां अनंताच्या व्रता । तेथें नलगे भगवद्गीता । साधुजनांसि वार्ता । फळाशेचि नाहीं ॥ १४॥

अनंताचे व्रत घेतल्यावर तेथे भगवद्गीतेचे काम नाही,त्याप्रमाणें साधुलोकांस फलाशेची गरज नाही.

वीरकंकण घालितां नाकीं । परी तें शोभा पावेना कीं । जेथील तेथें आणिकीं । कामा न ये सर्वथा ॥१५॥

( आणिकीं - अन्यत्र,इतरत्र )

वीरकंकण नांकात घातले तर तें शोभावयांचे नाही,जेथल्या तेथेच पाहिजें (जेथल्या तेथेच गोडी लागतें) अन्यत्र कामाचें नाही.

नाना माहात्म्यें बोलिलीं । जेथील तेथें वंद्य झालीं । विपरीत करून वाचिलीं । तरी तें विलक्षण ॥ १६॥

अनेक प्रकारची महात्मे सांगितली आहेत,ती जेथल्या तथेंच पूज्य आहेत ती भलतीकडे नेऊन वाचली तर चमत्कारिक दिसेल.

मल्हारीमाहात्म्य द्वारकेसी ।द्वारकामाहात्म्य नेलें काशीसी ।काशीमाहात्म्य व्यंकटेशीं ।शोभा न पावे॥१७॥

मल्हारीमाहात्म द्वारकेला नेले,द्वारकामहात्म काशीला नेले किंवा काशीमाहात्म व्यंकटेशाच्या गिरीवर नेलें तर त्याला शोभा येत नाही.

ऐसें सांगतां असे वाड । परी जेथील तेथेंचि गोड । तैसी ज्ञानियांस चाड । अद्वैतग्रंथाची ॥ १८॥

सांगावयाला लागलें तर असें पुष्कळ (वाड) आहे ,पण जेथल्या तेथेच गोड,त्याचप्रमाणें ज्ञान्यांना अद्वैत ग्रंथाची अपेक्षा असते.

योगियांपुढे राहाण । परीक्षावंतापुढें पाषाण । पंडितापुढें डफगाण । शोभा न पावे ॥ १९॥

( राहाण - भुताटकीचे प्रयोग )

आंगात दैवत आणून तें योग्यांपुढे बोलावणें (राहाणे) रत्नपारख्यापुढे दगड ठेवणें किंवा पंडीतांपुढे डफगाणें म्हणणें ह्यानें शोभा येत नाही.

वेदज्ञापुढें जती । निस्पृहापुढें फळश्रुती । ज्ञानीयापुढें पोथी । कोकशास्त्राची ॥ २०॥

( जती - संन्यासी )

वेदवेत्यापुढें (जैनधर्मीय) जती,निरीच्छ पुरुषांपुढे फलश्रुति किंवा ज्ञान्यापुढें कोकशास्त्राची पोथी (कोक.म्ह.-चक्रवाक पक्षांची जोडी,ह्या नरमादींचे अन्योन प्रेम अत्यंत असतें ह्यावरुन कोकशास्त्र म्ह. शृंगारशास्त्र,प्रेमकहाणी)

ब्रह्मचर्यापुढें नाचणी । रासक्रीडा निरूपणीं । राजहंसापुढें पाणी । ठेविलें जैसें ॥ २१॥

( नाचणी - ब्रह्मचर्यापुढे नृत्यांगना )

किंवा ब्रह्मचा-यापुढें नाचणारणींचे ताफे-नृत्यांगना,निरुपणामध्ये रासक्रीडा,अथवा राजहंसापुढे पाणी ठेवल्यानें (शोभ़ा येत नाही) असे अनौचित्य करणे म्हणजें राजहंसापुढे निव्वळपाणी ठेवण्यासारखे अरसिकपणाचें काम आहे)

तैसें अंतर्निष्ठापुढें । ठेविलें शृंगारीक टिपडें । तेणें त्याचें कैसें घडे । समाधान । २२॥

( टीपडें - चोपडे )

त्याप्रमाणें अंर्तनिष्ठ सत्पुरुषांपुढे शृंगारिक चोपडें (टिपडे) ठेवलें तर त्यानें त्याचें समाधान कसें होइल ?

रायास रंकाची आशा । तक्र सांगणें पीयूषा । संन्याशास वोवसा । उच्छिष्टचांडाळी ॥ २३॥

( पीयूषा - अमृत , वोवसा - व्रत, उच्छिष्टचांडाळी - एका व्रताचे नाव )

भिका-यास योग्य अशी आशा राजास करण्यास सांगणें (राजाला रंकास योग्य अशी क्षुद्र आशा दाखविणें) अमृतापुढें ताकाची बढाई मारणे (ताकाचा नैवेद्य दाखविणें)किंवा संन्याशाला उच्छिष्ट चांडाळाचें व्रत करावयास सांगणे (उच्छिष्ट"चांडाळी" चा क्षुद्र मंत्र सांगणें)

कर्मनिष्ठा वशीकरण । पंचाक्षरीया निरूपण । तेथें भंगे अंतःकरण । सहजचि त्याचें ॥ २४॥

कर्मनिष्ठास वशीकरण मंत्र उपदेशणे-जपण्यास सांगणे,अथवा पंचाक्ष-याला (अध्यात्माचे-वेदांताचे)निरुपण सांगणे,त्याने त्याच्या अंत:करणाचा सहज हिरमोड होतो,(म्हणजे त्याचा मनोभंग करुन त्याला दु:ख देणे होय.)

तैसे पारमार्थिक जन । तयांस नसतां आत्मज्ञान । ग्रंथ वाचितां समाधान । होणार नाहीं ॥ २५॥

तद्वत परमार्थाला लागलेले जें लोक आहेत त्यांस ज्यांत आत्मज्ञान नाही असे ग्रंथ वाचल्यानें समाधान होणार नाही (त्याप्रमाणे पारमार्थिक म्हणविणा-यास आत्मज्ञानाची आस्था नसेल तर त्यापुढें अद्वैत ग्रंथ वाचल्यानें त्याचें समाधान होणार नाही.)

आतां असो हें बोलणें । जयासि स्वहित करणें । तेणें सदा विचरणें । अद्वैतग्रंथीं ॥ २६॥

आतां हे बोलणे पुरे,ज्याला आपलें कल्याण करुन घ्यावयांचे आहे (ज्याला खरोखर आत्महित पाहिजे असेल),त्याने नेहमी अद्वैतग्रंथाचे अवलोकन करावें.

आत्मज्ञानी येकचित्त । तेणें पाहणें अद्वैत । एकांत स्थळीं निवांत । समाधान ॥ २७॥

आत्मज्ञानावरच ज्यांने एकसारखे चित्त ठेवले आहे त्याने एकांतस्थानी निवांत बसून अद्वैताचा विचार करावा म्हणजे समाधान होइल.

बहुत प्रकारें पाहतां । ग्रंथ नाहीं अद्वैतापरता । परमार्थास तत्वतां । तारूंच कीं ॥ २८॥

अनेक बाजूंनी विचार केला तरी अद्वैतापेक्षा श्रेष्ठ असा दुसरा ग्रंथ नाही. तो खरोखर परमार्थास तारुंच आहे. (अद्वैतग्रंथासारखा दुसरा ग्रंथच नाही परमार्थाची ती नौकाच आहे)

इतर जे प्रापंचिक । हास्य विनोद नवरसिक । हित नव्हे तें पुस्तक । परमार्थासी ॥ २९॥

इतर जीं हास्यविनोदाची नऊ रसांनी भरलेली प्रापंचिक पुस्तके आहेत,ती परमार्थास हितकारक नाहीत (प्रपंचपोषणाचे अनेक ग्रंथ असतात,हास्यविनोदप्रचुर काहीं पुस्तकें असतात,शृंगार-वीर-करुणादि नवरसांचे नाना ग्रंथ असतात,पण तें परमार्थाच्या उपयोगाचे नाहीत)

जेणें परमार्थ वाढे । आंगी अनुताप चढे । भक्तिसाधन आवडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३०॥

ज्या ग्रंथांच्या परिशीलनानें किंवा श्रवणानें परमार्थबुध्दि वाढतें परमार्थाची वाढ होते,आंगात (विरक्ति) अनुताप बाणतो,भक्ति व साधन हीं आवडूं लागतात,त्यांस ग्रंथ म्हणावे.

जो ऐकतांच गर्व गळे । कां ते भ्रांतीच मावळे । नातरी एकसरी वोळे । मन भगवंतीं ॥ ३१॥

जो ग्रंथ ऐकताच गर्व नाहीसा होतो,भ्रांति लय पावतें किंवा मन एकदम भगवंताकडे जडू लागतें

जेणें होय उपरती । अवगुण अवघे पालटती । जेणें चुके अधोगती । त्या नांव ग्रंथ ॥ ३२॥

ज्याच्या श्रवणानें उपरति होते,अवगुण पालटतात व अधोगति चुकते(अधोगति चुकून मोक्षाधिकार प्राप्त होतो) त्याला ग्रंथ म्हणावे.

जेणें धारिष्ट चढे । जेणें परोपकार घडे । जेणें विषयवासना मोडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३३॥

ज्याच्या योगानें धैर्य येते (सात्विक धैर्य उत्पन्न होतें),परोपकार घडतो,विषयवासना नाहीशी होते,त्याला ग्रंथ म्हणावें.

जेणें ग्रंथ परत्र साधन । जेणें ग्रंथें होय ज्ञान । जेणें होइजे पावन । त्या नांव ग्रंथ ॥ ३४॥

ज्याच्या योगानें परलोकाचें साधन घडतें,(आत्म-)ज्ञान होतें (व पतित असेल तो) पावन होतो त्यांचे नांव ग्रंथ.

ग्रंथ बहुत असती । नाना विधानें फळश्रुती । जेथें नुपजे विरक्ती भक्ति । तो ग्रंथचि नव्हे ॥ ३५॥

अनेक प्रकारची विधानें व फलश्रुति-सांगणारे (फलश्रुतिरुपानें दुराशा वाढविणारे) ग्रंथ पुष्कळ आहेत पण ते ग्रंथ नव्हेत,ज्याच्यायोगानें विरक्ति व भक्ति उत्पन्न होत नाही,जो मोक्षलाभ देत नाही-तो ग्रंथच नव्हे

मोक्षेंविण फळश्रुती । ते दुराशेची पोथी । ऐकतां ऐकतां पुढती । दुराशाची वाढे ॥ ३६॥

मोक्षाशिवाय इतर फलें ज्या ग्रंथाची सांगितली आहेत तो ग्रंथ म्हणजे दुराशेची-दुराशा वाढविणारी-पोथी होय (कारण) तो ग्रंथ ऐकता ऐकता पुढे दुराशाच वाढत जातें.

श्रवणीं लोभ उपजेल जेथें । विवेक कैंचा असेल तेथें । बैसलीं दुराशेचीं भूतें । तयां अधोगती ॥ ३७॥

जो ग्रंथ ऐकताना लोभ उत्पन्न होतो,त्यापासून (आत्मानात्म-) विवेक कसा करता येइल ?(तसला ग्रंथ ऐकण्यास) दुराशेची भुतें बसलेली असावयाची व त्यांना अधोगतिच व्हावयाची.

ऐकोनिच फळश्रुती । पुढें तरि पावोंन म्हणती । तयां जन्म अधोगती । सहजचि जाली ॥ ३८॥

(ग्रंथाची) फलश्रुति एकूनच ती पुढें (पुढच्या जन्मीं) तरी आपणास भोगावयास मिळेल असें जें म्हणतात,त्यांस सहजच पुनर्जन्म (गर्भवासादि दुःखे भोगण्याची) अधोगति होते.(फलश्रुति ऐकतांच तोंडाला पाणी सुटून हें मला मिळावे अशी दुराशा उत्पन्न होणें हीच अधोगति)

नाना फळें पक्षी खाती । तेणेंचि तयां होय तृप्ति । परी त्या चकोराचे चित्तीं । अमृत वसे ॥ ३९॥

पक्षी अनेक फळे खातात आणि त्यातच तृप्त असतात.पण चकोर पक्षाच्या मनांत अमृताचा निदिध्यास असतो (पण चकोर त्याविषयी सस्पृह न होतां अमृताची इच्छा करुन असतो.)

तैसें संसारी मनुष्य । पाहे संसाराची वास । परी जे भगवंताचे अंश । ते भगवंत इच्छिती ॥ ४०॥

त्याप्रमाणें संसारी माणूस संसाराची इच्छा करतो,पण भगवंताचे अंश असतात ते भगवंताचीच इच्छा धरतात(संसारी माणसे संसारातल्या अनेक गोष्टींच्या वासना धरितात,पण देवाचें निष्कामभक्त देवाचीच वासना धरितात)

ज्ञानियास पाहिजे ज्ञान । भजकास पाहिजे भजन । साधकास पाहिजे साधन । इच्छेसारिखें ॥ ४१॥

ज्ञान्याला ज्ञान,भजकाला भजन,साधकाला साधन हें ज्याला त्याला आपल्या इच्छेप्रमाणें पाहिजें असतें,

परमार्थ्यास पाहिजे परमार्थ । स्वार्थ्यास पाहिजे स्वार्थ । कृपणास पाहिजे अर्थ । मनापासुनी ॥ ४२॥

परमार्थ्यास परमार्थ,स्वार्थी माणसास स्वार्थ,कंजूष मनुष्यास द्रव्य मनापासून पाहिजे असतें.

योगियास पाहिजे योग । भोगियास पाहिजे भोग । रोगियास पाहिजे रोग- । हरती मात्रा ॥ ४३॥

योग्यास योग,भोग्यास (विषयी जनास) विषयोपभोग व रोग्यास रोग नाहीसे करणारी मात्रा पाहिजे असतें,

कवीस पाहिजे प्रबंद । तार्किकास पाहिजे तर्कवाद । भाविकास संवाद । गोड वाटे ॥ ४४॥

कविला काव्यरचना,तार्किकास (नैय्यायिकांस) तर्कवाद आणि भाविकांस संवाद (ईशगुणानुवाद) गोड वाटतो.

पंडितास पाहिजे वित्पत्ती । विद्वानास अधेनप्रीती । कळावंता आवडती । नाना कळा ॥ ४५॥

पंडितास व्युत्पत्ति (विद्वत्ता) पाहिजें,विद्वानांचे प्रेम अध्ययनावर (अभ्यासावर) असतें व कला जाणणा-यांस अनेक कला आवडतात.

हरिदासां आवडे कीर्तन । सुचिस्मंतां संध्यास्नान । कर्मनिष्ठांस विधिविधान । पाहिजे तें ॥ ४६॥

हरिदासास कीर्तन आवडते,पवित्र पुरुषांस स्नानसंध्या आवडतें,व कर्मठास (कर्म करण्याची) शास्त्राज्ञा व शास्त्रोक्त पध्दति पाहिजें.

प्रेमळास पाहिजे करुणा । दक्षता पाहिजे विचक्षणा । चातुर्य पाहे शहाणा । आदरेंसीं ॥ ४७॥

प्रेमळास करुणा (करुणास्त्रोत्रे) आणि चिकित्सकास दक्षता पाहिजें असतें, व शहाणा माणूस चतुरता आदरपूर्वक पाहातो.

भक्त पाहे मूर्तिध्यान । संगीत पाहे ताळज्ञान । रागज्ञानी तान मान । मूर्च्छना पाहे ॥ ४८॥

भक्त मूर्तीचे ध्यान पाहातो, गायक असतो तो तालज्ञान (राग) पाहातो आणि रागदारीची माहिती असणारा ताल (स्वरविस्तार) व मूर्च्छना (प्रत्येक दोन स्वरातलें तीन तीन सूक्ष्म स्वरांश) पाहात असतो,

योगाभ्यासी पिंडज्ञान । तत्त्वज्ञासि तत्त्वज्ञान । नाडीज्ञानी मात्राज्ञान । पाहातुसे ॥ ४९॥

योगाभ्यासी शरीरज्ञान,तत्ववेता तत्वज्ञान व वैद्य (नाडीपरीक्षक) औषधें -मात्रांचे ज्ञान-पाहात असतो.

कामिक पाहे कोकशास्त्र । चेटकी पाहे चेटकीमंत्र । यंत्री पाहे नाना यंत्र । आदरेंसी ॥ ५०॥

विषयीमाणूस कामशास्त्र पाहात असतो,चेटकी मनुष्य चेटकाचें मंत्र पाहात असतो व यंत्री (शिल्पशास्त्री) अनेक यंत्रे आदरपूर्वक पाहातो.

टवाळां आवडे विनोद । उन्मतास नाना छंद । तामसास प्रमाद । गोड वाटे ॥ ५१॥

टवाळ्यास थट्टा (हास्यविनोद) व उन्मत्तास अनेक प्रकारचे चाळे आवडतात,आणि तामसी माणसास प्रमाद (गाफिलपणा) गोड वाटतो.

मूर्ख होय नादलुब्धी । निंदक पाहे उणी संधी । पापी पाहे पापबुद्धी । लावून अंगीं ॥ ५२॥

मूर्ख नादलुब्ध (छांदिष्ट) असतो,निंदक असतो तो कोठे उणे पडेल ही संधी पाहातो आणि (स्वतः) पापी असतो तो दुस-यावरही (दोषाचा) पापाचा आरोप करुं पाहात असतो.

येकां पाहिजे रसाळ । एकां पाहिजे पाल्हाळ । येकां पाहिजे केवळ । साबडी भक्ती ॥ ५३॥

कोणाला रसाळ (कथा-निरुपण) आवडतें,कोणाला पाहिजे असतो,कोणास भ़ोळी (साबडी) भक्ति पाहिजें असते.

आगमी पाहे आगम । शूर पाहे संग्राम । एक पाहती नाना धर्म । इच्छेसारिखे ॥ ५४॥

आगमी (वेदशास्त्र,किंवा तंत्र जाणणारा) आगम (वेद,शास्त्र किंवा तंत्र) पाहातो,शुर पुरुष युध्द संग्राम पाहातो,कोणी आपल्या इच्छेप्रमाणे अनेक धर्म पाहातात.

मुक्त पाहे मुक्तलीळा । सर्व पाहे सर्वकळा । ज्योतिषी भविष्य पिंगळा । वर्णूं पाहे ॥ ५५॥

मुक्त असतात तें मुक्तांच्या लीला पाहातात,सर्वज्ञ पुरुष सर्वच कळा पाहातो,(बहुश्रुताला बहु विषय आवडतात) व ज्योतिषी असतात ते भविष्य किंवा पिंगळ्याचें भाकित वर्णन करुं पाहातात.

ऐसें सांगावें तें किती । आवडीसारिखें ऐकती । नाना पुस्तकें वाचिती । सर्वकाळ ॥ ५६॥

असें किती सांगावें ?लोक आपल्या आवडीप्रमाणें सदोदित अनेक पुस्तकें वाचतात व ऐकतात,(प्रत्येकाची आपापल्या प्रिय विषयाच्या ठिकाणीं आवड असते.लोक आपापल्या आवडीप्रमाणें पुस्तकाची निवड करुन वाचत असतात)

परी परत्रसाधनेंविण । म्हणों नये तें श्रवण । जेथें नाहीं आत्मज्ञान । तया नांव कर्मणा ॥ ५७॥

( परत्रसाधनेंविण - परमार्थ साधनेशिवाय )

परंतु परलोकांचे साधन असल्याशिवाय त्याला श्रवण म्हणू नयें (ज्यापासून आत्मज्ञान होत नाही ते श्रवण नव्हे) ज्या ठिकाणी आत्मज्ञान नाही त्यांचे नाव करमणूक किंवा कालक्रमणाचा मार्ग,

गोडीविण गोडपण । नाकेंविण सुलक्षण । ज्ञानेंविण निरूपण । बोलोंचि नये ॥ ५८॥

( नाकेंविण सुलक्षण - सरळनाकाशिवाय सौदर्य )

गोडीशिवाय गोडपणा,नाकावांचून सौदर्य (जसें म्हणता येत नाही तसेच)आत्मज्ञानावांचून निरुपण असें म्हणूच नयें.(ज्ञानावाचूंन निरुपण व्यर्थ होय).

आतां असो हें बहुत । ऐकावा परमार्थ ग्रंथ । परमार्थग्रंथेंविण वेर्थ । गाथागोवी ॥ ५९॥

आतां हा विस्तार पुरे (तात्पर्य हें की) परमार्थाचा ग्रंथ ऐकावा.परमार्थाशिवाय बाकीचा गोंधळ (गाथागोवी)व्यर्थ होय.

म्हणोनि नित्यानित्य विचार । जेथें बोलिला सारासार । तोचि ग्रंथ पैलपार । पाववी विवेकें ॥ ६०॥

म्हणून नित्य काय व अनित्य काय,सार कोणतें व असार कोणंतें ह्याचा विचार ज्या ग्रंथात सांगितला आहें,तोच (ग्रंथ) विवेकाच्या योगानें (भवसमुद्राच्या) पैलतीरास पोंचवील-तो ग्रंथच तारक होय.

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके श्रवणनिरूपणं नाम नवमः समासः ॥ ९॥**

## समास दहावा : देहान्तनिरूपण श्रीराम ॥

मिथ्या तेंचि झालें सत्य । सत्य तेंचि जालें असत्य । मायाविभ्रमाचें कृत्य । ऐसें असे पाहतां ॥ १॥

जें मिथ्या आहें तेंच खरें होऊन बसलें आहे व सत्य आहे तेंच असत्य झालें आहें,असे हें मायाभ्रमाचे कृत्य होय,असें विचार पाहिल्यास कळून येईल.(जग मिथ्या असून सत्य वाटतें व ब्रह्म सत्य असून मिथ्या वाटतें हा मायेचा विभ्रम आहें)

सत्य कळाया कारणें । बोलिलीं नाना निरूपणें । तरी उठेना धरणें । असत्याचें ॥ २॥

सत्य (-स्वरुप) कळण्यासाठी अनेक निरुपणें सांगितली आहेत,तरी पण असत्याचे धरणें उठत नाहीं,तरी चित्तांत असत्य दृढ झाले तें जात नाही.

असत्य अंतरीं बिंबलें । न सांगतां तें दृढ जालें । सत्य असोन हारपलें । जेथील तेथें ॥ ३॥

असत्याचें निरुपण (कोणी) न सांगतांही मनांत बळकट बसलें आहें-अंतःकरणांत अगदी भिनून गेलें आहें आणि सत्य (परब्रह्म) असतांही जेथल्या तेथेंच हें हरवून गेले आहे.

वेद शास्त्रें पुराणें सांगती । सत्याचा निश्चयो करिती । तरी नये आत्मप्रचिती । सत्य स्वरूप ॥ ४॥

वेदं,शास्त्रे व पुराणें (ब्रह्मसंबंधानें) सत्य निश्चयपूर्वक सांगत आहेत,तथापि तें सत्य स्वरुप स्वतःच्या अनुभवास येत नाही,

सत्य असोन आच्छादलें । मिथ्या असोन सत्य जालें । ऐसें विपरीत वर्तलें । देखत देखतां ॥ ५॥

ब्रह्म शाश्वत सत्य असून झांकून गेले आहे आणि (दृश्य भास) हा मिथ्या (लटका) व नश्वर असून तो खरा झाला आहें,पाहाता पाहाता असा हा उलट प्रकार झाला आहे (अशी मायेची विपरीत करणी आहे)

ऐसी मायेची करणी । कळों आली तत्क्षणीं । संतसंगें निरूपणीं । विचार घेतां ॥ ६॥

संतांच्या संगतीत त्याच्या निरुपणाचा विचार केला असतां हा सर्व मायेचा खेळ आहे असे तात्काळ कळून येंतें.

मागां झालें निरूपण । देखिलें आपणासि आपण । तेणें बाणली खूण । परमार्थाची ॥ ७॥

पूर्वी जे निरुपण झाले त्यावरुन आपलें स्वरुप आपण पाहिलें (आत्मस्वरुपाची ओळख पटली) व तेणेंकरुन परमार्थाची खूण पटली.

तेणें समाधान जालें । चित्त चैतन्यीं मिळालें । निजस्वरूपें वोळखिलें । निजवस्तूसी ॥ ८॥

त्यामुळें समाधान झालें,चित्तचैतन्यांत मिळून गेलें आत्मस्वरुपानेंच (आत्मस्वरुप होऊन) आत्मवस्तूला ओळखले (हा अनुभव झाला).

प्रारब्धें टाकिला देहो । बोधें फिटला संदेहो । आतांचि पडो अथवा राहो । मिथ्या कळीवर ॥ ९॥

प्रारब्धावर देह (देहाचा व्यवहार) सोंपविला,(आत्मस्वरुपाच्या) ज्ञानाच्या योगाने संशय लोपला (बोधाने संदेह मावळला)(अशी स्थिति झाल्यावर) मग ज्ञात्याचें हे खोटे शरीर आतांच पडो किंवा राहो (त्याची फिकीर नाहीं)

ज्ञानियांचें जें शरीर । तें मिथ्यत्वें निर्विकार । जेथें पडे तेचि सार । पुण्यभूमी ॥ १०॥

ज्ञान्यानें शरीर मिथ्या मानल्यामुळे तें निर्वीकार असतें,जेथे ते पडेल तेंच स्थळ पवित्र व तीच पुण्यभूमि होय.

साधुदर्शनें पावन तीर्थ । पुरती त्यांचे मनोरथ । साधू न येतां जिणें वेर्थ । तया पुण्यक्षेत्रांचें ॥ ११॥

साधूच्या दर्शनाने तीर्थही पावन होतें,त्याचें मनोरथ पूर्ण होतात, तीर्थाच्या ठिकाणी साधु जर येणार नाही तर त्या पुण्यक्षेत्राचें जिणे व्यर्थ होय.

पुण्यनदीचें जें तीर । तेथें पडावें शरीर । हा इतर जनांचा विचार । साधु तोंचि नित्यमुक्त ॥ १२॥

(मुक्ति मिळावी ह्या हेतूंने) पवित्र नद्यांच्या ठिकाणी आपलें शरीर पडावें असा सामान्य लोकांचा विचार असतो,परंतु साधु नेहमींच मुक्त असतो.

उत्तरायण तें उत्तम । दक्षिणायन तें अधम । हा संदेहीं वसे भ्रम । साधु तो निःसंदेह ॥ १३॥

उत्तरायण तेवढे उत्तम,दक्षिणायन हें अधम (वाईट) असें वाटणें हा संशयी मनुष्याचा भ्रम होय,साधु तर निःसंशय असतो.

शुक्लपक्ष उत्तरायेण । गृहीं दीप दिवामरण । अंतीं रहावें स्मरण । गतीकारणें ॥ १४॥

(पुढे उत्तम गति होण्यासाठी) मृत्युसमयीं शुक्लपक्ष असावा,उत्तरायण असावें घरांत दिवा असावा,दिवसा मरण यावें व (मरतांना) शेवटी भगवंताचे स्मरण असावें (असें सामान्य लोकांचे मत असतें).

इतुकें नलगे योगियासी । तो जीतचि मुक्त पुण्यरासी । तिळांजुळी पापपुण्यासी । दिधली तेणें ॥१५॥

परंतु योग्यास (ज्ञानी भक्ताला) इतकें लागत नाहीं,कां कीं तो अतिशय पुण्यवान असल्यामुळे जिवंत असतांच मुक्त असतो,पाप व पुण्य ह्या दोन्हीवरही ह्यानें पाणी सोडलेले असते.

देहाचा अंत बरा आला । देह सुखरूप गेला । त्यास म्हणती धन्य जाला । अज्ञान जन ॥ १६॥

देहाचा शेवट चांगला झाला,देह सुखानें सुटला तो धन्य होय असें अज्ञानी लोक म्हणतात.

जनांचें विपरीत मत । अंतीं भेटतो भगवंत । ऐसें कल्पून घात । करिती आपुला स्वयें ॥ १७॥

जनांचे मत उलटें असतें,शेवटी (मरायच्या वेळी) परमेश्र्वर भेटतो अशी कल्पना करुन आपला आपण घात करुन घेतात.

जितां सार्थक नाहीं केलें । वेर्थ आयुष्य निघोन गेलें ।मुळीं धान्यचि नाहीं पेरिलें ।तें उगवेल कैंचें ॥१८॥

जिवंत असताना काही सार्थक न केल्यांने सर्व आयुष्य फुकट जातें (इश्र्वरभजनानें सार्थकता होते) मुळी धान्यच पेरलें नाही तर उगवणार कोठून ?

जरी केलें ईश्वरभजन । तरी तो होइजे पावन । जैसें वेव्हारितां धन । रासि माथां लाभे ॥ १९॥

पैशाची देवघेव केली (जैसे वेव्हारितां धन ) म्हणजें मुद्दलाची रास होऊन धन पुष्कळ वाढतें (जैसे वेव्हारितां धान्य ) धान्याची देवघेव केली म्हणजें वृध्दी होते, तद्वत इश्र्वराचें भजन केलें तरच मनुष्य पावन-पवित्र होईल.

दिधल्याविण पाविजेना । पेरिल्याविण उगवेना । ऐसें हें वाक्य जनां । ठाउकेंचि आहे ॥ २०॥

दिल्याशिवाय मिळत नाही व पेरल्याशिवाय उगवत नाही अशी म्हण लोकांस माहीतच आहे,

न करितां सेवेच्या व्यापारा । स्वामीस म्हणे कोठें मुशारा ।तैसें अंतीं अभक्त नरा ।स्वहित न घडे॥ २१॥

( मुशारा - मोबदला )

सेवेचा कोणताच उद्योग न करतां माझा पगार (मुशारा) कोठे आहें म्हणून धन्यास विचारणें (जसें व्यर्थ) तसे अभक्त (जन्मभर देवाची भक्ति न करणा-या ) माणसाला शेवटी (मरणाच्या वेळी) आपलें कल्याण करुन घेतां येत नाही.

जितां नाहीं भगवद्भक्ती । मेल्या कैंची होईल मुक्ती ।असो जे जे जैसें करिती ।ते ते पावती तैसें ॥२२॥

जिवंत असताना भगवद्भक्ति केली नाही तर मेल्यावर मुक्ति कशी मिळणार ? असो,जे जसें (कर्म) करतील तसें त्यांस (फळ) मिळेल.(जें जसें करितात तसें फळ पावतात.)

एवं न करितां भगवद्भजन ।अंतीं न होइजे पावन ।जरी आलें बरे मरण ।तरी भक्तिविण अधोगती ॥ २३॥

तात्पर्य (जिवंत असतां) भगवद्भजन केले नाही तर अंतकाळी पावन होत नाही.(लोकदृष्ट्या) चांगल्या प्रकारचें मरण आलें तरी भक्ति केली नसल्यामुळें अधोगतीच होते.

म्हणौन साधूनें आपुलें । जीत अस्तांच सार्थक केलें । शरीर कारणीं लागलें । धन्य त्याचें ॥ २४॥

म्हणून साधु जिवंत असतांच आपले सार्थक करुन घेतो.त्याचे शरीर (परमेश्र्वराच्या) कारणी लागल्यामुळे तें धन्य होय.

जे कां जीवन्मुक्त ज्ञानी । त्यांचें शरीर पडो रानीं । अथवा पडो स्मशानीं । तरी ते धन्य जाले ॥ २५॥

जें जीवन्मुक्त ज्ञानी आहेत त्यांचे शरीर रानांत पडलें किंवा स्मशानात पडलें तरी तें धन्य होय.

साधूंचा देह खितपला । अथवा श्वानादिकीं भक्षिला । हें प्रशस्त न वाटे जनांला । मंदबुद्धीस्तव ॥ २६॥

साधूचा देह खितपत पडला अथवा कुत्रे वगैरनीं खाल्ला तर (सामान्य) लोकांस मंदबुध्दीमुळें प्रशस्त वाटत नाही.

अंत बरा नव्हेचि म्हणोन । कष्टी होती इतर जन । परी ते बापुडे अज्ञान । नेणती वर्म ॥ २७॥

अंतःकाळ चांगल्या प्रकारें झाला नाही म्हणून सामान्य लोकांस वाईट वाटते,पण तें बिचारे अज्ञानी-त्यांना खरे वर्म माहीत नसतें.

जो जन्मलाच नाहीं ठाईचा । त्यास मृत्यु येईल कैंचा ।विवेकबळें जन्ममृत्यूचा ।घोट भरिला जेणें ॥ २८॥

आत्मानात्म विवेकाच्या बळानें ज्यानें जन्ममृत्यूस ठार मारले (घोट भरिला),(किंबहुना) जो मुळी जन्मालाच आला नाही,त्याला मरण कोठून येणार ?

स्वरूपानुसंधानबळें । सगळीच माया नाडळे । तयाचा पार न कळे । ब्रह्मादिकांसी ॥ २९॥

आत्मस्वरुपाच्या ठिकाणी त्यांचा लय लागल्यामुळें त्या अनुसंधानाच्या बळावर सर्व मायाच त्याला आढळेनाशी होते,त्याचा अंत ब्रह्मादिकांना सुध्दा लागत नाही.

तो जितचि असतां मेला । मरणास मारून ज्याला । जन्म मृत्यु न स्मरे त्याला । विवेकबळें ॥ ३०॥

तो जिवंत असतानाच मेलेला असतो (देह वागताना) दिसतो,पण शवाची आशा धरीत नाही,त्याप्रमाणें तो आपल्या देहाविषयी निराश असतो आणि मरणाला मारुन (ज्याला) जिवंत असतो,विवेकाच्या योगानें त्याला जन्ममृत्यूचें स्मरणही राहात नाही.

तो जनीं दिसतो परी वेगळा । वर्ततां भासे निराळा । दृश्य पदार्थ त्या निर्मळा । स्पर्शलाचि नाहीं ॥ ३१॥

लोकांमध्ये वागत असतांही तो लोकांहून वेगळा आहेसा भासतो,त्याच्या निर्मळ स्वरुपाला दृश्य पदार्थ स्पर्श करीत नाही,

असो ऐसे साधु जन । त्यांचें घडलिया भजन । तेणें भजनें पावन । इतर जन होती ॥ ३२॥

अशा सत्पुरुषांची सेवा (भजन भक्ति) इतर लोकांस घडल्यास तेही पावन होतात,

सद्गुरूचा जो अंकित साधक । तेणें केलाचि करावा विवेक । विवेक केलिया तर्क । फुटे निरूपणीं ॥ ३३॥

जो सद्गुरुंच्या आज्ञेत वागणारा साधक असेल,त्यानें (वेदान्त विषयाचा) विचार एकदा केलेलाच पुन्हा करावा,असा विवेक केल्यास पुढें निरुपणसमयी (तर्क) स्फूर्ति उत्पन्न होऊ लागतें (सद्गुरुचा जो अंकित त्याने विवेकपूर्वक अध्यात्म श्रवण करावें म्हणजें मननानें तो अर्थरुप होईल)

हेंचि साधकासी निरवणें । अद्वैत प्रांजळ निरूपणें । तुमचेंहि समाधान बाणे । साधूच ऐसें ॥ ३४॥

( निरवणें - सांगणे )

अद्वैताचे प्रांजळपणानें निरुपण करीत जा,म्हणजे तुमच्याही ठिकाणी साधूप्रमाणेंच समाधान बाणेल हेंच साधकांस शेवटचें सांगणें आहें (सच्छिष्यांना-साधकांना-शेवटचे हेंच सांगणें आहें की संतांना शरण जा व तन्मुखांनी अध्यात्म श्रवण करा म्हणजे तुम्हीही संतच होऊन लोकोध्दारास समर्थ व्हाल.

जो संतांस शरण गेला । तो संतचि होऊन ठेला । इतर जनांस उपेगा आला । कृपाळूपणें ॥ ३५॥

जो संतास शरण जातो तो स्वतः संतच बनतो,इतकेच नव्हे,तर दयाळूपणानें इतरांच्याही उपयोगी पडतो.

ऐसें संतांचें महिमान । संतसंगें होतें ज्ञान । सत्संगापरतें साधन । आणिक नाहीं ॥ ३६॥

असा संतांचा महिमा आहें,संतसंगतीने आत्मज्ञान प्राप्त होते म्हणून संतसंगापेक्षा श्रेष्ठ असें दुसरे साधन नाही.

गुरुभजनाचेनि आधारें । निरूपणाचेनि विचारें । क्रियाशुद्ध निर्धारें । पाविजे पद ॥ ३७॥

गुरुसेवेच्या,गुरुभक्तीच्या आधारानें,निरुपणाच्या विचारानें व क्रियाशुध्द (आचारशुध्द) राहून निर्धारानें (निश्र्चयात्मक ज्ञानानें) तुम्हाला मोक्षपद मिळेल.

परमार्थाचें जन्मस्थान । तेंचि सद्गुरूचें भजन । सद्गुरुभजनें समाधान । अकस्मात बाणे ॥ ३८॥

सद्गुरुंची सेवा हेंच परमार्थाचे जन्म-(आरंभ)-स्थान आहे.सद्गुरुंसेवेच्या योगाने समाधान अकस्मात बाणतें,(सद्गुरुंभजनाने परमार्थबुध्दि विकास पावतें व सहज समाधान प्राप्त होते).

देह मिथ्या जाणोनि जीवें । याचें सार्थकचि करावें । भजनभावें तोषवावें । चित्त सद्गुरूचें ॥ ३९॥

देह क्षणभंगुर आहे असें अंतःकरणपूर्वक जाणून भावभक्तीनें सद्गुरुंच्या चित्ताचा संतोष करावा व देहाचें सार्थक करावें.

शरणागताची वाहे चिंता । तो एक सद्गुरु दाता । जैसें बाळका वाढवी माता । नाना यत्नेंकरूनी ॥ ४०॥

आई आपल्या लेकरास हरप्रयत्नानें जसे वाढवीत असतें तसेंच शरण आलेल्यांची चिंता वाहाणारे (त्याच्या परमार्थाची वाढ करणारे) दाते असे एक सद्गुरुंच होत. (आई आपल्या लेकराला अनेक सायास करुन वाढविते तसे सद्गुरुं अनन्य भक्तांची चिंता वाहातात).

**यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥**

म्हणोनि सद्‌गुरूचें भजन । जयासि घडे तोचि धन्य । सद्‌गुरुविण समाधान । आणीक नाहीं ॥ ४१॥

म्हणून ज्याला सद्गुरुंसेवा घडेल-जो सद्गुरुंभजन करील-तोच धन्य होय,सद्गुरुंवाचूंन दुसरे समाधान नाही (सद्गुरुंभजनापरतें दुसरे समाधान नाही).

सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट । येथें सांगितलें स्पष्ट । सद्‌गुरुभजन ॥ ४२॥

आतां शब्दांची खटपट संपली (शब्दांनी सांगायचे ते संपले) व ग्रंथाचा (विषयाचाही) शेवट आला येथे सद्गुरुंभजन (हेंच मुख्य साधन होय असें) स्पष्टपणें सांगितले.

सद्‌गुरुभजनापरतें कांहीं । मोक्षदायक दुसरें नाहीं । जयांस न मने तेहीं । अवलोकावी गुरुगीता ॥ ४३॥

सद्गुरु भजनापेक्षां मोक्ष देणारे दुसरे काही साधन नाही,हे ज्यास मान्य नसेल त्यांनी गुरुगीता पहावी.

तेथें निरूपिलें बरवें । पार्वतीप्रति सदाशिवें । याकारणें सद्भावें । सद्‌गुरुचरण सेवावे ॥ ४४॥

तींत सदाशिवांनी पार्वतीला (सद्गुरु भजनाचें महत्व) चांगल्याप्रकारे सांगीतले आहे,म्हणून परमभक्तीने सद्गुरु चरणसेवा करावी.

जो ये ग्रंथींचा विवेक । विवंचूनि पाहे साधक । तयास सांपडे येक । निश्चय ज्ञानाचा ॥ ४५॥

जो साधक विवेकाने ह्या ग्रंथाचे मनन करुन पाहील,त्याला आत्मज्ञानाचा एक निश्चय (निश्चयात्मक आत्मज्ञान) सांपडेल.

ज्या ग्रंथीं बोलिलें अद्‌वैत । तो म्हणूं नये प्राकृत । सत्य जाणावा वेदांत । अर्थाविषईं ॥ ४६॥

ज्या ग्रंथात अद्वैताचे निरुपण केलें आहें-अद्वैतज्ञान स्पष्ट सांगितले आहे-तो ग्रंथ प्राकृत म्हणून उपेक्षू नयें अर्थाच्या संबंधाने तो खरोखरच वेदांत होय.

प्राकृतें वेदांत कळे । सकळ शास्त्रीं पाहतां मिळे । आणि समाधान निवळे । अंतर्यामीं ॥ ४७॥

प्राकृत भाषेंतील निरुपणानेंही वेदांतासारखा कठिण विषय कळतो,सर्व शास्त्रांशी त्याचा मेळ बसतो,आणि अंतःकरणात समाधान बाणते.

तें प्राकृत म्हणों नये । जेथें ज्ञानाचे उपाये । मूर्खासि हें कळे काये । मर्कटा नारिकेळ जैसें ॥ ४८॥

तर ज्यायोगानें आत्मज्ञानाचे असे मार्ग कळतात,त्याला प्राकृत म्हणू नयें,परंतु माकडाच्या हाती नारळ दिल्याप्रमाणें मूर्खाला ते काय कळणार ?(हे म्हणणे कळले नाही तर न कळो).

आतां असो हें बोलणें । अधिकारपरत्वें घेणें । शिंपीमधील मुक्त उणें । म्हणों नये ॥ ४९॥

आतां हें बोलणें पुरे ज्याने त्याने आपल्या अधिकाराप्रमाणे हें घ्यावें. मोती शिंपीमध्ये असते म्हणून त्यास (शिंपीसारखे) हलके समजू नयें.

जेथें नेति नेति म्हणती श्रुती । तेथें न चले भाषाव्युत्पत्ती । परब्रह्म आदि अंतीं । अनिर्वाच्य ॥ ५०॥

वेदही जेथे नेति नेति (न इति न इति) असें म्हणतात-हात टेकतात,तेथे भाषा किंवा विद्वत्ता ह्यांचे काहीच चालत नाही,असे ते परब्रह्म आदिअंती अनिर्वाच्य-शब्दातीत-आहे (त्याचे वर्णन करतां येत नाही.)

**हरि ॐ तत्सत् इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सप्तमदशके देहातीतनिरूपणं नाम दशमः समासः ॥ १०॥**
**॥ दशक सातवा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक आठवा - ज्ञानदशक मायोद्भवाचा



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक आठवा : मायोद्भव समास पहिला : देवदर्शन ॥ श्रीराम ॥**

श्रोतीं व्हावें सावध । विमळ ज्ञान बाळबोध । गुरुशिष्यांचा संवाद । अति सुगम परियेसा ॥१॥

( परियेसा - लहान मुलानाही समजेल )

श्रोत्यांनीं सावध होऊन बाळबोध रीतींने निर्मल ज्ञान ज्यांत सांगितले आहे,असा अतिशय सुलभ गुरुशिष्यांचा संवाद श्रवण करावा.(बाळांना म्हणजें मतिमंद अज्ञान्यांना कळेल असा बोध (विमल ज्ञान) येथे सांगायचा आहे.)

नाना शास्त्रें धांडोळितां । आयुष्य पुरेना सर्वथा । अंतरी संशयाची वेथा । वाढोंचि लागे ॥ २ ॥

अनेक शास्त्रें धुंडीत बसले तर आयुष्य पुरणार नाही.पण अंत:करणामध्यें संशयाचे दुखणें तर वाढतच जातें (व मन अधिकाधिक संशयारुढ होतें)

नाना तीर्थें थोरथोरें । सृष्टिमध्यें अपारें । सुगमें दुर्गमें दुष्करें । पुण्यदायकें ॥३॥

मोठमोठीं पुण्यदायक तीर्थे सृष्टीमध्ये असंख्य आहेत,त्यांत कित्येक सुगम (साधी),कित्येक अवघड (दुर्गम) व काहीं दुष्कर आहेत.

ऐसीं तीर्थें सर्वहि करी । ऐसा कोण रे संसारी । फिरों जातां जन्मवरी । आयुष्य पुरेना ॥ ४ ॥

असलीं हीं सगळीं तीर्थे करणारा असा ह्या संसारामध्ये कोण आहे बरें ? (हीं सगळी तीर्थे) जन्मभर फिरावयाचें म्हटलें तर आयुष्य पुरणार नाहीं.

नाना तपें नाना दानें । नाना योग नाना साधनें । हें सर्वहि देवाकारणें । करिजेत आहे ॥ ५ ॥

अनेक प्रकारची तपें,दानें,योग,साधनें इत्यादि सर्व काहीं देवाचें (प्राप्ति)साठी करतात.

पावावया देवाधिदेवा । बहुविध श्रम करावा । तेणें देव ठाईं पाडावा । हें सर्वमत ॥ ६ ॥

देवाधिदेवाची प्राप्ति होण्यासाठीं पुष्कळ श्रम करावें व त्या योगानें तो आपलास करावा,असें सर्व लोकांचे मत असतें.

पावावया भगवंतातें । नाना पंथ नाना मतें । तया देवाचें स्वरूप तें । कैसे आहें ॥ ७ ॥

ज्या भगवंताची प्राप्ति करुन घेण्यासाठीं अनेक पंथ व अनेक मतें निर्माण झालीं त्याचें स्वरुप तरी कसें आहें ?(तर तो देव कसा आहें ?)

बहुत देव सृष्टीवरी । त्यांची गनना कोण करी । येक देव कोणेपरी । ठाईं पडेना ॥ ८ ॥

ह्या सृष्टीत पुष्कळ देव आहेत,मोजदाद कोणास करतां येईल ? (त्यातून) एक (मुख्य) देव कोणता हें काही केल्या समजत नाहीं (पण एक देव कसा मिळावा ?)

बहुविध उपासना । ज्याची जेथें पुरे कामना । तो तेथेंचि राहिला मना । सदृढ करूनि ॥ ९ ॥

अनेक प्रकारच्या उपासना आहेत.ज्याची ज्या ठिकाणीं इच्छा पूर्ण होते तो तेथेच मन (दृढतापूर्वक) लावून बसतो.

बहु देव बहु भक्त । इच्छया जाले आसक्त । बहु ऋषी बहु मत । वेगळालें ॥ १० ॥

देव पुष्कळ आहेत आणि इच्छेत गुंतलेले त्यांचे भक्तही पुष्कळ आहेत,तसेच ऋषिही पुष्कळ आहेत आणि त्यांची मतेही वेगवेगळी आहेंत,तसेंच ऋषिही पुष्कळ आहेत आणि मतेंही वेगवेगळी,

बहु निवडितां निवडेना । येक निश्चय घडेना । शास्त्रें भांडती पडेना । निश्चय ठाईं ॥ ११ ॥

कितीही निवडानिवडी केली तरी खरें निघत नाहीं व एक निश्र्चय होत नाही,शास्त्रांचे तर भांडण लागलें आहें.त्यांचे एकमत होत नाही .

बहुत शास्त्रीं बहुत भेद । मतांमतांस विरोध । ऐसा करितां वेवाद । बहुत गेले ॥ १२ ॥

अनेक शास्त्रे व त्यांचे भेदही अनेक आहेत.मतामतांमध्ये विरोध आहें असा वाद करतां करतां पुष्कळ लोक होऊन गेलें.

सहस्त्रामधें कोणी येक । पाहे देवाचा विवेक । परी त्या देवाचें कौतुक । ठाईं न पडे ॥ १३ ॥

हजारों लोकांवर कोणी एखादाच त्या (मुख्य) देवाचा विचार करितो,पण त्या देवाचे कौतुक (लीला) त्याला काही कळत नाहीं (-पण देवांचे कौतुक कळणें दुर्घट आहे असें म्हटलें तरी अहंता जडते व देव दूरच राहातो.

ठाई न पडे कैसें म्हणतां । तेथें लागली अहंता । देव राहिला परता । अहंतागुणें ॥ १४ ॥

( परता - अप्राप्य )

पण देव कळत नाही (ठाई न पडे) असें कसें म्हणावें ?(कारण मताभिमानानें) देहाचा अभिमान पाठीस लागतो व त्या अभिमानामुळें देव लांबच राहातो.

आतां असो हें बोलणें । नाना योग ज्याकारणें । तो देव कोण्या गुणें । ठाईं पडे ॥ १५ ॥

आंता हें बालणें पुरे,अनेक प्रकारचे योग ज्यासाठी करावयाचें तो देव कोणत्या उपायानीं प्राप्त होईल (ठाईं पडेल) ?

देव कोणासी म्हणावें । कैसें तयासी जाणावें । तेंचि बोलणें स्वभावें । बोलिजेल ॥ १६ ॥

देव कोणाला म्हणावें व त्याला कसें जाणावें तेंच आता ओघानें सांगतों.

जेणें केले चराचर । केले सृष्ट्यादि व्यापार । सर्वकर्ता निरंतर । नाम ज्याचें ॥ १७ ॥

ज्याने हें चराचर उत्पन्न करुन सृष्टी इत्यादिकाचें व्यापार चालवलें आहेंत,सकलकर्ता हें ज्याचें नांव निरंतर चाललें आहें.

तेणें केल्या मेघमाळा । चंद्रबिंबीं अमृतकळा । तेज दिधलें रविमंडळा । जया देवें ॥ १८ ॥

ज्या देंवानें मेघांच्या माळा उत्पन्न केल्या,चंद्रबिंबाच्या ठिकाणी अमृताच्या कळा ठेविल्या आणि सूर्यमंडळाला तेज दिलें,

ज्याची मर्यादा सागरा । जेणें स्थापिलें फणिवरा । जयाचेनि गुणें तारा । अंतरिक्ष ॥ १९ ॥

ज्यानें समुद्रास मर्यादा घालून दिली,शेषाची स्थापना केली,(पृथ्वीला शेषाच्या मस्तकावर ठेविली) व ज्याच्या योंगानें आकाशांत तारका आहेत (अंतरिक्षांत नक्षत्र-तारांना स्थानें देऊन कामास लावलें)

च्यारी खाणी च्यारी वाणी । चौर्यासि लक्ष जीवयोनी । जेणें निर्मिले लोक तिनी । तया नाव देव ॥ २० ॥

(अंडज,जारज,स्वेदज व उद्विज्ज अशा) चार खाणी व (परा,पश्यंती,मध्यमा,व वैखरी अशा) चार वाणी (चार खाणी चारी वाणींचे अनंत जीव निर्माण केले) ८४ लक्ष जीवसृष्टि व तिन्ही लोक ज्यानें निर्माण केले,त्याचें नांव देव.

ब्रह्मा विष्णु आणी हर । हे जयाचे अवतार । तोचि देव हा निर्धार । निश्चयेंसीं ॥ २१ ॥

ब्रह्मा,विष्णु व शंकर हें ज्याचें अवतार तोच देव हा निश्र्चयेंकरुन निर्णय.

देव्हाराचा उठोनि देव । करूं नेणे सर्व जीव । तयाचेनि ब्रह्मकटाव । निर्मिला न वचे ॥ २२ ॥

सिध्दांत: (आपल्या घरच्या) देव्हा-यातल्या देवानें उठून हें सर्व जीव काहीं निर्माण केलेले नाहीत,त्यांच्याने अनंत ब्रह्मांडाचे गोल उत्पन्न होऊ शकत नाहीत.

ठाईं ठाईं देव असती । तेहिं केली नाहीं क्षिती । चंद्र सूर्य तारा जीमूती । तयांचेनि नव्हे ॥ २३ ॥

( तारा जीमूती - तारे व मेघ )

तसेंच जागोजाग देव आहेत,त्यांनी ही पृथ्वी निर्माण केली नाही, किंवा च्रंद्र,सूर्य,तारा,मेघ,(जीमूती) हेही त्यांच्याने झाले नाहींत.

सर्वकर्ता तोचि देव । पाहों जातां निरावेव । ज्याची कळा लीळा लाघव । नेणती ब्रह्मादिक ॥ २४ ॥

( निरावेव - निरवयव )

हें सर्व ज्यानें केले तोच देव (तोच सर्वकर्ता देव),पाहूं गेले तर तो निरवयव (निराकार) आहें (त्याला अवयव नाहीत),(परंतु) (त्याची सृष्टि उत्पन्न करण्याची) कला,(सृष्टींत असणारी) त्याची लीला व सृष्टि चालवण्याचें त्याचे कौतुक ही ब्रह्मादि देंवासही कळत नाहीत.

येथें आशंका उठिली । ते पुढिलीये समासीं फिटली । आतां वृत्ती सावध केली । पाहिजे श्रोतीं ॥ २५ ॥

येथे एक शंका उत्पन्न होते (आतां निरववयी चराचर कसें झालें ह्याचा विचार-) तिचें निरसन पुढील समासांत होईल,आतां श्रोत्यांनी सावधवृत्तीने (प्रस्तुत निरुपणाकडे) लक्ष द्यावें.

पैस अवकाश आकाश । कांहींच नाहीं जें भकास । तये निर्मळीं वायोस । जन्म जाला ॥ २६ ॥

पैस-अवकाश-आकाश-काहीं नाही (शून्य) भकास निर्मळ असें आकाश आहें त्या आकाशापासून-त्या निर्मळाच्या ठिकाणी वायु उत्पन्न झाला.

वायोपासून जाला वन्ही । वन्हीपासुनी जालें पाणी । ऐसी जयाची करणी । अघटित घडली ॥ २७ ॥

( वन्ही - अग्नी )

वायूपासून अग्नि (तेज) व अग्नीपासून पाणी उत्पन्न झालें अशी ज्याची करणी अघटित आहें.

उदकापासून सृष्टि जाली । स्तंभेविण उभारली । ऐसी विचित्र कळा केली । त्या नाव देव ॥ २८ ॥

पाण्यापासून पृथ्वी झाली,व ती खांबावाचून उभी केली,अशी ज्याची अदभूत कला आहे त्याचे नाव देव.

देवें निर्मिली हे क्षिती । तीचे पोटीं पाषाण होती । तयासचि देव म्हणती । विवेकहीन ॥ २९ ॥

( क्षिती - पृथ्वी )

देवांने ही पृथ्वी (क्षिति) उत्पन्न केली,तिच्या पोटीं पाषाण झालें,त्या पाषाणापासूनच (पाषाणमूर्तीसच) अविचारी लोक देव म्हणतात.

जो सृष्टिनिर्माणकर्ता । तो ये सृष्टीपुर्वी होता । मग हे तयाची सत्ता । निर्माण जाली ॥ ३० ॥

जो ही सृष्टी निर्माण करणारा तो ह्या सृष्टीपूर्वी होता आणि नंतर ही (सृष्टि निर्मिण्याची) त्याची सत्ता उत्पन्न झाली (सृष्टिनिर्माणकर्ता सृष्टीच्या पूर्वीचा हें तर उघड आहे ना?)

कुल्लाळ पात्रापुर्वी आहे । पात्रें कांहीं कुल्लाळ नव्हे । तैसा देव पूर्वीच आहे । पाषाण नव्हे सर्वथा ॥ ३१ ॥

( कुल्लाळ - कुंभार )

गाडग्याच्या आधी कुंभार (कुलाल) असतो आणि गाडगी म्हणजें कुंभार नव्हे तसा देव (सृष्टि) पूर्वीच आहें. (मडकी घडविणारा कुंभार जसा मडक्यापूर्वी तसा देव सृष्टीपुर्वीचा,सृष्टीच्या पोटी निघणा-या पाषाणांपूर्वीचा आहे)(सृष्टीतला)पाषाण कधीही देव होणार नाही.

मृत्तिकेचें शैन्य केलें । कर्ते वेगळे राहिले । कार्यकारण येक केलें । तरी होणार नाहीं ॥ ३२ ॥

मातीचे सैन्य केले (शिपाई,हत्ती,घोडे,वगैरेची चित्रे केली),आणि तें उत्पन्न करणारा कुंभार अर्थात वेगळा असतो,कार्य -मातीचें सैन्य व कारण-कुंभार हे दोन्ही एक केले तरी होणार नाहीत (कार्यकारण एक होत नाहीत)

तथापि होईल पंचभूतिक । निर्गुण नव्हे कांहीं येक । कार्याकारणाचा विवेक । भूतांपरता नाहीं ॥ ३३ ॥

( भूतांपरता - पंचमहाभूतापलीकडे )

तथापि ह्या ठिकाणीं कार्य व कर्ता ही दोन्ही पंचभूतात्मक असल्यामुळे एक आहेत असे म्हणावें हवें तर,परंतु निर्गुणाच्या ठिकाणी असलें ऐक्य नाहीं,पंचभूतांपलीकडे म्हणजे निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी कार्यकारणसंबंध नाहीं(-पण कार्य-कारण संबंध पंचभूतांपलीकडलें,निर्गुण ब्रह्माकडे नेता येत नाही)

अवघी सृष्टि जो कर्ता । तो ते सृष्टीहूनि पर्ता । तेथें संशयाची वार्ता । काढूंचि नये ॥ ३४ ॥

( पर्ता - निराळा )

जो ही सर्व सृष्टि उत्पन्न करणारा तो त्या सृष्टीहून वेगळा आहें,ह्याविषयी संशयाचे नांव सुध्दा काढू नयें (सृष्टि कर्ता सृष्टीपलीकडचा ह्या विषयी संशयही बाळगू नये.)

खांबसूत्रींची बाहुली । जेणें पुरुषें नाचविली । तोचि बाहुली हे बोली । घडे केवी ॥ ३५ ॥

( खांबसूत्रींची - कळसूत्रीची )

कळसुत्री (खांबसुत्री) बाहुली ज्या पुरुषानें नाचविली तो पुरुषच ती बाहुली होय हे म्हणणे कधीतरी शोभेल काय ?(कळसूत्री बाहुली वेगळी व ती नाचविणारा वेगळा)

छायामंडपीची सेना ।सृष्टिसारिखीच रचना । सूत्रें चाळी परी तो नाना । वेक्ति नव्हे ॥ ३६ ॥

पडद्याच्या आंतील दिव्याच्या प्रकाशानें पडद्यावर कातरुन लावलेल्या पशु-पक्षी-मनुष्य इत्यादिकांच्या चित्रांची छाया पाडली असतां (सिनेमाच्या खेळातल्याप्रमाणे) ती चित्रे मोठी व प्रत्यक्ष सृष्टिरचनेप्रमाणेंच हुबेहूब मूळच्यासारखी दिसतात (तीं वेगळी) व त्या चित्रांची सूत्रे चालविणारा इसम म्हणजें तीं अनेक चित्रें नव्हेत, सूत्रधार वेगळा.

तैसा सृष्टिकर्ता देव । परी तो नव्हे सृष्टिभाव । जेणें केले नाना जीव । तो जीव कैसेनी ॥ ३७ ॥

त्याप्रमाणे सृष्टि उत्पन्न करणारा जो देव आहें तो सृष्टिरुप नाही,ज्याने अनेक जीव उत्पन्न केले तो स्वतः जीव कसा असेल ?

जें जें जया करणें पडे । तें तें तो हें कैसें घडे । म्हणोनि वायांचि बापुडे । संदेहीं पडती ॥ ३८ ॥

जों जें करतो,तो (कर्ता) ते ते (कार्य) आहे असें कसें होईल ?म्हणून कित्येक बिचारे विनाकारण संशयात पडतात.(जो जे करतो तो त्याहून वेगळा असतो)

सृष्टि ऐसेंचि स्वभावें । गोपुर निर्मिलें बरवें । परी तो गोपुर कर्ता नव्हे । निश्चयेसीं ॥ ३९ ॥

( गोपुर - देवालयाच्या पुढील दरवाज्यावरील मजले )

सृष्टिप्रमाणेंच गोपुर (देवळाच्या पुढील दरवाज्यावर मजले असतात ते) चांगले तयार केलेले असतें,पण गोपुर म्हणजे करणारा (कारागीर) नव्हे हे खास (गोपुर उभारणारा काही गोपुर नव्हे)

तैसें जग निर्मिलें जेणें । तो वेगळा पूर्णपणें । येक म्हणती मूर्खपणें । जग तोचि जगदीश ॥ ४० ॥

त्याचप्रमाणें ज्याने जग निर्माण केले तो जगाहून पूर्ण वेगळा आहें जग तो जगदीश होय असें कोणी मूर्खपणानें म्हणतात (तसा जगनिर्माणकर्ता जगदीश नव्हे)

एवं जगदीश तो वेगळा । जग निर्माण त्याची कळा । तो सर्वांमधें परी निराळा । असोन सर्वी ॥ ४१ ॥

तात्पर्य जगदीश हा जगाहून निराळा आहे उत्पन्न झालेले जग ही त्या कर्त्याची लीला आहे तो सर्वांमध्ये असून सगळ्यांहून वेगळा आहें, (जगदीश सर्व जगांत-सृष्टीत असतो,पण तो जगाहून वेगळा)

म्हणोनि भूतांचा कर्दमु । यासी अलिप्त आत्मारामु । अविद्यागुणें मायाभ्रमु । सत्यचि वाटे ॥४२ ॥

म्हणून पंचभूतांचा कर्दम (मिश्रण,चिखल)(जें जग) त्याहून आत्माराम (अलिप्त) वेगळा आहे,अविद्येमुळें (अज्ञानामुळें) माया-भ्रम (जग) खरे आहे असे वाटतें.(अविद्येमुळे मायाभ्रम सत्य वाटतो)

मायोपाधी जगडंबर । आहे सर्वहि साचार । ऐसा हा विपरीत विचार । कोठेंचि नाहीं ॥ ४३ ॥

पण मायोपाधि जगडंबर सत्य आहे असें कोठेही म्हटलेले नाहीं.

म्हणोनि जग मिथ्या साच आत्मा । सर्वांपर जो परमात्मा । अंतर्बाह्य अंतरात्मा । व्यापूनि असे ॥ ४४ ॥

म्हणून जग मिथ्या व आत्मा (ब्रह्म) सत्य आहे जो सर्वांच्या पलीकडे परमात्मा तोच अंतरात्मा होय,तो ह्या (सर्वसृष्टीला) अंर्तबाह्य व्यापुन आहे (तो परमात्मा सर्वांत्पर आहे,सृष्टीला व अंतरात्म्याला -प्रतिबिंबित जीवसृष्टिला-व्यापून आहे.)

तयास म्हणावें देव । येर हें अवघेंचि वाव । ऐसा आहे अंतर्भाव । वेदांतीचा ॥ ४५ ॥

त्यास देव म्हणावे,बाकीचे हे सगळेच व्यर्थ होय (त्यावाचून बाकी सर्व मिथ्या आहे) असा वेदांत शास्त्राचा अभिप्राय आहें.

पदार्थवस्तु नासिवंत । हें तों अनुभवास येत । याकारणें भगवंत । पदार्थावेगळा ॥ ४६ ॥

प्रत्येक पदार्थ किंवा वस्तु नाशवंत आहें हा तर प्रत्यक्ष अनुभव आहें,म्हणून भगवंत हा पदार्थांदिकांहून निराळा आहें,(परमात्मा सर्व पदार्थाहून वेगळा आहें)

देव विमळ आणी अचळ । शास्त्रें बोलती सकळ । तया निश्चळास चंचळ । म्हणों नये सर्वथा ॥ ४७ ॥

देव निर्मळ व निश्र्चळ आहे असे सर्व शास्त्रे सांगतात,त्या निश्र्चळ देंवास चंचळ असें केव्हाही म्हणू नये.

देव आला देव गेला । देव उपजला देव मेला । ऐसें बोलतां दुरिताला । काय उणें ॥ ४८ ॥

देव आला व गेला,देव उपजला व मेला असें म्हटल्यास पापाला काय तोटा आहें ?( ही भाषा देवासंबंधीं वापरण्यांत पाप आहें)

जन्म मरणाची वार्ता । देवास लागेना सर्वथा । देव अमर ज्याची सत्ता । त्यासी मृत्यु कैसेनी ॥ ४९ ॥

जन्ममरणाचे नावही देवा-(परब्रह्मा-)जवळ नाही,ज्याच्या सत्तेने इंद्रादि देव अमर आहेत,त्या देवाधिदेवाला मृत्यु कसा येईल ?

उपजणें आणी मरणें । येणें जाणें दुःख भोगणें । हें त्या देवाचें करणें । तो कारण वेगळा ॥ ५० ॥

उपजणें,मरणें,येणे,जाणें दु:ख भोगणें हे सर्व त्या देवाचें करणें आहे.तो देव ह्याचे कारण असून ह्या कारणांहून (कार्याहून) वेगळा आहे.

अंतःकरण पंचप्राण । बहुतत्वीं पिंडज्ञान । यां सर्वांस आहे चळण । म्हणोनि देव नव्हेती ॥ ५१ ॥

अंतःकरण,पंचप्राण वगैरे अनेक तत्वांचे शरीर किंवा ज्ञान (महाकारण देह) ह्यास चलन असल्यामुळें ती काही देव नव्हेत (कारण ही चंचळ व देव निश्र्चळ आहे.)

येवं कल्पनेरहित । तया नाव भगवंत । देवपणाची मात । तेथें नाहीं ॥ ५२ ॥

तात्पर्य,कल्पनेच्याही जो पलीकडें आहें त्यास भगवंत म्हणावें,देवपणाची गोष्टही तेथे नाही (कारण देवपण ह्यात कल्पना आली,देव तर कल्पनारहित)

तव शिष्यें आक्षेपिलें । तरी कैसें ब्रह्मांड केलें । कर्तेपण कारण पडिलें । कार्यामधें ॥ ५३ ॥

तेव्हा शिष्यानें प्रश्न केला की,हें ब्रह्मांड कसें झाले ? (ब्रह्मांडाचा कर्ता निर्गुण म्हटल्यानें त्या निर्गुणाच्या ठिकाणीं कर्तेपण-कर्तृत्व हा गुण येतो व ज्याच्या ठिकाणी हा गुण असतो तो स्वतः दुस-याचें कर्त्याचे कार्य होतो,म्हणजे) कर्तृत्वगुणांमुळे कर्ता (कारण) हाच कार्य झाला (अर्थात त्या कार्याचा कर्ता पुन्हा कोणी तरी शोधला पाहिजें)

द्रष्टेपणें द्रष्टा दृश्यीं । जैसा पडे अनायांसीं । कर्तेपणे निर्गुणासी । गुण तैसे ॥ ५४ ॥

द्रष्टा-पाहाणारा-हा द्रष्टेपणामुळें म्हणजें पाहाण्यामुळें (स्वतः पाहाणारा असल्यामुळें) सहजच दुस-या-(पाहाणा-या) चें दृश्य होतो,त्याचप्रमाणें सृष्टीचें कर्तृत्व निर्गुणाकडे दिले कीं त्या निर्गुणाच्या ठिकाणी कर्तेपणाचा गुण येतो.

ब्रह्मांडकर्ता कवण । कैसी त्याची वोळखण । देव सगुण किं निर्गुण । मह निरोपावा ॥ ५५ ॥

तेव्हा ब्रह्मांडाचा कर्ता कोण,त्याला कसे ओळखावें,तसेच देव सगुण आहे की निर्गुण आहें हे मला सांगावें,

येक म्हणती त्या ब्रह्मातें । इछ्यामात्रें सृष्टिकर्ते । सृष्टिकर्ते त्यापर्ते । कोण आहे ॥ ५६ ॥

सृष्टि उत्पन्न करणारे त्या ब्रह्माशिवाय कोण आहे ?इच्छामात्रेंकरुन सृष्टि निर्माण करणारे ते ब्रह्मच होय,असे कोणी म्हणतात.

आतां असो हे बहु बोली । सकळ माया कोठून जाली । ते हे आतां निरोपिली । पाहिजे स्वामी ॥ ५७ ॥

निराकार निर्गुण ब्रह्मापासून सगुण साकार माया कशी उत्पन्न झाली ?आतां हे बोलणे पुष्कळ पुरे,ही सर्व माया कोठून उत्पन्न झाली तें मला स्वामींनी सांगावें.

ऐसें ऐकोनि वचन । वक्ता म्हणे सावधान । पुढिले समासीं निरूपण । सांगिजेल ॥ ५८ ॥

असे शिष्याचे बालणे ऐकून वक्ता म्हणाला सावध हो ,पुढील समासात ह्याचे निरुपण करु

ब्रह्मीं माया कैसी जाली । पुढें असे निरोपिली । श्रोतीं वृत्ति सावध केली । पाहिजे आतां ॥५९ ॥

ब्रह्माच्या ठिकाणी माया कशी उत्पन्न झाली ह्याचे विवरण पुढील समासात केले आहें तें ऐकण्यास श्रोत्यांनी वृत्ति सावध केली पाहिजे.

पुढें हेंचि निरूपण । विशद केलें श्रवण । जेणें होय समाधान । साधकांचें ॥ ६० ॥

पुढें हेंच निरुपण स्पष्ट करुन सांगितले आहे.ते ऐकले असतां साधकाचें समाधान होईल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देवदर्शननाम समास पहिला ॥ १ ॥**

**समास दुसरा : सूक्ष्मआशंकानिरूपण ॥ श्रीराम ॥**

मागां श्रोतीं आक्षेपिलें । तें पाहिजे निरोपिलें । निरावेवीं कैसें जालें । चराचर ॥ १ ॥

निराकारामध्ये चराचर सृष्टि कशी उत्पन्न झाली अशी श्रोत्यांनी पूर्वी शंका घेतली होती,तिचें आता चर्चा-निरुपण केले पाहिजें.

याचें ऐसें प्रतिवचन । ब्रह्म जें कां सनातन । तेथें माया मिथ्याभान । विवर्तरूप भासे ॥ २ ॥

( विवर्तरूप - भासमात्र , नसून दिसणारी )

ह्याचे उत्तर असें,की शाश्र्वत (निश्र्चल-सनातन) असें जें ब्रह्म त्याच्या ठिकाणी मायेचा मिथ्या भास विवर्तरुपानें (असतें एक व वाटतें दुसरें,जसें  दोरी असून सर्प भासणें,शिंपी असून चांदी भासणें असा) होतो.

आदि येक परब्रह्म । नित्यमुक्त अक्रिय परम । तेथें अव्याकृत सूक्ष्म । जाली मूळमाया ॥ ३ ॥

( अव्याकृत - अदृश्य , केवळ स्पुरणमात्र )

नित्यमुक्त,अत्यंत निष्क्रिय असें एक परब्रह्म प्रथम असतां तेथे अस्पष्ट (अदृश्य) व सूक्ष्म अशी मूळमाया झाली.

**॥ श्लोक ॥ आद्यमेकं परब्रह्म नित्यमुक्तमविक्रियम् । तस्य माया समावेशो जीवमव्याकृतात्मकम् ॥ आशंका ॥**

येक ब्रह्मा निराकार । मुक्त अक्रिये निर्विकार । तेथें माया वोडंबर । कोठून आली ॥ ४ ॥

( वोडंबर - मिथ्या )

(प्रश्र्न) आशंका-ब्रह्म एक,निराकार,मुक्त,निष्क्रिय व निर्विकार असता त्या ठिकाणी मायेचे गारुड कोठून उत्पन्न झाले ?(तेथे ही लटकी माया कोठून आली ?)

ब्रह्म अखंड निर्गुण । तेथें इच्छा धरी कोण । निर्गुणीं सगुणेंविण । इच्छा नाहीं ॥ ॥ ५ ॥

ब्रह्म अखंड व निर्गुण असतां त्याच्या ठिकाणी (सृष्टि करण्याची) इच्छा कोण धरते ? निर्गुणाच्या ठिकाणी सगुणाशिवाय  इच्छा उत्पन्न होणे शक्य नाही.

मुळीं असेचिना सगुण । म्हणौनि नामें निर्गुण । तेथें जालें सगुण । कोणेपरी ॥ ६ ॥

मुळांत सगुण नाहीच,म्हणून तर त्याला निर्गुण असें नाव आहें.आणि त्या ठिकाणी सगुण कसें उत्पन्न झालें ?

निर्गुणचि गुणा आलें । ऐसें जरी अनुवादलें । लागों पाहे येणें बोलें । मूर्खपण ॥ ७ ॥

निर्गुण असतें तेंच गुणयुक्त (सगुण) झालें असें म्हटलें तर त्यायागे गुणयुक्त झालें असें म्हटलें तर त्यायोगे मूर्खपणा पदरी येतो.

येक म्हणती निरावेव । करून अकर्ता तो देव । त्याची लीळा बापुडे जीव । काये जाणती ॥ ८ ॥

एक म्हणतात तो निराकार देव करुन अकर्ता आहें,त्याची लीला बापुडया जीवांना काय कळणार ?

येक म्हणती तो परमात्मा । कोण जाणे त्याचा महिमा । प्राणी बापुडा जीवात्मा । काये जाणे ॥ ९ ॥

एक म्हणतात,तो तर परमात्मा आहे,त्याचा महिमा कोणाला कळणार ?प्राणी तर बिचारा जीवात्मा त्यास (तो महिमा) कसा कळावा ?

उगाच महिमा सांगती । शास्त्रार्थ अवघा लोपिती । बळेंचि निर्गुणास म्हणती । करूनि अकर्ता ॥ १० ॥

(लोक परमात्म्यांचें) माहात्म्य उगीच सांगतात,शास्त्रार्थ सगळा बुडवितात (तो परमात्मा निर्गुण आणि) त्या निर्गुणास बळेंच करुन अकर्ता म्हणतात.

मुळीं नाहीं कर्तव्यता । कोण करून अकर्ता । कर्ता अकर्ता हे वार्ता । समूळ मिथ्या ॥ ११ ॥

मुळी कर्तव्यता-कार्यच-काहींनाही तर तेथे अकर्ता कोण ? तात्पर्य,कर्ता किंवा अकर्ता ही गोष्टच मुळी खोटी,

जें ठाईंचें निर्गुण । तेथें कैचें कर्तेपण । तरी हे इच्छा धरी कोण । सृष्टिरचाव्याची ॥ १२ ॥

जें मुळचेच निर्गुण तेथे कर्तेपण कसले ? तर मग ही सृष्टिरचना करण्याची इच्छा कोण धरते ?

इच्छा परमेश्वराची । ऐसी युक्ती बहुतेकांची । परी त्या निर्गुणास इच्छा कैंची । हें कळेना ॥ १३ ॥

परमेश्र्वराची इच्छा असा युक्तिवाद कित्येक जण करतात,पण त्या निर्गुणाला इच्छा कशी होते ते कळत नाही.

तरी हे इतुकें कोणें केलें । किंवा आपणचि जालें । देवेंविण उभारलें । कोणेपरी ॥ १४ ॥

तर हें इतकें कोणी केले ? किंवा तें आपोआपच झाले ? (आपोआप झाले म्हणावें तर) देवाशिवाय एवढें कसें रचलें गेले ?

देवेंविण जालें सर्व । मग देवास कैंचा ठाव । येथें देवाचा अभाव । दिसोन आला ॥ १५ ॥

देवावांचून सर्व झाले असेल तर देवाचा ठावठिकाणा कोणता ? ह्यांत देव नाहीं असे दिसून आलें (देवेविण उभारले म्हणावें तर  देवाचा अभाव दिसून येतो)

देव म्हणे सृष्टिकर्ता । तरी येवं पाहे सगुणता । निर्गुणपणाची वार्ता । देवाची बुडाली ॥ १६ ॥

( येवं - येऊ )

देव सृष्टिकर्ता आहे असे म्हणावें तर देवाकडें सगुणपणा येऊ पाहातो व देव निर्गुण आहें हे म्हणणे सर्वस्वीं खोटे पडतें.

देव ठाईंचा निर्गुण । तरी सृष्टिकर्ता कोण । कर्तेपणाचें सगुण । नासिवंत ॥ १७ ॥

( कर्तेपणाचें सगुण नासिवंत - कर्तेपणा देवाकडे आला तर तो देव सगुण ठरतो व सगुण नाशवंत आहे )

देव तर मूळचा निर्गुण,तर मग सृष्टि उत्पन्न करणारा कोण ? कर्ता म्हटला की तो सगुण व सगुण तितकें नाशवंत.

येथें पडिले विचार । कैसें जालें सचराचर । माया म्हणों स्वतंतर तरी हेंहि विपरीत दिसे ॥ १८ ॥

तेव्हा येथेही विचार पडला एकंदर स्थावरजंगामात्मक जग कसें उत्पन्न झालें ? (तें करणारी) माया स्वतंत्र आहे असे म्हणावें तर तेही विरुध्द दिसते.

माया कोणीं नाहीं केली । हे आपणचि विस्तारली । ऐसें बोलतां बुडाली । देवाची वार्ता ॥ १९ ॥

मायेला कोणीं उत्पन्न केलें नाहीं ती आपोआप झाली,असें म्हटले कीं देव खोटा ठरतो.

देव निर्गुण स्वतसिद्ध । त्यासी मायेसि काये समंध । ऐसें बोलतां विरुद्ध । दिसोन आलें ॥ २० ॥

देव निर्गुण व स्वयंभू आहे,त्याचा व मायेचा संबंध काय ? असें म्हटल्यास हेही विरुध्द दिसतें.

सकळ कांहीं कर्तव्यता । आली मायेच्याचि माथां तरी भक्तांस उद्धरिता । देव नाहीं कीं ॥ २१ ॥

(जगाचें) एकंदर सर्व कार्य मायेच्याच माथीं ठेवावें (सर्व करणारी माया आहे म्हणावें) तर (मायेच्या जंजाळातून) भक्तांचा उध्दार करणारा देव नाही काय ?

देवेंविण नुस्ती माया । कोण नेईल विलया । आम्हां भक्तां सांभाळाया । कोणीच नाहीं ॥ २२ ॥

देवावाचून नुसती (एकटी) मायाच असेल तर तिचा नाश कोण करील ? मग आम्हां भक्तांचा सांभाळ करण्यास कोणीच नाहीं असे होईल.(अशी आपत्ती ओढवेल!)

म्हणोनि माया स्वतंतर । ऐसा न घडे कीं विचार । मायेस निर्मिता सर्वेश्वर । तो येकचि आहे ॥ २३ ॥

ह्यास्तव  माया स्वतंत्र आहे असें म्हणता येत नाही,मायेला निर्माण करणारा तो सर्वेश्र्वर तो एकच असला पाहिजें.

तरी तो कैसा आहे ईश्वर । मायेचा कैसा विचार । तरी हें आतां सविस्तर । बोलिलें पाहिजे ॥ २४ ॥

तर तो इश्र्वर कसा आहे ? मायेचा विचार काय करावयाचा ?हें सर्वही आतां सविस्तर सांगितलें पाहिजें.

श्रोतां व्हावें सावधान । येकाग्र करूनियां मन । आतां कथानुसंधान । सावध ऐका ॥ २५ ॥

(उत्तर)- आतां श्रोत्यांनी सावध होऊन व एकाग्र मन करुन कथानुसंधान नीट ऐकावें.

येके आशंकेचा भाव । जनीं वेगळाले अनुभव । तेहि बोलिजेती सर्व । येथानुक्रमें ॥ २६ ॥

ह्या शंकेच्या बाबतीत लोकांचें वेगवेगळें अनुभव आहेंत,ते सर्वही आतां क्रमानें सांगतो.

येक म्हणती देवें केली । म्हणोनि हे विस्तारली । देवास इच्ह्या नस्ती जाली । तरी हे माया कैंची ॥२७॥

एक म्हणतात-देवानें ही माया केली म्हणून ही इतकी फैलावली आहें,देवाला इच्छा नसती तर माया कोठून होती ? (देवानें माया केली म्हणून झाली,देवाला इच्छा झाली नसती तर ही झाली नसती.)

येक म्हणती देव निर्गुण । तेथें इच्हा करी कोण । माया मिथ्या हे आपण । जालीच नाही ॥ २८ ॥

एक (दुसरे) म्हणतात,देव तर निर्गुण आहे,तेथें इच्छा करणारा कोण ? माया लटकी आहे ती मुळी झालीच नाही.

येक म्हणती प्रत्यक्ष दिसे । तयेसी नाहीं म्हणतां कैसें । माया हे अनादि असे । शक्ती ईश्वराची ॥ २९ ॥

एक (तिसरे विद्वान) म्हणतात,माया प्रत्यक्ष दिसते तिला तुम्ही नाही कसे म्हणतां ?(वा !नाही कशी म्हणता ? ही प्रत्यक्ष दिसते आणि नाही कशी ? )

येक म्हणती साच असे । तरी हे ज्ञानें कैसी निरसे । साचासारिखीच दिसे । परी हे मिथ्या ॥ ३० ॥

एक (चवथे विद्वान पंडित) सांगतात,जर माया खरी आहे,तर आत्मज्ञानाने तिचा नाश कसा होतो ? म्हणून ही खरी आहेसे दिसले तरी खोटीच (मिथ्या) आहे.

येक म्हणती मिथ्या स्वभावें । तरी साधन कासया करावें । भक्तिसाधन बोलिलें देवें । मायात्यागाकारणें ॥ ३१ ॥

एक (पांचवे गृहस्थ) म्हणतात, माया स्वभावतः जर मिथ्या आहे तर साधन कशाला करावयाचे ?मायेचा त्याग घडावा म्हणून भक्तीचे साधन देंवानेंच सांगितले आहे.

येक म्हणती मिथ्या दिसतें । भयें अज्ञानसन्येपातें । साधन औषधही घेईजेतें ।परी तें दृश्य मिथ्या ॥३२॥

( अज्ञानसन्येपातें - अज्ञानरुपी ज्वराने मायेचे भय वाटते व साधनरुपी ओषधाने ते मावळते )

एक (सहावे गृहस्थ) म्हणतात,माया खोटी पण अज्ञानरुपी सन्निपातामुळें मायेचे भय वाटतें (माया भयावह दिसतें) (तो अज्ञान-संन्निपाताचा आजार बरा होण्यासाठी-) तें भय जाण्यास साधनरुप औषधही घ्यावे लागते,म्हणजे दृश्य मिथ्या आहे हे समजते -द्दश्यात्मक माया लटकीच होय.

अनंत साधनें बोलिलीं । नाना मतें भांबावलीं । तरी माया न वचे त्यागिली ।मिथ्या कैसी म्हणावी ॥३३॥

(सातवे पंडित म्हणतात माया त्याग घडावा म्हणून) असंख्य साधनें ग्रंथांतरी सांगितलीं आहेत,(तिचा निरास करण्याच्या बाबतींत) अनेक मतमतांतर भांबावली आहेत,(त्यास तिचा निरास कसा करावा हें कळेनासें होतें) तरीपण तिचा त्याग होत नाहीं,तेव्हा तिला खोटी कशी म्हणावी ?

मिथ्या बोले योगवाणी । मिथ्या वेदशास्त्रीं पुराणीं । मिथ्या नाना निरूपणीं । बोलिली माया ॥ ३४ ॥

(एक म्हणतो-आठवे गृहस्थ उत्तर देतात) वेद,शास्त्रे,पुराणे व योगवाणी (परमेश्र्वराशीं ऐक्य पावलेल्या सिध्दांची वाणी) ह्यांनी अनेक निरुपणातून माया मिथ्या आहे असें सांगितले आहे (तरी माया मिथ्या याबद्दल तुम्ही शंका घेंता तुम्हाला म्हणावें तरी काय ?)

माया मिथ्या म्हणतां गेली । हे वार्ता नाहीं ऐकिली । मिथ्या म्हणतांच लागली । समागमें ॥ ३५ ॥

(दुसरा म्हणतो-नववे पंडीत म्हणतात),(पण) माया लटकी आहे असें म्हटल्यानें ती नाहीशी झाली अशी गोष्टही एकिवांत नाही,उलट तिला खोटी म्हटले की ती अधिक मागे लागते.

जयाचे अंतरीं ज्ञान । नाहीं वोळखिले सज्जन । तयास मिथ्याभान । सत्यचि वाटे ॥ ३६ ॥

(दहावे पंडीत म्हणतात),ज्याच्या अंतःकरणात आत्मज्ञान नाही व ज्याला साधुसंताची ओळख नाही,त्याला मायेचा त्रास मिथ्या असला तरी खराच वाटतो.

जेणें जैसा निश्चये केला । तयासी तैसाचि फळला । पाहे तोचि दिसे बिंबला । तैसी माया ॥ ३७ ॥

( पाहे तोचि दिसे बिंबला - पाहणाऱ्या प्रमाणे प्रतिबिब )

(अकरावे पंडीत म्हणतात) (उगीच वाद कशाला ?) जो जसा निश्र्चय करतो तसाच तो त्याला फलद्रूप होतो,(आरशांत) पाहाणा-याला आपलेंच प्रतिबिंब दिसते,तशीच ही माया आहें !

येक म्हणती माया कैंची । आहे ते सर्व ब्रह्मचि । थिजल्या विघुरल्या घृताची । ऐक्यता न मोडे ॥ ३८ ॥

कोणी (बारावे पंडीत म्हणतात) अहो ! माया कसली ? जे आहे ते सगळे ब्रह्मच आहे, तूप घट्ट झाले किंवा पातळ असले (विघुरलें) तरी त्याचा तूपपणा नाहीसा होत नाही.

थिजलें आणी विघुरलें । हें स्वरूपीं नाहीं बोलिलें । साहित्य भंगलें येणें बोलें । म्हणती येक ॥ ३९ ॥

( साहित्य भंगलें - वेदांत शास्त्राचा संबंध मोडीत निघाला )

थिजले किंवा पातळ झालें हें बालणें स्वरुपासंबंधी शोभत नाही,अशा भाषणाने हा दृष्टांत अयोग्य ठरतो.

येक म्हणती सर्व ब्रह्म । हें न कळे जयास वर्म । तयाचें अंतरींचा भ्रम । गेलाच नाहीं ॥ ४० ॥

एक (तेरावे पंडीत म्हणतात) सगळे ब्रह्म आहे हे रहस्य ज्याला कळत नाही त्याच्या अंतःकरणातला भ्रम गेलाच नाही (असें समजावें)

येक म्हणती येकचि देव । तेथें कैंचें आणिलें सर्व । सर्व ब्रह्म हें अपूर्व । आश्र्चिर्य वाटे ॥ ४१ ॥

एक म्हणतात, एकच देव,तेथें सगळे कोठून आणलें ? सर्व ब्रह्म हें म्हणणे अद्भुत-केवळ आश्र्चर्याचे वाटते.

येक म्हणती येकचि खरें । आनुहि नाहीं दुसरें । सर्व ब्रह्म येणें प्रकारें । सहजचि जालें ॥ ४२ ॥

( आनुहि - अणुमात्र )

एक म्हणतात,एकच(ब्रह्म)काय तें खरे आहें,दुसरे (आनु,अन्य) यत्किंचितही नाही,ह्या बोलण्यावरुन सर्व ब्रह्म आहे हें सहजच सिध्द झालें.

सर्व मिथ्या येकसरें । उरलें तेंचि ब्रह्म खरें । ऐसीं वाक्यें शास्त्राधारें । बोलती येक ॥ ४३ ॥

दुसरे कोणी शास्त्रांच्या आधारानें असे प्रतिपादन करतात,की यच्चयावत् सर्व मिथ्या असून त्याच्या पलिकडे जें काही उरले तेंच सत्यब्रह्म होय !

आळंकार आणी सुवर्ण । तेथें नाहीं भिन्नपण । आटाआटी वेर्थ सीण । म्हणती येक ॥ ४४ ॥

एक म्हणतात,(सोन्याचे) अलंकार व सोनें ह्यांत काही वेगळेपणा नाही (तेव्हा दागिन्यांचे सोने करावे म्हणून दागिनें) आटविणें हे व्यर्थ श्रम होत.

हीन उपमा येकदेसी । कैसी साहेल वस्तूसी । वर्णवेक्ती अव्यक्तासी । साम्यता न घडे ॥ ४५ ॥

एक म्हणतात, ही सोन्याची उपमा हीन व एकदेशी असल्यानें परब्रह्म वस्तूला कशी शोभेल ? अव्यक्त अशा परब्रह्माशी रंग रुप ज्याला आहे अशा (सोन्या) ची बरोबरी होणार नाही.

सुवर्णीं दृष्टी घालितां । मुळीच आहे वेक्तता । आळंकार सोनें पाहतां । सोनेंचि असे ॥ ४६ ॥

सोन्याकडे पाहिले तर तें मूळचेच व्यक्त आहें,तसेच अलंकार व सोने ह्या दोघांतही पाहिले तर सोनेच आहे.

मुळीं सोनेंचि हें वेक्त । जड येकदेसी पीत । पूर्णास अपूर्णाचा दृष्टांत । केवीं घडे ॥ ४७ ॥

मुळांतच सोने हे व्यक्त,जड,एकदेशी व पिवळे (अर्थात अपूर्ण) आहे.अशा अपूर्ण पदार्थाचा दृष्टांत पूर्ण ब्रह्मास कसा शोभेल ?

दृष्टांत तितुका येकदेसी । देणें घडे कळायासी । सिंधु आणी लहरीसी । भिन्नत्व कैंचें ॥ ४८ ॥

दृष्टांत म्हणून जेवढा देतात तो एकदेशी असावयाचा.तरीपण समजुतीसाठी तो द्यावा लागतो,वास्तविक समुद्र व लाटा ह्यांत वेगळेपण काय आहें ?

उत्तम मधेम कनिष्ठ । येका दृष्टांतें कळे पष्ट । येका दृष्टांतें नष्ट । संदेह वाढे ॥ ४९ ॥

एका दृष्टांतानें उत्तम,मध्यम,कनिष्ठ काय आहे तें स्पष्ट कळतें आणि एका दृष्टांतानें नष्ट (नसतां,द्वाड) संशय वाढू लागतो.

कैंचा सिंधु कैंची लहरी । अचळास चळाची सरी । साचा ऐसी वोडंबरी । मानूंच नये ॥ ५० ॥

सिंधु कशाचा आणि लाट तरी कशाची ? अचलास (ब्रह्मास) चंचलाची उपमा कशी देता येईल ? वोडंबरी-गारुडी-गौडबंगाली विद्या ख-याप्रमाणे मानूच नयें.

वोडंबरी हे कल्पना । नाना भास दाखवी जना । येरवी हे जाणा । ब्रहमची असे ॥ ५१ ॥

कल्पना हीच वोडंबरी माया असून लोकांस अनेक भास दाखविते एरवी हें ब्रह्मच आहे.

ऐसा वाद येकमेकां । लागतां राहिली आशंका । तेचि आतां पुढें ऐका । सावध होऊनी ॥ ५२ ॥

असा एकमेकांचा वाद लागल्याने शंका तशीच राहिली,तसेच निरुपण आतां पुढे सावध होऊन ऐका.

माया मिथ्या कळों आली।परी ते ब्रहमीं कैसी जाली ।म्हणावी ते निर्गुणें केली।तरी ते मुळींच मिथ्या ॥५३॥

माया लटकी हें कळलें,माया मिथ्या आहें हें स्पष्ट आहें पण ती ब्रह्माच्या ठिकाणी झाली कशी ? हा मुख्य प्रश्न आहे निर्गुणानें माया केली असें म्हणावे तर ती मुळचीच लटकी आहें.

मिथ्या शब्दीं कांहींच नाहीं । तेथें केलें कोणें काई । करणें निर्गुणाचा ठाईं । हेंहि अघटित ॥ ५४ ॥

माया मिथ्या म्हणजेच ती काही नाही असे उघड होत आहे मग तेथे कोणी व काय केले ? निर्गुणाने केले असे म्हणणे हे ही अद्भूतच (-मग जी काहीच नाही तिचा कर्ता कोण म्हणून काय विचारता ?)

कर्ता ठांईचा अरूप । केलें तेंहि मिथ्यारूप । तथापी फेडूं आक्षेप । श्रोतयांचा ॥ ५५ ॥

( कर्ता ठांईचा अरूप - ब्रहम मुळातच निराकार )

कर्ता हा मूळचाच अरुप म्हणजेच निराकार व त्यानें केलें तेंही मिथ्यारुप (खोटे!) (असे शंकेचे उत्तर आहे) तथापि श्रोत्यांच्या आशंकेचें निरसन करुं (कर्त्याला मुळीं ना नांव ना रुप,व जे केले आहे म्हणतां तेही मिथ्यारुप आहें,तथापि आक्षेप काढला आहे तर त्याला उत्तरही देऊ.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मआशंकानिरूपण समास दुसरा ॥ २ ॥**

**समास तिसरा : सूक्ष्मआशंकानिरूपण ॥ श्रीराम ॥**

अरे जे जालेंचि नाहीं । त्याची वार्ता पुससी काई । तथापि सांगों जेणें कांहीं । संशय नुरे ॥ १ ॥

अरे जे मुळी झालेच नाही त्याची गोष्ट काय (म्हणून) विचारतोस? तथापि (काहीं) सांगतो की तणेकरुन संशय उरणार नाही,(अरे!माया -सृष्टी-जी झालीच नाही तिची वार्ता काय पुसतोस?तथापि विचारलेंस तर निःसंदेहता होईल असें उत्तर देऊ)

दोरीकरितां भुजंग । जळाकरितां तरंग । मार्तंडाकरितां चांग । मृगजळ वाहे ॥ २ ॥

दोरी आहे म्हणून सर्प भासतो,पाणी आहे म्हणून लाटा दिसतात,सूर्य आहे म्हणून मृगजळ स्वच्छ (चांग) वाहातेंसे वाटतें.

कल्पेनिकरितां स्वप्न दिसे । सिंपीकरितां रुपें भासे । जळाकरितां गार वसे । निमिष्य येक ॥ ३ ॥

कल्पनेमुळें (कल्पना आहे म्हणून) स्वप्न दिसतें,शिंप आहें म्हणून रुपें भासतें-चमकतें,पाणी आहे म्हणून एक क्षणभर गार राहातें.

मातीकरितां भिंती जाली । सिन्धुकरितां लहरी आली । तिळाकरितां पुतळी । दिसों लागे ॥ ४ ॥

( पुतळी - डोळ्यातील बाहुलीमुळे तिळांसारखे पदार्थ दिसतात )

मातीमुळे भिंत झाली,समुद्र आहे म्हणून लाट आली.(डोळ्यांत काळें) बुबूळ (तीळ-कनीनिका) आहे म्हणून त्यांत प्रतिबिंब दिसतें.

सोन्याकरितां अळंकार । तंतुकरितां जालें चीर । कासवाकरितां विस्तार । हातापायांचा ॥ ५ ॥

( चीर - वस्त्र )

सोने आहे म्हणून अलंकार घडलें,तंतूमूळे वस्त्र झालें,कासव आहे म्हणून हातापायांचा विस्तार झाला.

तूप होतें तरी थिजलें । तरीकरितां मीठ जालें । बिंबाकरितां बिंबलें । प्रतिबिंब ॥ ६ ॥

( तरी - खाडी )

तूप होतें म्हणून तें घट्ट झालें,खाडी (तरी) असते म्हणून मीठ होतें,बिंब आहे म्हणून प्रतिबिंब दिसते,

पृथ्वीकरितां जालें झाड । झाडाकरितां छाया वाड । धातुकरितां पवाड । उंच नीच वर्णाचा ॥ ७ ॥

( धातुकरितां पवाड - धातूमुळे (रंगधारे) त्याची प्रत ठरते.)

पृथ्वी आहे म्हणून झाड आले,झाड आहें म्हणून (वाड) मोठी छाया पडतें.धातु (रुप,विषय) असतात म्हणून कमीजास्त रंगाची मातब्बरी.

आतां असो हा दृष्टांत । अद्वैतास कैंचें द्वैत । द्वैतेंविण अद्वैत । बोलतांच न ये ॥ ८ ॥

आतां हे दृष्टांत पुरेत,अद्वैताला द्वैताची उपमा कशी द्यावयाची ?(परंतु) द्वैताशिवाय अद्वैत सांगताच येत नाही.(हे सारे द्वैतातले द्दष्टांत,अद्वैतसिध्दीच्या काय कामाचे! पण द्वैतावाचून अद्वैत बोलतांच येत नाही.)

भासाकरितां भास भासे । दृश्याकरितां अदृश्य दिसे । अदृश्यास उपमा नसे । म्हणोनि निरोपम ॥ ९ ॥

( निरोपम - उपमा न देता येण्यासारखे )

भास आहे म्हणून (जग) भास उत्पन्न होतो,द्दश्य आहे म्हणून द्दश्य दिसतें,अद्दश्यास (परब्रह्मास) उपमा नाही म्हणून तें निरुपम (उपमेंरहित) आहें.

कल्पेनेविरहित हेत । दृश्यावेगळा दृष्टांत । द्वैतावेगळें द्वैत । कैसें जालें ॥ १० ॥

( द्वैतावेगळें द्वैत - द्वैतावेगळें अद्वैत )

कल्पनेशिवाय हेतु (कारण),किंवा द्दश्यावांचून द्दष्टांत सांगता येत नाही,त्याचप्रमाणे द्वैताचा अंगीकार केल्यावाचून द्वैत कसे झाले -द्वैतरुप सृष्टी कशी झाली-हें सांगता येत नाहीं,

विचित्र भगवंताची करणी । वर्णवेना सहस्त्रफणी । तेणें केली उभवणी । अनंत ब्रह्मांडाची ॥ ११ ॥

भगवंताची करणी अद्भुत आहे,तिचे वर्णन शेषालाही करतां येत नाही,त्यानेच ह्या अनंत ब्रह्मांडाची उभारणी केली.

परमात्मा परमेश्वरु । सर्वकर्ता जो ईश्वरू । तयापासूनि विस्तारु । सकळ जाला ॥ १२ ॥

जो परमात्मा,परमेश्वर व सर्वकर्ता ईश्वर त्याच्यापासून हा सगळा विस्तार झाला.

ऐसीं अनंत नामें धरी । अनंत शक्ती निर्माण करी । तोचि जाणावा चतुरीं । मूळपुरुष ॥ १३ ॥

( मूळपुरुष - मायाविशिष्ट ईश्वर,शबल ब्रह्म )

अशी असंख्य नावें धारण करणारा,अनंतशक्ति उत्पन्न करणारा तोच मूळपुरूष होय हें सुज्ञानीं लक्षात ठेवावें.

त्या मूळपुरुषाची वोळखण । ते मूळमायाचि आपण । सकळ कांहीं कर्तेपण । तेथेंचि आलें ॥ १४ ॥

अनंतशक्ति जो मुळपुरुष त्याच्यापासून सारा विस्तार झाला आहे,त्या मुळपरुषाचें स्वरुप तिच मुळमाया,(सगळ्या सृष्टी)चा कर्तेपणा तिच्याकडेंच येतो.

**॥ श्लोक ॥ कार्यकारण कर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ॥**

हे उघड बोलतां न ये । मोडों पाहातो उपाये । येरवीं हें पाहतां काय । साच आहे ॥ १५ ॥

हें उघड सांगता येत नाही,(कारण हे सांगितल्यास) साधनामार्ग बिघडेल,बाकी विचार केला तर काय खरे आहें ?(-कारण हें सांगितल्यास अनाधिकारी पुरुष ब्रह्मप्राप्तीचा मार्गच सोडुन देईल.) (अद्वैत ब्रह्माच्या ठिकाणी द्वैत झालेच नाही हा सिध्दांत,तथापि संशय मोडण्यासाठी द्वैताची उभारणी करुन दाखवित आहेत व मूळमाया व तेथून पुढील सृष्टीरचनेची गोष्ट सांगत आहेत) तथापि (स्वानुभावाच्या बाजूनें विचाराल तर मूळमाया व तिची गोष्ट (आम्ही पुढे सांगणार आहोत ती) काय खरी आहें ? सृष्टी नसुन सृष्टी झाली असा ग्रह करुन घेणा-यांसाठी सृष्टीच्या ऊभारणीची गोष्ट सांगावयाची आहें खरोखर अरे जे झालेंच नाही हाच सिध्दांत आहें).

देवापासून सकळ जालें । हें सर्वांस मानलें । परी त्या देवास वोळखिलें । पाहिजे कीं ॥ १६ ॥

देवापासून सर्व उत्पन्न झालें हें सर्वांना पटते.(ह्या लोकांच्या समजुतीप्रमाणेंच आम्ही बोलतो.) पण त्या देवाला ओळखलें पाहिजें.

सिद्धांचे जें निरूपण । जें साधकांस न मने जाण । पक्व नाहीं अंतःकर्ण । म्हणोनियां ॥ १७ ॥

साधकांचें अंत:करण पक्के नसतें म्हणून त्यांस सिध्दांचे निरुपण (त्यांच्या भूमिकेवरुन असतें पण तें) मान्य होत नाही.

अविद्यागुणें बोलिजे जीव । मायागुणें बोलिजे शिव । मूळमाया गुणें देव । बोलिजेतो ॥ १८ ॥

अविद्येची (अज्ञानाची पिंडाची) उपाधि ज्याला आहे तो जीव व ब्रह्मांडाच्या उपाधीमुळें शिव व मूळ मायेची (ब्रह्मांडाची) उपाधि ज्याला आहे तो देव असे म्हणतात.

म्हणौनि कारण मूळमाया । अनंत शक्ती धरावया । तेथीचा अर्थ जाणावया । अनुभवी पाहिजे ॥ १९ ॥

म्हणून (सृष्टिरचनादि कार्याला लागणा-या) अनंत शक्ति धारण करण्यासाठी कारण मूळमाया हेंच सर्वांचे मूळ होय.(पण) त्यांतील रहस्य लक्षांत येण्याला अनुभवी मनुष्य पाहिजें.

मूळमाया तोचि मूळपुरुष । तोचि सर्वांचा ईश । अनंतनामी जगदीश । तयासीचि बोलिजे ॥ २० ॥

जी मूळमाया तोच मूळपुरूष होय,तोच सगळ्यांचा ईश्वर,त्यालाच अनंत नामें धारण करणारा जगदीश्वर असें म्हणतात.

अवघी माया विस्तारली । परी हे निशेष नाथिली । ऐसिया वचनाची खोली । विरुळा जाणे ॥ २१॥

ही सगळी माया पसरलेली आहे,पण ती अजिबात खोटी (नाशवंत) आहे,ह्या भाषणांतील रहस्य जाणणारा क्वचितच सापांडावयाचा (सारें जगत् मूळमायेचा विस्तार आहे पण तीच मुळीं मिथ्या आहें,पण हें बालणें स्वानुभवी महात्म्यालाच कळणारें आहे.)

ऐसें अनुर्वाच्य बोलिजे । परी हें स्वानुभवें जाणिजे । संतसंगेविण नुमजे । कांही केल्यां ॥ २२ ॥

अशाप्रकारें तें वर्णन करुन सांगता येत नाहीं पण तें आपल्या अनुभवानें समजून घेतलें पाहिजें,संतसंगतीवांचून कांही केलें तरी तें समजणार नाहीं.

माया तोचि मूळपुरुष । साधकां न मने हें निशेष । परी अनंतनामी जगदीश । कोणास म्हणावें ॥ २३॥

मूळमाया तोच मूळपुरुष होय हें म्हणणे साधकास मुळीच मान्य होत नाहीं,पण मग अनंत नामात्मक जगदीश्वर कोणाला म्हणावें ?

नामरूप माये लागलें । तरी हें बोलणें नीटचि जालें । येथें श्रोतीं अनुमानिलें । कासयासी ॥ २४ ॥

नाम व रुप हें जर मायेलाच लागलेले (मायेंचेच आहें) तर हें बोलणें सरळच आहे. मग त्यांत श्रोत्यांनी तर्कवितर्क कां करावे ?

आतां असो हे सकळ बोली । मागील आशंका राहिली । निराकारीं कैसी जाली । मूळमाया ॥ २५ ॥

आतां हें सगळें बालणें राहो.पूर्वीची शंका राहिली ती ही,कीं निराकाराच्या ठिकाणीं मूळमाया कशी उत्पन्न झाली ?(ही शंका अजून ज्याला असेल त्याच्या समाधानासाठीं काहीं बोलले पाहिजें)

दृष्टीबंधन मिथ्या सकळ । परी तो कैसा जाला खेळ । हेंचि आतां अवघें निवळ । करून दाऊं ॥ २६ ॥

इंद्रजाल किंवा गारुडी विद्या ही सारी खोटी.पण मग गारुड्याचे खेळ होतात कसे ?(तसाच मूळमायेचा प्रकार आहे.) हेंच आतां स्पष्ट करुन दाखवूं.

आकाश असतां निश्चळ । मधें वायो जाला चंचळ । तैसी जाणावी केवळ । मूळमाया ॥ २७ ॥

आकाश निश्र्चळ असतां त्याच्यामध्यें चंचळ वायु जसा उत्पन्न होतो,अगदीं तशीच मूळमाया (ब्रह्माच्या ठिकाणीं) उत्पन्न होतें (-तशी निर्गुण निराकार ब्रह्माच्या ठिकाणीं सगुण,साकार व चंचळ माया झाली)

रूप वायोचें जालें । तेणें आकाश भंगलें । ऐसें हें सत्य मानलें । नवचे किं कदा ॥ २८ ॥

वायूला आकार आला (वायु प्रकट झाला) म्हणून त्यामुळे आकाश फाटलें हें म्हणणें कोणास तरी कधीं खरें वाटेल काय ?(वायुरुपामुळें आकाश भंगलें असें होत नाहीं,तसें मूळमायेमुळें निर्गुण ब्रह्माच्या व्यापकत्वाला बाध येत नाहीं)

तैसी मूळमाया जाली । आणी निर्गुणता संचली । येणें दृष्टांतें तुटली । मागील आशंका ॥ २९ ॥

त्याचप्रमाणें मूळमाया उत्पन्न झाली तरी ब्रह्माचा निर्गुणपणा (निर्गुण ब्रह्म) जसा आहे तसाच भरलेला आहें ह्या द्दष्टांतानें मागील शंकेचे निरसन झालें,

वायु नव्हता पुरातन । तैसी मूळमाया जाण । साच म्हणतां पुन्हा लीन । होतसे ॥ ३० ॥

पूर्वी वायु नव्हता तशी मूळमायाही पूर्वी नव्हती,ती खरी (शाश्र्वत) म्हणावी तर (परब्रह्माशी) ती पुन्हा लीन होतें (वायु पुरातन नव्हता,तशी मुळमायाही नाही,वायु किंवा मुळमाया सत्य म्हणाल तर वायु आकाशांत व माया ब्रह्मांत लीन होते.)

वायो रूपें कैसा आहे । तैसी मूळमाया पाहें । भासे परी तें न लाहे । रूप तयेचें ॥ ३१ ॥

वायूचें रुप (जसें भासमात्र) आहें तसेंच मूळ मायेंचेही स्वरुप आहें,तिचे अस्तित्व भासतें पण रुप मात्र पहावयास सांपडत नाहीं (वायु भासतो पण सांपडत नाहीं,तशी माया भासतें पण आढळत नाहीं.)

वायो सत्य म्हणो जातां । परी तो न ये दाखवितां । तयाकडे पाहों जातां । धुळीच दिसे ॥ ३२ ॥

वायु खरा म्हणावा तर दाखविंता येत नाही,त्याच्याकडे पाहूं जावें तर नुसती धूळच दिसतें.

तैसी मूळमाया भासे । भासी परी ते न दिसे । पुढें विस्तारली असे । माया अविद्या ॥ ३३ ॥

त्याप्रमाणें मूळमाया भासतें पण ती दिसत नाही,(तथापि) पुढें माया (ब्रह्मांड-शिवाची उपाधि) अविद्या (पिंड-जिवाची उपाधि) ह्या उभय रुपांनी तिचा विस्तार झाला आहे.

जैसें वायोचेनि योगें । द्दश्य उडे गगनमार्गे । मूळमायेच्या संयोगें । तैसें जग ॥ ३४ ॥

ज्याप्रमाणें वायूच्या योगाने (तृणपर्णादि) दृश्य (पदार्थ) आकाशांत उडतात,त्याप्रमाणें मूळमायेच्या संयोगानें (मूळमायेपासून) हे जग झालेले दिसतें (भ्रमण पावतें)

गगनीं आभाळ नाथिलें । अकस्मात उद्भवलें । मायेचेनि गुणें जालें । तैसें जग ॥ ३५ ॥

लटकें (असलेले) अभ्र आकाशांत एकदम उत्पन्न होतें त्याप्रमाणें मायेच्या योगानें  हें जग झालें.(आकाशाच्या ठिकाणीं नसलेंले ढग एकाएकी उदभवतात तशी ब्रह्मी लटिकीं माया उत्पन्न होतें)

नाथिलेंचि गगन नव्हतें । अकस्मात आलें तेथें । तैसें द्दश्य जालें येथें । तैसियापरी ॥ ३६ ॥

(गगन-आभाळ-अभ्र) ढग हें नाथिले (लटके,नश्र्वर)(आकाशांत) प्रथम नव्हते,(नंतर) तेथे (आकाशामध्ये) ते ढग एकदम आलें (उत्पन्न झालें),तसे द्दश्य हें येथे (परब्रह्माच्या ठिकाणी) तैसियापरी(अभ्राप्रमाणें) उत्पन्न झालें.

परी त्या आभाळाकरितां । गगनाची गेली निश्चळता । वाटे परी ते तत्वता । तैसीच आहे ॥ ३७ ॥

परंतु त्या अभ्रामुळें आकाशाचा निश्र्चळपणा गेलासा वाटतो,तरी खरोखर तो तसाच असतो (गेलेला नसतो)(गगनाची निश्र्चळता ढगांच्या येण्यानें ढळल्यासारखी वाटली तरी तें निश्र्चळ आहें.)

तैसें मायेकरितां निर्गुण । वाटे जालें सगुण । परी तें पाहतां संपूर्ण । जैसें तैसें ‖ ३८ ‖

त्याचप्रमाणें मूळमायेमुळें निर्गुण असें हें सगुण झालेंसें वाटतें,परंतु विचार केला तर तें जसेच्या तसेंच परिपूर्ण आहें (तसे मायेच्या योगानें ब्रह्म सगुण व चंचळ झालेसे वाटतें,पण ब्रह्म निश्र्चळ व निर्गुण आहे तसेंच आहें.)

आभाळ आले आणि गेलें । तरी गगन तें संचलें । तैसें गुणा नाहीं आलें । निर्गुण ब्रह्म ‖ ३९ ‖

अभ्र आलें आणि गेलें तरी आकाश जसेच्या तसें भरलेले (संचलें) आहे,त्याचप्रमाणें (माया उत्पन्न झाली व लय पावली) तरी निर्गुण हें सगुण झालेंच नाही.

नभ माथा लागलें दिसे । परी तें जैसें तैसें असे । तैसें जाणावें विश्वासें । निर्गुण ब्रह्म ‖ ४० ‖

आकाश डोक्यास लागलेले दिसतें पण तें जसें असतें त्याचप्रमाणें निर्गुण ब्रह्म असतें हा विश्र्वास ठेवावा.( आकाश डोक्यास लागलेले दिसतें पण तें अलिप्त,तसेंच ब्रह्मही मायेंने अस्पष्ट आहे.)

ऊर्ध पाहातां आकाश । निळिमा दिसे सावकास । परि तो जाणिजे मिथ्याभास । भासलासे ‖ ४१ ‖

वर आकाशाकडें पाहिलें तर सगळा निळा रंग भरलेला आहे असे दिसतें,परंतु तो लटका भास भासला आहे असें समजावें.(आकाशाचा नीळिमा भासमान आहे,सत्य नाहीं.)

आकाश पालथें घातलें । चहूंकडे आटोपलें । वाटे विश्वास कोंडिले । परी तें मोकळेचि असे ‖ ४२ ‖

आकाश पालथें घातलेलें असून तें (सभोंवार)चहूकडें लागलेले (चिकटलेंले) आहे,व त्याने विश्र्वाला कोंडून टाकलें आहे असें वाटते,पण ते विश्र्व मोकळेंच आहे (पाण्यातं आकाश पालथें घातले कीं वाटतें, आता जग संपले पण आकाश आहें तसेंच आहें)

पर्वतीं निळा रंग दिसे । परी तो तया लागला नसे । अलिप्त जाणावे तैसें । निर्गुण ब्रह्म ‖ ४३ ‖

डोगरांकडे (दुरुन पाहिलें तर) निळा रंग त्यास लागला आहेसे दिसते,पण तो त्यास लागलेला नसतो,त्याचप्रमाणे निर्गुण ब्रह्म आहे असें समजावें (पर्वतावर निळा रंग दिसतो पण तो त्याला लागलेला नसतो.)

रथ धावतां पृथ्वी चंचळ । वाटे परी ते असे निश्चळ । तैसें परब्रह्म केवळ । निर्गुण जाणावें ‖ ४४ ‖

रथ धावू लागला म्हणजें (आंत बसणा-याला भोवतालची) जमीन चंचळ (पळत) आहेशी वाटतें पण ती हालत नाही,तसे परब्रह्म निश्र्चळ जाणावें (पण ती स्थिर असतें तसेंच परब्रह्म हें अगदी निर्गुण आहे असे जाणावें)

आभाळाकरितां मयंक । वाटे धावतो निशंक । परी तें अवघें माईक । आभाळ चळे ‖ ४५ ‖

( मयंक - चंद्र )

अभ्रामुळें चंद्र (मयंक,मृगांक) धावत आहेंसे वाटतें पण तें (चंद्राचे धावणें) लटकें असून आभाळच धावंते ह्यांत शंका नाही.

झळे अथवा अग्निज्वाळ । तेणें कंपित दिसे अंत्राळ । वाटे परी तें निश्चळ । जैसें तैसें ॥ ४६ ॥

( अंत्राळ - अंतराळ,वातावरण )

झळई (झळें,उष्ण वारे) अथवा अग्नीच्या ज्वाळा ह्यांजकडून पाहिलें असतां पलीकडील अंतराळ (वातावरण) कंप पावतें आहें असें वाटतें पण तें जसेंच्या तसेंच निश्र्चल असतें (त्याप्रमाणें ब्रह्म सगुण झालेंसे वाटतें! पण त्याची निर्गुणता अखंड आहें)

तैसें स्वरूप हें संचलें । असतां वाटे गुणा आलें । ऐसें कल्पनेसि गमलें । परी ते मिथ्या ॥ ४७ ॥

तसे स्वरुप हे (घनदाट) भरलेलें असतां सगुण झालेंसे वाटते!तसें जें वाटतें तें कल्पनेला,पण तें (वाटणें) खोटें.

दृष्टिबंधनाचा खेळ । तैसी माया हे चंचळ । वस्तु शाश्वत निश्चळ । जैसी तैसी ॥ ४८ ॥

इंद्रजालाच्या खेळाप्रमाणें माया ही चंचळ आहे आणि परब्रह्मवस्तु शाश्र्वत व निश्र्चळ जशीच्या तशीच आहें.

ऐसी वस्तु निरावेव । माया दाखवी अवेव । ईचा ऐसा स्वभाव । नाथिलीच हे ॥ ४९ ॥

परब्रह्मवस्तु अशी निरवयव-निराकार-आहे माया आकार दाखविते,हा तिचा स्वभावच असा आहे आणि ती स्वतः लटकीच आहे(वस्तु निरवयव असून मायेंमुळें सावयव वाटतें,मिथ्या मायेचा हा स्वभावच आहे.)

माया पाहातां मुळींच नसे । परी हे साचा ऐसी भासे । उद्भवे आणि निरसे । आभाळ जैसें ॥ ५० ॥

विचार केला तर माया मुळींच नाही,परंतु ती ख-यासारखी भासतें,अभ्राप्रमाणें माया उत्पन्न होते व नाश पावते.(आकाशात आभाळ येतें व जातें तशी माया नसून ख-यासारखी भासतें)

ऐसी माया उद्भवली । वस्तु निर्गुण संचली । अहं ऐसी स्फुर्ति जाली । तेचि माया ॥ ५१ ॥

वस्तु निर्गुण व संचलली आणि माया ही अशी उत्पन्न झाली.(त्याब्रह्माच्या ठिकाणी) एऽकोहं अशी जी स्फूर्ति उत्पन्न झाली तीच माया,(असो,निर्गुण वस्तु संचलेली असतांना मूळमाया ब्रह्मी उद्भवली,मी एकाकी आहें तो बहुविध व्हावें अशी अहंस्फूर्ति ति माया)

गुणमायेचे पवाडे । निर्गुणीं हें कांहींच न घडे । परी हें घडे आणी मोडे । सस्वरूपीं ॥ ५२ ॥

( पवाडे - खेळ )

गुणमायेंचा हा एक पसारा आहें,निर्गुणाच्या ठिकाणीं हें काहींच घडत नाहीं,तरी पण निर्गुणाच्या अधिष्ठानामुळें (-गुणमायेंच्या योगे) हें सर्व घडतें व मोडतें,

जैसी दृष्टी तरळली । तेणें सेनाच भासली । पाहातां आकाशींच जाली । परी ते मिथ्या ॥ ५३ ॥

जसा दृष्टीला भ्रम व्हावा व त्यामुळें एखादें सैन्य उभें आहेंसे भासावें,विचार केला तर तें सैन्य आकाशाच्या ठिकाणीं भासतें,पण तें भासणें खोटें (द्दष्टि चंचळ झाली,आकाशांत नसून सेना (गंधर्व नगरी) दिसतें (पण ती तेथे नसतें)

मिथ्या मायेचा खेळ । उद्भव बोलिला सकळ । नानातत्वांचा पाल्हाळ । सांडूनियां ॥ ५४ ॥

(पुढे झालेल्या) अनेक तत्वांचा पसारा बाजूला ठेऊन (त्याठिकाणी फक्त) लटक्या अशा मूळमायेच्या खेळाची उत्पत्ति कशी झाली तें सविस्तर सांगितलें.

तत्वें मुळींच आहेती । वोंकार वायोची गती । तेथीचा अर्थ जाणती । दक्ष ज्ञानी ॥ ५५ ॥

(पंच)तत्वे मूळी म्हणजें मूळमायेंतच आहेंत (ती मागून प्रकट झाली असें नाही-त्रिगुणपंचभूतें हिं सर्व मूळमायेंतच बीजरुपानें आहेत) ॐ हा शब्द आकाशांत उत्पन्न झाला (शब्द आकाशाचा गुण असल्यामुळें) हेंच वायूचें चलन होय,ह्यातील रहस्य दक्ष व ज्ञानी असतील त्यांस कळेल.

मूळमायेचे चळण । तेंचि वायोचें लक्षण । सूक्ष्म तत्वें तेंचि जाण । जडत्वा पावलीं ॥ ५६ ॥

मूळमायेंचे चलन हेंच वायूचें स्वरुप होय (मूळ) सूक्ष्म तत्वें होती तींच पुढें जडत्व पावलीं.

ऐसीं पंचमहांभूतें । पूर्वी होती अवेक्तें । पुढें जालीं वेक्तें । सृष्टिरचनेसी ॥ ५७ ॥

अशा प्रकारें पंच महाभूते पूर्वी अव्यक्त होतीं तीं पुढें सृष्टिरचना करण्यासाठीं द्दश्य स्वरुपाला येतात.

मूळमायेचें लक्षण । तेंचि पंचभूतिक जाण । त्याची पाहें वोळखण । सूक्ष्मदृष्टीं ॥ ५८ ॥

मूळमायेंचें स्वरुप हेंच पांचभौतिक-पंचभूतात्मक आहें त्याची ओळख सूक्ष्म द्दष्टीनें करुन घ्यावी.

आकाश वायोविण । इच्ह्याशब्द करी कोण । इच्हाशक्ती तेचि जाण । तेजस्वरूप ॥ ५९ ॥

(ऐकोऽहं बहुस्याम।) हा इच्छेचा शब्द आकाशामध्यें वायूशिवाय कोण करतो ?(वायूच करतो),ही इच्छा उत्पन्न होण्याची जी शक्ति तेंच तेजाचें स्वरुप आहें (इच्छाशक्ती तेजोरुप आहे).

मृदपण तेचि जळ । जडत्व पृथ्वी केवळ । ऐसी मूळमाया सकळ । पंचभूतिक जाणावी ॥ ६० ॥

त्यांतील-तेंजातील मृदुपण तें पाणी व केवळ जडत्व ती पृथ्वी होय,ह्या द्दष्टीनें मूळमायेतच पंचभूतें सूक्ष्म आहेंत,अशी ही सर्व मूळमाया पांचभौतिक आहें.

येक येक भूतांपोटीं । पंचभूतांची राहाटी । सर्व कळे सूक्ष्मदृष्टी । घालून पाहातां ॥ ६१ ॥

एका एका भूताच्या पोटांत पांचही भूतांचे व्यापार होत असतात,ते सगळें सूक्ष्म दृष्टीनें विचार केल्यास कळतात,(पृथ्वी,आप,तेज,वायु,आकाश हीं पंचभूतें अगदी पृथक् नव्हेत,तर ह्यांपैकीं एकेका भूतांत पांचही भूतें आहेत)

पुढें जडत्वास आलीं । तरी असतीं कालवलीं । ऐसी माया विस्तारली । पंचभूतिक ॥ ६२ ॥

पुढें तीं (पंचभूतें) जडत्वाला आलीं (स्थूलस्वरुप पावलीं) तरी एकमेकांत मिश्र झालेलीं असतात,असा हा पंचमहाभूतात्मक मायेंचा विस्तार आहें.

मूळमाया पाहातां मुळीं । अथवा अविद्या भूमंडळीं । स्वर्ग्य मृत्य पाताळीं । पांचचि भूतें ॥ ६३ ॥

( मुळीं - आत्म्याच्या ठिकाणी )

मूळी म्हणजें परमात्म्याच्या ठिकाणी मूळमाया अथवा पृथ्वीवरील अविद्या (माया),किंवा स्वर्ग,मृत्यु,पाताळ हे तिन्ही लोक हयापैकी कोठेही पाहिले तरी पांचच भूतें आहेंत (त्रैलोक्यात धुडूंन पाहिलें तरी पंचभूतांचाच खेळ दिसतों)

**॥ श्लोक ॥ स्वर्गे मृत्यौ पाताले वा यत्किंचित्सचराचरं । सर्वपंचभूतकं राम षष्ठें किंचिन्न दृश्यते ॥**

सत्य स्वरूप आदिअंतीं । मध्यें पंचभूतें वर्तती । पंचभूतिक जाणिजे श्रोतीं । मूळमाया ॥ ६४ ॥

आरंभी व शेवटीं सत्य स्वरुप तेंवढें शाश्र्वत असून मध्येंच हीं पंचभूतें वावरत असतात मूळमाया ही पंचभूतात्मक आहें हे श्रोत्यांनी लक्षांत ठेवावें.

येथें उठिली आशंका । सावध होऊन ऐका । पंचभूतें जालीं येका । तमोगुणापासुनी ॥ ६५ ॥

येथें एक शंका उद्भवली ती सावध होऊन ऐका-पंचभूतें एका तमोगुणांपासून उत्पन्न झाली.

मूळमाया गुणापरती । तेथें भूतें कैंचि होतीं । ऐसी आशंका हे श्रोतीं । घेतली मागां ॥ ६६ ॥

मूळमाया गुणांपलीकडची आहें,तर तेथें भूतें कशीं झाली ? अशी शंका श्रोत्यांनी मागें घेतली आहें.

ऐसें श्रोतीं आक्षेपिलें । संशयास उभें केलें । याचें उत्तर दिधलें । पुढिले समासीं ॥ ६७ ॥

असें विचारुन श्रोत्यांनी संशय उत्पन्न केला,त्याचे उत्तर पुढील समासात दिले आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मआशंकानाम समास तिसरा ॥ ३ ॥**

**समास चवथा : सूक्ष्मपंचभूतेंनिरूपण ॥ श्रीराम ॥**

मागील आशंकेचें मूळ । आतां होईल प्रांजळ । वृत्ति करावी निवळ । निमिष्य येक ॥ १ ॥

मागील आशंकेचे मूळ आतां स्पष्ट करण्यांत येईल,तरी चित्तवृत्ति स्थिर करावी.

ब्रह्मीं मूळमाया जाली । तिच्या पोटा माया आली । मग ते गुणा प्रसवली । म्हणौनि गुणक्षोभिणी ॥ २ ॥

ब्रह्माच्या ठिकाणीं मूळमाया झालीं,तिच्या पोटी माया झाली,मग तिनें गुणास जन्म दिला म्हणून तिला गुणक्षोभिणी म्हणतात.

पुढें तिजपासाव कोण । सत्वरजतमोगुण । तमोगुणापासून निर्माण । जाली पंचभूतें ॥ ३ ॥

( पासाव - पासून )

पुढें त्या गुणमायेपासून सत्व,रज,तम हें तीन गुण यथाक्रम कोण (म्हं उत्पन्न झालें) व तमागुणांपासून पंचमहाभूते झालीं.(कोण हें भूतकालवाचक क्रियापद आहें औरंगाबादच्या अगर नगरच्या सीमेवर हा शब्दप्रयोग रुढ आहें,तिकडें कोण निघाली-बाळंत झाली)

ऐसीं भूतें उद्भवलीं । पुढें तत्वें विस्तारलीं । एवं तमोगुणापासून जालीं । पंचमाहांभूतें ॥ ४ ॥

अशी (सूक्ष्म) भूतें उत्पन्न झाली व पुढें (सृष्टिरुपानें) त्यांचाच विस्तार झाला (तीच पुढे जडत्व पावलीं),तात्पर्य तमोगुणांपासून पंचमहाभूतें झालीं.

मूळमाया गुणापरती । तेथें भूतें कैंचीं होतीं । ऐसी आशंका हे श्रोतीं । घेतली मागां ॥ ५ ॥

मूळमाया गुणांच्या पूर्वीची (उत्पन्न झालेली,गुणापरती) आहें मग त्या मूळमायेंतच भूतें कशी येतील ?(तेथे पंचभूतें कशी झाली),अशी शंका श्रोत्यांनी पूर्वी घेतली होती.

आणिक येक येके भूतीं । पंचभूतें असती । ते हि आतां कैसी स्थिती । प्रांजळ करूं ॥ ६ ॥

शिवाय एका एका भूतांत पंचभूतें कशी असतात तेंही आतां स्पष्ट करुन दाखवूं.

सूक्ष्मदृष्टीचें कौतुक । मूळमाया पंचभूतिक । श्रोतीं विमळ विवेक । केला पाहिजे ॥ ७ ॥

मूळमाया पंचभूतात्मक कशी आहे हा चमत्कार सूक्ष्म दृष्टीनें पाहाण्यासारखा आहें,श्रोत्यांनीं नीट विचार केला पाहिजें.

आधीं भूतें तीं जाणावीं । रूपें कैसीं वोळखावी । मग तें शोधून पाहावीं । सूक्ष्मदृष्टीं ॥ ८ ॥

आधी भूतांची माहिती करुन घ्यावी,मग त्यांची रुपें कशी आहेंत तें ओळखावें आणि नंतर सूक्ष्म दृष्टीनें त्यांचे शोधन करावें.

वोळखी नाही अंतरी । ते वोळखावी कोणेपरी । म्हणोनि भूतांची वोळखी चतुरीं । नावेक परिसावी ॥ ९ ॥

( नावेक परिसावी - क्षणभर ऐकून घ्यावे )

ज्यांची माहिती अंतःकरणास नाही ती  ओळखतां कशीं येणार ? म्हणून सुज्ञांनी (नावेक) क्षणभर (प्रथम) भूतांचीच ओळख करुन घ्यावी.(पंचभूतांची रुपे काय आहेत तीं पहावींत.)

जें जें जड आणी कठिण । तें तें पृथ्वीचें लक्षण । मृद आणी वोलेपण । तितुकें आप ॥ १० ॥

जड व कठिण म्हणून जे जें आहें तें तें पृथ्वीचें लक्षण आहें आणि मृदु व ओलें असेल तेवढें आप होय.

जें जें उष्ण आणी सतेज । तें तें जाणावें पैं तेज । आतां वायोहि सहज । निरोपिजेल ॥ ११ ॥

जें जें उष्ण व तेजयुक्त असेल तें तें तेज म्हणून जाणावें,(उष्ण आणि सतेज तो अग्नि) आतां ओघानुसार वायूचेंही निरुपण सांगण्यात येईल.

चैतन्य आणी चंचळ । तो हा वायोचि केवळ । सून्य आकाश निश्चळ । आकाश जाणावें ॥ १२ ॥

चैतन्य (हालचाल करणारे) व चंचळ जें आहें तो वायु आणि जें शून्य व निश्र्चळ तें आकाश होय असें जाणावें.

ऐसीं पंचमाहांभूतें । वोळखी धरावी संकेतें । आतां येकीं पांच भूतें । सावध ऐका ॥ १३ ॥

अशी पंचमहाभूतें आहेत,ह्या लक्षणांवरुन त्यांची ओळख धरावीं,आतां एका भूतांत पांच भूते कशी असतात-प्रत्येक भूतांत बाकीची भूते कशी-हें सावधपणें ऐका.

जें त्रिगुणाहूनि पर । त्याचा सूक्ष्म विचार । यालागीं अति तत्पर । होऊन ऐका ॥ १४ ॥

जी मूळमाया त्रिगुणाच्या पलीकडची (अर्थात फार सूक्ष्म) तिचाही सूक्ष्म विचार करावयाचा आहें,ह्यास्तव अत्यंत लक्षपूर्वक ऐका.

सूक्ष्म आकाशीं कैसी पृथ्वी । तेचि आधीं निरोपावी । येथें धारणा धरावी । श्रोतेजनीं ॥ १५ ॥

सूक्ष्म आकाशांत पृथ्वी कशी असतें तिचेंच आधी निरुपण करुं,श्रोत्यांनी एकाग्रतापूर्वक नीट ऐकावें.

आकाश म्हणजे अवकाश सून्य । सून्य म्हणिजे तें अज्ञान । अज्ञान म्हणिजे जडत्व जाण । तेचि पृथ्वी ॥ १६ ॥

(आकांशात पंचभूते-म्हणजें) आकाश-अवकाश (पोकळी) शून्य,शून्य म्हणजें अज्ञान आणि अज्ञान म्हणजें जडत्व,हींच (सूक्ष्म आकाशांतील) पृथ्वी.

आकाश स्वयें आहे मृद । तेंचि आप स्वतसिद्ध । आतां तेज तेंहि विशद । करून दाऊं ॥ १७ ॥

आकाश म्हणजें स्वतःच मृदु आहें तेंच स्वयंसिध्द आप होय,(आकाश स्वयें मृदु आहें व मृदुत्व हें आपाचें लक्षण असल्यामुळें आकाशांत आप आहें) आतां तेजही स्पष्ट करुन दाखवूं

अज्ञानें भासला भास । तोचि तेजाचा प्रकाश । आतां वायो सावकाश । साकल्य सांगों ॥ १८ ॥

अज्ञानानें भास भासतो,तोच तेजाचा प्रकाश होय.(म्हणून आकाशांत तेज आहें) आतां वायूचेही यथासांग निरुपण करु.

वायु आकाश नाहीं भेद । आकाशाइतुका असे स्तब्ध । तथापी आकाशीं जो निरोध । तोचि वायो ॥ १९ ॥

वायु व आकाश ह्यांत भेद नाही,आकाशाप्रमाणेंच वायुही स्तब्ध असतो,तथापि आकाशामध्यें जो कोंडलेला तोच वायु.

आकाशीं आकाश मिसळलें । हें तों नलगे किं बोलिलें । येणें प्रकारें निरोपिलें । आकाश् पंचभूत ॥ २० ॥

आकाशांत आकाश मिसळलें आहें हे सांगितलेच पाहिजें असें नाही,अशाप्रकारे आकाशात पंचभूते असतात,

वायोमध्यें पंचभूतें । तेंहि ऐका येकचित्तें । बोलिजेती ते समस्तें । येथान्वयें ॥ २१ ॥

(वायु-पंचभूते) वायुमध्ये पंचभूतें आहेत,तीही सर्व क्रमानें सांगतो,ती एकाग्रचित्तानें ऐका.

हळु फूल तरी जड । हळु वारा तरी निबिड । वायो लागतां कडाड । मोडती झाडें ॥ २२ ॥

फूल हलकें असलें तरी तें काही जड असतें,त्याप्रमाणें वायु कितीही जलका असला तरी तो कठिण आहें,वायुच्या झपाट्यानें झाडें कडाकडा मोडतात.

तोलेंविण झाड मोडे । ऐसें हें कहिंच न घडे । तोल तोचि तये जडे । पृथ्वीचा अंश ॥ २३ ॥

काहीं भार पडल्याशिवाय झाड मोडलें असें कधीच घडावयांचें नाहीं,जो भार म्हणजें तोल तोच वायूतील पृथ्वीचा जडत्वांश.

येथें श्रोते आशंका घेती । तेथें कैचीं झाडें होतीं । झाडें नव्हतीं तरी शक्ती । कठिणरूप आहे ॥ २४ ॥

तेथें मूळमायेच्या (वायूच्या सूक्ष्म रुपाच्या) ठिकाणीं-झाडें कोठंची ?अशी शंका श्रोते घेतील,झाडें नसलीं तरी शक्ति कठिणरुपानें आहेंच,

वन्हीस्फुलींग लाहान । कांहीं तऱ्ही असे उष्ण । तैसें सुक्ष्मीं जडपण । सूक्ष्मरूपें ॥ २५ ॥

विस्तवाची ठिणगी अगदी लहान असली तरी तिच्या ठिकाणी काहींतरी उष्णता असतेंच त्याचप्रमाणें सूक्ष्मामध्यें जडपणा असतो,तोही सूक्ष्मरुपानेंच असतो.

मृदपण तेंचि आप । भास तेजाचें स्वरूप । वायो तेथें चंचळरूप । सहजचि आहे ॥ २६ ॥

(वायूतला) मृदुपणा तेंच आप होय भास हें तेजाचें स्वरुप होयं,चंचळरुपानें वायु तेंथें स्वभावतःच आहें.

सकळांस मिळोन आकाश । सहजचि आहे अवकाश । पंचभूतांचे अंश । वायोमधें निरोपिले ॥ २७ ॥

सर्वांना मिळून आकाश सहजच पैस जागा आहें ह्याप्रमाणें वायूंतील पंचभूतांचे अंश सांगितलें.

आतां तेजाचें लक्षण । भासलेंपण तें कठीण । तेजीं ऐसी वोळखण । पृथ्वीयेची ॥ २८ ॥

(तेज-पंचभूते) आतां तेजाचें लक्षण सांगतो,त्याचा भास होतो हाच कठिणपणा,तेजामध्ये हेच पृथ्वीचे रुप होय.

भासला भास वाटे मृद । तेजीं आप तेचि प्रसिद्ध । तेजीं तेज स्वतसिद्ध । सांगणेंचि नलगे ॥ २९ ॥

भास भासला तो मृदु आहेसा वाटला,तोच मृदुपणा हें तेंजातील आप होय असें स्पष्टपणें जाणावें.तेजामध्ये तेज आहेच हे सांगावयास नकोंच.

तेजीं वायो तो चंचळ । तेजीं आकाश निश्चळ । तेजीं पंचभूतें सकळ । निरोपिलीं ॥ ३० ॥

तेजात चंचळपणा दिसतो तो वायु व निश्र्चळता असते तें आकाश अशाप्रकारें तेजामध्ये असलेली पंचमहाभूतें सांगितली.

आतां आपाचें लक्षण । आप तेंचि जें मृदपण । मृदपण तें कठिण । तेचि पृथ्वी ॥ ३१ ॥

(४- आप पंचभूते ) आतां आप ह्या तत्वांचे लक्षण सांगतों,जो मृदुपणा तेंच आपाचे लक्षण होय.जो मृदुपणा तोच कठिणपणा (मृदुत्व म्हणजे काहीतरी काठिण्य) तेंच पृथ्वी चें लक्षण होय.

आपीं आप सहजचि असे । तेज मृदपणें भासे । वायो स्तब्धपणें दिसे । मृदत्वाआंगी ॥ ३२ ॥

आपात आप सहजच आहें,मृदुपणा भासतो तें तेज मृदुपणामध्ये स्तब्धपणाने वायु दिसतो.

आकाश न लगे सांगावें । तें व्यापकचि स्वभावें । आपीं पंचभूतांचीं नांवें । सूक्ष्म निरोपिलीं ॥ ३३ ॥

आपामध्यें आकाश असतें हें सागणें नकोच,कारण तें मूळचेच सर्वव्यापक आहें आपामध्ये पंचभूतें कशी असतात ते सांगितलें.

आतां पृथ्वीचें लक्षण । कठीण पृथ्वी आपण । कठिणत्वीं मृदपण । तेंचि आप ॥ ३४ ॥

कठिणत्वाचा जो भास । तोचि तेजाचा प्रकाश । कठिणत्वीं निरोधांश । तोचि वायो ॥ ३५ ॥

(५-पृथ्वी पंचभूतें) आतां पृथ्वीचें लक्षण सांगतो. पृथ्वी ही मूळचीच कठिण आहे,व कठिणपणांत जो मृदुपणा तेंच आप,कठिणत्व जे भासतें तें भासणें तोच तेजाचा प्रकाश,काठिणत्वामध्यें जो विरोधाचा अंश आहे तोच वायु.

आकाश सकळांस व्यापक । हा तों प्रगटचि विवेक । आकाशींच कांहीं येक । भास भासे ॥ ३६ ॥

आकाश सर्वांना व्यापक आहे,हा तर उघडच विचार आहें कोणताही भास भासतो तो आकाशातच भासतो.

आकाश तोडितां तुटेना । आकाश फोडितां फुटेना । आकाश परतें होयेना । तिळमात्र ॥ ३७ ॥

आकाश तोडल्यानें तुटत नाही,आकाश फोडल्यानें फुटत नाही,तें तिळमात्रही पलिकडे होत नाही,(बाजूला सरत नाही)

असो आतां पृथ्वीअंत । दाविला भूतांचा संकेत । येक भूतीं पंचभूत । तेंहि निरोपिलें ॥ ३८ ॥

असो,आतां पृथ्वीमध्यें भूतांचा समावेश कसा असतो तें दाखविलें,आणि एकेका भूतांत पंचभूतें कशी असतात त्यांचेही निरुपण केलें,सूक्ष्म पंचभूतांचे हें निरुपण झालें.

परी हें आहाच पाहातां नातुडे । बळेंचि पोटीं संदेह पडे । भ्रांतिरूपें अहंता चढे । अकस्मात ॥ ३९ ॥

पण हें (आहाच) वरवर पाहिल्यानें समजणार नाही,बळेचिं नसता संशय मनात येतो,(बळेचिं धसमुसळेपणानें पाहिल्यास मनांत संशय उत्पन्न होतों) आणि भ्रांतीच्या स्वरुपांने एकाएकीं अहंकार मनांत उत्पन्न होतो.

सूक्ष्मदृष्टीनें पाहातां । वायोचि वाटे तत्वता । सूक्ष्म वायो शोधूं जातां । पंचभूतें दिसती ॥ ४० ॥

पचभूतांकडे सूक्ष्म द्दष्टीनें पाहिल्यास खरोखर (मूळचा) वायुच आहेंसे वाटतें आणि वायूचें सूक्ष्म शोधन केल्यास त्यांत पंचभूतें दिसतात.

एवं पंचभूतिक पवन । तेचि मूळमाया जाण । माया आणी सूक्ष्म त्रिगुण । तेहि पंचभूतिक ॥ ४१ ॥

तात्पर्य, (हा सूक्ष्म) पंचभूतात्मक वायु हीच मूळमाया होय आणि त्या मूळ मायेंच्या पुढील (गुण) माया व सूक्ष्म त्रिगुण हें ही पंचभूतात्मक आहेत.

भूतें गुण मेळविजे । त्यासी अष्टधा बोलिजे । पंचभूतिक जाणिजे । अष्टधा प्रकृति ॥ ४२ ॥

पंचमहाभूते म्ह.मूळमाया व तीन गुण मिळून अष्टधा प्रकृति म्हणतात,अशी ही अष्टधा प्रकृती पंचभूतात्मक आहे.(मूळमायेंत पंचभूते सूक्ष्म रुपानें आहेत तिच्यापासून गुणमाया-त्रिगुण-हेही प्रथम सूक्ष्म व नंतर क्रमानें स्पष्ट झालें)

शोधून पाहिल्यावीण । संदेह धरणें मूर्खपण । याची पाहावी वोळखण । सूक्ष्मदृष्टीं ॥ ४३ ॥

नीट शोधून पाहिल्या-(विचार केला-) वांचून संशय धरणें मूर्खपणाचें होय,ह्याचा विचार सूक्ष्मद्दष्टीनें करावा,

गुणापासूनि भूतें । पावलीं पष्ट दशेतें । जडत्वा येऊन समस्तें । तत्वें जालीं ॥ ४४ ॥

गुणांपासून (पंच) भूतें व्यक्त स्वरुपाला आली,नंतर सगळी जड बनून त्यांची तत्वे झाली. (पुढें नाना तत्वें निर्माण होऊन पिंडब्रह्माडात्मक स्थूळ सृष्टिरचना झाली,

पुढें तत्वविवंचना । पिंडब्रह्मांड तत्वरचना । बोलिली असे ते जना । प्रगटचि आहे ॥ ४५ ॥

नंतर तत्वांचा विचार,पिंड व ब्रह्मांड ह्यांतील तत्वांची रचना कशी झाली ती पुढें सांगितली आहें व लोकांत ती प्रकट आहें.

हा भूतकर्दम बोलिला । सूक्ष्म संकेतें दाविला । ब्रह्मगोळ उभारला । तत्पूर्वी ॥ ४६ ॥

हा जो वर संक्षेपानें सांगितला तो भूतकर्दम (-पंचभूतांचा कर्दम-चिखल) होय,ब्रह्मांड गोळ्याची रचना होण्याच्या पूर्वीचा तो सूक्ष्म कर्दम होय,

या ब्रह्मांडापैलिकडिल गोष्टी । जैं जाली नव्हती सृष्टी । मूळमाया सूक्ष्मदृष्टीं । वोळखावी ॥ ४७ ॥

जेव्हा सृष्टी उत्पन्न झाली नव्हती तेंव्हाच्या-ब्रह्मांडाच्या पूर्वीच्या ह्या गोष्टी आहेंत,(अशा स्थितीतली) मूळमाया सूक्ष्म रुपांने ओळखावी.

सप्तकंचुक प्रचंड । जालें नव्हतें ब्रह्मांड । मायेअविद्येचें बंड । ऐलिकडे ॥ ४८ ॥

( सप्तकंचुक - पंचभूते + अहंकार + महतत्व अशी सात आवरणयुक्त त्रैलोक्य )

सप्तकंचूक (पंचतत्त्वे + अहंकार + महतत्व ह्या सात आवरणांनी वेष्टित अथवा सप्तसागर,सप्तरस,किंवा सप्तवर्ण ह्यांनीं युक्त) असें प्रचंड ब्रह्मांड तेव्हा झालें नव्हतें,माया सप्तभुवनें (शिवोपाधि) व अविद्या (जीवोपाधि) यांचे बंड सुध्दा अलीकडचें आहें,

ब्रह्मा विष्णु महेश्वर । हा ऐलिकडिल विचार । पृथ्वी मेरु सप्त सागर । ऐलिकडे ॥ ४९ ॥

ब्रह्मा विष्णु शंकर किंवा पृथ्वी,मेरु,सप्तसागर हें सर्व (मूळमायेंच्या) अलीकडचें आहेंत,(हें तेव्हा निर्माण झालें नव्हतें.)

नाना लोक नाना स्थानें । चन्द्र सूर्य तारांगणें । सप्त द्वीपें चौदा भुवनें । ऐलिकडे ॥ ५० ॥

( **सप्त द्वीपें** - जंबू,प्लक्ष,श्यामली,कुश,क्रोच,शाक,पुष्कर , चौदा भुवनें - भू , भूवः,स्वः,महः,जनः ,तपः , सत्य हे सात स्वर्ग व अतल ,वितल , सुतल , रसातल , महातल , तालातल , पाताळ हे सात पाताळ )

अनेक लोक,अनेक स्थानें,चंद्र,सूर्य,तारे,सप्तद्वीपें ,चौदाभुवनें ही सर्व अलीकडील होत. (ही तेव्हा निर्माण झाली नव्हती)

शेष कूर्म सप्त पाताळ । येकविस स्वर्गें अष्ट दिग्पाळ । तेतिस कोटि देव सकळ । ऐलिकडे ॥ ५१ ॥

( येकविस स्वर्गें - **एकवीस स्वर्ग** - ज्योती , सित ,विमल , अभिआगत , प्रकाश,रम्य ,सहज,नाद,दिव्य, एकांत,स्थिर,तृप्ती,निर्मळ,प्रेमळ,निज,लय,अनंत,नित्य,अतित,सच्चीतानंद **अष्ट दिग्पाळ** - इंद्र-पूर्व ,अग्नी - आग्नेय,यम-दक्षिण,निऋती - नैऋत्य,वरूण -पश्चिम,वायू - वायव्य,सोम - उत्तर,ईश्वर - ईशान्य )

शेष,कूर्म,सप्तपाताळ एकवीस स्वर्ग,अष्टदिक्पाळ,तेहतीस कोटि देव (८ वसु-दिक्पाळ,१२- आदित्य,११-रुद्र,प्रजापति व वषट्कार मिळून ३३) हें सर्व अलीकडचें आहेत,

बारा आदित्य । अक्रा रुद्र । नव नाग सप्त ऋषेश्वर । नाना देवांचे अवतार । ऐलिकडे ॥ ५२ ॥

( **बारा आदित्य** - धातू , मित्र,अर्यमा,रुद्र,वरूण,सूर्य,भग,विवस्तव,पुषन,सवित,त्वष्टा, व विष्णु अक्रा रुद्र - रेवत,अज,भीम,भव,वाम,वृषा,कपि,अजैकपाद,उग्र,अहिबुध्न्य,बहुरूप,महान **नव नाग** - अनंत, वासुकी,शेष,पद्मनाभ,कंबल,शंखपाल,धृतराष्ट्र,तक्षक, व कालिया , **सप्त ऋषेश्वर** - कश्यप ,अत्री,भारद्वाज , विश्वामित्र, गौतम, वशिष्ठ,जमदग्नी )

बारा आदित्य,अकरा रुद्र,नऊ नाग,सात महर्षि,तसेंच अनेक देवांचें अवतार हें अलीकडचे आहेत.

मेघ मनु चक्रवती । नाना जीवांची उत्पति । आतां असो सांगों किती । विस्तार हा ॥ ५३ ॥

मेघ,मनु,चक्रवर्ती राजें,अनेक जीवांची उत्पत्ति असा हा विस्तार किती सांगावा ?

सकळ विस्ताराचें मूळ । ते मूळ मायाच केवळ । मागां निरोपिली सकळ । पंचभूतिक ॥ ५४ ॥

आतां पुरे,ह्या सर्व विस्ताराचें मूळ म्हणजें फक्त मूळमायाच एकटी होय आणि तो सगळा पंचभूतात्मक आहे हे पूर्वीच सांगितले आहें,

सूक्ष्मभूतें जे बोलिलीं । तेचि पुढें जडत्वा आलीं । ते सकळहि बोलिलीं । पुढिले समासीं ॥ ५५ ॥

पूर्वी सूक्ष्मभूतें जीं सांगितलीं तीच पुढें जडत्व पावलीं व त्यांनी हा ब्रह्मगोळा उभारला हें सर्वही पुढच्या समासात सांगितली आहें.

पंचभूतें पृथकाकारें । पुढें निरोपिलीं विस्तारें । वोळखीकारणें अत्यादरें । श्रोतीं श्रवण करावीं ॥ ५६ ॥

पंचभूते वेगवेगळी व विस्तारपूर्वक पुढें सांगितली आहेत,त्यांच्या स्वरुपाची ओळख होण्यासाठी श्रोत्यांनी ती आदरपुर्वक श्रवण करावी.

पंचभूतिक ब्रह्मगोळ । जेणें कळे हा प्रांजळ । दृश्य सांडून केवळ । वस्तुच पाविजे ॥ ५७ ॥

त्यायोगानें हा ब्रह्मांडगोल कसा पंचभूतात्मक आहें हें स्पष्ट कळेल आणि दृश्य टाकून केवळ परब्रह्म वस्तूचीच प्राप्ति करुन घेतां येईल.

माहाद्वार वोलांडावें । मग देवदर्शन घ्यावें । तैसें दृश्य हे। सांडावें । जाणोनियां ॥ ५८ ॥

देवालयाचें महाद्वार ओलांडून आंत गेल्यावर मग देवदर्शन घ्यावयाचें,त्याचप्रमाणें जे दृश्य असेल तें ओळखून टाकावें (मग ब्रह्मप्राप्ति होईल) (मूळमाया हें महाद्वार ओलांडले म्हणजें मूळमायेच्या पलींकडें जावें,दृश्यातीत व्हावें तेव्हांच देवदर्शन होतें)

म्हणोनि दृश्याचा पोटीं । आहे पंचभूतांची दाटी । येकपणें पडिली मिठी । दृश्य पंचभूतां ॥ ५९ ॥

म्हणून दृश्याच्या पोटांत पंचभूतांचीच गर्दी आहे,फार काय ? दृश्य व पंचभूतें एकजीव झालेली आहेंत (व तींच सृष्टि हे दृश्य सांडून वस्तु गांठावी.)

एवं पंचभूतांचेंचि दृश्य । सृष्टी रचली सावकास । श्रोतीं करून अवकाश । श्रवण करावें ॥ ६० ॥

तात्पर्य पंचभूतांचीच ही सृष्टि कशी हळूहळू बनली आहें हे श्रोत्यांनी स्वस्थ चित्तानें श्रवण करावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मपंचभूतेंनिरूपणनाम समास चवथा ॥ ४ ॥**

**समास पांचवा : स्थूळपंचमहाभूतेंस्वरूपाकाशभेदोनाम ॥ श्रीराम ॥**

केवळ मूर्ख तें नेणे । म्हणौन घडलें सांगणे । पंचभूतांचीं लक्षणें । विशद करूनि ॥ १ ॥

(आतां स्थूळ पंचमहाभूतांचें वर्णन करुन त्यांतच आकाश व स्वरुप ह्यांत काय भेद आहें तो दाखवू.) जें केवळ मूर्ख असतात,त्यांना कळत नाही म्हणून ही पंचमहाभूतांची लक्षणे अधिक स्पष्ट करुन सांगणें भाग पडलें.

पंचभूतांचा कर्दम जाला । आतां न वचे वेगळा केला । परंतु कांहीं येक वेगळाला । करून दाऊं ॥ २ ॥

ह्या पांच भूतांची परस्परात (कर्दम) मिसळ (मूळचीच) आहे,ती आतां काही केल्या वेगळी करता येणार नाही.तथापि काहींतरी वेगवेगळी करुन दाखवूं (पंचभूतांचा मूळमायेंत कर्दम झाला आहें तेव्हा स्थूळ पंचभूतात तो झाला आहे हें सांगायला. नकोच.कोणतेही भूत पृथक असें सापडायचें नाही. तथापि सामान्य जनांच्या समजुतीसाठी पांचही भूतांचे वर्णन करुन सांगतो.)

पर्वत पाषाण सिळा सीखरें । नाना वर्णें लहान थोरें । खडे गुंडे बहुत प्रकारें । जाणिजे पृथ्वी ॥ ३ ॥

(१)पृथ्वी-जडांश व कठिनांश तो पृथ्वीचा भाग) डोंगर,पर्वत,दगड,शिळा,(पर्वत-) शिखरें,अनेक प्रकारचें व अनेक रंगाचे खडें,गुंडें,

नाना रंगांची मृत्तिका । नाना स्थळोस्थळीं जे कां । वाळुकें वाळु अनेका । मिळोन पृथ्वी ॥ ४ ॥

अनेक रंगांची माती,अनेक ठिकाणी असलेले वाळूचें दगड,अनेक प्रकारची वाळू .

पुरें पट्टणें मनोहरें । नाना मंदिरें दामोदरें । नाना देवाळयें सीखरें । मिळोन पृथ्वी ॥ ५ ॥

( दामोदरें - रत्नखचित मंदिरे )

सुंदर शहरें व पट्टणें,अनेक मंदिरे,राजवाडें (दामोदरें),अनेक देवळें व त्यांची शिखरें ही सर्व पृथ्वी होय.

सप्त द्वीपावती पृथ्वी । काये म्हणोनि सांगावी । नव खंडे मिळोन जाणावी । वसुंधरा ॥ ६ ॥

सप्तद्वीपयुक्त पृथ्वीच्या विस्ताराचें किती म्हणून वर्णन करावें ? ही सांतही द्विपे व नऊ खंड पृथ्वी होय,

नाना देव नाना नृपती । नाना भाषा नाना रिती । लक्ष चौर्यासी उत्पत्ती । मिळोन पृथ्वी ॥ ७ ॥

अनेक देव व अनेक राजे ,अनेक भाषा बोलणारे व अनेक रीतिरिवाजाचें चो-यांशी लक्ष योनींत उत्पन्न झालेले जीव,

नाना उद्वसें जें वनें । नाना तरुवरांचीं बनें । गिरीकंदरें नाना स्थानें । मिळोन पृथ्वी ॥ ८ ॥

( उद्वसें - ओसाड )

उध्वस्त झालेली (उध्वसें) अनेक वनें,वृक्षलतांची अरण्यें,पर्वतांतील गुहा इत्यादि अनेक स्थानें मिळून पृथ्वी होय.

नाना रचना केली देवीं । जे जे निर्मिली मानवी । सकळ मिळोन पृथ्वी । जाणिजें श्रोतीं ॥ ९ ॥

देवांनी किंवा मनुष्यांनी उत्पन्न केलेली जी जी रचना किंवा कार्ये तीं सर्व मिळून पृथ्वी होय.

नाना धातु सुवर्णादिक । नाना रत्नें जे अनेक । नाना काष्ठवृक्षादिक । मिळोन पृथ्वी ॥ १० ॥

सोनें वगैरे अनेक धातु,अनेक प्रकारची रत्नें,अनेक काष्ठें,झाडें इत्यादि मिळून सर्व पृथ्वी होय.

आतां असो हें बहुवस । जडांश आणी कठिणांश । सकळ पृथ्वी हा विश्वास । मानिला पाहिजे ॥ ११ ॥

आतां हा विस्तार (बहुवस) पुरें, जें जें जड व कठिण तें तें सर्व पृथ्वी होय.(तात्पर्य,जडांश आणि कठिनांश तो सर्व पृथ्वीचा अंश) ह्यावर विश्र्वास ठेंविला पाहिजें.

बोलिलें पृथ्वीचे रूप । आतां सांगिजेल आप । श्रोतीं वोळखावें रूप । सावध होऊनी ॥ १२ ॥

पृथ्वीचें रुप सांगितलें आतां आपाचें रुप सांगू ते श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावें.

वापी कूप सरोवर । नाना सरितांचें जें नीर । मेघ आणी सप्त सागर । मिळोन आप ॥ १३ ॥

(२: आप (पाणी))-अनेक आड,विहिरी,सरोवरें,नद्या,मेघ,सात समुद्र ह्या सर्वातील पाणी तें आप.

**॥ श्लोक - क्षारक्षीरसुरासर्पिर्दधि इक्षुर्जलं तथा ॥**

क्षारसमुद्र दिसताहे । सकळ जन दृष्टीस पाहे । जेथें लवण होताहे । तोचि क्षारसिंधु ॥ १४ ॥

क्षार समुद्र दिसतो.तो सर्व लोकांच्या दृष्टीस पडतो,पण मीठ (लवण) तयार होतें तो क्षारसिंधु.

येक दुधाचा सागर । त्या नाव क्षीरसागर । देवें दिधला निरंतर । उपमन्यासी ॥ १५ ॥

एक दुधाचा समुद्र आहें,त्याला क्षीरसिंधु म्हणतात,देवाने तो उपमन्यूस कायमचा दिला आहें,

येक समुद्र मद्याचा । येक जाणावा घृताचा । येक निखळ दह्याचा । समुद्र असे ॥ १६ ॥

एक मधाचा,एक तुपाचा,एक निव्वळ दह्याचा समुद्र आहें.

येक उसाच्या रसाचा । येक तो शुद्ध जळाचा । ऐसा सातां समुद्राचा । वेढा पृथ्वीयेसी ॥ १७ ॥

एक उसाच्या रसांचा,एक शुध्द पाण्याचा समुद्र,अशा सात समुद्रांचा वेढा पृथ्वीला आहें,

एवं भूमंडळीचें जळ । नाना स्थळींचें सकळ । मिळोन अवघें केवळ । आप जाणावें ॥ १८ ॥

तात्पर्य,पृथ्वीवरील व इतर अनेक ठिकाणंचें जेंवढें म्हणून पाणी आहें तें सर्व आप होय.

पृथ्वीगर्भीं कितीयेक । पृथ्वीतळीं आवर्णोदक । तिहीं लोकींचें उदक । मिळोन आप ॥ १९ ॥

पृथ्वीच्या पोटांत कितीतरी पाणी आहें तें, तसेंच पृथ्वीच्या पृष्ठभागावर पसरलेले व तिला वेढणारें आवरणोदक आहें तें असें तिन्ही लोकांतील पाणी मिळून सर्व आप.

नाना वल्ली बहुवस । नाना तरुवरांचे रस । मधु पारा अमृत विष । मिळोन आप ॥ २० ॥

अनेक प्रकारच्या वेली व वृक्ष ह्यांचे रस,मध,पारा,अमृत,विष मिळून सर्व आप

नाना रस स्नेहादिक । याहि वेगळे अनेक । जगावेगळे अवश्यक । आप बोलिजे ॥ २१ ॥

पाण्याशिवाय तूप,तेल (स्नेह) इत्यादि रस व इतर अनेक आर्द्र पदार्थ हें सर्व मिळून आप.

सारद्र आणी सीतळ । जळासारिखें पातळ । शुक्लीत शोणीत मूत्र लाळ । आप बोलिजे ॥ २२ ॥

पाण्यासारखें पात्तळ,ओलें व थंड म्हणून जेंवढें आहें,तसेंच (शुक्रीत-शुक्र) रेत,(शोणित) रक्त,मूत्र,लाळ तें सर्व आप म्हणावें.

आप संकेतें जाणावें । पातळ बोलें वोळखावें । मृद सीतळ स्वभावें । आप बोलिजे ॥ २३ ॥

तात्पर्य,पातळ,ओाले मृदु व शितळ ह्या आपत्वाच्या खुणा आहेतं,ही लक्षणें जेथें असतील त्यांस आप समजावें.

जाला आपाचा संकेत । पातळ मृद गुळगुळित । स्वेद श्लेष्मा अश्रु समस्त । आप जाणावें ॥ २४ ॥

पातळ मृदु व गुळगुळीत ह्या आपाच्या खुणा ठरल्या,घाम,श्लेष्मा (कफ),अश्रु हें सर्व आप जाणावें,

तेज ऐका सावधपणें । चंद्र सूर्य तारांगणें । दिव्य देह सतेजपणें । तेज बोलिजे ॥ २५ ॥

(३: तेज) आता सावधपणाने तेज ऐका,चंद्र,सूर्य,तारांचे समुदाय इत्यादि पदार्थ-ज्यांचे आकार तेजामुळें दिव्य आहेत,त्यांस तेज म्हणावें.

वन्ही मेघीं विद्युल्यता । वन्ही सृष्टी संव्हारिता । वन्ही सागरा जाळिता । वडवानळु ॥ २६ ॥

अग्नि,मेघांतील वीज,सृष्टीचा संहार करणारा (प्रलयकाळचा) अग्नि,समुद्रास जाळणारा-समुद्रातला-वडवानळ,

वन्ही शंकराचे नेत्रींचा । वन्ही काळाचे क्षुधेचा । वन्ही परीघ भूगोळाचा । तेज बोलिजे ॥ २७ ॥

शंकराच्या तृतीय नेत्रांतील अग्नी,भुकेमूळे पोटांत उत्पन्न होणारा क्षुधाग्नि,भुगोलास वेष्टीत असलेला (परिघ) अग्नी,त्यांस तेज म्हणावें.

जें जें प्रकाश रूप । तें तें तेजाचें स्वरूप । शोषक उष्णादि आरोप । तेज जाणावे ॥ २८ ॥

जें जें प्रकाशरुप आहें तें तें तेंजाचें स्वरुप होय.शोषण करणारे व उष्णता उत्पन्न करणारे जे धर्म ते तेज होत असे जाणावें.

वायो जाणावा चंचळ । चैतन्य चेतवी केवळ । बोलणें चालणें सकळ । वायुमुळें ॥ २९ ॥

(४:वायु) वायु चंचल आहे म्हणून समजावें,सर्वांस चेतवणारे चैतन्य (अव्यक्त),बालणें-चालणें (व्यक्त) सर्वं काहीं वायूमूळेंच.

हाले डोले तितुका पवन । कांहीं न चले पवनेंविण । सृष्टी चाळाया कारण । मूळ तो वायो ॥ ३० ॥

हालतो,डोलतो तितका सर्व वायु,वायूवाचून काही चालत नाही.सृष्टीला चाळवावयास (चलन द्यावयास) मूळ कारण  हा वायुच.

चळण वळण आणी प्रासारण । निरोध आणी अकोचन । सकळ जाणावा पवन , चंचळरूपी ॥ ३१ ॥

( अकोचन - आकुंचन )

चलन,वलन, प्रसारण, निरोधन व आकुंचन हे चंचलधर्म ज्याचें आहेत तो वायु,

प्राण अपान आणी व्यान । चौथा उदान आणी समान । नाग कुर्म कर्कश जाण । देवदत्त धनंजये ॥३२॥

प्राण,अपान,व्यान,उदान व समान (हें पांच मुख्य प्राण)व नाग (ढेकर),कूर्म (निमेषोन्मेष),कृकल, (कर्कश)(शिंक),देवदत्त (जांभई) व धनंजय (देहपुष्टी) (हें पाच उपप्राण) मिळून वायुच.(१:- प्राण वायूचें स्थान ह्रदय आहे अष्टप्रहरांत २१६०० इतके ह्याचें श्र्वासोच्छवास होतात,अपान वायूचे स्थान गुद,मल-मूत्रोत्सर्गरुप क्रिया हा करितो उदान वायूचें स्थान कंठ हें आहें,अन्नजलाचें विभाग करणें व स्वप्नदर्शनादि कार्य हा करितो,व्यान वायु सर्वांगांत आहें शरीरातील संधींतून हा आपलें काम करतो,समान वायूचें स्थान नाभि आहें हा अन्नरस सर्व शरींरात पोचविंतों.)

जितुकें कांहीं होतें चळण । तितुकें वायोचें लक्षण । चंद्र सूर्य तारांगण । वायोचि धर्ता ॥ ३३ ॥

जेवढे म्हणून चलन होते तें वायूचें लक्षण होय.चंद्र,सूर्य व तारांचे समुदाय ह्या सर्वांस धारण करणारा वायुच आहें.

आकाश जाणावें पोकळ । निर्मळ आणी निश्चळ । अवकाशरूप सकळ । आकाश जाणावें ॥ ३४ ॥

(५-आकाश) आकाश पोकळ,निर्मळ व निश्र्चळ आहे हे समजून घ्यावें,सारी पोकळी म्हणून जेवढी आहें तें सर्व आकाश.

आकाश सकळांस व्यापक । आकाश अनेकीं येक । आकाशामध्यें कौतुक । चहूं भूतांचे ॥ ३५ ॥

सर्वांना व्यापक व अनेकांमध्ये एक असें आकाश आहें,वरील चारही भूतांचे चमत्कार आकाशांतच घडतात.

आकाशा ऐसें नाहीं सार । आकाश सकळांहून थोर । पाहातां आकाशाचा विचार । स्वरूपासारिखा ॥ ३६ ॥

आकाशासारखें श्रेष्ठ कोणी नाहीं,ते सूर्याहून मोंठें आहें,आकाशाचा विचार केला तर तें परब्रह्मासारखें आहें.

तव शिष्यें केला आक्षेप । दोहीचें सारखेंचि रूप । तरी आकाशचि स्वरूप । कां म्हणो नये ॥ ३७ ॥

(प्रश्न) तेव्हां शिष्यानें शंका काढली कीं आकाश व परब्रह्म ह्या दोहोंचे स्वरुप जर अचळ,अढळ,निर्मळ व निश्र्चळ असें सारखें आहें तर आकाश हेंच स्वरुप-परब्रह्म-असें कां म्हणू नयें ?

आकाश स्वरुपा कोण भेद । पाहातां दिसेती अभेद । आकाश वस्तुच स्वतसिद्ध । कां न म्हणावी ॥ ३८ ॥

आकाश व स्वरुप ह्यांत भेद कोणता आहें ?पाहायला गेलें तर दोन्हीही एकरुप दिसतात,तेव्हा आकाश हेंच स्वत:सिध्द (स्वयंभू) ब्रह्म कां म्हणू नयें ?

वस्तु अचळ अढळ । वस्तु निर्मळ निश्चळ । तैसेंचि आकाश केवळ । वस्तुसारिखें ॥ ३९ ॥

ब्रह्म अचळ,अढळ,निर्मळ,व निश्र्चळ आहें,तद्वत आकाशही ब्रह्माप्रमाणेंच आहें.

ऐकोनि वक्ता बोले वचन । वस्तु निर्गुण पुरातन । आकाशाआंगी सप्त गुण । शास्त्रीं निरोपिलें ॥ ४०॥

(उत्तर) ही शंका ऐकून वक्त्यानें उत्तर दिलें कीं ब्रह्म हें निर्गुण व पुरातन असून आकाशाच्या आंगी सात गुण आहेत असें शास्त्रांत सांगितले आहें.

काम क्रोध शोक मोहो । भय अज्ञान सुन्यत्व पाहो । ऐसा सप्तविध स्वभाव । आकाशाचा ॥ ४१ ॥

काम,क्रोध,शोक,मोह,भय,अज्ञान व शून्यत्व असा आकाशाचा सात प्रकारचा स्वभ़ावधर्म आहें.

ऐसें शात्राकारें बोलिलें । म्हणोनि आकाश भूत जालें । स्वरूप निर्विकार संचलें । उपमेरहित ॥ ४२ ॥

असें शास्त्रकारांनी सांगितल्यामुळें आकाश हें भूत झालें,आणि स्वरुप तर निर्विकार व निरुपम घनदाट भरलेले आहें (असा त्यात भेंद असल्यामुळें आकाशाला ब्रह्म म्हणतां येणार नाही)

काचबंदि आणी जळ । सारिखेंच वाटे सकळ । परी येक काच येक जळ । शाहाणे जाणती ॥ ४३ ॥

कांच बसवलेली जमीन व पाणी दोन्ही अगदीं सारखी  दिसतात,पण एक काच आहें व एक पाणी आहें हें शहाण्यांस उमजतें.

रुवामधें स्फटिक पडिला । लोकीं तद्रूप देखिला । तेणें कपाळमोक्ष जाला । कापुस न करी ॥ ४४ ॥

(रु-कापूस,रुवामध्यें) कापसांत स्फटिक पडलेला असला तर लोकांस तो कापसासारखाच दिसतो,पण स्फटिकावर मनुष्य आपटला तर कपाळमोक्ष होईल,कापसानें होणार नाही.

तदुलामधें श्वेत खडे । तंदुलासारिखें वांकुडे । चाऊं जाता दांत पडे । तेव्हां कळे ॥ ४५ ॥

तांदळात पोढरे खडें असतात,तांदळाप्रमाणें तें वांकडें (अणकुचीदार) असतात,पण चावावयाला गेलें म्हणजें दांत पडतो तेव्हा तें समजून येतात.

त्रिभागामधें खडा असे । त्रिभागासारिखाच भासे । शोधूं जातां वेगळा दिसे । कठिणपणें ॥ ४६ ॥

कमावलेल्या चुन्यांत (त्रिभाग-चुना,वाळू व ताग तिन्हीं मिळून केलेला लगदा,त्यांत) खडा असतो तो त्या चुन्यासारखाच दिसतो,शोधून काढायला लागलें म्हणजें कठिणपणामुळें हाताला तो वेगळा लागतो.

गुळासारिखा गुळदगड । परी तो कठिण निचाड । नागकांडी आणी वेखंड । येक म्हणो नये ॥ ४७ ॥

( निचाड - केवळ )

गुळासारखा गुळ-दगड असतो,पण तो निखलास (निचाड) कठिणच असतो, बचनाग व वेखंड हीं (सारखी दिसली तरी) एक म्हणतां येत नाहीत.

सोनें आणी सोनपितळ । येकचि वाटती केवळ । परी पितळेंसी मिळतां ज्वाळ । काळिमा चढे ॥ ४८॥

सोने व सोनपितळ (पितळपान) हीं दोन्हीं एकसारखी दिसतात,पण पितळपानाला जाळ लावला तर तें काळें पडतें.

असो हे हीन दृष्टांत । आकाश म्हणिजे केवळ भूत । तें भूत आणी अनंत । येक कैसे ॥ ४९ ॥

असो,हे दृष्टांत कमीच होत,आकाश म्हणजें केवळ भूत होय,तें भूत व अनंत परमात्मा एक कशी होतील ?

वस्तुसी वर्णचि नसे । आकाश शामवर्ण असे । दोहींस साम्यता कैसे । करिती विचक्षण ॥ ५० ॥

परब्रह्म ह्या वस्तुला रंगच नाही,आकाश तर श्यामवर्ण दिसतें,तेव्हा शहाणें आहेत तें दोहींस सारखे असें कसें म्हणतील ?

श्रोते म्हणती कैंचें रूप । आकाश ठांईचे अरूप । आकाश वस्तुच तद्रूप । भेद नाहीं ॥ ५१ ॥

श्रोतें म्हणूं लागलें,आकाशाला तरी रुप कसलें ?तें मूळचें अरुप-निराकारच आहें ह्यास्तव आकाश हेंच ब्रह्मस्वरुप,त्यांत भेद नाही.

चहूं भूतांस नाश आहे । आकाश कैसें नासताहे । आकाशास न साहे । वर्ण वेक्ती विकार ॥ ५२ ॥

चार भूतांस नाश आहें,पण आकाश कसे नाश पावेल,त्याला रंग,रुप विकार हें लागत नाहीत.

आकाश अचळ दिसतें । त्याचें काये नासों पाहातें । पाहातां आमुचेनि मतें । आकाश शाश्वत ॥ ५३ ॥

तेव्हा आकाश निश्र्चळ दिसतें,त्याचें काय नासणार ?। म्हणून आमच्या मतें विचार करतां आकाश शाश्र्वत आहें.

ऐसे ऐकोन वचन । वक्ता बोले प्रतिवचन । ऐक आतां लक्षण । आकाशाचें ॥ ५४ ॥

असे श्रोत्यांचे बालणे ऐकून वक्ता प्रत्युत्तर देता झाला,आता आकाशाचें लक्षण ऐक.

आकाश तमापासून जालें । म्हणोन काम क्रोधें वेष्टिलें । अज्ञान सुन्यत्व बोलिलें । नाम तयाचें ॥ ५५ ॥

(उत्तर) आकाश तमोगुणांपासून झालें आहें म्हणून तें कामक्रोधानें वेष्टिलेलें आहें व त्याला अज्ञान शून्य अशी नांवें दिली आहेंत.

अज्ञानें कामक्रोधादिक । मोहो भये आणी शोक । हा अज्ञानाचा विवेक । आकाशागुणें ॥ ५६ ॥

अज्ञानापासून काम,क्रोध,मोह,भय,शोक इत्यादि होतात,आकाशाच्या धर्मांमुळेच हा अज्ञानांचा विचार (विषय) उत्पन्न होतो,

नास्तिक नकारवचन । तें सुन्याचें लक्षण । तयास म्हणती ह्रुदयसुन्य । अज्ञान प्राणी ॥ ५७ ॥

नास्तिकपणा किंवा नकारवचन हेंच शून्यांचे लक्षण होयं,ह्रदयशून्य (भावनाशून्य) व अज्ञानी प्राणी त्या शून्यालाच ब्रह्म म्हणतात.

आकाश स्तब्धपणें सुन्य । सुन्य म्हणिजे तें अज्ञान । अज्ञान म्हणिजे कठिण । रूप तयाचें ॥ ५८ ॥

आकाश म्हणजें स्तब्धपणानें असणारे शून्य, शून्य म्हणजें अज्ञान व अज्ञान म्हणजें कठिणपणा,हें त्या आकाशाचें रुप आहें.

कठिण सुन्य विकारवंत । तयास कैसें म्हणावें संत । मनास वाटे हें तद्वत । आहाच दृष्टीं ॥ ५९ ॥

( आहाच - उथळ ,वरवर )

जें कठिण, शून्य व विकारवंत आहें त्याला संत म्हणजें शाश्र्वत किंवा सत कसें म्हणावें ?लोक (आहाच) वरवर पाहातात म्हणून त्यांस आकाश स्वरुपाप्रमाणें आहेंसे वाटतें.

अज्ञान कालवलें आकाशीं । तया कर्दमा ज्ञान नासी । म्हणोनिया आकाशासी । नाश आहे ॥ ६०॥

आकाशांत अज्ञान मिसळलेले आहें,त्यां मिश्रणाचा नाश ज्ञानानें होतो.म्हणून आकाशालाही नाश आहें.

तैसें आकाश आणी स्वरूप । पाहातां वाटती येकरूप । परी दोहींमधें विक्षेप । सुन्यत्वाचा ॥ ६१ ॥

त्याचप्रमा़णें,आकाश व ब्रह्मस्वरुप हीं पाहू गेलें तर एकरुप वाटतात,पण दोन्हीमध्यें शून्यत्वाचा फरक आहें.(स्वरुपाच्या ठिकाणी नसलेले शून्यत्व आकाशांत आहें).

आहाच पाहातां कल्पेनिसी । सारिखेंच वाटे निश्चयेंसीं । परी आकाश स्वरूपासी । भेद नाही ॥ ६२॥

वरवर पाहिल्यास आकाश व ब्रह्म ही सारखीच असें कल्पनेस खरोखर वाटतें.तथापि आकाश व ब्रह्म ह्यांत भेद आहें.

उन्मनी आणी सुषुप्ति अवस्ता । सारिखेच वाटे तत्वता । परी विवंचून पाहों जातां । भेद आहे ॥ ६३ ॥

उन्मनी (ईश्र्वरुपीं मिळून जाणें ही मनाची एक अवस्था) व गाढ निद्रा (सुषुप्ति) या दोन्ही अवस्था सारख्याच वाटतात,पण विचारपूर्वक पाहिल्यास दोहींत भेद आहें.

खोटें खर्यासारिखें भाविती । परी परीक्षवंत निवडिती । कां कुरंगें देखोन भुलती । मृगजळासी ॥ ६४ ॥

मृगजळ पाहून हरणें (कुरंगे) भुलतात,त्याचप्रमाणें (सामान्यलोंक) खोट्याला ख-याप्रमाणेंच मानतात,पण पारखी असतात तें त्याची निवड करतात.

आतां असो हा दृष्टांत । बोलिला कळाया संकेत । म्हणौनि भूत आणी अनंत । येक नव्हेती ॥ ६५ ॥

पण आतां पुरें,खूण लक्षांत येण्यासाठीं हा द्दष्टांत सागितला,ह्यास्तव भूत जें आकाश तें व अनंत ब्रह्म हीं एक नव्हेत,

आकाश वेगळेपणें पाहावें । स्वरूपीं स्वरूपचि व्हावें । वस्तुचें पाहाणें स्वभावें । ऐसे असे ॥ ६६ ॥

आकाशाहून वेगळें राहून आकाश पाहावें,आणि स्वरुपाच्या ठिकाणीं स्वरुप होऊन जावें असें परब्रह्मवस्तूला पाहावयाचें असतें.

येथें आशंका फिटली । संदेहवृत्ती मावळली । भिन्नपणें नवचे अनुभवली । स्वरूपस्थिती ॥ ६७ ॥

येथें शंका फिटली,संशयवृत्ति लय पावली,स्वरुपस्थितीचा अनुभव वेंगळेंपणानें घेतां येत नाहीं.

आकाश अनुभवा येतें । स्वरूप अनुभवापरतें । म्हणोनियां आकाशातें । साम्यता न घडे ॥ ६८ ॥

आकाशाचा अनुभव घेतां येतो व ब्रह्मस्वरुप अनुभवाच्या पलीकडचें आहें,म्हणून आकाशाला ब्रह्माची बरोबरी होत नाहीं.

दुग्धासारिखा जळांश । निवडुं जाणती राजहंस । तैसें स्वरूप आणी आकाश । संत जाणती ॥ ६९ ॥

दुधांत मिसळलेलें पाणी दुधासारखें दिसलें तरी तें राजहंस वेगळें काढतात,त्याचप्रमाणें आकाश व स्वरुप ह्यांतील भेद संत जाणतात.

सकळ माया गथागोवी । संतसंगें हें उगवावी । पाविजे मोक्षाची पदवी । सत्समागमें ॥ ७० ॥

मायेंची ही सगळी गुंतागुंत संतसंगतीनें काढून टाकून मोक्षाची पदवी प्राप्त करुन घ्यावी.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्थूळपंचमहाभूतेंस्वरूपाकाशभेदोनाम समास पांचवा ॥ ५ ॥**

## समास सहावा : दुश्चीतनिरूपण ॥ श्रीराम ॥

श्रोता विनवी वक्तयासी । सत्संगाची महिमा कैसी । मोक्ष लाभे कितां दिवसीं । हें मज निरोपावें ॥ १ ॥

(प्रश्न) श्रोता वक्त्याला विनंति करतो कीं सत्संगाचें महत्व काय व सत्संग धरिल्यापासून किती दिवसांनी मोक्ष मिळतों,हें मला सांगावें,

धरितां साधूची संगती । कितां दिवसां होते मुक्ती । हा निश्चय कृपामुर्ती । मज दिनास करावा ॥ २ ॥

हें कृपामूर्ते साधूची संगति धरल्यानंतर मुक्ति किती दिवसांनी मिळतें,हें मज दीनाला निश्र्चयपूर्वक सांगावें.

मुक्ती लाभे तत्क्षणीं । विश्वासतां निरूपणीं । दुश्चितपणीं हानी । होतसे ॥ ३ ॥

( दुश्चितपणीं - मन एकाग्र नसताना )

(उत्तर-वक्ता उत्तर देतो:) निरुपणावर विश्र्वास ठेवला की त्या क्षणाला मुक्ति मिळतें,मन दुश्र्चित झालें की नुकसान होतें.

सुचितपणें दुश्चीत । मन होतें अकस्मात । त्यास करावें निवांत । कोणे परीं ॥ ४ ॥

( सुचितपणें दुश्चीत - काही वेळ सूचित काही वेळ दुश्चीत )

(प्रतिप्रश्न-श्रोता प्रश्न करतो कीं) मग सुचित (निरुपण लक्षपुर्वक ऐकत) असतां एकदम दुर्लक्ष करतें (निरुपण सोडून भलतीकडे जातें,मन दुश्र्चित होतें. ) असल्या ह्या चंचल मनाला स्थिर कसें करावें ?

मनाच्या तोडून वोढी । श्रवणीं बैसावें आवडीं । सावधपणें घडीनें घडी । काळ सार्थक करावा ॥ ५ ॥

मनाला लागलेल्या (आसक्तीच्या) ओढण्या तोडून टाकून निरुपण ऐकण्यास मोठया प्रेमानें बसावें आणि सावधपणानें वागून व घटकेंनें घटका साधून आयुष्याचें सार्थक करावें.

अर्थ प्रमेय ग्रंथांतरीं । शोधून घ्यावें अभ्यांतरीं । दुश्चीतपण आलें तरी । पुन्हां श्रवण करावें ॥ ६ ॥

ग्रंथातील अर्थ व सिध्दांत शोधून ह्रदयांत ग्रहण करुन ठेवावें,काहीं दुर्लक्ष झालें तर पुन्हा ऐकावें. (दुश्र्चितपण आलें तर पुन्हा श्रवण करावें)

अर्थांतर पाहिल्यावीण । उगेंचि करी जो श्रवण । तो श्रोता नव्हे पाषण । मनुष्यवेषें ॥ ७ ॥

अर्थांचे सार पाहिल्याशिवाय (मननाशिवाय) उगाच श्रवण करतो तो श्रोता नव्हें,तर मनुष्यरुपानें दगडच बसलेला आहें असें समजावें.

येथें श्रोते मानितील सीण । आम्हांस केलें पाषाण । तरी पाषाणाचें लक्षण । सावध ऐका ॥ ८ ॥

येथें आपणाला दगड म्हटलें म्हणून श्रोत्यांना वाईट (सीण) वाटेल,पण दगडसुध्दां कसा असतों हें सावधपणानें ऐका.

वांकुडा तिकडा फोडिला । पाषाण घडून नीट केला । दुसरे वेळेसी पाहिला । तरी तो तैसाचि असे ॥ ९ ॥

वांकडा तिकडा असलेला दगड घडून नीटनेटका करुन ठेवला आणि केव्हाही दुस-या वेळेला पाहिलें तरी तो घडलेला असतों तसाच असतो.

टांकीनें खपली फोडिली । ते मागुती नाहीं जडली । मनुष्याची कुबुद्धि झाडिली । तरी ते पुन्हा लागे ॥१०॥

टांकीनें त्याचा कपरा उडवला तर  तों पुन्हा लागत नाही,पण मनुष्याची दुर्बुध्दि काढून टाकली तरी ती पुन्हां उत्पन्न होतें.

सांगतां अवगुण गेला । पुन्हा मागुतां जडला । याकरणें माहाभला । पाषाणगोटा ॥ ११ ॥

एकदा सांगून दुर्गुण गेला तरी तों पुन्हा येऊन लागतों,म्हणून माणसापेक्षा दगडगोटा फार चांगला.

ज्याचा अवगुण झडेना । तो पाषाणाहून उणा । पाषाण आगळा जाणा । कोटिगुणें ॥ १२ ॥

म्हणून ज्याचा दुर्गुण जात नाही तो दगडापेक्षांही नीच होय,त्याच्यापेक्षा कोटिपटीनें दगड चांगला.

कोटिगुणें कैसा पाषाण । त्याचेंहि ऐका लक्षण । श्रोतीं करावें श्रवण । सावध होऊनी ॥ १३ ॥

कोटिपटीनें दगड चांगला.कसा हें श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावें.

माणीक मोतीं प्रवाळ । पाचि वैडुर्य वज्रनीळ । गोमेदमणी परिस केवळ । पाषाण बोलिजे ॥ १४ ॥

माणिक,मोत्ये,पोवळें,पांच,वैडूर्य,हिरा,इंद्रनीळ मणि,गोमेद,परीस ह्यांनासुध्दा दगडच म्हणतात.

याहि वेगळे बहुत । सूर्यकांत सोमकांत । नाना मोहरे सप्रचित । औषधाकारणें ॥ १५ ॥

ह्यांशिवाय सूर्यकांत,सोमकांत,ज्यांचा गुण येतो असें अनेक औषधीं मणि (मोहोरे) इ. उंची प्रकार

पुष्कळ आहेंत.

याहि वेगळे पाषाण भले । नाना तिर्थीं जे लागले । वापी कूप सेखीं जाले । हरिहरमुर्ती ॥ १६ ॥

ह्याखेरीज अनेक तीर्थांत,किंवा विहिरींस व कूपांस लागलेले दगड,तसेंच शेवटीं (सेखीं) ज्याच्या हरिहरांच्या मूर्ति बनविल्या आहेंत असें दगड चांगलें (सार्थकीं लागतात)

याचा पाहाता विचार । पाषाणा ऐसें नाहीं सार । मनुष्य तें काये पामर । पाषाणापुढें ॥ १७ ॥

(ह्या दृष्टीनें पाहाता पाषाणासारखीं लोकोपकारक वस्तु कोण़ती आहें ?)ह्यासर्वांचा विचार केला असतां दगडासारखें थोर (सार) कोणी नाहीं,दगडापुढें माणूस तो काय ?पामर बिचारा!

तरी तो ऐसा नव्हे तो पाषाण। जो अपवित्र निःकारण । तयासातिखा देह जाण ।दुश्चीत अभक्तांचा ॥१८॥

तर दुश्चित व अभक्त ह्यांचा देह ह्या उत्तम उत्तम दगडांसारखा नसून अपवित्र व निरुपयोगी दगडाप्रमाणें आहें असें समजांवें (आतां एखादा पाषाण अपवित्र-शौचाकूपादि कामीं लागतो,ह्यासारखा दुश्चित्त मनुष्याचा देह होय)

आतां असो हें बोलणें । घात होतो दुश्चीतपणें । दुश्चीतपणाचेनि गुणें । प्रपंच ना परमार्थ ॥ १९ ॥

आंता हें बोलणें पुरे, दुश्चितपणामुळें घात होतो,प्रपंच व परमार्थ दोन्ही अंतरतात.

दुश्चीतपणें कार्य नासे । दुश्चीतपणें चिंता वसे । दुश्चीतपणें स्मरण नसे । क्षण येक पाहातां ॥ २० ॥

दुश्चितपणामुळें कार्याचा नाश होतो,चिंता उत्पन्न होतें आणि पाहातां पाहातां क्षणांत स्मरण नाहीसें होतें (विस्मरणामुळें प्रमाद होतात).

दुश्चीतपणें शत्रुजिणें । दुश्चीतपणें जन्ममरणें । दुश्चीतपणाचेनि गुणें । हानी होय ॥ २१ ॥

( शत्रुजिणें - शत्रुकडून जिकले जाणे )

दुश्चितपणामुळें शत्रुकडून पराभव पावतों (शत्रुंपुढे हार खावी लागतें),जन्ममरणाचें फेरे भोगावें लागतात (जन्ममृत्युच्या यातातातींतून सुटका होत नाहीं)व नाश होतो.

दुश्चीतपणें नव्हे साधन । दुश्चीतपणें न घडे भजन । दुश्चीतपणें नव्हे ज्ञान । साधकांसी ॥ २२ ॥

दुश्चितपणामुळें साधकांना साधन,भजन (भक्ति),ज्ञान काहींच होत नाही,

दुश्चीतपणें नव्हे निश्चयो । दुश्चीतपणें न घडे जयो । दुश्चीतपणें होये क्षयो । आपुल्या स्वहिताचा ॥२३॥

दुश्चितपणामुळें निश्चय होत नाही,यश मिळत नाहीं आणि आपल्या कल्याणाचा -हास होतो (दुश्चित मनुष्य-साधक-स्वहिताला आंचवतो.

दुश्चीतपणें न घडे श्रवण । दुश्चीतपणें न घडे विवरण । दुश्चीतपणें निरूपण । हातींचे जाये ॥ २४ ॥

दुश्चितपणामुळें श्रवण-मनन घडत नाही,विवरण करतां येत नाही,आणि हातचें (ऐकायला मिळत असलेलें) निरुपण व्यर्थ जातें,

दुश्चीत बैसलाचि दिसे । परी तो असतचि नसे । चंचळ चक्रीं पडिलें असे । मानस तयाचें ॥ २५ ॥

दुश्चित माणूस श्रवण करीत बसलेला दिसतो पण त्यांचे मन कल्पनालहरींच्या फिरत्या चाकावर गिरक्या खात असल्यामुळें तों निरपणांत असून नसल्यासारखे असतों.

वेडें पिशाच्य निरंतर । अंध मुके आणी बधिर । तैसा जाणावा संसार । दुश्चीत प्राणियांचा ॥ २६ ॥

दुश्चितपणामुळें माणसाचा संसार नेहमी वेड्यापिशांच्या संसारासारखा किंवा आंधळे,मुके, व बहिरे ह्यांच्या संसारासारखा असतो (-संसार नासून जातों).

सावध असोन उमजेना । श्रवण असोन ऐकेना । ज्ञान असोन कळेना । सारासारविचार ॥ २७ ॥

( सावध असोन उमजेना - व्यग्रचित्तामुळे )

तो शुध्दीवर असून त्याला उमज पडत नाही त्याला कान असून ऐकू येत नाही व ब-यावाईटाचें ज्ञान असून सारासार विचार कळत नाही (तो सावध असून उमजत नाहीं,तो श्रवणास बसून ऐकत नाही,त्याला कळत असून सारासार विचार तेवढा नसतो.)

ऐसा जो दुश्चीत आळसी । परलोक कैंचा त्यासी । जयाचे जिवीं अहर्निशीं । आळस वसे ॥ २८ ॥

असा जो दुश्चित व आळशी असतो त्याला परलोक कोठून मिळणार ? त्याच्या अंतःकरणात नेहमीं आळस भरलेला असतो,

दुश्चीतपणापासूनि सुटला । तरी तो सवेंच आळस आला । आळसाहातीं प्राणीयांला । उसंतचि नाहीं ॥२९॥

दुश्चितपणापासून सुटला तर लगेच आळस येतो व एकदां आळसाच्या तडाख्यांत सांपडला म्हणजें त्याला (रिकामपणामुळें) फुरसत (उसंत) मिळत नाही.

आळसें राहिला विचार । आळसें बुडाला आचार । आळसे नव्हे पाठांतर । कांहीं केल्यां ॥ ३० ॥

आळसानें विचार सुटतो (विचार स्फुरत नाही),आचार बुडतो (बिघडतो)(आचारधर्म किंवा नित्यनेम पाळला जात नाही) व काहीं केले तरी पाठांतर होत नाहीं.

आळसें घडेना श्रवण । आळसें नव्हें निरूपण । आळसें परमार्थाची खूण । मळिण जाली ॥ ३१ ॥

आळसानें श्रवण घडत नाहीं,निरुपण होत नाही व परमार्थाची ओळख बुजतें.

आळसें नित्यनेम राहिला । आळसें अभ्यास बुडाला । आळसें आळस वाढला । असंभाव्य ॥ ३२ ॥

ऩआळसानें नित्यनेम राहातो,परमार्थाचा अभ्यास बुडतो, (परमार्थबुध्दि मलिन होत जातें) व आळस इतका वाढतो कीं त्याची कल्पना करतां येत नाही.

आळसें गेली धारणा धृती । आळसें मळिण जाली वृत्ती । आळसें विवेकाची गती । मंद जाली ॥ ३३ ॥

आळसानें धारणा व धैर्य हीं नाहीशी होतात,वृत्ति मलिन होते व विचार करण्याची शक्ति कमी होतें.

आळसें निद्रा वाढली । आळसें वासना विस्तारली । आळसें सुन्याकार जाली । सद्‌बुद्धि निश्चयाची ॥३४॥

आळसानें झोंप वाढतें,वासना फैलावतें व निश्चय करणारी सदबुध्दि नाहींशी होतें (-पण बुध्दि निश्चय होत नाही).

दुश्चीतपणासवें आळस । आळसें निद्राविळास । निद्राविळासें केवळ नास । आयुष्याचा ॥ ३५ ॥

दुश्चित्तपणाबरोबर आळस येतो,आळस आला म्हणजें झोपेंची हौस येतें (-पण निद्रा प्रबळ होतें) आणि झोपेमुळे आयुष्याचा पूर्ण नाश होतो,

निद्रा आळस दुश्चीतपण । हेंचि मूर्खाचें लक्षण । येणेंकरिता निरूपण । उमजेचिना ॥ ३६ ॥

निद्रा,आळस,दुश्चित्तपणा हेंच मूर्खांचे लक्षण होय व (ही तीन लक्षणें आंगी असल्यावर श्रवण) निरुपण कळतच नाही (श्रवण निरुपण कसचें घडतें ?)

हें तिन्ही लक्षणें जेथें । विवेक कैंचा असेल तेथें । अज्ञानास यापरतें । सुखचि नाहीं ॥ ३७ ॥

हीं तिन्हीं लक्षणें जेथें असतील तेथें विवेक कोठचा असणार ?या तिन्ही लक्षणांपेक्षा अज्ञान्याला दुसरे कोणतेच सुख नाहीं.

क्षुधां लागतांच जेविला । जेऊन उठतां आळस आला । आळस येतां निजेला । सावकास ॥ ३८ ॥

भूक लागली कीं जेवला,जेवून ऊठला कीं आळस आला,आळस आला की झोंपेनें घेरलें व ताणून निजला.

निजोन उठतांच दुश्चीत । कदा नाहीं सावचित । तेथें कैचें आत्महित । निरूपणीं ॥ ३९ ॥

निजून ऊठतां क्षणीच मन दुश्चित असतें ,कधीही तो सावध नसतो,अशाला निरुपणापासून आपलें कल्याण कसें करुन घेतां येईल ?(निजून उठला की दुश्चित्तपणाचा बंदी झाला त्याला सावधचित्त श्रवण घडावयांचे नाहीं व तें नाही म्हणजें आत्महिताला प्राणी मुकलाच)

मर्कटापासीं दिल्हें रत्न । पिशाच्याहातीं निधान । दुश्चीतापुढें निरूपण । तयापरी होये ॥ ४० ॥

माकडाहाती रत्न अथवा पिशाच्याहाती ठेवा दिल्यास जसें व्यर्थ तसेंच दुश्चितपणा पुढें निरुपण फुकट होय.

आतां असो हे उपपत्ती । आशंकेची कोण गती । कितां दिवसाइं होते मुक्ती । सज्जनाचेनि संगें ॥ ४१ ॥

आतां हा युक्तिवाद पुरें (हें प्रतिपादन पुरें) सज्जनांच्या संगतीमुळें किती दिवसांत मुक्ति होते ह्या प्रश्नांचा निकाल काय ?

ऐका याचें प्रत्योत्तर । कथैंसि व्हावें निरोत्तर । संतसंगाचा विचार । ऐसा असे ॥ ४२ ॥

आतां ह्यांचें प्रत्युतर ऐका,तें ऐकून शंकेचें पूर्ण निरसन करुन घ्या (कथेंत बोलूं नका) संतसंगतीचा विचार असा आहें.

लोहो परियेसी लागला । थेंबुटा सागरीं मिळाला । गंगे सरिते संगम जाला । तत्क्षणीं ॥ ४३ ॥

लोखंड परिसाला लागावें किंवा थेंब समुद्रात मिसळावा अथवा गंगेचा व नदीचा संगम व्हावा म्हणजें जसा तात्काळ परिणाम दिसून येतों.

सावध साक्षपी आणी दक्ष । तयास तत्काळचि मोक्ष । इतरांस तें अलक्ष । लक्षिलें नवचे ॥ ४४ ॥

त्याप्रमाणें सावध (आत्महिताविषयी तत्पर),साक्षेपी (दिर्घोद्योगी,उद्योगरत,निरलस),दक्ष (हुशार,शमदमादिकीं जागा) जो सावध असतो त्याला संतसंगति होतांक्षणीच मुक्ति मिळतें,इतरांना त्या अलक्ष परब्रह्माकडें लक्षच लावता येत नाहीं.

येथें शिष्यप्रज्ञाच केवळ । प्रज्ञावंतां नलगे वेळ । अनन्यास तत्काळ । मोक्ष लाभे ॥ ४५ ॥

येथे (मोक्ष मिळणाच्या बाबतींत) केवळ शिष्यप्रज्ञा (शिष्याची तीव्र ज्ञानशक्ति) हिच मुख्य कारण आहें, बुध्दिमंत व अनन्य असेल त्याला मुळीच वेळ लागत नाही,तात्काळ मोक्ष मिळतों.

प्रज्ञावंत आणी अनन्य । तयास नलगे येक क्षण । अनन्य भावार्थेंविण । प्रज्ञा खोटी ॥ ४६ ॥

बुध्दीमंत व अनन्य (एकनिष्ठ) असेल त्याला मोक्ष मिळविण्यास एका क्षणाचाही अवकाश लागत नाही,एकनिष्ठ भावनेंवाचून नुसती तीव्रबुध्दि व्यर्थ होय.

प्रज्ञेविण अर्थ न कळे । विश्वासेंविण वस्तु ना कळे । प्रज्ञाविश्वासें गळे । देहाभिमान ॥ ४७ ॥

बुध्दीवांचून परमात्मवस्तुचें आकलन होत नाही बुध्दि व विश्र्वास ही दोन्ही असली म्हणजें देहाभिमान गळून जातो.

देहाभिमानाचे अंतीं । सहजचि वस्तुप्राप्ती । सत्संगें सद्गती । विलंबचि नाही ॥ ४८ ॥

देहाभिमानाचा शेवट झाला म्हणजें परमात्मवस्तुची प्राप्ति सहज होतें अशा रीतीनें संतसंगतीनें सद्गति (मोक्ष) मिळण्यास अवकाश लागत नाहीं.

सावध साक्षपी विशेष । प्रज्ञावंत आणी विश्वास । तयास साधनीं सायास । करणेंचि नलगे ॥ ४९ ॥

जो विशेष सावध व दिर्घोद्योगी आहें,तसेंच तीव्र बुध्दिमान व (गुरुवचनीं) विश्र्वास ठेवणारा आहें त्याला साधनाचें कष्ट करण्यांचें कारणच नाहीं.

इतर भाविक साबडे । तयांसहि साधनें मोक्ष जोडे । साधुसंगें तत्काळ उडे । विवेकदृष्टी ॥ ५० ॥

इतर भोळें (साबडे) भाविक त्यांना साधनानें मोक्ष मिळेल (मात्र त्या साधनांत सत्संगति असेल तर त्या) सत्संगतीच्या योगानें साधकाची विवेकदृष्टि ताबडतोब उघडेल (प्रकट होईल.)

परी तें साधन मोडुं नये । निरूपणाचा उपाये । निरूपणें लागे सोये । सर्वत्रांसी ॥ ५१ ॥

परंतु (संतकृपा झाली तरी) आपलें पहिलें साधन सोडू नयें,निरुपण (करणें व श्रवण करणें) हा परमार्थाचा मुख्य उपाय आहें,कारण त्यामुळें सर्वांची सोय होतें (साधनामार्ग लागतो-मिळतो).

आतां मोक्ष आहे कैसा । कैसी स्वरूपाची दशा । त्याचे प्राप्तीचा भर्वसा । सत्संगें केवी ॥ ५२ ॥

मोक्ष कसा असतों,त्याचें स्वरुप काय आहें आणि सत्संगतीनें मोक्षाची प्राप्ति होईल ह्यांची खात्री काय ?

ऐसें निरूपण प्रांजळ । पुढें बोलिलें असे सकळ । श्रोतीं होऊनियां निश्चळ । अवधान द्यावें ॥ ५३ ॥

ह्यां विषयांचें स्पष्ट प्रतिपादन पुढील समासांत सर्व केलें आहें श्रोत्यांनी त्याजकडें स्थिर चित्तानें लक्ष द्यावें,

अवगुण त्यागावयाकारणें । न्यायनिष्ठुर लागे बोलणें । श्रोतीं कोप न धरणें । ऐसिया वचनाचा ॥ ५४ ॥

दुर्गुणांचा त्याग घडावा म्हणून प्रसंगी न्याय्य पण निष्ठूरपणांचें (योग्य असेल तें) बोलावें लागतें अशा भाषणांचा श्रोत्यांनीं राग धरु नयें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे दुश्चीतनिरूपणनाम समास सहावा ॥**

### समास सातवा : मोक्षलक्षण ॥ श्रीराम ॥

मागां श्रोतयांचा पक्ष । कितां दिवसां होतो मोक्ष । तेचि कथा श्रोते दक्ष । होऊन ऐका ॥ १ ॥

पूर्वीचा श्रोत्यांचा प्रश्र्न असा आहें कीं मोक्ष किती दिवसांनी मिळतों.तर तीच कथा श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावीं,

मोक्षास कैसें जाणावें । मोक्ष कोणास म्हणावें । संतसंगें पावावें । मोक्षास कैसें ॥ २ ॥

मोक्ष कसा ओळखावा,मोक्ष कशाला म्हणावें,तसें संतसंगतीनें मोक्ष कसा पावावा ?

तरी बद्ध म्हणिजे बांधला ।आणि मोक्ष म्हणिजे मोकळा जाला ।तो संतसंगें कैसा लाधला ।तेंचि ऐका ॥३॥

(त्यांचे उत्तर असें-) तरी बध्द म्हणजें बांधलेला मोक्ष म्हणजे मोकळा झालेला,आतां तो मोक्ष संत्संगतीनें कसा मिळतो ते ऐका.

प्राणी संकल्पें बांधला । जीवपणें बद्ध जाला । तो विवेकें मुक्त केला । साधुजनीं ॥ ४ ॥

प्राणी हा मी जीव आहें अशा संकल्पनेने बांधलेला असल्यामुळें बध्द झाला आहें,त्याला विवेकाच्या योगानें (आत्मानात्म-विवेक सांगून) साधुलोक मुक्त करतात.

मी जीव ऐसा संकल्प । दृढ धरितां गेले कल्प । तेणें प्राणी जाला अल्प । देहबुद्धीचा ॥ ५ ॥

मी जीव आहें हा जन्मोजन्मींचा संकल्प चित्ताच्या ठिकाणी द्दढ धरुन युगेंच्या युगें गेलीं असल्यामुळें हा लहानसा देह तो मी अशी बुध्दि प्राण्याला होतें (-जीवाची देहबुध्दि वाढून तो अल्प होतों)

मी जीव मज बंधन । मज आहे जन्ममरण । केल्या कर्माचें फळ आपण । भोगीन आतां ॥ ६ ॥

मी जीव असल्यामुळें मला बंधन आहें माझ्यामागें जन्ममरण लागलें आहें,केलेल्या (ब-या,वाईट) कर्माचें (पापपुण्यात्मक) फळ मला आतां भोगावें लागतें,

पापाचें फळ तें दुःख । आणी पुण्याचें फळ तें सुख । पापपुण्य अवश्यक । भोगणें लागे ॥ ७ ॥

पापाचें फळ दुःख व पुण्याचे फळ सुख -अशाप्रकारे सुखदुःखरुपानें पापपुण्य जरुर भोगावें लागतें.

पापपुण्य भोग सुटेना । आणी गर्भवासहि तुटेना । ऐसी जयाची कल्पना । दृढ जाली ॥ ८ ॥

पापपुण्य भोगणे सुटत नाही आणि त्याने प्राप्त होणारा गर्भवासही तुटत नाही अशी ज्याची कल्पना बळकट झाली आहें.

तया नाव बांधला। जीवपणें बद्ध जाला । जैसा स्वयें बांधोन कोसला । मृत्यु पावे ॥ ९ ॥

( कोसला - कोश )

त्याचे नांव बांधलेला,जीवपणामुळें (मी जीव आहे असा अभिमान धरल्यामुळे) तो बध्द झालेला असतो.(अशा कल्पनांनी जीव आपला आपल्यासच बांधून घेतों) ज्यांप्रमाणें कोसला (रेशमाचा किडा) आपण आपल्याभोंवती घर बांधून आपणाला कोंडून घेऊन मरतो.

तैसा प्राणी तो अज्ञान । नेणें भगवंताचें ज्ञान । म्हणे माझें जन्ममरण । सुटेचिना ॥ १० ॥

त्याप्रमाणें ह्या अज्ञानांत गुरफटलेल्या प्राण्यास भगवंताच्या स्वरुपाचें ज्ञान कळत नाहीं आणि तो म्हणतो कीं माझ्या मागचा जन्ममृत्यु सुटावयाचा नाही.

आतां कांहीं दान करूं । पुढिलया जन्मास आधारु । तेणें सुखरूप संसारु । होईल माझा ॥ ११ ॥

ह्यास्तव आतां काहीतरी दानधर्म करावा म्हणजेंच पुढले जन्माला आधार होईल आणि त्यायोगानें पुढच्या जन्मी माझा संसार सुखाचा होईल.

पूर्वी दान नाहीं केलें । म्हणोन दरिद्र प्राप्त जालें । आतां तरी कांहीं केलें । पाहिजे कीं ॥ १२ ॥

पूर्वजन्मी मीं काही दानधर्म केला नाही म्हणून ह्या जन्मांत दारिद्र भ़ोगावे लागत आहें,ह्यासाठी आता काहीतरी (पुण्य)करुन ठेवलें पाहिजें.

म्हणौनी दिलें वस्त्र जुनें । आणी येक तांब्र नाणें । म्हणे आतां कोटिगुणें । पावेन पुढें ॥ १३ ॥

असा विचार करुन एक जुने वस्त्र व एक तांब्याचे नाणें (पैसा)दान करतो आणि म्हणतो की ह्या दानाचें फळ पुढील जन्मी मला कोटिपट मिळेल.

कुशावर्तीं कुरुक्षेत्रीं । महिमा ऐकोन दान करी । आशा धरिली अभ्यांतरीं । कोटिगुणांची ॥ १४ ॥

क्षेत्रादिकांचे महात्म्य ऐकून कुशावर्त,कुरुक्षेत्रे अशा पवित्र ठिकाणी दानधर्म करुन त्यांचे फळ कोटिपटीनें मिळेल अशी आशा मनांत धरतो.

रुका आडका दान केला । अतितास टुकडा घातला । म्हणे माझा ढीग जाला । कोटि टुकड्यांचा ॥ १५ ॥

पै (रुका),पैसा (आडका) दान करतो,अतिथीला एखादा तुकडा टाकतो व  मनांत म्हणतो की माझा आता कोटि तुकड्यांचा ढीग झाला.

तो मी खाईन पुढिलिये जन्मीं । ऐसें कल्पीं अंतर्यामीं । वासना गुंतली जन्मकर्मीं । प्राणीयांची ॥ १६ ॥

तो (ढीग) मी पुढल्या जन्मी खाईन अशी अंत:करणात कल्पना करतो आणि अशाप्रकारे प्राण्यांची वासना जन्म देणा-या कर्मामध्ये गुंतून पडतें.

आतां मी जें देईन । तें पुढिले जन्मीं पावेन । ऐसें कल्पी तो अज्ञान । बद्ध जाणावा ॥ १७ ॥

आतां मी जें देईन तें मला पुढल्या जन्मी मिळेल अशी कल्पना करणारा अज्ञानी व बध्द समजावा.

बहुतां जन्माचे अंतीं । होये नरदेहाची प्राप्ती । येथें न होतां ज्ञानें सद्गती । गर्भवस चुकेना ॥ १८ ॥

अनेक जन्मांच्या शेवटी नरदेहाची प्राप्ति होतें आणि ह्या देहांत आत्मज्ञानाच्या योगानें (सद्गति) मोक्ष मिळाला नाही तर (पुन्हा:पुन्हा:) (जन्ममरण) गर्भवास चुकायचा नाही.

गर्भवास नरदेहीं घडे । ऐसें हें सर्वथा न घडे । अकस्मात भोगणें पडे । पुन्हा नीच योनी ॥ १९ ॥

आणि तो गर्भवास पुन्हां नरदेहातच भोगावयास मिळेल असे मुळीच नाही एकाएकी पुन्हा नीच योनी भ़ोगाव्या लागतील (पापाधिक्यामुळे खालच्या योनीतही जन्म घ्यावा लागतो.-पापपुण्य समान झालें की नरदेह मिळतो.)

ऐसा निश्चयो शास्त्रांतरीं । बहुतीं केला बहुतांपरीं । नरदेह संसारीं । परम दुल्लभ असे ॥ २० ॥

असा निश्र्चय अनेकांनी अनेक प्रकारे शास्त्रामध्ये सांगितला आहे,म्हणून ह्या संसारामध्ये नरदेह अतिशय दुर्लभ आहें.

पापपुण्य समता घडे । तरीच नरदेह जोडे । येरवीं हा जन्म न घडे । हें व्यासवचन भागवतीं ॥ २१ ॥

पापपुण्य जेव्हा समसमान होईल तेव्हाच हा नरदेह मिळतो,नाहीतर मिळत नाही असे भागवतांत व्यासांनी सांगितले आहे.

**॥ श्लोक ॥ नरदेहमाद्यं सुलभं सुदुर्लभं । प्लवं सुकल्पं गुरुकर्णधारं । मायानुकुलेन नभस्वतेरितं । पुमान्भबाब्धिं न तरेत्स आत्महा ॥**

नरदेह दुल्लभ । अल्प संकल्पाचा लाभ । गुरु कर्णधारी स्वयंभ । सुख पाववी ॥ २२ ॥

नरदेह हा अति दुर्लभ आहे परमात्म्याचा एकोऽहं बहुस्याम।असा लहानसा संकल्प,त्यामुळे हा लाभ झाला आहे. ह्या ठिकाणी गुरु नावाडी असून तो स्वयंभू असें आत्मसुख प्राप्त करुन देतों (अशा दुर्लभ नरदेहांत गुरु कर्णधार मिळालें तर भक्त स्वयंसुखी होतो.)

दैव अनुकुळ नव्हे जया । स्वयें पापी तो प्राणीया । भवब्धी न तरवे तया । आत्महत्यारा बोलिजे ॥ २३ ॥

देव ज्याला अनुकूल नाही तो प्राणी मूळचाच पापी होय,त्याच्याने संसारसमुद्र तरला जाणार नाही,त्याला आत्महत्यारा (आत्मघातकी) म्हणावें.

ज्ञानेंविण प्राणीयांसी ।जन्ममृत्य लक्ष चौर्यासी ।तितुक्या आत्महत्या त्यासी ।म्हणोन आत्महत्यारा ॥२४॥

आत्मज्ञान नसलें तर प्राण्याला लक्ष चौ-याशी योनीमध्ये (जन्म घेऊन) तितके जन्ममृत्यु भोगावें लागतात,म्हणून त्याला आत्महत्यारा (आत्मघातकी) म्हणावें.

नरदेहीं ज्ञानेंविण । कदा न चुके जन्ममरण । भोगणें लागती दारुण । नाना नीच योनी ॥ २५ ॥

नरदेहामध्ये आल्यावर आत्मज्ञानांवाचून (आत्मज्ञान न झाले तर) जन्ममृत्यु केव्हाही टळणार नाहींत,(इतकेंच नव्हे तर) अनेक प्रकारच्या भयंकर व नीच योनी भोगाव्या लागतील (ज्ञानांवाचून जितक्या दुःखद योनि तो फिरतो तितक्या आत्महत्या त्याला घडतात.)

रीस मर्कट श्वान सूकर । अश्व वृषभ म्हैसा खर । काक कुर्कूट जंबुक मार्जर ।सरड बेडुक मक्षिका ॥२६॥

आस्वल, रीस,माकड,कुत्रे,डुक्कर,घोडा,बैल,टोणगा ,(म्हैसा),गाढव,कावळा,कोबडा,कोल्हा, मांजर,सरडा,बेडूक,माशी,

इत्यादिक नीच योनी । ज्ञान नस्तां भोगणें जनीं । आशा धरी मुर्ख प्राणी ॥ पुढिलिया जन्माची ॥ २७ ॥

इत्यादि नीच योनी ,ज्ञान नसेल तर,जगांत भोगाव्या लागतात,(असे असतां) मूर्ख प्राणी पुढल्या जन्माची आशा (फुकट) धरतों.

हा नरदेह पडतां । तोंचि पाविजे मागुतां । ऐसा विश्‍वास धरिजां । लाज नाहीं ॥ २८ ॥

हा नरदेह एकदां पडल्यावरही पुन्हा तोच-नरदेहच मिळेल असा भरवसा धरतांना त्याला कांहीं लाज वाटत नाही.

कोण पुण्याचा संग्रहो । जे पुन्हा पाविजे नरदेहो । दुराशा धरिली पाहो । पुढिलिया जन्माची ॥ २९ ॥

असा काय पुण्याचा सांठा आपण करुन ठेविला आहे की पुन्हा आपणांस नरदेहच मिळावा ?(असे असताही) पुढच्या जन्माची दुराशा धरतो हें केवढें आश्र्चर्य!

ऐसा मुर्ख अज्ञान जन । केलें संकल्पें बंधन । शत्रु आपणासि आपण । होऊन ठेला ॥ ३० ॥

असे मूर्ख व अज्ञानी लोक असतात,(आपल्याच) संकल्पाचें बंधन (आपणास) करुन घेऊन आपलें आपल्यालाच शत्रु होऊन बसतात,

**॥ श्लोक ॥ अत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ।**

ऐसे संकल्पाचें बंधन । संतसंगे तुटे जाण । ऐक तयाचें लक्षण । सांगिजेल ॥ ३१ ॥

असें हे संकल्पाचें बंधन संतसंगतीनें तुटतें,तें कसें तुटतें तो प्रकार आतां सांगतो (हें संकल्पाचें बंधन सत्संगात ज्ञानविवेकानेंच तुटतें)

पांचा भूतांचें शरीर । निर्माण जालें सचराचर । प्रकृतिस्वभावें जगदाकार । वर्तों लागे ॥ ३२ ॥

देहासह सर्व चराचर जग पंचभूतात्मक असें उत्पन्न झालें असून हा जगाचा पसारा प्रकृतिस्वभावे (मायेच्या अनुरोधानें किंवा आपापल्या प्रकृतिधर्माप्रमाणे) चालत असतो.

देह अवस्ता अभिमान । स्थानें भोग मात्रा गुण । शक्ती आदिकरुन लक्षण । चौपुटी तत्वांचें ॥ ३३ ॥

( चौपुटी तत्वांचें - देह,अवस्था,अभिमान,स्थाने,भोग,गुण,मात्रा,शक्ती हे प्रत्येकी चार )

(स्थूळ,सुक्ष्म,कारण,महाकारण हें) चारदेह,(जागृति,स्वप्न,सुषुप्ति,तुर्या ह्या) चार अवस्था, (विश्र्व,तैजस,प्राज्ञ, व प्रत्यगात्मा हे ) चार अभिमानी आत्में,(नेत्र,कंठ,ह्रदय,मूर्धा,ही चार) स्थानें,(स्थूल,प्रविविक्त,वासनारुप आनंद व आनंदाभावभास हें) चार भोग,(अ,उ,म् व अर्धमात्रा अशा चार) मात्रा,(तम,रज,सत्व,शुध्दसत्व असें चार) गुण,(क्रिया,द्रव्य,इच्छा व ज्ञान ह्या चार) शक्ति अशीं प्रत्येक देहांची आठ म्हणून चार देहांची बत्तीस तत्वे आहेत.(स्थूल देहाची २५ व सूक्ष्म देहाची २५ मिळून ५०,(३२व ५० मिळून ८०,१ज्ञान व १अज्ञान ) एकूण ८२ तत्वांची पिंडब्रह्मांड रचना झाली आहें.

ऐसी पिंडब्रह्मांड रचना । विस्तारें वाढली कल्पना । निर्धारितां तत्वज्ञाना । मतें भांबावलीं ॥ ३४ ॥

अशा प्रकारें एका पिंडाची व ब्रह्मांडाची रचना झाली आहें ,हा सर्व विस्तार मूळ एका कल्पनेचा (एकोऽहं बहुस्याम।) आहें, पण ह्या तत्वज्ञानाचा विचार करतांना अनेक मतामतांचा गोंधळ उडाला आहें,

नाना मतीं नाना भेद । भेदें वाढती वेवाद । परी तो ऐक्यतेचा संवाद । साधु जाणती ॥ ३५ ॥

अनेक प्रकारच्या मतांमध्यें अनेक भेद आहेंत आणि त्या भेंदांमुळे वादविवादही वाढतात,पण त्या सर्वांची एकवाक्यता कशी करायची तें साधु जाणतात.(तत्वांच्या संख्येंसंबंधानें अनेक मतभेद असतील पण ऐक्यतेचा संवाद संत करीत असतात)

तया संवादाचे लक्षण । पंचभूतिक देह जाण । त्या देहामधें कारण । आत्मा वोळखावा ॥ ३६ ॥

त्या संवादाचे स्वरुप असे असतें की हा देह पंचभूतात्मक असून त्यास कारणीभूत असणारा जों देहांतीत आत्मा त्याची ओळख करुन घ्यावी.

देह अंती नासोन जाये । त्यास आत्मा म्हणों नये । नाना तत्वांचा समुदाय । देहामधें आला ॥ ३७ ॥

देह शेवटी नाश पावतो म्हणून त्यास आत्मा म्हणता येत नाही (पूर्वी सागितलेल्या देहांतील) अनेक तत्वांचा समुदाय ह्यांचा समावेश देह ह्या शब्दांतच होतो.(अर्थात त्यांचाही नाश होतोच)

अंतःकर्ण प्राणादिक । विषये इंद्रियें दशक । हा सूक्ष्माच विवेक । बोलिला शास्त्रीं ॥ ३८ ॥

अंत:करणपंचक,प्राणपंचक,विषयपंचक व इंद्रियदशक (पंच कर्मेंद्रियें  व पंच ज्ञानेंद्रियें) मिळून सूक्ष्म देह होय,असा विचार शास्त्रांत सागितला आहें,

घेतां सूक्ष्माची शुद्धी । भिन्न अंतःकरण मन बुद्धी । नाना तत्वांचे उपाधी । वेगळा आत्मा ॥ ३९ ॥

आतां सूक्ष्मदेहाचा खोल विचार केला तर असें दिसून येईल कीं अंत:करण,मन,बुध्दि, चित्त, अहंकार इत्यादि निरनिराळ्या अनेक तत्वांच्या उपाधीहून आत्मा वेगळा आहें,

स्थूळ सूक्ष्म कारण । माहाकारण विराट हिरण्य । अव्याकृत मूळप्रकृति जाण । ऐसे अष्टदेह ॥ ४०॥

स्थूल,स्थूक्ष्म,कारण,महाकारण,विराट,हिरण्यगर्भ,अव्याकृत व मूळमाया असें आठ देह आहेंत.

च्यारी पिंडी च्यारी ब्रह्मांडीं । ऐसी अष्टदेहाची प्रौढी । प्रकृती पुरुषांची वाढी । दशदेह बोलिजे ॥ ४१ ॥

ह्यापैकी चार देह पिंडात व चार देह ब्रह्मांडात आहेत,अशी ही आठ देहांची प्रौढी (म्हणजें पुर्ण वाढ) झाली आहें, त्यांतच प्रकृति व पुरुष हें दोन धरलें तर सगळें मिळून दहा देह होतात असें म्हणतात.

ऐसें तत्वांचे लक्षण । आत्मा साक्षी विलक्षण । कार्य कर्ता कारण । दृश्या तयाचें ॥ ४२ ॥

असें तत्त्वांचे स्वरुप आहें,आत्मा ह्या तत्वांचा साक्षी असून त्या तत्वांहून तो विलक्षण निराळा आहें,कार्य म्हणजें जगत,कर्ता म्हणजें पुरूष,कारण म्हणजें प्रकृति हें सर्व त्यांचें दृश्य आहें,म्हणजें तो आत्मा त्याचा द्रष्टा आहें,

जीवशिव पिंडब्रह्मांड । मायेअविद्येचें बंड । हें सांगता असे उदंड । परी आत्मा तो वेगळा ॥ ४३ ॥

जीव आणि शिव,पिंड आणि ब्रह्मांड इत्यादि मायेंचें -अविद्येचें बंड सांगायला गेलें तर पुष्कळच आहें ,पण आत्मा हा सर्वांहून वेगळा आहें हा सर्व पंचीकरणाचा विषय आहें,

पाहों जातां आत्मे च्यारी । त्यांचे लक्षण अवधारीं । हें जाणोनि अभ्यांतरीं । सदृढ धरावें ॥ ४४ ॥

पाहूं गेलें तर आत्में चार दिसतात,त्यांची लक्षणें ऐक व ती समजून नीट ध्यानांत ठेव.

येक जीवात्मा दुसरा शिवात्मा । तिसरा परमात्मा जो विश्वात्मा । चौथा जाणिजे निर्मळात्मा । ऐसे च्यारी आत्मे ॥ ४५ ॥

जीवात्मा - घटकाश व उपाधी घट , शिवात्मा - मठकाश व उपाधी मठ, विश्वात्मा - ईश्वरचैतन्य-महदाकाश व उपाधी विश्र्व ,  निर्मळात्मा - ब्रह्मचैतन्याचे चिदाकाश व उपाधिरहित )

एक जीवात्मा,दुसरा शिवात्मा,तिसरा विश्र्वात्मा तोच परमात्मा आणि चौथा निर्मळात्मा असें चार आत्मे आहेंत.

भेद उंच नीच भासती । परी च्यारी एकचि असती । येविषीं दृष्टांत संमती। सावध ऐका ॥ ४६ ॥

भेदामुळें ते कमीजास्त भासतात,उपाधिभेदानें ते उच्चनीच वाटतात,पण चारही एकरुप आहेंत.ह्याविषयीं समर्पक दृष्टांन्त नीट लक्ष देऊन ऐक.

घटाकाश मठाकाश । महदाकाश चिदाकाश । अवघे मिळोन आकाश । येकचि असे ॥ ४७ ॥

घटांत व्यापक तें घटाकाश,मठांत व्यापक तें मठाकाश,मठाबाहेंरचें तें महदाकाश, व उपाधीवेगळें तें चिदाकाश (असें उपाधिभेदामुळें आकाशाचें चार भेद मानलें तरी) सर्व मिळून एकच आकाश आहें.

तैसा जीवात्मा आणि शिवात्मा । परमात्मा आणी निर्मळाता ।अवघा मिळोन आत्मा ।येकचि असे ॥ ४८ ॥

त्याचप्रमाणें जीवात्मा,शिवात्मा,परमात्मा व निर्मळात्मा हें सर्व मिळून एकच आत्मा आहें.

घटीं व्यापक जें आकाश । तया नाव घटाकाश । पिंडी व्यापक ब्रह्मांश । त्यास जीवात्मा बोलिजे ॥ ४९ ॥

घटामध्यें व्यापक असणारे आकाश त्याला घटाकाश असें नांव आहें त्याचप्रमाणें पिंडामध्यें व्यापक असणारा जो ब्रह्माचा अंश त्यास जीवात्मा म्हणतात,

मठीं व्यापक जें आकाश ।तया नाव मठाकाश ।तैसा ब्रह्मांडीं जो ब्रह्मांश ।त्यास शिवात्मा बोलिजे ॥५०॥

मठामध्यें जें आकाश भरलें आहें त्याला मठाकाश म्हणतात.तसेच ब्रह्मांडात असणारा ब्रह्मांश त्यास शिवात्मा म्हणतात.

मठाबाहेरील आकाश । तयाअ नांव महदाकाश । ब्रह्मांडाबाहेरील ब्रह्मांश ।त्यास परमात्मा बोलिजे ॥५१॥

मठाबाहेरच्या आकाशाला महदाकाश व ब्रह्मांडा बाहेरील ब्रह्मांशाला परमात्मा म्हणतात.

उपधीवेगळें आकाश । तया नाव चिदाकाश । तैसा निर्मळात्मा परेश । तो उपधिवेगळा ॥ ५२ ॥

कोणत्याही उपाधीहून निराळें जें आकाश त्याला चिदाकाश असें नाव आहें,त्याचप्रमाणें सर्वाहून श्रेष्ठ (परेश) जो निर्मळात्मा तो सर्व उपाधीहून निराळा आहें.

उपाधियोगें वाटे भिन्न । परी तें आकाश अभिन्न । तैसा अत्मा स्वानंदघन । येकचि असे ॥ ५३ ॥

उपाधीमुळें आकाश वेगवेगळें वाटतें पण तें अभिन्नच-एकच आहें तसा हा स्वानंदघन आत्मा एकच आहें (उपाधिभेदानें आकाश भिन्न वाटलें तरी आकाश एकच,त्याप्रमाणें उपाधिभेदामुळें जीव शिवाादि चार प्रकार समजुतींसाठी वेगवेगळें करुन सांगितलें तरी आत्मा एकच आहें,तो स्वानंदघन आहें तो तत्वादि सकळांहून वेगळा आहें,

दृश्य सबाह्य अंतरीं । सूक्ष्मात्मा निरंतरीं । त्याचि वर्णावया थोरी । शेष समर्थ नव्हे ॥ ५४ ॥

द्दश्याच्या आतंबाहेर निरंतर सूक्ष्म आत्मा व्यापलेला आहें त्याची थोरवी वर्णन करण्याला शेषही समर्थ नाहीं,

ऐसे आत्म्याचें लक्षण । जाणतां नाहीं जीवपण । उपाधी शोधतां अभिन्न । मुळींच आहे ॥ ५५ ॥

असें हें आत्म्याचें स्वरुप समजून घेतलें पाहिजें,म्हणजें जीवपण नाहींसे होतें,उपाधीचा शोध घेतला (उपाधी निराळी केली) म्हणजें वास्तविक आत्मा मूळचा एकच आहें.(उपाधी सोडून पाहाता आत्मा अभिन्न व एक आहें)

जीवपणें येकदेसी । अहंकारें जन्म सोसी । विवेक पाहतां प्राणीयांसी । जन्म कैंचा ॥ ५६ ॥

जीवात्मा जीवपणामूळें एकदेशी (लहान अंशात्मक) होऊन अहंकाराचें योगानें जन्ममृत्यूच्या फे-यांत पडला आहे,वास्तविक विचार केला तर प्राण्यांना जन्म कसला ? (पण विवेकाने पाहिल्यास जिवात्म्याला जन्ममरण नाहीं)

जन्ममृत्यापासून सुटला । या नाव जाणिजे मोक्ष जाला । तत्वें शोधितां पावला । तत्वता वस्तु ॥ ५७ ॥

(अशा प्रकारें विचार करुन) प्राणी जन्ममृत्यूपासून सुटला म्हणजें त्यास मोक्ष मिळाला असें समजावें,तत्वांचा शोध घेतां घेतां परमात्मवस्तूची खरोखरी प्राप्ति होते.(तत्वांचा शोध करुन तत्वातीत जन्ममृत्युरहित निरंजन आत्मा ओळखणें व तोच मी आहें असें निःसंदेह जाणणें यालाच मोक्ष म्हणतात.)

तेचि वस्तु ते आपण । हें माहावाक्याचें लक्षण । साधु करीती निरूपण । आपुलेन मुखें ॥ ५८ ॥

तीच परमात्मवस्तु आपण आहोत हा महावाक्याचा अर्थ (लक्षार्थ) आहें,असें साधु आपल्या मुखानें सांगतात (तीच निरंजन वस्तु तूं आहेस असा महावाक्याचा बोध साधु करितात)

जेचि क्षणी अनुग्रह केला । तेचि क्षणीं मोक्ष जाला । बंधन कांहीं आत्मयाला । बोलोंचि नये ॥ ५९ ॥

अशा रीतींची साधूंची कृपा ज्या क्षणाला साधकांवर होते त्याच क्षणाला तो मुक्त होतों,आत्म्याला काहीं बंधन आहें अशी गोष्टसुध्दा बोलूं नयें.(सत्संगात मोक्ष ह्याप्रमाणें होतों)

आतां आशंका फिटली । संदेहवृत्ती मावळली । संतसंगें तत्काळ जाली । मोक्षपदवी ॥ ६० ॥

तेव्हा आतां पूर्वीच्या शंकेचें निरसन होऊन,संशयवृत्ती नाहीशी झालीं,संतसंगतीनें मोक्षपद तात्काळ प्राप्त झालें,

स्वप्नामधें जो बांधला । तो जागृतीनें मोकळा केला । ज्ञानविवेकें प्राणीयाला । मोक्षप्राप्ती ॥ ६१ ॥

स्वप्नामध्यें जो बांधलेला असतों त्यास जागें केल्यानें तो मोकळा होतो,त्याचप्रमाणें स्वस्वरुपाच्या ज्ञानाच्या व विचाराच्या योगानें प्राण्यास मोक्षप्राप्ति होतें,(स्वप्नांत मी बांधलो आहें,असें भीतीनें ओरडणा-याला जागें करण्याप्रमाणें संसारस्वप्नांतून प्राण्याला ज्ञानविवेकानें संत स्वरुपजागृतीवर आणतात व ह्या स्वरुपजागृतीलाच मोक्ष म्हणतात)

अज्ञाननिसीचा अंतीं । संकल्पदुःखें नासती । तेणें गुणें होये प्राप्ती । तत्काळ मोक्षाची ॥ ६२ ॥

अज्ञानाची रात्र संपली कीं संकल्परुप दुःखें नाहीशी होतात व त्या योगानें तात्काळ मोक्षाची प्राप्ती होतें,

तोडावया स्वप्नबंधन । नलगे आणिक साधन । तयास प्रेत्न जागृतीवीण । बोलोंचि नये ॥ ६३ ॥

स्वप्नांतील बंधन तोडण्यासाठी त्याला जागे करण्याच्या प्रयत्नांवाचून दुसरा कोणताही उपाय नाही.

तैसा संकल्पें बांधला जीव । त्यास आणिक नाही उपाव । विवेक पाहतां वाव । बंधन होये ॥ ६४ ॥

तद्वत संकल्पाने बांधलेल्या जीवाला विवेकावांचून दुसरा कोणताही उपाय नाही, विवेक केला म्हणजें बंधनच नाहीसें होते,(वाव-व्यर्थ बंधन होय)(संकल्पाने बांधलेल्या जीवाला विवेकानेच मोकळे करतां येते व हें कार्य स्वतः मुक्त झालेले संतच करु शकतात)

विवेक पाहिल्याविण । जो जो उपाव तो तो सीण । विवेक पाहातां आपण । आत्माच असे ॥ ६५ ॥

विवेक केल्यावांचून जो उपाय करावा त्यानें व्यर्थ कष्ट मात्र होतात,विवेक केला तर आपण आत्माच आहों (आत्मविवेकांवाचून दुसरा उपाय म्हणजें व्यर्थ शीण होय)

आत्मयाचा ठांई कांहीं । बद्ध मोक्ष दोनी नाहीं । जन्ममृत्य हें सर्वहि । आत्मत्वीं न घडे ॥ ६६ ॥

आत्म्याच्या ठिकाणी बंध व मोक्ष ह्या दोन्हीपैकी एकही नाही,जन्म व मृत्यु इत्यादि कोणतेंहीं आत्म्याला घडत नाहीं. जन्ममरणाच्या कल्पनेंपलिकडें तो आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मोक्षलक्षणनाम समास सातवा ॥ ७ ॥**

### समास आठवा : आत्मदर्शन ॥ श्रीराम ॥

मागां जाले निरूपण । परमात्मा तो तूंचि जाण । तया परमात्मयाचें लक्षण । तें हें ऐसें असे ॥ १ ॥

परमात्मा तो तूंच आहेस असें प्रतिपादन पूर्वीच्या समासांत झालें,त्या परमात्म्याचें स्वरुप पुढें वर्णिल्याप्रमाणें आहें.

जन्म नाही मृत्यु नाहीं । येणें नाहीं जाणें नाहीं । बद्ध मोक्ष दोनी नाहीं । परमात्मयासी ॥ २ ॥

परमात्म्याला जन्ममृत्यु,येणे जाणे काही नाही,अर्थात बंध व मोक्ष दोन्हीही नाहीत,

परमात्मा निर्गुण निराकार । परमात्मा अनंत अपार । पर्मात्मा नित्य निरंतर । जैसा तैसा ॥ ३ ॥

परमात्मा निर्गुण,निराकार,अनंत,अपार व नित्य निरंतर जशाचा तसाच आहें.

परमात्मा सर्वांस व्यापक । परमात्मा अनेकीं येक । परमात्मयाचा विवेक । अतर्क्य आहे ॥ ४ ॥

परमात्मा सर्वांना व्यापक असून अनेंकात एक आहें,त्याचा विचार अतर्क्य आहें.

ऐसी परमात्मयाची स्थिती । बोलताती वेद श्रुती । परमात्मा पाविजे भक्तीं । येथें संशय नाही ॥ ५ ॥

अशी परमात्म्याची स्थिति असल्याचें वेद श्रुति सांगतात,असा तो परमात्मा भक्तीनें प्राप्त होतो ह्यांत संशय नाहीं.

तये भक्तीचें लक्षण । भक्ती नवविधा भजन । नवविधा भजनें पावन । बहु भक्त जाले ॥ ६ ॥

नऊ प्रकारचें जें भजन सांगितलें आहें तें त्या भक्तीचें स्वरुप होय,

तया नवविधामध्यें सार । आत्मनिवेदन थोर । तयेचा करावा विचार । स्वानुभवें स्वयें ॥ ७ ॥

त्या नवविधाभक्तीनें पुष्कळ भक्त पावन झालें आहेंत,त्या नवविधा भक्तीमध्यें आत्मनिवेदन भक्ति ही अत्यंत श्रेष्ठ होय,तिचा आपणच आपल्या अनुभवानें विचार करावा,

आपुलिया स्वानुभवें । आपणास निवेदावें । आत्मनिवेदन जाणावें । ऐसें असे ॥ ८ ॥

आपल्या स्वानुभवांनें (आत्मस्वरुपाच्या अनुभवानें) आपणांस (देहादिकांसह अहंभावास) परमात्मचरणी अर्पण करावें (लीन करावें) असें आत्मनिवेदन असतें.

महपूजेचा अंतीं । देवास मस्तक वाहाती । तैसी आहे निकट भक्ती । आत्मनिवेदनाची ॥ ९ ॥

महापूजेंच्या शेवटी देवाला मस्तक समर्पण करतात (साष्टांग नमस्कार रुपानें मस्तक अर्पण करतात) तशाच प्रकारची आत्मनिवेदन ही जवळची भक्ति आहें.

आपणांस निवेदिती । ऐसे भक्त थोडे असती । तयांस परमात्मा मुक्ती । तत्काळ देतो ॥ १० ॥

स्वतःला अर्पण करणारे असें भक्त थोडें असतात,अशांना परमात्मा तात्काळ (मुक्ति) मोक्ष देतों.

आपणांस कैसें निवेदावें । कोठें जाऊन पडावें । किंवा मस्तक तोडावें । देवापुढें ॥ ११ ॥

आपणांस कसें निवेदन करावें,कोठे जाऊन पडावें अथवा देवापुढें मस्तक तोडावें (असें श्रोत्यांनी विचारलें)

ऐसें ऐकोन बोलणें । वक्ता वदे सर्वज्ञपणें । श्रोतां सावधान होणें । येकाग्र चित्तें ॥ १२ ॥

असें श्रोत्यांचे बालणें ऐकून सर्वज्ञ वक्ता उत्तर देतो की श्रोत्यांनी एकाग्र चित्तानें सावध व्हावें.

आत्मनिवेदनाचें लक्षण । आधीं पाहावें मी कोण । मग परमात्मा निर्गुण । तो वोळखावा ॥ १३ ॥

आत्मनिवेदनाचें स्वरुप असें आहें,अगोदर मी कोण ह्याचा विचार करावा,नंतर निर्गुण परमात्म्याची ओळख करुन घ्यावी.

देवभक्ताचें शोधन । करितां होतें आत्मनिवेदन । देव आहे पुरातन । भक्त पाहे ॥ १४ ॥

अशाप्रकारें देंवाचा व भक्तांचा विचार केला म्हणजें आत्मनिवेदन होतें,पुरातन (सर्वाच्या पूर्वीचा) देव (सर्वच) आहें असें भक्त पाहातों,

देवास वोळखों जातां । तेथें जाली तद्रूपता । देवभक्तविभक्तता । मुळींच नाहीं ॥ १५ ॥

देवाची ओळख करुन घ्यावयास गेला तो आपणच देवरुप होऊन बसला,देव व भक्त ह्यांच्यात वेगळेपणा मुळीच (पूर्वीपासूनचा किंवा अगदीच) नाहीं (देवभक्तांचें मूळ पाहांता दुजेंपण नाहीं)

विभक्त नाहीं म्हणोन भक्त । बद्ध नाहीं म्हणोन मुक्त । अयुक्त नाहीं बोलणें युक्त । शास्त्राधारें ॥१६॥

देवाहून तो विभक्त म्हणजें वेगळा नाहीं म्हणून त्याला भक्त म्हणावयांचें तसेंच त्याला कोणतें बंधन नाही म्हणून तो मुक्त होय,हें बोलणें शास्त्राधारानें युक्त असल्यामुळें तें अयोग्य नाहीं.

देवाभक्ताचें पाहातां मूळ । होये भेदाचें निर्मूळ । येक परमात्मा सकळ । दृश्यावेगळा ॥ १७ ॥

देव भक्त ह्यांचे मूळ काय ह्याचा विचार करुं गेलें असतां उभयतांमधील भेद (वेगळेंपणा) समूळ नाहीसा होतो,व दृश्यविरहित असा एक परमात्माच सर्वत्र व्यापून राहातों.

तयासि होतां मिळणी । उरी नाहीं दुजेपणीं । देवभक्त हे कडसणी । निरसोन गेली ॥ १८ ॥

( कडसणी - दोरी,सूत्र,विचार )

त्या परमात्म्याशी ऐक्य झालें असतां द्वैत शिल्लक राहात नाहीं,देव वेगळा व भक्त वेगळा हा विचारच (कडसणी,प्रकार) नाहीसा होतो.

आत्मनिवेदनाचे अंतीं । जे कां घडली अभेदभक्ती । तये नाव सायोज्यमुक्ती । सत्य जाणावी ॥ १९ ॥

आत्मनिवेदनाच्या शेवटी जी अभेदभक्ति घडतें तिलाच सायुज्यमुक्ति असें नांव आहें व तीच शाश्र्वत होय असें समजावें.

जो संतांस शरण गेला । अद्‌वैतनिरूपणें बोधला । मग जरी वेगळा केला । तरी होणार नाहीं ॥२०॥

संतांना शरण जाऊन त्याला अद्वैत निरुपणाचा उपदेश झाला,तो नंतर देवाहून वेगळा करु म्हटलें तरी होणार नाहीं.

नदीं मिळाली सागरीं । ते निवडावी कोणेपरी । लोहो सोनें होतां माघारी । काळिमा न ये ॥ २१ ॥

नदी समुद्राला मिळाली मग तिला वेगळी कशी काढावी ? परिसाच्या योगानें लोखंडाचे सोनें झाल्यानंतर पुन्हा त्याला काळेपण येत नसतें,

तैसा भगवंतीं मिळाला । तो नवचे वेगळा केला । देव भक्त आपण जाला । विभक्त नव्हे ॥ २२ ॥

त्यांचप्रमाणे भगवतस्वरुपांत जो लीन झाला त्याला मग वेगळा करता येत नाही,तो भक्त स्वतः देवरुप होतो,वेगळा राहात नाही.

देव भक्त दोनी येक । ज्यासी कळला विवेक । साधुजनीं मोक्षदायेक । तोचि जाणावा ॥ २३ ॥

देव आणि भक्त हे दोघे एकरुपच आहेत हा विवेक ज्याला उमजला,तोच एकटा साधुसंतामध्ये मोक्षदायक होय,हें लक्षात ठेवावे.

आतां असो हें बोलणें । देव पाहावा भक्तपणें । तेणें त्यांचें ऐश्वर्य बाणे । तत्काळ आंगीं ॥ २४ ॥

आतां हें बोलणे पुरे (तात्पर्य हें की) भक्त होऊन देवाचा शोध करावा,म्हणजें देवाचें ऐश्र्वर्य ताबडतोब आंगी बाणेल.(भक्तपणें म्हणजे देवाशी एकरुप होऊन-अभिन्नपणे देव पाहावा.)

देहचि होऊन राहिजे । तेणें देहदुःख साहिजे । देहातीत होतां पाविजे । परब्रह्म तें ॥ २५ ॥

देहच होऊन राहिल्यानें देहदुःख सोसावे लागतें,देहातीत म्हणजें देहाहून वेगळा झाल्यास तें परब्रह्म प्राप्त होतें,(देहबुध्दीनें देहदुःख होते,ती सोडता ब्रह्मप्राप्ति होते हेच आता उलगडून दाखवू)

देहातीत कैसें होणें । कैसें परब्रह्म पावणें । ऐश्वर्याची लक्षणें । कवण सांगिजे ॥ २६ ॥

देहातीत कसें व्हावें,परब्रह्म कसें पावावें आणि ऐश्वर्याची लक्षणें कोणती आहेत ते सांगा.

ऐसें श्रोतां आक्षेपिलें । याचे उत्तर काये बोलिलें । तेंचि आतां निरोपिलें । सावध ऐका ॥ २७ ॥

असे श्रोत्यांनी विचारले,त्याचे उत्तर जे सांगितलें आहें तें पुढें आहे ते सावधपणाने ऐका.

देहातीत वस्तु आहे । तें तूं परब्रह्म पाहें । देहसंग हा न साहे । तुज विदेहासी ॥ २८ ॥

देहातीत वस्तु जें परब्रह्म तेंच तू आहेस,अर्थात तूं विदेही म्हणजें देहाहून वेगळा आहेस,म्हणून तुला विदेह्याला देहाभिमान उपयोगी नाही (शोभत नाही)(तुला विदेह्याला देहसंग नाही,असे साधु सांगतात)

ज्याची बुद्धी होये ऐसी । वेद वर्णिती तयासी । शोधितां नाना शास्त्रांसी । न पडे ठांई ॥ २९ ॥

ज्याचा निश्र्चय असा होतो त्याला वेद गातात आणि अनेक शास्त्रे त्याचा शोध घेतात,पण त्यांस त्याचा पत्ता लागत नाही.

ऐश्वर्य ऐसें तत्वता । बाणें देहबुद्धि सोडितां ।। देह मी ऐसें भावितां । अधोगती ॥ ३० ॥

अशा प्रकारचें ऐश्र्वर्य देहबुध्दि सोडली असतां खरोखरी आंगी बाणतें आणि देहच मी अशी भावना केल्यास अधोगति प्राप्त होतें (जन्ममरणाच्या फे-यात सापडतों),

याकारणें साधुवचन । मानूं नये अप्रमाण । मिथ्या मानितां दूषण । लागों पाहे ॥ ३१ ॥

म्हणून साधूचें वचन कधीं खोटे मानू नयें,खोटे मानल्यास दोष लागेल,

साधुवचन तें कैसें । काये धरावें विश्र्वासें । येक वेळ स्वामी ऐसें । मज निरोपावें ॥ ३२ ॥

(श्रोता विचारतो-) साधुवचन तें कोणतें ?विश्र्वासानें काय मान्य करावें ? महाराज हे एक वेळ मला निवेदन करा.

सोहं आत्मा स्वानंदघन । अजन्मा तो तूंचि जाण । हेंचि साधूचें वचन । सद्दढ धरावें ॥ ३३ ॥

(वक्ता उत्तर देतो) जो जन्ममरणरहित स्वानंदघन (दाट आनंदरुप) असा सोऽहं आत्मा तो तूंच आहेस! हें साधूचें वचन चित्तामध्ये धरावें,

महावाक्याचें अंतर । तुंचि ब्रह्म निरंतर । ऐसिया वचनाचा विसर । पडोंचि नये ॥ ३४ ॥

निरंतर म्हणजें शाश्र्वत असें ब्रह्म तूंच आहेस हें पहावयाचें तात्पर्य (अंतर,रहस्य) होय,अशा ह्या वचनांचा विसर कधींच पडू नयें.

देहासि होईल अंत । मग मी पावेन अनंत । ऐसें बोलणें निभ्रांत । मानूंचि नये ॥ ३५ ॥

देहाचा अंत झाल्यावर मग अनंतच,असेल बोलणे तिलप्राय (निभ्रांत मुळींच) मनावर घेऊ नयें.

येक मुर्ख ऐसें म्हणती । माया नासेल कल्पांतीं । मग आम्हांस ब्रह्मप्राप्ती । येरवीं नाहीं ॥ ३६ ॥

काहीं मूर्ख असे म्हणतात की कल्पाच्या शेवटी मायेचा नाश होईल,मगच आम्हांला ब्रह्मप्राप्ति होणार,मध्यंतरी होणार नाही (कल्पांती माया नासेल आणि मग मी अनायासेंच मुक्त होईन हें बालणें मानू नयें)

मायेसी होईल कल्पांत । अथवा देहासी येईल अंत । तेव्हां पावेन निवांत । परब्रह्म मी ॥ ३७ ॥

एकतर मायेचा समूळ नायनाट झाला पाहिजें किंवा दुसरें देहाचा शेवट झाला पाहिजें,तेव्हा मला निवांतपणे ब्रह्मप्राप्ती होईल (निवांत म्हणजें शांत परब्रह्मप्राप्ति होईल)

हें बोलणें अप्रमाण । ऐसें नव्हे समाधान । समाधानाचें लक्षण । वेगळेंचि असे ॥ ३८ ॥

परंतु असे बोलणें अयोग्य होय,अशाने समाधान होत नाही,समाधानाचे लक्षण वेगळेच आहे.

शैन्य अवघेंचि मरावें । मग राज्यपद प्राप्त व्हावें । शैन्य अस्तांचि राज्य करावें । हें कळेना ॥ ३९ ॥

सगळें सैन्य मरुन जावें व मग राज्य मिळावें (राज्यवैभव भोगावें अशातलाच हा विचार) ह्यांत अर्थ नाहीं. सैन्य असतानाच राज्य केले तर ते राज्य होय (त्यांत शहाणपण आहें) हें कळत नाहीं (तसें दृश्य देहभान जावें आणि मग आत्मसाम्राज्य भोगावें ह्यापेक्षा दृश्य देहभाव असतांही आत्मसमाधान रहावें ह्यांत स्वारस्य आहें)

माया असोनिच नाहीं । देह असतांच विदेही । ऐसें समाधान कांहीं । वोळखावें ॥ ४० ॥

माया असून ती नाहिशी झाली पाहिजें देह असतांच विदेही म्हणजें देहातीत होतां आले पाहिजें,अशाप्रकारे ख-या समाधानाची काही ओळख करुन घ्यावी (माया असून ती मिथ्या म्हणून ओळखावी,देहांत असून विदेहपणा भोगावा,ह्यांत खरे समाधान आहें)

राज्यपद हातासी आलें । मग परिवारें काय केलें । परिवारा देखतां राज्य गेलें । हें तों घडेना ॥ ४१ ॥

राज्यपद प्राप्त झाल्यावर मग परिवार असेना का ? तो काय करील ? परिवारानें पाहिल्यामुळें (परिवार डोळ्यासमोर आला की) राज्य हातचें गेले असें घडत नाहीं.

प्राप्त जालियां आत्मज्ञान । तैसें दृश्य देहभान । दृष्टीं पडतां समाधान । जाणार नाही ॥ ४२ ॥

त्याप्रमाणें आत्मज्ञान प्राप्त झाल्यावर दृश्य दृष्टीस पडलें किंवा देहभान आलें तरी समाधान नाहींसे होणार नाहीं (तद्वत आत्मज्ञानांची बैठक स्थिर झाल्यावर प्रपंच दृश्य असला म्हणून काय करितो ?तों काहीं आत्मसमाधान हिरावून नेत नाहीं)

मार्गीं मूळी सर्पाकार । देखतां भये आलें थोर । कळतां तेथील विचार । मग मारणें काये ॥ ४३ ॥

मार्गामध्यें सापाच्या आकाराची मुळी पाहून मोठी भिति वाटली,पण त्यांतील खरा प्रकार कळल्यावर मग कोणाला मारायचें ?(पण तो सर्प नसून मुळी आहें हें कळल्यावर मग तिला धोपटायचें कारणच उरत नाहीं)

तैसी माया भयानक । विचार पाहातां माईक । मग तयेचा धाक । कायसा धरावा ॥ ४४ ॥

त्याप्रमाणें ह्या भयंकर मायेचा विचार करु गेल्यास ती लटकी आहें असें दिसून येतें,मग तिचा धाक भिति कशाला बाळगावी ?

देखतां मृगजळाचे पूर । म्हणे कैसा पावों पैलपार । कळतां तेथीचा विचार । सांकडें कैंचें ॥ ४५ ॥

मृगजळाचा पूर पाहून त्यांतून पलिकडें कसा जाऊ असें म्हणतो,पण त्याचा लटकेपणा कळल्यावर मग संकट कशाचें ?(मृगजळ हें मृगजळ आहें हें कळल्यावर बुडावयाचे भय नाही.)

देखतां स्वप्न भयानक । स्वप्नीं वाटे परम धाक । जागृती आलीयां साशंक । कासया व्हावें ॥ ४६ ॥

भयंकर स्वप्न पाहून मोठी भिति वाटू लागतें पण जागे झाल्यावर भयग्रस्त (साशंक) होण्याचें कारण काय ?

तथापी माया कल्पनेसी दिसे । आपण कल्पनेतीत असे । तेथें उद्वेग काईसे । निर्विकल्पासी ॥ ४७ ॥

तथापि माया ही कल्पनेला दिसतें आणि आपण तर कल्पनेंहून वेगळें आहों मग त्या निर्विकल्पाला उद्वेग कसला ?(माया कल्पनेनें उभारलेली,आपण कल्पनातीत निर्विकल्प वस्तु,आपणास कल्पना काय करणार ?

अंतीं मतीं तेचि गती । ऐसें सर्वत्र बोलती । तुझा अंतीं तुझी प्राप्ती । सहजचि जाली ॥ ४८ ॥

अंतःकाळचें वेळी जशी बुध्दि असतें तशीच गति मिळतें,अन्ते मतिःसा गतिः। असे सर्वत्र म्हणतात,(ठीक आहे) अर्थात ह्या न्यायानें तुझ्या अंती म्हणजें देहबुध्दीचा शेवट झाला म्हणजें तुझी (स्वरुपाची) प्राप्ति आपोआपच होईल (तुझ्या अंती-मीपणाच्या,जीवदशेच्या अंतीं-मीपणाच्या,जीवदशेच्या अंती-तत्पदप्राप्ति सहजच आली.)

चौंदेहाचा अंत । आणी जन्म मुळाचा प्रांत । अंतांप्रांतासी अलिप्त । तो तुं आत्मा ॥ ४९ ॥

स्थूलसूक्ष्मादि चार देहांचा शेवट आणि जन्माचें मुळ जो अहंकार त्याचाही शेवट (प्रांत) ह्याहून वेगळा जो आत्मा तोच तूं आहेस.

जयासी ऐसी आहे मती । तयास ज्ञानें आत्मगती । गती आणी अवगती । वेगळाचि तो ॥ ५० ॥

ज्याला अशी बुध्दि आहें त्याला ज्ञानानें आत्मगति (आत्मप्राप्ति) होते,फार काय तो गति व दुर्गति ह्याहून वेगळा आहें (ह्या ज्ञानानेंच त्याला गति मिळतें,अथवा गती म्हणजें मोक्ष व अवगति म्हणजे बंध ह्यांहून तो वेगळा आहें येथे तीनही प्रचिति एकरुप होतात)

मति खुंटली वेदांची । तेथें गती आणी अवगती कैंची । आत्मशास्त्रगुरुप्रचितीची । ऐक्यता आली ॥ ५१ ॥

जेथे वेदांची बुध्दि कुंठित होऊन आत्मप्रचीति,शास्त्रप्रचीति व गुरुप्रचीति ह्या तिहींचें ऐक्य झालें तेथें गति किंवा अवगति कसली ?

जीवपणाची फिटली भ्रांती । वस्तु आली आत्मप्रचिती । प्राणी पावला उत्तमगती । सद्गुरुबोधें ॥ ५२ ॥

सद्गुरुंचा उपदेश झाल्यामुळें मी जीव हा भ्रम नाहीसा झाला,परमात्मवस्तु स्वतःच्या अनुभवास आली व त्यामुळें प्राणी उत्तम गतीला पोचला.

सद्गुरुबोध जेव्हां जाला । चौंदेहांस अंत आला । तेणें निजध्यास लागला । सस्वरूपीं ॥ ५३ ॥

सद्गुरुंचा अनुग्रह झाला कीं चारी देहांचा अंत होतो आणि त्यायोगें स्वरुपाचा निदिध्यास लागतों,

तेणें निजध्यासें प्राणी । धेयंचि जाला निर्वाणीं । सायोज्यमुक्तीचा धनी । होऊन बैसला ॥ ५४ ॥

त्या निदिध्यासाच्या योगानें प्राणी घ्येय जें ब्रह्म झाला आणि शेवटी सायुज्यमुक्तीचा धनी होऊन बसला.(प्राणी ध्येय-वस्तु-होऊन राहातों)

दृश्य पदार्थ वोसरतां । आवघा आत्माचि तत्वता । नेहटून विचारें पहातां । दृश्य मुळींच नाहीं ॥ ५५ ॥

( नेहटून - सूक्ष्म विचार )

दृश्य पदार्थ नाहींसें झालें म्हणजें खरोखरी सर्व आत्मरुपच होतें,न्याहाळून (नेहटून) विचारपूर्वक पाहिलें असतां मुळांतच दृश्य नाहीं.

मिथ्या मिथ्यत्वें पाहिलें । मिथ्यापणें अनुभवा आलें । श्रोतीं पाहिजे ऐकिलें । या नाव मोक्ष ॥ ५६ ॥

खोट्याला (दृश्याला) तें खोटें आहें अशा दृष्टीनें पाहिलें आणि खोटेंपणा अनुभवास आला ह्यांचें नांव मोक्ष,हें श्रोत्यांनी ऐकून ठेविलें पाहिजें (मिथ्या-माया-मिथ्या आहें म्हणून ओळखणें व तसा अनुभव येणें,ह्यांचे नांव मोक्ष)

सद्गुरुवचन हृदईं धरी । तोचि मोक्षाचा अधिकारी । श्रवण मनन केलेंचि करी । अत्यादरें ॥ ५७ ॥

सद्गुरुवचन जो अंतःकरणात ठसवून घेतो व एकदां ऐकल्याचेंच पुनः पुन्हा आदरपूर्वक श्रवण करतो,तोच मोक्षाचा अधिकारी होय.(सद्गुरुवचन ह्रदयी धरुन श्रवणमननाभ्यास ठेवल्यानें मोक्षाधिकार येतों)

जेथें आटती दोनी पक्ष । तेथें लक्ष ना अलक्ष । या नाव जाणिजे मोक्ष । नेमस्त आत्मा ॥ ५८ ॥

जेथें पूर्वपक्ष व उत्तरपक्ष हें दोन्ही पक्ष किंवा बंधमोक्ष,मायाब्रह्म,लक्ष्यअलक्ष्य,ध्यानध्याता इ.दोन्ही पक्ष जेंथें आटतात-नाहींसें होतात त्या ठिकाणी लक्ष नाही व अलक्ष नाहीं,तोच मोक्ष,तोच आत्मा होय,हें निश्चित (नेमस्त) होय.(तो आत्मा मोक्षस्वरुप होयं)

जेथें ध्यान धारणा सरे । कल्पना निर्विकल्पीं मुरे । केवळ ज्ञेप्तिमात्र उरे । सूक्ष्म ब्रह्म ॥ ५९ ॥

त्या ठिकाणी ध्यानधारणाही संपतात,निर्विकल्पामध्ये कल्पना मुरून जाऊन,शुध्द जाणीव तेंवढी उरतें,तेंच सूक्ष्म ब्रह्म होय,

भवमृगजळ आटलें । लटिकें बंधन सुटलें । अजन्म्यास मुक्त केलें । जन्मदुःखापासुनी ॥ ६० ॥

संसाररुप मृगजळ आटून गेलें,खोटे (लटिकें) बंधन सुटलें आणि अजन्मा जों आत्मा त्याची जन्ममृत्यूच्या दुःखापासून सुटका झाली,

निःसंगाची संगव्याधी । विदेहाची देहबुद्धी । विवेकें तोडिली उपाधी । निःप्रपंचाची ॥ ६१ ॥

निःसंगास लागलेला संगरुप रोग,विदेहास जडलेली देहबुध्दि व निःप्रपंचाची उपाधि विवेकाच्या योगानें नाहीशी करुन टाकली.

अद्वैताचें तोडिलें द्वैत । येकांतास दिला येकांत । अनंतास दिला अंत । अनंताचा ॥ ६२ ॥

अद्वैताच्या मागें लागलेले द्वैत तोडून टाकलें,एकांताला एकांत दिला आणि अनंताला अनंताचा पार (पलीकडचा शेवट,पैलपार) दाखविला.

जागृतीस चेवविलें । चेईर्यास सावध केलें । निजबोधास प्रबोधिलें । आत्मज्ञान ॥ ६३ ॥

जागृतीला जागें केलें,जागत्याला सावध केलें आणि निजबोधाला आत्मज्ञानाचा उपदेश केला.

अमृतास केलें अमर । मोक्षास मुक्तीचें घर । संयोगास निरंतर । योग केला । ६४ ॥

अमृताला अमर केलें,मोक्षाला मोक्षाचें घर दिलें आणि संयोगाला (ऐक्याला) अखंड योग केला.

निर्गुणास निर्गुण केलें । सार्थकाचें सार्थक जालें । बहुतां दिवसां भेटलें । आपणासि आपण ॥ ६५ ॥

निर्गुणाला निर्गुण केलें,सार्थकाचें सार्थक झालें,आणि पुष्कळ दिवसांनी आपली आपणाला भेट झालीं.

तुटला द्वैताचा पडदा । अभेदें तोडिलें भेदा । भूतपंचकाची बाधा । निरसोन गेली ॥ ६६ ॥

द्वैताचा पडदा तुटून गेला,अभेदानें भेदाचें तुकडें केलें आणि पांचां भूतांची बाधा नाहीशी झाली.

जालें साधनाचें फळ । निश्चळास केलें निश्चळ । निर्मळाचा गेला मळ । विवेकबळें ॥ ६७ ॥

साधनांचें फळ मिळालें,निश्र्चळाला निश्र्चळ केलें आणि विवेकाच्या योगानें निर्मळाचा मळ निघून गेला.

होतें सन्निध चुकलें । ज्याचें त्यास प्राप्त जालें । आपण देखतां फिटलें । जन्मदुःख ॥ ६८ ॥

अगदीं जवळ असून चुकलें होतें,तें ज्याचें त्याला मिळालें आणि आपल्या देखत किंवा स्वरुपाला पाहिल्यानें जन्मदु:ख लयास गेलें.

दुष्टस्वप्नें जाजावला । ब्रह्मण नीच याती पावला । आपणांसी आपण सांपडला । जागेपणें ॥ ६९ ॥

ब्राह्मणास वाईट स्वप्न पडलें (जाजावला) आणि त्यानें तो हलक्या जातीचा झाला,त्यामुळें त्याला वाईट वाटू लागलें,परंतु जागा झाल्यावर तो आपला आपल्यास सांपडला (दु:स्वप्नांत नीच याति पावलेला ब्राह्मण ब्राह्मणपणास आला.)

ऐसें जयास जालें ज्ञान । तया पुरुषाचें लक्षण । पुढिले समासीं निरूपण । बोलिलें असे ॥ ७० ॥

असें ज्ञान ज्या पुरुषाला झालें त्यांचें लक्षण पुढील समांसात सांगितलें आहें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मदर्शननाम समास आठवा ॥ ८ ॥**

**समास नववा : सिद्धलक्षण ॥ श्रीराम ॥**

अंतरी गेलीयां अमृत । बाह्या काया लखलखित । अंतरस्थिति बाणतां संत । लक्षणें कैसीं ॥ १ ॥

(सिध्दाला ओळखतां यावें म्हणून सिध्दलक्षणें सांगतो) पोटात अमृत गेले म्हणजें बाहेरुनही शरीर तेज:पुंज दिसतें,तद्वत ब्रह्मस्थिति अंत:करणात बाणली असतां,त्या साधूची लक्षणें कशी असतात ?

जालें आत्मज्ञान बरवें । हे कैसेनि पां जाणावें । म्हणौनि बोलिलीं स्वभावें । साधुलक्षणें ॥ २ ॥

खरें आत्मज्ञान झालें तें कसें ओळखावें ? ह्यासाठी ओघानुसार साधूचीं लक्षणें सांगितलीं आहेंत.

ऐक सिद्धांचे लक्षण । सिद्ध म्हणिजे स्वरूप जाण । तेथें पाहातां वेगळेपण । मुळीच नाहीं ॥ ३ ॥

आतां सिध्दाचें लक्षण ऐक,सिध्द म्हणजें ब्रह्मस्वरुप होय,त्यांत वेगळेपणा मुळींच नाही,(दोहोत भेद मुळीच नाही,तें तसें आहें अनिर्वचनीय तथापि कळावें म्हणून बोलतो.)

स्वरूप होऊन राहिजे । तया नाव सिद्ध बोलिजे । सिद्धस्वरूपींच साजे । सिद्धपण ॥ ४ ॥

ब्रह्मस्वरुप होऊन राहातात त्यांस सिध्द म्हणतात,ब्रह्मस्वरुप झालेल्यांना सिध्दपणा शोभतों,

वेदशास्त्रीं जें प्रसिद्ध । सस्वरूप स्वतसिद्ध । तयासिच बोलिजे सिद्ध । अन्यथा न घडे ॥ ५ ॥

जें स्वयंभू म्हणून वेदशास्त्रांत स्वरुप प्रसिध्द आहें त्यालाच सिध्द म्हणावें,दुस-यास म्हणता येत नाहीं.

तथापी बोलों काहीं येक । साधकास कळाया विवेक । सिद्धलक्षणाचें कौतुक । तें हें ऐसें असे ॥ ६ ॥

तथापि साधकांना विचार कळण्यासाठी म्हणून काहीं थोडेसे सांगू. सिध्दलक्षणांची मौज अशी असतें.

अंतरस्थित स्वरूप जाली । पुढें काया कैसी वर्तली । जैसी स्वप्नीची नाथिली । स्वप्नरचना ॥ ७ ॥

अंतःकरण ब्रह्मस्वरुपाकार झाल्यानंतर पुढें देह कसा वागतों ! तर स्वप्नातील स्वप्नरचना जशी लटकी असतें.

तथापि सिद्धांचें लक्षण । कांहीं करूं निरूपण । जेणें बाणे अंतर्खूण । परमार्थाची ॥ ८ ॥

तथापि परमार्थांचे वर्म अंतःकरणांत ठसण्यासाठी थोडेसें सिध्दांचे लक्षण सांगूं.

सदा स्वरूपानुसंधान। हें मुख्य साधूचें लक्षण । जनीं असोन आपण । जनावेगळा ॥ ९ ॥

निरंतर आत्मस्वरुपाचें चिंतन करणें हें साधूचें मुख्य लक्षण होय,त्याचा देह जनांत वागतो पण तो जनांमध्ये वेगळा असतो.

स्वरूपीं दृष्टी पडतां । तुटोन गेली संसारचिंता । पुढें लागली ममता । निरूपणाची ॥ १० ॥

स्वस्वरुपाकडें एखादां द्दष्टि पोंचलीं कीं संसाराची काळजी संपून जातें आणि नंतर निरुपण ऐकण्याची व सांगण्याची ममता लागतें.

हें साधकाचें लक्षण । परी सिद्धाआंगीं असे जाण । सिद्धलक्षण साधकेंविण । बोलोंच नये ॥ ११ ॥

हें लक्षण साधकांचें आहें खरें तरी तें सिध्दांच्या आंगीं असतें,साधक लक्षणांचा समावेश केल्यांवाचून सिध्दलक्षण सांगता येणार नाहीं.

बाह्य साधकाचें परी । आणी स्वरूपाकार अंतरीं । सिद्धलक्षण चतुरीं । जाणिजे ऐसें ॥ १२ ॥

बाह्यतः साधकाप्रमाणें वागून अंतःकरणात अखंड ब्रह्मस्वरुप असणें हें सिध्दांचें लक्षण होय,सुज्ञांनी हें नीट लक्षांत ठेवावे.

संदेहरहीत साधन । तेचि सिद्धांचे लक्षण । अंतर्बाह्य समाधान । चळेना ऐसें ॥ १३ ॥

संशयरहित साधन करणें आणि अंतर्बाह्य  समाधानाला धक्का बसणार नाहीं असें वागणें हें सिध्दांचें लक्षण होय.

अचळ जाली अंतरस्थिती । तेथें चळणास कैची गती । स्वरूपीं लागतां वृत्ती । स्वरूपचि जाली ॥ १४ ॥

अंतःकरणाची वृति स्थिर झाली म्हणजें मग चंचळ मनास गति कोठून मिळणार ? ब्रह्मस्वरुपाकडें एकदां वृत्ति स्थिर झाली म्हणजें मग चंचळ मनास गति कोठून मिळणार ? ब्रह्मस्वरुपाकडें एकदां वृत्ति लागली म्हणजें ती स्वरुपमयच होतें.

मग तो चळतांच अचळ । चंचळपणें निश्चळ । निश्चळ असोन चंचळ । देह त्याचा ॥ १५ ॥

मग त्याच्या देहानें हालचाल केली तरी तो अचळच असतो तो देह चंचळ असला (चंचळ्याच्या क्रिया करीत असला) तरी तों स्वस्थच आहें,तो निश्र्चळ असला तरी त्याचा देह चंचळ आहें.

स्वरूपीं स्वरूपचि जाला । मग तो पडोनिच राहिला । अथवा उठोनि पळाला । तरी चळेना ॥ १६ ॥

स्वरुपाच्या ठिकाणी समरस झाल्यावर मग त्याचा देह ऐके ठिकाणी पडून राहिला अथवा उठून पळाला तरी तो चळत नाहीं.

येथें कारण अंतरस्थिती । अंतरींच पाहिजे निवृत्ती । अंतर लागलें भगवंतीं । तोचि साधु ॥ १७ ॥

ह्या ठिकाणी अंतःकरणाची स्थिति हीच मुख्य कारण आहें,अंतःकरण दृश्यादिकापांसून निवृत्त झालें पाहिजें,ज्याचे अंतःकरण भगवंताच्या ठिकाणी जडलें तोच साधु होय.

बाह्य भलतैसें असावे । परी अंतर स्वरूपीं लागावें । लक्षणे दिसती स्वभावें । साधुआंगीं ॥ १८ ॥

बाहेर वाटेल तशी स्थिती असली तरी अंतःकरण ब्रह्मस्वरुपांत लीन असावें म्हणजें मग साधूंच्या आंगी सिध्दलक्षणें दिसू लागतात.(बाहेर कसाही म्हणजें चारचौघांसारखा वागला तरी साधूचे अंतर स्वरुपी लागलेलें असतें)

राजीं बैसतां अवलिळा । आंगीं बाणे राजकळा । स्वरूपीं लागतां जिव्हाळा । लक्षणे बाणती ॥ १९ ॥

( जिव्हाळा - उत्कट भक्ति )

राज्यावर बसला कीं राजतेज सहजपणें (अवलिळा) आंगात संचारतें,त्याप्रमाणें ब्रह्मस्वरुपाच्या ठिकाणी अंतःकरण लागलें की सिध्दांची लक्षणें आंगात बाणू लागतात.(राजा राज्यावर असला म्हणजें राजऐश्र्वर्यादिकानी युक्त असतों) तसा साधु स्वरुपाकार असला कीं सिध्दलक्षणें त्याच्या आंगी उमटतात.

येरव्ही अभ्यास करितां । हाता न चढती सर्वथा । स्वरूपीं राहावें तत्त्वतां । स्वरूप होऊनी ॥ २० ॥

एरवी नुसता अभ्यास करुन तीं लक्षणें हाती लागावयाची नाहीत,ह्यासाठी ब्रह्मस्वरुप होऊन ब्रह्मस्वरुपामध्यें राहावें,(स्वरुपानुसंधान सोडून इतर साधनांचा अभ्यास करुन तीं लक्षणें कोणी आंगी आणू म्हणेल तर तें दुरापास्त आहें)

अभ्यासाचा मुगुटमणी । वृत्ती राहावी निर्गुणीं । संतसंगें निरूपणीं । स्थिती बाणे ॥ २१ ॥

निर्गुणांमध्यें वृत्ति राहाणें हा सर्वात अत्यंत श्रेष्ठ अभ्यास होय,संतसंगतीत निरुपणाचें श्रवण मनन झाल्यास ही स्वरुपस्थिति आंगी बाणतें,(निर्गुणस्वरुपी राहाणें हा अभ्यासाचा मुकुटमणि आहें,मुख्याभ्यास हाच)

ऐसीं लक्षणें बरवीं । स्वरूपाकारें अभ्यासावीं । स्वरूप सोडितां गोसावी । भांबावती ॥ २२ ॥

अशा ह्या चांगल्या लक्षणांचा अभ्यास ब्रह्मस्वरुपाकार होऊन करावा,ब्रह्मस्वरुपाला सोडलें तर विरक्तही गोंधळून जातात (साधकानें श्रवणादिकांनी स्वरुपाकार होऊन ह्या लक्षणांचा अभ्यास करावा)

आतां असो हें बोलणें । ऐका साधूची लक्षणें । जेणें समाधान बाणे । साधकाअंगीं ॥ २३ ॥

आतां हें बोलणें पुरे.ज्यायोगानें साधकाच्या आंगी समाधान बाणेल अशी साधूंची लक्षणें ऐका.

स्वरूपीं भरतां कल्पना । तेथें कैंची उरेल कामना । म्हणौनियां सधुजना । कामचि नाहीं ॥ २४ ॥

ब्रह्मस्वरुपामध्यें एकदां कल्पना शिरली कीं मग तेथें कामना कोठून उरणार ?म्हणून साधुंच्या ठिकाणी कामच नसतो.

कल्पिला विषयो हातींचा जावा । तेणें गुणें क्रोध यावा । साधुजनाचा अक्षै ठेवा । जाणार नाहीं ॥ २५ ॥

एखादा विषय आपणास पाहिजें अशी कल्पना करावी आणि तो हातचा गेला म्हणजें त्यामुळें राग येतो,परंतु साधूचा शाश्वत ठेवा कधीही नाहीसा होणार नाहीं,

म्हणोनि ते क्रोधरहित । जाणती स्वरूप संत । नासिवंत हे पदार्थ । सांडुनिया ॥ २६ ॥

म्हणून ह्या नाशवंत पदार्थांना सोडून देऊन तें साधु आत्मस्वरुप ओळखतात आणि क्रोधरहित असतात,(नाशवंत पदार्थांविषयी विवेकी पुरूषाला कामक्रोधलोभादि वाटत नाहीत.)

जेथें नाहीं दुसरी परी । क्रोध यावा कोणावरी । क्रोधरहित सचराचरीं । साधुजन वर्तती ॥ २७ ॥

जेथें दुसरेपणा नाही तेथें रागवावयाचें कोणावर ?म्हणून चराचरामध्ये साधुलोक क्रोधरहित वागतात (आपल्यावाचूंन दुसरें कोणीच नाहीं असा अद्वय भाव साधूचा असल्यामुळें त्याला क्रोधच नाही)

आपुला आपण स्वानंद । कोणावरी करावा मद । याकारणें वादवेवाद । तुटोन गेला ॥ २८ ॥

सर्वत्र आपला आपण आनंदमय भरलेला आहें,मग गर्व (अहंकार,मद) कोणावर करावा ? म्हणून साधूंचा वादविवाद संपून जातो.

साधु स्वरूप निर्विकार । तेथें कैंचा तिरस्कार । आपला आपण मत्सर । कोणावरी करावा ॥ २९ ॥

साधूंचें स्वरुप निर्विकार असतें तेव्हा त्यांच्या ठिकाणी तिरस्कार कोठचा ? तसेंच सर्वत्र आपला आपणच भरलेला आहें,मग मत्सर कोणाशी करावा ?

साधु वस्तु अनायासें । याकारणें मत्सर नसे । मदमत्सराचें पिसें । साधुसी नाहीं ॥ ३० ॥

साधू सहजच ब्रह्मस्वरुप असल्यानें त्यांना मत्सर नसतो,मद-मत्सर ह्यांचे वेड साधूच्या ठिकाणी नसतें.

साधु स्वरूप स्वयंभ । तेथें कैंचा असेल दंभ । जेथेन् द्वैताचा आरंभ। जालाच नाही ॥ ३१ ॥

साधु स्वयंभू ब्रह्मस्वरुप असल्यामुळें त्याच्या ठिकाणी द्वैताचा आरंभ झालेला नसतों,अर्थात तेथे दंभ कोठून असणार ?

जेणें दृष्य केलें विसंच । तयास कैंचा हो प्रपंच । याकारणें निःप्रपंच । साधु जाणावा ॥ ३२ ॥

( विसंच - विस्कळीत संच - गट , एकत्रित )

अहो ज्यानें द्दश्य नाहींसे (विसंच) केले त्याला प्रपंच कोठचा ?म्हणून साधूला प्रपंच नसतो असें समजावें.

अवघें ब्रह्मांड त्याचे घर । पंचभूतिक हा जोजार । मिथ्या जाणोन सत्वर । त्याग केला ॥ ३३ ॥

सगळें ब्रह्मांडच त्याचें घर असतें,हा सर्व पंचभूतात्मक पसारा (जोजार,खटपट) नाशवंत असें जाणून त्यानें त्याचा तात्काळ त्याग केलेला असतो.

याकारणें लोभ नसे । साधु सदा निर्लोभ असे । जयाची वासना समरसे । शुद्धस्वरूपीं ॥ ३४ ॥

म्हणून साधूला लोभ नसतो,तो नेहमी निर्लोभ असतो,शुद्ध ब्रह्मस्वरुपामध्ये त्याची वासना ऐकरुप होऊन जातें.

आपुला आपण आघवा । स्वार्थ कोणाचा करावा । म्हणोनि साधु तो जाणावा । शोकरहित ॥ ३५ ॥

सर्वत्र आपला आपणच असल्यामुळें साधूनें कशाला स्वार्थ करावयाचा ?म्हणून तो स्थार्थरहित असतो.

दृष्य सांडून नासिवंत । स्वरूप सेविलें शाश्वत । याकारणें शोकरहित । साधु जाणावा ॥ ३६ ॥

नाशवंत द्दश्य (संसार) टाकून शाश्वत स्वरुप (ब्रह्म) सेविल्यामुळें साधु हा शोकापासून मुक्त असतो.

शोकें दुखवावी वृत्ती । तरी ते जाहली निवृत्ती । म्हणोनि साधु आदिअंतीं । शोकरहीत ॥ ३७ ॥

शोकानें वृत्तीला दुःख द्यावयाचें तर ती वृत्तीच निवृत्त म्हणजेंच नाहीशी झालेली असतें,म्हणून साधु आदिअंती (सर्वकाळ) दुःखरहितच असतात.

मोहें झळंबावें मन । तरी तें जाहालें उन्मन । याकारणें साधुजन । मोहातीत ॥ ३८ ॥

मोहानें मन पछाडलें जावें (झळंबावें),तर तें उन्मन म्हणजें परमेश्र्वररुपीं मिळून गेलेले असतें,म्हणून साधुलोक मोहापासून अलिप्त असतात.

सधु वस्तु अद्वये । तेथें कैचे वाटेल भये । परब्रह्म तें निर्भये । तोचि साधु ॥ ३९ ॥

अद्वैत अशी जी परमात्मवस्तु तत्स्वरुप असल्यामुळें त्यांना भय कसलें वाटणार ?परब्रह्म निर्भय असतें,तेंच साधुरुप.

याकारणें भयातीत । साधु निर्भय निवांत । सकळांस मांडेल अंत । साधु अनंतरूपी ॥ ४० ॥

ह्यास्तव साधु भयापासून अलिप्त,निर्भय व निवांत असतात.सर्वांचा अंत होईल पण साधु अनंतरुप असतात,(सर्व चराचरचा अंत होईल पण परब्रह्म अनंत अमर,आनंदस्वरुपीं साधुही तसाच)

सत्यस्वरूपें अमर जाला । भये कैंचें वाटेल त्याला । याकारणें साधुजनाला । भयेचि नाहीं ॥ ४१ ॥

स्वरुपामध्यें जो अमर होऊन राहातो त्याला भय कसें वाटेल ? म्हणून साधूंना भयच नाहीं.

जेथें नाहीं द्वंद्वभेद । आपला आपण अभेद । तेथें कैंचा उठेल खेद । देहबुद्धीचा ॥ ४२ ॥

जेथें द्वैतभेद नाही,अभेदरुपानें आपला आपणच भरलेला आहें,त्या ठिकाणी देहबुध्दीचा खेद तरी कसा उत्पन्न होईल ?

बुद्धिनें नेमिलें निर्गुणा । त्यास कोणीच नेईना । याकारणें साधुजना । खेदचि नाहीं ॥ ४३ ॥

बुध्दीनें निर्गुणाचा (निर्गुणच सर्वत्र आहे असा) निश्र्चय केला, त्या निर्गुणाला कोणीच नेत नाहीत,म्हणून साधूंना कधी खेदच नसतो.

आपण एकला ठाईचा । स्वार्थ करावा कोणाचा । दृष्य नसतां स्वार्थाचा । ठावचि नाहीं ॥ ४४ ॥

आपण मूळचा एकीएक आहें (दुसरा नाहीच) तर मग स्वार्थ कशाचा करावा ? आणि दृश्य ज्या अर्थी नाहीं त्या अर्थी स्वार्थाचा रिघाव नाहीं.

साधु आपणचि येक । तेथें कैंचा दुःखशोक । दुजेविण अविवेक । येणार नाहीं ॥ ४५ ॥

साधु आपणच सर्वत्र एकरुप असतों,तेथें दु:ख,शोक कसा  येणार ?द्वैतावाचून अविवेक उत्पन्न होत नाहीं.

आशा धरितां परमार्थाची । दुराशा तुटली स्वार्थाची । म्हणोनि नैराशता साधूची । वोळखण ॥ ४६ ॥

परमार्थाची आशा धरली कीं स्वार्थाची दुराशा तुटतें,म्हणून निराशा ही साधु ओळखण्याची खूण आहें.

मृदपणें जैसे गगन । तैसें साधुचें लक्षण । याकरणें साधुवचन । कठीण नाहीं ॥ ४७ ॥

आकाश जसें कोमळ असतें तसाच साधूचा स्वभाव असतों म्हणून साधूंचे भाषण कठिण नसतें.

स्वरूपाचा संयोगीं । स्वरूपचि जाला योगी । याकरणें वीतरागी । निरंतर ॥ ४८ ॥

ब्रह्मस्वरुपाशीं ऐक्य झाल्यामुळें योगी ब्रह्मस्वरुप झालेला असतों,म्हणून तों अखंड वैराग्यशील(वीतरागी) असतों.

स्थिती बाणतां स्वरूपाची । चिंता सोडीली देहाची । याकरणें होणाराची । चिंता नसे ॥ ४९ ॥

ब्रह्मस्वरुपाची स्थिति अंत:करणांत भिनल्यामुळें देहाच्या भरणपोषणाची (सुखदु:खाची) काळजी साधु सोडतो)म्हणून साधूला पुढें काय होणार ह्याची काळजी नसतें.

स्वरूपीं लागतां बुद्धी । तुटे अवघी उपाधी । याकारणें निरोपाधी । साधुजन ॥ ५० ॥

स्वरुपाच्या ठिकाणी बुध्दि जडली की मागची सगळी उपाधि संपतें,म्हणून साधुपुरुष निरुपाधिक असतात.

साधु स्वरूपींच राहे । तेथें संगचि न साहे । म्हणोनि साधु तो न पाहे । मानापमान ॥ ५१ ॥

साधु ब्रह्मस्वरुपीच राहात असतों,त्या ठिकाणी कोणतीही संगतीच मुळी सहन होत नाही,म्हणून साधु असतो तो मानापमान कधीं पाहात नाहीं.

अलक्षास लावी लक्ष । म्हणोनि साधु परम दक्ष । वोढूं जाणती कैपक्ष । परमार्थाचा ॥ ५२ ॥

अलक्ष्य असें जें परब्रह्म त्याजकडें साधु लक्ष लावतात,म्हणून तें अत्यंत दक्ष होत,आणि परमार्थाचा (कैपक्ष)कैवार कसा घ्यावा हें त्यांस माहीत असतें.

स्वरूपीं न साहे मळ । म्हणोनि साधु तो निर्मळ । साधु स्वरूपचि केवळ । म्हणोनियां ॥ ५३ ॥

स्वरुपाच्या ठिकाणी कोणताही मळ किंचितही सहन होत नाही,म्हणून साधु निर्मळ असतो,ह्यावरील कारणांसाठी साधु म्हणजें केवळ परब्रह्मच होत.

सकळ धर्मामधें धर्म । स्वरूपीं राहाणें हा स्वधर्म । हेंचि जाणें मुख्य वर्म । साधुलक्षणाचें ॥ ५४ ॥

स्वस्वरुपाच्या ठिकाणी राहाणें हाच स्वधर्म,इतकेच नव्हें तर सर्व धर्मामध्यें श्रेष्ठ धर्म होय आणि हेच साधूंच्या लक्षणातलें मुख्य अंग होय हे लक्षात ठेवावे,(सकळ धर्मातला परमधर्म म्हणजें स्वरुपीं राहाणें साधूला ओळखायची ही मुख्य खूण होय)

धरीतां साधूची संगती । आपषाच लागे स्वरूपस्थिती । स्वरूपस्थितीनें बाणती । लक्षणें आंगीं ॥ ५५ ॥

( आपषाच - विनासायास )

साधूची संगति धरली म्हणजें ब्रह्मस्वरुपाची स्थिति आपोआपच प्राप्त होऊ लागतें आणि स्वरुपस्थिति प्राप्त झाली कीं साधूंची लक्षणें आंगी बाणू लागतात.

ऐसीं साधूचीं लक्षणें । आंगीं बाणती निरूपणें । परंतु स्वरूपीं राहाणें । निरंतर ॥ ५६ ॥

अशी ही साधूंचीं लक्षणें निरुपणाच्या योगानें आंगी बाणतात,परंतु निरंतर स्वरुपामध्यें राहिले पाहिजें (श्रवणनिरुपणाभ्यासानें वरील लक्षणें आंगी बाणतात,पण स्वरुपाकार राहाणें व स्वरुपाकार झालेल्या साधूचा संग करणें हे उत्तम.

निरंतर स्वरूपीं राहातां । स्वरूपचि होईजे तत्त्वतां । मग लक्षणें आंगीं बाणतां । वेळ नाहीं ॥ ५७ ॥

स्वरुपामध्ये निरंतर राहिले असता खरोखर स्वस्वरुपच होऊन जाईल.मग साधूची लक्षणे आंगी बाणण्यास वेळ लागत नाही.

स्वरूपीं राहिल्यां मती । अवगुण अवघेचि साडती । परंतु यासी सत्संगती । निरूपण पाहिजे ॥ ५८ ॥

ब्रह्मरुपाच्या ठिकाणी बुध्दि लीन झाल्यास सगळेंच दुर्गुण नाहीसें होतात,परंतु ह्याला सत्संगति व निरुपण ह्यांची जोड पाहिजें.

सकळ सृष्टीचा ठाईं । अनुभव येकचि नाहीं । तो बोलिजेल सर्वहि । पुढिले समासीं ॥ ५९ ॥

सगळ्या सृष्टीमध्ये अनुभव पाहू गेले असतां एक नाही,तो सगळा पुढील समासांत सांगू.

कोणें स्थितीनें राहाती । कैसा अनुभव पाहाती । रामदास म्हणे श्रोतीं । अवधान देणें ॥ ६० ॥

आतां साधु कोणत्या स्थितीत राहातात व कसा अनुभव घेतात हें ऐकण्यासाठी रामदास म्हणतात कीं श्रोत्यांनी नीट लक्ष द्यावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सिद्धलक्षणनाम समास नववा ॥**

## समास दहावा : शून्यत्वनिरसन ॥ श्रीराम ॥

जनाचे अनुभव पुसतां । कळहो उठिल अवचिता । हा कथाकल्लोळ श्रोतां । कौतुकें ऐकावा ॥ १ ॥

लोकांचे अनुभव विचारायलें गेलें तर एकदम गडबड उडाली,कथेंचा हा गोंधळ श्रोत्यांनीं उत्सुकतेंनें ऐकावा.

येक म्हणती हा संसारु । करितां पाविजे पैलपारु । आपला नव्हे कीं जोजारु । जीव देवाचे ॥ २ ॥

( जोजारु - पसारा )

(प्रथम अज्ञान्यांची मते पाहा) पहिला म्हणतों-(अहो !हा) संसार करितांनाच मोक्ष प्राप्त होतों,सगळें जीव देवाचेंच असल्यामुळें ? (जोजार) खटपटही आपली नव्हें.(स्त्रीपुत्रादि सर्व देवाचेंच जीव आहेत म्हणून त्यांची सेवा हिच देवाची सेवा होय)

येक म्हणती हें न घडे । लोभ येऊन आंगीं जडे । पोटस्तें करणें घडे । सेवा कुटुंबाची ॥ ३ ॥

दुसरा म्हणतो-छे हो ! असें घडणार नाहीं,संसारव्यापामुळें लोभ आंगी येऊन जडतों आणि त्यामुळें (पोटस्त) पोटासाठी कुटुंबाची सेवा करावी लागतें.

येक म्हणती स्वभावें । संसार करावा सुखें नावें । कांहीं दान पुण्य करावें । सद्‌गतीकारणें ॥ ४ ॥

तिसरा म्हणतों-प्रारब्धाच्या योगानें आलेला संसार सुखानें करावा त्यातच सद्गतीसाठी दानपुण्य करावें.(संसार करावाचा,पण काहीं दानपुण्यही करावें की गति मिळतें)

येक म्हणती संसार खोटा । वैराग्यें घ्यावा देशवटा । येणें स्वर्ग्यलोकींच्या वाटा । मोकळ्या होती ॥ ५ ॥

चौथा म्हणतों-काही नाहीं,हा संसार खोटा आहें,ह्याकरितां वैराग्य धारण करुन परदेशी जावें. त्यायोगानें स्वर्गलोकी जाण्याचें मार्ग मोकळें होतात.(वैराग्य धरुन देशोधडी व्हावें तेव्हा स्वर्गाची वाट सांपडतें)

येक म्हणती कोठें जावें । वेर्थचि कासया हिंडावें । आपुलें आश्रमी असावें । आश्रमधर्म करूनी ॥ ६ ॥

पांचवा म्हणतों-(अहो जाता कुठें नी येता कुठें ?) जावयाचें कोठें ?उगीच कशाला हिंडायचें ? आपला आश्रमधर्म सांभाळून आपल्याच आश्रमांत राहावें,(आश्रमधर्म नीट पाळावेत,म्हणजें झालें)

येक म्हणती कैंचा धर्म । अवघा होतसे अधर्म । ये संसारीं नाना कर्म । करणें लागे ॥ ७ ॥

सहावा म्हणतों- धर्म कसला ?सगळा अर्धमच होत आहें,ह्या संसारात नाही नाही ती कामें करावी लागतात,

येक म्हणती बहुतांपरी । वासना असावी वरी । येणेंचि तरिजे संसारीं । अनायासें ॥ ८ ॥

सातवा म्हणतों-शक्यतोवर चांगली वासना धरावीं, म्हणजेंच अनायसें संसारातून तरुन जाता येईल ?

येक म्हणती कारण भाव । भावेंचि पाविजे देव । येर हें अवघेंचि वाव । गथागोवी ॥ ९ ॥

आठवा म्हणतों मुख्य भाव पाहिजें,भावानेंच देव मिळतों,बाकीचा हा सर्व गोंधळ (गथागोवी) होय.

येक म्हणती वडिलें जीवीं । अवघीं देवचि मानावीं । मायेबापें पूजीत जावीं । येकाभावें ॥ १० ॥

नववा म्हणतों-सगळ्या वडील माणसांना मनापासून देवस्वरुप मानावें व ऐकनिष्ठपणें आईवडिलांची पूजा करावी.

येक म्हणती देवब्राह्मण । त्यांचें करावें पूजन । मायेबाप नारायेण । विश्वजनाचा ॥ ११ ॥

दहावा म्हणतों-देवाब्राह्मणांचे पूजन करावें म्हणजें नारायण प्रसन्न होतों नारायण हाच सर्व जगाचा मायबाप आहें.

येक म्हणती शास्त्र पाहावें । तेथें निरोपिलें देवें । तेणें प्रमाणेंचि जावें । परलोकासी ॥ १२ ॥

अकरावा म्हणतों-शास्त्र पाहावें,त्यांत देवानें जसें वागण्यास सांगितलें आहें तसें वागून परलोकाला जावें.

येक म्हणती अहो जना । शास्त्र पाहातां पुरवेना । याकारणें साधुजना । शरण जावें ॥ १३ ॥

बारावा म्हणतों-अहो ! लोकांना शास्त्र पाहावयास वेळ मिळावयाचा नाहीं,ह्याकरितां साधूंनाच शरण जावें,

येक म्हणती सांडा गोठी । वायांचि करिता चाउटी । सर्वांस कारण पोटीं । भूतदया असावी ॥ १४ ॥

( सांडा गोठी - गप्पागोष्टी )

तेरावा म्हणतों-ह्या सा-या गोष्टी सोडा.तुम्ही उगीच बडबड (चाऊटी) करतां,सगळ्यांमध्ये मुख्य वर्म हेंच की प्राणीमात्रांबद्दल पोटांत दया असावी.

येक म्हणती येकचि बरवें । आपुल्या आचारें असावें । अंतकाळीं नाम घ्यावें । सर्वोत्तमाचें ॥ १५ ॥

चौदावा म्हणतों-आपल्या आचाराप्रमाणें चालावें आणि अंत:काळी देवाचे नांव घ्यावें म्हणजें झालें (म्हणजें सुटका होतें) हा एकच मार्ग बरा.

येक म्हणती पुण्य असेल । तरीच नाम येईल । नाहीं तरी भुली पडेल । अंतकाळीं ॥ १६ ॥

पंधरावा म्हणतो-पण पदरी पुण्य असेंल तरच अंत:काळी देवाचें नाव तोंडी येईल,नाहीतर भूल पडेल.

येक म्हणती जीत असावे । तंवचि सार्थक करावें । येक म्हणती फिरावें । तिर्थाटण ॥ १७ ॥

( तंवचि - तोपर्यंत )

सोळावा म्हणतों-जिवंत आहें तोवर सार्थक करुन घ्यावें व त्यासाठी तीर्थयात्रा करावी,

येक म्हणती हे अटाटी । पाणीपाषाणाची भेटी । चुबकळ्या मारितां हिंपुटी । कासाविस व्हावें ॥ १८ ॥

सतरावा म्हणतों-ही निव्वळ दगदग! हा संसार म्हणजें पाण्याची आणि दगडाची भेट त्यांत बुचकळ्या मारुन दु:ख का करुन घ्यावे?

येक म्हणती सांडी वाचाळी । अगाध महिमा भूमंडळीं । दर्शनमात्रें होय होळी । माहापातकाची ॥ १९ ॥

अठरावा म्हणतों-ही बडबड (वाचाळी) राहू द्या,ज्याच्या दर्शनानेंच मोठमोठया पातकांची राखरांगोळी होतें असा त्या तीर्थाचा जगांत अगाध महिमा आहें.

येक म्हणती तीर्थ स्वभावें । कारण मन अवरावें । येक म्हणती कीर्तन करावें । सावकास ॥ २० ॥

ऐकोणिसावा म्हणतों-आपल्या मनाचें संयमन करावें (मन आवरावें) हें खरें तीर्थ,विसावा म्हणतों-सावकाश कीर्तन करीत असावें हें मी त्याचसाठी म्हणतों.

येक म्हणती योग बरवा । मुख्य तोचि आधीं साधावा । देहो अमरचि करावा । अकस्मात ॥ २१ ॥

एकविसावा म्हणतों-योग चांगला तोच अगोदर मुख्य साधून घ्यावा व त्या योगानें देह एकदमच अमर करुन टाकावा.

येक म्हणती ऐसें काये । काळवंचना करूं नये । येक म्हणती धरावी सोये । भक्तिमार्गाची ॥ २२ ॥

बाविसावा म्हणतो-हें काय? काळाला फसवूं नयें (मृत्यु टाळू नयें)  तेविसावा एक म्हणतो-भक्तिमार्गानें चालावें (भक्तिमार्गाची सोय धरावी)

येक म्हणती ज्ञान बरवें । येक म्हणती साधन करावें । येक म्हणती मुक्त असावें । निरंतर ॥ २३ ॥

चोविसावा एक म्हणतो-ज्ञान चांगलें (ज्ञानमार्ग उत्तम),एक म्हणतात-साधन करावें,एक म्हणतात-नेहमी मोकळें असावें (बंधरहित-मुक्त असावें).

येक म्हणती अनर्गळा । धरीं पापाचा कंटाळा । येक म्हणती रे मोकळा । मार्ग आमुचा ॥ २४ ॥

एक म्हणतात (पंचविसावा) अरें,स्वेच्छाचा-या,जरा पापाचा कंटाळा धर,एक म्हणतात-आमचा मार्ग मोकळा आहें.

येक म्हणती हें विशेष । करूं नये निंदा द्वेष । येक म्हणती सावकास । दुष्टसंग त्यागावा ॥ २५ ॥

एक म्हणतात-(२६वा-) कोणाची निंदा,द्वेष,करु नयें हे काय तें मुख्य,एक म्हणतात-बेलाशक दुष्टसंग सोडावा.

येक म्हणती ज्याचें खावें । त्या सन्मुखचि मरावें । तेणें तत्काळचि पावावें । मोक्षपद ॥ २६ ॥

एक म्हणतात-(२७ वा) ज्याचें अन्न खावें त्याच्यासमोर देह ठेवावा,म्हणजें तात्काळ मोक्ष मिळतों.

येक म्हणती सांडा गोठी । आधीं पाहिजे ते रोटी । मग करावी चाउटी । सावकास ॥ २७ ॥

एक म्हणतात (२८ वा) ह्या गोष्टी राहू द्यात,अगोदर भाकरी (पोटाची सोय) पाहिजें,मग खुशाल चकाट्या पिटीत बसावें.

येक म्हणती पाउस असावा । मग सकळ योग बरवा । कारण दुष्काळ न पडावा । म्हणिजे बरें ॥ २८ ॥

एक म्हणतात (२९ वा) पाऊस असावा म्हणजें सगळें योग चांगलेंच आहेंत,कारण दुष्काळ पडला नाहीं म्हणजें सगळें बरें असतें.

येक म्हणती तपोनिधी । होतां वोळती सकळ सिद्धी । येक म्हणती रे आधीं । इंद्रपद साधावें ॥ २९ ॥

एक म्हणतात (३० वा) तपस्वी झालें म्हणजें सगळ्या सिध्दि (बोळती,प्राप्त) प्रसन्न होतात. एक म्हणतात इंद्रपद अगोदर प्राप्त करुन घ्यावें.

येक म्हणती आगम पाहावा । वेताळ प्रसन्न करून घ्यावा । तेणें पाविजे देवा । स्वर्गलोकीं ॥ ३० ॥

एक म्हणतात-तंत्रशास्त्राचा अभ्यास करुन अगोदर वेताळाला प्रसन्न करुन घ्यावें,म्हणजें स्वर्गलोकी देवाजवळ जाता येईल.

येक म्हणती अघोरमंत्र । तेणें होईजे स्वतंत्र । श्रीहरी जयेचा कळत्र । तेचि वोळे ॥ ३१ ॥

एक म्हणतात अघोर मंत्राने स्वतंत्र होता येतें,कारण श्रीहरी जिचा कलत्र-किल्ला-आश्रयस्थान आहें ती लक्ष्मीच प्रसन्न होतें.

ती लागले सर्व धर्म । तेथें कैंचें क्रियाकर्म । येक म्हणती कुकर्म । तिच्या मदे ॥ ३२ ॥

एक म्हणतात, त्या लक्ष्मीच्या मागें सर्व प्रकारचें धर्म आहेत,पण ती आल्यावर क्रियाकर्म कसलें ? तिच्या धुंदीनें कुकर्म मात्र होतें.

येक म्हणती येक साक्षप । करावा मृत्यंजयाचा जप । तेणें गुणें सर्व संकल्प । सिद्धीतें पावती ॥ ३३ ॥

एक म्हणतात-मृत्युंजयाचा जप करणें हा मुख्य प्रयत्न होय,त्या योगानें सर्व संकल्प सिध्दीस जातात.

येक म्हणती बटु भैरव । तेणें पाविजे वैभव । येक म्हणती झोटिंग सर्व । पुर्वितसे ॥ ३४ ॥

एक म्हणतात-बटु भैरवाची उपासना करावी म्हणजें वैभव मिळतें,एक म्हणतात-झोटिंग सर्व काही पुरवितो.

येक म्हणती काळी कंकाळी । येक म्हणती भद्रकाळी । येक म्हणती उचिष्ट चांडाळी।साहें करावी ॥३५ ॥

कोणी-काळी कंकाळी,भद्रकाळी,कोणी उच्छिष्ट चांडाळी साह्य करुन घ्यावीं असें म्हणतात.

येक म्हणती विघ्नहर । येक म्हणती भोळा शंकर । येक म्हणती सत्वर । पावे भगवती ॥ ३६ ॥

कोणी गणपति कोणी भोळा शंकर,कोणी भगवती देवी लवकर पावतें असें म्हणतात.

येक म्हणती मल्लारी । सत्वरचि सभाग्य करी । येक म्हणती माहा बरी । भक्ति वेंकटेशाची ॥ ३७ ॥

एक म्हणतात-खंडोबा फार लवकर भाग्यशाली (श्रीमंत) करतो एक म्हणतात-व्यंकटेशाची भक्ति फार उत्तम.

येक म्हणती पूर्व ठेवा । येक म्हणती प्रेत्न करावा । येक म्हणती भार घालावा । देवाचवरी ॥ ३८ ॥

एक म्हणतात-हें प्रारब्ध आहें, एक म्हणतात-प्रयत्न केला पाहिजें एक म्हणतात-देवावर भार घालावा.

येक म्हणती देव कैंचा । अंतचि पाहातो भल्यांचा । येक म्हणती हा युगाचा । युगधर्म ॥ ३९ ॥

एक म्हणतात-देव कसला हो! तो चांगल्यांचा अगदी अंत पाहातो.एक म्हणतात- हे कलियुग आहे त्याचा हा प्रताप!

येक आश्चीर्य मानिती । येक विस्मयो करिती । येक कंटाळोन म्हणती । काये होईल तें पाहावें ॥ ४०॥

कोणी आश्र्चर्य मानतात,कोणी (विस्मयांत) संशयात पडतात,कोणी कंटाळून म्हणतात,काय होईल ते पहावें!

ऐसे प्रपंचिक जन । लक्षणें सांगतां गहन । परंतु कांहीं येक चिन्ह । अल्पमात्र बोलिलों ॥ ४१ ॥

असें प्रापंचिक लोक असतात,त्यांची लक्षणें सांगायला लागलें तर पुष्कळ आहेत,पण नमुन्यासाठीं म्हणून काहीं थोडी सांगितली (ही अज्ञान्यांची मते सांगितली)

आतां असो हा स्वभाव । ज्ञात्यांचा कैसा अनुभव । तोहि सांगिजेल सर्व । सावध ऐका ॥ ४२ ॥

असो,हा ज्याचा त्याचा स्वभाव आहें,आतां ज्ञात्यांचा अनुभव कसा असतो तोही सर्व सांगतो,सावधपणे ऐका.

येक म्हणती करावी भक्ती । श्रीहरी देईल सद्गती । येक म्हणती ब्रह्मप्राप्ती । कर्मेंचि होये ॥ ४३ ॥

एक म्हणतात (१ला) श्रीहरीची भक्ति करावी म्हणजें तो सद्गति देईल,एक म्हणतात-(२रा-छे! असें नव्हें) कर्ममार्गानेंच ब्रह्मप्राप्ति होईल.

येक म्हणती भोग सुटेना । जन्ममरण हें तुटेना । येक म्हणती उर्मी नाना । अज्ञानाच्या ॥ ४४ ॥

एक म्हणतात (३रा) भोग काहीं सुटत नाहीं आणि जन्ममरण काहीं तुटत नाहीं,काहींच करु नयें,एक म्हणतात-ह्या अनेक कल्पना अज्ञानाच्या आहेंत.

येक म्हणती सर्व ब्रह्म । तेथें कैंचें क्रियाकर्म । येक म्हणती हा अधर्म । बोलोंचि नये ॥ ४५ ॥

एक म्हणतात (४था) सगळें ब्रह्मच आहें तेथें क्रिया कसली व कर्म कसलें ? एक म्हणतात-(५वा) चूप! हा अधर्म होय,असलें धर्मलंडपणाचें भाषणसुध्दां करु नयें.

येक म्हणती सर्व नासें । उरलें तेंचि ब्रह्म असे । येक म्हणती ऐसें नसे । समाधान ॥ ४६ ॥

एक म्हणतात (६वा) ह्या सगळ्या दृश्याचा नाश होऊन उरेल तेंच ब्रह्म होय.एक म्हणतात-(७वा) अशानें समाधान होत नाहीं (समाधानाचा हा मार्ग नव्हें)

सर्वब्रह्म केवळ ब्रह्म । दोनी पूर्वपक्षाचे भ्रम । अनुभवाचें वेगळें वर्म । म्हणती येक ॥ ४७ ॥

एक म्हणतात-(८वा) सर्व ब्रह्म व केवल ब्रह्म हें दोन्ही पूर्वपक्षातलें भ्रम आहेंत,अनुभवाचें ते रहस्य तें वेगळेंच आहें.

येक म्हणती हें न घडे । अनुर्वाच्य वस्तु घडे । जें बोलतां मोन्य पडे । वेदशास्त्रांसी ॥ ४८ ॥

एक म्हणतात-(९वा) असें व्हावयांचें नाहीं,(अनुभवही पूर्वपक्षातला आहें) परमात्मवस्तु अनिर्वाच्य आहें,वेदशास्त्रांना सुध्दां तिचें वर्णन करतांना मौन पडतें.

तव श्रोता अनुवादला । म्हणे निश्चये कोण केला । सिद्घांतमतें अनुभवाला । उरी कैंची ॥ ४९ ॥

( उरी - ठाव , जागा )

तेव्हा श्रोता पुन्हा म्हणू लागला की,ह्या सर्वांचा निश्र्चय काय झाला ?(सर्वापैकी निश्र्चित कोणतें ?) सिध्दांताच्या द्दष्टीनें येथें अनुभव कसा राहाणार ?

अनुभव देहीं वेगळाले । हें पूर्वीच बोलिलें । आतां कांहीं येक केलें । नवचे कीं ॥ ५० ॥

देहांमध्यें वेगवगळें अनुभव येतात हें पूर्वीच सागितलें आहें,आता त्यात काही कमीजास्त करता येणार नाहीं.

येक साक्षत्वें वर्तती । साक्षी वेगळाचि म्हणती । आपण दृष्टा ऐसी स्थिती । स्वानुभवाची ॥ ५१ ॥

एक साक्षित्वानें वागतात (देहाहिक द्दष्य पाहाणारा मी वेगळा असें समजतात) आणि मी म्हणजें द्रष्टा-पाहाणारा असून ह्या द्दश्याहून निराळा साक्षीभूत आहें असा त्यांचा स्वानुभव असतो.

दृश्यापासून द्रष्टा वेगळा । ऐसी अलिप्तपणाची कळा । आपण साक्षत्वें निराळा । स्वानुभवे ॥ ५२ ॥

द्दश्याहून द्रष्टा वेगळा राहाणें ही अलिप्तपणाची हातोटी आहें,मात्र आपल्या स्वानुभवानें आपण साक्षित्वानें भिन्न झालें पाहिजें.

सकळ पदार्थ जाणतां । तो पदार्थाहून पर्ता । देहीं असोनी अलिप्तता । सहजचि जाली ॥ ५३ ॥

जो सर्व पदार्थांना जाणतो तो त्या सर्व पदार्थांहून वेगळा असतो,अशाप्रकारे देहांत असून अलिप्तपणा सहजच येतो,

येक ऐसें स्वानुभवें । म्हणती साक्षत्वें वर्तावें । दृश्य असोनि वेगळें व्हावें । द्रष्टेपणें ॥ ५४ ॥

अशा रीतीनें स्वतःच्या अनुभवावरुन कोणी म्हणतात-(१०वा) कीं आपण साक्षित्वानें वागावें म्हणजें द्दश्य असतांच त्याचा द्दष्टा म्हणून वेगळेंच राहावें.

येक म्हणती नाहीं भेद । वस्तु ठाईंची अभेद । तेथें कैंचा मतिमंद । द्रष्टा आणिला ॥ ५५ ॥

एक म्हणतात-(११वा) द्दश्य वेगळें व द्रष्टा वेगळा असा भेदच नाहीं,परब्रह्म वस्तु ही मुळचीच अभेद आहें,तेथे जडबुध्दि द्रष्टा कोठून आणला ?

अवघी साकरचि स्वभावें । तेथें कडु काय निवडावें । द्रष्टा कैंचा स्वानुभवें । अवघेंचि ब्रह्म ॥ ५६ ॥

मूळची सगळी साखरच तर त्यांत निराळें कडू काय निवडावें ?सगळेंच ब्रह्म आहें असा जेथें अनुभव आहें तेथें द्रष्टा वेगळा कोठचा ?(द्रष्टा नाही व द्दश्य नाही,अवघेंच ब्रह्म आहें)

प्रपंच परब्रह्म अभेद । भेदवादी मानिती भेद । परी हा आत्मा स्वानंद । आकारला ॥ ५७ ॥

प्रपंच आणि परब्रह्म ह्यांत भेद नाहीं,भेदवादी उगाच भेद मानतात,परंतु हा स्वानंदरुप आत्माच सर्वत्र जगद्रूपानें आकारास आलेला आहें,

विघुरलें तुप थिजलें । तैसें निर्गुणचि गुणा आलें । तेथें काय वेगळें केलें । द्रष्टेपणें ॥ ५८ ॥

पातळ झालेलें तूप घट्ट व्हावें त्याप्रमाणें निर्गुणच सगुण झालें आहें,त्या ठिकाणी द्रष्टेपणाचें त्या ठिकाणीं निराळे काय केले ?

म्हणौनि द्रष्टा आणी दृश्य । अवघा येकचि जगदीश । द्रष्टेपणाचे सायास । कासयासी ॥ ५९ ॥

म्हणून द्रष्टा आणि द्दश्य ह्या दोन्ही रुपानें जगदीश एकच आहे.मग द्रष्टेपणाचे (द्रष्टेपणानें वेगळें राहाण्याचें) कष्ट कशाला पाहिजेंत ?

ब्रह्मचि आकारलें सर्व । ऐसा येकांचा अनुभव । ऐसे हे दोनी स्वभाव । निरोपिले ॥ ६० ॥

तात्पर्य,सर्व आकारास आलें आहें तें ब्रह्मच आहें असा काहींचा अनुभव असतों,असें हें दोन प्रकार सागितलें.

अवघा आत्मा आकारला । आपण भिन्न कैंचा उरला । दुसरा अनुभव बोलिला । ऐसियापरी ॥ ६१ ॥

आत्माच सर्वत्र आकारलेला आहे,तेथें आपण वेगळा कोठचा ? अशा प्रकारचा दुसरा अनुभव आहें.द्रष्टा द्दश्य एक परब्रह्मच.

ऐक तिसरा अनुभव । प्रपंच सारूनियां सर्व । कांहीं नाहीं तोचि देव । ऐसें म्हणती ॥ ६२ ॥

(१२वा म्हणतों) आतां तिसरा अनुभव ऐक.सगळा प्रपंच एका बाजूस सारुन काहीं नाहीं तोंच म्हणजें शून्य हाच देव,

दृश्य अवघें वेगळें केलें । केवळ अदृश्यचि उरलें । तेंचि ब्रह्म अनुभविलें । म्हणती येक ॥ ६३ ॥

द्दश्य हें सगळें वगळून जें केवळ अद्दश्य उरतें तेंच ब्रह्म अनुभवास येतें असें कोणी म्हणतात,

परी तें ब्रह्म म्हणों नये । उपायासारिखा अपाये । सुन्यत्वास ब्रह्म काये । म्हणों येईल ॥ ६४ ॥

(१३वा म्हणतो) पण त्यास ब्रह्म म्हणतां येत नाही,ते म्हणणे बरोबर आहेंसे वाटतें पण तें चुकीचें आहें, शून्याला ब्रह्म म्हणता येईल का ?

दृश्य अवघें वोलांडिलें । अदृश्य सुन्यत्वीं पडिलें । ब्रह्म म्हणौनि मुरडलें । तेथुनिच मागे ॥ ६५ ॥

सगळें द्दश्य ओलांडून पलिकडें गेला आणि अद्दश्यामध्यें म्हणजें शून्यत्वामध्यें जाऊन पडला व त्यालाच ब्रह्म समजून तेथुनच मागें फिरला (थबकला)

इकडे दृश्य तिकडे देव । मध्यें सुन्यत्वाचा ठाव । तयास मंदबुद्धिस्तव । प्राणी ब्रह्म म्हणे ॥ ६६ ॥

(द्दश्य व द्रष्टा हें सर्व ब्रह्मवाद्यांचें मत,द्रष्टा द्दश्याहून वेगळा आहें हें साक्षीवाद्यांचें मत व काहीं नाहीं हें शून्यवाद्यांचे मत,अशी तीन मतें वर सांगितली आहेंत, शून्यवाद्याचा येथें निरास केला पाहिजें)एकीकडे द्दश्य व

दुसरीकडें देव (शुध्द ब्रह्म) आणि ह्या दोंघांमध्यें शून्यांचें ठाणें त्या शून्यालाच प्राणी जडबुध्दिमुळें ब्रह्म म्हणतों,(पण शून्य काहीं ब्रह्म नव्हें)

रायास नाहीं वोळखिलें । सेवकास रावसें कल्पिलें । परी तें अवघें वेर्थ गेलें । राजा देखतां ॥ ६७ ॥

राजाची ओळख पटली नाहीं आणि चाकराला राजा म्हणून मानलें,पण राजा दृष्टीस पडला कीं तें सर्व व्यर्थ जातें,

तैसें सुन्यत्व कल्पिलें ब्रह्म । पुढें देखतां परब्रह्म । सुन्यत्वचा अवघा भ्रम । तुटोन गेला ॥ ६८ ॥

त्याप्रमाणें प्रथम शून्याला ब्रह्म मानलें खरें,पण खरे परब्रह्म दृष्टीस पडतांच शून्यत्वाचा सगळा भ्रम नाहीसा होतो.(राजाला न ओळखतां मधल्या एखाद्या सेवकालाच राजा समजण्या-यांची प्रत्यक्ष राजाला पाहिल्यावर जशी फजिती होतें तशीच ह्या शून्यवाद्यांची होतें तें शून्यालाच ब्रह्म म्हणतात,पण पुढें ब्रह्म देखतांच शून्यत्वाचा भ्रम निघून जातों ) हा शुन्यत्वाचा सूक्ष्म प्रतिबंध विवेकानें दूर करुन मुनि  राजहंस परमामृत प्राशन करितात.

परी हा सूक्ष्म आडताळा । वारी विवेकें वेगळा । जैसें दुग्ध घेऊन जळा । राजहंस सांडी ॥ ६९ ॥

परंतु राजहंस ज्याप्रमाणें दूध घेऊन पाणी टाकून देतों,त्याचप्रमाणें शून्यत्वाचा सूक्ष्म (आडताळा,प्रतिबंध) अडथळा विवेकानें नाहीसा करावयास पाहिजें,

आधीं दृश्या सोडिलें । मग सुन्यत्व वोलांडिलें । मूळमायेपरतें देखिलें । परब्रह्म ॥ ७० ॥

आधी दृश्य टाकून द्यावें,मग शून्य ओलांडावें,म्हणजें मूळमायेच्या पलिकडें परब्रह्म दृष्टीस पडतें.

वेगळेपणें पाहाणें घडे । तेणें वृत्ति सुन्यत्वीं पडे । पोटीं संदेह पवाडे । सुन्यत्वाचा ॥ ७१ ॥

पाहाणारा मी ब्रह्माहून वेगळा आहें अशा वृत्तीनें पाहिल्यास वृत्ति शून्यामध्यें अडकून अंतःकरणात शून्यत्वाचा संशय (पवाडें-वाढतों) उत्पन्न होतो.

भिन्नपणें अनुभविलें । तयास सुन्य ऐसें बोलिलें । वस्तु लक्षितां अभिन्न जालें । पाहिजे आधीं ॥ ७२ ॥

वेगळेपणानें जो अनुभव येतो त्यास शून्य असें म्हणतात,परब्रह्म पाहावयांचे म्हणजें आधी पाहाणारा त्याच्याशीं एकरुप झाला पाहिजें,

वस्तु आपणचि होणें । ऐसें वस्तुचें पाहाणें । निश्चयेंसीं भिन्नपणें । सुन्यत्व लाभे ॥ ७३ ॥

आपणच परमात्मवस्तुरुप होणें हेंच ती वस्तू पाहाणें आहें,वेगळेपणानें पाहिल्यास मात्र निश्र्चयेंकरुन शून्यत्व पदरी पडतें.

याकारणें सुन्य कांहीं । परब्रह्म होणार नाहीं । वस्तुरूप होऊन पाहीं । स्वानुभवें ॥ ७४ ॥

म्हणून शून्य हें कधीही परब्रह्म होणार नाही,ह्यास्तव परब्रह्मस्वरुप होऊन आपल्या अनुभवानें पाहावें (वस्तुरुप होऊन स्वानुभवानें वस्तु पाहावी)

आपण वस्तु सिद्धचि आहे । मन मी ऐसें कल्पूं नये । साधु सांगती उपाये । तूंचि आत्मा ॥ ७५ ॥

आपण मूळचें परब्रह्म स्वरुपच आहो,मी मन अशी कल्पनाच करु नयें, तूच आत्मा आहेस असा मार्ग साधु सांगत असतात.

मन मी ऐसें नाथिलें । संतीं नाहीं निरोपिलें । मानावें कोणाच्या बोलें । मन मी ऐसें ॥ ७६ ॥

खोटें (नाथिलें) (क्षणभर) मन मी आहें,असें साधु सांगत नाहीत,मग कोणाच्या सांगण्यावरुन मन मी असें मानावें ?

संतवचनीं ठेवितां भावे । तोचि शुद्ध स्वानुभव । मनाचा तैसाच स्वभाव । आपण वस्तु ॥ ७७ ॥

साधुसंतांच्या वचनावर विश्र्वास ठेवणें हाच शुध्द स्वानुभव होय.मीच परब्रह्म असें म्हणणें हा मनाचा स्वभाव होय.(संतवचनी विश्र्वास हा स्वानुभव होय,मन मीच वस्तु असें म्हणून मध्ये उगीच लुडबुडतें)

जयाचा घ्यावा अनुभव । तोचि आपण निरावेव । आपुला घेती अनुभव । विश्वजन ॥ ७८ ॥

ज्याचा अनुभव घ्यावा तेंच निरवयव परब्रह्म आपण आहोत,सर्व अनुभवी लोक आपलाच अनुभव घेत असतात.(ज्या निराकार,निर्गुण,निरंजनाचा अनुभव घ्यावा तेंच आपण व्हावें)

लोभी धन साधूं गेले । तंव ते लोभी धनचि जाले । मग भाग्यपुरुषीं भोगिलें । सावकास ॥ ७९ ॥

लोभी मनुष्य धन प्राप्त करुन घेण्याचा यत्न करु लागला व स्वतःच धन होऊन बसला तर त्या धनाचा उपभोग घेण्यास तो स्वतः निराळा उरत नाही,त्याचा उपभोग घेण्यास दुसरे भाग्यवान पुरुष सावकाश घेतात.(लोभी धनाच्या ध्यासानें धनच होतात.व इतरांच्या उपयोगी येतात,तसें आत्मरुप होऊन जनांच्या कार्यात उरावें)

तैसें देहबुद्धी सोडितां । साधकास जालें तत्वता । अनुभवाची मुख्य वार्ता । ते हे ऐसी ॥ ८० ॥

त्याचप्रमाणें देहबुध्दि सोडली म्हणजें साधकांचें होतें,अनुभवाची मुख्य गोष्ट अशी आहें.

आपण वस्तु मुळीं येक । ऐसा ज्ञानाचा विवेक । येथून हा ज्ञानदशक । संपूर्ण जाला ॥ ८१ ॥

आपण आणि परब्रह्मवस्तु हीं दोन्ही मिळून मूळचें एकच आहोत हा आत्मज्ञानाचा विचार होय,येथे हा ज्ञानदशक संपूर्ण झाला (आपण वस्तूच आहोत,हाच ज्ञानाचा विवेक)

आत्मज्ञान निरोपिलें । येथामतीनें बोलिलें । न्यूनपर्ण क्ष्मा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ ८२ ॥

यथामतींनें निरुपण केलें,त्यांत जें कमीजास्त असेल त्याबद्दल श्रोत्यांनी श्रमा करावी.

ब्रह्म अनिर्वाच्य आहें,लक्षणांनी किंवा विशेषणांनी तें सांगता येत नाही तें असें आहें म्हणून सांगवत नाही,पण हें तें नाहीं किंवा असें तें नाही ऐवढेंच म्हणता येईल.निराकार,निर्विकार,निर्विकल्प, अजन्मा,अनाम,अप्रत्यक्ष, अरुप अशा व्यावर्तक विशेषणांनी त्याची खूण दाखवितां येतें हें दर्शविण्यासाठी हा समास लिहीला आहें,न इति न इति म्ह.नेति नेति ह्याचा हाच अर्थ आहें (शिवकवच ३० वा मंत्र)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सुन्यत्वनिर्शननाम समास दहावा ॥ ॥ दशक आठवा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक नववा - गुणरूपाचा



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक नववा : गुणरूप**

**समास पहिला : आशंकानाम ॥ श्रीराम ॥**

निराकार म्हणिजे काये । निराधार म्हणिजे काये । निर्विकल्प म्हणिजे काये । निरोपावें ॥ १ ॥

निराकार,निराधार,निर्विकल्प म्हणजें काय हें मला सांगावें.

निराकार म्हणिजे आकार नाहीं । निराधार म्हणिजे आकार नाहीं । निर्विकल्प म्हणिजे कल्पना नाहीं । परब्रह्मासी ॥ २ ॥

निराकार म्हणजें ज्याला आकार नाहीं तें,निराधार म्हणजें ज्याला आधार नाहीं तें,निर्विकल्प म्हणजें ज्याला कल्पना नाहीं तें असें परब्रह्म आहें.

निरामय म्हणिजे काये । निराभास म्हणिजे काये । निरावेव म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ ३ ॥

निरामय,निराभास, निरवयव म्हणजें काय हें मला सांगावें ?

निरामय म्हणिजे जळमये नाहीं । निराभास म्हणिजे भासचि नाहीं । निरावेव म्हणिजे अवेव नाहीं । परब्रह्मासी ॥ ४ ॥

( जळमये - अमेय - विकार,रोग )

निरामय म्हणजें जें जळमय नाहीं तें,निराभास म्हणजें ज्याला भास नाही तें निरववय म्हणजे ज्याला अवयव नाही तें, असें परब्रह्म आहें.

निःप्रपंच म्हणिजे काये । निःकळंक म्हणिजे काये । निरोपाधी म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ ५ ॥

नि:प्रपंच,नि:कलंक,निरापाधी म्हणजें काय हें मला सांगावें ?

निःप्रपंच म्हणिजे प्रपंच नाहीं । निःकळंक म्हणिजे कळंक नाहीं । निरोपाधी म्हणिजे उपाधी नाहीं । परब्रह्मासी ॥ ६ ॥

नि:प्रपंच म्हणजें ज्याला प्रपंच नाही तें,नि:कलंक म्हणजें ज्याला कलंक (डाग) नाहीं तें,निरापाधी म्हणजें ज्याला उपाधि नाहीं तें असें परब्रह्म.

निरोपम्य म्हणिजे काये । निरालंब म्हणिजे काये । निरापेक्षा म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ ७ ॥

निरोपम्य,निरालंब,निरापेक्ष म्हणजें काय तें मला सांगावें,

निरोपम्य म्हणिजे उपमा नाहीं । निरालंब म्हणिजे अवलंबन नाहीं । निरापेक्षा म्हणिजे अपेक्षा नाहीं । परब्रह्मासी ॥ ८ ॥

निरोपम्य म्हणजें ज्याला उपमा नाही तें,निरालंब म्हणजें ज्याला अवलंब (आधार) नाही तें,निरापेक्ष म्हणजें ज्याला अपेक्षा नाहीं तें असें परब्रह्म आहें.

निरंजन म्हणिजे काये । निरंतर म्हणिजे काये । निर्गुण म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ ९ ॥

निरंजन,निरंतर,निर्गुण म्हणजें काय तें मला सांगावें ?

निरंजन म्हणिजे जनचि नाहीं । निरंतर म्हणिजे अंतर नाहीं । निर्गुण म्हणिजे गुणचि नाहीं । परब्रह्मासी ॥ १० ॥

निरंजन म्हणजें ज्याला लोकांचा संसर्ग (वासावारा) नाहीं तें,निरंतर म्हणजें ज्याच्या स्थितींत कोणतेही अंतर नाही तें, निर्गुण म्हणजें ज्याला गुण नाहीं तें,असें परब्रह्म आहें.

निःसंग म्हणिजे काये । निर्मळ म्हणिजे काये । निश्चळ म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ ११ ॥

निं:संग,निर्मळ,निश्र्चळ म्हणजें काय तें मला सांगावें.

निःसंग म्हणिजे संगचि नाहीं । निर्मळ म्हणिजे मळचि नाहीं । निश्चळ म्हणिजे चळण नाहीं । परब्रह्मासी ॥ १२ ॥

निःसंग म्हणजें ज्याला संग नाही तें,निर्मळ म्हणजें ज्याला मळ नाही तें,निश्र्चळ म्हणजें ज्याला चलन नाही तें,असें परब्रह्म आहें.

निशब्द म्हणिजे काये । निर्दोष म्हणिजे काये । निवृत्ती म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ १३ ॥

निःशब्द,निर्दोष,निवृत्ती म्हणजें काय तें मला सांगावें.

निशब्द म्हणिजे शब्दचि नाही । निर्दोष म्हणिजे दोषचि नाही । निवृत्ति म्हणिजे वृत्तिच नाहीं । परब्रह्मासी ॥ १४ ॥

निःशब्द म्हणजें ज्याच्या ठिकाणी शब्द होत नाहीं तें,निर्दोष म्हणजें ज्याला दोष नाही तें,निवृत्ती म्हणजें ज्याचा ठिकाणी वृत्ति नाहीं तें असें परब्रह्म आहें.

निःकाम म्हणिजे काये । निर्लेप म्हणिजे काये । निःकर्म म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ १५ ॥

निःकाम,निर्लेप,निःकर्म म्हणजें काय तें मला सांगावें,

निःकाम म्हणिजे कामचि नाहीं । निर्लेप म्हणिजे लेपचि नाहीं । निःकर्म म्हणिजे कर्मचि नाहीं । परब्रह्मासी ॥ १६ ॥

निःकाम म्हणजें ज्याला काम (इच्छा) नाही ते,निर्लेप म्हणजें ज्याला कसलाही दोष नाही तें,निःकर्म म्हणजें ज्याला कर्माचा लेप नाहीं तें असें परब्रह्म आहें.

अनाम्य म्हणिजे काये । अजन्मा म्हणिजे काये । अप्रत्यक्ष म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ १७ ॥

अनाम्य,अजन्मा,अप्रत्यक्ष म्हणजें काय तें मला सांगावें.

अनाम्य म्हणिजे नामचि नाहीं । अजन्मा म्हणिजे जन्मचि नाहीं । अप्रत्यक्ष म्हणिजे प्रत्यक्ष नाहीं । परब्रह्म तें ॥ १८ ॥

अनाम्य म्हणजें ज्याला नांव (-रुप) नाहीं तें,अजन्मा ज्याला जन्म नाहीं तें,अप्रत्यक्ष म्हणजें जें डोळ्यांनी दिसत नाही तें, असें परब्रह्म आहें.

अगणित म्हणिजे काये । अकर्तव्य म्हणिजे काये । अक्षै म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ १९ ॥

अगणित,अकर्तव्य,अक्षै म्हणजें काय तें मला सांगावें.

अगणित म्हणिजे गणीत नाहीं । अकर्तव्य म्हणिजे कर्तव्यता नाहीं । अक्षै म्हणिजे क्षयचि नाहीं । परब्रह्मासी ॥ २० ॥

अगणित म्हणजें ज्यांचे मोजमाप करतां येत नाही तें,अकर्तव्य म्हणजें ज्याला कर्तव्य नाही तें,अक्षै म्हणजें ज्याला क्षय नाही तें,असें परब्रह्म आहें.

अरूप म्हणिजे काये । अलक्ष म्हणिजे काये । अनंत म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ २१ ॥

अरुप,अनंत,अलक्ष म्हणजें काय तें मला सांगावें.

अरूप म्हणिजे रूपचि नाहीं । अलक्ष म्हणिजे लक्षत नाहीं ।अनंत म्हणिजे अंतचि नाहीं।परब्रह्मासी ॥२२॥

अरुप म्हणजें ज्याला रुप नाही तें,अलक्ष म्हणजें ज्याच्याकडें लक्ष लांवतां येत नाही तें,अनंत म्हणजें ज्याला अंत नाही तें,असें परब्रह्म आहें.

अपार म्हणिजे काये । अढळ म्हणिजे काये । अतर्क्य म्हणिजे काये । मज निरूपावें ॥ २३ ॥ अपार म्हणिजे पारचि नाहीं ।अढळ म्हणिजे ढळचि नाहीं ।अतर्क्यें म्हणिजे तर्कत नाहीं ।परब्रह्म तें ॥२४॥

( तर्कत नाहीं - तर्क करता येत नाही )

अपार म्हणजें ज्याला पार (पैलतीर) नाहीं तें,अढळ म्हणजें जें ढळत (हालत) नाही तें,अतर्क्य म्हणजें ज्याचा तर्क करतां येत नाही तें,असें परब्रह्म आहें.

अद्वैत म्हणिजे काये । अदृश्य म्हणिजे काये । अच्युत म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ २५ ॥

अद्वैत,अच्युत,अदृश्य म्हणजें काय ते मला सांगावें,

अद्वैत म्हणिजे द्वैतचि नाहीं । अदृश्य म्हणिजे दृश्यचि नाहीं । अच्युत म्हणिजे चेवत नाहीं । परब्रह्म तें ॥ २६ ॥

( चेवत नाहीं - ढळत नाही )

अद्वैत म्हणजे ज्याला द्वैत नाहीं तें,अदृश्य म्हणजें दृश्य (दिसणारें) नाही तें,अच्युत म्हणजें जें च्युत (घसरत नाही तें) असें परब्रह्म आहें.

अछेद म्हणिजे काये । अदाह्य म्हणिजे काये । अक्लेद म्हणिजे काये । मज निरोपावें ॥ २७ ॥

अछेद,अदाह्य,अक्लेद म्हणजें काय तें मला सांगावें,

अछेद म्हणिजे छेदेना । अदाह्य म्हणिजे जळेना । अक्लेद म्हणिजे कालवेना । परब्रह्म तें ॥ २८ ॥

( अक्लेद - कालवले / मिसळले न जाणे )

अछेद म्हणजें जें कापलें जात नाही तें, अदाह्य म्हणजें जें जळत नाही तें (न जळणारे),अक्लेद म्हणजें जें कालवतां (भिजवतां) येत नाही तें, असें परब्रह्म आहें.

परब्रह्म म्हणिजे सकळांपरतें । तयास पाहातां आपणचि तें । हें कळे अनुभवमतें । सद्‌गुरु केलियां ॥२९॥

( अनुभवमतें - अनुभवस्वरूपाने )

परब्रह्म हें सर्वाहून श्रेष्ठ (सर्वापलिकडचें-सर्वांहून भिन्न) आहें,तें पाहूं गेले असतां आपण तेंच आहोत,पण सद्गुरु केल्यानें हें आपणांस अनुभवानें कळून येतें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आशंकानाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : ब्रह्मनिरूपण ॥ श्रीराम ॥**

जें जें कांहीं साकार दिसे । तें तें कल्पांतीं नासे । स्वरूप तें असतचि असे । सर्वकाळ ॥ १ ॥

जें जें काहीं आकारयुक्त दिसतें त्याचा कल्पांती नाश होतो,पण स्वरुप (भगवंताचे निजरुप) हें सदासर्वकाळ जसेंच्या तसेंच असतें.

जें सकळांमधें सार । मिथ्या नव्हे तें साचार । जें कां नित्य निरंतर । संचले असे ॥ २ ॥

जें सगळ्यांमध्यें श्रेष्ठ तें खरोखरच कधींहीं लटकें होणार नाहीं,ते नित्य निरंतर भरलेले (व्यापक) आहें.

तें भगवंताचें निजरूप । त्यासि बोलिजे स्वरूप । याहि वेगळे अमूप । नामें तयाचीं ॥ ३ ॥

असें जें भगवंताचे आत्मस्वरुप त्यालाच स्वरुप म्हणतात,ह्याशिवाय त्याला पुष्कळ नांवें आहेत.

त्यास नामाचा संकेत । कळावया हा दृष्टांत । परी तें स्वरूप नामातीत । असतचि असे ॥ ४ ॥

परब्रह्माचा संकेत (खूण किंवा चिन्ह) कळण्यासाठी त्याला हा नामाचा दाखला दिलेला असतो,परंतु जे नाव घ्यावें त्याहून वेंगळें असें तें स्वरुप जसेच्या तसें असतें.

दृश्यसबाह्य संचलें । परी तें विश्वास चोरले । जवळिच नाहीसें जालें । असतचि कैसें ॥ ५ ॥

तें स्वरुप दृश्याच्या आंतबाहेर व्यापलेलें असलें तरी पण सगळ्या विश्र्वाला तें गुप्तच (चोरलें) आहें, जवळच असतांही तें नाहीसें झालेसें वाटतें,

ऐसा ऐकोनियां देव । उठे दृष्टीचा भाव । पाहों जातां दिसे सर्व । दृश्यचि आवघें ॥ ६ ॥

असें देवाचें वर्णन ऐकून डोळ्यांना ते पाहाण्याची इच्छा होतें,पण पाहावयांस जावें तर सर्व द्दश्यच दिसतें.

दृष्टीचा विषयो दृश्य । तोचि जालिया सादृश्य । तेणें दृष्टी पावे संतोष । परी तें देखणें नव्हे ॥ ७ ॥

( सादृश्य - प्रत्यक्ष दृष्टीसमोर )

द्दश्य हा द्दष्टीचा विषय आहें,(अहाहा! काय नक्षत्रतारांची शोभा,कसें हें सूर्य-चंद्र,नद्या-पर्वत,फुले व मुलें!अशी लीला पाहून त्याचें स्मरण होतें,पण हें काहीं देव पाहाणें नव्हें-हें देवदर्शन नव्हें)

दृष्टीस दिसे तें नासे । येतद्विषईं श्रुति असे । म्हणौन जें दृष्टीस दिसे । तें स्वरूप नव्हे ॥ ८ ॥

जें दृष्टीला दिसतें तें नाश पावतें ह्याविषयी श्रुतीचा आधार आहें,म्हणून द्दष्टीला दिसतें तें परमात्मरुप नव्हें.

स्वरूप तें निराभास । आणी दृश्य भासलें साभास । भासास बोलिलें नास । वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥

स्वरुप हें निराभास आहें आणि द्दश्य आभासयुक्त भासतें,पण वेदांतशास्त्रात भासाचा नाश होतो असें सागितलें आहें,(द्दश्य साभास व नाशवंत आणि वस्तु द्दश्यावेगळी आहें असें वेदांतशास्त्र सागतें)

आणी पाहातां दृश्यचि भासे । वस्तु दृश्यावेगळी असे । स्वानुभवें पाहातां दिसे । तें दृश्यासबाह्य ॥ १० ॥

आणि द्दष्टीनें पहावयास जावें तर द्दश्यच भासतें आणि परमात्मवस्तु ही द्दश्याहून वेगळी आहें,आपल्या अनुभवानें पाहू गेलें असतां ती वस्तु द्दश्याच्या आंत बाहेर व्यापलेली दिसतें.(बाकी स्वानुभवानें पाहाता! ब्रह्म द्दश्यास बाह्य आहें)

जें निराभास निर्गुण । त्याची काये सांगावी खूण । परी तें स्वरूप जाण । सन्निधचि असें ॥ ११ ॥

जें निराभास निर्गुण त्याची खूण तरी काय सांगावी ?पण असें तें स्वरुप जवळच आहें हें लक्षांत ठेव.

जैसा आकाशीं भासला भास । आणी सकळांमध्यें आकाश ।तैसा जाणिजे जगदीश।सबाह्य अभ्यांतरीं॥१२॥

जसा आकाशांत सर्वांचा भास होतो आणि त्या सर्वामध्यें आकाश व्यापून असतें,त्याप्रमाणें जगदीश हा सर्वाच्या अंर्तबाह्य व्यापून आहें, (आकाशासारखेंच ब्रह्म सर्वांशी अलिप्त असून सकळा सबाह्य आहें.)

उदकामधें परी भिजेना । पृथ्वीमधें परी झिजेना । वन्हीमधें परी सिजेना । स्वरूप देवाचें ॥१३॥

देवाचें स्वरुप पाण्यामध्यें असून भिजत नाही,पृथ्वीमध्ये असून झिजत नाहीं व अग्नीमध्यें असून शिजत नाहीं.

तें रेंद्यामधें परी बुडेना । तें वायोमधें परी उडेना । सुवर्णी असे परी घडेना । सुवर्णासारिखें ॥ १४ ॥

( रेंद्यामधें - चिखलात )

तें (रेद्यामध्यें) चिखलामध्यें असून बुडत नाही-भिजत नाही,वायूमध्यें असूनही उडत नाही, आणि सोन्यामध्यें असून सुवर्णाबरोबर अलंकाररुपांत घडलें जात नाही.

ऐसें जें संचलें सर्वदा । परी ते आकळेना कदा । अभेदामाजीं वाढवी भेदा । ते हे अहंता ॥ १५ ॥

अशाप्रमाणें हें सर्वत्र अभिन्नपणें भरलेले आहें,परंतु त्यांचें कधी आकलन करतां येत नाहीं तें अभेद म्हणजें ऐक्यरुप असतां त्यांत (कल्पना-) भेद उत्पन्न होतो,तो अहंकारामुळें होतो.

तिच्या स्वरूपाची खूण । सांगों कांहीं वोळखण । अहंतेचें निरूपण । सावध ऐका ॥ १६ ॥

अहंतेच्या स्वरुपाची ओळख पटण्याकरितां काही लक्षणें सांगू,तें निरुपण सावधपणानें ऐका.

जे स्वरूपाकडे पावे । अनुभवासवें झेंपावे । अनुभवाचे शब्द आघवे । बोलोन दावी ॥ १७ ॥

ती अहंता स्वरुपाकडें जातें (अहं ब्रह्मास्मि अशा स्वरुपाची ओळख करुन देते),अनुभवाबरोबर झेपा टाकीत (प्रत्येक भुमिकेचा अनुभव घेतांना मी अनुभव घेणारा म्हणून शिल्लक राहातो) आणि सगळा अनुभव शब्दांनी बोलून दाखवितें.

म्हणे आतां मीच स्वरूप । तेंचि अहंतेचें रूप । निराकारीं आपोआप । वेगळी पडे ॥ १८ ॥

आतां मीच स्वरुप झालों असें वाटणें हेंच अहंतेचे स्वरुप होय.निराकार ब्रह्माच्या ठिकाणी ती आपोआपच वेगळी पडतें,

स्वयें मीच आहे ब्रह्म । ऐसा अहंतेचा भ्रम । ऐसियें सूक्ष्मीं सूक्ष्म । पाहातां दिसे ॥ १९ ॥

मीच स्वतः ब्रह्मरुप आहें असें वाटणें, हा अहंकाराचा भ्रम आहे,अशा सूक्ष्म स्थितीचा बारकाईनें विचार केल्यास हा भ्रम जातो.

कल्पना आकळी हेत । वस्तु कल्पनातीत । म्हणौन नाकळे अंत । अनंताचा ॥ २० ॥

मीच ब्रह्म हा हेतु कल्पनेने जाणला जातो,आणि अनंत असे ब्रह्म कल्पनातीत असल्यामुळे त्याचा अंत लागत नाही.

अन्वये आणि वीतरेक । हा शब्द कोणीयेक । निशब्दाच अंतरविवेक । शोधिला पाहिजे ॥२१॥

अन्वय (अष्ट देहांची उभारणी) आणि व्यतिरेक (उद्भवाचा संहार) सांगता येणें हें शाब्दिक ज्ञान आहें (हा शब्दभेद आहें) ह्यासाठी निःशब्द असे जें परब्रह्म त्याचा विवेकानें शोध घेतला पाहिजें (पण निशःब्द वस्तूचा अंतरविवेक शोधून अनुभविला पाहिजे)

आधीं घेईजे वाच्यांश । मग वोळखिजे लक्ष्यांश । लक्ष्यांशीं पाहातां वाच्यांश । असेल कैंचा ॥ २२ ॥

वाच्यांश म्हणजें शब्दार्थ अगोदर पाहावा मग लक्ष्यांशाचा म्हणजें अर्थाचा विचार करावा,लक्ष्यांशाचा विचार करुं लागल्यास तेथें वाच्यांश कोठून राहील ? (शब्द सोडून अर्थ,वाच्यांश टाकून लक्षांश घ्यावा,)

सर्वब्रह्म आणी विमळब्रह्म । हा वाच्यांशाचा अनुक्रम । शोधितां लक्ष्यांशाचें वर्म । वाच्यांश नसे ॥२३॥

हे सर्व ब्रह्म असें म्हणणा-यांचा एक पक्ष व मायाविरहित तेवढेंच विमळब्रह्म म्हणणा-यांचा दुसरा पक्ष,असें हे दोन्ही पक्ष बोलण्यापुरतेंच (वाच्यांश) आहेंत,परब्रह्म हे काय आहें हे कळल्यानंतर हें बालणें वा हें पक्ष उरतच नाहीत (त्या दोन्हींचे लक्ष्य पाहिलें पाहिजें)

सर्व विमळ दोनी पक्ष । वाच्यांशीं आटती प्रत्यक्ष । लक्ष्यांशी लावीता लक्ष । पक्षपात घडे ॥ २४ ॥

सर्व ब्रह्म व विमळब्रह्म हे दोन्ही पक्ष वाच्यांशातच आटतात.(बोलण्यापलीकडे जात नाहीत) लक्षांश जें ब्रह्म त्याजकडें लय लागला की सर्व व विमल असे जें पक्ष त्यांचा पात होतो (ते उरत नाहीत) (वर्म उमगल्यावर हें शब्द व पक्ष काही उरत नाहीत.)

हें लक्ष्यांशें अनुभवणें । येथें नाहीं वाच्यांश बोलणे । मुख्य अनुभवाचे खुणे । वाचारंभ कैंचा ॥ २५ ॥

ब्रह्म होऊन ह्याचा अनुभव घ्यावा,तेथे वाच्यांश किंवा बोलणें ही नाहींत,जी खूण मुख्यतः अनुभवानें पटावयाची तेथें शब्दाला उद्भव तरी कोठचा ? (येथे बोलावयाचे काम नाही,जेथे अनुभव घ्यायचा तेथे वाचारंभ कसला ?)

परा पश्यंती मधेमां वैखरी । जेथें वोसरती च्यारी । तेथें शब्द कळाकुंसरी । कोण काज ॥ २६ ॥

( शब्द कळाकुंसरी - शाब्दिक कला कौशल्य )

परा,पश्यंती,मध्यमा,वैखरी ह्या चारही वाणी जेथें मागें हटतात तेथें शब्दांच्या कलाकुसरीचें काम काय ? (परादि चारी वाचा जेथें आटतात तेथें शब्दाचें कौशल्य काय चालणार ?)

शब्द बोलतां सवेंच नासे । तेथें शाश्वतता कोठें असे । प्रत्यक्षास प्रमाण नसे । बरें पाहा । २७ ॥

शब्द उच्चारतांच क्षणी नाश पावतो,त्याला शाश्वतपणा कोठें आहें ? ही प्रत्यक्ष गोष्ट तिला प्रमाण नाहीं,नीट विचार करा.

शब्द प्रत्यक्ष नासिवंत । म्हणोन घडे पक्षपात । सर्व विमळ ऐसा हेत । अनुभवीं नाहीं ॥ २८ ॥

शब्द हा उघड नाशवंत आहे म्हणून पक्षपात होतो (कोणताही पक्ष ब्रह्माच्या ठिकाणी उरत नाही),सर्व ब्रह्म किंवा विमल ब्रह्म अशी कल्पना अनुभवाच्या ठिकाणी नाही (शब्द नाशवंत म्हणून पक्ष व नाना मतें  बोलतात, अनुभवस्वरुप ब्रह्माच्या ठिकाणी सर्वब्रह्म नाही तसें विमल ब्रह्मही नाहीं.

ऐक अनुभवाचें लक्षण । अनुभव म्हणिजे अनन्य जाण । ऐक अनन्याचें लक्षण । ऐसें असे॥ २९ ॥

अनुभवाचें लक्षण आतां ऐक,अनुभव म्हणजें (ब्रह्माच्या ठिकाणी) अनन्यपणा होय,अनन्यपणाचें लक्षण असें आहे.

अनन्य म्हणिजे अन्य नसे । आत्मनिवेदन जैसें । संगभंगें असतचि असे । आत्मा आत्मपणें ॥३०॥

अनुभव म्हणजें अनन्य म्हणजें दुसरें-अन्य-नाहीं,आत्मनिवेदन जसें एकाएकी असतें तसें देहादिकांचा अथवा द्वैताचा संग नाहीसा होऊन निरंतर असणारा आत्मा आत्मपणानेंच असतों,

आत्म्यास नाहीं आत्मपण । हेंचि निःसंगाचें लक्षण । हें वाच्यांशें बोलिले जाण । कळावया कारणें ॥३१॥

आत्मा (स्वरुप) होऊन मी आत्मा आहें असा भाव नसणें हेंच निःसंगपणाचें लक्षण होय,श्रोत्यांना कळावें म्हणून हें शब्दांनी सांगितले,इतकेच.

येरवीं लक्ष्यांश तो वाच्यांशें । सांगिजेल हें घडे कैसें । वाक्य विवरणें अपैसें । कळों लागे ॥ ३२ ॥

एरवी लक्ष्यांश हा शब्दांनी (वाच्यांशानें) कसा सांगता येईल ? महावाक्याचें विवरण करावें म्हणजें ह्या गोष्टी आपोआप कळून येतील.

करावें तत्वविवरण । शोधावें ब्रहम निर्गुण । पाहावें आपणास आपण । म्हणिजे कळे ॥ ३३ ॥

तत्वविवरण करावें,निर्गुण ब्रह्माचा शोध घ्यावा,आपल्या स्वरुपाला आपण पाहावें म्हणजें (लक्षांश काय आहे तो) कळेल,तत्वांचे विवरण करावें,तत्वांच्या पलीकडील ब्रह्म शोधावें व आपण तेंच हें ओळखावें.

हें न बोलतांच विवरिजे । विवरोन विवरोन राहिजे । मग अबोलणेंचि साजे । माहापुरुषीं ॥ ३४ ॥

( माहापुरुषीं - सद्गुरुना )

पण न बोलतांच ह्यांचे विवरण करावें व विवरण करुन विरुन (अहंभाव नाहीसा करुन) राहावें म्हणजे अशा महापुरुषाच्या ठिकाणीं अबोलणें म्हणजे मौनच शोभून दिसतें (हे न बोलता विवरुन पहावें महात्मे ब्रह्माविषयी मौनच धरितात)

शब्दचि निशब्द होती । श्रुति नेति नेति नेति म्हणती । हें तों आलें आत्मप्रचिती । प्रत्यक्ष आतां ॥ ३५ ॥

त्या ठिकाणी शब्द मुके होतात,वेद न इति न इति, म्हणजे असे नव्हें असें म्हणतात,हें आपल्या प्रत्यक्ष अनुभवास येतें,

प्रचित आलियां अनुमान । हा तों प्रत्यक्ष दुराभिमान । तरी आतां मी अज्ञान । मज कांहींच न कळे॥३६॥

अनुभव (प्रचीति) आल्यावर अनुमान करणें हा उघड दुराग्रह आहें,तर मग मी अज्ञान,मला काहींच कळत नाही.

मी लटिका माझें बोलणें लटिकें । मी लटिका माझें चालणें लटिकें । मी माझें अवघेंचि लटिकें। काल्पनिक ॥ ३७ ॥

मी खोटा, माझे बोलणें-चालणें खोटें,मी व माझे सगळेंच खोटें व काल्पनिक आहें.

मज मुळींच नाहीं ठाव । माझे बोलणें अवघेंचि वाव । हा प्रकृतीचा स्वभाव । प्रकृती लटिकी ॥ ३८ ॥

( अवघेंचि वाव - निव्वळ मिथ्या )

माझा मुळीच ठाव नाहीं (एक ब्रह्म आहें) माझे बोलणें सगळेंच व्यर्थ असें म्हणणें हा प्रकृतीचा स्वभाव होय,पण प्रकृति तर खोटी! (म्हणून मीपण सोडून ब्रह्मी लीन व्हावें.)

प्रकृती आणी पुरुष । यां दोहींस जेथें निरास । तें मीपण विशेष । हें केवि घडे ॥ ३९ ॥

प्रकृति व पुरूष ह्या दोहोंचा जेथें (निरास) लय होतो तेथें मीपणा विशेषत्वानें शिल्लक राहील हें घडेल कसें ?

जेथें सर्व हि अशेष जालें । तेथें विशेष कैंचे आलें । मी मौनी म्हणतां भंगलें । मौन्य जैसें ॥ ४०॥

जेथें सर्वाचाच विशेष लय होतो तेथें विशेष कोठून आले ? मी (मौनव्रत धारण करणारा) मुका आहे असें कोणी म्हटलें तर ज्याप्रमाणें त्याचें मौन (मौनव्रत) भंग पावतें (तद्वत मला ब्रह्माचा अनुभव आला असे कोणी म्हटलें की त्याला अनुभव आला नाही तो अहंतेने घेरला असे समजावें.)

आतां मौन्य न भंगावें । करून कांहींच न करावें । असोन निशेष नसावें । विवेकबळें ॥ ४१ ॥

( करून कांहींच न करावें - विवेकाने सर्व करून नि:संग,मीपणाचा लवलेश नसावा )

आतां विवेकाच्या सामर्थ्याने मौनाचा भंग होऊ नयें,सर्व काही करुन (अहंकर्तृत्व व फलाशा ही नसल्यामुळें) काहींच न केल्यासारखें व्हावें व ब्रह्मस्थितीत असून अहंभावाने काहींच नसावें (तात्पर्य मौन भंगू नयें,म्ह.ब्रह्म होऊन मी ब्रह्म असा अहंतेचा वारा लागू नये,विहीत कर्मे करुन मी कर्ता असें मानू नयें,असून काहींच नसावें.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे ब्रह्मनिरूपणनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : निःसंदेह निरूपण ॥ श्रीराम ॥**

श्रोतीं केला अनुमान । ऐसें कैसें ब्रह्मज्ञान । कांहींच नाहीं असोन । हें केवि घडे ॥ १ ॥

(प्रश्न) येथे श्रोत्यानें शंका घेतली कीं असलें कसलें ब्रह्मज्ञान ?असून काहींच नसणें हें घडेल तरी कसें ?

सकळ करून अकर्ता । सकळ भोगून अभोक्ता । सकळांमधें अलिप्तता । येईल कैसी ॥ २ ॥

(तुम्ही म्हणतां की) ज्ञाता सगळें करुन अकर्ता,सगळें भोगून अभोक्ता कसा असेंल ? तसेंच सर्वांमध्यें असून अलिप्तपणा त्याला कसा  येईल ?

तथापि तुम्ही म्हणतां । योगी भोगून अभोक्ता । स्वर्गनरकहि आतां । येणेंचि न्यायें ॥ ३ ॥

तथापि तुम्ही म्हणतां की योगी सर्व भोगून अभोक्ता,तर मग ह्याच न्यायानें स्वर्ग व नरकही भोगून न भोगल्यासारखें होईल!

जन्म मृत्यु भोगिलेच भोगी । परी तो भोगून अभोक्ता योगी । यातना हि तयालागीं । येणेंचि पाडें ॥४॥

जन्ममृत्यु एकदां भोगलेलेच पुन्हा भोगतो तरी त्यालाही तें भोगून योगी व अभोक्ता असें म्हणता येईल,तो यातनाही भोगीत असतो तरी ह्याच न्यायानें (पाडें) अभोक्ता म्हणता येईल.(श्रोता ह्यावर उलट म्हणतो,की आतां यथेच्छ पापाचरण करण्यास हरकत नाहीं,कारण ह्याच न्यायाने जन्ममृत्यु भोगून न भोगल्यासारखें,पाप करुन न केल्यासारखे.स्वर्गाला व नरकालाही जाऊन न गेल्यासारखेंच आहें!)

कुटून नाहीं कुटिला । रडोन नाहीं रडला । कुंथोन नाहीं कुंथिला । योगेश्वर ॥ ५ ॥

योगीश्र्वरला ठोकला तरी ठोकला नाही,तो रडला तरी रडला नाही,तो कण्हला तरी कण्हला नाहीं.

जन्म नसोन घातला । पतित नसोन जाला । यातना नसोन पावला । नानापरी ॥ ६ ॥

त्याला जन्म नाही पण जन्माला आला.पतित नाही पण पतित झाला,यातना नाहींत पण अनेक प्रकारच्या यातना भोगाव्या लागल्या.

ऐसा श्रोतयांचा अनुमान । श्रोतीं घेतलें आडरान । आतां याचें समाधान । केलें पाहिजे ॥ ७ ॥

आडरानांत शिरुन श्रोत्यांनी अशा प्रकारची शंका घेतली,आतां त्याचें समाधान केले पाहिजें.

वक्ता म्हणे सावध व्हावें । तुम्ही बोलतां बरवें । परी हें तुमच्याच अनुभवें । तुम्हास घडे ॥ ८ ॥

(उत्तर-) (बाबारे! शब्दज्ञानाच्या बळावर तूं व्यर्थ आडरान घेतलें आहेंस) वक्ता म्हणतो,आतां सावध व्हा तुम्ही बोलतां तें ठीक आहें,पण तुम्हांला जें भोगावें लागतें त्या अनुभवावरुन तुम्ही बोलतां.

ज्याचा अनुभव जैसा । तो तो बोलतो तैसा । संपदेविण हो धिवसा । तो निरार्थक ॥ ९ ॥

( धिवसा - धीर व्यवहारात गरिबाने व परमार्थात अज्ञानाने निरर्थक)

ज्याला जसा अनुभव येतो तसा तो बोलतो,संपत्ति असल्याखेरीज नुसतें धाडस (धिवसा) करणें व्यर्थ होय.

नाहीं ज्ञानाची संपदा । अज्ञानदारिद्रें आपदा । भोगिल्याच भोगी सदा । शब्दज्ञानें ॥ १० ॥

आत्मज्ञानाची संपत्ति नाही आणि अज्ञानरुप दारिद्यामुळें कोरड्या शब्दज्ञानानें मनुष्य भोगलेल्याच विपत्ति सदा सर्वदा भोगतों.(ज्ञानसंपत्तीनें श्रीमंत झालेल्याचें वर्म अज्ञानी दरिद्याला कळत नसतें)

योगी वोळखावा योगेश्वरें । ज्ञानी वोळखावा ज्ञानेश्वरें । माहाचतुर तो चतुरें । वोळखावा ॥ ११ ॥

योगीश्र्वरानें योग्याला ओळखावें,ज्ञानेश्र्वरानें ज्ञान्यास ओळखावें आणि महाचतुर असेल त्याला चतुरानें ओळखावें,(योगी योगेश्र्वरानें,ज्ञानी ज्ञान्यानें,महाचतुर चतुरानेंच ओळखावा.)

अनुभवी अनुभवियास कळे । अलिप्त अलिप्तपणें निवळें । विदेहाचा देहभाव गळे । विदेही देखतां ॥१२॥

स्वतः जो अनुभवी असेल त्याला दुसरा कोण अनुभवी आहें तो कळेल,दुस-याचा अलिप्तपणा पाहून अलिप्तास आनंद होतो आणि दुसरा विदेही पाहातांच विदेहाचें देहाभान नाहींसें होतें (अलिप्त पुरुषच अलिप्ताला,विदेही विदेहाला पाहून संतोष पावतों)

बद्धासारिखा सिद्ध । आणी सिद्धासारिखा बद्ध । येक भावील तो अबद्ध । म्हणावाच नलगे ॥ १३ ॥

बध्दाप्रमाणेचं सिध्द व सिध्दाप्रमाणेंच बध्द हे दोघेही एकसारखें आहेंत असें जो मानील तो मूर्ख आहें हें सांगावयास पाहिजें असें नाही (बध्द आणि सिध्द सारखें मानील तो काही तरी अबध्द बोलतो आहें हें न बोलतांच कळण्यासारखें आहें.)

झडपला तो देहधारी । आणी देहधारक पंचाक्षरी । परंतु दोघां येकसरी । कैसी द्यावी ॥ १४ ॥

ज्याला भुतबाधा झाली आहें तो देहधारी (मनुष्य) व भूत काढणारा पंचाक्षरी आहें तोही देहधारीच आहें,पण दोघांची बरोबरी आहें असें कसें म्हणावें ?

तैसा अज्ञान पतित । आणी ज्ञानी जीवन्मुक्त । दोघे समान मानील तो युक्त । कैसा म्हणावा ॥ १५ ॥

तद्वत पतित अज्ञानी व जीवन्मुक्त ज्ञानी ह्या दोघांना सारखें मानील त्यास सुज्ञ-शहाणा-कसें म्हणावें ?

आतां असो हे दृष्टांत । प्रचित बोलों कांहीं हेत । येथें श्रोतीं सावचित । क्षणयेक व्हावें ॥ १६ ॥

आतां हें द्दष्टांत पुरेत,अनुभवाचें काही विचार सांगतो ते श्रोत्यांनी क्षणभर एकाग्र चित्त करुन ऐकावें.

जो जो ज्ञानें गुप्त जाला । जो विवेकें विराला । जो अनन्यपणें उरला । नाहींच कांहीं ॥ १७ ॥

( विराला - आत्मलीन झाला )

जो आत्मज्ञानाच्या योगानें गुप्त झाला,जो आत्मानात्मविवेकानें आत्मस्वरुपी लय पावला व जो अनन्य म्हणजें ब्रह्मस्वरुप झाल्यामुळें निराळा म्हणून काहीं राहिलाच नाही.

तयास कैसें गवसावें । शोधूं जातां तोचि व्हावें । तोचि होतां म्हणावें । नलगे कांहीं ॥ १८ ॥

त्याला शोधून कसे काढावें ? त्याला शोधायला गेले तर तद्रुप व्हावें लागतें आणि तद्रूप झालें म्हणजे मग बोलण्याचें कारणच उरत नाही.(आणि मग असल्या शंकाकुशंका घेण्यास जागा उरत नाही ),

देहीं पाहातां दिसेना । तत्वें शोधितां भासेना । ब्रह्म आहे निवडेना । कांहीं केल्यां ॥ १९ ॥

(ब्रह्ममय झालेला साधु दिसावा कसा ?) देहांमध्यें त्याचा शोध करावा तर दिसत नाही,तत्वांचा शोध घेतला तर तो भासत नाही,तो ब्रह्मस्वरुप असल्यामुळें काही केले तरी त्याला वेगळे काढता येत नाही.

दिसतो तरी देहधारी । परी कांहींच नाहीं अंतरीं । तयास पाहातां वरिवरी । कळेल कैसा ॥ २० ॥

देहधारी तर दिसतो,पण अंत:करणामध्यें काहींच (अहंभाव) नसतो,त्याला वरवर पाहायला लागलें तर तो कळणार कसा ?

कळाया शोधावें अंतर । तंव तो नित्य निरंतर । जयास धुंडितां विकार । निर्विकार होती ॥ २१ ॥

त्याचें स्वरुप कळण्यासाठी त्यांचे अंतर शोधावें तर नित्य व निरंतर (अंतररहित) आहें,त्याला कामक्रोधादि विकार घेऊन धुंडायला जावें तों तें विकारच त्याला सामील होतात म्ह.सर्व निर्विकार होतात.

तो परमात्मा केवळ । तयास नाहीं मायामळ । अखंड हेतुचा विटाळ । जालाच नाहीं ॥ २२ ॥

असा साधु म्ह.मूर्त-शुध्द परमाात्माच होय,त्याला मायेचा मळ (डाग) लागत नाही,तो अखंड असून त्याला हेतूचा म्हणजें कल्पनेचा विटाळ झालेलाच नाही.

ऐसा जो कां योगीराज । तो आत्मा सहजीं सहज । पूर्णब्रह्म वेदबीज । देहाकारें कळेना ॥ २३ ॥

( वेदबीज - वेदातील गुह्य )

असा जो योगीराज तो सहजच आत्मा होय,वेंदांत सांगितलेले परमगुह्य (रहस्य) असें पूर्ण ब्रह्म तो असतांही देहाच्या आकारामुळें (देहभावामुळे सामान्य लोकांना) कळत नाही.

देह भावितां देहचि दिसे । परी अंतर अनारिसें असे । तयास शोधितां नसे । जन्म मरण ॥ २४ ॥

देहाकडून पाहाल तर त्याचा देह म्हणजें त्याच्या देहांचे व्यवहार दिसतील,पण त्यांचे अंतःकरण मात्र वेगळें (अनारिसें) असतें,त्या अंतःकरणाचा (अंतरात्म्याचा) शोध घेउ गेलें तर त्याला जन्ममरण नाही असें दिसून येईल (किंवा,त्यांचें अंतर शोधाल तर तेंच तुम्ही होऊन तुमचें जन्ममरण टळेल)

जयास जन्ममरण व्हावें । तें तो नव्हेचि स्वभावें । नाहींच तें आणावें । कोठून कैंचें ॥ २५ ॥

ज्याला जन्ममरण आहे असा देह तों काही मुळीचं नाही,मग जें नाहींच तें आणावयाचें कोठून व कसें ? (जन्ममृत्यु ज्या मायेंकरिता देहाच्या मागें लागले आहेंत तो देह तो नव्हें,तो निर्गुण ब्रह्मच आहें)

निर्गुणास जन्म कल्पिला । अथवा निर्गुण उडविला । तरी उडाला आणी जन्मला । आपला आपण ॥२६॥

( उडविला - बाध/मृत्यू आणला )

निर्गुणाला जन्म आहें किंवा लय आहे अशी कल्पना केली तरी जन्मला व नाहीसा झाला कोण ? तर आपला आपणच (निर्गुणाला जन्ममरण कल्पिले तरी तें त्याला न स्पर्शतां कल्पणा-याच्या मागें लागते.)

माध्यांनीं थुंकितां सूर्यावरी । तो थुंका पडेल आपणांच वरी । दुसर्यास चिंतितां अंतरीं ।आपणास घडे॥२७॥

भर दोनप्रहरी सूर्यावर थुंकल्यास तो थुंका आपल्याच अंगावर पडतो (सूर्याला त्याचे काय ?) तद्वत दुस-यास बरें वाईट चिंतावें तसें आपणास घडतें,

समर्थ रायाचे महिमान । जाणतां होते समाधान । परंतु भुंकों लागलें स्वान ।तरी तें स्वानचि आहे ॥२८॥

एखाद्या थोर राजाचा महिमा कळला म्हणजें समाधान वाटतें,पण (तें न जाणतां) एखादें कुत्रें त्यावर भुंकू लागलें तर त्याला काय म्हणावें ?कुत्रेच तें! (राजाच्या महत्वाची हानि होत नाही पण कुत्राचा क्षुद्रपणा मात्र प्रकट होतो.)

ज्ञानी तो सत्यस्वरूप । अज्ञान देखे मनुष्यरूप । भावासारिखा फळद्रूप । देव तैसा ॥ २९ ॥

त्याप्रमाणें ज्ञानी हा सत्य म्हणजें परब्रह्मस्वरुप स्वरुप असतो आणि जो त्याला मनुष्यरुप समजतो तो अज्ञानी होय.देवही भावाप्रमाणेंच फळ देणारा असतो (देव व साधु ह्यांच्याविषयी जशी भावना करावी तसें फळ मिळतें)

देव निराकार निर्गुण । लोक भाविती पाषाण । पाषाण फुटतो निर्गुण । फुटेल कैसा ॥ ३०॥

देव हा निराकार व निर्गुण आहें आणि लोक पाषाणालाच  देव मानतात,पण पाषाण फुटतो,निर्गुण देव कसा फुटेल ?

देव सदोदित संचला । लोकीं बहुविध केला । परंतु बहुविध जाला । हें तों घडेना ॥ ३१ ॥

देव सदासर्वदा एकच-एक भरलेला (सर्वव्यापी) असून लोकांनी त्यास अनेक प्रकारचा केला आहें,लोक म्हणतात-तो नानात्व पावला आहे,म्हणून तो अनेक प्रकारचा झाला असें घडत नाही (लोकांच्या म्हणण्यामुळें तों एकत्व सोडून बहुविध झाला हें काही होत नाही)

तैसा साधु आत्मज्ञानी । बोधें पूर्ण समाधानी । विवेकें आत्मनिवेदनी । आत्मरूपी ॥ ३२ ॥

त्याप्रमाणें आत्मज्ञान झालेला साधु आत्मबोधाच्या योगानें पूर्ण समाधानी असतो आणि विचारानें आत्मनिवेदन करुन आत्मस्वरुपामध्येच रममाण होतो.(पूर्ण बोधानें समाधान पावलेला साधुही तसाच होय)

जळोन काष्ठाचा आकार । अग्नि दिसे काष्ठाकार । परी काष्ठ होईल हा विचार । बोलोंच नये ॥ ३३ ॥

लाकडाचा आकार जळून गेला म्हणजें तो अग्नि लांकडाच्या आकाराचा दिसतो,तथापि तो (अग्नि) परत लांकूड होईल ही गोष्टसुध्दा बोलतां कामा नयें (काष्ठ जळतांना अग्नि काष्ठाच्या आकारासारखा दिसला तरी तो काष्ठ होत नाही.)

कर्पूर असे तों जळतां दिसे । तैसा ज्ञानीदेह भासे । तयास जन्मवितां कैसें । कर्दळीउदरीं ॥ ३४ ॥

( उदरीं - गाभ्यातून )

कापूर असतो तो जळताना दिसतो तद्वत ज्ञानाचा देह भासतो,पण एकदां जळून गेलेला कापूर पुन्हा कर्दळीच्या पोटांत कसा उत्पन्न करतां येईल ?(तद्वत ज्ञान्याचा देह एकदा गेला म्हणजें त्याला जन्म नाहीं,ज्ञानी पुन्हा देहाला लगटत नाहीं)

बीज भाजलें उगवेना । वस्त्र जळालें उकलेना । वोघ निवडितां निवडेना । गंगेमधें ॥ ३५ ॥

बीं भाजल्यानंतर उगवत नाही,वस्त्र जळून गेले की उलगडतां येत नाही किंवा गंगेंस मिळालेला नदीचा ओघ (ओहळ) संगमानंतर गंगेतून वेगळा काढतां येत नाहीं (पुन्हा आहोळपणानें सापडत नाही)

वोघ गंगेमागें दिसे । गंगा येकदेसी असे । साधु कांहींच न भासे । आणी आत्मा सर्वगत ॥ ३६ ॥

गंगा एकदेशी असल्यामुळें ओघ गंगेच्या मागें दिसतो तरी पण साधु हा सर्वव्यापी आत्मा असल्यामुळें काहींच भासत नाहीं (ओघ गंगेला मिळण्याच्यापूर्वी तरी असतों म्हणून हा दृष्टांत एकदेशी आहें,साधु आत्मस्वरुपाकार झाला कि मागें काहीच राहात नाही.)

सुवर्ण नव्हे लोखंड । साधूस जन्म थोतांड । अज्ञान प्राणी जडमूढ । तयास हें उमजेचिना ॥ ३७ ॥

(परिसाच्या योगानें लोखंडाचें सोने झाल्यानंतर तें) सोनें पुन्हा लोखंड होत नाही,त्याप्रमाणें साधूला जन्म आहें असें म्हणणे केवळ थोतांड होय (साधूस जन्म बोलूच नयें परंतु जे प्राणी अज्ञानी व जडमूढ आहेत,त्यांना हे उमजत नाही)

अंधास कांहींच न दिसे । तरी ते लोक आंधळे कैसे । सन्नपातें बरळतसे । सन्नपाती ॥ ३८ ॥

( सन्नपात - सन्नपातीच्या (ताप) योगाने )

आंधळ्याला काहींच दिसत नाही म्हणून सगळेंच आंधळे कसें होतील ? सन्निपातज्वराच्या योगानें रोगी तेवढा बरळू लागतो,

जो स्वप्नामधें भ्याला । तो स्वप्नभयें वोसणाला । तें भये जागत्याला । केवि लागे ॥ ३९ ॥

जो स्वप्नामध्यें भ्याला तो त्या भयानें (वोसणला) बरळू लागला,तें भय जागत्या माणसाच्या पाठीमागें कसें लागेल ?

मुळी सर्पाकार देखिली । येक भ्याला येकें वोळखिली । दोघांची अवस्था लेखिली । सारिखीच कैसी ॥४०॥

सर्पाच्या आकाराची मुळी पाहून एकजण भ्याला व एकानें ती ओळखली तेव्हा त्या दोघांची अवस्था एकच कशी मानतां येईल ?

हतीं धरितां हि डसेना । हें येकास भासेना । तरी ते त्याची कल्पना । तयासीच बाधी ॥ ४१ ॥

ती हातांत धरली तरी डसणार नाही हें एकाला समजत नाही,तरीही त्याची कल्पना त्याला बाधक झाली.

विंचु सर्प डसला । तेणें तोचि जाकळला । तयाचेनि लोक जाला । कासावीस कैसा ॥ ४२ ॥

( जाकळला - व्याकूळ झाला )

एखाद्याला साप किंवा विंचू डसला तर तोच बरळतों (जाजावला) त्यामुळें इतर लोक कासावीस कसें होतील ?

आतां तुटला अनुमान । ज्ञानियास कळे ज्ञान । अज्ञानास जन्ममरण । चुकेचिना ॥ ४३ ॥

आतां शंका फिटली,ज्ञान्याला ज्ञान कळतें आणि अज्ञान्याला जन्ममरण चुकत नाहीं.

येका जाणण्यासाठीं । लोक पडिले अटाटीं । नेणपणें हिंपुटी होती । जन्ममृत्यें ॥ ४४ ॥

( अटाटीं - खटपट )

एक ज्ञान नसल्यामुळें लोक यातायातीत पडतात व अज्ञानानें जन्ममृत्यु भोगून कष्टी होतात.

तेंचि कथानुसंधान । पुढें केलें परिछिन्न । सावधान सावधान । म्हणे वक्ता ॥ ४५ ॥

( परिच्छिन्न - स्पष्ट )

तोच कथासंबंध पुढें स्पष्ट करुन दाखविला आहें,ह्यासाठी वक्ता म्हणतों,आता सावधान व्हा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निःसंदेहनिरूपणनाम समास तिसरा ॥**

**समास चवथा : जाणपणनिरूपण ॥ श्रीराम ॥**

पृथ्वीमधें लोक सकळ । येक संपन्न येक दुर्बळ । येक निर्मळ येक वोंगळ । काय निमित्य ॥ १ ॥

(प्रश्न)-पृथ्वीमध्यें अनेक लोक आहेत त्यांत कोणी सामर्थ्यवान,तर कोणी दुबळे,कोणी निर्मळ तर कोणी घाणेरडें असे असतात,ते काय म्हणून ?

कित्येक राजे नांदती । कित्येक दरिद्र भोगिती । कितीयेकांची उत्तम स्थिती । कित्येक अधमोद्धम ॥ २ ॥

कित्येक,जण राजे होऊन नांदत आहेत तर कित्येक दारिद्र्य भोगीत आहेत,कित्येकांची स्थिति उत्तम असतें,कित्येक नीचांतील नीच असतात (निकृष्टावस्थेंत असतात)

ऐसें काय निमित्य जालें । हें मज पाहिजे निरोपिलें । याचे उत्तर ऐकिलें । पाहिजे श्रोतीं ॥ ३ ॥

असें कोणत्या कारणानें झालें हें मला सांगितलें पाहिजें (वक्ता म्हणतो) याचे उत्तर आतां श्रोत्यांनी ऐकावें.

हे सकळ गुणापासीं गती । सगुण भाग्यश्री भोगिती । अवगुणास दरिद्रप्राप्ती । येदर्थी संदेह नाहीं ॥ ४ ॥

उत्तर -हें सगळें गुणाचें खेळ आहेत,गुणवान पुरुष वैभव भोगतात आणि अवगुणी दारिद्य भोगतात ह्यांत संशय नाही.

जो जो जेथें उपजला । तो ते वेवसाईं उमजला । तयास लोक म्हणती भला । कार्यकर्ता ॥ ५ ॥

जो ज्या धंद्यात उत्पन्न झाला त्या धंद्यातच त्याची गति चालतें (आणि त्यांत तो वाढला म्हणजें) त्यालाच लोक चांगला कार्यकर्ता म्हणतात,(जो आपला व्यवसाय समजून जाणतेंपणानें करतो त्याला चांगला कार्यकर्ता म्हणतात.)

जाणता तो कार्य करी । नेणतां कांहींच न करी । जाणता तो पोट भरी । नेणता भीक मागे ॥ ६ ॥

जाणता असतो तो उद्योग करतो,व नेणतां कांहीच करत नाही म्हणून जाणता आपले पोट भरतो व नेणता भीक मागतो.

हें तों प्रकटचि असे । जनीं पाहातां प्रत्यक्ष दिसे । विद्येवीण करंटा वसे । विद्या तो भाग्यवंत ॥ ७ ॥

हें तर उघड आहें विद्येवांचून मनुष्य करंटा असतो व विद्या शिकल्यास भाग्यवान होतो,हे लोकांत पाहिल्यास प्रत्यक्ष दिसतें.

आपुली विद्या न सिकसी । तरी काये भीक मागसी । जेथें तेथें बुद्धी ऐसी । वडिलें सांगती ॥ ८ ॥

आपली विद्या न शिकशील तर पुढें काय भिक मागशील ? असा बुध्दिवाद वडील माणसे जेथे तेथे मुलांस सांगत असतात.

वडिल आहे करंटा । आणी समर्थ होये धाकुटा । कां जे विद्येनें मोठा । म्हणोनिया ॥ ९ ॥

वडील मनुष्य (मुलगा) दरिद्री असतो व धाकटा श्रीमंत होतो कारण काय ?तर त्याच्याजवळ विद्या अधिक आहे म्हणून.

विद्या नाही बुद्धी नाही। विवेक नाहीं साक्षेप नाहीं ।कुशळता नाहीं व्याप नाहीं ।म्हणौन प्राणी करंटा ॥१०॥

विद्या,बुध्दि,विवेक,उद्योग,कुशलता किंवा व्याप ह्यापैकी कांहीही नसतें,म्हणून प्राणी करंटा होतो.

इतुकें हि जेथें वसे । तेथें वैभवास उणें नसे । वैभव सांडितां अपैसें । पाठीं लागे ॥ ११ ॥

( अपैसें - आपोआप )

हे सर्व गुण जेथे असतात तेथें वैभवाला कमतरता नसतें,वैभव नको म्हटलें तरी पाठीस लागतें.

वडिल समर्थ धाकुटा भिकारी । ऐका याची कैसी परी । वडिला ऐसा व्याप न करी । म्हणोनियां ॥१२॥

वडील श्रीमंत व धाकटा भिकारी ह्यांचे कारण ऐका,कारण तो वडिलांसारखा उद्योग करीत नाही म्हणून (वडिलांचा व्याप मुलाने चालविला नाही तर मुलगा करंटा निघतों)

जैसी विद्या तैसी हांव । जैसा व्याप तैसें वैभव । तोलासारिखा हावभाव । लोक करिती ॥१३॥

( जैसी विद्या तैसी हांव - विद्या तितकी महत्वाकांक्षा, तोलासारिखा - कुवतीनुसार महत्वाकांक्षा नी मानमरातब )

जशी विद्या असतें त्या प्रकारची इच्छा होतें व जसा उद्योग करतो तसें वैभव मिळवतो तात्पर्य आपल्या ऐपतीप्रमाणे लोक वागतात.(विद्या असेल त्या प्रमाणांत हांव-महत्वाकांक्षा,हांव असेल त्यामानानें-वैभव-तोलासारखे लोक वागतात.)

विद्या नसे वैभव नसे । तेथें निर्मळ कैंचा असे । करंटेपणें वोखटा दिसे । वोंगळ आणी विकारी ॥ १४ ॥

जेथें विद्या,वैभव नाही तेथें निर्मळपणा कोठून असणार ?करंटेपणामुळे तो वाईट घाणेरडा व विकारी दिसतो.

पशु पक्षी गुणवंत । त्यास कृपा करी समर्थ । गुण नस्तां जिणें वेर्थ । प्राणीमात्राचें ॥ १५ ॥

पशुपक्षीं चांगल्या गुणाचें असले तर त्यांस लोक प्रेमाने सांभाळतात गुण नसेल तर कोणत्याही प्राण्याचा जन्म व्यर्थ होय.

गुण नाहीं गौरव नाहीं । सामर्थ्य नाहीं महत्व नाहीं । कुशळता नाहीं तर्क नाहीं । प्राणीमात्रासी ॥ १६ ॥

कोणत्याही प्राण्याला गुण नसेल तर त्यांस गौरव,सामर्थ्य,महत्व,कुशलता,तर्क ह्यापैकी कांहींही प्राप्त होणार नाहीं.

याकारणें उत्तम गुण । तेंचि भाग्याचें लक्षण । लक्षणेवीण अवलक्षण । सहजचि जालें ॥ १७ ॥

म्हणून उत्तम गुण (आंगी) असणें हेंच भाग्याचें लक्षण होय,हें लक्षण नसेल तर तें अवलक्षणच आहें हें उघड होय.तात्पर्य उत्तम गुण (आंगी) असणें हेंच भाग्यलक्षण व गुणहीनता हें करंटलक्षण समजावें)

जनामधें तो जाणता । त्यास आहे मान्यता । कोणी येक विद्या असतां । महत्व पावे ॥ १८ ॥

जगांत जो जाणता असेल,काही एक विद्या शिकलेला असेल त्यालाच मान्यता व मान प्राप्त होईल (जाणत्याला मान्यता आहें काहीतरी गुण पाहिजें म्हणजे महत्व येते.)

प्रपंच अथवा परमार्थ । जाणता तोचि समर्थ । नेणता जाणिजे वेर्थ । निःकारण ॥ १९ ॥

प्रपंच म्हणा किंवा परमार्थ म्हणा,ह्या दोघांतही जाणता असतो तोच समर्थ ( पटाईत वा भाग्यशाली) होतो,नेणता अगदी व्यर्थ समजावा (प्रपंचात काय किंवा परमार्थात काय,जाणत्याचें सामर्थ्य चालतें)

नेणतां विंचु सर्प डसे । नेणतां जीवघात असे । नेणतां कार्य नासे । कोणी येक ॥ २० ॥

(न जाणल्यानेंच) नेणता-गैर वागणुकीनें-विंचू,साप डसतात,अपंघात किंवा कार्यनाश होतो.

नेणतां प्राणी सिंतरे । नेणपणें तऱ्हे भरे । नेणपणे ठके विसरे । पदार्थ कांहीं ॥ २१ ॥

( सिंतरे - भ्रमात )

नेणतेंपणानें प्राणी फसतों (सिंतरें) त-हेवाईक होतों आणि कित्येक पदार्थ गमावतों (विसराळू होतों)

नेणतां वैरी जिंकिती । नेणतां अपाईं पडती । नेण्तां संव्हारती घडती । जीवनास ॥ २२ ॥

नेणतेपणामुळे शत्रु पराभव करतात,संकटे ओढवतात,फडशा उडतो व जीवनाश होतो.

आपुले स्वहित न कळे जना । तेणें भोगिती यातना । ज्ञान नेणतां अज्ञाना । अधोगती ॥ २३ ॥

आपलें स्वतःचे कल्याण कशांत आहे हें लोकांस कळत नाही,म्हणून ते यातना भोगतात,ज्ञान न झाल्यामुळे अज्ञानी जीवांना अधोगति प्राप्त होतें,

मायाब्रह्म जीशिव । सारासार भावाभाव । जाटिल्यासाठीं होतें वाव । जन्ममरण ॥ २४ ॥

( जाटिल्यासाठीं - शास्त्रशुद्ध सूक्ष्म ज्ञानाने )

माया,ब्रह्म,जीव, शिव,सार,असार,भाव,अभाव हें जाणले म्हणजें जन्ममरण नाहीसे होते.

कोण कर्ता निश्चयेंसीं । बद्ध मोक्ष तो कोणासी । ऐसें जाणतां प्राणीयासी । सुटिकां घडे ॥ २५ ॥

खरोखर कर्ता कोण आहें,बंध किंवा मोक्ष होतो तो कोणास होतो,हे जाणले म्हणजें प्राण्याची जन्ममृत्यूपासून सुटका होतें.

जाणिजे देव निर्गुण । जाणिजे मी तो कोण । जाणिजे अनन्यलक्षण । म्हणिजे मुक्त ॥ २६ ॥

निर्गुण देव कसा आहे व त्याला जाणणारा मी कोण आहे,देवभक्तांचा (ह्या उभयतांतील) अनन्यपणा कसा असतो,हे सर्व जाणले म्हणजें साधक मुक्त होतो.

जितुकें जाणोन सांडिलें । तितुकें दृश्य वोलांडिलें । जाणत्यास जाणतां तुटलें । मूळ मीपणाचें ॥ २७ ॥

समजून जितके टाकलें तितकेंच ओलांडून साधक पलिकडे जातो,सर्वांना जाणणारा तो आत्मा त्यास जाणलें की मीपणाचे मूळ तुटून जातें.(जितके जाणून सोडले तितक्या दृश्याच्या बंधातून हा सुटतों व जाणत्यास जाणलें म्हणजें अहंकार निःशेष गळतो)

न जाणतां कोटीवरी । साधनें केलीं परोपरीं । तरी मोक्षास अधिकारी । होणार नाहीं ॥ २८ ॥

ज्ञान जाणतां अनेक प्रकारची कोट्यवधि साधनें केली तरी तो मोक्षाला अधिकारी होणार नाही (कोट्यावधि साधनें केली आणि जाणत्यास जाणले नाही तर मोक्षाधिकार प्राप्त होत नाही.)

मायाब्रह्म वोळखावें । आपणास आपण जाणावें । इतुक्यासाठीं स्वभावें । चुके जन्म ॥ २९ ॥

( इतुक्यासाठीं - एवढ्या ज्ञानामुळे )

माया,ब्रह्म ह्यांची ओळख करुन घ्यावी आपण कोण हे समजून घ्यावें,एवढे जाणलें की जन्ममृत्यूचे फेरे सहजच चुकतात.

जाणतां समर्थाचें अंतर । प्रसंगें वर्ते तदनंतर । भाग्य वैभव अपार । तेणेचि पावे ॥ ३० ॥

थोर लोकांचे-समर्थांचे-अंतःकरण जाणून पुढें त्या प्रसंगानुसार त्या धोरणानेंच जो वागतो त्या योगानेंच त्याला अपरिमित भाग्यसंपत्ति प्राप्त होतें.

म्हणौन जाणणें नव्हे सामान्य । जाणतां होईजे सर्वमान्य । कांहींच नेणतां अमान्य ।सर्वत्र करिती ॥३१॥

म्हणून जाणणे (ज्ञान) हें सामान्य समजू नयें,ज्ञान झाल्यास सर्वमान्य होतो,काहीच कळत नसलें म्हणजें सगळीकडें अपमान करतात.

पदार्थ देखोन भूत भावी । नेणतें झडपोन प्राण ठेवी । मिथ्या आहे उठाठेवी । जाणते जाणती ॥ ३२ ॥

नेणता मनुष्य एखादा पदार्थ पाहून भूत आले व त्यानें आपणास झडपले असे समजतो आणि त्या भूताचा आंगात संचार होऊन प्राणास मुकतो. (अशी नेणत्याची उदाहरणें थोडी नाहीत) पण ही भुताची उठाठेव मिथ्या आहे हें जाणत्यास समजतें.

जाणत्यास कळे वर्म । नेणत्याचें खोटें कर्म । सकळ कांहीं धर्माधर्म । जाणतां कळे ॥ ३३ ॥

कोणत्याही गोष्टींतले रहस्य अथवा धर्म कोणता,अधर्म कोणता हें सर्व काही जाणणा-याला कळतें,नेणत्याचे कर्मच मुळी खोटे असतें.

नेणत्यास येमयातना । जाणत्यास कांहींच लागेना । सकळ जाणोन विवंचना । करी तो मुक्त ॥ ३४ ॥

नेणत्याला यमयातना भोगाव्या लागतात,नेणत्याच्या मागें यमयातनेंपर्यंतची सर्व दु:खे लागतात जाणत्याच्या पाठीमागें काही नसतें (जाणता हर प्रयत्नाने सुटतो) सर्व काही जाणून जो विचार करतो तो मुक्त होय.

नेणतां कांहीं राजकारण । अपमान करून घेती प्राण । नेणतां कठीण वर्तमान । समस्तांस होये ॥ ३५ ॥

राजकारण कळलें नाही तर शत्रु अपमान करुन प्राण घेतात,नेणतेपणामुळेंच सर्वांवर कठीण प्रसंग ओढवतो (राजकारण न जाणता केले तर प्राणास मुकावें लागतें,कठिण प्रसंग येतात.)

म्हणोनियां नेणणें खोटें । नेणते प्राणी करंटे । जाणतां विवरतां तुटे । जन्ममरण ॥ ३६ ॥

म्हणून नेणणें म्हणजें अज्ञान हें खोटे आहें,नेणतें प्राणी करंटे होतात,ज्ञान समजून घेऊन त्यांचे विवरण करीत राहिल्यास जन्ममरण नाहींसे होतें.

म्हणोन अलक्ष करूं नये । जाणणें हाचि उपाये । जाणतां सापडें सोये । परलोकाची ॥ ३७ ॥

( अलक्ष - दुर्लक्ष , सोये - युक्ती )

म्हणून ज्ञानाकडे दुर्लक्ष करु नयें,जाणणें हाच उपाय,ज्ञान झाल्यास परलोकाचा मार्ग सापडतो.(म्हणून जाणतेपण धरावें ,जाणता प्रपंच,राजकारण,परमार्थ सर्व काही साध्य होते.)

जाणणें सकळांस प्रमाण । मूर्खास वाटे अप्रमाण । परंतु अलिप्तपणाची खूण । जाणतां कळे ॥ ३८ ॥

जाणणे हेंच सर्वांना सत्य वाटतें,पण तें मूर्खाला मात्र खोटे वाटतें,पण अलिप्तपणाची खूण जाणत्यास कळतें (सर्व कार्य करुन अलिप्त कसे राहावें हे जाणत्यासच कळतें.)

येक जाणणें करून परतें । कोण सोडी प्राणीयातें । कोणी येक कार्य जें तें । जाटिल्याविण न कळे ॥३९॥

एक जाणणे खेरीज करुन प्राण्याला (संसारातून) कोण सोडविणार आहे ? कोणतेही कार्य जाणल्यावाचूंन होणार नाही (एक जाणणे सोडून ज्ञानावाचून कोण समर्थ आहें ?)

जाणणें म्हणिजे स्मरण । नेणणें म्हणिजे विस्मरण । दोहींमधें कोण प्रमाण । शाहाणे जाणती ॥ ४० ॥

जाणणे म्हणजें (स्वस्वरुपाचें) स्मरण होय व नेणणें (म्हणणे कोणतेंच काम जाणल्यावाचून होत नाही) (स्वस्वरुपाचें) विस्मरण होय,ह्या दोहोंमध्ये कोणते खरे आहें हे जाणत्यांनाच कळतें,

जाणते लोक ते शाहाणे । नेणते वेडे दैन्यवाणे । विज्ञान तेहि जाणपणें । कळो आलें ॥ ४१ ॥

जाणतें लोक शहाणे असतात आणि नेणतें लोक वेडे व दैन्यवाणें असतात,विज्ञान म्हणजे अनुभवजन्य ज्ञान हे जाणल्यानेंच कळून येते.

जेथें जाणपण खुंटलें । तेथें बोलणें हि तुटलें । हेतुरहित जालें । समाधान ॥४२॥

जेथें जाणपण (मला कळतें अशी वृत्ति) खुंटते तेथे बोलणेही संपते व कल्पनारहित समाधान होतें.

श्रोतें म्हणती हें प्रमाण । जालें परम समाधान । परी पिंडब्रह्मांड ऐक्यलक्षण । मज निरोपावें ॥ ४३ ॥

ह्यावर श्रोते म्हणाले,आपण सांगितलेली गोष्ट खरी आहे,ती ऐकून फार समाधान झालें,पण पिंड व ब्रह्मांड ह्यांचे ऐक्य कसें असतें,हे आम्हास सांगावें.

ब्रह्मांडीं तेंचि पिंडीं असे । बहुत बोलती ऐसें । परंतु याचा प्रत्यय विलसे । ऐसें केलें पाहिजे ॥ ४४ ॥

पुष्कळ लोक असें सांगतात,की जें ब्रह्मांडात आहे तें पिंडात आहे,पण ह्याचा अनुभव येईल असे केले पाहिजें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे जाणपणनिरूपणनाम समास चवथा ॥**

**समास पांचवा : अनुमाननिर्शन ॥ श्रीराम ॥**

पिंडासारिखी ब्रह्मांडरचना । नये आमुच्या अनुमाना । प्रचित पाहातां नाना । मतें भांबावती ॥ १ ॥

पिंडाच्या रचनेसारखीच ब्रह्मांडाची रचना आहे (असे म्हणतात) पण हे आम्हाला पटत नाही अनुभव पहायला गेले की मतामतांचा गोंधळ उडतो.

जें पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं । ऐसी बोलावयाचि प्रौढी । हें वचन घडिनें घडी । तत्वज्ञ बोलती ॥ २ ॥

जे पिंडी ते ब्रह्मांडी अशी (सामान्य लोकांची) बोलण्याची रुढी आहे तत्वज्ञ लोकसुध्दा हें वचन सांगत असतात.

पिंड ब्रह्मांड येक राहाटी । ऐसी लोकांची लोकधाटी । परी प्रत्ययाचे परीपाटीं । तगों न सके ॥ ३ ॥

पिंड व ब्रह्मांड ह्यांतील व्यापार सारखेंच आहेत अशी लोकांची बोलण्याची पध्दत आहे,पण अनुभवाच्या कसोटीला हें म्हणणे टिकत नाही.

स्थूळ सूक्ष्म कारण माहाकारण । हे च्यारी पिंडींचे देह जाण । विराट हिरण्य अव्याकृत मूळप्रकृती हे खूण । ब्रह्मांडींची ॥ ४ ॥

स्थूळ,सुक्ष्म,कारण व महाकारण हे जसे पिंडातलें चार देह तसें विराट,हिरण्यगर्भ,अव्याकृत व मूळमाया (मूळप्रकृति) हें ब्रह्मांडातील चार देह.

हे शास्त्राधाटी जाणावी । परी प्रचित कैसी आणावी । प्रचित पाहातां गथागोवी । होत आहे ॥ ५ ॥

हें म्हणणे शास्त्रपध्दतींचे आहे,पण ह्याचा अनुभव कसा पाहावा ? अनुभव पाहिल्यास सगळा (गथागोवी) गोंधळ उडतो.

पिंडीं आहे अंतःकरण । तरी ब्रह्मांडीं विष्णु जाण । पिंडीं बोलिजेतें मन । तरी ब्रह्मांडीं चंद्रमा ॥ ६ ॥

पिंडात अंत:करण आहे तसा ब्रह्मांडात विष्णु,पिंडात मन तसा ब्रह्मांडात चंद्र आहें.

पिंडीं बुद्धी ऐसें बोलिजे ।तरी ब्रह्मांडीं ब्रह्मा ऐसें जाणिजे।पिंडीं चित्त ब्रह्मांडीं वोळखिजे।नारायेणु ॥ ७ ॥

पिंडात बुध्दि तसा ब्रह्मांडात ब्रह्मदेव,पिंडात चित्त तसा ब्रह्मांडात नारायण.

पिंडीं बोलिजे अहंकार । ब्रह्मांडीं रुद्र हा निर्धार । ऐसा बोलिला विचार । शास्त्रांतरीं ॥ ८ ॥

(ब्रह्मांडीं रुद्र - जसे पिंड - अंतःकरण - बुद्धी- चित्त - अहंकार  तसेच ब्रह्मांड - विष्णु - चंद्रमा - ब्रह्मदेव - नारायण - रुद्र )

पिंडात अहंकार तसा ब्रह्मांडात रुद्र,अशा प्रकारचा निश्चित विचार शास्त्रांत सांगितला आहे.

तरी कोण विष्णूचें अंतःकर्ण । चंद्राचें कैसें मन । ब्रह्मयाचे बुद्धीलक्षण । मज निरोपावें ॥ ९ ॥

तेव्हा (ब्रह्मांडामध्यें) विष्णुचें अंत:करण कसें,चंद्राचे मन कसें आणि ब्रह्मदेवाच्या बुध्दिचे स्वरुप काय,हे मला सांगावें.

नारायणाचें कैसें चित्त । रुद्राहंकाराचा हेत । हा विचार पाहोन नेमस्त । मज निरोपावा ॥ १० ॥

नारायणाचें चित्त कसें,रुद्र हा अहंकार ही कल्पना काय आहे,ह्या सर्वांचा नीट विचार करुन मला निश्र्चयात्मक सांगावें.

प्रचितनिश्चयापुढें अनुमान । जैसें सिंहापुढें आलें स्वान । ख-यापुढें खोटें प्रमाण । होईल कैसें ॥ ११ ॥

अनुभावानें झालेल्या निश्र्चयापुढें अनुमान म्हणजे सिंहापुढे कुत्रे आल्याप्रमाणेंच होय,ख-यापुढें खोटें प्रमाण (अनुमान) कसे होईल ?

परी यास पारखी पाहिजे । पारखीनें निश्चय लाहिजे । परिक्षा नस्तां राहिजे । अनुमानसंशईं ॥ १२ ॥

पण ह्याला परिक्षक पाहिजे,परिक्षा केल्याने निश्र्चय होतो व परिक्षा न केल्यास अनुभवांत व संशयात घोटाळावें लागतें.

विष्णु चंद्र आणी ब्रह्मा । नारायेण आणी रुद्रनामा । यां पाचांची अंतःकर्णपंचकें आम्हा । स्वामी निरोपावीं ॥ १३ ॥

विष्णु,चंद्र,ब्रह्मा,नारायण व रुद्र ह्या पांचाचें ब्रह्मांडातील अंतःकरणपंचक कसें आहे हें स्वामीनीं आम्हास सांगावें,

येथें प्रचित हें प्रमाण । नलगे शास्त्राचा अनुमान । अथवा शास्त्रीं तरी पाहोन । प्रत्ययो आणावा ॥ १४ ॥

(वक्ता म्हणतो-) येथे अनुभव हें तुमचें मुख्य प्रमाण आहे,शास्त्रातले अनुमान तुम्हास नको आहे अथवा शाास्त्रांतले म्हणणें तरी तुमच्या अनुभवाला आणून दिलें पाहिजें.

प्रचितीवीण जें बोलणें । तें अवघेंचि कंटाळवाणें । तोंड पसरून जैसें सुणें । रडोन गेलें ॥ १५ ॥

अनुभवावाचून जे बोलणे ते सगळेच कुत्र्यानें (सुणें) तोंड पसरुन रडून जावें त्याप्रमाणें कंटाळवाणें होतें.

तेथें काये हो ऐकावें । आणी काये शोधून पाहावें । जेथें प्रत्यायाच्या नावें । सुन्याकार ॥ १६ ॥

जेथें अनुभवाच्या नावांनें पूज्य तेथें ऐकायचें काय व शोधून पाहायचें काय!

आवघें आंधळेचि मिळाले । तेथें डोळसाचें काय चाले । अनुभवाचे नेत्र गेले । तेथें अंधकार ॥ १७ ॥

सगळे आंधळेच मिळाल्यावर तेथें डोळसाचें काय चालणार ?अनुभवाचे डोळे गेले की सगळा अंधारच पडायचा.

नाही दुग्ध नाही पाणी । केली विष्ठेची सारणी । तेथें निवडावयाचे धनी । ते एक डोंबकावळे ॥ १८ ॥

दूध नाही,पाणी नाही,नरकाचें मिश्रण पडलें आहे,तेथे निवड करणारे काय तें डोमकावळेंच होत.

आपुले इच्हेनें बोलिलें । पिंडाऐसे ब्रह्मांड कल्पिले । परी तें प्रचितीस आलें । कोण्या प्रकारें ॥ १९ ॥

आपल्या इच्छेला वाटले तसे म्हटलें व पिंडासारखे ब्रह्मांड आहे अशी कल्पना केली,पण ते अनुभवाला कसे येईल ते पाहिले पाहीजें.

म्हणोन हा अवघाच अनुमान । अवघें कल्पनेचें रान । भलीं न घ्यावें आडरान । तश्करीं घ्यावें ॥ २० ॥

म्हणुन हा सर्व तर्क आहे,सगळें कल्पनेचे रान झाले आहे,भल्याने आडरानांत शिरु नयें,चोरांनी शिरावे (ब्रह्मादि देवांची अंतःकरण पंचके आम्हांस सांगा असे म्हणाल तर,ज्याला ह्या विषयाबद्दल जें वाटेल तें त्यानें कवित्व केले आहे.)

कल्पून निर्मिले मंत्र । देव ते कल्पनामात्र । देव नाहीं स्वतंत्र । मंत्राधेन ॥ २१ ॥

(ह्याचा मुख्य विचार असा करावयाचा आहे,की) मंत्र कल्पनेने निर्माण केलेले असून,देव कल्पनास्वरुपच आहेत,देव काही स्वतंत्र नाहीत,मंत्रांच्या आधीन आहेत (ज्या मंत्रांनी देवांची आपण प्राणप्रतिष्ठा करितो तें मंत्र व ते देव कल्पनेचेच आहेत हे न बोलता जाणावे.

येथें न बोलतां जाणावें । बोलणें विवेका आणावें । आंधळें पाउलीं वोळखावें । विचक्षणें ॥ २२ ॥

जसें आंधळा विचक्षणपणाने जणू काय पावलानेंच पाहातो,तद्वत हे वरील बोलणे काही न बोलता (मनातल्या मनांत) समजून घ्यावें,त्याचा नीट विचार करावा.

जयास जैसें भासलें । तेणें तैसें कवित्व केलें । परी हें पाहिजे निवडिलें । प्रचितीनें ॥ २३ ॥

ज्याला जसें भासलें तसें त्यानें कवित्व केलें पण त्यांतले खरेखोटें काय ह्याचा अनुभवानें निवाडा केला पाहिजें.

ब्रह्म्यानें सकळ निर्मिलें । ब्रह्म्यास कोणें निर्माण केलें । विष्णूनें विश्व पाळिलें । विष्णूस पाळिता कवणु ॥ २४ ॥

ब्रह्मदेवानें सर्व सृष्टि निर्माण केली पण ब्रह्मदेवाला कोणीं निर्माण केले ? विष्णूनें विश्र्वाचें पालन केले पण विष्णूचे पालन करणारा कोण ?

रुद्र विश्वसंव्हारकर्ता । परी कोण रुद्रास संव्हारिता । कोण काळाचा नियंता । कळला पाहिजे ॥ २५ ॥

सर्व विश्र्वाचा संहार करणारा शंकर पण त्याचा संहार करणारा कोण ?तसेंच काळाचा शास्ता कोण-हे सर्व कळले पाहिजें.

याचा कळेना विचार । तों अवघा अंधकार । म्हणोनियां सारासार । विचार करणें ॥ २६ ॥

ह्याचा विचार जोपर्यंत कळत नाही तोपर्यंत सर्व अंधार होय,म्हणून सारासारविचार करावा.

ब्रह्मांड स्वभावेंचि जालें । परंतु हें पिंडाकार कल्पिलें । कल्पिलें परी प्रत्यया आलें । नाहीं कदा ॥ २७ ॥

ब्रह्मांड सहज (आपोआप) उत्पन्न झाले पण तें पिंडाकार म्हणजें शरीराकार आहे अशी कल्पना केली,ही कल्पना झाली तरी तसा अनुभव काही आला नाही.

पाहातां ब्रह्मांडाची प्रचिती । कित्येक संशय उठती । हें कल्पनिक श्रोतीं । नेमस्त जाणावें ॥ २८ ॥

ह्या कल्पनेप्रमाणे ब्रह्मांड पाहू गेलें तरी कितीतरी संशय उत्पन्न होतात, ह्यास्तव हें वर्णन काल्पनिक आहें हें निश्र्चयेकरुन श्रोत्यांने समजावें.

पिंडासारिखी ब्रह्मांडरचना । कोण आणितो अनुमाना । ब्रह्मांडीं पदार्थ नाना । ते पिंडीं कैंचे ॥ २९ ॥

पिंडाप्रमाणेंच ब्रह्मांडाची रचना आहे ह्याचा अंदाज कोणाला करतां येईल काय ? ब्रह्मांडात अनेक पदार्थ भरले आहेत ते पिंडात कसें येतील ?

औटकोटी भुतावळी । औटकोटी तीर्थावळी । औटकोटी मंत्रावळी । पिंडीं कोठें ॥ ३० ॥

साडेतीन कोटि भूतें,तितकीच तीर्थे व तितकीच मंत्रमाळा हीं सर्व पिंडामध्यें कोठें आहेत ?

तेतीस कोटी सुरवर । अठ्यांसि सहस्त्र ऋषेश्वर । नवकोटी कात्यायेणीचा विचार । पिंडीं कोठें ॥ ३१ ॥

तेहतीस कोटि देव,अठ्यांशी सहस्त्र ऋषि,नऊ कोटि कात्यायनी पिंडात कोठे आहेत ?

च्यामुंडा छपन्न कोटी । कित्येक जीव कोट्यानुकोटी । चौर्यासी लक्ष योनींची दाटी । पिंडीं कोठें ॥ ३२ ॥

छप्पन कोटि चामुंडा, कितीतरी कोट्यानकोटि जीव,चौ-याशीं लक्ष योनींची गर्दी पिंडामध्यें कोठें आहेत ?

ब्रह्मांडीं पदार्थ निर्माण जाले । पृथकाकारें वेगळाले । तेहि तितुके निरोपिले । पाहिजेत पिंडीं ॥ ३३ ॥

ब्रह्मांडात असंख्य पदार्थ उत्पन्न झाले आहेत व त्यांचे आकारही वेगवेगळे आहेत,ते तितके सर्वच पिंडामध्ये (निरोपिले) दाखवितां आले पाहिजेत.

जितुक्या औषधी तितुकीं फळे । नाना प्रकारीं रसाळें । नाना बीजें धान्यें सकळें । पिंडीं निरोपावीं ॥ ३४ ॥

जितक्या वनस्पति तितकींच निरनिराळ्या प्रकारचीं रसाळ फळें,तशीच अनेक बीजे,ध्यान्ये हीं सर्व पिंडात दाखविंता आली पाहिजेत.

हें सांगतां पुरवेना । तरी उगेंचि बोलावेना । बोलिलें न येतां अनुमाना । लाजिरवाणें ॥ ३५ ॥

हें सांगायला लागलें तर पुरें होणार नाहीं,म्हणून उगीच वायफळ बोलू नयें,कारण बोललेले तर्कानें सिध्द होणार नाही,तर ती लाजिरवाणी गोष्ट होय.

तरी हें निरोपिलें नवचे । फुकट बोलतां काय वेचे । याकारणें अनुमानाचें । कार्य नाहीं ॥ ३६ ॥

तात्पर्य,हें सांगता येणार नाही (ब्रह्मांडातलें अनेक पदार्थ पिंडात आहेत),फुकट बोलायला काय जातें ? ह्या करितां येथे अनुमानाचें काम नाही.

पांच भूतें ते ब्रह्मांडीं । आणि पांचचि वर्तती पिंडीं । याची पाहावी रोकडी । प्रचीत आतां ॥ ३७ ॥

जी पांच भूतें ब्रह्मांडांत आहेत तींच पांच पिंडामध्येंही आहेत,ह्याचा आतां रोकडा अनुभव पाहावा.

पांचा भूतांचे ब्रह्मांड । आणी पंचभूतिक हें पिंड । यावेगळें तें उदंड । अनुमानज्ञान ॥ ३८ ॥

पंचभूतांचें हें एक ब्रह्मांड आहें आणि पिंडही पंचभूतात्मक आहें,ह्याशिवाय बाकीचा सर्व अंदाज होय.(पिंडब्रह्मांडाच्या देहाचें स्थानमान,रचना व तदंर्तगत पदार्थ,देवता ई.जें काहीं बोलणें होते ते सारे अनुमानाचें आहें परमार्थास त्याचे महत्व नाहीं)

जितुकें अनुमानाचें बोलणें । तितुकें वमनप्राये त्यागणें । निश्चयात्मक तेंचि बोलणें । प्रत्ययाचें ॥ ३९ ॥

अनुमानाचें जेवढे बोलणें असेल  त्याचा वमनाप्रमाणे (ओकारीप्रमाणे) त्याग करावा आणि अनुभवाचें जें बोलणें असेल तेंच निश्र्चयात्मक म्हणजें खरे समजावें.

जेंचि पिंडीं तेंचि ब्रह्मांडीं । प्रचित नाहीं कीं रोकडी । पंचभूतांची तांतडी । दोहीकडे ॥ ४० ॥

पंचभूतांची गर्दी (समुदाय) दोन्हीकडें असल्यामुळें जें पिंडात तेंच ब्रह्मांडात ह्याचा रोकडा अनुभव नाही का येत ?

म्हणोनि देहींचें थानमान । हा तों अवघाचि अनुमान । आतां येक समाधान । मुख्य तें कैसें ॥ ४१ ॥

( थानमान - रचना )

म्हणून देहांतील स्थानमान (रचना) तेंच ब्रह्मांडात आहे असें म्हणणें हें सर्वच अनुमान होय,आतां मुख्य समाधान कसें ते ऐका,(ब्रह्मांड तसाच पिंड पंचभूतात्मक आहे व दोन्ही नाशवंत आहेत हे जाणून समाधान पाहावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अनुमाननिर्शननाम समास पांचवा**

**समास सहावा : गुणरूपनिरूपण ॥ श्रीराम ॥**

आकाश जैसें निराकार । तैसा ब्रह्माचा विचार । तेथें वायोचा विकार । तैसी मूळमाया ॥ १ ॥

आकाश जसें निराकार आहे तशीच ब्रह्माची गोष्ट आहे,आकाशांत जसा वायूचा विकार तशीच ब्रह्मामध्ये मूळमाया उत्पन्न होते.

हें दासबोधीं असे बोलिलें । ज्ञानदशकीं प्रांजळ केलें । मूळमायेंत दाखविलें । पंचभूतिक ॥ २ ॥

हे दासबोधात सांगितले आहे व ज्ञानदशकांत स्पष्ट केले आहें,त्या ठिकाणी मूळमायेंत पंचभूतें आहेत असे सांगितलें आहें,(निराकार आकाशात जसा वायूचा विकार तशी निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया हे मागें स्पष्ट सांगितलें असून मूळमायेतच पांचभौतिक दाखविलें आहें.)

तेथें जाणीव तो सत्वगुण । मध्य तो रजोगुण । नेणीव तमोगुण । जाणिजे श्रोतीं ॥ ३ ॥

आतां मूळमायेतच जाणीव हा सत्वगुण,जाणीव नेणीव मिळून रजोगुण व नेणीव हा तमोगुण,हे श्रोत्यांनी लक्षात ठेवावे.

म्हणाल तेथें कैंची जाणीव । तरी ऐका याचा अभिप्राव ।पिंडीं माहाकारण देहीं सर्व ।साक्षिणी अवस्था ॥४॥

( सर्वसाक्षिणी - तुर्यावस्था )

त्या ठिकाणी जाणीव कोठची आहे असे म्हणाल तर त्यांचा संबंध (अभिप्राय) ऐका.पिंडातील महाकारण देहाची सर्वसाक्षिणी तूर्या अवस्था आहे.

तैसी मूळप्रकृती ब्रह्मांडींचें । देह माहाकारण साचें । म्हणोन तेथेंजाणीवेचें । अधिष्ठान आलें ॥ ५ ॥

( तेथेंजाणीवेचें अधिष्ठान - पिंडातील ४ था देह महाकारण त्यातील सर्वसाक्षीणी अवस्था व ब्रह्मांडातील ४ था देह मूळप्रकृती त्यातील जाणीव )

त्याप्रमाणें मूळप्रकृति म्हणजेच ब्रह्मांडाचा महाकारण देह होय,म्हणून त्या ठिकाणी जाणिवेचें अधिष्ठान आहें.

असो मूळमायेभीतरीं । गुप्त त्रिगुण वास करी । पष्ट होती संधी चतुरीं । जाणावी गुणक्षोभिणी ॥ ६ ॥

असो.मूळमायेमध्ये तीन गुण गुप्तपणें (लीन होऊन) असतात,तें व्यक्त होण्याची जी संधी ती गुणक्षोभिणी किंवा गुणमाया होय हें सुज्ञांनी जाणावें.

जैस तृणाचा पोटराकळा । पुढें उकलोन होये मोकळा । तैसी मूळमाया अवलीळा । गुण प्रसवली ॥ ७ ॥

( अवलीळा - सहज )

ज्याप्रमाणें गवताचें पोटरीला आलेले कणीस पुढें उमलून बाहेर पडतें त्याप्रमाणें मूळमाया ही सहजच गुणांना प्रसवती झाली. (तृणाचा पोटरा आलेला कळा म्ह.उमलण्यापूर्वीचे कणीस,पोटरा-गाभा,गर्भ,पोटरा कळा-गर्भात असलेले कणीस.पीक पोट-यात आलें ही शेतक-यांची भाषा आहें कणीस जसें उकलून बाहेर पडतें तशी मूळ माया उकलून-प्रकटतेस येऊन-गुण प्रकटतें).

मूळमाया वायोस्वरूप । ऐक गुणक्षोभिणीचें रूप । गुणविकार होतांचि अल्प । गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ८ ॥

मूळमाया ही वायुस्वरुप आहे आतां गुणक्षोभिणीचें रुप ऐक,थोडाबहुत गुणांचा विकार झाला कीं त्याला गुणमाया-गुणक्षोभिणी म्हणतात (वायुस्वरुप मूळमायेंचे अधिक व्यक्त स्वरुप म्हणजें गुणमाया होय)

पुढें जाणीव मध्यस्त नेणीव । मिश्रित चालिला स्वभाव । तेथें मातृकास ठाव । शब्द जाला ॥ ९ ॥

( शब्द - मातृकास, शब्द हा आकाशाचा गुण त्यापासून आकाश - वायू - अग्नी - पाणी - पृथ्वी )

गुणमायेंपासून पुढें जाणीव (सत्वगुण),मध्यस्थ (जाणीव नेणीव म्ह. रजोगुण) व नेणीव (तमोगुण) हें उत्पन्न होतात ह्या तिघांच्या मिश्रणानें सृष्टीचा एकंदर स्वभाव बनला आहें.त्या गुणांच्या ठिकाणी मातृका म्हणजें अक्षर ह्यांचें मूळस्थान असा शब्द म्हणजें ध्वनि उत्पन्न झाला.(ह्या गुणांच्या ठायी अकार,उकार,मकार अशा अ-उ-म (व अर्धमात्रा) म्ह.ॐ अशा मात्रांचा शब्दध्वनि उत्पन्न झाला.)

तो शब्दगुण आकाशींचा । ऐसा अभिप्राव येथीचा । शब्देंचि वेदशास्त्रांचा । आकार जाला ॥ १० ॥

आणि शब्द हा आकाशाचा गुण आहें (तेथे ॐ असा मात्रामय शब्द निर्माण झाला)(अर्थात तेथें आकाश उत्पन्न झालें व त्यापासून बाकीची भूतें झाली,असा ह्यातील आशय आहे),शब्दामुळेंचे वेदशास्त्रे उत्पन्न झाली (अर्थात आकाशापासून वायु,वायूपासुन अग्नी,अग्नीपासून पाणी व पाण्यापासून पृथ्वी अशा क्रमानें पंचभूतें निर्माण झाली.)

पंचभूतें त्रिगुणाकार । अवघा वायोचा विकार । जाणीवनेणीवेचा विचार । वायोचि करितां ॥ ११ ॥

पंचभूतें व तीन गुण मिळून अष्टधा प्रकृत्ति हा सगळा वायूचा विकार होय.जाणीव व नेणीव ह्यांचा प्रकारसुध्दा वायूमुळें (वायोचिकरितां) होतो.

वायो नस्तां कैंची जाणीव । जाणीव नस्तां कैंची नेणीव । जाणीवनेणीवेस ठाव । वायोगुणें ॥ १२ ॥

वायु नसेल तर जाणीव कोठची ? व जाणीव नसेल तर नेणीव तरी कोठची ?म्हणून वायूमुळेंच जाणीव-नेणीवेला अस्तित्व आहे.(वायूच्या चळणामुळेंच जाणीव-सत्वगुण व जाणीव नाही म्हणून नेणीव-तमोगुण व उभयसंगतीनें रजोगुण असें तीनही गुण वायूच्या चळणामुळेंच दिसून येतात.)

जेथें मुळीच नाही चळण । तेथें कैंचें जाणीवलक्षण । म्हणोनि वायोचा गुण । नेमस्त जाणावा ॥ १३ ॥

जेथें मुळी चळण (चलन-चलणें) नाहीं तेथें जाणीवेचें स्वरुप (सत्वगुण) कोठून दिसेल ? म्हणून जाणीव हा वायूचा गुण होय,हें निश्र्चयेंकरुन समजावें.

येकापासून येक जालें । हें येक उगेंचि दिसोन आलें । स्वरूप मुळीच भासलें । त्रिगुणभूतांचें ॥ १४ ॥

त्रिगुण व पंचभूते ही एकापासून एक उत्पन्न झाली असें उगींच (वरवर पाहांतां) दिसून येतें (पण वास्तविक) वायुरुपी मूळमायेंचे स्वरुप मुळातच तीन गुण व पांच महाभूतें ह्या आठांचे बनलें आहें (आकाशापासून वायु.इ.पंचभूतांचा क्रम दिसून येतो.पण तीन गुण व पंचभुतें मिळून जी अष्टधा प्रकृति तिचे स्वरुप मूळीच म्हणजें वायुरुप मूळमायेच्याच ठिकाणी आहें).

ऐसा हा मुळींचा कर्दमु । पुढें पष्टतेचा अनुक्रमु । सांगतां येकापासून येक उगमु । हें हि खरें ॥ १५ ॥

मुळांत हें असें मिश्रण आहें,पुढें वर सांगितलेल्या क्रमानें तीं तत्वे स्पष्ट होत गेली,म्हणून एकापासून एक झालें हें म्हणणेही खरेंच आहे (असा त्रिगुण-पंचभूतांचा कर्दम मूळ मायेंतच आहें, व जें बीजांत आहें तेंच वृक्षांत उमटतें हा न्याय प्रसिध्दच आहें.)

वायोच कर्दम बोलिला । तयापासून अग्नि जाला । तोहि पाहातां देखिला । कर्दमुचि ॥ १६ ॥

वायुचा कर्दम पूर्वी सांगितला,त्याच्यापासून अग्नि उत्पन्न झाला,त्याचा विचार केला तर तोही कर्दमरुपच आहें.

अग्निपासून जालें आप । तेंहि कर्दमस्वरूप । आपापासून पृथ्वीचें रूप । तेंहि कर्दम रूपी ॥ १७ ॥

अग्नीपासून आप (पाणी) झालें,तेही कर्दमरुपच आहें व त्यापासून पृथ्वी झाली तीही कर्दमरुपच आहें.(पंचभूतांचा कर्दम मूळमायेंतच असल्यामुळें पुढें जी आकाश,वायु,अग्नि,आप व पृथ्वी हीं भूतें झाली त्या प्रत्येक भूतांत इतर चार भूतांचा अंतर्भाव असल्यामुळें पांचही भूतें कर्दमरुप-मिश्रित आहेत हें ओघानेंच आलें.)

येथें आशंका उठिली । भूतांस जाणीव कोठें देखिली । तरी भूतांत जाणीव हे ऐकिली ।नाहीं वार्ता ॥ १८ ॥

ह्या ठिकाणी आशंका उत्पन्न झाली कीं पंचभूतांमध्यें जाणीव कोठें दृष्टीस पडली ? भूतांत जाणीव आहें ही गोष्टच ऐकण्यांत नाहीं.

जाणीव म्हणिजे जाणतें चळण । तेंचि वायोचें लक्षण । वायोआंगीं सकळ गुण । मागां निरोपिलें ॥ १९ ॥

जाणीव म्हणजे जाणतेपणाचें चळण तेंच वायूचें स्वरुप होय,वायूच्या अंगचे सगळे गुण पूर्वी सांगितलें आहेत.

म्हणोन जाणीवनेणीवमिश्रीत । अवघें चालिलें पंचभूत । म्हणोनियां भूतांत । जाणीव असे ॥ २० ॥

म्हणून सत्व,रज,तम मिळूनच सर्व पंचभूतांचा व्यवहार चालला आहें,ह्याच कारणासांठी पंचभूतांमध्यें जाणीव आहें.

कोठें दिसे कोठें न दिसे । परी तें भूतीं व्यापून असे । तिक्षण बुद्धी करितां भासे । स्थूळ सुक्ष्म ॥ २१ ॥

ती जाणीव कोठें दिसतें व कोठें दिसत नाही (कोठे सूक्ष्म आहें व कोठें स्थूल आहें) पण ती सर्व भूतात व्यापून आहें (ती नाही असें म्हणतां येत नाहीं),खोल विचार करुन पाहिलें तर ती सूक्ष्म अगर स्थूलरुपानें समजून येतें.

पंचभूतें आकारली । भूतीं भूतें कालवलीं । तरी पाहातं भासलीं । येक स्थूळ येक सूक्ष्मे ॥ २२ ॥

भूतांमध्ये भुते मिसळून भूतें आकाराली आली.तथापि विचार केला असता एक स्थूळ व एक सूक्ष्म अशी भासतात.

निरोधवायो न भासे । तैसी जाणीव न दिसे । न दिसे परी ते असे । भूतरूपें ॥ २३ ॥

वायूला विरोध असला म्हणजें तो भासत नाही.त्याप्रमाणें जाणीव दिसत नाहीं ती दिसली नाही तरी भूतांशी मिसळून असतें.

काष्ठीं अग्नी दिसेना । निरोधवायो भासेना । जाणीव तैसी लक्षेना । येकायेकीं ॥ २४ ॥

काष्ठांतला अग्नि दिसत नाही स्तब्ध असलेला वायु भासत नाही (म्हणून तो नाही म्हणतां येत नाही), त्याचप्रमाणें जाणीव (भूतांतील) एकाएकीं लक्षांत येत नाही (पंचभूतात जाणीव म्हणजें सत्वगुण -अर्थात पुढचें रजोगुण व तमोगुणही-भासत नाही असें म्हणता येत नाही.)

भूतें वेगळालीं दिसती । पाहातां येकचि भासती । बहुत धूर्तपणें प्रचिती । वोळखावी ॥ २५ ॥

भूतें निरनिराळी दिसतात,विचार करायला गेलें की तीं एकच आहेत अशी भासतात,ह्यास्तव ह्याचा अनुभव मोठया सावधपणें घ्यावा.(त्याप्रमाणेंच प्रत्येक भूतांत इतर भूतांचें अंश आहेत,त्याप्रमाणें त्रिगुणही आहेंत,भूतें भिन्न भिन्न दिसतात पण विचारानें पाहाता तीं एकच आहेंत)

ब्रह्मापासुन मूळमाया । मूळमायेपासून गुणमाया । गुणमायेपासून तया । गुणास जन्म ॥ २६ ॥

ब्रह्मापासून मूळमाया,मूळमायेंपासून गुणमाया व गुणमायेंपासून (त्रि)गुण उत्पन्न झालें.

गुणापासूनियां भूतें । पावली पष्ट दशेतें । ऐसीयांचीं रूपें समस्तें । निरोपिलीं ॥ २७ ॥

गुणांपासून (पंच) भूतें उत्पन्न होत चालली,त्या सर्वांची रुपें आपण सांगितली (अर्थात आकाश हे ही गुणांपासून झालें असाच आपला अभिप्राय दिसतों)

आकाश गुणापासून जालें । हें कदापी नाही घडलें । शब्दगुणास कल्पिलें । आकाश वायां ॥ २८ ॥

पण आकाश गुणांपासून झालें हें कदापि घडलेंच नाही (पण आकाश गुणांपासुन झालें हें म्हणणें योग्य वाटत नाही),कारण आकाशाचा गुण जो शब्द तो आकाशापासून झााल्याचें पूर्वी १०व्या ओवीत सांगितलें आहें,अर्थात आकाश गुणांपासून झालें हें म्हणणें अगदी व्यर्थ होय.(शब्दगुणमाकाशम म्हणजें शब्द हा आकाशाचा गुण आहें असें जें शास्त्र सांगतें तें काय खाटे आहें ?

येक सांगतां येकचि भावी । उगीच करी गथागोवी । तया वेड्याची उगवी । कोणें करावी ॥ २९ ॥

अशी श्रोत्याने शंका घेतली त्यावर समर्थ म्हणतात की,एक सांगायला गेले तर दुसरेंच समजतों आणि उगीच गोंधळ घालून बसतों,असल्या वेडयाची समजूत (उगवी) कोणी करावी ? (अशा श्रोत्यांची समजूत पाडणें कठिण आहें)

सिकविल्यां हि कळेना । उमजविल्यां हि उमजेना । दृष्टांतेंहि तर्केना । मंदरूप ॥ ३० ॥

शिकविलें तर कळत नाही,समजून दिलें तर समजूत पटत नाही,द्दष्टांतानें दाखविलें तरी तर्क चालत नाही,असा हा बुध्दिमंद श्रोता! (अशा मंद श्रोत्याला सांगावें तरी कसें ?)

भूतांहून भूत थोर । हा हि दाविला विचार । परी भूतांवडिल स्वतंत्र । कोण आहे ॥ ३१ ॥

एका भूतांपेक्षा दुसरें भूत मोठें आहें हाही विचार पूर्वी सांगितला,पण त्या भूतांपेक्षा दुसरें मोठें व स्वतंत्र असें कोण आहें ?

जेथें मूळमाया पंचभूतिक । तेथें काये राहिला विवेक । मूळमायेपरतें येक । निर्गुणब्रह्म ॥ ३२ ॥

जेथे मूळमायाच पंचभुतात्मक अर्थात मिथ्या आहें,तेथें भूतांचा विचार तो काय राहिला ?मूळ मायेच्या पलिकडें निर्गुण ब्रह्म तेंवढें आहें.

ब्रह्मीं मूळमाया जाली । तिची लीळा परीक्षिली । तंव ने निखळ वोतली । भूतेंत्रिगुणांची ॥ ३३ ॥

( निखळ वोतली भूतेंत्रिगुणांची - माया हि पंचभूते व त्रिगुण यांची ओतलेली मूस आहे )

ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया उत्पन्न झाली,तिच्या स्वरुपाची किंवा विस्ताराची कल्पना केली तर ती तीन गुण व पांच भूतें अशी आठांची निव्वळ ओतलेली मूस आहें असेंच दिसून येतें.

भूतें विकारवंत चत्वार । आकाश पाहातां निर्विकार । आकाश भूत हा विचार । उपाधीकरितां ॥ ३४ ॥

चार (चत्वार) भूतें विकारयुक्त (विकार पावणारी ) आहेत.आकाश मात्र निर्वीकार आहें,आकाश भूत आहें हें उपाधीमुळें म्हणावयांचें (आकाश हें वास्तविक भूत आहें असें नव्हें)

पिंडीं व्यापक म्हणोन जीव । ब्रह्मांडीं व्यापक म्हणोन शिव । तैसाच हाहि अभिप्राव । आकाशाचा ॥३५॥

(ब्रह्माचा अंश) पिंडाला व्यापून असतो म्हणून जीव व ब्रह्मांडाला व्यापून असतो म्हणून शिव असें म्हणावयाचें,त्याचप्रमाणें हा आकाशाचा विस्तार आहे (पिंडाच्या उपाधीसाठी जीव व ब्रह्मांडाच्या उपाधीसाठी शिव असे सांगितले म्हणून जीव व शिव सत्यार्थाने पाहायला जाणें वेडेपणाचें आहें,तसेंच उपाधीस्तव आकाश भूतांत धरिले म्हणून इतर चार भूतांप्रमाणें तें हि गुणांपासुन झाले असें समजणें गैर आहे)

उपाधीमधे सापडलें । सूक्ष्म पाहातां भासलें । इतुक्यासाठीं आकाश जालें । भूतरूप ॥ ३६ ॥

उपाधीमध्यें सांपडलें व सूक्ष्मपणानें विचार करतां भासलें एवढयाचसाठी आकाशाची भूतांत गणना करावयाची (उपाधीमुळें भासरुप असल्यामुळेंच आकाश भूतांत गणलें जातें)

आकाश अवकाश तो भकास । परब्रह्म तें निराभास । उपाधीं नस्ता जें आकाश । तेंचि ब्रह्म ॥ ३७ ॥

आकाश-अवकाश-भकास- भासरुप म्ह.शून्य पोकळी किंवा काहीं नाही (असें त्याचें वर्णन करतात) आणि परब्रह्म हें निराभास आहें उपाधी आहें म्हणून आकाशाला भूत म्हणावयांचें,नाही तर उपाधीरहित जें आकाश तेंच परब्रह्म होय.

जाणीव नेणीव मध्यमान । हेंचि गुणाचें प्रमाण । येथें निरोपिलें त्रिगुण । रूपेंसहित ॥ ३८ ॥

( मध्यमान - मिश्रण )

जाणीव (सत्व),नेणीव (तम),मध्यमान (रज) (जाणीव व नेणीव ह्यांचें मिश्रण) हेंच गुणांचे परिमाण (माप) होय,ह्या ठिकाणी तिन्ही गुण त्यांच्या स्वरुपासह सांगितलें (ह्या गुणांत गुणरुपेंही आली असें जाणावें)

प्रकृती पावली विस्तारातें । पुढे येकाचें येकचि होतें । विकारवंतचि तयातें । नेम कैंचा ॥ ३९ ॥

प्रकृतीचा विस्तार झाल्यानंतर पुढें एका स्वरुपाचें (भलतें) दुसरें (अष्टधा) स्वरुप बनतें,विकार पावणारेच तें,त्याचा नियम कसा सांगावा ?(तिच्यांत एकापासून अनेक झालें त्याचा ताळमेळ कसा ठेवायचा ? )

काळें पांढरें मेळवितां । पारवें होतें तत्वता । काळें पिवळें मेळवितां । हिरवें होये ॥ ४० ॥

काळें पांढरें एकत्र केले तर पारवें होते व काळे पिवळे मिळविल्यास हिरवे होतें (काळ्यात पांढरा रंग मिळवला की पारवा होतो व पिवळा मिळविला की हिरवा होतो असे अनेक रंग होतात)

ऐसें रंग नानापरी । मेळवितां पालट धरी । तैसें दृश्य हें विकारी । विकारवंत ॥ ४१ ॥

अशा अनेक प्रकारचें रंगांचें मिश्रण केलें असतां अनेक प्रकारचें नवें निरनिराळें रंग होतात.तसे द्दश्य हे विकारवंत असल्यामुळे विकारच उत्पन्न होतात (तसेंच द्दश्य-प्रकृति-अनंत-विकार प्रसवतें)

येका जीवनें नाना रंग । उमटों लागती तरंग । पालटाचा लागवेग । किती म्हणोन पाहावा ॥ ४२ ॥

एका पाण्यावर अनेक तरंग येऊन अनेक रंग उमटतात,ह्या फेरबदलाचा प्रकार किती म्हणून पाहावा ? (नित्य पालटणा-या ह्या विकारी द्दश्याबद्दल काय सांगावें ?)

येका उदकाचे विकार । पाहातां दिसती अपार । पांचा भूतांचे विस्तार । चौर्यासी लक्ष योनी ॥ ४३ ॥

एका पाण्याच्याच विकारांचा विचार केला असतां तें असंख्य आहेत,तसेंच चौ-यांशी लक्ष योनींचा हा विस्तार अवघ्या पांच भूतांचाच आहें,(एका उदकांतून अनेक विकारांचा तसा पंचभूतांतून ८४ लक्ष योनींचा उद्भव झाला)

नाना देहाचें बीज उदक । उदकापसून सकळ लोक । किडा मुंगी स्वापदादिक । उदकेंचि होयें ॥ ४४ ॥

अनेक देहांचे बीज उदकच आहें (उदकांपासून अनंत देह झालें) सर्व लोक किडा, मुंगी,श्र्वापदें इत्यादि सर्व जीव एका उदकापासूनच झालेले आहेंत.

शुक्लीत शोणीत म्हणिजे नीर । त्या नीराचें हें शरीर । नखें दंत अस्तिमात्र । उदकाच्या होती ॥ ४५ ॥

पुरुषांचें शुक्र (रेत) व स्त्रियांचे शोणित (रक्त) म्हणजें पाणी,त्या पाण्याचेंच हें शरीर होय.(तेव्हा मनुष्ययोनि उदकापासूनच झाली असल्यांचे उघड आहें) नखें ,दांत,हाडें ही सर्व पाण्यापासूनच होतात.

मुळ्यांचे बारीक पागोरे । तेणें पंथें उदक भरे । त्या उदकेंचि विस्तारे । वृक्षमात्र ॥ ४६ ॥

( पागोरे - तंतू )

झाडांच्या मुळांना पांगारे म्हणजें बारीक तंतू असतात त्यांच्या द्वारें पाणी वर चढून त्या पाण्यानें प्रत्येक वृक्ष विस्तार पावतो.

अंबवृक्ष मोहरा आले । अवघे उदकाकरितां जाले । फळीं फुलीं लगडले । सावकास ॥ ४७ ॥

आंब्याची झाडें माहोरानें लगडतात,फुलांनी व फळांनी यथास्थित भरुन जातात हें सर्व पाण्यानेंच होते.(हे सर्व विकार उदकाचेच)

खोड फोडुन अंबे पाहातां । तेथें दिसेना सर्वथा । खांद्या फोडुन फळें पाहातां । वोलीं सालें ॥ ४८ ॥

( खांद्या - फांद्या )

पण खोड फोडून आंबा (फळ) पाहायला गेलें तर तेथें मुळीच दिसत नाही,फळ पाहाण्यासाठी खांद्याच्या ढपल्या काढल्यानंतर ओली सालेंच दिसतात.

मुळापासून सेवटवरी । फळ नाहीं तदनंतरीं । जळरूप फळ चतुरीं । विवेकें जाणावें ॥ ४९ ॥

असें मूळापासून शेंड्यापर्यंत पाहिले तर त्याच्या आंतमध्ये फळ दिसत नाही, त्या ठिकाणी फळ जळरुपानें असते हे सुज्ञांनी विवेकाने समजून घ्यावें.

तेंचि जळ सेंड्या चढे । तेव्हां वृक्षमात्र लगडे । येकाचें येकचि घडे । येणें प्रकारें ॥ ५० ॥

तेथें पाणी जेव्हा शेंडयापर्यंत पाहोचतें तेव्हाच झाड फळांनी भरुन जातें,अशा प्रकारें एकाचेंच दुसरें (निराळेंच) स्वरुप बनतें (तेंच जळ शेंडयापर्यंत चढलें व अनंत आंबें लगटले म्हणजें एकाचें अनंत घडल्याचें पाहून कौतुक वाटतें)

पत्रें पुष्पें फळें भेद । किती करावा अनुवाद । सूक्ष्म दृष्टीनें विशद । होत आहे ॥ ५१ ॥

अशारीतीने पाने फळे व फुले हे भेद किती म्हणून सांगावे ? सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास हें स्पष्ट होत जातें (कळत जातें).

भूतांचे विकार सांगों किती । क्षणक्षणा पालटती । येकाचे येकचि होती ॥ नाना वर्ण ॥ ५२ ॥

भूतांचे विकार किती सांगावेंत ? ते क्षणाक्षणाला बदलत असतात,एकाचे दुसरे व दुस-याचे तिसरे असे अनेक रंग होतात (भूतांचे क्षणोक्षणी अनंत पालट होतात तें सर्व कोठवर सांगावें ?)

त्रिगुणभूतांची लटपट । पाहों जातां हे खटपट । बहुरूप बहु पालट । किती म्हणोन सांगावा ‖ ५३ ‖

तीन गुण व पंचभूतें ह्यांची लटपट पाहायला लागलें म्हणून हें इतकें सांगण्याची खटपट करावी लागली. त्यांची अनेक रुपे व अनेक फेरबदल ह्यांचे किती वर्णन करावें ? (एका ओंकारापासून अनेक वर्ण होतात ते असेच)

ये प्रकृतीचा निरास । विवेकें वारावा सावकास । मग परमात्मा परेश । अनन्यभावें भजावा ‖ ५४ ‖

सारांश हा,की विवेकानें हळूहळू ह्या अष्टधा प्रकृतीचा निरास करावा आणि मग जो परमात्मा परेश आहें त्यांचे अनन्य भावानें भजन करावें (तात्पर्य सारी खटपट व लटपट त्रिगुण व पंचभूतें ह्यांची होय किती रंग,किती रुपें झटपट पालटत असतात हा सारा अष्टधा प्रकृतीचा खेळ चालला आहें,विवेकानें प्रकृति दूर सारुन,तिचा निरास करुन निर्गुण् निराभास परमात्मा अनन्य भावानें पूजावा.)

**इथि श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गुणरूपनिरूपणनाम समास सहावा ‖**

### समास सातवा : विकल्पनिरूपण ‖ श्रीराम ‖

आधी स्थूळ आहे येक । तरी मग अंतःकरण पंचक । जाणतेपणाचा विवेक । स्थूळाकरितां ‖ १ ‖

( प्रश्न) अगोदर स्थूल शरीर म्हणून काहीं एक आहें,म्हणूनच अंतःकरणपंचक होतें, स्थूळामुळेंच जाणतेपणाचा म्हणजें ज्ञानाचा विचार करतां येतो.

तैसेंचि ब्रह्मांडेंवीण कांहीं । मूळमायेसि जाणीव नाहीं । स्थूळाच्या आधारें सर्व हि । कार्य चाले ‖ २ ‖

त्याप्रमाणेंच ब्रह्मांडावाचून मूळमायेला काहीं जाणीव नाहीं, स्थूळांच्या आधारानें (स्थूक्ष्माचें) सर्व काही काम चालत असतें.

तें स्थूळचि नस्तां निर्माण । कोठें राहेल अंतःकर्ण । ऐसा श्रोतीं केला प्रश्न । याचें उत्तर ऐका ‖ ३ ‖

तें स्थूळच उत्पन्न झालेले नसलें तर अंत:करण कोठें राहील ? (स्थूळ देहाच्या आश्रयानें अंत:करण असतें हें जर आपण पाहातों तर स्थूल देह आधी व मग अंत:करण निर्माण झालें,तसेंच ब्रह्मांड आधी व मग मूळमाया झाली असें कां मानूं नयें ?)असा श्रोत्यांनी प्रश्न उत्पन्न केला.त्यांचे उत्तर ऐका.

कोसले अथवा कांटेघरें । नाना पृष्ठिभागीं चालती घरें । जीव करिती लाहानथोरें । शक्तीनुसार ‖ ४ ‖

उत्तर-(आधी सूक्ष्म निर्माण होतें व मग स्थूळ होतें असाच प्रकार सृष्टीत दिसतों) कोसलें (म्ह.आपणाभोवती घर करुन आंत स्वतःस कोडून घेणारें किडें) किंवा कांटेघरें अशा प्रकारचें अनेक लहान थोर किडें जीवसृष्टीत दिसतात. ते आपल्या शक्तीप्रमाणें आपल्या पाठीवर घरें करुन वागवीत असतात.

शंख सिंपी घुला कवडें । आधीं त्यांचें घर घडे । किंवा आधीं निर्माण किडे । हें विचारावें ॥ ५ ॥

शंख,शिंपी,घुला,कवडें हें सर्व त्यांतीलच होत,तेव्हा हे किडे अगोदर उत्पन्न होतात का त्यांचे घर अगोदर उत्पन्न होतें ?

आधी प्राणी ते होती । मग घरें निर्माण करिती । हे तों प्रत्यक्ष प्रचिती । सांगणें नलगे ॥ ६ ॥

अगोदर तें प्राणी उत्पन्न होतात आणि मग तें घरें करतात,हा तर उघड अनुभव आहें हें सांगायला नकों.

तैसें आधी सूक्ष्म जाण । मग स्थूळ होतें निर्माण । येणें दृष्टांतें प्रश्न । फिटला श्रोतयांचा ॥ ७ ॥

त्याचप्रमाणे अगोदर सूक्ष्म होते आणि मग स्थूल होते,ह्या दाखल्याने श्रोत्यांची शंका दूर झाली (सूक्ष्म आधी,स्थूल नंतर ह्याच न्यायाने सूक्ष्मांत सूक्ष्म अशी मूळमाया प्रथम,नंतर क्रमाक्रमानें ब्रह्मांड अशी सृष्टिरचना सांगितली तीच बरोबर आहे.)

तव श्रोता पुसे आणीक । जी आठवलें कांहीं येक । जन्ममृत्युचा विवेक । मज निरोपावा ॥ ८ ॥

(प्रश्न)-तेव्हा श्रोत्याने पुन्हा विचारले की महाराज, मला आणखी थोडीशी आठवण झाली,मला जन्ममृत्यूचा विचार सांगावा.

कोण ज्न्मास घालितें । आणी मागुता कोण जन्म घेतें । हें प्रत्यया कैसें येतें । कोण्या प्रकारें ॥ ९ ॥

जन्माला कोण घालतें ? व नंतर जन्म कोण घेतो ?हें कोणत्या रीतीनें व कसे अनुभवास येतें ?

ब्रह्मा जन्मास घालितो । विष्णु प्रतिपाळ करितो । रुद्र अवघें संव्हारितो । ऐसें बोलती ॥ १० ॥

ब्रह्मदेव जन्माला घालतो,विष्णु पालन करतो व रुद्र सर्वांचा संहार करतो असे म्हणतात.

तरीं हें प्रवृतीचें बोलणें । प्रत्ययास आणी उणें । प्रत्यय पाहातां श्लाघ्यवाणें । होणार नाहीं ॥ ११ ॥

( प्रवृतीचें - जनरूढीचे )

पण हें (प्रवृत्तींचे-लोकपरिपाठाचें-) जनरुढीचे बोलणे दिसते,ह्यानें अनुभवाला कमीपणा येतो,अनुभव पाहायला गेलें असतां हे योग्य (श्र्लाघ्यवाणें) दिसणार नाही.

ब्रह्म्यास कोणें जन्मास घातलें । विष्णूस कोणें प्रतिपाळिलें । रुद्रास कोणें संव्हारिलें । माहाप्रळईं ॥१२॥

(ब्रह्मा जर जन्मास घालतो तर) ब्रह्मदेवाला जन्माला कोण घालतो ? विष्णूचे पालन कोण करतो ? व महाप्रळयाचें वेळी रुद्राचा संहार कोण करतो ?

म्हणौनि हा सृष्टीभाव । अवघा मायेचा स्वभाव । कर्ता म्हणों निर्गुण देव । तरी तो निर्विकारी ॥ १३ ॥

( सृष्टीभाव - सहज - स्वभाव )

म्हणून हा सर्व सृष्टिक्रम मायेचा खेळ असावा,निर्गुण देव कर्ता आहे असे म्हणावें तर तो निर्विकारी आहे!

म्हणावें माया जन्मास घाली ।तरी हे आपणचि विस्तारली । आणी विचारितां थारली ।हें हि घडेना ॥१४॥

( थारली - स्थिर )

माया जन्माला घालतें म्हणावे तर ती आपली आपणच जन्मास आली, विस्तार पावली व विचार केला असतां ती टिकतें असेंही घडत नाही (ती स्थिर व शाश्र्वत नाही)

आतां जन्मतो तो कोण । कैसी त्याची वोळखण । आणी संचिताचें लक्षण । तेंहि निरोपावें ॥ १५ ॥

आतां जन्म घेतो तो कोण असावा ?त्याला कसें ओळखावें ? व (पापपुण्यात्मक) संचिताचें स्वरुप काय ?हे मला सांगावें.

पुण्याचें कैसें रूप । आणी पापाचें कैसें स्वरूप । याहि शब्दाच आक्षेप । कोण कर्ता ॥ १६ ॥

पुण्याचें व पापाचें स्वरुप काय ? व  ह्या शब्दांनी आक्षेप घेणारा मी कोण ?

हें कांहींच न ये अनुमाना । म्हणती जन्म घेते वासना । परी ते पाहातां दिसेना ।ना धरितां न ये ॥१७॥

ह्यांत काहीच तर्क चालत नाही,वासना जन्म घेतें असें म्हणतात पण पाहायला लागलें तर ती दिसत नाही,धरायला गेले तर सांपडत नाहीं.

वासना कामना आणी कल्पना ।हेतु भावना मति नाना।ऐशा अनंत वृत्ती जाणा ।अंतःकर्णपंचकाच्या॥१८॥

वासना,कामना,कल्पना,हेतु,भावना,अनेक प्रकारच्या बुध्दि अशा अंत:करण पंचकाच्या अनेक वृत्ति आहेत.

असो हें अवघें जाणीव यंत्र । जाणीव म्हणिजे स्मरणमात्र । त्या स्मरणास जन्मसूत्र । कैसें लागे ॥ १९ ॥

असो,हें सर्व जाणीवेंचे यंत्र आहें व ती जाणीव म्हणजें केवळ स्मरण होय,त्यां स्मरणाच्या मागें जन्माचा धागा कसा लागतो ?

देहो निर्माण पांचा भूतांचा । वायो चाळक तयाचा । जाणणें हा मनाचा । मनोभाव ॥ २० ॥

देह हा पांच भूतें मिसळून उत्पन्न होतो,त्याचा चालक वायु असतो आणि त्यांतील जाणणें हा मनाचा धर्म आहें.

ऐसें हें सहजचि घडलें । तत्वांचें गुंथाडें जालें । कोणास कोणे जन्मविलें । कोण्या प्रकारें ॥ २१ ॥

असें हे सहजगत्यांच घडून येऊन तत्वांची गुंतागुंत होऊन बसली,त्यांत कोणाला कोणी व कोणत्या प्रकारे जन्मास घातलें हें समजत नाही.

तरी हें पाहातां दिसेना । म्हणोन जन्मचि असेना । उपजला प्राणी येना । मागुता जन्मा ॥ २२ ॥

हें पहायला लागलें तर दिसत नाही म्हणून जन्मच (पुर्नजन्म) नाही एकदा जन्माला आलेला प्राणी पुन्हा जन्म घेत नाही.

कोणासीच जन्म नाहीं । तरी संतसंगें केलें काई । ऐसा अभिप्राव सर्वहि । श्रोतयांचा । २३ ॥

कोणालाच जर जन्म नाही तर संतसंगतीने विशेष काय केले ?असा सर्व श्रोत्यांचा म्हणण्याचा अर्थ दिसतो.

पुर्वी स्मरण ना विस्मरण । मधेंचि हें जालें स्मरण । अंतर्यामीं अंतःकर्ण । जाणती कळा ॥ २४ ॥

पूर्वीचे स्मरण किंवा विस्मरण नसतांना मध्येच हें स्मरण उत्पन्न झाले,तेच अंतर्यामांतील अंत:करण किंवा जाणती कळा होय.

सावध आहे तों स्मरण । विकळ होतां विस्मरण । विस्मरण पडतां मरण । पावती प्राणी ॥ २५ ॥

सावध आहे तो पर्यंत स्मरण व बेशुध्द झाले की विस्मरण आणि विस्मरण झाले की प्राणी मरण पावतात.

स्मरण विस्मरण राहिलें । मग देहास मरण आलें । पुधें जन्मास घातलें । कोणास कोणें ॥ २६ ॥

अशा रीतीने स्मरण किंवा विस्मरण एका बाजूस राहिल्यानंतर मग देहाला मरण येतें, अशा स्थितीत कोण कोणाला जन्मास घालतें ?

म्हणोनी जन्मचि असेना । आणी यातना हि दिसेना । अवघी वेर्थचि कल्पना । बळावली ॥ २७ ॥

म्हणून जन्मच नाही व यातनाही दिसत नाहीत.ही सगळी पोकळ कल्पनाच वाढत गेली आहें.

म्हणौन जन्मचि नाहीं कोणासी । श्रोतयांची आशंका ऐसी । मरोन गेलें तें जन्मासी । मागुतें न ये ॥२८॥

ह्यास्तव श्रोत्यांची शंका अशी आहें की कोणाला जन्मच (पुर्नजन्म) नाही, जे एकदा मरुन गेले की परत जन्मास येत नाही.

वाळलें काष्ठ हिरवळेना । पडिलें फळ तें पुन्हां लागेना । तैसें पडिलें शरीर येना । जन्मास मागुतें ॥२९॥

वाळले लाकूड पुन्हा हिरवें होत नाही किंवा पडलेले फळ पुन्हा झाडास लागत नाही,तद्वत जें शरीर एकदा पडले ते पुन्हा जन्मास येत नाही.

मडकें अवचितें फुटलें । फुटलें तें फुटोनिच गेलें । तैसेंचि पुन्हां जन्मलें । नाहीं मनुष्य ॥ ३० ॥

मडके एकाएकी फुटलें,फुटलें तें फुटून नाहीसे झाले.अशा रीतीने मनुष्यही पुन्हा जन्मास येत नाही.

येथें अज्ञान आणी सज्ञान । सारिखेच जालें समान । ऐसा बळावला अनुमान । श्रोतयांसी ॥ ३१ ॥

ह्यांत अज्ञान व सज्ञान ह्या दोघांचीही योग्यता सारखीच झाली.अशी श्रोत्यांची शंका बलवत्तर वाढली.

वक्ता म्हणे हो ऐका । अवघें पाषांड करूं नका । अनुमान असेल तरी विवेका । अवलोकावें ॥ ३२ ॥

उत्तर-वक्ता म्हणतो,अहो,ऐका,सगळे थोतांड (पाषांड) माजवू नका,शंका असेल तर नीट विचार करुन पाहा.

प्रेत्नेंवीण कार्य जालें । जेविल्यावीण पोट भरलें । ज्ञानेंवीण मुक्त जालें । हें तों घडेना ॥ ३३ ॥

प्रयत्नांवाचून कार्य झाले,जेवल्यावांचून पोट भरलें किंवा ज्ञानावाचून मुक्ति मिळाली असें कधी घडत नाही.

स्वयें आपण जेविला । त्यास वाटे लोक धाला । परंतु हें समस्तांला । घडले पाहिजे ॥ ३४ ॥

जो स्वत:जेवलेला असतो त्याला सर्व लोक तृप्त झाले आहेत असे वाटतें.(पण ह्यानें काही बाकीच्यांची पोटे भरत नाहीत) तशी तृप्ति सर्वांची झाली पाहिजें.

पोहणें सिकला तो तरेल । पोहणें नेणें तो बुडेल । येथें हि अनुमान करील । ऐसा कवणु ॥ ३५ ॥

पोहणे शिकला असेल तर तो तरेल व ज्याला पोहता येत नाही तो बुडेल,ह्या म्हणण्याला शंका घेईल असा कोण आहे ?

तैसें जयास ज्ञान जालें । ते ते तितुकेच तरले । ज्याचें बंधनचि तुटलें । तोचि मुक्त ॥ ३६ ॥

त्याप्रमाणे ज्यांना ज्यांना जितपत ज्ञान झाले असेल ते ते तितपत तरले,ज्याचें बंधन नाहीसें झाले तेवढेंच मुक्त.

मोकळा म्हणे नाहीं बंधन । आणी प्रत्यक्ष बंदीं पडिले जन । त्यांचें कैसें समाधान । तें तुम्ही पाहा ॥३७॥

जो मोकळा आहे तो म्हणतो बंधन नाही (लटके) आणि लोक तर प्रत्यक्ष बंधनात पडलेले आहेत,तेव्हा ह्यांचे समाधान कसें करावयाचें ह्याचा विचार तुम्हीच करा. (मोकळा झाला तो आपल्या पुरता बंधन नाही असे म्हणेल,सर्वच मुक्त आहेत असे कसे म्हणेल ? अज्ञान व सज्ञान सारखे होणार नाहीत,सर्वच समान हें म्हणणे योग्य नाही)

नेणे दुस-याची तळमळ । तें मनुष्य परदुःखसीतळ । तैसाच हाही केवळ । अनुभव जाणावा ॥ ३८ ॥

दुस-याची तळमळ ज्याला समजत नाही त्या मनुष्याला परदुःख शीतळ होय,त्यातलाच हाही एक अनुभव समजावा.

जयास आत्मज्ञान जालें । तत्वें तत्व विवंचिलें । खुणेसी पावतांच बाणलें । समाधान ॥ ३९ ॥

ज्याला आत्मज्ञान झाले आहे व एकुण एक तत्वांचा विचार करुन ज्याला स्वस्वरुपाची खूण पटली आहे त्यालाच समाधान बाणतें.

ज्ञानें चुके जन्ममरण । सगट बोलणें अप्रमाण । वेदशास्त्र आणी पुराण । मग कासयासी ॥ ४० ॥

(आत्म-) ज्ञानानें जन्ममरणाचें फेरे चुकतात पण असे सरसकट बोलणें हें अयोग्य आहे मग वेद शास्त्रेंपुराणे ही कशाला ?(ज्ञानानेंच जन्म मरण चुकते व अज्ञान्यास तारण्यासाठी वेद शास्त्रपुराणे झाली आहेत.)

वेदशास्त्रविचारबोली । माहानुभावांची मंडळी । भूमंडळीं लोक सकळी । हें मानीतना ॥ ४१ ॥

वेदशास्त्रातील विचारपूर्वक वचनें,थोर अनुभविक महात्म्यांचें समुदाय किंबहुना पृथ्वीच्या पाठीवरील सर्व लोक ह्या सगळ्यांना हे सरसकट पध्दतीचे बोलणें पटत नाहीं.

अवघें होतां अप्रमाण । मग आपलेंच काय प्रमाण । म्हणोन जेथें आत्मज्ञान । तोचि मुक्त ॥ ४२ ॥

हे सगळेच खोटे ठरल्यावर मग आपलेंच एकट्याचें म्हणणे खरे कशावरुन ? म्हणून सिध्दांत हा की ज्याला आत्मज्ञान झालें तेवढाच मुक्त होय,

अवघे च मुक्त पाहातां नर । हाहि ज्ञाचा उद्गार । ज्ञानेंविण तो उदगार । होणार नाहीं ॥ ४३ ॥

सगळेच लोक मुक्त आहेत हें म्हणणे देखील ज्ञानानेंच आहे.(पण श्रोत्यांचे प्रतिपादन ज्ञानाचें नसून पाखंड आहे) ज्ञानावांचून उध्दार कदापि होणार नाही.

आत्मज्ञान कळों आले । म्हणोन दृश्य मिथ्या जालें । परंतु वेढा लाविलें । सकळास येणें ॥ ४४ ॥

आत्मज्ञान झाले म्हणजें दृश्य मिथ्या असे अनुभवास येतें,परंतु ह्या दृश्याने सर्वांस वेड लावलें आहे (दृश्याने सर्वांस मोहात पाडले-वेढा लाविले-आहे.)

आतां प्रश्न हा फिटला । ज्ञानी ज्ञानें मुक्त जाला । अज्ञान तो बांधला । आपले कल्पनेनें ॥ ४५ ॥

आतां श्रोत्यांची शंका फिटली ज्ञानी हा ज्ञानाने मुक्त होतो व अज्ञानी आपल्या कल्पनेने बांधला जातो.

विज्ञानासारिखें अज्ञान । आणी मुक्तासारिखें बंधन । निश्चयासारिखा अनुमान । मानूंचि नये ॥ ४६ ॥

विज्ञान व अज्ञान,मुक्ति व बंधन,निश्र्चय व अनुमान ह्यांना कधीही सारखे मानूं नयें.

बंधन म्हणिजे कांहींच नाहीं । परी वेढा लाविलें सर्व हि । यास उपावचि नाहीं । कळल्यावांचुनी ॥ ४७ ॥

( परी वेढा लाविलें सर्व हि - बंधन कल्पनेने सर्वांना घेरल्याने )

(आपल्या कल्पनेने) बंधन म्हणजें वास्तविक काही नाही पण त्याने सगळ्यांना वेढून टाकले आहें.पण त्याला समजण्यावाचून-हे-कळल्यावाचून उपायच नाही (बंधन नाहीच हा बुध्दिनिश्र्चय झाला म्हणजें तोच ज्ञानी)

कांहींच नाहीं आणी बाधी । हेंचि नवल पाहा आधीं । मिथ्या जाणिजेना बद्धि । म्हणोन बद्ध ॥ ४८ ॥

बंधन हे खोटे असतानाच तें बांधतें हेंच अगोदर केवढें आश्र्चर्य आहे पहा! बंधन हें मिथ्या आहे हें समजत नाही म्हणूनच तो बध्द.

भोळा भाव सिद्धी जाव । हा उधाराचा उपाव । रोकडा मोक्षाचा अभिप्राव । विवेकें जाणावा ॥ ४९ ॥

भोळा भाव सिध्दीस जाव हा उधारीचा मार्ग आहे.मोक्षाचा रोकडा मार्ग विवेकाने ओळखून घ्यावा.(विवेकाने मोक्ष तात्काळ होतो.)

प्राणी व्हावया मोकळा । आधीं पाहिजे जाणीवकळा । सकळ जाणतां निराळा । सहजचि होये ॥ ५० ॥

प्राणी मोकळा होण्यासाठी अगोदर जाणीव कळा म्हणजें ज्ञान पाहिजे,सर्व जाणले की आपोआपच प्राणी मोकळा होतो.(जाणून निराळा-मुक्त-सहजच होतो)

कांहींच नेणिजे तें अज्ञान । सकळ जाणिजे तें ज्ञान । जाणिव राहातां विज्ञान । स्वयेंचि आत्मा ॥ ५१ ॥

( राहातां - बाजूस राहिली असता, ज्ञानाच्या जाणीवेचा लय हेच विज्ञान )

काहींच कळत नाही तें अज्ञान व सर्व कळते तें ज्ञान,जाणीव म्हणजें जाणिवेचा अभिमान नाहीसा झाला की विज्ञान म्हणजें अनुभवजन्य ज्ञान प्राप्त होते व प्राणी स्वतः आत्मरुप होतो.

अमृत सेऊन अमर जाला । तो म्हणे मृत्यु कैसा येतो जनाला । तैसा विवेकी म्हणे बद्धाला । जन्म तो कैसा ॥ ५२ ॥

अमृतपान करुन जो अमर होतो त्यानें म्हणावें की लोकांना मृत्यु कसा येतो ? त्याप्रमाणें विवेकी बध्दाला विचारतो की जन्म कसा येतो ?(अमृत पिऊन अमर झाला म्हणजें ह्या प्राण्यांना मृत्यु कसा येतो ह्याचे नवल वाटते,तसा ज्ञानी बध्दाला म्हणतो की जन्म ही काय चीज आहे ?)

जाणता म्हणे जनातें । तुम्हांस भूत कैसे झडपितें । तुम्हास वीष कैसें चढतें । निर्विष म्हणे । ॥ ५३ ॥

जाणता म्हणजें पंचाक्षरी लोकांना म्हणतो की तुम्हाला भूत कसे लागतें ? ज्याला विषबाधा झाली नाही तो दुस-याला विचारतो की तुम्हाला विष कसे चढते ?(बध्दाची भूमिका समजल्यावर हे पुसावेंच लागत नाही)

आधीं बद्धासारिखे व्हावें । मग हें नलगेचि पुसावें । विवेक दूरी ठेऊन पाहावें । लक्षण बद्धाचें ॥ ५४ ॥

विवेक दूर ठेऊन बध्दाचें लक्षण कसें असतें तें पहावें,अगोदर बध्दासारखे व्हावें म्हणजें मग हें विचारण्याची गरज राहाणार नाही (विवेक दूर ठेऊन बध्दलक्षण पहावें)

निजेल्यास चेईला तो । म्हणे हा कां रे वोसणातो । अनुभव पाहाणेंचि आहे तो । तरी मग निजोन पाहावा ॥ ५५ ॥

जागा असलेला,निजलेल्या मनुष्यास म्हणतो की हा उगीच बरळतो का ? त्याचा अनुभव घ्यावयाचा तर स्वतः निजूनच पहावें !

ज्ञात्याची उगवली वृत्ती । बद्धाऐसी न पडेल गुंती । भुकेल्याची अनुभवप्राप्ती । धाल्यास नाहीं ॥ ५६ ॥

ज्ञात्याची वृत्ति मोकळी झाली असल्यामुळे बध्दाप्रमाणे त्याला घोटाळा-पाश-गुंती पडत नाही,जो (जेवून) तृप्त झाला (धाला) आहें त्याला भुकेलेल्या माणसाची तळमळ अनुभवांस येणार नाही (तात्पर्य भुकिस्त मनुष्यास तृप्तीचें ढेकर देणा-याची तृप्ति नाही.तशी बध्दाची गुंती-पाश-मुक्तास नाहीं)

इतुकेन आशंका तुटली । ज्ञानें मोक्षप्राप्ती जाली । विवेक पाहातां बाणली । अंतरस्थिती ॥ ५७ ॥

एवढयांनें शंकेंचे निरसन झालें,ज्ञानानें मोक्षप्राप्ति होतें (ज्ञानाने मुक्ति हें निश्चित) व विवेकांनें अंतःकरणांत स्वरुपस्थिति बाणतें.

**इथि श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विकल्पनिरसननाम समास सातवा ॥**

**समास आठवा : देहांतनिरूपण ॥ श्रीराम ॥**

ज्ञाता सुटला ज्ञानमतें । परंतु जन्म कैसा बद्धातें । बद्धाचें काये जन्मतें । अंतकाळीं ॥ १ ॥

प्रश्न-ज्ञानी आत्मज्ञानाच्या योगाने जन्ममरणाच्या फे-यातून सुटतो,परंतु बध्दाला पुन्हा जन्म कसा येतो ?

बद्ध प्राणी मरोन गेले । तेथें कांहींच नाहीं उरलें । जाणिवेचे विस्मरण जालें । मरणापूर्वी ॥ २ ॥

बध्द प्राणी मरुन गेला तर तेथेंही कांहीही उरत नाही,मरणाच्या पूर्वी जाणीवेंचे विस्मरण झालेले असतें.

ऐसी घेतली आशंका । याचें उत्तर ऐका । आतां दुश्चीत होऊं नका । म्हणे वक्ता ॥ ३ ॥

अशी शंका श्रोत्यांनी घेतली तिचें उत्तर ऐका,आता दुर्लक्ष करु नका असे वक्ता म्हणतो.

पंचप्राण स्थळें सोडिती । प्राणरूप वासनावृत्ती । वासनामिश्रीत प्राण जाती । देह सोडुनिया ॥ ४ ॥

उत्तर - वासनावृत्ति ही प्राणरुप आहे,पंचप्राण जेव्हा आपापली स्थाने सोडतात त्या वेळी वासनेसह प्राण,देह सोडून जातात (त्याला आपण मरण म्हणतो).

वायोसरिसी वासना गेली । ते वायोरूपेंचि राहिली । पुन्हां जन्म घेऊन आली । हेतुपरत्वें ॥ ५ ॥

वायूबरोबर वासना जातें आणि वायूरुपानेंच राहाते नंतर पुन्हा आपल्या हेतूप्रमाणें जन्म घेऊन येते (तीच पुर्नजन्माला कारण होते)

कित्येक प्राणी निःशेष मरती । पुन्हां मागुते जीव येती । ढकलून दिल्हें तेणें दु:खवती । हस्तपादादिक॥६॥

कित्येक प्राणी अजिबात नि:शेष-निश्र्चेष्ट मरतात व पुन्हा जिवंत होतात (अशा समयी स्वर्गातून) ढकलून दिल्यामुळे कित्येकांचे हातपाय दुखावतात.

सर्पदृष्टी जालियां वरी । तीं दिवसां उठवी धन्वंतरी । तेव्हां ते माघारी । वासना येते कीं ॥ ७ ॥

( तीं - तीन )

सर्पदंश होऊन मेला तर तीन दिवसांनी धन्वंतरी (मांत्रिक) त्याला उठवितो,त्या वेळेला ती पूर्वीची वासना परत येतें की नाही ?

कित्येक शवें होऊन पडती । कित्येक तयांस उठविती । येमलोकींहून आणिती । माघारे प्राणी ॥ ८ ॥

कित्येक प्रेतें होऊन पडतात,त्यांना कोणी उठवितात,प्रेयमलोकाहूनसुध्दा प्राणी परत आणतात.

कित्येक पुर्वी श्रापिले । ते शापें देह पावले । उश्रापकाळीं पुन्हां आले । पूर्वदेहीं ॥ ९ ॥

कित्येकांना पूर्वी शाप झालेला असतो,त्या शापामुळे त्यांना दुसरा देह प्राप्त होतो व उःशाप होण्याची वेळ आली की पुन्हा पूर्वीचे देह प्राप्त होतात.

कित्येकीं बहु जन्म घेतले । कित्येक परकाया प्रवेशले । ऐसे आले आणी गेले । बहुत लोक ॥ १० ॥

कित्येकांनी अनेक जन्म घेतले,कित्येकांनी परकायाप्रवेश केला असे पुष्कळ लोक आले आहेत व गेले आहेत.

फुंकल्यासरिसा वायो गेला । तेथें वायोसूत निर्माण जाला ।म्हणोन वायोरूप वासनेला ।जन्म आहे ॥११॥

फुंकल्याबरोबर (श्वासाबरोबर) वायु गेला त्या ठिकाणी वायुसुत म्हणजें दुस-या देहांत जन्म घेणारा प्राण उत्पन्न झाला. ह्यास्तव वायुरुपी वासनेला जन्म आहें (वायुस्वरुप वासनाच जन्म घेते हे उघड आहे)

मनाच्या वृत्ती नाना । त्यांत जन्म घेते वासना । वासना पाहातां दिसेना । परंतु आहे ॥ १२ ॥

मनाच्या अनेक वृत्ति आहेत,त्यांत वासना जन्म घेते.वासना पाहू गेले असतां दिसत नाही पण आहे (वासना ही मनाच्या अनंत वृत्तींपैकी एक वृत्ति आहे,ती दिसत नाही पण आहे)

वासना जाणिजे जाणिवहेत । जाणीव मुळींचा मूळतंत । मूळमायेंत असे मिश्रित । कारणरूपें ॥ १३ ॥

वासना म्हणजें जाणीवेची कल्पना (वायुरुप प्रकृतीचा अंश) होय आणि जाणीव ही मूळमायेतील मूळचा धागा होय,मूळमायेंचें कारण ही जाणीव असून तिजमध्ये मिश्रित आहे. (वासना म्ह.जाणीवेचा हेतु वासना वायुरुप (प्रकृति-अंश) व जाणीव ज्ञानरुप (पुरुष-अंश) मूळमायेचे कारण जाणीव आहे,जाणीव मूळमायेत कारणरुपानें मिश्रित आहे (मूळमायेत वायु व जाणीव असे दोन भाग आहेत) वायु प्रकृति व जाणीव पुरूष, गणेश-शारदा,शिव-शक्ति हीं प्रकृतिपुरुषांचीच नावें आहेत)

कारणरूप आहे ब्रहमांडीं । कार्यरूपें वर्ते पिंडीं । अनुमानितां तांतडीं । अनुमानेना ॥ १४ ॥

जाणीव ही कारणरुपानें ब्रह्मांडात असून कार्यरुपानें पिंडात आहे (-कारणांतूनच कार्यांत आली आहे) घाइघाईनें तिजविषयी तर्क करु लागल्यास तर्क करतां येणार नाही.

परंतु आहे सूक्ष्मरूप । जैसें वायोचे स्वरूप । सकळ देव वायोरूप । आणी भूतसृष्टि ॥ १५ ॥

परंतु वायूचें रुप जसें सूक्ष्म असते तशीच ही जाणीव सूक्ष्मरुप आहे सर्व देव आणि (पंचभूते) ही भूतसृष्टी वायुरुपच आहे.

वायोमधें विकार नाना । वायो पाहातां तरी दिसेना । तैसी जाणीववासना । अति सूक्ष्म ॥ १६ ॥

वायुमध्ये अनेक प्रकारचें विकार आहेत तरी पण तो वायु पाहायला गेले तर दिसत नाही,त्याचप्रमाणे जाणीव वासना अतिसूक्ष्म आहेत (म्हणून दिसत नाहीत)

त्रिगुण आणी पंचभूतें । हे वायोमध्यें मिश्रिते । अनुमानेना म्हणोन त्यातें । मिथ्या म्हणों नये ॥ १७ ॥

त्रिगुण व पंचभूतें वायुमध्यें मिसळली आहेंत,आपणास त्याचे अनुमान करता आले नाही तरी त्यांस खोटे म्हणू नयें (ती दिसत नाहीत म्हणून नाहीत असे नाही)

सहज वायो चाले । तरी सुगंध दुर्गंध कळों आले । उष्ण सीतळ तप्त निवाले । प्रत्यक्ष प्राणी ॥ १८ ॥

सहज वारा वाहू लागला की सुंगध व दुर्गध कळून येतो,उष्मा होतो,थंडी वाजते ताप येतो,निवतो ह्या सर्वाचा अनुभव प्राण्याला प्रत्यक्ष येतो (ही दिसली नाही तरी कळून येतात)

वायोचेनि मेघ वोळती । वायोचेनि नक्षत्रें चालती । सकळ सृष्टीची वर्तती गती । सकळ तो वायो ॥१९॥

वायूने मेघ भरुन पाऊस पडतो,वायूने नक्षत्रें चालतात.फार काय,सगळ्या सृष्टीची गति चालली आहे ती सर्व वायूच्या योगानेंच होय.

वायोरूपें देवतें भूतें । आंगीं भरती अकस्मातें । वीध केलियां प्रेतें । सावध होतीं ॥ २० ॥

( वीध केलियां - मंत्रतंत्रविधी केल्याने )

देवता व भूतें वायुरुपानें (वायरुप असल्यामुळें) एकाएकी आंगात संचारतात,काही मंत्रसामर्थ्यानें (मंत्रप्रयोग,विधि केल्यानें) प्रेतेही सजीव होतात.

राहाणें ब्रह्मणसमंध जाती । राहाणें ठेवणीं सांपडती । नाना गुंतले उगवती । प्रत्यक्ष राहाणें ॥ २१ ॥

( राहाणें - मंत्रप्रयोगाने )

आंगात देव येऊन ब्रह्मसंबंध जातात,ठेवे सापडतात,अनेक प्रकारची संकटे दूर होतात,ह्या आंगात येणा-या देवतांच्या उघड गोष्टी आहेत (आंगात शिरुन राहिलेली दैवते-राहाणे-व-ब्राह्मण समंध जातात. राहाण्याच्या योगानें पुष्कळ गोष्टी कळून गुंते उलगडतात)

वारें निराळें न बोले । देहामधें भरोन डोले । आळी घेऊन जन्मा आले । कित्येक प्राणी ॥ २२ ॥

( वारें - समंध, आळी - इच्छा )

वारें (पिशाच्चसंचार) निराळे (देहाहून वेगळें होऊन) बोलत नाही,देहांत संचार करुन डोलत असतें,वासना धरुन कित्येक प्राणी जन्मास आले (वायु स्वतंत्रपणे काही बोलत नाही,देहाच्या आश्रयानें बोलतो व डोलतों,हट्ट-आळी-घेऊन कित्येक प्राणी जन्मास येतात,ही वासनेंची कार्ये पाहाता वासना वायुरुप आहें असेंच ठरतें.)

ऐसा वायोचा विकार । येवंचे कळेना विस्तार । सकळ कांहीं चराचर । वायोमुळें ॥ २३ ॥

अशा रीतीनें वायुचें खेळ होत असतात,तात्पर्य,त्याचा विस्तार कळत नाही,सगळे चराचर वायुमुळें चालत आहे.

वायो स्तब्धरूपें सृष्टीधर्ता । वायो चंचळरूपें सृष्टीकर्ता । न कळे तरी विचारीं प्रवर्ता ।म्हणिजे कळे ॥२४॥

( वायो - शक्ति )

स्तब्धरुपाने सृष्टीला धरणारा (सृष्टीधर्ता-विष्णु) व चंचळ रुपाने सृष्टीला करणारा (सृष्टीकर्ता-ब्रह्मा) वायुच होय,कळत नसेल तर विचार करा म्हणजें कळेल.

मुळापासून सेवटवरी । वायोचि सकळ कांहीं करी । वायोवेगळें कर्तुत्व चतुरीं मज निरोपावें ॥ २५ ॥

मूळापासून शेवटपर्यंत (मूळमायेपासून शेवट स्थूळापर्यंत सर्व) काही वायुच करतो. वायूखेरीज कोणते कार्य होते तें मला सुज्ञांनी सांगावें.(वायुवेगळे कर्तृत्व नाही)

जाणीवरूप मूळमाया । जाणीव जाते आपल्या ठाया । गुप्त प्रगट होऊनियां । विश्वीं वर्ते ॥ २६ ॥

मूळमाया जाणीवरुपाने प्राणिमात्रांत आहे व शेवटी पुन्हा आपल्या ठिकाणी लीन होऊन राहाते,अशाप्रकारे ती गुप्त व प्रकट होऊन विश्र्वांत वागत आहे.

कोठें गुप्त कोठें प्रगटे । जैसें जीवन उफाळे आटे । पुढें मागुता वोघ लोटे । भूमंडळीं ॥ २७॥

पाणी जसें कोठे वर उसळतें,कोठें आटून जातें (व असें करीत पुढें भूमंडळावर  महानदीरुपांनें वाहू लागतें) आणि पुढे जमिनीवर पाण्याचा लोटच्या लोट येतो,त्याप्रमाणें जाणीव वायूंत कोठें गुप्त कोठे प्रकट आहें.

तैसाच वायोमधें जाणीव प्रकार । उमटे आटे निरंतर । कोठें विकारें कोठें समीर । उगाच वाजे ॥ २८ ॥

वायूंमधील जाणीवेचा प्रकारही कोठे गुप्त असतो,कोठे प्रकट असतो,कोठे तो विकार पावतो (म्हणजें त्याचें स्वरुप निराळें होतें),कुठें नुसता वाराच वाजत असतो.

वारीं आंगावरून जाती । तेणें हातपाये वाळती । वारां वाजतां करपती । आलीं पिकें ॥ २९ ॥

( वारीं जाती - अर्धांगवायू )

आंगावरुन वारे गेले म्हणजें हातपाय सकून जातात,वा-याचा कडका पडला की कित्येक पिकें करपून-जळून-जातात.

नाना रोगांचीं नाना वारीं । पीडा करिती पृथ्वीवरी । वीज कडाडी अंबरीं । वायोमुळें ॥ ३० ॥

अनेक रोगांची अनेक वारी असतात,ती जगात पीडा करतात.आकाशात वीज कडाडतें ती वायूमुळेंच.

वायोकरितां रागोद्धार । कळे वोळखीचा निर्धार । दीप लागे मेघ पडे हा चमत्कार । रागोद्धारीं ॥ ३१ ॥

वायूंच्या योगानें (करिता) गायन-शास्त्रातील अनेक राग उत्पन्न होऊन त्यांचे स्वरज्ञान निश्र्चित होते.दीपकल्याण रागानें दिवें लागतात,मेघमल्हार रागानें पाऊस पडतो असे चमत्कार रागामुळे होतात.

वायो फुंकितां भुली पडती । वायो फुंकितां खांडकें करपती । वायोकरितां चालती । नाना मंत्र ॥ ३२ ॥

वारा फुंकल्याने भूल पडतें,फोड सुकून जातात,वायुमुळेंच अनेक मंत्र चालू आहेत (अनेक मंत्र सिध्द होतात).

मंत्रें देव प्रगटती । मंत्रें भूतें अखरकिती । बाजीगरी वोडंबरी करिती । मंत्रसामर्थ्यें ॥ ३३ ॥

( अखरकिती - नाहिशी होते )

मंत्राच्या योगानें देव प्रकट होतात,भूतें वठणीवर येतात (अखरकिती,नाहीशी होतात),गारुडी विद्या व राक्षसांची वोडंबरी ही विद्या सर्व मंत्रसामर्थ्यानेच चालतात.

राक्षसांची मावरचना । ते हे देवांदिकां कळेना । विचित्र सामर्थ्यें नाना । स्तंबनमोहनादिकें ॥ ३४ ॥

राक्षसांच्या मायेची कृत्ये देवादिकांनासुध्दा कळत नाहीत,स्तंभन मोहन इत्यादि अनेक प्रकारची विचित्र सामर्थ्यें तिच्यांत आहेत.

धडचि पिसें करावें । पिसेंच उमजवावें । नाना विकार सांगावे । किती म्हणोनी ॥ ३५ ॥

( पिसें - वेडे )

(धड) चांगल्याला वेड लावावे,वेडयाला ताळ्यावर आणावें असें अनेक प्रकारचें वायुं विकार किती म्हणून सांगावें ?

मंत्रीं संग्राम देवाचा । मंत्रीं साभिमान ऋषीचा । महिमा मंत्रसामर्थ्याचा । कोण जाणे ॥ ३६ ॥

(अस्त्रविद्येतल्या) मंत्रांच्या योगानेंच देवांची युध्दे होतात,मंत्र हेंच ऋषींचे भूषण आहे,मंत्रसामर्थ्याचा महिमा कोणाला कळणार ?

मंत्रीं पक्षी आटोपिती । मूशकें स्वापदें बांधती । मंत्रीं माहसर्प खिळिती । आणी धनलाभ ॥ ३७ ॥

मंत्राने पक्षी धरतात,उंदिर,वाघ इत्यादि बांधतात,मोठेमाठे सर्पसुध्दा जागच्याजागी खिळून टाकतात आणि द्रव्य प्राप्त करुन घेतात (सारे वायूंचें खेळ)

आतां असो हा प्रश्न जाला । बद्धाचा जन्म प्रत्यया आला । मागील प्रश्न फिटला । श्रोतयाचा ॥ ३८॥

बध्दाचा जन्म कसा होतो ह्याचा अनुभव आल्यामुळे हा प्रश्न संपला आणि श्रोत्यांची मागील आशंकाही फिटली.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहांतनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : संदेहवारण ॥ श्रीराम ॥**

ब्रह्म वारितां वारेना । ब्रह्म सारितां सारेना । ब्रह्म कांहीं वोसरेना । येकीकडे ॥ १ ॥

(प्रश्न)–ब्रह्म निवारण करावयास जावें तर त्यांचे निवारण होत नाही.सारावयास गेले तर सरत नाही,क्षणभरसुध्दां एका बाजूस होत नाहीं,

ब्रह्म भेदितां भेदेना । ब्रह्म छेदितां छेदेना । ब्रह्म परतें होयेना । केलें तरी ॥ २ ॥

ब्रह्माचा भेद होत नाही,तोडायला गेलें तर तुटत नाही व एकीकडे ढकलले तर एकीकडें जात नाही.

ब्रह्म खंडेना अखंड । ब्रह्मीं नाहीं दुसरें बंड । तरी कैसें हें ब्रह्मांड । सिरकलें मधें ॥ ३ ॥

ब्रह्म अखंड असल्यामुळे खंड पावत नाही,ब्रह्माच्या ठिकाणी दुसरेपणाचें बंड नाही,तर मग हें ब्रह्मांड मध्ये कसे शिरले (सिरकले) ?

पर्वत पाषाण सिळा सिखरें । नाना स्थळें स्थळांतरें । भूगोळरचना कोण्या प्रकारें । जालीं परब्रह्मीं ॥ ४ ॥

पर्वत,पाषाण,शिळा,शिखरें,अनेक स्थळे व स्थळांतरे इत्यादि पृथ्वीची रचना परब्रह्मामध्ये कशी झाली ?

भूगोळ आहे ब्रह्मामधें । ब्रह्म आहे भूगोळामधें । पाहातं येक येकामधें । प्रत्यक्ष दिसे ॥ ५ ॥

ब्रह्मामध्ये भूगोल आहे व भूगोलामध्ये ब्रह्म आहे,विचार केला तर ही एकमेकांत असलेली प्रत्यक्ष दिसतात.

ब्रह्मीं भूगोळें पैस केला । आणी भूगोळहि ब्रह्में भेदिला ।विचार पाहातां प्रत्यय आला ।प्रत्यक्ष आतां ॥६॥

ब्रह्मामध्ये भूगोलाने आपल्यापुरती जागा करुन घेतली व भूगोलाचाही ब्रह्मानें भेद केला (तें आंत शिरले) अशा प्रकारचा अनुभव विचार केला असता प्रत्यक्ष दिसून येतो.

ब्रह्में ब्रह्मांड भेदिलें । हें तों पाहतां नीटचि जालें । परी ब्रह्मास ब्रह्मांडें भेदिलें । हें विपरीत दिसे ॥ ७ ॥

ब्रह्मानें ब्रह्मांडाचा भेद केला हें म्हणणे विचारांती योग्य दिसतें,पण ब्रह्मांडानें ब्रह्माचा भेद केला हें म्हणणें विरुध्द दिसतें.

भेदिलें नाहीं म्हणावें । तरी ब्रह्मीं ब्रह्मांड स्वभावें । हें सकळांस अनुभवें । दिसत आहे ॥ ८ ॥

भेटले नाही म्हणावें तर ब्रह्मामध्यें ब्रह्मांड स्वाभाविकपणे असल्याचें सर्वांना स्पष्ट दिसत आहे.

तरी हें आतां कैसें जालें । विचारून पाहिजे बोलिलें । ऐसें श्रोतीं आक्षेपिलें । आक्षेपवचन ॥ ९ ॥

तेव्हा आता हें कसें झाले ह्याचा विचार करुन सांगितले पाहिजें,ह्याप्रमाणें शंका घेऊन ती श्रोत्यांनी विचारली.

आतां याचें प्रत्युत्तर । सावध ऐका निरोत्तर । येथें पडिले किं विचार । संदेहाची ॥ १० ॥

आतां ह्याचें उत्तर नीट स्तब्ध होऊन सावधपणे ऐका,कारण हे संशयाचें विचार आहेत.

ब्रह्मांड नाहीं म्हणो तरी दिसे । आणी दिसे म्हणो तरी नासे । आतां हें समजती कैसें । श्रोतेजन ॥ ११॥

ब्रह्मांड नाही म्हणावें तर दिसतें,दिसते म्हणावे तर मिथ्या आहे,आता ह्या श्रोत्यांची समजूत कशी पडेल ?

तंव श्रोते जाले उद्दित । आहों म्हणती सावचित्त । प्रसंगें बोलों उचित । प्रत्योत्तर ॥ १२ ॥

तेव्हा श्रोते उत्कंठित झाले,वक्ता म्हणतो,तुम्ही सावध असा,प्रसंगानुसार योग्य उत्तर देऊ.

आकाशीं दीपास लाविलें । दीपें आकाश परतें केलें । हें तों घडेना पाहिलें । पाहिजे श्रोतीं ॥ १३॥

उत्तर-आकाशामध्ये दिवा लावला म्हणून दिव्याने आकाश पलिकडे ढकलले असें होत नाही (तसेंच ब्रह्मांत ब्रह्मांड भासले म्हणून ब्रह्म अभंग अखंड आहे असें म्हणण्यास कोणताच प्रत्यवाय नाही) ह्याचा श्रोत्यांनी विचार केला पाहिजें.

आप तेज अथवा पवन । सारूं न सकती गगन । गगन पाहातां सघन । चळेल कैसें ॥ १४ ॥

आप,तेज,अथवा वायु ह्यांपैकी कोणीही आकाशाला बाजूला सारुं शकत नाहीत.आकाश पाहिले तर तें चोहींकडे घनदाट भरलेले आहें तें चळणार कसें ?

अथवा कठीण जाली मेदनी । तरी गगनें केली चाळणी । पृथ्वीचें सर्वांग भेदुनी राहिलें गगन ॥ १५ ॥

( मेदनी - पृथ्वी )

अथवा पृथ्वी कितीही कठिण असली तरी आकाश तिच्यांत शिरुन चाळणी करुन सोडतें,पृथ्वीचें सारें आंग भेदून आकाश राहिले आहे.(आकाशातच पृथ्वी,आप,तेज,वायु असूनही गगन हें सघन व अचल आहेंच कीं नाही ?)

याची प्रचित ऐसी असे । जें जडत्वा आलें तितुकें नासे । आकाश जैसें तैसें असे । चळणार नाहीं ॥ १६ ॥

ह्यांचें प्रत्यंतर हेंच,की जें जडत्व पावलें तें नाश पावतें,पण आकाश जसेंच्या तसेंच असतें व तें हालत नाही (ह्याची प्रचिती एवढीच पाहा की जें जडत्वाला येते तें नासतें,पण आकाश जसेच्या तसेंच अचळ अभेद्य आहे.)

वेगळेपण पाहावें । तयास आकाश म्हणावें । अभिन्न होतां स्वभावें । आकाश ब्रह्म ॥ १७ ॥

वेगळेपणाने पाहिल्यास जें (ब्रह्म) दिसतें त्याला आकाश म्हणतात,एकरुप झाले की तें आकाशच आपोआप ब्रह्म झाले आहे.(आकाशाहून एकच पायरी पलिकडची ब्रह्माची,वस्तूपासून वेगळे राहून पाहिले की तें आकाश,व वस्तूशी अभिन्न झाले की ते आकाशच ब्रह्म होय !

तस्मात आकाश चळेना । भेद गगनाचा कळेना । भासलें ब्रह्म तयास जाणा । आकाश म्हणावें ॥ १८ ॥

म्हणून आकाश हालत नाही,त्याचा भेद कळत नाही,भासलेले जें ब्रह्म त्याला आकाश म्हणावें,(कल्पनेला भासतें ते आकाश व निराभास निर्विकल्प आहें ते परब्रह्म)

निर्गुण ब्रह्मसें भासलें । कल्पूं जातां अनुमानलें । म्हणोन आकाश बोलिलें । कल्पनेसाठीं ॥ १९ ॥

निर्गुण ब्रह्म आहे असा भास झाला अशी कल्पना करु लागले असता त्याचें अनुमान करता आलें म्हणून ह्या कल्पनेंसाठींच त्याला आकाश म्हटलें.

कल्पनेसि भासे भास । तितुकें जाणावें आकाश । परब्रह्म निराभास । निर्विकल्प ॥ २० ॥

कल्पनेला जेवढा भास भासतो तेवढे आकाश आहे असे समजावें,परब्रह्म हें भ़ासरहित व कल्पनारहित आहें.

पंचभूतांमधें वास । म्हणौन बोलिजे आकाश । भूतांतरीं जो ब्रह्मांश । तेंचि गगन ॥ २१ ॥

तें पंचभूतांमध्ये राहाते म्हणून त्याला आकाश म्हणतात.भूतांमध्ये जो ब्रह्माचा अंश आहे तेंच आकाश होय.

प्रत्यक्ष होतें जातें । अचळ कैसें म्हणावें त्यातें । म्हणओनियां गगनातें । भेदिलें नाहीं ॥ २२ ॥

वायुपासून पृथ्वीपर्यंतची चार भूतें उत्पन्न होतात व लय पावतात,त्यांना अचल कसें म्हणता येईल ?म्हणून त्यांनी गगनाचा भेद केलाच नाही.

पृथ्वी विरोन उरे जीवन । जीवन नस्तां उरे अग्न । अग्न विझतां उरे पवन । तोहि नासे ॥ २३ ॥

पृथ्वी विरघळते व पाणी राहाते,पाणी आटून अग्नि राहातो,अग्नि विझून वायु उरतो व तोही शेवटी नाश पावतो (पण आकाश होत जात नाही हे तर प्रत्यक्ष दिसते म्हणून आकाश अचळ आहे.)

मिथ्या आलें आणी गेलें । तेणें खरें तें भंगलें । ऐसें हें प्रचितीस आलें । कोणेंपरी ॥२४॥

अशाप्रकारे मिथ्या आले व गेले आणि त्यायोगे ख-याचा भंग झाला ह्या म्हणण्याची प्रचीति यावी कशी ?(पण तसे आकास होत नाही व जात नाही  व चारी भूतें त्यांत झाली व गेली तरी आकाश भंगत नाही,आकाश भेदले जात नाही,तसें ब्रह्मी ब्रह्मांड भासले तरी ब्रह्म भेदत नाही ते अखंडच आहे.)

भ्रमें प्रत्यक्ष दिसतें । विचार पाहतां काय तेथें । भ्रममूळ या जगाअतें । खरें कैसें म्हणावें ॥२५॥

भ्रम़ाने ही चार भूते दिसली तरी विचार करुन पाहिल्यास त्यांत खरें काय आहे ? ह्या भ्रममूलक जगाला खरे कसे म्हणावे ?

भ्रम शोधितां कांहींच नाहीं । तेथें भेदिलें कोणें काई । भ्रमें भेदिलें म्हणतां ठाईं । भ्रमचि मिथ्या ॥२६॥

भ्रम म्हणजे काय हे पाहिले असता भ्रम म्हणजे काहीच नाही अशा ठिकाणी कोणी कोणाचा भेद केला ?भ्रमाने भेद केला म्हणावे तर तो भ्रमच मिथ्या आहे,

भ्रमाचें रूप मिथ्या जालें । मग सुखें म्हणावें भेदिलें । मूळीं लटिकें त्यानें केलें । तेंहि तैसें ॥ २७ ॥

भ्रमाचे रुप खोटे ठरल्यानंतर मग त्याने भेद केला असें खुशाल म्हणावें, मूळचे जे लटके त्याने केले तेंही तसेंच लटके.

लटिक्यानें उदंड केलें । तरी आमुचें काय गेलें । केलें म्हणतांच नाथिलें । शाहाणे जाणती ॥ २८ ॥

लटक्याने पुष्कळ केले म्हटले तरी त्यांत आमचें काय गेले ? लटक्याने केले असे म्हणताक्षणीच तें खोटे असे शहाणे समजतात.

सागरामधें खसखस । तैसें परब्रह्मीं दृश्य । मतिसारिखा मतिप्रकाश । अंतरीं वाढे ॥ २९ ॥

समुद्रात खसखशीचा दाणा तसें परब्रह्मामध्ये दृश्य आहें,बुध्दि वाढवावी तसतसा बुध्दीचा प्रकाश अंतःकरणामध्यें पडत जातो.(सांगरात खसखस तसें परब्रह्मी, हें दृश्य ब्रह्मांड आहें)

मती करितां विशाळ । कवळो लागे अंतराळ । पाहातां भासे ब्रह्मगोळ । कवीठ जैसें॥ ३० ॥

( कवीठ - कवठ )

बुध्दि जर विशाल केली (वाढविली) तर ती आकाशाचें आकलन करु लागतें,मग तिला हा ब्रह्मांडगोल कवठाप्रमाणे दिसू लागतो.

वृत्ति त्याहून विशाळ । करितां ब्रह्मांड बद्रिफळ । ब्रह्माकार होतां केवळ । कांहींच नाहीं ॥ ३१ ॥

( बद्रिफळ - बोर )

त्यापेक्षां वृत्ति (बुध्दि) वाढविल्यास ब्रह्मांड बोराएवढें दिसते आणि शुध्द ब्रह्माकार झाल्यावर काहींच नाही असें दिसून येईल.

आपण विवेकें विशाळला । मर्यादेवेगळा जाला । मग ब्रह्मगोळ देखिला । वटबीजन्यायें ॥ ३२ ॥

आपण विवेकानें वाढला,मर्यादेच्या बाहेर गेला म्हणजें त्याला वडाच्या बीजाएवढें ब्रह्मांड दिसतें.

होतां त्याहून विस्तीर्ण । वटबीज कोटीप्रमाण । आपाण होतां परिपूर्ण । कांहींच नाहीं ॥ ३३ ॥

त्याहूनही विशाल झाल्यास वटबीजाच्या कोट्यांश ब्रह्मांड दिसू लागेल आणि आपण केवळ परिपूर्ण ब्रह्माकार होतांच ब्रह्मांड म्हणून काहींच नाही असे होईल.

आपण भ्रमें लाहानाळला । केवळ देहधारी जाला । तरी मग ब्रह्मांड त्याला । कवळेल कैसें ॥ ३४ ॥

भ्रमानें आपण लहान झाला,केवळ देहधारी बनला मग त्याच्या बुध्दीला ब्रह्मांडाचे आकलन कसें होईल ?(आपण भ्रमे लहान देहधारी झालो म्हणून ब्रह्मांड कवळत नाहीं)

वृत्ती ऐसी वाढवावी । पसरून नाहींच करावी । पूर्णब्रह्मास पुरववी । चहूंकडे ॥ ३५ ॥

वृत्ति अशी वाढवावी कीं पसरतां पसरतां ती नाहीशी होईल, पूर्ण ब्रह्माला तिने चोहोकडून व्यापून टाकावें (इतकी ती विशाल करावी) (वृत्ति वाढवीत वाढवीत अमर्याद वाढवावी व वाढवून नाहीशी करावी व पूर्ण ब्रह्मास पुरवावी)

जंव येक सुवर्ण आणितां । तेणें ब्रह्मांड मढवितां । कैसे होईल तें तत्वतां । बरें पाहा ॥ ३६ ॥

एक गुंजभर सोने (सोन्याचा एक छोटासा पत्रा) घेऊन त्यानें सर्व ब्रह्मांड मढवू म्हटलें तर कसें होईल,ह्यांचा नीट विचार करा.

वस्तु वृत्तिस कवळे । तेणें वृत्ति फाटोन वितुळे । निर्गुण आत्माच निवळे । जैसा तैसा ॥ ३७ ॥

( वृत्ति फाटोन वितुळे - (ब्रह्म व्यापण्याच्या प्रयत्नात) वृत्ती फाटून नष्ट होते )

(वृत्ति परमात्मवस्तूचें आकलन करुं गेल्यास) वृत्तीला ब्रह्मांचे आकलन होत नाहीं,त्यामुळें वृत्ति फाटून लीन होऊन जातें आणि मग निर्गुण आत्माच जशाचा तसा उरतों (वस्तु वृत्तीला कवळतें व वृत्ति फाटून जातें आणि मग निर्गुण आत्माच उरतो)

येथें फिटली आशंका । श्रोते हो संदेह धरूं नका । अनुमान असेल तरी विवेका । अवलोकावें ॥ ३८ ॥

येथे शंकेचे निरसन झाले श्रोत्यांनो,येथे संशय धरु नका,अजून शंका असेल तर नीट विचारपूर्वक पाहा.

विवेकें तुटें अनुमान । विवेकें होये समाधान । विवेकें आत्मनिवेदन । मोक्ष लाभे ॥ ३९ ॥

विवेकाने अनुमान नाहीसे होऊन समाधान होतें व आत्मनिवेदन होऊन मोक्ष प्राप्त होतो.

केली मोक्षाची उपेक्षा । विवेकें सारिलें पूर्वपक्षा । सिद्धांत आत्मा प्रत्यक्षा । प्रमाण न लगे ॥ ४० ॥

मोक्षाची उपेक्षा करुन,विवेकाने पूर्वपक्ष उडविला त्यायागें सिध्दांत वस्तु जो आत्मा तो प्रचीतीस आला,त्याला आता प्रमाण नको (मोक्षही पूर्वपक्षांत गेला व सिध्दांतरुप आत्मा प्रत्यक्ष झाला आता प्रत्यक्षाला प्रमाण कशाला ?)

हे प्रचितीचीं उत्तरें । कळती सारासारविचारें । मननध्यासें साक्षात्कारें । पावन होईजे ॥ ४१ ॥

हे अनुभवाचें बोलणें आहे,सारासार विचार केल्यास हें कळेल आणि त्यांचे मनन करुन निदिध्यास केल्यास साक्षात्कार होऊन साधक पावन होईल (विचारानें,मननध्यासाने साक्षात्कार होतो)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे संदेहवारणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : स्थितिनिरूपण ॥ श्रीराम ॥**

(बहिरंग साधनापेक्षा अंतरंग साधनानें अंतर्निष्ठ होण्यातच व निर्गुण ब्रह्मानुभव घेण्यातच जन्माची खरी सफलता आहे.बाह्यात्कार पुष्कळ केला त्यानें लौकिक वाढेल,म्हणून अंतर्निष्ठांची योग्यता येईल काय.)

देउळामधें जगन्नायेक । आणी देवळावरी बैसला काक । परी तो देवाहुन अधिक । म्हणों नये कीं ॥ १ ॥

देवळाच्या आंत देव असतो व देवळावर कावळा येऊन बसला म्हणून त्या कावळ्याला थोर म्हणावयाचें नाही (थोर म्हणू नयें)

सभा बैसली राजद्वारीं । आणी मर्कट गेलें स्तंभावरी । परी तें सभेहून श्रेष्ठ चतुरीं । कैसे मानावें ॥ २ ॥

सभा राजदरबारांत भरली आहे व माकड खांबावर जाऊन बसलें म्हणून सभेहून माकड श्रेष्ठ होय असें सुज्ञांनी कसे मानावे ?

ब्रह्मण स्नान करून गेले । आणी बक तैसेचि बैसले । परी ते ब्रह्मणपरीस भले । कैसे मानावे ॥ ३ ॥

ब्राह्मण स्नानसंध्या उरकून गेले आणि बगळे नदीकाठांवर तसेच (ध्यानस्थ) बसले म्हणून तें श्रेष्ठ होत नाहीत (त्यांना ब्राह्मणापेक्षा चांगले कसे मानावे ?)

ब्रह्मणामधें कोणी नेमस्त । कोणी जाले अव्यावेस्त । आणी स्वान सदा ध्यानस्त । परी तें उत्तम नव्हे ॥ ४ ॥

ब्राह्मणांमध्ये कोणी नियमीत वागणारे तर कोणी अव्यवस्थित वागणारे असतात आणि कुत्रे नेहमी ध्यानस्थ बसलेले दिसतें म्हणून त्याला ब्राह्मणांपेक्षा उत्तम म्हणतां येणार नाहीं.

ब्राह्मण लक्षमुद्रा नेणें । मार्जर लक्षविषईं शाहाणें । परी ब्रह्मणापरीस विशेष कोणें । म्हणावें तयासी॥५॥

ब्राह्मणाला एकाग्र ध्यान ठाऊक नाही आणि मांजर टक लावून बसण्यात हुशार असते म्हणून ते ब्राह्मणापेक्षा श्रेष्ठ आहे असे कोण म्हणणार ?

ब्रह्मण पाहे भेदाभेद । मक्षिका सर्वांस अभेद । परी तीस जाला ज्ञानबोध । हें तों न घडे कीं ॥ ६ ॥

ब्राह्मण भेदाभेद पाहातो व माशी सर्वत्र अभेद भावाने वावरतें म्हणून तिला आत्मज्ञान झाले असें होत नाही.

उंच वस्त्रें नीच ल्याला । आणी समर्थ उघडाच बैसला । परी तो आहे परिक्षिला । परीक्षवंतीं ॥ ७ ॥

क्षुद्र माणसाने आंगावर उंची वस्त्रे घातली व थोर मनुष्य उघडाच बसलेला असला तरी जाणते आहेत ते त्यांची परीक्षा करितात.

बाह्याकार केला अधिक । परी तो अवघा लोकिक । येथें पाहिजे मुख्य येक । अंतरनिष्ठा ॥ ८ ॥

बाहेरचा देखावा कितीही केला तरी तो सगळा लौकिकी होय ह्या ठिकाणी मुख्य एक अतर्निष्ठा पाहिजें.

लोकिक बरा संपादिला । परी अंतरीं सावध नाहीं जाला । मुख्य देवास चुकला । तो आत्मघातकी ॥ ९ ॥

तात्पर्य,लौकिक चांगला संपादन केला,अंतःकरणात सावधपणा ठेविला नाही व तेणेंकरुन मुख्य देवाला चुकला तर तो आत्मघातकी होय.

देवास भजतां देवलोक । पित्रांस भजतां पित्रलोक । भूतांस भजतां भूतलोक । पाविजेतो ॥ १० ॥

देवाचें भजन केले असता (देवभक्ति केली असतां) देवलोक,पितराची भक्ति (पितृपूजा) केली असता पितृलोक व भूतांची भक्ति-पूजा केली असता भूतलोक प्राप्त होतो.

जेणें जयास भजावें । तेणें त्या लोकासी जावें । निर्गुणीं भजतां व्हावें । निर्गुणचि स्वयें ॥ ११ ॥

जो ज्याला भजेल तो त्या लोकाला जाईल.निर्गुणाचें भजन केले असता स्वतः निर्गुणच होतो (ज्याचें भजन करावे तदाकारता प्राप्त होते)

निर्गुणाचें कैसें भजन । निर्गुणीं असावें अनन्य । अनन्य होतां होईजे धन्य । निश्चयेंसीं ॥ १२ ॥

( धन्य - मोक्ष )

निर्गुणाचे भजन कसें करावे ?तर निर्गुणाच्या ठिकाणी अनन्य म्हणजें एकरुप व्हावें,अनन्य झाल्यास निश्र्चयेकरुन धन्य होईल.

सकळ केलियाचें सार्थक । देव वोळखावा येक । आपण कोण हा विवेक । पाहिला पाहिजे ॥ १३ ॥

देव एक आहे तो ओळखावा व आपण कोण हा विचार करावा म्हणजे सगळी साधनें केल्याचें सार्थक होते.(मुख्य देवाची म्हणजे निर्गुण ब्रह्माची उपासना केल्यानें निर्गुण पद मिळतें,निर्गुणाची उपासना म्ह.निर्गुणाशी अनन्य होणें,तो एक देव ओळखून त्याशी अनन्य होणे हेंच जन्माचें साफल्य होय.)

देव पाहातां निराकार । आपला तो माईक विचार । सोहं आत्मा हा निर्धार । बाणोन गेला ॥ १४ ॥

विचार केला असता देव निराकार आहे व आपण (देहबुध्दि धारण केलेला जीव) मिथ्या,तो निराकार,आत्माच मी असा निश्र्चय अंतःकरणात बाणला (आपला मायिक विचार म्ह.देहबुध्दि सोडून निराकार निर्गुण परब्रह्माशी सोऽहं आत्मा ह्या निर्धाराने एकरस व्हावें)

आतां अनुमान तो काई । वस्तु आहे वस्तुचा ठाईं । देहभाव कांहींच नाहीं । धांडोळितां ॥ १५ ॥

अशाप्रकारे आपण ब्रह्म आहोत असा निश्र्चय बाणल्यानंतर मग आतां शंका कसली ? ब्रह्म आपल्या ठिकाणी आहेच व देहभावाचा शोध घेतल्यास तोही मिथ्याच (देहच आपण नाही मग देहभाव कुठला ?वस्तु ठायीच्या ठायींच आहे.)

सिद्धास आणी साधन । हा तों अवघाच अनुमान । मुक्तास आणी बंधन । आडळेना ॥ १६ ॥

सिध्दाला आणखी साधन! हे बोलणेच सगळें वायफळ,मुक्ताला आणखी बंधन! असे कोठे सापडत नाही.(सिध्द व साधन,मुक्त व बंधन हें सारे अनुमानांत गेले)

साधनें जें कांहीं साधावें । तें तों आपणचि स्वभावें । आतां साधकाच्या नावें । सुन्याकार ॥ १७ ॥

साधनाने जे काही साध्य करुन घ्यावयाचें तें तो मुळचा स्वतः असतो,म्हणून आता त्याच्या ठिकाणी साधकाच्या स्थितीच्या नावानें पुज्य असतें (साधनांनी जें साधायचें ते आपणच आहोत आता साधनपण संपले)

कुल्लाळ पावला राजपदवी ।आतां रासभें कासया राखावी ।कुल्लाळपणाची उठाठेवी ।कासया पाहिजे ॥१८॥

कुंभार राजाच्या सिंहासनावर बसल्यानंतर त्याने गाढवे कशाला राखावी ? कुंभाराच्या धंद्याची उठाठेव करुन त्याला काय करावयाचें आहे ?(कुंभाराला राज्यपदवी मिळाल्यानंतर तो गाढवें हाकण्याचा धंदा कशाला करील ?)

तैसा अवघा वृत्तीभाव । नाना साधनांचा उपाव । साध्य जालियां कैंचा ठाव । साधनांसी ॥ १९ ॥

तद्वत सर्व साधनांचे जे उपाय आहेत ते वृत्तींतील असल्यामुळे साध्य, निवृत्तिपद झाल्यानंतर साधने राहातात कोठे ?(तद्वत सगळ्या वृत्तींचा जो भाव म्हणजें आत्मा व अनेक साधनांचे जें साधन असे ब्रह्म ही प्राप्त झाल्यानंतर मग साधने राहातात कोठे ?)

साधनें काये साधावें । नेमें काये फळ घ्यावें । आपण वस्तु भरंगळावें । कासयासी ॥ २० ॥

साधनाने काय साधावे ?नेम धरुन कोणते फळ मिळवावयाचें ? (नित्यनेमादि साधनांनी साधायचें आतां काय उरलें आहे ?) आपण ब्रह्मरुप झाल्यावर उगीच काय म्हणून भटकावें ?

देह तरी पांचा भूतांचा । जीव तरी अंश ब्रह्मींचा । परमात्मा तरी अनन्याचा । ठाव पाहा ॥ २१ ॥

देह पाहिला तर पंचभूतांचा आहे,जीव पाहिला तर ब्रह्माचा अंश आहे व परमात्मा पहावयाचा तर अनन्यपणाचा शोध घ्यावा (देहपंचभूतांचा,जीव अंश ब्रह्माचा,हें जाणून परब्रह्मी अनन्य व्हावें)

उगेंचि पाहातां मीपण दिसे । शोध घेतां कांहींच नसे । तत्वें तत्व निरसे । पुढें निखळ आत्मा ॥ २२ ॥

वरवर पाहू लागले तर मीपण दिसते पण नीट शोध केला तर मीपण मिथ्या असून (काहीच नसून) तत्वाने तत्वांचा निरास झाला म्हणजें पुढें शुध्द आत्माच उरतो.

आत्मा आहे आत्मपणें । जीव आहे जीवपणें । माया आहे मायापणें । विस्तारली ॥ २३ ॥

आत्मा आत्मपणानें आहे ,जीवही जीवपणानें आहें व माया मायापणानें विस्तारली आहें.

ऐसें अवघेंचि आहे । आणी आपण हि कोणीयेक आहे । हें सकळ शोधून पाहे । तोचि ज्ञानी ॥ २४ ॥

असे हें सगळेच आहे आणि आपणही कोणीएक आहो पण ह्या सगळ्याचा शोध नीट घेऊन पाहील तो ज्ञानी होय.

शोधूं जाणें सकळांसी। परी पाहों नेणे आपणासी । ऐक ज्ञानी येकदेसी । वृत्तिरूपें ॥ २५ ॥

सर्वांचा शोध घेण्याची माहिती आहे पण (सर्वांचा शोध घेणारा जो) आपण त्याला स्वतःला काही पाहांता येत नाही असा जो ज्ञानी असतो तो ऐकदेशी व वृत्तिरुप असतो (सर्वास शोधतील पण आपणास पाहाणार नाहीत,वृत्ति शिल्लक ठेऊन म्ह.एकदेशी होऊन ब्रह्म पाहू जाणारे दृश्य उडवून द्रष्टेपणाने राहाणारे ज्ञानी पुष्कळ आहेत पण हि द्रष्टेपणाची म्ह.साक्षित्वाची वृत्तिसुध्दा सोडली पाहिजें)

तें वृत्तिरूप जरी पाहिलें । तरी मग कांहींच नाहीं राहिलें । प्रकृतिनिरासें अवघेंचि गेलें । विकारवंत ॥२६॥

त्या वृत्तीच्या रुपाचा विचार केला म्हणजें मग दृश्य काहींच उरत नाही,आणि अष्टधा प्रकृतीचा निरास झाला कीं,जे जे विकार पावणारे ते तें नाश पावतें (वृत्तीकडे पाहिले की,काहींच उरत नाही)

उरलें तें निखळ निर्गुण । विवंचितां तेंचि आपण । ऐसी हे परमार्थाची खूण । अगाध आहे ॥ २७ ॥

नंतर जें उरलें ते शुध्द निर्गुण ब्रह्म होय.त्याचा विचार केला तर तेंच आपण असा हा परमार्थाचा विचार खोल आहे.(ह्याप्रमाणें प्रकृतिनिरास करिंता निव्वळ निर्गुण ब्रह्म उरतें त्याशी अनन्य व्हावें ही परमार्थाची गहन खूण़ आहे,येथे जाणारा विरळा).

फळ येक आपण येक । ऐसा नाहीं हा विवेक । फळाचें फळ कोणीयेक । स्वयेंचि होईजे ॥ २८ ॥

फळ वेगळे व आपण वेगळा (आत्मज्ञानाचें फळ मुक्ति व मुक्तीचा उपभोग घेणारा आपण) असा निराळेपणाचा विचार तेथें नाही तर आपण स्वतः फळाचें फळ (मुक्तिलाही मुक्ति) देणारें झाले पाहिजें.(आपण वेगळें व फळ वेगळें असा दुजाभाव इतर मार्गांत असतो पण ह्या परमार्थात आपण फळाचें फळ आहोत-परमार्थांचे फळ मुक्ति,पण येथे आपण मुक्तीला मुक्तिपद देणारे आहोंत.

रंक होता राजा जाला । वरें पाहातां प्रत्यय आला । रंकपणाचा गल्बला । रंकीं करावा ॥ २९ ॥

भिकारी (रंक) होता तो राजा झाला,नीट विचारपूर्वक पाहिल्यावर तसा अनुभवही आला,मग भिकारीपणाचें चाळे भिका-याने करावे.(रंकाचा राजा झाला,आतां तो रंकपणाचा बाजार कशाला मांडील ?रंकानी रंकपणांचा गलबला करावा,हा सुटला)

वेद शास्त्रें पुराणें । नाना साधनें निरूपणें । सिद्ध साधु ज्याकारणें । नाना सायास करिती ॥ ३० ॥

वेद,शास्त्रे,पुराणे,अनेक प्रकारची साधनें,निरुपणें इत्यादिकांच्या अनेक खटपटी सिध्द आणि साधु ज्या करितां करतात.

तें ब्रह्मरूप आपणचि आंगें । सारासारविचारप्रसंगें । करणें न करणें वाउगें । कांहींच नाहीं ॥ ३१ ॥

तें ब्रह्म सारासारविचाराच्या योगानें आपण स्वतः झालो,मग करणें किंवा न करणे ही दोन्ही राहिली नाहीत,सगळे व्यर्थ.

रंक राजआज्ञासि भ्यालें । तेंचि पुढें राजा जालें । मग तें भयेचि उडालें । रंकपणासरिसें ॥ ३२ ॥

भिकारी राजाच्या हुकमाला भीत होता पण तो पुढें स्वतःच राजा झाला,अर्थात भिकारपणाबरोबर भीति नाहीशी झाली (रंकपणा गेला व भयही उडाले)

वेदें वेदाज्ञेनें चालावें सच्छास्त्रें शास्त्र अभ्यासावें । तीर्थें तीर्थास जावें । कोण्या प्रकारें ॥ ३३ ॥

वेदानें वेदाच्या आज्ञेप्रमाणें कसे चालावें ?सच्छास्त्रान सच्छास्त्राचा अभ्यास कसा करावा ?तीर्थानें तीर्थयात्रा कशी करावी ?(वेदाला वेदाज्ञा कशाला पाहिजें ?ब्रह्मविद्येला ब्रह्मविद्येचा अभ्यास करण्याचे प्रयोजन काय ? आत्मशुध्दीसाठी तीर्थाला तीर्थयात्रा करायला कशाला हवी ?)

अमृतें सेवावें अमृत । अनंतें पाहावा अनंत । भगवंतें लक्षावा भगवंत । कोणा प्रकारें ॥ ३४ ॥

अमृताने अमृतपान कसे करावे ?अनंताने अनंत कसा पाहावा ?अमृताला आता अमृत सेवायला नको,अनंताला अनंत पाहायला नको,भगवंताने भगवंताचा विचार कसा करावा ?

संत असंत त्यागावे । निर्गुणें निर्गुणासी भंगावें । स्वरूपें स्वरूपीं रंगावें । कोण्या प्रकारें ॥ ३५ ॥

सत्य स्वरुपानें सत्य स्वरुपाचा त्याग कसा करायचा ?निर्गुणानें निर्गुणाचा भंग कसा करावा ?आणि स्वरुपानें स्वरुपाच्या ठिकाणी कसें रममाण व्हावें ?(संताला असंत टाकायला नकों,निर्गुणाला निर्गुणपणाची भूक नको,स्वरुपाला आत्मरंगासाठी स्वरुप व्हावयाला नको.)

अंजनें ल्यावें अंजन । धनें साधावें धन । निरंजनें निरंजन । कैसें अनुभवावें ॥ ३६ ॥

अंजनाने अंजन घालणे,द्रव्याने द्रव्य मिळविणे व निरंजनाने निरंजनाचा अनुभव घेणें हें कसे घडेल ?

साध्य करावें साधनासी । ध्येयें धरावें ध्यानासी । उन्मनें आवरावें मनासी । कोण्या प्रकारें ॥ ३७ ॥

( ध्येयें - ध्येयाने स्वतःचे ध्यान कसे करावे ? )

साध्यानें साधन कसे करावे ? ध्येयानें ध्यान कसे करावे ? उन्मनाने मन कसे आवरावे ?(साध्याला साधन,किंवा ध्येयाला ध्यान उन्मनाला मनोजय हे काही एक उरले नाही.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे स्थितिनिरूपणनाम समास दहावा ॥**

**नाना शास्त्रं पठेल्लोको नाना दैवतपूजनम। आत्मज्ञानं विना पार्थ सर्व कर्म निरर्थकम । नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्वस्यं योगसंसिद्धः कालेनात्त्मनि विन्दति ।।**
**॥ दशक नववा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक दहावा - जगज्योतीचा

**दशक दहावा जगज्योतीचा (५७८ - ६२९)**

**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक दहावा : जगज्जोतीनाम समास पहिला : अंतःकरणैकनिरुपण॥ श्रीराम ॥**

सकळांचे अंतःकरण येक । किंवा येक नव्हे अनेक । ऐसें हे निश्चयात्मक । मज निरोपावें ॥ १ ॥

प्रश्न-सर्वांचे अंत:करण एक आहे की एक नसून ती (अंत:करणें) अनेक आहेत हे मला निश्र्चयात्मक सांगावे,असे श्रोत्यांनी विचारले.

ऐसें श्रोतयानें पुसिलें । अंतःकरण येक किं वेगळालें । याचे उत्तर ऐकिलें पाहिजे श्रोतीं ॥ २ ॥

तेव्हा अंत:करण एक आहे की तीं निरनिराळी आहेत ह्याचें उत्तर श्रोत्यांनी ऐकले पाहिजे.

समस्तांचे अंतःकर्ण येक निश्चयो जाणावा नेमक । हा प्रत्ययाचा विवेक । तुज निरोपिला ॥ ३ ॥

उत्तर- सर्वांचे अंत:करण एक आहे हा अगदी पक्का निश्र्चय आहे,हा अनुभवाचा विचार तुला सांगितला (सकळांचे अंत:करण एक हाच निश्र्चय)

श्रोता म्हणे वक्तयासी । अंतःकरण येक समस्तांसी । तरी मिळेना येकायेकासी । काये निमित्य ॥ ४ ॥

प्रश्न-श्रोता वक्त्याला म्हणाला,की सर्वांचे अंत:करण एक आहें,तर एकाचे अंत:करण एकाला कां मिळत नाही ?

येक जेवितां अवघे धाले । येक निवतां अवघे निवाले । येक मरतां अवघे मेले । पाहिजेत कीं ॥ ५ ॥

( अवघे धाले - सर्व तृप्त झाले )

एक जेवला की सगळे (घाले) तृप्त व्हावें,एकाचे समाधान झाले (निवतां) की सर्वांचे समाधान व्हावे,एक मेला की सगळे मरावें असे झाले पाहिजे.

येक सुखी येक दुःखी । ऐसें वर्ततें लोकिकीं । येका अंतःकरणाची वोळखी । कैसी जाणावी ॥ ६ ॥

एक सुखी व एक दु:खी दिसतो असे लोकांत दृष्टीस पडतें,मग सर्वांचे अंत:करण एक म्हणून कशावरुन म्हणावें ?

जनीं वेगळाली भावना । कोणास कोणीच मिळेना । म्हणौन हें अनुमाना । येत नाही ॥ ७ ॥

लोकांमध्ये प्रत्येकाची भावना निरनिराळी आहे,कोणांची कोणाला मिळत नाही म्हणून आपले म्हणणे मनाला पटत नाही.

अंतःकरण येक असतें । तरी येकाचें येकास कळों येतें । कांहीं चोरितांच न येतें । गौप्य गुह्य ॥ ८ ॥

अंतःकरण जर एक असतें तर एकाचें विचार एकाला कळून येतें मग काही गुप्त गोष्ट चोरुन ठेवता आलीच नसती (मग कोणालाच कोणाहीपासून काही गुह्य चोरुन ठेवता आले नसतें)

याकरणें अनुमानेना । अंतःकरण येक हें घडेना । विरोध लागला जना । काये निमित्य ॥ ९ ॥

म्हणून आपले म्हणणे मान्य होत नाही,अंतःकरण एक असेलसे वाटत नाही (असे असते तर) लोकांमध्ये विरोध काय म्हणून असता ?

सर्प डसाया येतो । प्राणी भेऊन पळतो । येक अंतःकरण तेरी तो । विरोध नसावा ॥ १० ॥

साप चावायला येतो व प्राणी भिऊन पळतो तोही समजूनच,एक अंतःकरण असतें तर हा विरोध दिसला नसता.(तात्पर्य,सकळांचे अंतःकरण एक असतें तर हा विरोध दिसला नसता.(तात्पर्य,सकळांचे अंतःकरण एक हें मला पटत नाही.)

ऐसी श्रोतयांची आशंका । वक्ता म्हणे चळों नका । सावध होऊन ऐका । निरूपण ॥ ११ ॥

अशी श्रोत्यांची शंका ऐकून वक्ता म्हणाला,कीं चंचल न होतां सावधपणानें निरुपण ऐका.

अंतःकर्ण म्हणिजे जाणीव । जाणिव जाणता स्वभाव । देहरक्षणाचा उपाव । जाणती कळा ॥ १२ ॥

उत्तर-बाबारें!अंतःकरण म्हणजें जाणीव व जाणीव म्हणजें जाणता (समजणारा) स्वभाव,ह्या जाणतेपणाच्या कलेच्या योगानेंच देहाचें संरक्षण करतां येतें.

सर्प जाणोन डंखूं आला । प्राणी जाणोन पळाला । दोहींकडे जाणीवेला । बरें पाहा ॥ १३ ॥

साप समजून उमजून चावायला येतो व प्राणी पळतो तोही समजूनच,दोन्हीकडेही जाणीव असते.हे विचार करुन पाहा.

दोहींकडे जाणीवेसी पाहिलें । तरी अंतःकर्ण येकचि जालें । विचारितां प्रत्यया आलें । जाणीवरूपें ॥ १४ ॥

दोन्हीकडे जाणीव दृष्टीस पडली तर जाणीवरुपाने अंतःकरण एकच आहे. असे अनुभवास येईल.

जाणीवरूपें अंतःकर्ण । सकळांचे येक हें प्रमाण । जीवमात्रास जाणपण । येकचि असे ॥ १५ ॥

जाणीवरुपाने अंत:करण एक असल्याचें सिध्दच आहे. जीवमात्राला जाणपण (जाणीव) असें एकच आहें (जीवमात्रास जाणीवरुपाने अंत:करण एकच आहे)

येके दृष्टीचें देखणें । येके जिव्हेचें चाखणें । ऐकणें स्पर्शणें वास घेणें । सर्वत्रास येक ॥ १६ ॥

दृष्टीचें देखणें,जिभेचें चाखणें,ऐकणें,स्पर्श करणें,वास घेणें सर्वांना मिळून जाणीव कळा एकच आहे.

पशु पक्षी किडा मुंगी । जीवमात्र निर्माण जगीं । जाणीवकळा सर्वांलागीं । येकचि आहे ॥ १७ ॥

पशु,पक्षी,किडा,मुगी आदिकरुन जेवढे जीव जगांत निर्माण झालें आहेंत त्या सर्वांना मिळून जाणीव कळा एकच आहें. (डोळ्यांनी पाहाणें,जिव्हेनें स्वाद घेणें,ऐकणे,स्पर्शणें) हे सर्व पशुपक्षी,किडामुंगी सर्व निर्माण झालेल्या प्राणांस जाणीवरुपानें एकच आहे)

सर्वांस जळ तें सीतळ । सर्वांस अग्नि तेजाळ । सर्वांस अंतःकर्ण केवळ । जाणीव कळा ॥ १८ ॥

सर्वांनाच पाणी थंड असतें,अग्नि हा सर्वांना सारखाच दाहक आहे त्याप्रमाणें सर्वाना अंत:करण हीच  एक जाणीव कळा होय.

आवडे नावडे ऐसें जालें । तरी हें देहस्वभावावरी गेलें । परंतु हें कळों आलें । अंतःकर्णयोगें ॥ १९ ॥

आवडनावड उत्पन्न झाली ती देहस्वभावामुळें झाली,परंतु जें कळतें ते अंत:करणामुळें कळतें.

सर्वांचे अंतःकर्ण येक । ऐसा निश्चयो निश्चयात्मक । जाणती याचें कौतुक । चहुंकडे ॥ २० ॥

तात्पर्य,सर्वांचे अंत:करण म्ह.जाणीव एक आहें हा निश्र्चय पक्का समजावा.ह्याचा अनुभव चोहोंकडें येतो.

इतुकेन फिटली आशंका । आतां अनुमान करूं नका । जाणणें तितुकें येका । अंतःकर्णाचें ॥ २१ ॥

एवढयाने शंका फिटली,जाणणे म्हणून जेवढें आहे तेवढें सर्व एका अंत:करणाचे होय,ह्याविषयी आंता संशय घेऊ नका.

जाणोन जीव चारा घेती । जाणोन भिती लपती । जाणोनियां पळोन जाती । प्राणीमात्र ॥ २२ ॥

जीव चारा खातात तो समजून खातात,प्राणीमात्र भितात,लपतात किंवा पळून जातात तें जाणूनच.

किडामुंगीपासून ब्रह्मादिक । समस्तां अंतःकर्ण येक । ये गोष्टीचें कौतुक । प्रत्यें जाणावें ॥ २३ ॥

अशा रीतीनें किडामुंगीपासून ब्रह्मादिदेवांपर्यंत सर्वांचे अंतःकरण एक आहे,ह्या गोष्टीचा चमत्कार अनुभवानें पाहून घ्यावा.

थोर लहान तरी अग्नी । थोडें बहु तरी पाणी । न्यून पूर्ण तरी प्राणी । अंतःकर्णें जाणती ॥ २४ ॥

ठिणगी मोठी (प्रळयाग्नि) किंवा लहान असली तरी अग्नींच,थोडें (पंचपात्रीभर) किंवा पुष्कळ (समुद्र) असलें तरी तें पाणीच तद्वत कमी किंवा जास्त-काहीतरी-प्रमाणात प्राणी अंतःकरणानेंच जाणतात.

कोठें उणें कोठें अधीक । परंतु जिनसमासला येक । जंगम प्राणी कोणीयेक । जाटिल्याविण नाहीं ॥ २५ ॥

( जाटिल्याविण - जाणीवेशिवाय )

कोठें कमी असतें,कोठें अधिक असतें,परंतु नमुना (जिन्नस-मासला) एकच कोणताही सजीव प्राणी जाणीवेवांचून नाही (पण जाणपणावाचून प्राणी नाही)

जाणीव म्हणिजे अंतःकर्ण । अंतःकर्ण विष्णूचा अंश जाण । विष्णु करितो पाळण । येणें प्रकारें ॥ २६ ॥

जाणीव म्हणजें अंतःकरण (म्ह.सत्वगुण) व अंतःकरण विष्णूचा अंश आहे.ह्या अंतःकरणाच्या योगानेंच विष्णु सर्व जगाचें पालन करतो (म्हणून जाणीवरुपानें विष्णु सकलांचे परिपालन करतों.)

नेणतां प्राणी संव्हारितो । नेणीव तमोगुण बोलिजेतो । तमोगुणें रुद्र संव्हारितो । येणें प्रकारें ॥ २७ ॥

न जाणल्यामुळे प्राण्याचा नाश होतो,ह्या नेणीवेला तमोगुण म्हणतात,अशा प्रकारें रुद्र हा तमोगुणाच्या साहाय्याने संहार करतो.

कांही जाणीव कांही नेणीव । हा रजोगुणाचा स्वभाव । जाणतां नेणतां जीव । जन्मास येती ॥ २८ ॥

काही जाणीव काही नेणीव (जाणीव-नेणीव मिश्रित) असा रजोगुणाचा स्वभाव होय व रजोगुणामुळे प्राणी जन्मास येतो (म्हणून ब्रह्मा निर्माण करितो असे म्हणतात)

जाणीवेनें होतें सुख । नेणीवेनें होतें दुःख । सुखदुःख अवश्यक । उत्पत्तिगुणें ॥ २९ ॥

जाणीवेच्या योगाने सुख होतें व नेणीवेमुळे दुःख होतें.उत्पत्तीमुळे म्हणजें जन्मामुळें सुखदुःख हे भोगावे लागतें.

जाणण्यानेणण्याची बुद्धि । तोंचि देहीं जाणावा विधी । स्थूळ देहीं ब्रह्मा त्रिशुद्धि । उत्पत्तिकर्ता ॥ ३० ॥

( त्रिशुद्धि - निश्चयेकरून )

जाणीव-नेणीव ह्या मिश्रणाची जी बुध्दि ती देहामधला ब्रह्मदेव होय, अशाप्रकारे स्थूल देहाच्या ठिकाणी उत्पत्ति करणारा ब्रह्मदेव आहे खास (स्थूल देहाचा निर्माता निश्र्चयानें त्रिशुध्दि ब्रह्माच होय.)

ऐसा उत्पत्ति स्थिति संहार । प्रसंगें बोलिला विचार । परंतु याचा निर्धार । प्रत्यें पाहावा ॥ ३१ ॥

अशा प्रकारे उत्पत्ति,स्थिती व संहार हें विकार कसें होतात हें प्रसंगानुसार सांगितलें,पण ह्याचा निश्र्चय अनुभवानें करावा.(अंतःकरण म्ह.जाणीव व जाणीव सकळांचें एकच हें सांगण्याच्या प्रसंगानें उत्पत्ति-स्थिति-संहाराचा म्ह.ब्रह्मा-विण्णु-महेशांना आपल्या देहांत ओळखण्याचा उपायही सांगितला गेला.त्याचा ज्याचा त्यानें आपल्याशी विचार करुन प्रत्यय पाहावा)

**चैतन्यमयी आत्मा नित्य,अक्षय,अखंड,अविकारी ,अद्वय असाच असतो,तो चैत्यनमयी आत्मा स्थानत्रयव्यतिरिक्तत्वं,नित्यत्वं,शुद्धत्वं,बुद्धत्वं,मुक्तत्वं,अविक्रीयत्वं,अपरिलुप्त-दृकस्वरूपत्वं एकत्वं असा असतो.**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अंतःकर्णयेकनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : देहआशंकानिरूपण ॥ श्रीराम ॥**

स्वामीनें विचार दखविला । येथें विष्णूचा अभाव दिसोन आला । ब्रह्मा विष्णु महेशाला ।उरी नाहीं ॥ १ ॥

प्रश्र्न-महाराजांनी जो विचार सांगितला त्यांत तर विष्णूंचा अभाव दिसून येतो,ब्रह्मा,विष्णु,महेश ह्यांचा पत्ताच (उरी) नाही (हे देवच उत्पत्ति-स्थिती,संहाररुप ठरल्यानें उडून जातात.)

उप्तत्ति स्थिति संव्हार । ब्रह्मा विष्णु महेश्वर । याचा पाहातां विचार । प्रत्ययो नाहीं ॥ २ ॥

उत्पत्ति-स्थिति,संहार व ब्रह्मा,विष्णु,महेश ह्यांचा विचार पाहू गेले तर अनुभव येत नाही.

ब्रह्मा उत्पत्तिकर्ता चौंमुखांचा । येथें प्रत्ययो नाहीं त्याचा । पाळणकर्ता विष्णु चौभुजांचा । तो हि ऐकोन जाणों ॥ ३ ॥

उत्पन्न करणारा ब्रह्मदेव चारमुखांचा आहे,देहांत त्याचा अनुभव येत नाही,पालन करणारा चार हातांचा विष्णु तो सुध्दा ऐकूनच ठाऊक आहे.

महेश संव्हार करितो । हाहि प्रत्यय कैसा येतो । लिंगमहिमा पुराणीं तो । विपरीत बोलिला ॥ ४ ॥

शंकर सुध्दा संहार करतो ह्याचा अनुभव कसा घ्यावयाचा ? पुराणांमध्ये लिंगमहिमा निराळाच (उलट) सांगितला आहे.

मूळमायेस कोणें केलें । हें तों पाहिजे कळलें । तिहीं देवांचें रूप जालें । ऐलिकडे ॥ ५॥

मूळ मायेला कोणी उत्पन्न केले हे सगळे कळले पाहिजे ना ?तिन्ही देवांची रुपें तिच्या अलीकडची आहेत.

मूळमाया लोकजननी । तयेपासून गुणक्षोभिणी । गुणक्षोभिणीपासून त्रिगुणी । जन्म देवां ॥ ६ ॥

( जन्म देवा - ब्रह्मा , विष्णु ,महेश यांचा जन्म )

सर्व लोकांची जी जननी मूळमाया तिच्यापासून गुणक्षोभिणी झाली,त्या गुणक्षोभिणीपासून ब्रह्मा,विष्णु, महेश्वर ह्या त्रिगुणात्मक देवांचा जन्म झाला.( मूळ मायेपासून गुणमाया झाली व तिच्यापासून त्रिगुणात्मक तीन देव झाले असें शास्त्राकार व परंपरेचे लोक सांगतात.पण मूळ मायेलाच कोणी केले हे सांगत नाहीत,प्रत्ययाचे तर कोणीच बोलत नाहीत.)

ऐसें बोलती शास्त्रकारक । आणि प्रवृत्तीचेहि लोक । प्रत्ययें पुसतां कित्येक । अकांत करिती ॥ ७ ॥

( प्रवृत्तीचेहि - रूढीवादी )

शास्त्रज्ञ व व्यवहारिक लोक असेंच बोलतात,पण ह्याचा अनुभव कसा म्हणून विचारले तर कित्येक लोक आकाशपाताळ एक करतात,कांही प्रत्यय आहे का ? म्हणून विचारले,तर उलट आम्हांवरच ओरडतात.

म्हणोन त्यास पुसावेना । त्यांचेन प्रत्ययो आणवेना । प्रत्ययेंविण प्रेत्न नाना । ठकाठकी ॥ ८ ॥

म्हणून ह्यांना विचारावत नाही,त्यांच्याने प्रत्यय आणून देववत नाही,अनुभवावाचून अनेक प्रयत्न करणें म्हणजें फसवाफसवी होय.(ह्यांनाच प्रत्यय नसला तर काय करतील बिचारे ? बरे,बिनप्रत्ययाचें ठकपणाचें बोल ऐकून करावयाचें काय ?

प्रचितवीण वैद्य म्हणवी । उगीच करी उठाठेवी । तया मुर्खाला गोवी । प्राणीमात्र ॥ ९ ॥

अनुभवावाचून वैद्य म्हणवितो व उगीच खटपट करतो अशा मूर्खाला वाटेल तो मनुष्य (गोवी) पेंचात धरतो.(औषधाच्या प्रचीतीवाचूंन एखादा खोटा वैद्य जर नसत्या उठाठेवी करायला लागला तर त्याला गोंवी-पेंचात धरिल्याशिवाय काय म्हणून राहतील ?)

तैसाच हाहि विचार । प्रत्यये करावा निर्धार । प्रत्ययें नस्तां अंधकार । गुरुशिष्यांसी ॥ १० ॥

ही गोष्टही तशीच आहे.अनुभवानें निश्र्चय झाला पाहिजें,अनुभव नसेल तर गुरु व शिष्य ह्या दोघांनाही आंधारच (प्रत्ययावांचून गुरु व शिष्य दोघेही अंधारातच चांचपडतात)

बरें लोकास काये म्हणावें । लोक म्हणती तेंचि बरवें । परंतु स्वामीनें सांगावें । विशद करुनी ॥ ११ ॥

बरें,लोकांना तरी काय म्हणायचें आहें ?(त्यांना का दोष द्यावा ?) तें बोलतात तें त्यांच्या परीनें ठीकच आहें,परंतु महाराजांनी हें स्पष्ट करुन सांगावें.

म्हणों देवीं माया केली । तरी देवांचीं रूपें मायेंत आलीं । जरी म्हणों मायेनें माया केली । तरी दुसरी नाहीं ॥ १२ ॥

(माया कोणी केली हा माझा मुख्य प्रश्न आहें) (देव मायेनंतरचें),देवांनी माया केली म्हणावें तर देवांची रुपें मायेत येतात आणि मायेंनें माया केली म्हणावें तर दुसरी माया नाही (तर ही दुसरी माया कोठून आली ?)

जरी म्हणो भूतीं केली । तरी ते भूतांचीच वळली । म्हणावें जरी परब्रह्में केली । तरी ब्रह्मीं कर्तुत्व नाहीं ॥ १३ ॥

भूतांनी माया केली म्हणावें तर ती भूतांचीच बनली आहें (असें म्हणावें लागेल) परब्रह्मानें माया केली म्हणावें तर त्याच्या ठिकाणी (ब्रह्माकडें) कर्तृत्व नाहीं.

आणी माया खरी असावी । तरी ब्रह्मीं कर्तुत्वाची गोवी । माया मिथ्या ऐसी जाणावी । तरी कर्तुत्व कैंचें ॥ १४ ॥

आणि माया खरी असेल तर ब्रह्माच्या माथीं कर्तृत्वाची (गोवी) भानगड येईल.मायेला मिथ्या म्हणावयांचें तर कर्तृत्व तरी कशाचें ?(शिवाय माया खरी असती तर तिचे कर्तृत्व ब्रह्माकडे जाते की नाही हा विचार असता पण ती मुळी मिथ्या,तेव्हा कर्तृत्व कोणाकडे द्यावे.)

आतां हें अवघेंचि उगवें । आणी मनास प्रत्यये फावे । ऐसें केलें पाहिजें देवें । कृपाळूपणें ॥ १५ ॥

तर आतां हे सगळे स्पष्ट होईल व मनाला प्रत्यय येईल असें महाराजांनी कृपाळूपणें केले पाहिजें (आतां हे कोडे समाधानकारक रीतीने उलगडेल असे स्वामींनी उत्तर दिले पाहिजें)

वेद मातृकावीण नाहीं । मातृका देहावीण नाहीं । देह निर्माण होत नाहीं । देहावेगळा ॥ १६ ॥

तसेंच,(शब्द) वेद अक्षरांशिवाय (प्रणवाच्या साडेतीन मातृकांशिवाय) नाहीत व मातृका देहावांचून नाहीत, व देह दुस-या देहाशिवाय नाही.

तया देहामधें नरदेहो । त्या नरदेहांत ब्राह्मणदेहो । तया ब्राह्मणदेहास पाहो । अधिकार वेदीं ॥ १७ ॥

त्या सगळ्या देहांत नरदेह श्रेष्ठ,त्या नरदेहांत ब्राह्मण देह श्रेष्ठ-वरीष्ठ आहे,म्हणूनच त्या ब्राह्मणास वेदांचा अधिकार आहे.(हे काय आहे काही उमगत नाही)

असो वेद कोठून जाले । देह कासयाचे केले । दैव कैसे प्रगटले । कोण्या प्रकारें ॥ १८ ॥

असो,वेद कोठून आले ?देह कशाचे केले ?देव कसे व कोणत्या रीतीनें प्रकट झाले ? हे काहीच उलगडत नाही.

ऐसा बळावला अनुमान । केलें पाहिजे समाधान । वक्ता म्हणे सावधान । होईं आता । १९ ॥

अशी श्रोत्यांची शंका वाढत चालली,त्यांचे समाधान करावयास पाहिजे,ह्यास्तव वक्ता म्हणतो आता सावध व्हा .

प्रत्यये पाहातां सांकडी । अवघी होते विघडाविघडी । अनुमानितां घडीनें घडी । काळ जातो ॥ २० ॥

उत्तर-अनुभव पाहू गेले असतां संकट वाटतें-अडचणी येतात,सगळी विस्कटाविस्कट होतें,संशयामध्यें घटकेनें घटका असा काळ निघून जातो.

लोकधाटी शास्त्रनिर्णये । येथें बहुधा निश्चये । म्हणोनियां येक प्रत्यये । येणार नाहीं ॥ २१ ॥

( लोकधाटी - जनरीत , बहुधा निश्चये - विविधमतांनी )

लोकव्यवहार व शास्त्राचा निर्णय (ही एकाच प्रकारची नसल्यामुळे) त्यांच्यात अनेक प्रकारचें निश्र्चय केले आहेत.त्यामुळे एकच प्रकारचा अनुभव येत नाही (सत्य प्रत्यय हा नेहमी एकच असल्यामुळे कोणता निर्णय सांगावा ही पंचायत पडतें)

आतां शास्त्राची भीड धरावी । तरी सुटेना हे गथागोवी ।गथागोवी हे उगवावी । तरी शास्त्रभेद दिसे ॥२२॥

( गथागोवी - घोटाळा , गुंता )

आतां शास्त्रांची भीड धरुन बसावें तर हा गोंधळ सुटावयाचा (मिटायचा) नाही,हा गोधळ काढून टाकावा तर शास्त्रातं भेद दिसतो.( शास्त्राची भीड धरुन प्रत्यय-अनुभव-सागुं नयें म्हटलें तर गुंता उलगडायचा नाही,कारण शास्त्रांतही अनेक मते आहेत.)

शास्त्र रक्षून प्रत्यये आणिला।पूर्वपक्ष त्यागून सिद्धांत पाहिला ।शहाणा मुर्ख समजाविला ।येका वचनें ॥२३॥

तेव्हा एकाच वचनाने शास्त्र सांभाळून प्रत्यय आणावयाचा, पूर्वपक्ष सोडून देऊन सिध्दांत दाखवावयाचा आणि शहाणा व मूर्ख ह्यांची समजूत घालावयाची,अशी तीन कामें करावयाची आहेत.(शास्त्र रक्षून प्रत्यय आणला म्हणजें पूर्वपक्ष त्यागून सिध्दांताकडें लक्ष दिलें,की मूर्ख व शाहाणें ह्यांची एकाच शब्दांनी समजून पाडता

येते.मूर्ख  शास्त्रांचे शब्द तेवढें घेऊन वचनांचा काथ्याकूट करीत बसतो व सुज्ञ मनुष्य प्रत्यय पावून समाधानरुप होऊन राहातो)

शास्त्रींच पूर्वपक्ष बोलिला । पूर्वपक्ष म्हणावें लटक्याला । विचार पाहातां आम्हांला । शब्द नाहीं ॥ २४ ॥

शास्त्रांमध्येंच पूर्वपक्ष सांगितला आहे, पूर्वपक्ष खोट्याला म्हणतात ह्याचा तुम्ही विचार करा म्हणजे आमच्यावर दोष नाही (शास्त्रांत पुर्वपक्ष खोट्याला म्हणतात,ह्याचा तुम्ही विचार करा म्हणजें आमच्यावर दोष नाहीं ( शास्त्रात मध्येंच पूर्वपक्ष मांडलेला असतो व पूर्वपक्ष म्हणजें अर्थात लटका-मूर्ख तेथेंच लक्ष लावून बसतों,विचारांचा प्रत्यय पाहाणारा वेगळा,विचार पाहील तर आम्हाला दोष लावणार नाही)

तथापि बोलों कांहींयेक । शास्त्र रक्षून कौतुक । श्रोतीं सादर विवेक । केला पाहिजे ॥ २५ ॥

तथापि शास्त्रमर्यादा सांभाळून काहीं थोडीशी गंमत सांगू-श्रोत्यांनी आदरपूर्वक विचार केला पाहिजें (असो शास्त्र रक्षून काय सांगायचें ते आम्ही सांगतो,विचारानें घ्यावें)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहआशंकानाम समास दुसरा ॥**

## समास तिसरा : देहआशंकाशोधन ॥ श्रीराम ॥

उपाधिविण जें आकाश । तेंचि ब्रह्म निराभास । तें निराभासीं मूळमायेस । जन्म जाला ॥ १ ॥

उपाधिरहित जे आकाश तें निराभास ब्रह्म होय,त्या निराभासामध्यें मूळमायेचा जन्म झाला.

तें मूळमायेचे लक्षण ।वायोस्वरूपचि जाण । पंचभूतें आणी त्रिगुण । वायोआंगीं ॥ २ ॥

त्या मूळमायेंचे स्वरुपही वायुरुपच आहे,त्या वायूमध्ये पंचभूतें व तीन गुण (अतिसूक्ष्मपणानें) असतात.

आकाशापासून वायो जाला । तो वायोदेव बोलिला । वायोपासून अग्नि जाला । तो अग्निदेव ॥ ३ ॥

आकाशापासून वायु झाला,त्याला वायुदेव म्हणतात.वायूपासून अग्नि उत्पन्न झाला त्यास अग्निदेव म्हणतात.

अग्निपासून जालें आप । तें नारायणाचें स्वरूप । आपापासून पृथ्वीचें रूप । तें बीजाकारें ॥ ४ ॥

अग्नीपासून आप झालें ते नारायणाचें स्वरुप (आपोनारायण) होय.आपापासून पृथ्वी झाली ती बीजरुप आहे.(आपापासून नाना बीजाकार पृथ्वी)

ते पृथ्वीचे पोटीं पाषाण । बहु देवांचें लक्षण । नाना प्रचित प्रमाण । पाषाणदेवीं ॥ ५ ॥

त्या पृथ्वीच्या पोटांत पाषाण असतात.ते अनेक देंवांचे स्वरुप होत.पाषाणमूर्तीच्या ठिकाणी अनेक प्रकारचा अनुभव येतो.(त्या त्या देवांची त्यांच्या त्यांच्या उपासकांना प्रचीति येत असतें)

नाना वृक्ष मृत्तिका । प्रचित रोकडी विश्वलोकां । समस्त देवांचा थारा येका । वायोमध्यें ॥ ६ ॥

अनेक झाडें (वृक्षकाष्ठ),माती ह्यांच्या देवांचाही सर्व लोकांना रोकडा अनुभव येतो.पण ह्या सर्व देवांचे आश्रयस्थान एका वायूमध्ये आहे.

देव यक्षिणी कात्यायेणी । चामुंडा जखिणी मानविणी । नाना शक्ति नाना स्थानीं । देशपरत्वें ॥ ७ ॥

देव,याक्षिणी,कात्यायणी,चामुंडा,जाखिणी,मानवरुपी देवता अशा अनेक प्रकारच्या शक्ति देशपरत्वें अनेक ठिकाणी आहेत.

पुरुषनामें कित्येक । देव असती अनेक । भूतें देवतें नपुषक । नामें बोलिजेती ॥ ८ ॥

कित्येक देव पुरुष नामाचे असतात,भूतें दैवतें अशी त्यांची कित्येक नपुसंक नावे आहेत.

देव देवतांदेवतेंभूतें । पृथ्वीमध्यें असंख्यातें । परंतु यां समस्तांतें । वायोस्वरूप बोलिजे ॥ ९ ॥

देव,देवता,दैवते,भूतें ही जगामध्ये असंख्य आहेत,परंतु त्या सर्वांना वायुरुप म्हणतात.

वायोस्वरूप सदा असणें । प्रसंगें नाना देह धरणें । गुप्त प्रगट होणें जाणें । समस्तांसी ॥ १० ॥

ही नेहमी वायुरुप असतात,प्रसंगानुसार अनेक देहही धारण करतात,गुप्त किंवा प्रकट होतात,पण त्या सर्वांच्यामागें जन्ममृत्यु लागलेला आहे.

वायोस्वरूपें विचरती । वायोमध्यें जगज्जोती । जाणीवकळा वासना वृत्ति । नाना भेदें ॥ ११ ॥

ही नेहमी वायुरुपाने असतात,जाणीव,वासना,तृप्ति इत्यादि अनेक प्रकारची वायूमध्ये जगज्योती (जाणीव कळा) भरुन राहिली आहे.

आकाशापासून वायो जाला । तो दों प्रकारें विभागला । सावधपणें विचार केला । पाहिजे श्रोतीं ॥ १२ ॥

आकाशापासून वायु उत्पन्न झाला,त्याचे  दोन भाग झाले त्याचा श्रोत्यांनी नीट सावधपणाने विचार करावा.

येक वारा सकळ जणती । येक वायोमधील जगज्जोती । जगज्जोतीच्या अनंत मूर्ती ।देवदेवतांच्या ॥१३॥

आकाशापासून वायु झाला तो मुख्यतः दोन प्रकारचा-एक प्रकार (सर्वत्र वाहाणारा) वायु सर्व लोकांस माहीत आहेच व दुसरा प्रकार वायूमधील जगज्योति हा होय,त्या जगज्योतीपासून देवदेवतांच्या अनेक (अनंत) मूर्ति झाल्या आहेत.

वायो बहुत विकारला । परंतु दों प्रकारें विभागला । आतां विचार ऐकिला । पाहिजे तेजाचा ‖ १४ ‖

वायूंचे विकार पुष्कळ आहेत,पण त्याचें मुख्य दोन प्रकार हें होत,आतां तेजाचा विचार ऐकावा.

वायोपाऊन तेज जालें । उष्ण सीतळ प्रकाशलें । द्विविध रूप ऐकिलें । पाहिजें तेजाचें ‖ १५ ‖

वायूपासून तेज झाले,ते उष्ण व शीत ह्या दोन प्रकारांनी प्रकट झालें,ते अशाप्रकारें तेजाचें दोन प्रकारचें रुप झाले,ते ऐकावें,

उष्णापासून जाला भानु । प्रकाशरूप दैदीप्यमानु । सर्वभक्षक हुताशनु । आणी विद्युल्यता ‖ १६ ‖

उष्ण तेजापासून प्रकाशरुप व दैदीप्यमान असा सूर्य व सर्वभक्षक अग्नि आणि वीज हीं तीन उत्पन्न झालीं.

सीतळापासून आप अमृत । चंद्र तारा आणी सीत । आतां परिसा सावचित्त। होऊन श्रोते ‖ १७ ‖

शीतल तेजापासून आप (पाणी),अमृत,चंद्र,तारा व बर्फ (थंडी-सीत-शीत) उत्पन्न झाली आतां श्रोत्यांनी सावध होऊन ऐकावें.

तेज बहुत विकारलें । परंतु द्विविधाच बोलिलें । आपहि द्विविधाच निरोपिलें । आप आणि अमृत ‖१८‖

तेजाचे विकार पुष्कळ असलें तरी मुख्य प्रकार दोनच आपाचेही पाणी आणि अमृत असें दोन प्रकार सांगितले आहेत.

ऐकें पृथ्वीचा विचार । पाषाण मृत्तिका निरंतर । आणीक दुसरा प्रकार । सुवर्ण परीस नाना रत्नें ‖ १९ ‖

आतां पृथ्वीचा विचार ऐक,पाषाण-माती हा नेहमीचा प्रकार आणि दुसरा प्रकार म्हणजें सोनें,परीस व अनेक रत्ने ही होत.

बहुरत्ना वसुंधरा । कोण खोटा कोण खरा । अवघें कळे विचारा । रूढ होतां ‖ २० ‖

पृथ्वीच्या पोटांत अनेक रत्ने आहेत,त्यांत खरा कोण व खोटा कोण हें विचार केल्यानें कळतें.

मनुष्यें कोठून जालीं । हे मुख्य आशंका राहिली । पुढें वृत्ति सावध केली । पाहिजे श्रोतीं ‖ २१ ‖

आतां म़ाणसें कोठून उत्पन्न झाली,ही मुख्य शंका राहिली ह्याकरीता श्रोत्यांनी एकाग्रचित्त करुन पुढें लक्ष द्यावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहआशंकाशोधननाम समास तिसरा ॥**

**समास चवथा : बीजलक्षण ॥ श्रीराम ॥**

आतां पाहों जातां उत्पत्ति । मनुष्यापासून मनुष्यें होती । पशुपासून पशु निपजती। प्रत्यक्ष आतां॥ १ ॥

आता (प्राण्यांच्या उत्पत्तीचा स्थूळ विचार केला म्हणजें) उत्पत्तींचा क्रम पाहू लागलें असतां माणसापासून म़ाणसें होतात व पशूपासून पशु उत्त्पन्न होतात.असे हे उघड दिसतें.

खेंचरें आणी भूचरें । वनचरें आणी जळचरें । नाना प्रकारीचीं शरीरें । शरीरांपासून होती ॥ २ ॥

(त्याचप्रम़ाणे खेचरे,आकाशांत फिरणारे जीवजंतु) पशु आदिकरुन जमिनीवरील प्राणी (भुचरें),वाघ-सिंहादि वनचरें,तशीच (मत्स्यादि) जलचरें इत्यादिकांची अनेक प्रकारची शरीरे शरीरापासूनच होतात.(नाना प्रकारचें प्राणी त्या त्या जातीच्या प्राण्यापासून उत्पन्न होतात.)

प्रत्ययास आणी प्रमाण । निश्चयास आणी अनुमान । मार्ग देखोन आडरान । घेऊंच नये ॥ ३ ॥

(हें प्रत्यक्षच आहे,येथें अनुभवाचें काम नाही.) प्रत्यक्षाला प्रमाण नको.निश्र्चय आल्यावर अनुमान करु नयें.चांगला मार्ग पाहिल्यावर आडरानांत शिरु नयें.

विपरीतपासून विपरीतें होती । परी शरीरेंच बोलिजेती । शरीरावांचून उत्पत्ती । होणार नाहीं ॥ ४॥

एखाद्या वेळी भलत्याला भलतेंच होते तरी पण त्याला शरीरेच म्हणतात,शरीरावाचून उत्पत्ति होणारच नाही,(विपरीत प्रकारे ही उत्पत्ती कोठे कोठे होते शरीरावाचून शरिराची उत्पत्ति होत नाही हें निश्र्चित आहें.)

तरी हे उत्पत्ति कैसी जाली । कासयाची कोणें केली । जेणें केली त्याची निर्मिली । काया कोणें ॥ ५ ॥

तर ही उत्पत्ति झाली कशी ? कशाची केली व कोणी केली ?ज्यानें ही उत्पत्ति केली त्यांचे शरीर कोणी निर्माण केले ?

ऐसें पाहातां उदंड लांबलें । परी मुळीं शेरीर जैसें जालें । कासयाचें उभारिलें । कोणें कैसें ॥ ६ ॥

असें पाहूं गेले तर पुष्कळच लांबतें,पण मुळांत शरीर कसे उत्त्पन्न झाले ? तें कशाचें व कोणी बनविले ?

ऐसी हे मागील आशंका । राहात गेली ते ऐका । कदापी जाजु घेऊं नका । प्रत्ययो आलियानें ॥ ७ ॥

( जाजु - शंका,संशय )

अशी ही मागची शंका तशीच राहिली आहे.तिचें उत्तर ऐका,अनुभव आल्यावर (जाजु) शंका घेण्याचे कारण नाही.

प्रत्ययोचि आहे प्रमाण । मूर्खास वाटे अप्रमाण । पिंडें प्रचितशब्दें जाण । विश्वासासी ॥ ८ ॥

( प्रचितशब्दें जाण विश्वासासी - प्रचिती तेथे विश्र्वास किवा तात्पर्य विश्वास हीच प्रचिती )

अनुभवच मुख्य प्रमाण असतांना मूर्खाला तो खोटा वाटतो.पिंडाच्या उत्पत्तीसंबंधानें (शास्त्रकारांच्या व साधुसंतांच्या) वचनावर विश्र्वास ठेवला म्हणजें अनुभव येईल.(मुख्य प्रत्यय पाहिला पाहिजे,पूर्व साधूंचे प्रचीतीचेच शब्द आहेत त्यावर विश्र्वास ठेवला पाहिंजें)

ब्रह्मीं मूळमाया जाली । तेचि अष्टधा प्रकृती बोलिली । भूतीं त्रिगुणीं कालवली । मूळमाया ॥ ९ ॥

ब्रह्माच्या ठिकाणी मूळमाया झाली.तिलाच (सूक्ष्म) अष्टधा प्रकृति म्हणतात.कां की ती मूळमायाच पंचभूतें त्रिगुण (तीन गुण) ह्यांनी (कालवली) मिश्रित झालेली आहें.

तें मूळमाया वायोस्वरूप । वायोमध्यें जाणीवेचें रूप । तेचि इच्छा परी आरोप । ब्रह्मीं न घडे ॥ १० ॥

ती मूळमाया वायुरुप असून वायूमध्ये जाणिवेचें  रुप आहे ही  जाणीवच इच्छा किंवा संकल्प होय पण इच्छा केल्याचा आरोप मात्र ब्रह्मावर करतां येत नाही (पण तिचा संबंध ब्रह्माकडे नाही)

तथापि ब्रह्मीं कल्पिला । तरी तो शब्द वायां गेला । आत्मा निर्गुण संचला । शब्दातीत ॥ ११ ॥

संबंध आहे असें कोणी म्हटलेच तर तो शब्द मात्र व्यर्थ जातो.निर्गुण ब्रह्म शब्दातीत संचले आहे.(तथापि तो आरोप ब्रह्मावर लादला तरी व्यर्थ होय,कारण परमात्मा निर्गुण व शब्दातीत असून सर्वत्र भरलेला आहें)

आत्मा निर्गुण वस्तु ब्रह्म ।नाममात्र तितुका भ्रम ।कल्पून लाविला संभ्रम ।तरी तो लागणार नाहीं ॥१२॥

निर्गुण ब्रह्म तोच आत्मा,ज्याला ज्याला म्हणून नाव देता येते तो सगळा भ्रम होय तथापि ती उपाधि कल्पनेने लावली तरी लागणार नाही.(नाममात्र तितके भ्रमरुप आहे)

तथापि आग्रहें लाविला । जरी धोंडा मारिला आकाशाला । आकाशावरी कुन्थीला । तरी तें तुटेना ॥ १३ ॥

( कुन्थीला - जोर लावला तरी )

पण आग्रहाने जरी उपाधि लावली तरी उपयोग काय ?आकाशावर  कोणी धोंडा मारला किंवा दांत खाल्ले तरी तें तुटणार नाही.(आकाशावर कोणी धोंडा कुंथून मारिला तरी तो आकाशाला लागत नाही,तसें निर्विकार ब्रह्माला नामरुप विकार कांही लागत नाही. )

तैसें ब्रह्म निर्विकार । निर्विकारीं लाविती विकार । विकार नासे निर्विकार । जैसें तैसें ॥ १४ ॥

त्याप्रमाणे ब्रह्म हें निर्विकार आहे,त्याला विकार लावतात पण विकार नाश पावतो आणि निर्विकार जसेंच्या तसेंच राहातें.

आतां ऐका प्रत्ययो । जाणोनि धरावा निश्चयो । तरीच पाविजे जयो । अनुभवाचा ॥ १५ ॥

आतां ऐका.अनुभव समजून घेऊन निश्र्चय करावा,म्हणजेंच अनुभव घेताना यश येईल.(प्रत्यय जाणून निर्धार धरावा तरच अनुभव येईल)

मायाब्रह्मीं जो समीर। त्यांत जाणता तो ईश्वर । ईश्वर आणि सर्वेश्वर । तयासीच बोलिजे ॥ १६ ॥

(त्यांत जाणता तो ईश्वर -ब्रह्माच्या ठिकाणी जी मुळमाया तिच्या ठिकाणी जी जाणीव कळा तोच ईश्वर )

ब्रह्माच्या ठिकाणी मायारुपी जो वायु त्यांत जीवनकळा आहे,तीच ईश्र्वर होय त्यालाच सर्वेश्र्वर असेही म्हणतात (वायुरुप मायेच्या ठिकाणी जी जाणीवकळा आहे त्याला ईश्र्वर ,सर्वेश्र्वर असेही म्हणतात)

तोचि ईश्वर गुणासी आला । त्याचा त्रिगुणभेद जाला । ब्रह्मा विष्णु महेश उपजला । तये ठाईं ॥ १७ ॥

तोच ईश्र्वर गुणरुप होऊन त्याचेच तीन भेद झाले,त्या ठिकाणी ब्रह्मा,विष्णु,महेश उत्पन्न झालें.

सत्व रज आणी तम । हे त्रिगुण उत्तमोत्तम । यांच्या स्वरूपाचा अनुक्रम । मागां निरोपिला ॥ १८ ॥

सत्व,रज,तम हे तीन गुण उत्तमोत्तम आहेत,त्यांच्या स्वरुपाचा विचार पूर्वी सांगितलाच आहे.

जाणता विष्णु भगवान । जाणता नेणता चतुरानन । नेणता महेश पंचानन । अत्यंत भोळा ॥ १९ ॥

जाणता भगवान विष्णु,जाणता नेणता चतुर्मुख ब्रह्मदेव आणि नेणता व अत्यंत भोळा असा पंचमुख महादेव आहे.

त्रिगुण त्रिगुणीं कालवले । कैसे होती वेगळाले । परी विशेष न्यून भासले । ते बोलावे लागती ॥ २० ॥

त्रिगुण हें तर मूळांतच एकमेकांत कालवले आहेत,ते आतां वेगळे कसे होतील ?परंतु कमीजास्त भासतात म्हणून सांगावें लागतात.(पण विशेष गुण तेवढाच घेऊन हें बोलणें आहे.)

वायोमध्यें विष्णु होता । तो वायोस्वरूपचि तत्वता । पुढें जाला देहधर्ता । चतुर्भुज ॥ २१ ॥

वायुस्वरुप मूळमायेंत (सत्वगुणातमक) विष्णु होता तोही मूळचा वायुरुपच होता,पुढे त्याने देह धारण केला तेव्हा तोच चतुर्भुज श्यामसुंदर देहधारी झाला.

तैसाच ब्रह्मा आणी महेश । देह धरिती सावकास । गुप्त प्रगट होतां तयास । वेळ नाहीं ॥ २२ ॥

तद्वत ब्रह्मदेव व शंकर हेही इच्छेप्रमाणे देह धारण करतात,त्यांना गुप्त व प्रकट होण्यास वेळ लागत नाही.

आतां रोकडी प्रचिती । मनुष्यें गुप्त प्रगटती । मां त्या देवांच्याच मूर्ती । सामर्थ्यवंत ॥ २३ ॥

सध्याही योगीश्र्वर माणसे गुप्त होतात व प्रकट होतात हा आतां प्रत्यक्ष अनुभव आहे. मग त्या तर देवांच्याच मुर्ति! त्या सामर्थ्यवंत असतील ह्यांत नवल तें काय?

देव देवता भूतें देवतें । चढतें सामर्थ्य तेथें । येणेंचि न्यायें राक्षसांतें । सामर्थ्यकळा ॥ २४ ॥

देव,देवता,भूतें व दैवतें ह्यांच्या ठिकाणी माणसांपेक्षा वाढत्या प्रमाणांत सामर्थ्य असतें,त्याच न्यायानें राक्षसांच्या ठिकाणी सामर्थ्य आहे.

झोटींग वायोस्वरूप असती । सवेंच खुळखुळां चालती । खोबरीं खारिका टाकून देती । अकस्मात ॥ २५ ॥

झोटींग हे वायुरुप असतात.ते वायुबरोबरच खुळखुळा चालतात व एकदम खोबरें,खारका टाकून जातात.

अवघेंचि न्याल अभावें । तरी तें बहुतेकांस ठावें । आपुल्याला अनुभवें । विश्वलोक जाणती ॥ २६ ॥

सगळेंच खोटे मानाल तर हें बहुतेक लोकांना माहीत आहे;ते आपापल्या अनुभवानें जाणतात.(हे सारेच खोटें मानता येणार नाही,कारण पुष्कळांस हें अनुभवानें माहीत आहे.)

मनुष्यें धरती शरीरवेष । नाना परकाया प्रवेश । मां तो परमात्मा जगदीश । कैसा न धरी ॥ २७ ॥

मनुष्ये नानाप्रकारची रुपे धारण करतात,परकायाप्रवेश करतात,मग तो परमात्मा जगदीस आहे,त्याला रुपें धारण करतां कां येऊ नयेंत?(माणसें नाना देह धारण करितात,परकायाप्रवेशही करितात,मग तो जगदात्मा,त्याला हवें ते देह धारण करणें गुप्त किंवा प्रकट होणे हे काय कठिण आहे?

म्हणोनि वायोस्वरूपें देह धरिलें । ब्रह्मा विष्णु महेश जालें । पुढें तेचि विस्तारलें । पुत्रपौत्रीं ॥ २८ ॥

म्हणून प्रथमतः वायुस्वरुपानेंच ब्रह्मा,विष्णु,महेश ह्यांनी देह धारण केले व पुढें त्यांचे मुलगें,नातू असा विस्तार झाला.

अंतरींच स्त्रिया कल्पिल्या । तों त्या कल्पितांच निर्माण जाल्या । परी तयापासून प्रजा निर्मिल्या । नाहींत कदा ॥ २९ ॥

त्यांनी अंतःकरणात स्त्रिया असाव्या अशी कल्पना केली,तेव्हा कल्पना करतांच (त्यांच्या संकल्पसामर्थ्याने) त्या निर्माण झाल्या,पण त्यांच्यापासून त्यांनी प्राणी,संतति केव्हाही निर्माण केली नाहीं.

इच्छून पुत्र कल्पिले । ते ते प्रसंगीं निर्माण जाले । येणें प्रकारें वर्तले । हरिहरादिक ॥ ३० ॥

तसेंच इच्छामात्रे करुन त्यांनी पुत्र उत्पन्न केले,त्या त्या वेळी तें निर्माण झाले.अशाप्रकारे हरीहरादिकांनी वर्तन केले,(त्यांच्या संकल्पानेच त्यांना पुत्रपौत्र झाले,ही झाली हरिहरादिकांची गोष्ट)

पुढें ब्रह्मयानें सृष्टी कल्पिली । इछेसरिसी सृष्टी जाली । जीवसृष्टि निर्माण केली । ब्रह्मदेवें ॥ ३१ ॥

पुढें ब्रह्मदेवानें सृष्टीची कल्पना केली इच्छा करण्याबरोबरच सृष्टि निर्माण झाली,अशाप्रकारे ब्रह्मदेवाने सृष्टि उत्पन्न केली (ब्रह्मदेवानेही संकल्पमात्रे करुन सृष्टि उत्त्पन्न केली.)

नाना प्रकारीचे प्राणी कल्पिले । इछेसरिसे निर्माण जाले । अवघे जोडेचि उदेले । अंडजजारजादिक ॥३२॥

(जारज अंडजादि अनंत जीवजंतु इच्छामात्रेकरुन निर्माण केले.) अनेक प्रकारच्या प्राण्यांची कल्पना केली आणि हें उत्पन्न व्हावें अशी इच्छा केल्याबरोबर तें उत्पन्न झाले.अंडज-जारजादिकांच्या जोडयाच्या जोडयाच उत्पन्न झाल्या.

येक जळस्वेदापासून जाले । ते प्राणी स्वेदज बोलिले । येक वायोकरितां जाले । अकस्मात उद्गिज ॥ ३३ ॥

एक पाण्यापासून किंवा घामापासून उत्त्पन्न झालें त्यांना स्वेदज असें म्हणतात.एक वायूपासून उत्त्पन्न झालें त्यांना उद्गिज्ज असें म्हणतात.(घामापासून उत्त्पन्न झालें ते स्वेदज,वायूपासून उत्त्पन्न झाले ते उद्गिज्ज)

मनुष्याची गौडविद्या । राक्षसांची वोडंबरी विद्या । ब्रह्मयाची सृष्टिविद्या । येणें प्रकरें ॥ ३४ ॥

माणसांची गारुडी (गोडबंगाली) विद्या,त्याचप्रमाणे राक्षसांची मायावी (वोडंबरी) विद्या असतें,त्याच प्रकारची ही ब्रह्मदेवाची सृष्टी निर्माण विद्या (पण ती श्रेष्ठ प्रतीची आहें)

कांहीयेक मनुष्यांची । त्याहून विशेष राक्षसांची । त्याहून विशेष ब्रह्मयाची । सृष्टिविद्या ॥ ३५ ॥

मनुष्याचें विद्येचें काही सामर्थ्य असतें,त्यापेक्षाही राक्षसांचे विद्येचें सामर्थ्य अधिक आणि ब्रह्मदेवाची सृष्टिविद्या ही त्या सर्वांहून श्रेष्ठ आहें.

जाणते नेणते प्राणी निर्मिले । वेद वदोन मार्ग लाविले । ब्रह्मयानें निर्माण केले । येणें प्रकारें ॥ ३६ ॥

जाणते नेणते प्राणी ब्रह्मदेवानें निर्माण केलें आणि वेद सांगून त्यांना मार्गाला लावलें,अशाप्रकारे ब्रह्मदेवानें सर्व निर्माण केले.

मग शरीपासून शरीरें । सृष्टी वाढली विकारें । सकळ शरीरें येणें प्रकारें । निर्माण जाली ॥ ३७ ॥

नंतर शरीरापासून शरीरे निर्माण झाली  व विकारें ,म्हणजें एकापासून एक होऊन सृष्टि वाढली अशाप्रकारे शरीरे उत्पन्न झाली (पुढे शरीरापासून शरीरे ह्या न्यायानें अनंत सृष्टि यथान्वयें निर्माण झाली)

येथें आशंका फिटली । सकळ सृष्टी विस्तारली । विचार पाहाता प्रत्यया आली । येथान्वयें ॥ ३८ ॥

ह्या ठिकाणी शंका फिटली..सृष्टीचा विस्तार कसा झाला ह्याचा विचार केला तेव्हा त्याचा यथातथ्य अनुभव आला.

ऐसी सृष्टी निर्माण केली । पुढें विष्णुनें कैसी प्रतिपाळिली । हेहि विवंचना पाहिली ।पाहिजे श्रोतीं ॥ ३९ ॥

अशा प्रकारे सृष्टि उत्पन्न केल्यानंतर पुढें तिचा प्रतिपाळ विष्णूने कसा केला ह्याचाही श्रोत्यांनी विचार केला पाहिजे.

सकळ प्राणी निर्माण जाले । ते मूळरूपें जाणोन पाळिले । शरीरें दैत्य निर्दाळिले । नाना प्रकारींचे ॥ ४० ॥

( शरीरें दैत्य निर्दाळिले  - विष्णूचे मुळरूप सत्वगुण, जाणीव, ज्ञान होय, जे सूक्ष्म,अदृश्य असते,हे स्थूलरूप धारण करून दुष्टांचा संहार करते )

सगळे प्राणी जे उत्पन्न झाले ते विष्णूने जाणीवेच्या मूळस्वरुपाने (जाणीवरुप अंत:करणाने) पाळले. आणि स्थूळ शरीर धारण करुन अनेक प्रकारच्या दैत्यांचा संहार केला.

नाना अवतार धरणें । दुष्टांचा संहार करणें । धर्म स्थापायाकारणें । विष्णुस जन्म ॥ ४१ ॥

दुष्टांचा संहार करुन धर्मस्थापना करण्यासाठी विष्णूला वेळोवेळी जन्म घेऊन, अनेक अवतार धारण करावे लागतात.

म्हणोन धर्मस्थापनेचे नर । तेंहि विष्णुचे अवतार । अभक्त दुर्जन रजनीचर । सहजचि जाले ॥ ४२ ॥

(धर्मस्थापनेचे नर तें विष्णुरुप-त्यांचे रक्षण करणें व धर्मविध्वंसक दैत्य त्यांचा संहार करणे व ही दोन्ही कार्ये करीत धर्मसंस्थापना करणें हें विष्णूच्या अवताराचे प्रयोजन होय.) म्हणून धर्मस्थापना करणारे जें पूरुष हे सुध्दा विष्णूचें अवतार होत,अर्थात धर्मस्थापनेच्या आड येणारे जे दुष्ट अभक्त तें सहजच (रचनीचर) राक्षस झालें.

आतां प्राणी जे जन्मले । ते नेणोन संव्हारिले । मूळरूपें संव्हारिलें । येणें प्रकारें ॥ ४३ ॥

आतां प्राणी जे जन्माला येतात त्यांचा नेणतेपणानें संहार होतो,अशा प्रकारें मूळरुपच (नेणीव,तमोगुण) त्यांचा नाश करिते,(रुद्रही जन्मलेले प्राणी मूळरुपें-नेणिवेने संहारितात)

शरीरें रुद्र खवळेल । तैं जीवसृष्टि संव्हारेल । अवघें ब्रह्मांडचि जळेल । संव्हारकाळीं ॥ ४४ ॥

(व स्थूळरुप धरुन-शरीरें-खवळले म्हणजें सारे ब्रह्मांड जीवसृष्टीसह जळून खाक होतें,रुद्ररुप शरीरानें जेव्हा नेणीव खवळेल तेव्हा सगळ्या जीवसृष्टीचा संहार होईल,त्या वेळेला सगळे ब्रह्मांड जळून जाईल.

एवं उत्पत्ति स्थिती संव्हार । याचा ऐसा आहे विचार । श्रोतीं होऊन तत्पर । अवधान द्यावें ॥ ४५ ॥

तात्पर्य,उत्त्पत्ति,स्थिती आणि संहार ह्यांचा विचार असा आहे,श्रोत्यांनी एकाग्र चित्ताने लक्ष द्यावें.

कल्पांतीं संव्हार घडेल । तोचि पुढें सांगिजेल । पंचप्रळय वोळखेल । तोचि ज्ञानी ॥ ४६ ॥

कल्पांताच्या वेळी संहार होतो तो पुढील समासांत सांगू,पंचप्रळय जो समजून घेईल तोच ज्ञानी होय.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बीजलक्षण समास चवथा ॥**

## समास पांचवा : पन्चप्रळयनिरूपण ॥ श्रीराम ॥

ऐका प्रळयाचें लक्षण । पिंडीं दोनी प्रळये जाण । येकनिद्रा येक मरण । देहांतकाळ ॥ १ ॥

आतां प्रळयाचे स्वरुप ऐका.(प्रळय एकंदर पांच प्रकारचे आहेत.) पिंडामध्ये दोन प्रळय आहेत-एक निद्रा व दुसरा मरण (देहाचा अंतःकाळ)

देहाधारक तिनी मूर्ती । निद्रा जेव्हां संपादिती । तो निद्रा प्रळय श्रोतीं । ब्रह्मांडींचा जाणावा ॥ २ ॥

देह धारण करणा-या ब्रह्मा,विष्णु,महेश ह्या तिन्ही देवांच्या मूर्ति जेव्हा निद्रेला वश होतात तेव्हा ब्रह्मांडीचा निद्राप्रळय होतो हें श्रोत्यांनी समजून घ्यावें.

तिनी मूर्तीस होईल अंत । ब्रह्मांडास मांडेल कल्पांत । तेव्हां जाणावा नेमस्त । ब्रह्मप्रळये जाला ॥ ३ ॥

तिन्ही मूर्तीचा जेव्हा अंत होईल तेव्हा ब्रह्मांडाचा नाश होईल,त्यावेळेला ब्रह्मप्रळय झाला असे निश्र्चयाने समजावें (ब्रह्मांडास कल्पांन्त होऊन तिन्ही मूर्तीचा जेव्हा अंत होतो त्यास ब्रह्मप्रळय असें म्हणतात.)

दोनी पिंडीं दोनी ब्रह्मांडीं । च्यारी प्रळय नवखंडीं । पांचवा प्रळय उदंडी । जाणिजे विवेकाचा ॥ ४ ॥

अशा प्रकारे पिंडात दोन व ब्रह्मांडात दोन असे मिळून नऊ खंडात चार प्रळय आहेत,पाचवा प्रळय विवेकाचा होय तो पुष्कळांस माहीत आहे.

ऐसे हे पांचहि प्रळये । सांगितले येथान्वयें । आतां हें अनुभवास ये । ऐसें करूं ॥ ५ ॥

असे हे पाच प्रळय अनुक्रमानें सांगितले,आतां ह्यांचा अनुभव येईल असें करु.

निद्रा जेव्हां संचरे । तेव्हां जागृतीव्यापार सरे । सुषुप्ति अथवा स्वप्न भरे । अकस्मात आगीं ॥ ६ ॥

निद्रा जेव्हा देहांत प्रवेश करतें तेव्हा जागेपणाचा व्यापार बंद पडतो,मग एकाएकी गाढ झोप लागतें किंवा स्वप्न पडते,(निद्रा लागली की सारे जागृतीचे व्यापार खुंटतात व सुषुप्ति किंवा स्वप्न सुरु होतें)

या नांव निद्राप्रळये । जागृतीचा होये क्षये । आतां ऐका देहांतसमये । म्हणिजे मृत्युप्रळये ॥ ७ ॥

अशाप्रकारे जागृतीचा नाश होणे यांस निद्राप्रळय म्हणतात.(जागृतीचा क्षय निद्रेत होतो म्हणून निद्राप्रळय) आतां देहांतसमय म्हणजे मृत्युप्रळय कसा असतो ते ऐका.

देहीं रोग बळावती । अथवा कठीण प्रसंग पडती । तेणें पंचप्राण जाती । व्यापार सांडुनी ॥ ८ ॥

देहामध्ये रोग वाढतात किंवा कठिण प्रसंग गुदरतो त्यामुळे पंचप्राण आपले व्यापार सोडून जातात,

तिकडे गेला मनपवनु । इकडे राहीली नुस्ती तनु । दुसरा प्रळयो अनुमानु । असेचिना ॥ ९ ॥

मन आणि वायु हे तिकडे निघून गेले व इकडे नुसतें शरीर राहिले हा दुसरा प्रळय होय.ह्यांत शंकेला जागा नाही (देहांत अनेक रोगांचे प्राबल्य झाल्यानें किंवा काही आकस्मिक प्रसंगानें देहातूंन पंचप्राण निघून जातात व मागोमाग मन व पवन जातो आणि खाली नुसतें शव राहातें ह्यालाच मृत्युप्रळय म्हणतात.)

तिसरा ब्रह्मा निजेला । तों हा मृत्यलोक गोळा जाला । अवघा व्यापार खुंटला । प्राणीमात्रांचा ॥ १० ॥

(आंता ब्रह्मांडीचें प्रळय सांगतो) तिसरा प्रळय असा-ब्रह्मदेव निजला म्हणजे ह्या मृत्युलोकाचा नाश होतो व प्राणिमात्रांचा व्यापार बंद पडतो (ह्या मृत्युलोकांचा गोळा होऊन प्राणिमात्रांचे व्यापार खुंटतात)

तेव्हां प्राणीयांचे सूक्ष्मांश । वायोचक्रीं करिती वास । कित्येक काल जातां ब्रह्मयास । जागृती घडे ॥ ११ ॥

त्या वेळी प्राण्यांचे सूक्ष्म अंश वायुचक्रांत (वातावरणांत) राहातात नंतर काही काळ गेल्यानंतर ब्रह्मदेव पुन्हा जागा हातों.

पुन्हा मागुती सृष्टि रची । विसंचिले जीव मागुतें संची । सीमा होतां आयुष्याची । ब्रह्मप्रळय मांडे ॥१२॥

नंतर पुन्हा सृष्टि रचायला लागतो,अवास्तव झालेले जीव पुन्हा पूर्ववत करतो (विसंचिले-विखुरलेले-जीव-सूक्ष्मांश पुन्हा संसारी येऊन सृष्टी चक्र सुरु होते.) असे होतां होतां ब्रह्मदेवाचे आयुष्य संपले म्हणजे ब्रह्मप्रळय सुरू होतो.

शत वरुषें मेघ जाती । तेणें प्राणी मृत्यु पावती । असंभाव्य तर्के क्षिती । मर्यादेवेगळी ॥ १३ ॥

( तर्के क्षिती - पृथ्वीला तडे जातात )

शंभर वर्षे पाऊसच पडत नाही,त्यामुळे (सारी जीवसृष्टि) सर्व प्राणी मरण पावतात आणि पृथ्वीला अशा भेगा पडतात की त्याला सीमाच नाही (पृथ्वी अमर्याद फाटून जातें).

सूर्य तपे बाराकळी । तेणें पृथ्वीची होय होळी । अग्नी पावतां पाताळीं । शेष विष वमी ॥ १४ ॥

सूर्य आपल्या बारा कलांनी प्रदीप्त होतो,त्यामुळे पृथ्वी होळीसारखी भडाभडा पेटते.(सा-या पृथ्वीची होळी होते.) आणि तो अग्नि पाताळांत शिरला की शेष विष ओकू लागतों (अग्नीचा भडका लागून शेष विष ओकून मरतों)

आकाशीं सूर्याच्या ज्वाळा । पाताळीं शेष विष वमी गरळा । दोहिकडून जळतां भूगोळा ।उरी कैंची ॥ १५ ॥

आकाशांत सूर्याच्या ज्वाळा भडकतात आणि पाताळांत शेषाच्या विषाचा भडका उडतो,(शेष विष ओकू लागतो),अशा प्रकारे दोन्हीकडून भूगोल जळू लागला म्हणजें मग त्यांचें काय उरणार ?(आणि ह्या दोन्हीच्या भडक्यांत सारें ब्रह्मांड जळून जातें)

सूर्यास खडतरता चढे । हलकालोळ चहुंकडे । कोंसळती मेरूचे कडे । घडघडायेमान ॥ १६ ॥

सूर्याचा प्रखरपणा वाढल्यामुळें चाहोंकडें हलकल्लोळ उडून जातो.मेरुचें कडे धडाधड कोसळतात.

अमरावती सत्यलोक । वैकुंठ कैळासादिक । याहिवेगळे नाना लोक । भस्मोन जाती ॥ १७ ॥

(इंद्राची अमरावती) इंद्रलोक (स्वर्ग),ब्रह्मदेवाचा सत्य लोक,वैकुंठ,कैलास आणि ह्याशिवाय अनेक (सर्व) लोक भस्म होऊन जातात.

मेरु अवघाचि घसरे । तेथील महीमाच वोसरे । देवसमुदाव वावरे । वायोचक्रीं ॥ १८ ॥

मेरु पर्वत सगळाच नाहींसा होतो (ढासळून जातो),त्याचें माहात्म मोडून जातें आणि देवांचे समुदाय वायुचक्रांत भ्रमण करुं लागतात (मिसळून जातात)

भस्म जालिया धरत्री । प्रजन्य पडें शुंडाधारीं । मही विरे जळांतरीं । निमिष्यमात्रें ॥ १९ ॥

पृथ्वीचें भस्म झाल्यावर मुसळधार पाऊस पडतो व त्या पाण्यामध्यें पृथ्वी निमिषमात्रांत बुडून जातें.(मग हत्तीच्या सोंडेसारखी वृष्टी सुरु होऊन सारी सृष्टि जळांत निमिषार्धांत विरुन जातें)

पुढें नुस्ते उरेल जळ । तयास शोषील अनळ । पुढें एकवटती ज्वाळ । मर्यादेवेगळे ॥ २० ॥

पुढें नुसतें उदक उरतें,त्यास अग्नि आटवून टाकतो,पुढे सगळे अग्नि एकवटून भयंकर भडका उडतो (नुसतेंच जळ उरल्यावर पृथ्वीचा आपांत लय झाल्यावर त्याला अग्नि खाऊन टाकतो.)

समुद्रींचा वडवानळ । शिवनेत्रींचा नेत्रानळ । सप्तकंचुकींचा आवर्णानळ । सूर्य आणी विद्युल्यता ॥ २१ ॥

( सप्तकंचुकीं - पंचतत्वे,अहंकार व महतत्व मिळून सप्तकंचुक त्रिलोक्य )

अग्नीने पेट घेतल्याबरोबर समुद्रांतील वडवानळ,शंकराच्या नेत्रांतील अग्नि (तेज),(ब्रह्मांडाभोवती असणारा आवरणग्नि-सप्त कचुकांचा आवरणानळ (ब्रह्मांडाला पंचमहाभूतें,अहंकार व महतत्व ह्या सप्त कंचुकांचा (वेढा आहे तो),सूर्य व वीज सा-या ज्वाळा एकवटतात.

ऐसे ज्वाळ येकवटती । तेणें देव देह सोडिती । पूर्वरूपें मिळोन जाती । प्रभंजनीं ॥ २२ ॥

सगळ्या ज्वाळा एकवटल्या म्हणजें देवही आपापले देह सोडून आपापल्या पूर्वरुपानें (जाणीवरुपानें), वायूमध्ये मिळून जातात (देवांचे तेजोमय देह त्यांत मिसळतातच व त्यांचे पूर्वरुप जें वायु त्यांत लीन होतात.)

तो वारा झडपी वैश्वानरा । वन्ही विझेल येकसरा । वायो धावें सैरावैरा । परब्रह्मीं ॥ २३ ॥

तो महाप्रभंजन वारा सुटून अग्नीला झडपून टाकतो,त्यामुळे सगळा अग्नि पार विझून जातो.नंतर वायु मूळ ब्रह्माकडे धांवता सुटतो-परब्रह्मामध्यें सैरावैरा धावू लागतो.

धूम्र वितुळे आकाशीं । तैसे होईल समीरासी । वहुतां मधें थोडियासी । नाश बोलिला ॥ २४ ॥

धूर जसा आकाशांत मिळून जातो (नाहीसा होतो ) तशीच त्या वायूची दशा होतें पुष्कळांमध्ये थोडयाचा नाश व्हावयाचाच.

वायो वितुळतांच जाण । सूक्ष्म भूतें आणी त्रिगुण । ईश्वर सांडी अधिष्ठान । निर्विकल्पीं ॥ २५ ॥

( ईश्वर सांडी अधिष्ठान - पंचभूते + त्रिगुण = प्रकृती आणि ईश्वर = पुरुष , पुरुष + प्रकृती = जाणीव + वायू = मुळमाया , मुळमाया निर्विकल्प स्वरूपी लीन होते.)

वायु वितळून म्हणजें नाहीसा होऊन गेला कीं सूक्ष्म पंचभूतें आणि त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृति व ईश्र्वर म्हणजें जाणीवरुप पुरुष मिळून जी मूळमाया ती आपलें अधिष्ठान जें निर्विकल्प परब्रह्म त्यांत लीन होतें.

तेथें जाणिव राहिली । आणी जगज्जोती निमाली । शुद्ध सारांश उरली । स्वरूपस्थिती ॥ २६ ॥

त्याठिकाणी स्वस्वरुप म्ह.जाणीव राहाते व जगज्योति नाहीशी होते.सारांश,शुध्द स्वरुपस्थिति राहातें.

जितुकीं काहीं नामाभिधानें । तये प्रकृतीचेनि गुणें । प्रकृती नस्तां बोलणें । कैसें बोलावें ॥ २७ ॥

(त्या स्वरुपाबद्दल काय बोलावे ? त्याच्या संकेतार्थ जी जी नावें द्यावी,ती ती प्रकृतीतलीच असणार,प्रकृतीच आटली तेथें बोलणे कोठे उरले ?) जितकी काही नावें आहेत तेवढी प्रकृतिमुळेंच आहेत,प्रकृत्ति नसल्यावर मग बोलणें तरी कसें बोलावयांचे ?

प्रकृती असता विवेक कीजे । त्यास विवेकप्रळये बोलिजे । पांचहि प्रळय वोजें । तुज निरोपिलें ॥ २८ ॥

( वोजें - उत्तम रितीने )

प्रकृत्ति असतांनाच नित्यानित्यविवेक करुन ब्रह्म-प्रकृत्ति-प्रळयाचा अनुभव घेणें ह्याला विवेक-प्रळय म्हणतात,अशाप्रकारे पांचही प्रळय (वोजे-सुबोध करुन) स्पष्ट करुन सांगितले.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पंचप्रळयनिरूपणनाम समास पांचवा ॥**

**समास सहावा : भ्रमनिरूपण ॥ श्रीराम ॥**

उत्पत्ति स्थिति संव्हार । याचा निरोपिला वेव्हार । परमात्मा निर्गुण निराकार । जैसा तैसा ॥ १ ॥

उत्पत्ति,स्थिती,आणि संहार ह्यांचा व्यवहार कसा होतो तें सांगितलें इतके होत असतांही परमात्मा जसाच्या तसाच निर्गुण व निराकार असतो,(निर्गुण परमात्मा ह्या सर्वाहून पर आहें तसा आहें)

होतें वर्ततें आणि जातें । याचा समंध नाहीं तेथें । आद्य मद्य अवसान तें । संचलेंचि आहे ॥ २ ॥

जें होते,वागतें (राहातें) व लय पावतें (जातें) त्याचा संबंध ब्रह्माशी नाही परब्रह्म हें आदि (आरंभी),मध्यें व अंती सारखें भरलेलेच आहें.

परब्रह्म असतचि असे । मध्येंचि हा भ्रम भासे । भासे परंतु अवघा नासे । काळांतरी ॥ ३ ॥

परब्रह्म सर्वकाळ आहेच आहे,हा भ्रम मात्र मध्येंच भासतो,परंतु तो सगळा कालांतराने नाश पावतो (आणि मध्येंच-ज्याची उभारणी व संहारणी करुन दाखविली आहे-सारा भ्रमाचा बाजार भासत असतो.अर्थात जो भासतो तो नासतो हें उघड आहे.)

उत्पत्तिस्थितीसंव्हारत । मध्येंहि अखंड होत जात । पुढें सेवटीं कल्पांत । सकळांस आहे ॥ ४॥

हा मायेंचा भ्रम उत्पन्न होतो,मध्यंतरी असतो व शेंवटी लय पावतो,मध्यंतरी होणें,जाणे चालूच असतें,पण पुढें ह्या सगळ्याचा नाश आहे.(पिंडब्रह्मांडाच्या घडामोडी नित्यशः होत असतात,पण कल्पांती सर्वांस नाश आहे)

यामधें ज्यास विवेक आहे । तो आधींच जाणताहे । सारासार विचारें पाहे। म्हणौनियां ॥ ५ ॥

आतां ह्यामध्ये ज्याला विवेक समजतो,तो सारासारविचार करुन त्याचें नाशवंत स्वरुप अगोदरच जाणून घेतो.(विवेकी पुरुष प्रकृतीत असतांही सारासार विचारानें उमजून स्वस्थ असतात)

बहुत भ्रमिष्ट मिळाले । त्यांत उमजल्याचें काय चाले । सृष्टिमधें उमजले । ऐसें थोडे ॥ ६॥

(पण असे उमजलेले पुरुष विरळ असल्यामुळे व सारा भ्रमिष्टांचाच हा लोक असल्यामुळे त्यांत त्यांचे काय चालणार ?) पुष्कळसें भ्रमिष्ट मिळाले तर त्यांत जाणत्याचें काय चालणार ?जगामध्ये असें जाणते फार थोडे आहेत.

त्या उमजल्यांचे लक्षण । कांहीं करूं निरूपण । ब्रम्हाहून विलक्षण । महापुरुष ॥ ७ ॥

त्या जाणत्यांचे लक्षण थोडेसे सांगू,असे महापुरूष भ्रमाहून अलिप्त असतात.(उमजलेल्याचें लक्षण थोडक्यांत सांगायचें म्हणजे तो भ्रमांत नसतो! जो सकळ भ्रमावेगळा तो महापुरूष जाणावा)

भ्रम हा नसेल जयासी । मनीं वोळखावे तयासी । ऐके आतां भ्रमासीं । निरोपिजेल ॥ ८॥

ज्यांना भ्रम नसेल त्यांचे स्वरुप मनाने समजून घ्यावें आतां भ्रमाचे निरुपण करतो ते श्रवण करा.

येक परब्रह्म संचलें । कदापी नाहीं विकारले । त्यावेगळें भासलें । तें भ्रमरूप ॥ ९ ॥

एक परब्रह्म सर्वत्र भरलेले आहे,त्याला कधीच काही विकार होत नाही,त्याच्याशिवाय जे भासतें तें भ्रमाचें रुप होय.(निर्विकार परब्रह्म जे सर्वत्र संचले आहे,त्यावेगळे बाकी सर्व भ्रमरुप आहे)

जयासी बोलिला कल्पांत । त्रिगुण आणि पंचभूत । हें अवघेंचि समस्त । भ्रमरूप ॥ १० ॥

ज्यांचा नाश होतो असे तीन गुण आणि पंचमहाभूतें ही सगळीच भ्रमरुप आहेत,(कल्पांती नाहीशी होणारी अष्टधा प्रकृति भ्रमरुप आहे)

मी तूं हा भ्रम । उपासनाहि भ्रम । ईश्वरभाव हाहि भ्रम । निश्चयेंसीं ॥ ११ ॥

मीपण,तूपण,उपासना,ईश्र्वरभाव ही सर्व निश्र्चयेकरुन भ्रमरुप आहेत.

**॥ श्लोक ॥  भ्रमेणाहं भ्रमेण त्वं । भ्रमेणोपासका जनाः । भ्रमेणेश्वर भावत्वं । भ्रममूलमिदं जगत् ॥ १ ॥**

याकारणें सृष्टि भासत । परंतु भ्रमचि हा समस्त । यामध्यें जे विचारवंत । तेचि धन्य ॥ १२ ॥

म्हणून सृष्टि भासत असली तरी तो सगळा भ्रम आहे,ह्याच्यात विचारवंत असतील तेंवढेच धन्य होत (भासमान सर्व सृष्टि भ्रमरुप असून ह्यांत विवेकाने वेगळा होईल तेवढाच धन्य होय )

आतां भ्रमाचा विचारु । अत्यंतचि प्रांजळ करूं । दृष्टांतद्वारे विवरूं । श्रोतयासी ॥ १३॥

आतां भ्रमाचा विचार श्रोत्यांना द्दष्टांताच्या द्वारे अतिशय स्पष्ट करुन सांगू.

भ्रमण करीतां दुरीं देसीं । दिशाभूली आपणासी । कां वोळखी मोडे जीवलगांसी । या नांव भ्रम ॥ १४॥

दूरदेशांत (परदेशांत) हिंडत असतांना आपली दिशाभूल होतें किंवा जिव्हाळ्याच्या माणसांची ओळख विसरली जातें,

कां उन्मत्त द्रव्य सेविलें । तेणें अनेक भासों लागलें । नाना वेथां कां झडपिलें । भुतें तो भ्रम ॥ १५ ॥

किंवा अंमली पदार्थ खाल्यामुळे एकाचें अनेक पदार्थ भासू लागतात,अनेक रोग उदभवतात किंवा पिशाच्याने झडपलें जाते ह्याचे नांव भ्रम होय.

दशावतारीं वाटती नारी । कां ते मांडली बाजीगरी । उगाच संदेह अंतरीं । या नांव भ्रम ॥ १६ ॥

दशावतारामध्ये (लळितामध्ये) स्त्रिया (खरोखरी पुरुष असून) ख-याशा भासतात. (लळित व नाटकें ह्यातील स्त्रींपात्रें खरी वाटतात) किंवा (बाजीगरी) गारुडाच्या खेळांतील पदार्थ खरे भासतात,अथवा मनांत उगीच संशय उत्पन्न होतो तो भ्रम.

ठेविला ठाव तो विसरला । कां मार्गीं जातां मार्ग चुकला । पट्टणामधें भांबावला । या नांव भ्रम ॥ १७ ॥

( पट्टणामधें - मोठ्या शहरात )

ठेवलेली जागा विसरतो (पुरलेल्या निधानाची-ठेव्याची-जागा चूकतो),मार्गानें जाताना वाट चुकतो,शहरामध्ये गोंधळून जातो तो भ्रम होय.

वस्तु आपणापासीं असतां । गेली म्हणोनि होये दुचिता । आपलें आपण विसरतां । या नांव भ्रम ॥ १८ ॥

वस्तु आपली आपल्याजवळच असतांना ती हरवली म्हणून काळजींत पडतो,आपलें आपण विसरतो हा भ्रम होय.

कांही पदार्थ विसरोन गेला । कां जें सिकला तें विसरला । स्वप्नदुःखें घाबिरा जाला ।या नांव भ्रम ॥१९॥

काही पदार्थ विसरुन जाणें किंवा शिकलेले विसरणें,स्वप्नांतील दु:खाने घाबरें होणे ह्याचें नांव भ्रम होय.

दुश्चिन्हें अथवा अपशकुन । मिथ्या वार्तेनें भंगे मन । वचके पदार्थ देखोन । या नांव भ्रम ॥ २० ॥

दुश्चिन्हें किंवा अपशकुन झालेसें वाटून भयभीत होणें,किंवा खोटी बातमी ऐकून मनाला वाईट वाटणें,एखादा पदार्थ पाहून मनांत दचकणें (वचके) हा भ्रम होय.

वृक्ष काष्ठ देखिलें । मनांत वाटें भूत आलें । कांहींच नस्तां हडबडिलें । या नांव भ्रम २१ ॥

झाड किंवा लांकूड पाहून पिशाश्च आलें असें मनांत वाटणें किंवा काहीच नसतानां उगीच घाबरणें (हडबडिणें),हा भ्रम होय.

काच देखोन उदकांत पडे।कां सभा देखोन दर्पणीं पवाडे। द्वार चुकोन भल्तीकडें जाणें या नांव भ्रम ॥२२॥

स्वच्छ उदकाला कांच म्हणून पाण्यात पडणे किंवा पलिकडे आरशांत सभा आहे असें वाटून आरशावर जाऊन आदळणे (पवाडणें) व दार चुकून भलतीकडें जाणे ह्याला भ्रम म्हणतात.

येक अस्तां येक वाटे । येक सांगतां येक निवटे । येक दिसतां येक उठे । या नांव भ्रम ॥ २३ ॥

( निवटे - निष्पन्न होते )

असतें एक व वाटते एक,एक सांगावें आणि घडावें (निवटे) दुसरे,एक दिसत असतां भलतेंच उत्पन्न व्हावें (दिसावें) हा भ्रम होय.

आतां जें जें देइजेतें । तें तें पुढें पाविजेतें । मेलें माणुस भोजना येतें । या नांव भ्रम ॥ २४ ॥

आतां जे जे दान करावें ते तें आपणास पुढें मिळतें,मेलेले माणूस भोजनाला येते असें वाटणें हा भ्रम होय.

ये जन्मींचें पुढिले जन्मीं । कांहीं येक पावेन मी । प्रीतीगुंतली मनुष्याचे नामीं । या नांव भ्रम ॥ २५ ॥

ह्या जन्मातील काहीतरी पुढल्या जन्मांत मिळेल असें वाटणें (एखाद्याच्या नावाचें प्रेम वाटणें) मनुष्याच्या ठिकाणी प्रेम गुंतून राहाणें  हा भ्रम होय.

मेलें मनुष्य स्वप्ना आलें । तेणें कांहीं मागितलें । मनीं अखंड बैसलें । यानांव भ्रम ॥ २६ ॥

मेलेल्या माणसाने स्वप्नातं येऊन काही मागितलें आणि तेंच मनांत नित्य राहिले (त्याचेच चिंतन करीत बसले) तर तो भ्रम होय.

अवघें मिथ्या म्हणोन बोले । आणि समर्थावरी मन चाले । ज्ञाने वैभवें दपटले । या नांव भ्रम ॥ २७ ॥

( ज्ञाने वैभवें दपटले - ज्ञानी असून वैभवाने दिपून गेला / भुलला )

(शहाण्यांतही भ्रम कसा असतो पाहा) सगळें लटके म्हणून म्हणतो आणि सामर्थ्याचा तर लोभ सुटतो,अशा रितीने ज्ञाता असूनही वैभवाच्या योगानें दडपला जातो (सर्व मिथ्या म्हणून तोंडाने सांगतो व आपली बडेजावी किंवा महती कशी वाढेल ह्याची चिंता करितो,जाणता असून सर्व वैभवाला भुलतो)

कर्मठपणें ज्ञान विटे । कां ज्ञातेपणें बळें भ्रष्टे । कोणीयेक सीमा फिटे । या नांव भ्रम ॥ २८ ॥

(सीमा फिटे - अहंकाराने मर्यादा उल्लंघन )

कर्मठपणामुळे ज्ञानाचा वीट येणे किंवा ज्ञानाच्या आढयतेने मुद्दाम भ्रष्ट होणें,असा रितीनें कोणतीही मर्यादा सुटणे हा भ्रम होय (कर्मठपणाच्या तो-यात ज्ञानाला तृच्छ गणतो,नाही तर मी ज्ञाता-ब्रह्मरुप म्हणून अनाचार करतो-ह्याप्रमाणें कोणत्याही मार्गाचा अतिरेक करितो तो भ्रमिष्टच होय.

देहाभिमान । कर्माभिमान जात्याभिमान कुळाभिमान । ज्ञानाभिमान मोक्षाभिमान । या नांव भ्रम ॥ २९ ॥

देह,कर्म,जाति,कुळ,ज्ञान, किवा मोक्ष ह्यांचा अभिमान धरणें हा भ्रम होय.

कैसा न्याय तो न कळे । केला अन्याने तो नाडले । उगाच अभिमानें खवळे । या नांव भ्रम ॥ ३० ॥

न्याय कसा असतो ते कळत नाही,केलेला अन्याय उमजत नाही,उगीच अभिमानानें खवळतो ह्याचें नाव भ्रम.

मागील कांही आठवेना । पुढील विचार सुचेना । अखंड आरूढ अनुमाना । या नांव भ्रम ॥ ३१ ॥

मागील काही आठवत नाही पुढील विचार सुचत नाही,नेहमी संशयात गुरफटलेला असतो,(अनुमाने बांधीत असतो) ह्यांचे नांव भ्रम होय.

प्रचीतिविण औषध घेणे । प्रचित नस्ता पथ्य करणे । प्रचीतीविण ज्ञान सांगणें । या नांव भ्रम ॥ ३२ ॥

अनुभवाशिवाय औषधें घेणें किंवा उगाच पथ्य करणें किंवा अनुभव नसतां ज्ञान सांगणे ह्यांचे नांव भ्रम होय.

फळश्रुतीवीण प्रयोग । ज्ञानेंवीण नुस्ता योग । उगाच शरीरें भोगिजे भोग । या नांव भ्रम ॥ ३३ ॥

फलश्रुतीवांचून अनुष्ठान किंवा संस्कार (प्रयोग) करणें,ज्ञानावाचून नुसता योगाचा अभ्यास करणें,शरीराने उगीच भोग भोगीत राहाणें (शरीरभोगावर मन ठेवणें) ह्यांचे नांव भ्रम होय.

ब्रह्मा लिहितो अदृष्टीं आणि वाचून जाते सटी । ऐशा प्रकारीच्या गोष्टी । या नांव भ्रम ॥ ३४ ॥

( अदृष्टीं - नशिबी )

ब्रह्मदेव कपाळावर लिहून ठेवतो व ते सटवाई (सटी) वाचून जातें,अशा प्रकारच्या गोष्टी हा भ्रम होय.

उदंड भ्रम विस्तारला । अज्ञानजनीं पैसावला। अल्प संकेतें बोलिला । कळावया कारणें ॥ ३५॥

असा भ्रमाचा विस्तार फारच मोठा असून अज्ञानी लोकांत तो फैलावला आहे.श्रोत्यांना कळावें म्हणून थोडक्यांत सांगितला आहे.(अज्ञानजनांत अनेक लोकभ्रम माजलेले आढळतात,थोडक्यांत सुचविले आहें)

भ्रमरूप विश्व स्वभावें । तेथें काये म्हणोन सांगावें । निर्गुण ब्रह्मावेगळें अघवें । भ्रमरूप ॥३६ ॥

सारें विश्र्वच मुळी भ्रमरुप आहे,तेथे काय काय म्हणून वर्णन करावे ?तेथे भ्रमांना काय कमी आहे ?निर्गुण ब्रह्माखेरीज सर्व काही (अवघे) भ्रमरुप आहे.

ज्ञातास नाहीं संसार । ऐसें बोलती अपार । गत ज्ञात्याचे चमत्कार । या नांव भ्रम ॥ ३७ ॥

ज्ञानी मनुष्याला संसार नाही  असे  अनेक लोक म्हणतात आणि होऊन गेलेल्या ज्ञान्यांचें चमत्कार सांगतात,हा भ्रम होय.(ज्ञात्यांचे चमत्कार हाही भ्रमच)

येथें आशंका उठिली । ज्ञात्याची समधी पूजिली । तेथें कांहीं प्रचीत आली । किंवा नाहीं ॥ ३८ ॥

ह्या ठिकाणीं शंका उत्पन्न झाली,ज्ञात्याच्या समाधीची पूजा केल्याने काही अनुभव येतो किंवा नाही ? (ह्यावर कोणी शंका घेईल,कीं सत्पुरुषांच्या समाधीची पुजा करण्यानें प्रचीती येते ती खरी की भ्रमरुप ?)

तैसेचि अवतारी संपले । त्यांचेहि सामर्थ्य उदंड चाले । तरी ते काये गुंतले । वासना धरूनि ॥ ३९ ॥

त्याचप्रमाणें भगवंताचे अवतार होऊन गेले त्यांचेही सामर्थ्य पुष्कळ चालतें तर ते वासना धरुन संसारात गुंतून पडतात की काय ?(तसेंच अवतारी पुरुषांचे सामर्थ्य त्यांच्या पश्र्चात चालतें तेव्हा ते वासनेंत गुंतले आहेत की काय ?)

ऐसी आशंका उद्भवली । समर्थें पाहिजे निरसिली । इतुकेन हे समाप्त जाली । कथा भ्रमाची ॥ ४० ॥

अशी ही शंका उद्भवली तिचे निरसन समर्थांनी केले पाहिजें येथें ही भ्रमाची कथा संपली.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे भ्रमनिरूपणनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : सगुणभजन ॥ श्रीराम ॥**

अवतारादिक ज्ञानी संत । सारासारविचारें मुक्त । त्यांचे सामर्थ्य चालत । कोण्या प्रकारें ॥ १ ॥

प्रश्न-ज्ञानी,संत व भगवंताचे अवतार इत्यादि जे सारासार विचारानें मुक्त झालें त्यांचे सामर्थ्य (सांप्रत,त्यांच्या पश्चात) कोणत्या प्रकारानें (कसें) चालते ?(त्यांची वासना बाकी राहिलेली असतें काय ?)

हें श्रोतयांची आशंका । पाहातां प्रश्न केला निका । सावध होऊन ऐका । म्हणे वक्ता ॥ २ ॥

ही श्रोत्यांची शंका आहे,विचार केला तर हा प्रश्न ठीक आहे,ह्याचे उत्तर सावध होऊन ऐका,असे वक्ता म्हणतो.

ज्ञानी मुक्त होऊन गेले । मागें त्यांचे सामर्थ्य चाले । परंतु ते नाहीं आले । वासना धरूनी ॥ ३ ॥

उत्तर-ज्ञानी तर मुक्त होउन जातात आणि पाठीमागे त्यांचे सामर्थ्य चालत असतें,परंतु ते काही वासना धरुन येत नाहीत (असा अवतारी महापुरुषांचे सामर्थ्य त्यांच्यामागे चालतें,पण ते वासना धरुन येतात म्हणून मात्र नव्हे.)

लोकांस होतो चमत्कार । लोक मानिती साचार । परंतु याचा विचार । पाहिला पाहिजे ॥ ४ ॥

लोकांना तर त्यांचा चमत्कार अनुभवास येतो आणि लोक तो खरा मानतात,पण ह्याचा नीट विचार केला पाहिजें.भाविकांना त्यांचे चमत्कार खरे वाटतात,जिवंत असतानाही संतांचे किती चमत्कार जनांत पसरतात,पण ह्या गोष्टींचा नीट विचार केला पाहिजें.

जीत अस्तां नेणों किती । जनामधें चमत्कार होती । ऐसियाची सद्य प्रचिती । रोकडी पाहावी ॥ ५ ॥

तें जिवंत असतानांच त्यांचे लोकांमध्यें अनेक चमत्कार होतात,तेव्हा ह्या चमत्कारांचा विचार प्रत्यक्ष पाहा (करा)

तो तरी आपण नाहीं गेला । लोकीं प्रत्यक्ष देखिला । ऐसा चमत्कार जाला । यास काये म्हणावें ॥ ६ ॥

तो स्वतः जात नाही असें असतां लोकांना तर तो प्रत्यक्ष दिसतो असा हा चमत्कार झाला ह्याला काय म्हणावें ?(सत्पुरुष वासना धरुन येत नाहीत,पण लोकांना ते प्रत्यक्ष दिसतात-भेटतात,ह्याला काय म्हणावें ?)

तरी तो लोकांचा भावार्थ । भाविकां देव येथार्थ । अनेत्र कल्पना वेर्थ । कुतर्काची ॥ ७ ॥

(तर भाविक लोकांच्या विश्र्वासाचा भाग आहे) तर ही लोकांची श्रध्दा (निष्ठा) होय.भाविकांना देव खराच असतो,बाकीच्या कुर्तकाच्या कल्पना व्यर्थ होत (त्याबद्दल व्यर्थ कुतर्क काढीत बसण्यात अर्थ नाही)

आवडे तें स्वप्नीं देखिलें। तरीकाय तेथून आलें । म्हणाल तेणें आठविलें । तरी द्रव्य कां दिसे ॥ ८ ॥

ज्या पदार्थाची आवड असते,तो स्वप्नांत दिसतो तर तो काय आपली जागा सोडून आला ?त्याने आठवण केली म्हणून दिसला असें म्हणाल तर प्रत्यक्ष पदार्थ का दिसावा ? (आपल्या आवडीच्या वस्तु स्वप्नांत दिसतात इतकेंच)

एवं आपली कल्पना । स्वप्नीं येती पदार्थ नाना । परी ते पदार्थ चालतीना । अथवा आठऊ नाहीं ॥९॥

एकंदरीत स्वप्नांत जे पदार्थ येतात ती आपली कल्पना होय.ते पदार्थ चालतही नाहीत किंवा त्यांची आठवणही नसतें.(तात्पर्य हे सारे कल्पनेंचे खेळ आहेत,कल्पनेमुळेंच स्वप्नांत अनेक पदार्थ दिसतात.पण तें पदार्थ कोठून चालून येत नाहीत किंवा त्यांची आठवण असतेंच असें नाही)

येथें तुटली आशंका । ज्ञात्यास जन्म कल्पूं नका । उमजेना तरी विवेका । बरें पाहा ॥ १० ॥

येथे शंका फिटली ह्यास्तव ज्ञान्याला जन्म आहे अशी कल्पना करु नका,समजूत पटली नसेल तर नीट विचार करा (तात्पर्य,संत जन्म घेऊन येतात अशी कल्पना करु नका,हे एकदम लक्षांत न आल्यास चांगला विचार करुन पाहा)

ज्ञानी मुक्त होऊन गेले । त्यांचें सामर्थ्य उगेचि चाले । कां जे पुण्यमार्गें चालिलें । म्हणोनियां ॥ ११ ॥

ज्ञानी मुक्त होउन गेलें तरी ते पुण्यमार्गानें चालल्यामुळें (त्यांची इच्छा नसतांही) त्यांचे सामर्थ्य त्यांच्या मागे सहजच चालतें.

याकारणें पुण्यमार्गें चालावें । भजन देवाचें वाढवावें । न्याये सांडून न जावें । अन्यायमार्गें ॥ १२ ॥

ह्यासाठी त्यांच्याप्रमाणें आपणही पुण्यमार्गानें चालावें,देवांचे भजन वाढवावे व न्यायनीतीनें चालावें-न्याय सोडून अन्यायाच्या मार्गानें कधीं जाऊ नयें.

नानापुरश्चरणें करावीं । नाना तीर्थाटणें फिरावीं । नाना सामर्थ्यें वाढवावीं। वैराग्यबळें ॥ १३ ॥

अनेक पुरश्र्चरणे करावी,अनेक तीर्थयात्रा कराव्या,अशा प्रकारे वै़राग्याच्या बळावर अनेक सामर्थ्ये वाढवावी (आपलेही सामर्थ्य वाढवावे)

निश्चये बैसे वस्तूकडे । तरी ज्ञानमार्गेंहि सामर्थ्य चढे । कोणीयेक येकांत मोडे । ऐसें न करावें ॥ १४ ॥

परब्रह्मावर निश्र्चय ठेवला तर ज्ञानमार्गानेंही सामर्थ्य वाढते.पण स्वरुपस्थितीचा झालेला निश्र्चय ढळेल असे काही करु नयें (स्वस्वरुपी स्थिरता प्राप्त झाली तर ज्ञानमार्गानेंही सामर्थ्य वाढतें,अशासाठी एकांत भंग पावेल असे काहीही करु नयें)

येक गुरु येक देव । कोठें तरी असावा भाव । भावार्थ नस्तां वाव । सर्व कांहीं ॥ १५ ॥

एक गुरु किंवा एक देव ह्या दाहोपैकी एके ठिकाणी कोठेतरी भाव-अचळ विश्र्वास-ठेवावा,भाव नसेल तर-विश्र्वासावांचून-सर्व काहीं व्यर्थ होतें.

निर्गुणीं ज्ञान जालें । म्हणोन सगुण अलक्ष केलें । तरी तें ज्ञातें नागवलें । दोहिंकडे ॥ १६ ॥

निर्गुणाचे ज्ञान झाले  म्हणून सगुणाकडे दुर्लक्ष केले,तर तो बिचारा ज्ञाता दोहीकडून फशी पडतो.

नाहीं भक्ती नाहीं ज्ञान । मधेंच पैसावला अभिमान । म्हणोनियां जपध्यान । सांडूंच नये ॥१७ ॥

अशी स्थिति म्हणजे धड भक्तिही नाही व धड ज्ञानही नाही,मध्येच अभिमान माजतो. ह्यास्तव जप व ध्यान ही सोडूच नयेंत (जपध्यानाचा अभ्यास सोडू नयें)

सांडील सगुणभजनासी । तरी तो ज्ञाता परी अपेसी । म्हणोनियां सगुणभजनासी । सांडूंच नये ॥ १८ ॥

सगुणभजन-सगुणोपासना-सोडिल तर तो ज्ञाता असला तरी अपेशी होय.ह्यास्तव सगुण भजन टाकूच नये.(सगुण केव्हाही सोडू नयें)

निःकाम बुद्धीचिया भजना । त्रैलोकीं नाहीं तुळणा । समर्थेंविण घडेना । निःकाम भजन ॥ १९ ॥

निष्कामबुध्दीनें केलेल्या भजनाला-निष्काम भक्तीला त्रैलोक्यांत दुसरी उपमा नाही.पण सामर्थ्यावाचून असें निष्कामभजन घडत नाही)

कामनेनें फळ घडे । निःकाम भजनें भगवंत जोडे । फळभगवंता कोणीकडे । महदांतर ॥ २० ॥

कामनेने केलेल्या भजनाने फळ मिळतें व निष्काम भजनाने भगवंताची प्राप्ति होते,फळ व भाग्यवान ह्या दोहींमध्यें केवढें बरे मोठे अंतर आहे!(सकाम भक्तीने कामना पूर्ण होतात,पण निष्काम भक्तीनें परमात्मा जोडतो,कामपूर्तता व भगवतप्राप्ति ह्या दोंहोत अंतर केवढे आहे!)

नाना फळे देवापासी । आणी फळ अंतरीं भगवंतासी । याकारणें परमेश्वरासी । निःकाम भजावें ॥ २१ ॥

( अंतरीं - दूर करते , अंतरवते )

देवाजवळ अनेक फळे आहेत पण फळांची आशा धरली तर भगवंत दुरावतो,म्हणून परमेश्र्वराचें भजन निष्काम बुध्दीने करावें (फळदाता तरी भगवंतच आहे,पण फळावर नजर ठेवली तर भगवंत अंतरतात,म्हणून निष्काम भक्तीने भगवंतास वश करुन घ्यावें.

निःकामभजनाचें फळ आगळे । सामर्थ्य चढे मर्यादावेगळें । तेथें बापुडी फळें । कोणीकडे ॥ २२॥

निष्काम भजनाचें फळ विशेष (आगळें-अतिशय मोठें) आहें,त्यायोगानें असें काही अर्मयाद सामर्थ्य प्राप्त होतें की त्याच्यापुढे बिचारी फळे काय होत? (त्या सामर्थ्यापुढें सकाम भक्तीने प्राप्त होणारी फळे केवळ तृच्छ होत.)

भक्तें जें मनीं धरावें । तें देवें आपणचि करावें । तेथें वेगळें भावावें । नलगे कदा ॥ २३ ॥

भक्तानें जी जी गोष्ट मनांत धरावी ती ती देव स्वतःच करतों,तेथे निराळी कल्पना करण्याचें केव्हाही कारण नाहीं (निष्काम भक्ताच्या मनांत जे जे येते ते ते देव तात्काळ आपण होऊन पुर्ण करितों. असें देव भक्त एकच असतात,त्यांच्यात दुजेंपण नसतें.

दोनी सामर्थ्यें येक होतां । काळास नाटोपे सर्वथा । तेथें इतरांसी कोण कथा । कीटकन्यायें ॥ २४ ॥

( नाटोपे - आवारत नाही , कीटकन्यायें - क्षुद्र मूल्य )

ह्याप्रमाणें त्यापुढें देव व भक्त दोंघांची सामर्थ्ये एक झाली असता तेथे काळाचेही काही चालत नाही,कलिकाळाची मात्रा चालत नाही , तेथे बाकीच्याची काय कथा ?ते बिचारे किडयासारखे होत,(मग इतरांचा किटकन्यायानें काय पाड ?)

म्हणोनि निःकाम भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान । तयास तुळितां त्रिभुवन । उणें वाटे ॥ २५ ।

म्हणून निष्काम भजन हें उत्तम होय,त्यांत ब्रह्मज्ञान असलें तर विशेषच श्रेष्ठ अशाच्या तुलनेंला त्रिभुवनें सुध्दा लहानच वाटतें (म्हणून निष्काम भक्ति व विमल ब्रह्मज्ञान हीं दोन्ही जेथें एकवटतात त्यापुढें त्रैलोक्य हीन होय.)

येथें बुद्धीचा प्रकाश । आणिक न चढे विशेष । प्रताप कीर्ती आणी येश । निरंतर ॥ २६ ॥

(त्यापुढें अचाट बुध्दीच्या पुरुषाचेंही तेज फिकें पडतें,यश,किर्ती व प्रताप तेथें निरंतर वास्तव करितात) (देव व भक्त ह्यांची सामर्थ्ये जेथें एकत्रित होतात असा स्थितीचें) आणखी वर्णन करावयास बुध्दीचें सामर्थ्य अधिक चालत नाहीं प्रताप किर्ती व यश ही त्या ठिकाणी सदोदित असतात)

निरूपणाचा विचार । आणी हरिकथेचा गजर । तेथें होती तत्पर । प्राणीमात्र ॥ २७ ॥

जेथे अध्यात्मनिरुपणाची चर्चा व हरिकथेंचा घोष चाललेला असतो (म्ह.ज्ञान व भक्ति एक होतात),त्या ठिकाणी सर्व प्राणी लुब्ध असतात-तेथें प्राणिमात्र वश होतें.

जेथें भ्रष्टाकार घडेना । तो परमार्थहि दडेना । समाधान विघडेना । निश्चयाचें ॥ २८ ॥

ज्या परमार्थात भ्रष्टाकार घडत नाही तो परमार्थ लपत नाही आणि आत्मनिश्र्चयाचें समाधानही बिघडत नाही (जेथे भ्रष्टाकार नाही तेथल्या परमार्थाचें तेज फाकतें व विवेक-समाधान खंड पावत नाही)

सारासारविचार करणें । न्याये अन्याये अखंड पाहाणें । बुद्धि भगवंताचें देणें । पालटेना ॥ २९ ॥

असो.नित्य सारासार विचार करावा व न्याय-अन्याय पाहावा,म्हणजें भगवंतानें दिलेली बुध्दि भगवंतच देतो) (सारासारविवेक व न्यायनीति दोन्ही जाज्वल्य आहेत अशी बुध्दि भगवंतानें द्यावी लागतें.)(भगवंत अनन्य भक्ताला अशी बुध्दि देतात.)

भक्त भगवंतीं अनन्य । त्यासी बुद्धी देतो आपण । येदर्थी भगवद्‌वचन । सावध ऐका ॥ ३० ॥

भक्त देवाच्या ठिकाणी अनन्य असला म्हणजे देव त्याला आपण होउन योग्य बुध्दि देतो ह्याविषयी भगवंताचे गीतेत एक वचन आहे ददामि बुध्दियोगं तम ते ऐका.

**श्लोकार्ध ॥ ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥**

म्हणौन सगुण भजन । वरी विशेष ब्रह्मज्ञान । प्रत्ययाचें समाधान । दुर्ल्लभ जगीं ॥ ३१ ॥

म्हणून सगुण भजन,त्यांत विशेष ब्रह्मज्ञान आणि त्यावर अनुभवाचें समाधान असा योग जगामध्ये फार दुर्मिळ आहे (तात्पर्य,निष्काम सगुणभक्ति व मुरलेले ब्रह्मज्ञान ह्या दोन गोष्टी जेथें एकत्र असतात तेथेंच आनुभविक ज्ञान मिळतें व तें अत्यंत दुर्लभ होय)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सगुणभजननिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : प्रचीतनिरूपण ॥ श्रीराम ॥**

ऐका प्रचितीचीं लक्षणें । प्रचित पाहेल तें शाहाणें । येर वेडे दैन्यवाणे । प्रचितीविण ॥ १ ॥

आतां अनुभवाची लक्षणें सांगतो ती ऐका,अनुभव (परीक्षा) घेईल तो शहाणा बाकीचें जें अनुभव घेणार नाहीत ते वेडें व दैन्यवाणें होत (प्रचीत पाहील तो शहाणा प्रचीत नाही तर जिणें दैन्यवाणें होय.)

नाना रत्नें नाना नाणीं । परीक्षून न घेतां हानी । प्रचित न येतां निरूपणीं । बैसोंच नये ॥ २ ॥

अनेक रत्ने,नाणी पारखून घेतली नाहीत तर नुकसान होतें,तद्वत ज्या निरुपणाचा अनुभव येत नाही ते ऐकण्यांस बसूच नयें.

तुरंग शस्त्र दमून पाहिलें । बरें पाहातां प्रचितीस आले । तरी मग पाहिजे घेतलें । जाणते पुरुषीं ॥ ३ ॥

(तुरंग) घोडा किंवा शस्त्र नीट चालवून पाहावें व परीक्षेस नीट उतरलें तर मग जाणत्या पुरुषानें घ्यावें.

बीज उगवेलसें पाहावें । तरी मग द्रव्य घालून घ्यावें । प्रचित आलियां ऐकावें । निरूपण ॥ ४ ॥

बी उगवेल असें पाहावें व तसें असेंल तर द्रव्य खर्चून घ्यावें,तद्वत अनुभव आल्यास निरुपण ऐकावें (उगवेलसें वाटलें तरच पैसा खर्चून पेरणीचे बी घ्यावें,प्रचीत आली तरच निरुपण ऐकावें)

देहीं आरोग्यता जाली । ऐसी जना प्रचित आली । तरी मग आगत्य घेतली । पाहिजे मात्रा ॥ ५ ॥

शरीरास आरोग्य प्राप्त झालें असा अनुभव आला म्हणजें तें औषध घ्यावें (मात्रेचा दुस-यास गुण येऊन आरोग्य झालें असें ऐकल्यावरच मात्रा घ्यावी.)

प्रचितीविण औषध घेणें । तरी मग धडचि विघडणें । अनुमानें जें कार्य करणें । तेंचि मूर्खपण॥६॥

अनुभव पाहिल्याशिवाय औषध घेणे म्हणजें धड असलेली प्रकृत्ति मुद्दाम बिघडविणे होय,केवळ अनुभवाने काम करणे हे मूर्खपणाचे होय. (अनुमानाने काहीही कार्य करणें मूर्खत्वाचें होय)

प्रचितीस नाहीं आलें । आणी सुवर्ण करविलें । तरी मग जाणावें ठकिलें । देखतदेखतां ॥ ७ ॥

अनुभव पाहिला नसतांच सोने करविले (सोने घेऊन दागिनें घडविलें) तर खात्रींने समजावें  की पाहाता पाहाता फसवणूक झाली.

शोधून पाहिल्याविण । कांहींतरी येक कारण । होणार नाहीं निर्वाण । प्राणास घडे ॥ ८ ॥

शोधून पाहिल्याशिवाय कोणतेही काम करणे वाजवी होणार नाही,प्राणांवर बेतेल (शोधल्यावांचून काम केल्यास प्राणांत व्हायचा प्रसंग!)

म्हणोनी अनुमानाचें कार्य । भल्यानीं कदापि करूं नये । उपाय पाहतां अपाये । नेमस्त घडे ॥ ९ ॥

(म्हणून अनुमानाने चालू नयें,चालल्यास उपाय केलें तर अपायच होतात) ह्यास्तव शहाण्यानें अनुमानाचें कार्य मुळीच करु नयें,कारण त्यानें उपाय करु गेले असता अपाय मात्र नेमका होईल.

पाण्यांतील म्हैसीची साटी । करणें हें बुद्धिच खोटी । शोधिल्याविण हिंपुटी । होणें घडे ॥ १० ॥

( साटी - खरेदी ,संगत,संग्रह )

पाण्यांत बसलेल्या म्हशीचा सौदा (साटी-खरेदी) ठरवून इसारा देणें ही बुध्दीच खोटी,शोध केल्याशिवाय जे जे करावें त्यांत कष्टच भोगावें लागतात.

विश्वासें घर घेतलें । ऐसें किती नाहीं ऐकिलें । मैंदें मैंदावें केलें । परी तें शोधिलें पाहिजे ॥ ११ ॥

( किती नाहीं - कधी नाही )

विश्र्वासानें (न पाहाता) एखाद्याचे घर कोणी घेतलें,असें कधी ऐकलें नाही,कपटी माणसानें कपट केलें तरी तें शोधून पाहिलें पाहिजें (अमक्या तमक्यानें विश्र्वासानें घर घेतलें,ही भाषा कोणी ऐकली नाही लबाडाच्या लबाडया शोधून पाहाव्यात)

शोधिल्याविण अन्नवस्त्र घेणें । तेणें प्राणास मुकणें । लटिक्याचा विश्वास धरणें । हे।चि मूर्खपण ॥ १२ ॥

परीक्षा केल्याशिवाय अन्न किंवा वस्त्र घेणें म्हणजें प्राणाला मुकणें होय.खोट्याचा विश्र्वास धरणें हाच मूर्खपणा होय.

संगती चोराची धरितां । घात होईल तत्वता । ठकु सिंतरु शोधितां । ठाईं पडे ॥ १३ ॥

चोराची संगति धरली तर आपला घात होणार हें ठरलेलेच आहें लबाड किंवा फसविणारा (सिंतरु) कोण हें शोध केल्यानें समजतें.

गैरसाळ तामगिरी । कोणी नवी मुद्रा करी । नाना कपट परोपरीं । शोधून पाहावें ॥ १४ ॥

( गैरसाळ - खोटारडा ,तामगिरी - तांब्यापासून खोटी/नकली नाणी बनविणारा )

गैरशिस्त वर्तनाचा तांबट (ताम-ताम्र-तांबेगिरी)(खोटी वजनें वगैरे करणारा) किंवा कोणी खोटी नाणी करणारा (नवे नवे वेष करुन फसविणारा) अशी अनेक प्रकारचीं कपटें शोधून पाहावीत.

दिवाळखोराचा मांड । पाहातां वैभव दिसे उदंड । परी तें अवघें थोतांड । भंड पुढें ॥ १५ ॥

( मांड - पसारा , भंड - फजिती )

दिवाळखोराचा भपका पाहिला तर त्यांचे ऐश्र्वर्य दांडगें आहेंसे वाटतें (भोळा माणूस त्या खोट्या वैभवानें दिपून जातो) पण तें सगळें थोतांड होय,पुढे फजिती ठेवलेली (पुढे उघडकीस येऊन फजितवाडा होतोच)

तैसें प्रचितीवीण ज्ञान । तेथें नाहीं समाधान । करून बहुतांचा अनुमान । अन्हीत जालें ॥ १६ ॥

तद्वत अनुभवरहित ज्ञानामध्ये समाधान नाही.असले ज्ञान पुष्कळांना संशयात पाडून त्याचे कल्याण करते,(त्याप्रमाणे प्रचीतीवांचून ज्ञान फोल होय,त्याचे समाधान होत नाही,बहुतांना व्यर्थ नादी लावल्यानें शेवटी ह्याचें अनहितच होते.)

मंत्र यंत्र उपदेसिले । नेणतें प्राणी तें गोविलें । जैसें झांकून मारिलें । दुखणाईत ॥ १७ ॥

दुखणाईत माणसाला (रोग प्रकट न करतां) झांकून मारावें त्याचप्रमाणें मंत्रांचा व यंत्रांचा उपदेश करुन अज्ञानी प्राण्यांना गोत्यात घालतात,(मंत्रतंत्राचा नेणत्याला उपदेश करणें म्ह.दुखणाईत झाकून मारल्यासारखे पापावह आहे)

वैद्य पाहिला परी कच्चा । तरी प्राण गेला पोराचा । येथें उपाये दुसर्याचा । काये चाले ॥ १८ ॥

वैद्य पाहून आणला पण तो बिनअनुभवाचा तर त्याच्यायोगानें पोराचा प्राण जाईल,त्याठिकाणी दुस-याचा उपाय काय चालणार ?(कच्चा वैद्य पाहिला की शेवटी त्यांत पोराचा प्राण जाणार हें ठरलेलेच.)

दुःखें अंतरी झिजे । आणी वैद्य पुसतां लाजे । तरीच मग त्यासी साजे । आत्महत्यारेपण ॥ १९ ॥

आपल्या दुःखाने मनांत झुरतो,आणि वैद्याने विचारले तर लाजतो,अशाला आत्महत्या करणारा हेंच नांव शोभतें.(दुःखाने अंतर्यामी कासावीस झालेला मनुष्य  वैद्यापुढेही लाजेने खरे सांगणार नाही तर तो आत्मघातकीच होय.)

जाणत्यावरी गर्व केला । तरी नेणत्याकरितां बुडाला । येथें कोणाचा घात जाला । बरें पाहा ॥ २० ॥

जाणत्याशी गर्व करतो व स्वतः नेणता असल्यामुळे बुडतो,ह्यामुळे कोणाचा घात झाला ह्याचा विचार करा बरे! (स्वतः नेणता म्हणून समजत नाही व जाणत्याशी आढयतेने वागायचें ह्यांत घात कोणाचा होईल ?)

पापाची खंडणा जाली । जन्मयातना चुकली । ऐसी स्वयें प्रचित आली । म्हणिजे बरें ॥ २१ ॥

पापाचें खंडण झाले,जन्ममृत्यूच्या यातना चुकल्या असा स्वतःला अनुभव आला म्हणजें ठीक!

परमेश्वरास वोळखिलें । आपण कोणसें कळलें । आत्मनिवेदन जालें । म्हणिजे बरें ॥ २२ ॥

परमेश्र्वराचें स्वरुप ओळखिले,आपण कोण ते कळून येऊन आत्मनिवेदन झाले म्हणजें बरे! (परमेश्र्वरास ओळखावें,आपण कोण हें समजून घ्यावें,व आत्मनिवेदनानें मोकळे व्हावे म्हणजे जन्मसाफल्य झाले)

ब्रह्मांड कोणें केलें । कासयाचें उभारलें । मुख्य कर्त्यास वोळखिलें । म्हणिजे बरें ॥ २३ ॥

हें ब्रह्मांड कोणी उत्पन्न केले,कशाचे बनविले,ह्याचा जो मुख्य कर्ता तो ओळखिला म्हणजे बरे!

येथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वायां गेला । प्राणी संशईं बुडाला । प्रचितीविण ॥ २४ ॥

त्या गोष्टीसंबंधाने संशय राहिला तर केलेला परमार्थ फुकट जातो,कारण अनुभव नसल्यानें प्राणी संशयात गुरफटून बुडतो.(ह्याविषयी जर निःसंदेहपणा आला नाही तर परमार्थाविषयी सर्व खटपटी व्यर्थ होत. ती प्रचीति नसल्यामुळे संशयात बुडाला असे समजावें)

हें परमार्थाचें वर्म । लटिकें बोले तो अधम । लटिके मानी तो अधमोद्धम । येथार्थ जाणावा ॥ २५ ॥

हें परमार्थाचे वर्म आहे,हे जर खोटें असेल तर बोलणारा अधम होय व खोटे मानील तो अधमाधम होय हे निश्र्चयपूर्वक समजावें.

येथें बोलण्याची जाली सीमा । नेणतां न कळे परमात्मा । असत्य नाहीं सर्वोत्तमा । तूं जाणसी ॥ २६ ॥

येथे बोलण्याची सीमा झाली,अज्ञानानें परमात्म्याचें स्वरुप कळत नाही,ह्यांत असत्य असे काही नाही,हे सर्वोत्तमा (श्रीरामा) हें तू यथार्थ जाणतोसच!

माझे उपासनेचा बडिवार । ज्ञान सांगावें साचार । मिथ्या बोलतां उत्तर । प्रभूस लगे ॥ २७ ॥

खरें (आचारासह) ज्ञान सांगावें हाच माझ्या उपासनेचा थोरपणा आहे,खोटें असल्यास प्रभूला दोष लागेल.

म्हणोनि सत्यचि बोलिलें । कर्त्यास पाहिजे वोळखिलें । मायोद्भवाचें शोधिलें । पाहिजे मूळ ॥ २८ ॥

तो लागू नये म्हणून खरेच सागितले आहें ब्रह्मांडाचा कर्ता कोण त्याला ओळखिले पाहिजें म्हणजें माया कशी उत्पन्न झाली ह्याचा शोध घेतला पाहिजें (मायोद्भावाचें मूळ शोधावें,हेंच काय तें खरें ज्ञान होय)

तेंचि पुढें नीरूपण । बोलिलेंचि बोलिलें प्रमाण । श्रोतीं सावध अंतःकर्ण । घातलेंचि घालावें ॥ २९ ॥

तेंच निरुपण (पूर्वी सांगितलेले) आहे,श्रोत्यांनी अंतःकरण सावध ठेविलेलेंच आहे ,ते आणखी सावध ठेऊन विचार करावा (श्रोत्यांनी सावधपणें ऐकावें म्हणून सांगितलेले पुन्हा सांगतो)

सूक्ष्म निरूपण लागलें । तेथें बोलिलेंचि मागुतें बोलिलें । श्रोत्यांस पाहिजे उमजलें ।म्हणौनियां ॥ ३० ॥

सुक्ष्म विषयांचे निरुपण लागलें आहें त्याची समजूत श्रोत्यांना नीट पडावी म्हणून बोललेले भाषणच पुनःपुन्हा बोलावें लागतें.(हा सूक्ष्माचा विषय श्रोत्यांना नीट उमजावा म्हणून पुनःपुन्हा सांगावा लागतो)

प्रचित पाहातां निकट । उडोन जाती परिपाठ । म्हणोनि हे खटपट । करणें लागे ॥ ३१ ॥

( परिपाठ - जनारूढी,दंडक )

अनुभव जवळ करावयाला (पाहावयाला) जावें तर (परिपाठ-) जनरुढीच्या विरुध्द होते म्हणून ही खटपट करावी लागतें.

परिपाठेंचि जरी बोलिलें । तरी प्रचितसमाधान बुडालें । प्रचितसमाधान राखिलें ।तरी परिपाठ उडे ॥ ३२॥

जगाच्या समजुतीप्रमाणे प्रमाणें बोलायला जावें तर अनुभव व समाधान ही बुडतात आणि ती राखावी तर परिपाठ बुडतो,प्रचीत-समाधान राखायला जावें तर लोकपरिपाठाला-लौकिक समजुतीला सोडून बोलावे लागतें,बरे परिपाठाप्रमाणें बोलावे तर प्रचीतीचे समाधान लाभत नाही,

ऐसी सांकडी दोहींकडे । म्हणौन बोलिलेंचि बोलणें घडे । दोनी राखोनियां कोडें । उकलून दाऊं ३३ ॥

असें दोन्हीकडून संकट होतें,म्हणून बोललेलेच बोलावें लागतें,आतां ही सांभाळून ही कोंडी उकलून दाखवू.

परीपाठ आणी प्रचित प्रमाण । दोनी राखोन निरूपण । श्रोते परम विचक्षण । विवरोत पुढें ॥ ३४ ॥

परिपाठ व प्रचीत (अनुभव) ही दोन्ही प्रमाण धरुन व दोहोंसही सांभाळून निरुपण करु.परम सुज्ञ श्रोत्यांनी त्याचा पुढें विचार करावा.(आम्हा दोन्ही सांभाळावयाची असल्यामुळें तेंच तें पुनः पुन्हां सांगावें लागतें)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रचितनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : पुरुषप्रकृति ॥ श्रीराम ॥**

आकाशीं वायो जाला निर्माण ।तैसी ब्रह्मीं मूळमाया जाण । त्या वायोमधें त्रिगुण । आणी पंचभूतें ॥१॥

आकाशामध्यें वायु उत्पन्न झाला,त्याप्रमाणें ब्रह्मामध्ये मूळमाया झाली असें समजावें,त्या वायूमध्यें तीन गुण व पंचभूतें असतात.(वायुस्वरुप मूळमायेंत त्रिगुण-पंचभूतातत्मक अष्टधा प्रकृति अतिसूक्ष्म अशी होती)

वटबीजीं असे वाड । फोडून पाहातां न दिसे झाड । नाना वृक्षांचे जुंबाड । बीजापासून होती ॥ २ ॥

( वाड - प्रचंड , जुंबाड - समूह )

वडाच्या बीजामध्ये मोठें (वाड) असतें पण तें बी फोडून पाहिले तर त्यांत झाड दिसत नाही,अनेक वृक्षांचा समूह बीजापासूनच होतो ( मुळांत असते तेंच व्यक्त दशेला येते)

तैसी बीजरूप मूळमाया । विस्तार जाला तेथूनियां । तिचें स्वरूप शोधूनियां । बरें पाहावें ॥ ३ ॥

तद्वत मूळचा बीजरुप असून तिच्यापासून हा विस्तार झाला,तिच्या स्वरुपाचा नीट विचार करुन पाहावा,(ज्या बिजभूत मूळमायेपासून हा सृष्टीरचनेचा अवडंबर निर्माण झाला तिचें स्वरुप शोधून पाहावें)

तेथें दोनी भेद दिसती । विवेकें पाहावी प्रचिती । निश्चळीं जे चंचळ स्थिती । तोचि वायो ॥ ४ ॥

त्या ठिकाणी- मूळमायेंत-दोन भेद दिसतात,त्याचा अनुभव विवेकाने पाहावा,निश्र्चल परब्रह्मामध्ये जी चंचळरुपाची स्थिति तोच वायु (निश्र्चळी जी चंचळ स्थिति तोच वायु)

तयामधें जाणीवकळा । जगज्जोतीचा जिव्हाळा । वायो जाणीव मिळोन मेळा । मूळमाया बोलिजे ॥ ५ ॥

त्याच्यामध्ये जगज्योतीचा झरा किंवा उगम अशी जाणीवकळा असतें ही जाणीव व वायु मिळून जो मिलाफ ह्यास मूळमाया म्हणतात (त्यातील जी जाणीव तोच जगज्ज्योतीचा मूळ झरा होय,पाणी व वायु मिळून मूळमाया)

सरिता म्हणतां बायको भासे । तेथें पाहातां पाणीच असे । विवेकी हो समजा तैसें । मूळमायेसी ॥ ६ ॥

नदी म्हटले की स्त्रीचा भास होतो पण पाहिले तर तेंथें पाणीच असतें,त्याचप्रमाणे मायेची (मूळ) गोष्ट आहें असें विचारी मनुष्याने समजावें (मूळमाया हा शब्द स्त्रीलिंगी आहे,म्हणजें मूळमाया स्त्री आहे असे नव्हें नदी हा शब्द स्त्रीलिंगी म्हणजें नदी काही स्त्री नव्हें तसेंच हें समजावें.)

वायो जाणीव जगज्जोती । तयास मूळमाया म्हणती । पुरुष आणी प्रकृती । याचेंच नांव ॥ ७ ॥

वायु व जगाला चेतवून देणारी जाणीव ह्या दोहींस मिळून मूळमाया म्हणतात व ह्याचेंच नांव प्रकृति -पुरुष आहें.

वायोस म्हणती प्रकृती । आणी पुरुष म्हणती जगज्जोती । पुरुषप्रकृती शिवशक्ती । याचेंच नांव ॥ ८ ॥

वायूला प्रकृति म्हणतात व जगज्जोतीला पुरुष म्हणतात, पुरुषप्रकृत्ति,शिवशक्ति ही ह्यांचीच नावें आहेंत (जाणीव व वायु ह्यांनाच पुरुषप्रकृत्ति किंवा शिवशक्ति अशी नावें आहेंत)

वायोमधें जाणीव विशेष । तेंचि प्रकृतीमधें पुरुष । ये गोष्टीचा विश्वास । धरिला पाहिजे॥ ९॥

वायूमध्ये जाणीव श्रेष्ठ आहे व ती जाणीव हीच प्रकृतीमधील पुरुष होय,ह्या गोष्टीवर विश्र्वास ठेविला पाहिजे (वायुस्वरुप मूळमायेंतील जाणीव तोच पुरुष)

वायो शक्ति जाणीव ईश्वर । अर्धनारी नटेश्वर । लोक म्हणती निरंतर । येणें प्रकारें ॥ १० ॥

वायु ही शक्ति व ईश्र्वर (शिव),ह्याच अर्थांनें-उभयतां एकरुप असल्यामुळे-मूळमायेला लोक नेहमी अर्धनारीनटेश्र्वर म्हणतात.

वायोमधें जाणीव गुण । तेंचि ईश्वराचें लक्षण । तयापासून त्रिगुण । पुढें जाले ॥ ११ ॥

वायूमध्ये जो जाणीवेंचा गुण आहे तेंच ईश्र्वराचें स्वरुप होय,त्यापासून पुढे तीन गुण (त्रिगुण) झाले.

तया गुणामधें सत्वगुण । निखळ जाणीव लक्षण । त्याचा देहधारी आपण । विष्णु जाला ॥ १२ ॥

त्या त्रिगुणांमध्यें सत्वगुण हें निव्वळ जाणीवेंचे रुप स्वतः विष्णूनें घेतलें (त्या त्रिगुणांत सत्वगुण म्ह.शुध्द जाणीव त्याचा देहधारी विष्णु झाला)

त्याच्या अंशे जग चाले । ऐसे भगवद्‌गीता बोले। गुंतले तेंचि उगवले । विचार पाहातां ॥ १३ ॥

त्याच्या अंशानें जग चालतें असें भगवदगीतेंत सांगितलें आहें असेंच मूळापर्यंत जे विचार करतील तें मायेंत गुंतलेले असतील तरी मुक्त होतील.

येक जाणीव वांटली । प्राणीमात्रास विभागली । जाणजाणों वांचविली । सर्वत्र काया ॥ १४ ॥

एकच जाणीव सर्वत्र वाटली गेली आहें,प्रत्येक प्राण्यांत तिचा अंश असून शरीराचें रक्षण जाणतेपणानें (समजून) तीच करतें (एकच जाणीव सर्व प्राण्यांत खेळत असून त्यांचे रक्षण करीत असतें)

तयेंचे नांव जगज्जोती । प्राणीमात्र तिचेन जिती । याची रोकडी प्रचिती । प्रत्यक्ष पाहावी ॥ १५ ॥

तिचे नांव जगज्योति,प्रत्येक प्राणी तिच्यायोगानेंच जिवंत (जिती) आहे.ह्याचा रोकडा अनुभव प्रत्यक्ष पाहावा.

पक्षी श्वापद किडा मुंगी । कोणीयेक प्राणी जगीं । जाणीव खेळे त्याच्या आंगीं । निरंतर ॥१६॥

पक्षी,श्र्वापद,किडा,मुंगी असा जगांतला कोणताही प्राणी घेतलात तरी त्याच्या आंगी नेहमी जाणीव खेळत असतें.

जाणोनी काया पळविती । तेणें गुणें वांचती । दडती आणि लपती । जाणजाणों ॥ १७ ॥

जाणीवेमुळे देह पळवितात व त्यामुळें वांचतात,दडतात आणि लपतात हे सर्व जाणीवेमुळेंच.

आवघ्या जगास वांचविती । म्हणोन नामें जगज्जोती । ते गेलियां प्राणी मरती । जेथील तेथें॥ १८॥

सगळ्या जगाला वांचविते म्हणून तिला जगज्योति असे नांव आहे,ती निघून गेली म्हणजे प्राणी जेथल्या तेथें मरुन पडतात.

मुळींचे जाणीवेचा विकार । पुढें जाला विस्तार । जैसे उदकाचे तुषार । अनंत रेणु ॥१९ ॥

( मुळींचे - मूळमायेचे )

उदकाचे तुषार उडून जसे असंख्य रेणु पसरतात त्याप्रमाणे मूळमायेतील जाणीवेला विकार होऊन तिचा पुढें अपार विस्तार वाढला.

तैसे देव देवता भूतें । मिथ्या म्हणोनये त्यांतें । आपलाल्या सामर्थ्यें ते । सृष्टीमधें फिरती ॥२० ॥

तशीच देव,देवता,दैवतें, भूतें ही जाणीवेंची झाली,त्यांना खोटे म्हणू नयें,आपापल्या सामर्थ्याप्रमाणें तीं सृष्टीत फिरत असतात.(ती नाहीत असे म्हणू नयें)

सदा विचरती वायोस्वरूपें । स्वईछा पालटिती रूपें । अज्ञान प्राणी भ्रमें संकल्पें त्यास । बाधिती ॥ २१ ॥

ती नेहमी वायुरुपाने वावरत असतात.आपल्या इच्छेने रुपें बदलतात आणि अज्ञानी प्राणी आपल्या संकल्पामुळें-वासनांमुळे-भ्रम पावतात,त्यांना त्याची बाधा होते.

ज्ञात्यास संकल्पेचि असेना । म्हणोन त्यांचेन बाधवेना । याकारणें आत्मज्ञाना । अभ्यासावें ॥ २२ ॥

ज्ञान्याला वासना किंवा संकल्पच नसल्यामुळे त्याला त्यांच्यानें बाधा करवत नाही,त्यांचा उपद्रव होत नाही,ह्यास्तव आत्मज्ञानाचा अभ्यास करावा.

अभ्यासिलीया आत्मज्ञान। सर्वकर्मास होये खंडण । हे रोकडी प्रचित प्रमाण । संदेह नाहीं ॥ २३ ॥

आत्मज्ञानाचा अभ्यास केला म्हणजें सर्व कर्मांचे खंडण होतें (नाश होतो) हा रोकडा अनुभव आहे ह्यांत किमपिही संशय नाही.

ज्ञानेविण कर्म विघडे । हें तों कदापि न घडे । सद्‌गुरुवीण ज्ञान जोडे । हेंहि अघटीत ॥ २४ ॥

( विघडे - खंडन होते )

ज्ञानावांचून कर्मे नाहीसे झाले असे कधींही घडावयाचें नाही आणि सद्गुरुवांचून ज्ञान प्राप्त होणें हे ही दुर्घट (कठिण) होय.(ज्ञानावाचून कर्मपाश सुटत नाहीत व ज्ञान सद्गुरुवांचून होत नाही हे वर्म आहे)

म्हणोन सद्‌गुरु करावा । सत्संग शोधून धरावा । तत्वविचार विवरावा । अंतर्यामीं ॥ २५॥

(म्हणून सद्गुरु समागम करावा व अंर्तयामी तत्वांचा झाडा करावा) म्हणून सद्गुरु करावा,नीट शोध करुन सत्संग धरावा आणि अंतःकरणात तत्वविचारांचे विवरण करावें.

तत्वें तत्व निरसोन जातां । आपला आपणचि तत्वता । अनन्यभावें सार्थकता । सहजचि जाली ॥ २६ ॥

एकंदर तत्वांचे निरसन झाले म्हणजें आपला आपणच खरोखरी उरतो आणि अनन्यभावांनें सहजच सार्थकता होतें (तत्वे त्तत्वातं मिसळून आपलें आपणच राहातो,ह्या स्वरुपाशी अनन्यता हेंच सर्वांचे साध्य होय)

विचार न करितां जें जें केलें । तें तें वाउगें वेर्थ गेलें । म्हणोनि विचारीं प्रवर्तलें । पाहिजे आधीं ॥ २७ ॥

विचार न करतां जें जें होतें तें तें व्यर्थ होतें म्हणून अगोदर विचार करावयास पाहिजे.(विचारावाचून सर्व व्यर्थ आहे म्हणून अगोदर विचार करावयास पाहिजे (विचारावाचून सर्व व्यर्थ आहें म्हणून विचाराची चाळणा निरंतर ठेवावी)

विचार पाहेल तो पुरुषु । विचार न पाहे तो पशु । ऐसी वचनें सर्वेशु । ठाईं ठाईं बोलिला ॥ २८ ॥

विचार पाहील तो पुरूष होय आणि विचार न पाहील (करील)तो पशु होय,असे परमात्माच ठिकठिकाणी बोलले आहेत (अशी वचनें देंवाने जागोजाग सांगितली आहेत)

सिद्धांत साधायाकारणें । पूर्वपक्ष लागे उडवणें । परंतु साधकां निरूपणें । साक्षात्कार ॥ २९ ॥

सिध्दांत प्रस्थापित करण्यासाठी पूर्वपक्ष उडवून टाकावा लागतो (शंका निरसन करावी लागतें),परंतु निरुपणाच्या योगानें (अध्यात्म-) साधकांना साक्षात्कार होतो (पण साधकांना तर त्यांच्या अचळ श्रध्देमुळें निरुपणांत साक्षात्कार होत असतो)

श्रवण मनन निजध्यास । प्रचितीनें बाणतां विश्‍वास । रोकड साक्षात्कार सायास । करणेंचि नलगे ॥ ३० ॥

श्रवण-मनन-निदिध्यासाच्या अभ्यासानें अनुभव घेतां घेता विश्र्वास बसला म्हणजें रोकडा साक्षात्कार ठेवलेला,दुसरी खटपट करावीच लागत नाही (त्यासाठी वेगळें उपाय धुंडायला नकोत.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिश्यसंवादे पुरुषप्रकृतीनाम समास नववा ॥**

**समास दहावा : चळाचळनिरूपण ॥ श्रीराम ॥**

गगनासारिखें ब्रह्म पोकळ । उदंड उंच अंतराळ। निर्गुण निर्मळ निश्‍चळ । सदोदित ॥१॥

ब्रह्म हें आकाशासारखें पोकळ,व्यापक (उदंड),(सर्वांपलीकडे) खूप ऊंच,निर्गुण,निर्मळ व निश्र्चल नेहमीं असतें.

त्यास परमात्मा म्हणती । आणिक नामें नेणों किती । परी तें जाणिजे आदिअंतीं । जैसें तैसें ॥२ ॥

त्याला परमात्मा म्हणतात,त्याला आणखी काहीतरी नावें आहेत,पण तें आदिअंती जसेच्या तसेंच असतें.

विस्तीर्ण पसरला पैस । भोंवता दाटला अवकाश । भासचि नाहीं निराभास । जैसें तैसें ॥ ३ ॥

त्याचा विस्तार अपरंपार पसरलेला आहे. त्यांचे रुप सभोवार भरलेले आहे,त्याला भासच नाही,ते जसेच्या तसें निराभास असतें,

चहुंकडे पाताळतळीं । अंतचि नाहीं अंतराळीं । कल्पांतकाळीं सर्वकाळीं । संचलेचि असे ॥ ४ ॥

तें चहूकडें आहे,पाताळाच्या खालीं आहे,ते अंतराळात आहे त्याला अंतच नाही,तें कल्पांतकाळी आहे,असें ते सर्वत्र सर्वकाळी भरलेले आहे (ब्रह्म आकाशासारखें सर्वव्यापी,निराभास,पाताळीं व अंतराळी पसरलेलें,कल्पांतीही सर्वत्र संचलेले आहें)

ऐसें कांहींयेक अचंचळ । ते अचंचळीं भासे चंचळ । त्यास नामेंहि पुष्कळ । त्रिविधा प्रकारें ॥ ५ ॥

असे काही अचंचल म्हणजें निश्र्चळ असें तें स्वरुप आहे त्या निश्र्चळामध्यें चंचळाचा भास होतो आणि त्यास तिन्ही लिंगाची नांवे पुष्कळ आहेत.(असें ते काहीएक-अनिर्वाच्य व निश्र्चळ आहे,त्या निश्र्चळी चंचळ भासलेल्या चंचळालाही पुष्कळ नावें आहेत)

न दिसतां नांव ठेवणें । न देखतां खूण सांगणें । असो हें जाणायाकारणें । नामाभिधानें ॥ ६ ॥

न दिसतांच नांव ठेवावयाचे,न पाहातां खूण सांगावयाची,अशांतला हा प्रकार आहे,असो हे समजण्यासाठीच नावें ठेवलेली आहेत (तें दिसत नसून त्याला नांव देणें किंवा खूण सांगणें प्राप्त आहे.ओळख पटण्यासाठी हे करावें लागतें)

मूळमाया मूळप्रकृति । मूळपुरुष ऐसें म्हणती । शिवशक्ति नामें किती । नाना प्रकारें ॥ ७ ॥

मूळमाया,मूळप्रक्रृति,मूळपुरूष,शिवशक्ति अशी अनेक प्रकारची कितीतरी नावें त्या चंचळालाच आहेत.

परी जें नाम ठेविलें जया । आधीं वोळखावें तया । प्रचितीवीण कासया । वलगना करावी ॥ ८ ॥

पण जें नाव त्याला ठेवलें त्याला आधी ओळखले पाहिजें,अनुभव घेतल्याशिवाय उगीच बडबड कशाला करावी ?

रूपाची न धरितां सोये । नामासरिसें भरंगळों नये । प्रत्ययाविण गळंगा होये । अनुमानज्ञानें ॥ ९ ॥

( गळंगा - घोटाळा )

रुपाची ओळख करुन घेण्याचा मार्ग न धरतां नुसत्या नांवाबरोबर वाहात जाऊ नयें,अनुभव न घेता नुसत्या अनुमानाच्या ज्ञानाने गोधळ(गळंगा) मात्र माजतो. (रूप ध्यानांत न येता नुसत्या नावांबरोबर वाहावणें योग्य नाही प्रत्यय नसता अनुमानानें नुसता गोंधळ मात्र माजतो.)

निश्चळ गगनीं चंचळ वारा । वाजों लागला भरारां । परी त्या गगना आणि समीरा । भेद आहे ॥ १० ॥

निश्र्चळ आकाशामध्ये चंचळ वारा भरारा वाजूं लागला,परंतु तें आकाश व तो वारा ह्यांत भेद आहें.

तैसें निश्चळ परब्रह्म । चंचळ माया भासला भ्रम । त्या भ्रमाचा संभ्रम । करून दाऊं ॥ ११ ॥

(तसा निश्र्चळ परब्रह्माच्या ठिकाणी चंचळ मायारुप भ्रम उभा राहिला,तथापि ब्रह्म व भ्रम ह्यांत फरक आहें,आतां त्या मायाभ्रमाचें विवरण करु) तद्वत परब्रह्म निश्र्चळ आहें,त्यांत चंचळमाया जी भासतें तो भास होय,त्या भ्रमाचेंच विस्तारपूर्वक वर्णन करुन सांगू.

जैसा गगनी चालिला पवन । तैसें निश्चळीं जालें चळण । इछ्या स्फूर्तिलक्षण । स्फूर्णरूप ॥ १२ ॥

जसा आकाशांत वायु उत्पन्न होतो,त्याप्रमाणें निश्र्चळ ब्रह्माच्या ठिकाणी चलन,तीच आदि स्फूर्ति किंवा स्फुरणरुप इच्छा होय.(एकोSहं बहु स्याम । मी एक आहें तें बहु व्हावें ही इच्छा,आदि स्फुर्ति)

अहंपणें जाणीव जाली । तेचि मूळप्रकृति बोलिली । माहाकारणकाया रचली । ब्रह्मांडीची ॥ १३ ॥

अहंरुपानें जी जाणीव उत्पन्न झाली तिलाच मूळप्रकृति म्हणतात,ब्रह्मांडाचा महाकारण देह तो हिचाच बनलेला आहे.

माहामाया मूळप्रकृती । कारण ते अव्याकृती । सूक्ष्म हिरण्यगर्भ म्हणती । विराट ते स्थूळ ॥ १४ ॥

महाकारण,कारण, सूक्ष्म व स्थूल हें जसें पिंडातील चार देह तसेंच मूळप्रकृति,अव्याकृत,हिरण्यगर्भ व विराट असें ब्रह्मांडाचें चार देह आहेंत.(ह्यांना इश्र्वर तनुचतुष्ट्य किंवा ईश्र्वराचें चार देह म्हणतात,पिंडाचें चार व ब्रह्मांडाचे चार देह मिळून आठ देह ह्या अष्टदेंहांचा विचार व निरसनाचा प्रकार पंचीकरणांत सांगितलेला असतो,ह्या अष्टदेहांपैकी आठवा देह जो मूळमाया तीच वर सांगितलेली अहंस्फुरण रुप जाणीव होय,जाणीव तीच मूळमाया.

ऐसें पंचीकर्ण शास्त्रप्रमये । ईश्वरतनुचतुष्टये । म्हणोन हें बोलणें होये । जाणीव मूळमाया ॥ १५ ॥

असें हें शास्त्रसंमत पंचीकरण व ईश्र्वराचें तनुचतुष्ट्य आहें म्हणून हीच मूळमाया होय असें म्हणतात.

परमात्मा परमेश्वरु । परेश ज्ञानघन ईश्वरु । जगदीश जगदात्मा जगदेश्वरु । पुरुषनामें ॥ १६ ॥

(मूळ मायेला परमेश्वरवाचक अनंत नावें आहेंत,नाम-रुप-लिंग-भेद नसल्यामुळें तिला काहीं पुरुषवाचक,काही स्त्रीवाचक,काही नपुंसक अशी सर्व प्रकारची नांवें केवळ संकेतासाठी ठेवलेली आहेंत) परमात्मा,परमेश्वर,परेश,ज्ञानघन,ईश्वर,जगदीश,जगदात्मा,जगदीश्वर हीं पुरुषवाचक नावें होत.

सत्तारूप ज्ञानस्वरूप । प्रकशरूप जोतिरूप । कारणरूप चिद्रूप । शुद्ध सूक्ष्म अलिप्त ॥ १७ ॥

मूळ मायेलाच सत्तारुप,ज्ञानरुप,प्रकाशरुप,ज्योतिरुप,कारणरुप,चिद्रूप,शुध्द,सूक्ष्म,अलिप्त.

आत्मा अंतरात्मा विश्वात्मा ।द्रष्टा साक्षी सर्वात्मा ।क्षेत्रज्ञ शिवात्मा जीवात्मा ।देही कूटस्त बोलिजे ॥१८॥

आत्मा,अंतरात्मा,विश्वात्मा,द्रष्टा,साक्षी,सर्वात्मा,क्षेत्रज्ञ,जीवात्मा,शिवात्मा,देही,कुटस्थ असें म्हणतात.

इंद्रात्मा ब्रहमात्मा हरिहरात्मा ।येमात्मा धर्मात्मा नैरूत्यात्मा ।वरुणवायोकुबेरात्मा ।ऋषीदेवमुनिधर्ता ॥१९॥

इंद्रात्मा,ब्रह्मात्मा,हरिहरात्मा,यमात्मा,धर्मात्मा,नैऋत्यात्मा,वरुण्-वायु-कुबेर ह्यांचा आत्मा,ऋषिदेवमुनी ह्यांना धारण करणारा,

गण गंधर्व विद्याधर । येक्ष किन्नर नारद तुंबर । सर्व लोकांचें अंतर । तो सर्वांतरात्मा बोलिजे ॥ २० ॥

गण,गंधर्व,विद्याधर,यक्ष,किन्नर,नारद,तुंबर इत्यादि सर्व लोकांच्या अंतरांत राहाणारा त्याला सर्वातरात्मा म्हणतात.(इ. सर्व लोकांचे तो अंतर आहें म्ह.सर्वांतरात्मा म्हणतात)

चंद्र सूर्य तारामंडळें । भूमंडळें मेघमंडळें । येकवीस स्वर्गें सप्त पाताळें । अंतरात्माच वर्तवी ॥ २१ ॥

हा अंतरात्माच चंद्र,सूर्य,तारा (नक्षत्र) मंडळें,भूमंडळें,मेघमंडळें,एकवीस स्वर्ग,स्पप्त पाताळें इत्यादि सर्वांना चाळवितो.

गुप्त वल्ली पाल्हाळली । तिचीं पुरुषनामें घेतलीं । आतां स्त्रीनामें ऐकिलीं । पाहिजे श्रोतीं ॥ २२ ॥

(मूळमायाच गुणमाया होऊन सत्वरजतमरुप हरिहरब्रह्मादि उत्पन्न करुन सकळ ब्रह्मांडरचनेला कारण होतें,म्हणून गुणमाया पाल्हाळली असें म्हटलें आहें)

मूळमाया जगदेश्वरी । परमविद्या परमेश्वरी । विश्ववंद्या विश्वेश्वरी । त्रैलोक्यजननी ॥ २३ ॥

अशी ही गुप्तवेल जाणीव पसरलेली आहें,तिची पुरुषवाचक नांवें सांगितली,आतां मूळमायेंची स्त्रीवाचक नांवें श्रोत्यांनी ऐकली पाहिजेंत. मूळमाया,जगदीश्वरी,परमविद्या,परमेश्वरी,विश्ववंद्या,विश्वेश्वरी,त्रैलोक्यजननी

अंतर्हेतु अंतर्कळा । मौन्यगर्भ जाणीवकळा । चपळ जगज्जोती जीवनकळा । परा पश्यंती मध्यमा ॥२४॥

अंतर्हेतु,अंर्तकला,मौन्यगर्भा,जाणीवकळा,चपला,जगज्योति,जीवनकला,परा,पश्यंती,मध्यमा.

युक्ति बुद्धि मति धारणा । सावधानता नाना चाळणा । भूत भविष्य वर्तमाना । उकलून दावी ॥ २५ ॥

युक्ति,बु ध्दि,मति,धारणा,सावधानता,अनेक प्रकारची चाळणा,भूत-भविष्य-वर्तमान स्पष्ट करणारी,

जागृति स्वप्न सुषुप्ती जाणे । तुर्या ताटस्ता अवस्ता जाणे ।सुख दुःख सकळ जाणे ।मानापमान ॥ २६ ॥

जागृती स्वप्न सुषुप्ति,तुर्या,तटस्थता इत्त्यादि अवस्था,तसेंच सुखदुःख,मान अपमान,वगैरे सर्व जाणणारी.

ते परम कठीण कृपाळु । ते परम कोमळ स्नेहाळु । ते परम क्रोधी लोभाळु । मर्यादेवेगळी ॥ २७ ॥

ती परम कठोर असून कृपाळु,अत्यंत कोमळ व स्नेहाळु,अत्यंत क्रोधी असून परम लोभाळु

शांती क्ष्मा विरक्ती भक्ती । अध्यात्मविद्या सायोज्यमुक्ति । विचारणा सहजस्थिति । जयेचेनी ॥ २८ ॥

जिच्यामुळें शांति,क्षमा,विरक्ति,भक्ति,अध्यात्मविद्या,सायुज्यमुक्ति,विचारशीलता सहजस्थिति ह्या प्राप्त होतात अशी ती आहें.

पुर्वी पुरुषनामें बोलिलीं । उपरी स्त्रीनामें निरोपिलीं । आतां नपुषकनामें ऐकिलीं ।पाहिजे चंचळाचीं ॥ २९ ॥

पूर्वी पुरुषवाचक व नंतर स्त्रीवाचक नांवें सांगितलीं,आतां ह्या चंचळाची (मूळमायेंची) नपुसकलिंगी नावें ऐकावी.

जाणणें अंतःकर्ण चित्त । श्रवण मनन चैतन्य जीवित । येतें जातें सुचीत । होऊन पाहा ॥ ३० ॥

जाणणें,अंतःकरण,चित्त,श्रवण,मनन,चैतन्य,जीवित ,जे येते ते जातें ही नावे लक्ष देऊन पहा.

मीपण तूंपण जाणपण । ज्ञातेंपण सर्वज्ञपण । जीवपण शिवपण ईश्वरपण । अलिप्तपण बोलिजे ॥ ३१ ॥

मीपण,तूपण,जाणपण,ज्ञातेपण,सर्वज्ञपण,जीवपण,शिवपण,ईश्र्वरपण असें तिला म्हणतात.

ऐसीं नामें उदंड असती । परी ते येकचि जगज्जोती । विचारवंत ते जाणती । सर्वांतरात्मा ॥ ३२ ॥

अशी पुष्कळ नावें असली तरी ती जगज्योति एकच आहे,तीच सर्वांतरात्मा होय हें विचारशील असतात तें जाणतात.

आत्मा जगज्जोती सर्वज्ञपण । तीनी मिळोन येकचि जाण । अंतःकर्णचि प्रमाण । ज्ञेप्तीमात्र ॥ ३३ ॥

आत्मा (पुं.),जगज्योति (स्त्री) व सर्वज्ञपण (नपु.) ही तिन्ही मिळून एकच जाणीवरुप अंत:करण आहे हे निश्चित.

ढीग जाले पदार्थाचे । पुरुष स्त्री नपुंसक नामांचे । परंतु सृष्टीरचनेचें । किती म्हणोन संगावें ॥ ३४ ॥

अशा पुल्लिंगी,स्त्रीलिंगी,नपुसकलिंगी नावांचे पदार्थ (ढीग,राशि) पडलेले आहेत,परंतु सृष्टिरचनेचें प्रकार किती म्हणून सांगावें ?(गुणाचा म्ह.सृष्टिरचनेचा आश्रय करुन आणखी अनंत नावें सांगितलीं तरी सकळचाळिता अंतरात्मा एक आहे.)

सकळ चाळिता येक । अंतरात्मा वर्तती अनेक । मुंगीपासून ब्रह्मादिक । तेणेंचि चालती ॥ ३५ ॥

परंतु ह्या सर्वांचे पालन करणारा एकच आहें,तोच अंतरात्मा ह्या अनेकांना चाळवितो,मुंगीपासून ब्रह्मादिक देवांपर्यंत सर्व त्याच्याच योगानें चालतात (वर्ततात)

तो अंतरात्मा आहे कैसा । प्रतुत वोळखावा आमासा । नाना प्रकारींचा तमासा । येथेंचि आहे ॥ ३६ ॥

( वोळखावा आमासा - अंमळ/किंचितशी ओळख करून घ्यावी )

तो अंतरात्मा कसा आहे ह्याची ओळख अंमळशी (आमासा) प्रस्तुत करुन घ्या! (तो थोडासा ओळखावा) अनेक प्रकारचें खेळ त्यांच्यातच चाललेले आहेत.(सृष्टिरचनेचा तमाशा-बाजार-तेथून पाहावा)

तो कळतो परी दिसेना । प्रचित येते परी भासेना । शरीरीं असे परी वसेना । येके ठाईं ॥ ३७ ॥

तो कळतो परंतु दिसत नाही,त्याचा अनुभव येतो पण तो भासत नाही,तो शरीरांत आहे पण एके ठिकाणी राहात (सांपडत) नाही.

तीक्षणपणें गगनीं भरे । सरोवर देखतां च पसरे । पदार्थ लक्षून उरे । चहूंकडे ॥ ३८ ॥

( तीक्षणपणें - सूक्ष्मपणे )

तो एकदम (जोराने) आकाशांत शिरतो,सरोवर पाहिले कीं तात्काळ त्याच्या व्याप्तीइतका पसरतो,प्रत्येक पदार्थ पाहून (व्यापक)चहूंकडे शिल्लक राहातो (तो सूक्ष्म इतका कीं आकाश सुक्ष्म पण त्यांत लपून राहातो.स्थूळ इतका सरिता सागरासारखा अपरंपार सर्व पदार्थांत पसरला आहे.

जैसा पदार्थ दृष्टीस दिसतो । तो त्यासारिखाच होतो । वायोहूनि विशेष तो । चंचळविषईं ॥ ३९ ॥

जशा प्रकारचा पदार्थ त्याच्या द्दष्टीस पडतो त्या पदार्थासारखाच तो होतो (तद्रूप होतो) चंचळामध्ये तो वायूपेक्षा अधिक आहे.

कित्येक दृष्टीनें देखे । कितीयेक रसनेनें चाखे । कितीयेक ते वोळखे । मनेंकरूनि ॥ ४० ॥

तो कित्येक पदार्थ द्दष्टीनें पाहातो,कित्येक जिभेंने चाखतो व कित्येकांना मनाने ओळखतो (तो अनंत द्दष्टीने पाहातो,अनंत रसनांनी चाखतो,अनंत रुपांनी ओळखतो)

श्रोतीं बैसोन शब्द ऐकतो । घ्राणेंद्रियें वास घेतो । त्वचेइंद्रियें जाणतो । सीतोष्णादिक ॥ ४१ ॥

कानांत बसून शब्द ऐकतो,नाकाने वास घेतो व स्पर्शेंद्रियांनें शितोष्ण जाणतो (त्वचेत बसून शिताष्णादि स्पर्श जाणतो)

ऐशा जाणे अंतर्कळा । सकळामधें परी निराळा । पाहातां त्याची अगाध लीळा । तोचि जाणे ॥ ४२ ॥

(असा तो सकळांची अंर्तकळा असून सकळांहून निराळा आहे. त्याची अगाध लीला तोंच जाणे!) अशाप्रकारें तो सर्व अंतरस्थिती जाणतो.तो सर्वामध्ये असून सर्वांपेक्षा निराळा आहें. विचार केला तर त्याची गुढ लीला त्याची त्यालाच ठाऊक!

तो पुरुष ना सुंदरी । बाळ तारुण्य ना कुमारी । नपुंसकाचा देहधारी । परी नपुसक नव्हे ॥ ४३ ॥

तो पुरुष,स्त्री,बाळ,तरूण,किंवा कुमारी नाही,तो नपुंसक देहधारी असून नपुंसक नव्हे (बाल्यतारुण्यादि अवस्था त्याला नाहीत)

तो चालवी सकळ देहासी । करून अकर्ता म्हणती त्यासी ।तो क्षेत्रज्ञ क्षेत्रवासी ।देही कूटस्त बोलिजे ॥४४॥

तो सर्व देहांना चाळवितो,तरी त्याला अकर्ता म्हणतात,तसेंच त्याला क्षेत्रज्ञ क्षेत्रवासी,देही, कूटस्थ असेंही म्हणतात,

**॥ श्लोक ॥ द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च । क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोक्षर उच्यते ॥**

दोनी पुरुष लोकीं असती । क्षराक्षर बोलिजती । सर्व भूतें क्षर म्हणती । अक्षर कूटस्त बोलिजे ॥ ४५ ॥

जगांत दोन पुरुष आहेत त्यांना क्षर व अक्षर म्हणतात सर्व भूतांना क्षर म्हणजें नाशिवंत म्हणतात व कूटस्थाला (आत्म्याला) अक्षर म्हणजें अविनाशी म्हणतात (येथवर हे सर्व चंचळाचे ,मूळमायेचे अंतरात्म्याचें वर्णन झाले,निश्र्चळ परब्रह्म ह्यापलीकडे आहे.)

उत्तम पुरुष तो आणीक । निःप्रपंच निःकळंक । निरंजन परमात्मा येक । निर्विकारी ॥ ४६ ॥

( आणीक - वेगळा )

उत्तम पुरुषस्तन्य:।  उत्तम पुरुष आहे तो त्याहून वेगळाच आहे,तो निष्प्रपंच,निष्कलंक,निरंजन व निर्विकार असा एकमेव परमात्माच आहे.

च्यारी देह निरसावे । साधकें देहातीत व्हावें । देहातीत होतां जाणावें । अनन्य भक्त ॥ ४७ ॥

चारी देहांचा निरास करुन म्ह.साधक देहातीत होऊन त्याशीं अनन्य झाला,म्हणजे तो अनन्य भक्त होय.

देहमात्र निरसुनी गेला । तेथें अंतरात्मा कैसा उरला । निर्विकारीं विकाराला । ठाव नाहीं ॥ ४८ ॥

प्रत्येक देहाचा निरास झाल्यानंतर (देहाच्या अपेक्षेनें अंतरात्मा हा शब्दप्रयोग होत असल्यामुळें) ह्या ठिकाणी अंतरात्मा कसा राहील ? निर्विकारामध्ये विकार होण्याला जागाच नाही (अष्ट देहांचे निरसन झाल्यावर चंचळ अंतरात्मा कोंठे उरला ? निर्विकारी विकार कसा ?)

निश्चळ परब्रह्म येक । चंचळ जाणावें माईक । ऐसा प्रत्यय निश्चयात्मक । विवेकें पाहावा । ४९ ॥

एक परब्रह्म तेंवढें निश्चल आहे आणि चंचळ जेवढे तेवढे माईक (मायिक,नाशवंत) समजावें,असा अनुभव निश्चय धरुन विवेकांच्या योगानें पाहावा (असा निश्चयाचा प्रत्यय घ्यावा.)

येथें बहुत नलगे खळखळ । येक चंचळ येक निश्चळ । शाश्वत कोणतें केवळ । ज्ञानें वोळखावें ॥ ५० ॥

ह्या ठिकाणी फारशा यातायातीचें काम नाही,एक चंचळ व एक निश्चळ आहे त्यांमध्ये शाश्वत कोणतें ते ज्ञानानें ओळखावें (ज्ञानविवेकानें ओळखण्याचें वर्म थोडे आहे.चंचळ नाशवंत जाणून निश्चळ शाश्वत जाणावें)

असार त्यागून घेईजे सार । म्हणोन सारासार विचार । नित्यानित्य निरंतर । पाहाती ज्ञानी ॥ ५१ ॥

असार,अनित्य टाकून देऊन सार,नित्य असें निश्चळ परब्रह्म घेतां यावें म्हणून सारासारविचार व नित्यानित्यविवेक ज्ञानी पाहात असतात.

जेथे ज्ञानचि होते विज्ञान । जेथें मनांचे होतें उन्मन । तेथें कैचें चंचळपण । आत्मयासी ॥ ५२ ॥

जेथें ज्ञानच विज्ञान म्हणजें अनुभवरुप होतें व मनच उन्मन होऊन जातें तेथें आत्म्याला चंचळपणा तरी कसला ? (निश्चळ आत्मा-तेथें चंचळाला स्पर्श कोठला ?)

सांगणोवांगणीचें काम नव्हे । आपुल्या अनुभवें जाणावें । प्रत्ययाविण सिणावें । तेंचि पाप ॥ ५३ ॥

हें सांगोवांगीचें (हे नुसते बोलण्याचे) काम नाही,हे आपल्या अनुभवाने जाणायचे आहे,अनुभवावाचून रिकामी यातायात करणें हेच पाप होय (अनुभव घेऊन पाहावा,त्यांवाचून समाधान नाही)

सत्यायेवढें सुकृत नाहीं । असत्यायेवढें पाप नाहीं । प्रचितीविण कोठेंचि नाहीं । समाधान ॥ ५४ ॥

सत्याऐवढे पुण्य नाही व असत्याएवढें पााप नाही,अनुभवाशिवाय कोठेही समाधान नाही.

सत्य म्हणिजे स्वरूप जाण । असत्य माया हें प्रमाण । येथें निरोपिलें पापपुण्य । रूपेंसहित ॥ ५५ ॥

सत्य म्हणजें स्वस्वरुप निश्र्चळ ब्रह्म होय व असत्य म्हणजे चंचळ माया होय ह्यांत संशय नाही ह्या ठिकाणी पापाचें व पुण्याचें स्वरुप दाखवून दिले.

दृश पाप वोसरलें । पुण्य परब्रह्म उरलें । अनन्य होतांच जालें । नामातीत ॥ ५६ ॥

दृश्यरुपी पाप नाहीसें होऊन,पुण्यरूपी परब्रह्म तेंवढें उरले,अशा रीतीनें अनन्य नामातीत होतांच (नामरुपातीत) झालें.

आपण वस्तु स्वतसिद्ध । तेथें नाहीं देहसमंध । पापरासी होती दग्ध । येणें प्रकारें ॥ ५७ ॥

आपण स्वयमेव वस्तु-(परब्रह्म) रुप आहोत,त्या ठिकाणी देहाचा संबंध नाही अशा विचाराच्या रीतीनें पातकाच्या राशीच्या राशि जळून जातात.( स्वत:सिध्द वस्तु आहोत देह संबंध आपणस नाही, हा प्रत्यय आला की पापाचें डोंगर निमिषार्धात जळून खाक झालें)

येरवी ब्रह्मज्ञानेंवीण । जें जें साधन तो तो सीण । नाना दोषांचे क्षाळण । होईल कैसें ॥ ५८ ॥

( क्षाळण - धुणे )

बाकी ब्रह्मज्ञानाशिवाय जे जे साधन करावें त्यानें कष्ट मात्र होतात,मग अनेक दोष नाहीसे कसे होतील ? (नाना दोषांचे क्षालन करणारें ब्रह्मज्ञानच,इतर साधनें तो शीण होय)

पापाचें वळलें शरीर । पापचि घडे तदनंतर । अंतरीं तोग वरीवरी उपचार । काय करी ॥ ५९ ॥

हें शरीर पातकाचेंच बनलेले आहे आणि नंतरही त्याच्याकडून पापच घडत असतें,पोटात रोग असता वरच्या उपचाराने काय होणार ?(शरीर मुळी पातकाचेंच बनलेले आहे व नंतर दृश्य सत्य घेऊन जीव चालतो म्हणून पापच घडत जातें)

नाना क्षेत्रीं हें मुंडिलें । नाना तीर्थीं हें दंडिलें । नाना निग्रहीं खंडिलें । ठाईं ठाईं ॥ ६० ॥

ह्या शरीराला अनेक क्षेत्रात नेऊन त्यांचे मुंडण केलें,अनेक तीर्थांच्या ठिकाणी उपवासादिंकानी त्याला दंड केला (तिर्थात बुचकळ्या मारिल्या),अनेक नेमनिग्रहादिकांच्या योगानें त्याला जागोजाग त्रास दिला (ठिकठिकाणी ह्या देहाला निग्रहांनी पिडिलें)

नाना मृत्तिकेनें घांसिलें । अथवा तप्तमुद्रेनें लासिलें । जरी हें वरीवरी तासिलें । तरी शुद्ध नव्हे ‖ ६१ ‖

( लासिले - डागले )

अथवा मातीने शरीर घासलें,अथवा तप्त मुद्रेने डाग दिले (लासिलें) किंवा वरवर तासलें तरी हें शरीर शुध्द होत नाहीं,

सेणाचे गोळे गिळिले । गोमुत्राचे मोघे घेतले । माळा रुद्राक्ष घातले । काष्ठमणी ‖ ६२ ‖

( मोघे - मडके )

शेणाचें गोळे गिळले,गोमुत्राची (मोघे) गाडगी घशांत ओतलीं किंवा रुद्राक्षाच्या माळा वा काष्ठमण्यांच्या माळा घातल्या (माळामुद्रांची वा रुद्रांक्षांची भूषणें घातली)

वेष वरीवरी केला । परी अंतरीं दोष भरला । त्या दोषाच्या दहनाला । आत्मज्ञान पाहिजे ‖ ६३ ‖

( दोषाच्या दहनाला - दोष काढून टाकण्यासाठी )

(ह्याप्रमाणे वरवर वाटेल तितके वेष घातले तरी आंतले पाप दूर करण्यास आत्मज्ञानच पाहिजे) असा बाहेरून वेष केला पण अंतःकरणात दोष भरलेला असेल तर तो जाळावयाला पाहिजें.

नाना व्रतें नाना दानें । नाना योग तीर्थाटणें । सर्वांहुनी कोटीगुणें । महिमा आत्मज्ञानाचा ‖ ६४ ‖

अनेक व्रते,दाने,योग,याग,तीर्थयात्रा इत्यादि सर्वाहून (सर्व साधनांपेक्षा) आत्मज्ञानाचा महिमा कोटिपट अधिक श्रेष्ठ आहे.

आत्मज्ञान पाहे सदा । त्याच्या पुण्यास नाहीं मर्यादा । दुष्ट पातकाची बाधा । निरसोन गेली ‖ ६५ ‖

जो आत्मज्ञानाचा नित्य विचार करतो त्याच्या पुण्याला मर्यादा नाही,त्याला होणारी पातकांची दुष्ट बाधा नाहींशी होतें (आत्मज्ञानाने ज्याची बैठक बसली त्याच्या पुण्यास मर्यादा नाही त्याची सकळ पातकें भस्म झाली)

वेदशास्त्रीं सत्यस्वरूप । तेंचि ज्ञानियांचें रूप । पुण्य जालें अमूप । सुकृतें सीमा सांडिली ‖ ६६ ‖

वेदशास्त्रांत वर्णन कलेले जें सत्यस्वरुप तेंच ज्ञात्याचें रुप होय (ज्ञानी आत्मरुपच असतात) म्हणून त्यांचे पुण्य (पुण्यसंपत्ति) पुष्कळ असतें,त्याच्या सुकृताला मर्यादा राहात नाही.

या प्रचितीच्या गोष्टी । प्रचित पाहावी आत्मदृष्टीं । प्रचितीवेगळे कष्टी । होऊंच नये ‖ ६७ ‖

ह्या अनुभवाच्या गोष्टी आहेत,आत्मदृष्टीने अनुभव पाहावा,अनुभवाशिवाय व्यर्थ कष्ट करु नयेंत (प्रचीतीवांचून वृथा कष्ट आहेत)

आगा ये प्रचितीचे लोक हो ।प्रचित नस्तां अवघा शोक हो ।रघुनाथकृपेनें राहो ।प्रत्यय निश्चयाचा ॥ ६८ ॥

अहो,हा अनुभव घेण्याची इच्छा करणारे लोक हो! अनुभवाशिवाय सगळे दु:ख आहें ह्यास्तव श्रीरामकृपेने तुम्हाला निश्र्चयाचा अनुभव होवो (आत्मदर्शनप्रत्यय घ्यावा,प्रचीत नसतां दु:खशोक जात नाहीत,रघुरायाच्या कृपेने निश्र्चयप्रत्यय राहो)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चळाचळनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक दहावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक अकरावा - भीमदशक



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक अकरावा : भीमदशक समास पहिला : सिद्धांतनिरूपण॥ श्रीराम ॥**

आकाशापासून वायो होतो । हा तों प्रत्यये येतो ।वायोपासून अग्नी जो तो ।सावध ऐका ॥१॥

आकाशापासून वायु उत्पन्न होतो हा तर प्रत्यक्ष अनुभव आहे,आता वायूपासून अग्नि (कसा) उत्पन्न होतो ते लक्षपूर्वक ऐका.

वायोची कठीण घिसणी । तेथें निर्माण जाला वन्ही । मंद वायो सीतळ पाणी । तेथुनि जालें ॥ २ ॥

( घिसणी - घर्षण, कठीण घिसणी- वायुच्या उष्ण झोतापासून रवी,वन्ही,विद्युलता,मंद वायो सीतळ पाणी - मंद तेजापासून चंद्र,तर )

वायूच्या कठिण घर्षणामध्ये (प्रखर) अग्नि उत्पन्न झाला. वायूच्या उष्ण व शीतळ अशा दोन झुळका असून मंद म्हणजे शीतळवायूपासून शीतळ (चंद्र,तारा,इत्यादिकांसारखे) तेज उत्पन्न झालें व त्यापासून पाणी निर्माण झाले.

आपापासून जाली पृथ्वी । ते नाना बीजरूप जाणावी । बीजापासून उत्पत्ति व्हावी।हा स्वभावचि आहे ॥३॥

पाण्यापासून पृथ्वी झाली,ती अनेक प्रकारची बीजरुप आहे,बीजापासून (उत्पत्ति) अंकुर निघावें हा त्या बीजाचा सहज धर्म आहें (पाण्यापासून बीजरुप पृथ्वी व अनंत बीजांपासून सृष्टि सहजच झाली.)

मुळीं सृष्टी कल्पनेची । कल्पना आहे मुळींची । जयेपासून देवत्रयाची । काया जाली ॥ ४ ॥

मुळांत ही सृष्टि कल्पनेची आहे,जिच्यापासून तिन्ही देवांची शरीरें निर्माण झालीं,त्या मूळमायेंतच कल्पना आहे.(मूळमायेच्या ठिकाणची कल्पनाच सृष्टिरुप झाली आहे,)

निश्चळामधें चंचळ । तेचि कल्पना केवळ । अष्टधा प्रकृतीचें मूळ । कल्पनारूप ॥ ५ ॥

निश्र्चळामध्ये (परब्रह्मामध्यें) चंचळपणा उत्पन्न झाला हीच कल्पना होय,अष्ट प्रकारच्या प्रकृतीचें मूळ कल्पनारुप आहे.(ती पहिली कल्पना-आदिसंकल्प-म्हणजें मूळमाया,तिच्यापासून त्रिगुणात्मक गुणमाया झाली,निश्र्चळ ब्रह्माच्या ठिकाणची ही मूळमाया म्ह.चंचळ कल्पना हीच त्रिगुण-पंचभूतात्मक अष्टधा प्रकृतीचें मूळ होय)

कल्पना तेचि अष्टधा प्रकृति । अष्टधा तेचि कल्पनामुर्ती । मुळाग्रापासून उत्पत्ति ।अष्टधा जाणावी ॥६॥

मूळ (मायारुपी)कल्पना अष्टधा प्रकृतिमय आहे,आणि प्रकृतीचें (व्यक्त झालेले) आठ प्रकार हे ही कल्पनारुपच आहेत,अशा प्रकारे अगदीं आरंभापासून उत्पत्ति ही अष्टधा प्रकृतिरुप आहे.(अष्टधा प्रकृति हे कल्पनेचेच रुप होय. मूळमायेंत प्रथमपासूनच अष्टधा प्रकृत्ति आहें.)

पांच भूतें तीन गुण । आठ जालीं दोनी मिळोन । म्हणौनि अष्टधा प्रकृति जाण । बोलिजेते ॥ ७ ॥

(पृथ्वी,आप,तेज,वायु व आकाश ही) पांच भूतें,व (सत्व,रज व तम हें) तीन गुण अशी दोन्ही मिळून आठ होतात,म्हणून तिला अष्टधा प्रकृति असें म्हणतात.

मुळीं कल्पनारूप जाली । पुढें तेचि फांपावली । केवळ जडत्वास आली । सृष्टिरूपें ॥ ८ ॥

ह्या प्रकारे ही प्रकृति मूळचीच कल्पनारुप असून पुढें ती (प्रकृति)च सर्वत्र पसरलेली आहे आणि सृष्टिरुपानें अगदी जडपणाला आली (मूळमायेंत ती कल्पनारुप होती,त्याच बीजाची वाढ होत होत सूक्ष्मांतून स्थूळांत येत येत ती जड सृष्टीत परिणाम पावली आहें)

मुळीं जाली ते मूळमाया । त्रिगुण जाले ते गुणमाया । जडत्व पावली ते अविद्या माया । सृष्टिरूपें ॥९॥

प्रथम (कल्पना-संकल्परुप) उत्पन्न झाली ती मूळमाया,त्रिगुणरुप झाली ती गुणमाया व ती सृष्टिरुपानें जडपणाला आली (जडसृष्टिरुपास आली) की अविद्यामाया होय.

पुढें च्यारी खाणी जाल्या । च्यारी वाणी विस्तारल्या । नाना योनी प्रगटल्या । नाना वेक्ती ॥ १० ॥

( वेक्ती - प्राणी )

तिच्यात पुढें (जारज,अंडज,स्वेदज व उद्भिज्ज अशा) चार खाणी झाल्या व (परा,पश्यंन्ती,मध्यमा,व वैखरी ह्या) चार वाणी विस्तार पावल्या आणि अनेक योनि प्रकट होऊन अनेक व्यक्ति निर्माण झाल्या (त्यांत अनेक जीव प्रकट झाले)

ऐसी जाली उभारणी । आतां ऐका संव्हारणी । मागील दशकीं विशद करूनि । बोलिलें असे ॥ ११ ॥

अशाप्रकारें सृष्टीची उभारणी झाली,आतां (संहारणीचा क्रम) संहार कसा होतो तें ऐका,मागील दशकांत प्रळयाच्या वर्णनांत हे स्पष्ट करुन सांगितललेच आहे.

परंतु आतां संकळित । बोलिजेल संव्हारसंकेत । श्रोते वक्ते येथें चित्त । देऊन ऐका ॥ १२ ॥

( संकळित - थोडक्यात )

परंतु आता संहाराचे स्वरुप संक्षेपानें सांगतो,श्रोत्यावक्त्यांनी आतां लक्षपूर्वक ऐकावें.

शत वरुषें अनावृष्टि । तेथें आटेल जीवसृष्टि । ऐशा कल्पांताच्या गोष्टी । शास्त्रीं निरोपिल्या ॥ १३ ॥

शंभर वर्षे पाऊस पडणार नाही,त्यामुळे सगळ्या जीवांचा संहार होईल.अशी कल्पांताची वर्णने शास्त्रांत सांगितली आहेत. (तो कल्पांतसमय शास्त्रांत सांगितला आहे.)

बाराकळीं तपे सूर्य । तेणें पृथ्वीची रक्शा होये । मग ते रक्शा विरोन जाये । जळांतरीं ॥ १४ ॥

( बाराकळीं - बाराकलानी )

पुढें सूर्य आपल्या द्वादश (बारा) कलांनी तप्त होईल,त्यायोगे पृथ्वीची राख होऊन ती राख मग पाण्यात विरुन जाईल.

तें जळ शोषी वैश्वानरु । वन्ही झडपी समीरु । समीर वितुळे निराकारु । जैसें तैसें ॥ १५ ॥

त्या पाण्याला अग्नि सुकवून टाकील,अग्नीला वायु झडपील-(विझवील) आणि वायूही वितळून जाईल व मूळचें निराकार स्वरुप जसेंच्या तसें राहील (जल अग्नीत,अग्नि वायूत,वायु निराकार आकाशांत ह्याप्रमाणे सर्व सृष्टीचा लय-संहारणी होईल व ह्याप्रमाणे मायेचा निरास होऊन स्वरुपच उरेल)

ऐसी सृष्टिसंहारणी जाली । मागां विस्तारें बोलिली । मायानिरासें उरली । स्वरूपस्थिति ॥ १६ ॥

अशा रीतीनें सृष्टीचा संहार होतो,पुर्वी हे सविस्तर सांगितले आहे,एवंच मायेचा निरास होऊन स्वस्वरुपस्थिती उरतें.

तेथें जीवशिव पिंडब्रह्मांड । अटोन गेलें थोतांड । माये अविद्येचें बंड । वितळोन गेलें ॥ १७ ॥

त्याठिकाणी जीव-शिव,पिंड-ब्रह्मांड हे सगळे थोतांड आटून जाऊन माया व अविद्या ह्यांनी उभारलेले बंड पार वितळून जातें. (जीवशिव,पिंडब्रह्मांड,मायाअविद्या ही मूळमायेपासून उभारलेली सर्व थोतांडे आटून जाऊन स्वरुपच राहील)

विवेकेंचि बोलिला क्षये । म्हणोनि विवेकप्रळये । विवेकी जाणती काये । मूर्खास कळे ॥ १८ ॥

हा प्रळय विवेकाने (विवेक करुन) सांगता येतो म्हणून त्यांस विवेकप्रळय म्हणतात.विचारी आहेत त्यांस हे समजते, मूर्खास हें काय कळणार ?

सृष्टि शोधितां सकळ । येक चंचळ येक निश्चळ । चंचळास कर्ता चंचळ । चंचळरूपी १९ ॥

सा-या सृष्टीचा शोध घेतला तर एक चंचळ (माया) व एक निश्र्चळ (ब्रह्म) असे दोन प्रकार दिसून येतात,चंचळ सृष्टीला उत्पन्न करणारी चंचळ म्हणजे मूळमाया होय,ती चंचळरुपी नाशिवंत आहे.(चंचळ सृष्टीचा कर्ता चंचळरुपी,चंचळ म्हणजे मूळमाया-अंतरात्मा हाच होय.)(निश्र्चळ ब्रह्माशीं चंचळ सृष्टीचा संबंध नाही)

जो सकळ शरीरीं वर्ते । सकल कर्तुत्वास प्रवर्ते । करून अकर्ता हा वर्ते । शब्द जया ॥ २० ॥

जो (हा कर्ता) सगळ्या शरीरांत वागतो,सर्व कर्मास प्रवृत्त होतो (इंद्रियांच्या द्वारे हा अनंत देह चालवितो) पण सर्व करुन अकर्ता हा शब्दप्रयोग ज्याला लावतात (पण तो करुन अकर्ता आहे.)

राव रंक ब्रह्मादिक । सकळांमधें वर्ते येक । नाना शरीरें चाळक । इंद्रियेंद्वारें ॥ २१ ॥

राजा असो,रंक असो,किंवा ब्रह्मादिक देव असोत,ह्या सर्वांमध्ये तो एकटाच राहातो आणि अनेक शरीरांमध्ये राहून इंद्रियद्वारा वावरत असतो.

त्यास परमात्मा बोलती । सकळ कर्ता ऐसें जाणती । परि तो नासेल प्रचिती । विवेकें पाहावी ॥ २२ ॥

त्यास परमात्मा असें म्हणतात,तो सकळ-कर्ता आहे,असे सगळे जाणतात,पण तो नाश पावेल ह्याचा अनुभव विवेक करुन पाहावा,(पण विवेकप्रळयांत हाही उरत नाही)

जो स्वानामधें गुरुगुरितो । जो सूकरांमधें कुरुकुरितो । गाढवीं भरोन भुंकतो । आटाहास्यें ॥ २३ ॥

तो कुत्र्या-(च्या देहा-) मध्ये शिरुन गुरगुरतो,डुकरांत संचार करुन कुरकुरतो व गाढवामध्ये शिरुन जोराजोरानें ओरडतो.

लोक नाना देह देखती । विवेकी देहांत पाहाती । पंडित समदर्शनें घेती । येणें प्रकारें ॥ २४ ॥

(सामान्य) लोक वरवर अनेक देह पाहातात,पण विवेकी असतात ते देहाच्या आंतील अंत:स्थिति (देह चालवणारा देहांतील अंतरात्मा) पाहातात,अशाप्रकारे पंडित लोक सर्व प्राणिमात्रास समसमान मानतात.(तो सर्व देहांत एकच असल्यामुळें विवेकी पंडित. समदर्शन सहजच असतात)(श्र्लोकाचा अर्थ:-विद्याविनय संपन्न ब्राह्मण,गाय,हत्ती,श्र्वान,चांडाळ ह्या सर्वांचे देह वेगवेगळे असले तरी सर्वांचा अंतरात्मा एकच आहे,ज्ञानी पुरुष प्राणिमात्रांच्या ठायी एक अंतरात्मा पाहातात.)

**॥ श्लोक ॥ विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥**

देह पाहातां वेगळाले । परंतु अंतर येकचि जालें । प्राणीमात्र देखिलें । येकांतरें ॥ २५ ॥

देह वेगवेगळे दिसले तरी अंतरंग (अंतरात्मा) एकच आहे,अशाप्रकारे सर्व प्राण्यांचा आत्मा एकच आहे असें (पंडित) पाहातात.

अनेक प्राणी निर्माण होती । परी येकचि कळा वर्तती । तये नांव जगज्जोती । जाणतीकळा ॥ २६ ॥

अनेक प्राणी उत्पन्न झाले असले तरी सर्वांस वागविणारी शक्ति एकच आहे,तिला जगज्योति किंवा जाणती कळा असें नाव आहे,

श्रोत्रीं नाना शब्द जाणे । त्वचेमधें सीतोष्ण जाणे । चक्षुमधें पाहों जाणे । नाना पदार्थ ॥ २७ ॥

ती कानांनी अनेक शब्द ओळखतें,त्वचेने शीत किंवा उष्ण जाणतें व डोळ्यामध्ये राहून अनेक पदार्थ कसे पहावयाचें हे जाणतें(डोळ्यांनी नाना पदार्थ पाहाते)

रसनेमधें रस जाणे । घ्राणामधें वास तो जाणे । कर्मेंद्रियामधें जाणे । नाना विषयेस्वाद ॥ २८ ॥

जिव्हे मध्ये राहून रस समजून घेते.नाकामध्ये राहून वास जाणते,कर्मेंद्रियांमध्ये राहून अनेक प्रकारच्या विषयांची रुचि ओळखते.

सूक्ष्म रूपें स्थूळ रक्षी । नाना सुखदु:खें परीक्षी । त्यास म्हणती अंतरसाक्षी । अंतरात्मा ॥ २९ ॥

सूक्ष्मरुपानें स्थूळाचें (स्थूळ शरिराचें)रक्षण करते,अनेक प्रकारच्या सुखदु:खाची परीक्षा करतें.तिलाच अंर्तसाक्षी अंतरात्मा म्हणतात.

आत्मा अंतरात्मा विश्वात्मा । चैतन्य सर्वात्मा सूक्ष्मात्मा । जीवात्मा शिवात्मा परमात्मा । द्रष्टा साक्षी सत्तारूप ॥ ३० ॥

आत्मा,अंतरात्मा,विश्र्वात्मा,चैतन्य,सर्वात्मा,सूक्ष्मात्मा,जीवात्मा,शिवात्मा,परमात्मा,द्रष्टा,साक्षी,सत्तारुप ही सर्व तिचीच नांवे आहेत.

विकारामधील विकारी । अखंड नाना विकार करी । तयास वस्तु म्हणती भिकारी । परम हीन ॥ ३१ ॥

विकारात्मक देहांतील विकार करणारा व अनेक प्रकारचे विकार नित्य करणारा (जो अंतरात्मा) त्यालाच परम हीन व भिकारी लोक (मूढ जन) परब्रह्म-परमात्मवस्तु-म्हणतात.

सर्व येकचि दिसती । अवघा येकंकार करिती । ते अवघी माईक स्थिती । चंचळामधें ॥ ३२ ॥

(ब्रह्म व अंतरात्मा) सर्व एकच आहे असें समजून सगळा एकंकार करतात. ही मायिक स्थिति जेवढी आहे तेवढी सारी चंचलामध्ये आहे.

चंचळ माया ते माईक । निश्चळ परब्रह्म येक । नित्यानित्यविवेक । याकारणे ॥ ३३ ॥

चंचळमाया ही मायिक म्हणजें खोटी व विविध असून एक परब्रह्म तेंवढें निश्र्चळ व सत्य आहें व कळण्यासाठीच नित्यानित्यविवेक करावयाचा असतो.

जाणतो जीव तो प्राण । नेणे जीव तो अज्ञान । जन्मतो जीव तो जाण । वासनात्मक ॥ ३४ ॥

( जातो जीव तो प्राण - जो प्राणयुक्त जाणता असतो तो जीव )

जीव चार प्रकारचा म्हटले आहेत,जाणणारा जीव प्राण होय.नेणता (न जाणणारा) जीव तो अज्ञानी व जन्मणारा जीव तो वासनात्मक असतो.

ऐक्य जीव तो ब्रह्मांश । जेथें पिंडब्रह्मांडनिरास । येथें सांगितले विशेष । चत्वार जीव ॥ ३५ ॥

जेथें पिंडब्रह्मांड ही लय पावतात अशा ब्रह्माशी ऐक्य पावतो तो जीवब्रह्मांश होय,ह्या ठिकाणी जीवाचे चार प्रकार सांगितले आहेत.

असो हें अवघें चंचळ । चंचळ जाईल सकळ । निश्चळ तें निश्चळ । आदिअंतीं ॥ ३६ ॥

असो,हे सगळे चंचळ असून सगळें जाणारें-चंचळांतले म्हणजें नाशवंत आहे,निश्र्चळ ब्रह्म हेंच आरंभी व शेवटी निश्र्चळ-शाश्र्वत सत्य असें राहाणार आहे.

आद्य मध्य अवसान । जे वस्तु समसमान । निर्विकारी निर्गुण निरंजन । निःसंग निःप्रपंच ॥ ३७ ॥

आरंभी,मध्ये,व शेवटी (चंचळापूर्वी,चंचळ असतांना व चंचळाचा लय झाल्यावर) ती परब्रह्म वस्तु अगदी एकसारखी असून निर्विकारी,निर्गुण,निर्मल,निःसंग व निःप्रपंच आहे.

उपाधीनिरासें तत्वता । जीवशिवास ऐक्यता । विवंचून पाहों जातां । उपाधि कैंची ॥ ३८ ॥

उपाधीचा नाश झाला म्हणजें जीवशिवाचें खरोखरी ऐक्य होते आणि विचार करुन पाहिले तर उपाधि आहे कोठे ?(चंचळाची उपाधि विवेकानें दूर सारतांच जिवशिवांचे ऐक्य आहें (असें शास्त्रे सांगतात पण उपाधीच मुळी नाही मग तिचा निरास कशाचा ?)

असो जाणणें तितुकें ज्ञान । परंतु होतें विज्ञान । मनें वोळखावें उन्मन । कोण्या प्रकारें ॥ ३९ ॥

( मनें वोळखावें उन्मन कोण्या प्रकारें - मनोलय अवस्था मनास कोणत्या प्रकारे ओळखता येईल. )

असो,(तात्पर्य हे की) जाणणें तेंवढें ज्ञान होय,परंतु त्यांचे नांव विज्ञान होतें (साक्षात्कार होतो)(जाणणें हें ज्ञान व तेंही हारपतें हें विज्ञान)(ही विज्ञानांची) उन्मनी अवस्था मनानें कशाप्रकारे ओळखावी ?

वृत्तिस न कळे निवृत्ति । गुणास कैंची निर्गुणप्राप्ती । गुणातीत साधक संतीं । विवेकें केलें ॥ ४० ॥

वृत्तीला निवृत्ति स्थिती कळावयाची नाही,गुणाला (चंचळाला) निर्गुणाची प्राप्ति कशी व्हावी ?(पण) संत हे विवेकमार्गाने साधकास गुणातीत करतात (वृत्तीला निवृत्ति म्ह.वृत्तिशून्यता कळत नाही तसें गुणाला-चंचळाला-निर्गुण ब्रह्म आकळत नाही,म्हणून गुणातीत परब्रह्म विवेके ओळखावे असें संत सांगतात)

श्रवणापरीस मनन सार । मननें कळे सारासार । निजध्यासें साक्षात्कार । निःसंग वस्तु ॥ ४१ ॥

म्हणून श्रवणापेक्षा मनन श्रेष्ठ आहे,मननाने सारासार विचार कळतो व निदिध्यासाने निःसंग असे जे परब्रह्म त्याचा साक्षात्कार होतो.(श्रवणाहून मनन श्रेष्ठ,कांकी,मननानें सार (ब्रह्म) व असार (चंचळ) हा विवेक होतो व सार जें ब्रह्म त्याच्या निदिध्यासानें संगरहित वस्तूचा साक्षात्कार होतो-प्रचीति येते.)

निर्गुणीं जे अनन्यता । तेचि मुक्ति सायोज्यता । लक्श्यांश वाच्यांश आतां । पुरे जाला ॥ ४२ ॥

निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी अनन्य म्हणजे एकरुप होणे ह्याचेच नांव सायुज्यमुक्ति होय,आता लक्ष्यांश (वस्तु) व वाच्यांश (चंचळ-दृश्य-भासात्मक विश्र्व) ह्यांची चर्चा पुरें (हा विचारही येथे सरला)

अलक्शीं राहिलें लक्ष । सिद्धांतीं कैंचा पूर्वपक्ष । अप्रत्यक्शास कैंचें प्रत्यक्ष । असोन नाहीं ॥ ४३ ॥

अलक्ष्य असें जे परब्रह्म त्याच्या ठिकाणी लक्ष विराले,सिध्दांतापाशी पूर्वपक्ष म्हणजें माया कोठून येणार ?अप्रत्यक्ष म्हणजें मन-बुध्दीला अगोचर असे जे ब्रह्म त्याला प्रत्यक्षता (नेत्रादि इंद्रियांनी ग्रहण करण्याची स्थिति) कशी येईल ?एवंच त्या परब्रह्माचा अनुभव घेऊनही तो नाहीसा झाला पाहिजे (द्वैत उरता कामा नयें) (अलक्ष्य वस्तुच्या ठिकाणी लक्ष विरालें,सिध्दांतापाशी पुर्वपक्ष संपला.मग बुध्दिअगोचर-अप्रत्यक्ष-असें जें परब्रह्म त्यांशी प्रत्यक्षता नेत्रादि इंद्रियगोचरता-कोठून येणार ?म्ह.अनुभवरुप होऊन अनुभवाची द्वैत भाषा तेथे खुंटली,असोन नाही)

असोन माईक उपाधी । तेचि सहजसमाधी । श्रवणें वळावी बुद्धी । निश्चयाची ॥ ४४ ॥

(द्दश्यभासात्मक) मायिक उपाधि असूनही स्वरुपाकारता पावणें हींच सहज समाधी होय,श्रवणानें अशा प्रकारची बुध्दि होते,(मायिक उपाधि-चंचळ-जेथल्या तेथें असून स्वरुपाकारता पावणें हीच सहज समाधि होय,श्रवणाभ्यासानें हा निश्र्चय स्थिर होतो)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सिद्धांतनिरूपणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : चत्वारदेवनिरूपण ॥ श्रीराम ॥**

येक निश्चळ येक चंचळ । चंचळीं गुंतलें सकळ । निश्चळ तें निश्चळ । जैसें तैसें ॥ १ ॥

(ह्या ब्रह्मांडात दोन प्रकार आहेत)  एक निश्र्चळ व एक चंचळ सगळा द्दश्य पसारा चंचळांत अडकलेला आहे (सारे लोक चंचळात गुंतले आहेत) निश्र्चळ असतें ते जसेच्या तसेच (सर्व निश्र्चळच) असतें.

पाहे निश्चळाचा विवेक । ऐसा लक्शांमधें येक । निश्चळाऐसा निश्चयात्मक । निश्चळचि तो ॥ २ ॥

ह्या निश्र्चळाचा विवेक पाहाणारा लाखांमध्ये एखादाच असतो,निश्र्चळ ब्रह्मासारखाच तो निश्र्चयेकरुन निश्र्चळच असतो (लक्षावधि लोकांत निश्र्चल ब्रह्मी निश्र्चयपूर्वक स्थिरावलेला व म्हणून ब्रह्मस्वरुप झालेला एखादाच सांपडतो.)

या निश्चळाच्या गोष्टी सांगती । पुन्हां चंचळाकडे धांवती । चंचळचक्रीं निघोन जाती । ऐसे थोडे ॥ ३ ॥

(पुष्कळ लोक) निश्र्चल ब्रह्माच्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी बोलतात,पण (चंचळात गुंतून राहातात),पुन्हा चंचळ जगाकडे धांव घेतात,चंचळ मायेच्या फे-यातून पलीकडे जाणारे असे लोक फार थोडे (चंचळ मायेच्या झपाट्यातून निसटून जाणारे विरळाच)

चंचळीं चंचळ जन्मलें । चंचळाचि मधें वाढलें । अवघें चंचळचि बिंबलें । जन्मवरी ॥ ४ ॥

चंचळ मायेमध्ये हा जीव जन्मास आला आणि चंचळ जगामध्ये वाढला,त्यामुळे त्याच्या आंगी जन्मभर सगळें चंचळ भिनते.( चंचळ मूळमायेपासूनच त्रिगुण-पंचभूतात्मक जग व त्यांतच अनंत जीव जन्मलें,चंचळ मायेंतच वाढलें,म्हणून जीवांच्या सर्व वासना मायेंतल्याच असतात.

पृथ्वी अवघी चंचळाकडे । करणें तितुकें चंचळीं घडे । चंचळ सांडून निश्चळीं पवाडे । ऐसा कैंचा ॥ ५ ॥

सगळे जग चंचळाकडेच धावतें जेवढे म्हणून कर्म घडतें तेवढे सगळें चंचळामध्येच घडतें,ह्या चंचंळाचा त्याग करुन निश्चल ब्रह्मामध्यें प्रवेश करणारा असा कोठे सांपडेल ?(पृथ्वीवरचें सारे जीव चंचळ मायेंतलें असल्यामुळें त्यांची कर्मेही मायिकच असतात चंचळाचा विवेकबळानें त्याग करुन निश्चळ ब्रह्मीं प्रवेश करणारा महापुरूष दुर्मिळ आहें)

चंचळ कांहीं निश्चळेना । निश्चळ कदापी चळेना । नित्यानित्यविवेकें जना । उमजे कांहीं ॥ ६ ॥

हें चंचळ (दृश्य) काहीं निश्चळ होत नाही आणि निश्चळ ब्रह्म (कधीही)चंचळ व्हावयांचे नाही (चळणात-मायेंत-सांपडत नाही.)(ह्यांतील मर्म) नित्यानित्यविवेक केल्याने मनुष्यास काहीतरी उमगेल,चंचळ-निश्चळाचा विवेक नित्य जागृत ठेवला तर काही तरी उमगतें.

कांहीं उमजलें तरी नुमजे । कांहीं समजलें तरी न समजे । कांहीं बुझे तरी निर्बुजे । किंचित मात्र ॥ ७ ॥

काही थोडेसें समजले तरी तें नीट पटत नाही,थोडे मनांत उतरले (उमजले) तरी नीट लक्षांत येत नाही,काही ज्ञान झाले तरी त्यांत थोडा संशय उरतोच

संदेह अनुमान आणी भ्रम । अवघा चंचळामधें श्रम । निश्चळीं कदा नाहीं वर्म । समजलें पाहिजे ॥ ८ ॥

तात्पर्य,जोपर्यंत चंचळाचा पगडा आहे तोपर्यंत संशय,अनुमान व भ्रम हे उत्पन्न होऊन व्यर्थ कष्ट होतात,निश्चळामध्ये मात्र ह्यापैकी काही एक नाही,पण हे मर्म लक्षांत घेतले पाहिजे (पण कळणे कठिण आहे)

चंचळाकरि तितुकी माया । माईक जाये विलया । लहान थोर म्हणावया । कार्य नाहीं ॥ ९ ॥

जेवढे म्हणून चंचळरुपी आहे ते सर्व माया होय आणि मायेंचें म्हणून जे काही आहे ते नाश पावणारे आहे,त्यांत लहानमोठें म्हणावयाचें राहातच नाही (सगुण साकार सारे नाशवंत आहे,त्यांत लहानमोठे काय निवडावे ?)

सगट माया विस्तारली । अष्टधा प्रकृति फांपावली । चित्रविचित्र विकारली । नाना रूपें ॥ १० ॥

विस्तारलेली ही सर्व माया असून अष्टधा प्रकृतीच जिकडेतिकडे फेलावली आहे व तीच अनेकरुपाने चित्रविचित्र बनली आहें,(सारा मायेचाच विस्तार आहें,हें ब्रह्मांड हा अष्टधा प्रकृतीचा विस्तार असून चित्रविचित्र अनंतरुपांनी तीच विकार पावली आहें)

नाना उत्पत्ती नाना विकार । नाना प्राणी लाहान थोर । नाना पदार्थ मकार । नाना रूपें ॥ ११ ॥

( मकार - प्रकार (उच्च,निच,मध्यम,अधम/निचतम )

नाना प्रकारची उत्पत्ति,विकार,अनेक लहानथोर प्राणी,पदार्थांचे अनेक प्रकार व अनेक रुपें (अनंत विकार पावून मायेंत नानाविध चमकृतिजनक लहानथोर प्राणी निर्माण झाले आहेत)

विकारवंत विकारलें । सूक्श्म जडत्वास आलें । अमर्याद दिसों लागलें । कांहींचाबाहीं ॥ १२ ॥

ही सर्व विकारवंताला (मूळमायेला) विकार होऊन झालेली आहेत,सूक्ष्म होते तेंच जडत्वाला आले आणि तेंच काहीच्याबार्हीं अफाट दिसू लागलें,(मूळमायाच विकारवंत आहे,ती मूळांत सूक्ष्म असली तरी काही नसून काहीच्याबाही अफाट जगडंबररुप होऊन स्थूळ जडापर्यंत विस्तारली आहे,मनुष्य योनींतही अनंत शरीरे झाली व भाषापरत्वें त्यांना अनंत नामे मिळाली.)

मग नाना शरीरें निर्माण जालीं । नाना नामाभिधानें ठेविलीं ।भाषा परत्वें कळों आलीं ।काहीं कांहीं ॥१३॥

मग अनेक शरीरें उत्पन्न झाली,त्यांची नावे ठेविंली ती भाषाभेदानें काही काही कळून येऊ लागली

मग नाना रीति नाना दंडक । आचार येकाहून येक । वर्तों लागले सकळ लोक । लोकाचारें ॥ १४ ॥

मग त्यांच्या अनेक रीती,अनेक चाली निघाल्या वेगवेगळे आचार पडलें त्या लोकाचाराप्रमाणें पुढील लोक वागू लागले (मग त्यात अनेक प्रकारच्या रितीभाती,अनेक कल्पनाप्रकार,अनेक आचार उत्पन्न झाले,लोक आपापल्या त-हेने वागू लागलें)

अष्टधा प्रकृतीचीं शरीरें । निर्माण जालीं लाहानथोरें । पुढें आपुलाल्या प्रकारें । वर्तों लागती ॥ १५ ॥

अष्टधा प्रकृतीची लहानमोठी शरीरे निर्माण होऊन ती आपापल्या रितीप्रमाणें पुढें वागू लागली.(अष्टधा प्रकृतींतूनच सर्व लोक जन्मास आले पण त्याचे वर्तनप्रकार हजारो झाले)

नाना मत्तें निर्माण जालीं । नाना पाषांडें वाढलीं । नाना प्रकारीचीं उठिलीं ॥ नाना बंडें ॥ १६ ॥

नंतर अनेक मतें उद्भवली,अनेक प्रकारची पाखांडे (वेदविरुध्द मतें) वाढलीं व अनेक प्रकारची अनेक बंडे (स्वच्छंदी मतें) माजलीं.

जैसा प्रवाह पडिला । तैसाच लोक चालिला । कोण वारील कोणाला । येक नाहीं ॥ १७ ॥

जशी रुढी पडली तसेंच लोक वागू लागलें,कोणी कोणाचे निवारण करावे ?ऐक्य राहिले नाही (जसा प्रवाह पडत चालला तसतसें लोक त्या त्या प्रवाहाबरोबर चालले,सर्वात एकरुपता नसल्यामुळें कोणी कोणाला वारावें अशी बेबंदशाही झाली)

पृथ्वीचा जाला गळांठा । येकाहून येक मोठा । कोण खरा कोण खोटा । कोण जाणे ॥ १८ ॥

( गळांठा - गोंधळ )

सा-या दुनियेचा (नाना मतांतरामुळें) गोधळ (गळांटा) उडाला,जो तो आपल्याला दुस-यापेंक्षा मोठा समजू लागला,त्यांत खरा कोण व खोटा कोण हे कोणाला समजणार ?पृथ्वीवर नाना मतांचा गोंधळ उडाला एकापेक्षा एक मोठे असे अग्रेसर सरसावले.आतां त्यांत ख-याखोट्याची निवड तरी कोणी कशी करावी ?

आचार बहुकचित पडिला । कित्येक पोटासाठीं बुडाला । अवघा वरपंगचि जाला । साभिमानें ॥ १९ ॥

( बहुकचित - वात्रटपणाचा,मनमानेल तसा अंगवळणी/ रूढ )

आचाराची खिचडी झाली (आचार बहु कर्चित-कचाटींत सांपडलेला झाला,आचार वेगवेगळे पडले) कित्येकांचा आचार पोटाला मिळेनासे झाल्यामुळें बुडून गेला (त्यातच कित्येक पोटबाबू निघाले) पक्षाभिमानाने आचाराची नक्कल (बाह्य देखावा) मात्र राहिला.(आपल्या पक्षाचें अभिमानी असे सोंगाडे उभे राहिले)

देव जाले उदंड । देवांचें मांडलें भंड । भूतादेवतांचें थोतांड । येकचि जालें ॥ २० ॥

( मांडलें भंड - बंड माजले )

देव पुष्कळ होऊन देवांचा भंडवडा झाला (पूजामार्ग अनेक निघाले) आणि भूतपिशाच्चे व देवता ह्यांच्या उपासनामार्गाची भेसळ होऊन सगळे थातांड माजले.

मुख्य देव तो कळेना । काशास कांहींच मिळेना । येकास येक वळेना । अनावर ॥ २१ ॥

मुख्य देव कोणता हे कोणालाच कळेना,कोणाची मते कोणाला मिळेनाशी झाली व कोणी कोणास आवरेनासे झाले .

ऐसा नासला विचार । कोण पाहातो सारासार । कैचा लहान कैंचा थोर । कळेचिना ॥ २२ ॥

अशा रितीनें खरा विचार नाश पावला (पार लोपला),सारासार विचार पाहातो कोण ? लहान कोण,मोठा कोण हें कळेनासे झाले.

शास्त्रांचा बाजार भरला । देवांचा गल्बला जाला । लोक कामनेच्या व्रताला । झोंबोन पडती ॥ २३ ॥

शास्त्रांचा बाजार भरुन देवांचा गोंधळ माजला व कामनिक व्रतांमागें लोक लागु लागले (लोकांच्या उडया पडल्या)( अनेक देव व शास्त्रें ह्यांचा बाजार भरला,कामनिक-इच्छा पुरी करणारी-व्रते तेंवढीच लोक करु लागले)

ऐसें अवघें नासलें । सत्यासत्य हारपलें । अवघें अनावेक जालें । चहूंकडे ॥ २४ ॥

( अनावेक - निर्णायक )

असें सगळें बिघडून गेले,खरे खोटे लोपले,जिकडे तिकडे सगळे निर्णायक झाले (ह्याप्रमाणें ख-याखोट्याचा निर्णय होईनासा होऊन समाज नासून गेला.समाज अ-नावेक म्ह.ज्याला नाविक किंवा कर्णधार,प्रमुख नावाडी नाही असा किंवा अ-नायक म्ह. नायक किंवा नियंता नाही असा झाला.

मतामतांचा गल्बला । कोणी पुसेना कोणाला । जो जे मतीं सांपडला । तयास तेंचि थोर ॥ २५ ॥

मतामतांचा गलबला माजून कोणी कोंणास विचारींनासें झालें. तो ज्या मतात-मतांच्या प्रवाहांत-सांपडला त्याला तेंच मत श्रेष्ठ असें वाटू लागलें.

असत्याचा अभिमान । तेणें पाविजे पतन । म्हणोनियां ज्ञाते जन । सत्य शोधिती ॥ २६ ॥

परंतु खोट्याचा-असत्याचा-अभिमान धरल्यास अधोगति होतें,-समाजाचा नाश होतो म्हणून ज्ञाते लोक खरे काय आहे ह्याचा शोध घेतात (म्हणून ज्ञाते लोक सत्य शोधीत असतात)

लोक वर्तती सकळ । तें ज्ञात्यास करतळामळ । आतां ऐका केवळ । विवेकी हो ॥ २७ ॥

लोक कोण्या पंथें जाती । आणि कोण्या देवास भजती । ऐसी हे रोकडी प्रचिती । सावध ऐका ॥ २८ ॥

( करतळामळ - तळहातावरील आवळे )

लोकांच्या वागणुकीचे सारे प्रकार जाणत्याला तळहातावरील आंवळ्याप्रमाणे स्पष्ट दिसत असतात,अहो,आतां ऐका,शुध्दविवेकी लोक असतात तें कोणत्या मार्गानें जातात व कोणत्या देवाला भजतात ह्याचा प्रत्यक्ष अनुभव लक्षपूर्वक श्रवण करा (लोक कोणत्या देवास भजतात,कोणत्या मार्गाने जातात हे सावधपणें ऐका)

मृत्तिका धातु पाषाणादिक । ऐसिया प्रतिमा अनेक । बहुतेक लोकांचा दंडक । प्रतिमादेवीं ॥ २९ ॥

माती,धातु,पाषाण इत्यादिकांच्या अनेक प्रतिमा असतात आणि बहुतेक लोकांची चाल (पध्दत) ह्या प्रतिमांच्या देवालाच भजण्याची असतें (धातु-पाषाण-मृत्तिकेच्या अनेक मुर्ति करुन हाच देव ह्या भावनेने त्यांची पुजाअर्चा करावी हा बहुजनसमाजाचा मार्ग आहें)

नाना देवांचे अवतार । चरित्रें ऐकती येक नर । जप ध्यान निरंतर । करिती पूजा ॥ ३० ॥

अनेक देवांची अवतारांत घडलेली चरित्रे कोणी लोक ऐकतात आणि त्या अवतारांचे जप,ध्यान, पूजा करितात (काही लोक रामकृष्णांदि देवांची अवतारचरित्रे ऐकून त्या त्या अवतारांची जप-ध्यान-पूजा करितात)

येक सकळांचा अंतरात्मा । विश्वीं वर्ते जो विश्वात्मा । द्रष्टा साक्षी ज्ञानात्मा । मानिती येक ॥ ३१ ॥

सर्वांस एक असणारा अंतरात्मा,विश्र्वांत वावरणारा विश्र्वात्मा,किंवा द्रष्टा,साक्षी असा जो ज्ञानात्मा,त्यालाच कोणी देव मानतात (आणखी काही लोक सकळांचा अंतरात्मा व सर्वसाक्षी ज्ञानघन असा देव मानतात)

येक ते निर्मळ निश्चळ । कदापी नव्हेति चंचळ । अनन्यभावें केवळ । वस्तुच ते ॥ ३२ ॥

कोणी निर्मळ व निश्र्चळ अशा ब्रह्माला देव मानतात,अनन्य भावानें केवळ वस्तुरूप झाल्यामुळें ते कधीही चंचळ होत नाहीत (कित्येक निर्मळ व नित्यनिश्र्चळ अशा परब्रह्मवस्तूचें वस्तु होऊन अनन्यचिंतन करितात.)

येक नाना प्रतिमा । दुसरा अवतारमहिमा । तिसरा तो अंतरात्मा । चौथा तो निर्विकारी ॥ ३३ ॥

तात्पर्य,अनेक प्रतिमाच देव मानणें (१-प्रतिमापूजा) हा एक वर्ग,अवतारचरित्रे मानणें (२-अवतारोपासना) हा दुसरा वर्ग,अंतरात्मा मानणें (३. अंतरात्मभजन) हा तिसरा वर्ग आणि निर्विकार ब्रह्म मानणें (४-निश्र्चळ ब्रह्मोपासना) हा चवथा वर्ग (अशा चार प्रकारांनी लोक देवाची पूजा करितात)(सृष्टीतल्या भिन्नभिन्न स्वभा-वाच्या सर्व लोकांचा ह्या चार वर्गात अंर्तभाव होतो)

ऐसे हे चत्वार देव । सृष्टीमधील स्वभाव । यावेगळा अंतर्भाव । कोठेंचि नाहीं ॥ ३४ ॥

अशाप्रकारे सृष्टीमधील स्वभावसिध्द असे हे चार प्रकार आहेत,ह्याशिवाय दुसरा देव कोठेही नाही.

अवघें येकचि मानिती । ते साक्ष देव जाणती । परंतु अष्टधा प्रकृति । वोळखिली पाहिजे ॥ ३५ ॥

सगळ्या जगात एकच अंतरात्मा आहे असे जे मानतात ते देवाला (आत्म्याला) साक्षी समजतात,परंतु अष्टधा प्रकृतीमुळे आत्म्याला हे साक्षित्व आलें हे ओळखिले पाहिजें (वस्तुतः आत्म्याच्या ठिकाणी साक्षित्वही उरत नाही)(हे सारे लोक पुन्हा आम्ही एकाच देवाची पूजा करितो असे म्हणतात,पण ह्याची परीक्षा त्या देवालाच ठाऊक पण अष्टधा प्रकृति ओळखून प्रकृतिपर-प्रकृतीहून निराळा श्रेष्ठ परमात्मा जाणला पाहिजें.

प्रकृतीमधील देव । तो प्रकृतीचा स्वभाव । भावातीत माहानभाव । विवेकें जाणावा ॥ ३६ ॥

प्रकृतींतले देव म्ह.प्रकृतीचा स्वभावच होय,प्रकृतीपलीकडील पदार्थांहून वेगळा-भावातीत -असा परमात्मा भावातीत महात्मेच जाणतात व अशांची ओळखही विवेकानेंच होत असतें,मायेमधील देव म्हणजें मायेचेच एक

अंग होय,परंतु प्रकृतीपलीकडचें,भावाला आकलन न होणारे असें जें परब्रह्म तें महात्म्यांनी विवेकाने समजून घ्यावें.

जो निर्मळास ध्याईल । तो निर्मळचि होईल । जो जयास भजेल । तो तद्रूप जाणावा ॥ ३७ ॥

जो निर्मळ ब्रह्माचें ध्यान करील तो निर्मळ स्वरुपच पावेल,(जो निर्मळ निश्र्चळास भजेल तो निर्मळ निश्र्चळच होईल) जो ज्याचे भजन करील तो तद्रूप होतो हे लक्षांत ठेवावे.

क्षीर नीर निवडिती । ते राजहंस बोलिजेती । सारासार जाणती । ते माहानभाव ॥ ३८ ॥

दूध व पाणी ह्याची निवड करितात त्यांस राजहंस म्हणतात त्याप्रमाणें ह्या विश्र्वांत सार काय व असार काय हें जें जाणतात त्यांस महात्मे म्हणतात.(दूध व पाणी वेगळे करणारे जसे पक्ष्यांत एक राजहंसच होत,त्याप्रमाणे सार (निश्र्चळ ब्रह्म) व असार (चंचळ प्रकृति) ह्यांचे तारतम्य (विवेक) राजहंसच जाणतात.

अरे जो चंचळास ध्याईल । तो सहजचि चळेल । जो निश्चळास भजेल । तो निश्चळचि ॥ ३९ ॥

( सहजचि चळेल - मिथ्या वस्तूच्या ध्यानाने सहजपणे दु:ख प्राप्त होईल. )

अरे,जो चंचळाचे ध्यान करील तो चंचळच होईल (चळेल नाश पावेल व) जो निश्र्चळाचें भजन करील,तो निश्र्चळच (वस्तुरुपच) होईल.

प्रकृतीसारिखें चालावें । परी अंतरीं शाश्वत वोळखावें । सत्य होऊन वर्तावें । लोकांऐसें ॥ ४० ॥

( सत्य होऊन वर्तावें - ब्रह्मरूप होऊन जनरितीनुसार वागावे )

(बाह्यत:) मायेप्रमाणें वागावें परंतु अंत:करणांत शाश्र्वत स्वरुपाची ओळख करुन घ्यावी,सत्य अशी जी परमात्मवस्तु तद्रूप होऊन,लोकाचाराप्रमाणें ज्ञात्यानें वागावें (लोकांसारखे ज्ञात्याला वागले पाहिजे,पण त्याने अंतरी निश्र्चळ ओळखलें पाहिजे,शाश्वत ब्रह्मवस्तु होऊन लोकांसारखेंच लोकांत वागावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चत्वारदेवनिरूपणनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : शिकवण निरूपण ॥ श्रीराम ॥**

बहुतां जन्मांचा सेवट । नरदेह सांपडे अवचट । येथें वर्तावें चोखट । नितिन्यायें ॥ १ ॥

( अवचट - अचानक , चोखट - शुद्ध )

अनेक जन्मांचा (जन्ममरण फे-यांचा) शेवट करणारा (अनेक जन्म झाल्यानंतर),अकस्मात हा नर देह प्राप्त झाला आहे,म्हणून ह्या नरदेहामध्यें न्याय व नीति सांभाळून शुध्दमार्गाने (जावे) वागावें,

प्रपंच करावा नेमक । पाहावा परमार्थविवेक । जेणेंकरितां उभय लोक । संतुष्ट होती ॥ २ ॥

जरुरीपुरता व्यवहार (अनासक्तीने) करुन परमार्थाचा विवेक पाहात असावें,म्हणजे त्यायोगे इहपर दोन्ही साधतात (प्रपंची आणि परमार्थी असे दोन्ही प्रकारचे लोक संतुष्ट होतील)(प्रपंच शिस्तीनें करावा व परमार्थाचा विवेक पाहावा, म्हणजे इहपर दोन्ही साधतात)

शत वरुषें वय नेमिलें । त्यांत बाळपण नेणतां गेलें । तारुण्य अवघें वेचलें । विषयांकडे ॥ ३ ॥

शंभर वर्षाचे आयुष्य ठरलेले आहें,त्यांत बाळपण अज्ञांनात जाते आणि तरुणपण सगळे विषयांच्या उपभोगात खर्च होतें.

वृद्धपणीं नाना रोग । भोगणें लागे कर्मभोग । आतां भगवंताचा योग । कोणे वेळे ॥ ४ ॥

म्हातारपणी अनेक रोग उत्पन्न होऊन,कर्मभोग असेल तो भोगावा लागतो,आतां भगवंताची प्राप्ति होण्याचा योग केव्हा येणार ?(वृध्दत्व,कर्मानुसार उद्भवणा-या रोगांच्या शुश्रूषेंत गेलें,आंता देवाची जोड करायला वेळ कोणता ?)

राजिक देविक उदेग चिंता । अन्न वस्त्र देहममता । नाना प्रसंगें अवचिता । जन्म गेला ॥ ५ ॥

राजकीय व दैविक ह्यायोगांने उत्पन्न झालेले उद्वेग व चिंता आणि अन्न वस्त्र व देह ह्यांची ममता (आसक्ति) इत्यादि संबंधाने अनेक कठिण प्रसंग येऊन हा नरजन्म हां हां म्हणतां निघून जातो (राजकीय परिस्थितीमुळे किंवा दैवबळामुळे अनेक चिंता-क्लेष भोगावे लागतात,अन्न,वस्त्र मिळविण्याच्या खटपटी,देहाचें चोज पुरविणे इत्यादिकांत आयुष्य सरून जातें,

लोक मरमरों जाती । वडिलें गेलीं हे प्रचिती । जाणत जाणत निश्चिती । काये मानिलें ॥ ६ ॥

लोक भराभर मरुन जातात,वडील मरुन गेलें हा प्रत्यक्ष अनुभव असूनही समजून उमजून शाश्र्वती कशाची मानावी ?

अग्न गृहासी लागला । आणि सावकास निजेला । तो कैसा म्हणावा भला । आत्महत्यारा ॥ ७ ॥

घराला आग लागली असता जो खुशाल निजतो,त्याला शहाणा कसे म्हणावे ?तो आत्मघातकी होय.

पुण्यमार्ग अवघा बुडाला । पापसंग्रह उदंड जाला । येमयातनेचा झोला । कठीण आहे ॥ ८ ॥

( येमयातनेचा झोला - संकटकाळाचा / यातनेचा दणका / हल्ला )

पुण्यमार्ग सगळा बुडून जाऊन पापाचा सांठा फार वाढला,त्यामुळे पुढें यमयातनांचा धक्का फार जबर बसणार आहे.

तरी आतां ऐसें न करावें । बहुत विवेकें वर्तावें ॥ इक लोक परत्र साधावें । दोहीकडे ॥ ९ ॥

ह्यासाठी आतां असे करु नयें,फार विचाराने वागावे आणि इहलोक व परलोक दोन्ही सांधतील असे करावें.(विवेकाने वागून इहपर साधावें)

आळसाचें फळ रोकडें । जांभया देऊन निद्रा पडे । सुख म्हणौन आवडे । आळसी लोकां ॥ १० ॥

आळसाचें फळ प्रत्यक्षच असते तें हे की जांभया देऊन झोप ताणायची,आळशी लोकांना हेंच सुख म्हणून आवडत असते (मुख्य शत्रु म्हणजे आळस,आळसाचे फळ प्रत्यक्षच मिळतें,आळशी माणूस सदाचा जांभया देऊन लोळत पडतो.लोकांना आळस हेच सुख वाटतें-आवडे)

साक्शेप करितां कष्टती । परंतु पुढें सुरवाडती । खाती जेविती सुखी होती । येत्नेंकरूनी ॥ ११ ॥

( सुरवाडती - सुख लाभते )

उद्योग करतांना कष्ट होतात हें खरें,पण पुढें सुख होते,प्रयत्न करणारे खातात,जेवतात व सुखी असतात (उद्योगाचे सापेक्ष कष्ट करणा-यांना पुढें सुख होतें-सुरवाडती,-प्रयत्न करुन ते अन्नवस्त्रादि सुख भोगतात)

आळस उदास नागवणा । आळस प्रेत्नबुडवणा । आळसें करंटपणाच्या खुणा । प्रगट करिती ॥ १२ ॥

आळसामुळे खिन्नता येऊन नागवणूक (फजिती) होते,आळस हा प्रयत्नाला बुडविणारा आहे व त्यामुळे करंटेपणाची चिन्हे प्रकट होतात (आळसाने मनुष्य निरुत्साही होतो,तो सर्वत्र नागवला जातो,आळसाने प्रयत्न ऊद्यम नाहीसा होतो,आळशी माणसाच्या तोंडावरच करंटपणाची चिन्हे दिसतात)

म्हणौन आळस नसावा । तरीच पाविजे वैभवा । अरत्रीं परत्रीं जीवा । समाधान ॥ १३ ॥

म्हणून आळस नसावा,तरच वैभव प्राप्त होऊन इहपरलोकी जिवाला समाधान मिळेल.

प्रेत्न करावा तो कोण । हेंचि ऐका निरूपण । सावध करून अंतःकरण । निमिष्य येक ॥ १४ ॥

प्रयत्न कोणता करावा म्हणाल तर तेंच निरुपण क्षणभर एकाग्र चित्त करुन ऐका.

प्रातःकाळी उठावें । कांहीं पाठांतर करावे । येथानशक्ती आठवावें सर्वोत्तमासी ॥ १५ ॥

पहाटें-प्रातःकाळी-उठावें,काही पाठ करावे (नेमानें पाठांतर करावें) परमेश्र्वराचें स्मरण यथाशक्ति करावें.

मग दिशेकडे जावें । जे कोणासिच नव्हे ठावें । शौच्य आच्मन करावें । निर्मळ जळें ॥ १६ ॥

नंतर कोणास कळणार नाहीं अशा ठिकाणी शौंचास जावें,नंतर निर्मळ जळानें हातपाय वगैर धुऊन आचमन करावें.

मुखमार्जन प्रातःस्नान । संध्या तर्पण देवतार्चन । पुढें वैश्यदेवौपासन । येथासांग ॥ १७ ॥

तोंड धुणें प्राःतस्नान, संध्या,तर्पण,देवपूजा करुन वैश्र्वदेव,उपासना हे सर्व यथासांग करावे.

कांहीं फळाहार घ्यावा । मग संसारधंदा करावा । सुशब्दें राजी राखावा । सकळ लोक ॥ १८ ॥

काही फराळ करुन नंतर संसाराचा उद्योग पाहावा,गोड बोलून सर्व लोक राजी राखावें,(मधुर भाषणानें सर्वास संतुष्ट ठेवावे.)

ज्या ज्याचा जो व्यापार । तेथें असावे खबर्दार । दुश्चितपणें तरी पोर । वेढा लावी ॥ १९ ॥

( वेढा लावी - फसवणूक )

ज्याचा जो व्यापार-धंदा असेल त्यांत त्याने दक्ष असावें दुश्र्चितपणा केला तर पोरही फसवील.(प्रत्येकानें आपला व्यवसाय सावधगिरीने करावा,गैरसावधपणा केल्यास एखादें पोरही ठकवून जातें)

चुके ठके विसरे सांडी । आठवण जालियां चर्फडी । दुश्चित आळसाची रोकडी । प्रचित पाहा ॥ २० ॥

(मनुष्य गैरसावध-दुश्र्चित व आळशी राहिला तर तो) चुकतो,फसतो,विसरतो,हरवतो (हे दोष त्याच्या हातून सहज घडतात) आणि मग आठवण झाल्यावर चरफडत बसतो,(-व तो सावध होतो तेव्हा आपला आपल्यावरच कातावतो) असा हा दुश्र्चितपणाचा व आळसाचा प्रत्यक्ष अनुभव आहे.

याकारणें सावधान । येकाग्र असावें मन । तरी मग जेवितां भोजन । गोड वाटे॥ २१ ॥

(मनुष्याने सावध व अव्यग्र असावें व ह्याप्रमाणें दक्षतेने व्यवसाय करणारा जेवायला बसला म्हणजे त्याला जेवणही गोड लागतें) ह्यासाठीं मन स्थिर व व्यवहारांत सावध असावें म्हणजें जेवताना भोजन गोड लागतें.

पुढें भोजन जालियांवरी । कांहीं वाची चर्चा करी । येकांतीं जाऊन विवरी । नाना ग्रंथ ॥ २२ ॥

नंतर जेवण झाल्यावर काही वाचावें-ग्रंथावलोकन करावें,जाणत्याबरोबर चर्चा करावी आणि एकांतात जाऊन अनेक ग्रंथांचे विवरण करावें (अनंत ग्रंथ वाचून त्यांचे मनन करावें)

तरीच प्राणी शाहाणा होतो । नाहींतरी मूर्खचि राहातो । लोक खाती आपण पाहातो । दैन्यवाणा ॥ २३ ॥

असे वागेल तरच मनुष्य शहाणा होतो,नाहीतर मूर्खच राहातो,लोक खात असतात आणि हा भिका-यासारखा त्यांच्या तोंडाकडें पाहात बसतो.(सुज्ञ लोक नाना उपभोग भोगीत असताना हा दीनवाणेपणें त्यांच्या तोंडाकडें पाहात राहील!)

ऐक सदेवपणाचें लक्षण । रिकाम्या जाऊं नेदी येक क्षण । प्रपंचवेवसायाचें ज्ञान । बरें पाहे ॥२४॥

( सदेवपणाचें - भाग्यवान )

भाग्यवंताचे लक्षण आतां ऐक,एक क्षणही फुकट न जाऊ देतां,प्रपंचाच्या कामाचें ज्ञान नीट पाहातो (जाणतो) (एक क्षणही व्यर्थ न दवडणें हे भाग्यवंताचे लक्षण आहे,म्हणून आपल्या उद्योगांत निमग्न असावें)

कांहीं मेळवी मग जेवी । गुंतल्या लोकांस उगवी । शरीर कारणीं लावी । कांहीं तरी ॥ २५ ॥

काहीतरी मिळवून मग जेवतो,(संकटात) अडकलेल्या लोकांस बाहेर काढतो,अशा रितीनें आपले शरीर परोपकाराच्या कामी थोडें बहुत तरी लावतो.(स्वकष्टानें आधीं धनधान्य मिळवून मग जेवणें,बध्दांना मोकळें करणें,शरीराचे काहीतरी सार्थक करणें.

कांहीं धर्मचर्चा पुराण । हरीकथा निरूपण । वायां जऊं नेदी क्षण । दोहींकडे ॥ २६ ॥

(धर्मचर्चानिरुपणांत वेळ घालविणें,एवंच प्रपंच व परमार्थ ह्या दोहोंविषयी निरलस असणे हेंच भाग्यवंताचे लक्षण होय.) धर्मचर्चा,पुराण,हरिकथानिरुपण ही ऐंकण्यात व करण्यांत काहीं काळ घालवितो,ह्याप्रकारे प्रपंच किंवा परमार्थ ह्यापैकी काहींतरी कृत्य केल्याशिवाय एक क्षणसुध्दां फुकट दवडीत नाही.

ऐसा जो सर्वसावध । त्यास कैंचा असेल खेद । विवेकें तुटला समंध । देहबुद्धीचा ॥ २७ ॥

असा जो सर्व बाजूनें दक्षता ठेवतो,त्याला खेद कोठून होईल? विवेकाच्या योगानें त्याचा व देहबुध्दीचा संबंध तुटलेला असतो (असा जो सर्वसावध-प्रपंचपरमार्थी दक्ष-आहे त्याची विवेकबळाने देहबुध्दि गलित होते असल्यामुळें त्याच्या चित्ताला खेद ठाऊक नसतो.)

आहे तितुकें देवाचें । ऐसें वर्तणें निश्चयाचें । मूळ तुटें उद्‌वेगाचें । येणें रीतीं ॥ २८ ॥

आहे तें सर्व देवाचेच आहे अशा निश्र्चयाने  वागल्यानें उद्वेगाचे मुळ अजिबात तुटून जातें (त्याचा उद्वेग नि:शेष नाहींसा होतो)

प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थीं पंचिकर्ण । माहावाक्याचें विवरण । करितां सुटे ॥ २९ ॥

( प्रपंचीं पाहिजे सुवर्ण परमार्थीं पंचिकर्ण - प्रपंचात पैसा ,परमार्थात पंचीकर्ण )

प्रपंचात (सुवर्ण-सोनें) द्रव्य पाहिजें व परमार्थामध्ये पंचीकरण (दोन्ही महत्वाची व अवश्य आहेत) ही दोन्ही साधून (तत्वमस्यादि) माहवाक्याचें विवरण केल्यानें प्राणी संसारबंधनातून पार पडतो (मुक्त होतो)

कर्म उपासना आणि ज्ञान । येणें राहे समाधान । परमार्थाचें जें साधन । तेंचि ऐकत जावें ॥ ३० ॥

तात्पर्य कर्म ज्ञान व उपासना ह्यायोगें समाधान राहातें,म्हणून परमार्थाचे साधन असेल तेंच नेहमी ऐकत जावें.(कर्म,उपासना व ज्ञान ह्या तीनही आंगांनी पूर्ण असलेला मनुष्य परम समाधान पावतो,म्हणून परमार्थपोषक असेच श्रवण करीत असावें)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सिकवणनिरूपणनाम समास तिसरा ॥**

**समास चवथा : सारविवेकनिरूपण ॥ श्रीराम ॥**

ब्रहम म्हणिजे निराकार । गगनासारिखा विचार । विकार नाहीं निर्विकार । तेंचि ब्रहम ॥ १ ॥

ब्रह्म म्हणजे निराकार,त्याचे स्वरुप आकाशासारखे आहे,मात्र त्याला विकार नाही असे जें निर्विकार तेंच ब्रह्म होय (गगनासारखाच ब्रह्माचा विचार आहे,ते जसे तसेंच निराकार व निर्विकार आहे)

ब्रहम म्हणिजे निश्चळ । अंतरात्मा तो चंचळ । द्रष्टा साक्शी केवळ । बोलिजे तया ॥ २ ॥

ब्रह्म हें निश्र्चळ असून अंतरात्मा चंचळ आहे,त्या अंतरात्म्यालाच निव्वळ द्रष्टा किंवा साक्षी म्हणतात.

तो अंतरात्मा म्हणिजे देव । त्याचा चंचळ स्वभाव । पाळिताहे सकळ जीव । अंतरी वसोनी ॥ ३ ॥

( पाळिताहे - नियमन )

तो अंतरात्माच देव होय,त्याचा स्वभाव चंचळ आहे सगळ्या जीवांच्या अंत:करणात राहून तो त्यांचे पालन करतो.

त्यावेगळे जड पदार्थ । तेणेंवीण देह वेर्थ । तेणेंचि कळे परमार्थ । सकळ कांही ॥ ४ ॥

तो नसेल तर सगळे पदार्थ जड होत,त्याच्यावांचून देह व्यर्थ होय,त्याच्याच योगानें सगळा परमार्थ कळून येतो.

कर्ममार्ग उपासना मार्ग । ज्ञानमार्ग सिद्धांतमार्ग । प्रवृत्तिमार्ग निवृत्तिमार्ग । देवची चालवी ॥ ५ ॥

कर्म,उपासना,ज्ञान,सिध्दांत,प्रवृत्ति,निवृत्ति इ.सारे मार्ग हा देवच चालवितो.

चंचळेविण निश्चळ कळेना । चंचळ तरी स्थिरावेना । ऐसें हे विचार नाना । बरे पाहा ॥ ६ ॥

ह्या चंचळाशिवाय  निश्र्चळ (ब्रह्म) कळत नाही,आणि चंचळ तर स्थिर (निश्र्चळ) होत नाही (हे सर्व विचारानें कळों येतें) असे अनेक विचार आहेत ते नीट सावधपणाने पाहा.

चंचळनिश्चळाची संधी । तेथें भांबावते बुद्धि । कर्ममार्गाचे जे विधी । ते मग ऐलिकडे ॥ ७ ॥

( भांबावते बुद्धि - चंचळ अंतरात्मा व निश्र्चळ ब्रह्म याचा जो संधी ती माया,त्या मायेच्या ठिकाणी बुद्धी भांबावते )

(चंचळ व निश्र्चळ ह्यांच्या संधीत म्ह.) चंचळ जेथे संपते व निश्र्चळ जेथें सुरु होतें अशा संधीच्या ठिकाणी बुध्दि भांबावतें,कर्ममार्गाचें विधी हें सर्व अलीकडचें म्ह.चंचंळातले-मायेतले-आहेत (चंचळ जो अंतरात्मा त्यातून निश्र्चळ परब्रह्माकडें धारणा नेताना पुढें अवलंब-आधार नसल्यामुळें स्वत:च नाहीसे व्हावयाचें असल्यामुळे निव्वळ विचाराची स्थिति असताही बुध्दि भांबावतें. मग कर्ममार्ग तर संशयाने भरलेला-विचाराच्या अलीकडला-त्यांत बुध्दि भांबावेल ह्यांत नवल काय ?)

देव या सकळांचे मूळ । देवास मूळ ना डाळ । परब्रह्म तें निश्चळ । निर्विकारी ॥ ८ ॥

ह्या सर्वाचे -कर्मादिकाचें-मूळ देव आहे,त्या देवाला (डाळ) शेंडा ना बुडखा,त्याहून परब्रह्म हे (वेगळे असून) निश्र्चळ व निर्विकारी आहे (ह्या देवाहून-चंचळ अंतरात्म्याहून-निश्र्चळ ब्रह्म वेगळें आहे.)

निर्विकारी आणि विकारी। येक म्हणेल तो भिकारी । विचाराची होते वारी । देखतदेखतां ॥ ९ ॥

( होते वारी - निवारण होते. )

हें निर्विकारी ब्रह्म व हा विकारी अंतरात्मा देव ही दोन्ही एकच आहेत असे जो म्हणेल तो बुध्दिमंद समजावा,विकारी व निर्विकारी ह्या दोहोंचा विंचार करु लागल्यास विचार पाहांता पाहांता नष्ट होतो (विचाराची तारांबळ उडतें)(दोहोंचा विचार पाहाता विचाराचीच वारी-निवारण होते म्ह.विचार मावळतो.)

सकळ परमार्थास मूळ । पंचीकर्ण माहावाक्य केवळ । तेंची करावें प्रांजळ । पुनःपुन्हां ॥ १० ॥

पंचीकरण व महावाक्य ह्यांचे विवरण करणे हेंच सगळ्या परमार्थाचें मूळ होय,ह्यास्तव तेंच पुन: पुन्हा स्पष्ट करीत जावें.

पहिला देह स्थूळकाया । आठवा देह मूळमाया । अष्ट देह निर्शलियां । विकार कैंचा ॥ ११ ॥

पहिल्या स्थूळदेहापासून आठव्या मूळमायेपर्यंतच्या आठही देहांचे निरसन झाल्यानंतर मग विकार कोठून राहील ?(पहिला देह स्थूळ (स्थूळ,सूक्ष्म,कारण,महाकारण हे पिंडाचे चार देह) व आठवा देह म्ह.ब्रह्मांडाच्या

चार देहांपैकी (विराट,हिरण्यगर्भ,महतत्व व मूळमाया)जो मूळमाया-ह्या आठही देहांचे निराकारण झाल्यावर विकार कोठून राहाणार ?)

याकारणें विकारी । साचाऐसी बाजीगरी । येक समजे येक खरी । मानिताहे ॥ १२ ॥

म्हणून ख-या (ब्रह्मा) सारखी भासणारी विकारी अंतरात्म्याची गारुडी विद्या एकाला उमजतें व एक तिला खरी मानतो,(पण विकारी चंचळ हा भास-बाजीगिरी-सत्यासारखाच वाटत असल्यामुळे त्यांचे मिथ्यात्व एक समजतो  व एक तेंच खरे घेऊन चालतो.

उत्पत्ति स्थिती संव्हार । यावेगळा निर्विकार । कळायासाठीं सारासार । विचार केला ॥ १३ ॥

उत्पत्ति-स्थिति व संहार (लय) ह्याहून निर्विकार ब्रह्म वेगळे आहे हे कळण्यासाठी सारासारविचार करावयाचा,(उत्पत्ति-स्थिति-लय हे विकार चंचळाला आहेत,निश्र्चळाला नाहीत,सारासार विचार कळला पाहिजें)

सार असार दोनी येक । तेथें कैंचा उरला विवेक । परिक्शा नेणती रंक । पापी करंटे ॥ १४ ॥

सार व असार ही दोन्हीं एकच आहेत असे मानलें तर विवेक कोठून राहिंला ? ज्यांना परीक्षा कळत नाही ते भिकारी,पापी,करंटे होत.(सार असार एकच असा गोधळ केल्यावर विवेक कोठे राहिला ?हा विचार बुध्दिदारिद्र्य असलेल्या प्राण्यांना कळत नाही)

जो येकचि विस्तारला । तो अंतरात्मा बोलिला । नाना विकारीं विकारला । निर्विकारी नव्हे ॥ १५ ॥

जो एकटाच ह्या दृश्यरुपानें विस्तारलेला आहे त्याला अंतरात्मा म्हणतात,अनेक विकारांनी तो विकार पावलेला आहे,तो निर्विकार ब्रह्म नव्हे.(जो एक असून बहु झाला,सृष्टीरुपें विस्तारला तो विकारी अंतरात्मा कांही निश्र्चळ परब्रह्म नव्हे.

ऐसें प्रगटचि आहे । आपुल्या प्रत्ययें पाहे । काय राहे काय न राहे । हें कळेना ॥ १६ ॥

( काय राहे काय न राहे - काय शाश्र्वत काय अशाश्र्वत )

असे हे उघडच आहें,आपल्या अनुभवानें पाहा,कोणते शाश्र्वत आहे व कोणते अशाश्र्वत आहे हे समजत नाही (तें पाहिले पाहिजें) (विचारी आपल्या प्रत्ययानें घेतो.अज्ञाला शाश्र्वत काय अशाश्र्वत काय हे काहीच कळत नाही)

जें अखंड होत जातें । जें सर्वदा संव्हारतें । रोकडें प्रचितीस येतें । जनामधें ॥ १७ ॥

जे नित्य उत्पन्न होतें व जातें,त्याचा नित्य नाश आहे,ह्याचा जगामध्ये प्रत्यक्ष अनुभव आहे (उत्पत्ति,स्थिति व लय ही सर्व अशाश्वताच्यामागें लागली आहेत हे सर्वांच्या अनुभवाचें आहें.)

येक रडे येक चर्फडी । येकांची धरी नरडी । येकमेकां झोंबती बराडी । दुकळ्ळले जैसे ॥ १८ ॥

( बराडी - आशाळभूत , दुकळ्ळले - दुष्काळातून आल्यासारखे,अधाशीपणे )

कोणी रडतो कोणी चरफडतो,कोणी कोणाचे नरडे धरतो,कोणी दुष्काळांत धादावल्याप्रमाणें,(आशाळभुतासारखें) एकमेकांना झोंबत असतात(एक सुखी एक दु:खी,एक दुस-याला आशाळभूत,दुष्काळातून ओढून काढल्यासारखा-जसें मांजर उंदराला झडप टाकून खाते)

नाहीं न्यावे नाही नीति । ऐसे हे लोक वर्तती । आणि अवघेंच सार म्हणती । विवेकहीन ॥ १९ ॥

न्याय नाही,नीति नाही,अशाप्रकारे लोक वागतात आणि असले विचारशून्य लोक सगळेंच सार म्हणजे शाश्वत असें म्हणतात (न्यायनीति सोडणारी माणसेंही अशींच वागतात,असा प्रकार असताना सर्वच सार म्ह.ब्रह्म आहे असे अविचारी म्ह.सर्वब्रह्मवादी वगैरे म्हणत असतात)

धोंडे सांडून सोनें घ्यावें । माती सांडून अन्न खावें । आणि आवघेंचि सार म्हणावें । बाष्कळपणें ॥ २० ॥

धोंडे टाकून सोने जपून ठेवतात,माती फेकून देऊन अन्न खातात आणि बाष्कळपणाने सगळेच सार (चांगले-सत्य) म्हणतात (हा किती मूर्खपणा!) (दगड टाकून सोंने घ्यावें,माती सांडून अन्न खावे असा वागण्यात भेद दाखवीत असूनही सर्वत्र ब्रह्म म्हणावें हा बाष्कळपणा नाही तर काय ?)

म्हणौनि हा विचार करावा । सत्यमार्ग तोचि धरावा । लाभ जाणोन घ्यावा । विवेकाचा ॥ २१ ॥

म्हणून ह्यांचा विचार करुन खरा मार्ग असेल तोच धरावा,विवेक हाच लाभ समजून त्याची प्राप्ति करुन घ्यावी (म्हणून विवेकानें असार टाकून सार म्ह.शाश्वत ब्रह्म तेंवढें घ्यावें)

सारगार येकचि सरी । तेथें परीक्शेस कैंची उरी । याकारणें चतुरीं । परीक्षा करावी ॥ २२ ॥

( सारगार - सार-असार , सार = किमती,मौल्यवान, गार = गारगोटी,टाकाऊ )

संपत्ति व गारगोटी दोन्ही एकच मानल्यास तेथें परीक्षा ती काय राहिली ?म्हणून शहाण्यानें परीक्षा करीत जावी (रत्ने व गार-गारगोटी-एकच म्हटल्यावर रत्नपारख कशी होईल ? म्हणून चतुरानें परीक्षा करुन असार टाकून सार घ्यावें)

जेथें परीक्षेचा अभाव । तेथें दे घाव घे घाव । सगट सारिखा स्वभाव । लौंदपणाचा ॥ २३ ॥

( लौंद - आळशी )

जेथे परीक्षा नाही तेथे दे घाव घे घाव (लट्टालट्टी) असेंच चालावयाचें,सगळे सारखेंच मानणें हा शुध्द मूर्खपणा (लौंदपण) होय.

घेव ये तेंचि घ्यावें । घेव न ये तें सोंडावें । उंच नीच वोळखावें । त्या नाव ज्ञान ॥ २४ ॥

घेण्यासारखें असेल (उचित) तेंवढेंच घ्यावें व घेण्यासारखे नसेल (अनुचित) तें टाकून द्यावें,कमी जास्त (उंच नीच) ओळखावें ह्याचें नांव ज्ञान.

संसारसांतेस आले । येक लाभें अमर जाले । येक ते करंटे ठकले । मुदल गेलें ॥ २५ ॥

( संसारसांतेस - जगाच्या बाजारात , सांत = साथ = भरभराट = बाजार )

ह्या संसाररुप बाजारांत (सांत) आलेल्या लोकांपैकीं कोणी परमार्थाचा लाभ मिळवून श्रीमंत होतात तर कोणाचे भांडवल जाऊन ते फसतात (संसाराच्या बाजारपेठेस येऊन काही विवेकी शाश्र्वत लाभ जोडून अमरपद पावतात व काही-सारासारहीन मूढ अभागी लोक मुद्दल म्ह.निजधन गमावून बसतात)

जाणत्यानें ऐसें न करावें । सार तेंचि शोधून घ्यावें । असार तें जाणोन त्यागावें । वमक जैसें ॥ २६ ॥

( वमक - ओकारी )

ह्यास्तव शहाण्यानें असे करु नयें सार असेल तेवढेंच शोधून घ्यावें व असार असेल ते ओळखून त्याचा वमनाप्रमाणें त्याग करावा.(वमनासारखें असार तें जाणून टाकावें व सार तें शोधून-पारखून घ्यावें.)

तें वमक करी प्राशन । तरी तें स्वानाचें लक्षण । तेथें सुचिस्मंत ब्राह्मण । काये करीती ॥ २७ ॥

तें वमन जर कोणी प्राशन करु लागला तर तें कुत्र्याचें लक्षण होय त्या ठिकाणीं शुचिर्भूत ब्राह्मण काय करणार ?(ओकलेले खाणे हे श्र्वानाचे लक्षण आहे,पवित्र ब्राह्मण त्या वमनाकडे ढुंकूनही पाहात नाहीतः असे असारच सार समजून घेणें हें पतिताचे लक्षण आहे. विवेकी असार सेवन कधीही करत नाहींत.)

जेहि जैसें संचित केलें । तयास तैसेंचि घडलें । जें अभ्यासीं पडोन जडलें । तें तों सुटेना ॥ २८ ॥

ज्यानें पूर्वी जसे वर्तन केले असेल त्याला तसेंच फळ प्राप्त होतें पूर्वजन्मींच्या अभ्यासानें ज्याची संवय जडली ते काही केल्या सुटत नाही (असो संचिताप्रमाणे होत असतें,जे अभ्यासाने पचनी पडलें तें सुटतां सुटत नाही)

येक दिव्यान्नें भक्षिती । येक विष्ठा सावडिती । आपुल्या वडिलांचा घेती । साभिमान ॥ २९ ॥

कोणी सुग्रास अन्ने खातात तर कोणी नरक सावडतात व दोघेही आपल्या वडिलांचा (आपले वडील थोर म्हणून अभिमान धरतात.

असो विवेकेविण । बोलणें तितुका सीण । कोणीयेकें श्रवण मनन । केलेंचि करावें ॥ ३० ॥

असो,विवेकावाचून जें बालेणे ते व्यर्थ कष्ट होत,कोणीही झाले तरी तरी एकदा केलेले श्रवणमननच पुन:पुन्हा करावें (विवेक जागृतीसाठी नित्य श्रवणमनन करीत असावे.)

**आत्मज्ञान होण्यासाठी लागणारी क्षमता,सामर्थ्य हे प्रत्येकाच्या अंगी असते,पण फार थोडी माणसे त्याच्या या कुवतीचा योग्य दिशेने विकास करतात,चिकाटी व निश्र्चयाचे बळ ज्याच्यापाशी असते त्यास आत्मज्ञान प्राप्ति होते.**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सारविवेकनिरूपणनाम समास चौथा ॥**
**समास पांचवा : राजकारण निरूपण ॥ श्रीराम ॥**

कर्म केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें । विवरलेंचि विवरावें । पुन्हा निरूपण ॥ १ ॥

केलेलेच काम करावें एकदा ध्यान धरले तरी पुन्हा धरावें,एकदां विवरण केलेल्या विषयाचेंच पुन्हा विवरण करावें लागतें.(रोजच्या रोज तेंच तें स्वधर्मकर्म करीत असावें,आपलें उपास्यध्यान धरीत असावें व निरुपणी पुन:पुन्हा मनन करीत असावे.)

तैसें आम्हांस घडलें । बोलिलेंचि बोलणें पडिलें । कां जें बिघडलेंचि घडलें । पाहिजे समाधान ॥ २ ॥

त्याप्रमाणेंच आमचेही झालें,एकदा सांगितलेलेच पुन्हा सांगावे लागले,कारण समाधान बिघडले होते ते पूर्ववत झाले पाहिजे.(कां की श्रोत्यांचे चंचळ मन जागेवरून ढळले,की आम्हांला तें पुन्हा स्वस्थ करावें लागतें)

अनन्य राहे समुदाव । इतर जनास उपजे भाव । ऐसा आहे अभिप्राव । उपायाचा ॥ ३ ॥

सांप्रदायिकांचा समुदाय एकनिष्ठ राहावा आणि इतर लोकांच्या ठिकाणीं निष्ठा उत्पन्न व्हावी असा हा उपाययोजनेचा हेतु आहे (आपला समुदाय-सांप्रदायिक-अनन्य राहावा व बाहेरील लोकांस सद्भाव वाढावा असा लोकहिताचा दंडक आहे)

मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकरण । तिसरें तें सावधपण । सर्वविषईं ॥ ४ ॥

( राजकरण - मुसद्दीपण )

पहिली मुख्य गोष्ट हरिकथा व निरुपण करणें,दुसरी राजकारण करणें (समाजाचें व्यवहार सुरळित चालण्यासाठी) समाज-धुरीणांनी व राजकीय पुरुषांनी करण्याचा सर्व गोष्टी),तिसरी सर्व गोष्टींविषयी सावधपणा ठेवणें.

चौथा अत्यंत साक्शप । फेडावे नाना आक्षेप । अन्याये थोर अथवा अल्प । क्षमा करीत जावे ॥ ५ ॥

चौथा उपाय (साक्षेप) अतिशय उद्योगी असणे,नाना प्रकारच्या शंका दूर कराव्या,अन्याय लहान असो मोठा असो-क्षमा करीत जावी (हरिकथानिरुपण हें मुख्य आहे,दुसरे राजकारण,तिसरे सर्वत्र सावधानता व चौथा निरलस उद्योग ह्या चार गुणांशिवाय लोककल्याणाचा मार्ग-उपाय-नाही लोकहितेच्छूने आणखींही गुण संपादिले पाहिजेत.त्याने दुस-याचें लहानमोठे अपराध क्षमा करायला शिकलें पाहिजें.

जाणावें पराचें अंतर । उदासीनता निरंतर । नीतिन्यायासि अंतर । पडोंच नेदावें ॥ ६ ॥

( अंतर - अंतरग )

दुस-याचे अंतःकरण (मनोगत) काय आहे तें ओळखावें ,आपण नित्य अनासक्त असावें (उदासवृत्तीनें रहावें) व निति न्यायांत अंतर पडूं देऊ नयें (नितिन्याय सोडू नये)

संकेतें लोक वेधावा । येकूनयेक बोधावा । प्रपंचहि सावरावा । येथानशक्त्या ॥ ७ ॥

(संकेतें लोक वेधावा - संकेताने/खाणाखुणांनी/मौनाने लोकाना आकर्षित करावे,येथानशक्त्या -कुवतीनुसार)

संकेताने (आचरणाच्या इशारतीनें ) लोकांची मनें आकर्षण करावी,सर्वांना उपदेश करावा,यथाशक्ति प्रपंचही नीट करावा.

प्रपंचसमयो वोळखावा । धीर बहुत असावा । संमंध पडों नेदावा । अति परी तयाचा ॥ ८ ॥

( अति परी - अतिपरिचय )

प्रपंचातले अनेक प्रसंग ओळखून बहुत धैर्यानें वागावें,परंतु त्या प्रपंचाचा अतिशय संबंध जडू देऊ नयें.(अति लगट कोणाशीही करु नयें)

उपाधीसी विस्तारावें । उपाधींत न संपडावें । नीचत्व पहिलेंच घ्यावें । आणि मूर्खपण ॥ ९ ॥

उपाधीचा विस्तार करावा,पण आपण त्या उपाधींत सांपडूं नये.(अलिप्तपणे उपाधि खूप वाढवावी) आपणाकडें प्रथमच हलकेपणा व मूर्खपणा घ्यावा (वादप्रसंग आल्यास आधींच आपल्याकडे लघुत्व व मूर्खत्व घ्यावें म्हणजें वाद मिटतो)

दोष देखोन झांकावे। अवगुण अखंड न बोलावे । दुर्जन सांपडोन सोडावे । परोपकार करूनी ॥ १० ॥

दुस-याच्या दोषांवर पांघरूण घालावें दुस-याचे दुर्गुण सदोदित बोलत बसू नयें,दुर्जन अपराधात सापडले असतांही (शासन न करतां) त्यांच्यावर परोपकार करून त्यांना सोडून द्यावें (दोष दिसले तरी उघड करु नयेंत,प्रसंगाने बोलावें लागल्यास नित्य बोलू नयें.दुर्जनांवरही ऊपकार करुन त्यांस सोडून द्यावें)

तऱ्हे भरोंच नये । सुचावे नाना उपाये । नव्हे तेंचि करावें कायें । दीर्घ प्रेत्नें ॥ ११ ॥

त-हेवाईकपणा-एककल्लीपणा (त-हे भरणें) करु नयें बिकट प्रसंगातून पार पडण्याचें अनेक उपाय शोधून काढावें,जें काम होण्यासारखे नसेल तें महत्कार्य मोठया-दिर्घ प्रयत्नाने करुन दाखवावे.

फड नासोंचि नेदावा । पडिला प्रसंग सांवरावा । अतिवाद न करावा । कोणियेकासी ॥ १२ ॥

(सभा किंवा समारंभ आपल्या मतासाठी मोडू देऊ नयें ) समुदायाची जूट बिघडूं देऊ नयें,आलेला प्रसंग निभावून न्यावा (कसलाही प्रसंग आला तरी त्यांतूनही पार पडून जावें.) कोणाशी अतिवाद करु नयें.

दुसर्याचें अभिष्ट जाणावें । बहुतांचें बहुत सोसावें । न सोसे तरी जावें । दिगांतराप्रती ॥ १३ ॥

( अभिष्ट - मनोगत )

दुस-याचें कल्याण (अभीष्ट) चिंतावे ,कशात आहे हे समजून घ्यावें,अनेकांचे अनेक प्रकारे त्रास सहन करावे,(पुष्कळांचे पुष्कळ सोसावें) सोसवेनासे झाल्यास दूरदेशी निघून जावे.

दुखः दुस-याचें जाणावें । ऐकोन तरी वांटून घ्यावें । बरें वाईट सोसावें । समुदायाचें ॥ १४ ॥

दुस-याचे दुःख ओळखावें आणि तें हलके करण्याचा काही प्रयत्न न करतां आला तरी (निदान) ऐकून घ्यावें व त्याच्या दुःखाने हळहळावें (म्हणजे दुस-याचें दुःख हलके होते) एकंदर समुदायाचे बरे वाईट सहन करीत असावें.

अपार असावें पाठांतर । सन्निधचि असावा विचार । सदा सर्वदा तत्पर । परोपकारासी ॥ १५ ॥

पाठांतर पुष्कळ असावें आणि विचारही जवळ (जागृत) असावा,परोपकार करण्यांत नेहमी तत्परता ठेवावी.

शांती करून करवावी । तऱ्हे सांडून सांडवावी । क्रिया करून करवावी । बहुतांकरवीं ॥ १६ ॥

आपण शांति धरावी व दुस-यास धरायला लावावी,आपण त-हेवाईकपणा सोडावा व दुस-याकडून सोडवावा,आपण (उद्योग)(चांगली) क्रिया करावी व पुष्कळांकडून करवावी (स्वतःला शांत म्ह.समचित्त

राखावें व दुस-याच्या आंगी शांति भिनवावी,त-हेवाईकपणा स्वत: करु नयें व दुस-याला करु देऊ नयें,सत्कर्माचरण् स्वत:करावें व करवावे)

करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखऊं नये । परस्परेंचि प्रत्यये । प्रचितीस आणावा ॥ १७ ॥

एखाद्याला अपाय करावयाचा असेल तरी बोलून दाखवू नये,परभारेच त्याला त्याचा ठोकताळा आणून द्यावा (काट्याने कांटा काढावा)

जो बहुतांचे सोसीन । त्यास बहुतेक लोक मिळेना । बहुत सोसितां उरेना । महत्व आपुलें ॥ १८ ॥

जो लोकांचें सोशीत नाही त्याला पुष्कळ लोक अनुकूल होत नाहीत,पण फारच सहनशीलता दाखविली तर आपले महत्व उरत नाही (दुस-याचें दु:ख सोसल्यशिवाय लोकसंग्रह होत नाही व सर्वच सोसू म्हटले तर आपले महत्व उरत नाही)

राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच नेदावें । परपीडेवरी नसावें । अंतःकरण ॥ १९ ॥

राजकारण पुष्कळ केले तरी तें कोणाला कळू देऊ नये,पण तें करताना दुस-याला पीडा देण्याचा हेतु नसावा (राजकारण बहुत करावे पण कळू देऊ नयें,पराला दु:ख देण्याची बुध्दि धरु नयें)

लोक पारखून सांडावे । राजकारणें अभिमान झाडावे । पुन्हा मेळऊन घ्यावें । दुरील दोरे ॥ २० ॥

लोकांची परिक्षा करुन ठेवावी,कारस्थाने (राजकारण) करुन त्यांचा अहंकार झाडून टाकावा (कोणाचा अभिमान राहू देऊ नयें) आणि पुन्हा दुरच्या धाग्यानें त्यांना एक करुन घ्यावें (आणि काहीही करुन युक्तींने मिळवून घ्यावें,तात्पर्य,मनुष्य तोडू नयें)

हिरवटासी दुरी धरावें । कचरटासी न बोलावें । समंध पडता सोडून जावें । येकीकडे ॥ २१ ॥

( हिरवट - हलकट विचाराचा )

हिरवट (चटकन वर्दळीवर येणारा,तामसी) असेल त्याला दूर ठेवावें,कुचर-कचरट (कामचुकार व क्षुद्र) असेल त्याच्याशी बोलूंही नयें आणि अशाचा संबंध आलाच तर त्याला सोडून दूर जावें.

ऐसें असो राजकारण । सांगतां तें असाधारण । सुचित अस्तां अंतःकरण । राजकारण जाणे ॥ २२ ॥

असो,असे राजकारण सांगायला लागलें तर पुष्कळ आहे,अंत:करण सावध व स्थिर असले म्हणजें राजकारण (सुचतें) समजतें.

वृक्षीं रूढासी उचलावें । युद्धकर्त्यास ढकलून द्यावें । कारबाराचें सांगावें । आंग कैसें ॥ २३ ॥

( वृक्षीं रूढासी उचलावें - भितीग्रस्तांना धीर द्यावा वृक्षीं - घाबरून झाडावर बसलेले )

(१) झाडावर चढलेले असतील म्हणजें उन्नतीच्या मार्गाला लागलेले असतील त्यांना साहाय्य करावें आणि युध्दकर्ते म्हणजें भांडखोर असतील त्यांना दूर करावे (२) उच्च भूमिकेचे असतील त्यांना पुढे आणावें आणि योध्दे असतील त्यांस युध्दांत पुढे सारावें कारभारातील ह्या शिताफीच्या गोष्टी आहेत त्या स्पष्ट कशा सांगता येतील ?(जे कोणी वर चढत असतील त्यांना टेंका देऊन चढवावे,जे कलह किंवा विरोध करतील त्यांना खाली पाडावें-कारभाराचें आंग कसें काय सांगावें ?)

पाहातां तरी सांपडेना । कीर्ति करूं तरी राहेना । आलें वैभव अभिळासीना । कांहीं केल्यां ॥ २४ ॥

( अभिळासीना - अभिलाषा नसते )

ह्याला (महंताला) पाहायला जावें तर तो सांपडत नाही (१) कीर्ती केल्याशिवाय राहात नाही (२) कीर्ति व्हावयाला लागली तर हा तेथें राहात नाही,आलेल्या वैभवाची अभिलाषा धरत नाही.

येकांची पाठी राखणें । येकांस देखो न सकणें । ऐसीं नव्हेत कीं लक्षणें । चातुर्याचीं ॥ २५ ॥

( पाठी राखणें - पाठपुरवठा , देखो न सकणें - भेट न देणे )

काहींचा पक्ष धरावयाचा व काहींना डोळ्यापुढें उभे राहू द्यावयाचें नाही,अशी चातुर्याची लक्षणें नसतात.(एकाला पाठीशी घालावें,एकाची दुष्मनगिरी करावी हे अकलेंचे काम नाही)

न्याय बोलतांहि मानेना । हित तेंचि न ये मना । येथें कांहींच चालेना । त्यागेंवीण ॥ २६ ॥

( त्यागेंवीण - सोडून दिल्याशिवाय )

ज्याला न्यायाचे सांगितले तरी पटत नाही,हितकारक असेल तेंच आवडावयाचें नाही,अशाचा त्याग करण्याशिवाय मार्ग नाही (न्याय सांगितला तरी ऐकत नाही,हिताची गोष्ट मनावर घेत नाही,अशांची गांठ पडल्यास त्याचा त्याग करावा)

श्रोतीं कळोन आक्षेपिलें । म्हणौन बोलिलेंचि बोलिलें । न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ २७ ॥

श्रोत्यांनी शंका घेतली म्हणून एकदां सांगितलेलेच पुन्हा सांगावे लागलें,त्यात कमीजास्त असल्यास श्रोत्यांनी क्षमा करावी(श्रोत्यांना हे माहीतच आहे पण शंकासमाधानार्थ बोलल्याबद्दल क्षमा करावी)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे राजकारणनिरूपणनाम समास पांचवा ॥**

**समास सहावा : महंत लक्षण ॥ श्रीराम ॥**

शुद्ध नेटकें ल्याहावें । लेहोन शुद्ध शोधावें । शोधून शुद्ध वाचावें । चुकों नये ॥ १ ॥

शुध्द व चांगले लिहावे,लिहिल्यानंतर शुध्दाशुध्द तपासावें,तपासल्यानंतर शुध्द वाचावें व वाचताना चुका करु नयेत (लिहिण्यात,नंतर शोधण्यात व नंतर वाचण्यांत तीनही प्रकारांत बिनचूकपणा असावा)

विश्कळित मात्रुका नेमस्त कराव्या । धाट्या जाणोन सद्दढ धराव्या ।रंग राखोन भराव्या ।नाना कथा ॥२॥

अक्षरें व कानेमात्रा वांकड्यातिकड्या झाल्या असतील तर नीट सरळ कराव्या लिहिण्याची ढब (घाटी) ती नीट पाहून बळकट धरावी (अक्षराचे वळण चांगले घेऊन आरंभापासून शेवटपर्यंत एका टाकी टिकवावे) अनेक प्रकारच्या कथाप्रसंगास अनुलक्षून काढलेल्या चित्रांमध्यें रंग भरावे.(नाना कथा लिहितांना जागोजाग चतुराईने रंग भरावें)

जाणायाचें सांगतां न ये । सांगायाचें नेमस्त न ये । समजल्याविण कांहींच न ये । कोणीयेक ॥ ३ ॥

( नेमस्त - थोडक्यात )

संकेताने जाणून घ्यावयाचें (करावयाचें) असतें ते सांगता कामा नयें (सांगता येत नाही),जे सांगावयाचें असेल तें थोडक्यात व निश्र्चयेकरुन सांगता येत नाही (किंवा त्याचे नियम वगैरे देता येत नाहीत) व समजून घेतल्याशिवाय कोणतीही गोष्ट करितां येत नाही.

हरिकथा निरूपण । नेमस्तपणें राजकारण । वर्तायाचें लक्षण । तेंहि असावें ॥ ४ ॥

हरिकथा व निरुपण करणें,नेमस्तपण (अचूक) राजकारण करणें,चोख वागणे हे सर्व (महंतापाशी) असावे.(परमार्थविवरण,सावधपणाचें राजकारण व चोख वर्तन ही सर्व महंतापाशी असली पाहिजेत)

पुसों जाणे सांगों जाणे । अर्थांतर करूं जाणे । सकळिकांचें राखों जाणे । समाधान ॥ ५ ॥

विचारावे कसे व सांगावे कसे हे कळतें,निरनिराळे अर्थ करता येतात.व सर्वांचे समाधान राखावें हेही कळतें (त्यांनें दुस-यास विचारावें,स्वतःसांगावें,सूक्ष्म बुध्दीनें वेगवेगळे अर्थ काढावें व सर्वांना समाधानसुख द्यावें)

दीर्घ सूचना आधीं कळे । सावधपणें तर्क प्रबळे । जाणजाणोनि निवळे । येथायोग्य ॥ ६ ॥

पुढील विचार अगोदरच समजतो,सावधपणाने तर्क वाढत असतो पुन:पुन्हां विचार करुन सर्व गोष्टींचा निट योग्य रीतींने उलगडा करतो,(पुढे होणा-या गोष्टी आगाऊ कळाव्यात,सावधपणाने तर्कानें तर्क बांधावेत,पुन:पुन्हा समजून विमल ज्ञान व्हावें)

ऐसा जाणे जो समस्त । तोचि महंत बुद्धिमंत । यावेगळें अंतवंत । सकळ कांहीं ॥ ७ ॥

असा बुध्दिमंत पुरुष तोच महंतपणाला योग्य होय व अशा श्रेष्ठ महंताशिवाय बाकी सर्व नश्वर होय. अशाप्रकारे जों सर्व जाणतों तोंच बुध्दिमान महंत होय,ह्याशिवाय बाकी सर्व नश्र्वर (फुकट) होय.

ताळवेळ तानमानें । प्रबंद कविता जाड वचनें । मज्यालसी नाना चिन्हें । सुचती तया ॥ ८ ॥

( मज्यालसी - सभेत )

ताल,वेळ,ताना,(मान),आलाप,प्रबंध,कविता,मोठमोठी वचनें इत्यादि जी सभाधीटपणाची (मज्यालसी) लक्षणें त्याला सुचत असतात (तालसूर,तानमान,कवित्वरचना,गंभीर व अढळ सिध्दांताचे प्रतिपादन,जाणत्यांच्या सभांवर हरएक प्रकारे छाप पाडण्याची शक्ति),

जो येकांतास तत्पर । आधीं करी पाठांतर । अथवा शोधी अर्थांतर । ग्रंथगर्भीचें ॥ ९ ॥

(एकांताची प्रीति,पाठशक्ति,ग्रंथांचे रहस्य शोधपूर्वक उकलण्याची ताकद हे सर्व गुण महंताच्या आंगी पाहिजेत) तो एकांताला तत्पर असतो,अगोदरच पाठांतर करुन ठेवतो किंवा ग्रंथातील मर्माचा विचार करुन ठेवतो.

आधींच सिकोन जो सिकवी । तोचि पावे श्रेष्ठ पदवी । गुंतल्या लोकांस उगवी । विवेकबळें ॥ १० ॥

( गुंतल्या लोकांस - मायेत गुंतलेल्या लोकांस )

स्वतः अगोदर जो शिकून नंतर दुस-याला शिकवितो,तो श्रेष्ठ पदवीला चढतो आणि विचाराच्या सामर्थ्यानें अडचणींत सांपडलेल्या लोकांस (उगवी) बाहेर काढतो (स्वतः आधी शिकून मग जनांस शिकवतो,पेंचात अगर बंधनात पडलेल्यांची सांकडी वारतो)

अक्षर सुंदर वाचणें सुंदर । बोलणें सुंदर चालणें सुंदर । भक्ति ज्ञान वैराग्य सुंदर । करून दावी ॥ ११ ॥

अक्षर,वाचन,बोलणे,चालणें,भक्ति.ज्ञान,वैराग्य,ही सर्व तो उत्कृष्ट करुन दाखवितो.

जयास येत्नचि आवडे । नाना प्रसंगीं पवाडे । धीटपणें प्रगटे दडे । ऐसा नव्हे ॥ १२ ॥

( पवाडे - उभा ठाकतो, पवाडेणे - शिरणे )

त्याला प्रयत्न करणेंच आवडते (तो प्रयत्नशील होतो) अनेक प्रसंगात तो शिरतो,धैर्याने पुढे होतो,दडून बसत नाही.

सांकडीमधें वर्तों जाणे । उपाधीमधें मिळों जाणे । अलिप्तपणें राखों जाणे । आपणासी ॥ १३ ॥

( सांकडी - संकटात )

संकटामध्ये कसे वागावयाचें हे त्याला कळतें (त्याला संकटातून यशस्वीपणानें निभावून जाता येतें) उपाधीमध्ये कसे मिळून जावें व स्वतःस अलिप्तपणें कसे बाजूला राखावें हे त्याला कळतें (भिन्न भिन्न उपाधींत वेगवेगळी कार्ये करुन त्याला पुन्हा असंगपणा राखतां येतो)

आहे तरी सर्वां ठाईं । पाहों जातां कोठेंचि नाहीं । जैसा अंतरात्मा ठाईंचा ठाईं । गुप्त जाला ॥ १४ ॥

असतो तर सर्व ठिकाणी आणि त्याला पाहायला जावें तर तो कोठेही सांपडत नाही,जसा काही अंतरात्माच जेथल्या तेथे गुप्त झाला (अंतरात्माच देहातील सर्व कार्ये करीत असून जसा कोठें लिंपत नाही,त्याप्रमाणे तो सर्व सर्वत्र कार्ये करीत असून कोठेंच सापडत नाही.

त्यावेगळें कांहींच नसे । पाहों जातां तो न दिसे । न दिसोन वर्तवीतसे । प्राणीमात्रांसी ॥ १५ ॥

त्याच्याशिवाय तर काहींच नसते आणि पाहायला जावें तर तो (अंतरात्मा) कोठेही दिसत नाही,पण न दिसतांही  सर्व प्राणिमात्रांचे व्यवहार चालवित असतो (त्याच्यावांचून कोणतेंच कार्य होत नाही,उलट सर्व प्राण्यांना प्रेरक तोंच आहे असे असून तो कोठेही दिसत नाही)

तैसाच हाहि नानापरी । बहुत जनास शाहाणे करी । नाना विद्या त्या विवरी । स्थूळ सूक्ष्मा ॥ १६ ॥

त्याप्रमाणे हा महंतही पुष्कळ लोकांना अनेक प्रकारे शहाणें करतो,अनेक प्रकारच्या स्थूळ व सूक्ष्म विद्या समजावून सांगतो.

आपणाकरितां शाहाणे होती । ते सहजचि सोये धरिती । जाणतेपणाची महंती । ऐसी असे ॥ १७ ॥

आपल्यामुळे जे शहाणे होतात ते सहजच आपला आश्रय करुन वागतात जाणत्याची महंती अशी असतें (अशाप्रकारें ज्ञान देऊन लोकांना वेधून घेण्याची महंती तीच जाणत्यांची महंती)(अनेक सुलभ किंवा सूक्ष्म विद्या बहुत जनांस सांगून जो शहाणें करतो व ह्याप्रमाणें ह्याच्यापासून शहाणपण शिकून अनेक लोक स्वतंत्र कार्यप्रवर्तक होतात असा तो सर्वज्ञ व सर्वकर्ता पुरुष तोच महंतपणाला योग्य होय.)

राखों जाणें नीतिन्याय । न करी न करवी अन्याये । कठीण प्रसंगीं उपाये । करूं जाणे ॥ १८ ॥

नीति,न्याय,ह्यांचे रक्षण कसे करावे हे ज्याला कळते,अन्याय स्वतःकरीत नाही व दुस-याकडून करवीत नाही,कठिण प्रसंगामध्ये कोणता उपाय योजावा हे त्याला माहीत असतें(कठिण प्रसंगातून पार पडण्याचें उपाय शोधून काढतो)

ऐसा पुरुष धारणेचा । तोचि आधार बहुतांचा । दास म्हणे रघुनाथाचा । गुण घ्यावा ॥ १९ ॥

( धारणेचा - कर्तुत्वसंपन्न,विरक्त,ज्ञानी,क्रियाशील )

असो जो व्यापक बुध्दीचा पुरुष असतो तोच अनेक जनांचा आश्रय होय,रघुनाथाचे दास (रामदास) म्हणतात की त्याचा (धारणाशील पुरुषाचा) गुण घ्यावा (दास म्हणतात की हें सर्व गुण रामचरित्रापासून शिकावें)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे महंतलक्षणनिरूपणनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : चंचळ नदीई ॥ श्रीराम ॥**

चंचळ नदी गुप्त गंगा । स्मरणें पावन करीं जगा । प्रचित रोकडी पाहा गा । अन्यथा नव्हे ॥ १ ॥

( गुप्त - चंचळ माया गुप्त असून तिचे रूप कोणासही कळत नाही,मुळात नाही ती सर्वत्र भासते.)

तुर्या अवस्थेंचे मूळ जी जाणीव (स्फुरण) हीच चंचळनदी होय,ती सरस्वती इत्यादि नद्यांप्रमाणे गुप्त आहे,पण तिंचे स्मरण केले असतां ती सर्व जगाला पावन करतें हा प्रत्यक्ष अनुभव पाहून घ्या,ह्यांत काही खोटे नाही.(मायानदी ही चंचळ असून गुप्त आहे,ती सर्व खटाटोप करीत असून कोठेंच आढळत नाही,मूळमायेचें स्मरण चित्तशुध्दि करणारे आहे,कल्पना माघारी नेत नेत मूळमायेंपर्यंत म्हणजे उगमापर्यंत नेली की परम पावनता प्राप्त होते ह्याचा अनुभव कोणालाही येणारा आहे हे बोलणे अगदी सत्य आहे.)

केवळ अचंचळीं निर्माण जाली । अधोमुखें बळें चालिली । अखंड वाहे परी देखिली । नाहींच कोणीं ॥ २ ॥

( अचंचळीं - ब्रह्म , अधोमुखें बळें चालिली - ब्रह्माच्या ठिकाणी निर्माण होऊन स्वबळाने अधोमुख होऊन वाहते )

मायानदी ही केवळ अचंचळ अशा ब्रह्माच्या (पर्वताच्या) ठिकाणी उत्पन्न झाली आणि खाली वाहात जोराने चालली आहे (शुध्दातूंन शबलांत व सूक्ष्मातून स्थूलांत वाहात चालली आहे) ती खंड न पडतां सारखी वाहात आहें,पण तिला अद्यापि कोणी पाहिले नाही.

वळणें वांकाणें भोवरे । उकळ्या तरंग झरे । लादा लाटा कातरे । ठाईं ठाईं ॥ ३ ॥

( लादा - आपटणे )

तिला ठिकठिकाणी अनेक वळणे,बांक,भोवरे,उसळ्या,लहरी,झरे आहेत,तिचे पाणी खडकावर आदळून उसळत आहे,लाटा येत आहेत (खडकावर आपटत व पाणी जागोजाग कांपीत अशाप्रकारें ती अधोमुख वाहात आहे.)

शुष्क जळाचे चळाळ । धारा धबाबे खळाळ । चिपळ्या चळक्या भळाळ । चपळ पाणी ॥ ४ ॥

( शुष्क जळाचे - खरोखर पाणी नसून गुप्त आहे म्हणून कोरड्या जलाचे )

पाण्याचा कोरडा फेंस,धारा,धबधबे,खळखळ,चिळकांड्या,कारंजी,उडण,एकदम झपाट्याने वाहाणें,असे पाणी चपळ आहे.

फेण फुगे हेलावे । सैरावैरा उदक धावे । थेंब फुई मोजावे । अणुरेणु किती ॥ ५ ॥

फेंस,बुडबुडें,हेलकावें,इकडे तिकडे वाहणारे पाणी,थेंब,तुषार (फुई) ह्यांचे अणुरेणूसारखे बारीक कण किती तरी मोजावे ?

वोसाणे वाहती उदंड । झोतावे दर्कुटे दगड । खडकें बेटें आड । वळसा उठे ॥ ६ ॥

( वोसाणे - केरकचरा,गवत, दर्कुटे - तुटलेले बारीक दगड , वळसा - भोवरा )

पुराबरोबर पुष्कळ केरकचरा वाहात येत आहे (वोसाणे) उंचावरुन (-धबधबे-झोतावे) पाणी पडत आहे,लहान मोठे दगड,धोंडे,खडक,बेटें,वळसे ह्यांना अडकल्यामुळे पाण्यात भोवरे उत्पन्न झाले आहेत (हे सर्वप्रकार मायानदीतही आहेत.अनंत प्रकारच्या वृत्तीत लहरी उठत असतात)

मृद भूमी तुटोन गेल्या । कठीण तैश्याचि राहिल्या । ठाईं ठाईं उदंड पाहिल्या । सृष्टीमधें ॥ ७ ॥

ह्या प्रवाहांत मऊ जमिनी असतात त्या फुटून वाहून जातात,कठिण भूमि असतात त्या तशाच राहातात,अशा राहिलेल्या जमिनी सृष्टीमध्ये ठिकठिकाणी द्दष्टीस पडतात (म्ह.सात्विक सूक्ष्म लहरी टिकत नाहीत व तामस्थूल तेवढ्या टिकून राहातात किंवा सूक्ष्मातून स्थूळाकडें जाणें असा प्रवाह आहे)

येक ते वाहतचि गेले । येक वळशामधें पडिले । येक सांकडींत आडकले । अधोमुख ॥ ८ ॥

ह्या नदीत कोणी वाहात जात असतात,कोणी भोव-यात सांपडतात,कोणी खाली डोके वर पाय करुन खबदडीत अडकतात (मायानदीच्या प्रवाहाबरोबर कित्येक जीव वाहात जातात,कित्येक वळशांत-प्रपंच फे-यात पडून खालीवर होतात,कित्येक अधोगतीला लागून कामक्रोधादिकांच्या कचाट्यांत सांपडतात आपटतात,चिरडतात,अहंकाराने फुगून वर येतात.

येक आपटआपटोंच गेली । येक चिरडचिडोंच मेलीं । कितीयेक ते फुगलीं । पाणी भरलें ॥ ९ ॥

कोणी ताडताड आपटतच जातात,कोणी चिरडून चिरडून मरतात,कित्येकांच्या पोटांत पाणी शिरुन ते फुगतात.

येक बळाचे निवडले । ते पोहतचि उगमास गेले । उगमदर्शनें पवित्र जाले । तीर्थरूप ॥ १० ॥

( ते पोहतचि उगमास - लौकिक प्रवाहाविरुद्ध पोहून परब्रह्माकडे )

एक असे,बलवान (पुण्यवान) निपजतात की ते प्रवाहात वरवर पोहत जाऊन उगमाला (ब्रह्माला) जाऊन पोहोचतात व उगमाच्या दर्शनामुळे ते पवित्र तीर्थरुप (ब्रह्मरुप) होतात (काही पुण्यवंत जीव (शास्त्र,बुध्दि,भाव इ.) बळाने उलट पोहत म्ह. अंतर्मुख होऊन उगमास जातात व त्यामुळे उध्दरुन जातात)

तेथें ब्रह्मादिकांचीं भुवनें । ब्रह्मांडदेवतांचीं स्थानें । उफराटी गंगा पाहातां मिळणें । सकळांस तेथें ॥ ११ ॥

( उफराटी गंगा - मायेस जाणून )

त्या ठिकाणी म्ह.उगमापाशी,मूळमायेच्या ब्रह्मदेवादिकांचे लोक असतात,ब्रह्मांडातील देवतांची स्थानें असतात,(म्हणजे मूळमायेच्या ठिकाणी सगळे देव,देवता आपल्या मूळस्वरुपांत आहेत) ही मायानदी उलट क्रमाने पोहत उगमाशी गेल्यावर तेथें सर्वांची भेट होते,कां की सर्वांचे ते विश्रांतिस्थान आहे.

त्या जळाऐसें नाही निर्मळ । त्या जळाऐसें नाहीं चंचळ । आपोनारायण केवळ । बोलिजे त्यासी ॥ १२ ॥

त्या पाण्यासारखे निर्मळ व चंचळ दुसरे काही नाही (त्या उगमाचें जळ-चैतन्य-अत्यंत शुध्द व चंचळ आहे) त्या पाण्याला केवळ आपोनारायण म्हणतात.

माहानदी परी अंतराळीं । प्रत्यक्ष वाहे सर्वकाळीं । स्वर्गमृत्युपाताळी । पसरली पाहा ॥ १३ ॥

स्वर्ग,मृत्यु,पाताळ या तिन्ही लोकांत पसरलेली ही महानदी आहे पण ती अंतरिक्षांत सदासर्वकाळ वाहात असते,(पण तिचें मूळ अंतराळात आकाशात आहें व सर्वकाळ सर्वत्र ती सारखी वाहात आहें,पण तिचे मूळ अत्यंत सूक्ष्म आहे)

अधोर्ध अष्टहि दिशा । तिचें उदक करी वळसा । जाणते जाणती जगदीशा । सारिखीच ते ॥ १४ ॥

( अधोर्ध - खालीवर )

खाली म्हणजें पशुपक्षादिकांच्या योनीत व वर म्हणजें देवादिकांच्या योनीत आठही दिशांना (सर्वत्र) तिच्या उदकाचा वेढा आहें,ती जगदिशासारखीच (सामर्थ्यवंत) आहें हें ज्ञात्यांना ठाऊक आहें (तिचें बळ सर्वावर सारखेच चालते,हें सर्व ज्ञातेपुरूष जाणतात,जगदीशाबरोबरची तिची सत्ता ब्रह्मांडात चालते)

अनंत पात्रीं उदक भरलें । कोठें पाझपाझरोंच गेलें । कितीयेक तें वेचलें । संसारासी ॥ १५ ॥

( अनंत पात्रीं उदक - अनेक प्राणीमात्रात अहंभाव )

जीवरुपी अनंत पात्रांत हे पाणी भरलेले आहे,कित्येक भांड्यातून (स्थावरादि योनींमधून) तें पाझरुन जातें,दुस-या कित्येकांमधील तें संसाराला खर्च होते.(अनंत प्राणी ही अनंत पात्रें-भांडी आहेत व ह्या सर्व

भांड्यातून तिचे पाणी भरले आहे,हे कोठें संसारात खर्च होते व कोठे साधुसंतांच्या ठिकाणी-पाझरुन जातें,त्यांच्या ठिकाणची माया ओसरुन जातें)

येक्यासंगे तें कडवट । येक्यासंगें तें गुळचट । येक्यासंगे ते तिखट । तुरट क्षार ॥ १६ ॥

एका पात्रांत संगतीने तें कडू,एकाच्या संगतीने तें गोड,तर एकाच्या संगतीने तिखट,तुरट,खारट होतें (हे पाणी ज्या पदार्थांच्या संगात जातें त्यासारखे होते,सात्विकांच्या संगतींत गोड,तामसांच्या संगतीत कडू व राजसांच्या संगतीत खारट,तुरट,तिखट असे होते)

ज्या ज्या पदार्थास मिळे । तेथें तद्रूपचि मिसळे । सखोले भूमीस तुंबळे । सखोलपणें ॥ १७ ॥

तें ज्या पदार्थाला मिळतें तेथे तें तद्रूपच बनून जातें,खोल जमीन असेल तेथें खोलगटपणामुळे सांचते (म्हणजे अज्ञ जीवांचे ठिकाणी माया तळ देऊन स्थिर होऊन राहातें)

विषामधें विषचि होतें । अमृतामधें मिळोन जाते । सुगंधीं सुगंध तें । दुर्गंधीं दुर्गंध ॥ १८ ॥

(ती माया) तें विषामध्ये विष होतें,अमृतात अमृत-तद्रूपच-होऊन राहातें,सुगंधात सुगंधि व दुर्गंधात दुर्गंधि होते.

गुणीं अवगुणीं मिळे । ज्याचें त्यापरी निवळे । त्या उदकाचा महिमा न कळे । उदकेंविण ॥ १९ ॥

गुण व अवगुण ह्या दोहोतही मिसळून तें ज्याच्या त्याच्याप्रमाणें बनतें,अशा त्या उदकाचा महिमा स्वतः त्याच्या शिवाय कोणासही कळणार नाही (ह्या मायानदीच्या जळाचा महिमा अर्तक्य आहे)

उदक वाहे अपरंपार । न कळे नदी कीं सरोवर । जळवास करून नर । राहिले कितीयेक ॥ २० ॥

( जळवास करून - मायारुपी पाण्यात गुरफटून )

(तिचे उदक अपरंपार आहे) ही नदी आहे की सरोवर हे कळत नाही इतके ते उदक अथांग वाहात आहे,कित्येक लोक तर जळवास करुन राहिले आहेत.(मायेत गुरफटलेले आहेत,मायेतून त्यांचे डोके वर निघतच नाही)

उगमापैलिकडे गेले । तेथें परतोन पाहिलें । तंव तें पाणीच आटलें । कांहीं नाहीं ॥ २१ ॥

उगमाच्या पलीकडें गेल्यानंतर तेथून परतून पाहिलें तर पाणी (माया) सगळेंच आटून जाऊन काहींच राहिलें नाही (माया म्हणजें कल्पना किंवा वृत्ति)(जे मूळ उगमाच्या पलीकडे गेले म्ह.मायानदी उलट पोहून जाऊन व मायापार होऊन ब्रह्मस्वरुप झाले ते मागे वळून पाहूं लागले तेव्हा मायानदीच नाही,आपण आजवर उगाच भ्रमांत होतो,माया उगाच मिथ्या आहे असे त्यांना कळून आले)

वृत्तिसुन्य योगेश्वर । याचा पाहावा विचार । दास म्हणे वारंवार । किती सांगों ॥ २२ ॥

दास म्हणतात,पुन:पुन्हा किती सागावें ?(माया म्हणजे कल्पनावृत्ति) योगीश्र्वर वृत्तिशून्य कसे असतात ह्याचा विचार करावा म्हणजे झाले.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चंचळ नदीईनिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : अंतरात्माविवरण ॥ श्रीराम ॥**

आतां वंदूं सकळकर्ता । समस्त देवांचा जो भर्ता । त्याचे भजनीं प्रवर्ता । कोणीतरी ॥ १ ॥

सर्व देवांचे पोषण करणारा व सकळ सृष्टीचा जो कर्ता (परमात्मा) त्याला प्रथम नमस्कार करु,कोणीतरी त्याच्या भजनाला लागावें (आतां सर्व कर्तृत्वाचे मूळ,सर्व देवांचा नाथ जो मूळपरुष-अंतरात्मा-त्याला वंदन करितो,त्याचें भजन अज्ञान्यांकरिता येणे कठिण,पण कोणीतरी जाणते त्याला जाणून भजतील तर बरे)

तेणेंविण कार्य न चले । पडिलें पर्ण तेंहि न हाले । अवघें त्रैलोक्येचि चाले । जयाचेनी ॥ २ ॥

त्याच्यावांचून कोणतेही काम होत नाही,पडलेले पानसुध्दा हालत नाही,फार काय सांगावे,सगळें त्रैलोक्य त्याच्यायोगानें चालत आहे.(अवघ्या त्रेलोक्याचा चालक तो आहे)

तो अंतरात्मा सकळांचा । देवदानवमानवांचा । चत्वारखाणीचत्वारवाणीचा । प्रवर्तकु ॥ ३ ॥

देव,दानव व मानव ह्या सर्वांचा तो अंतरात्मा होय,चार खाणी,चार वाणी ह्यांचा प्रवर्तकही (उत्पादकही) तोच होय.

तो येकलाचि सकळां घटीं।करी भिन्नभिन्ना राहाटी ।सकळ सृष्टीची गोष्टी ।किती म्हणोन सांगावी ॥४॥

तो एकटाच सगळ्या घटांत राहून (देहांत) राहून (नांदत असून) भिन्नभिन्न व्यवहार करतो,सगळ्या सृष्टीची गोष्ट (विस्तृत वर्णन) किती म्हणून सांगावे ?

ऐसा जो गुप्तेश्वर । त्यास म्हणावें ईश्वर । सकळ ऐश्वर्य थोर थोर । जयाचेनि भोगिती ॥ ५ ॥

असा जो गुप्तेश्र्वर त्यासच ईश्र्वर म्हणावे,त्याच्या कृपेमुळे सगळे मोठमोठे ऐश्र्वर्य भोगतात.(मोठमोठे त्याच्या सत्तेनेंच ऐश्र्वर्य भोगतात)

ऐसा जेणें वोळखिला । तो विश्वंभरचि जाला । समाधी सहजस्थितीला । कोण पुसे ॥६॥

असा परमेश्र्वर ज्यानें ओळखला तो स्वतःच ईश्र्वर झाला,मग समाधीला व सहजस्थितीला विचारतो कोण ?(त्या विश्र्वंभराला जो ओळखतो तो विश्र्वंभरच होतो,त्यांशी समरस होणारा तोच होतो-अशा अनन्यतेपुढें समाधि,सहजस्थिति इ.कमावलेल्या स्थितीचा काय पाड ?)

अवघें त्रैलोक्य विवरावें । तेव्हां वर्म पडेल ठावें । आवचटें घबाड सिणावें । नलगेचि कांहीं ॥ ७ ॥

( आवचटें घबाड - अचानक मोठा लाभ )

सगळ्या त्रैलोक्याचे शोधन करावें (म्ह.विश्र्वाची उभारणी व संहारणी पाहावी) तेव्हाच हें वर्म माहीत होते.(त्याचे स्वरुप आकळतें व एकदम डबोलें हाती आल्याचा परमानंद होतो) अकल्पित घबाड (ठेवा) सांपडेल,कष्ट करण्याचें काही कारण नाही.

पाहातां ऐसा कोण आहे । जो अंतरात्मा विवरोन पाहे । अल्प स्वल्प कळोन राहे । समाधानें ॥ ८ ॥

ह्या अंतरात्याचे साग्र विवरण करुन पाहाणारा असा शोधूं गेले असतां कोण आहे ? थोडें समजलें की तेवढ्यातच समाधान मानून राहातात (हा अंतरात्मा विवरून पाहाणारा व त्याशी तद्रूप होणारा महात्मा विरळा,त्याची थोडीशी ओळख होऊन डोलणारेच फार)

आरे हें पाहिलेंच पाहावें । विवरलेंचि मागुतें विवरावें । वाचिलेंचि वाचावें । पुन्हापुन्हा ॥ ९ ॥

ह्यास्तव हें पाहिलेलेच पुन्हा पाहावें,एकदा ज्याचे विवरण केले असेल त्याचे पुन्हा विवरण करावे आणि वाचलेलेच पुनःपुन्हा वाचीत असावे (अरे !हा अंतरात्मा निरंतर पाहावा,दिसत नसेल तर वारंवार मनन करावें,मनन नीट होत नसेल तर त्यांचे वर्णन करणारे ग्रंथ पुनःपुन्हा वाचावेत)

अंतरात्मा केवढा कैसा । पाहाणाराची कोण दशा । देखिल्या ऐकिल्या ऐसा । विवेक सांगे ॥ १० ॥

अंतरात्मा हा केवढा व कसा आहे त्यास पाहाणा-याची स्थिति काय होते हे कसे सांगावे ?लोक जसे पाहातात व ऐकतात तसा विचार सांगतात (लोक जेवढे पाहातात तेवढेंच बोलतात)

उदंड ऐकिलें देखिलें । अंतरात्म्यास नवचे पुरविलें । प्राणी देहधारी बाउलें । काय जाणे ॥ ११ ॥

पुष्कळ पाहिले व पुष्कळ ऐकले तरी तेवढ्याने अंतरात्म्याचा थांग लागणार नाही (अंतरात्मा पूर्णपणें कळणार नाही),प्राणी बिचारे देहधारणा करणारे बाहुले,त्याला ते काय समजणार ?

पूर्णास अपूर्ण पुरेना । कां जें अखंड विवरेना । विवरतां विवरतां उरेना । देवावेगळा ॥ १२ ॥

पूर्ण म्हणजें व्यापक अशा अंतरात्म्याचे आकलन अपूर्ण जीवाला होत नाही कारण जीव त्याचें अखंड (निरंतर) विवरण करीत नाही आणि सारखे (नित्य) विवरण करील तर तो देवाहून भिन्न राहाणार नाही.

विभक्तपणें नसावें । तरीच भक्त म्हणवावें । नाहींतरी वेर्थचि सिणावें । खटाटोपें ॥ १३ ॥

अशाप्रमाणे जो देवाहून वेगळेपणाने राहाणार नाही तरच त्याला भक्त म्हणावे,नाहीतर व्यर्थ खटाटोप करुन कष्टी व्हावें (देवाहून विभक्त-वेगळे-नसावें तरच भक्त म्हणविल्याचें सार्थक,नाही तर इतर खटाटोपी व्यर्थ होत)

उगाच घर पाहोन गेला । घरधनी नाहीं वोळखिला । राज्यामधूनचि आला । परी राजा नेणे ॥ १४ ॥

उगीच घर पाहून जावयाचें आणि घरच्या मालकाची ओळख करुन घ्यावयाची नाही,राज्यामधून यावयाचे पण राजा कोण म्हणून माहीत नाही (राजाची भेट झाली नाही तर जसे व्यर्थ)

देहसंगें विषये भोगिले । देहसंगें प्राणी मिरवलें । देहधर्त्यास चुकलें । नवल मोठें ॥ १५ ॥

तसे देहसंगतींत नाना विषय भोगले,मोठे ऐश्र्वर्य मिरविले पण देहाचा चालक ओळखला नाही तर सारें व्यर्थ होय.देहाच्या संगतींत प्राणी विषय भोगतात,वागतात (आढ्यता मिरवतात) आणि ज्यानें देहधारण केला त्या अंतरात्म्याला चुकतात हे केवढें आश्र्चर्य!

ऐसे लोक अविवेकी । आणि म्हणती आम्ही विवेकी । बरें ज्याची जैसी टाकी । तैसें करावें ॥ १६ ॥

( टाकी - दंडक,रीत,कुवत,मगदूर )

(पण नवलाची गोष्ट ही की) लोक असे अविचारी असून आपणाला मोठे विवेकी म्हणवितात (व वर सांगितल्याप्रमाणे अविचाराने वागतात!) असो ज्याची जशी पध्दति असेल (अधिकार असेल) तसें त्याने करावें (ज्याचा जसा अधिकार किंवा पुण्याई-टाकी,तसें त्याने वागावे)

मूर्ख अंतर राखों नेणे । म्हणौन असावें शाहाणे । ते शाहाणेहि दैन्यवाणे । होऊन गेले ॥ १७ ॥

मूर्खास अंतर म्हणजें अंतःस्थिति सांभाळतां येत नाही (मूर्ख दुस-याचे अंतःकरण संतुष्ट ठेऊं शकत नाही) म्हणून शहाणे (ज्ञाते) असावे तर तेही बिचारे दीन होऊन गेले (अंतर म्ह.आंतली इश्र्वर शक्ति मूर्खाला कळत नाही,पण शहाणे म्हणविणारेही मूर्खासारखेच वागून व्यर्थ दैन्य भोगतात)

अंतरीं ठेवणें चुकलें । दारोदारीं धुंडूं लागलें । तैसें अज्ञानास जालें । देव न कळे ॥ १८ ॥

आंत गुप्त ठेवलेला ठेवा चुकला आणि लोकांच्या दारोदार शोधू लागला त्याचप्रमाणेंच अज्ञान जीवांची स्थिति झाली,अंतःकरणात देव असून तो कळत नाही.(अंतरीचा (ह्रदेशी राहाणारा) देव (सर्वाचे जुने ठेवणें) चुकल्यामुळे घरांत पुरुन ठेवलेला ठेवा न सांपडल्यामुळें घरोघर भिक्षा मागत हिंडणा-या करंट्याप्रमाणे अज्ञ जीव कुचंबत पडतात)

या देवाचें ध्यान करी । ऐसा कोण सृष्टीवरी । वृत्ती येकदेंसी तर्तरी । पवाडेल कोठें ॥ १९ ॥

( तर्तरी - तरी मग )

ह्या देवाचे (अंतरात्म्याचे) सार्थ ध्यान करील असा ह्या जगांत कोण आहे ? वृत्ति बोलून चालून एकदेशी (संकुचित) तिचा चंचळपणा कोठवर चालेल ?(चित्तवृत्ति एकदेशी व चंचल-तर्तरी,अंतरात्म्याचें ध्यान करण्याकडे मनाची प्रवृत्ति फार थोड्यांची असतें).

ब्रह्मांडीं दाटले प्राणी । बहुरूपें बहुवाणी । भूगर्भीं आणि पाषाणीं । कितीयेक ॥ २० ॥

ब्रह्मांडामध्ये अनेक नामरुपांचे व वाणीचे (अनेक शब्दांनी बोलणारे अनंत) प्राणी भरून राहिले आहेत,कित्येक भूमीच्या पोटांत व पाषाणांतही आहेत.

इतुके ठाईं पुरवला । अनेकीं येकचि वर्तला । गुप्त आणि प्रगटला । कितीयेक ॥ २१ ॥

पण ह्या इतक्या सगळ्या ठिकाणी अंतरात्मा भरुन राहिला आहे अनेकांचे व्यापार तो एकटाच करीत आहे,कित्येक ठिकाणी गुप्त आहें,कित्येक ठिकाणी प्रकट आहे (तो एक असून अनेकांत वर्तत असतो,कोठे प्रकट दिसतो,कोठे दिसत नाही.)

चंचळें न होईजे निश्चळ । प्रचित जाणावी केवळ । चंचळ तें नव्हे निश्चळ । परब्रह्म तें ॥ २२ ॥

अशा चंचल अंतरात्म्याच्या योगाने निश्र्चळ परब्रह्म होता येणार नाही,हा साक्षात अनुभव ध्यानात ठेवावा निश्र्चळ तेंच परब्रह्म,चंचळ तें परब्रह्म नव्हे (चंचळाला निश्र्चळ केव्हांच होता येत नाही,निश्र्चळ म्ह.परब्रह्म)

तत्वें तत्व जेव्हां उडे । तेव्हां देहबुद्धि झडे । निर्मळ निश्चळ चहुंकडे । निरंजन ॥ २३ ॥

(ज्या तत्वांचा आपला पिंड बनला आहे ती तत्वे मूळतत्वांत विवेकानें उडविली की देहावरचें मीपण नाहीसे होते व मीपणा जिरल्यावर चहूकडें निर्मळ,निश्र्चळ,निरंतर परब्रह्मच भरले आहे हा प्रत्यय येतो) एका तत्वात दुस-याचा लय होऊन सर्व तत्वे नाहीशी होतात तेव्हा देहबुध्दि झडून जातें आणि चहूकडे निर्मळ,निश्र्चळ व निरंजन असे स्वरुपच प्रचीतीस येतें

आपण कोण कोठें कैंचा । ऐसा मार्ग विवेकचा । प्राणी जो स्वयें काचा । त्यास हें कळेना ॥ २४ ॥

( काचा - काचलेला,बद्ध ,अर्धवट असतो)

आपण कोण,कोठे व कसे-कोठचे आहोत हा विचार करणें हा विवेकाचा मार्ग होय,जो स्वत: कच्च्या बुध्दीचा म्ह.विवेकहीन प्राणी आहे त्याला हें समगत नाही.

भल्यानें विवेक धरावा । दुस्तर संसार तरावा । अवघा वंशचि उधरावा । हरिभक्ती करूनी ॥ २५ ॥

म्हणून शहाण्याने हा विवेकाचा पंथ धरावा,विवेकबळाने दुस्तर संसार (भवनदी) तरुन जावें आणि हरिभक्ति करुन सा-या कुळाचा-वंशाचा उध्दार करावा (वंश म्हणजे स्थूल देहाचा वंश नव्हे तर मूळमायेपासून देहापर्यंतचा सारा ब्रह्मवंश)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अंतरात्माविवरणनिरूपणनाम समास आठवा ॥**

**सत्व,रज,तम यांच्या मिश्रणाने विश्र्व निर्मितीची क्रिया सहज चालू राहते,यात प्रथम ॐकाराची निर्मिती झाली अ उ म आणि अर्धमात्रा या साडेतीन मात्रांचाच हिरण्यगर्भ किवा शब्दब्रह्म किवा लोगाँस असे म्हणतात संतांचे नाम हेच होय.शब्द हा आकाशाचा गुण होय,त्यातूने पुढे वेद शास्त्रे प्रकटली.**

**समास नवावा : उपदेश निरूपण ॥ श्रीराम ॥**

आधीं कर्माचा प्रसंग । कर्म केलें पाहिजे सांग । कदाचित पडिले व्यंग । तरी प्रत्यवाय घडे ॥ १ ॥

कर्म,उपासना व ज्ञान ह्या अनुक्रमानें पाहातां प्रथम कर्माशीच प्रसंग येतो,ह्यास्तव कर्म करणें तें यथासांग करावे,कदाचित त्यात काही व्यंग पडले तर दोष होतो (विघ्न येते) आधी (प्रथम,आदौ) कर्माशी संबंध पडतो,(कर्म उपासना,ज्ञान ह्यांत कर्म प्रथम करावयाचे असते) कर्म यथाशास्त्र व यथासांग केले पाहिजे,कर्मात काही उणेपणा आला तर उलट विघ्न प्राप्त होतें).

म्हणौन कर्म आरंभिले । कांहींयेक सांग घडलें । जेथजेथें अंतर पडिलें । तेथें हरिस्मरण करावें ॥ २ ॥

म्हणून कर्माला प्रारंभ करावा म्हणजे काही कर्म सांग घडते आणि जेथें कमीपणा येईल तेथें हरिस्मरण करावें.

तरी तो हरी आहे कैसा । विचार पाहावा ऐसा । संधेपूर्वीं जगदीशा । चोविसां नामीं स्मरवें ॥ ३ ॥

तर तो हरी कसा आहे ह्याचा विचार करावा संध्येच्या आरंभी त्या जगदीशाचे चोवीस नामांनी नामस्मरण करतात (प्रत्यही संध्या करण्यापूर्वी देवाची चौवीस नावें आपण घेतो.)

चोवीसनामी सहस्त्रनामी । अनंतनामी तो अनामी । तो कैसा आहे अंतर्यामीं । विवेकें वोळखावा ॥ ४ ॥

असा जो चोवीसनामी,सहस्त्रनामी किंवा अनंतनामी आहें तो अनामी कसा आहे हे विचारानें अंतःकरणात ओळखावे) (तो २४ नावांचा सहस्त्र नावांचां,अनंत नामांचा व नामातीत परमात्मा कसा आहे तो अंतर्यामी ओळखला पाहिजें.)

ब्राह्मण स्नानसंध्या करून आला । मग तो देवार्चनास बैसला । येथासांग तो पूजिला । प्रतिमादेवो ॥ ५ ॥

ब्राह्मण स्नानसंध्या करून आल्यावर देवपूजेला बसतो,आणि प्रतिमेच्या देवाची यथासांग पूजा करतो (स्नानसंध्या,देवार्चन केले म्हणजें यथाविधि प्रतिमेची पूजा होते)

नाना देवांच्या नाना प्रतिमा । लोक पूजिती धरून प्रेमा ।ज्याच्या प्रतिमा तो परमात्मा ।कैसा आहे ॥ ६ ॥

अनेक देवांच्या अनेक प्रतिमा करुन लोक प्रेमानें पूजतात,त्या प्रतिमा ज्याच्या आहेत तो परमात्मा कसा आहे ? (ज्याला ज्या देवाची प्रीति त्याची तो प्रतिमा करुन पूजतो) आता ह्या सर्व प्रतिमा ज्याच्या आहेत तो देव ओळखणें अवश्य नाही काय ?

ऐसें वोळखिलें पाहिजे । वोळखोन भजन कीजे । जैसा साहेब नमस्कारिजे । वोळखिल्याउपरी ॥ ७ ॥

हे ओळखिलें पाहिजे व त्याचे भजन केले पाहिजे,ज्याप्रमाणे (सरकारी) अधिका-याला ओळखल्यानंतर नमस्कार करावा लागतो (एखादा मोठा मनुष्य-साहेब आपण आधीं ओळखतों आणि मग त्याला नमस्कार करतो.)

तैसा परमात्मा परमेश्वर । बरा वोळखावा पाहोन विचार । तरीच पाविजे पार । भ्रमसागरचा ॥ ८ ॥

(तसें देवाला आधीं ओळखावें आणि मग त्याची भक्ति करावी,तरच संसारसागर तरुन जाण्याची आशा.) त्याप्रमाणे परमात्मा-परमेश्र्वर ह्याची ओळख नीट विचारानें करुन घ्यावी,तर ह्या भ्रमाच्या सागरांतून पलीकडे जाता येईल.

पूजा घेताती प्रतिमा । आंगा येतो अंतरात्मा । अवतारी तरी निजधामा । येऊन गेले ॥ ९ ॥

ज्याच्या प्रतिमेची पूजा करतात ते अवतारी (देव व संत) निजधामाला गेलेले असतात,अर्थात प्रतिमेच्या ठिकाणी अंतरात्मा संचार करुन पूजा घेतो,( पूजा होते प्रतिमेची, पण पूजकाच्या आंगी अंतरात्म्याचा संचार होतो)

परी ते निजरूपें असती । तें निजरूप ते जगज्जोती । सत्वगुण तयेस म्हणती । जाणती कळा ॥ १० ॥

(अवतारी जरी निजधामाला गेले असले तरी) ते निजरुपाने म्हणजे अंतरात्मारुपाने असतात,जे निजरुप तिच जगज्योति,तिलाच सत्वगुण किंवा जाणती कळा म्हणतात (देवाचे किंवा महंताचे अवतार झाले तरी तेही निजरुप अंतरात्माच पाहातात.सर्वांचें निजरुप अशी ती जगज्याति सत्वगुणाधिष्ठित आहें,सर्वांच्या अंतर्यामींची ती जाणीव होय.)

तये कळेचे पोटीं । देव असती कोट्यान्-कोटी । या अनुभवाच्या गोष्टी । प्रत्ययें पाहाव्या ॥ ११ ॥

(तिच्या पोटी असंख्य देव आहेत,ती देंवांचा देव आहें ह्याचा ज्याचा त्याने प्रत्यय घेऊन पाहावा.) ह्या जाणीवकळेच्या पोटांत कोट्यावधिं देव आहेत,ह्या अनुभवाच्या गोष्टी आहेत,अनुभव घेऊन पाहावा.

देहपुरामधें ईश । म्हणोन तया नांव पुरुष । जगामधें जगदीश । तैसा वोळखावा ॥ १२ ॥

देहरुप पुराचा जो ईश म्हणजे स्वाम़ी त्याला पुरुष असे म्हणतात,त्याचप्रमाणे जगामध्ये जगदीश असतो,देहांतला पुरूष जसा विवेकाने पाहावयाचा तसाच जगांतला जगदीशही विवेकाने ओळखावयाचा (देहपुरींतला ईश-नियंता-म्हणून त्याला पुरूष म्हणतात,तोच जगदंतरी जगदीश,किंवा पुरुषांतला उत्तम-पुरुषोत्तम)

जाणीवरूपें जगदांतरें । प्रस्तुत वर्तती शरीरें । अंतःकरणविष्णु येणें प्रकारें । वोळखावा ॥ १३ ॥

सांप्रत तों जगदीश जाणीवरुपाने जगांत राहून सगळ्या शरीरांचे व्यवहार चालवितो,अशा प्रकारें अंत:करण (जाणीव-) रुप विष्णु आहे हे विवेकानें ओळखावें (जाणीवरुपाने सर्व जीवांच्या अंतरीं राहून सर्व शरीरें चालवितो तोच विष्णु होय)

तो विष्णु आहे जगदांतरीं । तोचि आपुले अंतरीं । कर्ता भोक्ता चतुरीं । अंतरात्मा वोळखावा ॥ १४ ॥

(तो जगदंतरी आहे व आपल्याही अंतरी आहे) तो विष्णु जगामध्ये आहे,तसाच आपल्या ह्रदयांतही आहे,कर्ता व भोक्ता तोच अंतरात्मा होय हे सुज्ञांनी ओळखावें.

ऐके देखे हुंगे चाखे । जाणोन विचारें वोळखे । कित्येक आपुले पारिखे । जाणताहे ॥ १५ ॥

ऐकतो,पाहातो,हुंगतो,चाखतो,समजून घेऊन विचारांनें ओळखतो,आपले कोणतें,दुसरे कोणते असें कितीतरी अंतरात्माच ओळखतो.

येकची जगाचा जिव्हाळा । परी देहलोभाचा आडताळा । देहसमंधें वेगळा । अभिमान धरी ॥ १६ ॥

( जिव्हाळा - जीवनकळा,अंतःकरण , आडताळा - अडथळा )

असा तो एकच जगाचा जिव्हाळा म्हणजें अंत:करण आहे (सा-या जगाच्या अंतरी राहून वर्ततो) तो सा-यांचे अंत:करण जिव्हाळा आहे.तोच विष्णु पण देहलोभाच्या अडथळ्यामुळें देहाच्या संबंधाने तो वेगवेगळा अभिमान धरतो,(देहासक्तीमुळें प्रत्येक जीव मी वेगळा आहे असा मिथ्या अभिमान धरतो,असे मिथ्याभिमानाने म्हणत असतो इतकेंच)

उपजे वाढे मरे मारी । जैशा उचलती लहरीवरी लहरी । चंचळ सागरीं भरोवरी ।त्रैलोक्य होत जातें ॥ १७ ॥

( भरोवरी - पुष्कळ )

उपजतो,वाढतो,मरतो,मारतो,ज्याप्रमाणे चंचळ सागरामध्ये लाटांवर लाटा एकसारख्या उसळत असतात त्याप्रमाणें ह्या चंचळाच्या (अंतरात्म्याच्या) ठिकाणी हें त्रैलोक्य होतें व नाश पावतें (जन्म-मृत्यु,मरणे-मारणें हे दरदेहागणिक वेगवेगळे वाटतें मात्र,पण हें एकाच महासागरावर उचंबळणा-या लहरींनी आपापलें वेगळेपण भासवण्यासारखेंच भासमात्र आहे)

त्रैलोका वर्तवितो येक । म्हणोन त्रिलोक्यनायेक । ऐसा प्रत्ययाचा विवेक । पाहाना कैसा ॥ १८ ॥

तो एकटाच त्रैलोक्याला वागवितो म्हणून त्याला त्रैलोक्यनायक म्हणतात.(त्रैलोक्य वर्तविणारा त्रैलोक्यनायक एक अंतरात्माच आहें) असा हा अनुभवाचा विचार कां पाहात नाही ?

ऐसा अंतरात्मा बोलिला । परी तोहि तत्वांमधें आला । पुढें विचार पाहिजे केला । माहावाक्याचा ॥ १९ ॥

अशाप्रकारे अंतरात्म्याचें वर्णन केलें,पण तोही तत्वांमध्येच येतो.ह्यास्तव पुढें माहावाक्याचा विचार केला पाहिजें.

आधीं देखिला देहधारी । मग पाहावें जगदांतरीं । तयाचेनियां उपरी । परब्रह्म पावे ॥ २० ॥

अंतरात्मा हा सत्वगुणाधिष्ठित विष्णु ह्या रुपानें जगाच्या अंतरात आणि अंत:करणरुपाने देहामध्ये राहात असल्यामुळें तत्वांमध्ये येतो आणि तत्वे नाशवंत आहेत म्हणून अंतरात्मा नाशवंत आहे.ह्यास्तव त्याचा त्याग करून महावाक्याच्या विचारानें परब्रह्माशी तद्रूप व्हावयाचें,(अंतरात्मा म्हणून वर सांगितला खरा पण तो सत्वगुणाधिष्ठान म्हणून विष्णु व अंत:करण ह्या रुपांनी जगाच्या व जिवाच्या अंतरी राहातो,ह्याचा नीट विचार करुन प्रत्यय पाहावा म्हणजे तो तत्वांत आला हें समजून येईल.तत्वे तितकी नाशवंत आहेत, म्हणून तत्वें तत्वांत सोडून माहावाक्याचा विचार करावा.देहबुध्दि सोडून देहांतीत अंतरात्मा प्रथम आपल्या अंतरी पाहावा,मग तोच जगाच्या अंतरी पाहावा आणि मग आपण व जग दोन्ही सोडून महावाक्याचा विचार करावा आणि ब्रह्मपद पावावें)

परब्रह्माचा विचार । होतां निवडे सारासार । चंचळ जाईल हा निर्धार । चुकेना कीं ॥ २१ ॥

(ब्रह्मपदाचा विचार म्हणजें निश्र्चळ ब्रह्म एक व बाकी सारे चंचळ,एक सार व एक असार सार शाश्र्वत व चंचळ असार हा निश्र्चय) परब्रह्माचा विचार करू गेले तर सार काय व असार काय ह्याचा निवाडा होतो,त्यावेळी चंचळ अंतरात्म्याचा लय होईल हा निश्र्चय फिरावयाचा नाही.

उत्पत्ति स्थिति संव्हार जाण । त्याहून वेगळा निरंजन । येथें ज्ञानाचें विज्ञान । होत आहे ॥ २२ ॥

उत्पत्ति,स्थिति व संहार ह्याहून निरंजन परब्रह्म अलिप्त आहे,त्या ठिकाणी ज्ञान हें विज्ञान म्हणजें अनुभवरुप होतें,(उत्पत्ति-स्थिति-लयाहून परमात्मा निराळा आहे.ह्या ज्ञानाचाच परिपाक विज्ञांनात-स्वस्वरुपानुभवांत-होत असतो)

अष्टदेह थानमान । जाणोन जालियां निर्शन । पुढें उरे निरंजन । विमळ ब्रह्म ॥ २३ ॥

आठ देह व त्यांची स्थाने वगैरे ह्यांचे विचारानें निरसन झाल्यावर पुढें निरंजन व निर्मळ असे परब्रह्म राहाते.

विचारेंचि अनन्य जाला । पाहाणाराविण प्रत्यय आला । तेहि वृत्ति निवृत्तीला । बरें पाहा ॥ २४ ॥

त्या परब्रह्माशी (विचाराने तत्वमसि) महावाक्याच्या चिंतनाने अनन्य होणे,पाहाणारा वेगळा न राहाता म्हणजें त्रिपुटी नाहीशी करुन अनुभव घेणें-एकरुप होणें ही ही वृत्तिच आहे.तीही वृत्ति(मी वेगळा,मी परब्रह्म ही ही वृत्ति) टाकून देऊन निवृत्तिपदाचा पूर्ण अनुभव घ्यावा (विज्ञान,साक्षात्कार,सायुज्यता मुक्ति ही सारी नावें ह्यालाच देण्यांत येतात)

येथें राहिला वाच्यांश । पाहोन सांडिला लक्ष्यांश । लक्ष्यांशासारिसा वृत्तिलेश । तोहि गेला ॥ २५ ॥

ह्या ठिकाणी तत्वमस्यादि महावाक्यांचा वाच्यांश तर बाजुलाच राहिला पण लक्ष्यांशसुध्दां ध्यानीं आणून सोडून द्यावा,म्हणजें त्या लक्ष्यांशाबरोबरच मी ब्रह्म ही अखेरची लेशमात्र वृत्ति असतें तीही सुटून जातें (तत्वमसि ह्या महावाक्याचा वाच्यांश पाहिल्यावर लक्ष्यांश ध्यानी आणावा.लक्ष्यांशही सोडून अनन्य व्हावें म्हणजें मी ब्रह्म ही ही अखेरची ऊर्मि-वृत्तिलेश-सोडावी-सुटलीच ती!)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उपदेश निरूपणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : निस्पृह वर्तणूक ॥ श्रीराम ॥**

मूर्ख येकदेसी होतो । चतुर सर्वत्र पाहातो । जैसा बहुधा होऊन भोगितो । नाना सुखें ॥ १ ॥

मूर्ख एकदेशी (संकुचित) असतो आणि चतुर हा व्यापकपणानें सर्वत्र पाहातो,चतुर जणू काय अनेक रुपें घेऊन अनेक सुखांचा उपभोग घेतो.

तोचि अंतरात्मा महंत । तो कां होईल संकोचित । प्रशस्त जाणता समस्त । विख्यात योगी ॥ २ ॥

अंतरात्मा जसा व्यापक असतो तसाच हा चतुर महंतही व्यापक असतो,तो संकुचित कां होईल ? तो उत्कृष्ट (प्रशंसनीय),सर्वज्ञ व प्रसिध्द असा योगी असतो.(व्यापकांत अत्यंय व्यापक,बडा महंत म्हणजें अंतरात्माच होय,सर्व जाणता तो योगी,सर्व भूतांतर्यामीं त्याचा वास असल्यामुळें तो अत्यंत प्रशस्त-व्यापक-होय,त्याला संकुचित कोण म्हणेल ?)

कर्ता भोक्ता तत्वता । भूमंडळीं सर्व सत्ता । त्यावेगळा त्यास ज्ञाता । पाहेसा कवणु ॥ ३ ॥

खरोखर,(सर्व-) कर्ता व (सर्व) भोक्ता तोचं,सगळ्या भूमंडळावर त्याचीच सत्ता,त्यांस पाहाणारा असा ज्ञाता त्याच्याशिवाय दुसरा कोण आहे ?(त्याचें संपूर्ण ऐश्र्वर्य पाहील असा त्याच्याहून दुसरा कोण आहे ?)

ऐसें महंते असावें । सर्व सार शोधून घ्यावें । पाहों जातां न सांपडावें । येकायेकी ॥ ४ ॥

अशा प्रकारें महंतानें वागावें,सगळीकडेंच सार असेल तें शोधून ग्रहण करावें कोणी पहावयास लागलें तर एकाएकीं सांपडू नयें.(महंताने ह्या अंतरात्म्यासारखे सारग्राही  व्यापक व्हावें,सर्वत्र असावें पण कोठेंही सहसा सांपडू नयें)

कीर्तिरूपें उदंड ख्यात । जाणती लहान थोर समस्त । वेश पाहातां शाश्वत । येकहि नाहीं ॥ ५ ॥

कीर्तीच्या रुपाने महंत इतका प्रसिध्द असतो की सगळे लहानथोर त्याला जाणत असतात,पण त्याचा वेष पाहूं गेले असता कायमचा असा एकही नसतो.

प्रगट कीर्ति ते ढळेना । बहुत जनास कळेना । पाहों जातां आडळेना । काये कैसें ॥ ६ ॥

त्याची पसरलेली कीर्ती कमी होत नाही,पुष्कळ सामान्य लोकांना त्याच्या स्वरुपाचा पत्ता लागत नाही,पहायला गेले तर त्याच्या वागणुकीचा काही पत्ता लागत नाहीं. (कीर्ती मात्र अचळ पण मूर्ति पाहून सामान्य जनांस ह्याचें काही एक कळू नयें)

वेषभूषण ते दूषण । कीर्तिभूषण तें भूषण । चाळणेविण येक क्षण । जाऊंच नेदी ॥ ७ ॥

वेषांचे भूषण हे भूषण असून दुषण आहें कीर्तीचें भूषण हेंच खरे भूषण आहे.(तें महंताजवळ असतें), चिंतनाशिवाय तो एक क्षणही वायां जाऊ देत नाहीं,(वेष नाना प्रकारचें,अंतर्यामी चिंतन-चाळणा-सतत चाललेली.)

त्यागी वोळखीचे जन । सर्वकाळ नित्य नूतन । लोक शोधून पाहाती मन । परी इच्छा दिसेना ॥ ८ ॥

ओळखीच्या लोकांचा त्याग करून सदा सर्वदा नवनवे लोक मिळवतो,लोक त्यांचे अंतःकरण (कसोटी लावून) शोधून पाहातात,पण त्याच्या ठिकाणीं इच्छा (स्वार्थ,लोभ) दिसत नाही.(लोक ह्याला काय पाहिजे म्हणून ह्यांचे मन शोधून पाहात असतात,पण हा अत्यंत निरिच्छ आहे असेंच सर्वांस आढळून येंतें)

पुर्ते कोणाकडे पाहेना । पुर्ते कोणासीं बोलेना । पुर्ते येके स्थळीं राहेना । उठोन जातो ॥ ९ ॥

धड कोणाकडे पाहात नाही,धड कोणाशी बोलत नाही,धड एका ठिकाणी बसावयाचा नाही,उठून चालू लागतो.

जातें स्थळ तें सांगेना । सांगितलें तेथें तरी जायेना । आपुली स्थिति अनुमाना । येवोंच नेदी ॥ १० ॥

ज्या ठिकाणी त्यास जावयाचे असतें तें ठिकाण तो सांगत नाही व जेथे जायचें म्हणून सांगतो तेथें जात नाही.अशा रीतींनें आपलें अनुमान कोणाला होऊं देत नाही (ह्याची स्थिति कोणाला अनुमानतांच येत नाही)

लोकीं केलें तें चुकावी । लोकी भाविलें तें उलथवी । लोकीं तर्किलें तें दावी । निर्फल करूनी ॥ ११ ॥

लोकांनी ह्याच्यासंबंधी (जग व देव ह्यासंबंधी) जे अनुमान केले असेल तें हा खोटे पाडतो.लोकांनी जी भावना केली असेल ती हा उलथून टाकतो,आणि लोकांनी तर्क केला असेल तो हा निष्फळ करुन दाखवितो.(लोक करतील तें चुकवितो,लोकांचे भाव व तर्क उलथून पाडतो)

लोकांस पाह्याचा आदर । तेथें याचा अनादर । लोक सर्वकाळ तत्पर । तेथें याची अनिछ्या ॥ १२ ॥

ज्या गोष्टी लोकांना पाहाण्याचा आदर वाटतो तेथे ह्याचे मन जात नाही आणि लोक जें करण्याविषयी उत्सुक असतात तेथें ह्याची इच्छाच असत नाही.(ह्याला पाहाण्यासाठीं लोक हपापलेले-पण हा लोकांच्या मेळ्यांत यायचाच नाही,लोकांचा जेथे आदर तेथें ह्याची अनिच्छा)

एवं कल्पितां कल्पेना । न तर्कितांहि तर्केना । कदपी भावितां भावेना । योगेश्वर ॥ १३ ॥

तात्पर्य,अशा योगीश्र्वर महंताच्या स्थितीची कल्पना करु लागलें तरी होत नाही,त्याच्या संबंधी कोणती भावना तर्क कांहींही एक चालत नाही (तात्पर्य ह्या योगीश्र्वरापुढें कोणाची कल्पना,भावना,तर्क,काहीं एक चालत नाही)

ऐसें अंतर सांपडेना । शरीर ठाईं पडेना । क्षणयेक विशंभेना । कथाकीर्तन ॥ १४ ॥

अशाप्रकारे त्याच्या अंतःकरणाच्या स्थितीचा (अंतर) अंत लागत नाही आणि त्याचा देहही एके ठिकाणी सांपडत नाही,पण कथाकीर्तनाला मात्र क्षणभरही विसंबत नाही (ह्याप्रमाणे त्याचें मनोगत कोणालाही कळत नाही,त्याचा देह कोठे जातो येतो हे समजत नाही.तथापि हा हरिकिर्तनाला क्षणभरही विसरत नाही)

लोक संकल्प विकल्प करिती ।ते अवघेचि निर्फळ होती ।जनाची जना लाजवी वृत्ति ।तेव्हां योगेश्वर॥१५॥

( जनाची जना लाजवी वृत्ति - लोकांनी योगेश्वराविषयी केलेले तर्कवितर्क परस्पर खोटे ठरून लोकांना स्वतःच्या वृत्तीविषयी लाज वाटते , निर्फळ - निष्फळ )

(लोकांचे संकल्प-विकल्प-ब-यावाइट कल्पना-हा निष्फळ करुन टाकतो व ह्याप्रमाणे आपले तर्कवितर्क फजीत झाले असें लोकांच्या परभारे प्रत्ययाला आणून देतो) लोक ह्याच्या संबंधाने जे जे तर्कवितर्क करतात ते सगळे व्यर्थ होतात,तेणेकरुन लोंकांना आपल्या तर्कविर्तकाबद्दल लज्जा उत्पन्न होतें तरच तों योगेश्र्वर होय.

बहुतीं शोधून पाहिलें । बहुतांच्या मनास आलें । तरी मग जाणावें साधिलें । महत्कृत्य ॥ १६ ॥

अनेकांनी ह्याची कसोटी पाहून त्यांच्या कसोटीला हा उतरला तर मग मोठेंच कार्य झाले असे समजावें (बहुतांना शोधपूर्वक पाहिल्यावर ह्याचेच म्हणणें पटतें.असे झाले म्हणून महत्कृत्य झाले असे समजावें)

अखंड येकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा । काळ सार्थकचि करावा । जनासहित ॥ १७ ॥

निरंतर एकांताचे सेवन करुन त्या एकांतात अभ्यासच करावा आणि (नंतर लोकांत येऊन) लोकांसह वर्तमानकाळ सार्थकी लावावा.(महंताने अखंड एकांतात असावें,आपला अभ्यास-ध्यानधारणा-नामजपादि सोडू नयें.आपले आयुष्य सार्थकी लावावे व इतरांचेही सफल करावें)

उत्तम गुण तितुले घ्यावे । घेऊन जनास सिकवावे । उदंड समुदाये करावे । परी गुप्तरूपें ॥ १८ ॥

(प्राणिमात्रांचे) उत्तम गुण असतील तेवढे आपण अभ्यासानें घ्यावें व नंतर तेंच लोकांना शिकवावे.पुष्कळ समुदाय करावें पण तें गुप्तरुपानें करावें.(ह्याप्रमाणें आपल्या संप्रदायांत अनेक लोक घेऊन त्यांचे संघ बनवावे पण तें गुप्त ठेवावे -एकाचे एकास कळो नयें.)

अखंड कामाची लगबग । उपासनेस लावावें जग । लोक समजोन मग । आज्ञा इछिती ॥ १९ ॥

निरंतर कामाची घाई असावी,सगळे जग उपासनेला लावावें,म्हणजें मग सगळे लोक त्याचा थोरपणा जाणून काहींतरी आपणाला आज्ञा व्हावी अशी इच्छा करतात,(एकामागें एक अशीं अनेक कामें अंगावर घेऊन उद्योगात गुंग असावें,लोक उपासनेस -भजनमार्गास लावावे,लोकांस कळत चाललें कीं मग शब्द झेलण्यास ते तत्पर होतात.

आधीं कष्ट मग फळ । कष्टचि नाहीं तें निर्फळ । साक्षेपेंविण केवळ । वृथापुष्ट ॥ २० ॥

( वृथापुष्ट - कुचकामी )

अगोदर कष्ट मग त्यांचे उत्तम फळ असा नियम आहे,ज्यात कष्टच नाहीत ते फुकट,उद्योगावाचून राहाणें निव्वळ गलेलठ्ठपणाच होय.(आधी उदंड कष्ट आणि मग मोठें फळ असा नियम आहे ज्यात कष्टच नाहीत त्यांचे फळही शून्यच,साक्षेप-उद्योग -न करितां गलेलठ्ठपणा काय कामाचा ?)

लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे । जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥ २१ ॥

अनेक लोकांना पारखावें व त्यांची योग्यता ओळखावी आणि त्यांना वरचेवर तपासून त्यांच्या योग्यतेप्रमाणें त्यास जवळ किंवा दूर करावें,बारकाईनें लोक परीक्षून ज्याच्या त्याच्या अधिकाराप्रमाणें,त्याला जवळ किंवा दूर ठेवावे)

अधिकारपरत्वें कार्य होतें । अधिकार नस्तां वेर्थ जातें । जाणोनि शोधावीं चित्तें । नाना प्रकारें ॥ २२ ॥

अधिकाराप्रमाणें (लोकांच्या हातून) कार्ये होत असतात,अधिकार आंगी नसला तर व्यर्थ जातें (ते ते कार्य होत नाही),हे लक्षांत आणून अनेक प्रकारांनी लोकांच्या अंतःकरणाची पारख करुन ठेवावी (मनुष्यांचे अधिकार-योग्यता,कर्तृत्व-पाहात असावें)

अधिकार पाहोन कार्य सांगणें । साक्षेप पाहोन विश्‍वास धरणें । आपला मगज राखणें । कांहीतरी ॥ २३ ॥

( मगज - महत्व )

अधिकार पाहून कार्य सांगावें,उद्योगशीलता पाहून विश्र्वास ठेवावा आणि आपला बोज (वजन,महत्व) काहीतरी राखावा.(अधिकारपाहून योग्य तें काम सांगावें,उद्योग किंवा व्याप पाहून विश्र्वास ठेवावा,आपले महत्व राखून कार्य करुन घ्यावें)

हें प्रचितीचें बोलिलें । आधीं केलें मग सांगितलें । मानेल तरी पाहिजे घेतलें । कोणीयेकें ॥ २४ ॥

ह्या अनुभवाच्या गोष्टी सांगितल्या आहेत (समर्थ म्हणतात) अगोदर मी स्वतः ह्याप्रमाणे केले आहे व मग सांगितले आहे,ज्या कोणाला पटेल त्यांनी ग्रहण करावें (मानेल तर कोणी तरी घ्यावें.)

महंतें महंत करावे । युक्तिबुद्धीनें भरावे । जाणते करून विखरावे । नाना देसीं ॥ २५ ॥

महंतानें आपल्यासारखे दुसरे महंत करुन त्यांना युक्ति,बुध्दि शिकवून शहाणें करावें आणि अनेक देशांत अनेक स्थळी महंती करावयास पाठवावें.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निस्पृह वर्तणूक निरूपणनाम समास दहावा ॥**

**॥ दशक अकरावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक बारावा - विवेकवैराग्यनाम

समास १.विमळलक्षण(६७६-६८०)२.प्रत्ययनिरुपण (६८०-६८५) ३. भक्तिनिरुपण (देवभक्तिनिरुपण) (६८५ - ६९०)४.विवेकवैराग्य (६९०-६९३)५. आत्मनिवेदन(६९३-६९७) ६.सृष्टीक्रम(६९७ -७०१) ७.विषयत्याग(७०१ -७०६) ८.काळरूप(७०६-७११) ९. यत्नसिकवण (यत्न निरुपण)(७११-७१६) १०. उत्तमपुरुष (७१६-७२२)

**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक बारावा : विवेकवैराग्य**

**समास पहिला : विमळ लक्षण ॥ श्रीराम ॥**

आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावें परमार्थविवेका । येथें आळस करूं नका । विवेकी हो ॥ १ ॥

अगोदर नीट (शास्त्रोक्त पध्दतीने),प्रपंच करावा व परमार्थाचा विचार (आत्मप्राप्तीस्तव सद्गुरुस शरण जावें) मग करावा,अहो विचारी लोक हो,ह्याविषयी मात्र आळस करु नयें (आधीं प्रपंच नेटका-धड,शिस्तीचा-करावा आणि मग परमार्थ,विवेक स्वस्थ चितानें पाहावा,विवेकी स्त्रीपुरुष हो! ह्यांत हयगय करु नका)

प्रपंच सांडून परमार्थ कराल । तेणें तुम्ही कष्टी व्हाल । प्रपंच परमार्थ चालवाल ।तरी तुम्ही विवेकी ॥२॥

प्रपंच टाकून देऊन नुसत्या परमार्थाला तुम्ही लागाल तर तुम्हाला दुःख होईल,प्रपंच व परमार्थ हे दोन्ही तुम्ही साधाल तर तुम्ही खरे विवेकी (प्रपंचाकडें दुर्लक्ष करुन परमार्थ करु म्हणाल तर कष्ट पावाल,प्रपंच व परमार्थ दोन्ही चालवाल तर तुम्ही विवेकी खरे)

प्रपंच सांडून परमार्थ केला । तरी अन्न मिळेना खायाला । मग तया करंट्याला । परमार्थ कैंचा ॥ ३ ॥

( करंट्याला - भाग्यहीन )

प्रपंच सोडून परमार्थ कोणी केला,तर त्यास खायला अन्न मिळणार नाही,मग त्या भिका-यास परमार्थ कोठून होणार ?(आणि मग आपल्या विक्षिप्त चित्त करंट्याचे परमार्थाकडे लक्ष तरी कसें लागावें)

परमार्थ सांडून प्रपंच करिसी । तरी तूं येमयातना भोगिसी । अंतीं परम कष्टी होसी । येमयातना भोगितां ॥ ४ ॥

( उलटपक्षी परमार्थाची हेळसांड करुन प्रपंचातच डोके खुपसून राहाल,तर अंतीं यमयातनेचे परम कष्ट भोगावे लागतील) परमार्थ सोडून प्रपंच करशील,मग तुला यमयातना भोगाव्या लागतील आणि त्या भोगताना शेवटी तुला फार फार दुःख होईल.

साहेबकामास नाहीं गेला । गृहींच सुरवडोन बैसला । तरी साहेब कुटील तयाला । पाहाती लोक ॥ ५ ॥

( साहेबकाम  - मालकाचे काम , सुरवडोन - आळसाने )

धन्याच्या कामाला न जाता घरांतच चैनीने बसून राहिला तर त्याला धनी शिक्षा करील व फजितवाडा इतर लोक पाहातील.(आपल्या मालकाच्या,वरिष्ठाच्या (साहेब) कामास गेला नाही,सुखानें सुस्तावून घरीच पडला तर (धनी) चांगला चोप देतो.हे प्रत्यक्ष आहे.

तेव्हां महत्वचि गेलें । दुर्जनाचें हासें जालें । दुःख उदंड भोगिलें । आपुल्या जीवें ॥ ६ ॥

त्यावेळी मोठेपणा (धन्यापाशीं पत) जाऊन टवाळ लोक हसू लागतात(दुर्जनांकडून झालेल्या कुचाळ्या ऐकून घ्याव्या लागतात) आणि स्वतःलाही फार दुःख भोगावे लागतें,

तैसेचि होणार अंतीं । म्हणोन भजावें भगवंतीं । परमार्थाची प्रचिती । रोकडी घ्यावी ॥ ७ ॥

(देवाचें भजन न केल्यास) शेवटी तसेंच होईल,म्हणून परमेश्र्वराचे भजन करावे आणि परमार्थाचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा.

संसारीं असतां मुक्त । तोचि जाणावा संयुक्त । अखंड पाहे युक्तायुक्त । विचारणा हे ॥ ८ ॥

( संयुक्त - खरा साधक )

संसारात असतांनाच (पद्मपत्रमिवाम्भसा) जो मुक्त आहे तोच खरा संयुक्त म्हणजें परमेश्र्वराशीं ऐक्य पावला आहे (योगी) असें समजावें,कारण युक्त काय व अयुक्त काय ह्याचा विचार (आत्मानुसंधान) तोच नित्य ठेऊ शकतो.

प्रपंची तो सावधान । तो परमार्थ करील जाण । प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थीं खोटा ॥ ९ ॥

अशाप्रकारे जो प्रपंचात सावधपणानें (दक्षतेनें) वागेंल तोच परमार्थ करील आणि प्रपंचात जो खोटा तो परमार्थातही खोटाच होय.(म्हणून निजात्मतत्वीं सावध असेंल तोच परमार्थ करील व त्याचा संसार नेटका होतो,ह्याप्रमाणे ज्याचा प्रपंच नेटका त्याचा परमार्थही नेटका व ज्याचा प्रपंच धड नाही त्याचा परमार्थही खोटा.

म्हणौन सावधपणें । प्रपंच परमार्थ चालवणें । ऐसें न करिता भोगणें । नाना दुःखें ॥ १० ॥

ह्यास्तव परमार्थ व प्रपंचही दक्षतेंने चालवावें,असे न केल्यास अनेक दुःखे भोगावी लागतील (म्हणून स्वरुपी सावध राहून संसाराचे खरे रुप जाणून प्रपंच व परमार्थ त्यांनी सावधपणें साधावें.असे न केल्यास नाना दुःखे भोगावी लागतात)

पर्णाळि पाहोन उचले । जीवसृष्टि विवेकें चाले । आणि पुरुष होऊन भ्रमले । यासी काय म्हणावें ॥ ११ ॥

पानावरची (उंटाची) आळी (यःकश्र्चित् आळी,पर्णाळी,तृणजलूका पुढचा आश्रय आहे असें पुढच्या पायांने चांचपून पाहून सुरक्षित जागा आहे असें पाहून मग मागील पाय पुढें टाकण्यासाठी उचलतें,अशाप्रकारें कृमिकीटकसुध्दां मागील पुढील विचार करुन वागत असतात आणि पुरुष होऊन भ्रमांत पडतात ह्याला काय म्हणावें ?(आणि शहाणें सुर्ते लोक भ्रमांत राहून संसार करितात-आणि संसार नेटका झाला असे मानतात- ह्याला काय म्हणावें ?)

म्हणौन असावी दीर्घ सूचना । अखंड करावी चाळणा । पुढील होणार अनुमाना । आणून सोडावें ॥ १२ ॥

( दीर्घ सूचना - दूरदृष्टीने , चाळणा - अंदाज )

ह्यासाठी (दिर्घ सूचना) दुरदर्शीपणा असावा,नित्य विचार करावा व पुढे होणा-या गोष्टींविषयी अगोदरच अनुमान करुन ठेवावें,(दीर्घ सूचना पाहिजें तर सार कोणतें,असार कोणतें ?ह्याचा विचार-अखंड चाळणा-ठेवली पाहिजें म्हणजें पुढें होणा-या गोष्टी जाणून सिध्दांत बसला पाहिजें)

सुखी असतो खबर्दार । दुःखी होतो बेखबर । ऐसा हा लोकिक विचार । दिसतचि आहे ॥ १३ ॥

जो दक्ष (सावध खबरदार) असतो तो सुखी असतो व बेसावध वागतो तो दुःखी होतो,असा लौकिकातला विचार स्पष्टच दिसतो आहे.(गैरसावध मनुष्य दुःखी होतो हे तर व्यवहारांतही दिसतें)

म्हणौन सर्वसावधान । धन्य तयाचें महिमान । जनीं राखे समाधान । तोचि येक ॥ १४ ॥

म्हणून सदासर्वकाळ व सर्वत्र सावधपणानें जो वागेल त्यांचे महात्म्य थोर होय, तोच धन्य होय.तोच एकटा लोकांत समाधान होईल असे वागेल (म्हणून प्रपंच व परमार्थ जो सावधपणानें करितो तो धन्य होय,आत्महित साधून जनांचे समाधान त्याला साधता येते.)

चाळणेचा आळस केला । तरी अवचिता पडेल घाला । ते वेळे सावरायाला । अवकाश कैंचा ॥ १५ ॥

( अवचिता - अचानक )

चालना (विचार,शोध ) करण्याचा आळस केला तर अकस्मात घाला येऊन पडेल आणि त्यावेळी आवराआवर करायला वेळ कोठून सापडणार ? (चाळणेंचा विचार केला म्हणजें सारासार विचारानें असाराचा त्याग व सारभूत ब्रह्मवस्तूंचा अंगीकार केला नाही.तर मृत्यूसारखा महाप्रसंग पडला असता सावरावयाला कोण येईल ?)

म्हणौन दीर्घसूचनेचे लोक । त्यांचा पाहावा विवेक । लोकांकरिता लोक । शाहाणे होती ॥ १६ ॥

म्हणून दुरदृष्टीनें वागणा-या लोकांचा विचार पाहात असावें,एकाचें (उदाहरण) पाहूनंच दुसरे लोक शहाणे होत असतात.(म्हणून दूरदर्शी लोकांचा विवेक पाहावा,परमार्थी मन ठेऊन ते प्रपंच कसा करितात तें पाहावें म्हणजें एकाचे पाहून एक शहाणा,ह्या न्यायानें तसेंच वागता येते.)

परी ते शाहाणे वोळखावे । गुणवंताचे गुण घ्यावे । अवगुण देखोन सांडावे । जनामधें ॥ १७ ॥

पण ते शहाणे (परमार्थी लक्ष ठेऊन प्रपंच करणारे) कोण हें ओळखावें,गुणवान असतील त्यांचे सद्गुण घ्यावें,सामान्य लोकांमध्ये अवगुण इ्ष्टीस पडलें तरी त्यांकडे दुर्लक्ष करावें (असो,शहाणे लोक ओळखावें-परमार्थी सावध राहून प्रपंचही दक्षतेंने करणारे पाहावेत त्यांचे सद्गुण घेऊन त्यांना अनुसरावें,सामान्य जगांत दोष असतील त्यांकडे लक्ष देऊं नयें)

मनुष्य पारखूं राहेना । आणि कोणाचें मन तोडीना । मनुष्यमात्र अनुमाना । आणून पाहे ॥ १८ ॥

मनुष्याची पारख केल्याशिवाय शहाणा राहात नाही.(बिनचूक यथार्थ जाणतो) पण मन मात्र कोणाचेही मोडीत नाही,प्रत्येक मनुष्याच्या स्थितीचें अनुमान करुन ठेवतो.

दिसे सकळांस सारिखा । पाहातां विवेकी नेटका । कामी निकामी लोकां । बरें पाहे ॥ १९ ॥

(तो सर्वांना सारखा दिसतो पण त्याचा विवेक पाहाल तर तो चोख असतो) दिसण्यात सर्वांना सारखा दिसतो,पण नीट पाहू लागले असता चांगला विचारशील असतो,कामाचें (उपयोगी) कोण व निकामी (निरुपयोगी लोक) कोण हे नीट ओळखून ठेवातो.(कामी उद्योगी,कामाला लागण्यासारखा कोण,निकामी आळशी,रिकामटेकडा कोण हे तो जाणून दोघांचे हितच करीत असतो.)

जाणोन पाहिजेत सर्व । हेंचि तयाचें अपूर्व । ज्याचे त्यापरी गौरव । राखों जाणे ॥ २० ॥

प्रत्येकाचे बरवाईट गुण ओळखून,सर्वांनाच जवळ करतो व प्रत्येकाचा मान त्याच्या योग्यतेप्रमाणें कसा ठेवावा हें त्यास कळतें,हेंच त्याच्या ठिकाणी मोठे अपूर्व असतें,(अशा दूरदर्शी शहाण्यांप्रमाणें ज्याला सर्वसावध राहांता येंते त्याचाच प्रपंच नेटका होतो.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विमळलक्षणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : प्रत्ययनिरूपण ॥ श्रीराम ॥**

ऐका संसारासी आले हो । स्त्री पुरुष निस्पृह हो । सुचितपणें पाहो । अर्थांतर ॥ १ ॥

( अर्थांतर - वेगळे प्राप्तव्य - जे मिळवायचे ते )

जन्म घेऊन संसाराला आलेल्या म्हणजें प्रापंचिक (संसारी) स्त्रीपुरूष व निःस्पृह (विरक्त) लोक हो! मी काय म्हणतो ते ऐका व सावधपणानें अर्थ पाहा (अर्थाचे मनन करुन पाहा)

काये म्हणते वासना । काये कल्पिते कल्पना । अंतरींचे तरंग नाना । प्रकारें उठती ॥ २ ॥

अंतःकरणांत अनेक प्रकारचे तरंग उठत असतात,त्यात वासना काय म्हणत असतें (मागतें) ?कल्पनेच्या लहरी काय येतात ?(वासनेचें,कल्पनेंचे अनंतरंग चित्तावर उठत असतात)

बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । मनासारिखें असावें । सकळ कांहीं ॥ ३ ॥

खायला,प्यायला चांगलें असावें,चांगले अलंकार घालावें,चांगलीं वस्त्रे नेसावी,सगळे काही मनासारखे निटनेटके असावें (ह्या सर्व गोष्टी अगदी मनासारख्या व्हाव्या असें तुम्हाला मनापासून वाटतें)

ऐसें आहे मनोगत । तरी तें कांहींच न होत । बरें करितां अकस्मात । वाईट होतें ॥ ४ ॥

असा मनांतील हेतु असतो पण तसें काहीच घडून येत नाही, बरें करायला जावें तर अकस्मात वाईटच होते,असा तुम्हाला अनुभव आहें)

येक सुखी येक दुःखी । प्रत्यक्ष वर्ततें लोकीं । कष्टी होऊनियां सेखीं । प्रारब्धावरी घालिती ॥ ५ ॥

(असें का होते,ह्यांत आपला दोष आहे की काय ह्याचा विचार केला पाहिजे) कोणी सुखी कोणी दुःखी असा प्रकार जगांत प्रत्यक्ष चालतो (असे व्यवहारात आपण नित्य पाहातो)(त्याचे वास्तविक कारण न कळल्यामुळें अनेकजण) दुःखे भोगभोगून त्याचा दोष शेवटी आपल्या प्रारब्धाला देतात.

अचुक येत्न करवेना । म्हणौन केलें तें सजेना । आपला अवगुण जाणवेना । कांहीं केल्यां ॥ ६ ॥

( अचुक येत्न करवेना - बिनचूक प्रयत्न न होणे )

(पण समर्थ सांगतात यत्न करण्यांत कोठेतरी चुका होतात म्हणून केलेले काम यशस्वी होत नाही आणि आपल्या चुकांचा दोष टाळण्यासाठी म्हणा किंवा स्वतःचे दोष उमगत नाहीत म्हणून म्हणा,हे लोक प्रारब्धाला नावें ठेवतात) बिनचूक प्रयत्न करतां येत नाही,म्हणून केलेले काम यशस्वी होत नाही,काही केले तरी आपला दोष आपल्या ध्यानीं येत नाही,

जो आपला आपण नेणे । तो दुसर्याचें काये जाणे । न्याये सांडितां दैन्यवाणे । होती लोक ॥ ७ ॥

ज्याला स्वतःचा दोष कळत नाही,त्यास दुस-याचें काय समजणार ? न्याय सुटल्यामुळे लोक अगदी दीन होतात (ज्याला स्वतःचेच दोष कळत नाहीत तो दुस-याचे काय जाणणार ? न्याय सोडील त्याच्या कपाळी दैन्य हे ठेवलेलेंच,नियम सोडून वागणा-यास दैन्य प्राप्त झाले तर त्यांत नवल नाही)

लोकांचे मनोगत कळेना । लोकांसारिखें वर्तवेना । मूर्खपणें लोकीं नाना । कळह उठती ॥ ८ ॥

लोकांच्या मनांतील हेतु समजत नाही,लोकांसारखें वागता येत नाही,आणि ह्याच्या मूर्खपणामुळे (लोकांत) अनेक भांडणें-अनेक मतें व अनेक पक्ष होतात.

मग ते कळो वाढती । परस्परें कष्टी होती । प्रेत्न राहातां अंतीं । श्रमचि होयें ॥ ९ ॥

( कळो - कलह )

(उभयपक्षीं कलह वाढत जातात,दोन्ही पक्ष दुःख पावतात,दोघांचे प्रयत्न शिथिल होतात व शेवटी दोन्ही कष्टी होतात) मग ते तंटे वाढत जाऊन उभयपक्षीं दुःख पावतात,प्रयत्न थकला कीं शेवटी कष्टच सोसावें लागतात.

ऐसी नव्हे वर्तणुक । परिक्षावे नाना लोक । समजलें पाहिजे नेमक । ज्याचें त्यापरी ॥ १० ॥

अशी वागणूक (वागण्याची पध्दति) नसावी,अनेक लोकांची चांगली पारख करावी आणि ज्याच्या त्याच्या परी नीट समजून घेऊन वागता आले पाहिजे.(लोकांत वागण्याची ही पध्दत नव्हे,अनेक प्रकारचें लोक व त्यांचे मनोभाव आणि स्वभावविशेष कळलें पाहिजेत,ज्यांचे त्यापरी वागता आले पाहिजे)

शब्द परीक्षा अंतरपरीक्षा । कांहीं येक कळे दक्षा । मनोगत नतद्रक्षा । काय कळे ॥ ११ ॥

( दक्षा - सावध माणसास , नतद्रक्षा - बेसावध,खोडकर )

दक्ष असेल त्याला शब्दपरीक्षा,अंतरपरीक्षा इत्यादि द्वारांनी काहीतरी कळेल,पण करंट्याला दुस-याच्या मनांतील हेतु काय समजणार ?(अनेकांचे मनोगत कळून तदनुसार ज्याचे त्यापरी वागता आले पाहिजे,हें ज्याला साधतें त्याचें यत्न यशस्वी होऊन तो सुखी होतो,हे साधत नाही तो अर्थातच दुःखी होतो)

दुसर्यास शब्द ठेवणें । आपला कैपक्ष घेणें । पाहों जातां लोकिक लक्षणें । बहुतेक ऐसीं ॥ १२ ॥

( शब्द ठेवणें - दोष ठेवणे, कैपक्ष - बाजू घेणे, आपलेच बरोबर असा दुराग्रह )

लौकीक लक्षण-जगांतला प्रकार पाहूं गेलें असता दुस-यावर(किंवा दुस-या पक्षावर) दोष ठेऊन आपला (किंवा आपल्याचा) कैवार घ्यावा असाच बहुतेक असतो,

लोकीं बरें म्हणायाकारणें । भल्यास लागतें सोसणें । न सोसितां भंडवाणें । सहजचि होये ॥ १३ ॥

( भंडवाणें - फजिती )

(पण सर्वाकडून भले म्हणून घेणा-याला सोसावें लागतें,सोसलें नाही तर कलह-उद्वेग-भंडवाणें उत्पन्न होतात) लोकांनी आपल्याला चांगले म्हणावें म्हणून भल्या माणसाला झीज सोसावी लागतें,न सोसल्यास फजितवाडा सहजच होतो.

आपणास जें मानेना । तेथें कदापि राहावेना । उरी तोडून जावेना । कोणीयेकें ॥ १४ ॥

जेथें आपले पटत नाही तेथें माणसाला राहावत नाही,पण (उरी) भिड तोडून जाववतही नाही.

बोलतो खरें चालतो खरें । त्यास मानिती लहानथोरें । न्याये अन्याये परस्परें । सहजचि कळे ॥ १५ ॥

तथापि ज्याचें बोलणें,चालणें खरेपणाचें असतें त्यास (पक्षभेदाचा त्रास होत नाही, कां की) त्याला लहानथोर सारखाच मान देत असतात,आणि न्यायाचा किंवा अन्ययाचा पक्ष कोणता हे परभारे पण सहजच लोंकांना कळून येते.

लोकांस कळेना तंवरी । विवेकें क्ष्मा जो न करी । तेणेंकरितां बराबरी । होत जाते ॥ १६ ॥

लोकांना ह्याचें महत्व (खरेपणा) कळत नाही,तोपर्यंत हा विवेक करुन क्षमा करणार नाही,तर त्यामुळे त्यांची इतर सामान्य लोकांशी बरोबरी होईल.(लोकांना कळत नाही,तोंवर विवेक करुन क्षमाशीलपणा धरिला पाहिजे,न धरल्यास बरोबरी होते)

जंवरी चंदन झिजेना । तंव तो सुगंध कळेना । चंदन आणि वृक्ष नाना । सगट होती ॥ १७ ॥

चंदन जोंपर्यंत झिजणार नाही तोपर्यंत त्याचा सुगंध लोकांस कळणार नाही,चंदन व (बोरी,बाभळी) इतर वृक्ष सारखेच (सगट) मानले जातील.

जंव उत्तम गुण न कळे । तों या जनास काये कळे । उत्तम गुण देखतां निवळे । जगदांतर ॥ १८ ॥

जोपर्यंत ह्यांचे उत्तम गुण लोकांस कळत नाहीत तोपर्यंत लोकांस ह्याची परीक्षा कशी होणार ? ह्याचा उत्तम गुण प्रकट झाला कीं ह्याजविषयीं लोकांची अंत:करणें शुध्द होत जातात (लोकांना उत्तम गुण कळलें नाहीत तर कोणाचेंही महत्व वाटतं नाहीं, उत्तम गुण कळल्यावर सर्वांची मने शांत होतात)

जगदांतर निवळत गेलें । जगदांतरी सख्य जालें । मग जाणावें वोळले । विश्वजन ॥ १९ ॥

(लोकांची मनें निवळत गेली,लोकांच्या मनांत ह्याच्याविषयीं आदरयुक्त प्रेम उत्पन्न झालें म्हणजें मग सारे लोक वश होतात.) अशा प्रकारें जगाचें अंत:करण शुध्द होत जाऊन जगदंतराशी म्हणजें अंतरात्म्याशी ह्याचे सख्य झालें कीं सर्व लोक त्यास अनुकूल आहेत असे समजावें.

जनींजनार्दन वोळला । तरी काये उणें तयाला । राजी राखावें सकळांला । कठीण आहे ॥ २० ॥

तात्पर्य,जनीं जनार्दन (जगाचा अंतरात्मा) असा प्रसन्न झाला तर मग त्याला काय कमी पडणार आहे ? ह्यासाठी सर्वांस राजी (संतुष्ट) राखावें पण तें कठिण आहे.(जनीं जनार्दन भरला आहे तो प्रसन्न झाल्यावर मग उणें काय ?असें सर्वांना राजी राखता येणें कठिण आहे)

पेरिलें तें उगवतें । उसिणें द्यावें घ्यावें लागतें । वर्म काढितां भंगतें । परांतर ॥ २१ ॥

( परांतर -  दुस-याचे अंतःकरण )

पेरले असेल तेंच उगवतें,किंवा उसनें जें घेतले किंवा दिले असेल तेंच द्यावें किंवा घ्यावें लागतें,त्याच न्यायाने दुस-याचे वर्म काढले तर त्यांचे मन दुखावतें.

लोकीकीं बरेपण केलें । तेणें सौख्य वाढलें । उत्तरासारिखें आलें । प्रत्योत्तर ॥ २२ ॥

जगामध्ये भलेपणाने वागले तर सुख वाढते (सर्व लोक सुखी होतात) जसे उत्तर द्यावें तसें प्रत्युत्तर मिळतें (तुमच्या भलेपणाची फेड लोक तुमच्याशी भलेंपणानें वागूनच करितात)

हें आवघें आपणांपासीं । येथें बोल नाहीं जनासी । सिकवावें आपल्या मनासी । क्षणक्षणा ॥ २३ ॥

हें सगळें आपणापाशींच आहे,ह्यांत लोकांकडे बोल नाही असे आपल्या मनाला वारंवार शिकवीत जावें,म्हणून (क्षणाक्षणाला आपल्या मनाला शिकवून शाहाणे करावें)(शांति क्षमा धरिल्यानें व भलेपणाने लोकाशीं वागल्यानें लोक वश होतात,चिणचिण करुन पक्षपातित्व केल्यानें कलह माजतात म्हणून भल्याने शांतीने सोसायला शिकलें पाहिजें,वादानें भेद मोडत नाहीत तर सोशिकपणानें,शांततेनें,सर्वांना पोटात घेऊन भेदातीत झाल्यानें लोक वश होतात,खरा कार्यकर्ता लोकनायक कसा असावा हें ह्या समासांत सांगितले आहे.)

खळ दुर्जन भेटला । क्षमेचा धीर बुडाला । तरी मोनेंचि स्थळत्याग केला । पाहिजे साधकें ॥ २४ ॥

(भलेपणाची ज्याच्यापाशी किंमत होत नाही अशा) एकाद्या दुष्ट दुर्जनाशीं गांठ पडली आणि (वेळेला आपली सहनशीलताही ढळू लागली )त्यास क्षमा करण्याइतके धैर्य न राहिले तर साधकानें काही न बोलताच त्या स्थळाचा त्याग करुन ऊठून चालतें व्हावें.(-तर भल्यानें मुकाट्यानें-मौने कलह करुन व कुभावनांचे बीज पेरुन-तेथून पाय काढावा म्ह.स्थलत्याग करावा)

लोक नाना परीक्षा जाणती । अंतरपरीक्षा नेणती । तेणें प्राणी करंटे होती । संदेह नाहीं ॥ २५ ॥

लोक अनेक परीक्षा करावयांचे जाणतात,पण दुस-याच्या अंत:करणाची परीक्षा कशी करावयाची हें जाणत नाहीत,त्यायोगें ते भिकारी होतात ह्यांत संशय नाहीं,(लोक अनेक विषयांत निष्णात-पारखी-असतात,पण परांतर पारखूं जाणत नाहींत म्हणून करंटे होतात,ह्यांत संशय नाही.)

आपणास आहे मरण । म्हणौन राखावें बरेंपण । कठिण आहे लक्षण । विवेकाचें ॥ २६ ॥

(हट्टाला पेटू नयें.) आपण (एक दिवस) मरणार आहो (व मागें सत्कीर्ति राहाणें उत्तम),म्हणून भलेपणा सांभाळावा,हे विवेकाचें काम फार कठिण असतें,(हे विवेकाचें काम आहें,हवें त्यास साधणारे नाही)

थोर लाहान समान । आपले पारिखे सकळ जन । चढतें वाढतें सनेधान । करितां बरें ॥ २७ ॥

( सनेधान - मैत्रीचे संबंध )

आपल्यापेक्षां लहान मोठे,बरोबरीचें,आपले किंवा परके कोणीही असोत त्या सर्व लोकांशी चढती वाढती मै्त्री करणें बरे (चढत्या वाढत्या स्नेहानें वागतां आले पाहिजे.)

बरें करितां बरें होतें । हें तों प्रत्ययास येतें । आतां पुढें सांगावें तें । कोणास काये ॥ २८ ॥

दुस-यास बरे केले तर आपलेंही बरे होतें,हा तर प्रत्यक्ष अनुभव आहे (भलेपणाने भलेपण वाढतें ही अनुभवसिध्द गोष्ट आहें,) आतां ह्या उपर कोणास काय अधिक सांगावें ?

हरिकथानिरूपण । बरेपणें राजकारण । प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटें ॥ २९ ॥

हरिकथा व अध्यात्मनिरुपण,तसेंच भलेपणाचें राजकारण (मुत्सदिपण) हे सर्व प्रसंग (देश,काल,स्थिति) पाहून करावें,प्रसंग ध्यानी न आणतां काही केल्यास ते निष्फळ होतें.

विद्या उदंडचि सिकला । प्रसंगमान चुकतचि गेला । तरी मग तये विद्येला । कोण पुसे ॥ ३० ॥

पुष्कळ विद्या शिकला आणि प्रसंगी कर्तव्य (प्रसंगानुसार वागणें) चुकत गेला,तर त्या विद्येला विचारता कोण ? (तर त्या विद्येचा उपयोग काय ?)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रत्ययनिरूपणनाम समास दुसरा ॥**

### समास तिसरा : भक्तनिरूपण ॥ श्रीराम ॥

पृथ्वीमधें बहुत लोक । तेंहि पाहावा विवेक । इहलोक आणि परलोक । बरा पाहावा॥ १ ॥

पृथ्वीवर पुष्कळ लोक आहेत (ह्या पृथ्वीवर बहुत मनुष्ये आहेत) माणसांची इहलोक (प्रवृत्ति) व परलोक (निवृत्ति) हें दोन्हीही कसे साधतील ह्याचा नीट विचार करावा.

इहलोक साधायाकारणें । जाणत्याची संगती धरणें । परलोक साधायाकारणें । सद्गुरु पाहिजे ॥ २ ॥

इहलोकाचें सार्थक करण्यासाठी (इहलोक साधण्यासाठी) जाणत्याची संगति धरावी व परलोकप्राप्तीसाठी सद्गुरुचरण सेवावे.

सद्गुरुसी पाय पुसावें । हेंहि कळेना स्वभावें । अनन्यभावें येकभावें । दोनी गोष्टी पुसाव्या ॥ ३ ॥

सद्गुरुना काय विचारावें हे ही कित्येकांस स्वभावतः (आपोआप) कळत नाही,अनन्य भक्तिने व एकनिष्ठेनें दोन गोष्टी त्यांस विचारावयाच्या असतात,

दोनी गोष्टी त्या कोण । देव कोण आपण कोण । या गोष्टींचे विवरण । केलेंचि करावें ॥ ४ ॥

त्या दोन गोष्टी कोणत्या म्हणाल तर एक देव कोण आहे व दुसरी आपण (भक्त) कोण आहो ह्या होत,ह्या दोन गोष्टींचें विवेचन (चर्चा) (एकदां केलेले असले तरी) पुनः पुन्हा करीत जावें.

आधीं मुख्य देव तो कोण । मग आपण भक्त तो कोण ।पंचीकर्ण माहावाक्यविवरण ।केलेंचि करावें ॥५॥

प्रथम मुख्य देव कोणता ह्याचा विचार करावा आणि नंतर आपण भक्त म्हणणारा कोण आहे ह्याचा शोध घ्यावा (तात्पर्य देव भक्तांचा विचार पुसावा) त्यासाठी पंचीकरण व महावाक्यें ह्यांची चर्चा करीत जावी.

सकळ केलियाचें फळ । शाश्वत वोळखावें निश्चळ ।आपण कोण का केवळ । शोध घ्यावा ॥ ६ ॥

शाश्र्वत निश्र्चळ परब्रह्म ओळखणें आणि आपण मुळी कोण आहों ह्याचा शोध घेणें,हेंच सर्व काही (साधनें) केल्याचे खरें फळ होंय (सर्व श्रमांचे साफल्य हेंच की निश्र्चळ शाश्र्वत परब्रह्म ओळखावें व आपण कोण ह्याचा शोध घ्यावा)

सारासार विचार घेतां । पदास नाहीं शाश्वतता । आधी कारण भगवंता । वोळखिलें पाहिजे ॥ ७ ॥

सार काय व असार काय ह्याचा विचार केला तर कोणत्याही पदार्थाला (इंद्रादिकांच्या पदास) शाश्र्वतपणा नाही,म्हणून प्रथम सर्वांस कारण (आदिकरण) जो भगवान त्यास ओळखले पाहिजें,(सार कोणते व असार कोणतें हें पाहाता पदार्थमात्र तितुका असार म्ह.अशाश्र्वत,ह्याला कारण,सारभूत भगवंत ह्याहून वेगळा आहे.)

निश्चळ चंचळ आणि जड । अवघा मायेचा पवाड । यामधें वस्तु जाड । जाणार नाहीं ॥ ८ ॥

( पवाड - विस्तार , जाड - सघन ब्रहम ते निश्र्चळ (जाड) , माया ती चंचळ व जगत ते जड )

निश्र्चळ (ब्रह्म),चंचळ (माया,अंतरात्मा) व जड (द्दश्य जग) हा सर्व प्रकार (पवाड,विस्तार) मायावी (लटका) आहे.(शाश्र्वत ब्रह्म ह्याहून निराळे आहे) ह्यापैकी परब्रह्म वस्तु साधन असून ती जाणारी म्हणजें अशाश्र्वत नाही.

तें परब्रह्म धुंडावें । विवेकें त्रैलोक्य हिंडावें । माईक विचार खंडावें । परीक्षवंतीं ॥ ९ ॥

त्या वस्तूची परिक्षा करणा-यांनी मायिक पदार्थांचे विचारानें खंडन करुन व विवेकाच्या योगानें त्रैलोक्यभर हिंडून त्या परब्रह्माचा शोध घ्यावा.

खोटें सांडून खरें घ्यावें । परीक्षवंतीं परीक्षावें । मायेचें अवघेचि जाणावें । रूप माईक ॥ १० ॥

मायेचे सगळेंच स्वरुप मिथ्या आहे हें लक्षात ठेऊन परीक्षकांनीं खोटे टाकून द्यावें आणि चांगल्या परीक्षेनें खरें (शाश्वत)असेंल तें घ्यावें.(पारखी लोक खोंटें टाकून खरें घेंतात,तसें विवेकी जन मायेंचे सारेंच मायिक जाणून शाश्र्वत ब्रह्म स्वीकारतात)

पंचभूतिक हे माया । माईक जाये विलया । पिंडब्रह्मांड अष्टकाया । नसिवंत ॥ ११ ॥

ही माया पंचभूतांची असून मायेंचे सगळें स्वरुप नाश पावणार आहे,पिंड व ब्रह्मांड ह्या दोहीचें मिळून असणारे आठही देह नाशवंत आहेत.

दिसेल तितुकें नासेल । उपजेल तितुकें मरेल । रचेल तितुकें खचेल । रूप मायेचें ॥ १२ ॥

जे दिसेल ते नासेल,जे उत्पन्न होईल तें मरेल,एवंच हे मायेचे रुप जेवढें उभारले जाईल,तेवढें सर्व खचेंल (बसेल)

वाढेल तितुकें मोडेल । येईल तितुलें जाईल । भूतांस भूत खाईल । कल्पांतकाळीं ॥ १३ ॥

जेवंढें वाढेल तेवढें मोडून जाईल,जे येईल ते जाईल (नाश पावेल),प्रलयकाळी एका भूतास खाऊन दुसरे भूत खाऊन (ग्रासून) टाकील (कल्पांती पृथिव्यादि भूतांचा एकमेकात लय होतो)

देहधारक तितुके नासती । हे तों रोकडी प्रचिती । मनुष्येंविण उत्पत्ति । रेत कैंचें ॥ १४ ॥

देहधारण करणारे जेवढें मनुष्य आहेत ते सर्व नाश पावतात (देहधारी सारे प्राणी नित्य मरताना आपण पाहातो) हा तर प्रत्यक्ष अनुभव आहे,पण (मूळचा) मनुष्य नसेल तर उत्पत्ति कशी होईल ?आणि वीर्य नसेल तर (मूळचा) मनुष्यदेह कोठचा ? (मनुष्याच्या रक्त-रेतापासून माणसाची उत्पत्ति होते हे ही स्पष्ट आहे.)

अन्न नस्तां रेत कैंचें । वोषधी नस्तां अन्न कैंचें । वोषधीस जिणें कैंचें । पृथ्वी नस्तां ॥ १५ ॥

अन्न नसेल तर वीर्य कोठून येईल ? वनस्पति नसतील तर अन्न कोठून उत्पन्न होईल ? पृथ्वी नसेल तर वनस्पति कशा जगतील ?

आप नस्तां पृथ्वी नाहीं । तेज नस्तां आप नाहीं । वायो नस्तां तेज नाहीं । ऐसें जाणावें ॥ १६ ॥

पाणी नसेल तर पृथ्वी होणार नाहीं,तेज नसेल तर आप (पाणी) नाही,वायु नसेल तर तेजही नाहीं असे जाणून घ्यावें.

अंतरात्मा नस्तां वायो कैंचा । विकार नस्तां अंतरात्मा कैंचा । निर्विकारीं विकार कैंचा । बरें पाहा ॥ १७ ॥

अंतरात्मा म्ह.आकाश नसेल तर वायु कोठून होईल? विकार-(अहंस्फुरण) नसेल तर अंतरात्मा कसा संभवेल?(अंतरात्मा हाही परब्रह्मी (एकोहं बहुस्याम।) हा विकार झाला नसता तर कोठून येता?) पण आधी,निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणी विकार संभवतो का हे पहा बरे!

पृथ्वी नाहीं आप नाहीं । तेज नाहीं वायो नाहीं । अंतरात्मा विकार नाहीं । निर्विकारीं ॥ १८ ॥

निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणीं पृथ्वी,आप,तेज,वायु,आकाश (अंतरात्मा) (पंचभूतांपैकी काहीएक) किंवा विकार (एकोऽहं स्फुरण) ह्यापैकीं काहीही नाही.

निर्विकार जें निर्गुण । तेचि शाश्वताची खूण । अष्टधा प्रकृति संपूर्ण । नासिवंत ॥ १९ ॥

जे निर्विकार व निर्गुण आहे,तेंच शाश्र्वत परब्रह्माचें लक्षण होय,त्याखेरीज बाकीची सर्व अष्टधा प्रकृति नाशवंत आहें,

नासिवंत समजोन पाहिलें । तों तें अस्तांचि नस्तें जालें । सारासारें कळों आलें । समाधान ॥ २० ॥

नाशवंत सृष्टीकडें ती नाशवंत आहे असें जाणून विवेकानें पाहिलें म्हणजें ती असून नसल्यासारखी होते आणि सारासार विचाराने शाश्र्वताचें समाधान मिळतें.

विवेकें पाहिला विचार । मनास आलें सारासार । येणेंकरितां विचार । सदृढ जाला ॥ २१ ॥

(सारासारविवेकाने हाच विचार द्दढ करावा)(पिंडातील) नित्यानित्यविवेक करून (ब्रह्मांडांतील) सारासारविचार पाहिला तेव्हा सार कोणतें व असार कोणतें हे मनाला पटलें आणि त्यामुळें शाश्र्वत ब्रह्माचा विचार (अंतःकरणात) द्दढ होत चालला.

शाश्वत देव तो निर्गुण । ऐसीं अंतरीं बाणली खूण । देव कळला मी कोण । कळलें पाहिजे ॥ २२ ॥

देव शाश्र्वत असून निर्गुण आहे,(शाश्र्वत ब्रह्म तो देव ) ही देवाच्या स्वरुपाची खूण अंतःकरणात बाणून गेली,अशाप्रकारे मुख्य देव कोणता हे कळलें,आतां मी कोण हे कळले पाहिजें.

मी कोण पाहिजे कळलें । देहतत्व तितुकें शोधिलें । मनोवृत्तीचा ठाईं आलें । मीतूंपण ॥ २३ ॥

मी कोण आहे हे कळावें म्हणून देहांतील एकूण एक तत्वांचा शोध केला तेंव्हा मी-तूंपणा हा मनोवृत्तीच्या ठिकाणी उत्पन्न होतो असे दिसून आलें (मीपण देहसंगानें उद्भवते.म्हणून देह कोणत्या तत्वांचा झाला हें पाहिलें तो मी-तूपणा हा मनाचा एक धर्म आहे कळलें)

सकळ देहाचा शोध घेतां । मीपण दिसेना पाहातां । मीतूंपण हें तत्वता । तत्वीं मावळलें ॥ २४ ॥

सगळ्या देहांचा शोध घेतला असता त्यांत मीपण कोठेही दिसत नाही. मी-तूपणा हा खरोखर तत्वांतच लय पावतो (तत्वे तत्वांत मिसळून गेल्यांवर मीपण काही सांपडले नाही)

दृश्य पदार्थचि वोसरे । तत्वें तत्व तेव्हां सरे । मीतूंपण हें कैंचें उरे । तत्वता वस्तु ॥ २५ ॥

सर्व दृश्य पदार्थांचे निरसन झाल्यावर एकूण एक तत्वांचा लय होतो,तेथे मी-तूपणा कोठून राहाणार ? केवळ ब्रह्ममयच ती स्थिती (सत्य वस्तु तेवढी उरली)

पंचीकर्ण तत्वविवरण । माहावाक्यें वस्तु आपण । निसंगपणें निवेदन । केले पाहिजे ॥ २६ ॥

पंचींकरण,तत्वविवरण व महावाक्यविचार ह्या तीन गोष्टीं झाल्या की आपण वस्तुरुप व्हावयाचें,ह्यासाठी (सर्व दृश्यभासादिकांचा संग टाकून देऊन) निःसंगपणे आत्मनिवेदन केले पाहिजें.

देवाभक्तांचे मूळ । शोधून पाहातां सकळ । उपाधिवेगला केवळ । निरोपाधी आत्मा ॥ २७ ॥

ह्याप्रकारें  देव व भक्त ह्यांच्या मूळाचा पक्का शोध घेतला असता उपाधिविरहित असा केवळ निरुपाधि असा आत्मा सर्वत्र दिसेल.

मीपण तें बुडालें । विवेकें वेगळेपण गेलें । निवृत्तिपदास प्राप्त जालें । उन्मनीपद ॥ २८ ॥

त्तत्वनिरसन झालें,त्यांत तत्वांबरोबर मग मीपण संपले,देवाभक्तांचा वेगळेपणा (जीव-शिव भेद) होता तोही विवेकाच्या योगानें नाहीसा झाला,सगळ्या वृत्तीची निवृत्ति (वृत्तिरहित पदप्राप्ति) होऊन मनाचें उन्मन झालें,

विज्ञानीं राहिलें ज्ञान । ध्येये राहिलें ध्यान । सकळ कांहीं कार्याकारण । पाहोन सांडिलें ॥ २९ ॥

विज्ञानामध्ये ज्ञान मुरलें,ध्येयामध्ये ध्यान लीन झालें,सर्व काही जरुरीपुरते पाहून टाकून दिले, (कार्यकारणविचारणा खुंटली)

जन्ममरणाचें चुकलें । पाप अवघेंचि बुडालें । येमयातनेचें जालें । निसंतान ॥ ३० ॥

जन्म व मरण हे चुकलें ( जन्ममरणांचे भय संपले ),सर्व (दृश्य) पाप (पुण्यही) नाहीसे झाले, यमयातनांचे निसंतान झाले (यमयातना निर्मूल झाल्या-चुकल्या)

निर्बंद अवघाचि तुटला । विचारें मोक्ष प्राप्त जाला । जन्म सार्थकचि वाटला । सकळ कांहीं ॥ ३१ ॥

विधि-निषेधाची सगळी बंधने तुटलीं,विवेकाने मोक्ष प्राप्त झाला आणि जन्माचें सर्व काही सार्थक झालेंसे वाटलें (जन्मसाफल्याचे समाधान झाले.)

नाना किंत निवारले । धोके अवघेचि तुटले । ज्ञानविवेकें पावन जालें । बहुत लोक ॥ ३२ ॥

अनेक संशयाचे निरसन होऊन धोके सगळे लयास गेले (कुतर्क संपले,संकटे गेलीं) अशा रीतीनें ज्ञान व विवेक ह्यांच्या योंगानें पुष्कळ लोक पावन झाले आहेत (अनेक जीव उध्दरले आहेत)

पतितपावनाचे दास । तेहि पावन करिती जगास । ऐसी हे प्रचित मनास । बहुतांच्या आली ॥ ३३ ॥

जे लोक पतितपावन श्रीरामाचें दास होतात तेही जगाला पावन करतात,असा हा अनुभव अनेकांच्या मनास पटला आहे. (परमात्मा पतितांना पावन करणारा आहे,त्याचें दासही पतितांना पावन करण्यास समर्थ होतात,ह्या गोष्टींची प्रचीति बहुतास आली आहेंच)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे भक्तनिरूपणनाम समास तिसरा ॥**

## समास चौथा : विवेकवैराग्यनिरूपण ॥ श्रीराम ॥

महद्भाग्य हातासी आलें । परी भोगूं नाहीं जाणितलें । तैसें वैराग्य उत्पन्न जालें । परी विवेक नाहीं ॥ १ ॥

एखाद्याला मोठे भाग्य प्राप्त झालें, पण त्याचा उपभोग घेण्याचें माहीत नसेल तर तें प्राप्त होऊनही उपयोग काय ? त्याचप्रमाणें वैराग्य उत्पन्न झालें पण विवेक नसल्याने (व्यर्थ) होतें (विवेकावाचूंन वैराग्यही निष्फळ होय.)

आदळतें आफळतें । कष्टी होतें दुःखी होतें । ऐकतें देखते येतें । वैराग्य तेणें ॥ २ ॥

( आफळतें - आपटते )

(घरांत कजाग बायकोनें) आदळआपट केली किंवा काही दुःख किंवा कष्ट झाले अथवा दुस-याच्या वैराग्याच्या गोष्टी पाहिल्या अगर ऐकल्या ( दुःखीकष्टी जीव पाहिले किंवा त्यांच्या अनंत यातनांच्या गोष्टी ऐकिल्या ),तर त्यामुळें वैराग्य उत्पन्न होते.(मनुष्य संसाराला विटतो)

नाना प्रपंचाच्या वोढी ॥ नाना संकटें सांकडीं । संसार सांडुनी देशधडी । होये तेणें ॥ ३ ॥

अनेक प्रकारच्या ओढी (प्रपंच्यातल्या हजारो ओढी),अनेक संकटें व अडचणी ह्यांत सांपडल्यामुळे संसार सोडून घरादाराचा त्याग करुन मनुष्य देशाधडी जातो (जोगी होतो)

तो चिंतेपासून सुटला । पराधेनतेपासुनि पळाला । दुःखत्यागें मोकळा जाला । रोगी जैसा ॥ ४ ॥

रोगी ज्याप्रमाणें (बरा झाला म्हणजें) दुःखमुक्त होतो,त्याप्रमाणे हाही (मनुष्य) प्रपंचाच्या काळजींतून सुटतो व लोकांच्या ताबेदारींतून मोकळा होतो (पण एवढ्याने भागत नाहीं)

परी तो होऊं नये मोकाट । नष्ट भ्रष्ट आणि चाट । सीमाच नाहीं सैराट । गुरूं जैसें ॥ ५ ॥

( मोकाट चाट सैराट - उनाड,चावट,बेभान )

(तो अर्नगळ (मोकाट),पापी,आचारशून्य,(भ्रष्ट),वात्रट(चाट) व मोकळ्या सुटलेल्या जनावराप्रमाणे अत्यंत उनाड असा न व्हावा म्हणून वैराग्याला विवेकाची जोड मिळाली पाहिजें ) पण त्याने स्वच्छंदी होऊ नयें जनावर मोकळे सुटले म्हणजें जसें सैरावैरा धांवते तसे त्यानें अर्मयाद होऊ नयें,आणि पाखंडी (नष्ट,खोटा),भ्रष्ट किंवा चावट होता कामा नयें.

विवेकेंविण वैराग्ये केलें । तरी अविवेकें अनर्थीं घातलें । अवघें वेर्थचि गेलें । दोहिंकडे ॥ ६ ॥

विवेकाशिवाय वैराग्य धारण केले तर अविवेकाच्या योगानें अनर्थ होतो,ना इहलोक ना परलोक असा दोन्हीकडें तो सर्वस्वीं वाया जातो (विवेकरहित वैराग्य म्हणजें जाणूनबुजून अनर्थपरंपरा ओढवून घेणें होय)

ना प्रपंच ना परमार्थ । अवघें जिणेंचि जालें वेर्थ । अविवेकें अनर्थ । ऐसा केला ॥ ७ ॥

(कां की  मग वैराग्य नाही  व विवेकही नाही),धड प्रपंचही नाही व परमार्थही नाही असे होऊन सारे आयुष्यच फुकट जातें (दोहींकडे जिणे व्यर्थ होतें) असा अनर्थ अविवेकामुळें ओढवतो (विवेक नसला म्हणजें असा अनर्थ होतों)

काम वेर्थचि ज्ञान बडबडिला । परी वैराग्ययोग नाहीं घडला । जैसा कारागृहीं अडकला।पुरुषार्थ सांगे ॥ ८ ॥

अथवा तुरूंगात अडकला असून आपल्या पराक्रमाचा बडेजाव सांगणा-याप्रमाणें आंगात वैराग्य (मुळींच) नसतां ज्ञानाच्या गप्पा मात्र व्यर्थ सांगतो. (किंवा शब्दशाश्त्र पुष्कळ पढला व सांगू लागला म्ह.थोडाफार विवेक बोलू लागला, पण चित्तांत वैराग्य नसलें तरी तें व्यर्थ होय,विषयांचा व प्रपंचाचा दास असलेल्या मनुष्याने दुस-यांस विवेक सांगणे़ं म्ह.बंदिवासात पडलेल्या पराधीन जीवाने आपल्या पराक्रमाच्या गोष्टी सांगण्यासारखें हास्यास्पद होय.)

वैराग्येंविण ज्ञान । तो वेर्थचि साभिमान । लोभदंभें घोळसून । कासाविस केला ॥ ९ ॥

( लोभदंभें - लोभ व दंभ , घोळसून - बरबटून )

वेराग्यावांचून ज्ञान असतें तें उगीचच अभिमानास कारण होतें (केवळ प्रौढी होय) लोभ व दंभ त्याला घुसळून कासावीस करीत असतात.

स्वान बांधलें तरी भुंके । तैसा स्वार्थमुळें थिंकें पराधीक देखों न सके । साभिमानें ॥ १० ॥

( थिंकें - चरफडतो, पराधीक - दुसऱ्यासा उत्कर्ष )

(लोभ,दंभाचा गुलाम बनलेला हा मूर्ख,साखळदंडाने) कुत्रें स्वतःबांधले असलें तरी दुस-यावर भुंकत असतें,त्याप्रमाणें स्वतः स्वार्थासाठी चरफडत असतो (थिंके),तरी पण स्वतःच्या अभिमानामुळे दुस-याचा उत्कर्ष त्याला पाहावत नाही.

हें येकेंविण येक । तेणें उगाच वाढे शोक । आतां वैराग्य आणि विवेक । योग ऐका ॥ ११ ॥

तात्पर्य,विवेक व वैराग्य ही एकाशिवाय एक असतील तर त्यामुळें उगीच शोक मात्र वाढतो,आतां विवेकाला वैराग्याची जोड असेल तर काय बहार होते ती ऐका.

विवेकें अंतरीं सुटला । वैराग्यें प्रपंच तुटला । अंतर्बाह्य मोकळा जाला । निःसंग योगी ॥ १२ ॥

विवेकाच्या योगानें अंतःकरणात (विकारांपासून) मोकळा होतो आणि वैराग्यामुळे बाहेरच्या प्रपंचाचा संबंध सुटतो.(विवेकाने आंतले बंध तुटतात व वैराग्यानें बाह्य प्रपंच सुटतो) अशाप्रकारे तो अंतर्बाह्य मोकळा होऊन निःसंग पुरुष खरा योगी बनतो.

जैसें मुखें ज्ञान बोले । तैसीच सवें क्रिया चाले । दीक्षा देखोनी चक्कित जाले । सुचिस्मंत ॥ १३ ॥

जसें तोंडानें ज्ञान बोलतो,तशीच त्याबरोबर स्वतः क्रियाही करीत असतो,त्यांचे आचरण पाहून पुण्यवान लोकसुध्दा चकित होतात (तो विचार करून बोलतो व बोलल्यासारखें वागतो,त्याची दिक्षा पाहूनच सदाचारी सज्जन संतोष पावतात)

आस्था नाहीं त्रिलोक्याची । स्थिती बाणली वैराग्याची । येत्नविवेकधारणेची । सीमा नाहीं ॥ १४ ॥

त्रैलोक्याची सुध्दा पर्वा नाही असे प्रखर वैराग्य त्याच्या आंगात बाणलेलें असतें आणि प्रयत्न विवेक व धारणा ह्यांस तर सीमाच राहात नाही,इतकी तीं वृध्दिंगत होतात.(त्रैलोक्याच्या राज्यापर्यंत कोणत्याही पदार्थाची लालसा नाही इतकें कडकडीत वैराग्य त्याच्या ठिकाणी बाणलेलें असतें,लोकोपकारक प्रयत्न,विवेक,धारणा हीं त्याच्यापाशीं निःसीम असतात)

संगीत रसाळ हरिकीर्तन । तालबद्ध तानमान । प्रेमळ आवडीचें भजन । अंतरापासुनी ॥ १५ ॥

संगीत व रसाळ असें हरिकीर्तन करावयाचें ,तालासुरांत आलाप (तानमान) वगेरे नीटनेटके घेऊन, अंतःकरणांपूर्वक भजन (देवाला) आवडेल असें करावयांचे.

तत्काळचि सन्मार्ग लागे । ऐसा अंतरीं विवेक जागे । वगत्रृत्व करितां न भंगे ।साहित्य प्रत्ययाचें ॥ १६ ॥

विवेक  अंत:करणांत इतका जागा असतो की (त्याचें भाषण) ऐकणा-यास तात्काळ सन्मार्ग लागतो आणि तो बोलू लागला तर अनुभवाच्या सामुग्रीचा (साधनाचा) भंग होत नाही (गायनयुक्त,प्रेमळ कीर्तन,तालासुराची उत्तम माहिती,तानमान,मनापासून निरपेक्ष भजन असा त्याचा कीर्तनाचा रंग व विवेक पाहून लोक तात्काळ परमार्थमार्गाला लागतात आणि त्याच्या वकृत्त्वाच्या भरांत अनुभवाची साधनें-साधनामार्ग मोडत नाहीत.)

सन्मार्गें जगास मिळाला । म्हणिजे जगदीश वोळला । प्रसंग पाहिजे कळला । कोणीयेक ॥ १७ ॥

सन्मार्गाने वागून जगाशी तद्रूप झाला (जनांच्या मनात भरला) की जगदीश प्रसन्न झाला म्हणून समजावें तथापि कोणताही प्रसंग (काय आहे तो) कळला पाहिजे.(पण ह्याला प्रसंगवेळ,तानमान सर्व काही कळले पाहिजें,)

प्रखर वैराग्य उदासीन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । स्नानसंध्या भगवद्भजन । पुण्यमार्ग ॥ १८ ॥

प्रखर (अचळ) वैराग्य, (सर्वकाळ) अलिप्तता (उदासीनता),निर्लोभ (निर्दंभ व निर्द्वंद्व स्थिती) अनुभवाचें मुरलेलें ब्रह्मज्ञान (असूनही स्नानसंध्या,भगवद्भजन इत्यादि पुण्यमार्गाचें आचरण (सदाचार))

विवेकवैराग्य तें ऐसें । नुस्तें वैराग्य हेंकाडपिसें । शब्दज्ञान येळिलसें । आपणचि वाटे ॥ १९ ॥

( हेंकाडपिसें - एककल्लीपणा,कंटाळवाणे )

(हें सर्व जेथें आहे तेथें विवेक व वैराग्य दोन्ही आहेत असे समजावें) विवेकयुक्त वैराग्य असे असतें,नुसतें वैराग्य एककल्लीपणाचें वेड होय,त्याचप्रमाणें नुसतें शब्दज्ञानही आपोआपच कंटाळवाणे वाटू लागतें (नुसतें वैराग्य म्हणजें हेकटपणा होय व नुसते शब्दज्ञान म्हणजें विवेकाच्या गोष्टी पांचट-येळील,शिळ्या होत.

म्हणौन विवेक आणि वैराग्य । तेंचि जाणिजे महद्भाग्य । रामदास म्हणे योग्य । साधु जाणती ॥ २० ॥

म्हणून विवेक वैराग्य दोन्ही असणें हेंच महद्भाग्य होय हें लक्षात ठेवावें,रामदास म्हणतात खरें साधु असतात त्यांस हे माहीत आहें(विवेक वैराग्य संपन्न असा पुरूषच दैवाचा पुतळा होय हें सर्व खरे सत्पुरुष जाणत असतात)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विवेकवैराग्यनिरूपणनाम समास चौथा ॥**

**समास पांचवा : आत्मनिवेदन ॥ श्रीराम ॥**

रेखेचें गुंडाळें केलें । मात्रुकाक्षरीं शब्द जाले । शब्द मेळऊन चाले । श्लोक गद्य प्रबंद ॥ १ ॥

रेघेचे (रेषांचे) गुंडाळे करुन व त्यांत स्वर-व्यंजनादि घालून अक्षर बनतें व (अनेक) अक्षरांचें शब्द होतात,ते शब्द एकत्र करुन श्लोक,गद्य,काव्यें (निबंध) इत्यादि होतात (शब्दांच्या पुढें गद्यपद्यादि प्रकार होतात)

वेदशास्त्रें पुराणें । नाना काव्यें निरूपणें । ग्रंथभेद अनुवादणें । किती म्हणोनि ॥ २ ॥

वेद,शास्त्रें,पुराणें,अनेक नानाविध काव्यें,निरुपणें असे ग्रंथांचे भेद किती म्हणून सांगावें ?

नाना ऋषी नाना मतें । पाहों जातां असंख्यातें । भाषा लिपी जेथ तेथें । काये उणें ॥ ३ ॥

अनेक ऋषींची अनेक मते आहेत,ती पाहू लागले तर असंख्य आहेत,जेथे भाषा व लिपि आहे तेथे काय कमी आहे ?

वर्ग ऋचा श्रुति स्मृति । अधे स्वर्ग स्तबक जाती । प्रसंग मानें समास पोथी । बहुधा नामें ॥ ४ ॥

( ऋचा - श्लोक , अधे स्वर्ग स्तबक - अध्याय, सर्ग,चम्पू )

वर्ग (ऋग्वेदातील अध्यायांचे पोटभेद ),ऋचा(वेदांतील मंत्र),श्रुति,स्मृति,(अधे) अध्याय,सर्ग,स्तवक (चंपुश्रादिकरुन ग्रंथातील भाग),जाति,प्रसंग,मानें,समास,पोथी अशी ग्रंथ-विभागांची पुष्कळ नांवे आहेत.

नाना पदें नाना श्लोक । नाना बीर नाना कडक । नाना साख्या दोहडे अनेक । नामाभिधानें ॥ ५ ॥

( बीर कडक - हिंदी भाषेतील छंद )

अनेक पदें,श्र्लोक,वीर व कडक (हिंदुस्थानी भाषेतील छंद),साक्या,दोहें (दोहडे,दोहरे) अशी अनेक नांवे आहेत.

डफगाणें माचिगाणें । दंडिगाणें कथागाणें । नाना मानें नाना जसनें । नाना खेळ ॥ ६ ॥

डफगाणें,माची (ढोलके) गाणें,दिंडिगांणें,कथेंतील गाणें (इत्यादि गायनप्रकार तानमानाप्रमाणें खेळांप्रमाणे नानाविध आहेत)अनेक प्रमाणें,अनेक (जसनें) आडकथा,अनेक खेळ.

ध्वनि घोष नाद रेखा । चहुं वाचामध्यें देखा । वाचारूपेंहि ऐका । नाना भेद ॥ ७ ॥

ध्वनी,घोष,नाद व रेखा असें चार वाणींचे चार भेद आहेत ते पाहा (हे चारी वाणीत आहेंत) वैखरीचेही अनेक भेद आहेत ते ऐका (ध्वनी,घोष,नाद व रेषा हें चार वाणींतील चार भेद ,वाचा म्हणजें वैखरी-रुपानें हे प्रगट होतात)

उन्मेष परा ध्वनि पश्यंति । नाद मध्यमा शब्द चौथी । वैखरीपासून उमटती । नाना शब्दरत्नें ॥ ८ ॥

( उन्मेष परा ध्वनि पश्यंति नाद मध्यमा शब्द - उन्मेष हे स्फुरण, स्पुर्ती हि परा वाचा, ध्वनि पश्यंति वाचा , नाद मध्यमा , शब्द वैखरीपासून )

पराउन्मेष म्हणजें ज्ञानरुप (परा वाणीच्या ठिकाणी उन्मेष म्ह.स्फुरण),पश्यन्ती ध्वनिरुप,मध्यमा,नादरूप व वैखरी शब्दरुप चौथी वाणी होय.(वैखरीच्या ठिकाणीं नाना रेषा व त्यापासून अनेक शब्दरुप रत्ने प्रकट होतात)

अकार उकार मकार । अर्धमात्राचें अंतर । औटमात्रा तदनंतर । बावन मात्रुका ॥ ९ ॥

( अ,उ,म आणि बिंदू हि अर्धमात्रा अशा साडेतीन व अ आ इ ई उ ऊ ए ऐ ओ औ अं अः ऋ ॠ लृ लृ असे **१६ स्वर** आणि क ख ग घ ङ. च छ ज झ ञ ट ठ ड ढ ण त थ द ध न प फ ब भ म य र ल व श ष स ह ळ क्ष ज्ञ अशी **३६ व्यंजने** = ५२ मातृका )

अ,उ,म ह्या तीन व (ँ) बिंदु ही अर्धी मिळून साडेतीन मात्रा म्हणजें ॐ व त्यापासून पुढें अ पासून ज्ञ पर्यंतचे ५२ वर्ण झाले (अकार,उकार.मकार,अर्धमात्रा मिळून साडेतीन-औट-मात्रा- व त्यांपासून-ओकारांपासून पुढें ५२ माृत्रा-मात्रृका म्ह.अ पासून ज्ञ पर्यंत १६ स्वर ३६ व्यंजनें )

नाना भेद रागज्ञान । नृत्यभेद तानमान । अर्थभेद तत्वज्ञान । विवंचना ॥ १० ॥

(आणि त्या वर्णापासून) नादभेद,रागज्ञान,नर्तनभेद,तानमान,(ताल किंवा तान ह्यांचें ज्ञान),
अर्थ भेद,तत्वज्ञानांचे विचार असे अनेक भेद झाले.

तत्वांमध्यें मुख्य तत्व । तें जाणावें शुद्धसत्व । अर्धमात्रा महत्तत्व । मूळमाया ॥ ११ ॥

सगळ्या तत्वांत मुख्य तत्व म्हटलें म्हणजें शुध्दसत्व होय.त्यासच अर्धमात्रा (अ-तम,उ-रज,म-सत्व व बिंदु-शुध्दसत्व),महतत्व किंवा मूळमाया म्हणतात.(साडेतीन मात्रांचा ॐकार,त्यात अकार तमोगुण,उकार रजोगुण,मकार सत्वगुण,व ह्यांत मुख्य तत्वें म्ह.अर्धमात्रा हा शुध्द सत्वगुण ह्यालाच महतत्व किंवा मूळमाया म्हणतात.)(शब्दसृष्टि ह्याचप्रकारची आहे.)

नाना तत्वें लाहानथोरे । मिळोन अष्टहि शरीरें । अष्टधा प्रकृतीचें वारें । निघोन जातें ॥ १२ ॥

देहाचेंही आठ प्रकार आहेत चार पिंडांचे व चार ब्रह्मांडाचें,हें आठ देह नाना तत्वांचें बनलें आहेत,मुख्य तत्वें

म्ह.त्रिगुण व पंचभूतें मिळून अष्टदेह बनतात,अष्टधा प्रकृति (वायुरुप मूळमायेंपासून झालेली असल्यामुळें) वायूप्रमाणें नाहीशी होतें,

वारें नस्तां जें गगन । तैसें परब्रह्म सघन । अष्ट देहाचें निर्शन । करून पाहावें ॥ १३ ॥

वायु नसताना आकाश जसें घनदाट असतें,तसेंच परब्रह्म घनदाट भरलेंले आहे,ते अष्ट देहांचा निरास करुन पाहावें (वायु नसतां जें आकाश तसें अष्टदेहांचा निरास करुन घनदाट ब्रह्म आहें तें विवेकानें पाहावें)

ब्रह्मांडपिंडउभार । पिंडब्रह्मांडसंव्हार । दोहिवेगळें सारासार । विमळब्रह्म ॥ १४ ॥

पिंड व ब्रह्मांड ह्यांची उभारणी किंवा संहारणी (स्थूल देहापासून मूळमायेपर्यंत अष्टदेहांचा विचार व निरास करुन) ह्या दोन्हींव्यतिरिक्त सारासार विचार करुन जें उरलें तें विमल ब्रह्म होय,(तें सारभूत विमल ब्रह्म शोधावें)

पदार्थ जड आत्मा चंचळ । विमळब्रह्म तें निश्चळ । विवरोन विरे तत्काळ । तद्रूप होये ॥ १५ ॥

दृश्य पदार्थ जड आहेत,आत्मा (अंतरात्मा) चंचळ आहें,(दोन्हीचां निरास करुन निश्र्चळ परब्रह्म शोधावें) आणि विमल ब्रह्म हें निश्र्चळ आहे,त्या निश्र्चळ ब्रह्माचें  विवरण करुन त्यांत विरुन जावें म्हणजें तात्काळ तद्रूप व्हावें (ह्यापुढे जड आत्मनिवेदन,चंचळ आत्मनिवेदन व निश्र्चळ आत्मनिवेदन असे आत्मनिवेदनाचें चढतें तीन प्रकार सांगतों.)

पदार्थ मनें काया वाचा । मी हा अवघाचि देवाचा । जड आत्मनिवेदनाचा । विचार ऐसा ॥ १६ ॥

(देहापासून जगापर्यंत सर्व नानातत्वात्मक जड सृष्टि देवाची,मी व माझें हें काही नाही) सा-या पदार्थांसह कायावाचामनें करुन  मी हा सर्वस्वी देवाचा आहे अशी भावना करणें (देवाला शरण जाणें),हा जड आत्मनिवेदनाचा विचार होय.

चंचळकर्ता तो जगदीश । प्राणीमात्र तो त्याचा अंश । त्याचा तोचि आपणास । ठाव नाहीं ॥ १७ ॥

आतां चंचळ आत्मनिवेदन सांगतों,जगदीश हा (सगळ्या जड पदार्थांचा) कर्ता आहे,प्रत्येक प्राणी त्याचा अंश आहे.(जीवात्मा वेगळा नाहीं,कर्ता देव तो आपण नाहीं) अशा प्रकारें त्याचा तोच सर्वत्र असल्यामुळे आपणाला म्हणजें मीपणाला ठिकाणच नाही.

चंचळ आत्मनिवेदन । याचें सांगितलें लक्षण । कर्ता देव तो आपण । कोठेंचि नाहीं ॥ १८ ॥

देव हा कर्ता असून आपण म्हणजें मी कोठेंच नाहीं असें चंचंळ आत्मनिवेदनाचें लक्षण सांगितलें.

चंचळ चळे स्वप्नाकार । निश्चळ देव तो निराकार । आत्मनिवेदनाचा प्रकार । जाणिजे ऐसा ॥ १९ ॥

परंतु हें चंचळ स्वप्नासारखें क्षणिक असतें व त्याचा ठावच नाहीं,निश्र्चळ देव हा निराकार आहे (निश्र्चळ ब्रह्मावेगळें दुसरे काहीं एक नाही),निश्र्चळ आत्मनिवेदनाचा प्रकार असा असतो हे ध्यानांत ठेवावें.

ठावचि नाईं चंचळाचा । तेथें आधीं आपण कैंचा । निश्चळ आत्मनिवेदनाचा । विवेक ऐसा ॥ २० ॥

अगोदर चंचळाचाच जेथें पत्ता नाहीं,तेथें आपण कोठला ? निश्र्चळ आत्मनिवेदनाचा विचार असा करावयाचा असतों.

तिहिं प्रकारें आपण । नाहीं नाहीं दुजेपण । आपण नस्तां मीपण । नाहींच कोठें ॥ २१ ॥

तात्पर्य,तिन्हीं प्रकारे विचार केला तर आपण म्हणून कोणी नाहीं ,दुजेपणा (द्वैत) नाही.आपण नसल्यावर मीपणाही कोंठेंच उरत नाहीं.

पाहातां पाहातां अनुमानलें ।कळतां कळतां कळों आलें ।पाहातां अवघेंचि निवांत जालें ।बोलणें आतां ॥२२॥

विचार करतां करता तर्क केला,समजतां समजतां समजून आलें,तेव्हा विवेक केला तर सगळें बोलणेंच संपलें (हें विवरतां विवरतां कळू लागतें,कळतां,कळतां अंतरी ठसतें व निश्र्चळ ब्रह्माकार होतों सारे बोलणेंच खुंटतें.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मनिवेदननाम समास पांचवा ॥**

**समास सहावा : सृष्टिक्रमनिरूपण ॥ श्रीराम ॥**

ब्रह्म निर्मळ निश्चळ । शाश्वत सार अमळ विमळ । अवकाश घन पोकळ । गगनाऐसें ॥ १ ॥

ब्रह्म हे आकाशासारखे निर्मळ,निश्र्चळ,शाश्र्वत,सार,निष्कलंक,शुध्द,व्यापक,घनदाट व पोकळ आहें.

तयास करणें ना धरणें । तयास जन्म ना मरणें । तेथें जाणणें ना नेणणें । सुन्यातीत ॥ २ ॥

त्याला करणे,धरणें,जन्मणें,मरणें हे काहींएक नाहीं,तें शून्याच्या पलीकडचें असून त्याच्या ठिकाणीं जाणणें व नेणणें ही दोन्हीं नाहीत,

तें रचेना ना खचेना । तें होयेना ना जायेना । मायातीत निरंजना पारचि नाहीं ॥ ३ ॥

ते रचत नाही,खचत नाहीं,तें होत नाहीं,जात नाहीं,कां की मायातीत असें ते निरंजन (निर्मल) असून त्याला पार नाहीं,

पुढें संकल्प उठिला । षडगुणेश्वर बोलिजे त्याला । अर्धरारीनटेश्वराला । बोलिजेतें ॥ ४ ॥

त्याच्या ठिकाणी पुढें (मी बहु व्हावें) असा संकल्प उठला,आदि संकल्प तीच मूळमाया तिलाच षडगुणेश्र्वर भगवान म्हणतात,किंवा (वायु व जाणिव ह्या उभयरुपाने ती संपन्न असल्यामुळे तिला) अर्धनारीनटेश्र्वर म्हणतात.

सर्वेश्वर सर्वज्ञ । साक्षी द्रष्टा ज्ञानघन । परेश परमात्मा जगजीवन । मूळपुरुष ॥ ५ ॥

सर्वेश्वर,सर्वज्ञ,साक्षी,द्रष्टा,ज्ञानघन,परेश,परमात्मा,जगज्जीवन,मूळपुरुष हीं सर्व त्या संकल्पाचीच (मूळमायेचींच) नावें आहेत.

ते मूळमाया बहुगुणी । अधोमुखें गुणक्षोभिणी । गुणत्रये तिजपासूनि । निर्माण जाले ॥ ६ ॥

ती मूळमायाच (संकल्प) बहुगुणी असून अधोमुख झाली (परब्रह्मापासून मुरडली) की गुणक्षोभिणी होतें,व त्या गुणक्षोभिणीपासून तीन गुण उत्पन्न होतात (व त्रिगुणांचे देव-जाणता विष्णु,मध्यस्थ ब्रह्मा व नेणतां रुद्र ह्याक्रमानें होऊन तमोगुणरुप (रुद्रापासून) पंचभूतें -आकाश,वायु,तेज,आप व पृथ्वी ह्याक्रमानें निर्माण होतात.)

पुढें विष्णु जाला निर्माण । जाणतीकळा सत्वगुण । जो करिताहे पाळण । त्रैलोक्याचें ॥ ७ ॥

पुढें त्रैलोक्याचें पालन करणारा असा जाणीव सत्वगुणरुप विष्णु उत्पन्न झाला.

पुढें जाणीवनेणीवमिश्रित । ब्रह्मा जाणावा नेमस्त । त्याच्या गुणें उत्पत्ति होत । भुवनत्रैं ॥ ८ ॥

पुढें जाणीव व नेणीव मिळून ब्रह्मदेव झाला हे निश्र्चयेकरून समजावें,त्याच्यापासून तिन्ही लोकांची उत्पत्ति झाली.

पुढें रुद्र तमोगुण । सकळ संव्हाराचें कारण । सकळ कांहीं कर्तेपण । तेथेंचि आलें ॥ ९ ॥

त्यानंतर सगळ्या संहाराचे कारण असा तमोगुणात्मक रूद्र झाला,तात्पर्य हे सगळे कर्तृत्व तेंथेंच म्हणजें त्या मूळमायेंतच आहे.

तेथून पुढें पंचभूतें । पावलीं पष्ट दशेतें । अष्टधा प्रकृतीचें स्वरूप तें । मुळींच आहे ॥ १० ॥

असो,तेथून म्हणजें तमोगुणापासून पंचमहाभूतें व्यक्त दशेला येतात.पण ह्या अष्टधाप्रकृतीचें स्वरुप मुळी म्हणजें मूळमायेंतच अति सूक्ष्मरुपाने आहे (तीच पुढें व्यक्तरुपाला येतें)

निश्चळीं जालें चळण । तेंचि वायोचें लक्षण । पंचभूतें आणि त्रिगुण । सूक्ष्म अष्टधा ॥ ११ ॥

निश्र्चळ ब्रह्माच्या ठिकाणी जो संकल्प उठला,जें पहिलें चलन झालें,तीच मूळमाया ती वायुस्वरुप आहें,त्यांत पंचमहाभूतें व तीन गुण अशी अष्टधा प्रकृति सूक्ष्मरुपानें वायुस्वरुप असतें.

आकाश म्हणिजे अंतरात्मा । प्रत्ययें पाहवा महिमा । त्या आकाशापासून जन्मा । वायो आला ॥ १२ ॥

त्यांत आकाश म्हणजेच अंतरात्मा त्याचा महिमा अनुभवानें पाहावा,त्या आकाशापासून वायु उत्पन्न झाला.

तया वायोच्या दोनी झुळुका । उष्ण सीतळ ऐका । सीतळापासून तारा मयंका । जन्म जाला ॥ १३ ॥

त्या वायुच्या उष्ण व शितळ अशा दोन झुळका झाल्या,त्यापैकीं शितळ झुळकेंपासून चंद्र (मयंक-मृगांक) व तारका उत्पन्न झाल्या.

उष्णापासून रवि वन्ही । विद्युल्यता आदिकरूनि । सीतळ उष्ण मिळोनि । तेज जाणावें ॥ १४ ॥

उष्ण झुळकेपासून सूर्य,अग्नि,विद्युलता इत्यादि उत्पन्न झालीं,हें उष्ण व शीतळ मिळून सगळें तेज आहें.

तया तेजापासून जालें आप । आप आळोन पृथ्वीचें रूप । पुढें औषधी अमूप । निर्माण जाल्यां ॥ १५ ॥

त्या तेजापासून आप निघालें,तें पाणी आटून पृथ्वीचें रुप प्रकट झालें,नंतर अनेक वनस्पति (औषधी) उत्पन्न झाल्या.

औषधीपासून नाना रस । नाना बीज अन्नरस । चौर्यासि लक्ष योनीच वास । भूमंडळीं ॥ १६ ॥

वनस्पतींपासून अनेक रस,अनेक बीजें व त्यांपासून अन्नरस झाले,अशा रितीनें भूमंडळावर ८४ लक्ष योंनीची वस्ती होत गेलीं.

ऐसी जाली सृष्टीरचना । विचार आणिला पाहिजे मना । प्रत्ययेंविण अनुमाना । पात्र होईजे ॥ १७ ॥

अशी ही सृष्टिरचना झाली,तिचा विचार मनांत आणला पाहिजें (अनुभव घेतला पाहिजें,अनुभवाचून नुसत्या अनुमानावरच निर्वाह करावा लागेल)

ऐसा जाला आकार । येणेंचि न्यायें संव्हार । सारासारविचार । यास बोलिजे ॥ १८ ॥

अशी सृष्टीची रचना झाली,ह्याच न्यायानें तिचा संहार होतो,ह्यांस (ब्रह्मांडाच्या उभारणी-संहारणीच्या विचारास) सारासारविचार म्हणतात.

जें जें जेथून निर्माण जालें । तें तें तेथेंचि निमालें । येणेंचि न्यायें संव्हारलें । माहाप्रळईं ॥ १९ ॥

जें जें ज्या  ठिकाणाहून उत्पन्न झालें,ते तें त्याच ठिकाणी लय पावलें (निमालें) हें तत्व लक्षांत ठेवावें,अशाच रीतीने महाप्रळयाच्या वेळी संहार होतो.

आद्य मध्य अवसान । जें शाश्वत निरंजन । तेथें लावावें अनुसंधान । जाणते पुरुषीं ॥ २० ॥

( अवसान - अंत ,संहार )

(सृष्टीची उत्पत्ति,स्थिति व लय-तीनही अवस्थांत शाश्वत स्वरुप अखंड आहे. ते सार,बाकीची माया असार,असा सारासारविवेक जागृत असावा.आदि-मध्यावसांनीं जें निरंजन शाश्वत परब्रह्म तेथें जाणत्यांचे अनुसंधान ठेवावें.) ह्यास्तव आदि,मध्यें व शेवटी जें शाश्वत व निरंजन असें (परब्रह्म) आहें,त्याच्याकडें जाणत्या पुरुषांनीं अनुसंधान लावावें.

होत जाते नाना रचना । परी ते कांहींच तगेना । सारासार विचारणा । याकारणें ॥ २१ ॥

( तगेना - टिकत नाही , विचारणा - विवेकविचार )

सृष्टीची अनेक प्रकारची रचना उत्पन्न होते व जातें तरी तिच्यांत टिकाऊ (शाश्वत) असें काहींच नसतें,हें ध्यानांत येण्यासाठींच सारासारविचार करावा लागतो.

द्रष्टा साक्षी अंतरात्मा । सर्वत्र बोलती महिमा । परी हे सर्वसाक्षिणी अवस्ता मां । प्रत्ययें पाहवी ॥ २२ ॥

द्रष्टा व साक्षी असा जो अंतरात्मा (तोच परमात्मा समजून) त्यांची थोरवी सर्व जण गातात,परंतु ही द्रष्टेपणाची सर्वसाक्षिणी तुर्यावस्था आहे किंवा नाही व ब्रह्म अवस्थातीत आहें,हे अनुभवानें पाहावें.

मुळापासून सेवटवरी । अवघी मायेची भरोवरी । नाना विद्या कळाकुंसरी । तयेमधें ॥ २३ ॥

( मायेची भरोवरी - मायेचा विस्तार )

आरंभापासून शेवटापर्यंत (मूळमायेपासून शेवट-स्थूला-पर्यंत) सगळा मायेचाच विस्तार (भरोवरी) आहे,अनेक प्रकारच्या विद्या,कलाकौशल्ये,सर्व काही तिच्यातलें आहे.

जो उपाधीचा सेवट पावेल ।त्यास भ्रम ऐसें वाटेल ।जो उपाधीमध्यें आडकेल ।त्यास काढिता कवण ॥२४॥

(अविद्या व विद्या किंवा पिंड व ब्रह्मांड) ह्या उपाधीच्या शेवटापर्यंत जो जाऊन पाहोंचेल,त्यालाच हा सारा भ्रम आहे असे वाटेंल आणि जो उपाधीमध्यें अडकून बसेल त्याला सोडविणारा कोण आहें ?

विवेक प्रत्ययाचीं कामें । कैसीं घडतील अनुमानभ्रमें । सारासारविचाराचेन संभ्रमें । पाविजे ब्रह्म ॥ २५ ॥

( अनुमानभ्रमें - अंदाजाने गोंधळून जाऊन, संभ्रमें = समभ्रमाने=संतुलित विवेकाने )

विवेकाची व अनुभवाची जी कामें आहेतं ती केवळ तर्कांनें व भ्रमानें कशी होतील ?सारासारविचाराच्या योगानें (त्वरित) ब्रह्मप्राप्ति होतें.(हे अनुभवाचें कार्य नाही,विवेकविचारानेंच ब्रह्मपद पावायचें असतें)

ब्रह्मांडींचे माहाकारण । ते मुळमाया जाण । अपूर्णास म्हणती ब्रह्म पूर्ण । विवेकहीन ॥ २६ ॥

ब्रह्मांडातील महाकारण देह म्हणजे मूळमाया होय,त्या अपुर्ण अशा मूळमायेलाच विचारशून्य लोक पूर्ण ब्रह्म म्हणतात.

सृष्टीमधें बहुजन । येक भोगिती नृपासन । येक विष्ठा टाकिती जाण । प्रत्येक्ष आतां ॥ २७ ॥

सृष्टीत अनेक लोक आहेत कोणी राजसिंहासनाचा उपभोग घेतात,तर कोणी नरकाच्या पाट्या वाहातात (विष्ठा सावडणारें आहेत) हा प्रकार प्रत्यक्ष डोळ्यापुढें आहें.

ऐसे उदंड लोक असती । आपणास थोर म्हणती । परी ते विवेकी जाणती । सकळ कांहीं ॥ २८ ॥

आणि स्वत:ला थोर म्हणविणारे पुष्कळ लोक आहेत,पण त्यांत खरा थोर कोण आहे हे विवेकी पुरुषांना कळतें (पण विवेकी जन यथार्थ जाणतात)

ऐसा आहे समाचार । कारण पाहिजे विचार । बहुतांच्या बोलें हा संसर । नासूं नये ॥ २९ ॥

( कारण - म्हणून )

अशी स्थिती असल्यामुळें विचार करावयास पाहिजे,अनेकांच्या (मूढांच्या) सांगण्यावर भिस्त ठेऊन आपण आपल्या संसाराचा नाश करुन घेऊ नयें.(आपल्या प्रत्ययानें घ्यावें)

पुस्तकज्ञानें निश्चये धरणें । तरी गुरु कासया करणें । याकारणें विवरणें । आपुल्या प्रत्ययें ॥ ३० ॥

पुस्तकी ज्ञानाने (पुस्तके वाचून) अध्यात्माचा निश्र्चय करता आला असता तर गुरु तरी करण्याची जरुरी काय ? ह्यास्तव (गुरुमुखानें सृष्टिक्रमाची उभारणी-संहारणीची कथा नीट समजाऊन घेऊन तिंचे) विवरण आपल्या अनुभवानें करावें.

जो बहुतांच्या बोलें लागला ।तो नेमस्त जाणावा बुडाला ।येक साहेब नस्तां कोणाला।मुश्यारा मागावा॥३१॥

जो अनेकांच्या बोलण्यावर विश्र्वासून वागू लागतो तो खात्रींनें बुडाला म्हणून समजावें,एक मालक (साहेब) नसेंल तर पगार (मुशाहिरा) कोणापाशी मागावा ?(म्हणून गुरूविश्र्वासानें जावें,एक धणी केला नाही तर पगार-मुशाहिरा-कोणापाशी मागता येईल ?)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सृष्टिक्रमनिरूपणनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : विषयत्याग ॥ श्रीराम ॥**

न्यायें निष्ठुर बोलणें । बहुतांस वाटे कंटाळवाणें । मळमळ करितां जेवणें । विहित नव्हे ॥ १ ॥

न्यायाचें व निष्ठूर म्हणजे सडेतोड असे बोलणें अनेक जणांना कंटाळवाणें वाटतें,तथापि पोटात (शंकेची) मळमळ असेल तर जेंवणें (श्रवणादि साधनें करणें) बरे नव्हें.

बहुतीं विषय निंदिले । आणि तेचि सेवित गेले । विषयत्यागें देह चाले । हें तों घडेना ॥ २ ॥

प्रश्न-(जो उठतो) तो विषयांची निंदा करीत सुटतों,आणि विषय काहीं सोडीत नाहीं,ह्याबद्दल मला स्पष्ट विचारावयांचे आहे.न्यायनिष्ठूर बोलणें बहुतेकांस कंटाळवाणें वाटतें.पण मळमळ ठेवूं कशाला ?जेवायचें तर खुल्या मनाने जेवावें.विषयांची निंदा करावी आणि विषय काहीं सोडूं नयेंत हा मिळमिळीतपणा चांगला नव्हें,प्रपंची लोकांसारखेच परमार्थीही खातात,जेवतात,सर्व विषय भोगतात आणि पुन्हा आपली विषयांची निंदा करीत सुटतात.देह ता चालतां,विषयत्यागी असा कोण आहे ? सर्वस्वीं विषयत्याग केल्याशिवाय परमार्थ साधायचा नाही असे असेल तर विषय सुटायला नकोत का ! व परमार्थ साधायला नको !)अनेकांची,विषयांची निंदा केली आणि त्यांच विषयांचे पुन्हा सेंवन केलें,विषयांचा पूर्ण त्याग केल्यावर देह वागतो आहे,असें तर कधीही घडत नाहीं.

बोलणें येक चालणें येक । त्याचें नांव हीन विवेक । येणें करितां सकळ लोक । हांसों लागती ॥ ३ ॥

बोलणें एक,चालणें एक अशा वागण्याला निंद्य म्हणतात.असे केल्याने सगळे उपहास करतात.

विषयत्यागेंविण तों कांहीं । परलोक तो प्राप्त नाहीं । ऐसें बोलणें ठाईं ठाईं । बरें पाहा ॥ ४ ॥

विषयत्याग केल्याशिवाय परलोक कधींही मिळावयाचा नाही अशी वचनें ठिकठिकाणीं आहेंत,ती बरी (नीट) पाहा.

प्रपंची खाती जेविती । परमार्थी काये उपवास करिती । उभयता सारिखे दिसती । विषयाविषईं ॥ ५ ॥

प्रांपंचिक लोक तेवढें जेवतात,खातात,परमार्थी काय उपवास करतात ? विषय सेवनाच्या बाबतींत दोघेही सारखेंच दिसतात.

देह चालतां विषय त्यागी । ऐसा कोण आहे जगीं । याचा निर्वाह मजलागीं । देवें निरोपावा ॥ ६ ॥

देह चालत असतानां,विषयांचा त्याग करील असा जगांत कोण आहे ?ह्याबाबतींत महाराजांनी माझे समाधान करावें,

विषय अवघा त्यागावा । तरीच परमार्थ करावा । ऐसें पाहातां गोवा । दिसतो किं ॥ ७ ॥

सगळ्या विषयांचा त्याग होत असेल तरच परमार्थ करावा असें म्हटलें तर सगळा गोंधळ (गोवा) दिसतो ना ?

ऐसा श्रोता अनुवादला । वक्ता उत्तर देता जाला । सावध होऊन मन घाला । येतद्विषईं ॥ ८ ॥

असे श्रोत्यांचे म्हणणे पडलें,त्यावर वक्त्याने जे उत्तर दिले तें मन लावून सावधपणे ऐका.

वैरग्यें करावा त्याग । तरीच परमार्थयोग । प्रपंचत्यागें सर्व सांग । परमार्थ घडे ॥ ९ ॥

उत्तर-वैराग्ययुक्त त्याग केला तरच परमार्थ घडतो,प्रपंचाच्या त्यागानें परमार्थ यथासांग होतो (हे म्हणणे सर्वस्वी खरें आहे)

मागें ज्ञानी होउन गेले । तेंहिं बहुत कष्ट केले । तरी मग विख्यात जाले । भूमंडळीं ॥ १० ॥

पूर्वी जें ज्ञानी होऊन गेले त्यांनी अनेक प्रकारचें कष्ट सहन केले , तेव्हांच ते जगांत प्रसिध्दि पावलें.

येर मत्सर करितांच गेलीं । अन्न अन्न म्हणतां मेलीं । कित्येक भ्रष्टलीं । पोटासाठीं ॥ ११ ॥

अशा श्रेष्ठांचा कित्येक अन्नार्थी पोटार्थी मत्सर करीत असतात) इतर बिचारी मत्सर करकरुन नाहीशी झाली,अन्नानदशा होऊन मेली,कित्येक तर पोटासाठी बाटलीं.

वैराग्य मुळींहून नाहीं । ज्ञान प्रत्ययाचें नाहीं । सुचि आचार तोहि नाहीं । भजन कैंचें ॥ १२ ॥

(त्यांचे कारण) त्यांच्या ठिकाणी मूळचेंच वैराग्य नसतें,(मूळमायेपासून तें चराचर सृष्टीपर्यंत वैराग्य नाही (अर्थात) त्यांस अनुभवानें ज्ञान होत नाही,त्यांचे आचरणसुध्दा पवित्र शुध्द असत नाही,मग भजन कोठलें ?

ऐसे प्रकारीचे जन । आपणास म्हणती सज्जन । पाहों जातां अनुमान । अवघाच दिसे ॥ १३ ॥

अशाप्रकारचे लोक आपणा स्वतःला साधु सज्जन म्हणवितात,पण त्यांची स्थिति पाहिली तर सारा अनुमान धपका दिसतो (पण त्यांच्यापाशी आनुमानिक ज्ञानाशिवाय काही नसते.)

जयास नाहीं अनुताप । हेंचि येक पूर्वपाप । क्षणक्ष्णा विक्षेप । पराधीकपणें ॥ १४ ॥

( पराधीकपणें - परोत्कर्षाने )

(त्याला खरा अनुताप नसतो ) त्याला पश्र्चाताप होत नाही,हेच त्याचे पूर्वजन्मीचें पाप असतें,दुस-याचा उत्कर्ष पाहून त्यांना क्षणोक्षणी चित्तक्षोभ होतो (वैराग्य व अनुताप नसल्यामुळे त्यांना परोत्कर्ष सहन होत नाही.)

मज नाहीं तुज साजेना । हें तों अवघें ठाउकें आहे जना । खात्यास नखातें देखों सकेना ।ऐसें आहे ॥१५॥

( नखातें - भिकारी )

मला नाहीं व तुला शोभत नाहीं (मला नाही तर तुला नाहीं) हा न्याय सगळ्या लोकांनाच ठाऊक आहे (हा जनस्वभाव आहे),खाणा-यास (संपन्न माणसास) न खाते (भिकारी) देखू शकत नाहीत (नावें ठेवतात,त्यांना दुस-याचें पाहावत नाही)

भाग्यपुरुष थोर थोर । त्यास निंदिती डीवाळखोर । सावास देखतां चोर । चर्फडी जैसा ॥ १६ ॥

शहाजोग माणसास पाहून चोरांनें चरफडावें (सावास देखून चोर चरफडतात) त्याप्रमाणे मोठमोठे भाग्यशाली पुरुष असतात त्यांची निंदा दिवाळखोर लोक करतात.(मत्सरी लोकांनी विरक्ताची निंदा व वैराग्याची टवाळी केली म्हणून काय होणार आहें ?)

वैराग्यपरतें नाहीं भाग्य । वैराग्य नाहीं तें अभाग्य । वैराग्य नस्तां योग्य । परमार्थ नव्हे ॥ १७ ॥

(परमार्थदृष्ट्या) वैराग्यासारखें भाग्य नाही, वैराग्य नसेल तर ते करंटपण होय.वैराग्यावाचून यथासांग परामार्थ होत नाहीं (आंगीं वैराग्य असल्यावाचून कोणालाही परमार्थाची योग्यताच येत  नाहीं.)

प्रत्ययेज्ञानी वीतरागी । विवेकबळें सकळ त्यागी । तो जाणीजे माहांयोगी । ईश्वरी पुरुष ॥ १८ ॥

अनुभविक ज्ञाता,वैराग्यशील,विवेकाच्या जोरावर सर्वांचा (सर्वस्व) त्याग करणारा असा असेल तो महान योगी व ईश्र्वरी पुरूष म्हणून समजावा.

अष्टमा सिद्धीची उपेक्षा । करून घेतली योगदीक्षा । घरोघरीं मागे भिक्षा । माहादेव ॥ १९ ॥

(अशा योग्यांचे मुकुटमणि म्हणजे  अष्ट महासिध्दींची उपेक्षा करुन योगदीक्षा घेणारे व घरोघर भिक्षा मागणारे भगवान शंकर होत ) महादेवसुध्दा अष्ट महासिध्दि टाकून योगदीक्षा धारण करुन घरोघर भिक्षा मागतात.

ईश्वराची बराबरी । कैसा करील वेषधारी । म्हणोनियां सगट सरी । होत नाहीं ॥ २० ॥

त्या ईश्र्वराची बरोबरी त्या वेषधारी भिका-याला कशी करतां येईल ? म्हणून (दोघे बाह्यत: सारखे दिसले तरी ) दोघांची सरसकट बरोबरी करतां येणार नाहीं.(ईश्र्वराची बरोबरी बाह्य वेषधारी कशी करु शकेल ?म्हणून सार-गार एक करुं नयें.)

उदास आणि विवेक । त्यास शोधिती सकळ लोक । जैसें लालची मूर्ख रंक । तें दैन्यवाणें ॥ २१ ॥

विरक्त (उदास) व विवेकी पुरुष असतात त्यांना सगळे लोक शोधीत येतात आणि लोभी व मूर्ख असतात तें भिकारी व कपाळकरंटें राहातात (आणि विषयांचे लालची दीन मूर्ख त्यांना कोण विचारतो ?)

जे विचारापासून चेवले । जे आचारापासून भ्रष्टले । विवेक करूं विसरले । विषयलोभीं ॥ २२ ॥

( चेवले - ढळले )

जे आचारविचारांपासून चेवले व भ्रष्ट झाले आणि जे (परमार्थाचा) विवेक करण्याचें विसरले असे विषयलोभी असतात.

भजन तरी आवडेना । पुरश्चर्ण कदापि घडेना । भल्यांस त्यांस पडेना । येतन्निमित्य ॥ २३ ॥

त्यांस भजन तर आवडतच नाहीं,त्यांच्या हातून पुरश्र्चरण कधीही घडत नाही आणि त्याच कारणास्तव त्यांचे व सज्जनांचे पटत नाही (त्यांचे व भल्यांचे न पटल्यास नवल काय ?)

वैराग्यें करून भ्रष्टेना । ज्ञान भजन सांडिना । वित्पन्न आणि वाद घेना । ऐसा थोडा ॥ २४ ॥

वेराग्यशील असून जो आचारभ्रष्ट होत नाही,आत्मज्ञानी असून जो सगुणभजन (सगुणभक्ति) टाकीत नाही,व्युत्पन्न असून जो वितंडवादांत शिरत नाही असा पुरुष विरळा.

कष्ट करितां सेत पिके । उंच वस्त तत्काळ विके । जाणत्या लोकांच्या कौतुकें । उड्या पडती ॥ २५ ॥

( उंच वस्त - चांगली वस्तू )

मेहनत केली म्हणजे शेतात पीक येतें (कष्ट मेहनत व मशागत केल्याने शेत पिकतें) उंची (चांगल्या,उत्कृष्ट) पदार्थांची विक्री ताबडतोब होते त्यावर जाणत्या लोकांच्या कौतुकाने एकसारख्या उड्या पडत असतात.

येर ते अवघेचि मंदले । दुराशेनें खोटे जाले । कानकोंडें ज्ञान केलें । भ्रष्टाकारें ॥ २६ ॥

( कानकोंडें - संकुचित ,ओशाळा )

बाकींचे सगळे (सामान्य जीव) रखडत बसतात कां की,दुराशेंमुळे ते खोटें ठरतात आणि भष्टाकारामुळे ते दुराशेंचें गुलाम होऊन आचारभ्रष्टतेंमुळें ) त्यांचे ज्ञान कानकोंडें झालेले असतें.

सबळ विषय त्यागणें । शुद्ध कार्याकारण घेणें । विषयत्यागाचीं लक्षणें । वोळखा ऐसीं ॥ २७ ॥

शबल (उन्मादक,अशुध्द,अशास्त्रीय) विषयांचा सर्वस्वी त्याग करुन शुध्द विषय जरुरीपुरतेंच (कार्यकारण) सेवन करणें हेंच विषयत्यागाचें लक्षण होय. ते नीट ओळखावें.

सकळ कांहीं कर्ता देव । नाहीं प्रकृतीचा ठाव । विवेकाचा अभिप्राव । विवेकी जाणती ॥ २८ ॥

( नाहीं प्रकृतीचा ठाव - प्रकृतीला ठावठिकाणा नाही सर्व मायारूप आहे )

सर्व काही करणारा देव असून प्रकृतीचा ठिकाणाच नाही हें विवेकाचें मर्म विवेकी पुरूष जाणतात.

शूरत्वविषईं खडतर । त्यास मानिती लाहानथोर । कामगार आणि आंगचोर । येक कैसा ॥ २९ ॥

(विषयांविषयी ज्यांचे वैराग्य प्रखर-खडतर-आहे अशा शूर वीरांना लहानथोर मानतात) जो शूरपणामध्ये प्रखर म्हणजे मागेंपुढे न करणारा असेल त्याला लहानथोर लोक मान देतात,असा कार्यकर्ता व चुकारतट्टू हे दोघे सारखे कसे होतील ?

त्यागात्याग तार्किक जाणे । बोलाऐसें चालों जाणे । पिंडब्रह्मांड सकळ जाणे । येथायोग्य ॥ ३० ॥

विवेककुशल असेल त्यालाच त्याग काय,अत्याग काय आणि बोलण्याप्रमाणे वागावें कसे ते कळतें,त्याचप्रमाणे पिंड व ब्रह्मांड ह्यांचा विचारही तो योग्य रीतींने करतो.(त्याग कोणता,कशाचा व कसा करायचा आणि अत्याग म्हणजें काय हे विवेककुशल-तार्किक जाणतात,ते बोलण्यासारखेच चालतात,पिंडब्रह्मांड सर्व काही जाणतात)

ऐसा जो सर्वजाणता । उत्तमलक्षणी पुरुता । तयाचेनि सार्थकता । सहजचि होये ॥ ३१ ॥

( पुरुता - पुरुष )

(असा तो सर्वज्ञ,उत्तम गुणांनी पूर्ण असतो त्याच्या योगाने सहजच सार्थकता प्राप्त होते) असा जो सर्व जाणणारा व उत्तम लक्षणांनी युक्त असेल त्याच्या योगानें सहजच सार्थक होईल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विषयत्यागनिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : काळरूपनिरूपण ॥ श्रीराम ॥**

मूळमाया जगदेश्वर । पुढें अष्टधेचा विस्तार । सृष्टिक्रमें आकार । आकारला ॥ १ ॥

मूळमाया हीच जगदीश्वर होय,तिजपासून पुढे अष्टधाप्रकृतीचा विस्तार होऊन सृष्टिक्रमाप्रमाणे दृश्याकार आकाराला आला.(-क्रमानें सृष्टीची उभारणी झाली)

हें अवघेंच नस्तां निर्मळ । जैसें गगन अंतराळ । निराकारीं काळवेळ । कांहींच नाहीं ॥ २ ॥

हे सगळेंच नसेल तर जसे आकाश अंतराल (खालींवर ज्यास कोठेंही संबंध नाही ) असे असते त्याप्रमाणे निर्मल ब्रह्म असतें त्या निराकाराच्या ठिकाण़ी काळवेळ काही नाहीं. (गगनाप्रमाणें निराकार जें ब्रह्म तेथें काळवेंळ काहीं नाही)

उपाधीचा विस्तार जाला । तेथें काळ दिसोन आला । येरवीं पाहातां काळाला । ठावचि नाही ॥ ३ ॥

ब्रह्मांडाच्या उपाधीचा विस्तार जेव्हा झाला तेव्हा त्या ठिकाणी काळ दिसायला लागला,एरव्ही पाहिले तर काळाला म्हणून ठिकाणच नाही (उपाधीचा विस्तार झाला त्यांत काळाची सत्ता दिसून आली )

येक चंचळ येक निश्चल । यावेगळा कोठें काळ । चंचळ आहे तावत्काळ । काळ म्हणावें ॥ ४ ॥

एक (माया,अंतरात्मा ) चंचळ व दुसरें परब्रह्म निश्चळ ह्या दोन्हीवाचूंन काळाला ठिकाण कोणतें ?चंचळ माया आहे तो वर काळ असे म्हणता येईल (चंचळ आहे तोवर काळाची कल्पना )

आकाश म्हणिजे अवकाश । अवकाश बोलिजे विलंबास । त्या विलंबरूप काळास । जाणोनि घ्यावें ॥ ५ ॥

आकाश म्हणजे अवकाश, विलंबालाहीं अवकाश असें म्हणतात,त्या विलंबरुप काळाची माहिती करुन घ्यावी.

सूर्याकरितां विलंब कळे । गणना सकळांची आकळे । पळापासून निवळे । युगपरियंत ॥ ६ ॥

सूर्य असल्यामुळे विलंब-कालावधि समजतो,सर्वकालगणना करतां येते. पळापासून युगापर्यंत सर्व कालगणना स्पष्ट होते.

पळ घटिका प्रहर दिवस । अहोरात्र पक्ष मास । शड्मास वरि युगास । ठाव जाला ॥ ७ ॥ क्रेत त्रेत द्वापार कळी । संख्या चालिली भूमंडळी । देवांचीं आयुष्यें आगळीं । शास्त्रीं निरोपिलीं ॥८॥
पळ,घटका,प्रहर,दिवस,अहोरात्र,पक्ष,महिना,सहा महिने,त्यानंतर युगापर्यंत सर्वांची उत्पत्ति झाली, कृत,द्वापार,त्रेता,कलि अशी युगसंख्या पृथ्वीवर चालू झाली,देवांची (देवादिकांची ) आयुष्ये मोठी (आगळी) असल्याचें शास्त्रांत सांगितले आहे.

ते देवत्रयाची खटपट । सूक्ष्मरूपें विलगट । दंडक सांडितां चटपट । लोकांस होते ॥ ९ ॥

( विलगट - जिव्हाळ्याने )

ब्रह्मा,विष्णु,महेश्वर ह्या तीन देंवांची जी खटपट जे खेळ (उत्पत्ति,स्थित्ति,संहार ) ती विशेंष लगट रीतींने व सूक्ष्मपणानें (सर्व पिडांच्या ठिकाणी ) चालू आहे,पण लोक न्यायनीतीचा मार्ग सोडतात,म्हणून त्यांस दुःख भोगावें लागतें (तिन्ही देवांचे उत्पत्यादि उद्योग हे सूक्ष्मरुपाने एकत्र आहेत,पण रुढ समजूत सोडून जरा वेंगळे सांगितले की लोकांच्या मनांस लागते)

मिश्रित त्रिगुण निवडेना । तेणें आद्यंत सृष्टिरचना । कोण थोर कोण साना । कैसा म्हणावा ॥ १० ॥

( आद्यंत - आदि अंत )

मिश्र झालेले तीन गुण वेगळे करता येंत नाहीत आरंभापासून अखेरपर्यंत सर्व सृष्टिरचना ह्या त्रिगुणांच्या मिश्रणाची झाली आहे,त्यांत लहान कोण व मोठा कोण हें कसें सांगावें ?

असो हीं जाणत्याचीं कामें । नेणता उगाच गुंते भ्रमें । प्रत्यये जाणजाणों वर्मे । ठाईं पाडावीं ॥ ११ ॥

असो ही जाणत्याची कामे आहेत,नेणता (अडाणी) असतो तो उगीच भ्रमांत घोटाळतो (पडतो) अनुभवाने वर्मे तेवढी जाणावी.

उत्पन्नकाळ सृष्टिकाळ । स्थितिकाळ संव्हारकाळ । आद्यंत अवघा काळ । विलंबरूपी ॥ १२ ॥

उत्पत्तिकाळ,सृष्टिकाळ,स्थितिकाळ व संहारकाळ असा हा आरंभापासून शेवटपर्यंत सगळा विलंब (अवधी -) रुप काळच होय.

जें जें जये प्रसंगीं जालें । तेथें काळाचें नांव पडिलें । बरें नसेल अनुमानलें । तरी पुढें ऐका ॥ १३ ॥

जे जे  ज्या प्रसंगाला घडते तेथे त्या काळाचें नांव पडते नीट लक्षात उतरले नसेल तर आणखी ऐका.

प्रजन्यकाळ शीतकाळ । उष्णकाळ संतोषकाळ । सुखदुःख आनंदकाळ । प्रत्यये येतो ॥ १४ ॥

(तसेच सहा ऋतूंचे काळ) पर्जन्यकाळ,शीतकाळ,उन्हाळा,संतोषकाळ,सुखदुःख किंवा आनंद ह्याचा काळ ह्यांचा अनुभव येतो.

प्रातःकाळ माध्यानकाळ । सायंकाळ वसंतकाळ । पर्वकाळ कठिणकाळ । जाणिजे लोकीं ॥ १५ ॥

प्रातःकाळ, मध्यानकाळ,सायंकाळ,वसंतकाळ,पर्वकाळ,कठीणकाळ, हे लोकांस माहीत आहेत.

जन्मकाळ बाळत्वकाळ । तारुण्यकाळ वृधाप्यकाळ । अंतकाळ विषमकाळ । वेळरूपें ॥ १६ ॥

जन्मकाळ,बाळपण,तरुणपण,म्हातारपण,मरणसमय,(बाल्तारुण्यादि दशांचेकाळ),विषमकाळ सर्व ही

काळाचीच रूपे होत.

सुकाळ आणि दुष्काळ । प्रदोषकाळ पुण्यकाळ । सकळ वेळा मिळोन काळ । तयास म्हणावें ॥ १७ ॥

सुकाळ,दुष्काळ,प्रदोषकाळ,पुण्यकाळ ह्या सर्व जितक्या वेळा आहेत त्यास काळ म्हणावे.

असतें येक वाटतें येक । त्याचें नांव हीन विवेक । नाना प्रवृत्तीचे लोक । प्रवृत्ति जाणती ॥ १८ ॥

(असते एक,वाटते एक ह्यांचे नाव हीनविवेक) असावे एक व वाटावे भलतेच हा अविचार होय.अनेक प्रवृत्तीचे लोक (प्रपंच) प्रवृत्ति तेवढी जाणतात.(प्रवृत्तीचे लोक असे अविचारी असतात म्हणून त्यांना प्रवृत्ति अधोमुख चालली आहे हे कळत नाही विवेकी लोक हे जाणतात)

प्रवृत्ति चाले अधोमुखें । निवृत्ति धावे ऊर्धमुखें । ऊर्धमुखें नाना सुखें । विवेकी जाणती ॥ १९ ॥

( अधोमुखें - अनेकत्व ,ऊर्धमुखें - एकत्व जे निश्चळ )

पण प्रवृत्ति अधोमुख चालते (अधोगति देते) आणि निवृति ऊर्ध्वमुख धावते (उत्तम गति देते) ऊर्ध्वमुख झाल्याने (उत्तम गतीच्या साधनास लागल्याने) अनेक सुख मिळतात हे विवेकी पुरुषांना माहित असते.

ब्रह्मांडरचना जेथून जाली । तेथें विवेकी दृष्टि घाली । विवरतां विवरतां लाधली । पूर्वापर स्थिति ॥ २० ॥

( विवरतां विवरतां लाधली - अनुसंधान करता करता प्राप्त होते )

जेथून हि ब्रह्मांडरचना झाली त्या मुळमायेच्या ठिकाणी जो विवेकी पुरुष अनुसंधान ठेवतो ( जो विवेकपूर्वक अनुसंधान ठेवतो) तो पुढे विवरण करता करता उगमाजवळ जातो (त्याला मूळची परब्रह्मस्थिती प्राप्त होते)

प्रपंची असोन परमार्थ पाहे । तोहि ये स्थितीतें लाहे । प्रारब्धयोगें करून राहे । लोकांमधें ॥ २१ ॥

प्रपंचात असून जो परमार्थाचा विचार करतो त्यालासुद्धा हि स्थिति प्राप्त होते.केवळ प्रारब्धास्तव तो लोकात राहात (वागत) असतो.

सकळांचे येकचि मूळ । येक जाणते येक बाष्कळ । विवेकें करून तत्काळ । परलोक साधावा ॥ २२ ॥

सर्वाचे मूळ (उगमस्थान) एकच आहे. तथापि काही जाणते व काही बाष्कळ असतात.विवेकाने तात्काळ परलोक-उगम-साधावा ( हे एकाला कळते.एक बाष्कळपणा करतात. ह्यास्तव (शहाण्याने) विचार करून परलोक तात्काळ मिळेल अशा साधनास लागावे)

तरीच जन्माचें सार्थक । भले पाहाती उभये लोक । कारण मुळींचा विवेक । पाहिला पाहिजे ॥ २३ ॥

तरच जन्माचे सार्थक होईल भले असतात ते दोन्ही लोकांचा विचार करतात,म्हणून त्यांच्या जन्मांचे सार्थक होते का कि ते मुळीचा (उगमस्थानाचा) विचार पाहातात.

विवेकहीन जे जन । ते जाणावे पशुसमान । त्यांचे ऐकतां भाषण । परलोक कैंचा ॥ २४ ॥

अविवेकी लोक हे पशुसारखे होत,त्यांचे भाषण ऐकून परलोक कसा प्राप्त होईल?

बरें आमचें काये गेलें । जें केलें तें फळास आलें । पेरिलें तें उगवलें । भोगिती आतां ॥ २५ ॥

बरे,त्यात तरी आमचे काय गेले? जे काही होते त्याचे तसे फळ त्यांना मिळाले.( करावे ते भरावे हा न्यायच आहे ) जे पेरले होते ते आता उगवले व त्याचाच उपभोग त्यास आता घेतला पाहिजे.

पुढेंहि करी तो पावे । भक्तियोगें भगवंत फावे । देव भक्त मिळतां दुणावें । समाधान ॥ २६ ॥

( फावे - मिळतो , दुणावें - दुप्पट होते )

पुढेही जो जसे कर्म करील तसे त्यास फळ मिळेल. भक्ति केल्यास तिच्या योगाने भगवंताची प्राप्ती होते ( फावे ) देव आणि भक्त एक झाले म्हणजे समाधान दुणावते (वाढते)

कीर्ति करून नाहीं मेले । उगेच आले आणि गेले । शाहाणे होऊन भुलले । काये सांगावें ॥ २७ ॥

जे कीर्ति न करताच मरतात ते फुकट जन्माला येतात. आणि व्यर्थ जातात,शहाणे असून ते चुकले (विसरले) ह्याला काय म्हणावे? (जन्मास आल्यासारखी कीर्ति मागे न ठेवता मरू नये.(शहाणे मिथ्या प्रवृत्तिला भुलून राहतात हे नवल आहे )

येथील येथें अवघेंचि राहातें । ऐसें प्रत्ययास येतें । कोण काये घेऊन जातें । सांगाना कां ॥ २८ ॥

हा सगळा पसारा इथल्या इथेच राहतो असा अनुभव आहे ह्यातले कोण काय बरोबर घेऊन जातो ते सांगा ना? ( सगळे इथल्या इथेच राहते कोणी येथले बरोबर काही नेत नाही हा तर अनुभव आहे ना?)

पदार्थी असावें उदास । विवेक पाहावा सावकास । येणेंकरितां जगदीश । अलभ्य लाभे ॥ २९ ॥

म्हणून सर्व पदार्थांच्या ठिकाणी उदासीन (अनासक्त) असावे व स्वस्थपणाने विवेक करावा ह्या योगाने अलभ्य अशा जगदीशाची प्राप्ति होते.(पदार्थांवेगळा परमात्मा त्याचा विवेक पाहावा म्हणजे त्याचा लाभ होतो)

जगदीशापरता लाभ नाहीं । कार्याकारण सर्व कांहीं । संसार करित असतांहि । समाधान ॥ ३० ॥

जगदीशापेक्षाही श्रेष्ठ लाभ नाही,तो लाभ झाला म्हणजे आवश्यक तेवढे संसारातील उद्योगधंदे करीत असतानाही समाधान ढळत नाही (परमात्मलाभापेक्षा अपर लाभ नाही,सर्व काही इहलोकी कार्याकारण मिळालेले येथल्या येथेच राहते हे जाणून संसार करीत असला तरी जीवास समाधान होते )

मागां होते जनकादिक । राज्य करितांहि अनेक । तैसेचि आतां पुण्यश्लोक । कित्येक असती ॥ ३१ ॥

राज्य करीत असतानाही आत्मसमाधान ढळू न देणारे असे जनकादिक अनेक पुण्यश्लोक पूर्वी होते.तसे हल्लीही पुष्कळ आहेत. (मागे जनकादिक राज्य करीत असतानाही परमात्मसुख भोगीत होते.आताही असे पुण्यश्र्लोक आहेत.)

राजा असतां मृत्यु आला । लक्ष कोटी कबुल जाला । तरि सोडिना तयाला । मृत्य कांहीं ॥ ३२ ॥

एकदा मृत्यू आला आणि मग तो जरी राजा असला व त्याने लाखो,कोट्यावधि द्रव्य देण्याचे कबूल केले तरी त्यास मृत्यु सोडणार नाही (मृत्यु आला असता लक्षावधि रुपये देऊ करणाऱ्या राजालाही मृत्यु सोडत नाही)

ऐसें हें पराधेन जिणें । यामधें दुखणें बाहाणें । नाना उद्वेग चिंता करणें । किती म्हणोनि ॥ ३३ ॥

असे हे जिणे (आयुष्य) पराधीन (कालवश) आहे. शिवाय त्यात दुखणीबाणी अनेक प्रकारच्या काळज्या व उद्वेग अशा किती अडचणी सांगाव्या?

हाट भरला संसाराचा । नफा पाहावा देवाचा । तरीच या कष्टाचा । परियाये होतो ॥ ३४ ॥

( परियाये - मोबदला )

हा संसाराचा बाजार (हाट) भरला असून त्यात (नरदेहाच्या भांडवलावर) देवाची प्राप्ति हाच नफा मिळवावा, तर गर्भवासादि यातना भोगल्याचे (चीज) सार्थक होते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे काळरूपनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : यत्नशिकवण ॥ श्रीराम ॥**

दुर्बल नाचारी वोडगस्त । आळसी खादाड रिणगस्त । मूर्खपणें अवघें वेस्त । कांहींच नाहीं ॥ १ ॥

( नाचारी - निराश्रित , वोडगस्त - ओढग्रस्त,दारिद्र्य )

(प्रश्न)दुबळा, अनाचारी,ओढग्रस्त,आळशी,खादाड,कर्जबाजारी, मूर्खपणामुळे सारे अव्यवस्थित झालेले,सारे गमावून बसलेला जवळ काहीच उरले नाही असा कोणी माणूस आहे.

खाया नाहीं जेवाया नाहीं।लेया नाहीं नेसाया नाहीं ।अंथराया नाहीं पांघराया नाहीं । कोंपट नाहीं अभागी॥२॥

त्याच्याजवळ खायला,जेवायला अन्न नाही,अंगावर घालायला,नेसायला,अंथरायला,पांघरायला काही नाही.राहायला कोंपट (खोपट) सुद्धा नाही.असा तो करंटा इतका दुर्दैवी!

सोयेरे नाहीं धायेरे नाहीं । इष्ट नाहीं मित्र नाहीं । पाहातां कोठें वोळखी नाहीं ।आश्रयेंविण परदेसी ॥ ३ ॥

सोयरेधोयरे किवा इष्टमित्र त्याला कोणीच नाहीत,पाहू गेले तर कोठे कोणाची ओळख नाही.असा तो निराश्रित परदेशी आहे.

तेणें कैसें करावें । काये जीवेंसीं धरावें । वाचावें किं मरावें । कोण्या प्रकारें ॥ ४ ॥

त्याने काय करावे? कोणती गोष्ट मनात धरावी? त्याने जगावे किवा मरावे? आणि ते कोणत्या प्रकाराने?

ऐसें कोणीयेकें पुसिलें । कोणी येकें उत्तर दिधलें । श्रोतीं सावध ऐकिलें । पाहिजे आतां । ५ ॥

असा कोणी एकाने प्रश्न केला त्याला दुस-या एकाने उत्तर दिले ते श्रोत्यांनी आता सावधपणाने ऐकले पाहिजे.

लाहानथोर काम कांहीं । केल्यावेगळें होत नाहीं । करंट्या सावध पाहीं । सदेव होसी ॥ ६ ॥

उत्तर- कोणतेही लहानमोठे काम केल्यावाचून काही (आपोआप) व्हायचे नाही ह्यासाठी,करंट्या! नीट विचार कर म्हणजे तू सुद्धा भाग्यवान होशील (लहानथोर न म्हणता काम करावयास लाग म्हणजे तुझेही नशीब उघडेल)

अंतरीं नाहीं सावधानता । येत्न ठाकेना पुरता । सुखसंतोषाची वार्ता । तेथें कैंची ॥ ७ ॥

अंतःकरणात दक्षता नाही यत्न पुरता करवत नाही अशा ठिकाणी सुख व संतोष ह्याचे नाव तरी कसे निघेल?(जो अंतरी सावध नाही व पुरा प्रयत्न करीत नाही त्याला सुखसंतोष कोठून मिळणार?)

म्हणोन आळस सोडावा । येत्न साक्षेपें जोडावा । दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ॥ ८ ॥

म्हणून आळस टाकून मोठ्या तत्परतेने प्रयत्न करावा आणि हरप्रकारे प्रयत्न करून दुश्चितपणाचा बीमोड करून टाकावा.

प्रातःकाळीं उठत जावें । प्रातःस्मरामि करावें । नित्य नेमें स्मरावें । पाठांतर ॥ ९ ॥

(आता काय करावे ते सांगतो) दररोज प्रातःकाळी उठून प्रातःस्मरण करावे आणि नित्यनेमाने पाठ केलेल्याची पुनरावृत्ति करीत जावी.

मागील उजळणी पुढें पाठ । नेम धरावा निकट । बाष्कळपणाची वटवट । करूंच नये ॥ १० ॥

अशाप्रकारे पूर्वी पाठ झालेल्याची पुनरावृत्ति (उजळणी) करून पुढे नवीन पाठ करण्याचा दृढ नियम करावा,कधीही बाष्कळपणाची बडबड करू नये.

दिशेकडे दुरी जावें । सुचिस्मंत होऊन यावें । येतां कांहीं तरी आणावें । रितें खोटें ॥ ११ ॥

शोचास दूर जावे (शोचादि देहधर्म सारावयास गावाबाहेर लांब जावे) नंतर हातपाय वगैरे धुउन निर्मळ होऊन यावे (स्नानाचमनादि करून शुद्ध होऊन यावे ) पण येताना काहीतरी घेऊन यावे रिकाम्या हाताने येणे बरे नव्हे.

धूतवस्त्रें घालावीं पिळून । करावें चरणक्षाळण । देवदर्शन देवार्चन । येथासांग ॥ १२ ॥

वस्त्रे धुऊन पिळून वाळत घालवी,हातपाय धुवावे,देवाचे दर्शन घेऊन देवाची यथासांग पूजा करावी (देवदर्शन,देवपूजन यथाशास्त्र संपूर्ण करावे.)

कांहीं फळाहार घ्यावा । पुढें वेवसाये करावा । लोक आपला परावा । म्हणत जावा ॥ १३ ॥

नंतर थोडा फराळ केल्यावर,आपल्या उद्योगधंद्यास लागावे ( तो उद्योग करत असताना) परक्या मनुष्या लाही आपलेपणाने वागवावे (आपलेसे करून घ्यावे हे मुख्य सूत्र ध्यानी धरून व्यवसाय करावा)

सुंदर अक्षर ल्याहावें । पष्ट नेमस्त वाचावें । विवरविवरों जाणावें । अर्थांतर ॥ १४ ॥

सुंदर अक्षर लिहावे स्पष्ट सावकाश व नेमस्त वाचावे आणि मनन करकरून अर्थातील रहस्य जाणून घ्यावे (सगळा अर्थ जाणून घ्यावा)

नेमस्त नेटकें पुसावें । विशद करून सांगावें । प्रत्ययेंविण बोलावें । तेंचि पाप ॥ १५ ॥

कोणाला काही विचारावयाचे ते स्पष्ट व योग्यप्रकारे विचारावे,कोणी विचारल्यास सांगावयाचे असेल ते खुलासेवार स्पष्ट व प्रांजळपणे सांगावे.आणि अनुभवाशिवाय बोलू नये तसे बोलणे पाप आहे असे समजावे.

सावधानता असावी । नीतिमर्यादा राखावी । जनास माने ऐसी करावी । क्रियासिद्धि ॥ १६ ॥

( जनास माने - लोकास मानवेल,आवडेल असे )

सावधपणाने (दक्षतेने) सर्वत्र वागावे, नीतीची मर्यादा सांभाळावी,आणि लोकांना पसंत पडेल असे आचरण असावे.( नीतिन्याय राखावा लोकांस मानेल असे वागून दाखवावे- कर्म सिद्धीस नेऊन दाखवावे म्ह.अपेशी असे म्हणून घेऊ नये.)

आलियाचें समाधान । हरिकथा निरूपण । सर्वदा प्रसंग पाहोन । वर्तत जावें ॥ १७ ॥

आलेल्यांचे (अतिथी-अभ्यांगतांचे) समाधान करावे,हरिकथा किवा निरुपण करीत जावे आणि नेहमी प्रसंग पाहून वागावे.

ताळ धाटी मुद्रा शुद्ध । अर्थ प्रमये अन्वये शुद्ध । गद्यपद्यें दृष्टांत शुद्ध । अन्वयाचे ॥ १८ ॥

ताल,छंद-घाटी(म्हणण्याची पद्धत),मुद्रा(चेहेरा,हावभाव) ही (गातांना) शुद्ध असावी,(श्र्लोकार्थ) अर्थ,सिद्धांत व अन्य हेही शुद्ध असावे (बिनचूक सांगावे) तसेच गद्य,पद्य व दृष्टांत हे शुद्ध असून सुसंबद्ध असावे. (गद्यपद्यातील सुंदर प्रत्ययाचे दृष्टांत द्यावे)

गाणें वाजवणें नाचणें । हस्तन्यास दाखवणें । सभारंजकें वचनें । आडकथा छंदबंद ॥ १९ ॥

गाणे,बजावणे,नाचणे,हावभाव करणे (हावभावांसहित भाषण) मनोरंजक वचने,उपकथा विविध छंदातील पद्ये अशी असावीत कि तेणेकरून,

बहुतांचें समाधान राखावें । बहुतांस मानेल तें बोलावें । विलग पडों नेदावें । कथेमधें ॥ २० ॥

बहुतेकांस संतोष वाटावा,अनेक जणांचे समाधान व्हावे.पुष्कळाना पटेल असे बोलावे.कथेमध्ये विसंगतपणा होऊ देऊ नये. (कथेत बेरंग होऊ देऊ नये)

लोकांस उदंड वाजी आणूं नये । लोकांचे उकलावें हृदये । तरी मग स्वभावें होये । नामघोष ॥ २१ ॥

( वाजी - जिकरीस )

लोकांना फार कंटाळा येईल ( वाजी-जिकीर होईल) असे बोलू नये,त्यांची अंतःकरणे प्रसन्न करावी,म्हणजे ते आपोआप नामघोष करू लागतात.( जनांची हृदये उकलून लोक सहज स्फूर्तीने नामघोष करतील असे बोलावे.)

भक्ति ज्ञान वैराग्य योग । नाना साधनाचे प्रयोग । जेणें तुटे भवरोग । मननमात्रें ॥ २२ ॥

भक्ति,ज्ञान,वैराग्य योग ज्यांचे मनन केल्यानेच संसाररूप रोगाचे निवारण होईल अशा अनेक साधनांचे प्रयोग (कथेत सांगावे ) (बोलण्यात भक्ति,ज्ञान,वैराग्य योग व अनेक साधनांचे मार्ग विशद करून सांगावे) कि त्या श्रवणाच्या मननाने भवरोग निवारण व्हावे.

जैसें बोलणें बोलावें । तैसेंचि चालणें चालावें । मग महंतलीळा स्वभावें । आंगीं बाणे ॥ २३ ॥

जसे बोलणे बोलावे त्याच रीतीने वागत जावे म्हणजे महंती (- ची ढब,ऐट,ऐश्र्वर्य ) सहजच अंगी बाणते ( स्वतः आपण बोलल्यासारखे चालावे म्हणजे महंतलीला अंगी बाणतात)

युक्तिवीण साजिरा योग । तो दुराशेचा रोग । संगतीच्या लोकांचा भोग । उभा ठेला ॥ २४ ॥

योग- महंतीचे कार्य चांगले असले तरी ते कौशल्यावाचून असेल तर तो दुराशेचा (स्वार्थाचा) रोग असे समजावे संगतीच्या लोकांचा भोग मात्र त्यामुळे उभा राहतो (ओढवतो) (युक्तीवाचून-जीव परमात्मसंयोगावाचून-योग म्हणजे ती दुराशेची पोथी होय. संगतीच्या लोकांचा भोग मात्र ओढवतो. अभेदभक्ति म्ह. युक्ति दुराशा म्ह.लोभ असे करू नये.)

ऐसें न करावें सर्वथा । जनास पावऊं नये वेथा । हृदईं चिंतावें समर्था । रघुनाथजीसी ॥ २५ ॥

जनावर ओझे घालून त्यांना त्रास देऊ नये. अंतःकरणामध्ये समर्थ श्रीरामचंद्रांचे ध्यान करीत असावे.

उदासवृत्तिस मानवे जन । विशेष कथानिरूपण । रामकथा ब्रह्मांड भेदून । पैलाड न्यावी ॥ २६ ॥

(निरपेक्ष निर्दंभ वागणे) उदासीनवृत्ति लोकांना फार आवडते, विशेषकरून कथानिरुपण (अध्यात्मनिरुपण) करीत असावे ( व श्रीरामकथने ब्रह्मांड भेदावे ) श्रीरामचंद्रांची कथा ब्रह्मांडाच्या पलीकडे न्यावी.

सांग महंती संगीत गाणें । तेथें वैभवास काय उणें । नभामाजी तारांगणें । तैसे लोक ॥ २७ ॥

( सांग - सर्व अंगे व लक्षणांनी युक्त )

सर्व (उपर्युक्त) लक्षणांनी युक्त अशी महंती व सुंदर गायन अशी जोड जमेल तेथे वैभवाला काय कमी आहे? अशा पुरुषाजवळ आकाशातील ता-यांप्रमाणे असंख्य लोक गोळा होतात.

आकलबंद नाहीं जेथें । अवघेंचि विश्कळित तेथें । येकें आकलेविण तें । काये आहे ॥ २८ ॥

(पण बुद्धि मोठी पाहिजे,अकलेवाचून कोणाला काय साधायचे आहे?) ज्या ठिकाणी अकलेची (बुद्धीची) मर्यादा नाही तेथे सगळा गोंधळ असतो.एका अकले शिवाय जगात दुसरे काय आहे? (अरे जेथे अकलेचा बंद नाही तेथे सारा गोधळच अकलेवाचून गुण असून माणूस वाया जातो.)

घालून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड । तेथें कैचें आणिले द्वाड । करंटपण ॥ २९ ॥

म्हणून अकलेचा तणावा मोठा असावा,अकलेचा विस्तार करून ब्रह्मांडापेक्षाही मोठे व्हावे.ते सोडून त्या ठिकाणी हा अपेशी करंटपणा कोठून आणला? (-करंटपण कोठून राहील?)

येथें आशंका फिटली । बुद्धि येत्नीं प्रवेशली । कांहींयेक आशा वाढली । अंतःकर्णी ॥ ३० ॥

एव्हढ्याने शंकेचे निरसन झाले,प्रयत्न करण्यासाठी बुद्धि वळली व त्यामुळे अंतःकरणामध्ये (भाग्योदयाची) थोडीशी आशा उत्पन्न झाली (बुद्धि प्रयत्नशील झाली, श्रोत्यांच्या मनात कर्तुत्वाचा उत्साह भरला)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे यत्नशिकवणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : उत्तमपुरुषह्निरूपण ॥ श्रीराम ॥**

आपण येथेष्ट जेवणें । उरलें तें अन्न वाटणें । परंतु वाया दवडणें । हा धर्म नव्हे ॥ १ ॥

आपण यथेच्छ-पोटभर-जेवावे आणि उरलेले अन्न इतर जनास वाटून द्यावे पण ते उरलेले अन्न वाया घालविणे हा धर्म नव्हे.

तैसें ज्ञानें तृप्त व्हावें। तेंचि ज्ञान जनास सांगावें । तरतेन बुडों नेदावें । बुडतयासी ॥ २ ॥

( तरतेन - पोहणा-याने )

त्याप्रमाणे आपण ज्ञानाने तृप्त व्हावे आणि ते ज्ञान इतर जनास सांगावे पोहोणा-याने इतर जनास बुडू देऊ नये.

उत्तम गुण स्वयें घ्यावे । ते बहुतांस सांगावे । वर्तल्याविण बोलावे । ते शब्द मिथ्या ॥ ३ ॥

उत्तम गुणांचा आपण स्वीकार करावा,ते पुष्कळाना सांगावे, स्वतः वागल्याशिवाय (दुसऱ्यास) सांगणे व्यर्थ होय (सर्वांचे उत्तम गुण घ्यावे तेच घेण्यास लोकांस सांगावे,स्वतः बोलण्याप्रमाणे चालावे,नाही तर बोलणे फोल होते)

स्नान संध्या देवार्चन । येकाग्र करावें जपध्यान । हरिकथा निरूपण । केलें पाहिजे ॥ ४ ॥

स्नानसंध्या,देवपूजा,जप,ध्यान ही एकाग्रतेने करावी.हरिकथा व निरुपण श्रद्धेने करावे,

शरीर परोपकारीं लावावें । बहुतांच्या कार्यास यावें । उणें पडों नेदावें । कोणियेकाचें ॥ ५ ॥

(परोपकाराच्या कामी शरीर लावावे) पुष्कळ लोकांच्या उपयोगी पडावे,कोणाचेही कमी पडू देऊ नये.

आडले जाकसलें जाणावें । यथानशक्ति कामास यावें । मृदवचनें बोलत जावें । कोणीयेकासी ॥ ६ ॥

( जाकसलें - गंजलेले )

अडलेले किवा गांजलेले (जसकले) कोण आहे ते जाणून घेऊन यथाशक्ति त्याच्या उपयोगी पडावे कोणाबरोबरही (सर्वांशी) मृदू भाषण बोलत असावे (मधुर बोलावे)

दुसर्याच्या दुःखें दुःखवावें । परसंतोषें सुखी व्हावें । प्राणीमात्रास मेळऊन घ्यावें । बर्या शब्दें ॥ ७ ॥

दुस-याचे दु:ख पाहून आपण दु:खी व्हावे, दुस-याच्या संतोषाने आपण सुख मानावे,गोड बोलून प्राणीमात्रांना आपलेसे करावे (वश करून घ्यावे)

बहुतांचे अन्याये क्ष्मावे । बहुतांचे कार्यभाग करावे । आपल्यापरीस व्हावे । पारखे जन ॥८ ॥

पुष्कळ जणांना त्यांच्या अपराधाबद्दल क्षमा करावी,अनेकांची कामे करावी.स्वजनाप्रमाणे परक्यासही आपला वेध लावावा.

दुसर्याचें अंतर जाणावें । तदनुसारचि वर्तावें। लोकांस परीक्षित जावें । नाना प्रकारें ॥ ९ ॥

दुसऱ्याचे अंतःकरण (मनोगत) जाणून त्याप्रमाणे वागावे,लोकांची अनेकप्रकारे परीक्षा करावी.

नेमकचि बोलावें । तत्काळचि प्रतिवचन द्यावें । कदापी रागास न यावें । क्ष्मारूपें ॥ १० ॥

मित (थोडे व मुद्याचे) भाषण बोलावे,उत्तर तात्काळ द्यावे,मनात क्षमा बाळगून कधीही रागाऊ नये.

आलस्य अवघाच दवडावा । येत्न उदंडचि करावा । शब्दमत्सर न करावा । कोणीयेकाचा ॥ ११ ॥

आळस पार सगळा काढून टाकावा सपाटून प्रपंच-उद्योग करावा, कोणाचाही शब्दाने सुद्धा मत्सर करू नये.

उत्तम पदार्थ दुसर्यास द्यावा । शब्द निवडून बोलावा । सावधपणें करीत जावा । संसार आपला ॥ १२ ॥

आपल्या जवळ उत्तम पदार्थ असेल तो दुसऱ्यास द्यावा शब्द बोलवायचा तो विचार करून ( विवंचून नेमका शब्द) बोलावा. आपला संसार सावधपणे करावा.

मरणाचें स्मरण असावें । हरिभक्तीस सादर व्हावें । मरोन कीर्तीस उरवावें । येणें प्रकारें ॥ १३ ॥

आपणास मरण येणार आहे याची आठवण ठेऊन भगवंताच्या भक्तीला तत्पर व्हावे अशाप्रकारे मरणानंतरही कीर्ति राहील असे करावे (मरणाचे स्मरण ठेऊन हरिभजनी तत्पर असावे ह्याप्रमाणे वागल्यास मरणोत्तरही नाव निघते)

नेमकपणें वर्तों लागला । तो बहुतांस कळों आला । सर्व आर्जवी तयाला । काये उणें ॥१४ ॥

नियमितपणाचे (निश्र्चयाचे) वर्तन ठेवले म्हणजे अनेकांस त्याची माहिती होते,सगळे जण त्याच्याशी आर्जवाने वागतात मग त्याला काय कमी पडणार?

ऐसा उत्तम गुणी विशेष । तयास म्हणावें पुरुष । जयाच्या भजनें जगदीश । तृप्त होये ॥ १५ ॥

अशा उत्तम गुणांनी जो संपन्न (युक्त) त्यालाच पुरुष म्हणावे (तोच पुरुष खरा) त्याच्या भजनाने (भक्तीने) जगदीश्वर संतुष्ट होतो.

उदंड धिःकारून बोलती । तरी चळों नेदावी शांति । दुर्जनास मिळोन जाती । धन्य ते साधु ॥ १६ ॥

( चळों नेदावी - ढळू देऊ नये )

पुष्कळ लोक धि:क्कार करून बोलले तरी लेशमात्र शांति ढळू देऊ नये. अशा रीतीने दुर्जनांशी सुद्धा जे मिळून जातात ते साधू पुरुष धन्य होत.

उत्तम गुणीं श्रृंघारला । ज्ञानवैराग्यें शोभला । तोची येक जाणावा भला । भूमंडळीं ॥ १७ ॥

जो अशा उत्तम गुणांनी भूषित झालेला असतो आणि ज्ञान वैराग्याच्या योगाने शोभिवंत असतो तो एकटाच ह्या जगात भला होय (उत्तम गुणालंकृत ज्ञान-वैराग्य संपन्न पुरुष तोच त्रैलोक्यात धन्य होय.)

स्वयें आपण कष्टावें । बहुतांचें सोसित जावें । झिजोन कीर्तीस उरवावें । नाना प्रकारें ॥ १८ ॥

आपण स्वतः कष्ट (श्रम) करून अनेकांचे (अनेक प्रकार) सहन करावे अशा अनेक प्रकारांनी (काया-वाचा-मने) झिजून मागे कीर्ती ठेवावी (उरवावी).

कीर्ती पाहों जातां सुख नाहीं । सुख पाहातां कीर्ती नाहीं । विचारेंविण कोठेंचि नाहीं । सामाधान ॥ १९ ॥

किर्ती मिळवायला गेले तर सुख मिळत नाही व सुख (आळसाचे!) पाहिजे असेल तर कीर्ति व्हावयाची नाही (विवेकावाचून) विचाराशिवाय कोठेही समाधान मिळणार नाही.

परांतरास न लावावा ढका । कदापि पडों नेदावा चुका । स्मासीळ तयाच्या तुका । हानी नाहीं ॥ २० ॥

( तुका - महत्व )

दुस-याच्या अंतःकरणास धक्का लाऊ नये ह्यात कधीही चूक होऊ देऊ नये जो क्षमाशील असतो त्याचे महत्व कधीही कमी होत नाही.

आपलें अथवा परावें । कार्य अवघेंच करावें । प्रसंगीं कामास चुकवावें । हें विहित नव्हे ॥ २१ ॥

आपले असो दुसऱ्याचे असो सगळे काम करावे प्रसंगाला कामातून आंग काढावे (उपयोगी न पडावे) हे योग्य नव्हे चुकवणे अयोग्य होय.

बरें बोलतां सुख वाटतें । हें तों प्रत्यक्ष कळतें । आत्मवत परावें तें । मानीत जावें ॥ २२ ॥

गोड बोलले म्हणजे सुख वाटते हे तर प्रत्यक्ष (स्वतःला) कळतेच,म्हणून दुसऱ्याला आपल्या सारखे समजून वागवावे.

कठिण शब्दें वाईट वाटतें । तें तों प्रत्ययास येतें । तरी मग वाईट बोलावें तें । काये निमित्य ॥ २३ ॥

कठोर भाषणाने आपल्याला वाईट वाटते हा तर प्रत्यक्ष अनुभव आहे,तर मग दुसऱ्यास काय म्हणून वाईट बोलावे?

आपणास चिमोट घेतला । तेणें कासाविस जाला । आपणावरून दुस-याला । राखत जावें ॥ २४ ॥

आपल्यास कोणी चिमटा घेतला तर जीव कासावीस होतो (हे मनात आणून ) आपल्या सारखेच दुसऱ्याचेहि संरक्षण करावे (आत्मवत दुसऱ्याला पाहावे).

जे दुस-यास दुःख करी । ते अपवित्र वैखरी । आपणास घात करी । कोणियेके प्रसंगीं ॥ २५ ॥

( अपवित्र वैखरी - दुसऱ्यास दुःख देणारी वैखरी )

दुसऱ्यास दुःख देणारी (दुसऱ्याचे अंतःकरण भेदणारी वैखरी ) वाणी अपवित्र होय.ती एखादे वेळी आपला सुद्धा घात करावयाची !

पेरिलें ते उगवतें । बोलण्यासारिखें उत्तर येतें । तरी मग कर्कश बोलावें तें । काये निमित्य ॥ २६ ॥

पेरावे तेच उगवते त्याचप्रमाणे जसे बोलावे तसे उलट उत्तर (प्रत्युतर) येते. तर मग काय म्हणून कठोर बोलावे?

आपल्या पुरुषार्थवैभवें । बहुतांस सुखी करावें । परंतु कष्टी करावें । हे राक्षेसी क्रिया ॥ २७ ॥

आपल्या कर्तुत्वाने पुष्कळांस सुखी करावे पण (उलट) दु:ख देणे ही राक्षसी क्रिया होय.

दंभ दर्प अभिमान । क्रोध आणी कठिण वचन । हें अज्ञानाचें लक्षण । भगवद्गीतेंत बोलिलें ॥ २८ ॥

दंभ,दर्प(ताठा),अभिमान,क्रोध,कठोर वचन हे अज्ञानाचे लक्षण होय असे भगवद्गीतेत सांगितले आहे.

जो उत्तम गुणें शोभला । तोचि पुरुष माहां भला । कित्येक लोक तयाला । शोधीत फिरती ॥ २९ ॥

जो पुरुष उत्तम गुणांनी अलंकृत असतो तोच पुरुष मोठा,चांगला होय किती तरी लोक त्याचा शोध घेत हिंडत असतात.

क्रियेविण शब्दज्ञान । तेंचि स्वानाचें वमन । भले तेथें अवलोकन । कदापी न करिती ॥ ३० ॥

स्वतः क्रिया केल्याशिवाय (वागल्याशिवाय) नुसते शाब्दिक ज्ञान बडबडणे हे कुत्र्याच्या ओकारीप्रमाणे (वमनासारखे तृच्छ होय) शहाणे लोक त्याच्याकडे कधीही ढुंकून सुद्धा पाहत नाहीत.

मनापासून भक्ति करणें । उत्तम गुण अगत्य धरणें । तया माहांपुरुषाकारणें । धुंडीत येती ॥ ३१ ॥

देवाची भक्ति मनापासून करतो आणि उत्तम गुणांचे अवश्य ग्रहण करतो अशा महापुरुषाला लोक शोधीत येतात.

ऐसा जो माहानुभाव। तेणें करावा समुदाव । भक्तियोगें देवाधिदेव । आपुला करावा ॥ ३२ ॥

असा जो कोणी महात्मा असेल त्याने समुदाय करावा आणि भक्तीच्या योगाने देवाधिदेव आपलासा करावा.

आपण आवचितें मरोन जावें । मग भजन कोणें करावें । याकारणें भजनास लावावे । बहुत लोक ॥ ३३ ॥

आपण एकाएकी मरून गेल्यावर मग पाठीमागे देवाचे भजन कोणी करावे? ह्यासाठी भजनाला अनेक लोक लावावे (आपण मेल्यावर मग भजन कोणी करील? म्हणून जनसमुदाय भक्ती मार्गास लावावा)

आमची प्रतिज्ञा ऐसी । कांहीं न मागावें शिष्यासी । आपणामागें जगदीशासी । भजत जावें ॥ ३४ ॥

आमची तर अशी प्रतिज्ञा आहे कि शिष्याजवळ दुसरे तिसरे काही मागवायचे नाही एकच मागणे ते हे कि आमच्या मागे जगदीश्वराचे भजन त्याने करावे (त्याने फक्त आपल्या मागे भक्तिमार्ग चालवावा)

याकारणें समुदाव । जाला पाहिजे मोहोत्छाव । हातोहातीं देवाधिदेव । वोळेसा करावा ॥ ३५ ॥

(ह्याकरिता समुदाय व महोत्सव सुरु करून देव हातोहाती बोलता होईल अशी उपासना वाढवावी) म्हणून समुदाय जमवून देवाचे मोठे मोठे उत्सव झाले पाहिजेत देवाधिदेव हातोहात प्रसन्न होईल असे करावे.

आता समुदायाकारणें । पाहिजेती दोनी लक्षणें । श्रोतीं येथें सावधपणें । मन घालावें ॥ ३६ ॥

आता समुदाय गोळा करण्यासाठी दोन गुण (लक्षणे) पाहिजेत,त्याकडे श्रोत्यांनी नीट लक्ष द्यावे.(प्रबोधशक्ती व बोलण्याप्रमाणे क्रिया हि ती दोन लक्षणे होत)

जेणें बहुतांस घडे भक्ति । ते हे रोकडी प्रबोधशक्ति । बहुतांचें मनोगत हातीं । घेतलें पाहिजे ॥ ३७ ॥

(प्रबोधशक्तीच्या योगाने बहुत जन भक्तीला लागतात तिच्या सहायाने लोक वेधावेत) उत्तम गुण स्वतः घेणे व प्रबोध शक्ती हे ते दोन गुण,जिच्या योगे अनेक लोकांस भक्तिमार्ग लागतो ती ही प्रत्यक्ष प्रबोधशक्ति होय (तिच्या साह्याने) अनेक लोकांचे मनोगत आपल्या हाती घेतले पाहिजे.

मागा बोलिले उत्तम गुण । तयास मानिती प्रमाण । प्रबोधशक्तीचें लक्षण । पुढें चाले ॥ ३८ ॥

उत्तम गुण पूर्वीच सांगितले आहेत ते लोक मान्य करतातच (मागे सांगितलेले उत्तम गुण म्ह.अशा गुणी माणसास लोक मानतातच) आता प्रबोधशक्तीचे लक्षण (वर्म) पुढे सांगतो.

बोलण्यासारिखें चालणें । स्वयें करून बोलणें । तयाचीं वचनें प्रमाणें । मानिती जनीं ॥ ३९ ॥

ते हे कि जो बोलण्याप्रमाणे चालतो वागतो स्वतः आधी करून मग दुसऱ्यास सांगतो त्याच्याच बोलण्यावर लोकांचा विश्वास बसतो (त्याच्या प्रबोधावर म्ह.उपदेशवचनांवर लोकांचा विश्वास बसतो)

जें जें जनास मानेना । तें तें जनहि मानीना । आपण येकला जन नाना । सृष्टिमधें ॥ ४० ॥

जे जे (त्याचे करणे) लोकास पसंत पडत नाही ते ते लोकही अमान्य करतात ( त्याच्या मंहतीमुळे दबून त्याच्या करण्यास मान डोलावीत नाहीत) आपण एकटा एकीकडे व बहुजन समाज एकीकडे अशी स्थिति होते.

म्हणोन सांगाती असावे । मानत मानत शिकवावे । हळु हळु सेवटा न्यावे । विवेकानें ॥ ४१ ॥

ह्यासाठी सोबती (अनुयायी) असावे त्यास पटेल अशा रीतीने शिकवीत शिकवीत विवेकाच्या योगाने हलके हलके मार्गावर आणावे (आपल्यासारखे त्यांना करावे)

परंतु हे विवेकाचीं कामें । विवेकी करील नेमें । इतर ते बापुडे भ्रमें । भांडोंच लागले ॥ ४२ ॥

परंतु ही विवेकाची कामे आहेत ती विवेकी पुरुष खात्रीने करील,बाकीचे बिचारे भ्रमाने भांडावयास लागतात (-इतर बापुडे जीव समुदाय करावयास जातात व भांडणे मात्र पिकवितात)

बहुतांसीं भांडतां येकला । शैन्यावांचून पुरवला । याकारणें बहुतांला । राजी राखावें ॥ ४३ ॥

( शैन्यावांचून पुरवला - सहकार्याशिवाय संपला )

एकटाच इसम अनेकांशी भांडू लागला तर सैन्यावाचून पुरा पडेल काय? म्हणून पुष्कळ लोकांस संतुष्ट राखावे (समस्ताना राजी राखावे)

**(ब्रह्माचा अनुभव येण्यास बुद्धी सूक्ष्म करणे आवश्यक आहे त्यासाठी मुमुक्षु होऊन साधकाची वाटचाल करावी लागते तरच आपल्याला हवा तसा फरक घडून येईल व अदृश्य झालेले ब्रह्म प्रकट होईल जे सामान्य लोक करत नाहीत )**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उत्तमपुरुषनिरूपणनाम समास दहावा ॥ दशक बारावा समाप्त ॥**

# सार्थ श्रीदासबोध दशक तेरावा - नामरूप



**दशक तेरावा : नामरूप**
**समास पहिला : आत्मानात्मविवेक ॥ श्रीराम ॥**

आत्मानात्मविवेक करावा । करून बरा विवरावा । ववरोन सदृढ धरावा । जीवामधें ॥ १ ॥

आत्मानात्मविवेक करून त्याचे निट विवरण (मनन) करावे.व विवरण केल्यावर तो विवेक अंतःकरणात बळकट ठेवावा.

आत्मा कोण अनात्मा कोण । त्याचें करावें विवरण । तेंचि आतां निरूपण । सावध ऐका ॥ २ ॥

आत्मा कोण व अनात्मा कोण ह्याचे विवरण करावयाचे त्याचेच निरुपण आता सावधपणे ऐका.

च्यारि खाणी च्यारि वाणी । चौर्यासि लक्ष जीवप्राणी । संख्या बोलिली पुराणीं । वर्तती आतां ॥ ३ ॥

चार खाणींच्या व चार वाणींच्या मिळून चौ-यांशी (८४) लक्ष जीवयोनि आहेत,अशी संख्या पुराणात सांगितली आहे आणि प्रस्तुत प्रचलितही आहे.

नाना प्रकारीचीं शरीरें । सृष्टींत दिसती अपारें । तयामधें निर्धारें । आत्मा कवणु ॥ ४ ॥
( अपारें - असंख्य)

सृष्टीमध्ये अनेक प्रकारची शरीरे दृष्टीस पडतात.त्यांच्यामध्ये खरोखर आत्मा कोणता? (-त्यात आत्म्याचा निश्र्चय कसा करायचा?)

दृष्टीमधें पाहातो । श्रवणामध्यें ऐकतो । रसनेमध्यें स्वाद घेतो । प्रत्यक्ष आतां ॥५ ॥

(तो आत्मा) डोळ्यांनी पहातो,कानांनी ऐकतो आणि जिभेच्या (रसना) द्वाराने प्रत्यक्ष रुची जाणून घेतो

घ्राणामधें वास घेतो । सर्वांगी तो स्पर्शतो । वाचेमधें बोलवितो । जाणोनि शब्द ॥ ६॥
(घ्राणामध्ये) नाकाने वास घेतो,सर्व अंगामध्ये स्पर्श जाणतो,शब्दांचा अर्थ जाणून घेऊन वाणीने बोलवितो (वाचेने शब्द जाणून उच्चारतो)

सावधान आणि चंचळ । चहुंकडे चळवळ । येकलाचि चालवी सकळ । इंद्रियेंद्वारा ॥ ७ ॥

(तो आत्मा) सावधान व चंचळ इतका आहे की एकटाच सगळ्या इंद्रियांच्या द्वारांनी (देहामध्ये) चोहोकडे वळवळ चालू ठेवतो (वळवळ करितो)

पाये चालवी हात हालवी । भृकुटी पालवी डोळा घालवी । संकेतखुणा बोलवी । तोचि आत्मा ॥ ८ ॥

जो पाय चालवितो,हात हलवितो,भुवया चढवितो,डोळे फिरवतो,संकेतचिन्हांनी बोलतो (मनोगत व्यक्त करतो) हे सर्व करतो तो आत्मा होय.

धिटाई लाजवी खाजवी । खोंकवी वोकवी थुंकवी । अन्न जेऊन उदक सेवी । तोचि आत्मा ॥ ९ ॥

धीटपणा करवितो,लाजवितो,खाजवितो,खोकायला,ओकायला,थुंकायला लावतो अन्न जेवून पाणी पितो (अन्नोदक सेवन करितो) तोच आत्मा होय.

मळमूत्रत्याग करी । शरीरमात्र सावरी । प्रवृत्ति निवृत्ति विवरी । तोचि आत्मा ॥ १० ॥
( सावरी - सावरतो )

मलमूत्रत्याग (विसर्जन) करतो,प्रत्येक शरीर सावरून धरतो आणि प्रवृत्ति व निवृत्ति ह्यांचे (प्रपंच-परमार्थाचे) विवरण करतो तोच आत्मा होय.

ऐके देखे हुंगे चाखे । नाना प्रकारें वोळखे । संतोष पावे आणी धाके । तोचि आत्मा ॥ ११ ॥

हुंगतो,पाहतो,ऐकतो,चाखतो (चव घेतो) अनेक प्रकारांनी (गुणधर्म) ओळखतो संतोष पावतो व भीति घेतो तोच आत्मा होय.

आनंद विनोद उदेग चिंता । काया छ्याया माया ममता । जीवित्वें पावे नाना वेथा ।तोचि आत्मा ॥ १२ ॥
( काया छ्याया - जिवंतपण,आत्म्याची छाया,जीवाला आत्म्याची छाया म्हणतात, जीवित्वें - जीवामुळे )

आनंद,उद्वेग,चिंता,काया,छाया,( जीव,आवरण,पटल ) ममता इत्यादि विकारात सापडून (ह्या सर्व विकारांशी आपलेपणाने एकत्व पावून) जीवपणामुळे अनेक व्यथा भोगणारा तो आत्मा.

पदार्थाची आस्था धरी । जनीं वाईट बरें करी । आपल्यां राखे पराव्यां मारी । तोचि आत्मा ॥ १३ ॥
( पराव्यां - परके )

नाना पदार्थांची आस्था (काळजी,आवड) धरतो.लोकांमध्ये बरी वाईट कामे करतो,स्वजनाचे रक्षण करून परक्यास मारतो तो आत्मा.

युध्ये होतां दोहिकडे । नाना शरीरीं वावडे । परस्परें पाडी पडे । तोचि आत्मा ॥ १४ ॥

युद्ध होऊ लागले म्हणजे दोन्ही पक्षातील अनेक शरीरात वावरत असतो,एकमेकास पाडतो व पडतो तो आत्मा होय

तो येतो जातो देहीं वर्ततो । हासतो रडतो प्रस्तावतो । समर्थ करंटा होतो । व्यापासारिखा ॥ १५ ॥

तो देहामध्ये येतो,जातो,वागतो,हांसतो,रडतो, पश्र्चाताप करतो ( पस्तावतो) आणि व्यापाप्रमाणे (उद्योगाप्रमाणे) श्रीमंत किवा भिकारी होतो. (उद्योगाच्या मानाने सभाग्य किवा करंटा होतो)

होतो लंडी होतो बळकट । होतो विद्यावंत होतो धट । न्यायेवंत होतो उद्धट । तोचि आत्मा ॥ १६ ॥
( लंडी - भ्याड,भित्रा, धट - दांडगट)

भित्रा (लंडी) होतो,बळकट होतो,विद्वान होतो,मूर्ख (ठोंब्या) होतो.न्यायी होतो,उध्दटही होतो तो आत्मा.

धीर उदार आणि कृपेण । वेडा आणि विचक्षण । उछक आणि सहिष्ण । तोचि आत्मा ॥ १७ ॥
( विचक्षण - चतुर, उछक - उच्छुंखल )

धीर (धैर्यशाली) उदार,कृपण,वेडा,शाहाणा (विचक्षण),उच्छृंखल,सहन करणारा (सहिष्णु) तो आत्मा.

विद्या कुविद्या दोहिकडे । आनंदरूप वावडे । जेथें तेथें सर्वांकडे । तोचि आत्मा ॥ १८ ॥

सुविद्या व कुविद्या या दोन्हीकडेही जो आनंदाने वावरतो आणि जेथे तेथे सर्वाकडे असतो तो आत्मा.

( आत्मा ज्ञानात व अज्ञानात सुखाने सर्वात वावरतो )

निजे उठे बैसे चाले । धावे धावडी डोले तोले । सोइरे धायेरे केले । तोचि आत्मा ॥ १९ ॥

निजतो,उठतो,बसतो,चालतो,धावतो,धाववितो, (धावडी),डोलतो,तोलतो,सोयरे-धायरे करतो तो आत्मा.

पोथी वाची अर्थ सांगे । ताळ धरी गाऊं लागे । वाद वेवाद वाउगे । तोचि आत्मा ॥ २० ॥
( वाउगे - उगाच )

पोथी वाचतो व अर्थ सांगतो,ताल धरतो व गाऊ लागतो,रिकामे वादविवाद करतो (वादविवाद करितो व निवांत बसतो ) हे सर्व करणारा तो आत्मा.
आत्मा नस्तां देहांतरीं । मग तें प्रेत सचराचरीं । देहसंगें आत्मा करीं । सर्व कांहीं ॥ २१ ॥

देहात आत्मा नसेल तर चराचरांत ते प्रेतच होय,देहाच्या संगतीने आत्मा सर्व काही करीत असतो.( आत्म्यावांचून देह म्हणजे ते प्रेतच, देहसंगाने आत्मा सर्व करितो )

येकेंविण येक काये । कामा नये वायां जाये ।म्हणोनि हा उपाये । देहयोगें ॥ २२ ॥

एकावाचून एक काही कामाचा नाही,व्यर्थ होतो म्हणून देहाचा व आत्म्याचा योग (मिलाफ) करून (सृष्टिव्यवहार करण्याची) ही युक्ती योजिली ( हा - उपाय व्यवहार देहयोगे आत्म्याचा देहाशी योग झाल्यामुळे चालतो)

देह अनित्य आत्मा नित्य । हाचि विवेक नित्यानित्य । अवघें सूक्ष्माचें कृत्य । जाणती ज्ञानी ॥ २३ ॥

ह्यापैकी देह अनित्य असून आत्मा नित्य आहे.असा विचार करणे,हाच आत्मानात्मविवेक किवा नित्यानित्यविवेक होय. पण हा सूक्ष्मबुद्धीचा विचार आहे हे ज्ञाते पुरुष जाणतात.

पिंडी देहधर्ता जीव । ब्रह्मांडीं देहधर्ता शिव । ईश्वरतनुचतुष्टये सर्व । ईश्वर धर्ता ॥ २४ ॥
( ईश्वरतनुचतुष्टये - ब्रह्मांडातील विराट,हिरण्यगर्भ,अव्याकृत,मूलप्रकृती हे चार )

पिंडातील चार देह धारण करणारा (देहाचा अभिमानी) तो जीव,ब्रह्मांडातील चारही देहधारी (ब्रह्मांडाभिमानी) तो शिव किंवा ईश्वर होय.

त्रिगुणापर्ता जो ईश्वर । अर्धनारीनटेश्वर । सकळ सृष्टीचा विस्तार । तेथून जाला ॥ २५ ॥

तो ईश्वर (मुळमाया) त्रिगुणाच्या पलीकडचा असून त्याला अर्धनारीनटेश्र्वर म्हणतात.त्याच्यापासून सर्व सृष्टीचा विस्तार झाला.

बरवें विचारून पाहीं । स्त्री पुरुष तेथें नाहीं । चंचळरूप येतें कांहीं । प्रत्ययासी ॥ २६ ॥
( बरवें - नीट )

नीट विचार करून पाहा म्हणजे त्या ठिकाणी स्त्रीत्व किवा पुरुषत्व नसून काहीसे चंचलरूप असल्याचा अनुभव येईल.( सूक्ष्म विचार करून पाहा म्हणजे कळेल की तो स्त्री नाही व पुरुष नाही तर चंचळ आहे त्याचे रूप प्रत्ययास येते.)

मुळींहून सेंवटवरी । ब्रह्मादि पिप्लीका देहधारी । नित्यानित्य विवेक चतुरीं । जाणिजे ऐसा ॥ २७ ॥
( पिप्लीका - मुंगी )

मूळमायेपासून शेवटपर्यंत (चार खाणी व चार वाणीपर्यंत,स्थूलपिंडापर्यंत) ब्रह्मादिदेवापासून मुंगीपर्यंत जेवढे देहधारी आहेत. (ते सारे अनित्य व त्यांना वागविणारा आत्मा तो नित्य.) त्या सर्वांच्या ठिकाणी अशा प्रकारे नित्यानित्यविवेक ज्ञात्यांनी पाहावा.

जड तितुकें अनित्य । आणि सूक्ष्म तितुकें नित्य । याहिमध्यें नित्यानित्य । पुढें निरोपिलें ॥ २८ ॥

जड तितके अनित्य व सूक्ष्म तितके नित्य हाच नित्यानित्यविवेक होय,ही नित्यानित्य विवेकाची पहिली पायरी,ह्या सूक्ष्मामध्येही नित्य काय आहे व अनित्य काय आहे हे पुढे (पुढील समासी) सांगितले आहे.

स्थूळ सूक्ष्म वोलांडिलें । कारण माहाकाराण सांडिलें ।विराट हिरण्यगर्भ खंडिलें । विवेकानें ॥ २९ ॥

पिंडाचे चार देह - स्थूल - सूक्ष्म कारण व महाकारण हे ओलांडून पुढे ब्रह्मांडाचे विराट हिरण्यगर्भ व अव्याकृत हे तीन देह मागे टाकून चौथा देह जो मूळप्रकृती-मूळमाया तेथे वरील नित्यानित्यविवेकाने प्रवृत्ति जाऊन बसली.तेथूनही ती वृत्ति सोडवून तिची निवृत्ति कशी करावयाची ते पुढे सांगतो.पिंडातील स्थूळ सूक्ष्म देह ओलांडून कारण व महाकारण देहास विसरला (मागे टाकले) आणि विवेकाने ब्रह्मांडातील विराट व हिरण्यगर्भ ह्या दोन देहाचे खंडण केले.

अव्याकृत मूळप्रकृती। तेथें जाऊन बैसली वृत्ती । तें वृत्ति व्हावया निवृत्ति । निरूपण ऐका ॥ ३० ॥
( अव्याकृत - अदृश्य, ईश्र्वरतनुचतुष्ट्यापैकी एक)

तदनंतर अव्याकृत व मूळप्रकृति ह्याठिकाणी वृत्ति जाऊन बसली ती वृत्ति निवृत्त होण्यासाठी (नाहीशी होण्यासाठी) पुढील निरुपण ऐका.

आत्मानात्माविवेक बोलिला । चंचळात्मा प्रत्यया आला ।पुढिले समासीं निरोपिला ।सारासार विचार ॥३१॥

ह्याप्रमाणे आत्मानात्मविवेक सांगितला त्यात आत्मा चंचलरूप आहे असे अनुभव आला आता पुढील समासात सारासार विचार सांगितला आहे (आत्मा कोण व अनात्मा कोण व आत्मा चंचलरूप का आहे हे ध्यानात ठेऊन आता सारासारविवेक सांगतो तिकडे अवधान द्यावे)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मानात्माविवेकनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : सारासारनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

ऐका सारासार विचार । उभारलें जगडंबर । त्यांत कोण सार कोण असार । विवेकें वोळखावा ॥ १ ॥
( सारासार - मूलतत्व ते सार बाकी सारा पसारा ते असार होय )

आता सारासार विचार ऐका,हा ब्रह्मांडाचा पसारा उभारला गेला आहे त्यात सार कोणते ते विचाराने (विवेकाने) ओळखावे ( म्हणजे सारासार विचार करावा )

**श्लोक: नसतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत: ।**
दिसेल तें नासेल । आणि येईल तें जाईल । जें असतचि असेल । तेंचि सार ॥ २ ॥

जे दिसेल ते नाश पावेल आणि जे येईल ते जाईल (आणि ह्या खेरीज) जे सारखे टिकणारे आहे तेच सार होय.

मागां आत्मानात्माविवेक बोलिला । अनात्मा वोळखोन सांडिला । आत्मा जाणतां लागला । मुळींचा मूळतंतु ॥ ३ ॥

पूर्वीच्या समासात आत्मानात्मविवेक सांगितला त्याच्या योगाने अनात्मा कोणता तो ओळखून टाकून दिला नंतर आत्म्याचे शोध घेता घेता मूळीचा - मूळ स्वरूपाचा मूळतंतु मूळधागा (मूळमाया) सापडला. (मागे अनात्मा ओळखून सोडला व आत्मा पाहाता मूळमायेपाशी गेलो.)

मुळीं जे राहिली वृत्ति । जाली पाहिले निवृत्ति । सारासार विचार श्रोतीं । बरा पाहावा ॥ ४॥
( मुळीं - मूळमाया )

(तिच्या ठायी जी वृत्ति राहिली ती निवृत्ति झाली की सार सापडते.) त्या मूळमायेच्या ठिकाणी बसलेली वृत्ति नाहीशी करण्यासाठी श्रोत्यांनी सारासारविचार नीट करावा.

नित्यानित्य विवेक केला । आत्मा नित्यसा निवडिला । निवृतीरूपें हेत उरला । निराकारीं ॥५॥

( हेत - चंचळ हेतू )
नित्यानित्यविवेक केला,तेव्हा त्यांत आत्मा नित्य समजून वेगळा काढला (आणि त्याचा विचार करता करता) मी ब्रह्म झालो-निवृत्त झालो अशी कल्पना-वृत्ति निराकार स्वरूपाच्या ठिकाणी शिल्लक उरली (आत्मा नित्य म्हणून घेतला व तेथे निवृत्तिरूपाने निराकारी हेतु उरला)

हेत म्हणिजे तो चंचळ । निर्गुण म्हणिजे निश्चळ । सारासारविचारें चंचळ । होऊन जातें ॥ ६॥

(हेतु हा चंचळ आणि परब्रह्म निर्गुण व निश्र्चळ आधी जडनिरासे चंचळ प्रचीतीस येते व चंचळनिरासे निश्र्चळ अनुभवास येते हा सारासारविवेक जड व चंचळ ह्या दोन्हीचा निरास करून निश्र्चळाशी तद्रूप होणे हे सार ) हा हेतु (कल्पना ,जाणीव ,वृत्ति ) म्हंटला की तो चंचळ असतो आणि निर्गुणब्रह्म हे निश्र्चळ असते.सारासारविचार केला म्हणजे चंचळ नाहीसे होऊन जाते.

चळे म्हणोनि तें चंचळ । न चळे म्हणोनि निश्चळ । निश्चळीं उडे चंचळ । निश्चयेसीं ॥ ७ ॥

चळते ( हालते ) म्हणूनच ते चंचळ आणि चळत नाही म्हणून ते निश्र्चळ त्या निश्र्चलाच्या (ब्रह्माच्या) ठिकाणी चंचळाचा खात्रीने नाश होतो (निश्र्चळाशी तद्रूप होणे म्हणजे चंचळाचा निरास होणे होय)

ज्ञान आणि उपासना । दोनी येकचि पाहाना । उपासनेकरितां जना । जगोद्धार ॥ ८ ॥

ज्ञानमार्ग व उपासनामार्ग हे दोन्ही (साध्याच्या दृष्टीने ) एकच परंतु (उपासनेने) (उपासना स्थूलरूपाने सामान्य लोकांस करता येत असल्यामुळे ) उपासनेच्या योगाने जनांचा उद्धार होतो (म्हणून ती अधिक उपयुक्त होय) (चंचळ म्हणजे मूळमाया हेच ज्ञान व हीच उपासना-उपास्य)

द्रष्टा साक्षी जाणता । ज्ञानधन चैतन्यसत्ता । ज्ञान देवचि तत्वता । बरें पाहा ॥ ९ ॥

ती चंचळ मूळमाया (देव) म्हणजेच द्रष्टा,साक्षी,जाणता,ज्ञानधन,चैतन्य व सत्ता होय.असे मूळमायारूप ज्ञान हाच उपासनेतील देव होय.नीट विचार करा.

त्या ज्ञानाचें विज्ञान होतें । शोधून पाहा बहुत मतें । चंचळ अवघें नासतें । येणेंप्रकारें ॥ १० ॥

त्या ज्ञानाचे ( मी ब्रह्म झालो ह्या कल्पनेचे ) विज्ञान होते (ती कल्पना लय पावते ) अशा प्रकारे चंचळ सगळे नाश पावते. अशाविषयी (पाहिजे तर) अनेक मते शोधून पहा ( त्या ज्ञानाचेच- चंचळाचेच- विज्ञान,निश्र्चळ होते,नानामतांचे पर्यवसान हेच आहे.,ह्याप्रमणे चंचळाचा निरास होतो.)

नासिवंत नासेल किं नासेना।ऐसा अनुमानचि आहे मना ।तरी तो पुरुष सहसा ज्ञाना ।अधिकार नव्हे॥११॥

नाशवंत चंचळाचा नाश होईल किवा न होईल अशी शंका ज्या पुरुषांच्या मनात राहाते तो ज्ञानाला सहसा अधिकारी नव्हे (नाशवंताबद्दल साशंक असणे म्हणजे ज्ञानाधिकार नाही असे दर्शविणे होय.)

नित्य निश्चये केला । संदेह उरतचि गेला । तरी तो जाणावा वाहावला । माहा मृगजळीं ॥ १२ ॥

(निश्र्चळाचा रोज निश्र्चय करितो व रोज पुन्हा साशंक होतो तो मृगजळात बुडाला असे समजावे दृश्यभासात्मक सर्व नाशवंत आहे असा निश्र्चय नित्य करूनही पुन्हा त्याच्या नाशाविषयी एखाद्यास शंका राहात गेली तर तो मृगजळाच्या मोठ्या पुरामध्ये वाहाणीस लागला असे समजावे.

क्षयेचि नाहीं जो अक्षई । व्यापकपणें सर्वां ठाईं । तेथे हेत संदेह नाहीं । निर्विकारीं ॥१३॥

ज्याला क्षय म्हणून नाही असे जे अक्षय आणि सर्व ठिकाणी व्यापक आहे अशा निर्विकाराच्या ठिकाणी हेतु कल्पना किवा शंका नाही .

जें उदंड घनदाट । आद्य मध्य सेवट । अचळ अढळ अतुट । जैसें तैसें ॥ १४ ॥

ते अनंत घनदाट भरलेले आहे आदि मध्ये व अंती अचल अढळ व अतुट जसेच्या तसेच आहे.

पाहातां जैसें गगन । गगनाहून तें सघन । जनचि नाहीं निरंजन । सदोदित ॥ १५ ॥

पाहायला जावे तर गगनासारखे आहेसे वाटते पण त्याच्यापेक्षाही घनदाट व त्याच्या ठिकाणी जनच नाहीत ते सदासर्वदा निरंजन आहे

चर्मचक्षु ज्ञानचक्षु । हा तों अवघाच पूर्वपक्षु । निर्गुण ठाईंचा अलक्षु । लक्षवेना ॥ १६ ॥

चर्मचक्षूने पाहाणे,ज्ञानचक्षूने पाहाणे असे बोलणे हा पूर्वपक्ष (मिथ्या) होय,निर्गुण हे मूळचेच अलक्ष्य आहे ते लक्षात येणार नाही (चर्मचक्षु ज्ञानचक्षु हा सर्व पूर्वपक्ष आहे,निर्गुण व निश्र्चळ ब्रह्म हे मुळी अलक्ष आहे तेथे त्रिपुटी नाही )

संगत्यागेंविण कांहीं । परब्रह्म होणार नाहीं । संगत्याग करून पाहीं । मौन्यगर्भा ॥ १७ ॥
( मौन्यगर्भा - मौनाच्या पोटात ब्रह्म )

मीचा संग सोडल्याशिवाय काही ब्रह्मस्वरूप होता येणार नाही म्हणून मीपणाच्या संगतीचा त्याग करून मोन्यगर्भ,अनिर्वाच्य अशा ब्रह्माचा विचार कर (चंचळाचाहि संग सोडल्याशिवाय ब्रह्मपदप्राप्ति नाही संग सोडून अनिर्वचनीय ब्रह्मसुख भोगावे)

निर्शतां अवघेंचि निर्शलें । चंचळ तितुकें निघोन गेलें। निश्चळ परब्रह्म उरलें । तेंचि सार ॥ १८ ॥

निरसन करू लागले म्हणजे सगळ्याच मायेचे निरसन होऊन जेवढे चंचळ म्हणून होते ते सर्व निघून जाते आणि निश्र्चळ परब्रह्म तेवढे उरते तेच सार होय (चंचळ निरसून गेल्यावर निश्र्चळ उरते तेच सार बाकी सारे असार )

आठवा देह मूळ माया । निर्शोन गेल्या अष्टकाया । साधु सांगती उपाया । कृपाळुपणें ॥ १९॥

आठवा देह जी मूळमाया तेथपर्यंतचे (स्थूळापासून मूळमायेपर्यंतचे) आठही देह निरास पावतात (ह्यासाठीच) साधू लोक कृपाळूपणे असा उपाय (उपदेश) सांगतात की

सोहं हंसा तत्वमसी । तें ब्रह्म तूं आहेसी । विचार पाहातां स्थिति ऐसी । सहजचि होते ॥ २० ॥

सोऽहम हंस: (सः अहं अहं सः।म्हणजे ते ब्रह्म मी आहे व मीच ब्रह्म आहे हे जाण) तत्वमसि। ते ब्रह्म तू आहेस ह्याचा विचार केला म्हणजे अशी स्थिति सहजच होते (म्हणजे सहजच ब्रह्मानुभव येतो)

साधक असोन ब्रह्म उरलें। तेथें वृत्तिसुन्य जालें। सारासार विचारिलें । येणें प्रकारें ॥ २१ ॥

( ब्रह्म होऊन बाह्य साधने करीत असता वृत्तिरहित पद विचाराने सारासारविचाराने प्राप्त होते ) बाह्यत: साधकाप्रमाणे वागून जे परब्रह्म होऊन उरले त्यांच्या ठिकाणी वृत्तिशून्यत्व सहजच येते अशाप्रकारे सारासारविचार करावयाचा असतो.

तें तापेना ना निवेना । उजळेना ना काळवंडेना । डहुळेना ना निवळेना । परब्रह्म तें ॥२२ ॥

ते परब्रह्म तापत नाही व निवत नाही,उजळत-स्वच्छ होत नाही व काळवंडत-काळे पडत नाही गढूळ होत नाही (मळत नाही) व निवळत नाही.

दिसेना ना भासेना । उपजेना ना नासेना ।तें येना ना जायेना । परब्रह्म तें ॥ २३ ॥

ते परब्रह्म (नेत्रांना) दिसत नाही किवा (मनाला) भासत नाही,उपजत नाही व मरत नाही,येत नाही व जात नाही.

तें भिजेना ना वाळेना । तें विझेना ना जळेना। जयास कोणीच नेईना । परब्रह्म तें ॥२४ ॥

जे भिजत नाही व वाळत नाही,जळत नाही व विझत नाही त्याला कोणीच नेत नाही असे आहे.

जें सन्मुखचि चहुंकडे । जेथें दृश्य भास उडे । धन्य साधु तो पवाडे । निर्विकारीं ॥ २५ ॥

ते जिकडे पाहावे तिकडे ओतप्रोत भरलेले व संमुखच असून त्याच्या ठिकाणी दृश्यभास नाहीसा होतो.(दृश्य व भास त्याच्यापुढे उडून जातो ) अश्या त्या निर्विकार ब्रह्माच्या ठिकाणी जो प्रवेश करतो (स्थिरावतो) तो साधु (सत्पुरुष) धन्य होय.

निर्विकल्पीं कल्पनातीत । तोचि वोळखावा संत । येर अवघेचि असंत । भ्रमरूप ॥ २६ ॥

कल्पनातीत होऊन (कल्पना सर्व नाहीशी करून) जो निर्विकल्पामध्ये राहतो तोच संत म्हणून समजावा.बाकीचे सगळे असंत व भ्रमिष्ट होत,(निर्विकल्प ब्रह्माला कल्पिणारा तोच संत होय,बाकीचे भ्रमरूप पामर होत.)

खोटें सांडून खरें घ्यावें । तरीच परीक्षवंत म्हणावें असार सांडून सार घ्यावें । परब्रह्म तें ॥ २७ ॥

खोटे टाकून देऊन खरे घेईल तरच त्याला परीक्षावंत म्हणावे,म्हणून असार (चंचळ,माया) टाकून देऊन सार असे परब्रह्म घ्यावे.(व्यवहारकुशल खोटे टाकून खरे घेतात संत असार टाकून सार घेतात-ह्यासच परीक्षावंत म्हणतात)

जाणतां जाणतां जाणीव जाते । आपली वृत्ति तद्रूप होते ।आत्मनिवेदन भक्ति ते । ऐसी आहे॥ २८ ॥

दृश्य,अंतरात्मा व जाणीव अशा क्रमाने एकेक जाणता जाणता (ओळखून टाकता टाकता) जाणीव म्हणजे ज्ञान वृत्तिही नाहीशी होते,कारण आपली ती वृत्ति ब्रह्माशी तद्रूप होते.अशी ही आत्मनिवेदनभक्ति आहे. (जाणता जाणता जाणीव ज्ञानवृत्ति-ज्ञेय जे ब्रह्मस्वरूप त्यात विरून जाते,वृत्ति तद्रूप होऊन निवृत्त होते ह्यालाच आत्मनिवेदन भक्ति असे म्हणतात)

वाच्यांशें भक्ति मुक्ति बोलावी । लक्ष्यांशें तद्रूपता विवरावी । विवरतां हेतु नुरावी । ते तद्रूपता ॥ २९॥

वाचेने भक्ति-मुक्तीचे वर्णन करावे आणि लक्षांश म्हणजे ज्ञेय जे परब्रह्म ते ज्ञानी आणून त्याच्याशी तद्रूपता कशी होते ह्याचे विवरण करावे ( व विवरता विवरता हेतुरहित होऊन विरून जावे.)

सद्रूप चिद्रूप आणि तद्रूप।सस्वरूप म्हणिजे आपलें रूप ।आपलें रूप म्हणिजे अरूप ।तत्वनिर्शनाउपरी॥३०॥

सद्रूप,चिद्रूप,तद्रूप,स्वस्वरूप म्हणजे आपले रूप होय.आपले रूप म्हणजे देह नव्हे तर देहाचा निरास झाल्यानंतर (तत्वनिरसनानात उरलेले) जे अरूप (किवा निर्विकल्प परब्रह्मस्वरूप ) म्हणजे आकाशरहित राहते ते होय.

**( मानवी जीवनात मनाला विशेष स्थान आहे,कारण द्‌वैत-अद्‌वैत,ज्ञान-अज्ञान,ब्रह्म-माया इत्यादि सर्व मनाचीच निर्मिती होय.पण मायाच मन उत्पन्न करते म्हणून मायेप्रमाणेच मनसुद्धा मिथ्याच असते हे आपण समजून घेणे आवश्यक असते.कल्पना मायेचे मूळ आहे. म्हणून मानवी मन सुद्धा कल्पनामयच असल्याने मायेच्या क्षेत्रात सर्वत्र कल्पनेचेच साम्राज्य असते हे ठीक आहे परंतु ति कल्पना मर्यादा ओलांडून ब्रह्माला गवसणी घालू पाहते तेव्हा अनावस्था प्रसंग येतो.साधकाने हे ध्यानात घेणे आवश्यक असते.)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सारासारनिरूपणनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : उभारणीनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

ब्रह्म घन आणि पोकळ । आकाशाहून विशाळ । निर्मळ आणि निश्चळ । निर्विकारी ॥ १ ॥
( घन - व्यापक )

ब्रह्म हे घनदाट व पोकळ,आकाशापेक्षा विस्तीर्ण,निर्मळ व निर्विकार असे आहे.

ऐसेंचि असतां कित्येक काळ । तेथें आरंभला भूगोळ । तया भूगोळांचे मूळ । सावध ऐका ॥ २ ॥

कित्येक काळपर्यंत ते असेच असता भूगोल उत्पन्न होण्यास आरंभ झाला “त्या भूगोलाची उत्पत्ति आता सावधपणे ऐका.”(असे असता काही काळाने तेथून सृष्टीरचना झाली,कशी ते ऐका.)
परब्रह्म असतां निश्चळ । तेथें संकल्प उठिला चंचळ । तयास बोलिजे केवळ । आदिनारायेण ॥ ३ ॥

परब्रह्म निश्र्चळ असता त्याच्या ठिकाणी निश्र्चळ असा संकल्प (बहुस्याम प्रजायेय । किवा एकोहं बहुस्याम।) उत्पन्न झाला त्याला आदिनारायण असे नाव आहे.

मूळमाया जगदेश्वर । त्यासीच म्हणिजे शड्‌गुणैश्वर । अष्टधा प्रकृतीचा विचार । तेथें पाहा ॥ ४ ॥

तो चंचळ आदिनारायण त्यालाच मूळमाया,जगदीश्वर,षडगुणेश्वर असेही म्हणतात.(ही सर्व त्या आदि संकल्पाचीच नावे आहेत) त्या ठिकाणी अष्टधा प्रकृति कशी असते ह्याचा विचार करा.

ऐलिकडे गुणक्षोभिणी । तेथें जन्म घेतला त्रिगुणीं । मूळ वोंकाराची मांडणी । तेथून जाणावी ॥ ५ ॥

मूळमायेच्या अलीकडे गुणक्षोभिणी (गुणमाया) असून तिच्यापासून तीन गुण (त्रिगुण) उत्पन्न झाले,येथून मूळ(ॐ)ओंकाराची मांडणी (रचना) झाली.

अकर उकार मकार । तिनी मिळोन वोंकार । पुढें पंचभूतांचा विस्तार । विस्तारला ॥ ६ ॥

अ,ऊ,म ह्या तीन मात्रा मिळून ॐ (ओम) कार होतो,पुढे पंचमहाभूतांचा विस्तार झाला.

आकाश म्हणिजेतें अंतरात्म्यासी । तयापासून जन्म वायोसी । वायोपासून तेजासी । जन्म जाला ॥ ७ ॥

अंतरात्म्याला (त्यापैकी) आकाश म्हणतात,त्याच्यापासून वायू झाला व वायूपासून तेज झाले.

वायोचा कातरा घसवटे । तेणें उष्णें वन्हि पेटे । सूर्यबिंब तें प्रगटे । तये ठाईं ॥ ८ ॥
( कातरा - कात्रीसारखे प्रवाह )

(दोन दिशांकडून येणाऱ्या) वायूच्या (कातरा) कात-याचे-घसटण्याचे-घर्षण होऊन त्या उष्णेतेपासून अग्नि उत्पन्न होतो व तेथे सूर्यबिंब प्रकट होते.

वारा वाजतो सीतळ । तेथें निर्माण जालें जळ । तें जळ आळोन भूगोळ । निर्माण जाला ॥ ९ ॥

तो वारा थंड वाहू लागला म्हणजे तेथे पाणी उत्पन्न झाले व ते पाणी आटून भूगोल झाला.

त्या भूगोळाचे पोटीं । अनंत बीजांचिया कोटी । पृथ्वी पाण्या होता भेटी । अंकुर निघती ॥ १० ॥

त्या भूगोलाच्या पोटात बीजांच्या असंख्य जाति (कोटी) आहेत.माती व पाणी एकत्र आली की अंकूर फुटतात (पृथ्वी पाण्याच्या संयोगाने अनंत प्रकारची बीजे वाढून त्याचे अंकुर निघाले )

पृथ्वी वल्ली नाना रंग । पत्रें पुष्पांचे तरंग । नाना स्वाद ते मग । फळें जाली ॥ ११॥

पृथ्वीवर अनेक रंगांच्या वेली,पाने,फुले ह्यांचे लोटच्या लोट उत्पन्न होऊन मग त्यापासून अनेक प्रकारच्या रुचीची फळे उत्पन्न झाली.

पत्रें पुष्पें फळें मुळें । नाना वर्ण नाना रसाळें। नाना धान्यें अन्नें केवळें । तेथून जालीं ॥ १२॥

अनेक रंगांची व अनेक रसांची पाने,फुले ,फळे,मुळे उत्पन्न झाली व त्यानंतर (पृथ्वीपासून) अनेक प्रकारची धान्ये व अन्ने निर्माण झाली.

अन्नापासून जालें रेत । रेतापासून प्राणी निपजत । ऐसी हे रोकडी प्रचित । उत्पत्तीची ॥ १३ ॥

अन्नापासून रेत झाले व रेतापासून प्राणी उत्पन्न झाले असा हा उत्पत्तीचा प्रत्यक्ष अनुभव आहे.

अंडज जारज श्वेतज उद्वीज । पृथ्वी पाणी सकळांचे बीज । ऐसें हें नवल चोज । सृष्टिरचनेचें ॥ १४ ॥
( चोज - मोठे )

अंडज,जारज,स्वेदज व उद्भिज्ज ( ह्या चार कोटींचे प्राणी झाले तथापि ह्या सर्वांचे बीज पृथ्वी व पाणी आहे असा हा सृष्टिटरचनेचा अद्भूत चमत्कार आहे (अशी ही सृष्टीच्या उभारणीची मोजेची कथा आहे)

च्यारि खाणी च्यारि वाणी । चौर्यासि लक्ष जीवयोनी । निर्माण झाले लोक तिनी । पिंडब्रह्मांड ॥ १५ ॥

अशा रीतीने चार खाणी चार वाणी चौ-र्याशीं लक्ष जीवयोनि,स्वर्गादि तिन्ही लोक मिळून सगळे पिंडब्रह्मांड उत्पन्न झाले (पिंडब्रह्मांड मिळून ८४ लक्ष जीवयोनी निर्माण झाल्या.

मुळीं अष्टधा प्रकृती । अवघे पाण्यापासून जन्मती । पाणी नस्तां मरती । सकळ प्राणी ॥ १६ ॥

मूळचे सगळे प्राणी (अष्टध्या प्रकृत्यात्मक सर्व प्राणी) पाण्यापासून जन्मतात व पाणी नसेल तर मरण पावतात.( पाण्यावाचून जीव मरतात हे उघड आहे.)

नव्हे अनुमानाचें बोलणें । याचा बरा प्रत्ययें घेणें । वेदशास्त्रें पुराणें । प्रत्ययें घ्यावीं ॥ १७ ॥

हे काही अनुभवाचे बोलणे नाही,ह्याचा नीट अनुभव घेऊन पाहावा (हे सर्व बोलणे प्रत्ययाचे आहे अनुमानाचे नाही ) वेदशास्त्रपुराणांतील सिद्धांत अनुभवाला पटतील (प्रत्यये- साक्षीला ) ते घ्यावे.

जें आपल्या प्रत्यया येना । तें अनुमानिक घ्यावेना । प्रत्ययाविण सकळ जना । वेवसाये नाहीं ॥ १८॥

जे आपल्या अनुभवास येत नाहीत असे अनुमानाचे विचार घेऊ नयेत.अनुभवाशिवाय सगळ्या लोकाना दुसरा व्यवसायच नाही ( जे अनुभवाला येत नाही ते केवळ अनुमानिक भाषण मानू नये,अनुभवावाचून जगात व्यवहार चालत नाही)
वेवसाये प्रवृत्ती निवृत्ती । दोहिंकडे पाहिजे प्रचिती । प्रचितीविण अनुमानें असती। ते विवेकहीन ॥ १९ ॥

प्रवृत्ति किवा निवृत्ति ह्यापैकी कोणताही व्यवसाय असो दोन्हीकडे अनुभव पाहिजे.अनुभव न घेता जे नुसते अनुमानावर विसंबतात ते विवेकहीन होत (प्रचीतीविण अनुमान कामाचे नाही )

ऐसा सृष्टिरचनेचा विचार । संकळित बोलिला प्रकार ।आतां विस्ताराचा संहार । तोहि ऐका ॥ २० ॥

असा सृष्टिरचनेचा विचार थोडक्यात सांगितला आहे. आता ह्या सृष्टिरचनेच्या विस्ताराचा संहार कसा होतो तेंही ऐका (सृष्टिरचनेची उभारणी सांगितली,आता संहारणी ऐका.)

मुळापासून सेवटवरी । अवघा आत्मारामचि करी । करी आणि विवरी । येथायोग्य ॥ २१ ॥

आदीपासून अंतापर्यंत सर्व काही आत्माराम करतो व तोच त्याचा विचारही करतो मुळापासून शेवटपर्यंत सृष्टिरचना करणारा आणि ती करून तिचे यथायोग्य विवरण करणारा एक आत्मारामाच होय.

पुढें संव्हार निरोपिला । श्रोतीं पाहिजे ऐकिला । इतुक्याउपरी जाला । समास पूर्ण ॥ २२ ॥

पुढे संहाराचे निरुपण केले आहे. ते श्रोत्यांनी ऐकावे.

**( मानवी जीवनात मनाला विशेष स्थान आहे कारण द्‌वैत-अद्‌वैत,ज्ञान-अज्ञान,ब्रह्म-माया इत्यादि सर्व मनाचीच निर्मिती होय.मायाच मन उत्पन्न करते म्हणून मायेप्रमाणे मन सुद्धा मिथ्याच असते,कल्पना मायेचे मूळ आहे.मानवी मन सुद्धा कल्पनामय असल्याने मायेच्या क्षेत्रात कल्पनेचेच साम्राज्य असते.परंतु ती कल्पना जेव्हा मर्यादा ओलांडून ब्रह्माला गवसणी घालते तेव्हा अनावस्था प्रसंग ओढवतो.)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उभारणिनिरूपणनाम समास तिसरा ॥**

**समास चौथा : प्रलयनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

पृथ्वीस होईल अंत । भूतांस मांडेल कल्पांत । ऐसा समाचार साध्यंत । शास्त्रीं निरोपिला ॥ १ ॥

पृथ्वीचा अंत होऊन पंचभूतास कल्पांत ओढवेल इत्यादि गोष्टी शास्त्रामध्ये साद्यंत सांगितल्या आहेत.

शत वरुषें अनावृष्टि । तेणें जळेल हे सृष्टि । पर्वत माती ऐसी पृष्ठी । भूमीची तरके ॥ २ ॥
( तरके - तडके )

शंभर वर्षे अनावृष्टि (अवर्षण) होऊन ही सृष्टि जाळून जाईल आणि पर्वतसुद्धां गडप होतील अशा प्रचंड भेगा पृथ्वीच्या पृष्ठभागाला पडतील ( पृथ्वीची पाठ इतकी फाटून जाईल की तिच्या भगदाडांत मोठेमोठे पर्वत गडप होतील.)

बारा कळीं सूर्यमंडळा । किर्णापासून निघती ज्वाळा । शत वरुषें भूगोळा । दहन होये ॥ ३ ॥

सूर्यमंडळ बारा कळांनी तळपेल व त्यांच्या किरणांपासून ज्वाळा निघू लागतील आणि शंभर वर्षे पर्यंत पृथ्वी सारखी जळत राहील.

सिंधुरवर्ण वसुंधरा । ज्वाळा लागती फणिवरा । तो आहाळोन सरारां । विष वमी ॥ ४ ॥
( आहाळोन - तापून,कळवळून )

पृथ्वी शेंदरासारखी लाल होऊन जाईल,त्या ज्वाळा खाली शेषाला लागून,तो (आहाळोंन) होरपळून भडाभडा विष ओकू लागेल.

त्या विषाच्या ज्वाळा निघती । तेणें पाताळें जळती । माहापावकें भस्म होती। पाताळ लोक ॥ ५ ॥

त्या विषाच्या ज्वाळा निघून (भडकून) त्यांच्यामुळे पाताळे जळून जातील व त्या प्रलयाग्नीने सगळे पातळ लोक भस्म होऊन जातील (जळून खाक होतील)

तेथें माहाभूतें खवळती । प्रळयेवात सुटती । प्रळयेपावक वाढती। चहूंकडे ॥ ६ ॥

त्यावेळी पंचमहाभूतें खवळतील प्रलयाचा वारा सुटेल आणि प्रळयकाळचे अग्नि चहूकडे भडकतील.

तेथें अक्रा रुद्र खवळले । बारा सूर्य कडकडिले । पावकमात्र येकवटले । प्रळयेकाळीं ॥ ७ ॥

त्या प्रळयकाळी अकरा रुद्र खवळतील व बारा सूर्य एकत्र होऊन सगळे अग्नि एकत्र होतील (पावकमात्र एकमय होतील.)

वायो विजांचे तडाखे । तेणें पृथ्वी अवघी तरके । कठिणत्व अवघेंचि फांके । चहुंकडे ॥ ८ ॥

वायूच्या व विजांच्या तडाख्यांनी सगळी पृथ्वी फाटून जाऊन तिचा कठिणपणा पार विरघळून जाईल.

तेथें मेरूची कोण गणना । कोण सांभाळिल कोणा । चंद्र सूर्य तारांगणा । मूस जाली ॥ ९ ॥

तेथे मेरूचा पाड काय? कोण कोणाला सांभाळणार? चंद्र,सूर्य,तारे, ह्या सर्वांची एकच आटणी (मूस) होईल.!

पृथ्वीनें विरी सांडिली । अवघी धगधगायेमान जाली । ब्रह्मांडभटी जळोन गेली । येकसरां ॥ १० ॥
( विरी - वीर्य,काठिण्य , ब्रह्मांडभटी - पृथ्वी )

पृथ्वीची विरी ( वीर्य, कठिणपणा,चिकटपणा ) नाहीशी होऊन ती सगळी धगधगू लागेल.साऱ्या ब्रह्मांडाची भट्टी सरसहा जळून जाईल.

जळोनि विरी सांडिली । विशेष माहावृष्टी जाली ॥ तेणें पृथ्वी विराली। जळामधें ॥ ११ ॥

पृथ्वी जळून तिची विरी गेल्यावर,खूपच महावृष्टि होईल त्या पाण्यात सगळी पृथ्वी विरून जाईल.

भाजला चुना जळीं विरे । तैसा पृथ्वीस धीर न धरे । विरी सांडुनिया त्वरें । जळीं मिळाली ॥ १२ ॥

भाजलेला चुना जसा पाण्यात ताबडतोब विरतो (विरघळतो) तसा पृथ्वीकडून तसा पृथ्वीकडून टिकाव धरवत नाही,चिरी सोडून ती तत्काळ पाण्यात मिसळेल (विरघळेल)

शेष कूर्म वाऱ्हाव गेला । पृथ्वीचा आधार तुटला । सत्व सांडून जळाला । मिळोन गेली ॥ १३॥
( वाऱ्हाव - वराह )

शेष,कूर्म,वराह,नाहीसे झाल्यामुळे पृथ्वीचा आधार तुटेल, अर्थात तिच्यातील विरी नाहीशी होऊन ती पाण्यात सहज मिळून जाईल.

तेथें प्रळयेमेघ उचलले । कठिण घोषें गर्जिनले । अखंड विजा कडकडिले । ध्वनि घोष ॥१४ ॥

तेव्हा प्रळय मेघ उठतील व भयंकर गर्जना करू लागतील,विजांचे सारखे कडकडाट होऊन गर्जना होऊ लागतील. (तेव्हा भयंकर गर्जना करीत प्रळयमेघ उठतील व एकसारखा विजांचा कडकडाट होईल.)

पर्वतप्राये पडती गारा । पर्वत उडती ऐसा वारा ।निबिड तया अंधकारा। उपमाचि नाहीं ॥ १५ ॥

पर्वता एवढ्या मोठाल्या गारा पडून पर्वत उडून जातील असा झंजावात सुटेल. आणि अंधकार तर इतका दाट (गडद) पसरेल की त्याला उपमाच देता येत नाही.

सिंधु नद्या एकवटल्या । नेणो नभींहून रिचवल्या । संधिच नाहीं धारा मिळाल्या । अखंड पाणी ॥ १६ ॥

समुद्र व नद्या एकच होऊ लागतील,जणू काय ती आकाशातून खाली रिचवत आहेत,पर्जन्याच्या धारा अशा दाट पडतील की त्यांच्यामध्ये वावच(अंतर) राहणार नाही,पाण्याचा धोत अखंड पडल्यासारखा दिसेल. (समुद्र व नद्या आकाशातून रिचविल्याप्रमाणे एकवटून सर्वत्र पाणीच पाणी होऊन जाईल)

तेथें मछ मूर्म सर्प पडती । पर्वतासारिखे दिसती । गर्जना होतां मिसळती । जळांत जळें ॥ १७ ॥

(त्यातून पर्वतमय मासे,कासव व सर्प पडून प्रचंड गर्जना होऊन जळात जळे मिसळून जातील )
मासे,कासव व सर्प हे एवढाले पडतील की जणू काय पर्वतच पडले आहेत गर्जना होताच पाण्यात पाणी मिसळून जाईल.

सप्त सिंधु आवर्णी गेले । आवर्णवेडे मोकळे जाले । जळरूप जालियां खवळले । प्रळयेपावक ॥ १८ ॥
( आवर्णवेडे मोकळे जाले - सप्तसागराने मर्यादा ओलांडली )

सात समुद्र वाढून आवरणोदकापर्यंत जातील,पुढे आवरणाचे वेढेही मोकळे होऊन,सर्व जलमय होईल,मग सगळे प्रलयाग्नि क्षुब्ध होतील (सप्त समुद्राची आवरणे व वेढे फुटून महाजळे एकमेकात मिसळून सारे जलमय होईल.)

ब्रह्मांडाऐसा तप्त लोहो । शोषी जळाचा समूहो । तैसे जळास जालें पाहो । अपूर्व मोठें॥ १९ ॥

तापलेल्या लोखंडाप्रमाणे लाल झालेला ब्रह्मांडा एव्हढा,आगीचा प्रचंड गोळा ते पाणी आटवून टाकील असा हा पाण्याचा मोठा चमत्कार होईल.

तेणें आटोन गेलें पाणी । असंभाव्य माजला वन्ही । तया वन्हीस केली झडपणी । प्रळयवातें ॥ २० ॥

त्यामुळे सगळे पाणी आटून जाऊन कल्पनातीत भयंकर असा अग्नि भडकेल नंतर प्रळयवात सुटून त्या अग्नीला झडपून टाकील.

दीपास पालव घातला । तैसा प्रळयेपावक विझाला । पुढें वायो प्रबळला । असंभाव्य ॥ २१ ॥
( पालव - पदर )

दिव्याला पदराने वारा घालून (पालव घातला) विझवावा त्याप्रमाणे तो प्रलयाग्नि चटदिशी विझेल.नंतर वायु असंभाव्य वाढेल (पदराने दिवा मालवावा त्याप्रमाणे तो प्रलयाग्नि विझून असंभाव्य प्रचंड वारे उठतील)

उदंड पोकळी थोडा वारा । तेणें वितळोन गेला सारा । पंचभूतांचा पसारा । आटोपला ॥ २२ ॥

पोकळी (आकाश) पुष्कळ व त्यामानाने वारा थोडा,त्यामुळे सगळा वितळून (जिरून) जाईल अशा रीतीने पंचभूताचा पसारा आटोपेल (पण ते वारे ह्याहून मोठ्या अशा आकाशात वितळून पार नाहीसे होतील ह्याप्रमाणे पंचमहाभूतांचा बाजार सारा उधळून जाईल )

महद्भूत मूळमाया। विस्मरणें वितुळे काया । पदार्थमात्र राहावया । ठाव नाहीं॥२३॥

आठवा देह जी मूळमाया म्हणजेच महद्भूत (बहुस्याम प्रजायेय।) त्यास (सृष्टीचा पसारा आटोपून ऊर्ध्वमुख ब्रह्म सन्मुख झाल्यामुळे) स्वतःचे विस्मरण पडेल व त्यामुळे आठवा देहही नाहीसा होईल.अर्थात कोणताही पदार्थ राहण्यास जागा राहणार नाही (शेवटी ब्रह्मांडाचा चौथा देह जी मूळमाया म्ह.महद्भूत तिचे स्पुरण नाहीसे होऊन साराच प्रपंच आटून कोणत्याही पदार्थाला किवा भूताला राहायला वाव उरणार नाही. )

दृश्य हलकालोळें नेलें । जड चंचळ वितुळलें । याउपरी शाश्वत उरलें । परब्रह्म तें ॥ २४ ॥

जड असे दृश्य प्रळयाच्या धामधुमीत उडून जाईल आणि चंचळही (जिरून) वितळून जाईल. ह्यानंतर शाश्र्वत असे परब्रह्म असेल ( ह्यानंतर पांचभौतिक दृश्य सृष्टि महाप्रळयाने उडविली की जड गेले व चंचल गेले असे होऊन निश्र्चळ परब्रह्म तेवढेच उरेल)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रळयेनाम समास चौथा ॥**

**समास पांचवा : कहाणीनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

कोणी येक दोघे जण । पृथ्वी फिरती उदासीन । काळक्रमणें लागून । कथा आरंभिली ॥ १ ॥

कोणी दोघे गृहस्थ उदासीन वृतीने देशोदेशी फिरत चालले असता वेळ जाण्यासाठी त्यांनी एका कथेस (एक गोष्ट सांगावयास) आरंभ केला.

श्रोता पुसे वक्तयासी । काहाणी सांगा जी बरवीसी । वक्ता म्हणे श्रोतयासी । सावध ऐकें ॥ २ ॥

(त्यापैकी एक झाला वक्ता व एक झाला श्रोता) त्यातला श्रोता वक्त्यास म्हणाला ‘अहो चांगलीशी एक गोष्ट कहाणी-कथा सांगा’ तेव्हा वक्ता श्रोत्याला म्हणाला, ‘सावधपणाने ऐक ‘

येकें स्त्रीपुरुषें होतीं । उभयेतांमधें बहु प्रीति । येकरूपेंचि वर्तती । भिन्न नाहीं ॥ ३ ॥

एक होते स्त्री पुरुषांचे-जोडपे (प्रकृति-पुरुष,शिव-शक्ति,अर्धनारीनटेश्र्वर,,मूळमाया,मूळपुरुष) त्या दोघांची परस्परांवर फार प्रीति होती.इतकी की अगदी एकरूपाने ती वागत,त्यांच्यात वेगळेपणा म्हणून मुळीच नाही.

ऐसा कांहीं येक काळ लोटला । तयांस येक पुत्र जाला । कार्यकर्ता आणि भला । सर्वविषीं ॥ ४ ॥

अशाप्रकारे काही काळ लोटल्यावर त्यांस एक मुलगा (सत्व-जाणीव विष्णु) झाला.तो कार्यकर्ता (जाणीव किवा ज्ञान असलेला) व सर्व कामात (भला सत्वगुणी) प्रवीण होता.

पुढें त्यासहि जाला कुमर । तो पित्याहून आतुर । कांहीं तदर्ध चतुर । व्यापकपणें ॥ ५ ॥

पुढे त्या मुलालाही मुलगा (रज जाणीव व नेणीवमिश्रित ब्रह्मदेव) झाला तो बापापेक्षा (कार्य करण्याविषयी) अधिक उत्सुक (आतुर व सृष्टि उत्पत्तीच्या उलाढाल्या करणारा) पण व्यापकपणाच्या बाबतीत (अर्ध चतुर) बापापेक्षा अर्धा शहाणा असा निघाला.(जाणीव व नेणीव ह्या गुणांनी युक्त असा व्यापक रजोगुणी झाला)

तेणें व्याप उदंड केला । बहुत कन्यापुत्र व्याला । उदंड लोक संचिला । नाना प्रकारें ॥ ६ ॥
( कन्यापुत्र व्याला - अखिल जगतातील जीवसृष्टी )

त्याने खूप व्याप केला,त्याने अनेक कन्या पुत्र उत्पन्न केले,आणि अनेक प्रकारांनी पुष्कळ प्रजा वाढविली (अनेक लोक त्याने निर्माण केले सप्त लोकांतील सर्व स्त्री-पुरुष किवा नर-मादी त्या ब्रह्मदेवाचीच लेकरे होत) ह्याप्रमाणे तो लोकसंग्रह कर्ता निघाला.

त्याचा पुत्र जेष्ठ । तो अज्ञान आणि रागिट । अथवा चुकता नीट । संव्हार करी ॥ ७ ॥

त्याचा (नातवाचा) वडील मुलगा ( तम नेणीव- रुद्र शंकर ) अज्ञानी (नेणीवरूप) व इतका रागीट निघाला की कोणी चुकला की प्राणच घेतो.(-कोठे चूक आढळली की संहार करायचा असा तो तमोगुणी होता असे हे कुटुंब एकत्र नांदत होते.)

पिता उगाच बैसला । लेकें बहुत व्याप केला । सर्वज्ञ जाणता भला । जेष्ठ पुत्र ॥ ८ ॥

(पुत्र,नातू,पणतू गृहप्रपंच चालवीत आहेत हे पाहून ) बाप (मूळपुरुष) उगीच बसून राहिला (वृद्धाने दुसरे काय करायचे?) पण मुलाने (सत्वगुणी विष्णूने) पुष्कळ व्याप केला. तो वडील मुलगा सर्व जाणणारा,शहाणा व भला अशी त्याची ख्याति झाली.

नातु त्याचें अर्ध जाणें । पणतु तो कांहींच नेणे । चुकतां संव्हारणें । माहा क्रोधी ॥ ९ ॥

नातू (रजोगुणी ब्रह्मदेव) त्याच्यापेक्षा (विष्णूपेक्षा) अर्धा शाहाणा व चटपट्या आणि पणतू (रुद्र तमोगुणी शंकर ) झाला त्याला तर कांहीच कळेना तो अति रागीट कोणी चुकले की नाश करावयाचा एवढेच त्याला ठाऊक (असा हा वृद्धाचा मूळपुरुषाचा संसार थाटला)

लेक सकळांचे पाळण करी । नातु मेळवी वरिचावरी । पणतु चुकल्यां संव्हार करी । अकस्मात ॥ १० ॥

मुलगा (विष्णु) सर्वांचे पालन करतो,नातू (ब्रह्मदेव) वरचेवर भर टाकतो (पुनःपुन्हां सृष्टि रचतो) आणि पणतू (रुद्र) एकदम संहार करतो.(ब्रह्मदेवाने असंख्य प्राणी व असंख्य सृष्टि घडवाव्या,विष्णूने त्याचे पोषण करावे व शंकराने संहार करावा असे चालले)

नेमस्तपणें वंश वाढला । विस्तार उदंडचि जाला । ऐसा बहुत काळ गेला । आनंदरूप ॥ ११ ॥

अश्याप्रकारे व्यवस्थितपणाने मूळपुरुषांचा वंश वाढला,पुष्कळच विस्तार वाढला असा बहुत काळ आनंदात गेला.

विस्तार वाढला गणवेना । वडिलांस कोणीच मानिना । परस्परें किंत मना । बहुत पडिला ॥ १२ ॥

परिवार इतका वाढला की त्याची मोजदाद होईना,वडिलास कोणीच जुमानेसे झाले आणि त्यांच्या त्यांच्यात ही किंतू उत्पन्न झाले.(अगणित विस्तार वाढला,अनंत ब्रह्मांडे व असंख्य जीव निर्माण झाले पण पुढे पुढे अवाढव्य वाढलेल्या ह्या मूळपुरुषाच्या साम्राज्यात अंतःकलह सुरु झाले.वडिलांचा बोज कनिष्ठ ठेविनासे झाले आता परस्परांची मने परस्परांविषयी कलुषित होऊन वैमनस्ये वाढली. एकोपा मोडून जो तो फुटून वागू लागला वडिलांशी कनिष्ठ मिळून होते तोवर शोभा होती पण आता तो मनु बदलला)

उदंड घरकळो लागला । तेणें कित्येक संव्हार जाला ।विपट पडिलें थोर थोरांला । बेबंद जालें ॥ १३ ॥
( विपट - वितुष्ट )

गृहकलह पुष्कळ वाढून त्यामुळे अनेकांचा संहार झाला मोठमोठ्यांमध्ये वितुष्ट येऊन बेबंदशाही माजली

नेणपणें भरी भरले । मग ते अवघेच संव्हारले । जैसे यादव निमाले । उन्मत्तपणें ॥ १४ ॥

यादव जसे उन्मत्तपणाने सारेच लढून मेले त्याप्रमाणे हे अज्ञानाने अभिमानास पेटून (अहंकाराच्या भरी भरल्यामुळे) सगळ्यांचाच संहार झाला.

बाप लेक नातु पणतु । सकळांचा जाला निपातु । कन्या पुत्र हेतु मातु । अणुमात्र नाहीं ॥ १५ ॥

बाप लेक नातू व पणतू ह्या सगळ्यांचा नि:पात झाला कोणाचेच अपत्य-कन्यापुत्रांचे नावसुद्धा शिल्लक राहिले नाही

ऐसी काहाणी जो विवरला । तो जन्मापासून सुटला । श्रोता वक्ता धन्य जाला । प्रचितीनें ॥ १६ ॥

ह्या कहाणीचा जो विचार (मनन) करील.(सृष्टीच्या उभारणी-संहाराचे मर्म समजेल) तो जन्ममृत्यूपासून सुटेल प्रत्यक्ष अनुभव आल्यामुळे श्रोता व वक्ता हे दोघही धन्य झाले (ह्याची प्रचीति घेतील तर श्रोते वक्ते दोघेही धन्य होतील.)

ऐसी काहाणी अपूर्व जे ते । उदंड वेळ होत जाते । इतकें बोलोन गोसावी ते । निवांत जाले ॥ १७ ॥

अशी ही अपूर्व कहाणी (युगयुगाच्या ठायी) अनेक वेळा होते व जाते इतके सांगून ते स्वामी गप्प बसले (वक्ता गप्प बसला)

आमची काहाणी सरो । तुमचे अंतरीं भरो । ऐसें बोलणें विवरो । कोणीतरी ॥ १८ ॥

ही आमची कहाणी संपली ती तुमच्या अंतःकरणात असू द्या आमच्या ह्या बोलण्याचा कोणीतरी विचार करावा ( आमची कहाणी सरो,तुमचे हृदयी भरो ह्या बोलण्याचे वर्म कोणीतरी उमगो)

चुकत वांकत आठवलें । एतुकें संकळित बोलिलें । न्यूनपूर्ण क्ष्मा केलें । पाहिजे श्रोतीं ॥ १९ ॥

चुकत वाकत आठवले तसे थोडक्यात सांगितले,त्यात कमी जास्त झाले असेल त्याबद्ल श्रोत्यांनी क्षमा करावी.

ऐसी काहाणी निरंतर । विवेकें ऐकती जे नर । दास म्हणे जग्गोधार । तेचि आरिती ॥ २० ॥

रामदास म्हणतात,अशी ही काहाणी जे पुरुष विवेकपूर्वक ऐकतात तेच जगाचा उद्धार करतात (ही कहाणी निरंतर होत असते जे विवेकाने पाहतील ते जगदुद्धार करतील)

त्या जगोद्धाराचें लक्षण । केले पाहिजे विवरण । सार निवडावें निरूपण । यास बोलिजे ॥ २१ ॥

आता त्या जगदुद्धाराचे लक्षण काय आहे त्याचे विवरण केले पाहिजे (सर्व बोलण्याचे) सार काय आहे ते निवडून घेणे ह्याला निरुपण (निरूपणाची पूर्वतयारी) म्हणतात.

निरूपणीं प्रत्ययें विवरावें । नाना तत्वकोडें उकलावें । समजतां समजतां व्हावें । निःसंदेह ॥ २२ ॥

निरुपणामध्ये आपल्या अनुभवास येत असेल त्याचे विवरण करावे,अनेक तत्व रहस्यांचा उलगडा करून दाखवावा (घ्यावा) आणि समजून घेता घेता नि:संशय व्हावे (तत्वरहस्य विवरता विवरता जीवी धरून नि:संदेह व्हावे)

विवरोन पाहातां अष्ट देह । पुढें सहजचि निःसंदेह । अखंड निरूपणें राहे । समाधान ॥ २३ ॥

आठही देहाचे विवरण करून पाहिले म्हणजे पुढे आपोआपच नि:संदेह होतो पण निरुपण अखंड पाहिजे,म्हणजे समाधान होते.

तत्वांचा गल्बला जेथें । निवांत कैचें असेल तेथें ।याकारणें गुल्लिपरतें । कोणीयेकें असावें ॥ २४ ॥
( गुल्लिपरतें - घोटाळ्यापासून अलिप्त )

तत्वांच्या गोंधळामध्ये निवांतपणा (शांति) कोठून मिळणार? ह्यासाठी कोणीही असेल त्याने (तत्वांच्या) गडबडीपासून (गुल्लीपरते) दूर असावे (तत्वांच्या गलबल्यात समाधान नाही म्हणून त्या गोंधळाच्या पार व्हावे)

ऐसा सूक्ष्म संवाद । केलाचि करावा विशद । पुढिले समासीं लघुबोध । सावध ऐका ॥ २५ ॥
( लघुबोध - थोडक्यात,साराशाने )

अशा ह्या सूक्ष्म विषयावरील संभाषणाचे वारंवार विवरण करीत जावे,पुढील समासातील लघुबोध सावधपणे ऐका.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कहाणीनिरूपणनाम समास पांचवा ॥**
**समास सहावा : लघुबोध ॥ श्रीराम ॥**

जें बोलिजेती पंचतत्वें । त्यांची अभ्यासाया नावें । तदुपरी स्वानुभवें । रूपीं जाणावीं ॥ १ ॥

पंचतत्वे जी म्हणतात त्यांची नावे (आधी लक्षात ठेवावीत) पाठ करावीत व नंतर त्यांची स्वरूपे आपल्या अनुभवाने माहीत करून घ्यावी.

यामधें शाश्वत कोण । आणी अशाश्वत कोण । ऐसें करावें विवरण । प्रत्ययाचें ॥ २ ॥

त्यामध्ये शाश्वत कोण व अशाश्वत कोण ह्याचे विवरण स्वानुभवाने करावे.

पंचभूतांचा विचार । नांवरूप सारासार ।तोचि बोलिला निर्धार । सावध अईका ॥ ३ ॥

पंचभूतांची नावे व स्वरूपे आणि त्यात सार कोण व असार कोण ह्याचा विचार आता निश्र्चयपूर्वक सांगतो, तो लक्षपूर्वक ऐका.

पृथ्वी आप तेज वायो आकाश । नावें बोलिलीं सावकास ।आतां रूपाचा विश्वास । श्रवणें धरावा ॥ ४ ॥

पृथ्वी,आप,तेज,वायु व आकाश ही त्यांची नावे वेगवेगळी सांगितली आता रूपे सांगतो ती ऐकून त्यावर विश्वास ठेवावा.

पृथ्वी म्हणिजे ते धरणी । आप म्हणिजे तें पाणी । तेज म्हणिजे अग्नि तरणी । सतेजादिक ॥ ५ ॥
(तरणी - सूर्य )

पृथ्वी म्हणजे हा भूगोल (धरणी) आप म्हणजे पाणी तेज म्ह.अग्नी सूर्य वन्ही इत्यादी तेजोमय पदार्थ.

वायो म्हणिजे तो वारा । आकाश म्हणिजे पैस सारा ।आतां शाश्वत तें विचारा । आपले मनीं॥ ६ ॥

वायु म्ह.वारा व आकाश म्ह.सारी पोकळी (पैस),आता त्यामध्ये शाश्वत काय आहे ह्याचा विचार करावा.

येक शीत चांचपावें। म्हणिजे वर्म पडे ठावें ।तैसें थोड्या अनुभवें । बहुत जाणावे ॥ ७ ॥

एक शीत चाचपले म्हणजे साऱ्या भाताची परीक्षा होते,त्याप्रमाणे थोड्याश्या अनुभवावरून पुष्कळाची माहिती करून घ्यावी.

पृथ्वी रचतें आणि खचतें । हें तों प्रत्ययास येतें । नाना रचना होत जाते । सृष्टिमधें ॥ ८ ॥

पृथ्वी निर्माण होते व नाश पावते (पृथ्वीला उत्पत्ति नाश आहे.) हा तर प्रत्यक्ष अनुभवच आहे ह्या सृष्टीमध्ये अनेक प्रकारची रचना उत्पन्न होते व नाश पावते (किंबहुना सृष्टीत ज्या ज्या रचना होतात त्यांना त्यांना नाश आहेच.)

म्हणौन रचतें तें खचतें । आप तें हि आटोन जाते । तेज हि प्रगटोन विझतें । वारें हि न राहे ॥९ ॥
( वारें हि न राहे - वाऱ्याचापण लय होतो )

म्हणून जे रचते ते खचते हा नियम आहे (पाणी) आपही आटून जाते तेजसुद्धा प्रकट होते व विझते वारा देखील थांबतो (तात्पर्य जे जे रचते ते ते खचतें )

अवकाश नाममात्र आहे । तें हि विचारिता न राहे । एवं पंचभूतिक राहे । हें तों घडेना ॥ १० ॥

आकाश-अवकाश-पोकळी ही नुसती नावाचीच आहे पण तिचे नांवसुद्धा विचार केला तर टिकत नाही,ह्याप्रमाणे पंचभूतात्मक  जे जे आहे ते ते टिकेल असे कधी घडावयाचे नाही (आकाश हे नाममात्र आहे विचारांती तेही टिकत नाही )

ऐसा पांचा भूतांचा हा विस्तार । नासिवंत हा निर्धार । शाश्वत आत्मा निराकार । सत्य जाणावा ॥ ११ ॥

असा हा पंचभूतांचा पसारा नाशवंत आहे हे खात्रींने समजावे निराकार आत्मा तेवढा शाश्र्वत व सत्य समजावा ( सारांश,पंचभूतात्मक जेवढे आहे तेवढे सारे अशाश्र्वत आहे, राहात नाही,नाशवंत आहे आणि आत्मा मात्र शाश्र्वत, निराकार व सत्य आहे.)

तो आत्मा कोणास कळेना । ज्ञानेंविण आकळेना । म्हणोनियां संतजना । विचारावें ॥ १२ ॥

तो आत्मा कोणाला कळत नाही,ज्ञानावाचून त्याचे आकलन होत नाही म्हणून त्याविषयी साधुसंतास विचारावे ( त्या आत्म्याचे स्वरूप ज्ञानाशिवाय कळत नाही व ज्ञान संतांपाशी असते म्हणून शाश्र्वत आत्मस्वरूप संतास विचारावे )

विचारितां सज्जनांसी । ते म्हणती कीं अविनासी । जन्म मृत्यु आत्मयासी । बोलोंच नये ॥ १३ ॥

सज्जनास विचारले तर ते सांगतात की आत्मा हा अविनाशी आहे त्यासंबंधी जन्म-मृत्यूचे नाव सुद्धा काढू नये.

निराकारीं भासे आकर । आणी आकारीं भासे निराकार । निराकार आणी आकार।विवेकें वोळखावा ॥१४॥

निराकारामध्ये आकार आहेसा भासतो व आकारामध्ये निराकार आहेसे दिसते. ह्यासाठी निराकार कोणता व आकार कोणता हे विचाराने ओळखावे.

निराकार जाणावा नित्य । आकार जाणावा अनित्य । यास बोलिजे नित्यानित्य । विचारणा ॥ १५ ॥

निराकार हा नित्य व आकार हा अनित्य आहे असे जाणावे ह्यालाच नित्यानित्यविवेक म्हणतात.

सारीं भासे असार । आणि असारीं भासे सार । सारासार विचार । शोधून पाहावा ॥ १६ ॥

सारांश,सारात असार भासतें व असारांत सार भासते ह्यासाठी सारासार विचार शोधून पाहावा.

पंचभूतिक तें माइक । परंतु भासे अनेक । आणि आत्मा येक । व्यापून असे ॥ १७ ॥

पंचभूतांत्मक दृश्य मायिक (मिथ्या) असले तरी अनेकत्वाने भासते.आणि एकटा आत्मा हा सर्वांना व्यापून आहे ( पंचभौतिक मायिक व अनेक आहे आणि आत्मा शाश्र्वत एक व व्यापक आहे?)

चहुं भूतांमधें गगन । तैसें गगनीं असे सघन । नेहटून पाहतां अभिन्न । गगन आणि वस्तु ॥ १८ ॥
( नेहटून - नीट लक्ष देऊन )

पृथिव्यादि चारही भूतांत आकाश जसे घनदाट भरलेले आहे तसे आकांशात निराकार ब्रह्म घनदाट भरलेले आहे नीट सूक्ष्म विचाराने पाहिले तर आकाश व ब्रह्म ही ( भिन्न दिसत नाहीत) एकरूपच आहेत.

उपाधीयोगेंचि आकाश । उपाधी नस्तां निराभास । निराभास तें अविनाश । तैसें गगन ॥ १९ ॥

उपाधीमुळेच त्याला आकाश म्हणावयाचे उपाधि नसेल तर तेच निराभास होते.(कारण भास कोणाला भासवायचा?) जे निराभास तेच अविनाशी आहे आकाशही तसेच आहे (उपाधि आहे म्हणून आकाश व उपाधि नाही म्हणून ब्रह्म ज्याला उपाधि किंवा भास नाही ते ब्रह्म -आकाशही तसेच आहे.)

आतां असो हे विवंचना । परंतु जें पाहातां नासेना । तें गे तैंचि अनुमाना । विवेकें आणावें ॥ २० ॥
( विवंचना - विवरण,स्पष्टीकरण )

आता हा विचार राहु द्या,पण विचार केला असता ज्याचा नाश होत नाही,तेच अरे त्याचेच विचाराने अनुमान केले पाहिजे (विचाराने पाहता जे नाश पावत नाही ते विवेकाने अनुमानाच्या टप्प्यात आणून सोडावे)

परमात्मा तो निराकार । जाणिजे हा विचार सार । आणी आपण कोण हा विचार। पाहिला पाहिजे ॥ २१ ॥

परमात्मा हा निराकार आहे हे समजणे,हा सारासार विचार होय.आता आपण कोण हा विचार केला (पाहिला) पाहिजे.

देहास अंत येतां । वायो जातो तत्वता । हें लटिकें म्हणाल तरी आतां । स्वासोस्वास धरावा ॥ २२ ॥

देहाचा अंत होतो म्हणजे काय होते तर खरोखर वायु तेवढा जातो हे खोटे म्हणाल तर आतांच्या आता श्र्वासोच्छास कोंडून धरावा.

स्वास कोंडतां देह पडे । देह पडतां म्हणती मडें । मड्यास कर्तुत्व न घडे । कदाकाळीं ॥ २३ ॥

श्र्वास कोंडला तर देह पडेल देह पडला की त्याला मढे म्हणतात त्या मढ्याच्या हातून कधीच काही काम होत नाही (मढ्याच्या ठिकाणी कर्तुत्व नाही हे तर उघड आहे)

देहावेगळा वायो न करी । वायोवेगळा देह न करी।विचार पाहातां कांहींच न करी । येकावेगळें येक॥२४॥

देहाशिवाय वायु किवा वायूशिवाय देह कधी काहीच करू शकत नाही,विचार केला तर एकाशिवाय एकाला काहीच करता येत नाही.

उगेंच पाहातं मनुष्य दिसे । विचार घेतां कांहीं नसे । अभेदभक्तीचें लक्षण ऐसें । वोळखावें ॥ २५ ॥

वरवर पहिले तर आपला मनुष्यदेह दिसतो पण त्याचा विचार केला तर देह म्हणून वेगळा पदार्थ नाही.(नाशिवंत तत्वांचे-भूतांचे-पंचभूतांचे एक गाठोडे आहे) असे आढळून येते आणि सर्वत्र निर्गुण ब्रह्मावेगळे काही नाही असे अनुभवास येते हेच अभेदभक्तीचे लक्षण आहे.

कर्ता आपण ऐसे म्हणावें ।तरी आपलें इछेसारिखें व्हावें। इछेसारिखें न होतां मानावें ।अवघेंच वाव ॥२६॥
( वाव - निरर्थक )

( 'मी कर्ता' असे म्हणावे ) कर्ता आपण असे म्हंटले तर आपल्या इच्छेप्रमाणे सर्व घडले पाहिजे पण तसे ( आपल्या इच्छेप्रमाणे ) होत नाही त्या अर्थी आपला कर्तेपणा सगळा खोटा आहे ( मी कर्ता हे आपले म्हणणे फुकट आहे) असे मानले पाहिजे.

म्हणोन कर्ता नव्हे किं आपण । तेथें भोक्ता कैंचा कोण । हें विचाराचें लक्षण । अविचारें न घडे ॥ २७ ॥

म्हणून कर्ता काही आपण नाही तर भोक्ता तरी कोण? हे विचाराचे काम आहे अविचाराने होणार नाही (अविचाराने हे कळायचे नाही)

अविचार आणि विचार । जैसा प्रकाश अंधकार । विकार आणि निर्विकार । येक नव्हे कीं ॥ २८ ॥

प्रकाश व अंधार किंवा विकार व निर्विकार एक नव्हेत,त्याप्रमाणे विचार व अविचार एक होणार नाहीत (विचार व अविचार म्ह.प्रकाश व अंधार होय, तात्पर्य,विकार व अविकार एक नाहीत.)

जेथें नाहीं विवंचना । तेथें कांहींच चालेना । खरें तेंचि अनुमाना । कदा नये ॥ २९ ॥

ज्या मनुष्याला विचार नसतो तेथे काहीच चालत नाही,त्याला खरे कधीच कळायचे नाही (जेथे विचार नाही तेथे काहीच चालत नाही सत्यवस्तु काही अनुभवास येत नाही)

प्रत्ययास बोलिजे न्याये । अप्रत्यये तो अन्याये । जात्यांधास परीक्षा काये । नाना रत्नाची ॥ ३० ॥

अनुभवला न्याय म्हणतात जेथे अनुभव नाही तो अन्याय होय.( प्रत्यय म्ह. न्याय व अप्रत्यय म्ह. अन्याय) जन्मांधाला अनेक रत्नांची परीक्षा कशी करता येईल?

म्हणोन ज्ञाता धन्य धन्य । जो निर्गुणेंसी अनन्य । आत्मनिवेदनें मान्य । परम पुरुष ॥ ३१ ॥

म्हणून जो निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी अनन्य म्हणजे समरस होऊन आत्मनिवेदनाच्या योगाने मान्य झाला तोच परमपुरुष तोच ज्ञाता धन्य धन्य होय (तात्पर्य मी कर्ता मी भोक्ता इ. विकार मिथ्या होत आत्मा निर्विकार व निर्गुण आहे त्याशी अनन्य होणारा अभेद भक्त परम धन्य होय.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे लघुबोधनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : प्रत्यय विवरण ॥ श्रीराम ॥**

निर्मळ आभास निराभास । तयास दृष्टांत आकाश । आकाश म्हणिजे अवकाश । पसरला पैस ॥ १ ॥

निर्मळ,निश्र्चळ व निराभास असे जे ब्रह्म त्याला आकाशाचा दृष्टांत आहे.आकाश म्हणजे अवकाश-पसरलेली-पैस-पोकळी.

आधीं पैस मग पदार्थ । प्रत्यये पाहातां यथार्थ । प्रत्ययेंविण पाहातां वेर्थ । सकळ कांहीं ॥ २ ॥

आधी पोकळी आणि तिच्यात पदार्थ,अनुभवाने पाहिले तर पाहिले तर हे म्हणणे बरोबर आहे,अनुभवाशिवाय सर्व काही व्यर्थ आहे (आधी आकाश मग त्यात पदार्थ म्ह. इतर चार भूते हे प्रत्ययाने पाहावे प्रत्यायावाचून सर्व व्यर्थ आहे.)

ब्रह्म म्हणिजे तें निश्चळ । आत्मा म्हणिजे तो चंचळ । तयास दृष्टांत केवळ । वायो जाणावा ॥ ३ ॥

ब्रह्म हे निश्र्चळ व व आत्मा हा चंचळ आहे त्या आत्म्याला दृष्टांत म्हंटला तर तो वायूचा आहे.

घटाकाश दृष्टांत ब्रह्माचा । घटबिंब दृष्टांत आत्म्याचा । विवरतां अर्थ दोहींचा । भिन्न आहे ॥ ४ ॥

ब्रह्माला घटातील आकाशाचा दृष्टांत दिला तर आत्म्याला घटामध्ये प्रतिबिंबित झालेल्या प्रतिबिंबाचा दृष्टांत देतात त्या दोघांच्या अर्थाचा विचार केला तर त्यात वेगळेपणा आहे (आकाशी वायु किवा घट-आकाशी घटबिंब तसा निश्र्चळ ब्रह्मी चंचळ आत्मा दोहोत भेद आहे)

भूत म्हणिजे जितुकें जालें । जालें तितुके निमालें । चंचळ आलें आणी गेलें । ऐसें जाणावें ॥ ५ ॥

जेवढे उत्पन्न झाले त्याचे नाव भूत जे झाले, ते नाहीसे झाले,ह्या न्यायाने चंचळ आले आणि गेले असे समजावे (भूत जे झाले ते जाते,ह्याप्रमाणे पाहतो तेवढे नाशवंत आहे आले आणि गेले ते चंचळ)

अविद्या जड आत्मा चंचळ । जड कर्पूर आत्मा अनळ । दोनी जळोन तत्काळ । विझोन जाती ॥ ६ ॥
( अनळ - अग्नी )

अविद्या ही जड (भूत म्ह.अविद्याकार्य ते जड) आणि आत्मा हा चंचळ आहे.जड हे कापरासारखे व आत्मा अग्नीसारखा असल्यामुळे दोन्ही (-चा संयोग झाला की) जळून तात्काळ विझून जातात (म्ह. आत्मा अनात्म्यास जाळतो व आपणही तत्काळ जळून जातो.)

ब्रह्म आकाश निश्चळ जाती । आत्मा वायो चंचळ जाती । परीक्षवंत परीक्षिती । खरें किं खोटें ॥ ७ ॥

ब्रह्म व आकाश ही निश्र्चळ असून आत्मा व वायु हे चंचळ आहेत.हे खरे किवा खोटे ह्याची परीक्षा परीक्षक करतील.

जड अनेक आत्मा येक । ऐसा आतानात्माविवेक । जगा वर्तविता जगन्नायेक । तयास म्हणावें ॥ ८ ॥

जड अनेक वस्तू असून आत्मा एक आहे असे जाणणे हा आत्मानात्मविवेक होय.ह्यात आत्मा (अंतरात्मा जगाचे व्यवहार चालवितो म्हणून त्यास जगन्नाथ म्हणावे (म्हणतात)

जड अनात्मा चेतवी आत्मा । सर्वी वर्ते सर्वात्मा । अवघा मिळोन चंचळात्मा । निश्चळ नव्हे ॥ ९ ॥
(सर्वी वर्ते सर्वात्मा - आत्मा ईश्वररूपाने सर्वत्र अचेतन,चेतन पदार्थात व्यापून असतो.)

जड हे अनात्मा असून त्याला चेतना देतो तो आत्मा होय सर्वामध्ये वागतो तो सर्वात्मा होय आत्मा सर्वात्मा इत्यादि सर्व मिळून चंचळात्मा होय.तो निश्र्चळ होणार नाही (जड अनात्म्याला आत्मा चेतवितो,सर्व ब्रह्मांडाला सर्वात्मा चेतवितो म्हणजे आत्मा व सर्वात्मा मिळून चंचळच,निश्र्चळच नव्हे.)

निश्चळ तें परब्रह्म । जेथें नाहीं दृश्यभ्रम । विमळ ब्रह्म तें निभ्रम । जैसें तैसें ॥ १० ॥

ते परब्रह्म मात्र निश्र्चळ असून त्याच्या ठिकाणी दृश्यभ्यास नाही निर्मळ ब्रह्म ते निर्भ्रम जसेच्या तसेच आहे.(निश्र्चळ,विमळ,निर्भ्रम असे ब्रह्म ते परब्रह्म )

आधी आत्मानात्माविवेक थोर । मग सारासारविचार । सारासारविचारें संव्हार । प्रकृतीचा ॥ ११ ॥

(आधी जड व चंचळ ह्यांचा विवेक करावा, ह्याला आत्मानात्मविवेक म्हणतात मग सार-ब्रह्म व असार-जड व चंचळ ह्यांचा विवेक करून दृश्यभासात्मक प्रकृति दूर सारावी) आधी आत्मानात्मविचार हा महत्वाचा,त्याहून सारासार विचार श्रेष्ठ.सारासारविचाराने सगळ्या प्रकृतीचा संहार होतो.

विचारें प्रकृती संव्हारे । दृश्य अस्तांच वोसरे । अंतरात्मा निर्गुणीं संचरे । अध्यात्मश्रवणें ॥ १२ ॥

(सारासार-) विचाराने प्रकृतीचा संहार होऊन दृश्य असतानाच ते नाहीसे होते आणि अध्यात्मश्रवणाच्या योगाने अंतरात्मा निर्गुणामध्ये प्रवेश करतो.(प्रकृति विचाराने दूर सारायची आहे ती सारली की दृश्य असताच वोसरून जाते व चंचल आत्मा अध्यात्म श्रवणाने निर्गुणात विरून जातो.)

चढता अर्थ लागला । तरी अंतरात्मा चढतचि गेला । उतरल्या अर्थें उतरला । भूमंडळीं ॥ १३ ॥

अर्थाची(उन्नती) चढती पायरी लागली तर अंतरात्मा चढत जातो.(परब्रह्माकडे जातो) आणि अर्थाची उतरती दिशा लागली तर उतरत उतरत जमिनीवर (मृत्युलोकात जन्ममरणाच्या फेऱ्यात) येऊन पोचतो.(अंतरात्मा हा चंचळ असल्यामुळे ज्या संगतीला लागतो त्याशी तद्रूप होतो.जड अनात्म संगतीला लागला तर देहात्म भाव धरून अधोगतीला लागतो व निश्र्चळ संगतीला लागला तर उद्धरून जातो आणि अनुमानाच्या तर्काच्या मार्गाला लागला तर तर्कटी बनून संदेहात पडतो.निश्र्चळाच्या मागे लागून नि:संदेह होतो व तर्काच्या मार्गाला लागला तर तर्कटी बनून संदेहात पडतो.

अर्थासारिखा आत्मा होतो । जिकडे नेला तिकडे जातो । अनुमानें संदेहीं पडतो । कांहींयेक ॥ १४ ॥

तात्पर्य,अर्थाच्या बऱ्यावाईटपणाप्रमाणे आत्मा होतो,जिकडे न्यावा तिकडे जातो,अनुमानाने काही संशयातही पडतो.

निसंदेह अर्थ चालिला। तरी आत्मा निसंदेहचि जाला । अनुमान-अर्थें जाला । अनुमानरूपी ॥ १५ ॥

नि:संशय अर्थ चालला तर आत्माही नि:संशय होतो व अनुमानाचा अर्थ असला तर तोही अनुमानात पडतो.

नवरसिक अर्थ चाले । श्रोते तद्रूपचि जाले । चाटपणें होऊन गेले । चाटचि अवघे ॥ १६ ॥
( चाट - चावट )

अर्थाचा ओघ नऊ रसांनीं युक्त असला तर श्रोतेही तद्रूप बनून जातात.चावटपणामुळे सगळे चावट होऊन जातात.(श्रृंगार,वीर करूणादि नवरसांचा रंग भरून देणारा एखादा वक्ता भेटला म्हणजे श्रोते तद्रूप होऊन जातात नाहीतर श्रोतेवक्ते सारे चाट-चावट बनतात.)

जैसा जैसा घडे संग । तैसे गुह्यराचे रंग । याकारणें उत्तम मार्ग । पाहोन धरावा ॥ १७ ॥
( गुह्यरा - एक प्रकारचा सरडा )

जशी जशी (भावनांची,बाह्य सृष्टीची) संगति मिळेल तसतसा गोहरा (तेरडा,सरडा) रंग पालटतो (तसे आत्म्याचे आहे) म्हणून उत्तम मार्ग (निश्र्चळाचा मार्ग) पाहून तसा संग धरावा.

उत्तम अन्नें बोलत गेले।तरी मन अन्नाकारचि जालें ।लावण्य वनितेचें वर्णिलें।तरी मन तेथेंचि बैसे॥१८॥
( लावण्य वनितेचें - रूपसुंदरीचे )

उत्तम पक्वान्नांची वर्णने करीत बसले तर मन अन्नाकारच होऊन जाते.स्त्रीचे लावण्य वर्णन केले तर मनही तेथेच बसते (त्यात तलीन्न होते.)

पदार्थवर्णन अवघें । किती म्हणोन सांगावें । परंतु अंतरीं समजावें । होये किं नव्हे ॥ १९ ॥

असे सगळ्या पदार्थांचे वर्णन किती म्हणून सांगावे? पण हे असे आहे की नाही ह्याचा विचार मनात समजून घ्यावा (अनंत पदार्थ आहेत ते किती म्हणून वर्णावेत?असो तात्पर्य अंतरी समजून घ्यावे)

जें जें देखिलें आणी ऐकिलें । तें अंतरीं सदृढ बैसलें । हित अन्हित परीक्षिलें । परीक्षवंतीं ॥ २० ॥

जे जे पाहावे व ऐकावे ते ते अंतःकरणात दृढ होऊन बसते पण त्यांत हितकर कोणते व अहितकार कोणते ह्याचा परीक्षक विचार करतात (म्हणून विवेकी जन आपले हिताहित पाहून वागतात.)

याकारणें सर्व सांडावें । येक देवास धुंडावें ।तरीचवर्म पडे ठावें । कांहींयेक ॥ २१ ॥

तात्पर्य ह्यासाठी ( हित व्हावे म्हणून ) सर्व गोष्टी बाजूला ठेवून एका निश्र्चळ देवाचा शोध घ्यावा (व बाकीचे सर्व सोडून द्यावे) तरच काही तरी मर्म ध्यानात येईल.

नाना सुखें देवें केलीं । लोकें तयास चुकलीं । ऐसीं चुकतां च गेलीं । जन्मवरी ॥ २२ ॥

देवाने अनेक सुखे निर्माण केली आहेत पण लोक सुखाच्या मागे लागून सुखकर्त्या देवाला विसरतात (अंतरतात) (व जन्मभर अशाच चुका करीत राहतात.) असे विस्मरण सारखे सारखे पडल्यानेच जन्मोजन्मी लोक रखडतात.

सर्व सांडून शोधा मजला । ऐसें देवचि बोलिला । लोकीं शब्द अमान्य केला । भगवंताचा ॥ २३ ॥

सगळे टाकून माझा शोध घ्या (सर्व सोडुन मला एकाला शोधा) असे देवानेच सांगितले असून तो भगवंताचा शब्द लोकांनी अमान्य केला.

म्हणोन नाना दुःखें भोगिती । सर्वकाळ कष्टी होती । मनीं सुखचि इछिती । परी तें कैंचें ॥ २४ ॥

म्हणून लोक अनेक दु:खे भोगतात सारा वेळ कष्टी असतात केवळ सुखच मिळावे अशी त्यांच्या मनात इच्छा असते पण ते मिळावे कोठून? (निश्र्चळ देव सोडून चंचळ सुखाच्या नादी लागतात पण तेथे सुख कोठे आहे?)

उदंड सुख जया लागलें । वेडें तयास चुकलें । सुख सुख म्हणताच मेलें । दुःख भोगितां ॥ २५ ॥

ज्याच्या ठिकाणी उदंड सुख भरून राहिले आहे अशा त्या देवाला वेडे चुकते आणि (दुसऱ्याच्या नादी लागून) सुख सुख म्हणून घोकीत दु:खच भोगून मरून जाते.

शाहाण्यानें ऐसें न करावें । सुख होये तेंचि करावें । देवासी धुंडित जावें । ब्रह्मांडापरतें ॥ २६ ॥

शहाण्याने असे करू नये.जेणेकरून खरे सुखच होईल असेच करावे. ह्यासाठी देवाचा शोध घेत ब्रह्मांडाच्या पलीकडे जावे. (ब्रह्मांडाच्या परते-दृश्य ओलांडून-देवाला धुंडावे.)

मुख्य देवचि ठाईं पडिला । मग काये उणें तयाला । लोक वेडे विवेकाला । सांडून जाती ॥ २७ ॥

मुख्य देवच (निश्र्चळ परब्रह्म) हाती लागल्यावर मग सुखाला काय कमी आहे? लोक वेडे म्हणून हा विवेक सोडून भलतीकडे जातात.

विवेकाचें फळ तें सुख । अविवेकाचें फळ तें दुःख । यांत मानेल तें अवश्यक । केलें पाहिजे ॥ २८ ॥

विवेकाचे फळ सुख व अविवेकाचे फळ दु:ख आहे ह्यात जे बरे वाटेल ते अवश्य केले पाहिजे ( ह्यात आवडेल ते घ्या)

कर्तयासी वोळखावें । यास विवेक म्हणावें। विवेक सांडितां व्हावें । परम दुःखी ॥ २९ ॥

ह्या सृष्टीचा कर्ता कोण तो ओळखणे ह्याचे नाव विवेक हा विवेक सोडला तर अत्यंत दु:ख होते कर्त्याला ओळखणे ह्याचे नाव विवेक विवेक सोडून बाकी सगळे दु:खच आहे.

आतां असो हें बोलणें । कर्त्यास वोळखणें । आपलें हित विचक्षणें । चुकों नये ॥ ३० ॥

आता हे बोलणे पुरे,शहाण्याने कर्त्याला ओळखून आपले कल्याण होण्याचे चुकू देऊ नये (कर्त्याला ओळखण्यात स्वहित आहे त्याला चुकू नये.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे प्रत्यय विवरणनाम समास सातवा ॥**
**समास आठवा : कर्ता निरूपण ॥ श्रीराम ॥**

श्रोता म्हणे वक्तयासी । कोण कर्ता निश्चयेंसीं । सलळ सृष्टि ब्रह्मांडासी । कोणें केलें ॥ १ ॥

तेव्हा श्रोता वक्त्याला म्हणतो," खरोखर कर्ता कोण? सर्व सृष्टि व ब्रह्मांड कोणी केले ते मला सांगा.

तव बोलिला सभानायेक । जे बोलिके येकाहून येक । या बोलण्याचे कौतुक । श्रोतीं सादर ऐकावें ॥ २ ॥

त्यावर बोलण्यामध्ये एकापेक्षा एक पटाईत असे अनेक सभासद (आपापल्या मनाप्रमाणे व संप्रदायाप्रमाणे उत्तर देण्यास सज्ज झाले.) बोलू लागले. त्या बोलण्याचा चमत्कार श्रोत्यांनी तत्परतेने ऐकवा.

येक म्हणती कर्ता देव । येक म्हणती कोण देव । आपुलाला अभिप्राव । बोलते जाले ॥ ३ ॥

एक म्हणावे (कर्ता कोण? करता कोण म्हणजे काय?कर्ता देव) देव कर्ता आहे,त्यावर दुसरे म्हणाले,देव कोणता? पण नंतर सर्व जण आपापली मते सांगू लागले.

उत्तम मध्यम कनिष्ठ । भावर्थें बोलती पष्ट । आपुलाली उपासना श्रेष्ठ । मानिती जनीं ॥ ४ ॥

उत्तम,मध्यम व कनिष्ठ अशा अधिकाराचे ते लोक आपापल्या भावनेप्रमाणे स्पष्ट बोलू लागले लोकांमध्ये जे ते आपापली उपासना श्रेष्ठ मानतात (ह्यावर अनेक जण अमुक देव श्रेष्ठ,अमुक,मध्यम व अमुक कनिष्ठ असे आपापल्या संप्रदायाच्या अभिमानाने बोलते झाले.)

कोणीयेक ऐसें म्हणती । कर्ता देव मंगळमूर्ती । येक म्हणती सरस्वती । सर्व करी ॥ ५ ॥

मंगलमूर्ति देव कर्ता आहे,असे कोणी म्हणाले,सरस्वती सर्व करते (शारदा सर्वाकर्ती) असे कोणी म्हणाले.

येक म्हणती कर्ता भैरव । येक म्हणती खंडेराव । येक म्हणती बीरेदेव । येक म्हणती भगवती ॥ ६ ॥

कोणी भैरव,खंडेराव,बिरदेव,भगवती

येक म्हणती नरहरी । येक म्हणती बनशंकरी । येक म्हणती सर्व करी । नारायेणु ॥ ७ ॥

कोणी नरहरी ,बनशंकरी,सर्वकर्ता नारायण

येक म्हणती श्रीराम कर्ता । येक म्हणती श्रीकृष्ण कर्ता । येक म्हणती भगवंत कर्ता । केशवराज ॥ ८ ॥

श्रीराम,श्रीकृष्ण,भगवंत,केशवराज

येक म्हणती पांडुरंग । येक म्हणती श्रीरंग । येक म्हणती झोटींग । सर्व करी ॥ ९ ॥

पांडुरंग,श्रीरंग,झोटिंग,

येक म्हणती मुंज्या कर्ता । येक म्हणती सूर्य कर्ता । येक म्हणती अग्न कर्ता । सकळ कांहीं ॥ १० ॥

मुंजा,सूर्य,अग्नि

येक म्हणती लक्ष्मी करी । येक म्हणती मारुती करी । येक म्हणती धरत्री करी । सर्व कांही ॥ ११ ॥

लक्ष्मी,मारुति,सर्वकर्ता,तर कोणी धरित्री (पृथ्वी) सर्व काही कर्ती आहे असे म्हणतात.

येक म्हणती तुकाई । येक म्हणती येमाई । येक म्हणती सटवाई । सर्वकरी । १२ ॥

कोणी म्हणतात तुकाई,यमाई,सटवाई

येक म्हणती भार्गव कर्ता । येक म्हणती वामन कर्ता ।येक म्हणती परमात्मा कर्ता ।येकचि आहे ॥ १३ ॥

भार्गव,वामन कर्ता आहे,एक म्हणजे एकच परमात्मा कर्ता आहे.

येक म्हणती विरंणा कर्ता । येक म्हणती बस्वंणा कर्ता । येक म्हणती रेवंणा कर्ता । सर्व कांहीं ॥ १४ ॥

काही म्हणतात विरण्णा,वसण्णा, रेवण्णा कर्ता आहे.

येक म्हणती रवळया कर्ता।येक म्हणती स्वामी कार्तिक कर्ता ।येक म्हणती वेंकटेश कर्ता।सर्व कांहीं॥१५॥

कोणी म्हणतात रवळनाथ,कार्तिकस्वामी,व्यंकटेश कर्ता आहे.

येक म्हणती गुरु कर्ता । येक म्हणती दत्त कर्ता । येक म्हणती मुख्य कर्ता । वोढ्या जगन्नाथ ॥ १६ ॥

काही म्हणतात गुरु,दत्त,ओढ्याजगन्नाथ कर्ता आहे

येक म्हणती ब्रह्मा कर्ता । येक म्हणती विष्णु कर्ता । येक म्हणती महेश कर्ता । निश्चयेंसीं ॥ १७ ॥

कोणी म्हणतात ब्रह्मा,विष्णु,महेश्वर खरोखर कर्ता आहे .

येक म्हणती प्रजन्य कर्ता । येक म्हणती वायो कर्ता । येक म्हणती करून अकर्ता । निर्गुण देव ॥ १८ ॥

दुसरे म्हणतात पर्जन्य कर्ता,कोणी म्हणतात वायु कर्ता आहे आणि करून अकर्ता असा निर्गुण देव आहे असे कोणी म्हणतात.

येक म्हणती माया करी । येक म्हणती जीव करी । येक म्हणती सर्व करी । प्रारब्धयोग ॥ १९ ॥

कोणी म्हणतात माया करते,कोणी म्हणतात जीव करतो, कोणी म्हणतात प्रारब्धयोग सर्व करतो.

येक म्हणती प्रेत्न करी । येक म्हणती स्वभाव करी । येक म्हणती कोण करी । कोण जाणे ॥ २० ॥

कोणी म्हणतात प्रयत्न करतो, कोणी म्हणतात स्वभाव करतो कोणी म्हणतात कोण करतो कोण जाणे?(ह्याप्रमाणे प्रत्येकाचे अभिमानी उठले व आपापल्या उपास्याला सृष्टीचे कर्तृत्व देऊ लागले,त्यात मुंज्या झोटिंग म्हसोबा ई. देवतांचे अभिमानीही बोलू लागले,कोणी निर्गुण देव अकर्ता असे म्हणणारे निघाले. कोणी कोण कर्ता कोण जाणे ! ह्याप्रमाणे कानावर हात ठेऊ लागले.

ऐसा कर्त्याचा विचार । पुसतां भरला बाजार । आतां कोणाचें उत्तर । खरें मानावें ॥ २१ ॥

अश्याप्रकारे कर्ता कोण हे विचारले असता मतांचा बाजार भरला आता त्यात कोणाचे खरे मानावे?

जेहिं जो देव मानिला । कर्ता म्हणती तयाला । ऐसा लोकांचा गल्बला । वोसरेना ॥ २२ ॥

ज्यांनी जो देव मानला त्यालाच ते तो कर्ता म्हणतात.असा लोकांचा वाद मिटत नाही

आपुलाल्या साभिमानें । निश्चयेचि केला मनें । याचा विचार पाहाणें । घडेचिना ॥ २३ ॥

आपापल्या देवांचा अभिमान धरून (तोच कर्ता) असा मनाने निश्र्चय केलेला असतो.पण त्याचा खरा विचार कोणासच होत नाही.

बहु लोकांचा बहु विचार । अवघा राहों द्या बाजार । परंतु याचा विचार । ऐसा आहे ॥ २४ ॥

अनेक लोकांचे अनेक विचार असतात आता हा सगळा बाजार बाजूस ठेऊ पण ह्यातला खरा विचार असा आहे.

श्रोतीं व्हावें सावधान । निश्चयें तोडावा अनुमान । प्रत्यये मानावा प्रमाण । जाणते पुरुषीं ॥ २५ ॥

श्रोत्यांनी निट लक्ष द्यावे निश्र्चयाच्या (भाषणाने) अनुमान (शंका) असेल ते नाहीसे करावे. शहाण्या पुरुषाने (ह्याबाबतीत) अनुभव हेच खरे प्रमाण मानावे.(जाणत्यांनी प्रत्यय प्रमाण मानून विचारांची तड लावली पाहिजे)

जें जें कर्तयानें केलें । तें तें त्याउपरी जालें । कर्त्यापूर्वी आडळलें । न पाहिजे कीं ॥ २६ ॥

(असो आता प्रत्ययाचा विचार सांगतो) कर्त्याने जे काही केले असेल ते त्या कर्त्याच्या मागाहून उत्पन्न व्हावयाला पाहिजे, कर्त्याच्या पूर्वी आढळता कामा नये.(हे खरे ना? कर्ता आधी आणि तदुपरि कार्य हे कबूल केले पाहिजे.)

केलें तें पंचभूतिक । आणि पंचभूतिक ब्रह्मादिक । तरी भूतांशें पंचभूतिक । केलें तें घडेना ॥ २७ ॥
( तरी भूतांशें पंचभूतिक - तथापि पंचभूतांच्या अंशाने पांचभौतिक सृष्टी करता येणे शक्य नाही.)

जे (दृश्य) उत्पन्न केले ते पंचभूतात्मक आहे आणि ब्रह्मदेवादिक सकल देव पंचभूतात्मक आहेत. अर्थात भूतांचे अंश असे जे ब्रह्मदेवादिक देव त्यांनी हे पंचभूतात्मक विश्र्व निर्माण केले असे होणार नाही

पंचभूतांस वेगळें करावें । मग कर्त्यास वोळखावें । पंचभूतिक तें स्वभावें । कर्त्यांस आलें ॥ २८ ॥

तेव्हा पंचभूते बाजूस काढून (पंचभौतिक ब्रह्मांड वेगळे करून) मग कर्त्याला शोधून काढावे.ब्रह्मदेवादिकांना कर्ता म्हणावे तर पंचभूते त्यांच्यातच आहेत.(पंचभौतिक हे कार्य असल्यामुळे त्याचा कर्ता पंचभौतिकाहून निराळा असणार हे स्पष्ट आहे)

पंचभूतांवेगळें निर्गुण । तेथें नाहीं कर्तेपण । निर्विकारास विकार कोण । लाऊं शके ॥ २९ ॥

निर्गुण हे पंचभूताहून वेगळे असून त्याच्या ठिकाणी कर्तेपणा नाही त्या निर्विकाराला कर्तेपणाचा विकार कोण लावू शकेल? (पंचभूताहून निराळे एक निर्गुण निर्विकार ब्रह्म आहे,पण त्या निर्विकारास विकार कोण लाऊ शकेल?)

निर्गुणास कर्तव्य न घडे । सगुण जाल्यांत सांपडे । आतां कर्तव्यता कोणेकडे । बरें पाहा ॥ ३० ॥
( जाल्यांत - जे झाले त्यात,कार्यात )

निर्गुणाकडे कर्तेपणा येत नाही आणि सगुण झालेल्यात (झाले त्यात कार्यात) मोडते. तेव्हा आता कोणाकडे कर्तेपणा लावावा ह्याचा नीट विचार करा.

लटिक्याचा कर्ता कोण । हें पुसणेंचि अप्रमाण । म्हणोनि हेंचि प्रमाण । जें स्वभावेंचि जालें ॥ ३१ ॥

सृष्टि लटकी म्ह.माया मिथ्या हा जर सिद्धांत आहे तर मिथ्या सृष्टीचा कर्ता कोण म्हणून काय विचारावे? लटक्याचा कर्ता कोण हे विचारणेच असंबद्ध आहे.म्हणून हे पांचभौतिक स्वाभविक झाले असे मानणे हेच खरे होय.

येक सगुण येक निर्गुण । कोठें लाऊं कर्तेपण । या अर्थाचें विवरण । बरें पाहा ॥ ३२ ॥

पंचभूते सगुण व ब्रह्म निर्गुण आता ह्या दोहोत कर्तेपणा कोठे लावावा? ह्या म्हणण्याचा नीट विचार करून पाहा.

सगुणें सगुण केलें । तरी तें पूर्वींच आहे जालें । निर्गुणास कर्तव्य लाविलें । नवचे कीं कदा ॥ ३३ ॥

सगुणाने सगुण केले म्हणावे तर ते (सगुणकार्य)(सगुणकर्त्याच्या) पूर्वीच झाले आहे आणि निर्गुणाला तर कधीच कर्तेपणा लावता येणार नाही.

येथें कर्ताचि दिसेना । प्रत्यये आणावा अनुमाना । दृश्य सत्यत्वें असेना । म्हणोनियां ॥ ३४ ॥

येथे कर्ताच दिसत नाही दृश्याच्या ठिकाणी खरेपणा नाही म्हणून अनुभवानेच धोरण बांधले पाहिजे (दृश्य सत्य नाही मिथ्या आहे म्हणुन त्याचा कर्ता कोणी नाही सृष्टी स्वभावेचं झाली,ती मिथ्या असल्यामुळे तिचा कर्ता कोणी नाही असेच म्हंटले पाहिजे.)

केलें तें अवघेंच लटिकें । तरी कर्ता हें बोलणेंचि फिकें । वक्ता म्हणे रे विवेकें । बरें पाहा ॥ ३५ ॥

(केले ते सारे लटिके म्हणून कर्ता कोणी दिसत नाही हा जर प्रत्यय येतो तर उगाच उपासनेचा मिथ्या अभिमान घेऊन अमुक कर्ता म्हणून म्हणण्यात काय अर्थ? सृष्टि मिथ्या व मिथ्याचा कर्ता कोणी नाही असा अंतरी प्रत्यय येतो हे विवेकाचे बोलणे आहे.) जे केले ते सगळेच जर खोटे आहे तर खोट्याचा कर्ता अमुक असे बोलणेच व्यर्थ होय. वक्ता म्हणतो."अरे नीट विचार करून पहा.

बरें पाहाता प्रत्यये आला । तरी कां करावा गल्बला । प्रचित आलियां आपणाला । अंतर्यामीं ॥ ३६ ॥

नीट विचार करून पाहिले म्हणजे अनुभव येतो आपल्याला अंतःकरणात अनुभव आल्यावर मग गडबड का करावी ?

आतां असो हें बोलणें । विवेकी तोचि हें जाणे । पूर्वपक्ष लागे उडवणें । येरवीं अनुर्वाच ॥ ३७ ॥

आता हे बोलणे पुरे,विवेकी असेल त्यालाच हे कळते,बाकी ब्रह्म हे अनिर्वाच्य आहे.पण पूर्वपक्षाचा (मायेचा,शंकेचा) निरास करण्यासाठी बोलावे लागते. (पूर्वपक्ष उडवायला पाहिजे म्हणून अनेक कर्ते उभे केले तत्वत: पाहता," अरे जे जालेचि नाही: त्याचा कर्ता कोण आढळणार?)

तंव श्रोता करी प्रस्न । देहीं सुखदुःखभोक्ता कोण । पुढें हेंचि निरूपण । बोलिलें असे ॥३८ ॥

(हे उत्तर ऐकून एका श्रोत्याने प्रश्न केला,की कर्ता कोणी नाही तर मग देही जे सुख-दु:ख होते त्याचा भोक्ता कोण? ह्याचे उत्तर पुढे देतो) तेव्हा देहामध्ये सुखदु:ख भोक्ता कोण आहे? असा श्रोत्यांनी प्रश्न केला.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कर्तानिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : आत्माविवरण ॥ श्रीराम ॥**

आत्मयास शेरीरयोगें । उद्वेग चिंता करणें लागे । शरीरयोगें आत्मा जगे । हें तों पगटचि आहे ॥ १ ॥

शरीराच्या योगाने आत्म्याला उद्वेग,चिंता वाहावी लागते व शरीरामुळेच आत्मा जगतो हे तर प्रसिद्धच आहे

देह अन्नचि खायेना । तरी आत्मा कदापि जगेना । अत्म्याविण चेतना । देहास कैंची ॥ २ ॥

देह अन्न खाणार नाही तर आत्मा कधीही जगवायचा नाही व आत्म्याशिवाय देहाला चेतना कशी येईल?

हें येकावेगळें येक । करूं जातां निरार्थक । उभयेयोगें कोणीयेक । कार्य चाले ॥ ३ ॥

ह्यांना वेगवेगळे केले तर दोन्ही व्यर्थ होतील दोघांच्या संयोगानेच कोणतेही कार्य चालते.( एकावीण एक व्यर्थ आहे. उभय योगाने कार्य चालते.)

देहाला नाहीं चेतना । अत्म्यास पदार्थ उचलेना । स्वप्नभोजनें भरेना । पोट कांहीं ॥ ४ ॥

नुसत्या देहाला चेतना नाही तसेच नुसता आत्मा काही पदार्थ उचलू शकत नाही. स्वप्नातील जेवणाने पोट भरत नसते

आत्मा स्वप्नावस्थेंत जातो । परंतु देहामध्यें हि असतो । निदसुरेपणें खाजवितो । चमत्कार पाहा॥ ५ ॥

( निदसुरेपणें - अज्ञानाने,झोपेत )
आत्मा हा स्वप्नावस्थेत जातो पण स्थूलदेहातही असतोच. झोपेमध्येच आंग खाजवितो हा त्याचा चमत्कार पहा!

अन्नरसें वाढे शरीर । शरीरप्रमाणें विचार । वृद्धपणीं तदनंतर । दोनी लाहानाळती ॥ ६ ॥
( लाहानाळती - क्षीण होतात )

अन्नरसाने शरीर वाढते व शरीराबरोबर विचार वाढतो.म्हातारपणी शरीर व विचार दोन्ही कमी-क्षीण होत जातात.

उत्तम द्रव्य देह खातो । देहयोगें आत्मा भुलतो । विस्मरणें शुद्धि सांडितो । सकळ कांहीं ॥ ७ ॥

देह मादक पदार्थ खातो पण त्यामुळे देहाच्या योगाने आत्म्याला भूल येते आणि विस्मरणाने त्याला कशाचीही शुद्धि राहात नाही.

देहानें घेतलें वीष । आत्मा जाये सावकास । वाढणें मोडणें आत्मयास । नेमस्त आहे ॥ ८ ॥

देहाने विष घेतले तर आत्माही निघून जातो,त्या आत्म्याला (जीवाला) वृद्धि किवा नाश पावणे हे विकार निश्र्चयेकरून भोगावेच लागतात.

वाढणें मोडणें जाणें येणें । सुख दुःख देहाचेनि गुणें । नान प्रकारें भोगणें । आत्मयास घडे ॥ ९ ॥

देहाच्या योगाने वाढणे,मोडणे,येणे,जाणे सुख दु:ख इत्यादि अनेक प्रकार आत्म्याला भोगावेच लागतात.

वारुळ म्हणिजे पोकळ । मुंग्यांचे मार्गचि सकळ । तैसेंचि हें केवळ । शरीर जाणावें ॥ १० ॥

वारूळ म्हंटले म्हणजे ते पोकळ असते,त्यात सगळे मुग्यांचे मार्ग असतात.त्याप्रमाणे हे शरीर समजावे. (मुंग्यांच्या मार्गामुळे पोकळ बनलेल्या वारुळासारखाच देह आहे.)

शरीरीं नाडीच खेटा । नाडीमध्यें पोकळ वाटा । लाहान थोर सगटा। दाटल्या नाडी ॥११॥

शरीरामध्ये नाड्यांची गर्दी (खेटा) भरलेली असून त्या नाड्यांमध्ये पोकळ मार्ग आहेत.लहान मोठ्या अशा नाड्यां शरीरात भरल्या आहेत.(नाड्यांचा एक जुडगाच आहे.)

प्राणी अन्नोदक घेतो । त्याचा अन्नरस होतो । त्यास वायो प्रवर्ततो । स्वासोस्वासें ॥ १२ ॥

प्राण्याने अन्नोदक घेतले की त्याचा अन्नरस होतो आणि श्वासोच्छवासाच्या योगाने वायु हा त्या अन्नरसाला सर्व शरीरभर खेळवितो.

नाडीद्वारां धांवे जीवन । जीवनामधें खेळे पवन । त्या पवनासरिसा जाण । आत्माहि विवरे ॥ १३ ॥

नाड्यांच्या द्वारानी जे पाणी वाहते त्यात वायु खेळत असतो त्या वायूबरोबर आत्माही संचार करीत असतो.

तृषेनें शोकलें शरीर । आत्म्यास कळे हा विचार । मग उठवून शरीर । चालवी उदकाकडे ॥ १४ ॥

तहानेने शरीर व्याकुळ झाले (शोकले) तर तो विचार आत्म्याला कळतो मग तो शरीराला उठवून पाण्याकडे चालवीत नेतो.

उदक मागे शब्द बोलवी । मार्ग पाहोन शरीर चालवी । शरीर अवघें च हालवी । प्रसंगानुसार ॥ १५ ॥

(आत्मा) पाणी मागतो,शब्दांचा उच्चार करवितो,वाट(रस्ता) पाहून शरीर (नदीकडे) चालवितो,वेळप्रसंगाप्रमाणे शरीर हलवितो

क्षुधा लागते ऐसें जाणतो । मग देहाला उठवितो । आच्यावाच्या बोलवितो । ज्यासी त्यासी ॥ १६ ॥
( आच्यावाच्या - ताळतंत्र सोडून अर्वाच्य )

भूक लागली असे आत्मा जाणतो,मग देवाला उठवितो,ज्याला त्याला अव्दातव्दा बोलवितो.

बायेकांत म्हणे जालें जालें । देह सोवळें करून आणिलें । पायांत भरून चालविलें । तांतडीं तांतडीं ॥ १७ ॥

स्त्रियांच्या देहातील आत्मा म्हणतो झाले झाले मग देहाला सोवळा करून आणतो,पायांत शिरून त्यास लवकर लवकर चालवितो.(स्वयंपाक झालासे बायकोला विचारून सोवळे नेसणे घाईघाईने पाटावर बसणे,वाढप पाहाणे,हाताकडून आपोशन घेणे,घास उचलून तोंड उघडून खाणे.)

त्यासी पात्रावरी बैसविलें । नेत्रीं भरोन पात्र पाहिलें। हाताकरवीं आरंभिलें । आपोशन ॥ १८ ॥
( आपोशन - भोजनापूर्वी,भोजनोत्तर हातावर पसाभर उदक घेणे. )

त्या देहाला पानावर नेऊन बसवितो,डोळे भरून पात्र पहावितो,नंतर हाताकडून आपोआप घास घेण्यास आरंभ करवितो

हाताकरवीं ग्रास उचलवी । मुखी जाऊन मुख पसरवी । दातांकरवीं चाववी । नेटें नेटें ॥ १९॥

हाताकडून घास उचलवितो,तोंडात शिरून तोंड पसरवितो,दातांकडून जोरजोराने चाववितो.

आपण जिव्हेमधें खेळे । पाहातो परिमळसोहळे । कैंस काडी खडा कळे । तत्काळ थुंकी ॥ २० ॥

आपणच जिव्हेमध्ये खेळून त्या रसास्वादाचे सोहोळे भोगतो,केस काढवितो,खडा कळवितो आणि तत्काळ थुंकून टाकवितो.

आळणी कळतां मीठ मागे । बायलेसि म्हणे आगे कांगे । डोळे ताऊन पाहों लगे । रागें रागें ॥ २१ ॥

अळणी आहेसे वाटेल की मीठ मागतो,"काय ग ए" म्हणून बायकोला दरडावतो व रागारागाने डोळे वटारून पाहू लागतो.

गोडी लागताच आनंदे । गोड नस्ता परम खेदे । वाकडी गोष्टी अंतरी भेदे । आत्मयासी ।।२२।।
गोड लागले कि लागलीच आनंदित होतो.गोड नसले कि अत्यंत दु:ख होते,एखादी वाकडी म्हणजे मनाविरुद्ध गोष्ट घडली कि आत्म्याला अंतःकरणात खोचते.

नाना अन्नचि गोडी । नाना रसें स्वाद निवडी । तिखट लागतां मस्तक झाडी । आणी खोंकी ॥ २३ ॥

अनेक प्रकारच्या अन्नाची गोडी सांगतो,अनेक रसांचे स्वाद वेगवेगळे पहातो,तिखट लागले की मस्तक झाडतो व खोकतो.

मिरपुडी घातली फार । कायसें करितें खापर । जिव्हेकरवीं कठिणोत्तर । बोलवी रागें ॥ २४ ॥

मिरपूड का घातली? काय करते,खापर ! अशाप्रकारे कठोर शब्द जेभेकडून रागारागाने बोलवितो.

आज्य उदंड जेविला । सवेंच ता।म्ब्या उचलिला । घळघळां घेऊं लागला। सावकास॥ २५ ॥
( आज्य - तूप )

तूप (आज्य) पुष्कळ खातो.लागलाच तांब्या उचलून घेऊन पाणी घटा घटा व्यवस्थित पिऊ लागतो.

देहीं सुखदुःखभोक्ता । तो येक आत्माचि पाहातां । आत्म्याविण देह वृथा । मडें होये ॥ २६ ॥

ह्यावरून पाहिले तर देहामध्ये सुखदु:खाचा भोग घेणारा असा एक आत्माच आहे,आत्म्याशिवाय देह म्हणजे मढे-व्यर्थ होय.(तात्पर्य आरंभापासून अखेरपर्यंतची सर्व कर्मे करणे व करवणे हे आत्माच करतो सुखदु:खभोक्ता आत्माच व त्यावाचून देह प्रेतच होय.)

मनाच्या अनंत वृत्ति । जाणणें तेचि आत्मस्थिति । त्रैलोकीं जितुक्या वेक्ती । तदांतरीं आत्मा ॥ २७ ॥

मनाच्या अनंतवृत्ति आहेत,त्या जाणणे हीच आत्मस्थिति होय. (मनाच्या अनंतवृत्ति जाणणे हा आत्म्याचा धर्म होय.) तिन्ही लोकांमध्ये जेवढ्या व्यक्ति आहेत त्याच्या अंतःकरणात आत्मा हा आहेच.

जगामध्यें जगदात्मा । विश्वामधें विश्वात्मा । सर्व चालवी सर्वात्मा । नाना रूपें ॥ २८ ॥

जगामध्ये आहे (वावरतो म्हणून) तो जगदात्मा,विश्र्वामध्ये आहे (खेळतो) तो विश्र्वात्मा व अनेक रूपे घेऊन सर्व चालवितो (सर्वा घरी नांदतो म्हणून) तो सर्वात्मा.

हुंगे चाखे ऐके देखें । मृद कठिण वोळखे । शीत उष्ण ठाउकें । तत्काळ होये ॥ २९ ॥

हुंगतो,चाखतो,ऐकतो,पाहतो,मऊ किंवा कठिण ओळखतो थंड किंवा उष्ण त्याला ताबडतोब कळते.

सावधपणें लाघवी । बहुत करी उठाठेवी । या धूर्ताच्या उगवी । धूर्तचि करी ॥ ३० ॥
( धूर्ताच्या उगवी - चतुरांच्या समजूती )

तो मोठा दक्ष असून चतुर आहे,तो अनेक उलाढाली करतो,तो मोठा धूर्त आहे.(त्याच्या लीलांचा) उलगडा धूर्त असेल तोच करतो.(अशा धूर्त आत्म्याला ओळखणारा धूर्तच असला पाहिजे.)

वायोसरिसा परिमळ येतो ।परि तो परिमळ वितळोन जातो।वायो धुळी घेउनी येतो।परी तेहि जाये ॥३१॥

(आता वायु अति चपळ पण आत्म्यापुढे वायुही उणाच होय.कसे ते पहा) वायू बरोबर सुगंध येतो पण तो सुगंध विसरून (पसरून) नाहीसा होतो.तशीच वायूबरोबर धूळही येते.पण तीही नाहिशी होते.(उडून जाते.)

शीत उष्ण वायोसरिसें । सुवासें अथवा कुवासें । असिजे परी सावकासें । तगणें न घडे ॥ ३२ ॥

वायू बरोबर थंडी,उष्णता,सुवास,कुवास ही सर्व असतात.पण ती फार वेळ टिकत नाहीत.( तगणे न घडे)

वायोसरिसे रोग येती । वायोसरिसी भूतें धांवती । धूर आणी धुकटें येती । वायोसवें ॥ ३३ ॥

वायूबरोबर रोग येतात, भुते धावतात धूर व धुके हे हीही वायूबरोबर येतात.

वायोसवें कांहींच जगेना । आत्म्यासवें वायो तगेना । आत्म्याची चपळता जाणा । अधिक आहे ॥ ३४ ॥

अशा रीतीने,वायूच्या बरोबरीने कोणीच टिकत (जगत) नाही.पण तो वायु आत्म्याबरोबर टिकाव धरीत नाही (पण आत्म्यापुढे मात्र वायूची मात्रा चालत नाही) आत्म्याचा चपळपणा (वायूपेक्षा) अधिक आहे.

वायो कठिणास आडतो । आत्मा कठिण भेदून जातो । कठिण पाहों तरी तो । छेदेहिना ॥ ३५ ॥

वायु कठिण पदार्थाला अडून राहतो (कठिण पदार्थ आड आलाच की वायु अडलाच) पण आत्मा कसल्याही कठिण पदार्थाचा भेद करून पलीकडे जातो.ह्यावरून तो कठिण आहे.म्हणाल तर तो कोणाचाही छेद करीत नाही (किवा त्याचा कोणी छेद करू शकत नाही)

वायो झडझडां वाजे । आत्मा कांहींच न वाजे । मोनेंचि अंतरीं समजे । विवरोन पाहातां ॥ ३६ ॥

वायु (स्थूल म्हणुन) झडझडा वाजतो.आत्म्याचा काहीच शब्द होत नाही,निवांत बसून अंतःकरणात विचार करून पहिले तर त्याचे ज्ञान मात्र  होते.

शरीरास बरें केलें । तें आत्मयास पावलें । शरीरयोगें जालें । समाधान ॥ ३७ ॥

शरीरास बरे केले म्हणजे ते आत्म्यास पोचते, शरीराच्या योगाने आत्म्याचे समाधान होते.(शरीरास सुख दिले की आत्मा सुखावतो)

देहावेगळे उपाये नाना । करितां आत्मयास पावेना । समाधान पावे वासना । देहाचेनि ॥ ३८ ॥

वाट्टेल तेवढे उपाय करू म्हंटले तरी ते देहाशिवाय आत्म्याला पोहोचत नाहीत.देहाच्या योगानेच (आत्म्याच्या) वासनेची तृप्ति होते.

देहआत्मयाचें कौतुक । पाहों जातां हें अनेक । देहावेगळी आडणुक । आत्मयास होये ॥ ३९ ॥

देह व आत्मा ह्यांच्या संयोगाने चमत्कार पाहू लागले तर पुष्कळच आहेत देहावाचून आत्म्याची अडवणूक होते.(देह व आत्मा ह्यांचे कौतुक वर्णन करावे तितके थोडेच आहे, देहावाचून आत्म्याचे अडते.)

येक असतां उदंड घडे । वेगळें पाहातां कांहींच न घडे । विवेकें त्रिलोकीं पवाडे । देहात्मयोगें ॥ ४० ॥

दोघे एकत्र असले (देह व आत्मा ह्यांचा संयोग असला ) म्हणजे पुष्कळच कार्यभाग होतो वेगवेगळे झाले तर काहीच होत नाही ( कुडी व आत्मा दोघांच्याही हातून काहीच होत नाही ) देह व आत्मा ह्यांच्या संयोगाने विवेकाच्या बळावर पुरुष त्रैलोक्यात गाजतो ( उभय संयोगाने विवेकाच्या बळावर पुरुष त्रैलोक्यात गाजतो (उभयसंयोगामुळे विवेकी पुरुष ब्रह्मांडाचा विचार करून मुक्त होतो.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मविवरणनाम समास नवावा ॥**

**समास दहावा : शिकवणनिरूपण ॥ श्रीराम ॥**

पालेमाळा सुमनमाळा । फळमाळा बीजमाळा । पाषाणमाळा कवडेमाळा । सुत्रें चालती ॥१॥

( माळांचे अनेक प्रकार आहेत) तुळशीची पाने (पाले),फुले,फळे,बीजे,दगड,कवड्या ह्या सर्वांच्या माळा दोऱ्याने करता येतात.

स्फटिकमाळा मोहरेमाळा । काष्ठमाळा गंधमाळा । धातुमाळा रत्नमाळा । जाळ्या वोलि चांदोवे ॥२॥
( वोलि चांदोवे - ओळी,छत )

स्फटिक,मोहरा (ओषधी मणि),काष्ठमणि,गंधगोळ्या,धातूंचे मणि,रत्ने इत्यादिकांच्या अनेक प्रकारच्या माळा,जाळ्या,वेल,छतांचे चांदवे वगैरे काहीतरी आहेत.

परी हें तंतूनें चालतें। तंतू नस्तां विष्कळीत होतें। तैसें म्हणों आत्मयातें। तरी साहित्य न पडे ॥ ३ ॥

(पण त्यांच्या आतून जो दोरा ओवलेला असतो त्यावर ह्या चालतात) पण हे सर्व दोऱ्यामुळे करता येते.तो तंतु नसेल तर सर्व विस्कळीत होईल,त्या दोऱ्यासारखा आत्मा आहे असे म्हटल्यास दृष्टांत योग्य होणार नाही (साहित्य न पडे) ( त्याप्रमाणे पदार्थमात्राच्या आतून आत्मतंतू आहेत (सूत्रे मणिगणा इव )

तंतूस मणी वोविला। तंतूमध्येंचि राहिला । आत्मा सर्वांगीं व्यापला । पाहाना कां॥ ४ ॥

दोऱ्यामध्ये मणी ओवला तर तो दोरा त्याच्या मध्यभागी मात्र राहतो आणि आत्मा तर सर्व शरीराला व्यापून असतो हे आपण पहात नाही का? (तंतू मण्याच्या आत मात्र असतो पण आत्मतंतु अंतर्बाह्य व्यापून असतो.)

आत्मा चपळ सहजगुणें । दोरी काये चळों जाणे । म्हणोन दृष्टांत देणें । साहित्य न घडे ॥ ५ ॥

तसेच आत्मा स्वभावत: चपळ आहे, दोऱ्याला काय चपळपणा करता येणार? (तो जड निर्जीव) म्हणुन हा दृष्टांत दिला तर बरोबर लागू पडत नाही (दृष्टांत अपूर्ण आहे)

नाना वल्लींत जळांश । उसांमध्यें दाटला रस । परी तो रस आणी बाकस । येक नव्हे ॥ ६ ॥
( बाकस - चोयट् )या

अनेक वल्लीमध्ये (वेलीत) पाण्याचा अंश भरलेला असतो व उसामध्ये रस वाढलेला असतो.तरी पण तो रस आणि चोथा-चिपाडे एक नव्हेत.

देही आत्मा देह अनात्मा । त्याहून पर तो परमात्मा । निरंजनास उपमा । असेचिना ॥ ७ ॥

देही (हा देह धारण करणारा) आत्मा व देह अनात्मा आहे,त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ (पलीकडे) परमात्मा आहे.त्या निरंजनाला द्यायला उपमाच नाही.

रायापासून रंकवरी । अवघ्या मनुष्यांचियां हारी । सगट समान सरी । कैसी करावी ॥ ८ ॥

राजापासून रंकापर्यंत सगळी माणसेच,पण ती सारी एका पंक्तीला कशी बसवावी? सरसकट सर्वांची बरोबरी कशी करावी?

देव दानव मानव । नीच योनी हीन जीव । पापी सुकृति अभिप्राव । उदंड आहे ॥ ९ ॥

देव,दैत्य,मनुष्य,उंच नीच योनि,उत्तम अधम (हीन) जीव,पापी,पुण्यवान असे अनेक भेद आहेत.

येकांशें जग चाले । परी सामर्थ्य वेगळालें । येकासंगे मुक्त केलें । येकासंगें रवरव ॥ १० ॥

परमेश्वराच्या एका अंशाने जग चालत असले (एकांशे जग चाले हे देवाचे म्हणणे खरे आहे.) तरी प्रत्येक जीवाचे सामर्थ्य वेगवेगळे आहे एकाच्या संगतीने मुक्ति मिळते तर एकाच्या संगतीने जीवाला नरकवास

(रवरव) भोगावा लागतो.

साकर माती पृथ्वी होये । परी ते माती खातां नये । गरळ आप नव्हे काये । परी तें खोटें ॥११॥

साखर व माती हे दोन्ही पदार्थ तत्वतः पृथ्वीरुप आहेत. तरी पण साखरेसारखी माती खाता येत नाही (सापाचे) गरळ (विष) हे सुद्धा पाणीच नव्हे काय? पण ते घातक (विष व पाणी दोन्ही आपच पण विष पिता येत नाही.)

पुण्यात्मा आणी पापात्मा । दोहिंकडे अंतरात्मा । साधु भोंदु सीमा । सांडूंच नये ॥ १२ ॥

पुण्यशील व पापी या दोघांतही एकच अंतरात्मा आहे,तथापि साधू व भोंदू यांच्याशी वागण्याची मर्यादा सोडता कामा नये (पण साधु व भोंदू हा भेद आहेच.)

अंतर येक तों खरें । परी सांगातें घेऊं न येती माहारे । पंडित आणि चाटें पोरें । येक कैसीं ॥ १३ ॥
( माहारे - कामक्रोधादी षडरिपुंच्या आहारी गेलेले )

सर्वांचा अंतरात्मा एकच आहे हे खरे तरी पण महारांना पंक्तीला जेवायला घेऊन बसता येत नाही.(ब्राह्मण व महार दोघात एकच आत्मा पण एक पंगत करता येत नाही.) पंडित व वात्रट पोरे एक कशी होतील?

मनुष्य आणि गधडे । राजहंस आणि कोंबडें । राजे आणि माकडें । एक कैसीं ॥ १४ ॥

माणसे व गाढवे,राजहंस व कोंबडे (कावळे) राजे व माकडे (दोघे उंचावर बसतात म्हणून) ही एक कशी होतील?

भागीरथीचें जळ आप । मोरी संवदणी तेंहि आप । कुश्चिळ उदक अल्प । सेववेना ॥ १५ ॥

भागिरथीचेही पाणीच आणि मोरीचे-सोदणीचेही (परटाच्या दोणीतलेही) पाणीच पण ते घाणेरडे पाणी थोडेसेही पिता येत नाही (गंगाजळ व मोरी डबक्याचे पाणी ही सारी एक होतील काय?)

याकारणें आचारशुद्ध । त्याउपरी विचारशुद्ध । वीतरागी आणि सुबुद्ध । ऐसा पाहिजे ॥ १६ ॥

ह्यासाठी अगोदर आचार शुद्ध पाहिजे,त्यानंतर शुद्ध विचार,वैराग्य आणि समंजसपणा पाहिजे,(म्हणुन आचार शुद्ध विचार,निर्मळ,वैराग्यशील व सुबुद्ध अशा थोराची कोटी काही वेगळीच होते.)

शूरांहून मानिलें लंडी । तरी युद्धप्रसंगीं नरकाडी । श्रीमंत सांडून बराडी । सेविता कैसें ॥ १७ ॥

(नरकाडी - फजिती, बराडी - दरिद्री )

शुरापेक्षा (लंडी) भित्र्याचा बडेजाव राखला (अधिक गौरव केला) तर युद्धाचे प्रसंगी फजितीच (नरकाडी-फजितवाडा ठेवलेलाच) श्रीमंताला सोडून दारिद्र्याची सेवा केली तर फळ काय?

येका उदकें सकळ जालें । परी पाहोन पाहिजे सेविलें । सगट अवघेंच घेतलें । तरी तें मूर्खपण ॥ १८॥

एकाच पाण्यापासून सर्व झालेले असले तरी विचार करून प्याले पाहिजे सरसकट दिसेल ते पिऊ लागले तर तो मूर्खपणा होय.

जीवनाचेंच जालें अन्न । अन्नाचें जालें वमन । परी वमनाचें भोजन । करितां न ये ॥ १९॥

पाण्यापासून अन्न होते व त्या अन्नाची वांती होते.परंतु ती वांती भक्षण करता येत नाही

तैसें निंद्य सोडूनद्यावें । वंद्य तें हृदईं धरावें । सत्कीर्तीनें भरावें। भूमंडळ ॥ २० ॥

त्याप्रमाणे निंद्य असेल ते टाकुन द्यावे व वंद्य असेल ते अंतःकरणात ठेवावे (तेवढेच घ्यावे) आणि आपल्या सत्कीर्तीने सगळे जग भरून टाकावे.

उत्तमांसि उत्तम माने। कनिष्ठांस तें न माने । म्हणौन करंटे देवानें । करून ठेवले ॥ २१ ॥

जो स्वतः उत्तम असतो त्याला उत्तम (मार्ग-पदार्थ) पसंत पडतो,नीचाला ते आवडत नाही, म्हणून देव त्याला करंटा करून ठेवतो ( म्हणून देवाने ह्यांस जगात करंटे केले आहेत.)

सांडा अवघें करंटपण । धरावें उत्तम लक्षण । हरिकथा पुराण श्रवण । नीति न्याये ॥२२॥

ह्यासाठी करंटेपणा टाकून देऊन उत्तम सद्गुण घ्या, हरिकथा किवा पुराण ऐकावे.नीतिन्यायाने वागावे.

वर्तयाचाविवेक । राजी राखणें सकळ लोक । हळुहळु पुण्यलोक। करीत जावे॥ २३ ॥

वागणूक विचारपूर्वक ठेवावी,सर्व लोक संतुष्ट ठेवावे,आणि त्यांना हळुहळू उत्तम पुण्यवंत-कीर्तिमान करावे (हे उत्तम गुण घ्या)

मुलाचे चालीनें चालावें । मुलाच्या मनोगतें बोलावें । तैसें जनास सिकवावें । हळुहळु ॥ २४ ॥

ज्याप्रमाणे मुलांना त्यांच्या चालीप्रमाणे चालून व त्यांच्या मनोगताप्रमाणे शिकवावे लागते,त्याप्रमाणे लोकांनाही (त्यांचे मन सांभाळून) हळुहळू शिकवावे.

मुख्य मनोगत राखणें । हेंचि चातुर्याचीं लक्षणें । चतुर तो चतुरांग जाणें । इतर तीं वेडीं ॥ २५ ॥

दुसऱ्याचे मनोगत मुख्यत: राखणे हेच चातुर्याचे लक्षण होय.जो चतुर पुरुष आहे त्याला सर्व अंगे समजतात.(चतुरंगे म्ह. साम-दाम-दंड-भेद हे चार प्रकार) बाकीचे वेडे बहुत आहेत.

वेड्यास वेडें म्हणों नये । वर्म कदापि बोलों नये। तरीच घडे दिग्विजये । निस्पृहासी ॥ २६॥

पण वेड्याला वेडे म्हणू नये कोणाचे वर्म कधीही काढुन मन दुखवू नये,तरच निस्पृहाच्या हातून दिग्विजय घडतो.

उदंड स्थळीं उदंड प्रसंग । जाणोनि करणें येथासांग । प्राणिमात्राचा अंतरंग । होऊन जावें ॥ २७ ॥

अनेक ठिकाणी अनेक प्रसंग येतात ते सर्व नीट रीतीने समजून घेऊन पर पाडावे.सर्व प्राण्यांचा केवळ प्राण होऊन राहावे.म्ह.सर्व प्रिय व्हावे.

मनोगत राखोन जातां । परस्परें होये अवस्ता । मनोगत तोडितां वेवस्तां । बरी नाहीं ॥ २८ ॥
( परस्परें - प्रतिकूल )

दुसऱ्याचे मन सांभळून निघून जाऊ लागला तर परस्परांच्या अंतःकरणास चटपट लागते.मनोगत तोडल्याने परिणाम ठीक होत नाहीत (मनोगत राखू गेल्याने परस्पर प्रेमोत्कंठा-अवस्था वाढते.मनोगत तोडल्याने परिणाम ठीक होत नाही.)

याकारणें मनोगत । राखेल तो मोठा महंत । मनोगत राखतां समस्त । वोढोन येती ॥ २९ ॥
( वोढोन - आकर्षित होतात )
ह्यासाठी जो दुसऱ्याचे मनोगत सांभाळील तो मोठा महंत होय.मनोगत राखल्याने सगळे लोक आपल्याकडे आकर्षून येतात.(मनोगत राखता आल्याने सर्वांच्या चित्ताचे आकर्षण होते.)
**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शिकवणनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक तेरावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध **दशक चौदावा – अखंडध्याननाम**

**समास पहिला : निस्पृह लक्षणनाम ॥ श्रीराम ॥**

ऐका स्पृहाची सिकवण । युक्ति बुद्धि शाहाणपण । जेणें राहे समाधान । निरंतर ॥ १ ॥

जेणेकरून निरंतर समाधान राहते अशी नि:स्पृहाची शिकवणूक,युक्ति,बुद्धि,शाहाणपण ही कशी असतात ते येथून पुढे ऐका.

सोपा मंत्र परी नेमस्त । साधें वोषध गुणवंत । साधें बोलणें सप्रचीत । तैसें माझें ॥ २ ॥

(परी नेमस्त - प्रचिती आणून देणारा)

मंत्र सोपा पण हटकून सिद्धि देणारा,ओषध साधे पण गुण चांगला त्याप्रमाणे माझे बोलणे साधे पण स्वानुभवाचे आहे.

तत्काळचि अवगुण जाती । उत्तम गुणाची होये प्राप्ती । शब्दवोषध तीव्र श्रोतीं । साक्षेपें सेवावें ॥ ३ ॥

(त्याच्या योगाने) अंगातले दुर्गुण तत्काळ नाहीसे होऊन,उत्तम गुण आंगी बाणतील असे माझे मत हे शब्दरूपी तीव्र-कडक हटकून गुण देणारे औषध श्रोत्यांनी आळस टाकून (साक्षेपें) घेतले पाहिजे.

निस्पृहता धरूं नये । धरिली तरी सोडूं नये । सोडिली तरी हिंडों नये । वोळखीमधें ॥ ४ ॥

(नि:स्पृहाने ह्या गुणांचा अभ्यास केला पाहिजे) (आधी) नि:स्पृहपणा (वैराग्य) धरू नये एकदा धरला तर पुन्हा टाकु नये,(कदाचित) सोडलाच तर ओळखीच्या मंडळीत हिंडू तरी नये.

कांता दृष्टी राखों नये । मनास गोडी चाखऊं नये । धारिष्ट चळतां चाखऊं नये । मुख आपुलें ॥ ५ ॥

स्त्रीविषयी लोलुपतेची दृष्टी ठेऊ नये. मनाला विषयाची गोडी लागू देऊ नये (स्त्री भोग मनानेही घेऊ नये,तद-विषयक गोडी मनाला दाखवू नये,धैर्याने मन आवरावे.) कदाचित विषयांची गोडी मनास लागून इंद्रिय दमनाविषयी धारिष्ट्य चळलेच (क्वचित पाय घसरलाच तर पुन्हा जनात तोंड दाखवायला येऊ नये.) तर तसले काळे तोंड लोकांना दाखवू नये.(दरी-खोऱ्यात एकांतात जाऊन तोंड काळे करावे,तात्पर्य कांता विषय पूर्ण जिंकलेला असेल तरच नि:स्पृह म्हणून पुढे यावे. )

येकेस्थळीं राहों नये । कानकोंडें साहों नये । द्रव्य दारा पाहों नये । आळकेपणें ॥ ६ ॥

(कानकोंडें - लाजिरवाणा,संकुचित,ओशाळलेपणा, आळकेपणें - लोचटपणाने,आशाळभूतपणाने)

एका ठिकाणी (एका गावी किवा एका घरी दीर्घकाळ) राहु नये (कारण ओशाळेपणा होतो) कोठेही कानकोंडेपणा-ओशाळगत सहन करू नये. कनक आणि कांता ह्याविषयी (आळकेपण) अभिलाष बुद्धि धरू नये.

आचारभ्रष्ट होऊं नये । दिल्यां द्रव्य घेऊं नये । उणा शब्द येऊं नये । आपणावरी ॥ ७ ॥

आचारभ्रष्ट होऊ नये,कोणी देऊ लागले तरी द्रव्य घेऊ नये (मागू नये हे सांगणे नकोच) कोणाचाही उणा शब्द आपणावर येईल असे ढिलाइने वागू नये.

भिक्षेविषीं लाजों नये । बहुत भिक्षा घेऊं नये । पुसतांहि देऊं नये । वोळखी आपली ॥ ८ ॥

भिक्षा मागण्याविषयी (भिक्षावृत्तीची) लाज धरू नये.पुष्कळ भिक्षा आणली तरी तितकी घेऊ नये.(थोडी घ्यावी)(लोभाने फार भिक्षा घेऊ नये.)कोणी विचारले तरी आपली ओळख देऊ नये.

धड मळिन नेसों नये । गोड अन्न खाऊं नये । दुराग्रह करूं नये । प्रसंगें वर्तावें ॥ ९ ॥

(धड मळिन-मळक वस्त्र)

मळके वस्त्र धड असेल तरी नेसू नये.गोड गोड अन्न (पक्वान्ने) खाऊ नये.( का की तेणे जीभ चटावते व विकार बळावतात.) दुराग्रह धरू नये.तर प्रसंग पाहून वागावे.

भोगीं मन असों नये । देहदुःखें त्रासों नये । पुढें आशा धरूं नये । जीवित्वाची ॥ १० ॥

विषयभोगमध्ये मन आसक्त होऊ देऊ नये, देहदुःखाचा त्रास मानू नये व पुढे जगावयाचे अशी इच्छा धरू नये ( व मरणासही भिऊ नये )

विरक्ती गळों देऊं नये । धारिष्ट चळों देऊं नये । ज्ञान मळिण होऊं नये । विवेकबळें ॥ ११ ॥

वैराग्य कमी होऊ देऊ नये,धैर्य ढळू देऊ नये (विवेक व धैर्य अढळ ठेवावे) आणि विवेकाच्या बळाने (विवेक जागृत ठेऊन) ज्ञान मळिण होऊ देऊ नये)

करुणाकीर्तन सोडूं नये । अंतर्ध्यान मोडूं नये ॥ प्रेमतंतु तोडूं नये । सगुणमूर्तीचा ॥ १२ ॥

प्रेमळ कीर्तन करण्याचे टाकू नये.(करुणा-कीर्तन देवाला ज्यात आळवितो व त्याची करुणा भाकतो असे कीर्तन सोडु नये.) अंतःकरणात असलेले ध्यान मोडु नये सगुण मूर्तिविषयीचा प्रेमाचा तंतू तोडू नये.(व सगुण प्रेम रक्षून बोलावे.)

पोटीं चिंता धरूं नये । कष्टें खेद मानूं नये । समइं धीर सांडूं नये । कांहीं केल्या ॥ १३ ॥

मनात काळजी बाळगू नये,त्रास पडला तर खेद मानू नये.प्रसंगी काही झाले तरी धैर्य सोडू नये.(चिंता व कष्ट पडतात म्हणून खेद मानू नये. कसलाही प्रसंग आला तरी धैर्य सोडू नये.)

अपमानितां सिणों नये । निखंदितां कष्टों नये । धिःकारितां झुरों नये । कांहीं केल्या ॥ १४ ॥

( निखंदितां - निंदा)

कोणी अपमान केला तर खेद मानू नये कोणी टोचून बोलले तरी दुःख करू नये किवा कोणी धिक्कार केला तरी कधीही झुरत बसू नये.

लोकलाज धरूं नये । लाजवितां लाजों नये । खिजवितां खिजों नये । विरक्त पुरुषें ॥ १५ ॥

(नीतिमार्गाने चालत असता) विरक्त पुरुषाने लोकलज्जा धरू नये.कोणी लाजविले तरी लाजू नये कोणी खिजविले तरी खिजू नये.

शुद्ध मार्ग सोडूं नये । दुर्जनासीं तंडों नये । समंध पडों देऊं नये । चांडाळासी ॥ १६ ॥

शुद्ध मार्ग सोडू नये दुर्जनाबरोबर वितंडवाद करीत बसू नये.(दुर्जन ओळखून जावे पण त्यांशी वाद घालीत बसू नये.) अत्यंत दुष्ट मनुष्याशी संबंधच पडू देऊ नये.

तपीळपण धरूं नये । भांडवितां भांडों नये । उडवितां उडऊं नये । निजस्थिती आपुली ॥ १७ ॥

(तपीळपण- तापटपणा)

तापटपणा (तपीळ-रागीटपणा धरू नये,कोणी भांडण्याचा प्रयत्न केला तरी भांडू नये,आपली वैराग्याची (समाधानाची) स्थिति कोणी मोडण्याचा प्रयत्न केला तरी मोडू देऊ नये.(आत्मस्थितीची बैठक स्थिर ठेवावी)

हांसवितां हासों नये । बोलवितां बोलों नये । चालवितां चालों नये । क्षणक्षणा ॥ १८ ॥

क्षणोक्षणी कोणी हसविले तरी हांसू नये बोलविले तरी बोलू नये चालविले तरी चालू (परप्रेरणेने हसू बोलू नये)

येक वेष धरूं नये । येक साज करूं नये । येकदेसी होऊं नये । भ्रमण करावें ॥ १९ ॥

(येक साज - एकप्रकारचा वेश)

एकच वेष धरू नये एकाच थाटाने राहू नये.एके ठिकाणी (एकान्त देशात) राहू नये.हिंडत असावे (निरंतर परिभ्रमण करावे)

सलगी पडों देऊं नये । प्रतिग्रह घेऊं नये । सभेमध्यें बैसों नये । सर्वकाळ ॥ २० ॥

( प्रतिग्रह - दान)

कोणाशी अधिक सलगी होऊ देऊ नये,प्रतिग्रह (म्ह.दान) घेऊ नये,सर्वकाळ सभेमध्ये म्हणजे (लोकसमूहात बसू नये.(म्ह.काही काळ तरी एकांतात घालवावा.)

नेम आंगीं लाऊं नये । भरवसा कोणास देऊं नये । अंगीकार करूं नये । नेमस्तपणाचा ॥ २१ ॥

बंधन आंगी लावून घेऊ नये.कोणाला अमुक काम करीन असा भरवसा देऊ नये.अतिशय नियमितपणाचा अंगीकार करू नये.

नित्यनेम सांडूं नये । अभ्यास बुडों देऊं नये । परतंत्र होऊं नये । कांहीं केल्यां ॥ २२ ॥

नित्यनेम सोडू नये (पण नियमांचे बंदिस्तही होऊ नये.) पण परमार्थाचा अभ्यास बुडू देऊ नये,(सोडू नये) काही झाले तरी पराधीन होऊ नये.

स्वतंत्रता मोडूं नये । निरापेक्षा तोडूं नये । परापेक्षा होऊं नये । क्षणक्ष्णा ॥ २३ ॥

(परापेक्षा- दुसऱ्याकडून अपेक्षा)

आपली स्वतंत्र्यता नाहीशी होऊ देऊ नये निरिच्छता सोडू नये. क्षणोक्षणी दुसऱ्याची आशा (अपेक्षा) धरू नये.(अपेक्षा करीत बसू नये.)

वैभव दृष्टीं पाहों नये । उपाधीसुखें राहों नये । येकांत मोडूं देऊं नये । स्वरूपस्थितीचा ॥ २४ ॥

ऐश्वर्य-वैभव डोळ्यांनी पाहू नये.(वैभव प्राप्त व्हावे अशी लालसा उत्पन  होण्याचा संभव म्हणून ) उपाधीत होणारे सुख गोड मानून राहू नये.(उपाधीच्या सुखात गुरफटून राहू नये.) स्वरूपानुसंधानाची एकांतवृत्ति बिघडेल असे करू नये.(स्वरूपानुसंधान अखंड राखावे.)

अनर्गळता करूं नये । लोकलाज धरूं नये । कोठेंतरी होऊं नये । आसक्त कदां ॥ २५ ॥

( अनर्गळता - स्वेच्छाचार,उच्छृखलता)

स्वेच्छाचाराने-स्वच्छंदाने-वागू नये.लोकलज्जा धरू नये.कधी कोठेही आसक्ति होऊ नये.

परंपरा तोडूं नये । उपाधी मोडूं देऊं नये । ज्ञानमार्ग सोडूं नये । कदाकाळीं ॥ २६ ॥

परंपरा (पूर्वापार व गुरुसाम्प्रदाय-पद्धति) सोडून वागू नये,उपसानामार्गाची उपाधि कमी होऊ देऊ नये,केव्हाही ज्ञानमार्ग सोडू नये.

कर्ममार्ग सांडूं नये । वैराग्य मोडूं देऊं नये । साधन भजन खंडूं नये । कदाकाळीं ॥ २७ ॥

कर्ममार्ग (वर्णाश्रमाचार) सोडू नये,वैराग्य कमी होऊ देऊ नये.साधन व भजन ह्यात केव्हाही खंड पडू देऊ नये.(खंडन करू नये.)(कर्म,ज्ञान,वैराग्य,उपासना,साधन-भजन सोडु नये दृढ धरावे.)

अतिवाद करूं नये । अनित्य पोटीं धरुं नये । रागें भरीं भरों नये । भलतीकडे ॥२८॥

( अनित्य पोटीं धरुं नये - मनात अनीतिचा विचार आणू नये ; अनित्य = अनिती)

अतिशय वाद करू नये,अनीति मनात धरू नये,रागाने हट्टाला पेटून भलती सलती कामे करू नये.

न मनी त्यास सांगों नये। कंटाळवाणें बोलों नये । बहुसाल असो नये । येकें स्थळीं ॥ २९ ॥

जो कोणी आपले ऐकत नाही त्यास सांगू नये, दुसऱ्यास कंटाळा येईल असे (पाल्हाळ) बोलू नये.एके ठिकाणी फार राहू नये.

कांहीं उपाधी करूं नये । केली तरी धरूं नये । धरिली तरी सांपडों नये । उपाधीमध्यें॥ ३० ॥

कोणतीही उपाधि करू नये.(वाढवू नये.) व केली तर चित्तांत आसक्ति धरून बसू नये. धरली तर तिच्यात गुरफटून बसू नये.

थोरपणें असो नये । महत्त्व धरून बैसों नये । कांहीं मान इछूं नये । कोठेंतरी ॥ ३१ ॥

थोरपणाने राहू नये.मोठेपणा धरून बसू नये.कोठेही काही मान मिळेल अशी इच्छा धरू नये (थोरपणा किंवा महत्व धरून बसू नये,मानाची इच्छा धरू नये लहानपण धरून वागावे.

साधेपण सोडूं नये । सानेपण मोडूं नये । बळात्कारें जोडूं नये । अभिमान आंगीं ॥ ३२ ॥

( सानेपण - लहानपण)

साधेपणा टाकू नये.,लहानपणा (सानेपण) मोडू नये.मुद्दाम म्हणून अभिमान आंगी जडवून घेऊ नये.

अधिकारेवीण सांगों नये । दाटून उपदेश देऊं नये । कानकोंडा करूं नये । परमार्थ कदा ॥ ३३ ॥

(ऐकणारा व सांगणारा) अधिकारी असल्याशिवाय सांगू नये केव्हाही परमार्थ हा चोरटेपणाचा -ओशाळेपणाचा करू नये.(अधिकार नसता बळेच कोणास उपदेश देऊ नये,परमार्थ कानकोंडा करू नये.म्ह. कोप-यात न टाकता परमार्थाचे महत्व वाढवावे.)

कठिण वैराग्य सोडूं नये । कठिण अभ्यास सांडूं नये । कठिणता धरूं नये । कोणेकेविशइं ॥ ३४ ॥

कडकडीत वैराग्य सोडु नये, अभ्यास कठिण वाटला तरी सोडू नये,कोणत्याही बाबतीत कठोरपणा धरू नये.

कठिण शब्द बोलों नये । कठिण आज्ञा करूं नये । कठिण धीरत्व सोडूं नये । कांहीं केल्यां ॥ ३५॥

कठोरशब्द बोलु नये पाळण्यास कठिण अशी आज्ञा करू नये. धैर्य सांभाळणे कठिण पण ते काही झाले तरी सोडू नये.(वैराग्य,अभ्यास,धैर्य हे कठिण म्ह. अभंग असावेत पण हृदय शब्द हे कठिण नसावेत.)

आपण आसक्त होऊं नये । केल्यावीण सांगों नये । बहुसाल मागों नये । शिष्यवर्गासी ॥ ३६ ॥

आपण कोठेही आसक्त होऊ नये,करून दाखविल्याशिवाय तोंडाने बोलत बसू नये.(केल्यावाचून सांगू नये.) शिष्यमंडळी जवळ फारसे काही मागू नये.

उत्धट शब्द बोलों नये । इंद्रियेंस्मरण करूं नये । शाक्तमार्गें भरों नये । मुक्तपणें भरीं ॥ ३७ ॥

उर्मटपणाचे शब्द बोलू नये विषयेन्द्रियांचे स्मरण करू नये का कीं त्यामुळे कामादि विकारबळावून मन विषयी होते.(मी मुक्त अशा डौलाने शाक्तमार्ग-स्वच्छंदाचरणाचा मार्ग धरू नये.) शाक्तमार्ग अनुसरून स्वेच्छाचार माजवू नये.

नीच कृतीं लाजों नये । वैभव होतां माजों नये । क्रोधें भरीं भरों नये । जाणपणें ॥ ३८ ॥

(गुरूच्या किवा देवाच्या घरी) कोणतेही हलके काम करण्याची लाज धरू नये.(देव संत सेवाप्रसंगी नीच सेवेस लाजू नये.वैभव आल्यास उन्मत्त होऊ नये.) ऐश्वर्य प्राप्त झाले तर त्याच्या योगाने उन्मत्त होऊ नये.समजुन उमजून रागाने हट्टाला पेटू नये.(जाणतेपणाच्या अभिमानाने क्रोधाधीन होऊ नये.)

थोरपणें चुकों नये । न्याये नीति सांडूं नये । अप्रमाण वर्तों नये । कांहीं केल्या ॥ ३९ ॥

(थोरपणाच्या डौलात सज्जन रीतीत चुकू नये प्रमाणरहित वागू नये.) थोरपणामुळे चुकी करू नये.काही केले तरी न्याय नीती सोडू नये व खोटेपणाने वागू नये.

कळल्यावीण बोलों नये । अनुमानें निश्चये करूं नये । सांगतां दुःख धरूं नये । मूर्खपणें ॥ ४० ॥

समजल्याशिवाय बोलू नये,नुसत्या अनुमानावरून कोणताही निश्र्चय करू नये.(अनुभवाने करावा) कोणी सदुपदेश केला तर (चांगली गोष्ट सांगितल्यास) मूर्खपणाने त्याचे दुःख मानू नये.

सावधपण सोडूं नये । व्यापकपण सांडूं नये । कदा सुख मानूं नये । निसुगपणाचें ॥ ४१ ॥

सावधपणा (इंद्रियविकार प्रबळ न होतील असे दक्ष असावे.) व व्यापकपणा (ब्रह्मांडाहून विशालपण,ब्रह्मस्थिति) ह्याचा त्याग करू नये.ऐदीपणाने (आळसाचे) सुख केव्हाही मानू नये.

विकल्प पोटीं धरूं नये । स्वार्थआज्ञा करूं नये । केली तरी टाकूं नये । आपणास पुढें ॥ ४२ ॥

( आपणास पुढें - आपणासाठी काही न मागता ते सर्वासाठी मागावे.)

मनात विकल्प (वाईट कल्पना) धरू नये.स्वार्थासाठी कोणी कोणास आज्ञा करू नये. व करण्याचा प्रसंग आला तर आपण पुढे होऊन करू नये.(ती आज्ञा स्वतःपुरतीच स्वतःच्या लोभाची केवळ नसावी तर तिच्यात देवाच्या किवा सार्वजनिक कार्याचा समावेश असावा.)

प्रसंगेंवीण बोलों नये । अन्वयेंवीण गाऊं नये । विचारेंवीण जाऊं नये । अविचारपंथें ॥ ४३॥

प्रसंगावाचून बोलू नये.असंबद्धपणाने गाऊ नये.विचार सोडून अविचाराने जाऊ नये.

परोपकार सांडूं नये । परपीडा करूंनये । विकल्प पडों देऊं नये । कोणीयेकासी ॥ ४४ ॥

परोपकार टाकू नये,दुसऱ्याला त्रास देऊ नये,कोणाच्याही मनात विकल्प येऊ देऊ नये.

नेणपण सोडूं नये ।महंतपण सांडूं नये । द्रव्यासाठीं हिंडों नये ।कीर्तन करीत ॥४५॥

आपल्याकडे अजाणतेपणा घ्यावा व तो टाकू नये महंतपण धरू नये.,द्रव्यांसाठी (कथा) कीर्तन करीत हिंडू नये.

संशयात्मक बोलों नये । बहुत निश्चये करूं नये । निर्वाहेंवीण धरूं नये । ग्रंथ हातीं ॥ ४६ ॥

(निर्वाहेंवीण - कुवतीशिवाय)

संशय राहील असे भाषण करू नये पण निश्र्चयही फार करू नयेत. ( तडीस जातील असेच करावे किवा आत्मनिश्र्चयावाचून कोणताच निश्र्चय करू नये.) ग्रंथ उलगडून सांगण्याची शक्ति आंगी असल्याशिवाय (निर्वाहेवीण) ग्रंथ सांगण्यासाठी हाती घेऊ नये.

जाणपणें पुसों नये । अहंभाव दिसों नये । सांगेन ऐसें म्हणों नये । कोणीयेकासी ॥ ४७ ॥

जाणतेपणाच्या गर्वाने विचार करू नये.मी सांगेन असे कोणालाही म्हणू नये,(सांगेन असा शब्द देऊ नये-दिल्यास पाळलाच पाहिजे)

ज्ञानगर्व धरूं नये । सहसा छळणा करूं नये । कोठें वाद घालूं नये । कोणीयेकासी ॥ ४८ ॥

ज्ञानाचा गर्व धरू नये,सहसा कोणाचा छळ करू नये.,कोठे कोणाशीच वाद घालत बसू नये.

स्वार्थबुद्धी जडों नये । कारबारीं पडों नये । कार्यकर्ते होऊं नये । राजद्वारीं ॥ ४९ ॥

स्वार्थाची बुद्धि आंगाला लावू नये,कोणाच्या कारभारात पडू नये आणि राजदरबारात कार्यकर्ता होऊ नये.( राजद्वारी लोककार्य करून दाखवावयाची हाव बाळगू नये )

कोणास भर्वसा देऊं नये । जड भिक्षा मागों नये । भिक्षेसाथीं सांगों नये । परंपरा आपुली ॥५० ॥

कोणाला भरवसा देऊ नये.कोणाला ओझे पडेल (जड कठिण वाटेल) अशी भिक्षा मागू नये भिक्षा मिळविण्यासाठी आपली परंपरा (मी अमुक परमार्थ केला असे) सांगत बसू नये.

सोयरिकींत पडों नये । मध्यावर्ति घडों नये । प्रपंचाची जडों नये । उपाधी आंगीं ॥ ५१ ॥

(मध्यावर्ति - (कुवत नसता) मध्यस्थी)

(विवाहाची) सोयरिकी जमवून देण्याच्या कामात पडू नये ( दोहीकडच्या शिव्या खायचा प्रसंग यायचा) त्यात मध्यस्थी करू नये.अंगाला प्रपंचाची उपाधि लावून घेऊ नये.

प्रपंचप्रस्तीं जाऊं नये । बाष्कळ अन्न खाऊं नये । पाहुण्यासरिसें घेऊं नये । आमंत्रणें कदां ॥ ५२ ॥

(बाष्कळ - अपवित्र/शिळे)

(निस्पृहाने प्रपंच्याच्या हाती प्रपंचहस्ती सापडू नये.) प्रपंचाचे प्रस्थ (प्रयोजन मेजवानी)(प्रपंचप्रस्थी-पाठभेद) वाढले असेल तेथे जाऊ नये.(भलते-भ्रष्ट) अन्न खाऊ नये पाहुण्याबरोबर आपण केव्हाही आमंत्रण घेऊ नये.

श्राध पक्ष सटी सामासें । शांती फळशोबन बारसें । भोग राहात बहुवसें । नवस व्रतें उद्यापनें ॥ ५३ ॥

तेथें निस्पृहें जाऊं नये । त्याचें अन्न खाऊं नये । येळिलवाणें करूं नये । आपणासी ॥ ५४ ॥

(येळिलवाणें - ओशाळे)

श्राद्ध,पक्ष,(सट) षष्ठीपूजन (समास) षांण्मासिक श्राद्धे,शांती,गर्भाधान,बारसे,(भोग) मेजवान्या,अंगात वाढलेल्या पिशाच्याच्या किवा देवाच्या सांगण्यावरून केलेली अथवा एखाद्या देवतेप्रीत्यर्थ केलेली ब्राह्मणभोजने,नवस,व्रते व त्यांची उद्यापने अशा ठिकाणी नि:स्पृहाने जाऊ नये व त्याठिकाणचे अन्न खाऊ नये (येळिलवाणे) दैन्य कधीच धरू नये.

लग्नमुहूर्ती जाऊं नये । पोटासाठीं गाऊं नये । मोलें कीर्तन करूं नये । कोठेंतरी ॥ ५५ ॥

कोठे लग्नमुंजीस (आमंत्रणाशिवाय) जाऊ नये व पोटासाठी गाऊ नये,कोठेही बिदागी घेऊन किर्तन करू नये.

आपली भिक्षा सोडूं नये । वारें अन्न खाऊं नये । निस्पृहासि घडों नये । मोलयात्रा ॥ ५६ ॥

आपली भिक्षा सोडू नये,वार लावून जेऊ नये.नि:स्पृहाने मोलाची यात्रा (पैसे घेऊन दुसऱ्यासाठी यात्रा) करू नये.पोटासाठी गाऊ नये (येळीलवाणे) दैन्य कधीच धरू नये.

मोलें सुकृत करूं नये । मोलपुजारी होऊं नये । दिल्हा तरी घेऊं नये । इनाम निस्पृहें ॥ ५७ ॥

मोल घेऊन नि:स्पृहाने पुण्यकृत्यसुद्धा करू नये,मोलाने पुजारी होऊ नये.कोणीही बक्षीस (इनाम) दिले तरी घेऊ नये.

कोठें मठ करूं नये । केला तरी तो धरूं नये । मठपती होऊन बैसों नये । निस्पृह पुरुषें ॥ ५८ ॥

नि:स्पृहपुरुषाने कोठेही मठ करू नये,केलातरी तो धरू नये.म्हणजे तेथे मठपति होऊन बसू नये.

निस्पृहें अवघेंचि करावें । परी आपण तेथें न सांपडावें । परस्परें उभारावें । भक्तिमार्गासी ॥ ५९ ॥

निस्पृहाने (परमार्थासाठी परोपकारासाठी) सर्व काही करावे पण आपण त्यात सापडू नये. परभारे लोकांकरवी भक्तिमार्गाची उभारणी करावी (परस्पर भक्तिमार्ग उभारावा)

प्रेत्नेंविण राहों नये । आळस दृष्टी आणूं नये । देह अस्तां पाहों नये । वियोग उपासनेचा ॥ ६० ॥

प्रयत्न केल्याशिवाय राहू नये,आळसाला डोळ्यापुढे उभा करू नये देह असताना उपासनेचा वियोग पडू देऊ नये.

उपाधीमध्यें पडों नये । उपाधी आंगीं जडों नये । भजनमार्ग मोडूं नये । निसंगळपणें ॥ ६१ ॥

( निसंगळपणें - अव्यवस्थितपणे)

उपाधीमध्ये पडू नये.पडलेच तर ती अंगाला चिकटेल असे करू नये. निर्लज्यपणाने भजनाचा मार्ग मोडू नये.(नि:संग झालो ह्या अभिमानाने सगुणभक्ति सोडू नये पण विभक्तपणे म्ह. वेगळेपणानेही राहू नये.)

बहु उपाधी करूं नये । उपाधीविण कामा नये । सगुणभक्ति सोडूं नये । विभक्ति खोटी ॥ ६२ ॥

पुष्कळ उपाधि करू नये,पण उपाधि केल्याशिवाय राहू नये (अति सर्वत्र वर्जावे) सगुणभक्ति टाकू नये. पण वेगळेपणाने भक्ति करणे खोटे.

बहुसाल धांवों नये । बहुसाल साहों नये । बहुत कष्ट करूं नये । असुदें खोटें ॥ ६३ ॥

( असुदें - आयते)

फार भटकू (धावू) नये,फार काळ कोठेही राहू नये (पण बसूनही राहू नये) फार कष्ट करू नयेत पण आयते खाणेही वाईट (आयदीपणाही नसावा)

बहुसाल बोलों नये । अबोलणें कामा नये । बहुत अन्न खाऊं नये । उपवास खोटा ॥ ६४ ॥

फार बोलू नये,पण अगदी न बोलणे उपयोगाचे नाही ( अतिभाषण व अबोला दोन्ही नसावीत ) फार अन्न खाऊ नये पण अगदीच न खाणे खोटे (अत्याहार व उपवास दोन्ही नकोत)

बहुसाल निजों नये । बहुत निद्रा मोडूं नये । बहुनेम धरूं नये । बाश्कळ खोटें ॥ ६५ ॥

फार निजू नये पण झोपेचा फारसा मोड करणेही उपयोगाचे नाही (अतिनिद्रा व अनिद्रा दोन्ही वाईट) फार नेम धरू नयेत पण अगदीच नेम नसणे वाईटच (नियमरहित-बाष्कळ-नसावे)

बहु जनीं असों नये । बहु आरण्य सेऊं नये । बहु देह पाळूं नये । आत्महत्या खोटी ॥ ६६ ॥

लोकात फार राहू नये.अरण्यातही फार राहु नये.देहाला फार सांभाळू नये पण आत्महत्या करणे वाईटच.

बहु संग धरूं नये । संतसंग सांडूं नये । कर्मठपण कामा नये । अनाचार खोटा ॥ ६७ ॥

संगति फार धरू नये पण संतसंगति टाकू नये (सत्संग निरंतर असावा) कर्मठपणा उपयोगाचा नाही पण अनाचाराचे वागणेही वाईट (कर्मठ व कर्मनष्ट दोन्ही नसावे.)

बहु लोकिका सांडूं नये । लोकाधेन होऊं नये । बहु प्रीती कामा नये । निष्ठुरता खोटी ॥ ६८ ॥

लोकाचार किवा व्यवहार टाकू नये आणि लोकांच्या अतिशय अधीनही होऊन राहू नये.फार प्रीतिही उपयोगाची नाही पण निष्ठूरपणा धरणे वाईट.(अतिप्रीति निष्ठुरपणा दोन्ही वाईट)

बहु संशये धरूं नये । मुक्तमार्ग कामा नये । बहु साधनीं पडों नये । साधनेंवीण खोटें ॥ ६९ ॥

फार संशय धरू नये,पण अगदीच स्वच्छंदीपणाचा मार्ग उपयोगाचा नाही,फार साधनात पडू नये.पण साधन मुळीच न करणे वाईट.

बहु विषये भोगूं नये । विषयत्याग करितां नये । देहलोभ धरूं नये । बहु त्रास खोटा ॥ ७० ॥

विषयोपभोग फार भोगू नयेत व विषयांचा सर्वस्वी त्यागही करिता येत नाही,देहाचा लोभ धरू नये पण त्याला फार त्रास देणे बरे नाही (देहाचा लोभ व कंटाळा दोन्ही वाईट)

वेगळा अनुभव घेऊं नये । अनुभवेंवीण कामा नये । आत्मस्थिती बोलों नये । स्तब्धता खोटी ॥ ७१ ॥

वेगळेपणाने (स्वरूपस्थितीचा) अनुभव घेऊ नये व (अनुभवावाचूनही राहू नये ) अनुभव घेतल्याशिवाय उपयोगाचे नाही स्वरूपस्थिति बोलता येत नाही पण अगदीच न बोलणे वाईट (आत्मानुभव बोलू नये,पण मुकेपणही उपयोगाचे नाही) (आपली स्थिति सांगू नये पण अगदीच न सांगणे बरे नव्हे)

मन उरों देऊं नये । मनेंवीण कामा नये । अलक्ष वस्तु लक्षा नये । लक्षेंवीण खोटें ॥ ७२ ॥

मन शिल्लक राहू देऊ नये म्हणजे उन्मन व्हावे पण मनाशिवाय राहणेही उपयोगाचे नाही,अलक्ष अशी जी परब्रह्मवस्तु ती लक्षात येत नाही तरी पण तिकडे लक्ष लावणे बरे नव्हे (लक्ष लागलेच पाहिजे) (मनाच्या सहाय्यावाचून काही व्हावयाचे नाही पण मन मनपणे राहू न देता उन्मन झाले पाहिजे परमात्मवस्तू लक्षिता येत नाही पण लाक्षिल्यावाचून सोय नाही)

मनबुद्धिअगोचर । बुद्धीवीण अंधकार । जाणीवेचा पडो विसर । नेणीव खोटी ॥ ७३ ॥

ब्रह्मस्वरूप मन व बुद्धि ह्यांना अगम्य आहे (म्हणुन स्वस्थ बसता कामा नये) बुद्धिविण सर्व अंधकार आहे (काही काम होत नाही) स्वरूपाकडे बुद्धि नेण्याचा प्रयत्न केला पाहिजे, जाणीवेचा विसर पडला पाहिजे पण नेणीव ही चांगली नव्हे.(जाणीव व नेणीव दोन्ही जिरून ज्ञानाचे विज्ञान झाले पाहिजे) (परमात्मवस्तु लक्षिता येत नाही पण लाक्षिल्यावाचून सोय नाही ,ती मनबुद्धीच्या पलीकडे आहे.पण बुद्धीच्या सहाय्यावाचून अंधार दुर होत नाही.जाणीव नाहीशी होते पण नेणीवही कामाची नाही.)

ज्ञातेपण धरूं नये । ज्ञानेंवीण कामा नये । अतर्क्य वस्तु तर्का नये । तर्केवीण खोटें ॥ ७४ ॥

ज्ञातेपणा धरू नये पण ज्ञान असल्यावाचून चालायचे नाही,अतर्क्य अशा परब्रह्म वस्तूचा तर्क करता येत नाही पण तर्क केल्याशिवाय राहाणे वाईटच (वस्तू तर्कातीत आहे पण तर्क चालविलाच पाहिजे)

दृश्यस्मरण कामा नये । विस्मरण पडों नये । कांहीं चर्चा करूं नये । केलीयावीण न चले ॥ ७५ ॥

दृश्याचे परमार्थात स्मरण उपयोगाचे नाही आणि व्यवहारात दृश्याचे विस्मरण पडू देऊ नये,कोणतीही चर्चा म्हणजे निंदास्तुतीची वाटाघाट करू नये.पण (निरुपणप्रसंगी) ती केल्याशिवाय चालत नाही.

जगीं भेद कामा नये । वर्णसंकर करूं नये । आपला धर्म उडऊं नये । अभिमान खोटा ‖ ७६ ‖

जगामध्ये (आत्मदृष्टीने पाहिल्यास) भेद उपयोगाचा नाही,( समाजात भेदभाव उपयोगाचा नाही) पण वर्णसंकरही करू नये आपल्या धर्माचे खंडण करू नये पण त्याचा दुराभिमान धरणेही वाईट (आपले जाती-आश्रमादि धर्म उडवू नयेत,त्याचा अभिमानही नसावा)

आशाबद्धत बोलों नये । विवेकेंवीण चालों नये । समाधान हालों नये । कांहीं केल्यां ‖ ७७ ‖

(आशाबद्धत - आशाळभूतपणे)

आशाबद्ध होऊन बोलु नये,विवेक केल्याशिवाय वागू नये काही केले तरी मनातील समाधान ढळू देऊ नये

अबद्ध पोथी लेहों नये । पोथीवीण कामा नये । अबद्ध वाचूं नये । वाचिल्यावीण खोटें ‖ ७८ ‖

ग्रंथ अशुद्ध लिहू नये पण ग्रंथावाचून उपयोगाचे नाही, अशुद्ध वाचू नये पण ग्रंथ न वाचणेही चांगले नाही (अबद्ध वाचू नये,वाचल्याविण व्यर्थ )

निस्पृहें वगत्रुत्व सांडूं नये । आशंका घेतां भांडों नये । श्रोतयांचा मानूं नये । वीट कदा ‖ ७९ ‖

निस्पृहाने वक्तृत्व करणे (हरिकथानीरुपणादि) टाकू नये कोणी आशंका घेतली (शंका काढल्या) तर त्याच्याशी भांडू नये श्रोत्यांचा कधीही कंटाळा करू नये.

हें सिकवण धरितां चित्तीं । सकळ सुखें वोळगती । आंगीं बाणे महंती । अकस्मात ‖ ८० ‖

( वोळगती - प्राप्त होणे.)

हा उपदेश (नि:स्पृहाने ध्यानात धरल्यास सर्व सुखे त्याला प्राप्त होतात व अनायासे महंतीची लक्षणे अंगात बाणतात (ही शिकवण नि:स्पृहाने ध्यानात धरल्यास सर्व सुखे त्याला प्राप्त होतात व अनायासे महंतीची लक्षणे आंगात बाणतात (ही शिकवण नि:स्पृहाने चित्ती धरावी म्ह. सर्व सुखे प्राप्त होतील व नको म्हणतांही महंतपणा आंगी बाणेल.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निस्पृहलक्षणनाम समास पहिला ‖**

**समास दुसरा : भिक्षानिरूपण ‖ श्रीराम ‖**

**विषय: ज्यामुळे महंती शोभायमान होईल अशा गुणांचे वर्णन.**

ब्रह्माणाची मुख्य दीक्षा । मागितली पाहिजे भिक्षा । वों भवति या पक्षा । रक्षिलें पाहिजे ॥ १ ॥

ब्राह्मणाच्या मुख्य (व्रत) दीक्षा म्हंटली म्हणजे त्याने भिक्षा मागितली पाहिजे (ॐ भवति भिक्षां देहि । हे व्रत त्याला मौजीबंधनाच्या वेळी दिलेले असते.) ह्या व्रताचे त्याने संरक्षण केले पाहिजे.

भिक्षा मागोन जो जेविला । तो निराहारी बोलिला । प्रतिग्रहावेगळा जाला । भिक्षा मागतां ॥ २ ॥

जो भिक्षा मागून जेवण करतो तो निराहारीच म्हणावयाचा (भिक्षान्न हे निराहाराच्या तोडीचेच आहे) भिक्षा घेतल्याने दान मागण्याच्या दोषापासून मुक्त होतो.(भिक्षा मागणारा प्रतिग्रहापासून मोकळा होतो.म्ह.दान ग्रहणाचा दोष त्याला लागत नाही)

संतासंत जे जन । तेथें कोरान्न मागोन करी भोजन । तेणे केलें अमृतप्राशन । प्रतिदिनीं ॥ ३ ॥

बरे वाईट लोक जेथे असतात,तेथे ( भल्याबुऱ्या लोकांच्या घरी) जो कोरडी भिक्षा मागून भोजन करतो,त्याला दररोज अमृतपान (सोमपान) केल्याचे श्रेय मिळते.

**॥ श्लोक ॥ भिक्षाहारी निराहारी । भिक्षा नैव प्रतिग्रहः । असंतो वापि संतो वा । सोमपानं दिने दिने ॥**

ऐसा भिक्षेचा महिमा । भिक्षा माने सर्वोत्तमा । ईश्वराचा अगाध महिमा । तोहि भिक्षा मागे ॥ ४ ॥

असा भिक्षेचा महिमा मोठा आहे. भिक्षा ही सर्वोत्तम जो परमेश्र्वर (शंकर) त्यालाही मान्य आहे,शंकराचा महिमा फार अगाध आहे तेही भिक्षा मागतात.

दत्त गोरक्ष आदिकरुनी । सिद्ध भिक्षा मागती जनीं । निस्पृहता भिक्षेपासुनी । प्रगट होये ॥ ५ ॥

दत्तात्रय,गोरक्षनाथ इत्यादि सिद्धानीही लोकांमध्ये भिक्षा मागितली आहे भिक्षेमुळे नि:स्पृहपणा प्रकट होतो.

वार लाऊन बैसला । तरी तो पराधेन जाला । तैसीच नित्यावळीला । स्वतंत्रता कैंची ॥ ६ ॥

वार लावले तर पराधीनपणा येतो, तसेच रोज पंक्तीला (नित्य आवळीला-पंक्तीला) जेवणाची परवानगी असली तरी त्यांत स्वतंत्रपणा कोणता? ( वार लावणारा किवा नित्य पंक्तीला जेवणारा पराधीन होतो)

आठां दिवसां धान्य मेळविलें ।तरी तें कंटाळवाणें जालें ।प्राणी येकायेकीं चेवलें ।नित्य नूतनतेपासुनी॥७॥

( चेवलें - वंचित)

दर आठवड्यास ( एकदम भिक्षा मागून) धान्य गोळा केले व साठवून ठेवले तर तेही कंटाळवाणेच होते.त्यायोगाने नित्यनवीनपणा असण्यात जी मौज आहे ती प्राण्याला मिळत नाही.

नित्य नूतन हिंडावें । उदंड देशाटण करावें । तरीच भिक्षा मागतां बरवें । श्लाघ्यवाणें ॥ ८ ॥

(श्लाघ्यवाणें - प्रशंसनीय,स्तुत्य)

रोज नव्या ठिकाणी हिंडत खूप देशाटन करावे तरच भिक्षा मागणे बरे,तेच स्तुत्य होय.(नित्य नव्या नव्या प्रांतात,गांवांत किवा घरात भिक्षा मागणे बरे,तेच स्तुत्य होय ( नित्य नव्या नव्या प्रांतात,गांवांत किंवा घरात भिक्षा मागण्यात नि:स्पृहता स्वतंत्रता व देशाटनाचा उल्हास असतो,असे केले तरच भिक्षा मागणे श्रेयस्कर आहे.)

अखंड भिक्षेचा अभ्यास । तयास वाटेना परदेश। जिकडे तिकडे स्वदेश । भुवनत्रैं ॥ ९ ॥

( भुवनत्रैं - त्रिभुवनात )

ज्याला भिक्षेचा नेहमी अभ्यास आहे त्याला कोठेही परदेशसे वाटतच नाही (तो जाईल तेथे स्वदेशच आहे) त्याला त्रिभुवनामध्ये जिकडे तिकडे स्वदेशच असतो.

भिक्षां मागतां किरकों नये । भिक्षा मागतां लाजो नये ।भिक्षा मागतां भागों नये ।परिभ्रमण करावें ॥१०॥

( किरकों - कुरकुर, भागों - दमणे )

भिक्षा मागताना ( किरको) जिकीर करू नये,लज्जा धरू नये,किंवा थकवा मानू नये,खूप हिंडावे.

भिक्षा आणि चमत्कार । च्चाकाटती लहानथोर । कीर्ति वर्णी निरंतर । भगवंताची ॥ ११ ॥

( च्चाकाटती - आश्र्चर्यचकित )

भिक्षा मागून नेहमी परमेश्र्वराचे गुणानुवाद गात असतो आणि हातून चमत्कार घडतात हे पाहून लहानथोर आश्र्चर्य करतात (त्याला पाहून पूज्यता वाटते.)

भिक्षा म्हणिजे कामधेनु । सदा फळ नव्हे सामान्यु । भिक्षेस करी जो अमान्यु । तो करंटा जोगी ॥ १२॥

(भिक्षा सामान्य समजू नका) भिक्षा म्हणजे एक कामधेनु होय ती निरंतर फळ देते आणि तेही सामान्य नव्हे,तर अद्भुत अशा भिक्षेचा जो अव्हेर करतो तो योगी करंटा होय.

भिक्षेनें वोळखी होती । भिक्षेनें भरम चुकती । सामान्य भिक्षा मान्य करिती । सकळ प्राणी ॥ १३ ॥

भिक्षेने अनेकांच्या ओळखी होतात व कित्येक भ्रम दूर होतात अशी भिक्षा सामान्य (अल्प) असली म्हणजे सर्व मनुष्ये ती आनंदाने घालतात (सामान्य भिक्षा घालायला कोणी कंटाळतही नाही.)

भिक्षा म्हणिजे निर्भये स्थिति । भिक्षेनें प्रगटे महंती । स्वतंत्रता ईश्वरप्राप्ती । भिक्षागुणें ॥ १४ ॥

भिक्षा म्हणजे निर्भय स्थिति आहे,भिक्षेने महंती प्रकट होते. भिक्षेवर निर्वाह करणारा नेहमी मोकळा असतो,भिक्षेमुळे स्वतंत्रपणा व ईश्वर ह्यांची प्राप्ति होते.

भिक्षेस नाहीं आडथळा । भिक्षाहारी तो मोकळा । भिक्षेकरितां सार्थक वेळा । काळ जातो ॥ १५ ॥

भिक्षेला कोणाचाही कोठेच अडथळा नसतो.भिक्षेमुळे सगळा वेळ सार्थकी लागून आनंदात जातो.

भिक्षा म्हणिजे अमरवल्ली । जिकडे तिकडे लगवली । अवकाळीं फळदायेनी जाली । निर्ल्लजासी ॥१६॥

(अवकाळीं - वाईट काळ)

भिक्षा म्हणजे कल्पवल्ली असून,तिला जिकडे तिकडे फळे लागली आहेत.(लगडली) (तिच्यायोगे अनेक लाभ होतात.) लज्जा सोडून भिक्षा मागणा-याला ती वेळी अवेळी केव्हाही फलद्रूप होते.(ती कठिण प्रसंगी तारक होते. )

पृथ्वीमधें देश नाना । फिरतां उपवासी मरेना । कोणे येके ठाईं जना । जड नव्हे ॥ १७ ॥

पृथ्वीवर अनेक देश आहेत त्यात फिरावे म्हणजे उपाशी मरत नाही व कोठेच कोणाला जड होत नाही (फिरणारा उपाशी राहात नाही बरे कोणत्याही एके स्थळी ती घालणाऱ्याला जड वाटत नाही )

गोरज्य वाणिज्य कृषी । त्याहून प्रतिष्ठा भिक्षेसी । विसंभों नये झोळीसी । कदाकाळीं ॥ १८ ॥

(गोरज्य - गवळ्याचा धंदा)

(गोरज्य) गवळ्याचा धंदा (वाणिज्य) व्यापार (कृषी) शेती ह्यापेक्षाही भिक्षेचा मान जास्त आहे,ह्यासाठी झोळीला केव्हाही सोडू नये ( ब्राह्मणाने हातची झोळी सोडू नये.)

भिक्षेऐसें नाहीं वैराग्य । वैराग्यापरतें नाहीं भाग्य । वैराग्य नस्तां अभाग्य । येकदेसी ॥ १९ ॥

भिक्षेसारखे वैराग्य नाही आणि वैराग्याहून मोठे भाग्य नाही वैराग्य नसेल तर तो एक्कलकोंडा व अभागी होय.

कांहीं भिक्षा आहे म्हणावें । अल्पसंतोषी असावें । बहुत आणितां घ्यावें । मुष्टी येक ॥ २० ॥

(भिक्षा मागता लोभ बिलकूल नसावा),“काही भिक्षा आहे काय” असे म्हणावे.(व मिळाल्यास घ्यावी नाहीतर पुढे चालू लागावे) थोड्या भिक्षेने संतोष मानावा,पुष्कळ आणल्यास एकच मुष्टी घ्यावी.(अल्पसंतुष्ट असावे पुष्कळ भिक्षा वाढायला आणली तरी आपण घेऊ नये,मूठभरच घ्यावी.)

सुखरूप भिक्षा मागणें । ऐसी निस्पृहतेचीं लक्षणें । मृद वागविळास करणें । परम सौख्यकारी ॥ २१ ॥

(सुखरूप राहून) आनंदाने भिक्षा मागावी आणि लोकांना फार सुख होईल अशाप्रकारे गोड भाषण करावे,ही नि:स्पृहाची लक्षणे आहेत.

ऐसी भिक्षेची स्थिती । अल्प बोलिलें येथामती । भिक्षा वांचवी विपत्ती । होणार काळीं ॥ २२ ॥

( होणार काळीं - पुढील काळात)

अशा भिक्षेची पद्धति यथामति सांगितली,भिक्षेच्या योगाने पुढे येणारी विपत्ती टळते ( भिक्षेची महती थोड्क्क्यात सांगितली आहे विपत्ती येणार असेल तर ती भिक्षेपासून टळते.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे भिक्षानिरूपणनाम समास दुसरा ॥**

## समास तिसरा : कवित्वकला निरूपण ॥ श्रीराम ॥

**विषय: परमार्थाला साधक अशी भिक्षा किती महत्वाची आहे व ती कशी मागावी ह्याचे वर्णन.**

कवित्व शब्दसुमनमाळा । अर्थ परिमळ आगळा । तेणें संतषट्पदकुळा । आनंद होये ॥ १ ॥

**(अर्थ परिमळ - शब्दार्थसुगंध , संतषट्पदकुळा - सज्जनरूपी भ्रमरकुळ)(संत समूहास षटपदकुळ असा शब्द वापरला आहे षटपद म्हणजे भरमार जो सतत फिरत असतो तसे संतही फिरत असतात,तसेच षटपद म्हणजे सहापाय,येथे जे कामक्रोधादि(षट) सहा विकारांना आवरून किवा ताब्यात ठेऊन असतात ते “संत सज्जन असा अर्थ होतो)**

कवित्वातील शब्दरूप पुष्पमालांमध्ये अर्थरूप सुगंध विशेष दरवळून राहिला तर त्याच्या योगाने संतरूप भ्रमरांना आनंद होतो.

ऐसी माळा अंतःकरणीं । गुंफुन पूजा रामचरणीं । वोंकारतंत अखंडपणीं । खंडूंच नये ॥ २ ॥

अशी माला आपल्या अंतकरणामध्ये गुंफून तिने श्रीरामचरणाची पूजा करावी (म्हणजे रामाची पूजा होते)मात्र ही माला गुंफतांना (कवित्व करताना) शब्दसृष्टीचे मूळ ॐ आहे व त्याचाच हा विस्तार होत आहे मी कोणी कर्ता नाही,अशा प्रकारच्या ॐ कारच्या अखंड स्थितीचे अनुसंधान ठेवावे,त्यात खंड पडू नये.

परोपकाराकारणें । कवित्व अगत्य करणें । तया कवित्वाचीं लक्षणें । बोलिजेती ॥ ३ ॥

परोपकारासाठी कवित्व अवश्य करावे,त्या कवित्वाची लक्षणे आता सांगतो.

जेणें घडे भगवद्भक्ती । जेणें घडे विरक्ती । ऐसिया कत्वाची युक्ती । आधीं वाढवावी ॥ ४ ॥

ज्याच्यायोगाने भगवद्भक्ति घडेल व वैराग्य उत्पन्न होईल,असे कवित्व करता येईल अशी पात्रता अगोदर वाढवावी (अशी युक्ति म्ह.योग,अधिकार वाढवून ठेवावा तो अधिकार मिळवायचा कसा?)

क्रियेवीण शब्दज्ञान । तया न मानिती सज्जन । म्हणौनी देव प्रसन्न । अनुतापें करावा ॥ ५ ॥

सदाचरणाशिवाय (क्रियेवाचून) नुसत्या शब्दज्ञानाला सत्पुरुष-सज्जन-मान देत नाहीत, म्हणून देवाला अनुतापाने प्रसन्न करून घ्यावे.

देवाचेन प्रसन्नपणें । जें जें घडे बोलणें । तें तें अत्यंत श्लाघ्यवाणें । या नाव प्रासादिक ॥ ६ ॥

देव प्रसन्न झाला म्हणजे जे जे तोंडातून अक्षर (भाषण) बाहेर पडते त्याची फार वाहवा होते व त्यालाच प्रासादिक कविता म्हणतात (देवाच्या प्रसादाने जे जे शब्द स्पुरतात ते ते योग्यच असतात,ह्यालाच प्रासादिक कविता म्हणतात.)

धीट पाठ प्रसादिक । ऐसें बोलती अनेक । तरी हा त्रिविध विवेक । बोलिजेल ॥ ७ ॥

धीट,पाठ व प्रासादिक असे कवित्वाचे तीन प्रकार असल्याचे अनेक सांगतात,त्यांची लक्षणे आता सांगतो.

धीट म्हणिजे धीटपणें केलें।जें जें आपुल्या मनास आलें ।बळेंचि कवित्व रचिलें ।या नाव धीट बोलिजे॥८॥

जे जे (जसे जसे) आपल्या मनास येईल तशा प्रकारचे कवित्व ओढून ताणून धीटपणाने रचणे त्याला “धीट काव्य” म्हणतात (जे जे मनात येईल ते ते बळाने रचणे ह्याचे नाव धीट कवित्व)

पाठ म्हणिजे पाठांतर । बहुत पाहिलें ग्रंथांतर । तयासरिखा उतार । आपणचि केला ॥ ९ ॥

पुष्कळ ग्रंथ पाहून व पाठ करून त्यातील वचनांची किवा विचारांची नक्कल करणे ह्याला “पाठकाव्य” म्हणतात.( बहुत ग्रंथ पाहून पाठांतर करणे व पाठशक्तीच्या बळे तसेच काही आपणही करणे अशाप्रकारे ह्याचे नाव “पाठकवित्व”)

सीघ्रचि कवित्व जोडिलें । दृष्टि पडिलें तें चि वर्णिलें । भक्तिवांचून जें केलें । त्या नाव धीटपाठ ॥ १० ॥

जलद कविता करणे,जे दृष्टीस पडेल त्याचे वर्णन करणे,जे दृष्टीस पडेल त्याचे वर्णन करणे अशा प्रकारे भक्तिरहित काव्य करणे त्याला “धीटपाठ” म्हणतात.(दृष्टीस पडेल त्यावर शीघ्र कवित्व करणे ह्याला नाव “धीटपाठ”)

कामिक रसिक श्रृंघारिक । वीर हास्य प्रस्ताविक । कौतुक विनोद अनेक । या नाव धीटपाठ ॥ ११ ॥

काम्य (कामोत्तेजक) रसभरित श्रृंगार,वीर,हास्य इत्यादि नवरसांनी युक्त शोकविषयक (प्रपंचातील दु:खाबद्दल झालेला शोक (प्रास्ताविक),कौतुक,विनोद इत्यादि प्रकारचे काव्य करणे ह्याला धीटपाठ म्हणतात.

मन जालें कामाकार । तैसेचि निघती उद्‌गार । धीटपाठें परपार । पाविजेत नाहीं ॥ १२ ॥

( परपार - पैलपार)

मन विषयातुर झाले म्हणजे काव्यातही तसलेच उद्‌गार निघतात (तेही धीटपाठच होत.) पण असल्या धीटपणाने भवसागर पैलतीर गाठता येणार नाही.

व्हावया उदरशांती । करणें लागे नरस्तुती । तेथें केली जे वित्पत्ति । त्या नाव धीटपाठ ॥ १३ ॥

पोटाची खाच भरण्यासाठी माणसांची स्तुति करावी लागते,त्या ठिकाणी ते शब्दपांडित्य करतात त्याला धीटपाठ म्हणतात.(मन कामाकर झाले असता श्रृंगाराचे उद्‌गार निघणे.पोटासाठी व्युत्पत्ति खर्च करून नरस्तुति करणे इ.प्रकार धीटपाठ कवित्वात मोडतात हे कवित्व भवमोचक नाही)

कवित्व नसावें धीटपाठ । कवित्व नसावें खटपट । कवित्व नसावें उद्धट । पाषांडमत ॥ १४ ॥

( पाषांडमत - नास्तिकमत)

कवित्व धीटपाठ असावे,कवित्व खटपटीचे म्हणजे ओढूनताणून (शब्द जुळवून खटपटीने) केलेले नसावे,कवित्वात उध्दटपणा व पाखंडीपणा नसावा (-कवित्व पाखंडादि मतांचे प्रवर्तक नसावे.)

कवित्व नसावें वादांग । कवित्व नसावें रसभंग । कवित्व नसावें रंगभंग । दृष्टांतहीन ॥ १५ ॥

कवित्वापासून वाद उत्पन्न होऊ नये,रसांचा अंग होऊ नये,रंगाचा बेरंग होईल अशी दृष्टांत विरहीत (दृष्टांतहीन,रुक्ष) कविता नसावी.

कवित्व नसावें पाल्हाळ । कवित्व नसावें बाष्कळ । कवित्व नसावें कुटीळ । लक्षुनियां ॥ १६ ॥

कवितेत पाल्हाळ किंवा बाष्कळपणा नसावा,कुटिळपणा व कुटिल माणसे ह्यांना अनुलक्षून कविता करू नये.

हीन कवित्व नसावें । बोलिलेंचि न बोलावें । छंदभंग न करावें । मुद्राहीन ॥ १७ ॥

(मुद्राहीन- कवित्वलक्षणविरहित)

कवितेमध्ये हलकेपणा नसावा एकदा सांगितलेले पुन्हा वर्णन करू नये.तीत छंदोभंग नसावा व कर्त्याच्या नावांविरहित (मुद्राहीन) कविता नसावी.

वित्पत्तिहीन तर्कहीन । कळाहीन शब्दहीन । भक्तिज्ञानवैराग्यहीन । कवित्व नसावें ॥ १८ ॥

ज्यामध्ये विद्‌वत्ता (व्युत्पत्ति) तर्क,कला,शब्द,भक्ति,ज्ञान,वैराग्य इत्यादि नाहीत असे कवित्व नसावे.

भक्तिहीन जें कवित्व । तेंचि जाणावें ठोंबें मत । आवडीहीन जें वगत्रृत्व । कंटाळवाणें ॥ १९ ॥

ज्या काव्यामध्ये भक्ति नाही ते (ठोंबे मत) मूर्खपणाचे काव्य होय.प्रेमविरहीत भाषण कंटाळवाणे होते.(भक्तिहीन कवित्व तो केवळ विरोध होय प्रेमप्रीतीवाचून कवित्व कसचे?)

भक्तिविण जो अनुवाद । तोचि जाणावा विनोद । प्रीतीविण संवाद । घडे केवी ॥ २० ॥

भक्तीशिवाय जे भाषण ती केवळ थट्टा होय,परमेश्र्वराच्या प्रीतीवाचून वादविवाद तोडणारा कवितारूपी संवाद कसा करता येईल?

असो धीट पाठ तें ऐसें । नाथिलें अहंतेचें पिसें । आतां प्रसादिक तें कैसें । सांगिजेल ॥ २१ ॥

(नाथिलें - खोटे.)

असो,धीटपाठ काव्य असे असते,त्यांत नसत्या अहंकाराचे वेड भरलेले असते.आता प्रासादिक कवित्व कसे असते ते सांगतो.

वैभव कांता कांचन । जयास वाटे हें वमन । अंतरीं लागलें ध्यान । सर्वोत्तमाचें ॥ २२ ॥

इहलोकीचे कनककांतादि वैभव ज्याला वमनप्राय वाटते,ज्याच्या अंतःकरणात सर्वोत्तमाचे ध्यान लागून राहाते,(ज्याचे मन भगवद्भजनात रंगून गेले आहे)

जयास घडीनें घडी । लागे भगवंतीं आवडी । चढती वाढती गोडी । भगद्भजनाची ॥ २३ ॥

ज्याला घटके घटकेला भगवंताची आवड लागत जाते व भगवदभजनाची गोडी चढत्या चढत्या प्रमाणात वाढत असते (घडीचे घडी भक्तीची आवड चंद्रकलेप्रमाणे वाढत आहे)

जो भगवद्भजनेंवीण । जाऊं नेदी येक क्षण । सर्वकाळ अंतःकरण । भक्तिरंगें रंगलें ॥ २४ ॥

जो देवाच्या भजनावाचून एक क्षणसुद्धा फुकट दवडीत नाही,ज्याचे अंतःकरण सर्वकाळ भक्तिरंगाने रंगलेले असते.

जया अंतरी भगवंत । अचळ राहिला निवांत । तो स्वभावें जें बोलत । तें ब्रह्मनिरूपण ॥ २५ ॥

ज्याच्या अंतःकरणात भगवान निवांतपणे नित्य (ठाण मांडून) राहिला आहे,तो सहजच जे जे बोलेल ते ब्रह्मनिरुपण होय.

अंतरी बैसला गोविंद । तेणें लागला भक्तिछंद । भक्तीविण अनुवाद । आणीक नाहीं ॥ २६ ॥

अंतःकरणामध्ये गोविंद बसलेला असल्यामुळे त्याला भक्तीचा छंद लागून राहतो,म्हणुन त्याजकडून भक्तीशिवाय दुसऱ्या विषयाचे प्रतिपादनच होत नाही (भक्तिछंद लागल्यामुळे भक्तीवाचून इतर गोष्टी करीत नाही )

आवडी लागली अंतरीं । तैसीच वदे वैखरी । भावें करुणाकीर्तन करी । प्रेमभरें नाचतु ॥ २७ ॥

त्याच्या अंतःकरणास देवाची आवड लागली असल्यामुळे त्याच्या मुखातून शब्दही तसेच प्रेमाने निघतात, त्यामुळे तो भक्तिभावाने प्रेमळ कीर्तन करून प्रेमभावाने नाचत असतो (अंतरीच्या आवडीप्रमाणेच वाणीतून प्रेमधारा स्त्रवतात.)

भगवंतीं लागलें मन । तेणें नाठवे देहभान । शंका लज्या पळोन । दुरी ठेली ॥ २८ ॥

त्याचे मन भगवंताच्या ठिकाणी लागले असल्यामुळे त्याला देहभानच राहात नाही,शंका व लज्जा ह्या पळून जाऊन दूर उभ्या राहतात.(करुणाकीर्तनाच्या रंगात देहभाव विवर्जित होऊन निर्लज्जपणे प्रेमभराने गातनाचत आहे.)

तो प्रेमरंगें रंगला । तो भक्तिमदें मातला । तेणें अहंभाव घातला । पायांतळीं ॥ २९ ॥

तो प्रेमरंगात रंगून जाऊन व भक्तीच्या मदाने उन्मत्त होऊन अहंभावाला पायाखाली तुडवितो.(अहंभाव पायाखाली घातला आहे.)

गात नाचत निशंक । तयास कैचे दिसती लोक । दृष्टीं त्रैलोक्यनायेक । वसोन ठेला ॥ ३० ॥

तो नि:शंकपणाने गात नाचत असतो.,त्याच्या दृष्टीमध्ये त्रैलोक्यनायक येऊन बसल्यामुळे त्याला लोक कसचे दिसतात? (डोळ्यांना जग दिसत नसून जनार्दन भरला आहे,त्याच्या चित्तात व दृष्टीत भगवंत भरून राहिले आहेत.)

ऐसा भगवंतीं रंगला । आणीक कांहीं नलगे त्याला । स्वैछा वर्णू लागला । ध्यान कीर्ती प्रताप ॥ ३१ ॥

असा जो भगवंताचे ठिकाणी तल्लीन होतो,त्याला दुसऱ्या कशाची गरज नसते.भगवंताचे ध्यान कीर्ति व प्रताप ह्यांचे तो आपल्या इच्छेप्रमाणे वर्णन करू लागतो.

नाना ध्यानें नाना मूर्ती । नाना प्रताप नाना कीर्ती । तयापुढें नरस्तुती । त्रुणतुल्य वाटे ॥ ३२ ॥

(त्रुणतुल्य - कस्पटासमान)

भगवंताची अनेक ध्याने,अनेक प्रकारच्या मूर्ति,अनेक पराक्रम व अनेक प्रकारची कीर्ति ह्याचेच तो वर्णन करतो,त्यापुढे त्याला मनुष्याची स्तुति कस्पटासमान वाटते.(स्वेछेने भगवंताची नाना रूपे,नाना ध्याने,यशकीर्तिप्रताप गात आहे असा वैराग्यसंपन्न व मुक्तिसुख भोगणारा भक्त सहज बोलता बोलता ज्या वैराग्य भक्तीच्या गोष्टी बोलेल ती प्रासादिक कविता होय..

असो ऐसा भगवद्भक्त । जो ये संसारीं विरक्त । तयास मानिती मुक्त । साधुजन ॥ ३३ ॥

असा जो संसारमध्ये विरक्त असणारा भगवद्भक्त त्याला साधू लोक मुक्त असे समजतात.

त्याचे भक्तीचें कौतुक । तयानव प्रसादिक । सहज बोलतां विवेक । प्रगट होय ॥ ३४ ॥

तो प्रेमभराने जे ध्यान व प्रतापादिकांचे वर्णन करील त्याला प्रासादिक काव्य म्हणतात.त्याच्या सहज बोलण्यात विवेक प्रकट होतो.

ऐका कवित्वलक्षण । केलेंच करूं निरूपण । जेणे निवे अंतःकर्ण । श्रोतयांचें ॥ ३५ ॥

आता कवित्वाचे लक्षण सांगतो,त्यायोगाने श्रोत्यांचे समाधान होईल.

कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें सरळ । कवित्व असावें प्रांजळ । अन्वयाचें ॥ ३६ ॥

(अन्वयाचें - अन्वयसुलभ संबंध,सुलभ)

कवित्व निर्मळ (शुद्धबुद्धीने केलेले) व सरळ (रसाळ) असावे.(अन्वयाला प्रांजळ असावे,दूरान्वय नसावा)

कवित्व असावें भक्तिबळें । कवित्व असावें अर्थागळें । कवित्व असावें वेगळें । अहंतेसी ॥ ३७ ॥

(अर्थागळें - अर्थपूर्ण,अर्थप्रचुर)

कवित्व भक्तिबळाने केलेले,अर्थप्रचुर म्हणजे पुष्कळ अर्थांचे पण अहंकारापासून अलिप्त असावे (कवित्वात अहंभाव नसावा,अर्थगौरव चांगला असावा-अर्थ-आगळे)

कवित्व असावें कीर्तिवाड । कवित्व असावें रम्य गोड । कवित्व असावें जाड । प्रतापविषीं ॥ ३८ ॥

कवित्व हे हरिकीर्तीने भरलेले (कीर्तीला वाढवणारे) रम्य,गोड व त्यात भगवंताच्या प्रतापाचे भारदस्त वर्णन केलेले असावे (त्यात हरिकीर्ति पुष्कळ-वाड-गाईलेली असावी,ते रम्य मधुर असावे.)

कवित्व असावें सोपें । कवित्व असावें अल्परूपें । कवित्व असावें सुल्लपें । चरणबंद ॥ ३९ ॥

(सुल्लपें - सुलभ)

कवित्व सोपे ( अल्परूपे म्ह.अल्पाक्षररमणीय),आटोपशीर असावे,तसेच (चरणबंद) यमकांकित व सुलभ (सुल्लपे) असावे.

मृदु मंजुळ कोमळ । भव्य अद्भुत विशाळ । गौल्य माधुर्य रसाळ । भक्तिरसें ॥ ४० ॥

(गौल्य - गोड)

मृदू,मंजुळ,कोमल पण भव्य,अद्भुत व विशाळ,तसेच (गौल्य) गोड,मधुर व भक्तिरसाने रसरसलेले असे असावे.

अक्षरबंद पदबंद । नाना चातुर्य प्रबंद । नाना कौशल्यता छंदबंद । धाटी मुद्रा अनेक ॥ ४१ ॥

(धाटी मुद्रा - धाटणी व लक्षणे)

अक्षरबंध,पदबंध इत्यादि चित्रकाव्याचे प्रकार किवा यमकप्रसादि शब्दचमत्कृति असलेले,अनेक प्रकारचे चातुर्ययुक्त प्रबंध मोठ्या कुशलतेने तयार केलेल्या चाली,अनेक बंध व वृते हे कवित्वात असावे (कलाकुसरी,नाना छंद,घाटी,मुद्रा ह्यांनी युक्त असे कवित्व असावे.)

नाना युक्ती नाना बुद्धी । नाना कळा नाना सिद्धी । नाना अन्वये साधी । नाना कवित्व ॥ ४२ ॥

परोपरीच्या युक्ति,अनेक प्रकारच्या बुद्धि,कला,सिद्धी व अन्वय (शब्दांचा किवा अर्थाचा योग्य संबंध) ह्यांनी युक्त असे कवित्व असावे ( युक्ति-बुद्धि-सिद्धी ह्यांनी युक्य असून अनेक अन्वय म्ह.संबंध साधणारे अर्थात समन्वयपूर्ण असे काव्य असावे)

नाना साहित्य दृष्टांत । नाना तर्क धात मात । नाना संमती सिद्धांत । पूर्वपक्षेंसीं ॥ ४३ ॥नाना गती नाना वित्पत्ती । नाना मती नाना स्फुर्ति । नाना धारणा नाना धृती ।या नाव कवित्व ॥ ४४ ॥

(नाना तर्क धातमात - अनेक तर्कांची मांडणी व खंडण, धृती - धैर्य)

अनेक प्रकारचे अलंकार (साहित्य),दृष्टांत,तर्क,घडलेल्या व कल्पित गोष्टी (घात मात),अनेक आधार,पूर्वपक्षासह सिद्धांत,अनेक प्रकारच्या गति (प्रवेश,अर्थ बरोबर साधणे), व्युत्पत्ति,अनेक बुद्धि (नाना मति),(नाना रसांच्या) स्फूर्ति धारणा आणि (धृतिधारणा) धृति ह्यांनी युक्त असे काव्य असावे.

शंका आशंका प्रत्योत्तरें । नाना काव्यें शास्त्राधारें । तुटे संशये निर्धारें । निर्धारितां ॥ ४५ ॥
नाना प्रसंग नाना विचार । नाना योग नाना विवर । नाना तत्वचर्चासार । या नाव कवित्व ॥ ४६ ॥
नाना साधनें पुरश्चरणें । नाना तपें तीर्थाटणें । नाना संदेह फेडणें । या नाव कवित्व ॥ ४७ ॥

( विवर - विवरण)

शंका प्रतिशंका व त्यांची उत्तरे,शास्त्राधाराप्रमाणे लिहिलेली आणि ज्यांचा नीट विचारकेला असता संशयाचा निरास होतो अशी अनेक काव्ये,अनेक विचार,अनेक योग व त्यांची अनेक विवरणे (विवर),अनेक प्रकारची तत्वचर्चा व तिचे तात्पर्य,अनेक प्रकारची साधने,पुरश्चरणे,तपे,तीर्थाटणे तसेच अनेक संशयाचे निरसन इत्यादिकांनी युक्त त्याचे नाव कवित्व (शंका समाधाने,साहित्यदृष्टांत,नि:संदेह ज्ञान इ.सर्व त्यात यथोचित असावे.अनेक सुविचार,योग,विवरणे,तत्वचर्चा,संशयछेद,पुरश्चरणे व तीर्थाटणे ह्यांची वर्णने इ.कवित्वात असावीत)

जेणें अनुताप उपजें । जेणें लोकिक लाजे । जेणें ज्ञान उमजे । या नाव कवित्व ॥ ४८ ॥

कवित्व तेच होय की ज्याच्या योगाने पश्र्चाताप अनुताप उत्पन्न होईल,लौकिकाला खाली मान घालावी लागेल,ज्ञान उत्पन्न होईल,(लौकिक हटेल,अज्ञानवृत्ति मावळून ज्ञान प्रबळेल)

जेणें ज्ञान हें प्रबळे । जेणें वृत्ती हे मावळें । जेणें भक्तिमार्ग कळे । या नाव कवित्व ॥ ४९ ॥

ज्ञान वाढेल,वृत्ति लय पावेल,भक्तिमार्ग कळेल.

जेणें सद्‌बुद्धि तुटे । जेणें भवसिंधु आटे । जेणें भगवंत प्रगटे । या नाव कवित्व ॥ ५० ॥

देहबुद्धि नाहीशी होईल,संसार समुद्र आटून जाऊन भगवंताचा साक्षात्कार होईल (भगवंत भेटेल ते कवित्व होय.)

जेणें सद्‌बुद्धि लागे । जेणें पाषांड भंगे । जेणें विवेक जागे । या नाव कवित्व ॥ ५१ ॥

(उत्तम कवित्वाच्या परिशीलनाने पाखांड मोडावे,सद्बुद्धि,विवेक जागृत व्हावे,दृश्यभास मावळून सद्वस्तु प्रकाशावी,अभेदभाव उपजावा,संसारबंध सुटून आत्मसमाधान वाढावे व ते सज्जनांना पसंत असावे,ज्याने सद्बुद्धि लागेल व पाखांड मोडेल,विवेक जागृत होईल.

जेणें सद्वस्तु भासे । जेणें भास हा निरसे । जेणें भिन्नत्व नासे । या नाव कवित्व ॥ ५२ ॥

ज्याने सद्वस्तु म्हणजे परब्रह्माचा भास होईल व जगद्भास नाश पावेल,स्वस्वरूपाशी झालेला वेगळेपणा नाश पावेल.

जेणें होये समाधान । जेणें तुटे संसारबंधन । जया मानिती सज्जन । तया नाव कवित्व ॥ ५३ ॥

ज्याने समाधान होईल,संसाराचे बंधन तुटून जाईल व जे सज्जनांना मान्य होईल,त्याचे नाव कवित्व.

ऐसें कवित्वलक्षण । सांगतां तें असाधारण । परंतु कांहींयेक निरूपण । बुझावया केलें ॥ ५४ ॥

(बुझावया - कळावे)

अशाप्रकारची लक्षणे सांगावयाला लागले तर पुष्कळ आहेत (कवित्वाची लक्षणे कळणे कठिण आहे) परंतु समजूत पडण्यासाठी थोडीशी सांगितली आहेत.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कवित्वकला निरूपण समास तिसरा ॥**

## समास चौथा : कीर्तन लक्षण ॥ श्रीराम ॥

कलयुगीं कीर्तन करावें । केवळ कोमळ कुशळ गावें । कठीण कर्कश कुर्टें सांडावें । येकीकडे ॥ १ ॥

( कुर्टें - किरट्या आवाजात )

कलियुगामध्ये कीर्तन करावे,केवळ कोमल व कुशाळ असे गावे,कठोर,कर्कश व कुर्टे (मनोभेदक, क्षुदवृत्तीचे,कुढे) बाजूला टाकावे.

खटखट खुंटून टाकावी । खळखळ खळांसीं न करावी । खरें खोटें खवळों नेदावी । वृत्ति आपुली ॥ २ ॥

खटखट म्हणजे तंटेबखेडे बंद करून टाकावे.दुष्टांबरोबर खळखळ करत बसू नये,त्याचे म्हणणे खरे असो की खोटे असो आपली वृत्ति खवळू (क्षुब्ध होऊ) देऊ नये. (खऱ्या खोट्याने मन क्षुब्ध होऊ देऊ नये)

गर्वगाणें गाऊं नये । गातां गातां गळों नये । गोप्य गुज गर्जों नये । गुण गावे ॥ ३ ॥

गर्वाने गाऊ नये,गात असताना घाबरू नये.( धैर्यहीन न व्हावे ) गुप्त किवा गुह्य गोष्ट-रहस्य (गोप्यगुज) असेल तर ती मोठयाने ओरडून सांगू नये.(गर्जो नये) भगवंताचे गुण गावे (गोड गुणानुवाद गावे.)

घष्टणी घिसणी घस्मरपणें । घसर घसरूं घसा खाणें । घुमघुमों चि घुमणें । योग्य नव्हे ॥ ४ ॥

( घिसणी - धास्म्पणे )

घासाघांशी,घिसघिस,घसघस (घालणे),घसरत घसरत घसरणे.(हवे त्याविषयावर किवा व्यक्तीवर घसरू नये.) घसा खाणे (खाकरणे),घुमत घुमत भलत्याच विषयात घुमत बसणे योग्य नाही

नाना नामे भगवंताचीं । नाना ध्यानें सगुणाचीं । नाना कीर्तनें कीर्तीचीं । अद्भुत करावीं ॥ ५ ॥

भगवंताची अनेक नावे,सगुणाची अनेक ध्याने भगवत्कीर्तीची अनेक कीर्तने अद्भुत रीतीने करावी.

चकचक चुकावेना । चाट चावट चळावेना । चरचर चुरचुर लागेना । ऐसें करावें ॥ ६ ॥

( चकचक - चकवणे नसावे )

चकचक म्हणजे स्पष्ट दिसणारे असेल ते चुकले जाणार नाही,थापेबाजी किवा चावटपणा करून चळू नये व चरचर किवा चूरचूर लागणार नाही असे करावे.(चुकवू नये,चुकू नये,चावटपणा करू नये,चळल्यासारखे भकूं नये.कोणाच्या मनाला लागेल असे चूरचूर बोलू नये.

छळछळ छळणा करूं नये । छळितां छळितां छळों नयें । छळणें छळणा करूं नये । कोणीयेकाची ॥ ७ ॥

कोणाची छळ छळ छळणा करू नये,दुसऱ्याने आपणाला छळले तरी आपण त्याला छळू नये.कोणाचीही छळणा करू नये.

जि जि जि जि म्हणावेना । जो जो जागे तो तो पावना । जपजपों जनींजनार्दना । संतुष्ट करावें ॥ ८ ॥

( पावना - (ब्रह्मपदी) पावत नाही )

जी जी म्हणू नये (कोणाची हाजी हाजी करू नये.) जो जो कीर्तनांत जागतो तो तो पावन होतो,जपून जपून जनी जनार्दनाला संतुष्ट करावे.

झिरपे झरे पझरे जळ । झळके दुरुनी झळाळ । झडझडां झळकती सकळ । प्राणी तेथें ॥ ९ ॥

(हरिदासाच्या नेत्रातून अश्रुजळ झिरपत असते.) हृदयाला पाझर सुटून नेत्रातून पाणी वाहू लागेल (असे कीर्तन करावे) व पूजावस्त्रांदि असे झळझळीत असते की दुरून चमकते,अशा ठिकाणी सर्व प्राणी झडझडा (भराभर धापा टाकीत) धावत येतात.

या या या या म्हणावें नलगे ।याया याया उपाव नलगे ।या या या या कांहींच नलगे ।सुबुद्धासी ॥१०॥

तेथे त्यांना या या म्हणावे लागत नाही किवा त्यांनी यावे म्हणून कोणताही उपाय करावा लागत नाही,सुबुद्ध (जाणता) असतो त्याला बोलावणे पाठवावे लागत नाही)

टक टक टक करूं नये । टाळाटाळी टिकों नये । टम टम टम टम लाऊं नये । कंटाळवाणी ॥ ११ ॥

सारखी टकमक टकळी लावू नये,टाळाटाळी टिकू देऊ नये म्ह मनापासून कीर्तन करावे,कंटाळवाणी टमटम करू नये.

ठस ठोंबस ठाकावेना । ठक ठक ठक करावेना । ठाकें ठमकें ठसावेना । मूर्तीध्यान ॥ १२ ॥

( ठस ठोंबस - अडाणी व मंदबुद्धी )

ठस ठोंबस ठोंबे असू नये.म्ह.(आधीच शिकून मग कीर्तनास उभे ठाकावे),काही न शिकता मूर्खपणाने कीर्तनास उभे राहू नये,कोणाला ठकवू नये.(फसवू नये) ठाक्याने ठमक्याने म्हणजे बाह्य सोगाढोंगाचे मूर्तिध्यान ठसत नाही.

डळमळ डळमळ डकों नये । डगमग डगमग कामा नये । डंडळ डंडळ चुकों नये । हेंकाडपणें ॥ १३ ॥

( डंडळ चुकों नये - चळू नये.)

डळमळू नये डगमगू नये डंडळू नये (चुकू नये) (म्ह.आत्मविश्र्वासपूर्वक निश्र्चयाचे भाषण करावे) हेकांडपणा (हटवादीपणा) करू नये.

ढिसाळ ढाळा ढळती कुंचे । ढोबळा ढसकण डुले नाचे । ढळेचिना ढिगढिगांचे । कंटाळवाणे ॥ १४ ॥

( ढिसाळ - हलक्या हाताने , ढाळा - सढळपणे , ढळती कुंचे - चवऱ्या वारतात, ढोबळा ढसकण -ओबड धोबड,धसकटपणे )

मोठ्या (ढिसाळ) ढाळाने (मंद सोम्यपणाने) किवा ढिसाळ ढाळाने म्हणजे भराभर श्रोते जरी चवऱ्या,पंखे,(कुंचे) ढाळू लागले किवा ढोबळा (मोठमोठ्या) ढसकट उड्या मारल्या (कीर्तनात नाचला) किंवा कीर्तनात जागेवरून न ढळता ढिगासारखा उभा राहिला,तरी प्रेमरंग नसेल तर कीर्तन कंटाळवाणेच होते.

नाना नेटक नागर । नाना नम्र गुणागर । नाना नेमक मधुर । नेमस्त गाणें ॥ १५ ॥

अनेक प्रकारचा नीटनेटकेपणा,नागरपणा (चतुराई),नम्रता इत्यादि गुणांचा आगर व मधुर भाषण करणारा,प्रसंगानुसार (नेमके) बोलणारा व गायनाचा उपयोग बेताबेताने करणारा असा कीर्तनकार असावा.

ताळ तुंबरे तानमानें । ताळबद्ध तंतगाणें । तूर्त तार्किक तनें मनें । तल्लिन होती ॥ १६ ॥

ताल,तंबोरे,तान,मान,तंतुवाद्याचे (सतारसारंगीचे) सुस्वर व तालबद्ध गायन ह्यांच्या योगाने बुद्धिमान श्रोते (तार्किक) तात्काळ (तूर्त,त्वरित) तनमने करून प्रसन्नता पावून तलीन्न होतात.

थर्थरां थरकती रोमांच । थै थै थै स्वरें उंच। थिरथिर थिरावे नाच । प्रेमळ भक्तांचा ॥ १७ ॥

( थिरथिर थिरावे- मंदपणे )

प्रेमळ भक्तांच्या अंगावर कीर्तनामध्ये भरारून रोमांच (किवा अष्टसात्विक भाव सारेच) उभे राहतात.(उंच स्वराने ते थै थै नाचतात.) थै थै थै हा नृत्याचा शब्द इतका मोठा होतो की सर्वांना ऐकू येतो व त्यांचे नाचणे मंदमंद (थिर थिर स्थिर) होत सहज थांबते.

दक्षदाक्षण्य दाटलें । बंदें प्रबंदें कोंदाटलें । दमदम दुमदुमों लागलें । जगदांतर ॥ १८ ॥

( दक्षदाक्षण्य - किर्तनकराचे सावध कोशल्य, बंदें प्रबंदें - छंदादि गीतभेद, जगदांतर - लोकांचे अंतरंग )

हरिदासाची दक्षता व दाक्षिण्य म्ह.सभ्यपणा दाटून राहतो.म्ह. सर्वांच्या प्रत्ययास येतो.बंधप्रबंधानी म्ह.चातुर्ययुक्त काव्यांनी सभास्थान भरून जाते व श्रोत्यांची अंतःकरणे कीर्तनाच्या नादाने दुमदुमून जातात.(हेलावू लागतात)

धूर्त तूर्त धावोन आला । धिंगबुद्धीनें धिंग जाला । धाकें धाकें धोकला । रंग अवघा ॥ १९ ॥

( धिंग - दंग)

धूर्त तेथे तात्काळ (तूर्त-त्वरित) धांवून येतात व त्यांची मति दंग (धिंग) होऊन जाते व धाकाधाकाने (आपल्या अपात्रतेचे भय बाळगून सुद्धा) ते रंगात दंग होतात व सगळा रंग जमून जातो.

नाना नाटक नेटकें । नाना मानें तुकें कौतुकें । नाना नेमक अनेकें । विद्यापात्रें ॥ २० ॥

( मानें - प्रमाणबद्ध,यथायोग्य , तुके - मर्यादेने)

अशी अनेक नीटनेटकेपणाने,कोतुकयुक्त व मर्यादायुक्त (नियमितपणाने) वागणारी विद्यापत्रे म्ह.विद्वान तेथे गोळा होतात.

पाप पळोन गेलें दुरी । पुण्य पुष्कळ प्रगटे वरी । परतरतो परे अंतरीं । चटक लागे ॥ २१ ॥

( परतरतो - परतून जातो.)

अशा कीर्तनात पाप दूर पाळून जाते (अनेक पातके दूर पळून जातात) व पुष्कळ पुण्य प्रकट होते.श्रोता परत जातो(श्रोता पुनःपुन्हा कीर्तनास येतो-परतरतो-परततो) पण त्याच्या अंतःकरणास परावाणीच्या आंत चटका लागतो.

फुकट फाकट फटवणें नाहीं ।फटकळ फुगडी पिंगा नाहीं ।फिकें फसकट फोल नाहीं ।भकाध्या निंदा ॥२२ ॥

(फटवणें - फसवणे, भकाध्या - बहाकणे)

व्यर्थ कोणाची फसवणूक नाही,फटकळपणाचा नाच अथवा धांगडधिंगा (फेर धरणे) नाही,रसहीन (फिके) किवा फोल (फसकट) बोलणे,बहाकणे (भाकाघ्या) निंदा वगैरे नाही.

बरें बरें बरें म्हणती । बाबा बाबा उदंड करिती । बळें बळेंचि बळाविती । कथेलागीं ॥ २३ ॥

असे ज्याचे कीर्तन असते त्याला लोक बरे बरे म्हणतात,बाबा बाबा म्हणून आदर करितात,मोठा आग्रह करून (आपआपल्या गावी व घरी) कीर्तनाला उभे करतात.(बोलावितात-बळावती)

भलाभलाभला लोकीं । भक्तिभावें भव्य अनेकीं । भूषण भाविक लोकीं । परोपकारें ॥२४॥

लोक त्यांची भलाई गातात तो आपल्या भक्तिभावाने (भक्तिभावबळेणे) अनेकांमध्ये महत्व पावतो,भाविकांमध्ये परोपकाराने भूषणीभूत होतो.

मानेल तरी मानावें मनें । मत न व्हावें ममतेनें । मी मी मी मी बहुत जनें । म्हणिजेत आहे ॥ २५ ॥

अशा उत्कृष्ट कीर्तनकाराला मनापासून पूज्य मानावे.स्त्रीद्रव्यांदिकांच्या ममतेने उन्मत्त होऊ नये मी मी मी मी सर्व लोक म्हणतच असतात.

येकें टोकत येकांपासीं । येऊं येऊं येती झडेसीं । या या या या असे तयासी । म्हणावें नलगे ॥ २६ ॥

( येकें टोकत येकांपासीं  - काही इतरांस बोलतात किवा मागे लागतात.)

कित्येक पोटार्थी हरिदास आम्ही तुमच्याकडे कीर्तन करायला येऊ असे म्हणत मागे लागतात-झडेसी येतात.) कित्येक (पोटार्थी हरिदास) आपण होऊन मागे लागून कीर्तनाची माळ लावण्यासाठी दुसऱ्यापाशी टोकत बसतात,या या म्हणण्याची वाट ही ते पहात नाहीत-बळेच गळी पडतात.

राग रंग रसाळ सुरंगें । अंतर संगित रागें । रत्नपरीक्षा रत्नामागें । धांवती लोक ॥ २७ ॥

कीर्तनात रागरंग सुरंग रसाळ अंतरंगवाणी,संगीत,रागरागिणींचे गायन इत्यादि गुण ज्या हरिदासरत्नापाशीं आहेत त्याच्या मागे रत्नपारखी म्हणजे गुणग्राही श्रोते धावत येतात.

लवलवां लवती लोचन । लकलकां लकलें मन। लपलपों लपती जन । आवडीनें ॥ २८ ॥

(लकलें - लागले)

त्याचे नेत्र लवलव लवतात,मन चकित होते (लकते) व ते आवडीने लपत लपत (नम्रपणे) कीर्तनाला येतात.

वचनें वाउगीं वदेना । वावरेविवरे वसेना । वगत्रुत्वें निववी जना । विनित होऊनी॥ २९॥

चांगला हरिदास तोंडातून वाऊगा (व्यर्थ) शब्द काढीत नाही त्याच्या चित्तांत भलत्यासलत्या अमंगल गोष्टी (वावरें विवरें) शिरत नाहीत तो आपल्या भाषणाने (वकृत्वाने) सर्वांना समाधान देतो आणि (इतके गुण आंगी असूनही) स्वतः नम्र असतो.

सारासार समस्तांला । सिकऊं सिकऊं जनाला। साहित संगित सज्जनाला । बरें वाटे ॥ ३० ॥

तो सगळ्यांना सारासार विचार पुनःपुन्हा समजावून देतो.साहित्य (काव्यशास्त्र) व संगीत सज्जनांना आवडते.

खरेंखोटें खरें वाटलें । खर्खर खुर्खुर खुंटलें । खोटें खोटेपणें गेलें। खोटें म्हणोनियां ॥३१॥

खरे खोटे हे खऱ्या रीतीने समजले म्हणजे खदखद खुदखुद (मनातील शंका,मळमळ) नाहीशी होते,खोटे ते खोटेच असते असते म्हणूनच खोटेपणामुळे नाहीसे होते (खोटे पडते)

शाहाणे शोधितां शोधेना । शास्त्रार्थ श्रृती बोधेना । शुक शारिकाशमेना । शब्द तयाचा ॥ ३२ ॥

शहाणे शोधूनही सापडत नाहीत (दुर्मिळ आहेत) श्रुतिशास्त्रांनाही त्यांच्या खऱ्या योग्यतेचा बोध (अंत) होत नाही,त्यांच्या शब्द माधुर्याची बरोबरी शुकसारिकानाही होत नाही.(बरोबरी करवत नाही)

हरुषें हरुषें हासिला । हाहाहोहोनें भुलला । हित होईना तयाला । परत्रीचें ॥ ३३ ॥

जो आचरटपणाने हास हास हांसतो,हा हा हो हो (टवाळ्यानी,विनोदाने) भुलतो (टवाळ्या विनोद करितो) त्याला परलोकीचे कल्याण (हित) साधत नाही.

लक्षावें लक्षितां अलक्षीं । लक्षिलें लोचनातें लक्षी । लंगलें लयेतें अलक्षी । विहिंगममार्गें ॥ ३४॥

(विहिंगममार्गें - आकाशमार्गे,एकदम वेगाने, लंगलें लयेतें अलक्षी - वाणी →मन→ बुद्धी →अंतःकरण या क्रमाने अंतःकरण वृतीचा लय करून एकदम वेगाने आत्मानुभव घेणे यासच लायचिंतन संबोधतात)

अलक्ष अशा परब्रह्मवस्तूकडे लक्ष लाऊन पाहावे.पाहणाऱ्या नेत्रांना हा पाहातो (लक्षी),आळसाच्या ठिकाणी हा विहंगममार्गाने म्ह.त्वरित गतीने लय पावतो.

क्षेत्र क्षेत्रज्ञ क्षोभतो । क्षमा क्षमून क्ष्मवितो । क्ष्मणें क्षोभणें क्षेत्रज्ञ तो । सर्वां ठाईं ॥ ३५ ॥

क्षेत्र म्हणजे देह त्यात राहणारा (क्षेत्रज्ञ) आत्मा जागा झाला,की क्षमाशीलतेने क्षमा करतो व करवितो. तो सर्व ठिकाणी राहणारा आत्मा क्षमा करतो व क्षुब्धही होतो.(सर्वाठायी असणाऱ्या आत्म्याच्या ठिकाणी क्षमणे व क्षोभणे हे दोन्ही धर्म आहेत.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे कीर्तन लक्षण निरूपण समास चौथा ॥**

**समास पांचवा : हरिकथा लक्षण ॥ श्रीराम ॥**

मागां हरिकथेचें लक्षण । श्रोतीं केला होता प्रश्र्न । सावध होऊन विचक्षण । परिसोत आतां ॥ १ ॥

( परिसोत - श्रवण करावे )

पूर्वी श्रोत्यांनी हरीकथेच्या लक्षणांबद्दल विचारले होते,त्याचे उत्तर आता सुज्ञांनी एकाग्र चिताने ऐकावे ( हरीकथेची लक्षणे चतुर श्रोत्यांनी आता ऐकावीत)

हरिकथा कैसी करावी । रंगें कैसी भरावी । जेणें पाविजे पदवी । रघुनाथकृपेची ॥ २ ॥

हरिकथा कशी करावी आणि श्रीराम कृपेचा योग ज्याच्या योगाने होईल असा हरिकथेचा रंग कसा भरावा (अशा आशयाचा तो प्रश्न होता)

सोनें आणि परिमळे । युक्षदंडा लागती फळें । गौल्य माधुर्य रसाळें । तरी ते अपूर्वता ॥ ३ ॥

( गौल्य माधुर्य रसाळें - गोड मधुर,रसाळ)

सोन्याला सुगंध येईल किवा (उसाला इक्षुदंडा-उसाच्या कांड्याला) गोड मधुर अशी फळे लागतील तर ते अपूर्व होय.

तैसा हरिदास आणि विरक्त ।ज्ञाता आणि प्रेमळ भक्त ।वित्पन्न आणि वादरहित ।तरी हेहि अपूर्वता॥४॥

तद्वत हरिदास असून विरक्त,ज्ञाता असून प्रेमळ भक्त,विद्वान असून वाद न करणारा असा पुरुष असेल तर तीही अपूर्वताच होय.(ही मोठी नवलाची गोष्ट आहे)

रागज्ञानी ताळज्ञानी । सकळकळा ब्रह्मज्ञानी । निराभिमानें वर्ते जनीं । तरी हेहि अपूर्वता ॥ ५ ॥

राग,ताल,इत्यादि कलांमध्ये प्रवीण व ब्रह्मज्ञानी असा असून जर लोकांमध्ये निराभिमानपणाने वागत असेल तर तीही अपूर्वताच होय.

मछर नाहीं जयासी । जो अत्यंत प्रिये सज्जनासी । चतुरांग जाणें मानसीं । अंतरनिष्ठ ॥ ६ ॥

(चतुरांग - चतुरस्त्र)

ज्याला मत्सर नाही,जो सज्जनांना अत्यंत प्रिय आहे,जो चतुरस्त्रपणा जाणतो आणि अंतःकरणात अंतर्निष्ठ (आत्मनिष्ठ) असतो (असा पुरुष दुर्मिळ होय.)

जयंत्यादिकें नाना पर्वें । तीर्थें क्षेत्रें जें अपूर्वें । जेथें वसिजे देवाधिदेवें । सामर्थ्यरूपें ॥ ७ ॥

(राम-कृष्ण) जयंत्यादिक अनेक प्रकारच्या पर्वण्या,ज्या ठिकाणी देवाधिदेव सामर्थ्यरूपाने वास करतो अशी अपूर्व तीर्थे व क्षेत्रे (जगात आहेत)

तया तीर्थातें जे न मानिती । शब्दज्ञानें मिथ्या म्हणती । तया पामरां श्रीपती । जोडेल कैंचा ॥ ८ ॥

अशा तीर्थांना जे मानीत नाहीत,तर उलट शब्दज्ञानाच्या घमेंडीत मिथ्या म्हणतात अशा पामरांना भगवंताची प्राप्ति कशी होईल?

निर्गुण नेलें संदेहानें । सगुण नेलें ब्रह्मज्ञानें । दोहिकडे अभिमानें । वोस केलें ॥ ९ ॥

निर्गुणविषयक खरे ज्ञान संशयाने नाहीसे होते.आणि शाब्दिक ब्रह्मज्ञानाने सगुण प्रेम श्रद्धा राहात नाही अशारीतीने अभिमानामुळे दोन्हीकडून नागवणूक होते.(ह्याप्रमाणे अभिमानाच्या पायी ना निर्गुण ना सगुण अशी स्थिति ह्या पामरांची होत असते.अशी द्विधा स्थिति होऊन तो दोन्हीबाजूनी वाया जातो.)

पुढें असतां सगुणमूर्ती । निर्गुणकथा जे करिती । प्रतिपादून उछेदिती । तेचि पढतमूर्ख ॥ १० ॥

सगुण मूर्ति सन्मुख असताना,तिच्यापुढे जे निर्गुणाचे निरुपण करतात व सगुणाचे उच्छेदन करतात ते पढतमूर्ख होत. (सगुणमूर्ति सन्मुख असता सगुण मोडून जे निर्गुण प्रतिपादितात ते पढतमूर्ख होत)

ऐसी न कीजे हरिकथा । अंतर पडे उभये पंथा । परिस लक्षणें आतां । हरिकथेचीं ॥ ११ ॥

जिच्या योगाने सगुण व निर्गुण ह्या दोन्ही मार्गामध्ये अंतर पडेल अशी हरिकथा करू नये.आता हरिकथेची लक्षणे ऐक (असे करू नये दोन्ही मार्ग दुरावतील अशी कथा करू नये.)

सगुणमूर्तीपुढें भावें । करुणाकीर्तन करावें । नानाध्यानें वर्णावें । प्रतापकीर्तीतें । १२ ॥

सगुणमूर्तीपुढें भक्तीने प्रेमळ कीर्तन ( करुणाकीर्तन) करावे देवाची अनेक ध्याने प्रताप व किर्ती ह्यांचे वर्णन करावे ( ध्यान वर्णून देवाची प्रताप-किर्ती वाखाणावी व प्रेमरसाने श्रोत्यांच्या हृदयात प्रेमसूखाचे आंदोलन उत्पन्न करावे)

ऐसें गातां स्वभावें । रसाळ कथा वोढवे । सर्वांतरीं हेलावे । प्रेमसुख ॥ १३ ॥

( हेलावे - उचंबळे)

अशारीतीने सहजस्थितीने गायन केले म्हणजे कथेला रंग चढतो आणि श्रोत्यांच्या अंतःकरणात प्रेमाच्या लाटा उसळतात.

कथा रचायाची खूण । सगुणीं नाणावें निर्गुण । न बोलावे दोष गुण । पुढिलांचे कदा ॥ १४ ॥

कथेला रंग भरण्याची खुबी हीच की सगुणापुढे निर्गुणाचे वर्णन करू नये. (सगुणात निर्गुण आणू नये.) आणि केव्हाही श्रोत्यांचे (दुसऱ्याचे) गुणदोष बोलू नयेत (दुसऱ्यांच्या गुणदोषांची चर्चा करू नये.)

देवाचें वर्णावें वैभाव । नाना प्रकारें महत्त्व । सगुणीं ठेउनियां भाव । हरिकथा करावी ॥ १५ ॥

देवाचे वैभव व अनेक प्रकारचे महत्व व प्रेम ह्यांचे वर्णन करावे,अशाप्रकारे सगुणाच्या ठिकाणी भक्ति ठेऊन हरिकथा करावी

लाज सांडून जनाची । आस्था सांडून धनाची । नीच नवी कीर्तनाची । आवडी धरावी ॥ १६ ॥

( नीच नवी - नित्यनूतन)

लोकलज्जा व द्रव्याची आशा (धनलोभ) टाकून देऊन किर्तनाची नित्य नवी आवड,गोडी धरीत जावी.

नम्र होऊन राजांगणीं । निःशंक जावें लोटांगणी । करताळिका नृत्य वाणीं । नामघोषें गर्जावें ॥ १७ ॥

(हरिमंदिरात) देवासमोर नम्र होऊन नि:शंकपणाने लोटांगणे घालावीत (साष्टांग नमस्कार घालावे),गावे,नाचावे व मुखाने नि:शंक नामघोष-जयजयकार करावा.

येकांची कीर्ति येकापुढें । वर्णितां साहित्य न पडे । म्हणोनियां निवाडे । जेथील तेथें ॥ १८ ॥

(सगुण कथेतही) एका देवापुढे दुसऱ्या देवाची कीर्ती गाऊ नये,त्याच्यापुढे त्याचेच वर्णन करणे शोभते.(एका देवतेची कीर्ती दुसऱ्या देवतेपुढे गाऊ नये,गाईली तर रंग उठत नाही,जेथल्या तेथे असावे.)

मूर्ती नस्तां सगुण । श्रवणीं बैसले साधुजन । तरी अद्‍वैतनिरूपण । अवश्य करावें ॥ १९ ॥

सगुण मूर्ति पुढे नसून साधुसंत ऐकावयास (श्रवणास) बसले असतील अशा ठिकाणी अव्दैताचे निरुपण अवश्य करावे.

नाहीं मूर्ती नाहीं सज्जन । श्रवणीं बैसले भाविक जन । तरी करावें कीर्तन । प्रस्ताविक वैराग्य ॥ २० ॥

सगुण मूर्तीही नाही व साधूसंतही नाहीत आणि केवळ भाविक लोक ऐकावयास बसले असतील,तर तेथे पश्र्चातापयुक्त वैराग्याचे कीर्तन करावे (अनुताप वैराग्याचे महत्व सांगावे.)

श्रुंघारिक नवरसिक । यामधें सांडावें येक । स्त्रियादिकांचें कौतुक । वर्णू नये कीं ॥ २१ ॥

श्रृंगारादि नवरसांमध्ये पहिल्याचा त्याग करावा,स्त्रियादिकांचे सौंदर्य व क्रीडा ह्यांचे वर्णन कधीही करू नये (नवरसापैकी स्त्रियादिकांचे कौतुक वर्णू नये.)

लावण्य स्त्रियांचें वर्णितां । विकार बाधिजे तत्वता । धारिष्टापासून श्रोता । चळे तत्काळ ॥ २२ ॥

स्त्रियांच्या सौंदर्याचे वर्णन केल्यास,खरोखर विकारांची बाधा होऊन श्रोता (इंद्रियदमनाच्या) धारीष्टापासून तात्काळ चळतो.(स्त्रियांचे लावण्य वर्णिता श्रोता मनोधैर्यापासून चळण्याचा व विकारवंत होण्याचा संभव असतो.)

म्हणऊन तें तजावें । जें बाधक साधकां स्वभावें । घेतां अंतरीं ठसावें । ध्यान स्त्रियांचें ॥ २३ ॥

म्हणून ज्याच्या योगाने स्त्रियांचे ध्यान अंतःकरणात ठसेल व ते सहजच साधकांना बाधक होईल असल्या वर्णनाचा त्याग करावा.

लावण्य स्त्रियांचें ध्यान । कामाकार जालें मन । कैचें आठवेल ध्यान । ईश्वराचें ॥ २४ ॥

लावण्यसंपन्न स्त्रियांचे ध्यान मनाला लागून (अंतरी ठसून) मन कामाने व्याप्त (कामाकर) झाले म्हणजे तेथे ईश्वराचे ध्यान कोठून आठवेल? (-तर ईश्वराचे ध्यान कसे ठसेल?)

स्त्री वर्णितां सुखावला । लावण्याचे भरीं भरला । तो स्वयें जाणावा चेवला । ईश्वरापासुनी ॥ २५ ॥

स्त्रीचे वर्णन करण्यात आनंद मानला आणि लावण्याच्या नादात गुरफटला की तो देवापासून दुरावलाच झाले म्हणजे तो देवापासून (चेवला) असे समजावे (स्त्रीवर्णनाने श्रोता सुखावला व मन सकाम झाले म्हणजे तो देवापासून दूर झाला.)

हरिकथेसी भावबळें । गेला रंग तो तुंबळे । निमिष्य येक जरी आकळे । ध्यानीं परमात्मा ॥ २६ ॥

( तुंबळे - उचंबळून येतो)

हरिकथेमध्ये एक क्षणभर जरी परमात्म्याचे ध्यान मनात उभे राहील व भक्तीचे बळ असेल तर (कोणत्याही कारणाने) गेलेला रंगसुद्धा तुडुंब भरेल.(तो रंग पुन्हा भरेल.)

ध्यानीं गुंतलें मन । कैचें आठवेल जन । निशंक निर्ल्लज कीर्तन । करितां रंग माजे ॥ २७ ॥

मन परमेश्वराच्या ध्यानात गुंतल्यावर लोकांची आठवण कोठून राहील? नि:शंकपणाने व निर्लज्जपणाने कीर्तन केल्यास (हरिप्रेमाचा) रंग माजतो-भरतो.

रागज्ञान ताळज्ञान । स्वरज्ञानेंसीं वित्पन्न । अर्थान्वयाचें कीर्तन । करूं जाणे ॥ २८ ॥ छपन्न भाषा नाना कळा । कंठमाधुर्य कोकिळा । परी तो भक्तिमार्ग वेगळा । भक्त जाणती ॥ २९ ॥

राग,ताल,स्वर इत्यादिकांचे ज्ञान असून शिवाय विद्वान आहे,सुसंबद्धपणाचे कीर्तन कसे करावे हे त्याला ठाऊक आहे, त्याला छपन्न भाषा येतात,तो अनेक कला जाणतो,कोकिळेसारखा त्याचा मधुर कंठ आहे,इतके सगळे जरी असले तरी भक्तिमार्गाचा आनंद वेगळाच आहे,तो भक्तांनाच ठाऊक ( राग,ताल,स्वर ह्यांचे ज्ञान असून अन्वयार्थ बरोबर सांगणारा कोकिळेसारखा मधुर कंठ असलेला,नाना भाषा व नाना कळा ह्यात निष्णात असा हरिदास भेटेल,पण भक्तिमार्गाचा रंग मात्र भक्तच भरू शकतात.)

भक्तांस देवाचें ध्यान । देवावांचून नेणें अन्न । कळावंतांचें जें मन । तें कळाकार जालें ॥ ३० ॥

( नेणें अन्न - अन्न जाणत नाही)

भक्तांना फक्त एक देवाचे ध्यान प्रिय असते,ते देवाशिवाय दुसरे काही (अन्न,अन्य) जाणत नाहीत,कलाभिज्ञ (कलाप्रिय) लोक असतात त्यांचे लक्ष (मन) कलेमध्ये वेधलेले असते.(-मन अलापादि बाह्य गोष्टीतच रमते)

श्रीहरिवीण जे कळा । तेचि जाणावी अवकळा । देवास सांडून वेगळा । प्रत्यक्ष पडिला ॥ ३१ ॥

भगवंतावाचून जी जी कळा ती ती अवकाळाच होय,कारण तिच्यायोगाने तो देवाला सोडून प्रत्यक्षच वेगळा होतो (-का की त्यामुळे श्रोते वक्ते देवापासून वेगळे पडतात.)

सर्पीं वेढिलें चंदनासी । निधानाआड विवसी । नाना कळा देवासी । आड तैस्या ॥ ३२ ॥

(निधानाआड - ((परब्रह्मरुपी) गुप्तधनाच्या आड, विवसी - पिशाच्य )

चंदनाभोवती सर्पाचे वेष्टन असावे किवा ठेव्याच्या आड पिशाच्य बसावे त्याप्रमाणे देवाच्या आड ह्या अनेक कला आहेत.(चंदनाभोवती सर्प,निधानाआड जशी पिशाच्ये त्याप्रमाणे कला ह्या देवाच्या आड येतात.)

सांडून देव सर्वज्ञ । नादामध्यें व्हावें मग्न । तें प्रत्यक्ष विघ्न । आडवें आलें ॥ ३३ ॥

सर्वज्ञ देवाला सोडून गायनाच्या नादामध्ये मग्न होऊन जाणे म्हणजे देवाच्या प्राप्तीच्या आड एक प्रत्यक्ष विघ्नच उभे राहिले असे समजावे (देव सोडून नादात मग्न झाला की नाद हे उघडच विघ्न आहे.)

येक मन गुंतलें स्वरीं । कोणें चिंतावा श्रीहरी । बळेंचि धरुनियां चोरीं । शुश्रृषा घेतली ॥ ३४ ॥ करितां देवाचें दर्शन । आडवें आलें रागज्ञान । तेणें धरुनियां मन । स्वरामागें नेलें ॥ ३५ ॥

( शुश्रृषा - शिश्रुषा )

(ध्यान करणारे) मन एकटे आणि ते स्वराच्या नादात गुंतले तर मग भगवंताचे चितन कोणी करावे?(श्रीहरीचे चिंतन करायला मन कोठे उरले?)चोरांनी जबरदस्तीने वेठीला धरून चाकरी करून घ्यावी,त्याप्रमाणे देवाचे दर्शन करायला जाताना हे रागज्ञान मध्येच आडवे येते आणि मनाला धरून सुराच्या मागे लावते (चोराने बळेच धरून वेठीला लावावे त्याप्रमाणे ह्याचे मन स्वराकडे असून हा मुखाने हरिकीर्तन करीत असतो. देवाचे दर्शन घेता रागज्ञान आडवे येते व मनाला स्वरामागे नेते.)

भेटों जातां राजद्वारीं । बळेंचि धरिला बेगारी । कळावंतां तैसी परी । कळेनें केली ॥ ३६ ॥

राजाला भेटण्यासाठी राजव्दारी जावे तो मध्येच जबरदस्तीने वेठीला सापडावे (कोणी बिगारी म्हणून धरावे.) तशीच अवस्था कलावंतांची कलेने केली.

मन ठेऊन ईश्वरीं । जो कोणी हरिकथा करी । तोचि ये संसारीं । धन्य जाणा ॥ ३७ ॥

परमेश्वराच्या (श्रीहरीच्या) ठिकाणी मन ठेऊन जो कोणी हरिकथा (-कीर्तन) करतो,तोच ह्या संसारामध्ये धन्य होय.

जयास हरिकथेची गोडी । उठे नीच नवी आवडी ।तयास जोडली जोडी । सर्वोत्तमाची ॥ ३८ ॥

ज्याला हरिकथेची गोडी लागते व नित्य नवी नवी आवड उत्पन्न होते.(ज्याला हरिकथेची वाढती आवड आहे) त्याला सर्वोत्तमाची प्राप्ती झाली म्हणून समजावे.

हरिकथा मांडली जेथें । सर्व सांडून धावे तेथें । आलस्य निद्रा दवडून स्वार्थें । हरिकथेसि सादर ॥ ३९ ॥ हरिभक्तांचिये घरीं । नीच कृत्य अंगिकारी । साहेभूत सर्वांपरीं । साक्षपें होये ॥ ४० ॥ या नावाचा हरिदास । जयासि नामीं विश्‍वास । येथून हा समास । संपूर्ण जाला ॥ ४१ ॥

(साहेभूत - सहाय्यभूत )

( तो सर्व उद्योग सोडून व निद्रा व आळस टाकून कथेला धावत जातो,हरिभक्तांच्या घरी हलकी कामे करून त्यांना सर्व प्रकारचे सहाय्य करतो.तात्पर्य,ज्याला हरि प्रिय असून ज्याचा नामी विश्र्वास आहे तो हरिदास) ज्या ठिकाणी हरिकथा चालली असेल,तेथे तो सर्व उद्योग सोडून व आळस,निद्रा टाकून धावत जातो आणि आपल्या कल्याणासाठी हरिकथा आदरपूर्वक ऐकतो,हरिभक्तांच्या घरी हलकी सलकी कामे करतो,अगत्य पूर्वक त्यांना सहाय्य करतो आणि ज्याचा नामस्मरणाच्या ठिकाणी विश्र्वास आहे.तोच हरिदास.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे हरिकथालक्षणनिरूपण समास पांचवा ॥**

## समास सहावा : चातुर्य लक्षण ॥ श्रीराम ॥

रूप लावण्य अभ्यासितां नये ।सहजगुणास न चले उपाये ।कांहीं तरी धरावी सोये ।अगांतुक गुणाची ॥१॥

बाह्यरूप किवा लावण्य हे अभ्यासाने मिळत नाही,सहज म्हणजे उपजत गुण असतात त्यावर उपाय चालत नाही,ह्यास्तव काही तरी नवीन गुण आंगी आणण्याचा अभ्यास करावा.

काळें माणुस गोरें होयेना । वनाळास येत्न चालेना । मुक्यास वाचा फुटेना । हा सहजगुण ॥ २ ॥

( वनाळास - जन्मखूण असलेली व्यक्ति,व्रणवाली व्यक्ति )

काळे माणूस गोरे होत नाही (-करिता येत नाही) तोंडावर देवीचे वगैरे वण (वनाल) असल्यास ते घालविता येत नाहीत,मुक्याला वाचा फुटत नाही,हे सहज गुण होत.

आंधळें डोळस होयेना । बधिर तें ऐकेना । पांगुळ पाये घेइना । हा सहजगुण ॥ ३ ॥

आंधळ्याला दृष्टी (डोळे) देता येत नाहीत बहिरा असेल त्याला ऐकण्याची शक्ति (कान) किवा पांगळ्याला पाय म्ह.पायाला चालण्याची शक्ति देता येत नाही हे ही सहज गुण होत.

कुरूपतेचीं लक्षणें । किती म्हणोनि सांगणें । रूप लावण्य याकारणें । पालटेना ॥ ४ ॥

कुरुपतेची अशी लक्षणे किती म्हणून सांगावी? ह्यास्तव रूप किवा लावण्य ही काही पालटता येत नाहीत.(कुरुपतेची सहज चिन्हे काही दूर करता येत नाहीत.)

अवगुण सोडितां जाती । उत्तम गुण अभासितां येती । कुविद्या सांडून सिकती । शाहाणे विद्या ॥ ५ ॥

(तथापि स्वभावदोष घालवता येतात,चांगले गुण शिकता येतात,शाहाणे लोक कुविद्या टाकून सद्विद्या शिकतात (हे आपण पाहतोच)

मूर्खपण सांडितां जातें । शाहाणपण सिकतां येतें । कारबार करितां उमजतें । सकळ कांहीं ॥ ६ ॥

मूर्खपण टाकता येते,शहाणपण शिकता येते,काम करायला लागले म्हणजे सर्व काही समजू लागते.

मान्यता आवडे जीवीं । तरी कां उपेक्षा करावी । चातुर्येविण उंच पदवी । कदापी नाहीं ॥ ७ ॥

आपली मानमान्यता झालेली जर जिवाला आवडते तर ती मिळविण्याची हयगय किवा उपेक्षा काय म्हणून करावी? चातुर्याशिवाय श्रेष्ठपण कधीही मिळत नाही (लोकात मानमान्यता पाहिजे तर गुणसंपन्नाची हेळसांड का करावी? चातुर्यावाचून श्रेष्ठपण मिळत नसते.)

ऐसी प्रचित येते मना । तरी कां स्वहित कराना । सन्मार्गें चालतां जनां । सज्जना माने ॥ ८ ॥

(हे जाणून तुम्ही स्वहित का करीत नाही? सन्मार्गाने चालावे म्हणजे सज्जन मानतात.) असा जर अनुभव मनाला येतो आहे तर आपल्या कल्याणाचा मार्ग का धरीत नाही? सन्मार्गाने चालल्यास,सामान्य लोकांस व सज्जनासही ते आवडते.

देहे नेटकें श्रुंघारिलें । परी चातुर्येंविण नासलें । गुणेंविण साजिरें केलें । बाष्कळ जैसें ॥ ९ ॥

(वस्त्रालंकारानी) देह निट नेटका सजवला (नटविला) तरी तो चातुर्यावाचून व्यर्थ होय.गुण नसताना नटविल्यास तो बाष्कळपणा होतो.(गुण नसताना बाष्कळाला सजविणे उपहास्य होते.)

अंतर्कळा श्रृंघारावी । नानापरी उमजवावी । संपदा मेळऊन भोगावी । सावकास ॥ १० ॥

चातुर्याने अंतरंग श्रुंगारावे,अनेक प्रकारे बुद्धि वाढवावी आणि ऐश्वर्य मिळवून यथेच्छ भोगावे.

प्रेत्न करीना सिकेना । शरीर तेंहि कष्टविना । उत्तम गुण घेईना । सदाकोपी ॥ ११ ॥

प्रयत्न करीत नाही,काही शिकत नाही,शरीरकष्टही करावयाला नकोत,उत्तम गुण घेत नाही,सदा रागीट (अशा मूर्खाला काय म्हणावे?)

आपण दुसर्यास करावें । तें उसिणें सवेंचि घ्यावें । जना कष्टवितां कष्टावें । लागेल बहु ॥ १२ ॥

आपण दुसऱ्यास जसे बरे वाईट करावे,तसे लोकांकडूनही आपणाला उलट सोसावे लागते. लोकांना आपण दु:ख दिले तर आपणालाही दु:ख भोगावे लागेल.(व सुख दिले तर लोकही आपणास सुखी करितील)

न्यायें वर्तेल तो शहाणा । अन्याइ तो दैन्यवाणा । नाना चातुर्याच्या खुणा । चतुर जाणे ॥ १३ ॥

न्यायाने वागतो तो शहाणा,अन्यायाने वागतो तो करंटा,चातुर्याची अनेक लक्षणे आहेत,ती चतुरच जाणतो.

जें बहुतांस मानलें । तें बहुतीं मान्य केलें । येर तें वेर्थचि गेलें । जगनिंद्य ॥ १४ ॥

जे अनेकांस (बहुत लोकांस) रुचते तेच जगात-लोकांस मान्य होते.बाकीचे फुकट निंदेला पात्र होते.(बाकीचे जगनिंद्य सारे व्यर्थ होय.)

लोक आपणासि वोळावे । किंवा आवघेच कोंसळावे । आपणास समाधान फावे । ऐसें करावें ॥ १५ ॥

( वोळावे - प्रसन्न व्हावेत)

लोक आपणास-अनुकूल व्हावे का त्यांनी आपणावर तुटून पडावे? (ह्यापैकी तुम्हास काय आवडते?) आपणास समाधान होईल तेच करणे योग्य (लोक तुम्हाला वश व्हावेत असे तुम्हाला वाटते का सारे उलटून पडावेत असे वाटते? आपणास समाधान सुख होईल तेच करणे योग्य होय.

समाधानें समाधान वाढे । मित्रिनें मित्रि जोडे । मोडितां क्षणमात्रें मोडे । बरेपण ॥ १६ ॥

आपण दुसऱ्यास समाधान दिले तर आपले समाधान वाढते,मैत्रीने मैत्री जडते (स्नेहाने स्नेह जोडतो) परंतु बरेपणा मोडवायला गेले तर मात्र उशीर लागत नाही (बरेपण काय एका क्षणांतही मोडते!)

अहो कांहो अरे कां रे । जनीं ऐकिजेतें किं ते । कळत असतांच कां रे । निकामीपण ॥ १७ ॥

अहो तर कां हो,अरे तर कां रे हे आपण लोकात ऐकत असतोच,हे कळत असूनही (शहाणपण शिकण्याचा) आळस का करावा? ( हे जाणत असून आळसटपणाने-चातुर्याचा अभ्यास न करता अरे का म्हणावे?)

चातुर्यें श्रुंघारे अंतर । वस्त्रें श्रुंघारे शरीर । दोहिमधें कोण थोर । बरें पाहा ॥ १८ ॥

चातुर्याने अंतःकरणाला शोभा येते आणि वस्त्राने देहाला शोभा येते.तेव्हा ह्या दोघांमध्ये श्रेष्ठ कोण ह्याचा विचार करा.(चातुर्य हे अंतरंगाचे भूषण आहे व वस्त्र हे बाह्य शरीराचे भूषण आहे.दोहोत श्रेष्ठ भूषण कोणते ते पहा तर खरे.)

बाह्याकार श्रृंगारिलें । तेणें लोकांच्या हातासि काये आलें । चातुर्यें बहुतांसी रक्षिलें । नाना प्रकारें ॥ १९ ॥

बाह्य देहाला नटवील्याने लोकांच्या हाती काय लाभ आला? (देह श्रृंगारिले तर लोकांना त्याचा काय लाभ? तेच चातुर्याच्या योगाने अनेकांचे अनेक प्रकारे रक्षण करता येते.

बरें खावें बरें जेवावें । बरें ल्यावें बरें नेसावें । समस्तीं बरें म्हणावें । ऐसी वासना ॥ २० ॥ तनें मनें झिजावें । तेणें भले म्हणोन घ्यावें । उगें चि कल्पितां सिणावें । लागेल पुढें ॥ २१ ॥

खाणेपिणे चांगले असावे,वस्त्रालंकार चांगले (सर्व यथास्थित असावे आणि सगळ्यांनी आपल्याला चांगले म्हणावे अशी वासना असेल तर शरीर व मन ह्यांना कष्ट द्यावे.(श्रम साहस केली पाहिजेत) म्हणजे लोक चांगले म्हणतील,उगीच कल्पना करीत बसल्याने-आळशी राहिल्यास-परिणामी दु:खच भोगावे लागणार!

लोकीं कार्यभाग आडे । तो कार्यभाग जेथें घडे । लोक सहजचि वोढे । कामासाठीं ॥ २२ ॥

लोकांचा अडलेला कार्यभाग जेथे सिद्धीस जाण्याचा संभव असतो तेथे आपल्या कामासाठी लोक सहजच धावून जातात.(लोकांचा कार्यभाग जेथे अडून राहतो तेथे तो होण्याचा जो उपाय सुचवितो त्याच्याकडे लोक सहजच वळतात)

म्हणोन दुसऱ्यास सुखी करावें । तेणें आपण सुखी व्हावें । दुसऱ्यास कष्टवितां कष्टावें ।लागेल स्वयें ॥ २३ ॥

म्हणून दुसऱ्यांना सुखी करण्यानेच आपणालाही सुख मिळते आणि दुसऱ्यास कष्ट दिल्याने (दुसऱ्याचे कष्ट दूर न केल्याने) स्वतःलाही कष्ट भोगावे लागतात.हे स्पष्टच आहे.

हें तों प्रगटचि आहे । पाहिल्याविण कामा नये । समजणें हा उपाये । प्राणीमात्रासी ॥ २४ ॥

(हे तर उघडच आहे) पण ह्याचा विचार केल्याशिवाय उपयोग नाही समजणे म्हणजे विचार करणे हाच सर्व प्राण्यांना एकच उपाय आहे.

समजले आणी वर्तले । तेचि भाग्यपुरुष जाले । यावेगळे उरले । तें करंटे पुरुष ॥ २५ ॥

समजून घेतात व त्याप्रमाणे वागतात तेच भाग्यवंत पुरुष होतात (तेच पुरुष भाग्य भोगतात) बाकीचे उरलेले सर्व पुरुष करंटे होत.

जितुका व्याप तितुकें वैभव । वैभवासारिखा हावभाव । समजले पाहिजे उपाव । प्रगटचि आहे ॥ २६ ॥

(जितके श्रम साहस अधिक तितके भाग्य अधिक,ह्याभाग्यानुसार माणसे व्याप म्ह.उद्योगही करतात,हे समजून वागले पाहिजे) जेवढा व्याप (उद्योग) अधिक करावा,तितके वैभव अधिक मिळते व वैभवाप्रमाणे

(कार्यही) वागणुकही करता येते,पण हे समजले पाहिजे(हा उद्योगाचा) उपाय प्रकट आहे.भाग्याचा उपाय म्ह.उद्योग हे उघडच आहे.

आळसें कार्येभाग नासतो । साक्षेप होत होत होतो । दिसते गोष्टी कळेना तो । शाहाणा कैसा ॥ २७ ॥

आळसाने कामे नासतात व उद्योगाने होता होता सिद्धीला जातात (उद्योगाने साक्षेप कामे यथाक्रम सिद्धीला जातात) हे स्पष्ट दिसत असूनही ज्याला कळत नाही त्याला शहाणा कसे म्हणावे?

मैत्रि करितां होतें कृत्य । वैर करितां होतो मृत्यु । बोलिलें हें सत्य किं असत्य । वोळखावें ॥ २८ ॥

मैत्री केल्याने (स्नेह वाढविल्याने) (मित्रसाह्यांमुळे) कार्य होते - कार्ये सफल होतात आणि वैर केल्याने मृत्यूही ओढवतो ( वैराने कार्ये फसतात हे आमचे म्हणणे खरे की खोटे ह्याचा विचार करून पाहा.)

आपणास शाहाणें करूं नेणें । आपलें हित आपण नेणें । जनीं मैत्रि राखों नेणे । वैर करी ॥ २९ ॥ ऐसे प्रकारीचे जन । त्यास म्हणावें अज्ञान । तयापासीं समाधान । कोण पावे ॥ ३० ॥

स्वतःस शहाणे कसे करावे (शहाणपण कसे शिकावे) हे समजत नाही,स्वतःचे हित समजत नाही,लोकांमध्ये मित्रत्व ठेवावयाचे ठाऊक नाही,सर्वांशी वैर करतो,असल्याप्रकारच्या लोकांना मूर्ख म्हणावे त्याच्या पासून कोणाला समाधान मिळेल? (शहाणपण शिकून जनात मैत्री वाढवीत नाहीत व व्देषभाव वाढवितात,त्या मूर्खापाशी समाधान कोणास मिळेल?)

आपण येकायेकी येकला । सृष्टींत भांडत चालिला । बहुतांमध्यें येकल्याला । येश कैचें ॥ ३१ ॥

आपण एकीएक एकटा आणि सर्व जगाशी भांडत सुटतो.तेव्हा सगळ्यांविरुद्ध वागून एकट्याला यश कसे मिळणार?ज्याचे लोकांशी पटत नाही व जो सगळ्यांशी भांडत चालला त्याला यश कसचे मिळणार?

बहुतांचे मुखी उरावें । बहुतांचे अंतरीं भरावें । उत्तम गुणीं विवरावें । प्राणीमात्रासी ॥ ३२ ॥ शाहाणे करावे जन । पतित करावे पावन । सृष्टिमधें भगवद्भजन । वाढवावें ॥ ३३ ॥

बहुतांच्या मुखी आपली किर्ति राहावी,अनेकांच्या अं:तकरणास आपण प्रिय व्हावे.(अशी इच्छा असेल) तर सर्व प्राण्यांना उत्तम गुणांच्या मार्गाला लावावे लोकांना शहाणे करावे,पतित असतील त्यांना पावन करावे व लोकांमध्ये भगवद्भक्ति वाढवावी (बहुतांस मान्य व प्रिय व्हावे,प्राणिमात्रांचे गुण घ्यावेत व ऐक्य वाढवावे लोक शाहाणे करावे,पतित पावन करावे व भगवद्भक्ति लोकांत वाढवावी.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चातुर्येलक्षणनिरूपण समास सहावा ॥**

## समास सातवा : युगधर्म निरूपण ॥ श्रीराम ॥

नाना वेश नाना आश्रम । सर्वांचें मूळ गृहस्थाश्रम । जेथें पावती विश्राम । त्रैलोक्यवासी ॥ १ ॥

अनेक वेष व अनेक आश्रम आहेत पण ह्या सर्वांचे मूळ गृहस्थाश्रम आहे,त्रैलोक्यातले सर्व प्राणी तेथे विश्रांति पावतात.

देव ऋषी मुनी योगी । नाना तापसी वीतरागी । पितृआदिकरून विभागी । अतीत अभ्यागत ॥ २ ॥
गृहस्थाश्रमीं निर्माण जाले । आपला आश्रम टाकून गेले । परंतु गृहस्थागृहीं हिंडों लागले ।कीर्तिरूपें ॥३॥

देव,ऋषि,मुनि,योगी,अनेक वैराग्यवंत तपस्वी,अतीत,अभ्यागत,ज्यांचा गृहस्थाश्रमात भाग आहे असे पितर वगैरे सगळे (मूळ गृहस्थाश्रमातच जन्म पावले) गृहस्थाश्रमातच उत्पन्न होतात व आश्रमांतर करतात तरी कीर्तीरूपाने पुन्हा गृहस्थाच्याच घरी पुन्हा फिरत-हिंडत असतात.

याकारणें गृहस्थाश्रम । सकळामधें उत्तमोत्तम । परंतु पाहिजे स्वधर्म । आणी भूतदया ॥ ४ ॥

ह्या कारणास्तव गृहस्थाश्रम हा सर्व आश्रमात अतिशय उत्तम आहे.परंतु त्यात स्वधर्माचरण व भूतदया ही सांभाळून राहिले पाहिजे.

जेथें शडकर्मे चालती । विध्योक्त क्रिया आचरती । वाग्माधुर्यें बोलती । प्राणीमात्रासी ॥ ५ ॥

(शडकर्मे - षडकर्मे (यजन,याजन,अध्ययन,अध्यापन,दान,प्रतिग्रह)

जेथे (यजन,याजन,अध्ययन,अध्यापन,दान व प्रतिग्रह ही) षड्कर्मे चालतात,जेथे सर्व क्रिया विधियुक्त असतात जेथे प्राणीमात्रांशी मधुरवाणीने बोलतात.

सर्वप्रकारें नेमक । शास्त्रोक्त करणें कांहींयेक । त्याहिमध्यें अलोलिक । तो हा भक्तिमार्ग ॥ ६ ॥

( अलोलिक - अपूर्व)

जेथे सर्व आचार शास्त्राप्रमाणे नियमितपणे पाळले जातात,त्यातल्या त्यात विशेषतः अपूर्व असा भक्तिमार्ग चालू असतो ( जेथे मुख्यतः भक्तिमार्ग चालू असतो (जेथे मुख्यतः भक्तिमार्गाने घरची मंडळी वागते)

पुरश्चरणी कायाक्लेसी । दृढव्रती परम सायासी । जगदीशावेगळें जयासी । थोर नाहीं ॥ ७ ॥

जेथे दृढव्रताने शरीरकष्ट सोसून मोठ्या परिश्रमाने पुराश्र्चरणादि करतात,जेथे परमात्म्यावाचून परमश्रेष्ठ असे दुसरे काहीच नाही (काहीच जाणत नाहीत)

काया वाचा जीवें प्राणें । कष्टे भगवंताकारणें । मनें घेतलें धरणें । भजनमार्गीं ॥ ८ ॥

व काया,वाचा,जीव,प्राण वेचून भगवंताच्या सेवेसाठी कष्ट करीत असतो (भगवंताच्या उपासनेत सर्व कालपेक्ष होतो.),भक्तिमार्गामध्ये ज्याचे मन पूर्ण रमलेले असते (असा गृहस्थाश्रम परम धन्य होय)

ऐसा भगवंताचा भक्त । विशेष अंतरीं विरक्त । संसार सांडून झाला मुक्त । देवाकारणें ॥ ९ ॥

ह्याप्रमाणे गृहस्थाश्रम चालविणारा भगवंताचा भक्त अंतःकरणात विशेष वैराग्य बळावल्यामुळे देवासाठी संसारावर पाणी सोडून मोकळा होतो.

अंतरापासून वैराग्य । तेंचि जाणावें महद्भाग्य । लोलंगतेयेवढें अभाग्य । आणीक नाहीं ॥ १० ॥

(लोलंगते - आसक्ती)

अंतःकरणापासूनचे खरे वैराग्य हेच त्यांचे महद्भाग्य होय.विषय सुखाच्या आसक्तीसारखे दुर्भाग्य दुसरे कोणतेच नाही.

राजे राज्य सांडून गेले । भगवंताकारणें हिंडलें । कीर्तिरूपें पावन जाले । भूमंडळीं ॥ ११ ॥

(जनक-भृर्तहरिसारखे) अनेक राजे भगवंतासाठी राज्य टाकून अरण्यात हिंडत बसले आणि त्रैलोक्यात कीर्तिरुपाने पावन झाले आहेत.

ऐसा जो कां योगेश्वर । अंतरीं प्रत्ययाचा विचार । उकलूं जाणे अंतर । प्राणीमात्रांचें । १२ ॥ऐसी वृत्ति उदासीन । त्याहिवरी विशेष आत्मज्ञान । दर्शनमात्रें समाधान । पावती लोक ॥ १३ ॥

अंतःकरणामध्ये अनुभवाचा आत्मविचार जागृत असून प्राणीमात्राचे अंतःकरण ज्यांना खुले करता येते.असा जो योगेश्वर ज्याची वृत्ति अत्यंत वैराग्यसंपन्न आहे,त्यातही आत्मज्ञान विशेष आहे (ज्यापाशी स्वानुभव जागृत आहे ) अश्याच्या नुसत्या दर्शनाने लोकांना समाधान होते.(-त्याला प्राणीमात्रांचे अंतःकरण विवेकाने खोलता येते.)

बहुतांसी करी उपाये । तो जनाच्या वाट्या न ये । अखंड जयाचे हृदये । भगवद्रूप ॥ १४ ॥

जो पुष्कळाच्या उपयोगी पडतो,तो सगळ्यांच्या वाट्याला येत नाही,तो निरंतर भगवदरुपी रंगलेला असतो.( उदासीन नि:स्वार्थ वृत्ति त्यावर विशेष आत्मज्ञान अशा पुरुषाच्या दर्शनानेच लोक समाधान पावतात.तो बहुतांस उद्धाराचा मार्ग दाखवितो,सर्वांच्याच वाट्याला तो कुठे येतो? तो निरंतर हरिरूपी रंगलेला असतो.)

जनास दिसे हा दुश्चित । परी तो आहे सावचित । अखंड जयाचें चित्त । परमेश्वरीं ॥ १५ ॥
उपासनामूर्तिध्यानीं । अथवा आत्मानुसंधानीं । नाहिं तरी श्रवणमननीं । निरंतर ॥ १६ ॥

( सावचित - सावध)

लोकांना तो दुश्चितसा दिसला (वाटला) तरी तो (अंतरी फार) सावध असतो,त्याचे चित्त उपास्यमूर्तीच्या ध्यानात मग्न असते. अथवा स्वरूपानुसंधानांत तन्मय असते नाहीतर श्रवण-मननात नित्य गर्क असते अशाप्रकारे त्याचे चित्त परमेश्वराच्या ठिकाणी नित्य (गर्क) रममाण असते.

पूर्वजांच्या पुण्यकोटी । संग्रह असिल्या गांठीं । तरीच ऐसीयाची भेटी । होये जनासी ॥ १७ ॥

वाडवडलांची मोठी पुण्याई जर पदरी साचलेली असेल (पूर्वजांचे थोर पुण्य वाट्याला आलेले असले) तरच अशा विभूतीची भेट (अशा विभूतींची संगती) संसारी जीवास होते.

प्रचीतिविण जें ज्ञान । तो आवघाचि अनुमान । तेथें कैंचें परत्रसाधन । प्राणीयासी ॥ १८ ॥

(परत्रसाधन - उद्धार,परब्रह्मप्राप्ति,मुक्ती )

अनुभवरहित असे जे शब्दज्ञान ते सगळेच नुसते अनुमान होय.अशा ठिकाणी प्राण्याला (परत्र) परलोकीचे साधन कोठून मिळणार? (प्रचीतिवीण नुसते अनुमानाचे शब्दज्ञान ज्यापाशी असते त्यापासून परलोकीचे साधन लोकांस नाही)

याकारणें मुख्य प्रत्यये । प्रचीतिविण काम नये । उपायासारिखा अपाये । शाहाणे जाणती ॥ १९ ॥

म्हणून अनुभव (आत्मप्रत्यय) हा मुख्य आहे,अनुभवरहित ज्ञान काय कामाचे? उपायासारखा (अनुभवज्ञानासारखा) उपाय (शब्दज्ञान) दिसला तरी त्यातील भेद (तारतम्य) ज्ञानी जाणतात.

वेडें संसार सांडून गेलें । तरी तें कष्टकष्टोंचि मेलें । दोहिकडे अंतरलें । इहलोक परत्र ॥ २० ॥

(खरे वैराग्य होऊन देवासाठी संसार सोडणारे सत्पुरुष कसे धन्य होतात व जगाच्या उपयोगी पडतात हे वर सांगितले,आता अर्धवट लोक संसार सोडून गेले तर कष्टातच राहून ईहपर लोकांस कसे आचवतात ते पहा) वेडा बायकापोरांवर रुसून-वैराग्य होऊन नव्हे घराबाहेर पडला तरी तो इंद्रियजय न झाल्यामुळे भाडंभांडून स्वतःस व दुसऱ्यास त्याने दु:खी केले.(वेडा बायकापोरांवर रुसून-वैराग्य होऊन नव्हे) संसार टाकून निघून गेला (घराबाहेर पडला) तरी तो कष्ट सोसून मरतो.इहलोक व परलोक दोन्ही त्याचे अंतरतात.

रागें रागें निघोन गेला । तरी तो भांडभांडोंचि मेला । बहुत लोक कष्टी केला । आपणहि कष्टी ॥ २१ ॥

रागारागाने घरातून निघून जातो व बाहेर मरेपर्यंत भांडतो,इतर अनेक लोकांनाही दु:ख देतो व आपणही दु:ख भोगतो.

निघोन गेला परी अज्ञान । त्याचे संगती लागले जन । गुरु शिष्य दोघे समान । अज्ञानरूपें ॥ २२ ॥

(निघोन गेला तरी अज्ञानीच राहिला व त्याच्या संगतीला त्याच्याच सारखी दोन अडाणी माणसे मिळाली हा गुरु व ते चेले!) संसार सोडून गेला पण मूळचा अज्ञानी आणि त्याच्या संगतीला त्याच्यासारखे काही लोक लागतात पण उपयोग काय? गुरु शिष्य दोघेही सारखेच अज्ञानाचे मूर्तिमंत पुतळे.

आशाबद्धी अनाचारी । निघोनि गेला देशांतरीं । तरी तो अनाचारचि करी । जनामध्यें ॥ २३ ॥

(आशाबद्धी - विषयासक्त)

( आशाळभूत व अनाचारी पहिलाच होता तशाचा तसाच राहिला) पहिला आशाळभूत व अनाचारी तो दुसऱ्या देशात गेला तरी लोकात अनाचारच करीत बसणार.

गृहीं पोटेविण कष्टती । कष्टी होऊन निघोन जाती । त्यास ठाईं ठाईं मारिती । चोरी भरतां ॥ २४ ॥

(पोटेविण - उपाशीपोटी)

घरात पोटाला न मिळाल्यामुळे कष्टी होऊन निघून जातात (व चोरी करू लागतात) आणि ठिकठिकाणी चोरीत सापडले म्हणजे त्यांना लोक मारतात (घरची बायकापोरे पोटाचे हाल भोगीत गृहत्याग करून भटकू लागली व चोरा-लबाडांनी बुडविले.)

संसार मिथ्या ऐसा कळला । ज्ञान समजोन निघोन गेला । तेणें जन पावन केला । आपणाऐसा ॥ २५ ॥

संसार खोटा (मिथ्या) आहे असे पुरे कळून व ज्ञानविचार चांगला समजून घेऊन जर मनुष्य संसारातून बाहेर जाईल तर तो स्वतःच्या बरोबरच इतर जनांचा उद्धार करील (- तो आपणा सारखा कोणाचाही उद्धार करील)

येके संगतीनें तरती । येके संगतीनें बुडती । याकारणें सत्संगती । बरी पाहावी ॥ २६ ॥

एका संगतीने उधार होतो व एका संगतीने अधोगति होते.ह्यासाठी सतसंगति नीट पाहून धरावी ( भल्या संगतीने लोक तरतात व वाईट संगतीने बुडतात म्हणून सज्जनांची संगति करावी)

जेथें नाहीं विवेकपरीक्षा । तेथें कैंची असेल दीक्षा । घरोघरीं मागतां भिक्षा । कोठेंहि मिळेना ॥ २७ ॥

जेथे विवेक विचार किवा परीक्षा नाही तेथे परमार्थाची दीक्षा कोठून असणार?(तेथे परमार्थदीक्षा म्हणजे सोंग आहे अशा सोंगाने माणसे वश होत नाहीत, ह्याला धड खायलाही मिळत नाही मग परमार्थाचे नाव कशाला पाहिजे?) जो घरोघर हिंडला तरी त्याला भिक्षा मिळणार नाही.

जो दुसर्याचें अंतर जाणे । देश काळ प्रसंग जाणे । तया पुरुषा काय उणें । भूमंडळीं ॥ २८ ॥

जो दुसऱ्याचे अंतःकरण जाणतो त्याला देश,काल,प्रसंग समजतात,अशा पुरुषाला जगात काय कमी आहे?(जो दुसऱ्याचे अंतर जाणून त्यांना वेध लाऊ शकतो व देशकालप्रसंग जाणून वर्तू शकतो त्याला भूमंडळावर काय कमी आहे?)

नीच प्राणी गुरुत्व पावला । तेथें आचारचि बुडाला । वेदशास्त्रब्राह्मणाला । कोण पुसे ॥ २९ ॥

(देश,काल,प्रसंग कसा आहे ते पहा) नीच जातीचा प्राणी गुरुत्व पावला असून त्यामुळे आचारमार्ग बुडाला आहे अशा स्थितीत वेद शास्त्र ब्राह्मण ह्यांना विचारतो कोण ?

ब्रह्मज्ञानाचा विचारू । त्याचा ब्राह्मणासीच अधिकारू । वर्णानां ब्रह्मणो गुरुः । ऐसें वचन ॥ ३० ॥

ब्रह्मज्ञांनाचा विचार सांगण्याचा अधिकार ब्राह्मणासच आहे चारी वर्णांचा गुरु ब्राह्मण असे शास्त्रवचन आहे.

ब्राह्मण बुद्धिपासून चेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ॥ ३१ ॥

(बुद्धिपासून चेवले - बुद्धीभ्रष्ट,(व आचारभ्रष्ट)

(बरे ब्राह्मणाकडे पाहावे तर त्याने शास्त्रविचार,आचारविचार सोडला आहे!) ब्राह्मण बुद्धीपासून चळले आहेत आचारभ्रष्ट (बुद्धीभ्रष्ट व आचारशून्य) झाले आहेत आपले गुरुत्व सांडून शिष्यांचेही शिष्य बनले (आपली गुरुत्वाची पायरी सोडून ज्यांना ह्यांनी शिकवावे अशांचे शिष्यत्व हे पत्करीत आहेत.)

कित्येक दावलमलकास जाती। कित्येक पीरास भजती । कित्येक तुरुक होती । आपले इछेनें ॥ ३२ ॥

कित्येक ब्राह्मण दावलमलकास जातात कित्येक पिराला भजतात,कोणीतरी आपखुषीने मुसलमान (तुरक,तुर्क परधर्मीय ) होतात.

ऐसा कलयुगींचा आचार । कोठें राहिला विचार । पुढें पुढें वर्णसंकर । होणार आहे ॥ ३३ ॥

असा कलियुगामध्ये आचार झाला आहे.(वर्णाश्रम धर्माचा अथवा शुद्ध अध्यात्माचा ) विचार राहिला आहे कोठे?(कलियुगाच्या प्राबल्यामुळे ह्याप्रमाणे आचारच मुळी सुटला मग विचार कोठे राहील?)(असो हळूहळू पुढे वर्णसंकर व्हावयाचा आहे.?) पुढे पुढे तर वर्णसंकरच होणार आहे.

गुरुत्व आले नीचयाती । कांहींयेक वाढली महंती । शुद्र आचार बुडविती । ब्राह्मणाचा ॥ ३४ ॥

हलक्या (खालच्या) वर्णाकडे (नीच यातीकडे) गुरुत्व गेले असून त्यांची महंती वाढत चालली आहे (त्यांची चढती कमान झाली आहे) व शुद्रलोक ब्राह्मणाचा आचार बुडवू लागले आहेत.

हें ब्राह्मणास कळेना । त्याची वृत्तिच वळेना । मिथ्या अभिमान गळेना । मूर्खपणाचा ॥ ३५ ॥

(आश्चर्य हे की आपली अधोगति किती झाली ह्याचा ब्राह्मण विचार करीत नाहीत त्यांना अनुताप होत नाही) पण हे ब्राह्मणांना कळत नाही आणि त्यांच्या स्वभावात पाळत होत नाही ते मूर्खपणाचा नसता अभिमान सोडत नाहीत (धरून बसले आहेत)

राज्य नेलें म्लेंचिं क्षेत्रीं । गुरुत्व नेलें कुपात्रीं । आपण अरत्रीं ना परत्रीं । कांहींच नाहीं ॥ ३६ ॥

म्लेछ्य राजांच्या हाती राज्य गेले (म्लेछ्य लोकांनी राज्य नेले) आणि हीनयातीनी गुरुत्व नेले आणि आपल्याला ना इहलोक (अरत्र) ना परलोक (परत्र) अशी अवस्था ब्राह्मणांनी करून घेतली (ब्राह्मणांना प्रपंचात किवा परमार्थात कोठेच महत्व राहिले नाही)

ब्रह्मणास ग्रामणीनें बुडविलें। विष्णूनें श्रीवत्स मिरविलें । त्याच विष्णूनें श्रापिलें । फरशरामें ॥ ३७ ॥

ब्राह्मणांना ( गावगुंडपणा,ग्रामण्य,मत्सर ह्यांनी) ग्रामणीने सत्वहीन-सत्वशून्य केले आहे,ज्या विष्णूने ब्राह्मणांच्या आदरप्रेमाने ( भृगुऋषीने मारलेल्या) लाथेचे श्रीवत्स्यचिन्ह म्हणून मिरविले,त्याच विष्णूने परशुराम अवतारात शाप दिला.!

आम्हीहि तेचि ब्रह्मण । दुःखें बोलिलें हें वचन । वडिल गेले ग्रामणी करून । आम्हां भोवतें ॥ ३८ ॥

आम्हीही त्याच ब्राह्मण जातीचे व दु:खाने बोलत आहोत पण काय करावे? वाडवडील (पूर्वीचे ब्राह्मण,मागील पिढ्या) आमच्या भोवती ग्रामण्य माजवून गेले आहेत ते आम्हाला निस्तरावे लागत आहे (जो गोंधळ करून गेले ते आम्हांस निस्तरावा लागत आहे)

आतांचे ब्रह्मणीं काये केलें । अन्न मिळेना ऐसें जालें । तुम्हा बहुतांचे प्रचितीस आलें ।किंवा नाहीं ॥३९॥

हल्लीच्या ब्राह्मणांचा ह्यात काय दोष? (आताच्या ब्राह्मणांनी तरी काय करून दाखविले?) अन्नसुद्धा खायला मिळेनासे झाले हे तुमच्या सर्वांच्या अनुभवास येत आहे किवा नाही?(प्रत्यक्षच पहा की ब्राह्मण अन्नालाही महाग झाले आहेत,ब्राह्मणांचे नशीब दुसरे काय?)

बरें वडिलांस काये म्हणावें । ब्रह्मणाचें अदृष्ट जाणावें । प्रसंगें बोलिलें स्वभावें । क्षमा केलें पाहिजे ॥ ४०॥

वडिलांना तरी ह्यात काय म्हणावयाचे (दोष द्यावयाचा) आहे? ब्राह्मणांचेच दुर्दैव असेच म्हणावे लागेल,ओघाला आले म्हणून सहज बोललो,त्याबद्दल क्षमा करावी.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे युगधर्म निरूपण समास सातवा ॥**

### समास आठवा : अखंड ध्यान निरूपण ॥ श्रीराम ॥

बरें ऐसा प्रसंग जाला । जाला तो होऊन गेला। आतां तरी ब्राह्मणीं आपणाला । शाहाणे करावें ॥ १ ॥

असा प्रसंग तर येऊन ठेपला आहे मागे झाले ते होऊन गेले,परंतु आता तरी ब्राह्मणानी आपणाला शहाणे करावे (शहाणपण शिकावे)

देव पुजावा विमळहस्तीं । तेणें भाग्य पाविजे समस्तीं । मूर्ख अभक्त वेस्तीं । दरिद्र भोगिजे ॥ २ ॥

पवित्र हातांनी देवाची पूजा करावी म्हणजे सर्वांना भाग्य प्राप्त होईल (सर्वांचे भाग्य उदय पावेल),मूर्ख,अभक्त (पाखंडी) व अव्यवस्थित (वेस्ती) असतात तेच दारिद्र्यात खितपत पडतात.

आधीं देवासवोळखावें । मग अनन्यभावें भजावें । अखंड ध्यानचि धरावें । सर्वोत्तमाचें ॥ ३ ॥

अगोदर देवाला ओळखावे मग अनन्यभक्तीने त्याचे भजन करावे,त्या सर्वोतम्माचे अखंड ध्यान धरावे.

सर्वांमधें जो उत्तम । तया नाव सर्वोत्तम । आत्मानात्मविवेकवर्म । ठाईं पाडावें ॥ ४ ॥

सर्वामध्ये जो उत्तम आहे त्यास सर्वोत्तम म्हणतात,आत्मानात्मविवेकाचे वर्म (रहस्य) ध्यानात आणावे (आत्मा कोण व अनात्मा कोण ह्याचा विचार करावा)

जाणजाणों देह रक्षी । आत्मा द्रष्टा अंतरसाक्षी । पदार्थमात्रास परीक्षी । जाणपणें ॥ ५ ॥

प्रत्येक क्रिया किवा व्यवहार जाणून देहाचे संरक्षण करणारा त्याला आत्मा,द्रष्टा,अंतरसाक्षी म्हणतात.प्रत्येक पदार्थाला तो जाणून त्याची परीक्षा करतो (पदार्थमात्रास जाणून त्याची परीक्षा करणारा तो आत्मा)

तो सकळ देहामधें वर्ततो। इंद्रियेंग्राम चेष्टवितो । प्रचितीनें प्रत्यये येतो । प्राणीमात्रीं ॥ ६ ॥

तो (आत्मा) सर्व देहात वागतो (असतो),इंद्रियसमुदाय वर्तवितो त्यामुळे प्राणिमात्रांचेमध्ये तो आहे असे अनुभवाने प्रत्यक्ष दिसते.(सर्वाभूती तो आहे ह्याची प्रचिती येते.)

प्राणीमात्रीं जगदांतरें । म्हणोनि राखावीं अंतरें । दाता भोक्ता परस्परें । सकळ कांहीं ॥ ७ ॥

जगदंतरात्मा  जो परमेश्वर तो प्राणीमात्रामध्ये आहे परस्पर देणारा,भोगणारा,उभयपक्षी सर्वकाही तोच आहे, म्हणून सर्वाची अंतरे राखावी (जगदात्मा प्राणीमात्राच्या अंतरी राहातो,म्हणून सर्वांची अंतरे राखावीत हीच वस्तुतः त्याची पूजा होय दाता भोक्ता सर्वकाही तोच आहे.)

देव वर्ततो जगदांतरी । तोचि आपुलें अंतरीं । त्रैलोकींचे प्राणीमात्रीं । बरें पाहा ॥ ८ ॥

जगदंतरात जसा देव आहे.तसाच तो आपल्या हृदयात आहे,त्रैलोक्यातीलयच्चययावत प्राण्यांमध्ये (प्राण्यांच्या अंतरी) तोच आहे हे नीट पहा.

मुळीं पाहाणार तो येकला । सकळां ठाईं विभागला । देहप्रकृतीनें जाला । भिन्न भिन्न ॥ ९ ॥

मुळचा पहाणारा म्हणजे द्रष्टा तो एकटाच आहे तोच सगळ्या ठिकाणी विभागला जाऊन देहप्रकृतीमुळे वेगवेगळा झाला आहे (असा दिसतो) पण सर्वाठायी तोच एकटा आहे.

भिन्न भासें देहाकारें । प्रस्तुता येकचि अंतरें । बोलणें चालणें निर्धारें । त्यासीच घडे ॥ १० ॥

देहाच्या आकारामुळे तो वेगळा असा भास होतो,वस्तुतः अंतरात एकच आहे,बोलणे,चालणे इत्यादी त्याच्याशीच खरोखर घडत असते (देहाचे आकार वेगळाले पण अंतर (आत्मा) एकच,बोलणे चालणे तोच करतो.)

आपुले पारिखे सकळ लोक । पक्षी स्वापद पश्वादिक । किडा मुंगी देहधारक । सकळ प्राणी ॥ ११ ॥ खेचर भूचर वनचर । नाना प्रकारें जळचर । चत्वार खाणी विस्तार । किती म्हणोन सांगावा ॥ १२॥ समस्त जाणीवेनें वर्तती । रोकडी पाहवी प्रचिती । त्याची आपुली संगती । अखंड आहे ॥ १३॥

(आपुले पारिखे - आपले परके)

आपले किवा (पारिखे) परके सारे लोक,पशु,पक्षी,श्र्वापद,किवा मुंगी इत्यादि देह धारण करणारे (लहान थोर सारे प्राणी) आकाशात उडणारे (खेचर,आकाशात फिरणारे),जमिनीवर राहणारे (भूचर,पृथ्वीवर राहणारे) वनात हिंडणारे (वनचर) पाण्यात वावरणारे (मास्यादि जलचर) असे अनेक प्रकारचे प्राणी तात्पर्य चार खाणींचा विस्तार किती म्हणून सांगावा? हे सगळे प्राणी जाणीवेने वागत असतात(जाणीव म्हणजे अंतरात्मा त्याचा प्रत्यय आपणास आहे) रोकडा अनुभव पाहावा. त्याची आपली अखंड संगति आहे.

जगदांतरें वोळला धणी । किती येकवटील प्राणी । परी ते वोळायाची करणी । आपणापासीं ॥ १४ ॥

(वोळायाची - प्रसन्न करून घेण्याची)

तद्नंतर जो परमात्मा तो आपलासा झाला,तर कितीतरी प्राणी एकवट करता येतील पण तो प्राप्त करून घेण्याचे आपल्या हाती आहे (तो सा-या जगाच्या अंतरी एकटा एक वसत असल्यामुळे तो वळला की साऱ्या प्राणांची अंतरे वश झाली म्हणून समजावे,नाहीतर मनुष्य किती प्राणी एकवटील-कित्येकांना वश करील? पण सर्वांना वश करण्याची युक्ति आपणापाशी आहे,ती ही की आपण त्यांस वश करून घ्यावे.)

हें आपणाकडेंच येतें । राजी राखिजे समस्तें । देहासि बरें करावें तें । आत्मयास पावे ॥ १५ ॥

ही गोष्ट आपल्याकडे आहे.सर्वांना संतुष्ट राखावे.(सर्वांच्या) देहाला बरे केले म्हणजे ते आत्म्याला पोचते (आत्माराम प्रसन्न होतो)

दुर्जन प्राणी त्यांतील देव । त्याचा लाताड स्वभाव । रागास आला जरी राव । तरी तंडों नये कीं ॥ १६ ॥

(रागास आला जरी राव  तरी तंडों नये कीं - दुर्जनामुळे अंतरात्म्यास जरी राग आला तरी भांडण करू नये (विवेकाने सज्जनच राहावे))

दुर्जन प्राण्यातही देव आहे तेथे त्याचा स्वभाव लाथरा (तिरसट,कृतघ्न) दिसला तरी त्यातील राव म्हणजे अंतरात्मा ओळखून तो रागावला तरी भांडू नये.

प्रसंगीं सांडीच करणें । पुढें विवेकें विवरणें । विवेक सज्जनचि होणें । सकळ लोकीं ॥ १७ ॥

अशा प्रसंगी (तो संतापला तर) त्याच्यापासून (थोडा काळ) दूर होऊन पुढे (विवेकाने पाहावे) त्याची विवेकाने समजूत घालावी, विवेकाने आपले सौजन्य सांभाळावे.

आत्मत्वीं दिसतो भेद । हा अवघाचि देहसमंध । येका जीवनें नाना स्वाद । औषधीभेदें ॥ १८ ॥

आत्मत्वाच्या ठिकाणी जो भेद दिसतो.तो सगळाच देहसंबंधामुळे दिसतो,पाणी एक असते पण वनस्पतींच्या भेदामुळे त्याचे अनेक प्रकारचे स्वाद होतात.(आत्मत्वी भेद दिसतो पण देह भिन्न आहेत,त्यातील आत्मा एकच आहे,नाना रसास्वाद देणाऱ्या ओषधी अनेक पण त्या सर्वांतील जीवन एकच आहे.)

गरळ आणि अमृत जालें । परी आपपण नाहीं गेलें । साक्षत्वें आत्मयास पाहिलें । पाहिजे तैसें ॥ १९ ॥

विष असले किवा अमृत असले तरी त्या दोहोतील आप-पण नाहीसे होत नाही (म्हणजे एकच असते) त्याचप्रमाणे (सुष्ट व दुष्ट ह्या दोहोंच्या ठिकाणी) आत्मा एकच आहे हे पाहावे (विष व अमृत ह्यात आप-पण एकच,तसेच साक्षित्वाने सुष्ट व दुष्ट ह्या दोहोत आत्मा एकच आहे हे पाहावे.)

अंतरनिष्ठ जो पुरुष । तो अंतरनिष्ठेनें विशेष । जगामधें जो जगदीश । तो तयास वोळखे ॥ २० ॥

जो पुरुष अंतरनिष्ठ असतो,त्याच्या ठिकाणी अंतरनिष्ठा विशेष असते.(एका अंतरात्म्यालाच तो सर्वत्र पाहतो) जगामध्ये असणारा जगदीश त्याला तो ओळखत असतो.(अंतरनिष्ठ पुरुष साऱ्या जगामध्ये जो एक अंतरात्मा आहे त्याला त्या जगदीशला-पाहातो)

नयनेंचि पाहावा नयेन । मनें शोधावें मन । तैसाचि हा भगवान । सकळां घटीं ॥ २१ ॥

डोळ्यानेच डोळा पहावायाचा किवा मनानेच मनाचा शोध घ्यावयाचा तसाच सर्वां घटी असणारा भगवान आपल्या अंतःकरणातील भगवानानेच (अतरात्म्यानेच) पाहावयाचा असतो.

तेणेंविण कार्यभाग आडे । सकळ कांहीं तेणेंचि घडे । प्राणी विवेकें पडावे । तेणेंचि योगें ॥ २२ ॥

त्याच्यावाचून कार्यभाग अडून राहतो व त्याच्यामुळेच सर्व कार्ये होतात,त्याच्या व्दारेच प्राणी विवेक करावयास लागतो.

जागृतीस व्यापार घडतो । समंध तयासीच पडतो । स्वप्नामधें घडे जो तो । येणेंचि न्यायें ॥ २३ ॥

जागृती व स्वप्न ह्यामध्ये जे जे व्यापार होतात,त्यांचा संबंध त्याच्या द्वारेच प्राणी विवेक करावयास लागतो.

अखंड ध्यानाचें लक्षण । अखंड देवाचें स्मरण । याचें कळतां विवरण । सहजचि घडे ॥ २४ ॥

त्या सर्वांतयामी व शाश्वत देवाचे अखंड स्मरण करणे हेच अखंड ध्यानाचे स्वरूप होय.ह्या म्हणण्याचे विवरण कळू लागले म्हणजे ते अखंड ध्यान सहजच घडते.

सहज सांडून सायास । हाचि कोणीयेक दोष । आत्मा सांडून अनात्म्यास । ध्यानीं धरिती ॥ २५ ॥

हे सहजध्यान सोडून सायासाने (मूर्तीच्या) ध्यानास बसणे म्हणजे आत्मा सोडून अनात्म्याचे ध्यान करणे हाच एक प्रकारचा दोष आहे.

परी तें धरितांहि धरेना । ध्यानीं येती वेक्ति नाना । उगेंचि कष्टती मना । कासाविस करूनी ॥ २६ ॥

(आणि ते अनात्म्याचे सायासाने केलेले) ध्यानही करायला लागले तर नीट करता येत नाही,ध्यानामध्ये अनेक रूपे येऊ लागतात व असल्या ध्यानाने मनाला रिकामे कासावीस करून कष्टी होतात.

मूर्तिध्यान करिता। सायासें । तेथें येकाचें येकचि दिसे । भासों नये तेंचि भासे । विलक्षण ॥ २७ ॥

मोठ्या प्रयत्नाने मूर्तीचे ध्यान करावयास बसावे तो तेथे काहीच्या काहीच दिसते (एकाला धरावयास जावे तर दुसरेच मनापुढे येते.) व जे कधी भासणार नाही असले विलक्षण त्यावेळी भासू लागते ( भासू नये ते नानाप्रकारे भासते)

ध्यान देवाचें करावें । किंवा देवाल्याचें करावें । हेंचि बरें विवरावें । आपले ठाईं ॥ २८ ॥

ध्यान देवाचे करावयाचे का देवळाचे करावयाचे ह्याचा आपल्या ठिकाणी नीट विचार करावा.

देह देउळ आत्मा देव । कोठें धरूं पाहातां भाव । देव वोळखोन जीव । तेथेंचि लावावा ॥ २९ ॥

देह हे देऊळ असून आत्मा हा देव आहे आता ह्यामध्ये भाव कोठे ठेवणार? देव कोणता ते ओळखून त्याच्या ठिकाणी जीव लावावा.

अंतरनिष्ठा ध्यान ऐसें । दंडकध्यान अनारिसें । प्रत्ययेविण सकळ पिसें । अनुमानध्यान ॥ ३० ॥

(अनारिसें - वेगळेच, अनुमानध्यान - अनुभवाशिवायचे ध्यान,कल्पनायुक्तध्यान)

अंतर्निष्ठाचे ध्यान अशाप्रकारचे असते.सामान्य लोकांचे रूढीचे (दंडक) ध्यान ह्याहून वेगळे हे अनुमान ध्यान होय,अनुभवावाचून (प्रत्ययावाचून) सगळा वेडेपणा होय.(लोकी जो दंडक-रीत,रूढी असेल त्याप्रमाणे ध्यान करितात ते अनुमान ध्यान होय.)

अनुमानें अनुमान वाढे । ध्यान धरितां सवेंचि मोडे । उगेचि कष्टती बापुडे । स्थूळध्यानें ॥ ३१ ॥

(अनुमानाच्या कल्पनेने अनुमान वाढत जाते कल्पनेने कल्पना वाढते),मूर्तीचे ध्यान धरावे न धरावे तोच ते नाहीसे होते (ध्यान धरितां धरीतांच मोडते) असल्या स्थूल ध्यानाने बिचारे (वेडे लोक) विनाकारण कष्ट भोगतात.

देवास देहधारी कल्पिती । तेथें नाना विकल्प उठती । भोगणें त्यागणें विपत्ति । देहयोगें ॥ ३२ ॥

देव देहधारी अशी कल्पना करतात,त्यामुळे त्याच्या ठिकाणी अनेक विकल्प उत्पन्न होतात (मन नानाविकारांनी भरून जाते) देह म्हंटला की त्याच्या मागे भोग,त्याग,विपत्ती ही आलीच असे वाटते.

ऐसें मनी आठवतें । विचारितां भलतेंचि होतें । दिसों नये तें दिसतें । नाना स्वप्नीं ॥ ३३ ॥

(तसेच हे विकार देवालाही असतील) असे मनात येते (इत्यादि विकल्प मनात येतात.)आणि स्वप्नात ज्याप्रमाणे दिसू नयेत असे अनेक पदार्थ दिसतात.(दिसू नये ते स्वप्नी दिसू लागते.) त्याप्रमाणे मूर्तीच्या ध्यानाचा विचार करायला जावे तो भलतेच होते.

दिसतें तें सांगतां न ये । बळें भावर्थ धरितां नये । साधक कासाविस होये । अंतर्यामीं ॥ ३४ ॥

जे दिसते ते सगळे सांगताच येत नाही,हट्टाने कृत्रिम भाव धरवत नाही व ह्यामुळे साधक अंतःकरणात तळमळत असतो (कष्टी होतो)

सांगोपांग घडे ध्यान । त्यास साक्ष आपुलें मन । मनामध्यें विकल्पदर्शन । होऊंच नये ॥ ३५ ॥

भाग्याने ज्याला यथासांग ध्यान घडते त्याला त्याचेच मन साक्षी असते.( व त्याला समाधान सुख मिळते.) त्याच्या ठिकाणी लेशमात्रही विकल्प येत नाही.

फुटक मन येकवटिलें । तेणें तुटक ध्यान केलें । तेथें कोण सार्थक जालें । पाहाना कां ॥ ३६ ॥

(फुटक मन - व्यग्रमन,भरकटलेले मन)

फुटके ध्यान एकवटून त्याने तुटके ध्यान केले तर सार्थक काय होणार? (तर त्याचा उपयोग काय?) ह्याचा निट विचार करा.

अखंड ध्यानें न घडे हित । तरी तो जाणावा पतित । हाचि अर्थ सावचित । बरा पाहावा ॥ ३७ ॥

अखंड ध्यानाने ज्याचे कल्याण होत नाही (ज्याला देव मिळत नाही) तो पतित म्हणजे अपात्र समजावा. ह्या म्हणण्यातील सार नीट विचार करून ध्यानी आणावे (अखंड ध्यानाने देव जोडला नाही तर भजक पतित-अपात्र आहे असे समजावे.

ध्यान धरितें तें कोण । ध्यानीं आठवतें तें कोण । दोनीमधें अनन्य लक्षण । असिलें पाहिजे ॥ ३८ ॥

ध्यान करणारा कोण? व ध्यानात ज्याचे स्मरण होते तो कोण? ह्या दोघांमध्ये (ध्याता व ध्येय ह्यामध्ये) अनन्यता (एकपण) पाहिजे.

अनन्य सहजचि आहे । साधक शोधून न पाहे । ज्ञानी तो विवरोन राहे । समाधानें ॥ ३९ ॥

हा अनन्यपणा (एकरूपता) स्वभावत:च-मूळचीच आहे परंतु साधक ह्याचा शोध घेत नाही (म्हणून भ्रमात पडतो.) आणि ज्ञानी विवरून (एकरूपता ओळखून) समाधान पावतो.

ऐसीं हे प्रत्ययाची कामें । प्रत्ययेंविण बाधिजे भ्रमें । लोकदंडकसंभ्रमें । चालती प्राणी ॥ ४० ॥

ही अनुभवाची कामे आहेत,अनुभव नसेल तर ब्रह्मात कूचमावें लागते,सगळे लोक लौकिक रुढीच्या भ्रमाने (दंड्काने-रूढीने) चालत असतात.

दंडकध्यानाचें लक्षण । धरून बैसलें अवलक्षण । प्रमाण आणि अप्रमाण । बाजारी नेणती ॥ ४१ ॥

हा अवलक्षणी दंडकध्यानालाच रूढ होऊन बसला पण त्या बाजा-याला म्हणजे सामान्य माणसाला खरे व खोटे कळत नाही (दंडक ध्यानाने मन सदोषता पावते व अखंड ध्यानाने समाधान पावते पण प्रमाण काय व अप्रमाण काय हे बाजारी लोकांना काय ठाऊक?)

मिथ्या समाचार उठविती । बाउग्याच बोंबा घालिती । मनांस आणितां अंतीं । आवघेंचि मिथ्या ॥ ४२ ॥

खोट्या गप्पा उठवितात,उगीच आरडाओरडा करतात (उगाच धामधूम करितात) पण त्याचा नीट विचार केला तर ते सर्व खोटे(विवेकाने शोधू गेल्यास ते सर्व मिथ्या ठरते.)

कोणीयेक ध्यानस्त बैसला । कोणीयेक सिकवी त्याला । मुकुट काढूनि माळ घाला । म्हणिजे बरें ॥ ४३ ॥

(उदाहरण-कोणी एक ध्यानस्थ बसला व दुसरा त्यास शिकवितो आहे की अहो,ध्येयमूर्तीच्या मस्तकावरील मुकुट काढुन घ्या म्हणजे माळ गळ्यात जाईल )कोणी मनुष्य ध्यानामध्ये मानसपूजा करीत बसला आहे (त्या ध्यानांतील अडचण अंतरज्ञानाने जाणणारा) दुसरा इसम त्यास शिकवतो की ध्येयमूर्तीचा मुकुट काढून गळ्यातील माळ घाल म्हणजे बरे होईल.

मनाचेथें काये दुष्काळ । जे आखुड कल्पिती माळ । सांगते ऐकते केवळ । मूर्ख जाणावे ॥ ४४ ॥

(मनाचेथें - मनाजवळ)

मनाच्या घरी कल्पनांना काय तोटा? आखूड माळेची कल्पनाच का केली? तात्पर्य,अशा गोष्टी सांगणारे व ऐकणारे दोघेही मूर्खच समजावे.

प्रत्यक्ष कष्ट करावे न लगती । दोरे फुलें गुंफावी न लगती । कल्पनेची माळ थिटी करिती । काये निमित्य ॥ ४५ ॥

प्रत्यक्ष कष्ट करावे लागत नाहीत,दोरा व फुले घेऊन माळ गुंफावी लागत नाही, (कल्पनेचीच माळ करावयाची तर मग ती आखूड काय म्हणून करावी? (तेथे काही फुले आणावी लागत नाहीत, माळ गुंफावी लागत नाही काहीच कष्ट नाहीत)

बुधीविण प्राणी सकळ । ते ते अवघेचि बाष्कळ । तया मुर्खासीं खळखळ । कोणें करावी ॥ ४६ ॥

असो जेवढे बुद्धिहीन प्राणी आहेत तेवढे सगळेच बाष्कळ होत,असल्या मूर्खाबरोबर कटकट कोण घालीत बसणार?(बुद्धिवाचून प्राणी बाष्कळ होतात,त्या मूर्खाच्या नादी लागू नये)

जेणें जैसा परमार्थ केला । तैसाच पृथ्वीवरी दंडक चालिला । साता पांचाचा बळावला । साभिमान ॥ ४७ ॥

(साता पांचाचा बळावला  साभिमान - सात(षड-रिपू व अज्ञान) व पांच (शब्द-स्पर्शादि) हेच अहंकाराने प्रबळ होतात.)

ज्याने जसा (जितका) परमार्थ केला (तितक्याचा) त्याच्याच एक सांप्रदाय जगामध्ये (रूढ) सुरु होऊन त्याचा अभिमान धरणारे दहापाच अनुयायी मिळतात व तो रूढ होतो.

प्रत्ययेंविण साभिमान । रोगी मारिले झांकून । तेथें अवघाची अनुमान । ज्ञान कैंचें ॥ ४८ ॥

अनुभवावाचून नुसत्या अभिमानानेच उपदेश देत सुटणे रोगी झाकून मारण्यासारखे आहे.त्यात ज्ञान कोठले? सर्वच अनुमान

सर्व साभिमान सांडावा । प्रत्ययें विवेक मांडावा । माया पूर्वपक्ष खंडावा । विवेकबळें ॥ ४९ ॥

असत्याचा सगळा अभिमान सोडून देऊन अनुभव घेत घेत विचार करावयास लावावे आणि विचाराच्या बळाने पूर्वपक्ष म्हणजे लटकी अशी माया तिचे खंडन करावे,सारा अभिमान सोडुन विवेकाने प्रत्यय घ्यावा,मायेचा पूर्वपक्ष-त्याचे खंडन करून करून आत्मा हा सिद्धांत स्वीकारावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अखंडध्याननिरूपणनाम समास आठवा ॥**

## समास नववा : शाश्वत निरूपण ॥ श्रीराम ॥

पिंडाचें पाहिलें कौतुक । शोधिला आत्मानात्मा विवेक । पिंड अनात्मा आत्मा येक । सकळ कर्ता ॥ १ ॥

पिंडाची कोतुकास्पद रचना पहिली,त्यात आत्मा कोण,अनात्मा कोण ह्याचा शोध घेतला,त्यात पिंड अनात्मा असून,सर्वकर्ता तो एक आत्मा आहे असे दिसून आले.

आत्म्यास अनन्यता बोलिली । ते विवेकें प्रत्यया आली । आतां पाहिजे समजली । ब्रह्मांडरचना ॥ २ ॥

सर्वत्र एक आत्माच आहे असे म्हणतात त्याचा अनुभव विवेकाने आला आता ब्रह्मांड रचना समजली पाहिजे.

आत्मानात्माविवेक पिंडी । सारासारविचार ब्रह्मांडी। विवरविवरों हे गोडी । घेतली पाहिजे ॥ ३ ॥

पिंडाचा विवेक करावयाला आत्मानात्मविवेक व ब्रह्मांडाचा विचार करावयाला सारासारविचार पाहिजे त्याचे विवरण करीत करीत त्यातील गोडी ग्रहण केली पाहिजे.

पिंड कार्य ब्रह्मांड कारण । याचें करावें विवरण । हेंचि पुढें निरूपण । बोलिलें असे ॥ ४ ॥

ब्रह्मांड(पंचभूते म्हणून कारण) हे कारण असून पिंड हे त्याचे कार्य आहे,त्याचे विवरण करीत जावे,त्याच विषयाचे निरुपण पुढे सांगितले आहे.

असार म्हणिजे नासिवंत । सार म्हणिजे तें शाश्वत । जयास होईल कल्पांत । तें सार नव्हे ॥ ५ ॥

असार म्हणजे नाशवंत (ज्याला कल्पांत आहे ते,पंचभूतात्मक ब्रह्मांड व पिंडही-कारण ब्रह्मांडकरणापासून पिंड हे कार्य होते.ह्याला नाश आहे कल्पांत आहे.) सार म्हणजे ज्याला नाश नाही ते शाश्र्वत,ज्याला कल्पांत म्हणजे नाश होईल ते सारे नव्हे.

पृथ्वी जळापासून जाली । पुढें ते जळीं मिळाली । जळाची उत्पत्ति वाढली । तेजापासूनी ॥ ६ ॥

पृथ्वी पाण्यापासून होते व पुढे (शेवटी) ती पाण्यातच विरून जाते.पाणी तेजापासून होते.

ते जळ तेजें शोषिलें । महत्तेजें आटोन गेलें । पुढें तेजचि उरलें । सावकाश ॥ ७ ॥

(व पुन्हा तेजातच आटून जाते) त्या पाण्याला तेज शोषून टाकते.महत्तेजाने ते आटते,मग पुढे सारे तेजच उरते.

तेज जालें वायोपासुनी । वायो झडपी तयालागुनी । तेज जाउनी दाटणी । वायोचीच जाली ॥ ८ ॥

तेज वायूपासून होते व वायुच त्याला झडपुन विझवतो नंतर तेज सर्व नाहीसे होऊन सारा वायूच भरून राहतो.

वायो गगनापासुनी जाला । मागुतां तेथेंचि विराला । ऐसा हा कल्पांत बोलिला । वेदांतशास्त्रीं ॥ ९ ॥

वायु आकाशापासून होतो व पुन्हा त्यातच विरतो.त्यालाच वेदांतशास्त्रात कल्पांत म्हणतात (मुळंमायेचा म्हणजे कल्पनेचा जेथे अंत होतो तो कल्पांत)

गुणमाया मूळमाया । परब्रह्मीं पावती लया । तें परब्रह्म विवराया । विवेक पाहिजे ॥ १० ॥

(ह्याप्रमाणे भूते ज्या ज्यापासून उत्पन्न होतात त्या त्या तत्वातच लय पावतात) शेवटी मूळमाया व गुणमाया ह्यासुद्धा परब्रह्माचे ठिकाणी लय पावतात.अशा त्या परब्रह्माचे विवरण करायला विवेक पाहिजे.

सर्व उपाधींचा सेवट । तेथें नाहीं दृश्य खटपट । निर्गुण ब्रह्म घनदाट । सकळां ठाईं ॥ ११ ॥

(मूळमायेतसुद्धा) सगळ्या उपाधीचा ज्या ठिकाणी शेवट होतो,ज्या ठिकाणी दृश्याची खटपट नाही असे ते (सर्वव्यापी) निर्गुणब्रह्म सर्वत्र घनदाट भरून राहिले आहे. (ते सारे म्हणजे शाश्र्वत होय.,निर्गुण ब्रह्मावेगळे मुळमायेसकट सर्व असार होय.ह्याचे नाव सारासारविचार )

उदंड कल्पांत जाला । तरी नाश नाहीं तयाला । मायात्यागें शाश्र्वताला । वोळखावें ॥ १२ ॥

हवा तेवढा कल्पांत झाला तरी त्याला (ब्रह्माला) नाश म्हणून नाही.अशा त्या शाश्वताला,मायेचा त्याग करून ओळखावे.(मायेला कल्पांत आहे तिचा विवेकाने त्याग करून शाश्वत ओळखावे.)

देव अंतरात्मा सगुण । सगुणें पाविजे निर्गुण । निर्गुणज्ञानें विज्ञान । होत असे ॥ १३ ॥

(सगुणें पाविजे निर्गुण - सगुणा कडून निर्गुणज्ञानाकडे , निर्गुणज्ञानें विज्ञान - निर्गुणाचे ज्ञान करून घेऊन ब्रह्मज्ञानी अर्थात ब्रह्मस्वरूपी लीन व्हावे.)

अंतरात्मा देव सगुण,त्या सगुणाच्या व्दारानेच निर्गुणाची प्राप्ती होते आणि निर्गुणाचे ज्ञान झाले म्हणजे ज्ञानाचे विज्ञान म्हणजे अपरोक्ष ज्ञान होते.(अपरोक्षानुभव होतो)

कल्पनेतीत जें निर्मळ । तेथें नाहीं मायामळ । मिथ्यत्वें दृश्य सकळ । होत जातें ॥ १४ ॥

ते निर्मळ ब्रह्म कल्पनेच्या पलीकडले आहे.त्याच्या ठिकाणी मायेचा मळ किंचितही नाही.सगळे दृश्य होते व जाते हे लटके होय.(निर्मळ निर्गुण ब्रह्म तेथे कल्पना-माया नाही तेथे दृश्य होते व जाते ही वार्ताही नाही)

जें होते आणि सवेंचि जातें । तें तें प्रत्ययास येतें । जेथें होणें जाणें नाहीं तें । विवेकें वोळखावे ॥ १५ ॥

जे उत्पन्न होते व लगेच नाहीसे होते ते ते अनुभवला येते,ज्या ठिकाणी होणे जाणे नाही असे परब्रह्म विचाराने ओळखावे (होते आणि जाते ते दृश्य नाशवंत,होणे जाणे नाही ते ब्रह्म )

येक ज्ञान येक अज्ञान । येक जाणावें विपरीत ज्ञान । हे त्रिपुटी होये क्षीण । तेंचि विज्ञान ॥ १६ ॥

(परब्रह्मास जाणणे हे ज्ञान,स्वरूपास न जाणणे हे अज्ञान,मी देहाचा आहे असे समजणे हे विपरीत ज्ञान)

एक ज्ञान व एक अज्ञान व एक विपरीत ज्ञान ही तिन्ही जेथे नाहीशी होतात तेच विज्ञान होय. (विपरीत ज्ञान म्हणजे एकाचे एक (निराळे,भलतेच) दिसते,अज्ञान म्ह.नेणणे,ज्ञान म्हणजे जाणणे.आत्मा नेणणे हे अज्ञान,आत्मा जाणणे हे ज्ञान व पंचभूतात्मक पसारा हे ज्ञान नव्हे व अज्ञान नव्हे,तर विपरीत ज्ञान का की तेथे आहे एक व दिसते भलतेच म्हणून तिन्ही वृत्ति समान करून निवृत्तिरूपाने विज्ञान व्हावे.)

वेदांत सिधांत धादांत । याची पाहावी प्रचित । निर्विकार सदोदित । जेथें तेथें ॥ १७ ॥

( वेदांत सिधांत धादांत - शास्त्रप्रचिती,गुरुप्रचिती,आत्मप्रचिती - शास्त्रगुरुआत्मप्रचिती)

वेदांत,सिद्धांत,धादांत या तिन्ही दृष्टीने निर्विकार परब्रह्म सर्वत्र सदोदित भरलेले आहे हा अनुभव घ्यावा.(वृत्तिशून्यता हे विज्ञान वेदांत (शास्त्रप्रचीति),सिद्धांत (गुरुप्रचीति) व धादान्त (आत्मप्रचीति) ह्या तिहींचा अनुभव पाहावा -तो हा की निर्विकार ब्रह्म सर्वत्र संचले आहे.

तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोन अनन्य राहावें मुख्य आत्मनिवेदन जाणावें । याचें नांव ॥ १८ ॥

ते ज्ञानदृष्टीने पाहून त्याच्या ठिकाणी अनन्य म्हणजे तद्रूप होऊन (अनन्य) राहावे.ह्याला आत्मनिवेदनाची भक्ति म्हणतात.(ह्याचे नाव आत्मनिवेदन)

दृश्यास दिसते दृश्य । मनास भासतो भास । दृश्यभासातीत अविनाश । परब्रह्म तें ॥ १९ ॥

दृश्याला दृश्य दिसते,मनाला भास भासतो.ते परब्रह्म दृश्यभासापासून (दृश्य आणि भास ह्याहून) वेगळे व अविनाशी असे आहे.

पाहों जातां दुरीच्या दुरी । परब्रह्म सबाहेअंतरीं । अंतचि नाहीं अनंत सरी । कोणास द्यावी ॥ २० ॥

जितके दूर पाहवायला जावे,त्याच्या पलीकडे ते दूर आहेच,पण सर्वांच्या आतबाहेर तेच आहे,त्याला अंतच नाही,अश्या त्या अनंताची बरोबरी (सरी) कोणी करावी.?

चंचळ तें स्थिरावेना । निश्र्चळ तें कदापी चळेना । आभाळ येतें जातें गगना । चळण नाहीं ॥ २१ ॥

चंचल माया कधी स्थिर व्हायचीच नाही आणि निश्र्चळ ब्रह्म कधी चळत नाही,चंचळ आभाळ म्हणजे मेघ आले व गेले तरी आकाश चळावायचे नाही (चंचळ ते स्थिर होत नाही-जशी माया, व निश्र्चळ ते चळत नाही-जसे ब्रह्म,चंचळ आभाळ येते जाते पण गगन निश्र्चळ आहे)

जें विकारें वाढें मोडे । तेथें शाश्र्वतता कैंची घडे । कल्पांत होताच विघडे । सकळ कांहीं ॥ २२ ॥

(विघडे - विनाश)

वाढणे,मोडणे,वैगेरे विकार ज्याला होतात,त्याला शाश्र्वतपणा कोठून असणार? कल्पांत झाला की सर्व काही नाहीसे होते.(जे विकाराने वाढते ते मोडते तेथे शाश्र्वतता कसची? सर्व काही वाढणारे बोलणारे कल्पांती नाहीसे होते.)

जे अंतरींच भ्रमलें । मायासंभ्रमें संभ्रमलें । तयास हें कैसें उकले । आव्हाट चक्र ॥ २३ ॥

(आव्हाट - अफाट)

ज्याच्या अंतःकरणात भ्रम उत्पन्न झाला आहे व जे मायाजाळात गुंतले आहेत,त्यांना अव्हाट म्हणजे अफाट किवा उलटसुलट फिरणारे चक्र उकलणार कसे?

भिडेनें वेव्हार निवडेना । भिडेनें सिधांत कळेना । भिडेनें देव आकळेना । अंतर्यामीं ॥ २४ ॥

(भिडेनें - भिडस्त स्वभाव,स्वतःचे पूर्वग्रह कायम ठेवणे,अहंकारामुळे अशा तिनही अर्थाने हा शब्द वापरला आहे.)

भिडेने व्यवहाराचा उलगडा होत नाही,सिद्धांत कळत नाही आणि अंतर्यामीच्या देवाचे आकलन होत नाही.

वैद्याची प्रचित येईना । आणी भीडहि उलंघेना । तरी मग रोगी वांचेना । ऐसें जाणावें ॥ २५ ॥

वैद्याच्या ओषधाचा अनुभव येत नाही व त्याची भीडही तुटत नाही,तर मग रोगी खास वाचत नाही असे समजावे.

जेणें राजा वोळखिला । तो राव म्हणेना भलत्याला । जेणें देव वोळखिला । तो देवरूपी ॥ २६ ॥

ज्याने राजाची ओळख करून घेतली तो भलत्यालाच राजा म्हणणार नाही.त्याप्रमाणे ज्याने देवाची ओळख करून घेतली तो स्वतः देवरुपीच होतो (तो देवच झाला)

जयास माईकाची भीड । तें काये बोलेल द्वाड । विचार पाहातां उघड । सकळ कांहीं ॥ २७ ॥

(द्वाड - खुळचट,वात्रट, माईकाची भीड - दृश्य मायिक सृष्टीची आसक्ती / लोभ (भीड))

ज्याला मायिकाची भीड पडते तो (द्वाड) मूर्ख खरे काय बोलणार ते दिसतच आहे.विचार पाहिला म्हणजे सर्व काही उघडे आहे.

भीड मायेऐलिकडे । परब्रह्म तें पैलीकडे । पैलीकडे ऐलीकडे । सदोदित ॥ २८ ॥

भीड मायेच्या अलीकडची व परब्रह्म मायेच्या पलीकडचे! ( पलीकडले एकटे काय तर) मायेच्या अलिकडे पलीकडे ते सदोदित भरलेलेच आहे.(ते अलीकडे व पलीकडे आहे)

लटिक्याची भीड धरणें । भ्रमें भलतेंचि करणें । ऐसी नव्हेंतीलक्षणें । विवेकाचीं ॥ २९ ॥

लटक्याची भीड धरून भ्रमाने भलतेच करणे हे काही विचारांचे लक्षण नव्हे.

खोटें आवघेंचि सांडावें । खरें प्रत्ययें वोळखावें । मायात्यागें समजावें । परब्रह्म ॥ ३० ॥

खोटे किवा (मायिक) सर्वच टाकून द्यावे आणि सत्य (ब्रह्म) अनुभवाने ओळखावे,मायेचा त्याग करून परब्रह्म समजून घ्यावे (माया-त्यागानेच) ब्रह्म समजते.)

तें मायेचें जें लक्षण । तेंचि पुढें निरूपण । सुचितपणें विवरण । केलें पाहिजे ॥ ३१ ॥

त्या मायेचे लक्षण कसे असते त्याचे निरुपण पुढील समासात केले आहे त्याचा विचार स्थिर चित्ताने करावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शाश्वतनिरूपणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : मायानिरूपण ॥ श्रीराम ॥**

माया दिसे परी नासे । वस्तु न दिसे परी न नासे । माया सत्य वाटे परी मिथ्या असे । निरंतर ॥ १ ॥

माया दिसते पण नाश पावते (नाशिवंत आहे) परब्रह्म दिसत नाही पण त्याचा नाश होत नाही (अविनाशी आहे) माया निरंतर खरी आहेशी वाटते पण ती सर्वथा मिथ्या आहे.

करंटा पडोनि उताणा । करी नानापरी कल्पना । परी तें कांहींच घडेना । तैसी माया ॥ २ ॥

भिकमाग्या (एखादा भिकारी) उताणा पडून पाहिजे त्या कल्पना करतो (मनोराज्ये) बांधित असतो पण त्याच्या हातून काहीच घडत नाही,तशीच माया (कल्पना रूप आहे)

द्रव्यदारेचें स्वप्नवैभव । नाना विळासें हावभाव । क्षणीक वाटे परी भाव । तैसी माया ॥ ३ ॥

स्वप्नात उत्तम स्त्री व पुष्कळ द्रव्य मिळून अनेक प्रकारचे विलास भोगल्याचे वाटले,पण जागे झाल्यावर ते सारे क्षणिक व मिथ्या आहे असे कळते,तशी माया (स्वप्नात उत्तम स्त्री व अफाट द्रव्य मिळाले व नाना प्रकारचे विलास-वैभव भोगल्याचे वाटले,पण जागे झाल्यावर हे सारे ते सारे क्षणिक व मिथ्या आहे असे कळते तशी माया,(स्वप्नात उत्तम स्त्री व अफाट द्रव्य मिळाले व नाना प्रकारचे विलास-वैभव भोगल्याचे वाटले,पण जागृतीत आल्यावर ते सारे क्षणिक व मिथ्या आहे असे कळते,त्याप्रमाणे स्वरूप जागृती झाल्यावर सारी दृश्य सृष्टी मिथ्या आहे हे कळून येते.)

गगनीं गंधर्वनगरें । दिसताती नाना प्रकारें । नाना रूपें नाना विकारें । तैसी माया ॥ ४ ॥

आकाशात अनेक प्रकारच्या मेघांच्या आकृति (गंधर्वनगरे) दिसतात त्याप्रमाणे अनेक रूपे व अनेक विकार दाखविणारी ही माया (मिथ्याच) आहे.

लक्षुमी रायेविनोदाची । बोलतां वाटे साची । मिथ्या प्रचित तेथीची । तैसी माया ॥ ५ ॥

(रायेविनोदाची - बहुरूप्याची )

रायविनोदी म्हणजे खुशमस्क-या,राजाची करमणूक करणारा किवा बहुरूपी ह्याची लक्ष्मी (वैभव) तो बोलतो (वर्णन करतो) तेव्हा ती खरी वाटते,पण (तो दिडक्या मागण्यासाठी नरोटी पुढे करितो तेव्हा) तिचा खोटेपणाचा अनुभव लगेच येतो,(तिचे मिथ्यत्व प्रचीतीस येते) तशीच माया आहे.(तसेच स्वरूपजागृति काळी इहलोकीचे ऐश्वर्य मिथ्या आहे हे कळून येते.)

दसर्याचे सुवर्णाचे लाटे । लोक म्हणती परी ते कांटे । परी सर्वत्र राहाटे । तैसी माया ॥ ६ ॥

(सुवर्णाचे लाटे - सोने लुटतात, राहाटे - रीतिरीवाज)

दस-याच्या सोन्याच्या लगडी आहेत असे लोक म्हणतात पण त्या असतात कांटे,तथापि त्याची देवघेव सर्वत्र होत असते तशी माया आहे (दस-याच्या सोन्याच्या लगडीला सोने म्हणतात व लोकांत त्याची देवघेव सर्वत्र करितात पण त्याचे काटे हाताला बोचतात तशीच मिथ्या मायेतील संपत्ति होय.)

मेल्याचा मोहोत्साव करणें । सतीचें वैभव वाढविणें । मसणीं जाउनी रुदन करणें । तैसी माया ॥ ७ ॥

मेलेल्याचा (पुण्यतिथीचा) उत्सव किवा सती जाणाऱ्या (जाऊ लागणा-या) स्त्रीचे वैभव अथवा स्मशानात जाऊन मृतांकरिता रडत बसणे (शोक-रसप्रधान काव्ये गाणे) तशी माया आहे.

राखेसी म्हणती लक्षुमी । दुसरी भारदोरी लक्षुमी । तिसरी नाममात्र लक्षुमी । तैसी माया ॥ ८ ॥

(भारदोरी - मंत्रवलेली दोरी,दोरा)

राखेला लक्ष्मी म्हणतात,दुसरी मंत्राने भारलेली दोरी तिलाही लक्ष्मी म्हणतात,तिसरी एक नावाची लक्ष्मी असते,तशीच माया (ठेवलेल्या राखेला लक्ष्मी म्हणून संबोधणे,गर्भपात न व्हावा म्हणून स्त्रिया भारलेली दोरी-भारदोरी कंबरेला बांधतात तिला लक्ष्मी म्हणणे तिसरी एक नावाची लक्ष्मी जी एका शतदरिद्री पुरुषाची स्त्री असते,तशीच माया)

मुळीं बाळविधवा नारी । तिचें नांव जन्मसावित्री । कुबेर हिंडे घरोघरी । तैसी माया ॥ ९ ॥

अगोदर स्त्री बालविधवा आणि तिचे नाव जन्म सावित्री (तिला जन्म सावित्री म्हणणे) किवा कुबेर आणि घरोघरी भिक मागत हिंडतो (घरोघर भिक्षा मागणाऱ्या पुरुषाला कुबेर ह्या नावाने -हे आडनाव असते हाक मारणे) तशी माया.

दशावतारांतील कृष्णा । उपजे जीर्ण वस्त्रांची तृष्णा । नदी नामें पीयुष्णा । तैसी माया ॥ १० ॥

दशावतारातील कृष्णाचे सोंग घेणा-याला फाटक्यातुटक्या जुन्या वस्त्राची इच्छा असावी किवा पीयुष्णा म्हणजे अमृताची नदी,पण असावे तिच्यात पाणी (दशावतारातील खेळातल्या फाटक्या चिंध्याची भिक्षा मागणाऱ्या पात्राचे नाव कृष्ण किवा कृष्णा किवा द्रौपदी ठेवणे.पाण्याचा थेंब नसणाऱ्या नदीला पीयुष्णा म्ह. अमृत सरिता किवा दुग्धसरिता म्हणणे) तशी माया.

बहुरूपांतील रामदेवराव । ग्रामस्तांपुढे दाखवी हावभाव । कां माहांराज म्हणोनि लाघव ।तैसी माया ॥११॥

( रामदेवराव - शूरराजा)

बहुरूप्याच्या सोंगातील रामदेवराव म्हणजे राजाचे सोंग घेणारा गावक-यांपुढे हावभाव दाखवितो आणि का महाराज म्हणून त्यांना नक्कल करून दाखवितो (अनाधिका-याला महाराज म्हणून हाक मारणे)(ग्रामस्थापुढे

हावभाव दाखविणा-याला पोटबाबू बहुरुप्याला रामदेवरावांचे नाव देणे.पंणक्याला किवा शागीर्दाला महाराज म्हणून संबोधणे **उत्तर हिंदुस्तानातील पद्धत**) तशी माया.

देव्हारां असे अन्नपूर्णा । आणी गृहीं अन्नचि मिळेना । नामें सरस्वती सिकेना । शुभावळु ॥ १२ ॥

(शुभावळु - गोवऱ्या थापणारी)

देव्हा-यात अन्नपूर्णा (मूर्ति) असून घरात अन्न खायला मिळत नाही किवा नाव सरस्वती पण काही येत नाही,गोवऱ्या थापीत असते.(एखाद्या गोवऱ्या थापणा-या शुभावळू बाईला सरस्वती म्हणून पाचारावे) तशी माया.

सुण्यास व्याघ्र नाम ठेविलें । पुत्रास इंद्रनामें पाचारिलें । कुरूप परी आळविलें । सुंदरा ऐसें ॥ १३ ॥

(सुण्यास - कुत्र्यास )

कुत्र्याचे (सुणे-सुण्यास,श्वानास) नाव वाघ्या ठेवावे,मुलाला इंद्र म्हणून हाक मारावी,कुरूप स्त्रीला सुंदरी म्हणावे.

मूर्ख नामें सकळकळा । राशभी नामें कोकिळा । नातरी डोळसेचा डोळा । फुटला जैसा ॥ १४ ॥

मूर्खाला सकलकलावंत म्हणावे,गाढवीचे नाव कोकिळा असावे डोळस नावाच्या स्त्रीचा डोळा फुटका असावा.(अंधेला-डोळस)

मातांगीचें नाम तुळसी । चर्मिकीचें नाम कासी । बोलती अतिशूद्रिणीसी । भागीरथी ऐसें ॥ १५ ॥

मांगिणींचे नाव तुळशी, चांभारणीचे नाव काशी किवा महारिणीचे नाव भागीरथी असावे इ. नावाने हाक मारणे जसे व्यर्थ होय,त्याप्रमाणे मिथ्यामायेला मोठमोठी नावे ठेऊन तिचा बडेजाव गाणे फुकट होय.

साउली आणी अंधकार । येक होतां तेथीचा विचार । उगाचि दिसे भासमात्र । तैसी माया ॥ १६ ॥

सावली व आंधार ही एकत्र आलेली असता जशी सावली उगीच भासमात्र दिसते तशी माया.

श्रवण बोटें संधी करतळ । रविरश्में दिसती इंगळ । रम्य आरक्तकल्होळ । तैसी माया ॥ १७ ॥

(श्रवण बोटें संधी - कानाची पाळी आणि बोटांचा संधी, आरक्तकल्होळ - लालभडक)

कान,बोटे,सांधे,(बोटांचे संधी किवा नखे) किवा तळहात हे सूर्यकिरणांमुळे(सूर्यप्रकाशात) निखा-याप्रमाणे लालभडक व गमतीचे दिसतात तशी माया.

भगवें वस्त्र देखतां मनाला । वाटे अग्नचि लागला । विवंचितां प्रत्ये आला । तैसी माया ॥ १८ ॥

भगवे वस्त्र दुरून पाहून आग लागल्यासारखे दिसते पण विचार केला म्हणजे खरा प्रकार कळून येतो तशी माया.

जळीं चरणकरांगुळें । आखुड लांबें किरकोळें । विपरीत काण दिसती जळें । तैसी माया ॥ १९ ॥

(विपरीत काण - वेडीवाकडी)

पाण्यामध्ये हातापायाची बोटे धरली तर ती पाण्यामुळे आखूड,लांब,बारीक,वाकडी (काण) अशी काही विलक्षण (वाटेल तशी) दिसतात,तशीच माया आहे.

भोवंडीनें पृथ्वी कलथली । कामिणीनें पिवळी जाली । सन्यपातस्थां अनुभवली । तैसी माया ॥ २० ॥

(भोवंडी - भोवळ, कामिणी - काविळ )

भोवळ आली म्हणजे पृथ्वी फिरलीशी वाटते,काविळीमुळे पिवळी झाली असे वाटते (कावीळ झाली की सारे पिवळे दिसते.) सन्निपात ज्वर ज्याला झाला आहे त्याला वाताच्या भ्रमाने अनेक देखावे दिसतात.(सन्निपातज्वर अंगात भरला की सारे गरगर फिरतेसे वाटते) तशी माया.

कोणीयेक पदार्थविकार । उगाचि दिसे भासमात्र । अनन्याचा अन्य प्रकार । तैसी माया ॥ २१ ॥

एखाद्या पदार्थाला विकार झाला म्हणजे उगीच काहीतरी भास दिसतो किंवा एकप्रकार असून दुसरा दिसतो तशीच माया सर्वथा असत्य असून सत्य आहे अशी भासते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे मायानिरूपणनाम समास दहावा ॥॥ दशक चौदावा समाप्त ॥**

# सार्थ श्रीदासबोध दशक पंधरावा - आत्मदशक



### समास पहिला : चातुर्य लक्षण॥ श्रीराम ॥

अस्तिमांशांचीं शरीरें । त्यांत राहिजे जीवेश्वरें । नाना विकारीं विकारे । प्रविण होइजे ॥ १॥

शरीरे ही हाडामासांची असून त्यात जीवेश्वर राहतो आणि तो (मायाविशिष्ट असल्याने) मुळचा विकारी असतोच, म्हणून पुढे अनेक विकारांमध्ये निपुण होतो.(शरीरे ही अस्थिमासाची असून त्यात अनेक जीव राहतात व मनोविकारांनी युक्त होऊन त्यात वावरतात.)

घनवट पोंचट स्वभावें । विवरोन जाणिजे जीवें । व्हावें न व्हावें आघवें । जीव जाणे ॥ २ ॥

घट्ट (स्थूळ) काय आहे व पात्तळ (सूक्ष्म) काय आहे.तसेच पाहिजे कोणते व नको कोणते हे सहजच जिवाला विवरण समजते.(घट्ट-पातळ,स्थूळ-सूक्ष्म हे जीव जाणतो,पाहिजे नको हे त्याला समजते)

येंकीं मागमागों घेणें । येकां न मागतांच देणें । प्रचीतीनें सुलक्षणें । ओळखावीं ॥ ३ ॥

एकाला मागमागून मिळवावे लागते तर दुसऱ्याला न मागता मिळते (ह्याचे कारण त्याच्या ठिकाणी चांगले गुण असतात म्हणून) ह्यासाठी चांगली लक्षणे अनुभवाने ओळखावी.(एकाला भिक्षा मागून मिळते दुसऱ्याला न मागताच लोक मागे लागून देतात सभाग्याची लक्षणे अनुभवाने जाणावी)

जीव जीवांत घालावा । आत्मा आत्म्यांत मिसळावा । राहराहों शोध घ्यावा । परांतरांचा ॥ ४ ॥

( परांतरां - दुसऱ्याचे अंतःकरण)

दुसऱ्याच्या जीवात आपला जीव घालावा,दुसऱ्याच्या आत्म्यात आपला आत्मा मिसळावा (इतके आपण दुसऱ्याच्या सुखदुःखाशी तद्रूप व्हावे) अशा प्रकारे वारंवार दुसऱ्याच्या अंतःकरणात शिरून त्याचे हृदत शोधून पाहावे.वारंवार इतरांचे मनोगत जाणावे.

जानवें हेंवडकारें जालें । ढिलेपणें हेवड आलें । नेमस्तपणें शोभलें । दृष्टीपुढें ॥ ५ ॥

(हेंवडकारें - गुंतागुंत)

जानव्याला बळी पडते ह्याचे कारण ढिलेपणा होय.व्यवस्थितपणाने (सूत काढल्यास) डोळ्याला ते शोभिवंत दिसते.(गबाळपणे वागल्याने गळ्यातल्या जानव्याची गुंतागुंत (हेवडेकारे) होते.व्यवस्थित राहिल्याने ते सुशोभित दिसते.

तैसेंचि हे मनास मन । विवेकें जावें मिळोन । ढिलेपणें अनुमान । होत आहे ॥ ६ ॥

(ढिलेपणें अनुमान - आळसामुळे (हयगय केल्याने) संशय वाढतो.)

त्याचप्रमाणे हे मन दुसऱ्याच्या मनाशी विचाराच्या योगाने मिळवून टाकावे,त्यात ढिलेपणा केल्यास संशय उत्पन्न होतो.(व ऐक्यभाव होत नाही)

अनुमानें अनुमान वाढतो । भिडेनें कार्यभाग नासतो । याकारणें प्रत्यये तो । आधीं पाहावा ॥ ७ ॥

संशयाने संशय वाढतात आणि भिडेमुळे कामाचा बिघाड होतो,ह्यासाठी अनुभव काय तो अगोदर पाहावा (संशयाने संशय वाढतात,ते भिडेमुळे काढून न टाकले तर गैरसमज वाढून कार्याची हानि होते.म्हणून अनुमानाने चालू नये-प्रत्ययाने चालावे)

दुस-याचें जीवीचें कळेना । परांतर तें जाणवेना । वश्य होती लोक नाना । कोण्या प्रकारें ॥ ८ ॥

दुसऱ्याचे मनोगत कळले नाही किवा दुसऱ्याचे अंतःकरण जाणता आले नाही तर पुष्कळ लोकांना कसे अनुकूल करून घेता येईल? (दुसऱ्याच्या मनातले भाव व विचार कळले नाहीत तर लोक कोणत्या प्रकारे वश होतील?)

आकल सांडून परती । लोक वश्यकर्ण करिती । अपूर्णपाणें हळु पडती । ठाईं ठाईं ॥ ९ ॥

(वश्यकर्ण - वशीकरण , हळु पडती - नाद सोडतात.)

(हा वशिकरणाचा मार्ग आहे) पण हे शहाणपण बाजूला टाकून लोक वशीकरणाचे प्रयोग करतात आणि त्यामुळे अर्धवटपणाच्या योगाने जागोजाग स्वतःकडे उणेपणा मात्र घेतात (खालावतात) (विचाराने व अकलेने न चालता जे वशीकरण प्रयोग करतात ते कच्चपणामुळे - मन व्यापक व विशाल नसल्यामुळे- अपूर्णपणे जागोजाग हलके पडतात.)

जगदीश आहे जगदांतरीं । चेटकें करावीं कोणावरी । जो कोणी विवेकें विवरी । तोचि श्रेष्ठ ॥ १० ॥

सर्व जगाच्या अंतःकरणामध्ये जगदीश भरलेला आहे,मग चेटके कोणावर बरे करावयाची? जो कोणी ह्याचे विवरण विचाराने करील तोच श्रेष्ठ होय.(विवेकबळाने पाहील तोच पुरुष श्रेष्ठ होय)

श्रेष्ठ कार्ये करी श्रेष्ठ । कृत्रिम करी तो कनिष्ठ । कर्मानुसार प्राणी नष्ट । अथवा भले ॥ ११ ॥

चांगली चांगली मोठी कार्ये जो कोणी करतो तो श्रेष्ठ होय (श्रेष्ठत्व कर्माने येते.श्रेष्ठ कार्य मनोभावाने करील तो श्रेष्ठ,चुकारपणे करील तो कनिष्ठ) आणि हलकी कामे करतो तो कनिष्ठ होय,अशारीतीने आपापल्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणे प्राणी भले आणि बुरे असतात (कर्माप्रमाणे माणसे भली किवा बुरी समजली जातात.)

राजे जाती राजपंथें । चोर जाती चोरपंथें । वेडें ठके अल्पस्वार्थें । मूर्खपणें ॥ १२ ॥

राजे असतात ते राजमार्गाने जातात ( राजे उजळ माथ्याने रस्त्याने जातात), चोरटे असतात ते चोरवाटेने जातात.(चोरांना चोर वाट शोधाव्या लागतात.) वेडा माणूस शुल्लक स्वार्थाच्या नादी लागून मूर्खपणाने फशी पडतो.(मूर्ख लहान होऊन अल्प स्वार्थ पाहातात व म्हणून फसतात.)

मूर्खास वाटे मी शहाणा । परी तो वेडा दैन्यवाणा । नाना चातुर्याच्या खुणा । चतुर जाणे ॥ १३ ॥

मुर्खाला असे वाटते की मीच काय तो शहाणा पण तो बिचारा वेडा व दीनवाणा असतो,चतुरपणाची लक्षणे चतुरांनाच माहित असतात.

जो जगदांतरे मिळाला । तो जगदांतरचि जाला । अरत्रीं परत्रीं तयाला । काय उणें ॥ १४ ॥

जो जगाच्या अंतःकरणाशी (मनोगताशी) एकरूप झाला, तो सगळ्या जगाचा जीव की प्राण (अंतर,हृदय) होऊन बसतो. ह्यालोकी(अरत्री) किवा परलोकी (परत्री) त्याला काय उणे (कमी) असणार?

बुद्धि देणें भगवंताचें । बुद्धिवीण माणुस काचें । राज्य सांडून फुकाचे । भीक मागे ॥ १५ ॥

(बुद्धिवीण माणुस काचें - निर्बुद्ध माणूस कच्चा असतो.)

पण अशा प्रकारची बुद्धि भगवंताची देणगी आहे (बुद्धि हे देवाचे देणे आहे.) बुद्धिहीन मनुष्य कच्चा (काचे,ढिला) होय,तो असलेले राज्य व्यर्थ गमावून भिक मागू लागतो.

जें जें जेंथें निर्माण जाले । तें तें तयास मानलें । अभिमान देऊन गोविलें । ठाईं ठाईं ॥ १६ ॥

जो जो ज्या ज्या परिस्थितीत उत्पन्न होतो त्याला त्याला ती ती परिस्थिति पसंत असते.आपापल्या परिस्थितीचा अभिमान धरून लोक गुंतुन पडतात. ( जे जे जेथे देवाने उत्पन्न केले आहे ज्याला ज्याला जो जो स्वभाव मिळाला आहे त्याच्या त्याच्याशी बुद्धिमान मनुष्य मिळून जातो व त्या त्या मनुष्याचा स्वाभिमान जागृत करून किंवा त्याचा गौरव करून त्याला उशी देऊन हळू हळू कार्याला लावतो.)

अवघेचि म्हणती आम्ही थोर । अवघेचि म्हणती आम्ही सुंदर । अवघेचि म्हणती आम्ही चतुर । भूमंडळीं ॥ १७ ॥

ह्या जगामध्ये आम्ही थोर,आम्ही सुंदर,आम्ही चतुर असे सगळेच म्हणतात (प्रत्येक जण आपल्याला थोर,सुंदर व चतुर समजत असतो.)

ऐसा विचार आणितां मना ।कोणीच लाहान म्हणवीना । जाणते आणिती अनुमाना । सकळ कांहीं ॥१८॥

हा सगळा विचार मनात आणला तर स्वतःला कोणीच लहान म्हणवून घेत नाही,शहाणे असतात ते मात्र ह्या सगळ्याचा विचार करून ठेवतात (पण जाणते पुरुष सर्व काही-खरा कोण हे समजून जाणतात.)

आपुलाल्या साभिमानें । लोक चालिले अनुमानें । परंतु हें विवेकानें । पाहिलें पाहिजे ॥ १९ ॥

आपापल्या गोष्टीचा लोक अभिमान धारण करून अनुमान धपक्याने काहीतरी चाललेले असतात.पण त्याचा निट विचारपूर्वक शोध घेतला पाहिजे (लोक अभिमानाला वश होऊन अनुमानाने चालतात.पण विवेकाने शहाण्याला पाहावे लागते.)

लटिक्याचा साभिमान घेणें । सत्य आवघेंच सोडणें । मूर्खपणाचीं लक्षणें । ते हे ऐसीं ॥ २० ॥

खोट्याचा अभिमान धरावयाचा,खरे असेल ते सर्व टाकून द्यावयाचे अशी ही मूर्खपणाची लक्षणे असतात (खोट्याचा अभिमान पक्ष घ्यावा व खरे सर्वस्वी टाकावे हे मूर्खपणाचे लक्षण होय.)

सत्याचा जो साभिमान । तो जाणावा निराभिमान । न्याये अन्याये समान । कदापी नव्हे ॥ २१ ॥

सत्याबद्दल जो अभिमान असेल तो अभिमानाच नव्हे हे ध्यानात ठेवावे.न्याय व अन्याय हे दोन्ही सारखेच कधीही होणार नाहीत.(सत्याचा अभिमान किंवा कैवार घेणे हेच खरोखर निराभिमानाचे लक्षण होय. न्याय व अन्याय सारख्याच मापाने जोखू नयेत.

न्याये म्हणिजे तो शाश्वत । अन्याये म्हणिजे तो अशाश्वत । बाष्कळ आणि नेमस्त । येक कैसा ॥२२॥

न्याय हा शाश्वत आहे व अन्याय हा अशाश्वत (काही काळाने उडून जाणारा ) आहे. बाष्कळपणा (नियमरहितपणा) व्यवस्थितपणा (नेमकेपणा) ही एक कशी होतील?

येक उघड भाग्य भोगिती । येक तश्कर पळोन जाती । येकांची प्रगट महंती । येकांची कानकोंडी ॥ २३ ॥

एक राजरोसपणे(उघड) वैभव भोगतात व चोरटे (प्रकाशाला भिऊन) पळून जातात,कोणाची महंती जगाला सिद्ध असते आणि कोणी (दंभादिकांमुळे) कानाकोपऱ्यात असतात (एकाची महंती राजरोसपणे जाहीर असते व एकाची कोपऱ्यात लपलेली सात-पांच शिष्यापुरतीं चोरटी-कानकोंडी असते)

आचारविचारेंविण । जें जें करणें तो तो सीण । धूर्त आणि विचक्षण । तेचि शोधावे ॥ २४ ॥

शुद्ध आचार-विचाराशिवाय जे जे करावे,त्याच्या योगाने त्रास मात्र होतो धूर्त व चतुर असतील त्यांचा शोध घ्यावा (आचार व विचार दोन्ही झळझळीत पाहिजेत,त्यावाचून सारी खटपट होते,म्हणून धूर्त व चतुर कोण ते पाहावेत)

उदंड बाजारी मिळाले । परी ते धूर्तेंचि आळिले । धूर्तांपासीं कांहीं न चले । बाजाऱ्यांचें ॥ २५ ॥

( बाजारी - बाजारबुणगे , आळिले - ओळखतो)

बाजारबुणगे (सामान्य लोक) पुष्कळ निघाले तरी तितक्यांना,धूर्त असतो तो आपल्या ताब्यात ठेवतो, धुर्तांपुढे सामान्य माणसांचे काही चालत नाही.(धूर्त म्ह.दूरदर्शी चतुर पुरुष साऱ्या बाजा-यांना आपल्या काबूत घेतो,त्यापुढे त्यांचे काही चालत नाही.)

याकारणें मुख्य मुख्य । तयांसी करावे सख्य । येणेंकरितां असंख्य । बाजारी मिळती ॥ २६ ॥

ह्यासाठी पुढारी असतील त्यांच्याशी मैत्री करावी तेवढे केले म्हणजे सामान्य लोक हवे तेवढे अनुकूल होतात.

धूर्तासि धूर्तचि आवडे । धूर्त धूर्तीच पवाडे । उगेंचि हिंडती वेडे । कार्येंविण ॥ २७ ॥

धुर्ताला धूर्तच आवडतो,धूर्तच धूर्ताच्या मध्ये मिसळतो.वेडे असतात ते कामावाचून उगाच भटकत असतात (धूर्ताधूर्तांचे सख्य होते,वेडे कार्य सिद्धीचे वर्म न जाणता उगाच भटकत असतात.)

धूर्तासि धूर्तपण कळलें । तेणें मनास मन मिळालें । परी हें गुप्तरूपें केलें । पाहिजे सर्वे ॥ २८ ॥

एका धुर्ताला दुसऱ्याचा धूर्तपणा कळला म्हणजे दोघाचे मन मिळून जाते.पण हे सगळे गुप्तपणे (गाजावाजा न करता) केले पाहिजे.

समर्थाचें राखतां मन । तेथे येती उदंड जन । जन आणि सज्जन । आर्जव करिती ॥ २९ ॥

थोर पुरुषाचे मन सांभाळले तेथे पुष्कळ लोक जमतात.सामान्य लोक व सज्जन सुद्धा त्यांचे आर्जव करू लागतात (म्होरक्या वश केला की त्याचे अनुयायी वश होतात.ह्याप्रमाणे सज्जन व सामान्य जन दोन्ही आपलेसे होतात.)

वोळखीनें वोळखी साधावी । बुद्धीनें बुद्धि बोधावी । नीतिन्यायें वाट रोधावी । पाषांडाची ॥ ३० ॥

एका ओळखीने दुसऱ्याची ओळख करून घ्यावी आपल्या बुद्धीने दुसऱ्याच्या बुद्धीला जागृत करावे.नितिन्यायाच्या योगाने नास्तिकपणाचा मार्ग बंद करावा ( आणि असे अनेक म्होरके म्ह. गुरु किंवा पुढारी व त्यांचे शिष्य किवा अनुयायी एक करून सर्वांच्या एकवट प्रयत्नाने नीतिन्यायाचा पुरस्कार करून पाखंडाला-वेद्शास्त्रविरुद्ध मत समाजात पसरू न देता त्याला अडवावे त्याचा मार्ग खुंटवावा.

वेष धरावा बावळा । अंतरीं असाव्या नाना कळा । सगट लोकांचा जिव्हाळा । मोडूं नये ॥ ३१ ॥

(नाना कळा - बहुश्रुत असावा)

(बाह्य राहणी) वेष बावळट असावा,पण अंतःकरणामध्ये अनेक युक्ति-प्रयुक्ति असाव्यात,सर्व लोकांच्या अंतःकरणातील आपल्या विषयीचा प्रेमतंतु-प्रेमभाव तोडू नये.

निस्पृह आणि नित्य नूतन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । प्रगट जाणतां सज्जन । दुल्लभ जगीं ॥ ३२ ॥

निस्पृह आणि नित्य नव्या ठिकाणी हिंडणारा आणि अनुभवाचे ब्रह्मज्ञान ज्याला झाले आहे,ज्याला सर्व काही स्पष्ट कळत आहे,असा सज्जन जगामध्ये दुर्लभ आहे (स्वतः निस्पृह व निरपेक्ष कार्यकर्ता आणि नित्यनूतन माणसाना वश करून कामाला लावण्यासाठी-हिंडणारा असून त्यापाशी अनुभवाचे ब्रह्मज्ञान पाहिजे सर्व स्पष्ट व नि:संदेह जाणणारा असून सोजन्याची तो मूर्ति असावा-असा पुरुष परम-दुर्लभ होय.

नाना जिनस पाठांतरें निवती सकळांचीं अंतरें । चंचळपणें तदनंतरें । सकळां ठाईं ॥ ३३ ॥

( निवती - शांत , जिनस - शास्त्रे,पुराणे,संतचरित्रे)

ज्याला काव्यातील उत्तम उत्तम वेचे पुष्कळ पाठ असतात की जे ऐकताच सर्वांची मने समाधान पावतात (व लोक वेधले जातात) आणि मग एके ठिकाणी बसून न राहता,तो सर्व ठिकाणी संचार करणारा पाहिजे.

येके ठाईं बैसोन राहिला । तरी मग व्यापचि बुडाला । सावधपणें ज्याला त्याला । भेटि द्यावी ॥ ३४ ॥

तो एके ठिकाणीच बसून राहील तर सगळ्या उद्योगावर पाणी पडेल (मोठा व्याप बंद राहिल) म्हणून निट दक्षता ठेऊन प्रत्येकाची भेट घेतली पाहिजे (सावधपणे ज्याला त्याला भेटी देत फिरले पाहिजे )

भेटभेटों ऊरी राखणें । हे चातुर्याचीं लक्षणें । मनुष्यमात्र उत्तम गुणें । समाधान पावे ॥ ३५ ॥

(ऊरी राखणें - पुन्हा भेटण्याची इच्छा मनात शिल्लक राहणे.)

वारंवार भेटले तरी पुन्हा भेट घेण्याची इच्छा शिल्लक राहील असे करणे हे चातुर्याचे लक्षण आहे (वारंवार भेटून त्याने इतरांची पुन्हा भेटण्याची इच्छा कायम राखली पाहिजे) उत्तम गुणांच्या योगाने कोणाही माणसाला समाधान होते.

**इति श्रीदासबोचे गुरुशिष्यसंवादे चातुर्यलक्षणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : निःस्पृह व्यापलक्षणनाम ॥ श्रीराम ॥**

पृथ्वीमधें मानवी शरीरें । उदंड दाटलीं लाहान थोरें । पालटती मनोविकारें । क्षणाक्षणा ॥ १ ॥

पृथ्वीमध्ये लहानमोठी अशी मनुष्यांची शरीरे पुष्कळ आहेत ती मनोविकारांच्या योगाने क्षणोक्षणी बदलत असतात (ह्या पृथ्वीच्या पाठीवर लहानमोठी कोट्यावधि माणसे आहेत त्यांच्या मनोवृत्ति वारंवार पालटत असतात.)

जितुक्या मूर्ती तितुक्याच प्रकृती । सारिख्या नस्ती आदिअंतीं ॥ नेमचि नाहीं पाहावें किती । काये म्हणोनी ॥ २ ॥

जेवढ्या मूर्ति तेवढ्या प्रकृति (आणि त्या प्रकृतीही सतत एकसारख्या राहात नाहीत,नेहमी पालटत असतात) त्या कोठवर सांगाव्या? मागे पहा अगर पुढे पहा,मनुष्य स्वभाव सारखे नसतात त्यांना धरबंध नाही किती आणि काय काय म्हणून पाहावे?

कित्येक म्लेंच होऊन गेले । कित्येक फिरंगणांत आटले । देशभाषानें रुधिले । कीतीयेक ॥ ३ ॥

( देशभाषानें रुधिले - भाषाभेदाने कित्येकांची अडवणूक झाली, रुधिले = अडकले)

(कित्येक मुसलमानी धर्म स्वीकारून समाजाच्या बाहेर गेले आहेत,कित्येक बाटून पोर्तुगीज मुलखात ख्रिस्ती होऊन गेले आहेत.कित्येक भिन्न भिन्न देशभाषांनी निरनिराळ्या प्रांतात (कर्नाटक,गुजरात,बंगाल इ.) अडकून पडले आहेत (सर्व भारतीयांची भाषा एक नसल्यामुळे सर्वांची संघटनात्मक शक्ति एकवटून कार्य करायला अडचण झाली आहे ह्या सर्व अडचणीमुळे कार्य क्षेत्र संकुचित झाले आहे.)कोणी मुसलमान कोणी बाटून फिरंगी आणि प्रांताप्रांताच्या भाषा भिन्नत्वामुळे एकमेकाचे मनोगत कळण्यास अडचण पडते.

मऱ्हाष्टदेश थोडा उरला । राजकारनें लोक रुधिला । अवकाश नाहीं जेवायाला । उदंड कामें ॥ ४ ॥

महाराष्ट्र देश अगोदर थोडा उरलेला त्यात अनेक लोक राजकारणात गुंतून पडलेले आहेत,त्यांच्या मागे कामाची इतकी गर्दी आहे की जेवायला फुरसत नाही.

कित्येक युद्धप्रसंगी गुंतले । तेणें गुणें उन्मत्त जाले । रात्रंदिवस करूं लागले । युद्धचर्चा ॥ ५ ॥

कित्येक लढाइच्या धंद्यात पडलेले असल्यामुळे उत्मत होऊन रात्रंदिवस लढाइचीच चर्चा करू लागले आहेत (कित्येक युद्धसंग्रामात गुंतले असून लढाईच्या गोष्टीशिवाय त्यांना काही सुचत नाही.)

उदिम्यास व्यासंग लागला । अवकाश नाहींसा जाला । अवघा पोटधंदाच लागला । निरंतर ॥ ६ ॥

(उदिम्यास) व्यापाऱ्यांच्या मागे त्याचा उद्योग लागला असून त्यांना फुरसत नाहीशी झाली आहे,नित्य पोटाचा धंदा मागे लागला आहे (व्यापार धंद्याचे लोक आपल्या पोटाच्या पाठीमागे लागले आहेत)

शडदर्शनें नाना मतें । पाषांडें वाढली बहुतें । पृथिवीमधें जेथ तेथें । उपदेसिती ॥ ७ ॥

(सांख्य,योग,न्याय,वैशेषिक,मीमांसा,वेदांत ही) षडदर्शने तशीच अनेक प्रकारची मते व ह्याशिवाय कित्येक पाखांडे पृथ्वीवर वाढली असून त्यांचाच जगामध्ये जिकडे तिकडे उपदेश चालला आहे (जिकडे तिकडे उपदेशाचे काम चालू आहे.)

स्मार्थी आणि वैष्णवी । उरलीं सुरलीं नेलीं आघवी । ऐसी पाहातां गथागोवी । उदंड जाली ‖ ८ ‖

ह्यातूनही जे लोक उरले त्यांना स्मार्त आणि वैष्णव ह्या दोन पंथांनी मिळून गुंडाळून घेतले आहे,अशा प्रकारे (गोवी) पुष्कळच गोंधळ उडाला आहे.(सर्वत्र गोंधळ माजला आहे.)

कित्येक कामनेचे भक्त । ठाइं ठाइं जालें आसक्त । युक्त अथवा अयुक्त । पाहातो कोण ‖ ९ ‖

कित्येक कामनिक भक्त (आपल्या कामना पूर्ण होतात त्या ठिकाणी) जागोजाग आसक्त झाले आहेत.योग्य किवा अयोग्य ह्याचा विचार करतो कोण? कित्येक कामना धरून केवळ सकाम व्रते आचरीत आहेत,यथायोग्य तारतम्य पाहतो कोण?

या गल्बल्यामधें गल्बला । कोणीं कोणीं वाढविला । त्यास देखों सकेनासा जाला । वैदिक लोक ‖ १० ‖

ह्या मतामतांतराच्या गलबल्यामध्ये,आणखी कोणी आपापली (भागवत सांप्रदायिक) मते वाढविण्याचा प्रयत्न केला पण वैदिक लोकांना हे खपेना (त्याच्याशी वैदिक लोकांचा झगडा चालला आहे,त्यात आणि कित्येक हरिकीर्तनात मग्न झाले आहेत.)

त्याहिमधें हरिकीर्तन । तेथें वोढले कित्येक जन । प्रत्ययाचें ब्रह्मज्ञान । कोण पाहे ‖ ११ ‖

त्यातही हरिकीर्तन निघाले,तिकडे कित्येक लोक वळले इतक्या गलबल्यात अनुभवाचे ब्रह्मज्ञान पाहतो कोण?

या कारणें ज्ञान दुल्लभ । पुण्यें घडे अलभ्य लाभ । विचारवंतां सुल्लभ । सकळ कांहीं ‖ १२ ‖

ह्यास्तव (ब्रहम) ज्ञान अत्यंत दुर्लभ झाले आहे.त्याचा अलभ्य लाभ पदरी पुण्याई असेल तरच घडेल ,पण विचारी पुरुषाला सर्व काही सुलभ आहे (थोर पुण्याशिवाय ज्ञानाकडे कोणी पहात नाही विचार करणाऱ्याला सर्व काही सुलभ आहे.)

विचार कळला सांगतां नये । उदंड येती अंतराये । उपाय योजितां अपाये । आडवे येती ‖ १३ ‖

(अंतराये - अडीअडचणी)

विचार कळला (अनुभव आला) तरी तो सांगता येत नाही,पुष्कळ (अंतराय) विघ्ने आडवी येतात.उपाय म्हणून करायला जावे तो अपाय होऊन अडचणी येतात.

त्याहिमधें तो तिक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण । धूर्त तार्किक विचक्षण । सकळां माने ‖ १४ ‖

(प्रत्ययाचे ब्रह्मज्ञान ज्याला आहे असा पुरुष कसा वागतो ते सांगतो) त्यातही तीव्र बुद्धीचा (ब्रह्ज्ञानी) जो असतो तो एक क्षणही फुकट दवडीत नाही,धूर्त तर्कशुद्ध व चतुरपणाने वागल्यामुळे जो सर्वांना मान्य होतो.

नाना जिनस उदंड पाठ । वदों लागला घडघडाट । अव्हाटचि केली वाट । सामर्थ्यबळें ॥ १५ ॥

अनेक प्रकारची वचने (जिनस) घडाघड म्हणून दाखवून आपल्या सामर्थ्याने,बळाने (प्रबोधशक्तीने) आडवाटा (अव्हाट) बंद करून सरळ मार्ग दाखवतो (मार्ग घालून देतो)

प्रबोधशक्तीचीं अनंत द्वारें । जाणें सकळांची अंतरें । निरूपणें तदनंतरें । चटक लागे ॥ १६ ॥

सर्वांची अंतःकरणे तसेच दुसऱ्याच्या ठिकाणी उपदेश बिबवण्याच्या खुब्या,त्याला माहित असतात आणि त्याशिवाय निरुपणाच्या योगाने तो चटक लाऊन सोडतो.

मतें मतांतरें सगट । प्रत्यये बोलोन करी सपाट । दंडक सांडून नीट । वेधी जना ॥ १७ ॥

अनेक मते व मतभेद ही सगळी (सगट) आपल्या अनुभविक भाषणाच्या योगाने पार मोडून टाकतो आणि लोकांना वेध लागून त्यांना रूढ (अज्ञान) मार्गावरून आपल्या प्रबोधशक्तीने (आडवाटा बंद करून) सरळ मार्गावर आणतो.

नेमकें भेदकें वचनें । अखंड पाहे प्रसंगमानें । उदास वृत्तिच्या गुमानें । उठोन जातो ॥ १८ ॥

नित्य प्रसंगमान पाहून,प्रसंगाला योग्य असे मार्मिक भाषण करून व लोकांचा वेध लावून उदास वृत्तीच्या डौलात (गुमाने) उठून निघून जातो.

प्रत्यये बोलोन उठोन गेला । चटक लागली लोकांला । नाना मार्ग सांडून त्याला । शरण येती ॥ १९ ॥

अनुभवाचे (खुण पटेलसे) बोलून उठून गेला म्हणजे लोकांना त्याची चटक लागून राहते.दुसरे अनेक मार्ग सोडून लोक त्यालाच शरण येतात.

परी तो कोठें आडळेना । कोणे स्थळीं सांपडेना । वेष पाहातां हीन दीना । सारिखा दिसे ॥ २० ॥

(ज्याला लोक धुंडतात) पण तो कोठे आढळत नाही,कोणत्याच जागी सापडत नाही (तो एका स्थळी राहात नाही.),वेष पाहायला गेले तर दीनदुबळ्यासारखा दिसतो (वेश पाहाल तर तो ही धड नाही)

उदंड करी गुप्तरूपें । भिका-यासारिखा स्वरूपें । तेथें येशकीर्तिप्रतापें । सीमा सांडिली ॥ २१ ॥

गुप्तरूपाने राहून अनेक (मोठमोठाली) कामे करतो पण बाह्यस्वरूप पाहिले तर भिकाऱ्यासारखे असते.(पण वेष बावळा व दरिद्री) त्याच्या ठिकाणी यश,किर्ती व प्रताप ही अमर्याद वाढलेली असतात (अशा पुरुषांला यश कीर्ति व प्रताप शोधीत येतात.)

ठाइं ठाइं भजन लावी । आपण तेथून चुकावी । मछरमतांची गोवी । लागोंच नेदी ॥ २२ ॥

जागोजाग भजनाला लावतो व आपण तेथून निसटतो.मत्सर व मतामतांचा गलबला ह्याचा संपर्क आपल्याकडे येऊ देत नाही (आपण त्यांच्या उपाधीत अडकून पडत नाही व ह्यामुळे कोणाचा मत्सर हेवादावा ह्याचपासून तो मुक्त असतो.)

खनाळामधें जाऊन राहे । तेथें कोणीच न पाहे । सर्वत्रांची चिंता वाहे । सर्वकाळ ॥ २३ ॥

(खनाळ - गुहेत)

अशा दुर्गम स्थळात (दऱ्याखोऱ्यात,खनाळी) कोठेतरी जाऊन राहतो की त्या ठिकाणी त्याला पाहावयास कोणीच येत नाही पण हा मात्र सर्व काळ सर्व लोकांची काळजी वाहत असतो.

अवघड स्थळीं कठीण लोक । तेथें राहणें नेमक । सृष्टीमधें सकळ लोक । धुंडीत येती ॥ २४ ॥

बिकट स्थळी व आडदांड लोकांमध्ये बहुत करून त्याचे राहाणे असावयाचे,त्याठिकाणी जगातले सारे लोक त्याला धुंडीत येतात.(लोकांना जाण्यायेण्याला कठिण अशा अवघड स्थळी तो राहतो व अशा पुरुषावाचून आपला उध्दार कारायला कोणीही समर्थ नाही असा स्वसामर्थ्याचा चटका लोकांना लावल्यामुळे लोक त्याला धुंडीत जातात )

तेथें कोणाचें चालेना । अनुमात्र अनुमानेना । कट्ट घालीन राजकारणा । लोक लावी ॥ २५ ॥

(कट्ट - एकोपा/ एकमत, कट्ट - कट्टी,अमैत्री)

त्याच्यापुढे कोणाचे काही चालवायचे नाही,त्याचे कोणाला काहीच अनुमान नाही.तो एकोपा करून लोकांना राजकारणाकडे लावतो (तो ऐक्य करून-कट्ट-घालून लोकांना राजकारणाला लावतो)

लोकीं लोक वाढविले । तेणें अमर्याद जाले । भूमंडळीं सत्त चाले । गुप्तरूपें ॥ २६ ॥

माणसाने माणूस वाढल्यामुळे त्याच्या शिष्यांची संख्या अमर्याद वाढते व तिच्या व्दाराने त्याची सत्ता गुप्तपणाने सर्व जगभर चालते.(शिष्याने शिष्य असा अफाट समुदाय वाढवितो व गुप्तपणाने त्याची सत्ता उदंड चालते.)

ठाइं ठाइं उदंड ताबे । मनुष्यमात्र तितुकें झोंबे । चहुंकडे उदंड लांबे । परमार्थबुद्धी ॥ २७ ॥

(ताबे - समुदाय, लांबे - दूरवर)

जागोजाग त्याचा शिष्य समुदाय पुष्कळ असतो (त्याची मंडळे पसरलेली असतात) सारी माणसे त्याच्या मार्गाकडे वेधून येतात आणि चोहोकडे परमार्थबुद्धि खूप फैलावते जाते.

उपासनेचा गजर । स्थळोस्थळी थोर थोर । प्रत्ययानें प्राणीमात्र । सोडविले ॥ २८ ॥

जागोजाग लोकांकडून तो उपासनेचा गजर करवितो,अनुभवाच्या मार्गाने सर्व लोकांना अनेक बंधनापासून मोकळे करतो. (प्रत्ययाच्या ज्ञानबळावर लोकांना विविध बंधापासून मुक्त करतो.)

ऐसे कैवाडे उदंड जाणे । तेणें लोक होती शाहाणे । जेथें जेथें प्रत्यये बाणे । प्राणीमात्रासी ॥ २९ ॥

(कैवाडे - युक्त्या)

अशाप्रकारच्या युक्ति प्रयुक्ति (कैवाड,अनेक प्रकार ) त्याला माहीत असतात.त्याच्या योगाने अनेक लोक शहाणे होतात,आणि प्राणिमात्रास पदोपदी अनुभव बाणतो.(असे अनेक प्रकार करून,लोकांना तो शाहाणे करितो)

ऐसी कीर्ति करून जावें । तरीच संसारास यावें । दास म्हणे हें स्वभावें । संकेतें बोलिलें ॥ ३० ॥

अशी कीर्ती करून जावे तरच संसाराला आल्याचे सार्थक,(ह्या कित्याप्रमाणे वागून उदंड कीर्ती करून जावे तरच जन्म घेतल्याचे सार्थक) दास म्हणतात,हे ओघानुसार संक्षेपाने सांगितले आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निस्पृहव्यापनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : श्रेष्ठ अंतरात्मा॥ श्रीराम ॥**

मुळापासून सैरावैरा । अवघा पंचीकर्ण पसारा । त्यांत साक्षत्वाचा दोरा । तोहि तत्त्वरूप ॥ १ ॥

( पंचीकर्ण - पंचीकृत पांचभौतिक, साक्षत्वाचा दोरा तोहि तत्त्वरूप - जाणीवेचा तंतू,तोही कूटस्थ आहे. )

मूळमायेपासून सगळा पंचीकरणाचा (पंचमहाभूताचा) पसारा पसरलेला असून त्यात असणारा साक्षित्वाचा (जाणीवेचा) तंतूही तत्वरूप म्हणजे पंचमहाभूतात्मकच आहे.(मूळमायेपासून सर्व पंचभूतांचा कर्दम होऊन हा जो पिंडब्रह्मांडात्मक विविध पसारा,अवास्तव पसरलेले आहे.त्यात-अंतरात्मा-साक्षित्वाचा जो ओतप्रत दोरा भरलेला आहे तोही तत्वरूपच आहे.)

दुरस्त्या दाटल्या फौजा । उंच सिंहासनीं राजा । याचा विचार समजा । अंतर्यामी ॥ २ ॥

रस्त्याच्या दोन्ही बाजूंना फौजा खेटून उभ्या राहिल्या असून मध्यभागी उंच सिहासनावर राजा असावा (त्याचप्रमाणे पंचभूतात्मक जगद्रुपी फौजेचा पसारा भोवताली असून त्यात साक्षी राजासारखा आहे.

देहमात्र अस्तिमांशांचें । तैसेंचि जाणावें नृपतीचें । मूळापासून सृष्टीचें । तत्वरूप ॥ ३ ॥

सैन्यातील प्रत्येकाचा देह हाडामासाचा असतो. त्याप्रमाणे राजाचाही देह हाडामासाचा असतो.तव्दत मूळमायेपासून सगळ्या सृष्टीचा (साक्षीसह) पसारा सगळा तत्वरूपच (पंचभूतात्मक) आहे (सारेच देह अस्थिमासाचे आहेत,राजाचा देह तसाच,त्याप्रमाणे भूतभौतिक सृष्टी व तिचा साक्षी जाणीवरूप अंतरात्मा हे दोन्ही तत्वरूप आहेत)

रायाचे सत्तेनें चालतें । परंतु अवघीं पंचभूतें । मुळीं आधिक जाणिवेचे तें । अधिष्ठान आहे ॥ ४ ॥

सत्ता राजाची (साक्षीची) चालत असली तरी सगळे सैन्य व राजा (जग व साक्षी) ही पंचभूतात्मक आहेत.(राजाच्या सत्तेने फौज चालते किवा अंतरात्म्याच्या सत्तेने सृष्टि चालते. पण हे सारे तत्वातील आहेत त्यात भेद फक्त जाणीवेचा आहे.)

विवेके बहुत पैसावले । म्हणौन अवतारी बोलिले । मनु चक्रवती जाले । येणेंचि न्यायें ॥ ५ ॥

(विवेके बहुत पैसावले - ज्ञानाने / जाणीवेने खूप व्यापक आहे.)

ज्याच्यात अधिक जाणीव तो सत्तेचे अधिष्ठान (राजा,साक्षी) होतो. विचाराने (ज्ञान किवा जाणीव ह्यायोगे) फार वाढले म्हणून त्यांना अवतारी म्हणतात,ह्याच न्यायाने मनू व चक्रवर्ती राजे होऊन गेले.

जेथें उदंड जाणीव । तेचि तितुके सदेव । थोडे जाणिवेने नर्देव । होती लोक ॥ ६ ॥

( नर्देव - करंटे)

ज्याच्या ठिकाणी जितकी जितकी जाणीव अधिक तितके तितके ते भाग्यशाली अधिक होतात.जाणीव कमी असल्यास लोक करंटे होतात.(जाणीव अधिक म्हणून भाग्यवंत,जाणीव कमी म्हणून करंटे)

व्याप आटोप करिती । धके चपेटे सोसिती । तेणें प्राणी सदेव होती । देखतदेखतां ॥ ७ ॥

उद्योग,साहस (आटोप) करितात,टक्केटोणपे सोसतात.हे प्राणी हां हां म्हणता (स-देव) भाग्यास चढतात (हे आपण पाहतो)

ऐसें हें आतां वर्ततें । मुर्ख लोकांस कळेना तें । विवेकीं मनुष्य समजतें । सकळ कांहीं ॥ ८ ॥

सद्ध्याही असेच चाललेले आहे.पण मूर्खांना ते समजत नाही,विचारी मनुष्याला,सर्व काही कळते (विवेकी उमजतात.)

थोर लाहान बुद्धीपासी । सगट कळेना लोकांसी । आधीं उपजलें तयासी । थोर म्हणती ॥ ९ ॥

मोठेपणा व लहानपणा हा सर्व बुद्धीपाशी आहे.पण सर्व लोकांना कळत नाही,अगोदर जन्मला असेल त्याला लोक थोर म्हणतात.(हा लौकिकी प्रक्रार)

वयें धाकुटा नृपती । वृद्ध तयास नमस्कार करिती । विचित्र विवेकाची गती । कळली पाहिजे ॥ १० ॥

राजा वयाने लहान असला तरी मोठमोठे म्हातारे लोक त्याला नमस्कार करतात.असा हा विवेकाचा मार्ग विचित्र आहे तो समजला पाहिजे.

सामान्य लोकांचे ज्ञान । तो अवघाच अनुमान । दीक्षादंडकाचें लक्षण । येणेंचि पाडें ॥ ११ ॥

( दीक्षादंडक - रूढी)

सामान्य लोकांचे ज्ञान सगळे अनुमानाचे (संशयाचे) असते.(दीक्षा) संप्रदाय किवा दंडक (लोकरूढी) अशाच प्रकारची असते.

नव्हें कोणास म्हणावें । सामान्यास काये ठावें । कोणकोणास म्हणावें । किती म्हणोनी ॥ १२ ॥

पण हे असे नव्हे म्हणून तरी कोणाला म्हणावे?सामान्य लोकांस काय समजणार? आणि सांगावयाचे झाले तरी कोणाकोणाला व किती म्हणून सांगावे.?

धाकुटा भाग्यास चढला । तरी तुछ्य करिती तयाला । याकारणें सलगीच्या लोकांला । दूरी धरावें ॥ १३ ॥

(वयाने वृद्ध तो श्रेष्ठ असल्या सामान्यांच्या समजुतीस काय म्हणावे? कोणाची तोंडे धरावीत?) वयाने धाकटा मनुष्य भाग्याला चढला तर लोक त्याला तृच्छ मानतात,ह्यासाठी अशा सलगीच्या लोकांना दूर करावे.

नेमस्त कळेना वचन । नेमस्त नये राजकारण । उगेचि धरिती थोरपण । मूर्खपणें ॥ १४ ॥

एकही वचन धड कळत नाही व राजकारणही व्यवस्थित करता येत नाही. आणि मूर्खपणाने उगीच थोरपणा मिरवतात.(व्यवस्थितपणा व शिस्तवचन परिपालनात किंवा राजकारणात किंवा कशातही माहित नसून कित्येक मूर्खपणाने स्वतःस थोर समजतात.)

नेमस्त कांहींच कळेना । नेमस्त कोणीच मानीना । आधी उपजलें त्या थोरपणा । कोण पुसे ॥ १५ ॥

धड काही कळत नाही,धड कोणी मानत नाही,नुसत्या अगोदर जन्मास आलेल्या वडीलपणास कोण विचारतो?(केवळ आधी जन्मले एवढ्यावर थोरपण कोण द्यायला बसले आहे?)

वडिलां वडिलपण नाहीं । धाकुट्यां धाकुटपण नाहीं । ऐसे बोलती त्यांस नाहीं । शाहाणपण ॥ १६ ॥

आता वडिलांना वडिलपण उरले नाही व धाकट्याचा धाकटेपणा राहिला नाही असे म्हणून (जो वयोवृद्ध मनुष्य वयाने धाकट्या अशा ज्ञानवान माणसाचा अपमान करील ) त्याला शहाणपण नाही असे समजावे.

गुणेविण वडिलपण । हें तों आवघेंच अप्रमाण । त्याची प्रचित प्रमाण । थोरपणीं ॥ १७ ॥

गुणाशिवाय नुसता वयाचा वडीलपणा व्यर्थ होय ह्याचा अनुभव थोरपणी पटतो.

तथापि वडिलांस मानावें । वडिलें वडिलपण जाणावें । नेणतां पुढें कष्टावें । थोरपणीं ॥ १८ ॥

तथापि धाकट्याने वडिलांना मान द्यावा आणि वडिलांनीही खरे वडिलपण कशात आहे हे समजून घ्यावे (वडिलांनी खरे वडिलपण वयात नसून ज्ञानात आहे हे जाणावे) नाहीतर पोकळ थोरपणामुळे त्यांना पुढे कष्ट भोगावे लागतात (वृद्धपणी त्यांना दु:ख भोगावे लागेल)

तस्मात वडिल अंतरात्मा । जेथें चेतला तेथें महिमा । हें तों प्रगटचि आहे आम्हा । शब्द नाहीं ॥ १९ ॥

(चेतला - प्रकट झाला.)

(म्हणून सर्वात वडिल असा अंतरात्मा ज्या ठिकाणी प्रकट झाला तेथे मोठेपण आहे हे उघड आहे,हे उघड असल्यामुळे आम्ही वर जे म्हंटले त्याबद्दल आमच्याकडे दोष येऊ शकणार नाही ) तात्पर्य खरा वडील हा अंतरात्मा आहे तो जेथे जागृत झाला.तेथील महात्म्य वाढत जाते हे प्रकटच आहे ,ह्यात आमचेकडे शब्द नाही.

याकारणें कोणीयेकें । शाहाणपण सिकावें विवेकें । विवेक न सिकतां तुकें । तुटोन जाती ॥ २० ॥

( तुकें - महत्व,लोकांतील वजन,मर्यादा)

ह्यासाठी कोणीही झाले तरी विचाराने शहाणपण शिकावे (न शिकल्यास महत्व टिकणार नाही) विवेक करायला शिकले नाही तर वजन नाहीसे होईल.

तुक तुटलें म्हणिजे गेलें । जन्मा येऊन काये केलें । बळेंचि सांदीस घातलें । आपणासी ॥ २१ ॥

वजन(तुक)नाहीसे झाले म्हणजे सारेच आटोपले,मग जन्मास आल्याचा उपयोग काय? आपल्याला मुद्दामहून सांदीकोपऱ्यात घातल्यासारखे होईल (महत्व घालवले तर जन्मास येऊन मिळवले काय? आपणास बळेच कोपऱ्यात घालणे शहाणपणाचे आहे काय?

सगट बायेका सिव्या देती । सांदीस पडिला ऐसें म्हणती । मूर्खपणाची प्राप्ती । ठाकून आली ॥ २२ ॥

(सांदीस - तुछ्य,अडगळीत)

साऱ्या (सगट) बायकाही त्याला शिव्या देऊ लागतील,कोपऱ्यात पडला असे म्हणतील.अशा रीतीने मूर्खपणा चालून पदरात येतो.

ऐसें कोणीयेकें न करावें । सर्व सार्थकचि करावें । कळेना तरी विवरावें । ग्रंथांतरीं ॥ २३ ॥

(म्हणून असे न करिता मुख्य शहाणपण ते शिकावे म्हणजे सार्थक होते.) असे कोणीही करू नये,सारे वय सार्थकी लावावे,हे नीट कळत नसेल तर (ग्रंथात पाहावे),ग्रंथ पाहून त्याचा विचार करावा.

शाहाण्यास कोणीतरी बाहाती ।मुर्खास लोक दवडून देती ।जीवास आवडे संपत्ति। तरी शाहाणें व्हावें ॥२४॥

(बाहाती - मानाने बोलवितात; जीवास आवडे संपत्ति - जीवास (संपत्ती) मोठेपणा आवडतो.)

शहाणा असेल तर त्याला कोणी सत्काराने जवळ बोलावतात (वाहती) आणि मूर्ख जवळ असला तरी त्याला दूर हाकून देतात.जीवास संपत्ति आवडत असेल तर शहाणपण शिकावे (ज्याला भाग्य पाहिजे असेल त्याने शहाणपण शिकावे )

आहो या शाहाणपणाकारणें । बहुतांचे कष्ट करणें । परंतु शाहाणपण शिकणें । हें उत्तमोत्तम ॥ २५ ॥

अहो! ह्या शहाणपणासाठी (शहाणपण शिकण्यासाठी) अनेकांची सेवाचाकरी करण्याचे कष्ट पडले तरी हरकत नाही,पण शहाणपण शिकणे हे उत्तमोत्तम आहे.

जों बहुतांस मानला । तो जाणावा शाहाणा जाला । जनीं शाहाण्या मनुष्याला । काये उणें ॥ २६ ॥

जो अनेक जणांना मान्य झाला,तो शहाणा झाला असे समजावे.शहाण्या मनुष्याला ह्या जगांत काय कमी आहे?

आपलें हित न करी लोकिकीं । तो जाणावा आत्मघातकी । या मुर्खायेवढा पातकी । आणिक नाहीं ॥२७॥

लौकिकात राहून जो आपले हित करून घेत नाही (जो स्वहित साधीत नाही) तो आत्मघातकी समजावा.त्या मुर्खाएवढा पातकी कोणी नाही.

आपण संसारीं कष्टतो । लोकांकरवी रागेजोन घेतो । जनामध्यें शाहाणा तो । ऐसें न करी ॥ २८ ॥

आपण संसारात कष्ट भोगतो आणि लोकांकडून हिडीस फिडीस करून घेतो.लोकांत जो शहाणा असतो तो असे करीत नाही (स्वतः संसारात क्लेश भोगावे आणि लोकांनी वर मूर्ख समजून रागवावे-असे शहाणा कधी वागायचा नाही.)

साधकां सिकविलें स्वभावें । मानेल तरी सुखें घ्यावें । मानेना तरी सांडावें । येकिकडे ॥ २९ ॥

हे साधकांना ओघानुसार शिकवले आहे,पटत असेल तर त्यांनी आनंदाने घ्यावे व न पटेल तर एका बाजूला ठेऊन द्यावे (सोडावे ह्यात आमचे काही जात नाही)

तुम्ही श्रोते परम दक्ष । अलक्षास लावितां लक्ष । हें तों सामान्य प्रत्यक्ष । जाणतसा ॥ ३० ॥

तुम्ही श्रोते फार चतुर आहात अलक्ष्य अशा परब्रह्माकडे तुम्ही लक्ष लावता,व ही तर सामान्य गोष्ट तुम्हाला उघड कळत आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे श्रेष्ठ अंतरात्मानिरूपणनाम समास तिसरा ॥**

**समास चौथा : शाश्वतब्रह्मनिरूपण॥ श्रीराम ॥**

पृथ्वीपासून जालीं झाडें । झाडापासून होती लांकडें । लांकडें भस्मोन पुढें । पृथ्वीच होये ॥ १ ॥

पृथ्वीपासून झाडे व झाडापासून लाकडे होतात आणि लाकडे जळून राख होऊन पुन्हा पृथ्वीच बनतात.

पृथ्वीपासून वेल होती । नाना जिनस फापावती । वाळोन कुजोन मागुती । पृथ्वीच होये ॥ २ ॥

( फापावती - विस्तार पावती)

पृथ्वीपासून वेल होऊन वाढतात,त्यांची पाने फुले वैगेरे पसरतात,नंतर ते सारे वाळून कुजून जाऊन पुन्हा पृथ्वीच बनते.

नाना धान्यांचीं नाना अन्नें । मनुष्यें करिती भोजनें । नाना विष्ठा नाना वमनें । पृथ्वीच होये ॥ ३ ॥

अनेक प्रकारच्या धान्याची अनेक अन्ने तयार करून मनुष्ये खातात त्यांचीही अनेक प्रकारची विष्ठा व वमने होऊन पुन्हा पृथ्वीच बनते.

नाना पक्षादिकीं भक्षिलें । तरी पुढें तैसेंचि जालें । वाळोन भस्म होऊन गेलें । पुन्हा पृथ्वी ॥ ४ ॥

अनेक पाखरादिकांनी जरी भक्ष्य खाल्ल्ले तरी त्यांचेही पुढे तसेच होते.वाळून भस्म होऊन पुन्हा पृथ्वीच होते.

मनुष्यें मरतांच ऐका । क्रिमि भस्म कां मृत्तिका । ऐशा काया पडती अनेका । पुढें पृथ्वी ॥ ५ ॥

आणखी ऐका माणसे मरतात,त्यांच्या देहाचे किडे,भस्म किवा माती अशी अनेक रूपे होतात.असे अनेक देह होऊन त्यांची पृथ्वीच होते.

नाना तृणे पदार्थ कुजती । पुढें त्याची होये माती । नाना किडे मरोन जाती । पुढें पृथ्वी ॥ ६ ॥

गवते वगैरे अनेक पदार्थ कुजून जातात किवा किडे मरतात,त्या साऱ्यांची पुन्हा पृथ्वीच होते.

पदर्थ दाटले अपार । किति सांगावा विस्तार । पृथ्वीवांचून थार । कोणास आहे ॥ ७ ॥

असंख्य पदार्थ भरलेले आहेत, त्यांचा विस्तार किती म्हणून सांगावा? त्या सर्वांना पृथ्वीशिवाय आधार कोणता आहे?(सर्व पृथ्वीपासून झालेले पदार्थ पुन्हा पृथ्वीपणालाच पावतात,पृथ्वीवाचून आधार कोणता आहे?)

झाड पाले आणि तृण । पशु भक्षितां होतें सेण । खात मूत भस्म मिळोन । पुन्हा पृथ्वी ॥ ८ ॥

( खात मूत भस्म - खातोरा मूत्र राख)

पशु झाडपाला गवत ही खातात व त्यांचे शेण,खत,मूत इ. सर्व भस्म होऊन त्याची पृथ्वीच होते.

उत्पत्तिस्थितिसंव्हारतें । तें तें पृथ्वीस मिळोन जातें । जितुकें होतें आणि जातें । पुन्हा पृथ्वी ॥ ९ ॥

ज्याला ज्याला उत्पत्ति,स्थिति व संहार आहे ते ते पृथ्वीला मिळून जाते,जे जे होते व नाश पावते त्याची पुन्हा पृथ्वी बनते.

नाना बीजांचिया रासी । विरढोने लागती गगनासी । पुढें सेवटीं पृथ्वीसी । मिळोन जाती ॥ १० ॥

( विरढोने - वाढून,विरुढणे=अंकुर येणे )

अनेक बिजांच्या राशीचे अंकुर फुटून गगनचुंबित वृक्ष होतात.पण शेवटी पृथ्वीलाच मिळून जातात.

लोक नाना धातु पुरिती । बहुतां दिवसां होये माती । सुवर्णपाषाणाची गती । तैसीच आहे ॥ ११ ॥

लोक अनेक धातु पुरून ठेवतात,पुष्कळ दिवसांनी त्यांची माती होते सोने किवा पाषाण ह्यांची अवस्था तीच होते.

मातीचें होते सुवर्ण । आणी मृत्तिकेचे होती पाषाण । माहा अग्निसंगें भस्मोन । पृथ्वीच होये ॥ १२ ॥

सोने व दगड हे मातीचेच होतात,तीव्र अग्नीच्या योगाने त्यांचे भस्म होऊन त्यांची मातीच होते.

सुवर्णाचें जर होतें । जर सेवटीं कुजोन जातें । रस होऊन वितुळतें । पुन्हा पृथ्वी ॥ १३ ॥

(जर/रज = कण,तंतू )

सोन्याचा ज्वर होतो तो शेवटी कुजून जातो किवा त्याचा रस होऊन (ते) वितळते व त्याची पृथ्वी होते.

पृथ्वीपासून धातु निपजती । अग्निसंगें रस होती । तया रसाची होये जगती । कठीणरूपें ॥ १४ ॥

( अग्निसंगें रस होती - आधी भस्म होते नंतर त्याचे रस केले)

पृथ्वीपासून धातु उत्पन्न होतात व अग्नीच्या योगाने त्यांचा रस होतो तो रस घट्ट झाला म्हणजे पृथ्वीच होते.)

नाना जळासी गंधी सुटे । तेथें पृथ्वीचें रूप प्रगटे । देवसेंदिवस जळ आटे । पुढें पृथ्वी ॥ १५ ॥

अनेक प्रकारच्या पाण्याला दुर्गंध येऊ लागतो हेच त्या ठिकाणी पृथ्वी उत्पन्न होण्याचे कारण होय.पुढे ते पाणी हळुहळू आटून जाऊन पृथ्वीच होते.(उदकाचा गंध हे पृथ्वीचेच रूप आहे, जळ आटून पृथ्वीरूप होते.)

पत्रें पुष्पें फळें येती । नाना जीव खाऊन जाती । ते जीव मरतां जगती । नेमस्त होये ॥ १६ ॥

(नेमस्त होये - निश्चित आहे.)

पाने,फुले,फळे येतात ती अनेक जीवजंतु खातात.ते जीव मेले म्हणजे निश्च्येकरून पृथ्वीच (जगती) होते.

जितुका कांहीं जाला आकार । तितुक्यास पृथ्वीचा आधार । होती जाती प्राणीमात्र । सेवट पृथ्वी ॥ १७ ॥

तात्पर्य जेवढे म्हणून आकाराला आले आहे,त्या सगळ्याला पृथ्वीचा आधार आहे ह्या पृथ्वीच्या पाठीवर अनेक प्राणी होतात.पण शेवटी पृथ्वीच होते. (जो जो आकार प्राण्यांचे होणे जाणे सर्वांचा शेवट पृथ्वी.)

हें किती म्हणौन सांगावें । विवेकें अवघेचि जाणावें । खांजणीभाजणीचें समजावें । मूळ तैसे ॥ १८ ॥

(खांजणीभाजणी - उत्पत्तीलय उभारणी,संहारणी,मृत्यू)

असे किती म्हणून सांगत बसावे? विचाराच्या योगाने हे सगळे समजुन घ्यावे हया विश्र्वाची उभारणी (खाजणी) व संहारणी (भांजणी) ह्याचेही मूळ असेच आहे.

आप आळोन पृथ्वी जाली । पुन्हां आपींच विराली । अग्नियोगें भस्म जाली । म्हणोनियां ॥ १९ ॥

(आपींच - जलामध्ये मृत्यू)

पाणी आटून त्याची पृथ्वी होते,बनते व ती अग्नीच्या योगाने भस्म झाल्यामुळे पुन्हा पाण्यातच विरून जाते.

आप जालें तेजापासूनी । पुढें तेजें घेतलें सोखुनी । तें तेज जालें वायोचेनी । पुढें वायो झडपी ॥ २० ॥

( सोखुनी - शोषूनी )

पाणी (आप) तेजापासून होते.पुढे त्याला तेज शोषून घेते,ते तेज वायूपासून होते.पुढे त्याला वायु झडपून विझवून टाकतो.

वायो गगनीं निर्माण जाला । पुढें गगनींच विराला । ऐसें खांजणी भाजणीला । बरें पाहा ॥ २१ ॥

वायु आकाशात उत्पन्न होतो व पुढे आकाशातच विरून जातो,अशाप्रकारे उभारणी व संहारणी किंवा खाजणी-भाजणी ह्याचा नीट विचार करा.

जें जें जेथें निर्माण होतें । तें तें तेथें लया जातें । येणें रितीं पंचभूतें । नाश पावती ॥ २२ ॥

जे जे जेथे उत्पन्न होते,ते ते त्याच ठिकाणी लय पावते.अशा प्रकारे पंचभूतांचा नाश होतो.

भूत म्हणिजे निर्माण जालें । पुन्हां मागुतें निमालें । पुढें शाश्वत उरलें । परब्रह्म तें ॥ २३ ॥

भूत (भू=होणे) म्हणजे उत्पन्न झालेले,अर्थात जे (पंचभौतिक) उत्पन्न होते ते लयास जाते.(उत्पत्ति आहे तेथे नाश आहेच.) त्यानंतरही शाश्र्वत रूपाने जे उरते ते परब्रह्म होय.(ह्याहून वेगळे म्हणजे उत्पत्तिनाशरहित असे परब्रह्म आहे.)

तें परब्रह्म जों कळेना । तो जन्ममृत्यु चुकेना । चत्वार खाणी जीव ना । होणें घडे ॥ २४ ॥

ते परब्रह्म जो पर्यंत कळत नाही,तोपर्यंत जन्मरण चुकत नाही,चार खाणीतील अनेक प्रकारचे जीव होऊन जन्मास यावे लागते.(चार खाणींच्या यच्चयावत जीवांना होणे जाणे आहे.)

जडाचें मूळ तें चंचळ । चंचळाचें मूळ तें निश्र्चळ । निश्र्चळासी नाहीं मूळ । बरें पाहा ॥ २५ ॥

जडाचे (भूतभौतिकाचे) मूळ चंचळ (अंतरात्मा) आहे. व चंचळाचे मूळ निश्र्चळ परब्रह्म आहे.त्या निश्र्चळाचे मात्र दुसरे मूळ नाही (ते अनादि आहे व अनंत आहे.) हे निट लक्षात ठेवा.

पूर्वपक्ष म्हणिजे जालें । सिद्धांत म्हणिजे निमालें । पक्षातीत जें संचलें । परब्रह्म तें ॥ २६ ॥

जग झाले (आहे व सत्य आहे) हा पूर्वपक्ष होय व नाहीसे झाले म्हणजे मिथ्या होय हा सिद्धांत आहे. ह्या दोन्ही पक्षाहून निराळे असे जे घनदाट भरलेले आहे ते परब्रह्म आहे.

हें प्रचितीनें जाणावें । विचारें खुणेंसी बाणावें । विचारेंविण सिणावें । तेंचि मूर्खपणें ॥ २७ ॥

हे अनुभवानेच समजले पाहिजे,विचाराच्या योगाने खुण पटवून घ्यावी,विचार न करता (साधनांचे) श्रम करणे.हाच मूर्खपणा (विचाराने खुणेस पावावे.विचार सोडून व्यर्थ शिणावे हे मूर्खपणाचे होय.)

ज्ञानी भिडेने दडपला । निश्चळ परब्रह्म कैंचें त्याला । उगाच करितो गल्बला । मायेंमधें ॥ २८ ॥

जो ज्ञानी दृश्याच्या भिडेने (जड चंचळाच्या म्हणजे मायेच्या भिडेने) दडपून जातो (तर तो ज्ञानी असला तरी) त्याला निश्र्चळ पद्प्रप्ति-परब्रह्म कोठून मिळणार? मायेमध्ये तो उगीच पोकळ बडबड करीत असतो.(मग तो मायेत खूप बडबडला तरी व्यर्थच)

माया निशेष नासली । पुढें स्थिति कैसी उरली । विचक्षणें विवरिली । पाहिजे स्वयें ॥ २९ ॥

मायेचा पूर्णपणे नाश झाल्यानंतर पुढे कशी स्थिति राहते ह्याचा विचार सुज्ञाने स्वतःच केला पाहिजे.( माया नि:शेष मूळमाया किवा अंतरात्मा त्यासुद्धा-निरसल्यानंतर पुढे स्थिति कशी असते ह्याचा सुज्ञाने विचार केला पाहिजे)

निशेष मायेचें निर्शन । होतां आत्मनिवेदन । वाच्यांश नाहीं विज्ञान । कैसें जाणावें ॥ ३० ॥

मायेचा पूर्णपणे निरास झाला म्हणजे खरे आत्मनिवेदन होते.त्या ठिकाणी वाच्यांश उरत नाही म्हणजे बोलणे खुंटते.असे हे विज्ञान (अनुभवजन्य ज्ञान) शब्दांनी कसे समजून घ्यावे? (माया नि:शेष निरसली की खरे आत्मनिवेदन झाले,तेथे वाच्यांश नाही मग (स्वस्वरूपस्थिति) विज्ञान जाणावे कसे?

लोकांचे बोलीं जो लागला । तो अनुमानेंच बुडाला । याकारणें प्रत्ययाला । पाहिलेंच पाहावें ॥ ३१ ॥

जगाच्या बोलण्याच्या नादी जो लागतो,तो संशयातच बुडतो.ह्यासाठी विचार केलेलाच करीत जाऊन अनुभव घ्यावा.(जो लोकांच्या नादी लागला तो त्याबद्दल अनुमानातच बुडून राहील,म्हणून विचार करीत करीत स्वानुभव पाहावा.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे शाश्वतब्रह्मनिरूपणनाम समास चौथा ॥**

**समास पांचवा : चंचळ लक्षण॥ श्रीराम ॥**

दोघां ऐसीं तीन चालती । अगुणी अष्टधा प्रकृती । अधोर्ध सांडून वर्तती । इंद्रफणी ऐसीं ॥ १ ॥

(इंद्र = मांजर,फणी = सर्प)

प्रकृति व पुरुष ह्या दोघांच्या अनुरोधाने(प्रेरणेने) त्रिगुण (त्रिदेव) वागतात. अगुणी म्हणजे निर्गुण अशा परब्रह्माच्या ठिकाणी जी अष्टधा प्रकृति(बुद्धि,मन व अहंकारासह पंचमहाभूते) सहज स्पुरण पावली ती अध म्ह.जड व ऊर्ध्व म्हणजे निश्चळ ह्यांना सोडून मध्ये म्ह.अंतरिक्षात इंद्र म्ह. मांजर फणी म्हणजे साप ह्यांच्या खेळासारखी वर्तते म्ह.खेळ खेळते.(इंद्रफणी म्ह.इंद्रधनुष्य ते जसे अंतरिक्षांत भासमात्र असते त्याप्रमाणे अष्टधा प्रकृति निर्गुणाच्या ठिकाणी भासमान दिसते.)

पणतोंडें भक्षितो पणजा । मूल बापास मारी वोजा । चुका-या गेला राजा । चौघां जणांचा ॥ २ ॥

(वोजा - चातुर्य)( राजा चौघां जणांचा - पृथ्वी,आप,तेज,वायु या चौघांचा राजा आकाश)

१) चार खाणी,चार वाणी आदिकरून पदार्थ हे पणतू ,पृथ्वी बाप,उदक आजा,अग्नि पणजा,ह्याक्रमाने अग्नि हा पणजा चार खाणींच्या-चार वाणींच्या पदार्थरूपी पणतवंडाना खाऊन टाकतो आणि मूल म्ह. पाणी आपला जो बाप अग्नि त्याला मोठ्या शिताफीने मारते.(नाहीसे करते) आणि ह्या चौघाचा राजा जो वायुरूप अंतरात्मा तो चुकार झाला ( म्ह. लपून बसला,चौघे बाप त्याची ओळख विसरले.) २) मूळमायारूप जगदीश्वर हा पणजा,सत्वगुण हा आजा,रजोगुण हा बाप व तमोगुण हा मुलगा (पणतू) हा तमोगुणरूप पणतू आपल्या अज्ञानामुळे मूळमाया किंवा जगदिश्वररूप पंणज्याला विसरतो.प्रत्येक मूल आपल्या बापाला मारते म्हणजे निर्माल्यवत करते.ह्या चौघाजणाचा राजा म्हणजे निर्गुणब्रह्म त्याला हे चुकले (विसरले) दोघा ऐसे तीन चालतात व अगुणी अष्टधा प्रकृति अधोर्ध्व म्ह. अध व ऊर्ध्व सांडून इंद्रफणी ऐसी वर्तते दोन म्हणजे वायुरूप प्रकृति व जाणीवरूप पुरुष,म्ह.मूळमाया,निश्चळ व निर्मळ ब्रह्माच्या ठिकाणी कर्तुत्व नाही पण तेथे निर्विकार आकाशात सहज वातोर्मि उठते.तशी एकोऽहं ही मुळमाया स्फूरली,प्रकृतिपुरुष शिवशक्ति,अर्धनारीनटेश्वर साऱ्यांचा हिच्यापासूनच कर्तूत्वास आरंभ प्रकृतिपुरुषात सामरस्य पूर्ण एकपण मोडू न देता दोनपणा दाखवितात. ह्या दोहोऐसे म्ह.मूळमायेच्या मताने तीन चालतात.तीन म्हणजे त्रिगुण त्रिदेव जाणीव सत्वगुण विष्णु जाणीव-नेणीव मिश्रित रजोगुण ब्रह्मदेव व नेणीव तमोगुण शंकर ही गुणमाया,मूळमायेला अनुसरून गुणमाया चालते.तेथून अगुणी म्ह.अष्टधा प्रकृति म्ह.त्रिगुणपंचभूतात्मक सृष्टि अध आणि ऊर्ध्व अध म्ह. जड व ऊर्ध्व म्ह. निश्चळ दोन्ही सांडून वर्तते सत्व रज व तम हे तीन गुण व आकाश वायू अग्नी आप व पृथ्वी ही पंचभूते मिळून अष्टधा प्रकृति ही अगुणी सूक्ष्म म्ह.निश्चळ निर्गुणाला जवळ असणारी (स्थूळ प्रकृति नव्हे.) अध म्ह. जड व ऊर्ध्व म्ह. निश्चळ सांडून मध्ये (अंतरिक्षात म्ह.आकाशात) इंद्रफणीसारखा इंद्र म्ह. मांजर फणी म्हणजे साप ह्यांच्या खेळासारखी वर्तते म्ह.खेळ खेळते. वायू अग्नी आप व पृथ्वी ह्यात वायू पणजा,अग्नि आजा,आप बाप व पृथ्वी मूल म्हणजे

वायूचे पणतवंड ! आता पणजा पणतोंडे भक्षितो,पणजा जो वायु तो आपल्या पणतवंडाला खाऊन टाकतो अर्थात पृथ्वी वायूत लीन होते.व पुन्हा वायुपासून अग्नि,आप ह्याक्रमाने पृथ्वी उत्पन्न होते.तात्पर्य ही चारही भूते वायूपासून पृथ्वीपर्यंत एकमेकापासून उत्पन्न होतात व एकेकात उलट क्रमाने लीन होतात.हा त्यांचा खेळ इंद्र व फणीसारखा नित्य चालला आहे.'मूल बापास मारी बोजा' म्ह.आपल्या तेजाने पराक्रमाने शुद्ध सत्वांपासून सत्वगुण,सत्वापासून रजोगुण,रजोगुणापासून तमोगुण झाले व उलट क्रमाने पाहता मूल बापाला खाऊन टाकते.तमोगुण रजोगुणाला मारतो,खातो म्हणजे निर्बळ करतो.रजोगुण सत्वगुणाला व शबलसत्व शुद्ध सत्वाला खातो निस्तेज करतो.तीन गुण क्रमाक्रमाने एकमेकाला प्रसवतात.व तेच उलट क्रमाने एकमेकाला खातात.पुन्हा उत्पन्न करितात पुन्हा लीन होतात.असा हा खेळ नित्य चालला आहे.ह्याप्रमणे पणत-वंडाला (पृथ्वीला) पणजा (वायू) खातो ह्यात चार भूतांचा खेळ व मूल बापाला मारते ह्यात त्रिगुणांचा खेळ उलट-सुलट क्रमाने कसा चालला आहे ते सांगितले आहे.हा खेळ मांजर व सर्प ह्यांच्या खेळासारखा सूक्ष्म प्रकृतीत नित्य चालला आहे.आता वाय्वादि चार भूते हा आपआपसात खेळ खेळत आहेत खरा,पण धांगडधिग्यात (वायू,अग्नि,आप व पृथ्वी ह्या) चारचौघांचा राजा (अधिष्ठान,मूळ आधार) जो अंतरात्मा (आकाश) तो काही आढळत नाही.अंतरात्म्याच्या अधिष्ठानावर चार भूते व त्रिगुण ह्यांचा खेळ चालला असून तोच तेवढा गुप्त झाल्यासारखा दिसत आहे.

देव देवाळयामधें लपाला । देऊळ पूजितां पावे त्याला । सृष्टिमधें ज्याला त्याला । ऐसेंचि आहे ॥ ३ ॥

(देव - अंतरात्मा)

देव (अंतरात्मा) हा (ब्रह्मांडदृष्टीने) अष्टधा प्रकृतिरूप सृष्टीमध्ये किवा (पिंडदृष्टीने) देहमध्ये लपून बसला आहे.(गुप्त झाला आहे,उघड दिसत नाही,म्हणून ह्याला पूर्वी “आकाशमार्गी गुप्त पंथ” असे म्हंटले आहे.) देवालयाची पूजा केली म्हणजे ती त्यादेवाला पोहोचते (प्राण्याच्या शरीराला दृष्ट पदार्थ देऊन त्यांचा संतोष केला म्हणजे अंतरात्मानुरूप देव प्रसन्न होतो.सृष्टीमधील प्रत्येक देहाला हा नियम लागू आहे (हा नियम प्राण्यांना लागू आहे,भूतांची पूजा हीच देवपूजा)

दोनी नामें येकास पडिलीं । लोकीं नेमस्त कल्पिलीं । विवेकें प्रत्ययें पाहिलीं । तों येकचि नाम ॥ ४ ॥

(दोनी नामें - पुरुष आणि प्रकृती)

शिवशक्ति,प्रकृतिपुरुष,गणेशशारदा इत्यादि दोन्ही जोड नावे वस्तुतः एकाच मायेला किवा मूळपुरुषाला पडलेली आहेत. ही केवळ लोकांनी कल्पिलेली आहेत,विवेकाने अनुभव घेऊन पहिले तर दोन्ही नावे मिळून एकच वस्तू आहे.(असे आढळून आले.)

नाहीं पुरुष ना वनिता । लोकीं कल्पिलें तत्त्वता । त्याचा बरा शोध घेतां । कांहींच नाहीं ॥ ५ ॥

ती वस्तू पुरुषही नाही व स्त्रीही नाही.स्त्री-पुरुषपणाची लोकांनी कल्पना केली आहे.ह्याचा नीट विचार केला म्हणजे तेथे मुळी वस्तुच नाही (पुरुष म्हणजे पुल्लिंगी देह व स्त्री म्हणजे स्त्रीलिंगी देह असा तेथे लिंगभेद नाही)

स्त्री नदी पुरुष खळाळ । ऐसें बोलती सकळ । विचार पाहातां निवळ । देह नाहीं ॥ ६ ॥

पाण्याच्या ओघाला “नदी” हे स्त्रीलिंगी व खळाळ असे पुल्लिंगी नाव सर्व जण देतात.पण शांतपणे विचार केला तर असे दिसून येईल की स्त्रीपुरुषांचे देह तेथे नाहीत.(उद्काला नदी स्त्रीलिंगी व खळाळ पुरुषलिंगी नाव दिले तरी ते स्त्री किवा पुरुष होत नाही.)

आपण आपणास कळेना । पाहों जातां आकळेना । काशास कांहींच मिळेना । उदंडपणें ॥ ७ ॥

आपण कोण हे आपले आपल्याला कळत नाही,पाहायला जावे तर आपल्या स्वरूपाचे आकलन होत नाही जगांत नानाविध प्रकार असल्यामुळे कोणाचा कोणाला मेळ बसत नाही.(अंतरात्मा आपण कोण व कसा हे न पाहिल्यामुळे नावावरून अज्ञानाला भेद वाटतो.)

येकलाचि उदंड जाला । उदंडचि येकला पडिला । आपणासी आपला । गल्बला सोसवेना ॥ ८ ॥

अंतरात्मा एक असून अनेक रूपे धारण करता झाला पण अनेक रूपे धारण करूनही त्याचा एकपणा मोडला नाही,आपण उत्पन्न केलेला हा उपाधीचा गलबला आपला आपल्यालाच सहन होत नाही.

येक असोन फुटी पडिली । फुटी असोन स्थिति येकली । विचित्र कळा पैसावली । प्राणीमात्रीं ॥ ९ ॥

सर्वत्र एकच अंतरात्मा असून देहोपाधिभेदामुळे तो अनेक भिन्न वाटतो.(व तो अनेक दिसला तरी सर्वांतर्यामी एकच आहे) पण भिन्न वाटला तरी सर्वांतर्यामी एकच आहे.प्राणीमात्रामध्ये त्याची विचित्रकळा पसरलेली आहे.(प्राणीमात्रात तो एकच विविध रूपांनी नटला आहे.)

वल्लिमधें जल संचरे । कोरडेपणें हें वावरे । वोलेवांचून न थिरे । कांहीं केल्यां ॥ १० ॥

वल्लीमध्ये पाणी फिरत असते ते कोरडेपणाने फिरत असते म्हणून दिसत नाही,तथापि ते असते ह्यात संशय नाही कारण जळाचा ओलेपणा वल्लीत नसेल तर ती काही केल्या टिकणार नाही.

झाडांमधें केलीं आळीं । झाडें धांवती निराळीं । कित्येक झाडें अंतराळीं । उडोन जाती ॥ ११ ॥

(झाडें अंतराळीं - पक्षी आकाशात उडून जातात झाडें - प्राणीमात्रांचे देह)

झाडांच्या सभोवताली पाणी घालण्यासाठी मोठाली आळी केलेली असतात (व त्यातील पाण्याच्या ओलाव्यामुळे पुष्ट होऊन) झाडे आकाशात (निराळी) उंच वाढत जातात.(वृक्ष गगनचुंबित होतात) (ह्या

दृष्टांतावरून) मनुष्य पशु पक्षादि हीही झाडेच होत व अंतरात्मा (हेच त्याचे मूळ ) जीवन होय.कित्येक झाडे (पक्षी) आकाशात उडून जातात.

भूमीपासून वेगळीं जालीं । परी तें नाहींत वाळलीं । निराळींच बळावलीं । जेथतेथें ॥ १२ ॥

ती पृथ्वीपासून वेगळी झाली तरी (अंतरी अंतरात्मरूप जीवन असल्यामुळे) ती वाळत नाहीत,आपापल्या ठिकाणी प्रबळ होऊन वाढत असतात.

देवाकरितां चालती झाडें । देव नस्तां होती लाकडें । नीटचि आहे कुवाडें । सर्वथा नव्हे ॥ १३ ॥

ह्या झाडांमध्ये देव म्ह.अंतरात्मा असतो म्हणून ती वाढतात,त्यांच्यात देव नसेल तर ती लाकडे होऊन जातात ही गोष्ट सरळ आहे,ह्यात कोडे काहीच नाही.

झाडापासून झाडें होती । तेहि अंतरीक्ष जाती । मुळानें भेदिली जगती । कदापि नाहीं ॥ १४ ॥

झाडांपासून झाडे होतात व ती ही आकाशात वाढत जातात पण त्यांचे मूळ काही जमीन भेदून जाते असे नाही.

झाडास झाडें खातपाणी । घालून पाळिलीं प्रतिदिनीं । बोलकीं झाडें शब्दमथनीं । विचार घेती ॥ १५ ॥

झाडांना झाडांचेच खत पाणी दररोज घालून त्यांचा सांभाळ करतात,बोलकी झाडे (माणसे) असतात ती (माणसे) शब्दांचे मंथन करून विचार करतात (परस्परांस मनोगत कळवितात)

होणार तितुकें आधींच जालें । मग कल्पकल्पून बोलिलें । जाणतयासी समजलें । सकळ कांहीं ॥ १६ ॥

सृष्टीक्रमाप्रमाणे (सृष्टीस्वभावधर्माप्रमाणे) व्हावयाचे ते आधीच होऊन गेले आहे.आणि मग सांगण्या-यांनी (अनेक शास्त्रकारांनी) आपपल्यापरी कल्पना करून त्याची उपत्ती सांगितली (कल्पना लढवून त्यावर ग्रंथ लिहिले आहेत.) पण जाणते त्या सगळ्याचे वर्म समजून असतात.

समजलें तरी उमजेना । उमजलें तरी समजेना । प्रत्ययेंविण अनुमानेना । सकळ कांहीं ॥ १७ ॥

सामान्य लोकांना वरवरचा अर्थ (वाच्यार्थ) कळला तरी वर्म कळत नाही व वर्म कळल्यासारखे झाले तरी ते नीट उकलत नाही.अनुभवावाचून कोणताही तर्क करता येत नाही (मुख्य अनुभव पाहिजे,त्यावाचून तत्वबोध होत नाही)

सर्वत्रांचा वडिल कोण । हेचि पाहावी वोळखण । भेटे आपणास आपण । जगदांतरें ॥ १८ ॥

सर्वांचा वडील कोण आहे त्याची (अंतरात्म्याची) ओळख करून घ्यावी म्हणजे जगदांतरामध्ये आपणच अंतरात्मारूपाने भरलेले आहोत असे कळून येऊन आपली आपल्याला भेट होते.

अंतरनिष्ठांची उंच कोटी । बाहेरमुद्र्याची संगती खोटी । मूर्ख काये समजेल गोष्टी ।शाहाणे जाणती ॥१९॥

(बाहेरमुद्र्याची - बहिर्मुखाची)

जे अंतर्निष्ठ (अंतर्मुख,आंत आपला आपण शोध घेणारे,अंतरात्म्यावर निष्ठा ठेवणारे) असतात ते हे जाणतात. त्यांची कोटि (उंच) श्रेष्ठ होय.जे बहिर्मुख असतात त्यांची संगति वाईट मूर्खाला ह्या गोष्टी काय कळणार? सुज्ञांना त्या समजतात.

अंतरें राखतां राजी । भलत्यास भलताच नवाजी । अंतरें न राखतां भाजी । मिळणार नाहीं ॥ २० ॥

(नवाजी - नावाजतो)

अंतःकरणे सांभाळता आली तर वाटेल तो मनुष्य वाटेल त्याची स्तुती करू लागतो ( तर परका मनुष्यही-परकेपणा मग उरतच नाही-प्रसन्न होऊन स्तुति करू लागतो.) अंतर राखता न आले तर भाजीचे पानही मिळणार नाही.

ऐसें वर्ततें प्रत्यक्ष । अलक्षीं लावावें लक्ष । दक्षास भेटतां दक्ष । समाधान होतें ॥ २१ ॥

ही उघड (अनुभवाची) गोष्ट आहे. अलक्ष्य जो अंतरात्मा त्याच्याकडे लक्ष लावावे दक्षास दक्ष (अंतर्निष्ठास अंतरनिष्ठ) भेटला की समाधान होते.

मनास मिळतां मन । पाहोन येती निरंजन । चंचळचक्र उलंघून । पैलाड जाती ॥ २२ ॥

सद्गुरू मनाशी सच्छिष्याचे मन मिळाले (समरस झाले) की निरंजन जे परब्रह्म त्याचे दर्शन घेऊन ते येतात आणि चंचळाचा फेरा ओलांडून पलीकडे जातात (मनास मन मिळाले (समरस झाले) मी तू पण उडाले एका अंतरात्म्याची व्यापकता कळली की निरंजनाची भेट होते.चंचळ चक्र ओलांडून पलीकडे केवळ परब्रह्म त्याची प्राप्ति होते.)

येकदा जाऊन पाहोन आले । मग तें सन्निध देखिलें । चर्मचक्षी लक्षिलें । न वचे कदा ॥ २३ ॥

(सन्निध - जवळच,सर्वत्र हृदयी पाहिजे)

एकदा का परब्रह्माचे दर्शन झाले की मग ते अखंड आपल्या जवळ आहे.मात्र ते चर्मचक्षूंनी कधीही पाहता येत नाही.

नाना शरीरीं चंचळ । अखंड करी चळवळ । परब्रह्म तें निश्चळ । सर्वां ठाईं ॥ २४ ॥

अंतरात्मा अनेक शरीरांमध्ये (नाना देहात) चंचळपणाने अखंड चळवळ करीत असतो,परब्रह्म हे सर्वत्र निश्र्चळ आहे.

चंचळ धांवे येकीकडे । वोस पडे दुसरेकडे । चंचळ पुरे सर्वांकडे । हें तो घडेना ॥ २५ ॥

(चंचळाची व्यापकता कमी आहे.) चंचळ एकीकडे असले तर दुसरीकडे नसते (ओस पडते) चंचळ सर्व ठिकाणी पुरे पडणे शक्य नाही.(चंचळ सर्वा ठाई पुरत नाही)

चंचळ चंचळास पुरेना । आवघें चंचळ विवरेना । निश्चळ अपार अनुमाना । कैसें येतें ॥ २६ ॥

चंचळ मन (जीव) चंचळ अंतरात्म्यास जाणू शकत नाही,पुरता शोध घेऊ शकत नाही,चंचळ अंतरात्मा एकदेशी असला तरी त्याचे साग्र विवरण ( मनाला) करता येत नाही.मग निश्र्चळ व अपार अशा परब्रह्माचे आकलन त्याला (मनाला) कसे करता येईल?

गगनीं चालिली हवावी । कैसी पावेल पार पदवी । जातां मधेंचि विझावी । हा स्वभावचि तिचा ॥ २७ ॥

(हवावी - दारूचा बाण)

(बाण,चंद्रज्योत) हवावी आकाशात पेटली तरी ती आकाशाचे पैलतीर कशी पावेल?(आकाशाचा अंत तिला लागणे कठिण) मध्येच विझून जाणे हा तिचा स्वभावच आहे.

मनोधर्म येकदेशी । कैसा आकळिल वस्तुसी । निर्गुण सांडून अपेसी । सर्व ब्रह्म म्हणे ॥ २८ ॥

मनोवृत्ति एकदेशी आहे तिला परब्रह्माचे आकलन कसे होईल? वृत्तीच्या पलीकडे असणारे परब्रह्म टाकून देऊन,वृत्तिला आकलन होण्या-या सर्व पदार्थांनाच करंटे मन ब्रह्म म्हणू लागते.

नाहीं सारासार विचार । तेथें अवघा अंधकार । खरें सांडून खोटें पोर । नेणतें घेतें ॥ २९ ॥

ज्या ज्या ठिकाणी सारासार विचार नाही,तेथे सगळा अंधार पडतो,नेणते पोर असते ते खरे टाकून खोट्याला भुलते (शहाणे भुलत नाही) (असार टाकून विवेकाने सारभूत निर्गुण ब्रह्म न घेतले तर सारा अंधारच आहे खरे सोडून खोटे घेणे हे सुज्ञाचे काम नाही.)

ब्रह्मांडाचें माहाकारण । तेथून हें पंचीकर्ण । माहावाक्याचें विवर्ण । वेगळें असे ॥ ३० ॥

(विवर्ण - विवरण)

ब्रह्मांडाचा महाकारण देह जी मूळमाया तिच्यापासून हे सारे पचीकरण म्हणजे पंचभूतांचा पसारा झाला.ह्या पचीकरणाहून महावाक्याचे विवरण वेगळे आहे (ते पंचीकरणात येत नाही)

महत्ततत्व महद्भूत । तोचि जाणावा भगवंत । उपासना हे समास । येथून जाली ॥ ३१ ॥

महतत्व म्हणजे महदभूत त्यालाच भगवंत असे म्हणतात उपासनेची समाप्ति तेथेच होते.(महतत्व हे महाव्दार-उपासनेची ही परम सीमा (एको विष्णुर्म्हहद्भूतम-महतत्वापलीकडे व्दैत उरत नाही)-ह्याच्या पलीकडे निश्र्चळ परब्रह्म आहे.

कर्म उपासना आणि ज्ञान । त्रिकांड वेद हें प्रमाण । ज्ञानाचें होतें विज्ञान । परब्रह्मी ॥ ३२ ॥

कर्म उपासना व ज्ञान असे हे त्रिकांडात्मक वेद आहेत (वेदमर्यादाही तेथेच खूंटते) ज्ञानाचे विज्ञान होणे म्हणजे परब्रह्म होणे होय.(परब्रह्मस्वरूप होणे हे पलीकडचे आहे)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चंचळलक्षणनिरूपणनाम समास पांचवा ॥**

**समास सहावा : चातुर्य विवरण॥ श्रीराम ॥**

पीतापासून कृष्ण जालें । भूमंडळीं विस्तारलें । तेणेंविण उमजलें । हें तों घडेना ॥ १ ॥

पीत म्ह.पिवळा हिरडा (पिवळ्या रंगाच्या हिरड्यापासून) त्याचपासून कृष्ण म्ह.काजळ किवा काळी शाई होते आणि त्या शाईचा वेदपुराणादि ग्रंथरूपाने सर्व जगभर विस्तार होतो,शाई नसती तर ( ग्रंथ नसते तर मनुष्यास ज्ञान झाले नसते.)

आहे तरी स्वल्प लक्षण । सर्वत्रांची सांठवण । अद्धम आणी उत्तम गुण । तेथेंचि असती ॥ २ ॥

शाई ही एक साधी वस्तू,परंतु तिजमध्ये (ब्रह्मांडातील) सर्व ज्ञान एकत्रित झाले आहे.चांगल्या किवा वाईट गुणांची वर्णने शाईने लिहिलेल्या ग्रंथातच आहेत.(ग्रंथातून-रामकृष्णादिकांच्या आंगचे उत्तम गुण व रावणकंसादिकांच्या आंगचे अधम गुण ह्या दोहोंचेही यथास्थित वर्णन केले आहे.)

महीसुत सरसाविला । सरसाऊन द्विधा केला । उभयेता मिळोन चालिला । कार्येभाग ॥ ३ ॥

(महीसुत - बोरू)

महीसुत म्ह.पृथ्वीच्या पोटातून सहज वर येणारा बोरू हा पुढे आला व मध्येच छिद्र पावून त्याची लेखणी झाली,ती लेखणी व शाई मिळून लिहिण्याचा सर्व कारभार सुरु झाला ( लेखणी व शाई मिळून स्वरव्यंजन युक्त असे शब्दांचे संघ एकापुढे एक येऊन लेखनक्रिया सुरु झाली)

स्वेतास्वेतास गांठीं पडतां । मधें कृष्ण मिश्रित होतां । इहलिकसार्थकता । होत आहे ॥ ४ ॥

श्र्वेत (पांढरा कागद) आणि अश्र्वेत (बोरू) ह्या दोघांची गांठ पडून मध्ये काळी शाई मिसळली आणि तिघांच्या संयोगाने इहलोकीचे मनुष्याचे लेखनवाचनादि व्यवहार म्ह. लेखन,वाचन,अर्थबोध वगैरे सुरु झाले.

विवरतां याचा विचार । मूर्ख तोचि होये चतुर । सद्यप्रचित साक्षात्कार । परलोकींचा ॥ ५ ॥

(सद्यप्रचित - तत्कालिन अनुभव)

ह्याचा (ह्या कुटाचा,ग्रंथाचा) विचार करून विवरण केले असता मूर्खसुद्धा चतुर होईल,फार काय परलोकीचा साक्षात्कार होईल ही प्रत्यक्ष प्रचिती आहे ( ग्रंथाचा जो विचार करील तो मूर्ख असला तर चतुर होईल ,फार काय लेखनार्थ मनात आणील तर त्याला परलोकीचा मार्ग सापडून तो कृतार्थ होईल)

सकळांस जे मान्य । तेंचि होतसे सामान्य । सामान्यास अनन्य । होईजेत नाहीं ॥ ६ ॥

सर्व सामान्य लोकांना जी गोष्ट मान्य होते तीच लोकात प्रचलितही होते पण अशा सामान्य सार्वत्रिक झालेल्या गोष्टिंशी चतुर पुरुष अनन्य (एकरूप) होत नाही (ध्येय मानीत नाही) (अर्थात त्याला ती संमत नसते.उदा.विषयसुख सर्वसंमत आहे पण हा ते मान्य करीत नाही किवा जगत सत्य आहे असे सर्व मानतात.पण हा मान्य करीत नाही किवा जगत सत्य आहे असे सर्व समजतात पण तसे तो मान्य करीत नाही.)

उत्तम मध्यम कनिष्ठ रेखा । अदृष्टीची गुप्त रेखा । चत्वार अनुभव रारिखा । होत नाहीं ॥ ७ ॥

(अदृष्टीची - अदृश्य,नशिबाची)

चौघांचे नशीब एकसारखे नसते,कोणाच्या कपाळाची रेषा उत्तम असते कोणाची मध्यम असते कोणाची कनिष्ठ असते (कोणाची रेषा अदृष्ट म्ह. गुप्त असते.) म्हणून चौघांचा अनुभव सारखा नसतो.(वेगळेपणा असतो)

चौदा पीड्यांचे पवाडे । सांगती ते शाहाणे कीं वेडे । ऐकत्यानें घडे कीं न घडे । ऐसें पाहावें ॥ ८ ॥

(पवाडे - किर्ती,पराक्रम)

आपल्या पूर्वजांच्या चौदा पिढ्यांचा पराक्रम (पवाडे) सांगणारे शहाणे असोत की वेडे असोत ते ऐकण्या-याने ह्यापैकी आपल्या हातून काही घडण्यासारखे आहे की नाही ह्याचा विचार करावा.

रेखा तितुकी पुसोन जाते । प्रत्यक्ष प्रत्यया येतें । डोळेझांकणी करावी तें । कायेनिमित्य ॥ ९ ॥

(डोळेझांकणी - डोळेझाक)

जेवढी म्हणून रेखा आहे ती पुसून टाकता येते (कागदावरच्या पाटीवरच्या किवा भिंतीवरच्या रेषा पुसून टाकता येतात.) हा प्रत्यक्ष अनुभव आहे.मग ललाटरेषा तेवढी पुसून टाकता येणार नाही असे समजुन का डोळेझाक करावी?

बहुतांचे बोलीं लागलें । तें प्राणी अनुमानीं बुडालें । मुख्य निश्र्चये चुकलें । प्रत्ययाचा ॥ १० ॥

जे प्राणी अनेकांच्या नादी लागतात ते बिचारे संशयात गटांगळ्या-गिरक्या खातात.स्वानुभवाचा मुख्य निश्र्चय त्यांना करता येत नाही (म्हणून ते फसतात)

उदंडाचें उदंड ऐकावें । परी तें प्रत्ययें पाहावे । खरेंखोटें निवडावें । अंतर्यामीं ॥ ११ ॥

पुष्कळांचे पुष्कळ ऐकावे पण आपल्या मनात खऱ्याखोट्याचा विचार करून अनुभवास पटेल ते घ्यावे.

कोणासी नव्हे म्हणों नये । समजावे अपाये उपाये । प्रत्यये घ्यावा बहुत काये । बोलोनियां ॥ १२ ॥

कोणालाच काही म्हणू नये (कोणाचे मन दुखवू नये.) पण त्यात उपयोगी काय व निरुपयोगी काय ते समजून घ्यावे (आपले हिताहित पाहावे) व अनुभव घ्यावा (अनुभवाने खरे ठरेल ते घ्यावे) विनाकारण फार बोलून काय करावयाचे? (चातुर्याचे लक्षण आणखी काय सांगावयाचे आहे?)

माणुस हेंकाड आणी कच्चें । मान्य करावें तयाचें । येणेंप्रकारें बहुतांचें । अंतर राखावें ॥ १३ ॥

एकदा माणूस हट्टी किवा कच्चा असला तरी त्याचेही ऐकून घ्यावे,अशाप्रकारे पुष्कळांचे अंतःकरण सांभाळीत जावे (तात्पर्य सर्वांचे ऐकावे व मनाचे करावे)

अंतरीं पीळ पेच वळसा । तोचि वाढवी बहुवसा । तरी मग शाहाणा कैसा । निवऊं नेणें ॥ १४ ॥

आपल्या मनात असलेला पीळ,पेच व वाकडेपणा (वळसा) हा जर पुष्कळ वाढवू लागला,तर तो शहाणा कसा? त्याला लोकांचे समाधान करता येत नाही.

वेडें करावें शाहाणें । तरीच जिणें श्लाघ्यवाणें । उगेंच वादांग वाढविणें । हें मूर्खपण ॥ १५ ॥

वेड्यास शहाणे करावे तरच जन्माचे सार्थक,उगीच वादाच्या बाजू वाढवीत बसणे हा मूर्खपणा होय.

मिळोन जाऊन मेळवावें । पडी घेऊन उलथावें । कांहींच कळों नेदावें । विवेकबळें ॥ १६ ॥

आपल्या प्रतिस्पर्ध्याशी मिळून जाऊन त्याला आपल्यात मिळवून घ्यावे,आधी आपण कमीपणा घेऊन,योग्य समयी त्याला उलथून टाकावे पण विवेकबळने आपल्या विचारांचा थांग लागू देऊ नये.

दुस-याचे चालणें चालावें । दुस-याचे बोलणीं बोलावें । दुस-याचे मनोगतें जावें । मिळोनियां ॥ १७ ॥

दुसऱ्याच्या चालीने चालावे,दुसऱ्याच्या (त्याच्या) सारखेच बोलावे आणि त्याच्या मनोगताशी मिळून जावे.

जो दुस-याच्या हितावरी । तो विपट कहिंच न करी । मानत मानत विवरी । अंतर तयाचें ॥ १८ ॥

(विपट - वितुष्ट)

जो दुसऱ्याचे कल्याण व्हावे असे इच्छितो तो कधीही कोणाचे वाईट करीत नाही,दुसऱ्याच्या अंतःकरणाला पटेल अशा रीतीने आपले विचार त्याच्या अंतःकरणात हळुहळू भरवितो (भला मनुष्य दुसऱ्याच्या हिताशी विरोध येईल असे-विपट-काहीच करीत नाही तो त्यांशी मिळून जाताजाता त्यालाच आपल्याशी मिळवून घेतो.)

आधीं अंतर हातीं घ्यावें । मग हळुहळु उकलावें । नाना उपायें न्यावें । परलोकासी ॥ १९ ॥

अगोदर त्याचे मन वश करून घ्यावे,मग आपले विचार हळूहळू त्याच्या मनात ठसवावे अनेक उपाय करून त्याला (परलोकाचा मार्ग दाखवावा) परलोकाची प्राप्ति करून द्यावी.

हेंकाडास हेंकाड मिळाला । तेथें गल्बलाचि जाला । कळहो उठतां च्यातुर्याला । ठाव कैंचा ॥ २० ॥

हेकाड मनुष्याशी हेकाड मनुष्याचा प्रसंग आला म्हणजे तेथे गोंधळच उडतो.(हमरीतुमरीवर येऊन कलह माजवितात ह्यात चातुर्य कोणते) अशाप्रकारे भांडण जुंपले म्हणजे चतुरपणा तो काय राहिला?

उगीच करिती बडबड । परी करून दाखविणें हें अवघड । परस्थळ साधणें जड । कठिण आहे ॥ २१ ॥

(परस्थळ - मोक्षाचा ठाव,शत्रुचा किल्ला)

पुष्कळ लोक फार बडबड करतात पण प्रत्यक्ष करून दाखविणे फार कठिण आहे.परस्थळ (मोक्षस्थान,शत्रूच्या ताब्यातील जागा) किवा दुसऱ्याचे अंतःकरण स्वाधीन करून घेणे फार कठिण आहे.

धके चपेटे सोसावे । नीच शब्द साहात जावे । प्रस्तावोन परावे । आपले होती ॥ २२ ॥

(धके चपेटे - धक्के,धपाटे)

दुसऱ्याचे टक्के टोपणे सोसावे नीच शब्दही सहन करावे म्हणजे पश्र्च्याताप पावून प्रतिस्पर्धी आपणास येऊन मिळतात.

प्रसंग जाणोनि बोलावें । जाणपण कांहींच न घ्यावें । लीनता धरून जावें । जेथतेथें ॥ २३ ॥

प्रसंग समजून बोलत असावे पण आपल्याकडे जाणतेपणाचा अभिमान (जाणपण) किंचितही घेऊ नये,सर्व ठिकाणी लीनतेने (नम्रपणाने) वागावे.

कुग्रामें अथवा नगरें । पाहावीं घरांचीं घरें । भिक्षामिसें लाहानथोरें । परीक्षून सोडावीं ॥ २४ ॥

भिक्षेच्या मिषाने खेडोपाडी किंवा शहरे व त्यातील एकूण एक घरे फिरावी आणि (भलेबुरे) लहानमोठ्या सर्वांची पारख करून ठेवावी.

बहुतीं कांहींतरी सांपडे । विचक्षण लोकीं मित्री घडे । उगेच बैसतां कांहींच न घडे । फिर्णें विवरणें ॥ २५ ॥

(बहुतीं कांहींतरी - अनेकांकडून अनेक गुणांची प्राप्ती)

पुष्कळ हिंडल्याने (बहुतांच्या ठिकाणी काहींना काही गुण असतो तो लक्षात येतो.) त्यात काही ना काही तरी चांगले लोक सापडतात,चतुर लोकांशी स्नेह जमतो,उगीच घरी बसून राहिल्यास फिरणे,मनुष्यशोध घेणे इत्यादी काहीच होत नाही.

सावधपणें सर्व जाणावें । वर्तमान आधींच घ्यावें । जाऊं ये तिकडे जावें । विवेकें सहित ॥ २६ ॥

(जाऊं ये - जाण्यास योग्य)

सावधपणाने सर्व समजून घ्यावे,जिकडे जाणे असेल तिकडील शोध आधी परस्पर काढून घेऊन मग विवेकाला बरोबर घेऊन जावे ( विवेक हा सोबती संगे घेऊन जावे)

नाना जिनसपाठांतरें । निवती सकळांचीं अंतरें । लेहोन देतां परोपकारें । सीमा सांडावी ॥ २७ ॥

ज्या कविता ऐकताच सर्वांच्या अंतःकरणाचे समाधान होईल अशांचे पुष्कळ पाठांतर असावे आणि (आस्थेवाईक भेटल्यास) त्यांना पुष्कळ उतारे स्वतः लिहून द्यावे आळस करू नये.

जैसें जयास पाहिजे । तैसें तयास दीजे । तरी मग श्रेष्ठचि होइजे । सकळां मान्ये ॥ २८ ॥

ज्याला जे पाहिजे ते तात्काळ द्यावे म्हणजे श्रेष्ठता व सर्वमान्यता प्राप्त होते.

भूमंडळीं सकळांस मान्य । तो म्हणों नये सामान्य । कित्येक लोक अनन्य । तया पुरुषासी ॥ २९ ॥

अशाप्रकारे जो जगामध्ये सर्वांना वंद्य (मान्य-लोकमान्य) झाला त्या पुरुषाला सामान्य म्हणू नये,अशा पुरुषांशी कितीतरी लोक एकनिष्ठ (अनन्य) असतात.

ऐसीं चातुर्याचीं लक्षणें । चातुर्यें दिग्विजये करणें । मग तयास काये उणें । जेथतेथें ॥ ३० ॥

अशी चातुर्याची लक्षणे आहेत चातुर्याने दिग्विजय करावा मग जेथे जेथे जावे तेथे तेथे त्याला काय कमी पडणार?(सर्व अनुकूलच आहे-उणे काहीच नाही)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चातुर्यविवरणनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : अधोर्धनिरूपण ॥ श्रीराम ॥**

नाना विकाराचें मूळ । ते हे मूळमायाच केवळ । अचंचळीं जे चंचळ । सूक्ष्मरूपें ॥ १ ॥

निश्चळ अशा परब्रह्माच्या ठिकाणी सूक्ष्मपणाने जे चंचळ स्पुरण झाले ती ही मूळमाया होय तीच पुढे अनेक विकारांचे मूळ आहे ( नाना विकारांचे मूळ,आद्य विकार,म्हणजे मूळमाया होय ती निश्चळ परब्रह्माच्या ठिकाणी अतिसूक्ष्मरूपाने झाली तिला चंचळ म्हणतात.)

मूळामाया जाणीवेची । मुळींच्या मूळ संकल्पाची । वोळखी शडगुणैश्वराची । येणेंचि न्यावें ॥ २ ॥

प्रकृतिपुरुष शिवशक्ति । आर्धनारीनटेश्वर म्हणती । परी ते आवघी जगज्जोती । मूळ त्यासी ॥ ३ ॥

(मुळींच्या मूळ संकल्पाची - ब्रह्माच्या प्रथम स्फुरणाची)

मूळमाया जाणीवरूप असून परब्रह्माचा मूळसंकल्परूप (स्फूरणवायुरूप) आहे जाणीव व चंचळत्वरूप वायू ही दोन्ही मिळुन झालेल्या मूळमायेलाच षडगुणेश्वर,प्रकृतिपुरुष,शिवशक्ती,अर्धनारीनटेश्वर म्हणतात.पण ह्या सर्वांचे मूळ ती मूळमायाच आहे सर्व जगज्योतिरुप तीच आहे.

संकल्पाचें जें चळण । तेंचि वायोचें लक्षण । वायो आणी त्रिगुण । आणी पंचभूतें ॥ ४ ॥

संकल्प उत्पन्न होताना निश्चळ परब्रह्माच्या ठिकाणी जे चलन झाले तेच वायूचे स्वरूप होय ,तीच मूळमाया होय तिच्या ठिकाणी त्रिगुण व पंचभूते अशी अष्टधा प्रकृति असते.

पाहातां कोणीयेक वेल । त्याच्या मुळ्या असती खोल । पत्रें पुष्पें फळें केवळ । मुळाचपासी ॥ ५ ॥

एखादा वेल पाहिला तर त्याच्या मुळ्या फार खोल गेलेल्या असतात पण पाने,फुले.फळे वगैरे जो विस्तार होत जातो तो सूक्ष्मरूपाने त्या (मुळ्यांतच) असतो.

याहिवेगळे नाना रंग । आकार विकार तरंग । नाना स्वाद अंतरंग । मुळामध्यें ॥ ६ ॥

ह्याशिवाय अनेक रंग आकार विकार स्वाद आतील रचना इत्यादि सर्व मूळामध्येच बीजरूपाने असते.

तेंचि मूळ फोडून पाहातां । कांहींच नाहीं वाटे आतां । पुढें वाढतां वाढतां । दिसों लागे ॥ ७ ॥

ते मूळ फोडून पाहिल्यास त्यात वरील प्रकारापैकी काहीही नाही असे वाटते,पण झाड जसे वाढू लागते तसे तसे वाढून सर्व प्रकट होऊ लागते.

कड्यावरी वेल निघाला । अधोमुखें बळें चालिला । फांपावोन पुढें आला । भूमंडळीं ॥ ८ ॥

कड्यावरून निघालेला हा वेल अधोमुख वाढत जाऊन फोफावून जगात विस्तार पावतो.

तैसीं मूळमाया जाण । पंचभूतें आणी त्रिगुण । मुळीं आहेत हें प्रमाण । प्रत्ययें जाणावें ॥ ९ ॥

तसाच प्रकार मूळमायेचा आहे,पंचभूते व तीन गुण तिच्यामध्ये सूक्ष्मरूपाने आहेत हे निश्चित पण हे अनुभवाने (विवेकाने) पाहावे.

अखंड वेल पुढें वाढला । नाना विकारीं शोभला । विकारांचा विकार जाला । असंभाव्य ॥ १० ॥

(निर्गुण परब्रह्म कड्यावर उत्पन्न झालेला) हा सृष्टिरुपी अखंड वेल सतत पुढे वाढत जातो.अनेक विकारांनी त्याला शोभा येते व त्या विकारांचे पुन्हा अनेक विकार होतात.(विकार वाढत जातात.)

नाना फडगरें फुटलीं । नाना जुंबाडें वाढली । अनंत अग्रें चालिलीं । सृष्टीमधें ॥ ११ ॥

(फडगरें - फुटवे,शाखा , जुंबाडें - समुदाय)

अनेक (फडगरे) फांद्या फुटतात,अनेक जाळ्या (जुबाडे) वाढतात व असंख्य शेंडे सृष्टीमध्ये विस्तार पावतात.

कित्येक फळें तीं पडती । सवेंचि आणीक निघती ॥ ऐसीं होती आणि जाती । सर्वकाळ ॥ १२ ॥

अनेक फळे पडतात,पुन्हा लगेच नवी येतात.अशी घडामोड सदोदित चाललेली आहे.

येक वेलचि वाळले । पुन्हां तेथेंचि फुटले । ऐसे आले आणि गेले । कितीयेक ॥ १३ ॥

काही वेलच वाळून जातात,पुन्हा त्याठिकाणी नवे उत्पन्न होतात व नाश पावतात.

पानें झडती आणि फुटती । पुष्पें फळें तेणेंचि रितीं । मध्यें जीव हे जगती । असंभाव्य ॥ १४ ॥

पाने गळतात व पुन्हा फुटतात,फुलाफळांची हिच गत होते. ह्याशिवाय मध्यंतरी त्यावर अनेक जीव निर्वाह करीत असतात.

अवघा वेलचि कर्पतो । मुळापासून पुन्हा होतो । ऐसा अवघा विचार जो तो । प्रत्यक्ष जाणावा ॥ १५ ॥

सगळा वेळच करपून जातो व नंतर मुळापासून पुन्हा उत्पन्न होतो,असा सगळा प्रकार उघडच होत आहे.(लक्षावधी प्राणी ह्याच न्यायाने येतात जातात)

मूळ खाणोन काढिलें । प्रत्ययेज्ञानें निर्मूळ केलें । तरी मग वाढणेंचि राहिलें । सकळ कांहीं । १६ ॥

त्या वेलांचे मूळच खणून टाकले म्हणजे अध्यात्मज्ञानाच्या अनुभवाने त्याचे निर्मूळ केले (मूळमायेचा निरास केला) म्हणजे मग वाढणे (जन्म घेणे) वगैरे सर्व प्रकार थांबतात (जन्ममरणाची यातायात खुंटते.)

मुळीं बीज सेवटीं बीज । मध्यें जळरूप बीज । ऐसा हा स्वभाव सहज । विस्तारला ॥ १७ ॥

त्या वेलाच्या मुळ्यांमध्ये जे बीज असते तेच शेवटी फळांत येते (अग्राला बीज) व मध्येही जळरूपाने बीजच असते,असा विस्तार सहजच होत जातो.

मुळामधील ज्या गोष्टी । सांगताहे बीजसृष्टी । जेथील अंश तेथें कष्टी । न होतां जातो ॥ १८ ॥

बीजापासून झालेली सृष्टी म्ह.पत्रफलपुष्पादिक रूप विस्तार मुळांमध्ये काय आहे ते सांगत असतो.जे जे जेथून उत्पन्न होते ते ते तेथेच अनायासे लय पावते.( मूळमायेतून आलेली पिंडब्रह्मांडात्मक नाना जीवसृष्टि तिच्यातच लय पावते)

जातो येतो पुन्हा जातो । ऐसा प्रत्यावृत्ति करितो । परंतु आत्मज्ञानी जो तो । अन्यथा न घडे ॥ १९ ॥

प्रत्येक जीव जातो,येतो,पुन्हा जातो,अशा अनेक येरझाऱ्या करतो.(अशा अनेक पुनरावृत्ति होतात,परंतु जो आत्मज्ञानी झाला त्याला हे जन्ममरणाचे सायास पडत नाहीत.

न घडे ऐसें जरी म्हणावें । तरी कांहींतरी लागे जाणावें । अंतरींच परी ठावें । सकळांस कैचें ॥ २० ॥

मुळीच सायास पडत नाहीत असे नव्हे,त्यालाही आत्मज्ञान करून घ्यावेच लागते.ते आत्मज्ञान आपल्या अंतःकरणातच आहे.पण ते सर्वांना कसे कळणार? (त्यालाही आत्मरूप जाणावे लागतेच आत्मा अंतरीच आहे पण सर्वांना सुलभ नाही.)

तेणेंसींच कार्यभाग करिती । परंतु तयास नेणती । दिसेना ते काये करिती । बापुडे लोक ॥ २१ ॥

त्या अंतरात्म्याच्या आधारावर सर्व लोक कार्ये करीत असतात,पण त्याला जाणत नाहीत,तो दिसतच नाही त्याला बिचारे लोक काय करणार?

विषयेभोग तेणेंचि घडे । तेणेंविण कांहींच न घडे । स्थूळ सांडून सूक्ष्मीं पवाडे । ऐसा पाहिजे ॥ २२ ॥

विषयभोग सुद्धा त्याच्याच आधारावर भोगले जातात,त्याच्यावाचून काहीच होत नाही (पण तो जाणण्यास) स्थूळावरील दृष्टि काढून सूक्ष्मांत प्रवेश करील असा बुद्धिमान पाहिजे (पण स्थूळावरील दृष्टी मावळून त्या सूक्ष्माकडे विवेकाने वळले पाहिजे.)

जें आपलेंचि अंतर । तद्रूपचि जगदांतर । शरीरभेदाचे विकार । वेगळाले ॥ २३ ॥

आपल्या स्वतःच्या अंतःकरणात जे रूप आहे तेच जगाच्या अंतःकरणात आहे (आपला व जगाचा आत्मा एकच आहे,शरीरभेदाने होणारे विकार वेगळे असतात.(आत्मा आपला व जगाचा एकच आहे,शरीर भेद वेगळे आहेत.)

आंगोळीची आंगोळीस वेधना । येकीची येकीस कळेना । हात पाये अवेव नाना । येणेंचि न्यायें ॥ २४ ॥

( आंगोळी - बोट )

एका बोटाची वेदना दुसऱ्या बोटाला होत नाही हातपाय इ. अवयवांचीही हीच स्थिति आहे.

अवेवाचें अवेव नेणे । मा तो परांचें काये जाणे । परांतर याकारणें । जाणवेना ॥ २५ ॥

एकाच देहातील एका अवयवाचे दुसऱ्या अवयवाला कळत नाही,मग दुसऱ्या देहाचे ह्याला काय कळणार? म्हणून दुसऱ्याचे अंतःकरण जाणता येत नाही (एक बोट कापले तर त्याच्या वेदना दुसऱ्या बोटास होत नाहीत.हस्तपादादि अवयवांची हीच स्थिति,एका अवयवाचे दुसऱ्या अवयवास कळत नाही,मग आपल्या वरून दुसऱ्याचे अंतर जाणणे कठिण जावे हे सहजच आहे.)

येकाचि उदकें सकळ वनस्पती । नाना अग्रेंभेद दिसती ।खुडिलीं तितुकींच सुकती ।येर ते टवटवीत ॥२६॥

एकाच पाण्याच्या योगाने सगळ्या वनस्पति होतात (पोसतात व वाढतात) व एका वनस्पतीला अनेक शेंडे (अग्रे) फुटतात,त्यात जेवढे खुडावे तेवढेच सुकतात व बाकीचे टवटवीत असतात.

येणेंचि न्यायें भेद जाला । कळेना येकाचें येकाला । जाणपणें आत्मयाला । भेद नाहीं ॥ २७ ॥

(हाच न्याय माणसांना,एकाचे एकाला कळत नाही,फक्त आत्मज्ञान झाले म्हणजे सर्वांची अंतरे एकच हे कळते.) ह्याच न्यायाने मनुष्यादि प्राण्यात भेद होऊन एकाचे अंतःकरण दुसऱ्याला कळत नाही,जाणीवरूप आत्म्याच्या ठिकाणी भेद नाही.

आत्मत्वीं भेद दिसे । देहप्रकृतिकरितां भासे । तरी जाणतचि असे । बहुतेक ॥ २८ ॥

आत्म्याच्या ठिकाणी जो भेद दिसतो तो भिन्नभिन्न देहप्रकृतीमुळे भासतो.(पण देह वेगळाले म्हणून तो दिसतो) तथापि बहुतेकांना आत्म्याचे एकपण थोडेबहुत जाणवते.

देखोन ऐकोन जाणती । शाहाणे अंतर परीक्षिती । धूर्त ते अवघेंच समजती । गुप्तरूपें ॥ २९ ॥

शहाणे व धूर्त असतात ते हे पाहून,ऐकून दुसऱ्याच्या अंतःकरणाची परीक्षा करतात व गुप्तरूपानेच सगळे समजून घेतात.(काही देखून ऐकून जाणतात,शहाणे अंतःपरीक्षेने जाणतात व चतुर विवेकानेच सारे समजतात.)

जो बहुतांचें पाळण करी । तो बहुतांचें अंतर विवरी । धूर्तपणें ठाउकें करी । सकळ कांहीं ॥ ३० ॥

जो पुष्कळांचे पालन करतो तो पुष्कळांचे अंतःकरण जाणतो,चातुर्याच्या योगाने त्याला सर्व काही माहित होते.

आधी मनोगत पाहतीं । मग विश्वास धरिती । प्राणीमात्र येणें रितीं । वर्तताहे ॥ ३१ ॥

अगोदर दुसऱ्याचे मनोगत पाहून मग त्यावर विश्र्वास ठेवावयाचा अशी प्राणिमात्रांची वागण्याची रीतच आहे.

स्मरणामगें विस्मरण । रोकडी प्रचित प्रमाण । आपलें ठेवणें आपण । चुकताहे ॥ ३२ ॥

स्मरणा पाठीमागे विस्मरण होते आपण ठेवलेली वस्तु आपणच विसरतो हा आपला प्रत्यक्ष अनुभव आहे.

आपलेंच आपणा स्मरेना । बोलिलें तें आठवेना । उठती अनंत कल्पना । ठाउक्या कैंच्या ॥ ३३ ॥

आपलेच आपल्याला स्मरत नाही,आपण बोललेले आपणासच आठवत नाही आपल्या अंतःकरणात असंख्य कल्पना (तरंग) उठतात,त्या सगळ्या आपल्याला कोठे माहीत होतात?

ऐसें हें चंचळ चक्र । कांहीं नीट कांहीं वक्र । जाला रंक अथवा शक्र । तरी स्मरणास्मरणें ॥ ३४ ॥

असे हे चंचळ मायेचे चक्र आहे,काही काळ सरळ चालते व काही काळ वाकडे चालते रंक असो वा इंद्र असो काही स्मरण व काही विस्मरण असावायाचीच (ह्या प्रकारचा जीवस्वभाव आहे.)

स्मरण म्हणिजे देव । विस्मरण म्हणिजे दानव । स्मरणविस्मरणें मानव । वर्तती आतां ॥ ३५ ॥

नित्य स्मरण (ज्ञान) म्हणजे देव व नित्य विस्मरण (अज्ञान) म्हणजे दानव आणि काही स्मरण व काही विस्मरण म्हणजे मानव होत.

म्हणोनि देवी आणि दानवी । संपत्ति द्विधा जाणावी । प्रचित मानसीं आणावी । विवेकेंसहित ॥ ३६ ॥

ह्यांमुळे दैवी व दानवी (आसुरी) असे संपत्तीचे दोन प्रकार (भेद) मानतात.विवेकाने ह्याचा प्रत्यय मनाशी घ्यावा.

विवेकें विवेक जाणावा । आत्म्यानें आत्मा वोळखावा । नेत्रें नेत्रचि पाहावा । दर्पणींचा ॥ ३७ ॥

आरशातला डोळा डोळ्यानेच पाहावयाचा,त्याप्रमाणे विवेकाने विवेक पाहावा व आत्म्यानेच आत्मा ओळखावा.

स्थूळें स्थूळ खाजवावें । सूक्ष्में सूक्ष्म समजावें । खुणेनें खुणेसी बाणावें । अंतर्यामीं ॥ ३८ ॥

जड हातानेच जड देह खाजवितात त्याप्रमाणे सूक्ष्माने सूक्ष्म समजून घ्यावे व खुणेच्या योगाने अंतःकरण खूण बाळगून घ्यावी.(खुणेने अंतरीची खूण जाणावी व बाणून घ्यावी.)

विचारें जाणाव विचार । अंतरें जाणावे अंतर । अंतरें जाणावे परांतर ॥ होऊनियां ॥ ३९ ॥

विचाराने विचार जाणून घ्यावा,अंतःकरणाने अंतःकरण समजून घ्यावे आणि दुसऱ्याच्या अंतःकरणाशी आपले अंतःकरण एकरूप करून त्याचे मनोगत (करणे) जाणावे.

स्मरणामाजीं विस्मरण । हेंचि भेदाचें लक्षण । येकदेसी । परिपूर्ण । होत नाहीं ॥ ४० ॥

(स्वरूपाच्या स्मरणात विस्मरण होते म्हणून सृष्टि भेदमय वाटते,जीव एकदेशीपणामुळे व्यापक होत नाही.) स्वरूपाच्या स्मरणामध्ये विस्मरण होणे.(वेगळेपणाचे स्मरण हेच भेदाचे स्वरूप होय,स्वस्वरूपाचे स्मरण करणे म्हणजे स्वरूपापासून वेगळे पडणे,एकदेशी होणे होय) हा एकदेशीपणा व्यापक होत नाही.

पुढें सिके मागें विसरे । पुढें उजेडे मागें अंधारें । पुढें स्मरे मागें विस्मरे । सकळ कांहीं ॥ ४१ ॥

पुढे पाठ व मागे सपाट ,पुढे उजेड व मागे अंधार पुढे स्मरण व मागे विस्मरण असे सर्वांचे आहे.

तुर्या जाणावी स्मरण । सुषुप्ती जाणावी विस्मरण । उभयेता शरीरीं जाण । वर्तती आतां ॥ ४२ ॥

(सुषुप्ती - गाढ निद्रा,त्याला गाढ निद्रेतील काही आठवत नाही)

तुर्या ही स्मरणरूप आहे व सुषुप्ति ही विस्मरणरूप (अज्ञानमय)आहे,दोन्हीही शरीरात (देहांत) प्रत्यक्ष आहेत.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अधोर्धनिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : सूक्ष्मजीवनिरूपण ॥ श्रीराम ॥**

रेणूहून सूक्ष्म किडे । त्यांचें आयुष्य निपटचि थोडें । युक्ति बुद्धि तेणेंचि पाडें । तयामधें ॥ १ ॥

( निपटचि - अगदीच)

रेणूपेक्षाही बारीक असणाऱ्या किड्यांचे आयुष्य अगदीच (निपटचि) थोडे असते त्या ज्ञानानेच त्यांची युक्ति व बुद्धिही सूक्ष्म असते.(कित्येक किडे रेणूपेक्षाही बारीक असतात व त्याचप्रमाणे त्यांची युक्तिबुद्धिही (सूक्ष्म) असते.)

ऐसे नाना जीव असती । पाहों जातां न दिसती । अंतःकर्णपंचकाची स्थिती । तेथेंचि आहे ॥ २ ॥

(अंतःकर्णपंचक - अंतःकरण,मन,बुद्धी,चित्त,अहंकार)

असे अनेक जीवजंतु आहेत ते साध्या डोळ्याला दिसतही नाहीत,पण त्यांच्यामध्येही अंतःकरण पंचकाची व्यवस्था आहेच.(अंतःकरण मन-बुद्धि,चित्त-अहंकार हे पंचक अनुक्रमे आकाशादि पंचभूतांपासून झाले आहे.)

त्यांपुरतें त्यांचें ज्ञान । विषये इंद्रियें समान । सूक्ष्म शरीरें विवरोन । पाहातो कोण ॥ ३ ॥

त्यांच्यापुरते त्यांचे ज्ञान असते,विषय व इंद्रिये हीही त्याचमनाने असतात,इतक्या सूक्ष्म शरीराचा विचार करून पाहतो कोण?

त्यास मुंगी माहाथोर । नेणोंचालिला कुंजर । मुंगीस मुताचा पूर । ऐसें बोलती ॥ ४ ॥

(कुंजर - हत्ती)

ते प्राणी इतके सूक्ष्म असतात की त्यांच्या मानाने मुंगी ही हत्तीसारखी वाटते."मुंगीला मुताचा पूर" ही म्हण मुगीसंबंधाने प्रसिद्धच आहे.

तें मुंगीसमान शरीरें । उदंड असती लाहानथोरें । समस्तांमध्यें जीवेश्र्वरें । वस्ति कीजे ॥ ५ ॥

त्या मुंगीसारखी लहान शरीरे पुष्कळ आहेत आणि त्या सर्वात अंतरात्म्याची वस्ती आहे.

ऐसिया किड्यांचा संभार । उदंड दाटला विस्तार । अत्यंत साक्षपी जो नर । तो विवरोन पाहे ॥ ६ ॥

असे किडा मुंग्यांचे असंख्य समुदाय पसरले आहेत.अत्यंत उद्योगी (साक्षेपी) मनुष्य असेल तो ह्यांचे विवरण करुन पाहतो.

नाना नक्षत्रीं नाना किडे । त्यांस भासती पर्वतायेवढे । आयुष्यहि तेणेंचि पाडें । उदंड वाटे ॥ ७ ॥

(पाडें - त्याप्रमाणात)

अनेक नक्षत्रांमध्ये अनेक किडे पडतात ते ह्या सूक्ष्म जंतुना पर्वतासारखे भासतात आणि त्यामानाने त्यांचे आयुष्यही ह्या जंतूंना पुष्कळच वाटते.

पक्षायेवढें लाहान नाहीं । पक्षायेवढें थोर नाहीं । सर्प आणि मछ पाहीं । येणेंचि पाडे ॥ ८ ॥

पक्षी,सर्प व मस्य हे प्राणी अतिशय लहानही आहेत व अतिशय मोठेही आहेत, त्यांच्यापेक्षा लहान व मोठा मोठा दुसरा कोणताही जीव नाही (त्यांच्यापेक्षा लहान जीवांच्या दृष्टीने ते थोर आहेत व त्यांच्या पेक्षा मोठ्या जीवांच्या हत्ती-वाघ इ. दृष्टीने ते लहान आहेत.)

मुंगीपासून थोरथोरें । चढतीं वाढतीं शरीरें । त्यांची निर्धारितां अंतरें । कळों येती ॥ ९ ॥

मुगीपासून हत्तीपर्यंत मोठ्या श्र्वापदांपर्यंत-चढती वाढती मोठी अशी अनेक शरीरे आहेत,त्यांच्या अंतःकरणाचा विचार केला तर तेथेही अंतःकरण पंचके आहेत हे कळून येईल.

नाना वर्ण नाना रंग । नाना जीवनाचे तरंग । येक सुरंग येक विरंग । किती म्हणौनि सांगावे ॥ १० ॥

(सुरंग विरंग - चांगला वाईट रंग)

येकें सुकुमारें येकें कठोरें। निर्माण केलीं जगदेश्र्वरें । सुवर्णासारिखीं शरीरें । दैदिप्यमानें ॥ ११ ॥

अनेक वर्णांची,अनेक रंगांची,एक वाईट रंगांची,एक सुकुमार,एक कठोर,काही सुवर्णासारखी देदीप्यमान (असे अनंत जीव) अशी अनेक शरीरे जगदिश्र्वराने निर्माण केली आहेत.

शरीरभेदें आहारभेदें । वाचाभेदें गुणभेदें । अंतरीं वसिजे अभेदें । येकरूपें ॥ १२ ॥

शरीर,आहार,वाचा,गुण इत्यादिकांसंबंधाने त्यांच्यात भेद दिसले तरी सर्वांच्या अंतःकरणात अभिन्न असा आत्माच एकटा (एकच अंतरात्मा) नांदत आहे.

येक त्रासकें येकमारकें। पाहो जातां नाना कौतुकें । कितीयेक आमोलिकें । सृष्टीमध्यें ॥ १३ ॥

ह्या सृष्टीमध्ये काही प्राणी त्रास देणारे (त्रासक,भीतिप्रद),काही मारकट (हिंस्त्र) आहेत,पहावयाला लागले तर असे अद्भुत चमत्कार आहेत.(सर्व पहिले की सृष्टीतले अनेक चमत्कार पाहून परमेश्वराचे कौतुक वाटते!)

ऐसीं अवघीं विवरोन पाहे । ऐसा प्राणी कोण आहे । आपल्यापरतें जाणोन राहे । किंचितमात्र ॥ १४ ॥

ह्या सर्वाचे विवरण करून पाहील असा प्राणी कोण आहे?(पशुपक्षी कीटकादि अनंत प्राणी सारे विवरून पहाणारा कोण आहे?) जो तो आपल्यापुरते अल्पभाग जाणून राहतो.

नवखंड हे वसुंधरा । सप्तसागरांचा फेरा । ब्रह्मांडाबाहेरील नीरा । कोण पाहे ॥ १५ ॥

( नवखंड - भरतखंड,धृतखंड,रम्यखंड,द्रव्यमालखंड,केतुमालखंड,हरिखंड,विधिमालखंड,हर्णखंड,सुवर्णखंड, सप्तसागर - क्षारोदक,इक्षुरसोदक,घ्रुतोदक,दधिमंडोदक,शुद्धोदक,क्षीरोदक )

ही नवखंड पृथ्वी व तिच्या भोवतालचा साता समुद्राचा वेढा,तसेच ब्रह्मांडाबाहेर असणारे उदक (नीर) हे सर्व कोण पाहतो?

त्या नीरामध्यें जीव असती । पाहों जातां असंख्याती । त्या विशाळ जीवांची स्थिती । कोणजाणे ॥ १६ ॥

त्या पाण्यामध्ये पाहू गेले असता असंख्य जीव असतात,त्या प्रचंड (लहानमोठया जीवांची स्थिति कोण जाणू शकेल?

जेथें जीवन तेथें जीव । हा उत्पत्तीचा स्वभाव । पाहातां याचा अभिप्राव । उदंड असे । ॥ १७ ॥

जेथे जीवन (पाणी) आहे तेथे जीव असावायाचेच,हा सृष्टीचा स्वभाव आहे.ह्याचा विचार आणखी पुष्कळ करिता येण्यासारखा आहे.

पृथ्वीगर्भीं नाना नीरें । त्या नीरामधें शरीरें । नाना जिनस लाहानथोरें । कोण जाणें ॥ १८ ॥

पृथ्वीच्या पोटात अनेक ठिकाणी पाणी असून त्या पाण्यात अनेक प्रकारचे लहान मोठे देह आहेत.ते कोणाला माहीत आहेत.

येक प्राणी अंतरिक्ष असती । तेहीं नाहीं देखिली क्षिती ।वरीच्यावरी उडोन जाती ।पक्ष फुटल्यानंतरें ॥१९॥

( पक्ष - पंख)

काही पक्षी आकाशातच असतात,त्यांच्या दृष्टीला पृथ्वी पडतच नाही,पंख फुटल्यावर ते वरच्या वर उडून जातात.(काही प्राणी पंख फुटल्यावर आकाशात उडून जातात ते पुन्हा ही पृथ्वी पहात नाहीत.)

नाना खेचरें आणि भूचरें । नाना वनचरें आणि जळचरें । चौ-यासि योनीप्रकारें । कोण जाणे ॥ २० ॥

खेचर (आकाशात उडणारे प्राणी),भूचर,वनचर,जळचर इ.८४ लक्ष योनीतील प्रकार कोणाला माहित आहेत? (८४ लक्ष योनींचे अनंत प्राणी आहेत ते कोण जाणतो?)

उष्ण तेज वेगळे करुनी । जेथें तेथें जीवयोनी । कल्पनेपासुनी होती प्राणी । कोण जाणे ॥ २१ ॥

उष्ण तेज तेवढे वेगळे करून प्रत्येक ठिकाणी (बाकीच्या सर्व सृष्टीत) जीव आहेत,फार काय कल्पनेपासून सुद्धा कित्येक प्राणी उत्पन्न होतात,ते कोणाला माहीत आहेत?

येक नाना सामर्थ्यें केले । येक इच्छेपासून जाले । येक शब्दासरिसे पावले । श्रापदेह ॥ २२ ॥

येक देह बाजीगिरीचे । येक देह वोडंबरीचे। येक देह देवतांचे । नानाप्रकारें॥ २३॥

कोणी तपादिकांच्या सामर्थ्यापासून होतात,कित्येक इच्छेपासून होतात,कोणी शापोच्चाराबरोबर शापदेह घेतात (कित्येक शापदग्ध झालेले पुन्हा उश्यापदेह घेऊन उठतात) गारुडी विदयेने (मायेतील-बाजीगरीचे) कित्येक देह होतात.कित्येक राक्षसी मायेने(अवडंबरीचे) होतात.कित्येक देवतांचे देह असतात( कित्येक देवताही अनेक देह घेणाऱ्या आहेत.) असे अनेक प्रकार आहेत.

येक क्रोधापासून जाले । येक तपा पासून जन्मले । येक उश्रापें पावले । पूर्वदेह ॥ २४ ॥

कोणी क्रोधापासून,तर कोणी तपापासून जन्म पावतात.काहीना उ:शापाच्या योगाने पूर्व देह प्राप्त होतात.

ऐसें भगवंताचें करणें । किती म्हणौन सांगणें । विचित्र मायेच्या गुणें । होत जातें ॥ २५ ॥

अशी भगवंताची लीला विचित्र आहे,ती किती म्हणून सांगावी? मायेच्या योगाने ही सर्व घडामोड होते (भगवंताची लीला विचित्र आहे,मायागुणे सर्व होत असते.)

नाना अवघड करणी केली । कोणीं देखिली ना ऐकिली । विचित्र कळा समजली । पाहिजे सर्वे ॥ २६ ॥

(ही सृष्टिरचना ही देवाची विचित्र करणी आहे) कोणी ऐकिली नाही की पाहिली नाही असल्या प्रकारच्या बिकट रचना सृष्टीची झाली आहे तिच्यातील देवांची अद्भुत लीला सर्व कळली पाहिजे.

थोडें बहुत समजलें। पोटापुरती विद्या सिकलें । प्राणी उगेंच गर्वे गेलें । मी ज्ञाता म्हणोनी ॥ २७॥

थोडेफार समजून घेऊन व पोटापुरती विद्या शिकून “मी ज्ञाता” ह्या गर्वाने माणसे उगीच फुगत असतात.

ज्ञानी येक अंतरात्मा । सर्वांमधें सर्वात्मा । त्याचा कळावया महिमा । बुद्धि कैंची ॥ २८॥

सर्वांच्या ठिकाणी सर्वात्मपणाने भरलेला व्यापक अंतरात्मा तेवढा खरा ज्ञाता होय.पण त्याचा महिमा कळण्याइतकी बुद्धि कोणाला असणार?(पण त्याचा महिमा मानवी बुद्धीला कसा कळावा?)

सप्तकंचुक ब्रह्मांड । त्यांत सप्तकंचुक पिंड । त्या पिंडामधें उदंड । प्राणी असती ॥ २९ ॥

(सप्तकंचुक - पंचभूते,अहंकार व महतत्व अशी सात आवरणे.)

(सप्तकंचुक ब्रह्मांड म्हणजे मूळपंचतत्वे) मूळ पंचभूते,अहंकार व महतत्व ह्या सात आवरणांनी वेष्टिलेले ब्रह्मांड व त्यातील,सात आवरणे असलेला,पिंड असून त्या पिंडात पुष्कळप्राणी (अनंत जीव) आहेत.

आपल्य देहांतील न कळे । मा तें अवघें कैंचें कळे । लोक होती उतावळे । अल्पज्ञानें ॥ ३० ॥

(आपल्या पिंडातले आपल्याला काही एक कळत नाही मग ब्रह्मांडातले काय कळणार?) ते आपल्या शरीरातील प्राणी आपल्याला माहीत नसतात.मग बाकीचे कोठून कळणार? पण अल्प ज्ञानामुळे लोक उच्श्रृंखल होतात.

अनुरेणाऐसें जिनस । त्यांचे आम्ही विराट पुरुष । आमचें उदंडचि आयुष्य । त्यांच्या हिसेबें ॥ ३१ ॥

अणुरेणूसारखे इतके बारीक जीव आहेत की त्यांच्या मानाने त्यांचे आम्ही विराटपुरुष होऊ.(आम्हाला विराट पुरूषच म्हंटले पाहिजे)त्यांच्या हिशेबाने आमचे आयुष्यही (शंभर वर्षाचे म्हणजे कितीतरी दीर्घ)फार मोठे !

त्यांच्या रिती त्यांचे दंडक । वर्तायाचे असती अनेक । जाणे सर्वहि कौतुक । ऐसा कैंचा ॥ ३२ ॥

त्याच्या परीने त्यांचे वागणुकीचे रूढ मार्ग (दंडक) अनेक आहेत.त्यासर्वांचे कौतुक जाणून घेईल असा कोण आहे?

धन्य परमेश्वराची करणी । अनुमानेना अंतःकरणीं । उगीच अहंता पापिणी । वेढा लावी ॥ ३३ ॥

परमेश्वराच्या लीलेची धन्य असो! मनुष्याला अंतःकरणाला तिचे काहीच अनुमान करता येणार नाही पण दुष्ट अहंकार जीवाला उगीच नाचवीत असतो !

अहंता सांडून विवरणें । कित्येक देवांचे करणें । पाहातां मनुष्याचें जिणें । थोडें आहे ॥ ३४ ॥

ह्यासाठी अहंकार सोडून देवाच्या कित्येक कृतींचे विवरण करावे.पण ते करायला सुद्धा मनुष्याचे आयुष्य फार थोडे आहे.

थोडें जिणें अर्धपुडी काया । गर्व करिती रडाया । शरीर आवघें पडाया । वेळ नाहीं ॥ ३५॥

(कायामाया - शरीरसमत्ति)

आयुष्य थोडे,क्षणभंगुर देह,तो ही सगळा पडावयाला वेळ लागत नाही ( तो केव्हा पडेल त्याचा भरवसा नाही.) अशा स्थितीत लोक उगीच रडावयाला गर्व करतात.)

कुश्चीळ ठाईं जन्मलें । आणि कुश्चीळ रसेंचि वाढलें। यास म्हणती थोरलें । कोण्या हिसेबें ॥३६॥

हे शरीर रजस्वलेच्या विटाळासारख्या कुश्चित ठिकाणी जन्म पावले.आणि मलमूत्रादि घाणेरड्या रसांनी वाढले अशा घाणेरड्या देहाला लोक मोठे म्हणतात.ते काय म्हणून?

कुश्चीळ आणि क्षणभंगुर । अखंड वेथा चिंतातुर । लोक उगेच म्हणती थोर । वेडपणें ॥ ३७ ॥

घाणेरडे क्षणभंगुर,नेहमी रोग (व्याधी,व्यथा) व चिंता (आधि) ह्यांनी ग्रासलेले,अशा शरीराला लोक उगीच वेडेपणाने मोठे म्हणतात.(लोक वेडेपणाने मोठेपणाचा डौल मिरवतात.)

कायामाया दों दिसांची । आदिअंतीं अवघी चीची । झांकातापा करून उगीचि । थोरीव दाविती ॥ ३८॥

(आदिअंतीं - जन्ममृत्यूच्यावेळी , झांकातापा - प्रेताला झाकूनपाकून)

शरीर (काया) व संपत्ति (माया) ही दोन दिवसांची (क्षणभंगुर) आहेत.जन्ममृत्युकाळी सगळे दैन्यच आहे.(आदिअंती सारा फजीतवाडा ची ची) सारवासारवा करून (वस्त्रादिकांनी झाकून) लोक उगीच मोठेपणा मिरवतात.(वस्त्रालंकारानी देह नटवून उगाच मोठेपणा मिरवितात.)

झांकिलें तरी उपंढर पडे । दुर्गंधी सुटे जिकडे तिकडे । जो कोणी विवेकें पवाडे । तोचि धन्य ॥ ३९ ॥

(उपंढर - उघडा पडतो,झाकून राहात नाही.)

पण हे शरीर कितीही झाकले तरी ते शेवटी (मरणकाळी) उघडे (उपंढर) पडतेच.मग सर्वत्र त्याची दुर्गंधि सुटते.जो कोणी विवेकाच्या योगाने परमार्थाच्या मार्गात शिरतो तो धन्य होय.

उगेंचि कायसा तंडावें । मोडा अहंतेचें पुंडावें । विवेकें देवास धुंडावें । हें उत्तमोत्तम ॥ ४०॥

उगीच कशाला तंटे बखेडे माजवावे? अहंतेचे बंड मोडून विवेकाने देवाला शोधावे.हे सर्वात उत्तम.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मजीवनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : पिंडोत्पत्तिनिरूपण ॥ श्रीराम ॥**

चौंखाणीचे प्राणी असती । अवघे उदकेंचि वाढती । ऐसे होती आणी जाती । असंख्यात ॥ १ ॥

चार खाणींचे प्राणी असंख्य होतात व जातात पण ते सगळे उदकापासूनच वाढतात.

तत्वांचें शरीर जालें । अंतरात्म्यासगट वळलें । त्यांचें मूळ जों शोधिलें । तों उदकरूप ॥ २ ॥

(अंतरात्म्यासकट तत्वांचे गाठोडे असे) हे शरीर अंतरात्म्यासकट पंचतत्वांचे बनलेले आहे.पण त्याचे मूळ पहिले तर ते उदकच आहे.

शरत्काळींचीं शरीरें । पीळपीळों झिरपती नीरें । उभये रेतें येकत्रें । मिसळती रक्तीं ॥ ३ ॥

शरत काळामध्ये स्त्रीपुरुषातील वीर्ये पाण्याप्रमाणे पातळ होऊन उभय रेते रक्तात मिसळतात.

अन्नरस देहरस । रक्तरेतें बांधे मूस । रसद्वयें सावकास । वाढों लागे ॥ ४ ॥

(मूस - गर्भाशय)

अन्नरसाचा देहरस व देहरसाचे शुक्र-शोणीत होऊन त्यांची मूस बांधली जाते.आणि अन्नरस व देहरस ह्या दोन रसांच्या योगाने ती वाढीस लागते.

वाढतां वाढतां वाढलें । कोमळाचें कठीण जालें। पुढें उदक पैसावलें । नाना अवेवीं ॥ ५॥

ती मूस जसजशी वाढीस लागते तसतशी कोमळाचे कठिण होऊन उदकाच्या योगाने अनेक अवयव बनतात.

संपूर्ण होतां बाहेरी पडे । भूमीस पडतां मग तें रडे । अवघ्याचें अवघेंच घडे । ऐसें आहे ॥ ६ ॥

पूर्ण वाढ झाली म्हणजे शरीर बाहेर येते (मूल जन्मास येते.) व जमिनीवर पडल्यावर रडू लागते.सगळ्यांचे सगळे घडते ते असेच घडते.

कुडी वाढे कुबुद्धि वाढे । मूळापासून अवघें घडे । अवघेंचि मोडे आणि वाढे । देखतदेखतां ॥ ७ ॥

(कुडी - शरीर)

देह वाढत जातो त्याच्या बरोबर देहबुद्धि वाढत जाते हे सगळेच आरंभापासून होत असते.हा हा म्हणता सगळेच वाढते व मोडते.(पुढच्या जन्मापासून मृत्युपर्यंत सर्व जीवांचा क्रम एकच आहे.)

पुढें अवघियांचें शरीर । दिवसेंदिवस जालें थोर । सुचों लागला विचार । कांहीं कांहीं ॥ ८ ॥

पुढे सगळ्यांचेच शरीर दिवसेंदिवस मोठे होऊन त्यात थोडा थोडा विचार सुचू लागतो.

फळामधें बीज आलें । तेणें न्यायें तेथें जालें । ऐकतां देखतां उमजलें । सकळ कांहीं ॥ ९ ॥

मुळामधील बीज फळामध्ये यावे त्याप्रमाणे येथे घडले पाहिले व ऐकले म्हणजे सर्व काही समजू लागते.

बीजें उदकें अंकुरती । उदक नस्तां उडोन जाती । येके ठाईं उदक माती । होतां बरें ॥ १० ॥

पाण्याच्या योगाने बीजांना अंकुर फुटतात (बीजे उदकाने अंकुरतात) पाणी नसेल तर बीजे उडून जातात.(नष्ट होतात.) उदक व माती एकत्र झाली म्हणजे पुढे ठीक जमते.

दोहिंमधें असतां बीज । भिजोन अंकुर सहज । वाढतां वाढतां पुढें रीझ । उदंड आहे ॥ ११ ॥

(रीझ - मौजमजा)

उदक व माती हया दोहोमध्ये बीज भिजले म्हणजे अंकुर सहजच वाढू लागतो व पुढे पुष्कळच आनंद (रीझ) होतो.

इकडे मुळ्या धावा घेती । तिकडे अग्रें हेलावती । मुळें अग्र द्विधा होती । बीजापासून ॥ १२ ॥

मुळ्या खाली जमिनीत पसरत असतात व वर शेंडे वाढत असतात.अशाप्रकारे बीजापासून मुळ्या व शेंडे वेगवेगळे होतात.

मुळ्या चालिल्या पाताळीं । अग्रें धावतीं अंतराळीं । नाना पत्रीं पुष्पीं फळीं । लगडलीं झाडें ॥ १३ ॥

मुळ्या पाताळात जातात व शेंडे आकाशात जाऊन पाने व फुले,फळे हयांनी झाडे लगडून जातात.(हयाप्रमाणे पत्र पुष्प फळांची झाडे समृद्ध होतात.)

फळावडिल सुमनें । सुमनांवडिल पानें । पानांवडिल अनुसंधानें । काष्ठें आघवीं ॥ १४ ॥

(अनुसंधानें काष्ठें - अनुक्रमाने लाकूड येते.)

फळांपेक्षा फुले वडील व फुलांपेक्षा पाने वडील आहेत,हयाच क्रमाने पानाहून सर्व काष्ठे वडील होत.

काष्ठांवडिल मुळ्या बारिक। मुळ्यां वडिल तें उदक । उदक आळोन कौतुक । भूमंडळाचें ॥ १५ ॥

काष्ठाहून बारीक मुळ्या वडील,मुळ्याहून पाणी वडील,तात्पर्य,पाणी आटूनच पृथ्वीतत्वाचा हा विस्तार वृक्षरूप बनला.

याची ऐसी आहे प्रचिती । तेव्हां सकळां वडिल जगती । जगतीवडिल मूर्ती। आपोनारायायेणाची ॥१६ ॥

(आपोनारायण - जीवनब्रह्म,जलब्रह्म)

उदकाचे झाड कसे होते ह्याचा अनुभव असा आहे तेव्हा सर्वाहून जगती वडील हे स्पष्ट झाले.ह्या पृथ्वीला वडील आपोनारायण आहे.

तयावडिल अग्निदेव । अग्निवडिल वायेदेव । वायेदेवावडिल स्वभाव । अंतरात्म्यांचा ॥ १७ ॥

त्याला (आपाला) वडील अग्निदेव,अग्निदेवाला वडील वायुदेव व त्यालाही वडील अंतरात्म्याचा स्वभाव म्हणजे चेतना होय.

सकळांवडिल अंतरात्मा। त्यासि नेणे तो दुरात्मा । दुरात्मा म्हणिजे दुरी आत्मा । अंतरला तया ॥ १८ ॥

सर्वाहून वडील अंतरात्मा आहे (हे सिद्ध झाले) त्याला जो जाणीत नाही तो दुरात्मा होय.दुरात्मा म्हणजे ज्याला अंतरात्मा दुरावला आहे अंतरला आहे तो.

जवळी असोन चुकलें। प्रत्ययास नाहीं सोकलें । उगेंचि आलें आणी गेलें । देवाचकरितां ॥ १९ ॥

तो अंतरात्मा जवळ असून मनुष्याला सापडत नाही,कारण त्याला त्याचा अनुभव घेण्याची गोडी नसते.(नाही सोकले) त्या अंतरात्म्यामुळेच प्राणी जन्माला येऊन (त्याला न ओळखल्यामुळे व्यर्थ जातो.(त्या अंतरात्म्याला प्रत्ययांने न पहिल्यामुळे “जवळी असून प्राणी चुकले “ असे होऊन ते फुकट आले व गेले असे होते.)

म्हणौन सकळांवडिल देव । त्यासी होतां अनन्यभाव । मग हे प्रकृतीचा स्वभाव । पालटों लागे ॥ २० ॥

म्हणून सर्वात वडील अंतरात्मा देव होय. त्याच्यात एकरूप झाले म्हणजे मग ह्या प्रकृतीच्या स्वभावात बदल होऊ लागतो.

करी आपुला व्यासंग। कदापि नव्हे ध्यानभंग । बोलणें चालणें वेंग । पडोंच नेदी ॥ २१ ॥

असा अनन्य झालेला पुरुष आपला उद्योगधंदा व्यवस्थित करीत असूनही आपल्या ध्यानामध्ये खंड पडू देत नाही ( ध्यानाचा भंग होऊ देत नाही,बोलण्याचालण्यात कोठे चूक पडू देत नाही.)

जें वडिलीं निर्माण केलें । तें पाहिजे पाहिलें । काये काये वडिलीं केलें । कीती पाहावें ॥ २२ ॥

वडील जो अंतरात्मा त्याने जे जे उत्पन्न केले ते ते सर्व पहिले पाहिजे खरे पण सर्वच काही उत्पन्न केलेले ते किती म्हणून पाहणार?

तो वडिल जेथें चेतला । तोचि भाग्यपुरुष जाला । अल्प चेतनें तयाला । अल्पभाग्य ॥ २३ ॥

(चेतला - जागृत झाला.)

तो सर्वांचा वडील अंतरात्मा जेथे प्रकाशित होतो,तोच भाग्यवान पुरुष खरा,तो थोडा प्रकाशित झाला तर थोडे भाग्य मिळते (त्याच्या प्रकाश चेतना अल्प तर भाग्य अल्प चेतना पूर्ण तर भाग्यही पूर्ण )

तया नारायेणाला मनीं । अखंड आठवावें ध्यानीं । मग ते लक्ष्मी तयापासुनी । जाईल कोठें ॥ २४ ॥

त्या नारायणाला (अंतराम्याला) ध्यानामध्ये अखंड स्मरावे मग त्याची लक्ष्मी (प्रकृति) त्याचपासून (त्याला सोडून) जाईल कोठे?

नारायेण असे विश्वी । त्याची पूजा करीत जावी । याकारणें तोषवावी । कोणीतरी काया ॥ २५ ॥

तो नारायण विश्वात भरून राहिला आहे त्याची पूजा करावी (त्याला संतुष्ट करावे) म्हणून नारायणाची पूजा करणे झाल्यास कोणत्या तरी देहाचा संतोष करावा (त्याची पूजा करणे म्हणजे सर्वा भूती त्याला पाहणे सर्व भूतांचा संतोष करणे.)

उपासना शोधून पाहिली । तों ते विश्वपाळिती जाली । न कळे लीळा परीक्षिली । न वचे कोणा ॥ २६ ॥

(विश्वपाळिती जाली - सर्वत्र अंतरात्मा आहे म्हणून सर्वांचे मनोगत जाणून त्यांना तोषवावे याचे नाव उपासना म्हणजे विश्वाचा प्रतिपाळ करणे.)

ह्यावरून उपासना म्हणजे काय ह्याचा शोध घेतला तर तिचे विश्वव्यापक स्वरूप दिसून येते,उपासना विश्वाचा संतोष,प्रतिपाळ,सर्व भूतांतरात्मा जो नारायण म्हणजे त्याला सर्वा भूती पाहाणे सर्व भूतांना सुखविणे,त्यांचा प्रतिपाळ करणे (उपासनेचे मूळ शोधून पाहता ह्याप्रमाणे उपासना विश्वपाळिती दिसून येते हीच उपासना) ही त्या नारायण लीलेची परीक्षा कोणालाही करता येणार नाही.

देवाची लीळा देवेंविण । आणीक दुसरा पाहे कोण । पाहणें तितुकें आपण । देवचि असे ॥ २७ ॥

देवाची लीला देवाशिवाय दुसरा कोण पाहणार? (नारायणची लीला नारायाणावाचून कोण समजणार?) पाहणे हे सुद्धा देवाचेच रूप आहे.

उपासना सकळां ठाईं । आत्माराम कोठें नाहीं । याकारणें ठाइं ठाइं । रामे आटोपिलें॥ २८ ॥

ह्याप्रमाणे (ह्या दृष्टीने पाहिले म्हणजे आत्मारामासारखीच उपासना सर्वव्यापक आहे.(विश्वव्यापिनी व विश्वपाळिती आहे.) अंतरात्मा कोणत्या स्थळी नाही? म्हणून राम सर्वत्र भरलेला आहे.

ऐसी माझी उपासना । आणितां नये अनुमाना । नेऊन घाली निरंजना । पैलिकडे ॥ २९ ॥

(नये अनुमाना - विश्वव्यापक अशा उपासनेचे अनुमान करता येते नाही)

माझी उपासना इतकी व्यापक आहे की तिचे अनुमान करता येत नाही. मूळमायेच्या पलीकडे असणारे जे निर्मळब्रह्म तेथे ती उपासकाला नेऊन सोडते.(माझी उपासना ही आहे,ही अनुमानाने आकळायची नाही,अंतरात्मा नारायण ह्याचीही उपासना मूळमायेपलीकडचे निरंजन (मायातीत अंजन म्ह.माया) निर्गुण विमलब्रह्म तेथे नेऊन सोडते.

देवाकरितां कर्में चालती । देवाकरितां उपासक होती । देवाकरितां ज्ञानी असती । कितियेक ॥ ३० ॥

(अंतरात्मा देव सर्व कर्ममार्ग त्याच्यासाठीच आहेत उपासना त्याच्यासाठी उपासक त्याचे ज्ञान व ज्ञानी त्यांच्यापर्यंत) सर्व कर्ममार्ग जगामध्ये चालतात,कोणी उपासक होतात अथवा कित्येक ज्ञानी असतात,ते सगळे देवामुळे (देवासाठीच) होत.

नाना शास्त्रें नाना मतें । देवचि बोलिला समस्तें । नेमकांनेमक वेस्तावेस्तें । कर्मानुसार ॥ ३१ ॥ देवास अवघें लागे करावें । त्यांत घेऊं ये तितुकें घ्यावें । अधिकारासारिखें चालावें । म्हणिजे बरें ॥ ३२ ॥

(नेमकांनेमक - नियमित अनियमित, वेस्तावेस्तें - चांगला वाईट )

अनेक शास्त्रे व अनेक मते तो देवच बोलला आहे,नेमक व बाष्कळ,व्यवस्थित (वेस्त) व अव्यवस्थित (अवेस्त) सर्व काही जीवांच्या कर्मानुसार देवाला सारेच करावे लागते.त्यात (आपल्याला पाहिजे ते घ्यावे) घेण्यासारखे असेल तेवढे घ्यावे.आपल्या अधिकाराप्रमाणे आपण चालावे हे बरे!

आवाहन विसर्जन । ऐसेंचि बोलिलें विधान । पूर्वपक्ष जाला येथून । सिद्धांत पुढें ॥ ३३ ॥

आवाहन (म्ह. मूळमायेपासून सर्व ब्रह्मांडाची उभारणी) व विसर्जन (म्ह. उत्पत्तीच्या उलट क्रमाने होणारी ब्रह्मांडाची संहारणी) हो दोन्ही कशी होतात हे जाणणे ही देवाची उपासना (पूजा) होय. (हिला व्दैत लागते,म्हणून) ही पूर्वपक्षात येते.सिद्धांत ह्याच्या पुढे आहे.

वेदांत सिद्धांत धादांत । प्रचित प्रमाण नेमस्त । पंचिकर्ण सांडून हित । वाक्यार्थपाहावा ॥ ३४ ॥

शास्त्रप्रचिति,गुरुप्रचीति व आत्मप्रचीति ह्यात आत्मप्रचीतीचे प्रमाण मुख्य आहे,ह्यासाठी पंचीकरणाने पिंडब्रह्मांडाचा विचार करून तो विचारही सोडून द्यावा आणि हितकारक अशा महावाक्याचा अर्थ (विवेक) पाहावा.(शास्त्र,गुरु व आपण ह्या तीन प्रचिती एकरूपतेस आणाव्या व पंचीकरणाचे पिंडब्रह्मांडविचार करून तो विचारही सोडून द्यावा आणि महावाक्याचा विवेक पाहावा)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पिंडोत्पत्तिनिरूपणणनाम समास नववा ॥**

## समास दहावा : सिद्धांतनिरूपण ॥ श्रीराम ॥

गगनीं अवघेंचि होत जातें । गगनाऐसें तगेना तें । निश्चळीं चंचळ नाना तें । येणेंचि न्यायें ‖ १ ‖

आकाशात सगळेच काही होते व जाते पण आकाशासारखे ते (काहीही) टिकून राहात नाही तसेच निश्र्चळ ब्रह्माच्या ठिकाणी अनेक रूपाचे चंचळ टिकत नाही.

अंधार दाटला बळें। वाटे गगन जालें काळें । रविकिर्णें तें पिवळें । सवेंचि वाटे ‖ २ ‖

गडद काळोख पडला म्हणजे आकाश काळे झाले असे वाटते,लगेच सूर्यकिरणांच्या योगाने ते पिवळे वाटते.

उदंड हिंव जेव्हां पडिले । गमे गगन थंड जालें। उष्ण झळेनें वाळलें। ऐसें वाटे ‖ ३ ‖

पुष्कळ (हिव,हिम) थंडी पडते तेव्हा आकाशही थंड झालेसे वाटते आणि ते उष्ण झळेने वाळेलसे वाटते (हिव पडले म्हणजे वाटते,की गगन थंड झाले,उष्ण झळेने वाटते की ते वाळले पण ह्यापैकी गगनाला काही होत नाही,गगन आहे तसे अखंड निराभास आहे-भास भासतात ते सारे मिथ्या आहेत.)

ऐसें जें कांहीं वाटलें । तें तें जालें आणि गेलें । आकाशासारिखें तगलें । हें तों घडेना ‖ ४ ‖

असा जो काही भास भासतो तो भासतो व नाहीसा होतो,आकाशासारखा तो टिकणे शक्य नाही.

उत्तम जाणीवेचा जिनस । समजोन पाहे सावकास । निराभास तें आकाश । भास मिथ्या ‖ ५ ‖

उत्तम जाणीवेचा विचार स्वस्थ चित्ताने नीट समजून पहा, म्हणजे समजेल की ( उत्तम जाणीव झाली आहे असा पुरुष स्वस्थ चित्ताने विचार करून पाहू लागला म्हणजे त्यास असे दिसून येते की ) भास मिथ्या असून,आकाश निराभास आहे.

उदक पसरे वायो पसरे । आत्मा अत्यंतचि पसरे । तत्वें तत्व अवघेंचि पसरे । अंतर्यामीं ‖ ६ ‖

(तत्वें तत्व - एकंदर तत्वे)

उदक व्यापक होते,वायु व्यापक होतो आणि आत्मा तर अतिशयच व्यापक होतो.अशी सर्वच तत्वे व्यापक होतात ती अंतःकरणास कळतात.

चळतें आणि चळेना तें । अंतरीं अवघेंच कळतें । विवरणेंचि निवळतें । प्राणिमात्रासी ‖ ७ ‖

चालणारे कोण व न चालणारे कोण, हे सर्वच अंतःकरणामध्ये विवरण केल्याने प्राणिमात्रास स्पष्ट कळते.

विवरतां विवरतां सेवटीं । निवृत्तिपदीं अखंड भेटी । जालियानें तुटी । होणार नाहीं ‖ ८ ‖

अशाप्रकारे तत्वांचे विवरण करतां करतां निवृत्तिपदी एकदा भेट झाली की ती अखंडच,तिचा कधीही वियोग व्हावयाचा नाही (विवेकाने तत्वविचार करिता करिता  निवृत्तिपदी एकदा भेट झाली की त्यापासून कधी चळण होत नाही.)

जेथें ज्ञानाचें होतें विज्ञान । आणि मनाचें होतें उन्मन । तत्वनिर्शनीं अनन्य। विवेकें होतें ॥ ९ ॥

त्या ठिकाणी ज्ञानाचे विज्ञान होते, मन उन्मन होऊन जाते आणि विवेकाच्या योगाने तत्वनिरसन झाल्यानंतर त्या निर्गुण पदाशी अनन्यता प्राप्त होते.

वडिलांस शोधून पाहिलें । तों चंचळाचें निश्चळ जालें । देवभक्तपण गेलें । तये ठाइं ॥ १० ॥

(वडिलांस - अंतरात्मा)

वडील जो अंतरात्मा त्याला शोधून पाहतां चंचळाचे निश्र्चळ होते व देव भक्तपण म्हणजे व्दैत त्याठिकाणी नाहीसे होते (तेथेच मावळते)

ठाव म्हणतां पदार्थ नाहीं। पदार्थमात्र मुळीं नाहीं । जैसें तैसें बोलों कांहीं । कळावया ॥ ११ ॥

ठिकाण म्हणावे तर त्याठिकाणी पदार्थ नाही,काहींच पदार्थ नाही (मग बोलायचे कसे?) पण कळण्यासाठी काहीतरी बोलू.

अज्ञानशक्ति निरसली। ज्ञानशक्ति मावळली । वृत्तिशून्यें कैसी जाली । स्थिती पाहा ॥ १२ ॥

अज्ञानवृत्ति नाहीशी होऊन ज्ञानाची (मला कळले ही) वृत्ति मावळल्यानंतर (वृत्तिशून्य झाल्यानंतर) काही स्थिति होते,ह्याचा विचार करा (अज्ञान वृत्तिबरोबर ज्ञान वृत्तीही नाहीशी होऊन निवृत्तिपद उरते चंचळ तेथे आटते.)

मुख्य शक्तिपात तो ऐसा । नाहीं चंचळाचा वळसा । निवांतीं निवांत कैसा । निर्विकारी ॥ १३ ॥

हाच मुख्य शक्तिपात होय.(अज्ञान व ज्ञान दोन्ही शक्ति नाहींशा होऊन) चंचळपणाचा भोवरा (स्फुरण) मुळीच राहात नाही,मायेचा विकार नाहीसा झाल्यावर निर्विकारी असा हा निवांत अशा परब्रह्माच्या ठिकाणी निवांत म्हणजे निश्र्चळ होतो.(चंचळ चक्री फिरणे संपून निर्विकारी हा निवांत होतो.)

चंचळाचीं विकार बालटें । तें चंचळचि जेथें आटे । चंचळ निश्र्चळ घनवटे । हें तों घडेना ॥ १४ ॥

(बालटें - आळ,सद्वस्तुच्या ठिकाणी चंचळ विकाराचा आळ)

ज्या चंचळाचे विकाररूप अनेक भ्रम(बालटे) आहेत ते चंचळ (मूळमायारूप स्फूरण) जेथे नाहीसे होते ते निश्चळ परब्रह्म व हे चंचळ ह्याचे ऐक्य होणे शक्य नाही ( चंचळाचे नानाविध भ्रम चंचळा सवे नष्ट होतात.निश्चळ व चंचळ,प्रकाश व अंधार ह्याप्रमाणे एकरूप होतात असे म्हणता येत नाही)

माहावाक्याचा विचारु । तेथें संन्याशास अधिकारु। दैवीकृपेची जो नरु । तोहि विवरोन पाहे ॥ १५ ॥

तत्वमस्यादि महावाक्याचा विचार करण्याचा अधिकार संन्यासाला आहे.किवा भगवतकृपेला जो पात्र झाला नाही तो ही ह्याचे विवरण करतो.

संन्यासी म्हणिजे शडन्यासी । विचारवंत सर्व संन्यासी । आपली करणी आपणासी । निश्चयेंसीं ॥ १६ ॥

(संन्यासी - षट (६ विकारांचा) गोष्टींचा त्याग करणारे संन्यासी)

संन्यासी म्हणजे सहा(षड) रिपु ह्यांचा ज्याने न्यास म्ह.त्याग केला आहे तो (जितेंद्रिय,वासनारहित),अर्थात सर्व विचारी पुरुष (मग त्यांनी बाह्यत्याग केला असो वा नसो ) संन्याशी होत. आपल्या कर्माचे फळ आपल्याला निश्चये करून भोगावे लागते.

जगदीश वोळल्यावरी । तेथें कोण अनुमान करी । आतां असो हें विचारी। विचार जाणती ॥ १७ ॥

जगदीश्वर प्रसन्न झाल्यानंतर आत्मस्वरूपाच्या प्राप्तीबद्दल कोणाला संशय राहील? असो विचारी असतील त्यांना हा विचार कळेल (परमेश्वर प्रसन झाल्यावर मग अनुमान कोण करील?असो विचारी विचार जाणतात.)

जे जे विचारी समजले । ते ते निःसंग होऊन गेले । देहाभिमानी जे उरले। ते देहाभिमान रक्षिती ॥ १८ ॥

जे जे विचारी पुरुष यथार्थ समजले त्यांना त्यांना नि:संगता प्राप्त झाली.जे देहाभिमानी राहतात ते देहाभिमानाच धरून बसतात.(देहाभिमानी देहाचा अभिमान वाढवीतच राहातात.)

लक्षीं बैसले अलक्ष । उडोन गेला पूर्वपक्ष । हेतुरूपें अंतरसाक्ष । तोहि मावळला ॥ १९ ॥

(हेतुरूपें अंतरसाक्ष तोहि मावळला - हेतुरूप म्हणजे जाणण्याची इच्छा धरून असलेला अंतरात्मा जो,तो मावळला म्हणजे जिवाशिवाचे ऐक्य झाले.)

मग ब्रह्माच्या ठिकाणी जडले (अलक्ष्य परब्रह्म वस्तूच्या ठिकाणी चित्त जडले)( माया) पूर्वपक्ष उडून गेला हेतुरूप म्ह.ब्रह्म जाणण्याची इच्छा धरून बसलेला अंतःसाक्षी जो अंतरात्मा तोही मावळून गेला (जीवा-शिवांचे ऐक्य झाले व शुद्धस्वरूप उरले.)

आकाश आणि पाताळ । दोनी नामें अंतराळ । काढितां दृश्याचें चडळ । अखंड जालें ॥ २० ॥

(चडळ - पडदा)

आकाश व पाताळ ही दोन्ही मिळुन आकाशाचा (अंतराळ), मधला दृश्याचा पडदा (पृथ्वी,चडळ) काढून टाकली तर (आकाश व पाताळ) अखंड एक आकाशच आहे.( अंतरात्मा म्हणजे परब्रह्माचा अंश प्रकृतीमुळे वेगळा पडला होता प्रकृतिनिरसनाने तो एकरूप झाला.)

तें तों अखंडचि आहे । मन उपाधी लक्षून पाहे। उपाधिनिरासें साहे । शब्द कैसा ॥ २१ ॥

आकाश (परब्रह्म) अखंड एकीएकच आहे. पण मनाला उपाधि (प्रकृति) उभी करून पाहण्याची सवय असते तथापि त्या उपाधीचा निरास झाल्यावर मग शब्दच कोठे उरतो? घट मठ ह्या उपाधीचा निरास झाल्यावर घटकाश,मठाकाश हे शब्द प्रयोग कसे संभवतील? ( घट-मठांदि उपाधि आहेत तोवर घटकाश मठाकाशादि शब्दयोजना होते पण उपाधि गेल्यावर शब्दच उरत नाही.)

शब्दपर कल्पनेपर । मन बुद्धि अगोचर । विचारें पाहावा विचार। अंतर्यामीं ॥ २२ ॥

(शब्दपर कल्पनेपर - शब्दातीत,कल्पनातीत)

परब्रह्मवस्तु (गगनासारखी) शब्द व कल्पना ह्या पलीकडची असून मन व बुद्धि ह्यांना न कळणारी आहे ह्याचा अंतःकरणात नीट विचार करावा म्हणजे पाहता पाहता कळून येते.

पाहातां पाहातां कळों येतें । कळलें तितुकें वेर्थ जातें । अवघड कैसें बोलावें तें । कोण्या प्रकारें ॥ २३ ॥

विचार करता कळू लागते पण कळले असे वाटले तेवढे व्यर्थ होय.(कळलेपणाही ब्रह्माच्या ठिकाणी खपत नाही.) ते कठिण आहे,ते कसे व कोणत्या रितीने बोलून दाखवावे?(कळून येते ही भाषाही उरत नाही, का की कळले तितके व्यर्थ जाते.कळतेपणही ब्रह्मी खपत नाही असा तो सूक्ष्म अनुभव शब्दांनी कसा बोलावा?

वाक्यार्थवाच्यांश शोधिला। अलक्षीं लक्ष्यांश बुडाला । पुढें समजोन बोला । कोणीतरी ॥ २४ ॥

महावाक्याचा जो अर्थ तो पाहता पाहता वाच्यांश कळला. त्याचे मनन करता करता लक्षांश उमजला व वाच्यांश उडाला. लक्षांशही परब्रह्म अशावस्तूत बुडून गेला हे ध्यानात घेऊन पुढे कोणीतरी बोला पाहू?(बोलताच येत नाही.) (महावाक्याचा लक्षांशही अलक्षी ब्रह्मरुपी बुडाल्यावर बोलणार कोण?)

शाश्वतास शोधीत गेला । तेणें ज्ञानी साच जाला । विकार सांडून मिळाला । निर्विकारीं ॥ २५ ॥

शाश्र्वताचा शोध घेत गेल्यामुळे ज्ञानी हा खरा ज्ञानी म्हणजे ज्ञानस्वरूप होतो.आणि विकार नाहीसे होऊन निर्विकार परब्रह्म स्थितीत जातो (ज्ञानी शाश्र्वतास शोधता शोधता ज्ञान स्वरूप झाला,विकारत्यागे निर्विकारी मिळाला.)

दुःस्वप्न उदंड देखिलें । जागें होतां लटिकें जालें । पुन्हां जरी आठवलें । तरी तें मिथ्या ॥ २६ ॥

दुःस्वप्न जरी पुष्कळ पहिले तरी जागे झाल्यावर ते खोटेच (ते दुःस्वप्नच मावळते) पुन्हा जरी त्याची आठवण झाली तरी ते खोटे आहे हे माहीत असते.

प्रारब्धयोगें देह असे । असे अथवा नासे । विचार अंतरीं बैसे । चळेना ऐसा ॥ २७ ॥

न ढलणारे आत्मज्ञान झाल्यानंतर प्रारब्धयोग असेल तोपर्यंत देह राहील अथवा जाईल ! (त्याची मातब्बरी काहीच नाही) (अढळपदी ज्ञानी स्थिर झाल्यावर प्रारब्धयोगे देह राहील अथवा जाईल,त्याची पर्वा ज्ञान्याला नाही.)

बीज अग्नीनें भाजलें । त्याचें वाढणें खुंटलें । ज्ञात्यास तैसे जालें । वासनाबीज ॥ २८ ॥

बीज अग्नीने भाजले म्हणजे त्याचे वाढणे खुंटते,त्याप्रमाणे ज्ञात्याचे वासनाबीज ज्ञानाग्नीने दग्ध झाल्यावर पुढे वाढ नाही,त्याचे जन्ममरण संपते.

विचारें निश्चळ जाली बुद्धि । बुद्धिपासीं कार्यसिद्धि । पाहातां वडिलांची बुद्धि । निश्चळीं गेलीं ॥ २९ ॥

ब्रह्मविचाराच्या योगाने बुद्धि निश्र्चळ झाली की त्या बुद्धीपाशीच सर्व कार्यसिध्दी आहे.(आत्मनिश्र्चय बुद्धीने केला की कृतकार्य झाली,चंचळ निमाले.) विचार केल्यास असे दिसून येईल की पूर्वीच्या ज्ञात्यांची (वडिलांची) बुद्धि निश्र्चळ अशा परब्रह्माच्या ठिकाणी लीन झाली होती.

निश्चळास ध्यातो तो निश्चळ ।चंचळास ध्यातो तो चंचळ । भूतास ध्यातो तो केवळ । भूत होये ॥३०॥

(पांचभौतिकांचे ध्यान करणारा पांचभौतिकच राहून जन्ममृत्युवान(पुनर्जन्म) होतो चंचळ अंतरात्म्याचे ध्यान करणारा चंचळ होतो व निश्र्चळ परब्रह्माचे ध्यान करणारा निश्र्चळपद पावतो.) जो निश्र्चळाचे ध्यान करतो तो निश्र्चळ ब्रह्मरूप होतो. जो चंचळ अंतरात्म्याचे ध्यान करतो तो पंचभूतात्मक होतो.

जो पावला सेवटवरी । तयास हें कांहींच न करी । अंतरिनिष्ठा बाजीगरी । तैसी माया ॥ ३१ ॥

(जो शेवटपर्यंत जाऊन निश्र्चळ ब्रह्माला पावला त्या अंतर्निष्ठाला मिथ्या माया काय होय?) शेवटपर्यंत जाऊन जो निश्र्चळ परब्रह्माला पावला अशा ज्ञान्याला हे चंचळ व जड काही बाधा करीत नाही.जाणत्याला गारुड्याच्या तमाशाचे जसे काही होत नाही तसेच अंतरनिष्ठ पुरुषाला माया काहीच करत नाही.

मिथ्या ऐसें कळों आलें । विचारानें सदृढ जालें । अवघें भयेंचि उडालें । अकस्मात ॥ ३२ ॥

माया मिथ्या असे कळले विचाराने ते ज्ञान सदृढ झाले म्हणजे मग सगळे भय एकदम नाहीसे झाले (अभयप्राप्ति झाली)( हा परमलाभ उपासनेने झाला,अंतरात्म्याची उपासना केल्यामुळे निश्र्चळपद मिळाले

उपासनेचें उत्तिर्ण व्हावें । भक्तजनें वाढवावें । अंतरीं विवेकें उमजावें । सकळ कांहीं ॥ ३३ ॥

(हा परमलाभ रामोपासनेच्या योगाने झाला म्हणून) त्या उपासनेचे उतराई व्हावयास पाहिजे ते कसे? तर अंतःकरणामध्ये विवेकाने सर्व काही उमजून घ्यावे,भक्तजने (उपासकाने) उपासना वाढवावी (उपासकांचा समुदाय वाढवावा),अंतःकरणात विवेकाने सर्व ऊमजावे व उपासनामार्ग भक्ताने वाढवावा,उपसना वाढविणे म्हणजेच उपासनेचे उतराई होणे होय.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सिद्धांतनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक पंधरावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक सोळावा - सप्ततिन्वयाचा



(सप्तसप्ति - सूर्य)

**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक सोळावा : सप्ततिन्वय समास पहिला : वाल्मीकि स्तवननिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥**

धन्य धन्य तो वाल्मीक । ऋषीमाजी पुण्यश्लोक । जयाचेन हा त्रिलोक्य । पावन जाला ॥ १ ॥

ज्याच्या योगाने हे त्रैलोक्य पावन झाले व जे ऋषींमध्ये पुण्यश्लोक आहेत असे वाल्मिकी ऋषी धन्य होत.

भविष्य आणी शतकोटी । हें तों नाहीं देखिलें दृष्टीं । धांडोळितां सकळ सृष्टि । श्रुत नव्हे ॥ २ ॥

भविष्य सांगावयाचे व ते शंभरकोट (शतकोटि) श्लोकात वर्णन करून सांगावयाचे अशी अद्भुत गोष्ट आमच्या तरी कधी दृष्टीस पडली नाही आणि (जगाचे वाङ्मय) सर्व सृष्टि धुंडली तरी ऐकावायासही यावयाचे नाही.

भविष्याचें येक वचन । कदाचित जालें प्रमाण । तरी आश्चिर्य मानिती जन । भूमंडळीचे ॥ ३ ॥

भविष्याचे एखादे वचन कदाचित खरे झाले तर जगातील लोकांना त्याचे फार आश्र्चर्य वाटते (पृथ्वीवर त्याचा डांगोरा पिटला जातो)

नसतां रघुनाथ अवतार । नाहीं पाहिला शास्त्राधार । रामकथेचा विस्तार । विस्तारिला जेणें ॥ ४ ॥ऐसा जयाचा वाग्विळास । ऐकोनी संतोषला महेश । मग विभागिलें त्रयलोक्यास । शतकोटी रामायेण॥५॥

रामावताराच्या आधी शास्त्राधार पाहिला नसूनही ज्याने रामकथा इतकी सुंदर वर्णन केली अशा त्या वाल्मिकींचा वाग्विलास (रामायण काव्य) ऐकून शंकरांना संतोष झाला आणि मग त्यांनी शतकोटि तिन्ही लोकात वाटून दिले

ज्याचें कवित्व शंकरें पाहिलें । इतरां न वचे अनुमानलें । रामौपासकांसी जालें । परम समाधान ॥ ६ ॥

ज्यांचे साग्र काव्य शंकरांस फक्त दृष्टीस पडले (त्यांच्या कवित्वाचे पूर्ण रहस्य शंकरास कळले.) इतरास त्याचे अनुमान करता येणार नाही तथापि त्या काव्यामुळे रामभक्तांना परम समाधान होते.

ऋषी होते थोर थोर । बहुतीं केला कवित्वविचार । परी वाल्मीकासारिखा कवेश्वर । न भूतो न भविष्यति ॥ ७ ॥

मोठमोठे ऋषी होऊन गेले,त्यापैकी पुष्कळानी काव्येही केली आहेत,पण वाल्मिकीसारखा कवीश्वर मागे झाला नाही व पुढेही होणार नाही.

पूर्वी केली दृष्ट कर्में । परी पावन जाला रामनामें । नाम जपतां दृढ नेमें । पुण्यें सीमा सांडिली ॥ ८ ॥

पूर्व वयात त्यांच्या हातून क्रूर कर्मे झाली,पण पुढे ते रामनामाने पावन झाले दृढनिश्र्चयाने रामनामाचा जप करता करता (दृढ व्रताने नामस्मरण करिताना) त्यांचे पुण्य अपार वाढले (त्यांच्या पुण्यास सीमा राहिली नाही.)

उफराटे नाम म्हणतां वाचें । पर्वत फुटले पापाचे । ध्वज उभारले पुण्याचे । ब्रह्मांडावरुते ॥ ९ ॥

उलटे नाम (म्ह. म रा) म्हणता म्हणता त्यांचे पापाचे डोंगर भग्न होऊन पुण्याचे ध्वज ब्रह्मांडावर उभारले गेले.

वाल्मीकें जेथें तप केलें । तें वन पुण्यपावन जालें । शुष्क काष्ठीं अंकुर फुटले । तपोबळें जयाच्या ॥१०॥

वाल्मीकींनी ज्या ठिकाणी तप केले ते वन अत्यंत पावन झाले,त्यांच्या तपोबलाने वाळलेल्या काष्ठाला अंकुर फुटले!

पूर्वी होता वाल्हाकोळी । जीवघातकी भूमंडळीं । तोचि वंदिजे सकळीं । विबुधीं आणि ऋषेश्वरीं ॥ ११ ॥

(विबुधीं - विद्वान)

हा पूर्वी माणसे मारणारा वाल्या कोळी होता तोच पुढे सर्व देवांना (मोठमोठ्या ज्ञात्यांना) व ऋषीश्र्वरांना वंद्य झाला.

उपरति आणि अनुताप । तेथें कैंचें उरेल पाप । देहयांततपें पुण्यरूप । दुसरा जन्म जाला ॥ १२ ॥

(देहयांततपें - देहाचा अंत होईतो तप करणे.)

वैराग्य व पश्र्चाताप ह्याच्यापुढे पाप कसे (कोठचे) उरणार? देहान्त व्हावा इतक्या खडतर तपश्र्चर्येने त्याचा पुण्यरूप असा पुनर्जन्म झाला.

अनुतापें आसन घातलें । देहयांचें वारुळ जालें । तेंचि नाम पुढें पडिलें । वाल्मीक ऐसें ॥ १३ ॥

पश्र्चातापाने जे एकदा आसन घातले ते शरीराचे वारूळ झाले (तरी सोडले नाही) (वाल्मीक म्हणजे वारुळ,हयावरून आसनावर तप करिता करिता देहाचे वारुळ झाले त्यावरून त्यांना वाल्मीकी हे नाव पडले.

वारुळास वाल्मीक बोलिजे ।म्हणोनि वाल्मीक नाम साजे । जयाच्या तीव्र तपें झिजे। हृदय तापसाचें॥१४॥

(हृदय - अंतःकरण)

वारुळाला वल्मीक म्हणतात म्हणून वाल्मीकि हे नाव पडले हे योग्यच,त्यांचे तीव्र तप पाहून (तप करणा-याचे) तपस्व्यांचे सुधा हृदय हेलावून गेले.

जो तापसांमाजीं श्रेष्ठ । जो कवेश्वरांमधें वरिष्ठ । जयाचें बोलणें पष्ट । निश्चयाचें ॥ १५ ॥ जो निष्ठावंतांचें मंडण । रघुनाथभक्तांचें भूषण । ज्याची धारणा असाधारण । साधकां सदृढ करी ॥ १६ ॥ धन्य वाल्मीक ऋषेश्वर । समर्थाचा कवेश्वर । तयासी माझा नमस्कार । साष्टांगभावें ॥ १७ ॥

(मंडण - अलंकार)

तो तपस्व्यांमध्ये श्रेष्ठ व कविश्र्वरामध्ये वरिष्ठ ज्याचे बोलणे स्पष्ट व निश्र्चयाचे (असंदिग्ध),जो निश्र्ष्ठावंत रामभक्तांचे भूषण,ज्याची अलोकिक धारणाशक्ति पाहून साधकाची बुद्धि दृढ होते.असा (समर्थाचा) श्रीरामरायाचा कवीश्र्वर वाल्मीकि ऋषि धन्य होय.त्यांना माझा साष्टांग नमस्कार असो.

वाल्मीक ऋषी बोलिला नसता । तरी आम्हांसी कैंची रामकथा । म्हणोनियां समर्था । काय म्हणोनी वर्णावें ॥ १८ ॥

वाल्मीकि ऋषीनी जर रामायण गायले नसते (त्यांनी जर कवित्व केले नसते.) तर आम्हाला रामकथा कोठून मिळती? ह्यास्तव त्या महात्म्याचे वर्णन किती म्हणून सांगावे?

रघुनथकीर्ति प्रगट केली । तेणें तयची महिमा वाढली । भक्त मंडळी सुखी जाली । श्रवणमात्रें ॥ १९ ॥

त्यांनी जगामध्ये रामयश प्रकट केले म्हणून त्यांचे महात्म्य वाढले आणि ती रामकथा ऐकून भक्तमंडळी सुखी झाली ( त्यांनी रामाचे यश ब्रह्मांडात दुमदुमून सोडले,भक्तांना सुखी केले.)

आपुला काळ सार्थक केला । रघुनाथकीर्तिमधें बुडाला । भूमंडळीं उधरिला । बहुत लोक ॥ २० ॥

राम यश गायनामध्येच दंग होऊन त्यांनी आपला काळ सार्थकी लावला (स्वतःच्या जन्माचे सार्थक केले) आणि जगात लोकांचा उद्धार केला (व राम यशात सर्वांना बुडवून त्यांना उद्धरिले)

रघुनाथ भक्त थोर थोर । महिमा जयांचा अपार । त्या समस्तांचा किंकर । रामदास म्हणे ॥ २१ ॥

ज्यांचा महिमा अपार आहे,असे मोठमोठे अनेक रामभक्त होऊन गेले,रामदास म्हणतात मी त्या सर्वांचा दासानुदास आहे ( वाल्मीकीसारखेच दुसरे थोर रामभक्त होऊन गेले त्या सर्वांचा मी रामदास-किंकर म्हणजे दासानुदास आहे)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे वाल्मीकस्तवननिरूपणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : सूर्यस्तवननिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥**

**विषय : सूर्यस्तुती व रामाच्या पूर्वजांची महती**

धन्य धन्य हा सूर्यवौंश । सकळ वौंशामधें विशेष । मार्तंडमंडळाचा प्रकाश । फांकला भूमंडळीं ॥ १ ॥

( मार्तंडमंडळ - सूर्यमंडळ )

सर्व वंशात श्रेष्ठ असा सूर्यवंश परम धन्य होय.( ह्या वंशाचा मूळपूर्वज जो) सूर्यनारायण त्याचा प्रकाश जगभर पसरलेला (भूमंडळावर पसरलाच) आहे.

सोमाआंगीं आहे लांछन । पक्षा येका होय क्षीण । रविकिर्ण फांकता आपण । कळाहीन होये ॥ २ ॥

( सोमाआंगीं - चंद्रबिबावर, पक्षा येका - एका पंधरवड्यात, कळाहीन - निस्तेज )

चंद्रावर डाग आहे,चंद्र कृष्णपक्षात क्षीण होतो व शिवाय सूर्यप्रकाशापुढे तो फिका पडतो.(निस्तेज होतो)

याकारणें सूर्यापुढें । दुसरी साम्यता न घडे । जयाच्या प्रकाशें उजेडे । प्राणीमात्रांसी ॥ ३ ॥

म्हणून सूर्याला दुसरी उपमा देता येत नाही (सूर्याची योग्यता कोणालाच नाही) सूर्यामुळे प्राणिमात्रांना प्रकाश मिळतो.

नाना धर्म नाना कर्मे । उत्तमें मध्यमें अद्धमें । सुगमें दुर्गमें नित्य नेमें । सृष्टीमधें चालती ॥ ४ ॥

अनेक प्रकारची बरी वाईट उत्तम मध्यम कनिष्ठ व बरी वाईट अशी धर्मकर्मे जगामध्ये नित्यनेमाने चालतात ती सूर्यामुळेच (सर्व प्रकारची सोपी अवघड भली व बुरी धर्मकर्मे व नेमधर्म सूर्यामुळे चालतात.)

वेदशास्त्रें आणी पुराणें । मंत्र यंत्र नाना साधनें । संध्या स्नान पूजाविधानें । सूर्येंविण बापुडीं ॥ ५ ॥

वेद,शास्त्रे,पुराणे,मंत्र,यंत्रे,स्नानसंध्या (जपध्याने) पूजाविधानादी अनेक साधने सूर्यावाचून बापुडी दुबळी होत.

नाना योग ना मतें । पाहों जातां असंख्यातें । जाती आपुलाल्या पंथें । सूर्यौदय जालियां ॥ ६ ॥

अनेक योग अनेक मते ही पाहू गेली असता असंख्य आहेत. ती सगळी आपापल्या मार्गानेच सूर्योदय झाल्यावर चालू लागतात.

प्रपंचिक अथवा परमार्थिक । कार्य करणें कोणीयेक । दिवसेंविण निरार्थक । सार्थक नव्हे ॥ ७ ॥

प्रापंचिक अथवा पारमार्थिक कोणतेही कार्य करावयाचे असो दिवस नसेल तर करता येणार नाही (प्रापंचिक व पारमार्थिक कर्मे सर्व काही सूर्योदयाच्या धोरणाने व सूर्यामुळे चालतात.)

सूर्याचें अधिष्ठान डोळे । डोळे नसतां सर्व आंधळे । याकारणें कांहींच न चले । सूर्येंविण ॥ ८ ॥

सूर्याचे अधिष्ठान डोळे नसतील तर सर्व आंधळे होतील.(डोळे नसता सारा अंधारच) व म्हणून सुर्यावाचून काहीच व्यवहार चालत नाही.

म्हणाल अंध कवित्वें करिती । तरी हेहि सुर्याचीच गती । थंड जालियां आपुली मती । मग मतिप्रकाश कैंचा ॥ ९ ॥

(मतिप्रकाश - बुद्धीचे तेज)

आंधळे (सुरदासासारखे अंधही) कविता कशी करतात म्हणाल तर ती सुद्धा सूर्याची शक्ति आहे.(त्यांच्या बुद्धीला प्रकाश देण्यावाचून कोण आहे?) बुद्धि थंड म्ह. तेजोहीन झाल्यावर मग मति प्रकाशित कशी होईल?(बुद्धीत उष्णता तेज न राहील तर त्यांची मति प्रकाशित कशी होईल?)

उष्ण प्रकाश तो सूर्याचा । शीत प्रकाश तो चंद्राचा । उष्णत्व नस्तां देहयाचा । घात होये ॥ १० ॥

सूर्याचा प्रकाश उष्ण असतो व चंद्राचा प्रकाश थंड असतो.देहात उष्णता नसेल तर देह पडतो (देहातील उष्णता गेली की कारभार संपतो.)

याकारणें सूर्येंविण । सहसा न चले कारण । श्रोते तुम्ही विचक्षण । शोधून पाहा ॥ ११ ॥

म्हणून सुर्यावाचून काहीही कार्य सहसा होत नाही श्रोतेहो तुम्ही चतुर आहात नीट विचार करून पहा ( म्हणून सूर्यावीण सहसा काही होत नाही हे विचाराने मनात आणा.)

हरिहरांच्या अवतरमूर्ती । शिवशक्तीच्या अनंत वेक्ती । यापूर्वी होता गभस्ती । आतां हि आहे ॥ १२ ॥

(गभस्ती - प्रभाकर,सविता,सूर्य)

हरिहरांचे व शिवशक्तीचे अनेक अवतार झाले,त्याच्या पूर्वी सूर्य होता व आताही आहे.

जितुके संसारासि आले । तितुके सूर्याखालें वर्तले । अंती देहे त्यागून गेले । प्रभाकरादेखतां ॥ १३ ॥

जितके जन्माला आले तितके सूर्याच्या सत्तेखालीच वागले आणि शेवटी त्याच्याच देखत देह टाकून गेले.(जे जे देह धरून संसारास आले त्या सर्वांनी संसार सूर्याच्या सत्तेखालीच केला व त्याच्या देखत ते देह टाकून गेले.)

चंद्र ऐलीकडे जाला । क्षीसागरी मथून काढिला । चौदा रत्नांमध्ये आला । बंधु लक्षुमीचा ।। १४ ।।

लक्ष्मीचा बंधू जो चंद्र जो अलीकडे क्षीरसागराचे मंथन होऊन,त्यातून जी चौदा रत्ने निघाली त्यात निघालेला आहे.

विश्वचक्षु हा भास्कर । ऐसें जाणती लाहानथोर । याकारणें दिवाकर । श्रेष्ठांहून श्रेष्ठ ॥ १५ ॥

सूर्य हा विश्वाचा डोळा आहे हे लहान थोर जाणतात,म्हणून सूर्य हा श्रेष्ठाहून श्रेष्ठ (सर्वश्रेष्ठ) आहे.

अपार नभमार्ग क्रमणें । ऐसेंचि प्रत्यहीं येणें जाणें । या लोकोपकाराकारणें । आज्ञा समर्थाची ॥ १६ ॥

आकाशाचा अपार मार्ग रोजच्या रोज चालवायचा हे काम लोकोपकारासाठी (परमात्म्याने) सूर्याला लाऊन दिले आहे.

दिवस नस्तां अंधकार । सर्वांसी नकळे सारासार । दिवसेंविण तश्कर । कां दिवाभीत पक्षी ॥ १७ ॥

(दिवाभीत - दिवसाप्रकाशाला घाबरणारे अर्थात घुबड)

(हा सूर्याचा जगावर केवढा उपकार आहे?) दिवस नसेल तर सर्वांचा सारासार विचार नाहीसा होईल.दिवसाशिवाय (रात्री) चोर व दिवाभीते मात्र वावरतात.

सूर्यापुढें आणिक दुसरें । कोण आणावें सामोरें । तेजोरासी निर्धारें । उपमेरहित ॥ १८ ॥

अशा सूर्यापुढे उपमा द्यावयाला दुसरे कोण आणावे? तो खरोखरी निरुपम असा तेजोराशि आहे.(अशा तेजोराशि सूर्यासमोर दुसऱ्या कोणाचे नाव घ्यावे.?)

ऐसा हा सविता सकळांचा । पूर्वज होय रघुनाथाचा । अगाध महिमा मानवी वाचा । काये म्हणोनि वर्णावी ॥ १९ ॥

असा हा सूर्य सर्वांचाच (सर्वोपकारक) आहे,आणि प्रभु श्रीरामरायाचा मूळपुरुष आहे त्याचा अगाध महिमा मनुष्य आपल्या वाणीने किती वर्णन करील?

रघुनाथवौंश पूर्वापर । येकाहूनि येक थोर । मज मतिमंदास हा विचार । काये कळे ॥ २० ॥

रघुनाथाचा वंश अनादि थोर आहे,त्यात एकापेक्षा एक थोर अशा अनेक विभूति झाल्या आहेत.मला बुद्धिमंदाला त्यांचा महिमा काय कळणार?

रघुनाथाचा समुदाव । तेथें गुंतला अंतर्भाव । म्हणोनी वर्णितां महत्व । वाग्दुर्बळ मी ॥ २१ ॥

(अंतर्भाव - अंतरंग)

परंतु श्रीरामाच्या भक्तसमुदायामध्ये (रामभक्तांच्या मेळ्यात) माझे चित्त गुंतल्यामुळे मी वाग्दुर्बळ,त्याचा महिमा वर्णन करायला लागलो(त्याचे वर्णन मी वाग्दुर्बळ कसा करू?)

सकळ दोषाचा परिहार । करितां सूर्यास नमस्कार । स्फूर्ति वाढे निरंतर । सूर्यदर्शन घेतां ॥ २२ ॥

सूर्याला नमस्कार केल्याने सर्व दोषांचा नाश होतो.आणि नित्य सूर्यदर्शन घेतल्याने स्फूर्ति वाढते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूर्यस्तवननिरूपणनाम समास दुसरा ॥**

## समास तिसरा : पृथ्वीस्तवननिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

धन्य धन्य हे वसुमती । इचा महिमा सांगों किती । प्राणीमात्र तितुके राहाती । तिच्या आधारें ॥ १ ॥

(वसुमती - अवनी,धरती)

ही पृथ्वी धन्य होय,हिचा महिमा किती सांगावा? जेवढे म्हणून प्राणी आहेत तेवढे तिच्या आधाराने राहतात.

अंतरीक्ष राहाती जीव । तोहि पृथ्वीचा स्वभाव । देहे जड नस्तां जीव । कैसे तगती ॥ २ ॥

कित्येक जीव (प्राणी) आकाशात राहतात हा सुद्धा पृथ्वीचाच धर्म होय. का की ज्यांचे देह जड (पृथ्वीचे नसते तर ते कसे वाचले असते?

जाळिती पोळिती कुदळिती ।नांगरिती उकरिती खाणती। मळ मूत्र तिजवरी करिती । आणी वमन॥३॥

ह्या पृथ्वीला जाळतात पोळतात कुदळतात.(कुदळीने खणतात),नांगरतात,उकरतात,खणतात,मलमूत्रत्याग किवा वमन (ओकारी) तिच्यावर करतात.

नासकें कुजकें जर्जर । पृथ्वीविण कैंची थार । देहयांतकाळीं शरीर । तिजवरी पडे ॥ ४ ॥

नासके,कुचके,जीर्ण झालेले पदार्थ टाकावायला पृथ्वीवाचून आधार (थार-थारा) कोठला? (देहपात होतो तेव्हा) देह पडला म्हणजे प्रेतही तिच्यावरच ठेवतात.

बरें वाईट सकळ कांहीं । पृथ्वीविण थार नाहीं । नाना धातु द्रव्य तेंहि । भूमीचे पोटीं ॥ ५ ॥

बऱ्यावाईट सर्व पदार्थांना पृथ्वीवाचून (थार-थारा) आधार नाही,अनेक धातू,द्रव्ये पृथ्वीच्या पोटात असतात.

येकास येक संव्हारिती । प्राणी भूमीवरी असती । भूमी सांडून जाती । कोणीकडे ॥ ६ ॥

प्राणी एकमेकाचा संहार करितात पण तोही पृथ्वीच्याच आधाराने,पृथ्वी सोडून ते कोणीकडे जातील?

गड कोठ पुरें पट्टणें । नाना देश कळती अटणें । देव दानव मानव राहाणें । पृथ्वीवरी ॥ ७ ॥

(अटणें - फिरण्यामुळे,पर्यटनाने)

गड,कोट,पुरे,पट्टणे अनेक देश हे सर्व पृथ्वीपर्यटनाने कळतात.देव,दानव,मानव सारे पृथ्वीवरच राहतात.

नाना रत्नें हिरे परीस । नाना धातु द्रव्यांश । गुप्त प्रगट कराव्यास । पृथ्वीविण नाहीं ॥ ८ ॥

रत्ने हिरे परिस वगैरे अनेक रत्ने,अनेक धातु,द्रव्ये वगैरे (बहुमोल पदार्थ) गुप्त किवा प्रकट करण्यास पृथ्वीशिवाय दुसरे कोणी नाही.(बहुमोल पदार्थ पृथ्वीच्या पोटात आहेत व पृथ्वीच ते प्रकट दाखविते.)

मेरुमांदार हिमाचळ । नाना अष्टकुळाचळ । नाना पक्षी मछ व्याळ । भूमंडळीं ॥ ९ ॥

(व्याळ - सर्प)( अष्टकुळाचळ - सात प्रसिद्ध कुलाचल आहेत-महेन्द्रो मलयः सह्यः शक्तिमान मधमादन: । विंध्यश्र्च पारियात्रश्र्च्य सप्तैते कुलपर्वतः ॥ यात मेरुमंदार व हिमाचल मिळून आठ)

मेरू,मंदार,हिमालय इत्यादि अनेक अष्ट कुलपर्वत,तसेच अनेक (नानाविध) पक्षी,मासे (व्याळ) सर्प पृथ्वीवर आहेत.

नाना समुद्रापैलीकडे । भोंवतें आवर्णोदका कडें । असंभाव्य तुटले कडे । भूमंडळाचे ॥ १० ॥

अनेक समुद्रापलीकडे आवरणोदकांचे वेढे आहेत व त्या ठिकाणी पृथ्वीचे प्रचंड कडे तुटलेले आहेत (व मोठमोठे पर्वतांचे तुटलेले कडे हे पृथ्वीवरच आहेत.)

त्यामधें गुप्त विवरें । लाहानथोरें अपारें । तेथें निबिड अंधकारें । वस्ती कीजे ॥ ११ ॥

त्यामध्ये लहान मोठी अनेक भुयारे आहेत की जेथे निबिड अंधकार भरलेला आहे

आवर्णोदक तें अपार । त्याचा कोण जाणे पार । उदंड दाटले जळचर । असंभाव्य मोठे ॥ १२ ॥

अवराणोदक तर अपार भरलेले आहे. त्याचा अंत कोणाला लागणार? त्यात कल्पनातीत मोठमोठाले (पर्वताकार) जलचर भरलेले आहेत.

त्या जीवनास आधार पवन । निबिड दाट आणी घन । फुटों शकेना जीवन । कोणेकडे ॥ १३ ॥

त्या जीवनाला निबिड व घनदाट आवरण वायूचा आधार असल्यामुळे पाणी कोठूनही फुटून जात नाही.

त्या प्रभंजनासी आधार । कठिणपणें अहंकार । ऐसा त्या भूगोळाचा पार । कोण जाणे ॥ १४॥

(कठिणपणें अहंकार - तमोगुणापासून पंचतत्वे झाली अहंकार हाच तमोगुण तो कठीण आहे म्हणजे अज्ञानमूलक आहे.)

त्या (प्रभंजन) वायूला कठिण म्हणजे अज्ञानमूलक अशा अहंकाराचा (तमाचा) आधार आहे.अश्या ह्या भूगोलाचा अंत कोणाला लागणार आहे?

नाना पदार्थांच्या खाणी । धातुरत्नांच्या दाटणी । कल्पतरु चिंतामणी । अमृतकुंडें ॥ १५ ॥

(दाटणी - दाटी)

अनेक पदार्थांच्या खाणी,नानाविध धातु व रत्ने,कल्पवृक्ष,चिंतामणी,अमृताची कुंडे

नाना दीपें नाना खंडें । वसती उद्‌वसें उदंडें । तेथें नाना जीवनाचीं बंडें । वेगळालीं ॥ १६ ॥

(उद्‌वसें - ओसाड)

अनेक बेटे (व्दिपे) खंडे अनेक ओसाड (उव्द्से)मैदाने व गजबजलेली स्थळे पृथ्वीवर आहेत.तसेच अनेक मोठमोठाले जलाशयही आहेत.(त्यात अनेक जलाशयांचे-जीवनाचे विचित्र प्रकार आहेत.)

मेरुभोंवते कडे कापले । असंभाव्य कडोसें पडिलें । निबिड तरु लागले । नाना जिनसी ॥ १७ ॥

(कडोसें - कवडसे,अंधारी जागा)

मेरूपर्वताच्या भोवताली तुटलेले कडे,त्यात (जागोजाग पडलेले विलक्षण कडोसे-कवडसा-सूर्यकिरण) त्यातील अनेक प्रकारचे घनदाट वृक्ष,फार मोठा प्रकाश (संधिप्रकाश,सूर्यकिरण)

त्यासन्निध लोकालोक । जेथें सूर्याचें फिरे चाक । चंद्रादि द्रोणाद्रि मैनाक । माहां गिरी ॥ १८ ॥

(लोकालोक - लोकाकोक पर्वत जेथून सूर्याचा रथ फिरतो,दक्षिणायन सुरु होते.)

त्याजवळच असणारा लोकालोक पर्वत आणि सभोवती फिरणारे सूर्यमंडळ ( चाक,चक्र) तसेच चंद्र,द्रोण,मैनाक इत्यादि प्रचंड पर्वत.

नाना देशीं पाषाणभेद । नाना जिनसी मृत्तिकाभेद । नाना विभूति छंद बंद । नाना खाणी ॥ १९ ॥

(विभूति - राख रक्षा द्रव्य , छंद बंद - गुप्त ठेवा )

अनेक देशातील अनेक जातीचे दगड,अनेक प्रकारची माती,अनेक विभूति (द्रव्ये,रक्षा,भस्मे),(छंद,बंद) गुप्त ठेवी व अनेक खाणी पृथ्वीवर आहेत.

बहुरत्न हे वसुंदरा । ऐसा पदार्थ कैचा दुसरा । अफट पडिलें सैरावैरा । जिकडेतिकडे ॥ २० ॥

अशा अनेक प्रकारच्या रत्नांनी भरलेली (नानाविध रत्नांनी संपन्न अशी) ही पृथ्वी आहे.तिच्यासारखी दुसरी कोणती वस्तु आहे? ती जिकडे तिकडे अफाट पसरलेली आहे.

अवघी पृथ्वी फिरोन पाहे । ऐसा प्राणी कोण आहे । दुजी तुळणा न साहे । धरणीविषीं ॥ २१ ॥

ही सगळी पृथ्वी फिरून पाहील असा प्राणी कोण आहे? ह्या पृथ्वीला दुसरी उपमा शोधत नाही (ही अतुल आहे.)

नाना वल्ली नाना पिकें । देसोदेसी अनेकें । पाहों जातां सारिख्या सारिखें । येकहि नाहीं ॥ २२ ॥

देशोदेशींच्या अनेक वनस्पति व अनेक धान्ये इतकी भिन्न भिन्न आहेत की एकसारखे दुसरे एकही सापडत नाही (भिन्न प्रकारच्या अनंत वनस्पति व धान्ये पसरली आहेत)

स्वर्ग मृत्यु आणिपाताळें । अपूर्व रचिलीं तीन ताळें। पाताळलोकीं माहां व्याळें । वस्ती कीजे ॥ २३ ॥ नान वल्ली बीजांची खाणी । ते हे विशाळ धरणी । अभिनव कर्त्याची करणी । होऊन गेली ॥ २४ ॥

स्वर्ग मृत्यू व पाताळ हे तिन्ही लोक (ताळे) किती अद्भुत बनलेले आहेत? पाताळात अजस्त्र सर्पांची (नागांची) वस्ती आहे. ही विशाळ पृथ्वी म्हणजे अनेक वल्लींची व बीजांची खाण आहे.विधात्याच्या (ब्रह्मदेवाच्या) हातून ही एक अद्भुत रचना (ह्या अद्भुत सृष्टीची रचना) होऊन गेली.

गड कोठ नाना नगरें । पुरें पट्टणें मनोहरें । सकळां ठाईं जगदेश्वरें । वस्ती कीजे ॥ २५ ॥

अनेक (गड) किल्ले (कोट) नगरे,सुंदर सुंदर पुरे,शहरे व पट्टणे ह्या सर्व ठिकाणी जगदीश्वराची वस्ती आहे.

माहां बळी होऊन गेले । पृथ्वीवरी चौताळले । सामर्थ्यें निराळे राहिले । हें तों घडेना ॥ २६ ॥

पृथ्वीवर मोठमोठे बलाढ्य वीर झाले पण त्यांना पृथ्वीवरच पराक्रम गाजवावा लागला,आपल्या सामर्थ्याने पृथ्वी सोडून(म्ह. वेगळी पृथ्वी निर्माण करून राहिले असे मात्र घडले नाही.)

असंभाव्य हे जगती। जीव कितीयेक जाती । नाना अवतारपंगती । भूमंडळावरी ॥ २७ ॥

अशी ही पृथ्वी अफाट आहे.तिच्या पाठीवर कितीतरी (असंख्य) जीव होतात व जातात,अनेक अवतार मालिकाही होऊन गेल्या आहेत.(शेकडो अवतारही होऊन गेले)

सध्यां रोकडे प्रमाण । कांहीं करावा नलगे अनुमान । नाना प्रकारीचें जीवन । पृथ्वीचेनि आधारें ॥ २८ ॥

ह्यात संशय धरण्याचे कारण नाही सध्या प्रत्यक्ष अनुभव आहे.(सांम्प्रतही प्रत्यक्ष आहेत.) पृथ्वीच्याच आधाराने हे सर्व जीव आपले भिन्न भिन्न प्रकारचे जीवन चालवतात.( पृथ्वीच्या आधारे सर्वांना जीवन मिळत आहे,जीव जिवंत राहात आहेत.

कित्तेक भूमी माझी म्हणती ।सेवटीं आपणचि मरोन जाती ।कित्तेक काळ होतां जगती ।जैसी तैसी॥२९॥

ही भूमी माझी असे कित्येक जण म्हणतात व शेवटी स्वतःच मरून जातात असा किती काळ होऊन गेला तरी पृथ्वी मात्र जशीच्या तशी आहे.

ऐसा पृथ्वीचा महिमा । दुसरी काये द्यावी उपमा । ब्रह्मादिकापासुनी आम्हां । आश्रयोचि आहे ॥ ३० ॥

असा पृथ्वीचा महिमा आहे.तिला दुसरी कशाची उपमा द्यावी?,ब्रह्मादिदेवांपासून आम्हापर्यंत सर्वांना तिचाच आधार आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पृथ्वीस्तवननिरूपणनाम समास तिसरा ॥**

## समास चौथा : आपनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

आतां सकळांचे ज्नमस्थान । सकळ जीवांचे जीवन । जयास आपोनारायेण । ऐसें बोलिजे ॥ १ ॥

आता सर्वांचे जन्मस्थान व सर्वांचे जीवन,ज्याला आपोनारायण असे म्हणतात.(त्याचे स्तवन करू.)

पृथ्वीस आधार आवर्णोदक । सप्तसिंधूचें सिंधोदक । नाना मेघीचें मेघोदक । भूमंडळीं चालिलें ॥ २ ॥

(सप्तसिंधूचें - सात नद्या)

पृथ्वीला सप्तसिधूच्या पाण्याच्या आवरणाचा आधार आहे.अनेक मेघातले मेघोदक पृथ्वीवर वाहत असते.(पृथ्वीला सप्तसागरांचे आवरण,वेढा आहे त्यांचे पाणी व मेघोदक पृथ्वीवर वाहात असते.)

नाना नद्या नाना देसीं । वाहात मिळाल्या सागरासी । लाहानथोर पुण्यरासी । अगाध महिमे ॥ ३ ॥

अनेक देशातल्या अनेक नद्या वाहत वाहत समुद्राला मिळालेल्या आहेत.त्या कमी अधिक पुण्यपावन असून त्यांची महात्मेही थोर आहेत.

नद्या पर्वतींहून कोंसळल्या । नाना सांकडिमधें रिचविल्या । धबाबां खळाळां चालिल्या । असंभाव्य ॥ ४ ॥

(सांकडि - कडेकपारी)

नद्या पर्वतावरून कोसळून दऱ्याखोऱ्यात पडतात व अनेक (साकडी,संकटे) अडचणीतून खळखळाटाने व जोरात वाहात जातात.

कूप बावी सरोवरें । उदंड तळीं थोरथोरें । निर्मळें उचंबळती नीरें । नाना देसीं ॥ ५ ॥

(कूप बावी - विहीर)

कुत्रे (आड),विहिरी,सरोवरे,मोठमोठाले अनेक तलाव निर्मळ पाण्याने उचंबळून अनेक प्रदेशातून वाहत जातात.

गायेमुखें पाट जाती । नाना कालवे वाहती । नाना झर्या झिरपती । झरती नीरें ॥ ६ ॥

गायमुखांतून पाट (गायमुखे व पाट) वाहात असतात,अनेक कालवे वाहात असतात अनेक झ-यातून पाणी झिरपत असते.

डुरें विहीरें पाझर । पर्वत फुटोन वाहे नीर । ऐसे उदकाचे प्रकर । भूमंडळीं ॥ ७ ॥

(डुरें - डहुरे , आड,कुवे, लहान विहीर)

डुरे म्ह.डहुरे किवा डबकी,विहिरे म्ह. म्हणजे मोठमोठे पाणदुरे पाझर (टाकी) इत्यादिकातील पाणी पर्वत फोडून वाहात असते.जगामध्ये उदकाचे असे अनेक प्रकार आहेत.

जितुके गिरी तितुक्या धारा । कोंसळती भयंकरा । पाभळ वाहाळा अपारा । उकळ्या सांडिती ॥ ८ ॥

(पाभळ वाहाळा - झरा,ओहोळ,जमिनीतील फवारे/जिव्हाळ)

प्रत्येक डोंगरावरुन पाण्याचे प्रवाह (लोट) भयंकर उसळ्या मारीत असंख्य झरे व ओहोळ भरीत,धावत असतात.

भूमंडळीचें जळ आघवें। किती म्हणोनि सांगावें । नाना कारंजीं आणावें । बांधोनी पाणी ॥ ९ ॥

पृथ्वीवरील सर्व पाण्याचे वर्णन किती म्हणून करावे? (पृथ्वीवरील उदक किती व कसे वाहाते ते सांगावे?) कोठे पाणी बांधून कारंज्यात सोडलेले असते.

डोहो डबके खबाडीं टांकीं । नाना गिरिकंदरीं अनेकीं । नाना जळें नाना लोकीं । वेगळालीं ॥ १० ॥

(डोहो डबके खबाडीं - डोह,डबकी,लहान पाणटाकी,जलस्तोत्र/साठे )

तर अनेक दऱ्याखोऱ्यात अनेक डोह,डबकी,लहानमोठी पाणटाकी ( नागझ-या वगैरे) स्वयंभू असतातच अनेक प्रदेशात भिन्न प्रकारचे पाणी आहे.

तीर्थें येकाहून येक । माहां पवित्र पुण्यदायक । अगाध महिमा शास्त्रकारक । बोलोनि गेले ॥ ११ ॥

एकाहून एक पवित्र व पुण्यदायक व ज्यांचा महिमा शास्त्रकारानी वर्णन केला आहे अशी अनेक तीर्थेही आहेत.

नाना तीर्थांची पुण्योदकें । नाना स्थळोस्थळीं सीतळोदकें । तैसींच नाना उष्णोदकें । ठाईं ठाईं ॥ १२ ॥

ह्या अनेक तीर्थातील पुण्यजले,तसेच कोठे थंडगार पाणी आहे,तर कोठे कोठे उष्णोदके म्ह.उन्हाळी आहेत.

नाना वल्लीमधें जीवन । नाना फळीं फुलीं जीवन । नाना कंदीं मुळीं जीवन । गुणकारकें ॥ १३ ॥

अनेक वल्हीमध्ये,तसेच फळांफुलात,कंदमुळात (अनेक तर्हेने गुणकारक म्ह.) ओषधीतुल्य गुणदायक उदक आढळते.

क्षीरोदकें सिंधोदकें । विषोदकें पीयूषोदकें । नाना स्थळांतरीं उदकें । नाना गुणाचीं ॥ १४ ॥

खारे पाणी,समुद्राचे पाणी,विषारी पाणी,अमृतासारखे गोड पाणी असे अनेक ठिकाणी अनेक प्रकारच्या गुणांचे पाणी असते.(-गुणांची उदके असतात.)

नाना युक्षदंडाचे रस । नाना फळांचे नाना रस । नाना प्रकारीचे गोरस। मद पारा गुळत्र ॥ १५ ॥

( गुळत्र - राब,काकवी,गुळवणी)

अनेक प्रकारचे उसाच्या कांड्यातील रस (अनेक प्रकारच्या स्वादिष्ट) फळांचे रस,गोरस (दुध,तूप,दही) मध पारा गुळत्रय ( राव काकवी गुळवणी इ.) असे अनेक प्रकारचे रस आहेत.

नाना मुक्तफळांचें पाणी । नाना रत्नी तळपें पाणी । नाना शस्त्रामधें पाणी । नाना गुणाचें ॥ १६ ॥

मोत्ये रत्ने व शस्त्रे ह्यावर झळकणारे पाणी,असे पाण्याचे अनेक गुण आहेत.

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद । नाना उदकाचे नाना भेद । विवरोन पाहातां विशद । होत जातें ॥ १७ ॥

(शुक्लीत - वीर्य , श्रोणीत - रक्त)

शोणित(रक्त),शुक्र(रेत),लाळ,मूत्र,(स्वेद) घाम असे पाण्याचे अनेक प्रकार आहेत,विचार केला म्हणजे सर्व समजून येते.

उदकाचे देह केवळ । उदकाचेंचि भूमंडळ । चंद्रमंडळ सूर्यमंडळ । उदकाकरितां ॥ १८ ॥

देह केवळ उद्काचाच बनलेला आहे (सारे देह उदकापासून झाले आहेत) पृथ्वी,चंद्र,सूर्य हे सर्व उदकापासूनच झाले आहेत.

क्षारसिंधु क्षीरसिंधु । सुरासिंधु आज्यसिंधु । दधिसिंधु युक्षरससिंधु । शुद्ध सिंधु उदकाचा ॥ १९ ॥

(क्षारसिंधु) खारा समुद्र दुधाचा (क्षीर) समुद्र,मद्याचा (सुरा) समुद्र,तुपाचा (आज्य) समुद्र,दह्याचा (दधि) समुद्र,उसाच्या रसाचे (इक्षुरस) समुद्र ,गोड्या पाण्याचा (शुद्धोदक) समुद्र (सिधु) असे सात समुद्र उद्काचेच आहेत.

ऐसें उदक विस्तारलें । मुळापासून सेवटा आलें । मधेहि ठाईं ठाईं उमटलें । ठाईं ठाईं गुप्त ॥ २० ॥

आरंभापासून शेवटपर्यंत असे हे सारे उदकच पसरले आहे.मध्येच कोठेकोठे प्रकट होते,कोठे कोठे गुप्त होते.

जे जे बीजीं मिश्रीत जालें । तो तो स्वाद घेऊन उठिलें । उसामधें गोडीस आलें । परम सुंदर ॥ २१ ॥

ते ज्या बिजांत मिसळते,त्याचा स्वाद (गुण) घेऊन उठते,उसाच्या संगतीने गोड होते (कारल्याच्यासंगे कडवट होते.)

उदकाचें बांधा हें शरीर । उदकचि पाहिजे तदनंतर ।उदकचा उत्पत्तिविस्तार ।किती म्हणोनि सांगावा॥२२॥

हे शरीरही उदाकाचेच बनलेले आहे व नंतरही ते जगण्याला उदकच पाहिजे.(शरीर हे उदकाचे बनलेले आहे,उदकाने वाढते,उदकापासून काय काय झाले आहे ते किती म्हणून सांगावे.?

उदक तारक उदक मारक । उदक नाना सौख्यदायक । पाहातां उदकाचा विवेक । अलोलीक आहे ॥ २३ ॥

उदक तारक आहे व मारकही आहे अनेक प्रकारचे सुख देणारे तेच आहे,अशी उदकाची अद्भुत लीला आहे.(उदक अत्यंत सौख्यदायक उदक ही अत्यंत अमौलिक वस्तु आहे असे विचारांती वाटते.)

भूमंडळीं धांवे नीर । नाना ध्वनी त्या सुंदर । धबाबां धबाबां थोर । रिचवती धारा ॥ २४ ॥

पृथ्वीवर चहूकडे पाणी धावते तेव्हा त्याचा ध्वनीही किती सुंदर असतो? धो धो धारा पडत असतात.

ठाईं ठाईं डोहो तुंबती । विशाळ तळीं डबाबिती । चबाबिती थबाबिती । कालवे पाट ॥ २५ ॥

जागोजाग डोह भरलेले असतात,विशाळ तळी तुडुंब भरून वाहतात.कालवे व पाट झळझळ खळखळ भरून वाहत असतात.(मंद ध्वनीने धावतात)

येकि पालथ्या गंगा वाहाती । उदकें सन्निधचि असती । खळाळां झरे वाहाती । भूमीचे पोटीं ॥ २६ ॥

( खळाळां - झुळूझुळू )

कित्येक नद्या पालथ्या वाहतात, त्यांच्या जवळपास कोठेही जरा खणले की पाणी सापडते (वाहू लागते) जमिनीच्या पोटातून (निर्झरोधकाचे पाट म्ह. सुंदर ) झरे सैरावैरा धावतात.-खळखळ वाहत असतात.

भूमीगर्भी डोहो भरलें । कोण्ही देखिले ना ऐकिले । ठाईं ठाईं झोवीरे जाले । विदुल्यतांचे ॥ २७ ॥

(झोवीरे - झरे)

जमिनीच्या पोटात मोठमोठे डोह भरलेले आहेत (भूगर्भात मोठाले जलाशय भरले आहेत.) ते कोणी ऐकलेले नाहीत व पाहिलेलेही नसतात,वीज पडून कोठे कोठे (झोवीरे) झरे झाले (निघाले) आहेत.

पृथ्वीतळीं पाणी भरलें । पृथ्वीमधें पाणी खेळे । पृथ्वी प्रगटलें । उदंड पाणी ॥ २८ ॥

पृथ्वीच्या खाली पाणी भरलेले आहे,पोटात खेळत आहे व वर जिकडे तिकडे पाणी प्रकट झाले आहे,असे खूप पाणीच पाणी भरलेले आहे.

स्वर्गमृत्यपाताळीं । येक नदी तीन ताळीं । मेघोदक अंतराळीं । वृष्टी करी ॥ २९ ॥

स्वर्ग मृत्यू पातळ ह्या तिन्ही लोकात एकच महानदी भरून वाहत आहे.,मेघोदकांची अंतराळातून वृष्टी होते.

पृथ्वीचें मूळ जीवन । जीवनाचें मूळ दहन । दहनाचें मूळ पवन । थोराहून थोर ॥ ३० ॥

पृथ्वीचे मूळ पाणी (जीवन),पाण्याचे मूळ अग्नि व अग्नीचे मूळ वायु असे हे एकाहून एक थोर आहेत.

त्याहून थोर परमेश्वर । महद्भूतांचा विचार । त्याहून थोर परात्पर । परब्रह्म जाणावें ॥ ३१ ॥

महद्भूत असा परमेश्वर (मूळमाया) हा ह्या सर्वाहून थोर आहे आणि परात्पर परब्रह्म हे त्या परमेश्र्वरापेक्षाही थोर आहे (पृथ्वीचे मूळ पाणी,पाण्याचे मूळ अग्नि, अग्नीचे मूळ वायु,वायुहून परमेश्वर (आकाश अंतरात्मा)श्रेष्ठ आहे.हा महद्भूतांचा विचार झाला.त्याहूनही परात्पर परब्रह्म थोर आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आपनिरूपणनाम समास चौथा ॥**

### समास पांचवा : अग्निनिरूपण

धन्य धन्य हा वैश्वानरु । होये रघुनाथाचा श्वशुरु । विश्वव्यापक विश्वंभरु । पिता जानकीचा ॥ १ ॥

श्रीरामांचा सासरा म्ह. जानकीदेवीचा पिता विश्र्वव्यापक व विश्र्वाचे पोषण करणारा असा हा अग्नि परम धन्य होय.(हा वैश्र्वानर परम धन्य होय. श्रीरामचंद्राचा सासरा म्ह. जानकीदेवीचा पिता होय.) सीता हरणापूर्वी तिला अग्निच्या स्वाधीन केले व भासमय सीता रावणास सामोरी गेली अशी कथा आहे.

ज्याच्या मुखें भगवंत भोक्ता । जो ॠषीचा फळदाता । तमहिमरोगहर्ता । भर्ता विश्वजनाचा ॥ २ ॥

(भर्ता - पालनहार)

(हा विश्र्वव्यापक विश्र्वंभर आहे.) त्याच्या मुखाने भगवान हविर्भोग (हविषान्य) ग्रहण करतात,यज्ञयागादि प्रसंगाने तो ऋषींना सुफलदायक होतो.असा हा विश्र्वपोषक अग्नि अंध:कार (तम) थंडी(हिम) व रोग ह्यांचे हरण करणारा (निवारणारा) आहे.

नाना वर्ण नाना भेद । जीवमात्रास अभेद । अभेद आणी परम शुद्ध । ब्रम्हादिकासी ॥ ३ ॥

अनेक वर्णांचे अनेक भेद असले तरी जीवमात्राला,फार काय ब्रह्मादि देवानासुद्धा अग्नि हा अभेद म्हणजे एकसारखा व परमशुद्ध आहे.(वर्णादि अनेक भेद असले तरी जीवाना व ब्रह्मादिकांना हा अभेद म्ह.एकरूप आहे.)

अग्नीकरितां सृष्टी चाले । अग्नीकरितां लोक धाले । अग्नीकरितां सकळ ज्याले । लाहानथोर ॥ ४ ॥

अग्नि आहे म्हणून सर्व सृष्टी चालते,लोक भोजन करून तृप्त होतात (अग्नीमुळे) व अग्नी (अंगात) आहे म्हणून सर्व लहानथोर प्राणी जिवंत राहतात.

अग्नीनें आळलें भूमंडळ । लोकांस राहव्या जालें स्थळ । दीप दीपिका नाना ज्वाळ । जेथें तेथें ॥ ५ ॥

अग्नीने आळून हा भूगोल तयार झाला (उभा केला) व लोकांना राहावायला जागा झाली (जीवांना राहावयाला स्थळ मिळाले) दिवे दिवट्या वगैरे (लहान मोठे दीप व ज्वाळ) अनेक प्रकारचे प्रकाश सर्वत्र अग्नीमुळेच मिळतात.

पोटामधें जठराग्नी । तेणें क्षुधा लागे जनीं । अग्नीकरितां भोजनीं । रुची येते ॥ ६ ॥

पोटात जठराग्नि आहे म्हणून लोकांना भूक लागते अग्नी आहे म्हणून जेवणात रुचि येते.

अग्नी सर्वांगीं व्यापक । उष्णें राहे कूणी येक । उष्ण नस्तां सकळ लोक । मरोन जाती ॥ ७ ॥

अग्नी सर्वांगात व्यापून राहिला आहे,उष्णता आहे म्हणून कोणीही जिवंत राहतो (तोवर लोक जगतात.) उष्णता नसेल तर लोक मरून जातील ( उष्णता गेली की लोक मरतात.)

आधीं अग्नी मंद होतो । पुढें प्राणी तो नासतो । ऐसा हा अनुभव येतो । प्राणीमात्रांसी ॥ ८ ॥

अगोदर जठराग्नि मंद होतो मग लगेच प्राण्याची प्रकृति बिघडते हा अनुभव प्रत्येक प्राण्याला आहेच (अग्निमांद्य झाले की लोक मृत्युमार्गाला लागतात ह्याचा अनुभव सर्वांना येतो.)

असतां अग्नीचें बळ । शत्रु जिंके तात्काळ । अग्नी आहे तावत्काळ । जिणें आहे ॥ ९ ॥

दारूगोळ्याचे बळ असल्यास शत्रूला ताबडतोब जिंकता येते (अग्नीच्या बळावर शत्रूंना मारता येते.) तात्पर्य अग्नि आहे तोपर्यंतच जगणे आहे.

नाना रस निर्माण जाले । अग्नीकरितां निपजले । माहांरोगी आरोग्य जाले । निमिषमात्रें ॥ १० ॥

मोठमोठे अनेक प्रकारचे रस ओषधी रस अग्नीमुळे तयार झाले असून त्या ओषधीच्या सहाय्याने मोठमोठे रोगी तत्काळ निरोगी झाले आहेत.

सूर्य सकळांहून विशेष । सूर्याउपरी अग्नीप्रवेश । रात्रभागीं लोक अग्नीस । साहें करिती ॥ ११ ॥

सगळ्याहून सूर्य श्रेष्ठ आहे पण सूर्यावर अग्निप्रकाश आहे अंधाऱ्या रात्री लोक अग्नीचे सहाय्य घेतात.

अंत्यजगृहींचा अग्नी आणिला । त्यास दोष नाहीं बोलिला । सकळां गृहीं पवित्र जाला । वैश्वानरु ॥ १२ ॥

महाराच्या घरातून अग्नि आणला तरी दोष नाही सर्वांच्या घरातील अग्नि (वैश्र्वानर) पवित्रच आहे.

अग्नीहोत्र नाना याग । अग्नीकरितां होती सांग । अग्नी त्रुप्त होतां मग । सुप्रसन्न होतो ॥ १३ ॥

अग्निहोत्रे तसेच अनेक यज्ञयाग अग्नीमुळे यथासांग होतात,अग्नि तृप्त झाला म्हणजे मग सुप्रसन्न होतो.

देव दानव मानव । अग्नीकरितां चाले सर्व । सकळ जनासी उपाव । अग्नी आहे ॥ १४ ॥

देव,दानव व मानव ह्या सर्वांचे सारे व्यवहार अग्नीमुळे चालतात,सगळ्या लोकांना (जिवंत राहण्याला) अग्नि हाच उपाय आहे.

लग्नें करिती थोर थोर । नाना दारूचा प्रकार । भूमंडळीं यात्रा थोर । दारूनें शोभती ॥ १५ ॥

मोठमोठे श्रीमंत लग्ने करतात,त्यात अनेक प्रकारचे दारुकाम उडवितात.यात्रादि मोहोत्सवांना दारुने शोभा येते(हा सारा अग्नीचा प्रभाव)

नाना लोक रोगी होती । उष्ण औशधें सेविती । तेणे लोक आरोग्य होती । वन्हीकरितां ॥ १६ ॥

अनेक लोक रोगी होतात,तेव्हा ते उष्ण ओषधे घेतात,त्यातील अग्नीमुळेच आरोग्य मिळते.(पुष्कळ रोगी उष्ण ओषधांनी निरोगी होतात,अग्नीमुळेच आरोग्य आहे.)

ब्रह्मणास तनुमनु । सूर्यदेव हुताशनु । येतद्विषईं अनुमानु । कांहींच नाहीं ॥ १७ ॥

ब्राह्मणाचे तनमन म्हणजे सर्वस्व सूर्य व अग्नि हे होत ह्यात काही शंका नाही.

लोकामध्यें जठरानळु । सागरीं आहे वडवनाळु । भूगोळाबाहेर आवर्णानळु । शिवनेत्रीं विद्युल्यता ॥ १८ ॥

पाण्यात जठरानळ,समुद्रांत वडवानळ,पृथ्वीच्या बाहेर आवरणानळ,शंकराच्या नेत्रांतील अग्नी व वीज (ही सारी अग्नीची रूपे होत.)

कुपीपासून अग्नी होतो । उंचदर्पणीं अग्नी निघतो । काष्ठमंथनी प्रगटतो । चकमकेनें ॥ १९ ॥

(काचभिंग किंवा बहिर्गोल आरशातून अग्नी निर्माण होतो.)

कुपीपासून (काचेपासून) अग्नि निघतो,उंची आरशांतून किंवा लाकडावर लाकूड घासल्यास (काष्ठमंथनाने) अथवा चकमक झाडल्याने अग्नि उत्पन्न होतो.

अग्नी सकळां ठाईं आहे । कठीण घिसणीं प्रगट होये । आग्यासर्पें दग्ध होये । गिरिकंदरें ॥ २० ॥

अग्नि सर्व ठिकाणी आहे पण जोराने घर्षण झाले म्हणजे प्रकट होतो.आग्या सर्पाच्या फुत्कारांनी गिरिकंदरे जळून जातात (डोंगर पेटतात)

अग्नीकरितां नाना उपाये । अग्नीकरीतां नाना अपाय । विवेकेंविण सकल होये । निरार्थक ॥ २१ ॥

अनेक उपाय किंवा अपाय दोन्हीही अग्नीमुळेच होतात.विचारापासून सर्व व्यर्थ होय.

भूमंडळीं लाहानथोर । सकळांस वन्हीचा आधार । अग्निमुखें परमेश्वर । संतुष्ट होये ॥ २२ ॥

पृथ्वीवरील लहानथोर सर्वांनाच अग्नीचा आधार आहे,अग्नीच्या मुखाने ( अग्नीत यज्ञाहुति टाकल्याने परमेश्र्वर प्रसन्न होतो.)

ऐसा अग्नीचा महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा । उत्तरोत्तर अगाध महिमा । अग्नीपुरुषाचा ॥ २३ ॥

असा अग्नीचा महिमा मोठा आहे,जी उपमा द्यावी ती कमीच पडते.ह्या अग्निनारायणाचा महिमा उतरोत्तर (विचार करावा तसतसा) अगधाच दिसतो (अधिकच वाढत जातो)

जीत असतां सुखी करी । मेल्यां प्रेत भस्म करी । सर्वभक्षकु त्याची थोरी । काये म्हणोनी सांगावी ॥२४॥

मनुष्य जिवंत आहे तोवर अग्नी नाना सुखे देतो मेल्यावर प्रेत जाळून भस्म करितो,सर्वभक्षकच तो त्याची थोरवी किती सांगावी?

सकळ सृष्टीचा संव्हार । प्रळय करी वैश्वानर । वैश्वानरें पदार्थमात्र । कांहींच उरेना ॥ २५ ॥

अग्नि हाच प्रळय करून सगळ्या सृष्टीचा नाश करतो.(सर्व सृष्टीचा नाश प्रळयाग्नि करतो.) त्याच्यामुळे कोणताही पदार्थ शिल्लक राहात नाही.

नाना होम उदंड करिती । घरोघरीं वैशदेव चालती । नाना क्षेत्रीं दीप जळती । देवापासीं ॥ २६ ॥

अनेक होम पुष्कळ जण करतात घरोघर वैश्र्वदेव करतात,अनेक क्षेत्रांमध्ये देवाजवळ नंदादीप असतात.

दीपाराधनें निलांजनें । देव वोवाळिजे जनें । खरें खोटें निवडणें । दिव्य होतां ॥ २७ ॥

लोक दीपमाळ लावतात,देवाला निरांजने ओवाळतात.खरे खोटे निवडावयाच्या वेळी दिव्य करतात (ही सारी अग्नीमुळे होतात.)

अष्टधा प्रकृती लोक तिन्ही । सकळ व्यापून राहिला वन्ही । अगाध महिमा वदनीं । किती म्हणोनि बोलावा ॥ २८ ॥

अष्टधा प्रकृति व तिन्ही लोक ह्या सर्वांना अग्नि व्यापक आहे (अग्नी व्यापून राहिला आहे.) त्याचा महिमा अगाध आहे,तो तोंडाने किती म्हणून सांगावा?

च्यारी श्रृंगें त्रिपदीं जात । दोनी शिरें सप्त हात । ऐसा बोलिला शास्त्रार्थ । प्रचितीविण ॥ २९ ॥

(४ श्रुगे- ४ शिंगे- धर्म,अर्थ,काम,मोक्ष)(३ पाय- कर्म,उपासना,ज्ञान)(२ शिरे - प्रवृत्ती,निवृत्ती)(७ हात - भू:, भूवा: , स्वः आदी सात)

अग्नीला चार शिगे,तीन पाय,दोन मस्तके व सात हात आहेत असे शास्त्रात वर्णन केले आहे ते काय अनुभवावाचून केले आहे?

ऐसा वन्ही उष्णमूर्ती । तो मी बोलिलों येथामती । न्यून्यपूर्ण क्षमा श्रोतीं । केलें पाहिजे ॥ ३० ॥

अशा उष्णतारूप अग्नीचे यथामति वर्णन केले आहे.त्यात कमीजास्त असल्यास श्रोत्यांनी क्षमा करावी.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अग्निनिरूपणनाम समास पांचवा ॥**

## समास सहावा : वायुस्तवन ॥ श्रीरामसमर्थ ॥

धन्य धन्य हा वायुदेव । याचा विचित्र स्वभाव । वायोकरितां सकळ जीव । वर्तती जनीं ॥ १ ॥

हा वायुदेव धन्य होय,ह्याचा स्वभाव विचित्र आहे.ह्याच्यामुळे (हा आहे म्हणून) सगळे जीव जगात वावरतात (वागतात)

वायोकरितां श्वासोश्वास । नाना विद्यांचा अभ्यास । वायोकरितां शरीरास । चळण घडे ॥ २ ॥

श्र्वासोच्छवास करणे,विद्याभ्यासादिक क्रिया करणे किवा शरीराची हालचाल (व्यापार) करणे हे सर्व वायूमुळेच होते.

चळण वळण प्रासारण । निरोधन आणी आकोचन । प्राण अपान व्यान उदान । समान वायु ॥ ३ ॥

चलन वलन ( चळण वळण),प्रसारण (पसरणे) निरोधन (विरोध होणे),आकुंचन (आखंडणे) हे वायूचे पांच प्रकार होत.प्राण,अपान,व्यान,उदान व समान हे वायूचे प्राणपंचक होय.(चलन म्ह चालणे,वलन म्ह.वळणे,धावन म्ह.धांवणे,प्रसारण म्ह.पसरण,आकुंचन म्ह.आंखडणे ही वायूची पाच तत्वे किंवा धर्म आहेत.आता वायूचे प्राणपंचक पाहा (प्राण हा जीवाच्या हृदयस्थानी राहतो दिवस-रात्र दिवस-रात्र २१६०० श्र्वासोच्छवास हे हयाचे कर्म)(१- प्राण-हृदयस्थान, श्र्वासोच्छवास ही त्याची क्रिया २-आपन-स्थान गुद व क्रिया मल्लोत्सर्ग ३-व्यान स्थान सर्वांग व क्रिया देहातील सा-या देहातील सा-या सांध्यांचे चलन वलन ४-उदान-स्थान कंठ व क्रिया अन्नरसाचे विभाग करणे,हितानामक नाडीतून उचकी उत्पन्न करणे व स्वप्न पाडणे.समान-स्थान नाभी व क्रिया नाड्यांच्या व्दारे सर्व शरीरभर-रोमारोमांत-अन्नरस पोहचवणे.)

नाग कूर्म कर्कश वायो । देवदत्त धनंजयो। ऐसे हे वायोचे स्वभावो । उदंड असती ॥ ४ ॥

नागादि पंचउपप्राण आहेत.नागापासून ढेकर येते,कुर्मापासून डोळ्यांची उघडझाप होते,कृकलापासून शिंक येते,देवदत्तापासून जांभई येते व धनंजय शरीर पुष्ट करितो व प्रेतात असून ते फुगवतो.(१- नाग (ढेकर येणे,२ - कूर्म-पापण्यांची-डोळ्यांची-उघड झांप ३ - कृकल (शिंकणे) ४ - देवदत्त (जांभई येणे) ५- धनंजय (शरीर पुष्ट करणे व प्रेतात राहून फुगवणे) हे पंच उपप्राण आहेत,असे वायूचे अनेक प्रकारचे स्वभाव आहेत.

वायो ब्रह्मांडीं प्रगटला । ब्रह्मांडदेवतांस पुरवला । तेथुनी पिंडी प्रगटला । नाना गुणें ॥ ५ ॥

वायु आधी ब्रह्मांडात प्रकट झाला,नंतर ब्रह्मांडदेवतांस पुरून मग पिंडामध्ये अनेक प्रकाराने प्रकट झाला.

स्वर्गलोकीं सकळ देव । तैसेचि पुरुषार्थी दानव । मृत्यलोकींचे मानव । विख्यात राजे ॥ ६ ॥

स्वर्गलोकातील सर्व देव,तसेच पराक्रमी दानव,मृत्यूलोकातील मानव व प्रसिद्ध राजे (राजापासून रंकापर्यंत सारे मानव)

नरदेहीं नाना भेदे । अनंत भेदाचीं श्वापदें । वनचरें जळचरें आनंदें । क्रीडा करिती॥ ७॥

नरदेहातील अनेक भेद,श्र्वापदातील अनेक जाति,तसेच आनंदाने क्रीडा करणारी वनचरे,जळचरे,खेचरे (इ.सर्व प्राण्यात)

त्या समस्तांमधें वायु खेळे । खेचरकुळ अवघें चळे । उठती वन्हीचे उबाळे । वायोकरितां ॥ ८॥

(खेचरकुळ - पक्षी समुदाय)

त्या सर्वांमध्ये वायु खेळत असतो.सर्व पक्षी (खेचर) हालचाल करतात ती वायुमूळेच होय.वायूमुळेच अग्नीचे लोट (उबाळे) उठत असतात.

वायो मेघाचें भरण भरी। सवेंच पिटून परतें सारी । वायो ऐसा कारबारी । दुसरा नाहीं ॥ ९ ॥

वायु मेघांत वाफ भरून तयार करतो आणि लगेच त्यांना धक्के देऊन दूर करतो (वायूच त्यांना ढकलून पाणी पाडतो व पुन्हा रिकामे करतो.),दुसरा कोणीच नाही.

परी ते आत्मयाची सत्ता । वर्ते शरीरीं तत्वता । परी व्यापकपणें या समर्था । तुळणा नाहीं ॥ १० ॥

परंतु त्या आत्म्याच्या सत्तेनेच वायु शरीरात वागतो.(नाना खेळ करितो),पण व्यापकपणाच्या बाबतीत ह्या समर्थ वायूच्या बरोबरीला दुसरा कोणी नाही.

गिरीहून दाट फौजा । मेघ उठिले लोककाजा । गर्जगर्जों तडक विजा । वायोबळें ॥ ११ ॥

(लोककाजा - लोकांच्या कामासाठी,कल्याणांसाठी)

लोकांच्या कार्यासाठी पर्वताच्या शिखरावरून मेघाच्या घनदाट फौजा बाहेर पडतात व विजांचा कडकडाट करितात,तो सारा वायूचा प्रभाव होय.

चंद्रसूर्य नक्षत्रमाळा । ग्रहमंडळें मेघमाळा । यें ब्रह्मांडीं नाना कळा । वायोकरितां ॥ १२ ॥

चंद्र,सूर्य,नक्षत्रमाळा,ग्रहमंडळे (तारांगणे),मेघपंक्ति हे जे ह्या ब्रह्मांडात अनेक चमत्कार आहेत ते सर्व वायूमुळेंच आहेत.

येकवटलें तें निवडेना । कालवलें तें वेगळें होयेना । तैसें हे बेंचाड नाना । केवी कळे ॥ १३ ॥

(बेंचाड - गुंता)( केवीकळे - कसा कळणारा)

पंचभूते जी निवडता येणार नाहीत व वेगळी करता येणार नाहीत,अशी एकत्र मिसळली आहेत ती वायूमुळेच होत असे हे बेचाड (जुंबाड-गुंतागुंत) उकलता येणार नाही असे हे झाले आहे ते वायूमुळेच (पंचभूतांचा हा जो खिचडा झाला आहे की ज्यांतून ती वेगवेगळी करून दाखविता येत नाहीत,ते सारे बेचाड-जुंबाड कालवाकालव वायूमुळेच होय.)

वायो सुटे सरारां । असंभाव्य पडतीगारा । तैसे जीव हे नीरा । सरिसे पडती ॥ १४ ॥

(नीरा सरिसे - पावसाबरोबर)

भूमीवर सोसाट्याचा वारा सुटतो,गारांची प्रचंड वृष्टि होते,त्याचप्रमाणे पावसातून अनेक जीव पडतात (ते वायूमुळेच)

वायुरूपें कमळकळा । तोचि आधार जळा । तया जळाच्या आधारें भूगोळा । शेषें धरिलें ॥१५ ॥

वायुरूप कमळाचा कळा हा जळाचा आधार आहे. त्या जळाच्या आधाराने शेषाने भूगोल मस्तकी धरला आहे.

शेषास पवनाचा आहार । आहारें फुगे शरीर । तरी मग घेतला भार । भूमंडळाचा ॥१६॥

शेषाला वायूचा आहार असून त्या आहाराने त्याचे शरीर पुष्ट होते व त्यामुळे त्याला भूगोलाचे ओझे उचलता येते.( शेष वायु भक्षण करून पुष्ट होतो व म्हणून भूगोल धारणेस समर्थ होतो.)

माहांकूर्माचें शरीर भलें । नेणों ब्रह्मांड पालथें घातलें । येवढें शरीर तें राहिलें । वायोचेनि ॥ १७॥

सर्व ब्रह्मांडास पालथें घालावे असे विस्तीर्ण महाकुर्माचे शरीर आहे एवढे मोठे ते शरीर वायूमुळेच राहिले (महाकुर्माचे शरीर वायूमुळेच प्रचंड होऊन त्याने ब्रह्मांड पालथें घातले.)

वाराहें आपुलें दंतीं । पृथ्वी धरिली होती । तयाची येवढी शक्ती । वायुबळें ॥ १८ ॥

वराहाने आपल्या दातावर पृथ्वी धारण केली ही ही शक्ति वायूमुळेच होय.

ब्रह्म विष्णु महेश्वर । चौथा आपण जगदेश्वर । वायोस्वरूप विचार । विवेकी जाणती ॥ १९ ॥

(वायोस्वरूप विचार - हे सर्व देव वायुस्वरूप असतात.)

ब्रह्मा,विष्णु,महेश्र्वर व चौथा अंतरात्मा हे वायुरुपीच आहेत हे विचारशील लोकांना माहीत आहेच.

तेतिस कोटी सुरवर । अठ्यासि सहस्र ऋषेश्वर । सिध योगी भारेंभार । वायोकरितां ॥ २० ॥

तेहतीस कोटि देव,अठ्यांशी हजार ऋषि, सहस्रावधि सिध्द,योगी हे सर्व वायूमुळेच आहेत.(हे सारे पुरे वायुरूप आहेत.)

नव कोटी कात्यायणी । छेपन कोटी च्यामुंडिणी । औट कोटी भूतखाणी । वायोरूपें ॥ २१॥

नऊ कोटि कात्यायनी,छप्पन्न कोटि चामुंडा,साडेतीन कोटि भूते (भूतयोनीतले प्राणी) ही सर्व वायुरूपच आहेत.

भूतें देवतें नाना शक्ती । वायोरूप त्यांच्या वेक्ती । नाना जीव नेणो किती । भूमंडळीं ॥ २२ ॥

भूते,देवते,अनेक शक्ति ही वायुरुपच आहेत.ह्या पृथ्वीवर किती जीव वायूरूप आहेत हे कोणी सांगावे?

पिंडीं ब्रह्मांडीं पुरवला । बाहेर कंचुकास गेला । सकळां ठाईं पुरवला । समर्थ वायु ॥ २३ ॥

पिंडात व ब्रह्मांडात भरून ब्रह्मांडाबाहेर त्याला आवरण (कंचुक) करण्याला गेला असा हा समर्थ वायु सर्व ठिकाणी भरून राहिला आहे.

ऐसा हा समर्थ पवन । हनुमंत जयाचा नंदन । रघुनाथस्मरणीं तनमन । हनुमंताचें ॥ २४ ॥

असा हा वायु परम समर्थ आहे.त्याचा पुत्र हनुमान,हनुमानाने आपले तन,मन श्रीरामस्मरणामध्ये अर्पण केले (रामचरणी अर्पिले)

हनुमंत वायोचा प्रसिद्ध । पित्यापुत्रांस नाहीं भेद । म्हणोनि दोघेहि अभेद । पुरुषार्थविषीं ॥ २५ ॥

हनुमंत हा वायूचा पुत्र हे प्रसिद्ध आहे.बापलेकात भेद नाही, म्हणून दोघेही पराक्रमात अगदी सारखे आहेत.(बापासारखाच प्रसिद्ध व तसाच पराक्रमी हा पुत्र बापाहून अणुभर कमी नाही दोघे अगदी अभेद एकरूप आहेत.)

हनुमंतास बोलिजे प्राणनाथ । येणें गुणें हा समर्थ । प्राणेंविण सकळ वेर्थ । होत जातें ॥ २६ ॥

हनुमंताला प्राणनाथ म्हणतात ह्यावरून त्याचे सामर्थ्य सिद्ध आहे.प्राणावाचून सर्व व्यर्थच आहे.

मागें मृत्य आला हनुमंता । तेव्हां वायो रोधला होता । सकळ देवांस आवस्ता । प्राणांत मांडलें ॥ २७ ॥

(मारुतिराय जन्मल्या बरोबर सूर्यबिंब ग्रासायला धावले तेव्हा इंद्राने त्याजवर वज्र फेकले,ते वज्र हनुवटीला लागले तेव्हा) हनुमंताला मूर्च्छना येऊन त्याचा मृत्यु झालासे (मृत्यूच जवळ आला असे) वाटले होते, तेव्हा वायूदेवाने ब्रह्मांडातील सर्व प्राण आकर्षण केला,त्यामुळे देवांवर प्राणांत प्रसंग ओढवला (सर्व देव घाबरले होते.)

देव सकळ मिळोन । केलें वायुचें स्तवन । वायो प्रसन्न होऊन । मोकळें केलें ॥ २८ ॥

नंतर सर्व देवांनी मिळून वायूची स्तुती केल्यावर वायूने प्रसन्न होऊन सर्वांना मोकळे केले.

म्हणोनि प्रतापी थोर । हनुमंत ईश्वरी अवतार । याचा पुरुषार्थ सुरवर । पाहातचि राहिले ॥ २९ ॥

म्हणून वायु हा मोठा प्रतापी आहे.त्याचा मुलगा हनुमंत तो ईश्वरी अवतारच,त्याचा पराक्रम पाहून देवसुद्धा चकित झाले.

देव कारागृहीं होते । हनुमंतें देखिलें अवचितें । संव्हार करूनी लंकेभोंवतें । विटंबून पाडिलें ॥ ३० ॥

देव रावणाच्या बंदिखान्यात पडले होते.ते हनुमंताने अकस्मात पाहिले (व हनुमंताला करुणा आली त्याने लंकेला वेढा देऊन) तेव्हा लंकेच्या भोवतीच राक्षसांचा फडशा पाडून त्यांची दुर्दशा केली.

उसिणें घेतलें देवांचें । मूळ शोधिलें राक्षसांचें । मोठें कौतुक पुछ्यकेताचें । आश्चीर्य वाटे ॥ ३१ ॥

ह्याप्रमाणे देवांचा छळ केल्याबद्दल राक्षसांचा सूड उगवला,त्यांचा समूळ फडशा पाडला,ऊर्ध्व पुछ्य अशा मारुतिरायांच्या लीलेचे मोठे आश्र्चर्य वाटते.

रावण होता सिंह्यासनावरी । तेथें जाऊन ठोंसरे मारी । लंकेमधें निरोध करी । उदक कैचें ॥ ३२ ॥

गर्विष्ठ रावण सिंहासनावर बसला होता तेथे जाऊन त्याला (ठोसरे) ठोसे मारले.( व त्याची कणीक मऊ केली) लंकेची अशी दुर्दशा केली,की लोकांना पाणी मिळेना (लंकेला वेढा दिला किवा प्राणनिरोध केला तेव्हा पाणी राहिले नाही.)

देवास आधार वाटला । मोठा पुरुषार्थ देखिला । मनामधें रघुनाथाला । करुणा करिती ॥ ३३ ॥

हनुमंताचा मोठा पराक्रम पाहून (आपला कैवारी आला असे वाटून) देवांना धीर आला आणि त्यांनी रामरायाची करुणा भाकली.

दैत्य आवघे संव्हारिले । देव तत्काळ सोडिले । प्राणीमात्र सुखी जाले । त्रयलोक्यवासी ॥ ३४ ॥

मारुतिरायानी सर्व दैत्य मारून,देवांना तात्काळ बंधमुक्त केले व त्रैलोक्यातील प्राणिमात्रांना सुखी केले.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे वायोस्तवननिरूपणनाम समास सहावा ॥**

### समास सातवा : महद्भूतनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

पृथ्वीचें मूळ जीवन । जीवनाचें मूळ अग्न । अग्नीचें मूळ पवन । मागां निरोपिलें ॥ १ ॥

पूर्वी सांगितलेलेच आहे की पृथ्वीचे मूळ पाणी,पाण्याचे मूळ अग्नि व अग्नीचे मूळ वायु होय.

आतां ऐका पवनाचें मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ । अत्यंतचि चंचळ । सकळांमधें ॥ २ ॥

आता वायूचे मूळ ऐका,वायूचे मूळ अंतरात्मा असून तो सर्वात आहे व अतिशय चंचळ आहे.

तो येतो जातो दिसेना । स्थिर होऊन बैसेना । ज्याचें रूप अनुमानेना । वेदश्रुतीसी ॥ ३ ॥

तो येतो जातो व दिसत नाही,स्थिरही राहात नाही,त्याच्या रूपाचे अनुमान वेद श्रुतीला करता येणार नाही.

मुळीं मुळींचें स्फुर्ण । तेंचि अंतरात्म्याचें लक्षण । जगदेश्वरापासून त्रिगुण । पुढें जालें ॥ ४ ॥

(मुळींचें स्फुर्ण - परब्रह्माचे स्पुरण)

ब्रह्माच्या ठिकाणी जे मूळ स्फुरण किवा आदिसंकल्प झाला तेच अंतरात्म्याचे स्वरूप होय.जगदीश्र्वर तोच,त्याच्यापासून पुढे सत्व,रज,तम हे तीन गुण झाले.

त्रिगुणापासून जालीं भूतें। पावलीं पष्ट दशेतें । त्या भूतांचें स्वरूप तें । विवेकें वोळखावें ॥ ५ ॥

त्रिगुणापासून भुते व्यक्त स्वरूपाला आली,त्या भूतांचे स्वरूप विचाराने नीट जाणावे.

त्यामधें मुख्य आकाश । चौ भूतांमधें विशेष । याच्या प्रकाशें प्रकाश । सकळ कांहीं ॥ ६ ॥

पंचभूतामध्ये चार भूतांहून विशेष असे मुख्य सर्वप्रकाशक आकाशच होय. त्या आकाशाच्या (अंतरात्म्याच्या) प्रकाशाने सर्व काही होते.

येक विष्णु महद्भूत । ऐसा भूतांचा संकेत । परंतु याची प्रचीत । पाहिली पाहिजे ॥ ७ ॥

एको विष्णुर्महभ्द्‌तम। असे त्या आकाशाला (अंतरात्म्याला) म्हणतात.अशी भूतांची खूण आहे.परंतु त्याचा अनुभव पाहिला पाहिजे.

विस्तारें बोलिलीं भूतें । त्या भूतामधें व्यापक तें । विवरोन पाहातां येतें । प्रत्ययासी ॥ ८ ॥

भूते स्पष्ट करून सांगितली आहेतच ( महद्भूतांपासून विस्तृत म्हणजे व्यक्त होत गेली म्हणून ती भूते म्हंटली जातात.) त्या भूतांमध्ये व्यापक असणाऱ्या त्या महद्भूतांचे विवरण केले असता ते अनुभवास येते.( ते सर्वास व्यापक असून विवरता प्रत्ययास येते.)

आत्मयाच्या चपळपणापुढें । वायो तें किती बापुडें । आत्म्याचें चपळपण रोकडें । समजोन पाहावें ॥ ९ ॥

(अंतरात्म्याच्या) आकाशाच्या चपळपणापुढे वायूचा बिचाऱ्याचा चपळपणा किती? हा आत्म्याचा चपळपणा प्रत्यक्ष समजून घ्यावा.

आत्म्यावेगळें काम चालेना । आत्मा दिसेना ना आडळेना । गुप्तरूपें विचार नाना । पाहोन सोडी ॥ १० ॥

आत्मा दिसत नाही सापडत नाही,पण त्याच्यावाचून एकही काम होत नाही (काहीच काम चालत नाही) तो गुप्तपणाने अनेक विचार पाहून टाकतो.तो गुप्तपणाने अनेक विचार पाहून टाकतो.(तो गुप्त राहून सर्व विचार करितो.)

पिंड ब्रह्मांड व्यापून धरिलें । नाना शरीरीं विळासलें । विवेकी जनासी भासलें । जगदांतरी ॥ ११ ॥

(विळासलें - विलासात असतो.)

पिंड ब्रह्मांड ह्यानेच धारण केले आहे.अनेक शरीरात तोच लीला करतो (शोभतो) विवेकी लोकांना तो जगदांतरांत आहेसे भासते. (तो पिंड ब्रह्मांडात असून अनंत शरीरात खेळून राहिला आहे विवेकी लोक त्याला जगदंतरी पाहातात.

आत्म्याविण देहे चालती । हें तों न घडे कल्पांतीं । अष्टधा प्रकृतींच्या वेक्ती । रूपासी आल्या ॥ १२ ॥

आत्म्यावाचून देह चालेले असे कधी कल्पांती घडवायचे नाही. अष्टधा प्रकृतीची रूपे त्याच्याचमुळे व्यक्त झालेली आहेत.(अष्टधा प्रकृतीपासून झालेले अनंत जीव त्याच्यामुळेच प्रत्यक्ष दिसतात.)

मूळापासून सेवटवरी । सकळ कांहीं आत्माच करी । आत्म्यापैलीकडे निर्विकारी । परब्रह्म तें ॥ १३ ॥

मुळमायेपासून शेवटपर्यंत-एखाद्या जीवजंतूपर्यंत सर्व काही आत्माच करितो.आत्म्याच्या पलिकडे फक्त निर्विकार परब्रह्म आहे.

आत्मा शरीरीं वर्ततो । इंद्रियेंग्राम चेष्टवितो । नाना सुखदुःखें भोगितो । देहयात्मयोगें ॥ १४ ॥

(इंद्रियेंग्राम - इंद्रियसमूह, चेष्टवितो - चेतना देतो)

आत्मा शरीरात वागतो,इंद्रियांना चालवतो,देह संगतीने अनेक सुखदु:खे भोगतो.

सप्तकंचुक हें ब्रह्मांड । त्यामधें सप्तकंचुक पिंड । त्या पिंडामधें आत्मा जाड । विवेकें वोळखा ॥ १५ ॥

(सप्तकंचुक) सात आवरणयुक्त असे हे ब्रह्मांड आणि त्यातील (सप्तकंचुक) सात आवरणयुक्त पिंड ह्या सर्वाहून आत्मा श्रेष्ठ आहे तो विवेकाने जाणावा.

शब्द ऐकोन समजतो । समजोन प्रत्योत्तर देतो । कठीण मृद सीतोष्ण जाणतो । त्वचेमधें ॥ १६ ॥

तो शब्द ऐकतो व त्याचा अर्थ समजतो,समजून त्याला उत्तर देतो. त्वचेने मऊ कठिण,मऊ,शीत,उष्ण इत्यादि जाणतो.

नेत्रीं भरोनी पदार्थ पाहाणें । नाना पदार्थ परीक्षणें । उंच नीच समजणें । मनामधें ॥ १७॥

डोळे भरून पदार्थ पाहातो,त्यांची परीक्षा करितो.त्यात श्रेष्ठ कनिष्ठ कोण हे मनात समजून घेतो.

क्रूरदृष्टी सौम्यदृष्टी । कपटदृष्टी कृपादृष्टी । नाना प्रकारींच्या दृष्टी । भेद जाणे॥ १८ ॥

क्रूरता,सौम्यता,कपट,कृपा (दया) इत्यादि विकारांच्या दृष्टीतील भेद त्याला कळतात.(वृत्तिभेद त्याला दिसतात.)

जिव्हेमधें नाना स्वाद । निवडून जाणे भेदाभेद । जें जें जाणें तें तें विशद । करुनी बोले ॥ १९॥

अनेक प्रकारच्या रुचीतील भेद जिव्हेने निवडण्याचे त्याला कळते आणि जे जे कळते ते ते स्पष्ट करून सांगतो.

उत्तम अन्नाचे परिमळ । नाना सुगंध परिमळ । नाना फळांचे परिमळ । घ्राणैंईद्रियें जाणे ॥ २० ॥

उत्तम पक्वान्ने,अनेक सुगंधी द्रव्ये किवा अनेक फळे ह्यांचे वास तो वासाने ओळखतो.

जिव्हेनें स्वाद घेणें बोलणें । पाणीइंद्रियें घेणें देणें । पादईद्रियें येणें जाणें । सर्वकाळ ॥२१ ॥ शिस्नईद्रियें सुरतभोग । गुदेंद्रियें मळोत्सर्ग । मनेंकरूनी सकळ सांग । कल्पून पाहे ॥ २२॥

(॥ शिस्न - जननेंद्रिय , सुरतभोग - कामभोग)

जिव्हेच्या योगाने रुची घेणे किवा बोलणे ,(पाणी) हाताने घेणे देणे,पायाने ये जा करणे,शिस्नाने भोग घेणे,गुदाने मलोत्सर्ग करणे इत्यादि क्रिया नित्य चालतात.ह्याची यथासांग कल्पना मनाने हा अंतरात्माच करून पाहतो.(जिव्हा प्राण गुद शिस्न ह्यांचे त्रैलोक्यात एकलाच व्यापार करितो.)

ऐसें व्यापार परोपरी । त्रिभुवनीं येकलाचि करी । त्याची वर्णावया थोरी । दुसरा नाहीं ॥ २३ ॥

त्रैलोक्यामध्ये असे अनेक प्रकारचे व्यापार हा एकटाच करतो.त्याचा मोठेपणा दृष्टांताने वर्णन करावा म्हंटले तर त्याच्या सारखा दुसरा पदार्थ नाही.

त्याविण दुसरा कैचा । जे महिमा सांगावा तयाचा ।व्याप आटोप आत्मयाचा । न भूतो न भविष्यति॥२४॥

त्याच्याशिवाय सृष्टीत दुसरा असा कोण आहे की त्याचा महिमा वर्णन करून सांगेल? (सांगणारा ऐकणारा तोच आहे.) त्या आत्म्याचा व्याप (आटोप) अवर्णनीय आहे.

चौदा विद्या चौसष्टी कळा । धूर्तपणाच्या नाना कळा ।वेद शास्त्र पुराण जिव्हाळा । तेणेंविण कैचा ॥२५ ॥

चौदा विद्या,चौसष्ठ कला,चातुर्याच्या अनेक युक्त्या किवा वेदशास्त्रपुराणे इत्यादिकांची उत्पत्ति आत्म्यावाचून कशाची? (तो हे सर्व जाणतो.)

येहलोकींचा आचार । परलोकीं सारासारविचार । उभय लोकींचा निर्धार । आत्माच करी ॥ २६ ॥

इहलोकातील व्यापार किंवा परलोकासंबंधी सारासार विचार करणे अथवा दोन्ही लोकासंबंधी निश्र्चय करणे हे सर्व आत्माच करतो.

नाना मतें नाना भेद । नाना संवाद वेवाद । नाना निश्चय भेदाभेद । आत्माच करी ॥ २७ ॥

अनेक मते,अनेक भेद,संभाषणे (संवाद) वादविवाद,त्यातील अनेक प्रकारचे भेदाभेद ह्या सर्वाचा निर्णय आत्माच करतो.

मुख्यतत्व विस्तारलें । तेणें तयास रूप आणिलें । येणेंकरितां सार्थक जालें । सकळ कांहीं ॥ २८ ॥

मुख्य तत्व म्हणजे महतत्व जो अंतरात्मा त्याचा विचार झाला म्हणून ह्या सर्व गोष्टींचे वर्णन करता आले.त्याच्यामुळेच सर्व काही सार्थक होते.

लिहिणें वाचणें पाठांतर करणें ।पुसणें सांगणें अर्थ करणें ।गाणें बाजवणें नाचणें । आत्म्याचकरितां ॥२९ ॥

लिहिणे,वाचणे,पाठांतर करणे,विचारणे सांगणे,अर्थ करणे,गाणे,वाजविणे,नाचणे इत्यादि क्रिया आत्म्यामुळेच होतात.

नाना सुखें आनंदतो । नाना दुःखें कष्टी होतो । देहे धरितो आणी सोडितो । नानाप्रकारें ॥ ३० ॥

अथवा सुख मिळाले म्हणजे आनंद होणे,दु:खाने कष्टी होणे,तसेच देह धरणे व सोडणे इत्यादि अनेक प्रकार आत्म्याचेच

येकलाचि नाना देहे धरी । येकलाचि नटे परोपरी । नट नाट्यकळा कुसरी । त्याविण नाहीं ॥ ३१ ॥

नट नाट्य कलाकुसरी ही त्याच्यावाचून नाही.तो एकटाच अनेक देह धरतो व एकटाच परोपरीने नटत असतो.

येकलाचि जाला बहुरूपी । बहुरूपी बहुसाक्षपी । बहुरूपें बहुप्रतापी । आणी लंडी ॥ ३२ ॥

तो एकटाच बहुरूपी,बहुरंगी,दिर्घोद्योगी,बहुगुणी झाला आहे. प्रतापी तोच व (लंडी) भित्रा तोच

येकलाचि विस्तारला कैसा । पाहे बहुविध तमासा । दंपत्यैंविण कैसा । विस्तारला ॥ ३३ ॥

अनेक प्रकारचे तमाशे म्हणजे मौज,गंमत तोच एकटा करून तोच पाहत बसतो.त्याने दांम्पत्य-भांवावाचून एवढा विस्तार केला कसा?

स्त्रियांस पाहिजे पुरुष । पुरुषासी पाहिजे स्त्रीवेष । ऐसा आवडीचा संतोष । परस्परें ॥ ३४ ॥

स्त्रीस पुरुष व पुरुषास स्त्री पाहिजे म्हणजे परस्पर प्रेमाचा आनंद होतो.

स्थूळाचें मूळ तें लिंग । लिंगामधें हें प्रसंग । येणें प्रकारें जग । प्रत्यक्ष चाले ॥ ३५ ॥

स्थूळाचे मूळ वासनात्मक लिंगदेह,त्या लिंगदेहामध्येच ही कार्ये आहेत.जग हे अश्याप्रकारे चालले आहे.(पण लिंग भेदामुळे स्थूळ शरीरात स्त्रीपुरुष भेद आहे. एरवी दोन्ही ठिकाणी अभेदाने तो एकलाच नांदत आहे.)

पुरुषांचा जीव स्त्रियांची जीवी । ऐसी होते उठाठेवी । परी या सूक्ष्माची गोवी । समजली पाहिजे ॥ ३६ ॥

पुरुषांचा जीव (आत्मा) व स्त्रियांची जीवी (आत्मी) असे अज्ञ लोक म्हणतात.पण ह्या सूक्ष्म देहातील गुंतागुंत समजून घेतली पाहिजे.

स्थूळांकरितां वाटे भेद । सूक्ष्मीं आवघेंचि अभेद । ऐसें बोलणें निरुध । प्रत्यया आलें ॥ ३७ ॥

(निरुध - निश्र्चयात्मक)

स्थूलाच्या दृष्टीने भेद वाटतो पण सूक्ष्मामध्ये सगळे एकरूपच (अभेद) आहे.हे बोलणे निश्र्चितपणाने अनुभवास येते.

बायकोनें बायकोस भोगिलें । ऐसें नाहीं कीं घडलें । बायकोस अंतरी लागलें । ध्यान पुरुषाचें ॥३८ ॥

स्त्रीने स्त्रीला भोगले असे कधी घडत नाही स्त्रीच्या अंतःकरणात पुरुषांचे ध्यान असते.(व पुरुषाला स्त्रीचे ध्यान असते.)

स्त्रीसी पुरुष पुरुषास वधु । ऐसा आहे हा समंधु । याकारणें सूक्ष्म संवादु । सुक्ष्मीं च आहे ॥ ३९ ॥

स्त्रीला पुरुष व पुरुषाला स्त्री असा हा बाह्य संबंध(पुनरुत्पिसाठी) आहे.(त्या सूक्ष्मसंवादाचे मूळ सूक्ष्म देहात म्हणजे वासनेत आहे) ह्यासाठी त्याचा सूक्ष्म देहातच सूक्ष्म विचार पाहावा.

पुरुषइछेमधें प्रकृती । प्रकृतीमधें पुरुषवेक्ती । प्रकृतीपुरुष बोलती । येणें न्यायें ॥ ४० ॥

(पुरुषवेक्ती - प्रकृतीमध्ये व्यक्त जाणिव तो पुरुष होय.)

पुरुषाच्या इच्छेमध्येच प्रकृतीचा वास ( इच्छा हीच प्रकृति) आणि प्रकृति मध्येच पुरुषाचे व्यक्त रूप असते.ह्यावरून प्रकृतिपुरुष म्हणतात.

पिंडावरून ब्रह्मांड पाहावें । प्रचीतीनें प्रचीतीस घ्यावें । उमजेना तरी उमजावें । विवराविवरों ॥ ४१ ॥

पिंडावरून ब्रह्मांड पाहावे एका अनुभवाच्या धाग्याने दुसरा अनुभव घ्यावा व न उमजले तर पुनःपुन्हा विवरण करून उमजून घ्यावे.

द्वैतइच्छा होते मुळीं । तरी ते आली भूमंडळीं । भूमंडळीं आणी मुळीं । रुजु पाहावें ॥ ४२ ॥

व्दैत इच्छया मूळमायेतच आहे.(मूळमाया प्रकृतिपुरुषात्मक आहे.) म्हणूनच जगामध्ये स्थूळ पिंडातही तशीच आली आहे (दिसते) अशाप्रकारे मूळमाया आणि जग ह्या दोन्हींचा मेळ (रजु) पाहावा (जगात भूमंडळी जीवसृष्टीत स्त्रीपुरुष भेद दिसतो तो मूळमायेतही तसाच आहे हा मेळ पाहावा.

येथें मोठा जाला साक्षेप । फिटला श्रोतयांचा आक्षेप । जे प्रकृतीपुरुषाचें रूप । निवडोन गेलें ॥ ४३ ॥

श्रोत्यांचा संशय फिटून प्रकृतिपुरुषांचे स्वरूप स्पष्ट झाले ही मोठी उत्तम गोष्ट झाली ( थोर विचारांचा साक्षेप केला पाहिजे.प्रकृतिपुरुषांचे रूप येथे स्पष्ट झाल्याने श्रोत्यांचे शंका निरसन झाले.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे महद्भूतनिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : आत्मारामनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

नमूं गणपती मंगळमूर्ती । जयाचेनि मतिस्फूर्ती । लोक भजनी स्तवन करिती । आत्मयाचें ॥ १ ॥

त्याच्या योगाने बुद्धीला प्रेरणा होते व ज्याच्या आश्रयाने लोक अंतरात्म्याचे भजन,स्तवन वगैरे करतात अशा मंगलमुर्ती श्रीगणेशाला नमस्कार असो.(मंगलमूर्ती गणेश,जो बुद्धिप्रेरक असून ज्याचे गुणानुवाद सारे लोक गात आहेत त्या अंतरात्म्याला नमन असो.)

नमूं वैखरी वागेश्वरी । अभ्यांतरीं प्रकाश करी । नाना भरोवरी विवरी । नाना विद्या ॥ २ ॥

अंतःकरणात बुद्धिप्रकाश देणारी व अनेक विद्यांचे परिपूर्णतेने (भरोवरी) विवरण करणारी अशी जी वाग्देवता शारदा (सरस्वती) तिला नमस्कार असो.

सकळ जनांमधें नाम । रामनाम उत्तमोत्तम । श्रम जाउनी विश्राम । चंद्रमौळी पावला ॥ ३ ॥

सर्व जगामध्ये रामनाम अतिशय श्रेष्ठ आहे,ते घेतल्याने विष प्राशनाचा त्रास कमी होऊन शंकराला आराम झाला.

नामाचा महिमा थोर । रूप कैसें उत्तरोत्तर । परात्पर परमेश्वर । त्रयलोक्यधर्ता ॥ ४ ॥ आत्माराम चहुंकडे । लोक वावडे जिकडे तिकडे । देहे पडे मृत्य घडे । आत्मयाविण ॥ ५ ॥

नामाचे महात्म्य व रूप उत्तरोतर चढते वाढते अनुभवास येते.परात्पर परमेश्वर, त्रैलोक्यधर्ता असा आत्माराम चहूकडे भरला आहे असा अनुभव येतो.लोक जिकडे तिकडे वावरतात तिकडे तिकडे हा आहेच.त्याच्या वाचून देह पडतो व मृत्यू येतो.(त्यावाचून देह मढे होय.)

जीवात्मा शिवात्मा परमात्मा । जगदात्मा विश्वात्मा गुप्तात्मा । आत्मा अंतरत्मा सूक्ष्मात्मा । देवदानवमानवीं ॥ ६ ॥सकळ मार्ग चालती बोलती । अवतारपंगतीची गती । आत्म्याकरितां होत जाती । ब्रह्मादिक ॥ ७ ॥

जीवात्मा,शिवात्मा,परमात्मा,जगदात्मा,विश्र्वात्मा,गुप्तात्मा,आत्मा,अंतरात्मा,सूक्षात्मा ही त्याचीच नावे आहेत.देव,दानव व मानव ह्यामध्ये बोलणे,चालणे आदिकरून व्यवहार तोच करतो.ब्रह्मादिक देवांच्या अवतारमालिका आत्म्यामुळेच होतात.(सर्व सामन्यांच्या व्यवहारात व अवतारी महात्म्यांच्या कृत्यांत तोच कर्ता आहे.ब्रह्मादिक त्याच्यामुळेच होतात जातात.)

नादरूप जोतीरूप । साक्षरूप सत्तारूप । चैतन्यरूप सस्वरूप । द्रष्टारूप जाणिजे ॥ ८ ॥ नरोत्तमु विरोत्तमु । पुरुषोत्तमु रघोत्तमु । सर्वोत्तमु उत्तमोत्तमु । त्रयलोक्यवासी ॥ ९ ॥

नाद,ज्योति,साक्षित्व,सत्ता,चैतन्य,स्वस्वरूप,द्रष्टा,नरोत्तम,विरोत्तम,पुरुषोत्तम,रघुत्तम,सर्वोत्तम,उतमोत्तम, त्रैलोक्यवासी ही सर्व त्याची रूपे आहेत.

नाना खतपट आणी चटपट । नाना लटपट आणि झटपट । आत्मा नसतां सर्व सपाट । चहुंकडे ॥ १० ॥

अनेक प्रकारचे उद्योग बडबडी,लटपटी,झटापटी हे सर्व आत्म्यामुळेच चालते.आत्मा नसेल तर सर्व सपाट,शून्य,जड होईल.

आत्म्याविण वेडें कुडें । अत्म्याविण मडें बापुडें । आत्म्याविण थडें रोकडें । शरीराचें ॥ ११ ॥

(थडें - थडगे)

आत्मा नसेल तर (कुंडे) शरीर वेडेवाकडे होऊन बिचारे मढे बनते,प्रत्यक्ष त्याचे थडगे होते.

आत्मज्ञानी समजे मनीं । पाहे जनी आत्मयालागुनी । भुवनी अथवा त्रिभुवनीं । अत्म्याविणें वोस ॥ १२ ॥

आत्मज्ञानी पुरुष मनात हे समजून लोकांमध्ये अंतरात्म्याला पाहतात,घर असो वा त्रिभुवन असो आत्म्यावाचून ते ओस (शून्य) होय.(त्रलोक्य त्यावाचून शून्य होय.)

परम सुंदर आणि चतुर । जाणे सकळ सारासार । आत्म्याविण अंधकार । उभय लोकीं ॥ १३ ॥

अमका मोठा सुंदर,चतुर व सारासार विचारी आहे असे आपण म्हणतो पण आत्मा नसेल तर दोन्ही लोकी आंधार (पण आत्मा अंतरी आहे म्हणून हे बोलणे.)

सर्वांगीं सिध सावध । नाना भेद नाना वेध । नाना खेद आणी आनंद । तेणेंचिकरितां ॥ १४ ॥

तो सर्व शरीरभर तत्पर व सावध आहे.अनेक भेद वेध (चिंता) खेद व आनंद त्याच्याचमुळे (सिद्ध,साधक,वेधक,सुखदु:ख भोक्ता हे आरोप त्याच्याचमुळे होतात.)

रंक अथवा ब्रह्मादिक । येकचि चालवी अनेक । पाहावा नित्यानित्यविवेक । कोण्हि येकें ॥ १५ ॥

ब्रह्मदेवापासून रंकापर्यंत सर्वांना तो एकटाच चाळवतो.हे कळण्यासाठी कोणीतरी नित्यानित्य विवेक पाहावा.(ह्याचा प्रत्यय आत्मज्ञानीजनाना असतो.)

ज्याचे घरी पद्मिणी नारी । आत्मा तंवरी आवडी धरी । आत्मा गेलियां शरीरीं । तेज कैचें ॥ १६ ॥

एखाद्याच्या घरी पद्मिनीसारखी सुंदर स्त्री असली तरी तिच्यात आत्मा आहे तोपर्यंत पति तिजवर प्रेम करतो.शरीरात तेज कोठून राहणार? ( पति सुंदरीवर आसक्त असतो पण तिच्या देहात आत्मा नांदत आहे तोवर,आत्मा निघून गेल्यावर ती सुंदरी नव्हे,ते प्रेत होय.)

आत्मा दिसेना ना भासेना । बाह्याकारें अनुमानेना । नाना मनाच्या कल्पना । आत्मयाचेनी ॥ १७ ॥

आत्मा दिसत नाही,भासत नाही,बाह्य आकाराने (बाहेरच्या बाजूने पाहाता) त्याचे अनुमान करता येत नाही आत्म्यामुळे अनेक प्रकारच्या कल्पना मन करीत असते.

आत्मा शरीरीं वास्तव्य करी । अवघें ब्रह्मांड विवरी भरी । वासना भावना परोपरीं । किती म्हणोनी सांगाव्या ॥ १८ ॥

आत्मा शरीरात राहतो व सर्व ब्रह्मांडात शिरून त्याचा विचार करितो अनेक प्रकारच्या वासना,भावना तो करितो.त्या किती म्हणून सांगाव्या?

मनाच्या अनंत वृत्ती । अनंत कल्पना धरिती । अनंत प्राणी सांगो किती । अंतर त्यांचें ॥ १९ ॥

अनंत प्राणांच्या मनातल्या अनंत वृत्ति,तसेच अनंत कल्पना,त्याचे प्रकार किती म्हणून सांगावे?

अनंत राजकारणें धरणें । कुबुद्धि सुबुद्धि विवरणें । कळों नेदणें चुकावणें । प्राणीमात्रासी ॥ २० ॥

अनेक राजकारणे करणे,सुबुद्धि-दुर्बुद्धि ह्यांचे वर्णन करणे,प्राणीमात्राला आपले विचार कळू न देणे,फसविणे हे सर्व आत्म्यामुळेच होय.(राजकारण, सुबुद्धि-कूर्बुद्धि गुप्त विचार,फसवणूक सर्व आत्म्यामुळेच होय.)

येकास येक जपती टपती । येकास येक खपती लपती । शत्रुपणाची स्थिती गती । चहुंकडे ॥ २१ ॥ पृथ्वीमधें परोपरीं । येकास येक सिंतरी । कित्तेक भक्त परोपरीं । परोपकार करिती ॥ २२ ॥ येक आत्मा अनंत भेद । देहेपरत्वें घेती स्वाद । आत्मा ठाईंचा अभेद । भेदहि धरी ॥ २३ ॥

चोहोकडे एकास एक जपतात,टपतात,खपतात,लपतात,शत्रुत्वाने वागतात,जगामध्ये एकमेकाला फसवितात (सिंतरी),हार खायला लावतात,कित्येक भक्त अनेक प्रकारचा परोपकार करतात,देह भिन्नत्वाने निरनिराळे स्वाद घेतात,असे अनंत भेद आहेत,पण त्यात आत्मा एक आहे.आत्मा मूळचा अभेद असून असे अनेक भेद धरतो.(पण ह्या सर्व भेदमय कारभारात आत्म्याचे अभेदत्व ढळत नाही.)

पुरुषास स्त्री पाहिजे । स्त्रीस पुरुष पाहिजे । नवरीस नवरी पाहिजे । हें तों घडेना ॥ २४ ॥

पुरुषाला स्त्री पाहिजे,स्त्रीला पुरुष पाहिजे (स्त्रीला पुरुषाचे व पुरुषाला स्त्रीचे वेड असते.) नवरीला नवरी पाहिजे असे कधी होत नाही.

पुरुषाचा जीव स्त्रीयांची जीवी । ऐसी नाहीं उठाठेवी । विषयसुखाची गोवी । तेथें भेद आहे ॥ २५ ॥

पुरुषांचा जीव व स्त्रियांची जीवी असा प्रकार नसून विषयसुखाच्या आसक्तीमुळे भेद होतो.(पण विषय सुखाच्या गोडीत भेद असला तरी गोडी भोगणारा अंतरात्मा दोहीकडे एकच आहे.)

ज्या प्राण्यास जो आहार । तेथेंचि होती तत्पर । पशूचे आहारीं नर । अनादरें वर्तती ॥ २६ ॥

ज्या प्राण्याचा जो आहार तेथेच तो लुब्ध (तत्पर) असतो.पशूचा जो आधार त्याविषयी माणसे निरीच्छ (उदासीन) असतात.

आहारभेद देहेभेद । गुप्त प्रगट उदंड भेद । तैसाचि जाणावा आनंद । वेगळाला ॥ २७ ॥

आहार,भोग,देह,आनंद (सुखानुभव) ह्यामध्ये गुप्त किंवा प्रकट असे अनेक भेद आहेत.(पण सर्व भेदात आत्मा अभेद एकरूप वर्ततो.)

सिंधु भूगर्भींचीं नीरें । त्या नीरामधील शरीरें । आवर्णोदकाचीं जळचरें । अत्यंत मोठी ॥ २८ ॥

समुद्रात किवा भूगर्भातील प्राण्यांत तसेच आवरणोदकांमध्ये अत्यंत मोठमोठ्या शरीराची जलचरे आहेत.(समुद्राच्या पाण्यात अनंत प्राणी असतात त्यापेक्षा आवरणोदकातील जळचरे,फार मोठी)

सूक्ष्म दृष्टीं आणितां मना । शरीराचा अंत लागेना । मा तो अंतरात्मा अनुमाना । कैसा येतो ॥ २९ ॥

सूक्ष्म दृष्टीने पाहता ह्या शरीराचा अंत लागत नाही,मग तो तर अंतरात्मा त्याचे अनुमान कसे करता येईल?(सूक्ष्म दृष्टीने पाहता अपरिमित असंख्य शरीरे आहेत त्याचा अंत लागत नाही मग त्या अनंताचा तरी अंत कसा लागावा?)

देह्यात्मयोग शोधून पाहिला । तेणें कांहीं अनुमानला । स्थूळसूक्ष्माचा गलबला । गथागोवी ॥ ३० ॥

(देह्यात्मयोग - कार्यासाठी देह आणि आत्मा यांचा संयोग)

देह व आत्मा ह्यांच्या संयोगाने जी जी कार्ये होतात.(दिसतात.) त्यांचा सूक्ष्म शोध घेतला पाहिजे म्हणजे अंतरात्म्याविषयी काहीसे अनुमान करता येते. नाही तर स्थूळ व सूक्ष्म ह्यांच्या गोधळात काही कळावयचे नाही.

गथागोवी उगवाव्याकारणें । केलीं नाना निरूपणें । अंतरात्मा कृपाळुपणें । बहुतां मुखें बोलिला ॥ ३१ ॥

हा गोंधळ नाहीसा करण्यासाठीच सगळी निरुपणे चालली आहेत.ती निरुपणेसुद्धा,अंतरात्माच दयाळूपणाने अनेक सत्पुरुषांच्या मुखाने बोलला आहे.(हा गोंधळ मोडावा,अंतरात्मा प्रत्ययास यावा ह्यासाठी ही सगळी निरुपणे चालली आहेत,ती सुद्धा अंतरात्म्यानेच अनेक,संतसज्जनांच्या मुखांनी केली आहेत.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मारामनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : नाना उपासनानिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

पृथ्वीमधें लोक नाना । त्यास नाना उपासना । भावार्थें प्रवर्तले भजना । ठाईं ठाईं ॥ १ ॥

(प्रश्न) ह्या पृथ्वीमध्ये अनेक लोक आहेत व त्यांच्या अनेक उपासना आहेत.(आपापल्या भावाप्रमाणे) भावार्थाने लोक ठायी ठायी (पूज्य भाव ठेवून) भजनाला लागले आहेत.

अपुल्या देवास भजती । नाना स्तुती स्तवनें करिती । जे जे निर्गुण म्हणिती । उपासनेसी ॥ २ ॥

अनेक प्रकारे स्तुति,स्तवने करून लोक आपापल्या देवाचे भजन करतात.जो तो आपल्या उपासनेला निर्गुण म्हणतो.(जे ते आपला देव निर्गुण आहे,आपली उपासना निर्गुणाची आहे असे म्हणत असतात.)

याचा कैसा आहे भाव । मज सांगिजे अभिप्राव । अरे हा स्तुतीचा स्वभाव । ऐसा आहे ॥ ३ ॥

ह्याचा मेळ कसा घालवायचा? त्यातील तात्पर्य मला सांगावे (असा श्रोत्यांनी प्रश्न केला,त्याला वक्ता उत्तर देतो की (उत्तर) अरे,हा स्तुतीचा स्वभाव असाच असावयाचा.

निर्गुण म्हणिजे बहुगुण । बहुगुणी अंतरात्मा जाण । सकळ त्याचे अंश हें प्रमाण । प्रचित पाहा ॥ ४ ॥

बरे,त्यात काही बिघडलेले नाही (हे पहा) निर्गुण म्हणजे बहुगुण व बहुगुणी आहे तो अंतरात्मा,सर्व देव व प्राणीमात्र त्याचेच अंश आहेत हे निश्चित,त्याचे अनुमान पाहा (म्हणून कोणत्याही उपास्याची उपासना केली तरी ती तत्वतः त्या अंतरात्म्याला पोचते.)( म्हणून कोणत्याही देवाला आपल्या अधिकाराप्रमाणे कोणीही भजला तरी सर्वांचे मूळ जो अंतरात्मा त्याचेच भजन होत असल्यामुळे त्याला मान्यता द्यायला तुझे काय जाते?) तात्पर्य,आपल्या उपास्य देवाचे भजन करीत असताना आम्ही निर्गुणाला भजतो असे सगळेच म्हणत असले तरी त्यात हानि कोठे आहे?

सकळ जनासी मानावें तें । येका अंतरात्म्यास पावतें । अधिकारपरत्वें तें । मान्य कीजे ॥ ५ ॥

सगळ्या लोकांचा संतोष केला तरी तो एका अंतरात्म्यालाच पोचतो,तथापि अधिकाराचा कमीजास्तपणा पहिला पाहिजे.

श्रोता म्हणे हा अनुमान । मुळीं घालावें जीवन । तें पावे पानोपान । हे सध्या प्रचिती ॥ ६ ॥

(प्रश्न) (निर्गुणाची उपासनाच श्रेष्ठ म्हणून तीच सर्वांनी करावी,अनेक देव देवतांच्या नादी लागू नये.) श्रोता म्हणतो येथे जरा संशय आहे. (अनेक देवांचे भजन केले म्हणजे एका अंतरातम्यासच पोचते असे तुम्ही म्हणता पण) झाडाच्या मुळाशी पाणी घातले की ते पानापानापर्यंत पोहोचते हा प्रत्यक्ष अनुभव आहे.(त्याप्रमाणे निर्गुणाची उपसना केली म्हणजे त्यात देव देवता आल्याच.)

वक्ता म्हणे तुळसीवरी । उदक घालावें पात्रभरी । परी न थिरे निमिषभरी । भूमीस भेदे ॥ ७ ॥

(उत्तर)- वक्ता उत्तर देतो:तुळशीवर (म्हणजे पानावर व शेंड्यावर कोठेही) पेलाभर पाणी घातले की ते वरती क्षणभर कोठेही न थांबता मूळापर्यंत मुरते.(त्याप्रमाणे देवदेवतांची पूजा केली तरी मुख्य परमेश्वराला पोचते.)

थोरा वृक्षास कैसें करावें । सेंड्या पात्र कैसें न्यावें । याचा अभिप्राव देवें । मज निरोपावा ॥ ८ ॥

(प्रश्न):- (ह्यावर श्रोत्याने पुन्हा प्रश्न केला) लहान झाडांच्याव्रर पाणी घालता आले तरी वडासारख्या मोठ्या झाडावर पाणी कसे घालता येईल? कळशी झाडापर्यंत कशी नेता येईल? ह्याचे वर्म मला सांगा.) मोठ्या झाडाला कसे करावे? त्याच्या शेंड्यापर्यंत भांडे कसे न्यावे? ह्याचे उत्तर महाराजांनी मला सांगावे?

प्रजन्याचें उदक पडतें । तें तों मुळाकडे येतें । हात चि पावेना तेथें । काये करिती ॥ ९ ॥

(उत्तर):- वक्ता म्हणतो,(कळशी शेंड्यापर्यंत हात न पोहोचल्यामुळे नेता नाही आली.) हातच पोहोचत नाही तेथे काय करणार?पण पावसाचे पाणी तरी मोठ्या झाडावर पडते ना? ते तर मूळाकडेच धावत येते.

सकळास मूळ सांपडे । ऐसें पुण्य कैचें घडे । साधुजनाचें पवाडे । विवेकीं मन ॥ १० ॥

(आता सर्वांनाच मूळ सापडेल असे कसे होईल ? फार पुण्यसंग्रह पदरी असल्याशिवाय मूळ सापडत नाही.साधूजनांचीच विवेक दृष्टी मूळाला जाऊन भिडते.) मूळ सापडण्याइतके पुण्य सर्वांच्याच जवळ कोठून असणार? साधूसत्पुरुषांचे मन विवेकाच्या मार्गाला लागते.

तथापी वृक्षांचेनि पडिपाडें । जीवन घालितां कोठें पडे । ये गोष्टीचें सांकडें । कांहींच नाहीं ॥ ११ ॥

(पडिपाडें - दृष्टांताने)

तथापि वृक्ष्याच्या दृष्टांतावरून ( हे स्पष्ट होते की पाणी कोठेही घातले तरी मूळापर्यंत जाते.त्याप्रमाणे भक्तिभावाने देव देवतांची उपासना केली तरी ती मुख्य परमेश्वराला पोचते.) झाडावर पाणी घातले तरी ते कोठे जाते हे कळण्यास काहीच अडचण नाही.

मागील आशंकेचें निर्शन । होतां जालें समाधान । आतां गुणास निर्गुण । कैसें म्हणती ॥ १२ ॥

(अनेक देवताची उपासना केली तर ती अंतरात्म्याला कशी पाहोचते ह्या) पुर्वीच्या शंकेचे निरसन झाल्याने समाधान झाले.(प्रश्न) आता एक प्रश्र्न राहिला तो हा की सगुण उपासनेला निर्गुण म्हणतात कसे?(लोक सगुणाला निर्गुण कसे म्हणतात ते सांगा.)

चंचळपणें विकारलें । सगुण ऐसें बोलिलें । येर तें निर्गुण उरलें । गुणातीत ॥ १३ ॥

निर्गुणाच्या ठिकाणी प्रथम चंचळपणा (स्फूर्ती) झाली तिला सगुण असे म्हणतात.गुणाच्या पलीकडे उरले ते निर्गुण होय.

वक्ता म्हणे हा विचार । शोधून पाहावें सारासार । अंतरीं राहातां निर्धार । नांव नाहीं ॥ १४ ॥

(अंतरीं राहातां निर्धार - अंतःकरणात निर्धार झाल्यावर निर्गुण असे नावहि उरत नाही.)

(उत्तरं):- वक्ता म्हणतो,सारासार नीट शोध घेऊन हा विचार अंतःकरणात दृढ बाणला पाहिजे.म्हणजे सगुण निर्गुण ह्यांच्या भेदाचे नाव उरत नाही (ते  खरे आहे,सारासार विचार पाहावा असार टाकून सार म्ह. शाश्र्वत परब्रह्म घ्यावे.म्ह."तत्वमसि" बोधाने ब्रह्माशी ऐक्यतेचा निर्धार झाल्यावर सगुण व निर्गुण हा भेदच उरत नाही पण ह्या नावाचा तेथे पत्ता काय लागणार!

विवेकेंचि तो मुख्य राजा । आणि सेवकाचें नांव राजा । याचा विचार समजा । वेवाद खोटा ॥ १५ ॥

(हे विवेकाचे काम आहे) सेवकाचे नाव राजा ठेवले म्हणून तो काही राजा होत नाही,ही कौतुकाची भाषा आहे) विवेकाच्या योगाने शहाणपणा शिकून एखादा मनुष्य मुख्य राजा झाला आणि एखाद्या सेवकाचे नाव राजा असले (म्हणून त्या दोघांची बरोबरी होत नाही) ह्याचा विचार करावा उगीच वादविवाद खोटा (सगुणाला निर्गुण म्हणल्याने सगुण काही निर्गुण होत नाही किवा एखाद्याने तसे कौतुकाने म्हंटलेच तर त्यात काही सगुणपणाची हानीही होत नाही).म्हणून सगुण-निर्गुण ह्यांची फारकत करावी उगीच वाद करू नये हेच खरे.

कल्पांतप्रळईं जें उरलें । तें निर्गुण ऐसें बोलिलें । येर तें अवघेंचि जालें । मायेमधें ॥ १६ ॥

कल्पांत प्रळयाच्या तडाख्यातून जे उरते त्याला निर्गुण परब्रह्म म्हणतात.त्या निर्गुण परब्रह्माखेरीज सगळे मायेमध्येच येते.

सेना शाहार बाजार । नाना यात्रा लाहानथोर । शब्द उठती अपार । कैसे निवडावे ॥ १७ ॥

(सगुण निर्गुण ह्यांचा सूक्ष्म विवेक शब्दांपलीकडला आहे.आता जगात अनेक(संप्रदाय,पंथ,धर्म) उपासना असल्यातरी शब्दातच जोवर घोटाळत आहेत तोवर त्यात निवडानिवड कशी करावी?(निवडानिवड करीत कोणी बसावे! मतामतांचा गलबला हा चालतच असतो.ह्यावर पुढील सर्व दृष्टांत आहेत.) लष्कर,दाट वस्तीचे शहर (शाहार),बाजार,लहानमोठ्या यात्रा ह्यात असंख्य शब्द होतात.ते कसे निवडावे व त्याचा विचार करायचा कसा?

काळामधें प्रज्यन्यकाळ । मध्यरात्रीं होतां निवळ । नाना जीव बोलती सकळ । कैसे निवडावे ॥ १८ ॥

पावसाळ्यात मोठा मुसळधार पाऊस पडून मध्यरात्री जरा निवांत झाले की अनेक जीवांच्या बोलण्याचे शब्द ऐकू येतात.(उठत असतात) पण त्याची निवड कशी करावयाची? (पण त्या गलबल्यातील शब्द निवडायचे कसे व त्यांचा विस्तार करावयाचा कसा?)

नाना देश भाषा मतें । भूमंडळीं असंख्यातें । बहु ऋषी बहु मतें । कैसीं निवडावीं ॥ १९ ॥

ह्या पृथ्वीवर अनेक देश,अनेक भाषा व असंख्य मते आहेत.त्या अनेक ऋषींच्या अनेक मतात निवड कशी करावयाची?

वृष्टी होतां च अंकुर । सृष्टीवरी निघती अपार । नाना तरु लाहानथोर । कैसे निवडावे ॥ २० ॥

पहिला पाऊस पडला की लहानमोठ्या अनेक वृक्षांचे अनेक अंकुर व लहानमोठे तंतू (वेलींचे) निर्माण होतात त्यात निवड कशी करावयाची?

खेचरें भूचरें जळचरें । नाना प्रकारींचीं शरीरें । नान रंग चित्रविचित्रें । कैसी निवडावीं ॥ २१ ॥

खेचरे,जळचरे,भूचरे,अशा अनेक प्राण्यांची अनेक भिन्नभिन्न प्रकारची व विविध आकृतीची अनंत शरीरे आहेत त्यात निवड काय करावी?

कैसें दृश्य आकारलें । नानापरीं विकारलें । उदंडचि पैसावलें । कैसें निवडावें ॥ २२ ॥

दृश्य कसे आकाराला आले,त्यात अनेक विकार कसे झाले आणि त्याचा एवढा अफाट विस्तार कसा झाला,हे कसे निवडावे?(पंचभूत त्रिगुणांची सृष्टी मूळ मायेतून प्रकटतेला येत येत अनंत विकारांनी विस्तार-पावली आहे.त्यात काय काय निवडावे?)

पोकळीमधें गंधर्वनगरें । नाना रंग लाहनथोरें । बहु वेक्ति बहु प्रकारें । कैसीं निवडावीं ॥ २३ ॥

(पोकळीमधें गंधर्वनगरें - आकाशात ढगांचे विलोभनीय आकार होतात.)

आकाशातील गंधर्व नगरात अनेक रंगांच्या लहानमोठ्या अनेक व्यक्ति व अनेक प्रकार उत्पन्न झालेले दिसतात त्यात कशा प्रकारची निवड करावी ?

दिवसरजनीचे प्रकार । चांदिणें आणी अंधकार । विचार आणी अविचार । कैसा निवडावा ॥ २४ ॥ विसर आणी आठवण । नेमस्त आणी बाष्कळपण । प्रचित आणी अनुमान । येणें रितीं ॥ २५ ॥

दिवस आणि रात्र,चांदणे (प्रकाश) आणि अंधकार,विचार आणि अविचार,विस्मरण आणि स्मरण (आठवण),व्यवस्थितपणा आणि बाष्कळपणा,अनुभव (प्रचीति) आणि अनुमान (तर्क) ह्यांची सृष्टीत झालेली सरमिसळ वेगवेगळी कशी काढावी?

न्याय आणी अन्याय । होय आणी न होये । विवेकेंविण काये । उमजों जाणे ॥ २६ ॥

न्याय व अन्याय,होते की होत नाही,होणारे जाणारे आणि शाश्वत ह्यातील निर्णय विवेकावाचून कसा कळेल?

कार्यकर्ता आणी निकामी । शूर आणी कुकर्मी । धर्मी आणी अधर्मी । कळला पाहिजे ॥ २७ ॥ धनाढ्य आणि दिवाळखोर । साव आणि तश्कर । खरें खोटें हा विचार । कळला पाहिजे ॥ २८ ॥

कार्यकर्ता आणि निकामी पुरुष,शूर आणि कुकर्मी (विषयकिंकर),धार्मिक (धर्मिष्ठ) आणि अधार्मिक (धर्मलंड),श्रीमंत (धनाढ्य) आणि दिवाळखोर,साव (सभ्य) आणि चोर,सत्य आणि असत्य,वरिष्ठ आणि कनिष्ठ,भ्रष्ट आणि अंतर्निष्ठ ह्या सर्वातील सारासार विचार (तारतमभाव) स्पष्ट कळला पाहिजे (तात्पर्य सृष्टीत विविधत्व भरलेले आहे,त्यातच (नानाविध संप्रदाय व उपसानांची ही विविधता आहे.) अनेक उपसानांची ही विविधता आहे.

वरिष्ठ आणि कनिष्ठ । भ्रष्ट आणी अंतरनिष्ठ । सारासार विचार पष्ट । कळला पाहिजे ॥ २९ ॥

विविधत्व हे सारे मायेतील आहे,असार आहे,असार ते विवेकाने टाकून देऊन सर,शाश्वत असे निर्गुणच स्वीकारावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे नाना उपासनानिरूपणनाम समास नववा ॥**

## समास दहावा : गुणभूतनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

पंचभूतें चाले जग । पंचभूतांची लगबग । पंचभूतें गेलियां मग । काये आहे ॥ १ ॥

पंचभूतांच्या योगाने जग चालते,सारी चळवळ त्याची आहे.पंचभूते नाहीशी झाल्यावर मग राहिले काय?

श्रोता वक्तयास बोले । भूतांचे महिमे वाढविले । आणि त्रिगुण कोठें गेले । सांगा स्वामी ॥ २ ॥

ह्यावर श्रोता वक्त्याला म्हणतो-महाराज भूतांची एव्हढी प्रतिष्ठा वाढवून सांगता तर त्रिगुण कोठे गेले,(त्याचे काहीच महत्व नाही काय?) हे सांगा.

अंतरात्मा पांचवे भूत । त्रिगुण त्याचें अंगभूत । सावध करूनियां चित्त । बरें पाहें ॥ ३ ॥

(उत्तर) - आकाश म्हणजे अंतरात्मा हे पांचवे भूत होय व त्रिगुण त्याच्या अंगभूत आहेत (अर्थात त्रिगुणांचा अंतर्भाव आकाशातच होतो) चित्त सावध करून नीट विचार करून पाहा.

भूत म्हणिजे जितुकें जालें । त्रिगुण जाल्यांत आले । इतुकेन मूळ खंडलें । आशंकेचें ॥ ४ ॥

जितके उत्पन्न झाले तितके भूत होय,अर्थात त्रिगुणही त्यातच आले.एव्हढ्याने शंका निरसन झाली.(शिवाय भूत झाले (भू-होणे) ते त्रिगुण झालेल्यात आहेत,अर्थात त्यांचा समावेश भूतातच होतो.)

भूतांवेगळें कांहीं नाहीं । भूतजात हें सर्व हि । येकावेगळें येक कांहीं । घडेचिना ॥ ५ ॥

भूतावाचून काही नाही,आहे ते सगळे भूतात्मक आहे,भूते व त्रिगुण ह्यांचे परस्परावाचून काही चालत नाही (एकाशिवाय एक होत नाही असा भूतांचा परस्पर संबंध आहे.)

आत्म्याचेनी जाला पवन । पवनाचेन प्रगटे अग्न । अग्नीपासून जीवन । ऐसें बोलती ॥ ६ ॥

आत्म्यावाचून आकाश,त्यापासून वायु,वायूपासून अग्नि,अग्नीपासून पाणी (आप) झाले असे सांगतात.

जीवन आवघें डबाबिलें । तें रविमंडळें आळलें । वन्हीवायोचेन जालें । भूमंडळ ॥ ७ ॥

पाणी सर्वत्र भरलेले (डबाबले) होते ते सूर्याच्या तेजामुळे आळले,तेव्हा त्याची वायु व अग्नि ह्यांच्या सहाय्याने पृथ्वी झाली.

वन्ही वायो रवी नस्तां । तरी होते उदंड सीतळता । ते सीतळतेमधें उष्णता । येणें न्यायें ॥ ८ ॥

अग्नि,वायु व सूर्य हे नसते तर सर्वत्र खूप पाण्याची थंडीच भरुन राहिली असती.ह्याप्रमाणे पाण्याच्या शीतळतेत उष्णता आली.

आवघें वर्मासी वर्म केलें । तरीच येवढें फांपावलें । देहेमात्र तितुकें जालें । वर्माकरितां ॥ ९ ॥

सगळे एकाला एक वर्म (मारक) करून ठेवले आहे म्हणून एव्हढा सृष्टीचा विस्तार झाला आहे व म्हणून त्याच वर्मामुळे सगळे पंचभूतांत्मक देह झाले आहेत.

आवघें सीतळचि असतें । तरी प्राणीमात्र मरोनी जातें । आवघ्या उष्णेंचि करपते । सकळ कांहीं ॥ १० ॥

सगळी थंडीच असती (सारी पाण्याची शीतळताच असती) तर सर्व प्राणी कुडकूडून-काकडून मेले असते.सारी उष्णताच असती तर सारे करपून गेले असते.

भूमंडळ आळोन गोठलें । तें रविकिर्णें वाळोन गेलें । मग सहज चि देवें रचिलें । उपायासी ॥ ११ ॥

पाणी आळून घट्ट गोळा बनलेली पृथ्वी सूर्याच्या तेजाने वाळून निघाली मग त्यावर देवाने ओघानुसार पुन्हा दुसरा उपाय योजला.

म्हणोनी केला प्रज्यन्यकाळ । थंड जालें भूमंडळ । पुढेंउष्ण कांहीं सीतळ । सीतकाळ जाणावा ॥ १२ ॥

म्हणून देवाने पर्जन्यकाळ उत्पन्न करून पृथ्वी थंड केली.नंतर काही उष्ण व काही शीतळ असा हिवाळा उत्पन्न केला.

सीतकाळें कष्टले लोक । कर्पोन गेलें वृक्षादिक । म्हणोन पुढें कौतुक । उष्णकाळाचें ॥ १३ ॥

थंडीने प्राणी त्रासले,वृक्षवेली वगैरे करपून गेल्या म्हणून मग उन्हाळा केला.

त्याहिमधें प्रातःकाळ । माध्यानकाळ सायंकाळ । सीतकाळ उष्णकाळ । निर्माण केले ॥ १४ ॥

त्यातही पुन्हा सकाळ दुपार संध्याकाळ असे तीन काळ योजून उष्ण व शीत ह्यांचे तारतम्य ठेवले.

ऐसें येकामागें येक केलें । विलेनें नेमस्त लाविलें । येणेंकरितां जगले । प्राणीमात्र ॥ १५ ॥

(विलेनें - क्रमाने,विल्हेवारीने))

असे एकामागे एक उत्पन्न करून क्रमाने ( विलेने,विल्हेवारीने) व्यवस्थित लावले म्हणून प्राणी जगले आहेत.

नाना रसें रोग कठिण । म्हणोनी औषधी केल्या निर्माण । परंतु सृष्टीचें विवरण । कळलें पाहिजे ॥ १६॥

अनेक रस सेवन केल्यामुळे दुर्धर (कठिण) रोग उत्पन्न झाले,त्यावर उपाय (तोड) म्हणून अनेक ओषधी निर्माण केल्या,पण(एकामागून एकाचे वर्म एक अशी) ही सृष्टी कशी झाली,ते विवरण करून समजुन घेतले पहिले.

देहेमूळ रक्त रेत । त्या आपाचे होती दात । ऐसीच भूमंडळीं प्रचित । नाना रत्नांची ॥ १७ ॥

देहाचे मूळ (म्हणजे स्त्रीचे रक्त व पुरुषाचे रेत) स्त्रीपुरुष वीर्य आहे (ते आपरूप आहे.) त्या आपाचे कठिण असे दात आहेत,आपापासून ह्याच न्यायाने जगामध्ये रत्ने झाली आहेत.

सकळांसी मूळ जीवन बांधा । जीवनें चाले सकळ धंदा । जीवनेंविण हरिगोविंदा । प्राणी कैचे ॥ १८ ॥
जीवनाचें मुक्ताफळ । शुक्रासारिखें सुढाळ । हिरे माणिके इंद्रनीळ । ते जळें जाले ॥ १९ ॥

(जीवनाचें मुक्ताफळ - पाण्याचे मोती होतात, सुढाळ - पाणीदार,तेजस्वी)

सर्व देहाचे मूळ जीवनच आहे.जीवनानेच सगळा उद्योग धंदा चालतो.जीवन नसेल तर हरिगोविंदा (काही-नाही) प्राणी कोठून राहणार? (जीवनावीण जीव कसचे जगतात?)(सर्वाचे मूळ आप म्ह. जीवन,सर्व देह पाण्यापासून तयार झाले त्यानेच ते वागले व जगले आहेत.)

शुक्राच्या चांदणीसारखी (सुढाळ) पाणीदार मोत्ये पाण्यानेच होतात.हिरे,माणके,इंद्रनीळ पाण्याचीच झाली (पाण्यापासून झाल्यामुळेच तेजाळ म्ह. कांतिमान झाली आहेत.)

महिमा कोणाचा सांगावा । जाला कर्दमुचि आघवा । वेगळवेगळु निवडावा । कोण्या प्रकारें ॥ २० ॥

उदकाचा महिमा सांगितला पण बाकीच्या भूतांचा महिमा पण असाच थोर आहे.असा महिमा कोणकोणत्या भूतांचा सांगावा? सगळेच मिश्रणच (कर्दमच) झाले आहे ते वेगवेगळ्या प्रकारे निवडावे कसे?(सृष्टी पंचभूतांच्या (चिखल,मिश्रण) कर्दमापासून झाली आहे त्यात भूते परस्परांपासून वेगळी करून दाखविता येत नाहीत.)

परंतु बोलिलें कांहींयेक । मनास कळावया विवेक । जनामधें तार्किक लोक । समजती अघवें ॥ २१ ॥

(अघवें - अवघे,सर्वत्र)

(विचारांची दिशा दाखविली आहे त्यावरून शहाण्यांनी वर्म जाणावे.) परंतु मनाला विचार कळावा म्हणून थोडेसे सांगितले आहे.लोकांमध्ये शहाणे असतात ते सर्व समजतात.

आवघें समजलें हें घडेना । शास्त्रांशास्त्रांसीं पडेना । अनुमानें निश्चय होयेना । कांहींयेक ॥ २२ ॥

पण सगळे पूर्णपणे समजणे शक्य नाही कारण अनेक शास्त्रांचा पूर्णपणे मेळ नाही आणि संशयामुळे कोणताही निश्चय पक्का होत नाही (सर्व पूर्णत्वे कळणे कोणासच शक्य नाही,म्हणून तर विविध शास्त्रे परस्परांशी पूर्ण मिळत नाहीत म्हणून अनुमानाने-कारण शास्त्रे अनुमानिक आहेत-निश्चय होत नाही.)

अगाध गुण भगवंताचे । शेष वर्णूं न शके वाचें । वेदविधी तेहि काचे । देवेंविण ॥ २३ ॥

(देवेंविण - अंतराम्याशिवाय)

भगवंताचे (अंतरात्म्याचे) गुण अगाध आहेत.शेषालाही ते आपल्या हजार तोंडानी वर्णन करता येणे शक्य नाही वेद व ब्रह्मदेवसुद्धा अंतरातम्यावाचून असमर्थ होत.(भगवंताचे अगाध गुण शेषही वानू शकत नाही,वेद व विधि ब्रह्मदेवसुद्धा वर्णन करण्यास असमर्थ आहे.)

आत्माराम सकळां पाळी । आवघें त्रयलोक्य सांभाळी । तया येकेंविण धुळी । होये सर्वत्रांची ॥ २४ ॥

आत्माराम(अंतरात्मा-नारायण) सर्वांचे पालन करितो,सारे त्रैलोक्य सांभाळतो.तो एकटा नसेल तर सगळ्यांची धूळधाण उडेल.(त्याच्यावाचून सारेच धुळीस मिळतील)

जेथें आत्माराम नाहीं । तेथें उरों न शके कांहीं । त्रयलोकीचे प्राणी सर्वहि । प्रेतरूपी ॥ २५ ॥

अंतरात्मा नाही तेथे काहीच राहणे शक्य नाही,त्यावाचून त्रैलोक्यातले सगळे प्राणी प्रेतरूप होऊन जातील

आत्मा नस्तां येती मरणें । आत्म्याविण कैचें जिणें । बरा विवेक समजणें । अंतर्यामीं ॥ २६ ॥

आत्मा नसेल तर मृत्यू येतो,त्याशिवाय जगणे शक्य नाही (तो नाही म्हणजे मृत्यू,तो आहे म्हणजे जगणे) ह्याचा विचार अंतःकरणात नीट समजून घ्यावा.

समजणें जें विवेकाचें । तेंहि आत्म्याविण कैचें । कोणीयेकें जगदीशाचें । भजन करावें ॥ २७ ॥

विवेकाच्या योगाने जे समजून घ्यावयाचे ते आत्म्यावाचून कसे समजून घेता येईल? म्हणून कोणीही असला तरी त्याने जगदीशाचे (अंतरात्म्याचे) भजन करावे.(विवेकाचे समजणे हे ही आत्म्यामुळे म्हणून त्या आत्मारामाचे-जगदीशाचे भजन करावे.)

उपासना प्रगट जाली । तरी हे विचारणा कळली । याकारणें पाहिजे केली । विचारणा देवाची ॥ २८ ॥

माझी उपासना प्रकट झाली की हा आत्मविचार मला कळतो म्हणून( तुम्हीही उपासना करून) देवाची प्राप्ती करून घेण्याचा विचार केला पाहिजे (म्हणून देव जो अंतरात्मा त्याचा विचार करावा)

उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो । उदंड केलें तरी तो जयो । प्राप्त नाहीं ॥ २९ ॥

उपासनेचा आश्रय फार मोठा आहे.तिच्यावाचून सर्व जीव निराश्रित आहेत.उपासनेच्या पाठिंब्यावाचून वाटेल तेवढे प्रयत्न केले तरी यश मिळणार नाही (पुष्कळ चळवळी केल्या पण उपासनेचे बळ नाही तर त्या निष्फळ होतात.)

समर्थाची नाहीं पाठी । तयास भलताच कुटी । याकारणें उठाउठी । भजन करावें ॥ ३० ॥

समर्थ (आत्माराम) जर पाठिराखा नसेल (पाठीराखा केला नाही) तर तो (भूते काय व कामादि विकार काय) येऊन यथेच्य ठोकतो.म्हणून (तात्काळ देवाला ओळखून) त्याचे भजन करावे.

भजन साधन अभ्यास। येणें पाविजे परलोकास । दास म्हणे हा विश्र्वास । धरिला पाहिजे ॥ ३१ ॥

भजनादि साधनांच्या अभ्यासाने परलोकाची (प्रकृतिपर ब्रहमस्थितीची) प्राप्ति होते.पण रामदास म्हणतात,ह्यावर श्रद्धा ठेवली पाहिजे.

**(येथे शाश्र्वत असे काही नाही जन्माबरोबर मृत्यूची (लयाची) जोड लाभली आहे किंबहुना तो पर्यंत ते विशेष अस्तित्व आहे ज्याक्षणी तो विशेष लय थांबतो.त्याक्षणी ते विशेष अस्तित्व परिवर्तित झालेले असते,मृत्यू आपला सदैव पाठलाग करीत असतो म्हणून हे विशेष जीवन चालू असलेले आपल्याला अनुभवास येत आहे मृत्यू नसता तर परिवर्तन नसते.परिवर्तन हाच जीवनाचा स्थायीभाव आहे. सूक्ष्मपेशी–संयुग–परिवर्तन–एकाचा लय अर्थात मृत्यू त्याच क्षणी दुसऱ्याचा जन्म अर्थात उदय हे चक्र अव्याहत चालू आहे. उत्पत्ति–स्थिति–लय हेच सत्य हेच ब्रहमा,विष्णु,महेश हाच अर्ध नारी नटेश्वर हेच ह्या विश्र्वाचे चिरंतन सत्य आहे.)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे गुणभूतनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक सोळावा समाप्त ॥**

# सार्थ श्रीदासबोध दशक सतरावा - प्रकृतिपुरुषाचा

**दशक सतरावा प्रकृतीपुरुषाचा (९२८ - ९७३)**



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक सतरावा : प्रकृति पुरुष**

**समास पहिला : प्रकृतिपुरुषनाम॥ श्रीरामसमर्थ ॥**

(देवबळात्कार नाम - अंतरात्मा बळांत्काराने आपला कार्यभाग साधून घेत असतो म्हणून हे नाम)

निश्चळ ब्रह्मी चंचळ आत्मा । सकळां पर जो परमात्मा । चैतन्य साक्षी ज्ञानात्मा । शड्गुणैश्वरु ॥ १ ॥

निश्र्चळ ब्रह्मापासून (मूळमाया) चंचळ आत्मा झाला,तो सकळा पर म्हणजे पंचभूते व त्रिगुण ह्यांच्या पलीकडचा आहे त्याला परमात्मा,चैतन्य,साक्षी,ज्ञानात्मा,षडगुणेश्र्वर अशी नावे आहेत.

सकळ जगाचा ईश्वरु । म्हणौन नामें जगदेश्वरु । तयापासून विस्तारु । विस्तारला ॥ २ ॥

तो सर्व जगाचा ईश्वर आहे व त्याच्यापासून सर्व विस्तार (सृष्टिविस्तार) झाला आहे.म्हणून त्याला जगदीश्र्वर म्हणतात.

शिवशक्ती जगदेश्वरी । प्रकृतिपुरुष परमेश्वरी । मूळमाया गुणेश्वरी । गुणक्षोभिणी ॥ ३ ॥ क्षेत्रज्ञ द्रष्टा कूटस्त साक्षी । अंतरात्मा सर्वसाक्षी । सुद्धसत्व महत्तत्त्व परीक्षी । जाणता साधु ॥ ४ ॥

शिवशक्ति,जगदीश्वरी,प्रकृतिपुरुष,परमेश्र्वरी,मूळमाया,गुणेश्र्वरी,गुणक्षोभिणी,क्षेत्रज्ञ,द्रष्टा,कूटस्थ,साक्षी,अंतरात्मा,सर्वलक्षी,शुद्धसत्व,महतत्व (ही सर्व नावे त्या आत्म्याची म्ह.अंतरात्म्याची असून) ह्याची परीक्षा जाणता साधु असेल त्याला होईल.

ब्रह्मा विष्णु महेश्वरु । नाना पिंडी जीवेश्वरु । त्यास भासती प्राणीमात्रु । लहानथोर ॥ ५ ॥

तो ब्रह्मा,विष्णु,शंकर अनंत पिंडातील अनेक जीव व सर्व लहानथोर प्राणीमात्र ह्यांना जाणतो.

देहदेउळामधें बैसला । न भजतां मारितो देहाला । म्हणौनि त्याच्या भेणें तयाला । भजती लोक ॥ ६ ॥

हा अंतरात्मा देव देहरूपी देवळामध्ये बसलेला असून (जे देह त्याला भजत नाहीत त्यांना तो शिक्षा करतो.) त्याचे भजन केले नाही तर देहाला मारतो (देहाचा नाश होतो) ह्या भयाने सर्व लोक त्याचे भजन करतात.

जे वेळेसी भजन चुकले । तें तें तेव्हां पछ्याडिलें । आवडीनें भजों लागले । सकळ लोक ॥ ७ ॥

ज्यावेळी भजनात कोणाकडून चूक (कुचराई) होते,त्यावेळी त्याला तो तेव्हाच शिक्षा करतो (ठोकतो),म्हणून सर्व लोक आवडीने त्याचे भजन करतात (त्याच्यापुढे नमतात.)

जें जें जेव्हां आक्षेपिले । तें तें तत्काळचि दिधलें । त्रैलोक्य भजों लागलें । येणें प्रकरें ॥ ८ ॥

(आक्षेपिले - कशासाठी तरी अडून बसले.)

बरे,त्याच्यापाशी जे जे मागावे ते ते तो देतो म्हणून प्राणिमात्र त्याला शरण जातात,ज्यावेळी जो जे मागतो त्यावेळी त्याला ते ताबडतोब द्यावे लागते.अश्याप्रकारे त्रैलोक्य त्याचे भजन करते.

पांचा विषयांचा नैव्यद्य । जेव्हां पाहिजे तेव्हां सिद्ध । ऐसें न करितां सद्य । रोग होती ॥ ९ ॥

शब्दादि पंचविषयांचा नैवेद्य त्याच्यासाठी नेहमी तयार ठेवावा लागतो,नाहीतर तात्काळ रोग होतो.(नाहीतर तो देहाच्या मागे नाना रोग लावून देतो.)

जेणें काळें नैव्यद्य पावेना । तेणें काळें देव राहेना । भाग्य वैभव पदार्थ नाना । सांडून जातो ॥ १० ॥

त्याला नैवेद्य मिळाला नाही की देव नाराज होऊन देवळात राहात नाही,नाना प्रकारचे भाग्य (भोग्यपदार्थ) व वैभवादि सारे टाकून निघून जातो.

जातो तों कळो देईना । कोणास ठाउकें होयेना । देवेंविण अनुमानेना । कोणास देव ॥ ११ ॥

जातो ते कळू देत नाही,कोणाला माहीत होत नाही त्याच्याशी एकरूप (अनन्य) झाल्याशिवाय त्याचे अनुमान कोणालाच करता येत नाही,(तो स्वतःचे रूप कोणास दाखवत नाही-ह्याप्रमाणे अंतरात्मा बळात्काराने आपला कार्यभाग साधून घेतो)

देव पाहावयकारणें । देउळें लागती पाहाणें । कोठेंतरी देउळाच्या गुणें । देव प्रगटे ॥ १२ ॥

तो देव भेटावा म्हणून देवळे शोधावी (पाहावी) लागतात,म्हणजे कोठेरी देवळामध्येच (संतसद्गुरूच्या ठिकाणी) देव भेटतो (तो प्रत्ययाला येतो त्याची ओळख पटते)

देउळें म्हणिजे नाना शरीरें । तेथें राहिजें जीवेश्वेरे । नान शरीरें नाना प्रकारें । अनंत भेदें ॥ १३ ॥

देवळे म्हणजे अनेक शरीरे,ज्यामध्ये जीवेश्वर हा देव राहातो.शरीरे अनेक व भिन्नभिन्न प्रकारची आहेत.

चालतीं बोलतीं देउळें । त्यामधें राहिजें राउळें । जितुकीं देउळें तितुकीं सकळें । कळली पाहिजे ॥ १४ ॥

चालत्या बोलत्या देवळात देव (राउळ) राहातो.(त्यात तो लवकर अनुभवास येतो.) जितकी शरीरे तितकी सर्व देवळे आहेत हे कळले पाहिजे (सर्व देवळात शरीरात देव-अंतरात्मा राहतो हे कळले पाहिजे.)

मछ कूर्म वाराह देउळें । भूगोळ धरिला सर्वकाळें । कराळें विक्राळें निर्मळें । कितियेक ॥ १५ ॥

भूगोलाला सर्वकाळ धारण करणारे मत्स्य,कूर्म,वराह,ही ही देवाचीच देवळे आहेत.कित्येक देवळे अक्राळविक्राळ आहेत कित्येक सौम्य आहेत मस्य कूर्म वराह ह्या भूगोळावरील सर्व प्राणी,त्यात कित्येक भयंकर ही असतात,सर्वात तो नांदत आहे.)

कित्येक देऊळीं सौख्य पाहे । भरतां आवघें सिंध आहे । परी तें सर्वकाळ न राहे । अशाश्वत ॥ १६ ॥

( भरतां - भर,उचंबळून येणे,सिंध - सुखसागर )

कित्येक देवळात तो सौख्यचं भोगतो इतके की जणू समुद्राला भरतीच आली आहे.पण ते सुख सर्वकाळ टिकत नाही (अशाश्वत असते.)

अशाश्वताचा मस्तकमणीं । जयाची येवढी करणी । दिसेना तरी काय जालें धनी ।तयासीच म्हणावें ॥१७॥

अशास्वत सुखाचा व सृष्टीचा मेरुमणि (अनित्य सृष्टीच्या मस्तकावरचा मणि) म्ह.मूळपुरुष ज्याची कृति एवढी थोर आहे असा तो अंतरात्मा दिसला नाही म्हणून काय झाले? त्यालाच जीवांनी आपला धनी (धणी,मालक) म्हटले-मानिले -पाहिजे

उद्भवोन्मुख होतां अभेद । विमुख होतां उदंड खेद । ऐसा अधोर्ध संवाद । होत जातो ॥ १८ ॥

( उद्भव - ब्रह्म, उद्भवोन्मुख- ब्रह्मैक्य , अध - विषयांकडे,ऊर्ध्व - वर परम्यात्म्याकडे )

सर्वांचा उद्भव (मूळ पुरुष वडील) तो,त्याच्याकडे तोंड वळविले की त्याचा आणि आपला अभेद आहे,त्याच्याकडे पाठ फिरवली (विन्मुख झालो ) की सारे दु:खच आहे.अशी त्याच्या संबंधाने अध व ऊर्ध्व म्हणजे ब्रह्माशी विमुखता व सन्मुखता होते व जाते (अध व ऊर्ध्व म्ह.सुख व दु:ख ह्याचा संबंध आहे.)

सकळांचे मूळ दिसेना । भव्य भारी आणी भासेना । निमिष्य येक वसेना । येके ठाइं ॥ १९ ॥

सर्वांचे मूळ असा तो अंतरात्मा दिसत नाही तो भव्य (व्यापक-सर्वव्यापी व तेजस्वी-प्रकाशरूप) व भारी (सामर्थ्यवान) असून भासत नाही,निमिषभरही एके ठिकाणी स्थिर राहात नाही.

ऐसा अगाध परमात्मा । कोण जाणे त्याचा महिमा । तुझी लीळा सर्वोत्तमा । तूंच जाणसी ॥ २० ॥

असा हा परमात्मा अगाध आहे,त्याचा महिमा कोणाला कळणार?(त्याचा महिमा कोण जाणत असेल तो जाणो) सर्वोतम्मा ! तुझी अशी लीला तुलाच ठाऊक.

संसारा आलियाचें सार्थक । जेथें नित्यानित्यविवेक । येहलोक आणी परलोक । दोनीं साधिले ॥ २१ ॥

नित्यानित्य विवेक करून,इहलोक व परलोक दोन्ही साधले म्हणजे संसाराला आल्याचे सार्थक झाले (नित्यानित्य विवेकाने इहलोक व परलोक प्रपंच आणि परमार्थ दोन्ही ज्याने साधले त्याच्या जन्माचे सार्थक झाले.)

मननसीळ लोकांपासीं । अखंड देव आहिर्निशीं । पाहातां त्यांच्या पूर्वसंचितासी । जोडा नाहीं ॥ २२ ॥

मननशील लोकांजवळ अखंड म्हणजे आदिअंत नाही असा परमेश्र्वर रात्रंदिवस असतो (ते त्याच्याशी नित्ययुक्त असतात) विचार केला तर त्यांच्या पुण्याईला उपमा नाही (त्यांचे पूर्वपुण्य अगाध होय.)

अखंड योग म्हणोनि योगी । योग नाहीं तो वियोगी । वियोगी तोहि योगी । योगबळें ॥ २३ ॥

(अखंड योग - अखंड आत्मानुसंधान)

परमात्म्याशी ज्याचा अखंड योग झाला तो योगी खरा,ज्याला हा योग नाही तो वियोगी म्ह.देवापासून दूर पडलेला असा वियोगी असेल तोही योगबळे एकरूपतेच्या निदिध्यासाने (मनन-निदिध्यास बळाने) योगी (देवाशी अखंड संयुक्त) होतो.

भल्यांची महिमा ऐसी । जे सन्मार्ग लावी लोकांसी । पोहणार असतां बुडतयासी । बुडों नेदावें ॥ २४ ॥

(असा हा मनुष्य भला खरा) भल्याचा थोरपणा हाच की तो इतरांनाही सन्मार्गाला (देवाच्या मार्गाला) लावतो.ज्याला पोहोता येत असेल त्याने कोणी बुडत असेल त्याला बुडू देऊ नये.

स्थूळसूक्ष्मतत्वझाडा । पिंडब्रह्मांडाचा निवाडा । प्रचित पाहे ऐसा थोडा । भूमंडळीं ॥ २५ ॥ वेदांतीचें पंचिकर्ण । अखंड तयाचें विवर्ण । महांवाक्यें अंतःकरण । रहस्य पाहे ॥ २६ ॥

स्थूळ व सूक्ष्म तत्वांचा झाडा (शोध) करून पिंडब्रह्मांडाचा विचाराने निरास करून आत्मानुभव पहाणारा असा पुरुष या जगामध्ये विरळा होय,की जो वेदांतातील पंचीकरणाचे अखंड विवरण करून

(म्ह.मूळमायेपासून पिंडापर्यंत सर्व सृष्टीचा नित्य विचार करून अंतरातील देव महावाक्याच्या विवरणाने पाहात असतो.) अंतःकरणामध्ये महावाक्याचे सार शोधून घेईल

ये पृथ्वीमधें विवेकी असती । धन्य तयांची संगती । श्रवणमात्रें पावती गती । प्राणीमात्र ॥ २७ ॥

ह्या जगामध्ये विवेकी पुरुषांची संगति धन्य होय.त्याचे भाषण ऐकून प्राणिमात्रांचा उद्धार होतो.(त्याच्या मुखाने निरुपण ऐकून प्राणिमात्र उद्धरतात)

सत्संग आणी सत्शास्त्रश्रवण । अखंड होतसे विवर्ण ।नाना सत्संग आणी उत्तम गुण । परोपकाराचे ॥२८॥

(तेथे सत्संग व सच्छास्त्रश्रवण घडून परोपकाराचे उदार गुण आंगी जडतात) तेथे सत्संगति व सच्छास्त्रश्रवण घडून इहपरलोकांच्या सार्थकतेचे अखंड विवरण होते,अनेक सत्पुरुषांचा सहवास घडतो व परोपकार वगैरे करण्याचे उत्तम गुण आंगी जडतात.

जे सद्कीर्तीचे पुरुष । ते परमेश्वराचे अंश । धर्मस्थापनेचा हव्यास । तेथेंचि वसे ॥ २९ ॥

असे जे कीर्तिमान पुरुष आहेत ते परमेश्र्वराचे होत.त्यांच्याच ठिकाणी धर्मस्थापनेची उत्कट आवड असते.(असे सत्कीर्तीचे पुरुष हे देवाचेच अंश होत.त्यांच्याच ठिकाणी धर्मस्थापनेची आवड असते.)

विशेष सारासार विचार । तेणें होय जग्गोद्धार । संगत्यागें निरंतर । होऊन गेले ॥ ३० ॥

त्यांच्या ठिकाणी सारासार विचार विशेष असल्यामुळे त्यांच्या हातून जगाचा उद्धार होतो आणि त्यांनी अहं कर्तुत्वाचा संग सोडल्यामुळे ते शाश्र्वत ब्रह्मस्वरूप होऊन जातात.(सारासार विवेकाने जीवाचा उद्धार होऊन असंगत्वाने ते स्वरुपकार होतात.)

**(आत्मप्राप्तिचा अनुभव आला कि साधकास परमानंदाचा लाभ होतो.साधकाने अशावेळी अत्यंत सावध असायला हवे.पण ते तरी कसे शक्य व्हावे? त्याने (ज्ञानाच्या) अहंकारापासून (मक्षिका) जाणीवपूर्वक स्वतःला दूर ठेवावे.सतत साधना करावी.)**

**इति श्रीदासभोधे गुरुशिष्यसंवादे देवबळात्कारनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : शिवशक्तिनिरूपण॥ श्रीराम ॥**

ब्रह्म निर्मळ निश्चळ । जैसें गगन अंतराळ । निराकार केवळ । निर्विकारी ॥ १ ॥

आकाश किवा अंतराळ ह्यासारखे ब्रह्म निर्मळ,निश्र्चळ निर्विकार,(केवळ) शुद्ध व निराकार आहे.

अंतचि नाहीं तें अनंत । शाश्वत आणी सदोदित । असंत नव्हे तें संत । सर्वकाळ ॥ २ ॥

त्याचा अंतच लागत नाही म्हणून ते अनंत,असंत (अस्थिर,अशाश्वत) नाही, म्हणून संत असे ते नित्य,शाश्वत व सर्वकाळ आहे.

परब्रह्म तें अविनाश । जैसें आकाश अवकाश । न तुटे न फुटे सावकास । जैसें तैसें ॥ ३ ॥

परब्रह्म अविनाशी आहे आकाश आणि अवकाश ह्याप्रमाणेच ते तुटत नाही,फुटत नाही ते स्वस्थपणाने (सदोदित) जसेच्या तसेच आहे.

तेथें ज्ञान ना अज्ञान । तेथें स्मरण ना विस्मरण । तेथें अखंड निर्गुण । निरावलंबी ॥ ४ ॥

तेथे ज्ञान नाही किवा अज्ञानही नाही,स्मरण नाही किवा विस्मरण नाही ते निरावलंबी म्ह.त्याला कोणाचाही आश्रय नाही ते स्वयंभू आहे.ते अखंड आहे व निर्गुण आहे.

तेथें चंद्र सूर्य ना पावक । नव्हे काळोखें ना प्रकाशक । उपाधीवेगळें येक । निरोपाधी ब्रह्म ॥ ५ ॥

तेथे चंद्र सूर्य व अग्नि (पावक) नाही तेथे अंधारही नाही व प्रकाशही नाही (असे व्दैत रहित,अव्दय,निरुपाधिक आहे म्ह.) उपाधीहून निराळे असे परब्रह्म होय.

निश्चळीं स्मरण चेतलें । त्यास चैतन्य ऐसें कल्पिलें । गुणासमत्वें जालें । गुणसाम्य ऐसें ॥ ६ ॥

निश्र्चळाच्या ठिकाणी जे चळण,स्मरण,चेतले (प्रकट झाले) ते चैतन्य अशी कल्पना केली त्याच्या ठिकाणी जे चळण,स्मरण चेतले (प्रकट झाले) ते चैतन्य आहे अशी कल्पना केली.त्याच्या ठिकाणी (सत्व-रज-तम हे) तिन्ही गुण समानत्वाने आहेत,म्हणून त्याला गुणसाम्य म्हणजे गुणमाया असे म्हणतात.(असे नाव ठेविले)

गगनीं आली अभ्रछ्याया । तैसी जाणिजे मूळमाया । उद्भव आणी विलया । वेळ नाहीं ॥ ७ ॥

आकाश निश्र्चळ असता मध्ये ढग यावेत (वर ढग पसरावेत) आणि त्यांना पसरायला व नाहीसे होण्याला वेळ लागत नाही (तसे ब्रह्मी मूळमायेचे आवरण उभे राहिले ) त्याप्रमाणे ही मूळमाया (स्मरण चैतन्य) आहे.

निर्गुणीं गुणविकारु । तोचि शड्गुणैश्वरु । अर्धनारीनटेश्वरु । तयास म्हणिजे ॥ ८ ॥ आदिशक्ति शिवशक्ति । मुळीं आहे सर्वशक्ति । तेथून पुढें नाना वेक्ती । निर्माण जाल्या ॥ ९ ॥

निर्गुणाच्या ठिकाणी हा जो (ढग) गुणविकार उत्पन्न झाला त्यालाच षडगुणेश्वर,अर्धनारीनटेश्वर, आदिशक्ति,शिवशक्ति इत्यादि नावे आहेत.त्या मूळमायेतच पुढील विश्र्वोत्पत्तीची (सृष्टिरचनेची) सर्वशक्ति सर्व बीजे असून पुढे तिच्यापासून अनेक आकार उत्पन्न झाले (अनेक तत्वे आकारास आली)

तेथून पुढें शुद्धसत्व । रजतमाचें गूढत्व । तयासि म्हणिजे महत्तत्त्व । गुणक्षोभिणी ॥ १० ॥

ज्याच्यामध्ये रज,तम,,गुप्तरूपाने आहेत असे शुद्ध सत्व त्या मूळमायेपासून उत्पन्न झाले.त्यालाच महतत्व किवा गुणक्षोभिणी म्हणतात.(त्या मूळमायेतच पुढील सृष्टिरचनेची सर्वशक्ति सर्व बीजे असून तिच्यापासूनच अनेक तत्वे आकारास आली) तेथून शुद्ध सत्व ह्यातच रज-तमही सूक्ष्मबीजरूपाने होते.) (महतत्व किवा गुणमाया झाली)

मुळीं असेचिना वेक्ती । तेथें कैंची शिवशक्ती । ऐसें म्हणाल तरी चित्तीं । सावधान असावें ॥ ११ ॥

आता मूळमायाच जर व्यक्त नाही तर तेथे शिवशक्ति कोठून आली,असे म्हणाल तर चित्तांत सावधपणा धरून विचार करावा.

ब्रह्मांडावरून पिंड । अथवा पिंडावरून ब्रह्मांड । अधोर्ध पाहातां निवाड । कळों येतो ॥ १२ ॥

ब्रह्मांडावरून पिंड व पिंडावरून ब्रह्मांड असा वरून खाली व खालून वर कसाही विचार करून पाहा म्हणजे काय ते कळून येईल (आपण पिंडावरून ब्रह्मांडाचा विचार करून शिवशक्तिपर्यंत जाऊ.)

बीज फोडून आणिलें मना । तेथें फळ तों दिसेना । वाढत वाढत पुढें नाना । फळें येती ॥ १३ ॥

बीज फोडून पहिले तर त्यात फळ काही दिसत नाही.पण बीज वाढत जाऊन वृक्ष झाला म्हणजे त्याला अनेक फळे येतात.(आंब्याची कोय फोडून पहिली तर त्यात फळ दिसत नाही पण ती कोय जमिनीत लाऊन निगा राखून तिचे मोठे झाड वाढविले म्हणजे शेवटी फळे येतात.)

फळ फोडितां बीज दिसे । बीज फोडितां फळ नसे । तैसा विचार असे । पिंडब्रह्मांडीं ॥ १४ ॥

त्यातील फळ फोडून पाहिले तर त्यात बीज दिसते पण बीज फोडून पहिले तर त्यात काही फळ दिसत नाही.हाचप्रकार पिंडब्रह्मांडातला आहे.(असाच पिंडब्रह्मांडाचा विचार करावा.)

नरनारी दोनी भेद । पिंडीं दिसती प्रसिद्ध । मुळी नस्तां विशद । होतील कैसीं ॥ १५ ॥

स्त्री पुरुष हे दोन भेद पिंडात दिसतात.हे प्रसिद्धच आहे.मूळमायेत जर हे भेद नसते तर पिंडात ते इतके स्पष्टपणे कोठून दिसते?

नाना बीजरूप कल्पना । तींत काये येक असेना । सूक्ष्म म्हणोनि भासेना । येकायेकीं ॥ १६ ॥

अनेक प्रकारच्या बिजाप्रमाणेच मूळ आत्मरूपी,कल्पनेत काय काय असत नाही?(सर्व आहे) सूक्ष्म असल्यामुळे एकाएकी भासमान होत नाही इतकेच.(बीजरूप कल्पनेच्या पोटात अनेक कल्पना असतात.त्या सूक्ष्म म्हणून भासत नाहीत इतकेच.)

स्थूळाचें मूळ ते वासना । ते वासना आधीं दिसेना । स्थूळावेगळें अनुमानेना । सकळ कांहीं ॥ १७ ॥

स्थूळाचे मूळ वासना आहे (वासनेमुळेच हा स्थूळ देह निर्माण होतो.) पण ती वासना काही दिसत नाही (पण वासना कोठे दिसते?) परंतु स्थूळदेहाच्या साहयावाचून कोणत्याही गोष्टीचा विचार करता येत नाही (सांगायचे इतकेच की स्थूळावरून सूक्ष्माची-दृष्टावरून अदृश्याची कल्पना करावी लागते.)

कल्पनेची सृष्टी केली । ऐसीं वेदशास्त्रें बोलिलीं । दिसेना म्हणोन मिथ्या केली । न पाहिजेत कीं ॥ १८ ॥

कल्पनेपासून सृष्टि झाली असे वेदशास्त्रे सांगतात.पण ती कल्पना दिसत नाही म्हणून वेद्शास्त्राचे सांगणे खोटे होत नाही.

पडदा येका येका जन्माचा । तेथें विचार कळे कैंचा । परंतु गूढत्व हा नेमाचा । ठाव आहे ॥ १९ ॥

एक एक जन्म हा एक एक पडदा आहे ( असे अनेक पडदे व ब्रह्म ह्यामध्ये असल्याने) ब्रह्मस्वरूपाचा-मूळचा विचार आपणास कसा उमजणार? (आपणास मूळचा विचार कळत नाही) परंतु रहस्य गुप्त असावयाचे हा नेमच आहे (पण निश्चित रहस्ये अशीच गूढ असतात.ती विवेकाशिवाय उमजत नाहीत.)

नाना पुरुषांचे जीव । नाना स्त्रियांचे जीव । येकचि परी देहस्वभाव । वेगळाले ॥ २० ॥

जीव पुरुषांचे असोत वा स्त्रियांचे असोत,ते एकच आहेत पण देहस्वभाव भिन्न भिन्न आहेत.

नवरीस नवरी नलगे । ऐसा भेद दिसों लागे । पिंडावरून उमगे । ब्रह्मांडबीज ॥ २१ ॥

नवरीला नवरी नको असते (नवराच पाहिजे असतो) असा प्रकार दिसतो.(हा पिंडात नियम दिसतो) ह्यावरून ब्रह्मांडाचे बीज जे मूळमाया तिच्या स्थितीचा उमज पडेल (ह्यावरून ब्रह्मांड बीज जी मूळमाया तिचा विचार करा.)

नवरीचें मन नवर्‍यावरी । नवर्‍याचें मन नवरीवरी । ऐसी वासनेची परी । मुळींहून पाहावी ॥ २२ ॥

नवरीचे मन नवऱ्यावर व नवऱ्याचे मन नवरीवर असा वासनेचा भिन्न प्रकार पिंडात दिसतो.(अशी पिंडात भिन्न वासना दिसते,तिचा पत्ता मूळमायेत लावावा.) त्याचा शोध मूळमायेत करावा.

वासना मुळींची अभेद । देहसमंधें जाला भेद । तुटतां देहाच समंध । भेद गेला ॥ २३ ॥

वासना तत्वतः अभिन्न आहे पण स्त्रीपुरुषदेहसंबंधाने भेद होतो.देहाचा संबंध सुटला की भेद गेला.

नरनारीचें बीजकारण ।शिवशक्तीमधें जाण । देह धरितां प्रमाण । कळों आलें ॥ २४ ॥

पिंडामध्ये जो स्त्रीपुरुषांचा भिन्न भाव दिसत आहे तोच मूळमायेमध्ये बीजरूपाने असला पाहिजे म्हणूनच देह धारण झाल्यावर तो निश्चितपणे समजून आला (पिंडात नरनारींचा जो भेदसंबंध दिसतो तोच मूळमायेत शिवशक्तिरूपाने सूक्ष्मत: असला पाहिजे,असे स्थूळावरून सूक्ष्माकडे मागे जाता जाता आढळून आले.)

नाना प्रीतीच्या वासना । येकाचें येकास कळेना । तिक्षण दृष्टीनें अनुमाना । कांहींसें येतें ॥ २५ ॥

प्रीतीच्या सूक्ष्म वासना अनेक असतात.त्या एकाच्या एकाला कळून येत नाहीत बारकाईने विचार केला म्हणजे कळून येते.

बाळकास वाढवी जननी । हें तों नव्हे पुरुषाचेनी । उपाधी वाढे जयेचेनी । ते हे वनिता ॥ २६॥

बाळाला आई वाढविते हे काम पुरुषाकडून होणार नाही जिच्या योगाने उपाधि वाढते अशी ही स्त्री आहे (सारी उपाधि वाढते स्त्रीमुळेच)

वीट नाहीं कंटाळानाहीं । आलस्य नाहीं त्रास नाहीं । इतुकी माया कोठेंचि नाहीं । मातेगेगळी ॥ २७ ॥

वीट नाही,कंटाळा नाही आळस नाही त्रास नाही आईशिवाय इतकी ममता कोठेच सापडणार नाही (ममता अत्यंत हे आईवाचून कोणाच्याही हातून होणार नाही)

नाना उपाधी वाढऊं जाणे । नाना मायेनें गोऊं जाणे । नाना प्रीती लाऊं जाणे । नाना प्रपंचाची ॥ २८ ॥

अनेक उपाधि वाढविणे,मायेत गोवून ठेवणे किवा प्रपंचाची गोडी लावणे (प्रेमपंचाशी बांधून टाकणे) हे एक आईच करू जाणे.

पुरुषास स्त्रीचा विश्वास । स्त्रीस पुरुषाचा संतोष । परस्परें वासनेस । बांधोन टाकिलें ॥ २९॥

पुरुषाचा विश्र्वास स्त्रीवर असतो व स्त्रीला पुरुषाच्या संगतीने संतोष होतो.अशारीतीने एकमेकांनी एकमेकांच्या वासनेत एकत्र बांधून टाकले आहे (असे वासनेने उभयतास एकत्र बांधले आहे)

ईश्वरें मोठें सूत्र केलें । मनुष्यमात्र गुंतोन राहिलें । लोभाचें गुंडाळें केलें । उगवेना ऐसें ॥ ३० ॥

ईश्वराने मोठे सूत्र केले आहे आणि सोडवावयला कठिण अशा लोभाच्या (प्रेमाच्या) जाळ्यात मनुष्यमात्राला गुंतवून टाकले आहे.

ऐसी परस्परें आवडी । स्त्रीपुरुषांची माहां गोडी । हे मुळींहून चालिली रोकडी । विवेकें पाहावी ॥ ३१ ॥

स्त्रीपुरुषांमध्ये एकमेकांविषयी असे पराकाष्ठेचे प्रेम असते,ते मूळमायेपासूनच चालत आलेले आहे. ह्याचा प्रत्यक्ष अनुभव विचाराने घ्यावा-पाहावा.(स्त्रीपुरुषांची ही परस्पर गोडी मूळातच ( मूळमायेपासूनच) चालत आली आहे ह्याचा अनुभव पाहावा.)

मुळीं सूक्ष्म निर्माण जालें । पुढें पष्ट दिसोन आलें। उत्पतीचें कार्य चाले। उभयतांकरितां ॥ ३२ ॥

मूळमायेमध्ये शिवशक्तिरूपाने जो सूक्ष्मरूपाने भेद झाला,तोच पुढे सृष्टीमध्ये व्यक्तरूपाने दिसत असून,सृष्टीच्या उत्पत्तीचे कार्य दोघांमुळे चालते.

मुळीं शिवशक्ती खरें । पुढें जालीं वधुवरें । चौर्यासि लक्ष विस्तारें । विस्तारली जे ॥ ३३॥

मूळमायेतील (सूक्ष्मांत) शिवशक्ति तिचेच स्थूळामध्ये वधूवराच्या रूपाने रुपांतर होते.(सूक्ष्मात शिवशक्ति तीच स्थूळामध्ये वधूवराच्या रूपाने रुपांतर होते. (सूक्ष्मात शिवशक्ती तीच स्थूळात वधूवरे होतात.) तिच्याच योगाने वधूवर ८४ लक्ष योनींचा विस्तार वाढला आहे (८४ लक्ष योनि त्यामुळेच निर्माण झाल्या आहेत.)

येथें शिवशक्तीचें रूप केलें । श्रोतीं मनास पाहिजे आणिलें ।विवरलियांविण बोलिलें। तें वेर्थ जाणावें ॥३४ ॥

ह्या ठिकाणी शिवशक्तिचे रूप स्पष्टपणे सांगितले त्याचा त्याचा श्रोत्यांनी नीट विचार करावा विवरण जर श्रोत्यांनी केले नाही तर माझे बोलणे फुकट आहे. (मननाशिवाय ऐकणे व्यर्थ)

**इति श्रीदासभोधे गुरुशिष्यसंवादे शिवशक्तिनिरूपणनाम समास दुसरा ॥**

### समास तिसरा : श्रवणनिरूपण॥ श्रीराम ॥

थांबाथांबा ऐका ऐका। आधींच ग्रंथ सोडूं नका । सांगितलें तें ऐका । सावधपणें ॥१॥

थांबा थांबा नीट ऐकून घ्या,अगोदर ग्रंथ बाजूला ठेऊ नका जे सांगितले ते नीट सावधपणाने मननपूर्वक ऐका.

श्रवणामध्यें सार श्रवण । तें हें अध्यात्मनिरूपण । सुचित करून अंतःकर्ण । ग्रन्थामधें विवरावें॥ २ ॥

(सुचित - एकाग्रचित्ताने)

श्रवणामध्ये महत्वाचे श्रवण म्हणजे अध्यात्मश्रवण होय.ह्यासाठी अध्यात्म श्रवणाचे विवरण करणे ते मन चागले एकाग्र करून करावे)मग ग्रंथातील तत्वांचे मनन करा.

श्रवणमननाचा विचार । निजध्यासें साक्षात्कार । रोकडा मोक्षाचा उधार । बोलोंचि नये ॥३॥

श्रवणाचे मनन करावे मननाचा निदिध्यास करावा (चितन करावे) आणि निदिध्यास होता होता मोक्षाचा साक्षात्कार निश्चितपणे (ह्याच जन्मात) मिळेल.उधारीचे (पुढील जन्मी फळ मिळेल असे) नाव नको.

नाना रत्नें परीक्षितां । अथवा वजनें करितां । उत्तम सोनें पुटीं घालतां । सावधान असावें ॥ ४ ॥

(पुटीं - मुशीत)

अनेक रत्नांची परीक्षा अथवा उत्तम सोने मुशीत घालताना सावध असावे लागते.

नाना नाणीं मोजून घेणें । नाना परीक्षा करणें । विवेकी मनुष्यासी बोलणें। सावधपणें ॥ ५ ॥

(सावधपणें - दक्षपणे,विचारपूर्वक जागृत राहून)

अनेक नाणी मोजून घेणे अथवा त्यांची परीक्षा करणे,तसेच विवेकी पुरुषांशी बोलणे ही कामे सावधपणाने करावी लागतात.

जैसें लाखोलीचें धान्य। निवडून वेंचितां होते मान्य । सगट मानितां अमान्य । देव क्षोभे ॥ ६ ॥

(लाखोलीचें धान्य - लाखमोलाचे (उत्तम प्रतीचे) धान्य निवडून)

लाखोलीचे धान्य नीट निवडून वाहिले म्हणजे ते देवाला मान्य होते.सरसकट वाहिल्यास (अर्पण केल्यास) देवाचा राग होतो.(लाखोलीचे धान्य बायका नीट निवडून वाहताना दक्षता ठेवतात का की न मोजता तसेच वाहिले तर देवाला राग येतो.)

येकांतीं नाजुक कारबार । तेथें असावें अतितत्पर । त्याच्या कोटिगुणें विचार । अध्यात्मग्रन्थीं ॥ ७ ॥

एकांतामध्ये काही कारभाराच्या नाजूक गोष्टीबद्दल विचार करताना (राजकारणी पुरुषांना) अतिशय सावधपणा ठेवावा लागतो.त्याच्या कोटिपट सावधपणा व एकाग्रता (बुद्धीची सूक्ष्मता) अध्यात्मग्रंथाचा विचार-विवरण करताना असावी लागते.

काहिण्या कथा गोष्टी पवाड । नाना अवतारचरित्रें वाड । त्या समस्तांमध्यें जाड । अध्यात्मविद्या ॥ ८ ॥

कहाण्या,कथा,गोष्टी,पवाडे,अनेक मोठमोठी (वाड) अवतार-चरित्रे ह्या सर्वांपेक्षा अध्यात्मविद्या (जाड) श्रेष्ठ आहे.

गत गोष्टीस ऐकिलें । तेणें काये हातास आलें । म्हणती पुण्य प्राप्त जालें । परी तें दिसेना कीं ॥ ९ ॥

पूर्वीच्या (मागे होऊन गेलेल्याच्या) कथा ऐकल्याने आपणास कोणता लाभ होतो?(आपल्या हाती काय लागते?) पुण्य लागते असे म्हणतात पण पुण्य काही दिसत नाही!

तैसें नव्हे अध्यात्मसार । हा प्रचितीचा विचार । कळतां अनुमानाचा संव्हार । होत जातो ॥ १० ॥

श्रेष्ठ अध्यात्माचा तसा प्रकार नाही स्वतःला त्याचा अनुभव येऊ लागला की संशयाचा पर नाश होऊन जातो ( येथल्या येथे मोक्ष देणारे अध्यात्म होय.) ह्याच्या अनुभवाबरोबर आनुमानिक संशयाचे ज्ञान पार नाहीसे होते.)

मोठे मोठे येऊन गेले । आत्म्याकरितांच वर्तले । त्या आत्म्याचा महिमा बोले । ऐसा कवणु ॥ ११ ॥

जगात मोठमोठे लोक होऊन गेले.त्यांनी आत्मलाभाकरिताच प्रयास केले अशा त्या आत्म्याचा महिमा वर्णन करून सांगेल असा कोण आहे?

युगानयुगें येकटा येक । चालवितो तिनी लोक । त्या आत्म्याचा विवेक । पाहिलाच पाहावा ॥ १२ ॥

युगायुगे जो एकटा आत्मा तिन्ही लोक चालवीत आहे त्याचा विचार पुन्हा पुन्हा करावा.

प्राणी आले येऊन गेले । ते जैसे जैसे वर्तले । ते वर्तणुकेचें कथन केलें । इछेसारिखें ॥ १३ ॥

ह्या जगामध्ये सृष्टीत अनेक अनंत प्राणी आले व गेले आणि त्यांनी जी वर्तणूक केली तिचे वर्णन ग्रंथकारांनी आपापल्या इच्छेप्रमाणे केले आहे (ते वर्णन एकून काय फायदा? ज्याच्या सत्तेने ते प्राणी वागले त्या आत्म्याचा विचार केला तर काही उद्धार तरी होईल.)

जेथें आत्मा नाहीं दाट । तेथें अवघें सरसपाट । अत्म्याविण बापुडें काष्ठ । काये जाणे ॥ १४ ॥

(आत्मा नाहीं दाट - आत्मचैतन्य सर्वव्यापक नाही)

ज्या ठिकाणी व्यापक आत्मा नाही तेथे सर्व सपाट होऊन जाते आत्मा नसेल तर शरीर बिचारे लाकूड,त्याला काय समजणार?(आत्म्यावीण सारे व्यर्थ होय.आत्म्यावीण प्राणी काष्ठवत होत,तो काय जाणणार?)

ऐसें वरिष्ठ आत्मज्ञान । दुसरें नाहीं यासमान । सृष्टीमधें विवेकी सज्जन । तेचि हें जाणती ॥ १५ ॥

आत्मज्ञान असे सर्व श्रेष्ठ आहे (सर्व ज्ञानात श्रेष्ठ) त्याच्यासारखे दुसरे ह्या जगात नाही विवेकी सत्पुरुषांना ह्याचे महत्व कळते.

पृथ्वी आणी आप तेज । याचा पृथिवीमध्यें समज । अंतरात्मा तत्वबीज । तें वेगळेंचि राहिलें ॥ १६ ॥

पृथ्वी,आप,तेज ह्यांना काही तरी जडत्व असल्यामुळे त्यांचा समावेश पृथ्वी तत्वांत होतो (का की त्यांना रूप आहे) ह्या सर्व तत्वांचा बीजरूप असा अंतरात्मा (आकाश) तो ह्या सर्वाहून निराळाच आहे (आकाश सर्व तत्वांचे बीज आहे.)

वायोपासून पैलिकडे । जो कोणी विवेकें पवाडे । जवळीच आत्मा सांपडे । त्या पुरुषासी ॥ १७ ॥

वायू,तत्वाच्या पलीकडचा जो विचार करील त्याला अंतरात्मा जवळच सापडेल (वायू,आकाश,गुणमाया ,मुळमाया अंतरात्मा अशा परंपरेने) जो कोणी विचाराने जाईल त्या पुरुषाला आत्मा जवळच सापडेल.

वायो आकाश गुणमाया । प्रकृतिपुरुष मूळमाया । सूक्ष्मरूपें प्रचित येया । कठीण आहे ॥ १८ ॥

वायु,पुढे आकाश,नंतर गुणमाया,नंतर प्रकृतिपुरुष म्हणजेच मूळमाया ही उत्तरोतर अधिक सूक्ष्म आहेत व सूक्ष्मरुपेच त्यांची प्रचीति घेतली पाहिजे,म्हणून अनुभव येणे कठिण आहे.

मायादेवीच्या धांदली । सूक्ष्मी।म् कोण मन घाली । समजला त्यची तुटली । संदेहवृत्ती ॥ १९ ॥

मायादेवीच्या गोंधळात इतक्या सूक्ष्म विषयाचा विचार कोण करणार?पण विचार करून ज्याला समजेल,त्याचा सर्व संशय नाहीसा होईल (मायेच्या गोंधळात सापडलेले जीव इतक्या सूक्ष्मात मन घालताना फारसे दिसत नाहीत पण जो विवेक समजून सूक्ष्मी प्रवेश करील तो नि:संदेह होईल.)

मूळमाया चौथा देह । जाला पाहिजे विदेह । देहातीत होऊन राहे । धन्य तो साधु ॥ २० ॥

मूळमाया हा ब्रह्मांडाचा चौथा देह आहे,त्याचा विवेकाने निरास झाला पाहिजे (सकळ अष्ट) आठही देहाहून जो वेगळा (देहातीत) होऊन राहील तो साधू धन्य होय.

विचारें ऊर्ध चढती । तयासी च ऊर्धगती । येरां सकळां अधोगती । पदार्थज्ञानें ॥ २१ ॥

विचाराच्या योगाने जे वर परब्रह्माकडे चढतात.त्यांनाच ऊर्ध्व गति (उंच गति,परब्रह्मप्राप्ति ) होते.बाकीच्या सगळ्यांना केवळ पदार्थ ज्ञानच असते.त्यामुळे त्यांना अधोगति होते.(इतर पदार्थज्ञानात गुरफटलेल्यांना अधोगति होते.)

पदार्थ चांगले दिसती । परी ते सर्वेचि नासती । अतो भ्रष्ट ततो भ्रष्ट होती । लोक तेणें ॥ २२ ॥

पदार्थ रमणीय दिसतात पण लगेच नासतात.(नाशवंत आहेत) म्हणून धड ना संसार ना देव अशी लोकांची स्थिति होते.(प्राणी ना धड ना इथे ना तिथे,असे विफल जन्म होतात.)

याकारळें पदार्थज्ञान । नाना जिनसीचा अनुमान । सर्व सांडून निरंजन । धुंडीत जावें । २३ ॥

म्हणून पदार्थज्ञान म्हणजे अनेक प्रकारचा संशय होय.तो सर्व टाकून देऊन निरंजन (निर्मल) अश्या परब्रह्माचा शोध करीत जावा.(पदार्थज्ञान सारे आनुमानिक,म्हणून ते सर्व सोडून निरंजनाला धुंडावे.)

अष्टांग योग पिंडज्ञान । त्याहून थोर तत्वज्ञान । त्याहून थोर आत्मज्ञान । तें पाहिलें पाहिजे ॥ २४ ॥

अष्टांग योग (हठयोग) व पिंडज्ञान (खालचे) ह्याहून तत्वज्ञान (वरचे) थोर आहे व तत्वज्ञानाहून (तत्वांच्या विचारापेक्षा) आत्मज्ञान श्रेष्ठ,सर्वोत्तम म्हणून ते अवश्य पाहावे.

मूळमायेचे सेवटीं । हरिसंकल्प मुळीं उठी । उपासनायोगें मिठी । तेथें घातली पाहिजे ॥ २५ ॥

मूळमायेच्या पलीकडेचे जे परब्रह्म त्या ठिकाणी जो भगवतसंकल्प उत्पन्न होतो त्या संकल्पाशी उपासनेच्या व्दाराने एकरूप झाले पाहिजे (मूळमायेच्या शेवटी जे विमळब्रह्म (हरि) आहे.त्या हरीच्या ठिकाणी जो आदिसंकल्प उठतो तेथे उपासनायोगाने सर्वस्वापर्ण केले पाहिजे)

मन त्यापैलिकडे जाण । निखळ ब्रह्म निर्गुण । निर्मळ निश्चळ त्याची खूण । गगनासारिखी ॥ २६ ॥

त्याच्या पलीकडे केवळ निर्गुण,निर्मळ व निश्र्चळ असे ब्रह्म आहे.त्याची खूण म्हणजे ते आकाशासारखे-गगनासारखे निश्र्चळ व निर्मळ आहे.

येथून तेथवरी दाटलें । प्राणीमात्रास भेटलें । पदार्थमात्रीं लिगटलें । व्यापून आहे ॥ २७ ॥

(लिगटलें - चिकटले)

ते तेथून तेथवर म्हणजे मूळमायेपासून पिंडापर्यंत घनदाट भरले आहे,ते प्राणीमात्रास व जड पदार्थांसही अंतर्बाह्य व्यापून चिकटले आहे.

त्याऐसें नाहीं थोर । सूक्ष्माहून सूक्ष्म विचार । पिंडब्रह्माचा संव्हार । होतां कळे ॥ २८ ॥ अथवा पिंड ब्रह्मांड असतां । विवेकप्रळये पाहों जातां । शाश्वत कोण हें तत्वता । उमजों लागे ॥ २९ ॥

त्याच्यासारखे थोर कोणी नाही ते कळण्यास,अत्यंत सूक्ष्म विचार करावा लागतो पिंडब्रह्मांडाचा (अष्ट देहाचा) प्रत्यक्ष संहार झाला,निरास झाला की ते आकळते (समजते) अथवा पिंडब्रह्मांड असतांही विवेक प्रळय करून त्याचा निरास केला म्हणजे खरोखरी शाश्वत काय आहे हे उमजू लागते.(शाश्वत ब्रह्म कळून येते.)

करून अवघा तत्वझाडा । सारासाराचा निवाडा । सावधपणें ग्रन्थ सोडा । सुखिनावें ॥ ३० ॥

(सुखिनावें - सुखनैव)

सगळ्या तत्वांचा पूर्ण निरास करून सार काय व असार काय ह्याचा सावधपणाने निर्णय करा आणि मग सुखाने (खुशाल) ग्रंथ बाजूला ठेवा (साऱ्या तत्वांचा झाडा करावा,सारासारविचाराने शुद्धब्रह्म ते ओळखावे आणि मग सावधपणे सुखनैव ग्रंथ सोडावा.)

**इति श्रीदासभोधे गुरुशिष्यसंवादे श्रवणनिरूपणनाम समास तिसरा ॥**

## समास चौथा : अनुमाननिरसन ॥ श्रीराम ॥

बहुत जनासी उपाये । वक्तयास पुसतां त्रासों नये । बोलतां बोलतां अन्वयें । सांडूं नये ॥१॥

बहुत जनांच्या उद्धारचे मार्ग कोणते असे वक्त्याला श्रोत्यांपैकी कोणी मध्येच विचारले तर त्यामुळे त्याने त्रासू नये (त्याने त्याचा त्रास कंटाळा किवा भय मानू नये.) (वक्तृत्व हे लोकांना सन्मार्गाला लावण्याचे साधन असल्यामुळे कोणी काही विचारले तरी वक्त्याने त्रासू नये.) आणि बोलता बोलता विषयसंगति (विषयांचा पूर्वापरसंबंध) सोडून बोलू नये.)

श्रोत्यानें आशंका घेतली । तै तत्काळ पाहिजे फेडिली । स्वगोष्टीनें सगोष्टी पेंचली । ऐसें न व्हावें ॥ २ ॥

(पेंचली - बाधा आली)

श्रोत्याने एखादी कसलीही शंका घेतली तर त्याने त्याचे समाधान केले पाहिजे आपले एका वेळचे बोलणे दुसऱ्या वेळच्या बोलण्याला बाध आणील असे असू नये (आपण सागितलेल्या एका गोष्टीने दुसरी गोष्ट आपणास नडली असे होऊ नये.)

पुढें धरितां मागें पेंचला । मागें धरितां पुढें उडाला । ऐसा सांपडतचि गेला । ठाइं ठाइं ॥ ३ ॥पोहणारचि गुचक्या खातो । जनास कैसा काढूं पाहातो । आशय लोकांचा राहातो । ठाइं ठाइं ॥ ४ ॥

त्याचे दुसऱ्या वेळेचे बोलणे कायम धरले तर मागच्या बोलण्याने पेचात सापडतो आणि मागच्या बोलण्यात त्याला पकडला तर पुढच्या बोलण्याने निसटून जातो अशारीतीने वक्ता जागोजाग सापडतच गेला तर लोकांच्या शंका जागोजाग तशाच राहतात (पुढे धरिला तर मागे पेचात सापडला किवा मागे धरिला तर पुढे उडाला असा जागोजाग वक्ता सापडत गेला तर श्रोत्यांनी काय करावे?) पोहोणाराच गटांगळ्या खाऊ लागला तर तो इतरांना (बुडण्या-यास) कसा काढणार? (असे होऊ लागले तर लोकांच्या ठिकठिकाणी शंका तशाच राहून जातील.)

आपणचि बोलिला संव्हार । आपणचि बोलिजे सर्वसार । दुस्तर मायेचा पार । टाकिला पाहिजे ॥ ५ ॥

सर्व सृष्टि नाशवंत आहे असे आपणास सांगतो व पुन्हा सर्व ब्रह्म आहे असे आपणास म्हणतो (अशाने कसे होणार?) दुस्तर मायेचा पैलपार गाठता आला पाहिजे (एकदा सृष्टीचा अशाप्रकारे संहार होतो असे

बोलून वक्ताच पुन्हा सर्वब्रह्म प्रतिपादू लागला तर मायेची पैलथडी पावायचा उपाय श्रोत्यास कोण सांगेल?)

जें जें सूक्ष्म नाम घ्यावें । त्याचें रूप बिंबऊन द्यावें । तरीच वक्ता म्हणवावें । विचारवंत ॥ ६ ॥

ज्या सूक्ष्म तत्वांचे नाव घ्यावे त्याचे रूप श्रोत्यांच्या मनावर ठसवून देता आले पाहिजे तरच विवेकी वक्ता म्हणवून घ्यावे (जे जे सूक्ष्मातील नाव घ्यावे त्याचे त्याचे रूप श्रोत्यांच्या मनावर त्याने बिंबवून द्यावे तरच विवेकवंत वक्ता म्हणून पुढे आल्याचा उपयोग)

ब्रह्म कैसें मूळमाया कैसी।अष्टधाप्रकृती शिवशक्ती कैसी ।शड्गुणेश्वराची स्थिति कैसी ।गुणसाम्याची॥७॥

ब्रह्म कसे,मूळमायेचे रूप कसे,पुढे अष्टधा प्रकृति-शिवशक्ति ह्या कशा आहेत,षडगुणेश्वर म्हणजे काय (ही नावे मूळमायेला का पडली) गुण-साम्य अवस्था कशी असते(गुणसाम्य जिच्यात असते ती गुणमाया कोणती?)

अर्धनारीनटेश्वर । प्रकृतिपुरुषाचा विचार । गुणक्षोभिणी तदनंतर । त्रिगुण कैसे ॥ ८ ॥

अर्धनारीनटेश्वर,प्रकृतिपुरुष,गुणक्षोभिणी ह्याचा विचार कसा करावयाचा,त्रिगुण कोणते?

पूर्वकक्ष कोठून कोठवरी । वाच्यांशलक्ष्यांशाची परी । सूक्ष्म नाना विचार करी । धन्य तो साधु ॥ ९ ॥
नान पाल्हाळीं पडेना । बोलिलेंचि बोलावेना । मौन्यगर्भ अनुमाना । आणून सोडी ॥ १० ॥

पूर्वपक्ष कोठून कोठवर,वाच्यांश काय,लक्षांश कोणता इत्यादि अनेक सूक्ष्म विचारांचा स्वच्छ उलगडा ज्याला झाला आहे तो साधु धन्य होय (वकृत्वाचा अधिकार त्यालाच खरोखर आहे) तो सांगताना पाल्हाळ लावीत नाही किवा (चर्वित-चर्वण करीत नाही) पुनःपुन्हा तेच तेच सांगत नाही आणि वाणीला जेथे मौन पडते अशा परब्रह्माची कल्पना श्रोत्यांच्या मनात उभी करतो,तो साधु धन्य होय.(वाचा जेथे विसावून मौन धरिते ते ब्रह्म श्रोत्यांच्या आटोक्यात आणून सोडतो.)

घडी येक विमळ ब्रह्म । घडी येक सर्व ब्रह्म । द्रष्टा साक्षी सत्ता ब्रह्म । क्षण येक ॥ ११ ॥ निश्चळ तेंचि जालें चंचळ । चंचळ तेंचि ब्रह्म केवळ । नाना प्रसंगीं खळखळ । निवाडा नाहीं ॥ १२ ॥

(खळखळ - गोधळ)

एकदा म्हणतो ब्रह्म विमळ (निर्मळ) व निश्र्चळ आहे.दुसऱ्यावेळी म्हणतो-सर्व ब्रह्म आहे एकदा सांगतो-ब्रह्म द्रष्टा साक्षी व सत्तारूप आहे आणि एकदा म्हणतो निश्र्चळ ब्रह्मच चंचळ झाले असून चंचळ तेच केवल ब्रह्म आहे.असा अनेक प्रसंगी वितंडवाद करीत बसतो (असंबद्ध बोलत जातो.) त्याचा निश्र्चय म्हणून काहीच नाही (निश्र्च्यात्मक) काहीच सांगत नाही तो वक्ता कसला?)

चळतें आणी निश्चळ । अवघें चैतन्यचि केवळ । रूपें वेगळालीं प्रांजळ । कदापी बोलवेना ॥ १३ ॥

जे चंचळ (अंतरात्मा) आहे आणि निश्र्चळ परब्रह्म हे सगळे मिळून केवळ चैतन्यच आहे असे म्हणतो,दोघांचीही रूपे त्याला स्पष्ट वेगवेगळी करून सांगता येत नाहीत.

उगीच करी गथागोवी । तो लोकांस कैसें उगवी । नाना निश्चयें नाना गोवी । पडत जाते ॥ १४ ॥

जो स्वतःच अश्या नसत्या गोंधळात पडतो तो लोकांना संशयातून कसा काढणार?(तो श्रोत्यांस निश्र्चायात्मक ज्ञान काय देणार?) अनेक प्रकारचे निश्र्चय सांगत सुटला तर अधिकच घोटाळा वाढत जातो (सारा गोंधळाच होतो.)

भ्रमास म्हणे परब्रह्म । परब्रह्मास ह्मणे भ्रम । ज्ञातेपणाचा संभ्रम । बोलोन दावी ॥ १५ ॥

भ्रमाला म्हणतो परब्रह्म व परब्रह्माला म्हणतो भ्रम आणि बोलताना मात्र डौल आणतो ज्ञातेपणाचा.

घाली शास्त्रांची दडपण । प्रचितिविण निरूपण । पुसों जातां उगाच सीण । अत्यंत मानी ॥ १६ ॥

अनुमानाशिवाय निरुपण करीत असतो,पण शास्त्रवचनांचे आधार देऊन श्रोत्यांच्या मनावर त्यांचे दडपण टाकतो आणि कोणी काही विचारले (कोणी शंका काढली) की उगाच त्रागा करू लागतो (त्रासून जातो.) (पण अनुभवाच्या नावाने शून्य)

ज्ञात्यास आणि पदार्थभिडा । तो काय बोलेल बापुडा । सारासाराचा निवाडा । जाला पाहिजे ॥ १७ ॥

(पदार्थभिडा - स्वतःला ज्ञानी म्हणवितो व पदार्थांची अपेक्षा करतो तो)

स्वतःला ज्ञानी म्हणवून घेऊन द्रव्यादि पदार्थाची ज्याला भीड पडते.तो बिचारा ब्रह्मज्ञान काय सांगणार? सार काय व असार काय ह्यांचा निर्णय अंतःकरणात बिबला पाहिजे (द्रव्यादि पदार्थाची चाड ठेवणारा हा पामर ब्रह्मज्ञान काय सांगणार?(सारासार विचार स्वच्छ असला पाहिजे)

वैद्य मात्रेची स्तुती करी । मात्रा गुण कांहींच न करी । प्रचितिविण तैसी परी । ज्ञानाची जाली ॥ १८ ॥

वैद्य आपल्या मात्रेच्या गुणांची तारीफ करतो,पण मात्रेचा गुण रोग्यास येत नाही (म्हणजे हे तारीफ करणे खोटे),तसे ह्या ज्ञानाचा अनुभव श्रोत्यास येणार नाही तर तेही व्यर्थ होय.

तेथें नाहीं सारासार । तेथें अवघा अंधकार । नाना परीक्षेचा विचार । राहिला तेथें ॥ १९ ॥

जेथे सारासार विचार नाही तेथे सर्व अंधार अनेक प्रकारच्या बऱ्या वाईटाची परीक्षा होतच नाही (सार व असार ह्यांचा नि:संदेह निवाडा जेथे झाला नाही ते अनुमानिक ज्ञान म्हणजे अज्ञानच होय तेथे सत्य-मिथ्या परीक्षा कोठची?)

पाप पुण्य स्वर्ग नर्क । विवेक आणि अविवेक । सर्वब्रह्मीं काये येक । सांपडलें नाहीं ॥ २० ॥ पावन आणि तें पतन । दोनीं मानिलीं तत्समान । निश्चये आणि अनुमान । ब्रह्मरूप ॥ २१ ॥

सर्व ब्रह्मात काय येत नाही? (सर्वब्रह्मवाद्यांना) पापपुण्य,स्वर्गनरक,विवेक-अविवेक(विचार-अविचार) पावन-पतन सारीच सारखी,त्यांना निश्र्चय व अनुमान (संशय) ही सगळी सारखीच दोन्ही ब्रह्मस्वरूपच!.

ब्रह्मरूप जालें आघवें । तेथें काये निवडावें । आवघी साकरचि टाकावें । काये कोठें ॥ २२ ॥

त्यांना सारेच ब्रह्मरूप आहे.त्यात निवडानिवड काय करायची? सारीच साखर,त्यात टाकावयाचे काय व कोठे?(निवडानिवड कसची होते?)

तैसें सार आणि असार । अवघा जाला येकंकार । तेथें बळावळा अविचार । विचार कैंचा ॥ २३ ॥

त्याप्रमाणेच सार व असार ही दोन्ही त्यांना एकरूपच,तात्पर्य अशा एकंकार करण्याऱ्या सर्वब्रह्मवाद्यांच्या ठिकाणी अविचार माजलेला असतो तेथे विचार कोठला असणार? (त्यांचे सारेच बोलणे अविचाराचे असल्यामुळे त्यांच्या बोलण्यात विचाराचा लेशही नसतो.)

वंद्य निंद्य येक जालें । तेथें काये हाता आलें । उन्मत्त द्रव्यें जें भुललें । तें भलतेंच बोले ॥ २४ ॥

वंद्य आणि निंद्य एकच मानल्याने कोणता फायदा झाला? (वंद्य आणि निद्य एकच मानल्याने कोणता निश्र्चय होती येणार?) कैफ चढलेला मनुष्य वाटेल ते बरळतो.

तैसा अज्ञान भ्रमें भुलला । सर्व ब्रह्म म्हणोन बैसला । माहांपापी आणि भला । येकचि मानी ॥ २५ ॥

(अंमल चढल्यावर मनुष्य भलतेच बरळतो) त्याप्रमाणे अज्ञानभ्रमाने भूललेला हा मूर्ख सर्वब्रह्म म्हणून बसतो आणि महापापी व सज्जन ह्यांना सारखेच (एकच) मानतो.

सर्वसंगपरित्याग । अव्हासवा विषयेभोग । दोघे येकचि मानितां मग । काये उरलें ॥ २६ ॥

(अव्हासवा - मनसोक्त)

सर्वसंगपरित्याग व मनसोक्त विषयसेवन (स्वेच्छाचाराचा विषयभोग) ही दोन्ही एकच मानल्यावर मग तेथे साधकाने घेण्यासारखे काय आहे?

भेद ईश्वर करून गेला ।त्याच्या वाचेन न वचे मोडिला ।मुखामधें घांस घातला । तो अपानीं घालावा॥२७॥

भेद ईश्वरानेच केला आहे.तो सर्वब्रह्मांडवाद्यांच्या बापाच्याने मोडला जाणार नाही तोंडात घालवायचा घास अपानात घातला तर कसे होईल?(ईश्वरानेच स्थान-लिंग-विषय-इंद्रियादिभेद करून ठेवला आहे.)

ज्या इंद्रियास जो भोग । तो तो करी येथासांग । ईश्वराचें केलें जग । मोडितां उरेना ॥ २८ ॥

ज्या ज्या इंद्रियाला जो जो भोग योग्य तोच त्याला दिला पाहिजे ईश्वराने केलेले नियम मोडील तर जिवंत राहणार नाही (देवाचे नियम / व्यवस्था / जगरहाटी मोडता येत नाहीत)

अवघी भ्रांतीची भुटाटकी । प्रचितिविण गोष्टी लटकी । वेड लागलें जे बटकी । ते भलतेंचि बोले ॥ २९ ॥

(भुटाटकी - भुताटकी,चकवा, बटकी - दासी)

हा सर्व ब्रह्मवाद म्हणजे भ्रमाची भूल-भूलावणी आहे.अनुभव नसल्याने ते सर्व खोटे,ज्याला वेड लागलेले असते तो बटकीचा वाटेल ते बरळतो (ह्याचे बरळणे भ्रमातले,अनुभवावाचून बडबड ती,वेडयाचे ते बरळणे)

प्रत्ययज्ञाता सावधान । त्याचें ऐकावें निरूपण । आत्मसाक्षात्काराची खूण । तत्काळ बाणें ॥ ३० ॥

(प्रत्ययज्ञाता - ब्रह्मज्ञानी स्वस्वरूपी लीन झालेला)

ह्यासाठी ज्याला अनुभवाचे ज्ञान झाले आहे (जो स्वानुभवी) व सावध आहे अश्या वक्त्याचे निरुपण ऐकावे(अशा वक्त्याच्या मुखे ज्ञान ऐकावे.) म्हणजे आत्मसाक्षात्काराची खूण तात्काळ बिंबते.

वेडें वांकडे जाणावें । आंधळें पाउलीं वोळखावें । बाश्कळ बोलणें सांडावें । वमक जैसें ॥ ३१ ॥

(वमक जैसें - उलटी जैसे)

पाउल वेडे वाकडे पडले की काय हे जाणून त्या पावलावरून चालणारा आंधळा आहे की काय हे ओळखावे(त्याप्रमाणे बाष्कळ क्रिया दिसली की) तेथील ज्ञानाचे बोलणे बाष्कळ समजून वमनाप्रमाणे टाकून द्यावे (वेडेवाकडे जाणावे,चालण्यावरून आंधळे जाणावे,तसे बाष्कळ भाषण ऐकून वमनासारखे टाकावे.)

**इति श्रीदासभोधे गुरुशिष्यसंवादे अनुमाननिर्शननाम समास चौथा ॥**

## समास पांचवा : अजपानिरूपण॥ श्रीराम ॥

**विषय : - अनाधिकारी वक्ता व सर्व ब्रह्मवांद्याचे खंडण**

येकवीस सहश्र सासें जपा । नेमून गेली ते अजपा । विचार पाहातां सोपा ।सकळ कांहीं ॥१॥

एकवीसहजार सहाशे श्र्वासोच्छवासांचा जप अजपा गायत्रीचा नित्य ठरलेला आहे.(२१६०० श्र्वासोच्छवास प्रत्येक प्राण्याचे प्रत्यही होत असतात,त्याकडे एकाग्रतेने लक्ष ठेवणे ह्याला अजपा जप असे म्हणतात.) विचार केला तर हा जप साधणे सोपे आहे.

मुखीं नासिकीं असिजे प्राणें । तयास अखंड येणें जाणें । याचा विचार पाहाणें । सूक्ष्मदृष्टीं ॥ २ ॥

मुखात व नाकात प्राणवायू असून त्याची सारखी ये जा चाललेली असते तिचा सूक्ष्मदृष्टीने विचार करावा (त्याचे श्र्वास व उच्छवास सारखे होत असतात.ते सूक्ष्मदृष्टीने पाहावेत.)

मुळीं पाहातां येक स्वर । त्याचा तार मंद्र घोर । त्या घोराहून सूक्ष्म विचार । अजपाचा ॥ ३ ॥

( तार = वरचा षडज , मंद्र = मधला षडज घोर = खालचा षडज )

मूळात पाहिले तर स्वर एकच आहे पण त्याचे तार (वरच षडज),मद्र (मधला षडज) व घोर (खालचा षडज किवा खर्ज) असे तीन भेद आहेत त्यातल्या घोरापेक्षाही अजपेचा विस्तार सूक्ष्म आहे.

सरिगमपदनिस । सरिं मात्रुका सायास । प्रथम स्वरें मात्रुकांस । म्हणोन पाहावें ॥ ४ ॥

सा,री,ग,म,प,ध,नि हे सप्त स्वर खर्जामध्ये आयातपूर्वक,म्हणून पाहावे.(ह्या सर्व मातृका म्हणून पहा.,सप्तस्वरांपैकी कोणताही स्वर प्रथम धरून तेथून पूर्वक म्हणून पाहावे.)

परेवाचेहून अर्तें । आणि पश्यंती खालतें । स्वराचे जन्मस्थान तें । तेथून उठे ॥ ५ ॥

(अर्तें - वर)

म्हणजे कळून येईल की नाभिस्थानी असलेल्या परावाणीच्या अलीकडे म्ह.वरती व हृदयस्थानी असलेल्या पश्यंती वाणीच्या खाली अर्थात नाभि व हृदय ह्यांच्यामध्ये स्वरांचे जन्मस्थान आहे,स्वर तेथून उठतो.

येकांतीं उगेंच बैसावें । तेथें हें समजोन पाहावें । अखंड घ्यावें सांडावें । प्रभंजनासी ॥ ६ ॥

एकांतामध्ये (निवांतस्थळी) उगीच स्थिर बसून ह्या गोष्टीचा अनुभव पाहावा वायु सारखा आत घ्यावा व सोडावा.

येकांतीं मौन्य धरून बैसे । सावध पाहातां कैसें भासे । सोहं सोहं ऐसे । शब्द होती ॥ ७ ॥

एकांती मौन धरून बसावे.सावधपणाने(सूक्ष्मपणाने)अनुभव घेऊन पाहावा पाहावे म्हणजे सोऽहं सोऽहं असे शब्द होत असल्याचा भास होतो (होत असलेले ऐकू येतात) हे लक्षात येईल.

उच्चरेंविण जे शब्द । ते जाणावे सहजशब्द । प्रत्ययायेती परंतु नाद । कांहींच नाहीं ॥ ८ ॥

(सहजशब्द - उच्चारा शिवाय शब्द)

उच्चारावाचून हे शब्द होतात म्हणून ह्यांना सहजशब्द म्हणतात.हे अनुभवला येतात (झाल्याचे कळते) पण ह्याचा नाद होत नाही.

ते शब्द सांडून बैसला । तो मौनी म्हणावा भला । योगाभ्यासाचा गल्बला । याकारणें ॥ ९ ॥

तेही शब्द (सोऽहं सोऽहं) टाकून जो गप्प बसतो तो खरा मौनी होय. ह्यासाठीच योगभ्यासाची खटपट करतात.(योगाभ्यासाची जी एवढी खटपट करावयाची असते ती त्यासाठीच होय.)

येकांतीं मौन्य धरून बैसला । तेणें कोण शब्द जाला । सोहं ऐसा भासला । अंतर्यामीं ॥ १० ॥

एकांतात ह्याप्रमाणे मौन धरून बसले असता कोणता शब्द होतो? सोऽहं शब्द आत होत असल्याचा भास होतो.

धरितां सो सांडितां हं । अखंड चाले सोहं सोहं । याचा विचार पाहातं बहु । विस्तारला ॥ ११ ॥

श्वास आत घेताना सः व बाहेर सोडताना अहम् असा “सोऽहं सोऽहं” हा जप अखंड चाललेला आहे ह्याचा आणखी विचार केला तर ह्या विषयांचा पुष्कळच विस्तार होण्यासारखा आहे.

देहधारक तितुका प्राणी । श्वेतजौद्‌विजादिक खाणी । स्वासोस्वास नस्तां प्राणी । कैसे जिती ॥ १२ ॥

जारज,अंडज,स्वेदज,उद्भिज ह्या चार खाणींमध्ये जेवढे म्हणून देह धारण करणारे प्राणी आहेत. ते सर्व सगळे श्र्वासोच्छवास नसेल तर कसे जगतील?(त्या सर्व प्राण्यांचा हा जप सहजच चाललेला आहे ह्या श्र्वासाशिवाय ते जगायचे नाहीत.)

ऐसी हे अजपा सकळासी । परंतु कळे जाणत्यासी । सहज सांडून सायासी । पडोंच नये ॥ १३ ॥

असा हा अजपा जप सगळ्या प्राण्यांचा अखंड चाललाच आहे पण जाणता असेल त्याला फळतो असे हे सहज साधन टाकून सायासाने होणाऱ्या साधनात गुंतू नये (हा सहज जप सोडून,टाकून सायासाचा जप करूच नये.)

सहज देव असतचि असे । सायासें देव फुटे नासे । नासिवंत देवास विश्वासे । ऐसा कवणु ॥ १४ ॥

सहज निश्र्चळ देव अखंड आहे तसा आहेच,सायासाने घडविलेला देव फुटतो,तुटतो,नाश पावतो, अशा नाशवंत देवावर विश्र्वास ठेवील असा कोण?

जगदांतराचें दर्शन । सहज घडे अखंड ध्यान । आत्मइछेनें जन । सकळ वर्तती ॥ १५ ॥

जगदंतर जो अंतरात्मा त्याचे दर्शन घेतले असता सहज ध्यान अखंड होतच असते.कारण आत्म्याच्याच इच्छेप्रमाणे सर्व लोक-प्राणिमात्र-वागत असतात.(प्राण्याच्या वागणुकीचे मूळ इच्छा व इच्छेचे मूळ अंतरात्मा हे जाणून नामरूपाकडे लक्ष न देता सर्व व्यवहार अंतरात्म्याचे आहेत असे समजणे हेच दर्शन व ध्यान होय.)

आत्मयाचें समाधान । घडे तैसेंचि आशन । सांडिलें फिटले समर्पण । तयासीच होये ॥ १६ ॥

(आशन - भोजनादि भोग)

जेणेकरून आत्म्याचे समाधान होईल असेच अशन म्ह.खाणेपिणे व भोग लोक त्याला देत असतात.(बुद्धिपुर:सर अर्पण केलेलेच नव्हे तर) चुकले माकलेलेसुद्धा त्या आत्मारामालाच समर्पण होत असते.

अग्नपुरुष पोटीं वसती । तयास अवदानें सकळ देती । लोक आज्ञेमधें असती । आत्मयांचे ॥ १७ ॥

(अवदानें - आहुती)

पोटात जठराग्निरूप पुरुष आहे. त्यालाच सर्वजण आहुति देत असतात.अश्या रीतीने लोक आत्म्याच्या ठिकाणी वागत असतात.(आपल्या ठिकाणी जो यज्ञ पुरुष आहे त्यालाच आपण आहुति देत असतो.त्याच्याच आज्ञेत आपण सर्व वागत असतो)

सहज देवजपध्यानें । सहज चालणें स्तुती स्तवनें । सहज घदे तें भगवान्नें । मान्य कीजे ॥ १८ ॥

ह्याप्रकारे देव सहज असून जप,ध्यान,स्तुति,स्तवन ही ही सहजगत्याच आपल्या हातून होत असतात.सहज जे जे काही करीत असतो ते ते देवाला भगवंताला मान्य होत असते.

सहज समजायाकारणें । नाना हटयोग करणें । परंतु येकायेकीं समजणें । घडत नाहीं ॥ १९ ॥

पण हे सर्व सहज होते हे कळण्यासाठी लोक हठ्योगादि अनेक साधने करतात.तरीपण एकाएकी समज पडत नाही (पण एकाएकी समजणे कठिण आहे.)

द्रव्य चुकतें दरिद्र येतें । तळीं लक्ष्मी वरी वर्ततें । प्राणी काये करील तें । ठाउकें नाहीं ॥ २० ॥

(द्रव्य कोठे पुरले आहे हे बरोबर ठिकाण न कळल्यामुळे मनुष्य विनाकारण दारिद्र्यात दिवस कंठत बसतो ) ठेवलेले ठेवणे न सापडल्यामुळे प्राणी दारिद्र्य भोगतो हा बसतो तेथेच खाली (ठेवा) संपत्ति पुरलेली असते व वर हा वागत असतो (हा वर बसून उपवास करितो!) काय करील बिचारा ( निधान आपल्याजवळ आहे हे बिचा-याला ठाऊक नाही.)(त्याला ठाऊक नसते.)

तळघरामधें उदंड द्रव्य । भिंतीमधें घातलें द्रव्य । स्तंभीं तुळवटीं द्रव्य । आपण मधें ॥ २१ ॥

खाली तळघरात खूप द्रव्य भरलेले असते भोवताली भिंतीतून व खांबातून तसेच वरती तुळयांमधून (ह्याप्रमाणे साऱ्या वाड्यात सर्वत्र) द्रव्य पुरलेले आहे व हा मध्ये असतो.

लक्ष्मीमध्यें करंटा नांदे । त्याचें दरिद्र अधिक सांदे । नवल केलें परमानंदें । परमपुरुषे ॥ २२ ॥

(करंटा - दुर्दैवी, सांदे - दु:खदायक)

अशी लक्ष्मी त्याच्या चौफेर असून (पण अशा लक्ष्मी निवासात बसून ) करंटा मध्ये नांदत असतो (अधिकच दारिद्र्य भोगतो) त्यामुळे त्याच्या दारिद्र्यात अधिकच भर पडत असते.(सांद्ते-पूर्ण होते) परमानंद परमात्म्याने हे केवढे नवल केले आहे!  ( की तो परमात्मा अंतर्बाह्य व्याप्त असूनही प्राण्यांना कळत नाही.)

येक पाहाती येक खाती । ऐसी विवेकाची गती । प्रवृत्ति अथवा निवृत्ती । येणेंचि ज्ञायें ॥ २३ ॥

(येक खाती - कोणी ऐश्वर्य भोगतात)

कोणी खातात (ऐश्वर्य भोगतात) तर कोणी (भाग्यहीन)त्याच्या तोंडाकडे नुसतेच पहात असतात हा परिणाम विवेकामुळे होत असतो (पण हे अंतर पडण्याचे बीज विवेकात आहे विवेक किवा जाणीव अधिक तेथे भाग्य अधिक जाणीव कमी म्हणून दारिद्र्य जास्त)(प्रवृत्ति) प्रपंच असो वा (निवृत्ति) परमार्थ असो दोहीकडे हाच तत्वन्याय (प्रवृत्तीत किवा निवृतीत माणसामाणसात अंतर दिसते ते केवळ जाणीव कमी किवा अधिक म्हणूनच होय.)

अंतरीं वसतां नारायेणें । लक्ष्मीस काये उणें । ज्याची लक्ष्मी तो आपणें । बळकट धरावा ॥ २४ ॥

(बळकट - घट्ट)

असो,अंतःकरणामध्ये नारायण (जाणीवरूप अंतरात्मा) प्रकट असल्यावर लक्ष्मीला काय उणे? म्हणून लक्ष्मी ज्याची दासी तो नारायण आपण हृदयात बळकट धरावा.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अजपानिरूपणनाम समास पांचवा ॥**

## समास सहावा : देहात्मनिरूपण॥ श्रीराम ॥

आत्मा देहामध्यें असतो । नाना सुखदु:खें भोगितो । सेवटीं शरीर सांडून जातो । येकायेकीं ॥ १ ॥

अंतरात्मा देहात राहून अनेक सुखदु:खे भोगतो.व शेवटी शरीर एकदम सोडून जातो.

शरीरीं शक्ति तारुण्यपणीं । नाना सुखें भोगी प्राणी । अशक्त होतां वृद्धपणीं । दु:खें भोगी ॥ २ ॥

तरुणपणी शरीरात शक्ति आहे तो पर्यंत प्राणी अनेक सुखे भोगतो व म्हातारपणी अशक्त (शक्तिक्षय) झाला की दु:खे भोगतो.

मरावेना ऐसी आवडी । हातपाये खोडून प्राण सोडी । नाना दु:खें अवघडी । वृद्धपणीं ॥ ३ ॥

(हातपाये खोडून - हातपाय झाडून)

म्हातारपणी अनेक दु:खे फार दुर्धर असतात मरू नये अशी इच्छा असते पण हातपाय घाशीत चरफडत प्राण सोडावा लागतो (मरणेप्रिय नसल्यामुळे देहत्यागसमयी हातपाय झाडून प्राण सोडतो.)

देहआत्मयांची संगती । कांहींयेक सुख भोगिती । चर्फडचर्फडून जाती । देहांतकाळीं ॥ ४ ॥

देह व आत्मा ह्यांच्या संगतीत प्राणी काहीसे सुख भोगतात (काही सुखोपभोग घेतात) आणि अंत:काळी चरफडत चरफडत देहत्याग करितात

ऐसा आत्मा दु:खदायेक । येकांचे प्राण घेती येक । आणी सेवटीं निरार्थक । कांहींच नाहीं ॥ ५ ॥

असा हा आत्मा दु:ख भोगणारा आहे.एकमेकएकमेकांचे प्राण घेतात आणि शेवटी फळप्राप्ती काहीच होत नाही सर्वच व्यर्थ.

ऐसा दों दिसांचा भ्रम । त्यास म्हणती परब्रह्म । नाना दु:खाचा संभ्रम । मानून घेतला ॥ ६ ॥

(नाना दु:खाचा संभ्रम - अनेक दु:खामुळे गोंधळून गेला.)

असा हा आत्मा दोन दिवसांचा भ्रम आहे पण दु:खाचे सुख मानून म्ह.गोड करून घ्यावे त्याप्रमाणेच ह्या भ्रमरूप आत्म्यालाच परब्रह्म म्हणतात (अनेक दु:खप्रसंग (जीव) आत्मा गोड करून (मानून) घेतो.

दु:खी होऊन चर्फडून गेले । तेथें कोण समाधान जालें । कांहींयेकसुख भोगिलें । तों सर्वेचि दु:ख ॥ ७ ॥

दु:खी होऊन चरफडून गेल्याचे काय समाधान मानावयाचे? थोडेसे सुख भोगिले नाही तो मागोमाग दु:ख आहेच (सुख अल्पकाळ भोगावे तो मागोमाग दु:ख आहेच.

जन्म दारभ्य आठवावें । म्हणिजे अवघें पडेल ठावें । नाना दुःख मोजावें । काये म्हणोनी ॥ ८ ॥

(जन्म दारभ्य - जन्मापासूनची)

अनेक दु:खे,त्यांची गणती काय करावी? जन्मापासून सगळे आठवावे म्हणजे सर्व माहीत होईल (जन्मापासून किती तरी दु:खे भोगावी लागली ह्याचा विचार करावा.)

ऐसी आत्मयाची संगती । नाना दुःखें प्राप्त होती । दैन्यवाणे होऊन जाती । प्राणीमात्र ॥ ९ ॥

आत्म्याच्या संगतीने (अनेक जीवांच्या संगतीत) प्राण्यांना अशी अनेक दु:खे प्राप्त होतात आणि शेवटी प्राणी दीन होऊन जातात.

कांहीं आनंद कांहीं खेद । जन्मवरी पडिला समंध । नाना प्रकारीं विरुद्ध । तडातोडी ॥ १० ॥

(तडातोडी - विविध प्रकारचा विरोध,तडातोडी,असंबद्ध)

काही आनंद (सुख),काही खेद (दु:ख) असा सुखदु:खाशी जन्मभर संबंध पडला आहे (असा अनुभव जन्मभर येतो.) अनेक प्रकारे मनाविरुद्ध पुष्कळ गोष्टी होतात आणि शेवटी प्राणी दीन होऊन जातात.

निद्राकाळीं ढेकुण पिसा । नाना प्रकारीं वळसा । नाना उपायें वळसा । त्यांस होये ॥ ११ ॥

(वळसा - त्रास)

निजताना ढेकूण,पिसवा अनेक प्रकारे त्रास (वळसा) देतात.व आपण त्यावर काही उपाय योजावा तर आपण त्यांना उलट त्रास देतो असे होते.

भोजनकाळी माश्या येती । नाना पदार्थ उंदीर नेती । पुढें त्यांचीहि फजिती । मार्जरें करिती ॥१२ ॥

जेवणाच्या वेळी (पानावर बसून जेवताना) माशा सतावतात.घरातले अनेक पदार्थ उंदीर बिळात ओढून नेतात.पुढे त्या उंदरांना मांजरे गट्ट करितात.

वा चामवा गोंचिड । गांधेलें कानटें उदंड । येकास येक चर्फड । दोहिकडे ॥ १३ ॥

(चामवा - उवा, गोंचिड- जनावरांच्या अंगावरचा रक्तपिपासू किटक, कानटें - साप)

उवा,पांढऱ्या चामव्या,गोचीड गांधीलमाशा कानटे (सर्पांची जात) इ.अनेक प्राणी (जीवास) एकमेकांस त्रास देतात.आणि दोन्हीही चरफडत असतात.

विंचु सर्प वाग रिसें । सुसरी लांडिगे माणसास माणसें । परस्परें सुखसंतोषें । येकहि नाहीं ॥ १४ ॥

विचू,साप,वाघ,(रीसे) आंस्वले,सुसरी,लांडगे,आणि माणसास माणसे ह्याप्रमाणे कोणीही प्राणी एकमेकांना सुखसंतोष देऊन राहात नाहीत (एकमेकांना गांजतात मारतात.)

चौर्यासि लक्ष उत्पत्ती । येकास येक भक्षिती । नाना पीडा दुःखणी किती । म्हणौन सांगावें ॥ १५ ॥

चौ-याशी (८४) लक्ष योनींचे प्राणी आहेत पण सगळे एकमेकाला खात असतात.(जीवो जीवस्य जीवनम!) ह्याशिवाय नाना क्लेश व दुखणी आहेतच ती किती म्हणून सांगावी!

ऐसी अंतरात्म्याची करणी । नाना जीव दाटले धरणीं । परस्परें संव्हारणी । येकयेकांची ॥ १६ ॥

अशी ही अंतरात्म्याची करणी आहे.पृथ्वीवर अनंत प्राण्यांची दाटी झाली आहे पण सगळे परस्पर एकमेकांचा संहार करीत असतात.

अखंड रडती । चर्फडिती । विवळविवळों प्राण देती । मूर्ख प्राणी त्यास म्हणती । परब्रह्म ॥ १७ ॥

रडणे,चरफडणे,विवळून विवळून प्राण देणे असे अंतरात्मा नित्य करीत व करवीत असताना मूर्ख माणसे त्यालाच परब्रह्म म्हणतात.

परब्रह्म जाणार नाहीं । कोणास दुःख देणार नाहीं । स्तुती निंदा दोनी नाहीं । परब्रह्मीं ॥ १८ ॥

परब्रह्म कोठे जात नाही (अचळ आहे) ते कोणालाही दु:ख देत नाही,स्तुति व निंदा ही दोन्हीही परब्रह्माच्या ठिकाणी नाहीत.

उदंड शिव्या दिधल्या । तितुक्या अंतरात्म्यास लागल्या । विचार पाहतां प्रत्यया आल्या ।येथातथ्य ॥१९॥

पुष्कळ जरी शिव्या दिल्या तरी ( परब्रह्माला लागत नाहीत.) अंतरात्म्याला लागतात विचार पाहिला म्हणजे हा बरोबर अनुभव येतो.

धगडीचा बटकीचा लवंडीचा । गधडीचा कुतरीचा वोंगळीचा । ऐसा हिशेब सिव्यांचा । किती म्हणोनि सांगावा ॥ २० ॥

घगडीचा,बटकीचा,लवंडीचा,गधडीचा,कुत्रीचा,वोंगळीचा अशी शिव्यांची किती नावे सांगावी?

इतुकें परब्रह्मीं लागेना । तेथें कल्पनाचि चालेना । तडातोडीचें ज्ञान मानेना । कोणीयेकासी ॥ २१ ॥

इतक्या सर्व शिव्या परब्रह्माला लागत नाहीत,तेथे कसल्याच कल्पना चालत नाहीत,विसंगतपणाचे ज्ञान कोणालाही मान्य होत नाही (मानवत नाही)

सृष्टीमधें सकळ जीव । सकळांस कैचें वैभव । याकारणें ठायाठाव । निर्मिला देवें ॥ २२ ॥

(ठायाठाव - बेतासबेत,योग्य तेव्हढे)

सृष्टीमध्ये असंख्य जीव आहेत पण सर्वांना वैभव कोठ्चे? म्हणून वैभव भोगण्याला योग्य असे ज्याच्या त्याच्या प्रारब्धानुसार कमीजास्त अधिकाराचे स्थान करून ठेवले आहे.(म्हणून देवाने जे केले आहे ते ठीक,यथायोग्य-ठायाठाय केले आहे.)

उदंड लोक बाजारीचे । जें जें आलें तें तें वेंचे । उत्तम तितुके भाग्याचें । लोक घेती ॥ २३ ॥

बाजारात ज्या ज्या वस्तू विक्रीस येतात त्या साऱ्याच खपतात.आणि लोकही पुष्कळ येतात,पण त्यात भाग्यवान लोक असतात ते उत्तम वस्तू असतात तेवढ्याच घेतात.

येणेंचि न्यायें अन्न वसन । येणेंचि न्यायें देवतार्चन । येणेंचि न्यायें ब्रह्मज्ञान । प्राप्तव्यासारिखें ॥ २४ ॥

(प्राप्तव्यासारिखें - नाशिबानुसार)

ह्याच न्यायाने अन्नवस्त्र,देवतार्चन,ब्रह्मज्ञान प्रारब्धानुसार जीवांना मिळत असते.

अवघेच लोक सुखी असती ।संसार गोड करून नेती ।माहाराजे वैभव भोगती ।तें करंट्यास कैचें ॥२५॥

आता सगळेच लोक आप आपला संसार गोड करून घेतात.व सुखाने राहतात.हे खरे पण मोठे राजे जे वैभव भोगतात ते करंट्यास कोठून मिळणार?

परंतु अंतीं नाना दुःखें । तेथें होतें सगट सारिखें । पूर्वीं भोगिलीं नाना सुखें । अंतीं दुःख सोसवेना ॥२६॥

परंतु (सर्वांना शेवटचे मरणाचे दु:ख सारखेच भोगावे लागते.) मरणकाळी अनेक प्रकारच्या यातना होतात त्या सर्वांना सारख्याच भोगाव्या लागतात.पूर्ववयात (तारुण्यात) अनेक सुखे भोगली असल्यामुळे अखेरची ही दु:खे फार जड जातात.

कठिण दुःख सोसवेना । प्राण शरीर सोडिना । मृत्यदुःख सगट जना । कासाविस करी ॥ २७ ॥

दु:सह दु:खे सोसवत नाहीत व प्राण शरीर सोडीत नाही. मृत्यूचे दु:ख सर्वांनाच कासावीस करते.(खुशीने शरीर सोडून प्राण जात नाहीत.मृत्यूदु:ख सर्वांनाच क्लेशकारक होते.

नाना अवेवहीन जालें । तैसेंचि पाहिजे वर्तलें । प्राणीं अंतकाळीं गेलें । कासाविस होऊनी ॥ २८ ॥

शरीर अवयवहीन झाले तरी तसेच जगांत वावरावे लागते आणि शेवटी प्राण कासावीस होऊन जातो.

रूप लावण्य अवघें जातें । शरीरसामर्थ्य अवघें राहातें । कोणी नस्तां मरतें । आपदआपदों ॥ २९ ॥

रूपलावण्य जाते. शरीरसामर्थ्यही राहते.(जाते क्षीण होते.,अवयव कमीजास्त झाले तर तसेच सोसावे लागते) व जवळ कोणीच नसता खितपून मरावे लागते.

अंतकाळ दैन्य दीन । सकळिकांस तत्समान । ऐसें चंचळ अवलक्षण । दु:खकारी ॥ ३० ॥

अंतःकाळ हा सर्वाना असा सारखा अत्यंत दीन करणारा आहे (अंतःकाळी सर्वच दीन होतात.)असा हा चंचळ (अंतरात्मा) अवलक्षणी व दु:खकारक आहे.(अंतःकाळी सर्वच दीन होतात.) असा हा चंचळ (अंतरात्मा) अवलक्षणी व दु:खकारक आहे.

भोगून अभोक्ता म्हणती । हे तों अवघीच फजिती । लोक उगेच बोलती । पाहिल्याविण ॥ ३१ ॥

त्या अंतरात्म्याला “भोगून अभोक्ता” असे सर्वब्रह्मवादी म्हणतात.हा (त्याचा व म्हणणा-याचा ) निव्वळ फजितवाडा आहे.विचार केल्यावाचून (पाहिल्यावाचून) लोक उगीच बोलतात.

अंतकाळ आहे कठिण । शेरीर सोडिना प्राण । बराड्यासारिखें लक्षण । अंतकाळीं ॥ ३२ ॥

(बराड्यासारिखें - आशाळभूतपणे,भिका-यासारखे)

अंतःकाळ कठिण आहे,प्राण शरीर सोडून जाता जात नाही,अंतःकाळी प्राण्यांची स्थिति आशाळभूत भिकाऱ्यासारखी केविलवाणी होते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहात्मनिरूपणनाम समास सहावा ॥**

### समास सातवा : जगजीवननिरूपण॥ श्रीराम ॥

मुळीं उदक निवळ असतें । नाना वल्लिमधें जातें । संगदोषें तैसें होतें । आंब्ल तिक्षण कडवट ॥ १ ॥

(आंब्ल - आम्ल)

पाणी मुळातच निर्मळ असते पण ते अनेक वनस्पतीमध्ये (वेलीमध्ये) जाऊन त्यांच्या संगतीच्या दोषाने आंबट,तिखट,कडवट,वगैरे होते.

आत्मा आत्मपणें असतो । देहसंगें विकारतो । साभिमानें भरीं भरतो । भलतिकडे ॥ २ ॥

तसा आत्मा आत्मपणाने (निर्विकार व निर्मळ) आहे.पण देहाच्या संगतीने त्याला विकार पावतो व अभिमानाच्या भरी भरून भलत्याच मार्गाला लागतो.

बरी संगती सांपडली । जैसी उंसास गोडी आली । विषवल्ली फांपावली । घातकी प्राणी ॥ ३ ॥

चांगली संगती मिळाली म्हणजे उसाला गोडी यावी तसा भला होतो आणि दुष्ट संगति (घात्क्क्यांची संगति) मिळाली म्हणजे विषवल्ली फोफावते तसा तो घातकी (परम नष्ट) होतो.

अठराभार वनस्पती । गुण सांगावे ते किती । नाना देहाचे संगती । आत्मयास होये ॥ ४ ॥

असंख्य वनस्पती आहेत,त्यांचे गुण किती सांगावे? (त्या वनस्पतींच्या संगतीने पाणी तितक्या गुणांचे होते.) त्याप्रमाणे अनेक देहांच्या संगतीने आत्माही अनेक विकारांनी युक्त होतो.

त्यामधें कोणी भले । ते संतसंगें निघाले । देहाभिमान सांडून गेले । विवेकबळें ॥ ५ ॥

(संतसंगें - संतांचा सहवासात वेळ घालवू लागले.)

त्यात कोणी चांगले असतात ते संत संगतीला लागतात (ते संतसंगतीने सुख पावतात.) व विवेकाने देहबुद्धि सोडून मोकळे होतात.(सद्गतीला जातात.) देहबुद्धि विवेकाने तोडून पैलपार जातात.)

उदकाचा नाशचि होतो । आत्मा विवेकें निघतो । ऐसा आहे प्रत्यय तो । विवेकें पाहा ॥ ६ ॥

(आत्मा विवेकें निघतो - आत्मा विवेकाने मुक्त होतो)

(येथवर हा उदकाचा दृष्टांत आत्म्याला दिला खरा पण तो अपूर्ण आहे,कारण) उदकाचा नाश होतो पण आत्मा विवेकाच्या योगाने सर्व उपाधीमधून (देहबुद्धीच्या आवरणातून) बाहेर पडतो.असा अनुभव आहे तो तुम्हीही विवेकाच्या योगाने पाहा.(त्याचा प्रत्यय घेऊन पहा.)

ज्यास स्वहितचि करणें । त्यास किती म्हणौन सांगणें । हें ज्याचें त्यानें समजणें । सकळ कांहीं ॥ ७ ॥

ज्याला स्वतःचे कल्याणाच करून घ्यावयाचे आहे.त्याला दुसरा किती सांगणार?(-त्याला फार सांगणे नको) हे सर्व काही ज्याचे त्यानेच समजून घेऊन शहाणे व्हावे.

आपला आपण करी कुडावा । तो आपला मित्र जाणावा । आपला नाश करी तो समजावा ।वैरी ऐसा ॥८॥

(कुडावा - रक्षण)

जो आपले आपण रक्षण (कुडावा) करतो तो आपला आपणच मित्र होतो व जो स्वतःचा नाश करून घेतो तो स्वतःचा शत्रू होतो.

आपले आपण अन्हित करावें । त्यास आडवें कोणें निघावें । येकांती जाऊन जीवें ।मारी आपणासी॥९॥

जो आपला आपणच नाश करायला तयार झाला त्याचे निवारण कोण करणार?(त्याला कोण वारील?) तो एकांतामध्ये जाऊन आत्महत्या करून घेईलच.

जो आपला आपण घातकी । तो आत्महत्यारा पातकी । याकारणें विवेकी । धन्य साधु ॥ १० ॥

जो आपला आपण घात करतो तो आत्मघातकी व घातकी होय.म्हणून विविकाने आपले खरे कल्याण साधून घेईल,तोच साधू धन्य होय.

पुण्य्वंतां सत्संगती । पापिष्टां असत्संगती । गति आणि अवगती । संगतीयोगें ॥ ११ ॥

पुण्यवंताना सत्संगती व पापिष्ठांना दुष्ट संगति मिळते.सद्गति व अधोगति ह्यांना कारण संगतीच होय.

उत्तम संगती धरावी । आपली आपण चिंता करावी । अंतरी बरी विवरावी । बुद्धि जाणत्याची ॥ १२ ॥

म्हणून उत्तम संगति धरून आपल्या कल्याणाची चिंता आपणच वाहावी (आपल्या सुटकेची काळजी आपणच करावी) व जाणता पुरुष शहाणपणाने (सद्बुद्धीने) कसा वागतो (कसा तरून जातो.) ह्याचे मनन आपल्या अंतःकरणात करावे.

इहलोक आणि परलोक । जाणता तो सुखदायेक । नेणत्याकरितां अविवेक । प्राप्त होतो ॥ १३ ॥

इहलोकी व परलोकी जाणत्याची संगति सुखदायक होते.आणि अडाण्यामुळे अविचार पाठीस लागतो.(प्रपंची अथवा परमार्थी जाणत्याचा संग सुखकारक होतो व नेणत्याच्या संगतीत अविवेकच वाढीस लागतो.)

जाणता देवाचा अंश । नेणता म्हणिजे तो राक्षेस । यामधें जें विशेष । तें जाणोन घ्यावें ॥ १४ ॥

जाणता हा देवाचा अंश आहे व नेणता हा दैत्याचा अंश आहे असे समजावे ह्यांना चांगला असेल तो (श्रेयस्कर तो) संग समजून धरावा.

जाणतां तो सकळां मान्य । नेणता होतो अमान्य । जेणेंकरितां होईजे धन्य । तेंचि घ्यावें ॥ १५ ॥

जाणता सर्वांना मान्य होतो,नेणता अमान्य होतो ह्यातून ज्याच्या योगाने धन्यता प्राप्त होईल ती संगति धरावी.(म्हणून ज्या संगतीने जन्मसाफल्य होते तीच संगति करावी.)

साक्षपी शाहाण्याची संगती । तेणें साक्षपी शाहाणे होती । आळसी मूर्खाची संगती । आळसी मूर्ख ॥१६॥

उद्योगी व शाहाण्या मनुष्याची संगति धरली तर मनुष्य उद्योगी व शहाणा होतो आणि मूर्ख आळशाच्या संगतीने आळशी व मूर्ख होतो.

उत्तम संगतीचें फळ सुख । अद्धम संगतीचें फळ दुःख । आनंद सांडुनियां शोक । कैसा घावा ॥ १७ ॥

(उत्तम संगतीपासून सुख होते,अधम संगतीपासून दुःख होते.) उत्तम संगतीचे फळ सुख व वाईट संगतीचे फळ दुःख होय,मग आनंद सोडून दुःख व शोक का पत्करावा?

ऐसें हें प्रगट दिसे । जनामधें उदंड भासे । प्राणीमात्र वर्ततसे । उभयेयोगें ॥ १८ ॥

हे उघड आहे,जगामध्ये पुष्कळ दिसून येते (प्रत्यक्ष दिसते.) दोन्ही मार्गांनी (प्रकारांनी) सर्व प्राणी वागत असतात.

येका योगें सकळ योग । येका योगें सकळ वियोग । विवेकयोगें सकळ प्रयोग । करीत जावे ॥ १९ ॥

एकाच्या (विवेकी पुरुषांच्या) संगतीने सगळे सुखाचेच योग येतात आणि दुसऱ्याच्या(मूर्खाच्या) संगतीने सगळी कामे फिसकटून जातात.ह्यासाठी विवेकी पुरुषाच्या संगतीने (मसलतीने प्रयोग) सगळी कामे करीत जावी.

अवचितें सांकडींत पडिलें । तरी तेथून पाहिजे निघालें । निघोन जातां जालें । परम समाधान ॥ २० ॥

अकस्मात एखादा संकटात सापडल्यास तेथून सुटका करून घ्यावी लागते,चांगली सुटका झाली म्हणजे समाधान वाटते (समाधान सुख प्राप्त होते.)(म्हणून जाणत्याचा संग करावा म्हणजे संकटमुक्ततेचा उपाय सुचतो.)

नाना दुर्जनांचा संग । क्षणक्षणा मनभंग । याकारणें कांहीं रंग । राखोन जावें ॥ २१ ॥

(कांहीं रंग राखोन - आपले महत्व राखून असावे.)

नाहीतर दुर्जनाच्या संगतीत (अनेक प्रकारच्या दुःसंगतीत) क्षणोक्षणी मनोभंगाचे दुःख भोगावे लागते ह्यासाठी आपले महत्व(रंग) सांभाळून वागावे.

शाहाणा येत्न त्याच्या गुणें । पाहों जातां काये उणें । सुख संतोष भोगणें । नाना श्लाघ्यता ॥ २२ ॥

(शहाणा प्रयत्नशील असतो त्याला काही कमी पडत नाही) शाहाणपणाने प्रयत्न केला तर काय कमी पडणार आहे? अनेक प्रकारे सुख संतोष पूज्यता (म्हणजे लौकीकात भलेपणा) भोगायला मिळते.

अतां लोकीं ऐसें आहे । सृष्टीमधें वर्तताहे । जो कोणी समजोन पाहे । त्यास घडे ॥ २३ ॥

जगात लोकांचा हाच प्रकार हल्लीही चालू आहे,जो कोणी समजून पाहील त्यालाही तशीच सुखे भोगायला मिळतील.

बहुरत्न वसुंधरा । जाणजाणों विचार करा । समजल्यां प्रत्ययो अंतरा- । माजीं येतो ॥ २४ ॥

ही पृथ्वी (वसुंधरा) बहुरत्ना आहे (अनेक जाणते शहाणे लोक पृथ्वीवर असतात.म्हणून जाणत्यांचा विचार करा म्हणजे ह्या म्हणण्याचा प्रत्यय येईल) त्यांच्या उत्कर्षाचा विचार पुनःपुन्हा करून पहा आणि तुम्हाला समजले म्हणजे ह्या म्हणण्याचा अनुभव मनाला पटेल.

दुर्बळ अणि संपन्न । वेडें आणि वित्पन्न । हें अखंड दंडायमान । असतचि असे ॥ २५ ॥

ह्या जगात दुर्बळ व संपन्न,वेडे व शाहाणे (व्युत्पन्न,पंडित)(असे दोन्ही प्रकारचे लोक असतातच) अशी रहाटी नित्य चालतच आली आहे.

येक भाग्यपुरुष मोडती । येक नवे भाग्यवंत होती । तैसीच विद्या वित्पती । होत जाते ॥ २६ ॥

कोणी भाग्यशाली (संपन्न) लोक धुळीस मिळतात.(मोडती) व काही दरिद्री लोक नवीनच भाग्याला चढतात.विद्या-व्युत्पत्ति ह्यांचाही असाच प्रकार आहे.

येक भरे येक रितें । रितें मागुतें भरतें । भरतेंहि रितें होतें । काळांतरीं ॥ २७ ॥

एक भरते एक रिकामे होते ते पुन्हा भरते भरलेले असते तेही कालांतराने रिकामे होते.

ऐसी हे सृष्टीची चाली । संपत्ति दुपारची साउली । वयेसा तरी निघोन गेली । हळुहळु ॥ २८ ॥

(असे हे सृष्टीचे चक्र-राहाट गाडगे सारखे फिरत आहे.) कुटुंबे व राष्ट्रे चक्रनेमिक्रमाने उदयास्त पावतात.अशी ही जगरहाटी आहे.संपत्ति दुपारच्या सावली सारखी क्षणभंगुर आहे.आयुष्यही हलके हलके निघून चालले आहे (आयुष्य क्षीण होणारे आहे,)

बाळ तारुण्य आपुलें । वृधाप्य प्रचितीस आलें । ऐसें जाणोन सार्थक केलें । पाहिजे कोणि येकें ॥ २९ ॥

(बाल्य,तारुण्य,वृधाप्य इ.अवस्था संपून मृत्यू उभा आहे हे जाणून मनुष्याने आयुष्य सार्थकी लावावे.)(आपलेही बालपण व तारुण्य निघून जाऊन वृद्धपणाच्या दु:खाचे अनुभव येत आहेत.)

बाल्य,तारुण्य,वृद्धपणा कसा दु:खकारक व अशाश्वत आहे.,हे अनुभवास येत आहेच.हे लक्षात घेऊन मनुष्याने आपल्या जन्माचे सार्थक करून घेतले पाहिजे.

देह जैसें केलें तैसें होतें । येत्न केल्यां कार्य साधतें । तरी मग कष्टावें तें । काय निमित्य ॥ ३० ॥

(कष्टावें तें - दु:खी का व्हावे.)

देहाचे जे जे करावे ते ते होते (देह जसा वागवावा तसा वागवला जातो) यत्न केल्याने कार्यसिद्धी होते,तर मग (हे जाणत असून) मनुष्याने काय म्हणून दु:ख भोगावे?

## सूक्ष्मदेहाची तत्वे

| पंचमहाभूते | आकाशाचे अंतःकरण पंचक | वायूचे प्राणपंचक | तेजाचे ज्ञानेद्रियपंचक | आपाचे कर्मेंद्रियपंचक | पृथ्वीचे विषयपंचक |
|---|---|---|---|---|---|
| आकाश | अंतःकारण प्रथम स्फुरण | व्यान सर्वांगी | श्रवण शब्द एकतो त्याशिवाय बहिरा | वाचा शब्द बोलतो त्याशिवाय जीव मुका | शब्द |
| वायू | मन संकल्पविकल्प | समान नाभिस्थानी | त्वचा शीतोष्णादि जाणतो | हस्त पदार्थ उचलतो | स्पर्श |
| तेज | बुद्धि निश्र्चयामक्ता | उदान कंठी | चक्षु रूप पाहतो त्याशिवाय आंधळा | पाद चालतो त्याशिवाय पांगळा | रूप |
| आप | चित्त,चिंतन | अपान गुद्स्थानी | जिव्हा रसास्वाद घेतो. | शिस्न मूत्र व रतिभोग त्याशिवाय नपुंसक | रस |
| पृथ्वी | अहंकार कार्याभिमान | प्राण मुखी नासिकी | घ्राण सुगंध दुर्गंध समजतो | गुद मल्लोत्सर्ग | गंध |

**इति श्रीदासभोधे गुरुशिष्यसंवादे जगजीवननिरूपणनाम समास सातवा ॥**

## समास आठवा : तत्त्वनिरसन

॥ श्रीराम ॥ नाभीपासून उन्मेषवृत्ती । तेचि परा जाणिजे श्रोतीं । ध्वनिरूप पश्यंती । हृदईं वसे ॥ १ ॥

(उन्मेषवृत्ती - स्पुरणरूप)

नाभीपासून जी स्फुरणरूप वृत्ति उत्पन्न होते तीच परवाणी होय.हे श्रोत्यांनी लक्षात ठेवावे तीच हृदयाच्या ठिकाणी ध्वनीरूप झाली म्हणजे “पश्यंती वाणी” होय.

कंठापासून नाद जाला । मध्यमा वाचा बोलिजे त्याला । उच्चर होतां अक्षराला । वैखरी बोलिजे ॥ २ ॥

कंठामध्ये येऊन नादरूप झाली म्हणजे तिला मध्यमा वाणी म्हणतात आणि त्या नादाचा अक्षरोच्चार झाला म्हणजे त्याला वैखरीवाणी म्हणतात.

नाभिस्थानीं परा वाचा । तोचि ठाव अंतःकर्णाचा । अंतःकर्णपंचकाचा । निवाडा ऐसा ॥ ३ ॥

नाभीच्या ठिकाणी जी परावाणी तीच अंतःकरणाचे स्थान होय.आता अंतःकरण पंचकाचे रूप पुढीलप्रमाणे आहे.

निर्विकल्प जें स्फुरण । उगेंच असतां आठवण । तें जाणावें अंतःकर्ण । जाणतीकळा ॥ ४ ॥

(निर्विकल्प जें स्फुरण - शून्याकार वृत्ती असता होणारे स्फूरण)

कल्पनारहित अशी मनाची स्थिति असता जे स्पुरण होते म्हणजे उगीच (स्वस्थ) असता जी आठवण होते ते अंतःकरण (जाणती कळा) होय.

अंतःकर्ण आठवलें । पुढें होये नव्हेसें गमलें । करूं न करू ऐसें वाटलें । तेंचि मन ॥ ५ ॥

आठवण होणे हे अंतःकरणाचे स्वरूप होय.त्याचे पुढे होय की नाही,करू की नको करू,असे जे वाटते.(चंचळपण तेच मन होय.)

संकल्प विकल्प तेंचि मन । जेणें करितां अनुमान । पुढें निश्चयो तो जाण । रूप बुद्धीचें ॥ ६ ॥

असे संकल्प विकल्परूप मन आहे,त्याच्या योगाने अनुमान (तर्क,संशय) होऊन पुढे निश्र्चय होतो ते बुद्धीचे स्वरूप होय.

करीनचि अथवा न करी । ऐसा निश्चयोचि करी । तेचि बुद्धि हे अंतरीं । विवेकें जाणावी ॥ ७ ॥

करीनच किंवा करणार नाही असा निश्र्चय करते ती बुद्धि होय. हे बुद्धीचे स्वरूप अंतःकरणात विवेकाने जाणावे.

जे वस्तुचा निश्चये केला । पुढें तेचि चिंतूं लागला । तें चित्त बोलिल्या बोला । येथार्थ मानावें ॥ ८ ॥

ज्या गोष्टीचा निश्चय होतो, तिचेच पुढे जे चिंतन सुरु होते ते चित्त होय.ह्या सांगण्यावर विश्वास ठेवावा.

पुढें कार्याचा अभिमान धरणें । हें कार्य तों अगत्य करणें । ऐस्या कार्यास प्रवर्तणें । तोचि अहंकारु ॥९॥

त्यानंतर त्या कार्याचा अभिमान धरून हे कार्य तर अगत्यच केले पाहिजे,अशा कार्याला लागले पाहिजे असे वाटून कार्यप्रवृत्त होणे हा अहंकार होय.

ऐसें अंतःकर्णपंचक । पंचवृत्ती मिळोन येक । कार्येंभागें प्रकारपंचक । वेगळाले ॥ १० ॥ जैक्षे पांचहि प्राण । कार्येंभागें वेगळाले जाण । नाहीं तरी वायोचें लक्षण । येकचि असे ॥ ११ ॥

असे हे अंतःकरणपंचक आहे ह्या पाचही वृत्ति मिळून खरी एकच वृत्ति आहे,निरनिराळ्या कार्यावरून पांचप्राण वेगवेगळे मानतात पण त्यातील वायुतत्व एकच(तसेच अंतःकरण पंचकाचे आहे.)कोष्टक पाहाणे.

सर्वांगीं व्यान नाभी समान । कंठी उदान गुदीं अपान । मुखीं नासिकीं प्राण । नेमस्त जाणावा ॥ १२ ॥

सर्वांगाच्या ठिकाणी राहणारा तो व्यान,नाभीच्या ठिकाणचा समान,कंठातला उदान,गुदाच्या ठिकाणी राहणारा अपान आणि मुख आणि नाक ह्यांच्या ठिकाणी असणारा जो प्राणवायू होय,हे निश्चयेकरून समजावे.

बोलिलें हें प्राणपंचक । आतां ज्ञानैंद्रियेंपंचक । श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा नासिक । ऐसीं हें ज्ञानेंद्रियें ॥ १३ ॥

हे प्राण पंचक सांगितले आता ज्ञानेद्रियपंचक सांगतो.श्रोत्र(कान) त्वचा,डोळे,जीभ व नाक ही पाच ज्ञानेंद्रिये आहेत.

वाचा पाणी पाद शिस्न गुद । हे कर्मैंद्रियें प्रसिद्ध । शब्द स्पर्ुष रूप रस गंध । ऐसें हें विषयपंचक ॥१४॥

वाचा,(पाणी) हात,पाय,शिस्न व गुद ही पाच प्रसिद्ध कर्मेंद्रिये आहेत.तसेच शब्द स्पर्श रूप रस गंध असे हे विषय पंचक आहे.

अंतःकर्ण प्राणपंचक । ज्ञानेंद्रियें कर्मेंद्रिये पंचक । पांचवें विषयपंचक । ऐसीं हे पांच पंचकें ॥ १५ ॥

अंतःकरण,प्राण,ज्ञानेंद्रिये,कर्मेंद्रिये व विषय अशी ही पाच पंचके आहेत.

ऐसें हे पंचविस गुण । मिळोन सूक्ष्म देह जाण । याच कर्दम बोलिला श्रवण । केलें पाहिजे ॥ १६ ॥

(पाच पंचके - अंतःकरण पंचक(अंतःकरण,मन,बुद्धी,चित्त,अहंकार) , प्राणपंचक (व्यान सामान,उदान,अपान,प्राण) , ज्ञानेंद्रिय पंचक (श्रवण,डोळा,वाणी,नाक,त्वचा), कर्मेंद्रिय पंचक-

(जीभ,हात,पाय,शिस्न,गुद) विषयपंचक (शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध) आणि विषयपंचकाची आकाश,वायु,अग्नि,आप,पृथ्वी पाच महाभूते होते.)

(प्रत्येक पंचकाचे पाच) असे पंचवीस गुण मिळून सूक्ष्मदेह होतो.ह्याचेही (कर्दम,चिखल) मिश्रण कसे झाले आहेत ते आता सांगतो ऐका.

अंतःकर्ण व्यान श्रवण वाचा । शब्द विषये आकाशाचा । पुढें विस्तार वायोचा । बोलिला असे ॥ १७ ॥

अंतःकरण सर्वांगी राहणारा व्यान,वायु,श्रवण(देवता),वाचा(वाची देवता) व शब्द (विषय) हे आकाशतत्वांचे पाच विषय म्ह.धर्म आहेत.पुढे वायूचे प्रकार सांगितले आहेत.

मन समान त्वचा पाणी । स्पर्श रूप हा पवनीं । ऐसे हे अडाखे साधुनी । कोठा करावा ॥ १८ ॥

मन,समान वायु,त्वचा व हात,स्पर्श हे वायूचे विषय होत.ह्यांचा मेळ घालून (कोठा) कोष्टक बनवावे म्हणजे समजेल.

बुद्धि उदान नयेन चरण । रूपविषयाचें दर्शन । संकेतें बोलिलें मन । घालून पाहिजे ॥ १९ ॥

बुद्धि,उदान,डोळे(चक्षुदेवता),(पाददेवता) व रूप हे पांच तेजाचे अंश (विषय) संक्षेपाने सांगितले आहेत.ह्यात मन घालून नीट विचार करावा.

चित्त अपान जिव्हा शिस्न । रसविषये आप जाण । पुढें ऐका सावधान । पृथ्वीचें रूप ॥ २० ॥

चित्त,अपान,जिव्हा,शिस्न,व रस हे पाच आंपाचे (पाण्याचे)अंश आहेत.पुढे पृथ्वीचे रूप सांगतिले आहे.ते सावधपणाने ऐका.

अहंकार प्राण घ्राण । गुद गंधविषये जाण । ऐसे केलें निरूपण । शास्त्रमतें ॥ २१ ॥

अहंकार,प्राण,घ्राण,गुद व गंध हे पाच पृथ्वीचे अंश (विषय) आहेत.हे सर्व शास्त्राच्या आधाराने सांगितले आहेत.

ऐसा हा सूक्ष्म देहे । पाहातां होईजे निसंदेहे । येथें मन घालून पाहे । त्यासीच हें उमजे ॥ २२ ॥

असा हा सूक्ष्म देहाचा विचार केला म्हणजे मन नि:संशय होईल (वर वर पाहण्या-याला हे समजणार नाही तर त्यात मन घालून विवरण करील त्यालाच हे कळेल.)

ऐसें सूक्ष्म देहे बोलिलें । पुढें स्थूळ निरोपिलें । आकाश पंचगुणें वर्तलें । कैसें स्थुळीं ॥ २३ ॥

(भूतांचे गुण प्रत्येकी पाच - आकाश–(काम,क्रोध,शोक,मोह,भय) , वायू - हालणे,वळणे,प्रसरण,निरोध,संकोच) तेज-(भूक,तहान,आळस,निद्रा,मैथुन) आप - (पुबीज,स्त्रीबीज,लाळ,मूत्र,घाम) पृथ्वी - (अस्थि,मांस,त्वचा,नाडी,रोम) हे २५ गुण)

येथपर्यंत सूक्ष्म देहाचे वर्णन केले आता पुढे स्थूळ देहाचे वर्णन करतो.स्थूळ देहामध्ये आकाशाचे पांच भाग कोणते ते सांगतो.

**सूक्ष्म देहाची तत्वे**

| आकाशाची | वायूची | तेजाची | आपाची | पृथ्वीची |
|---|---|---|---|---|
| काम | चळण | क्षुधा | शुक्र | अस्थि |
| क्रोध | वळण | तृषा | शोणित | मांस |
| शोक | प्रसारण | आलस्य | लाळ | त्वचा |
| मोह | निरोध | निद्रा | मूत्र | नाडी |
| भय | आकुंचन | मैथुन | स्वेद | रोम |

काम क्रोध शोक मोहो भये । हा पंचविध आकाशाचा अन्वये । पुढें पंचविध वायो । निरोपिला ॥ २४ ॥

काम,क्रोध,शोक,मोह व भय हे पाच आकाशाचे अंश (विषय) आहेत.पुढे वायूचे पाच प्रकार सांगतो.

चळण वळण प्रासारण । निरोध आणि आकोचन । हें पंचविध लक्षण । प्रभंजनाचें ॥ २५ ॥

चलण,वळण,प्रसारण,निरोध व आकुंचन असे (प्रभंजन) वायूचे पाच प्रकार आहेत.

क्षुधा त्रुषा आलस्य निद्रा मैथुन । हे तेजाचे पंचविध गुण । आतां पुढें आपलक्षण ।निरोपिलें पाहिजे ॥२६॥

क्षुधा,तृषा,आलस्य,निद्रा व मैथुन हे तेजाचे पाच गुण आहेत.आता पुढे आपाचे (जलाचे) स्वरूप सांगावयाचे आहे.

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद । हा पंचविध आपाचा भेद । पुढें पृथ्वी विशद । केली पाहिजे ॥ २७ ॥

शुक्र,शोणित,लाळ,मूत्र व स्वेद हे आपाचे (जलाचे) पाच गुण आहेत.आता पृथ्वीचे भेद स्पष्ट करून सांगू.

अस्ति मांष त्वचा नाडी रोम । हे पृथ्वीचे पंचविध धर्म । ऐसे स्थूळ देहाचें वर्म । बोलिलें असे ॥ २८ ॥

अस्थि,मांस,त्वचा,नाडी व रोम (केस) हे पृथ्वीचे चार भेद (धर्म) आहेत ह्याप्रमाणे स्थूळदेहाचे स्वरूप सांगितले आहे.

पृथ्वी आप तेज वायो आकाश । हे पांचाचे पंचविस । ऐसें मिळोन स्थूळ देहास । बोलिजेतें ॥ २९ ॥

पृथ्वी,आप,तेज,वायू व आकाश ह्या पाच भूतांचे हे पंचवीस गुण मिळून हा स्थूळ देह म्हंटला जातो.

तिसरा देह कारण अज्ञान । चौथा माहांकारण ज्ञान । हे च्यारी देह निर्शितां विज्ञान । परब्रह्म तें ॥ ३० ॥

(स्थूळ देहाची २५ तत्वे व सूक्ष्म देहाची २५ तत्वे सांगितली.)तिसरा कारण देह अज्ञान व चौथा महाकारण देह ज्ञान होय.ह्या चारही देहाचा निरास म्हणजे विज्ञान होते तेच परब्रह्म होय.

विचारें चौदेहावेगळें केलें । मीपण तत्वासरिसें गेलें । अनन्य आत्मनिवेदन जालें । परब्रह्मीं ॥ ३१ ॥

विचाराने आत्म्याला चारी देहाहून वेगळे केले,तत्वांच्या निरसनाबरोबर मीपण लय पावले म्हणजे परब्रह्माच्या ठिकाणी एकरूप झाल्याने आत्मनिवेदन होते.(ह्या चारी देहाचा निरास झाला,विचाराने आत्मा वेगळा आहे असे कळले.व मीपण अहंकार तत्वापासून गेला म्हणजे जे परब्रह्म उरले त्याशी अनन्य होणे हे आत्मनिवेदन होय.

विवेकें चुकला जन्म मृत्य । नरदेहीं साधिलें महत्कृत्य । भक्तियोगें कृत्यकृत्य । सार्थक जालें ॥ ३२ ॥

ह्या विविकाने जन्ममृत्यू चुकला म्हणजे नरदेहात येऊन एक मोठेच कृत्य साधल्यासारखे होते.म्हणजे परब्रह्माशी अनन्यता झाल्याने (कृतकृत्यता) सार्थक होते.(परब्रह्माशी अनन्यता म्ह.भक्ति तिच्यामागे सार्थक झाले.)

इति श्री पंचीकर्ण । केलेंचि करावें विवर्ण । लोहाचें जालें सुवर्ण । परिसाचेनयोगें ॥ ३३ ॥

पंचीकरण येथे संपले,ह्याचे विवरण वारंवार करावे म्हणजे परिसाच्या संगतीने सोने होते (त्याप्रमाणे पंचीकरणाचे विवरण केल्याने जीव ब्रह्मस्वरूप होतो-त्याप्रमाणे परब्रह्माशी अनन्यता पावल्याने जीवाची धन्यता होते.)

हाहि दृष्टांत घडेना । परिसाचेन परीस करवेना । शरण जातां साधुजना । साधुच होइजे ॥ ३४ ॥

पण हा दृष्टांतही अपुरा आहे परीसाला लोखंडाचा परिस करता येत नाही (लोखंडाचे सोने होते पण परीस होत नाही येथे जीव प्रत्यक्ष परब्रह्मच होतो.)पण साधुसंताना शरण गेल्याने मुमुक्षु साधुच-संत होतो.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे तत्वनिरूपणनाम समास आठवा ॥**

## समास नववा : तनुचतुष्टयनिरूपण॥ श्रीराम ॥

स्थूळ सूक्ष्म कारण माहाकारण ।ऐसे हे चत्वार देह जाण ।जागृति स्वप्न सुषुप्ति पूर्ण ।तुर्या जाणावी॥१॥

स्थूळ,सूक्ष्म,कारण व महाकारण हे चार देह होत.जागृति,स्वप्न,सुषुप्ति व तुर्या ह्या चार देहाच्या अवस्था होत.

विश्व तैजस प्राज्ञ । प्रत्यगात्मा हे अभिमान । नेत्रस्थान कंठस्थान हृदयस्थान । मूर्धनी ते ॥ २ ॥

विश्र्व,तेजस,प्राज्ञ व प्रत्यगात्मा हे चार ह्या देहांचे अभिमानी होत.नेत्रस्थान,कंठस्थान,हृदयस्थान व मूर्धन(मस्तक) ही त्यांची चार स्थाने होत.

स्थूळभोग प्रविक्तभोग । आनंदभोग आनंदावभासभोग । ऐसे हे चत्वार भोग । चौंदेहाचे ॥ ३ ॥

स्थूळभोग,प्राविविक्त भोग (उपाधिरहित,स्वप्नभोग),आनंदभोग व आनंदावभास भोग हे ह्या चार देहाचे चार भोग होत.

अकार उकार मकार । अर्धमात्रा तो ईश्वर । ऐस्या मात्रा चत्वार । चौंदेहाच्या ॥ ४ ॥

आकार,उकार,मकर व अर्धमात्रा-तोच ईश्वर ह्या चार देहांच्या चार मात्रा होत.

तमोगुण रजोगुण । सत्वगुण शुद्धसत्वगुण । ऐसे हे चत्वार गुण । चौंदेहाचे ॥ ५ ॥

तमोगुण,रजोगुण,सत्वगुण व शुद्धसत्वगुण हे ह्या चार देहांचे चार गुण होत.

क्रियाशक्ति द्रव्याशक्ती । इछाशक्ति ज्ञानशक्ती । ऐशा चत्वार शक्ती । चौंदेहाच्या ॥ ६ ॥

क्रियाशक्ति,द्रव्यशक्ति,इच्छाशक्ति व ज्ञानशक्ति अशा चार देहांच्या चार शक्ति होत.

ऐसीं हे बत्तिस तत्वें । दोहींचीं पन्नास तत्वें । अवघीं मिळोन ब्यासि तत्वें । अज्ञान आणी ज्ञान ॥ ७ ॥

अशी ही (८ X ४ = ३२) बत्तीस तत्वे झाली मागे सांगितलेली स्थूळदेहाची पंचवीस (२५) व सूक्ष्मदेहाची पंचवीस(२५) मिळून ५० तत्वे होतात.

ऐसीं हे तत्वें जाणावीं । जाणोन माइक वोळखावीं । आपण साक्षी निरसावीं । येणें रितीं ॥ ८ ॥

ती ह्यात मिळवली म्हणजे ३२+५० = (ही सगळी मिळून) ८२ तत्वे होतात. आणि शिवाय ज्ञान व अज्ञान (नीट हिशेब पाहता स्थूळाची २५+८ =३३ कारणाची ८ व महाकारणाची ८ मिळून ८२ तत्वे होतात.)

(अशी ही ८२ तत्वे मायिक आहेत.ती मायिक आहेत हे ओळखावे,आपण त्यांचे साक्षी व्हावे म्हणजे ती मावळतात.अशी ही तत्वे समजून घेऊन ती मायिक (खोटी) आहेत व मी त्यांचा साक्षी आहे असे ओळखून त्याचे निरसन करावे.

साक्षी म्हणिजे ज्ञान । ज्ञानें वोळखावें अज्ञान । ज्ञानाज्ञानाचें निर्शन । देहासरिसें ॥ ९ ॥

साक्षी (साक्षित्व) हे ज्ञान,हया ज्ञानाने अज्ञान ओळखावे आणि वरील ८२ तत्वांबरोबरच (चार देहाबरोबरच) त्याच्याविषयीचे अज्ञान व साक्षिस्वरूप (साक्षित्वरूपाने त्याचे) ज्ञान हया दोहीचा निरास करावा व आपले नि:संगत्व अनुभवावे.

ब्रह्मांडीं देह कल्पिले । विराट हिरण्यगर्भ बोलिले । ते हे विवेकें निर्शले । आत्मज्ञानें ॥ १० ॥

ब्रह्मांडाचे विराट,हिरण्यगर्भादि (विराट,हिरण्यगर्भ,अव्याकृत व मूळमाया असे ब्रह्मांडाचेही) चार देह समजुतीसाठी कल्पिले आहेत,त्यांचे सुद्धा आत्मज्ञानाने व विवेकाने निरसन केले पाहिजे.

आत्मानात्माविवेक करितां । सारासारविचार पाहतां । पंचभूतांची माइक वार्ता । प्रचित आली ॥ ११ ॥

आत्मानात्मविवेक व सारासारविचार (हे पूर्वी सांगितले आहेत.) पाहिले असता पंचभूते मायिक (खोटी) आहेत असा अनुभव येतो.(-पांचभौतिक पिंडब्रह्मांड पूर्ण निरसावे व ब्रह्मानुभव घ्यावा.)

अस्ति मांष त्वचा नाडी रोम । हे पांचहि पृथ्वीचे गुणधर्म । प्रत्यक्ष शरीरीं हें वर्म । शोधून पाहावें ॥ १२ ॥

अस्थि,मास,त्वचा,नाडी व केस हे पांच पृथ्वीचे गुणधर्म आहेत.शरीरात हे प्रत्यक्ष पाहून घावेत.

शुक्लीत श्रोणीत लाळ मूत्र स्वेद । हे आपाचे पंचकभेद । तत्वें समजोन विशद । करून घावीं ॥ १३ ॥

शुक्र,शोणित,लाळ,मूत्र व स्वेद हे आप-तत्वाचे (जलाचे) पाच भेद आहेत.तत्वांची स्वरूपे नीट स्पष्टपणे समजून घ्यावीत.

क्षुधा त्रुषा आलस्य निद्रा मैथुन । हे पांचहि तेजाचे गुण । या तत्वांचें निरूपण । केलेंचि करावें ॥ १४ ॥

क्षुधा,तृषा,आलस्य,निद्रा व मैथुन हे पाचही तेजाचे गुण आहेत.हया सर्व तत्वांचे निरुपण पुनःपुन्हा करीत जावे.

चळण वळण प्रासारण । निरोध आणि आकोचन । हें पंचहि वायोचे गुण । श्रोतीं जाणावे ॥ १५ ॥

चळण,वळण,प्रसारण,निरोध व आकुंचन हे पांच वायूचे गुण श्रोत्यांनी ध्यानात ठेवावेत.

काम क्रोध शोक मोहो भये । हा आकाशाचा परिपाये । हें विवरल्याविण काये । समजों जाणें ॥ १६ ॥

काम,क्रोध,शोक,मोह व भय हे आकाशाचे भेद (विषय,पर्याय) आहेत,विवरण केल्याशिवाय हे कसे मिळतील?

असो ऐसें हें स्थूळ शरीर । पंचविस तत्वांचा विस्तार । आतां सूक्ष्मदेहाचा विचार । बोलिजेल ॥ १७ ॥

असो,अशा स्थूळ शरीराच्या पंचवीस तत्वांचा विस्तार आहे.आता सूक्ष्मदेहाचा विचार सांगू.

अंतःकर्ण मन बुद्धि चित्त अहंकार । आकाशपंचकाचा विचार । पुढें वायो निरोत्तर । होऊन ऐका ॥ १८ ॥

अंतः:करण,मन,बुद्धि,चित्त व अहंकार हे आकाशपंचक होय,पुढे वायू स्वस्थपणे ऐका.

व्यान समान उदान । प्राण आणी अपान । ऐसे हे पांचहि गुण । वायोतत्वाचे ॥ १९ ॥

व्यान,समान,उदान,प्राण व अपान हे पाच वायु-तत्वांचे भेद आहेत.

श्रोत्र त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । हें पांचहि तेजाचे गुण । आतां आप सावधान । होऊन ऐका ॥ २० ॥

कान(श्रोत्र) तत्वा,डोळे,जीभ व नाक हे पाच तेजाचे गुण आहेत.आता आप (जल) सावधपणाने ऐका.

वाचा पाणी पाद शिस्न गुद । हे आपाचे गुण प्रसिद्ध । आतां पृथ्वी विशद । निरोपिली ॥ २१ ॥

वाचा,(पाणी) हात,पाय,शिस्न व गुद हे आप तत्वाचे प्रसिद्ध गुण आहेत. आता आप (जल) सावधपणे ऐका.

शब्द स्पर्श रूप रस गंध । हे पृथ्वीचे गुण विशद । ऐसे हे पंचवीस तत्वभेद । सूक्ष्म देहाचे ॥ २२ ॥

शब्द,स्पर्श,रूप,रस व गंध हे पाच पृथ्वीचे गुण उघड आहेत.असे हे सूक्ष्म देहाच्या तत्वांचे पंचवीस भेद आहेत.(सूक्ष्म व स्थूळ देहांची तत्वे जी मागील समासात सांगितली आहेत ती नीट समजून घ्यावी,शोधून विवरावी व मोकळे व्हावे.)

**(विश्र्वाच्या आयुष्याच्या तुलनेत माणसाचे आयुष्य क्षणभरच म्हणून आयुष्यभर ध्यान कर तरच मुक्ति मिळेल.)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवाअदे तनुचतुष्टयेनाम समास नववा ॥**

**समास दहावा : टोणपसिद्धलक्षण॥ श्रीराम ॥**

(जम्बुव्दिपादि सप्तव्दीपे,मिळून पृथ्वी,पृथ्वीला (दुधाचा) क्षीर समुद्र,तसेच सुरा,वृत्त,दधि,इक्षु,क्षार( खाऱ्या पाण्याचा) व शुद्ध जल अशा सप्त समुद्राची आवरणे आहेत त्यामध्ये)

आवर्णोदकीं हटकेश्वर । त्यास घडे नमस्कार । महिमा अत्यंतचि थोर । तया पाताळलिंगाचा ॥ १ ॥

आवरणोदकांत हाटकेश्र्वर (नावाचे शंकराचे पाताळलिंग) आहे त्यास येथूनच नमस्कार केला म्हणजे पोचतो त्या पाताळलिंगाचा महिमा अतिशय मोठा असल्यामुळे फार पुण्य लागते.

परंतु तेथें जाववेना । शरीरें दर्शन घडेना । विवेकें आणावें अनुमाना । तया ईश्वरासी ॥ २ ॥

पण तेथे शरीराने जाता येत नाही व प्रत्यक्ष दर्शन घेता येत नाही म्हणून विवेकाच्या योगाने त्या ईश्वराच्या स्वरूपाचा तर्क करावा.

सातां समुद्रांचे वेडे । उदंड भूमि पैलिकडे । सेवटीं तुटले कडे । भूमंडळाचे ॥ ३ ॥

ह्या पृथ्वीच्या भोवती सात समुद्रांचे वेढे (आवरणे) असून त्याच्या पलीकडे ही अफाट भूमि आहे आणि त्या भूमीच्या शेवटी भूमंडळाचे कडे तुटलेले आहेत.

सात समुद्र वोलांडावे । तेथें जाणें कैसें फावे । म्हणोन विवेकी असावे । साधुजन ॥ ४ ॥

(फावे - जमेल)

सात समुद्र ओलांडून त्या हाटकेश्र्वराला जाणे कसे शक्य आहे? म्हणून विवेकी सत्पुरुषांची संगति धरावी (साधू पुरुषांनी विवेकाने वागावे / निर्णय घ्यावा)

जें आपणास नव्हे ठावें । तें जाणतयास पुसावें । मनोवेगें तनें फिरावें । हें तों घडेना ॥ ५ ॥

जे आपणाला ठाऊक नाही ते आपण जाणत्याला विचारावे.मनाच्या वेगाने तर (देहासकट) स्थूळ देहाला फिरता येत नाही.

जें चर्मदृष्टीस नव्हे ठावें । तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । ब्रह्मांड विवरोन राहावें । समाधानें ॥ ६ ॥

(म्हणून बसल्याजागीच ब्रह्मांड ध्यानी आणून समाधानाने राहावे कां की) जे चर्मचक्षुला दिसत नाही ते ज्ञानचक्षुनेच पाहिले पाहिजे,ह्याप्रकारे सर्व ब्रह्मांडाचे विवरण करून समाधानाने बसल्या ठिकाणीच असावे.

मध्यें आहे भूमीचें चडळ । म्हणौन आकाश आणि पाताळ । तें चडळ नस्तां अंतराळ । चहुंकडे ॥ ७ ॥

(चडळ - पडदा)

हा भूमीचा पडदा ( चडळ,तुकडा) मध्ये आहे म्हणून वर आकाश आणि खाली पाताळ असा भेद होतो.हा पडदा मध्ये नाही अशी कल्पना केली तर सर्वत्र एक (अंतराळ) आकाशच भरलेले आहे.

तयास परब्रह्म म्हणावें । जें उपाधीवेगळें स्वभावें । जेथें दृश्यमायेच्या नांवें । सुन्याकार ॥ ८ ॥

(ते आकाशच-त्याची उपाधि दूर करून पाहिले म्हणजे परब्रह्म होय.दृश्य सृष्टीचा तेथे काही एक लाग नाही)असे जे सर्व उपाधीहून सहजच वेगळे आकाश तेच परब्रह्म होय.दृश्य मायेच्या त्याठिकाणी संपूर्ण लय होतो.(तिचे नावसुद्धा उरत नाही.)

दृष्टीचें देखणें दृश्य । मनाचें देखणें भास । मनातीत निराभास । विवेकें जाणावें ॥ ९ ॥

दृष्टीने पाहावे ते दृश्य व मनाने पाहावे तो भास ते परब्रह्म मनाच्या पलीकडे व भासरहित असून,त्याला विवेकाने जाणावे.(ते परब्रह्म दृश्यभासातीत आहे-इंद्रिये व मन ह्याहून ते पलीकडे आहे.

दृश्य भास अवघा विघडे । विवेक तेथें पवाडे । भूमंडळीं ज्ञाते थोडे । सूक्ष्मदृष्टीचे ॥ १० ॥

दृश्य व भास ह्यांचा जेथे लाग लागत नाही तेथे विवेक (पवाडे) प्रवेश करतो (दृश्यभासात्मक साधनांनी जे काम करता येत नाही ते विवेकाने करता येते.) पण अशा सूक्ष्म दृष्टीने ज्ञानी फार थोडे-विरळाच असतात.

वाच्यांश वाचेनें बोलावा । न बोलतां लक्ष्यांश जाणावा । निर्गुण अनुभवास आणावा । गुणाचेनयोगें ॥११॥

वाच्यांश आहे तो वाचेने बोलता येतो (आणि त्या वाच्यांशाच्या आधाराने) पण न बोलता लक्षांश जाणून घ्यावा लागतो.त्याप्रमाणे सगुणाच्या (मूळमायेच्या) आधाराने निर्गुणाचा अनुभव घ्यावा लागतो.

नाना गुणास आहे नाश । निर्गुण तें अविनाश । ढोबळ्याहून विशेष । सूक्ष्म देखणें ॥ १२ ॥

( ढोबळ्याहून -स्थूलापेक्षा)

अनेक गुणांचा नाश होतो पण निर्गुण अविनाशी आहे,स्थूळापेक्षा सूक्ष्मदृष्टीने पाहाणे विशेष आहे.

जें दृष्टीस न पडे ठावें । तें ऐकोन जाणावें । श्रवणमननें पडे ठावें । सकळ कांहीं ॥ १३ ॥

जे स्थूळदृष्टीला माहीत पडत नाही,ते ऐकून जाणून घ्यावे लागते.श्रवण-मननाच्या योगाने सर्व काही माहित होते.(जे चर्मचक्षूंना दिसत नाही ते श्रवण मननाने जाणावे.)

अष्टधेचे जिनस नाना । उदंड पाहातां कळेना । अवघें सगट पिटावेना । कोणियेकें ॥ १४ ॥

अष्टधा प्रकृतीचे अनेक पदार्थ झाले आहेत ते असंख्य पदार्थ पाहू लागले तर कळत नाहीत परंतु कोणीही त्या सर्वांना सारखे (सगट) मानू नये.(अष्टधा प्रकृतीपासून ही नाना जिनसीसृष्टि झाली पण ही सारी पाहणार कशी?पण सारे जिन्नस सारखे समजू नयेत)

सगट सारिखी स्थिती जाली । तेथें परीक्षाच बुडाली । चविनटानें कालविलीं । नाना अन्नें ॥ १५ ॥

(चविनट - तोंडाला चव नसलेला,नटखट)

जेथे सर्व सारखेच मानले जातात तेथे परीक्षाच नाहीशी झाली ज्याच्या तोंडाला चव नाही तो साऱ्या अन्नाचा-पदार्थांचा काला करतो.(सारे सारखे सपाट समजणे हे परीक्षावंतांचे काम नाही ज्याच्या जिभेला चव नाही तो साऱ्या अन्नाचा पदार्थांचा काला करतो.)

टोणपा नव्हे गुणग्राहिक । मूर्खास कळेना विवेक । विवेक आणि अविवेक । येकचि म्हणती ॥ १६ ॥

जो मूर्ख टोणपा आहे,त्याला विवेक (वर्म) समजत नाही,गुण घेता येत नाही (त्याला विवेकाने सार वेगळे निवडावे हे समजत नाही) विवेकी आणि अविवेकी हे दोन्ही तो एकच समजतो.

उंच नीच कळेना ज्याला । तेथें अभासचि बुडाला । नाना अभ्यासें प्राणियाला । सुटिका कैंची॥ १७ ॥

ज्याला उंच नीच (सार असार) कळत नाही (हे अभ्यास नसल्याचे लक्षण होय.) त्याचा अभ्यासच नाहीसा झाला,बहुधा ज्ञानाच्या अभ्यासाने (एकास अभ्यास न करील तर ) प्राण्याची सुटका कशी होणार?(--प्राण्याला सुटकेचा मार्ग कोठून सापडेल?)

वेड लागोन जालें वोंगळ । त्यास सारिखेंच वाटे सकळ । तें जाणावें बाश्कळ । विवेकी नव्हेती ॥ १८ ॥

(जे वेडांत सारे सकट काला करितात ते बाष्कळ होत,विवेकी नव्हेत.) वेड लागल्यामुळे जो घाणेरडेपणाने वागतो त्याला विवेक नाही.

ज्यास अखंड होतो नाश । त्यासीच म्हणती अविनाश । बहुचकीच्या लोकांस । काये म्हणावें ॥ १९ ॥

ज्याचा नित्य नाश होत आहे त्यालाच अविनाशी म्हणतात.अशा एकंकार करणाऱ्या (सर्वब्रह्मवादी) बोह्चक (फाजील,गोंधळी,सारासारशून्य) लोकांस काय म्हणावे?

ईश्वरें नाना भेद केले । भेदें सकळ सृष्टी चाले । आंधळे परीक्षवंत मिळाले । तेथें परीक्षा कैंची ॥ २० ॥

ईश्वराने नाना भेद केले आहेत सर्व सृष्टि भेदामुळे चालली आहे पण परीक्षक जर आंधळे (विवेकहीन) मिळाले तर (सृष्टि कशी चालली आहे ह्याची) परीक्षा कशी होणार?(पण परीक्षक आंधळे मिळाले तर काय उपयोग?)

जेथें परीक्षेचा अभाव । तो टोणपा समुदाव । गुणचि नाहीं गौरव । येईल कैंचें ॥ २१ ॥

जेथे परीक्षा (सारासारविवेक) नाही अशा टोणप्यांचा-मुर्खांचा समुदाय मिळाला तर त्याजपाशी गुण कोठून सापडायचे व गुणावाचून गौरव कसा व्हावयाचा तो मूर्खाचा समुदाय-होय.त्याठिकाणी गुण नसतात.आणि गुणापासून गौरव कसा व्हावा?

खरें खोटें येकचि जालें । विवेकानें काय केलें । असार सांडून सार घेतलें । साधुजनीं ॥ २२ ॥

टोणपे खरे खोटे एकच करू लागले तर मग तो विवेक कसचा?(तेथे विवेक कोणता असणार?) म्हणून संत-सत्पुरुष असार टाकून सार तेवढे घेतात.

उत्तम वस्तूचि परीक्षा । कैसी घडे नतद्रक्षा । दीक्षाहीनापासीं दीक्षा । येईल कैंची ॥ २३ ॥

(नतद्रष्टा) करंट्याला उत्तम वस्तूंची पारख कशी होईल? दीक्षा-हीनापासून (संप्रदाय परंपरेचा उपदेश) दीक्षा कशी मिळेल?

आपलेन वोंगळपणें । दिशाकरून शौच्य नेणे । वेद शास्त्रें पुराणें । त्यास काये करिती ॥ २४ ॥

स्वतःच्या घाणेरड्या सवयीमुळे बहिर्दिशेला जाऊन शरीर स्वच्छ करण्याचे ज्याला माहित नाही असला जो गावंढळ त्याच्यापुढे वेद्शास्त्रे पुराणे काय करतील?

आधीं राखावा आचार । मग पाहावा विचार। आचारविचारें पैलपार । पाविजेतो ॥ २५॥

म्हणून आधी आचार सांभाळला व मग निर्मळ होऊन विचार पाहावा आचार व विचार ह्या दोहोंच्या साह्याने भवसमुद्राचे पैलतीर गाठावे (आचार व विचार दोन्ही असतील तरच पैलतीर गाठता येईल!)

जे नेमकास न कळे । तें बश्कळास केवी कळे । डोळस ठकती आंधळे । कोण्या कामाचे ॥ २६ ॥

जे नियमाने चालणाऱ्यास (नेमके) कळत नाही (जे कळणे दुर्घट) ते बाष्कळाला (अनियमित-नियमबाह्य वागणा-यास) कसे कळणार? जेथे डोळस फसतात तेथे आंधळे काय कामाचे?

पापपुण्य स्वर्ग नर्क । अवघेंच मानिलें येक । विवेक आणी अविवेक । काये मानावें ॥ २७ ॥

पुण्यपाप,स्वर्गनरक,विवेक अविवेक हे सगळे काय एकच मानावे? (हे एक कसे होतील?)

अमृत विष येक म्हणती । परी विष घेतां प्राण जाती । कुकर्मे होते फजिती । सत्कर्मे कीर्ति वाढे ॥ २८ ॥

अमृत आणि विष एकच म्हणतात पण विष घेतल्याने प्राण जातात हे स्पष्ट आहे (तसेच कुकर्म व सत्कर्म एकच समजतात.) पण दुष्कर्मामुळे फजिती होते व सत्कर्मामुळे किर्ती वाढते.

इहलोक आणि परलोक । जेथें नाहीं साकल्प विवेक । तेथें अवघेच निरार्थक । सकळ कांहीं ॥ २९ ॥

तात्पर्य इहलोक व परलोक ह्या दोघांचाही जे परिपूर्ण विचार करीत नाहीत त्यांचे सर्व काही करणे निरर्थक होय.(इहलोक व परलोक ह्या दोघांमध्ये विवेक नसेल तर सारे व्यर्थ होय.)

म्हणौन संतसंगेंचि जावें । सत्शास्त्रचि श्रवण करावें । उत्तम गुणास अभासावें । नाना प्रयेत्ने ॥ ३० ॥

म्हणून संग धरणे तो संतांचाच धरावा (सत्संग धरावा) ऐकवायचे ते सच्छास्त्रच ऐकावे अनेक प्रयत्न करून उत्तम गुणांचा अभ्यास करावा.

**( समर्थ साधकास सांगतात की अहंकार सोडून दे व जे नाशवंत हे ते सारे टाकून दे )**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे टोणपसिद्धलक्षणनाम समास दहावा ॥ ॥ दशक सतरावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक अठरावा - बहुजिनसी



**॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक अठरावा : बहुजिनसी समास पहिला : बहुदेवस्थाननाम॥ श्रीरामसमर्थ ॥**

(बुद्धिदाता गजानन व परादि-वाचांना स्फूर्ति देणारी शारदा ह्यांना वंदन करून ह्या समासात अनेक उपास्य देवतांचे धन्यवाद गाईले आहेत.)

तुज नमूं गजवदना । तुझा महिमा कळेना । विद्या बुद्धि देसी जना । लाहानथोरांसी ॥ १ ॥

हे गजानना,तुला नमस्कार असो तुझा महिमा कळत नाही लहानथोर लोकांना तूच विद्या व बुद्धि देतोस.

तुज नमूं सरस्वती । च्यारी वाचा तुझेन स्फूर्ती । तुझें निजरूप जाणती । ऐसे थोडे ॥ २ ॥

हे सरस्वती तुला नमस्कार असो तू चारी वाणींना स्फूर्ति देतेस तुझे आत्मस्वरूप जाणणारे फार थोडे आहेत.

धन्य धन्य चतुरानना । तां केली सृष्टीरचना । वेद शास्त्रें भेद नाना । प्रगट केले ॥ ३ ॥

(चतुरानना - ब्रह्मदेव , तां - तू )

ब्रह्मदेवा तुझी धन्य असो तू सृष्टिरचना करून वेद शास्त्रे तसेच अनेक भेद प्रकट केलेस (धन्य तो चतुर्मुख ब्रह्मा ज्याने सृष्टिरचना केली व भिन्नप्रकारे वेदशास्त्रे प्रकट केली)

धन्य विष्णु पाळण करिसी । येकांशें सकळ जीवांसी । वाढविसी वर्तविसी । जाणजाणों ॥ ४ ॥

हे विष्णु तुझी धन्य होय तू आपल्या एका अंशाने व जाणीवरूपाने सर्व जीवांचे पालन करतोस त्यांना वाढवितोस,वर्तवितोस (एकांषांने जगताचे पालन करणारा व जाणीव रूपाने सर्व जीवाना वाढविणारा विष्णु धन्य होय.)

धन्य धन्य भोळाशंकर । जयाच्या देण्यास नाहीं पार । रामनाम निरंतर । जपत आहे ॥ ५ ॥

ज्याचे देणे अपरंपार (वदान्यवर) व जो रामनाम अखंड जपतो,तो भोळा शंकर धन्य होय.

धन्य धन्य इंद्रदेव । सकळ देवांचाहि देव । इंद्रलोकींचें वैभव । काये म्हणौनि सांगावें ॥ ६ ॥

सर्व देवांचा देव असा इंद्र धन्य होय,इंद्रलोकीचे वैभव किती सांगावे?

धन्य धन्य येमधर्म । सकळ जाणती धर्माधर्म । प्राणीमात्राचें वर्म । ठाईं पाडिती ॥ ७ ॥

यमधर्म धन्य होत.ते सर्व धर्माधर्म यथार्थ जाणतात आणि प्राणिमात्रांचे गुप्त रहस्य जाणून घेतात.(प्राणिमात्राचे वर्म प्रकट करितात.)

वेंकटेंसीं महिमा किती । भले उभ्यां अन्न खाती । वडे धिरडीं स्वाद घेती । आतळस अपालांचा ॥ ८ ॥

(आतळस - परिमळ,स्वादिष्टपक्वान, अपाल - घारगे इ.पक्वान्न विशेष))

व्यंकटेशाच्या गिरीचा महिमा किती सांगावा! चांगले चांगले लोक उभ्यानेच अन्न खातात वडे धिरडी किवा तळलेले पदार्थ ह्यावर उभ्यानेच ताव मारतात.(गिरीवर मोठमोठे लोक उभ्यानेच प्रसाद भक्षण करितात,वड्याधिरड्यांचा स्वाद घेतात व सर्वत्र घमघमाट व परिमळ पसरणाऱ्या अतसळ अशा स्वादिष्ट पक्वान्नाचे-आपालांचे-सेवन करितात तो व्यंकटेश धन्य होय.)

धन्य तूं वो बनशंकरी । उदंड शाखांचिया हारी । विवरविवरों भोजन करी । ऐसा कैंचा ॥ ९ ॥

बनशंकरी तुझी धन्य असो.असंख्य भाजांच्या रांगांचे विवरण करून भोजन करणारा असा कोण आहे?(शाकाहारी वंनशंकरी धन्य होय.)

धन्य भीम गोलांगुळा । कोरवड्यांच्या उदंड माळा । दहि वडे खातां सकळां । समाधान होये ॥ १० ॥

(गोलांगुळा - बलदंड, कोरवडे - मेदूवडे))

बलभीमा कपिराया,तुझी धन्य असो.कोरड्या वडांच्या माळा तुझ्या गळ्यात पुष्कळ आहेत.तुझा दहीवड्याचा प्रसाद खाल्याने सर्वांना समाधान होते.( कोरड्यावड्याच्या-उडदाच्या पिठाचे वडे करतात.त्यांच्या माळा

गळ्यात घालणारा व दहिवड्यांचा प्रसाद सेवकांस देणारा वानर-गो-लांगुल-गाईच्या सारखे शेपूट असणारा मारुति धन्य होय.)

धन्य तूं खंडेराया । भंडारें होये पिंवळी काया । कांदेभरीत रोटगे खाया । सिद्ध होती ॥ ११ ॥

अगा (पालीच्या किंवा जेजुरीच्या) खंडेराया,तुझी धन्य असो तुझ्या भंडाऱ्याने भक्तांचे देह पिवळे होतात आणि कांदे भरीत व रोडगे तुझे भक्तगण मोठ्या आनंदाने खातात.

धन्य तुळजाभोवानी । भक्तां प्रसन्न होते जनीं । गुणवैभवास गणी । ऐसा कैंचा ॥ १२ ॥

लोकांमध्ये भक्तांवर प्रसन्न होणारी तुळजाभवानी धन्य होय.तिच्या गुणांची व वैभवाची गणती करणारा कोण आहे?(अमर्याद गुणवैभव भोगणारी व भक्तांना देणारी तुळजा भवानी धन्य होय.)

धन्य धन्य पांडुरंग । अखंड कथेचा होतो धिंग । तानमानें रागरंग । नाना प्रकारीं ॥ १३ ॥

(धिंग - गदारोळ)

पांडुरंगा तुझी धन्य असो.तुझ्याजवळ तानमान,रागरंग इत्यादिंकांसह हरिकथेचा गजर अखंड चाललेला असतो.(धन्य तो पंढरपूर निवासी पांडूरंग की ज्याच्यापाशी नाना प्रकारच्या तानमान वाद्यांसह हरिकथेचा रंग अखंड भरून राहिलेला असतो.)

धन्य तूं गा क्षत्रपाळा । उदंड जना लाविला चाळा । भावें भक्ति करितां फळा । वेळ नाहीं ॥ १४ ॥

अगा क्षेत्रपाळा भैरवा,तुझी धन्य असो (तुझी सेवा चुकल्याबद्दल) अनेक लोकांना वेड लावले आहेस आणि सद्भावाने तुझी कोणी भक्ति केली तर त्याला चांगले फळ द्यावयाला तुला वेळ लागत नाही (क्षेत्रपाळ भैरव हा अनेकांना आपल्या भजनी लावणारा आहे.)

रामकृष्णादिक अवतार । त्यांचा महिमा अपार । उपासनेस बहुत नर । तत्पर जाले ॥ १५ ॥

रामकृष्णादिक अवतार झाले त्याचा महिमा अपार आहे.त्याच्या उपासनेमध्ये अनेक लोक मग्न झालेले आहेत.

सकळ देवांचे मूळ । तो हा अंतरात्माचि केवळ । भूमंडळीं भोग सकळ । त्यासीच घडे ॥ १६ ॥

ह्या सर्व उपास्य देवांचे मूळ म्हंटले म्हणजे हा एक अंतरात्माच आहे.जगातले सगळे भोग त्यालाच पोहोचतात.(भरत खंडात अशा नाना उपासना चालू आहेत,पण ह्या सर्व उपास्यांचा मूळपुरुष अंतरात्माच असून पूजादि सर्व भोग त्यालाच पावतात.)

नाना देव होऊन बैसला । नाना शक्तिरूपें जाला । भोक्ता सकळ वैभवाला । तोचि येक ॥ १७ ॥

अनेक देव होऊन तो बसला आहे,अनेक शक्तिची रूपे त्याचीच आहेत (सर्व देव व त्यांच्या शक्ति ह्यांना मूळ अधिष्ठान अंतरात्मा आहे.व सर्व वैभवाचा भोक्ता तो एकच आहे.

याचा पाहावा विचार । उदंड लांबला जोजार । होती जाती देव नर । किती म्हणोनी ॥ १८ ॥

ह्याचा विचार करू लागले तर विस्तार खूपच होईल.माणसे आणि देव किती होतात व जातात के किती सांगावे?(देव व भक्त पुष्कळ झाले व आहेत त्यांचा विस्तार कोठवर करावा?)

कीर्ति आणि अपकीर्ति । उदंड निंदा उदंड स्तुती । सर्वत्रांची भोगप्राप्ती । अंतरात्म्यासीच घडे ॥ १९ ॥

किर्ती व अपकिर्ती,उदंड,निंदा आणि स्तुति इत्यादि सर्व भोगांची प्राप्ती त्या अंतरात्म्यालाच घडते.

कोण देहीं काये करितो । कोण देहीं काये भोगितो । भोगी त्यागी वीतरागी तो । येकचि आत्मा ॥ २० ॥

तो कोणत्या देहात काही करीत असतो,कोणत्या देहात काही भोगत असतो,भोगी व त्यागी विरागी सर्व काही तो एकच अंतरात्मा आहे.)

प्राणी साभिमानें भुलले । देहयाकडे पाहात गेले । मुख्य अंतरात्म्यास चुकलें । अंतरीं असोनी ॥ २१ ॥

प्राणी अभिमानाला भुलून देहाकडेच पाहात गेले (देहबुद्धि धरून बसले) आणि मुख्य चालक अंतरात्मा अंतःकरणात असून तो सापडत नाही (प्राणी देहाकडे पाहतात व देहाभिमानी होतात.पण मुख्य चालक देव अंतरात्मा अंतरी असून त्याला विसरतात हे नवल आहे.)

आरे या आत्मयाची चळवळ पाहे ।ऐसा भूमंडळीं कोण आहे ।अगाध पुण्यें अनुसंधान राहे ।कांहींयेक॥२२॥

अरे,ह्या अंतरात्म्याची सर्व चळवळ पाहणारा असा जगात कोण आहे? अगाध पुण्यपदरी असेल तरच त्याचे काहीसे अनुसंधान राहते.

त्या अनुसंधानासरिसें । जळोनी जाईजे किल्मिषें । अंतरनिष्ठ ज्ञानी ऐसे । विवरोन पाहाती ॥ २३ ॥

पण तेवढ्याच अनुसंधानाने सर्व पाप जळून जाते,म्हणून अंतर्निष्ठ ज्ञानी त्या अंतरात्म्याचे विवरण करीत असतात.(हे आत्मानुसंधान सर्व पापांचा नाश करिते, अंतर्निष्ठ ज्ञानी पुरुष त्यालाच विवरुन पाहतात.)

अंतरनिष्ठ तितुके तरले । अंतरभ्रष्ट तितुके बुडाले । बाहयात्कारें भरंगळले । लोकाचारें ॥ २४ ॥

(अंतरभ्रष्ट - बहिर्मुख,अस्वस्थ चित्ताचे)

अंतर्निष्ठ तेवढे तरतात व अंतर्भ्रष्ट (बहिर्मुख) बाहय लोकाचाराने भरकटत जाऊन बुडतात (बाहयलोकोपचारातच गुरफटून वाहतात.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बहुदेवस्थाननिरूपणनाम समास पहिला ॥**

## समास दुसरा : सर्वज्ञसंगनिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥

नेणपणें जालें तें जालें । जालें तें होऊन गेलें । जाणतेपणें वर्तलें । पाहिजे नेमस्त ॥ १ ॥

नेणतेपणाने आजवर झाले ते झाले,ते आता होऊन चुकले,ह्यापुढे तरी शहाणपणाने नियमित वागले पाहिजे (जाणतेपणाने शिस्तवार वागण्याचा निश्र्चय करा.)

जाणत्याची संगती धरावी । जाणत्याची सेवा करावी । जाणत्याची सद्बुद्धि घ्यावी । हळुहळु ॥ २ ॥

(जाणत्याची संगति धरली म्हणजे जाणतेपणाचे सर्व गुण अनायासे प्राप्त होतात.) जाणत्याची संगति धरून त्याची सेवा करावी,जाणत्याची सद्बुद्धि हळूहळू शिकावी.

जाणत्यापासीं लेहों सिकावें । जाणत्यापासीं वाचूं सिकावें । जाणत्यापासीं पुसावें । सकळ कांहीं ॥ ३ ॥

लिहिणे वाचणे जाणत्याजवळ शिकावे सर्व काही जाणत्याला विचारावे (व शंका समाधान करून घ्यावे.)

जाणत्यास करावा उपकार । जाणत्यास झिजवावें शरीर । जाणत्याचा पाहावा विचार । कैसा आहे ॥ ४ ॥

जाणत्यावर उपकार करावा,जाणत्यासाठी शरीर झिजवावे व जाणत्याचे विचार कसे असतात ते पाहावे.

जाणत्याचे संगतीनें भजावें । जाणत्याचे संगतीनें झिजावें । जाणत्याचे संगतीनें रिझावें ।विवरविवरों ॥५ ॥

भजन करणे,झिज सोसणे अथवा विवरण करून मनाचा संतोष करणे हे सर्व जाणत्याच्या संगतीने करावे.

जाणत्याचे गावें गाणें । जाणत्यापासीं वाजवणें । नाना आलाप सिकणें । जाणत्यापासीं ॥ ६ ॥

गाणे वाजविणे,अनेक आलाप शिकणे ते जाणत्यापाशी शिकावे.(जाणत्याच्या संगतीत कष्ट करायला व आनंदाने वर्तायला-वागण्याला-शिकावे.)

जाणत्याचे कासेसी लागावें । जाणत्याचें औषध घ्यावीं । जाणतां सांगेल तें करावें । पथ्य आधीं ॥ ७ ॥

(कासेसी लागावें - संगत धरावी)

जाणत्याची कास धरावी,जाणत्याचे औषध घ्यावे आणि तो सांगेल ते पथ्य अगोदर करावे.

जाणत्यापासीं परीक्षा सिकणें । जाणत्यापासीं तालिम करणें । जाणत्यापासीं पोहणें । अभ्यासावें ॥ ८ ॥

अनेक पदार्थांची व गोष्टींची पारख कशी करावी ते शिकणे,तालीम करणे,पोहोणे ह्याचा अभ्यास जाणत्याजवळ करावा.

जाणता बोलेले तैसें बोलावें । जाणता सांगेल तैसें चालावें । जाणत्याचें ध्यान घ्यावें । नाना प्रकारीं ॥ ९ ॥

जाणता बोलेल ते बोलावे,तो सांगेल तसे वागावे व जाणता जसे ध्यान करतो तसे ध्यान अनेक प्रकारांनी साध्य करावे.

जाणत्याच्या कथा सिकाव्या । जाणत्याच्या युक्ति समजाव्या । जाणत्याच्या गोष्टी विवराव्या । सकळ कांहीं ॥ १० ॥

जाणत्याच्या कथा शिकाव्या,जाणत्याच्या युक्त्या समजून घ्याव्या,जाणत्याच्या सर्व गोष्टींचे विवरण करावे.(त्याच्या कथा गोष्टी,युक्ति,बोलणे,चालणे सर्व शिकावे.)

जाणत्याचे पेंच जाणावे । जाणत्याचे पीळ उकलावे । जाणता राखेल तैसे राखावे । लोक राजी ॥ ११ ॥

जाणत्याचे पीळपेच कसे असतात व तो दुसऱ्याचे कसे उकलतो हे जाणून घ्यावे आणि तो लोकांना राजी कसे राखतो तसे आपण राखावे.

जाणत्याचे जाणावे प्रसंग । जाणत्याचे घ्यावे रंग । जाणत्याचे स्फूर्तीचे तरंग । अभ्यासावे ॥ १२ ॥

जाणत्याचे बरेवाईट प्रसंग समजून घ्यावे,त्याचे (धोरण) रंग घ्यावे आणि त्याच्या स्फूर्तीचे तरंग कसे उठतात त्याचा अभ्यास करावा.

जाणत्याचा साक्षेप घ्यावा । जाणत्याचा तर्क जाणावा । जाणत्याचा उल्लेख समजावा ।न बोलतांचि ॥१३॥

जाणत्याचा उद्योगीपणा घ्यावा,जाणत्याचा तर्क समजून घ्यावा आणि त्याचा अभिप्राय न बोलताच उमजावा.

जाणत्याचें धूर्तपण । जाणत्याचें राजकारण । जाणत्याचें निरूपण । ऐकत जावें ॥ १४ ॥

धूर्तपण,राजकारण,निरुपण एकणे ते जाणत्याचे ऐकावे.

जाण्त्याची कवित्वें सिकावीं । गद्यें पद्यें वोळखावी । माधुर्यवचनें समजावीं । अंतर्यामीं ॥ १५ ॥

काव्य करावयास शिकणे किवा गद्यपद्याचा अर्थ समजून घेणे,ते जाणत्याच्या ग्रंथावरून शिकावे,त्याची मधुर भाषणे मनांत समजून घ्यावी.

जाणत्याचें पाहावे प्रबंद । जाणत्याचे वचनभेद । जाणत्याचे नाना संवाद । बरे शोधावे ॥ १६ ॥

जाणत्याचे प्रबंध (लेख) पाहावेत,जाणत्याचे बोलण्याचे प्रकार व अनेक संभाषणे (नाना लोकांशी होणारे संवाद) ह्यांचा नीट विचार करावा.

जाणत्याची तीक्षणता । जाणत्याची सहिष्णता । जाणत्याची उदारता । समजोन घ्यावी ॥ १७ ॥

जाणत्याचा कडकपणा,सहनशीलता व उदारता समजून घ्यावी.

जाणत्याची नाना कल्पना । जाणत्याची दीर्घ सूचना । जाणत्याची विवंचना । समजोन घ्यावी ॥ १८ ॥

जाणत्याचा दूरदर्शीपणा (दीर्घसूचना) त्याची विचार करण्याची हातोटी किंवा त्याची कल्पकता समजून घ्यावी.

जाणत्याचा काळ सार्थक । जाणत्याचा अध्यात्मविवेक । जाणत्याचे गुण अनेक । अवघेच घ्यावे ॥ १९ ॥

जाणता आपला काळ कसा सार्थकी लावतो.त्याचा अध्यात्मविवेक कसा असतो असे त्याचे अनेक नव्हे सगळेच गुण घ्यावेत.

जाणत्याचा भक्तिमार्ग । जाणत्याचा वैराग्ययोग । जाणत्याचा अवघा प्रसंग । समजोन घ्यावा ॥ २० ॥

जाणत्याचा भक्तिमार्ग,त्याचा वैराग्ययोग अशा त्याच्या सगळ्या गोष्टी समजून घ्याव्यात.

जाणत्याचें पाहावें ज्ञान । जाणत्याचें सिकावें ध्यान । जाणत्याचें सूक्ष्म चिन्ह । समजोन घावें ॥ २१ ॥

(सूक्ष्म चिन्ह - सूक्ष्म स्वरूप)

जाणत्याचे ज्ञान पाहावे,त्याचे ध्यान शिकावे,त्याचे सूक्ष्म स्वरूप (त्याच्या बारीकसारीक गोष्टी) समजून घ्याव्यात.

जाणत्याचें अलिप्तपण । जाणत्याचें विदेहलक्षण । जाणत्याचें ब्रह्मविवरण । समजोन घ्यावें ॥ २२ ॥

त्यांचे अलिप्तपण,विदेहलक्षण (वैराग्य) व ब्रह्मविवरण समजून घ्यावे.

जाणता येक अंतरात्मा । त्याचा काये सांगावा महिमा । विद्याकळागुणसीमा । कोणें करावी ॥ २३ ॥

जाणता एक अंतरात्मा आहे,त्याचा महिमा किती वर्णन करावा?त्याच्या विद्या कला गुण ह्यांचा थांग कोणी लावावा?

परमेश्वरांचे गुणानुवाद । अखंड करावा संवाद । तेणेंकरितां आनंद । उदंड होतो ॥ २४ ॥

परमेश्वराच्या गुणानुवादाची अखंड चर्चा करावी म्हणजे अपार आनंद होतो.

परमेश्वरें निर्मिलें तें । अखंड दृष्टीस पडतें । विवरविवरों समजावें तें । विवेकी जनीं ॥ २५ ॥

परमेश्वराने जे निर्माण केले आहे ते नित्य दृष्टीस पडत असते.त्याचे पुनःपुन्हा विवरण करून (परमेश्वराचे अलिप्तपण वेगळेपण) विवेकी पुरुषाने समजून घ्यावे.

जितुकें कांहीं निर्माण जालें । तितुकें जगदेश्वरें निर्मिलें । निर्माण वेगळें केलें । पाहिजे आधीं ॥ २६ ॥

जे जे काही उत्पन्न झाले आहे ते ते जगदीश्वराने उत्पन्न केले ते देवापासून अगोदर वेगळे काढले पाहिजे.

तो निर्माण करतो जना । परी पाहों जातां दिसेना । विवेकबळें अनुमाना । आणीत जावे ॥ २७ ॥

तो लोकांना उत्पन्न करतो पण पहावयाला जावे तो दिसत नाही! विवेकाच्या योगाने त्याला ध्यानात आणावे.

त्याचें अखंड लागतां ध्यान । कृपाळुपणें देतो आशन । सर्वकाळ संभाषण । तदांशेंचि करावें ॥ २८ ॥

(आशन - योगक्षेम, तदांशेंचि - त्या सतस्वरुपाचेच आपण अंग आहोत हे जाणून,त्याच भावनेने परमात्म्याशी संवाद साधावा)

त्याचे अखंड ध्यान लागून राहिले म्हणजे कृपाळूपणे तो खायला प्यायला (अशन) देतो (तो सर्व सांभाळतो),सदा सर्वदा संभाषण करणे ते तदंशेचि,म्हणजे भाषण करणारा व ऐकणारा त्याचेच अंश आहेत असे समजून करावे.

ध्यान धरीना तो अभक्त । ध्यान धरील तो भक्त । संसारापासूनी मुक्त । भक्तांस करी ॥ २९ ॥

तो परमात्मा आपल्या भक्तांना संसारापासून मुक्त करतो अशा त्याचे जो ध्यान करीत नाही तो अभक्त होय.व ध्यान करील तो भक्त होय.( तो जगदोद्धार करतो.)

उपासनेचे सेवटीं । देवां भक्तां अखंड भेटी । अवुभवी जाणेल गोष्टी । प्रत्ययाची ॥ ३० ॥

उपासनेच्या शेवटी देवाभक्तांची अखंड (ऐक्य) भेट होते.ही अनुभवाची गोष्ट जो अनुभवी असेल त्याला कळेल.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सर्वज्संगनिरूपणनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : निस्पृहशिकवण॥ श्रीराम ॥**

दुल्लभ शरीरीं दुल्लभ आयुष्य । याचा करूं नये नास । दास म्हणे सावकास । विवेक करावा ॥ १ ॥

रामदास म्हणतात,दूर्लभ आयुष्याच्या नाश करू नका,सावधपणे विचार करा (नरदेह दुर्लभ व त्यांचे आयुष्य दुर्लभ म्हणून त्यांचा नाश करू नये मुख्य विवेक पाहिजे)

न पाहातां उत्तम विवेक । अवघा होतो अविवेक । अविवेकें प्राणी रंक । ऐसा दिसे ॥ २ ॥

विवेक उत्तम प्रकारे न केल्यास सगळा अविवेकी माजतो व त्यायोगे प्राणी भिकाऱ्यासारखा दिसतो.(विवेकावाचून प्राणी दैन्यवाणा होय.)

हें आपलें आपण केलें । आळसें उदास नागविलें । वाईट संगतीनें बुडविलें । देखत देखतां ॥ ३ ॥

हे नुकसान आपले आपण करून घेतले आहे,आळसाने व उदासपणाने नागवणूक होते,पाहता पाहता वाईट संगत बुडविते.(आळसाने व कुसंगतीने आपला आपण नाश करून घेतो.)

मूर्खपणाचा अभ्यास जाला । बाष्कळपणें घातला घाला । काम चांडाळा उठिला । तरुणपणीं ॥ ४ ॥

(मूर्खपणाचा अभ्यास जाला - सतत मूर्खपणे वागण्याची सवय झाली)

मूर्खपणाचा अभ्यास झाला,त्यात बाष्कळपणाने हल्ला चढविला आणि तशात कामरूपी चांडाळाने उठावणी केली.मूर्खपणाचा अभ्यास,बाष्कळपणाची वागणूक,अविवेकी तरुणपणा ह्यांचा परिणाम दैन्यात होतो.)

मूर्ख आळसी आणि तरुणा । सर्वांविषीं दैन्यवाणा । कांहीं मिळेना कोणा । काये म्हणावें ॥ ५ ॥

चांगला तरणाताठा पण मूर्ख व आळशी असल्यामुळे सर्वच गोष्टीविषयी त्याला दैन्य भोगावे लागते.त्याच्या हातून कोणाला काही मिळत नाही ह्याला काय म्हणावे?

जें जें पाहिजे तें तें नाहीं । अन्नवस्त्र तेंहि नाहीं । उत्तम गुण कांहींच नाहीं । अंतर्यामीं ॥ ६ ॥

अगदी जरुरीच्या गोष्टी त्याला मिळत नाहीत फार काय,अन्नवस्त्र सुद्धा नसते.अंतःकरणात एकही उत्तम गुण नसतो.

बोलतां येना बैसतां येना । प्रसंग कांहींच कळेना । शरीर मन हें वळेना । अभ्यासाकडे ॥ ७ ॥

नीट बोलता येत नाही,बसता येत नाही,वेळप्रसंग काही समजत नाही (प्रसंगवेळ तर्कत नाही) अभ्यासाकडे शरीर व मन वळत नाही.

लिहिणें नाहीं वाचणें नाहीं । पुसणें नाहीं सांगणें नाहीं । नेमस्तपणाचा अभ्यास नाहीं । बाष्कळपणें ॥ ८ ॥

लिहिणे-वाचणे किवा पुसणे सांगणे काही नाही,नियामितपणाचा अभ्यास नाही,सगळा बाष्कळपणा भरलेला (सारेच वागणे बाष्कळपणाचे आहे.)

आपणांस कांहींच येना । आणी सिकविलेंहि मानेना । आपण वेडा आणि सज्जना । बोल ठेवी ॥ ९ ॥

स्वतःला काही येत नाही व कोणी शिकवले तर ऐकत नाही स्वतः वेडा आणि सत्पुरुषांना बोल लावतो.

अंतरी येक बाहेरी येक । ऐसा जयाचा विवेक । परलोकाचें सार्थक । कैसें घडे ॥ १० ॥

आत एक बाहेर एक (विचार) असा जो वागतो (असा ज्याचा विवेक) त्याला परलोकीचे सार्थक कसे घडावे?

आपला संसार नासला । मनामधें प्रस्तावला । तरी मग अभ्यास केला । पाहिजे विवेकाचा ॥ ११ ॥

असो,आपल्या संसाराचा नाश झाल्याने मनामध्ये पश्र्चाताप उत्तम झाला तर विवेकाने अभ्यास केला पाहिजे.

येकाग्र करूनिया मन । बळेंचि धरावें साधन । येत्नीं आळसाचें दर्शन । होऊंच नये ॥ १२ ॥

मन एकाग्र करून साधनांचा मार्ग (प्रथम लक्ष लागत नसेल तर हट्टाने) धरावा.यत्न करीत असता आळस अगदी डोळ्यांपुढे येऊ देऊ नये.

अवगुण अवघेचि सांडावे । उत्तम गुण अभ्यासावे । प्रबंद पाठ करीत जावें । जाड अर्थ ॥ १३ ॥

सगळेच दुर्गुण टाकून द्यावे,गुणांचा अभ्यास करावा,गहन अर्थाचे प्रबंध पाठ करीत जावे.(प्रबंध पाठ करावे,जाड-खोल,गहन-अर्थांचे मनन करावे.)

पदप्रबंद श्लोकप्रबंद । नाना धाटी मुद्रा छंद । प्रसंगज्ञानेंचि आनंद । होत आहे ॥ १४ ॥

अनेक लक्षणांची व अनेक छंदांची पदबद्ध व श्र्लोकबद्ध काव्ये पाठ करावीत त्यातील प्रसंग समजून घेतल्याने (प्रसंगास योग्य असे पद्य म्हंटल्याने) चित्ताला आनंद होत असतो.

कोणे प्रसंगीं काये म्हणावें । ऐसें समजोन जाणावें । उगेंचि वाउगें सिणावें । कासयासी ॥ १५ ॥

कोणत्या (प्रसंगाचे ज्ञान झाल्याने ) प्रसंगी काय म्हणावे हे समजून घेतलेले बरे (हे तारतम्य ठेवावे.) उगीच का व्यर्थ श्रम करावे? (उगाच शिणू नये.)

दुसर्याचें अंतर जाणावें । आदर देखोन म्हणावें । जें आठवेल तें गावें । हें मूर्खपण ॥ १६ ॥

दुसऱ्याचे अंतःकरण (आपण म्हणत असलेल्या पद्याविषयी दुसऱ्याची आवड) जाणून घ्यावी व त्याचा त्याच्याविषयी आदर दिसला तरच म्हणावे.(दुसऱ्याचे अंतकरण जाणावे व श्रवणाचा आदर दिसला तरच म्हणावे.) आठवेल तेच गात सुटणे मूर्खपणाचे आहे.

जयाची जैसी उपासना । तेंचि गावें चुकावेना । रागज्ञाना ताळज्ञाना । अभ्यासावें ॥ १७ ॥

ज्याला जी उपासना आवडत असेल,त्यास उपासनेचे गुणानुवाद त्यापूढे गावे ह्यात चुकू नये.राग ताल ह्यांचा अभ्यास करावा.

साहित संगीत प्रसंग मानें । करावीं कथेंचीं घमशानें । अर्थांतर श्रवणमननें । काढीत जावें ॥ १८ ॥

(घमशानें - लयलूट)

साहित्य (काव्य वा अलंकारशास्त्र) संगीत,प्रसंगभान (मान) ह्यांच्या बळावर कथेची लयलूट करावी.(कीर्तनात प्रेमसुखाची लयलूट करावी(घमशाने-घमस्थाने,घमेंडे) श्रवण मननाने (अर्थांचे अंतर म्ह.रहस्य किवा भिन्न भिन्न अर्थ) अर्थांतर काढीत जावे.

पाठ उदंडचि असावें । सर्वकाळ उजळीत जावें । सांगितलें गोष्टीचें असावें । स्मरण अंतरीं ॥ १९ ॥

पाठांतर पुष्कळ असावे,त्याची नित्य उजळणी करून ते ताजे (जागृत) ठेवावे.(आपण दुसऱ्यास किवा दुसऱ्याने आपणास) सांगितलेल्या गोष्टी किवा अर्थ चित्तात ठेवावेत.)

अखंड येकांत सेवावा । ग्रन्थमात्र धांडोळावा । प्रचित येईल तो घ्यावा । अर्थ मनीं ॥ २० ॥

निरंतर एकांताचे सेवन करून मिळेल तो प्रत्येक ग्रंथ वाचून पाहावा.(निरंतर अनंत ग्रंथ चाळीत असावेत.) आणि त्यातील जेवढा अर्थ अंतःकरणात पटेल तेवढा अंतःकरणात साठवावा ( व प्रचिती येईल तो अर्थ ध्यानी धरावा.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निस्पृहशिकवणनिरूपणनाम समास तिसरा ॥**

## समास चौथा : देहदुर्लभनिरूपण ॥ श्रीराम ॥

देहाकरिता (देह आहे म्हणून) मनुष्याचे प्रपंचातील अथवा परमार्थातील यच्चयावत व्यापार चाललेले असतात.गणेश-शारदास्तवन,नाना कवित्वे,अध्ययन,ग्रंथलेखन,सत्संग,तीर्थाटन,श्रवण,मनन,कर्म ज्ञान उपासंनादि मार्ग,इहलोक,परलोक,नाना साधने,पुण्यशीळ व पापी,सन्मार्ग व असन्मार्ग,भोग,रोग,त्याग ,भक्ति,मुक्ति,नानाविद्या व कला तात्पर्य देहाकरिता सकळ काही! देहाविण काही नाही.

देह्याकरितां गणेशपूजन । देह्याकरितां शारदावंदन । देह्याकरितां गुरु सज्जन । संत श्रोते ॥ १ ॥

(देही - जीवात्मायुक्त देह)

गणेशस्तवन,शारदावंदन,गुरु-संत-सज्जन-श्रोते ह्यांना वंदन हे देह आहे म्हणून होते.

देह्याकरितां कवित्वें चालती । देह्याकरितां अधेनें करिती । देह्याकरितां अभ्यासिती ।नाना विद्या ॥ २ ॥

(अधेनें करिती - अध्ययन करिती)

काव्य करणे,अध्ययन करणे किवा अनेक विद्यांचा अभ्यास करणे हे सर्व देहामुळेच होते.

देह्याकरितां ग्रंथलेखन । नाना लिपीवोळखण । नाना पदार्थशोधन । देह्याकरितां ॥ ३ ॥

ग्रंथ लिहिणे,लिपी ओळखणे अथवा पदार्थांचे संशोधन करणे हे देहामुळेच होते.

देह्याकरितां माहांज्ञानी । सिद्धसाधु ऋषीमुनी । देह्याकरितां तीर्थाटणीं । फिरती प्राणी ॥ ४ ॥

मोठमोठे ज्ञानी,सिद्ध,ऋषि,मुनि हे देहामुळेच होतात.तीर्थयात्रेला लोक देहामुळेच जातात.

देह्याकरितां श्रवण घडे । देह्याकरितां मननीं पवाडे । देह्याकरितां देहीं आतुडे । मुख्य परमात्मा ॥ ५ ॥

श्रवण,मनन देहामुळेच होते.देहामुळेच मुख्य परमात्म्याची प्राप्ती देहात होते.

देह्याकरितां कर्ममार्ग । देह्याकरितां उपासनामार्ग । देह्याकरितां ज्ञानमार्ग । भूमंडळीं ॥ ६ ॥

कर्म,उपासना व ज्ञान हे मार्ग जगामध्ये देहामुळेच होतात.

योगी वीतरागी तापसी । देह्याकरितां नाना सायासी ॥ देह्याकरितां आत्मयासी । प्रगटणें घडे ॥ ७ ॥

योगी,विरागी,तपस्वी इत्यादि अनेक सायास करणारे देहामुळेच आहेत,देहामुळेच आत्म्याला प्रकट व्हावे लागते.

येहलोक आणि परलोक । देह्याकरितां सकळ सार्थक । देहेंविण निरार्थक । सकळ कांहीं ॥ ८ ॥

इहलोकाचे किवा परलोकाचे सर्व सार्थक देहामुळेच होते.देह नसेल तर सर्व निरर्थक होय.

पुरश्चरणें अनुष्ठानें । गोरांजनें धूम्रपानें । सीतोष्ण पंचाग्नी साधने । देह्याकरितां ॥ ९ ॥

पुरश्र्चरणे,अनुष्ठाने,पोत घेणे,धुम्रपान (धूर पिऊन तप करणे.)पंचाग्निसाधन हे सर्व देहामुळेच.

देह्याकरितां पुण्यसीळ । देह्याकरितां पापी केवळ । देह्याकरितां अनर्गळ । सुचिस्मंत ॥ १० ॥

पुण्यशील किवा अतिपापी,स्वेच्छयाचारी किवा पवित्र हे देहामुळेच.

देह्याकरितां अवतारी । देह्याकरितां वेषधारी । नाना बंडें पाषांडें करी । देह्याकरितां ॥ ११ ॥

लोक अवतारी किंवा वेषधारी होतात,बंडे व पाखांडे उपस्थित करतात ती देहामुळेच.

देह्याकरितां विषयभोग । देह्याकरितां सकळ त्याग । होती जाती नाना रोग । देह्याकरितां ॥ १२ ॥

विषय भोगणे किंवा सर्वस्वी त्याग करणे,अनेक रोग होणे किंवा नाहीसे होणे हे देहामुळेच.

देह्याकरितां नवविधा भक्ती । देह्याकरितां चतुर्विधा मुक्ती । देह्याकरितां नाना युक्ती ।नाना मतें ॥१३॥

नवविधा भक्ति,चारी मुक्ति,अनेक युक्त्या व मते हे देहामुळेच.

देह्याकरितां दानधर्म । देह्याकरितां नाना वर्म । देह्याकरितां पूर्वकर्म । म्हणती जनीं ॥ १४ ॥

दानधर्म करणे किवा अनेक रहस्ये कळणे ही देहामुळेच,लोकांमध्ये पूर्वकर्म म्हणतात हे देहामुळेच.

देह्याकरितां नाना स्वार्थ । देह्याकरितां नाना अर्थ । देह्याकरितां होईजे वेर्थ । आणी धन्य ॥ १५ ॥

अनेक स्वार्थ किंवा अर्थ देहामुळेच,धन्य होणे किवा व्यर्थ जाणे देहामुळेच.

देह्याकरितां नाना कळा । देह्याकरितां उणा आगळा । देह्याकरितां जिव्हाळा । भक्तिमार्गाचा ॥ १६ ॥

अनेक कला माहीत असणे किवा श्रेष्ठ (आगळा) कनिष्ठ (उणां) होणे,भक्तिमार्गाचे अत्यंत प्रेम लागणे,हे सर्व देहामुळेच.

नाना सन्मार्गसाधनें । देह्याकरितां तुटती बंधनें । देह्याकरितां निवेदनें । मोक्ष लाभे ॥ १७ ॥

अनेक प्रकारचे सन्मार्ग किवा नाना साधने करून बंधने तुटतात व आत्मनिवेदनाच्या योगाने मोक्ष प्राप्त होतो तो देहामुळेच.

देहे सकळामधें उत्तमु । देहीं राहिला आत्मारामु । सकळां घटीं पुरुषोत्तमु । विवेकी जाणती ॥ १८ ॥

सर्वामध्ये हा देह उत्तम आहे,कारण त्यामध्ये आत्माराम (पुरुषोत्तम) राहिला आहे.हा पुरुषोत्तम सर्व देहामध्ये (घटी) आहे हे विवेकी पुरुषांना माहित आहे.

देहयाकरितां नाना कीर्ती । अथवा नाना अपकीर्ती । देहयाकरितां होती जाती । अवतारमाळिका ॥ १९ ॥

अनेक प्रकारच्या किर्ती किंवा अपकिर्ती होतात किंवा अवतारमालिका होतात.व जातात त्या सर्व देहामुळेच.

देहयाकरितां नाना भ्रम । देहयाकरितां नाना संभ्रम । देहयाचेन उत्तमोत्तम । भोगिती पदें ॥ २० ॥

अनेक भ्रम किवा संभ्रम (संशय) होतात अथवा उत्तम उत्तम पदे भोगतात ते देहामुळेच

देहयाकरितां सकळ कांहीं । देहयाविण कांहीं नाहीं । आत्मा विरे ठाईं ठाईं । नव्हताच जैसा ॥ २१ ॥

सर्व काही देहामुळेच होते.देह नसेल तर काहीच नाही आत्मा जागच्या जागी जसा काही तो नव्हताच असा (विरे) गुप्त होतो.

देहे परलोकींचें तारूं । नाना गुणांचा गुणागरु । नाना रत्नांचा विचारु । देहयाचेनी ॥ २२ ॥

देह म्हणजे परलोकीचे तारू व अनेक गुणांची खाण (गुण-आगरु,गुणांचे आगर) आहे.अनेक रत्नांचा विचार देहामुळेच होतो.

देहयाचेन गायेनकळा । देहयाचेन संगीतकळा । देहयाचेन अंतर्कळा । ठाईं पडे ॥ २३ ॥

गायनकला,संगीतकला किवा अंतर्कळा (अंतरात्मा आणि शरीरातील रचनेचे ज्ञान) ह्याची प्राप्ति देहामुळेच होते.

देहे ब्रह्मांडाचें फळ । देहे दुल्लभचि केवळ । परी या देहयास निवळ । उमजवावें ॥ २४ ॥

देह हे ब्रह्मांड वृक्षाचे फळ आहे,तो अतिदुर्लभ आहे,पण त्याच्या यथार्थ योग्यतेविषयी नीट समजूत पटली पाहिजे.

देहयाकरितां लहनथोर । करिती आपुलाले व्यापार । त्याहिमधें लाहानथोर । कितीयेक ॥ २५ ॥

लहानमोठे प्राणी आपापले लहान मोठे व्यवहार करतात,ते देहामुळेच.

जे जे देहे धरुनी आले । ते ते कांहीं करून गेले । हरिभजनें पावन जाले । कितीयेक ॥ २६ ॥

जे जे देह धरून जन्माला आले,ते ते काहीतरी (बरे,वाईट) करून गेलेच,त्यात कित्येक जण हरिभक्तीच्या योगाने पावन झाले.

अष्टधा प्रकृतीचें मूळ । संकल्परूपचि केवळ । नाना संकल्पें देहेफळ । घेऊन आलें ॥ २७ ॥

अष्टधा प्रकृतीचे मूळ केवळ संकल्परूप आहे अनेक संकल्पालाच ही देहरूप फळे लागली आहेत.

हरिसंकल्प मुळीं होता । तोचि फळीं पाहावा आतां । नाना देहयांतरीं तत्वता । शोधितां कळे ॥ २८ ॥

अष्टधा प्रकृतीच्या मुळाशी जो हरिसंकल्प होता तोच आता फळांत (देहात) पाहावा. अनेक देहातील तत्वांचा शोध घेतला म्हणजे हे कळेल ( हरिसंकल्प जो मूळात-मूळमायेत होता तोच फळात-देहात पाहावा.)

वेलाचे मुळीं बीज । उदकरूप वेली समज । पुढें फळामधें बीज । मुळींच्या अंशें ॥ २९ ॥

वेलाच्या मुळाशी बीज असते,मध्ये उदकरूप वेलं असतो.पुढे मुळातील अंशामुळे फळांनाही बीज येते. (उत्पन्न होते.)(वेलाचे मूळ बीज व फळातही बीज,मध्ये उदकरूप वेल असतो.)

मुळाकरितां फळ येतें । फळाकरितां मूळ होतें । येणेंकरितां होत जातें । भूमंडळ ॥ ३० ॥

(मूळापासून फळ व पुन्हा फळापासून मूळ होते अशाप्रकारे सर्व सृष्टि चालली आहे) मुळापासून फळ व पुन्हा फळापासून मूळ होते.अश्याप्रकारे सर्व सृष्टि चालली आहे.) मुळापासून फळ होते व पुन्हा फळापासून मूळ होते अशाप्रकारे सर्व सृष्टि चालली आहे.

असो कांहीं येक करणें । कैसें घडे देहयाविणें । देहे सर्थकीं लावणें । म्हणिजे बरें ॥ ३१ ॥

असो,काही करणे झाले तरी ते देहावाचून कसे करता येईल? ह्यास्तव हा देह सार्थकी लावावा म्हणजे बरे.(देहावाचून काही होत नाही म्हणून देह सार्थकी लावावा)

आत्म्याकरितां देहे जाला । देहयाकरितां आत्मा तगला । उभययोगें उदंड चालिला । कार्यभाग ॥ ३२ ॥

आत्म्यामुळे देह आला व देहामुळे आत्म्याने टिकाव धरला.दोघांच्या संयोगाने पुष्कळ कार्यभाग होत असतो.(उभयसंयोगाने सृष्टीचा कारभार चालला आहे.)

चोरून गुप्तरूपें करावें । तें आत्मयासी पडे ठावें । कर्तुत्व याचेन स्वभावें । सकळ कांहीं ॥ ३३ ॥

कितीही चोरून गुप्तरूपाने केले तरी ते आत्म्याला ठाऊक होतेच कारण सर्व काही कर्तुत्व ह्याच्यामुळेच.(आत्म्याला चोरून गुप्तरूपाने काहीएक करता येत नाही कारण कर्तुत्व सारे आत्म्याचेच आहे.)

देहयामधें आत्मा असतो । देहे पूजितां आत्मा तोषतो । देहे पीडितां आत्मा क्षोभतो ।प्रत्यक्ष आतां ॥३४॥

देहामध्ये आत्मा असतो त्या देहाची पूजा केल्यास आत्मा संतुष्ट होतो व त्याला त्रास दिल्यास आत्मा क्षोभतो.(दु:ख पावतो,रागावतो) हे उघडच आहे.

देहयावेग्ळी पूजा पावेना । देहयाविण पूजा फावेना । जनीं जनार्दन म्हणोनी जना । संतुष्ट करावें ॥ ३५ ॥

(देहावाचून पूजा करिता येत नाही व देहावाचून तिचा स्वीकार होत नाही म्हणून जनी जनार्दन ह्या भावनेने प्राणीमात्रास संतुष्ट करावे.) देहावाचून पूजा पाहोचत व करताही येत नाही जनी जनार्दन हे वचन आहेच ह्यात्सव लोकांस संतुष्ट करीत जावे.

उदंड प्रगटला विचार । धर्मस्थापना तदनंतर । तेथेंच पूजेस अधिकार । पुण्यशरीरीं ॥ ३६ ॥

(पुण्यशील सत्पुरुषांपासून प्राणिमात्रास विचार कळतो.अनेकांना तो विचार कळतो,अनेकांना तो विचार पटतो व ह्याप्रमाणे धर्मस्थापनेचे महत्कार्य होते.म्हणून पूजेचा मुख्याधिकार अशा संतांचाच आहे.) ज्याच्या ठिकाणी विचार अतिशय जागृत झाला आहे व शिवाय जो धर्मस्थापना करीत आहे असा पुण्यवान देहच पूजा घेण्यास अधिकारी आहे.

सगट भजन करूं येतें । तरी मूर्खपण आंगीं लागतें । गाढवासी पूजितां कळतें । काये त्याला ॥ ३७ ॥

(सगट भजन - सरसकट सगळ्यांचे भजन)

सगट भजन (सर्वांना एकसारखे मानणे) करता येते पण त्यामुळे मूर्खपणा पदरात येतो.(जनी जनार्दन म्हणून सर्वास संतोष द्यावा पण सरसकट सर्वांचीच पूजा करू म्हंटले तर मूर्खत्व आंगी येते) गाढवाची पूजा केली तर त्या गाढवाला काय कळणार?

पूज्य पूजेसी अधिकार । उगेचि तोषवावे इतर । दुखऊं नये कोणाचें अंतर । म्हणिजे बरें ॥ ३८ ॥

पूज्य पुरुषांनाच पूजा घेण्याचा अधिकार आहे (म्हणून त्यांचीच पूजा करावी) इतर जीवांनी-बाकीच्या सामान्य लोकांस संतोष द्यावा कोणाचेही अंतःकरण दुखवू नये म्हणजे झाले (हे वर्म सांभाळले पाहिजे)

सकळ जगदांतरींचा देव । क्षोभता राहाव्या कोठें ठाव । जनावेगळा जनास उपाव । आणीक नाहीं ॥ ३९ ॥

सर्व जगाच्या अंतरीचा देव जर आपण क्षुब्ध केला तर मग आपणाला राहावायला जागा तरी कोठे मिळणार? माणसावाचून माणसाला दुसरा आश्रय नाही.

परमेश्वराचे अनंत गुण । मनुष्यें काये सांगावी खूण । परंतु अध्यात्मग्रंथश्रवण । होतां उमजे ॥ ४० ॥

परमेश्वराचे गुण अनंत आहेत (ते मनुष्याला वाचेने काय सांगता येणार ? माणसाने त्यांची खूण काय सांगावी?(परंतु अध्यात्मग्रंध श्रवण करावेत म्हणजे ते कळू लागतात) अध्यात्मग्रंथ ऐकले म्हणजे काही उमजते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहदुर्लभनिरूपणनाम समास चौथा ॥**

## समास पांचवा : करंटपरीक्षानिरूपण॥ श्रीराम ॥

धान्य उदंड मोजिलें । परी त्या मापें नाहीं भक्षिलें । विवरल्यविण तैसें जालें । प्राणीमात्रासी ॥ १ ॥

मापाने धान्य पुष्कळ मोजले तरी माप स्वतः ते काही खात नाही.जे लोक पुष्कळ वाचतात पण विवरण किंवा मनन करीत नाहीत.त्यांची अशीच अवस्था होते.(एखाद्या पायलीने खंडोगणती धान्य मोजले जाते,पण त्यातले चार दाणे काही पायली स्वतः खात नाही.–असाच प्रकार शेकडो ग्रंथ वाचून व हजारो श्लोक वगैरेचे पाठांतर करून त्याचे विवरण-मनन-न करण्या-याचा होतो.)

पाठ म्हणतां आवरेना । पुसतां कांहींच कळेना । अनुभव पाहातां अनुमाना । मधें पडें ॥ २ ॥

एकदा (सर्ग,अध्याय,स्तवक काही) म्हणायला लागला की थांबत नाही (पण त्यातल्या काही श्लोकांचा अर्थ) विचारावायला जावे तर त्याला काही समजत नाही (हे समजून येते) आणि त्याला अनुभव काय आहे म्हणून पाहायला जावे तर तो संशायातच पडलेला आढळतो.(अनुभव कसचा-अनुमानिक-शाब्दिक ज्ञानातच डुंबून जातो.सरसकट पाठ करणे हे वेडेपण होय.)

शब्दरत्नें परीक्षावीं । प्रत्ययाचीं पाहोन घ्यावीं । येर ते अवघीं सांडावीं । येकिकडे ॥ ३ ॥

शब्दरत्नांची परीक्षा करून घ्यावी,त्यात अनुभवाची असतील तेवढीच घ्यावी,बाकीची टाकून द्यावी.(शब्दरत्ने परीक्षून घ्यावी,प्रत्यय देणारी तेव्हढी लक्षात ठेवावी,बाकीची जेथल्या तेथे ठेऊन द्यावी.)

नावरूप आवघें सांडावें । मग अनुभवास मांडावें । सार असार येकचि करावें । हें मूर्खपण ॥ ४ ॥

नामरूपात्मक सगळे टाकून देऊन मग अनुभव घेण्यास तयार व्हावे (नामरूप टाकून देऊन अनुभव घ्यावा.) सार व असार एकच करणे हा मूर्खपणा आहे.

लेखकें कुळ समजवावें । किंवा उगेंचि वाचावें । येणें दृष्टांतें समजावें । कोणींतरी ॥ ५ ॥

(कुळ - सर्वकाही,अर्थांतर)

लेखकाने लिहिल्या गोष्टींचा अर्थ समजून घ्यावा की उगीच वाचीत सुटावे?(लेखकाने कुळ सर्व समजेल असे लिहिलेले असले पाहिजे.नाहीतर ते लेखन उगीच वाचण्यात अर्थ नाही.) ह्या दृष्टांतावरून काय ते लक्षात आणावे.

जेथें नाहीं समजावीस । तेथें आवघी कुसमुस । पुसों जातां वसवस । वक्ता करी ॥ ६ ॥

(कुसमुस - कुजबुज)

जेथे समजून देण्याची किवा घेण्याची अक्कल नाही तेथे सगळीच चुळबुळ होते.(स्वच्छ समजावून देता येत नाही तेथे सारा असंतोष असतो.) वक्त्याला कोणी अर्थ विचारायला जावे तो तो वसकन आंगावर येतो.

नान शब्द येकवटिले । प्रचीतीवीण उपाव केले । परी ते अवघेचि वेर्थ गेले । फडप्रसंगीं ॥ ७ ॥

(फडप्रसंगीं - संमूहात,आणीबाणीच्यावेळेस)

प्रचितीवाचून उपाय करावा त्याप्रमाणे अनेक शब्द नुसते घोकून ठेवतो.पण ते सभेच्या किंवा आणीबाणीच्या वेळी व्यर्थ (निरुपयोगी) होतात.(पुष्कळ शब्द घोकले पण प्रचिती वाचून त्यांचा उपयोग काय? आपतकाळी किवा सभाप्रसंगी फड व्यर्थ जातात.)

पसेवरी वैरण घातलें । तांतडीनें जातें वोडिलें । तेणें पीठ बारीक आलें । हें तो घडेना ॥ ८ ॥

(वैरण - धान्य)

जात्यात पसाभर वैरण घातले आणि घाईघाईने जाते ओढले,फिरवले तर भरड पीठ पडेल.पीठ बारीक येणे शक्य नाही.

घांसामागें घांस घातला । आवकाश नाहीं चावायाला । अवघा बोकणा भरिला । पुढें कैसें ॥ ९ ॥

तोंडामध्ये घासामागे घास घालून सगळा बोकाणा भरला,चावावयाला जागा ठेवली नाही,तर पुढे परिणाम कसा होणार? (दाताखाली न चावता बोकाणे भरीत कोणी अधाशी बसला तर त्या जेवणाचा काही उपयोग नाही.)

ऐका फडनिसीचें लक्षण । विरंग जाऊं नेदी क्षण । समस्तांचें अंतःकर्ण । सांभाळीत जावें ॥ १० ॥

(विरंग - व्यर्थ)

ऐका,एक क्षणही विरंग (रिकामा,स्वानंदाशिवाय) जाऊ न देणे व सर्वांचे अंतःकरण सांभाळीत जाणे हे फडनिसांचे (महंतीचे किंवा सभानायकाचे) लक्षण आहे.(एक क्षणही स्वानंदाशिवाय-विरंग-जाऊ देत नाही.सर्वांची अंतःकरणे राजी राखतो तो फडणीस (फड-सभा) किंवा सभानायक खरा)

सूक्ष्म नामें सुखें घ्यावीं । तितुकीं रूपें वोळखावीं । वोळखोन समजवावीं । श्रोतयांसी ॥ ११ ॥

अध्यात्मशास्त्रातील गहन अर्थाचे शब्द सभेत खुशाल सांगावेत.त्यांचा अर्थ स्वतः समजून घेतलेला असावा आणि श्रोत्यांनाही पटवून द्यावा.(अध्यात्मात सूक्ष्म शब्द येतात.त्याचा अचूक अर्थ ध्यानात आणून तो श्रोत्यांच्या गळी उतरवतात.)

समशा पुरतां सुखी होती । श्रोते अवघे आनंदती । अवघे क्षणक्षणा वंदिती । गोसावियांसी ॥ १२ ॥

(समशा - समस्या,शंका)

(समस्या) शंकासमाधान झाले म्हणजे श्रोत्यांची मने प्रसन्न होतात.आणि सगळे श्रोते वक्त्याला क्षणोक्षणी वंदन करतात.( वक्त्याचे क्षणोक्षणी ते धन्यवाद गातात.)

समशा पुरतां वंदिती । समशा न पुरतां निंदिती । गोसांवी चिणचिण करिती । कोण्या हिशेबें ॥ १३ ॥

(नाही तर निंदतात व वक्ता फणफण करितो.) शंकासमाधान झाले तर स्तुति करतात,नाही तर निंदा करतात.मग वक्त्याने काय म्हणून फणफण करावी?

शुध सोनें पाहोन घ्यावें । कसीं लाउनी तावावें । श्रवणमननें जाणावें । प्रत्ययासी ॥ १४ ॥

शुद्ध सोने घ्यावयाचे तर कसावर लाऊन,तापवून निट पाहून घ्यावे लागते,त्याप्रमाणे श्रवणामनंनादिकांच्या योगाने ब्रह्मानुभव घ्यावा लागतो.(तसे श्रवणमनननाने अनुभवरूप व्हावे.)

वैद्याची प्रचित येना । वेथा परती होयेना । आणी रागेजावें जना । कोण्या हिशेबें ॥ १५ ॥

वैद्याचा अनुभव (प्रचीत) येत नाही,रोग बरा होत नाही तर वैद्याने लोकांवर काय म्हणून रागवावे?(वैद्याची प्रचीती आली नाही,रोग गेला नाही तर मग कोणत्या आधारावर त्याने रागवावे?)

खोटें कोठेंचि चालेना । खोटें कोणास मानेना । याकारणें अनुमाना । खरें आणावें ॥ १६ ॥

ह्या जगात खोटे कोठेच चालत नाही ते कोणाला पटत नाही,खरे म्हणून असेल तेच ध्यानात घ्यावे.(खोटे कोणालाही मानवत नाही म्हणून खरे समजवावे.)

लिहिणें न येतां व्यापार केला । कांहीं येक दिवस चालिला । पुसता सुरनीस भेटला । तेव्हां खोटें ॥ १७ ॥

(सुरनीस - लेखापाल,हिशेबनीस)

स्वतः लिहिता येत नसताना व्यापार केला काही दिवस तो चालतो (निभेल) पण हिशेब तपासणारा भेटला आणि त्याने विचारले तर फजितीच (पण हिशेबतपासनीस भेटल्याबरोबर साऱ्या चुका बाहेर येतील.)

सर्व आवघें हिशेबीं ठावें । प्रत्यय साक्षीनें बोलावें । मग सुरनीसें काये करावें । सांगाना ना ॥ १८ ॥

स्वतःला हिशेबातला खडानखडा माहित आहे,अनुभवाच्या दृष्टीने समजून सांगतो आहे,मग त्याठिकाणी तपासनीस काय करील सांगा बरे?(हिशेब करताना चुका बाहेर आल्या,लेखांचा पुरावा-प्रत्यय व साक्षीही-लेखक वगैरे बोलु लागले.सत्य सांगू लागले मग सुरनीस दोष ठेवल्याशिवाय कसा राहील?)

स्वये आपणचि गुंते । समजावीस कैसी होते । नेणतां कोणीयेक ते । आपदों लागती ॥ १९ ॥

(आपदों - कष्ट,अडचणी)

(स्वतःच चुकता,गुंतून राहिला,तर त्याची समजूत कोणी पाडावी? व ती पडली नाही म्हणजे तो कष्टी होतो.) (आपल्या अज्ञानामुळे) आपण स्वतः गुंतून पडतो,त्याच्या हातून दुसऱ्याची समजूत कशी पटणार? अज्ञानामुळे कोणीही असेच कष्टी होतात.

बळेंविण युद्धास गेला । तो सर्वस्वें नागवला । शब्द ठेवावा कोणाला । कोण कैसा ॥ २० ॥

सामर्थ्य नसताना जर युद्धाला गेला तर त्याची सर्वस्वी नागवणूक होते.त्यांने दुसऱ्याला काय म्हणून दोष द्यावा? (फौजफाटा नसता कोणी युद्धाला गेला तर फजीत पावणारच त्यात दोष दुसऱ्याचा नाही)

जे प्रचीतीस आलें खरें । तेंचि घ्यावें अत्यादरें । अनुभवेंविण जें उत्तरें । तें फलकटें जाणावीं ॥ २१ ॥

(फलकटें - फोलकटे)

जे खरोखरी (खरे आहे असे) अनुभवास येईल,त्याचा अतिआदरपूर्वक स्वीकार करावा.अनुभवाचून जे भाषण ते फोलकट होय.(जे प्रत्ययाला येते,अत्यंत आदराने घ्यावे,अनुभवावीण बोल फोल होत.)

सिकऊं जातां राग चढे । परंतु पुढें आदळ घडे । खोटा निश्चय तात्काळ उडे । लोकामधें ॥ २२ ॥

(पुढें आदळ घडे - पुढे अद्दल घडते.)

कोणी शिकवायला लागले तर राग येतो पण न शिकले तर पुढे अद्दल घडते.खोट्या गोष्टी जगामध्ये (लोकांत) तात्काळ उघडकीस येतात.

खरें सांडुनी खोटें घेणें । भकाधेस काये उणें । त्रिभुवनीं नारायणे । न्याय केला ॥ २३ ॥

(भकाधेस - फजिती,बहकायला)

खरे टाकून देऊन कोणी बळेच खोट्याचा पक्ष धरू लागला (खोटे घेऊ लागला) व हवे ते बहकू लागला,तरी न्याय करणारा परमात्मा जगात आहेच.(तरी न्याय करायला परमेश्वर बसलाच आहे ना?)

तो न्याय सांडितां सेवटीं । अवघें जगचि लागे पाठीं । जनीं भंडभांडों हिंपुटीं । किती व्हावें ॥ २४ ॥

(भंडभांडों हिंपुटीं - भांडूनभांडून बेजार होतो)

तो न्याय सोडल्यास शेवटी सगळेच जग पाठीलागून भंडावून सोडील,मग त्या सगळ्या जगाशी (लोकांशी) भांडण्यात किती कष्ट भोगावे लागतील?( मग लोकांशी भांडूनभांडून ह्याला शीण मात्र होईल)

अन्यायें बहुतांस पुरवलें । हें देखिलें ना ऐकिलें । वेडें उगेंचि भरीं भरलें । असत्याचे ॥ २५ ॥

अन्यायाने वागणारा माणूस अनेकाना पुरून उरेल (अन्यायाची वागणूक अनेकांना पत्करेल किवा आवडेल.) हे कोणी कधी पाहिले नाही ऐकले नाही,असे असता वेडा माणूस उगीच खोट्याचा अभिमान धरून हट्टाला पेटतो.(अन्याय बहुजन समाजास खपतो असे कधी ऐकण्यात किंवा पाहण्यात नाही.(वेडे लोक खोट्याचा पक्ष घेऊन उगाच भांडतात.)

असत्य म्हणिजे तेंचि पाप । सत्य जाणावें स्वरूप । दोहींमधें साक्षप । कोणाचा करावा ॥ २६ ॥

असत्य म्हणजे पाप होय व सत्य हे ब्रह्मस्वरूप होय.ह्या दोहोपैकी कोणाच्या प्राप्तीसाठी उद्योग करावा?(दोहोमध्ये कोणाचा पक्ष धरावा ते पाहावे)

मायेमधें बोलणें चालणें साचें । माया नस्तां बोलणें कैंचें । याकारणें निशब्दाचें । मूळ शोधावें ॥ २७ ॥

बोलणे चालणे सर्व मायेमध्ये होते.माया नसेल तर बोलणे कसे होईल?म्हणून नि:शब्दाचे मूळ जे परब्रह्म ते शोधावे.

वच्यांश जाणोनि सांडावा । लक्ष्यांश विवरोन घ्यावा । याकारणें निशब्द मुळाचा गोवा । आडळेना ॥ २८ ॥

(मुळाचा गोवा - ब्रह्मविषयीचा गुंता , आडळेना - सुटतो,राहात नाही)

वाच्यांश (शब्दार्थ) समजून टाकावा आणि लक्षांशाचे मनन करून (विवरून) तो घ्यावा म्हणजे मग शब्दांतीत परब्रह्माचा घोटाळा पडत नाही (म्हणजे नि:शब्दाचा संशय,भ्रम-गोवा-राहाणार नाही)

अष्टधा प्रकृति पूर्वपक्ष । सांडून अलक्षीं लावावें लक्ष । मननसीळ परम दक्ष । तोचि जाणे ॥ २९ ॥

अष्टधा प्रकृति हा पूर्वपक्ष-तो-विवेकाने सोडून अलक्ष्य ब्रह्माच्या ठिकाणी लक्ष लावावे.जो अत्यंत दक्ष व मननशील असेल त्याला हे कळेल (जो अखंड सावध व मनन करील त्यालाच हे कळेल)

नाना भूस आणि कण । येकचि म्हणणें अप्रमाण । रस चोवडिया कोण । शाहाणा सेवी ॥ ३० ॥

(चोवडिया - चोइट्या)

भूस व धान्याचे कण एकच म्हणणे हे खोटे (हे म्हणणे वेडेपणाचे होय.) शहाणा मनुष्य रस व चोरट्या ह्यापैकी कोणते सेवन करील?(रस सोडून चिपाडे कोणता शहाणा घेईल?)

पिंडीं नित्यानित्य विवेक । ब्रह्मांडीं सारासार अनेक । सकळ शोधूनियां येक । सार घ्यावें ॥ ३१ ॥

पिंडसंबंधाने नित्यानित्यविवेक व ब्रह्मांडासंबंधाने सारासार विचार करून,सर्वांचा शोध घेऊन त्यात काय सार सापडेल तेवढे घ्यावे.(नित्यानित्यविवेकाने पिंड व सारासारविचाराने ब्रह्मांड ह्याप्रमाणे पिंडब्रह्मांड हे असार टाकून सार परब्रह्म घ्यावे.)

मायेकरितां कोणीयेक । अन्वय आणि वीतरेक । ते माया नस्तां विवेक । कैसा करावा ॥ ३२ ॥

माया आहे म्हणून (मायेच्या निरसनासाठी) अन्वय व व्यतिरेक ह्यांचा विचार करावयाचा,माया नसेल तर विवेक कसा करावयाचा? (मायानिरास झाल्यावर मग ह्या विवेकाचे कारण उरत नाही.)

तत्वें तत्व शोधावें । माहांवाकीं प्रवेशावें । आत्मनिवेदनें पावावें । समाधान ॥ ३३ ॥

एकून एक तत्वांचा शोध घेऊन महावाक्याच्या अर्थामध्ये प्रवेश करावा,आत्मनिवेदन करून परम समाधान पावावे.(तत्वाने तत्वांचा झाडा करून तत्वमसी-महावाक्यात प्रवेशावे व आत्मनिवेदन भक्तीने परम समाधान पावावे.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे करंटपरीक्षानिरूपणनाम समास पांचवा ॥**

## समास सहावा : उत्तमपुरुषनिरूपण॥ श्रीराम ॥

(अफजलखानाच्या वधानंतरचा शिवाजी रामदासस्वामी भेटीच्या वेळचा समास)

नाना वस्त्रें नाना भूषणें । येणें शरीर श्रृंघारणें । विवेकें विचारें राजकरणें । अंतर श्रृंघारिजे ॥ १ ॥

अनेक वस्त्रे व अलंकार ह्यांनी शरीर भूषवितात,तसे विचार,विवेक व राजकारण ह्यांनी अंतःकरण श्रृंगारावे

शरीर सुंदर सतेज । वस्त्रें भूषणें केले सज्ज । अंतरीं नस्तां चातुर्यबीज । कदापी शोभा न पवे ॥ २ ॥

शरीर सुंदर,तेजपुंज आणि वस्त्रालांकारानी सजविलेले असले तरी अंतःकरणात (अंतरी) चातुर्य नसेल तर त्या शरीराला कधीही शोभा येणार नाही.

तुंड हेंकाड कठोर वचनी । अखंड तोले साभिमानी । न्याय नीति अंतःकर्णी । घेणार नाहीं ॥ ३ ॥

तोंडाळ,हेकट(हटवादी) कठोर बोलणारा,नित्य अहंकाराच्या डौलात राहणारा,न्याय नीतीला अंतःकरणात जागा न देणारा (न जुमानणारा)

तऱ्हे सीघ्रकोपी सदा । कदापि न धरी मर्यादा । राजकारण संवादा । मिळोंचि नेणें ॥ ४ ॥

सदा तऱ्हेवाईक,शीघ्रकोपी(झटदिशी रागावणारा),कोणत्याही कामात इतरांशी मिळते न घेणारा (मिळून न जाणारा)

ऐसें लौंद बेइमानी । कदापि सत्य नाहीं वचनीं । पापी अपस्मार जनीं । राक्षेस जाणावें ॥ ५ ॥

ज्याच्या बोलण्यात कधी खरेपणा नाही,पापी अपस्मार (कृतघ्न,परपीडाकारक) असे (लौंद) लबाड,बेईमानी लोक असतात,ते जगात राक्षस समजावे (व त्यांना वाऱ्याशी उभे राहू देऊ नये.)

समयासारिखा समयो येना । नेम सहसा चालेना । नेम धरितां राजकारणा । अंतर पडे ॥ ६ ॥

प्रसंगासारखा प्रसंग येत नाही (नित्य नवनवे प्रसंग उद्भवतात) त्यामुळे नित्यनेम सहसा चालत नाहीत,नियमांच्या बंधनात फार राहू लागल्यास राजकारणात व्यत्यय येतो.

अति सर्वत्र वर्जावें । प्रसंग पाहोन चालावें । हटनिग्रहीं न पडावें । विवेकीं पुरुषें ॥ ७ ॥

(हटनिग्रहीं - हट्टाचा आग्रह)

त्यासाठी विवेकी पुरुषाने अति सर्वत्र वर्जावे,प्रसंग पाहून चालावे,विवेकी कार्य पुरुषाने हटनिग्रहात पडू नये.

बहुतचि करितां हट । तेथें येऊन पडेल तट । कोणीयेकाचा सेवट । जाला पाहिजे ॥ ८ ॥

फारच हट्ट धरिला की तेथे तट (भेद,पक्ष) उभे राहिलेच तर कोणतीच गोष्ट तडीस लागत नाही)(ते बरे नाही) कोणता तरी निर्णय लावला पाहिजे.

बरें ईश्वर आहे साभिमानी । विशेष तुळजाभोवानी । परंतु विचार पाहोनी । कार्ये करणें ॥ ९ ॥

असो ईश्र्वर तुमचा अभिमानी (कैवारी) आहे, त्यात तुळजाभवानीला तुमचा अभिमान विशेष आहे.( विशेषतः तुळजाभवानीच्या प्रेमातले तुम्ही आहात.) तथापि कोणतेही कार्य करणे ते नीट विचार करूनच करावे.

अखंडचि सावधाना । बहुत काये करावी सूचना । परंतु कांहीं येक अनुमाना । आणिलें पाहिजे ॥ १० ॥

तुम्ही अखंड सावधानच आहात,तुम्हाला बहुत काय सांगावे?परंतु (जे थोडे सांगतो) तिकडे लक्ष ठेवावे.(निरंतर सावधान असावे गाफीलपणा करू नये.अधिक काय सांगायचे आहे म्हणा,तथापि काही निश्र्चय करून ठेवला पाहिजे)

समर्थापासीं बहुत जन । राहिला पाहिजे साभिमान । निश्र्चळ करूनियां मन । लोक असती ॥ ११ ॥

थोरांजवळ पुष्कळ लोक असतात.त्यांच्याशिवाय आपलेपणा राहिला-राखला पाहिजे म्हणजे तेही निश्र्चळ मन करून (एकनिष्ठेने राहतात.) तेही चंचळपणा सोडून कायमचे राहतात.)

म्लेच दुर्जन उदंड । बहुतां दिसाचें माजलें बंड । याकार्णें अखंड । सावधान असावें ॥ १२ ॥

हे म्लेच्छ अतिशय दुष्ट आहेत.त्यांचे फार दिवसांचे बंड माजले आहे.ह्यासाठी नित्य सावधपणाने असावे.

सकळकर्ता तो ईश्वरु । तेणें केला अंगिकारुं । तया पुरुषाचा विचारु । विरुळा जाणे ॥ १३ ॥

(अंगिकारुं - स्विकार केला)

सर्वकर्ता तो ईश्वर आहे,त्याने ज्या पुरुषाचा अंगीकार केला (म्ह.पक्ष धरिला) त्या पुरुषाचे महत्व (विचार दृष्टी) फार थोड्या लोकांस कळते.

न्याय नीति विवेक विचार । नाना प्रसंगप्रकार । परीक्षिणें परांतर । देणें ईश्वराचें ॥ १४ ॥

(यश किर्तीप्रताप आपल्या कर्तुत्वाचे फळ आहे असे मनात न आणता हे ईश्वराचे देणे आहे असे समजणे योग्य आहे.) न्याय नीतीची आवड असणे विवेक विचार जागृत असणे,प्रसंगानुसार वागता येणे हे सर्व ईश्वराचे देणे आहे.

माहायेत्न सावधपणें । समई धारिष्ट धरणें । अद्भूतचि कार्य करणें । देणें ईश्वराचें ॥ १५ ॥

सावधपणाने अचाट प्रयत्न (महायत्न-मोठाली पराक्रमाची कृत्ये) करणे,वेळेला (प्रसंगी धारिष्ट्य) धैर्य धरणे,अघटित कार्ये करणे (लोकोत्तर कार्ये अंगावर घेऊन पार पाडणे) हे ईश्वराचे देणे आहे.

येश कीर्ति प्रताप महिमा । उत्तम गुणासी नाहीं सीमा । नाहीं दुसती उपमा । देणें ईश्वराचें ॥ १६ ॥

यश किर्ती प्रताप महिमा इतका वाढला आहे की त्याला दुसरी उपमा नाही अगणित उत्तम गुण आंगी आहेत हे ईश्वराचे देणे आहे.

देव ब्राह्मण आचार विचार । कितेक जनासी आधार । सदा घडे परोपकार । देणें ईश्वराचें ॥ १७ ॥

देव ब्राह्मण आचारविचार अनेक लोकांना आश्रय देणे,नित्य परोपकार घडणे.(सर्व काळ परोपकारात निमग्न असणे)

येहलोक परलोक पाहाणें । अखंड सावधपणें राहाणें । बहुत जनाचें साहाणें । देणें ईश्वराचें ॥ १८ ॥

प्रपंच परमार्थ ह्यांचा विचार पाहाणे,अखंड सावधपणे राहाणे अनेक लोकांची उपाधि सोसणे.

देवाचा कैपक्ष घेणे । ब्रह्माणाची चिंता वाहाणें । बहु जनासी पाळणें । देणें ईश्वराचें ॥ १९ ॥

(ब्रह्माणाची - संत सज्जनाची)

देवाचा कैवार घेणे,ब्राह्मणांच्या रक्षणाची काळजी बाळगणे (देवब्राह्मणांचा पक्ष उचलणे),पुष्कळ लोकांचे पालन करणे हे सर्व ईश्वराचे देणे आहे.

धर्मस्थापनेचे नर । ते ईश्वराचे अवतार । जाले आहेत पुढें होणार । देणें ईश्वराचें ॥ २० ॥

धर्मस्थापना करणारे पुरुष ईश्वराचे अवतार होत.असे अवतार मागे झाले,आता आहेत व पुढेही होतील,तथापि असे महात्मे जन्मास येणे हे “ईश्वराचे देणे” आहे.

उत्तम गुणाचा ग्राहिक । तर्क तीक्षण विवेक । धर्मवासना पुण्यश्लोक । देणें ईश्वराचें ॥ २१ ॥

उत्तम गुण ग्रहण करणे (गुणग्राहकात) तीक्ष्ण तर्कबुद्धि व निर्मळ विवेक असणे,धर्माची वासना असणे (जाज्वल्य धर्मबुद्धि) कीर्तिपावन होणे हे पुण्यश्लोकाच्या आंगचे गुण आहेत.ही देवाचीच मागणी आहे.हे ईश्वराचे देणे आहे.

सकळ गुणांमधें सार । तजविजा विवेक विचार । जेणें पाविजे पैलपार । अरत्रपरत्रींचा ॥ २२ ॥

(तजविजा - नियोजन,आधीच योग्य सोय करून ठेवणे)

ज्याच्या योगाने इहलोक व परलोक तरून जाता येईल अशा (ईहालोकाच्या व्यवहाराच्या) तजविजा आणि नित्यानित्यविवेक व सारासार विचार हे गुण सर्व गुणात सारभूत आहेत.(इहलोकीच्या व्यवहाराच्या तजविजा,नित्यानित्यविवेक व सारासारविचार ह्यांच्या योगाने इहलोक व परलोक प्रपंच व परमार्थ-दोन्ही यथार्थ साधणे-हा सर्व गुणात सारभूत गुण होय.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उत्तमपुरुषनिरूपणनाम समास सहावा ॥**

**समास सातवा : जनस्वभावनिरूपण ॥ श्रीराम ॥**

जनाचा लालची स्वभाव । आरंभीं म्हणती देव । म्हणिजे मला कांहीं देव ।ऐसी वासना ॥१॥

लोकांचा स्वभाव मोठा (लालची) लोभी ते प्रथमच देव म्हणतात, तेव्हा मला काही देव म्हणजे मला काही द्यावे ही वासना पोटात असते.

कांहींच भक्ती केली नस्तां । आणी इछिती प्रसन्नता । जैसें कांहींच सेवा न करिता।स्वामीस मागती ॥२ ॥

धन्याची चाकरी मुळीच न करता नोकराने पगार मागावा त्याप्रमाणे देवाची काहीच भक्ति न करता देव प्रसन्न व्हावा अशी इच्छा करतात (देवाची भक्ति न करता देवाचा प्रसाद मागणे वेडेपणाचे होय.

कष्टेंविण फळ नाहीं । कष्टेंविण राज्य नाहीं । केल्याविण होत नाहीं । साध्य जनीं ॥ ३ ॥

कष्ट केल्यापासून - **राज्य** मिळत नाही **फळ** मिळत नाही.जगामध्ये कष्ट केल्यावाचून काहीच साध्य होत नाही.

आळसें काम नासतें । हें तों प्रत्ययास येतें । कष्टाकडे चुकावितें । हीन जन ॥ ४ ॥

आळसाने काम बिघडते.(कार्यभाग नासून जातो.) हा तर प्रत्यक्ष अनुभव आहे.क्षुद्र माणसे कष्ट करण्याची टाळाटाळ करतात.

आधीं कष्टाचें दुःख सोसिति। ते पुढें सुखाचें फळ भोगिती ।आधीं आळसें सुखावती । त्यास पुढें दुःख॥५॥

जे अगोदर श्रम करण्याचे दु:ख सहन करतात त्यांना पुढे सुखरूपी फळ चाखावयास मिळते.आणि अगोदर आळसातच सुख मानतात.त्यांना पुढे दु:ख भोगावे लागते.(कष्टाचे दु:ख भोगल्यानंतर सुखाचे फळ मिळते,जे आधी आळसाने सुखावतात त्यांना पुढे दु:खच भोगावे लागते.)

येहलोक अथवा परलोक । दोहिंकडे सारिखाचि विवेक । दीर्घ सूचनेचें कौतुक । कळलें पाहिजे ॥ ६ ॥

इहलोक असो परलोक असो दोन्हीकडे (प्रपंचात अथवा परमार्थात दोन्हीकडे) विवेकसारखाच पाहिजे.दूरदर्शीपणाने वागण्यात काय आनंद असतो हे कळले पाहिजे (दीर्घसूचना-पुढे होणारे आधी कळले पाहिजे.)

मेळविती तितुकें भक्षिती । ते कठीण काळीं मरोन जाती । दीर्घ सूचनेनें वर्तती । तेचि भले ॥ ७ ॥

जेवढे मिळवतात तेवढे,जेव्हाचे तेव्हाच खाऊन टाकतात.ते लोक कठिण प्रसंगी मरून जातात.(त्यांना मरायची पाळी येते.) म्हणून दूरवर विचार करून (दीर्घसूचनेने) वागतो,तेच शहाणे खरे

येहलोकींचा संचितार्थ । परलोकींचा परमार्थ । संचितेंविण वेर्थ । जीत मेलें ॥ ८ ॥

इहलोकासाठी धन-धान्यादि संचय पाहिजे आणि परलोकासाठी परमार्थ जोडला पाहिजे संचितावाचून (इहलोकासाठी संग्रह असल्यावाचून आणि परलोकासाठी पूर्वपुण्याईचा साठा असल्यावाचून) व्यर्थ होय.मनुष्य जिवंत असून मेल्यासारखा तो!

येकदां मेल्यानें सुटेना । पुन्हा जन्मोजन्मीं यातना । आपणास मारी वांचविना । तो आत्महत्यारा ॥ ९ ॥

एकदा मरून भागत नाही,गर्भवासादिकांच्या यातना पुन्हा जन्मोजन्मी भोगाव्याच लागतात,ह्या प्रत्येक जन्ममरणातून जो आपणास वाचवीत नाही तर मारून टाकतो तो आत्मघातकी

प्रतिजन्मीं आत्मघात । कोणें करावें गणीत । याकारणें जन्ममृत्य । केवी चुके ॥ १० ॥

दर जन्मात हा असा आत्मघात होत आला आहे किंवा होईल त्याची मोजदात कोणाला करता येईल? ह्यासाठी हे जन्ममृत्यु कसे चुकतील ह्याचा विचार करावा (प्रत्येक जन्मी आत्मघात करतो ह्याला काय म्हणावे? म्हणून जन्ममरणाच्या यातना कशा चुकतील ह्याचा विचार करावा?)

देव सकळ कांहीं करितो । ऐसें प्राणीमात्र बोलतो । त्याचे भेटीचा लाभ तो । अकस्मात जाला ॥ ११ ॥

देव सर्व करतो असे प्रत्येक जण म्हणतो,ह्याने त्याच्या भेटीचा लाभ का एकदम होणार आहे?(सर्व काही देव करतो असे सर्व काही बोलतात पण त्यादेवाचा लाभ जोडला पाहिजे)

विवेकाच लाभ घडे । जेणें परमात्मा ठाईं पडे । विवेक पाहातां सांपडे । विवेकीं जनीं ॥ १२ ॥

विवेकाचा लाभ झाला म्हणजे परमात्मा प्राप्त होतो.(विवेकाच्या योगाने परमात्मा जोडतो.) शोध घेतला असता विवेकी पुरुषाजवळ विवेक सापडतो.

देव पाहातां आहे येक । परंतु करितो अनेक । त्या अनेकास येक । म्हणों नये कीं ॥ १३ ॥

वस्तुतः देव एक आहे,पण तो अनेक देव-देवता उत्पन्न करतो त्या अनेकांचा एक (मुख्य देव) म्हणू नये.(देव आहे एक व त्यापासून अनेक होतात पण अनेक म्हणजेच एक नव्हे,एक ओळखला पाहिजे.)

देवाचें कर्तुत्व आणि देव । कळला पाहिजे अभिप्राव । कळल्याविण कितेक जीव । उगेच बोलती ॥ १४ ॥

देव (अंतरात्मा) व देवांचे कर्तुत्व ह्यातील अंतर किंवा रहस्य कळले पाहिजे ते न कळताच कित्येक लोक उगाच काहीतरी बोलत असतात (देव कळल्याशिवाय लोक देवाबद्दल उगीच बोलत असतात.)

उगेच बोलती मूर्खपणें । शाहाणपण वाढायाकारणें । त्रुप्तिलागीं उपाव करणें । ऐसें जालें ॥ १५ ॥

(त्रुप्तिलागीं - केवळ समाधान राहावे यासाठीचा उपाय)

शहाणपण मिरवण्यासाठी मूर्ख लोक उगीच काहीतरी मूर्खपणाने बोलत असतात,क्षुधेच्या तृप्तीसाठी भोजनाखेरीज दुसरा उपाय करणे अशातलाच उपाय आहे (भोजन झाल्यावर तृप्ती सहजच होते.तसेच शहाणपण शिकल्यावर ते सहजच आंगी येते.ते मिरवावे लागत नाही.) तृप्तीसाठी उपाय म्हणजे कष्ट केले पाहिजेत हे उघड आहे.

जेहीं उदंड कष्ट केले । ते भाग्य भोगून ठेले । येर ते बोलतचि राहिले । करंटे जन ॥ १६ ॥

ज्यांनी खूप कष्ट केले,ते भाग्य भोगून गेले,बाकीचे करंटे लोक बडबडतच बसले (कष्ट करणारे भाग्य भोगून जातात. व करंटे बोलतच राहातात.)

करंट्याचें करंट लक्षण । समजोन जाती विचक्षण । भल्याचें उत्तम लक्षण । करंट्यास कळेना ॥ १७ ॥

करंट्याचा करंटपणा कशात आहे.हे शहाणे लोक ओळखतात पण शहाण्याचे शहाणपण कशात आहे हे मात्र करंट्यास कळत नाही.

त्याची पैसावली कुबुद्धी । तेथें कैंची असेल शुद्धी । कुबुद्धी तेचि सुबुद्धी । ऐसी वाटे ॥ १८ ॥

कारण त्याची दुर्बुद्धिच वाढलेली असते.तीच त्याला सदबुद्धि असे वाटते.दुर्बुद्धि वाढल्यावर शुद्धि कोणती (कोठून) असणार?

मनुष्य शुद्धीस सांडावें । त्याचें काये खरें मानावें । जेथें विचाराच्या नावें । सुन्याकार ॥ १९ ॥

ज्या मनुष्याची शुद्धि गेली,ज्याच्या ठिकाणी विचाराच्या नावाने पूज्य त्याचे काय खरे मानावे?

विचारें येहलोक परलोक । विचारें होतसे सार्थक । विचारें नित्यानित्य विवेक । पाहिला पाहिजे ॥ २० ॥

विचारानेच इहलोक व परलोक साधतात.विचारानेच सार्थक होते नित्य काय व अनित्य काय ह्याचा विवेक केला पाहिजे (विचाराने इहलोक व परलोक साधतात,विचाराने नित्यानित्यविवेक पाहावा.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे जनस्वभावनिरूपणनाम समास सातवा ॥**

### समास आठवा : अंतर्देवनिरूपण॥ श्रीराम ॥

ब्रह्म निराकार निश्चळ । आत्म्यास विकार चंचळ । तयास म्हणती सकळ । देव ऐसें ॥ १ ॥

ब्रह्म निराकार (निर्विकार) आणि निश्चळ आहे आणि आत्मा (अंतरात्मा) सविकार व चंचळ आहे आत्म्यासच सर्व जण देव म्हणतात.

देवाचा ठावचि लागेना । येक देव नेमस्त कळेना । बहुत देवीं अनुमानेना । येक देव ॥ २ ॥

(बहुत देवीं अनुमानेना - अनेक देवांच्या मागे लागून परब्रह्म गवसत नाही)

देवाचा पत्ताच लागत नाही (देवाचा निश्र्चय होत नाही) खरोखर एकच देव (अंतरात्मा) आहे हे निश्र्चयेकरून कळत नाही व अनेक देवांच्या गडबडीत एक देव कोणता ह्याचा निर्णय होत नाही.

म्हणोनी विचार असावा । विचारें देव शोधावा । बहुत देवांचा गोवा । पडोंचि नये ॥ ३ ॥

म्हणून विचाराने मुख्य देवाचा शोध घ्यावा,अनेक देवांच्या गोंधळात (गोंवा) पडूच नये.

देव क्षत्रीं पाहिला । त्यासारिखा धातूचा केला । पृथ्वीमधें दंडक चालिला । येणें रीतीं ॥ ४ ॥

(क्षत्रीं - तिर्थक्षेत्री)

क्षेत्रामध्ये जो देव पाहिला,त्याच्यासारखा धातूचा देव केला (लोक त्याची पूजाअर्चा करितात.) जगातील रूढी अशा प्रकारे चालली आहे.

नाना प्रतिमादेवांचें मूळ । तो हा क्षत्रदेवचि केवळ । नाना क्षत्रें भूमंडळ । शोधून पाहावें ॥ ५ ॥

अनेक प्रतिमांच्या देवाचे मूळ हा क्षेत्रदेव (देहरूपी क्षेत्रातला आत्मा) आहे जगातील अनेक क्षेत्रे (देह) शोधून पाहा म्हणजे तो अंतरात्मा कळेल.

क्षत्रदेव पाषाणाचा । विचार पाहातां तयाचा । तंत लागला मुळाचा । अवताराकडे ॥ ६ ॥

(तंत लागला - धागा जोडला)

क्षेत्रातील देव पाषाणाचा असतो,त्याचा विचार पाहिला असता त्याच्या मूळाचा धागा अवताराकडे पोहोचतो (पाषाण मूर्तीचा विचार पाहतां तिचे मूळ कोणत्यातरी अवताराकडे असते.)

अवतारी देव संपले । देहे धरुनी वर्तोन गेले । त्याहून थोर अनुमानले । ब्रह्मा विष्णु महेश ॥ ७ ॥

अवतारी देव निजधामाला गेले,ते जगामध्ये देह धरूनच वागले (कार्य होताच मूळ रुपात गेले) त्यांच्यापेक्षा ब्रह्मदेव,विष्णु व शंकर हे थोर आहेत अशी कल्पना आहे.

त्या तिही देवांस ज्याची सत्ता । तो अंतरात्माचि पाहातां । कर्ता भोक्ता तत्वता । प्रत्यक्ष आहे ॥ ८ ॥

ह्या तिन्ही देवांवर ज्याची सत्ता आहे तो अंतरात्माच होय.वास्तविक कर्ता भोक्ता तोच हे उघड आहे.

युगानयुगें तिन्ही लोक । येकचि चालवी अनेक । हा निश्चयाचा विवेक । वेदशास्त्रीं पाहावा ॥ ९ ॥

युगानुयुगे तो एकटाच त्रैलोक्य चालवीत आहे.वेद्शास्त्रात असे निश्चयात्मक सांगितले आहे ते पाहावे (असाच वेदशास्त्रांनीही निश्चय करून ठेवला आहे.)

आत्मा वर्तवितो शरीर । तोचि देव उत्तरोत्तर । जाणीवरूपें कळिवर । विवेकें वर्तवी ॥ १० ॥

जो आत्मा शरीराला वागवितो तोच पुढे पुढे चढत्या पायरीने देव समजला जातो. जाणीवरूप विवेकाने तोच शरीराला वागवितो ( जाणीवरूप विवेकाने शरीर वर्तविणारा अंतरात्मा हा देवच होय.)

तो अंतर्देव चुकती । धांवा घेऊन तीर्था जाती । प्राणी बापुडे कष्टती । देवास नेणतां ॥ ११ ॥

हा अंतर्देव लोक विसरतात आणि धावपळ करीत तीर्थाला जातात.देवाला न ओळखता बिचारे प्राणी उगाच श्रम करीत असतात.(हा अंतर्देव न जाणता देव पाहावा म्हणून तीर्थक्षेत्राकडे बापडे लोक धावत असतात.)

मग विचारिती अंतःकर्णी । जेथें तेथें धोंडा पाणी । उगेंचि वणवण हिंडोनि । काये होतें ॥ १२ ॥

(यात्रा करून करून भागले म्हणजे) मग मनाशी विचार करितात की ( खरेच,हरएक तीर्थक्षेत्रांच्या ठिकाणी) जेथे जावे तेथे धोंडा आणि पाणी ह्याशिवाय काय आहे? उगीच वणवण हिंडल्याने काय लाभ?

ऐसा ज्यासी विचार कळला । तेणें सत्संग धरिला । सत्संगें देव सांपडला । बहुत जनासी ॥ १३ ॥

(असा विचार करून ते सतसंग धरितात आणि सत्संगाने बहुत जनास देव सापडला आहे.) हा विचार ज्याच्या मनाला पटला ते सत्संगति धरतात संतसंगतीने अनेक जणांना देव मिळाला आहे.

ऐसीं हे विवेकाचीं कामें । विवेकी जाणतील नेमें । अविवेकी भुलले भ्रमें । त्यांस हें कळेना ॥ १४ ॥

अशी ही कामे विवेकाची आहेत,ती विवेकी पुरुषांना खात्रीने कळतात आणि अविवेकी लोकांना भ्रांतीने भूल पडल्यामुळे हे कळत नाही (ही विवेकाची कामे विवेकी जाणतात मूढाला भ्रमातच घोटाळतात.)

अंतरवेधी अंतर जाणे । बाहेरमुद्रा कांहींच नेणें । म्हणोन विवेकी शाहणे । अंतर शोधिती ॥ १५ ॥

(बाहेरमुद्रा - बहिर्मुखी)

अंतर्मुख पुरुष अंतःकरण जाणतो व बहिर्मुखाला काही कळत नाही म्हणून विवेकी शहाणे-सुज्ञ माणसे अंतःकरणचा शोध घेतात.

विवेकेंविण जो भाव । तो भावचि अभाव । मुर्खस्य प्रतिमा देव । ऐसें वचन ॥ १६ ॥

(मुर्खस्य प्रतिमा देव - भाव नसेल तर मूर्खांना मूर्ति पुरताच देव असतो)

विवेकावाचून असलेला भाव तो अभावच समजावा "प्रतिमापूजा मूर्खांसाठी" हे वचन प्रसिद्धच आहे.

पाहात समजत सेवटा गेला । तोचि विवेकी भला । तत्वें सांडुनी पावला । निरंजनीं ॥ १७ ॥

प्रतिमेपासून आरंभ करून (विवेकाने पाहता पाहता) मूळपुरुषापर्यंत विचार करीत समजून घेत जातो तो विवेकी होय.तो मायिक तत्वांचा त्याग करून (मायेपलीकडचे जे ब्रह्म म्ह.) निरंजनपद तेथे जाऊन पोचतो.

आरे जें आकारासी येतें । तें अवघेंच नासोन जातें । मग गल्बल्यावेगळें तें । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥

(गल्बल्यावेगळें - गोंधळापलिकडे)

जे जे आकाराला म्हणून येते ते ते नाश पावते,म्हणून त्या नावारूपाच्या गोंधळाहून परब्रह्म निराळे आहे (परब्रह्म नामरूपादिकांच्या पलिकडले आहे.) हे ध्यानात ठेवावे.

चंचळ देव निश्चळ ब्रह्म । परब्रह्मीं नाहीं भ्रम । प्रत्ययज्ञानें निभ्रम । होईजेतें ॥ १९ ॥

(निभ्रम - भ्रमरहित)

तो अंतरात्मा देव चंचळ आहे आणि परब्रह्म निश्र्चळ आहे त्याच्या ठिकाणी भ्रम नाही,त्याचा अनुभव घेऊन त्या ज्ञानाच्या योगाने संशय रहित भ्रमाच्या पार व्हावे.

प्रचीतीविण जें केलें । तें तें अवघें वेर्थ गेलें । प्राणी कष्टकष्टोंचि मेलें । कर्मकचाटें ॥ २० ॥

अनुभवावाचून जे जे करावे,ते ते सगळे व्यर्थ जाते आणि त्या कर्माच्या दगदगीसाठी प्राणी मरे-मरेतो कष्ट करतात (ब्रह्मस्थितीचा अनुभव पाहिजे,त्यावाचून केलेली सर्व कर्मे व्यर्थ होत (कर्मकचाट्यात सापडून प्राणी व्यर्थ कष्ट कर-कर करीत राहतात.)

कर्मावेगळें न व्हावें । तरी देवास कासया भजावें । विवेकी जाणती स्वभावें । मूर्ख नेणे ॥ २१ ॥

कर्मावेगळे होता येत नाही तर देवाचे भजन करावयाचे कशाला? विचारी लोकांच्या ते सहज ध्यानात येते. मुर्खाला कळत नाही (कर्मावेगळे व्हावयाचे नाही तर मग देवाच्या उपासनेचे कर्म कशाला करावयाचे?)

कांहीं अनुमानलें विचारें । देव आहे जगदांतरें । सगुणाकरितां निर्धारें । निर्गुण पाविजे ॥ २२ ॥

(विचाराने काहीसे कळले की देव जगाच्या अंतरी आहे) देव जगदांतरात आहे असे विचाराच्या योगाने काहीसे अनुमान झाले म्हणजे पुढे सगुणाच्या आधाराने निर्गुणाची प्राप्ती खात्रीने होते.(निश्चळ ब्रह्मपद पावता येते.)

सगुण पाहातां मुळास गेला । सहजचि निर्गुण पावला । संगत्यागें मोकळा जाला । वस्तुरूप ॥ २३ ॥

सगुण पाहता पाहता मूळापर्यंत गेला म्हणजे सहजच निर्गुणाची प्राप्ती होते.(निर्गुणपद प्राप्त होते.) अहंभावाचा संग सुटला म्हणजे मुक्त असा तो ब्रह्मस्वरूप होतो.(सगुणाचाही संग सोडून निर्गुणपद पहाता येते.)

परमेश्वरीं अनुसंधान । लावितां होईजे पावन । मुख्य ज्ञानेंचि विज्ञान । पाविजेतें ॥ २४ ॥

परमेश्वराचे (अंतरात्म्याचे) अनुसंधान लावल्याने जीव पावन होतो,हेच मुख्य ज्ञान व ह्याच्याच योगाने विज्ञान म्हणजे निर्गुणपद प्राप्त होते.

ऐसीं हे विवेकाचीं विवर्णे । पाहावीं सुचित अंतःकर्णे । नित्यानित्य विवेकश्रवणें । जगदोद्धार ॥ २५ ॥

असे हे विवेकाचे विवरण आहे ह्याचा एकाग्र चित्ताने विचार करावा.नित्यानित्यविवेक ऐकल्याने जगाचा (लोकांचा) उद्धार होतो.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे अंतर्देवनिरूपणनाम समास आठवा ॥**

**समास नववा : निद्रानिरूपण ॥ श्रीराम ॥**

वंदूनियां आदिपुरुष । बोलों निद्रेचा विळास । निद्रा आलियां सावकास । जाणार नाहीं ॥ १ ॥

आदिपुरुषाला वंदन करून त्यापासून झालेल्या मायारूप निद्रेचा विलास आता वर्णन करू निद्रा आल्यावर सहसा जात (उडत) नाही.

निद्रेनें व्यापिली काया । आळस आंग मोडे जांभया । तेणेंकरितां बैसावया । धीर नाहीं ॥ २ ॥

निद्रेने शरीर एकदा घेरले की आळस येतो,आंग मोडून येते,जांभया येतात,त्यामुळे बसण्याचे अवसान राहात नाही.

कडकडां जांभया येती । चटचटां चटक्या वाजती । डकडकां डुकल्या देती । सावकास ॥ ३ ॥

(डुकल्या - डुलक्या)

कडकडा जांभया येतात चटाचटा चुटक्या वाजवू लागतात किंवा निद्रावश लोक सावकाशपणे डकाडका डुलक्या देऊ लागतात.

येकाचे डोळे झांकती । येकाचे डोळे लागती । येक ते वचकोन पाहाती । चहुंकडे ॥ ४ ॥

कोणाचे डोळे मिटू लागतात,कोणाला ओझरती झोप येऊ लागते कोणी दचकून चोहोकडे पाहू लागतात.

येक उलथोन पडिले । तिहीं ब्रह्मविणे फोडिले । हुडकाचे टुकडे जाले । शुद्धी नाहीं ॥ ५ ॥

(हुडकाचे - वाद्याचे)

कोणी उलथून पडतात,त्यामुळे विणे फुटून जातात किंवा हुडकाचे (एक प्रकारच्या वाद्याचे ,धिमडीचे ,खंजिरीचे) तुकडे झाले तरी त्यांना त्यांची शुद्ध नसते.(तरी झोपेतल्या माणसांना शुद्ध राहात नाही.)

येक टेंकोन बैसले । तेथेंचि घोरों लागले । येक उताणे पसरलें । सावकास ॥ ६ ॥

एक जेथे टेकून बसतात तेथेच घोरू लागतात.कोणी खूशाल हातपाय ताणून उताणे पसरतात.

कोणी मुर्कुंडी घालिती । कोणी कानवडें निजती । कोणी चक्रीं फिरती । चहुंकडे ॥ ७ ॥

कोणी गूडघ्यात डोके (मुर्कुंडी) घालून बसतात,कोणी कुशीवर (कानवडे)निजतात,कोणी चाकासारखे गरगर फिरतात.

येक हात हालविती । येक पाये हालविती । येक दांत खाती । कर्कराटें ॥ ८ ॥

कोणी हात हलवितात,कोणी पाय हलवितात.कोणी तर करकरा दात खातात.

येकांचीं वस्त्रें निघोनि गेलीं । ते नागवींच लोळों लागलीं । येकाचीं मुंडासीं गडबडलीं । चहुंकडे ॥ ९ ॥

कोणाची वस्त्रे सुटून ते नागवेच लोळत असतात.कोणाची पागोटी(मुंडासी) खाली पडून चोहोकडे गडबडत जात असतात.

येक निजेलीं अव्यावेस्तें । येक दिसती जैसीं प्रेते । दांत पसरुनी जैसीं भूतें । वाईट दिसती ॥ १० ॥

कोणी अव्यवस्थित निजलेली असतात,कोणी मढ्यासारखे पडतात,कोणाचे दांत पसरलेले असतात ते भुतासारखे विचित्र दिसतात.

येक वोसणतचि उठिले । येक अंधारीं फिरों लागले । येक जाऊन निजेले । उकरड्यावरी ॥ ११ ॥

(वोसणतचि - ओरडतात,बडबडतात)

कोणी बरळतच (वोसणत) उठतात,कोणी अंधारातच हिंडू लागतात.कोणी तर उकिरड्यावर जाऊन निजतात.

येक मडकीं उतरिती । येक भोई चांचपती । येक उठोन वाटा लागती । भलतीकडे ॥ १२ ॥

(भोई - जमीन)

कोणी मडक्याच्या उतरंडी उतरतात,कोणी भुई चाचपून पाहतात,कोणी उठून भलत्याच वाटेला लागतात.

येक प्राणी वोसणाती । येक फुंदफुंदों रडती । येक खदखदां हासती । सावकास ॥ १३ ॥

कोणी ओरडत उठतात,कोणी स्फुंदस्फुंदुन रडतात,कोणी खुशाल खदाखदा हसू लागतात.

येक हाका मारूं लागले । येक बोम्बलित उठिले । येक वचकोन राहिले । आपुले ठाईं ॥ १४ ॥

कोणी हाकां मारीत सुटतात,कोणी बोंबलत उठतात,कोणी भिऊन आपल्याच ठिकाणी गप्प बसतात.

येक क्षणक्षणा खुरडती । येक डोई खाजविती । येक कढों लागती । सावकास ॥ १५ ॥

(कढों - कण्हू लागतात)

कोणी वरचेवर खुरडत असतात,कोणी डोके खाजवितात,कोणी खुशाल (कढो) कण्हत असतात.

येकाच्या लाळा गळाल्या । येकाच्या पिका सांडल्या । येकीं लघुशंका केल्या । सावकास ॥ १६ ॥

(पिका - थुंकी, लघुशंका - लघवी)

कोणाची लाळ गळते,कोणी पीक टाकतो,कोणी खुशाल लघवी करतो.

येक राउत सोडिती । येक कर्पट ढेंकर देती । येक खांकरुनी थुंकिती । भलतीकडे ॥ १७ ॥

(राउत -अपान वायु सोडतात.)

कोणी अपानवायु (राऊत) सोडतात,कोणी करपट ढेकर देतात.कोणी खाकरून भलतीकडेच थुंकतात.

येक हागती येक वोकिती । येक खोंकिती येक सिंकिती । येक ते पाणी मागती । निदसु-यास्वरें ॥ १८ ॥

(निदसु-या - अर्धवट झोपेत.)

कोणी हगतात,कोणी ओकतात,कोणी शिंकतात कोणी अर्धवट झोपेत पाणी मागत असतात.

येक दुस्वप्नें निर्बुजले । येक सुस्वप्नें संतोषले । येक ते गाढमुढी पडिले । सुषुप्तिमधें ॥ १९ ॥

(गाढमुढी - गाढ झोपेत)

कोणी दुष्ट स्वप्नामुळे (निर्बुजले) घाबरून जातात,तर कोणाला चांगल्या स्वप्नामुळे संतोष होतो आणि कोणी झोपेमध्ये अगदी गाढंमूढ (गर्क होऊन) पडलेले असतात.

इकडे उजेडाया जालें । कोण्हीं पढणें आरंभिलें । कोणीं प्रातस्मरामि मांडिलें । हरिकिर्तन ॥ २० ॥

इकडे उजाडण्याची वेळ झाली,कोणी पाठांतर सुरू केले,कोणी प्रात:स्मरण करू लागले,कोणी अनेक तऱ्हेच्या पाठांतराची उजळणी करू लागले. तर कोणी भगवद्गुणानुवाद गाऊ लागले.

कोणीं आठविल्या ध्यानमूर्ति । कोणी येकांतीं जप करिती । कोणी पाठांतर उजळिती ।नाना प्रकारें ॥२१॥

कोणी मूर्तीचे ध्यान करू लागले,कोणी एकांतात जप करू लागले,कोणी अनेक तऱ्हेच्या पाठांतराची उजळणी करू लागले.

नाना विद्या नाना कळा । आपलाल्या सिकती सकळा । तानमानें गायेनकळा । येक गाती ॥ २२ ॥

अनेक प्रकारच्या विद्या व कला शिकणारे आपापल्या विद्या शिकू लागले,तानमानादिकरून कोणी गान आरंभिले.

मागें निद्रा संपली । पुढें जागृति प्राप्त जाली । वेवसाईं बुद्धी आपुली । प्रेरिते जाले ॥ २३ ॥

पूर्वीच्या निद्रा संपून पुढे जागृति आल्यावर लोक आपापल्या उद्योगधंद्याचा ह्याप्रमाणे विचार करू लागले (उद्योगात निमग्न झाले-मायेची निद्रा संपून स्वरूपी जागा झालेला साधकही साधनमार्गात निरत झाला.)

ज्ञाता तत्वें सांडून पळाला । तुर्येपैलिकडे गेला । आत्मनिवेदनें जाला । ब्रह्मरूप ॥ २४ ॥

पण ज्ञानी असतो तो सर्व तत्वे टाकून देऊन तुर्येच्या पलीकडे पळून जातो आणि आत्मनिवेदनाच्या योगाने ब्रह्मस्वरूप होतो.(तत्वांचा विचार करून व तत्व ओळखून ज्ञाता तुर्यावस्थेच्या पलीकडे गेला,परेहून परता झाला व आत्मनिवेदनभक्तीने ब्रह्मरूप झाला.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे निद्रानिरूपणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : श्रोताअवलक्षणनिरूपण॥ श्रीराम ॥**

कोणीयेका कार्याचा साक्षेप । कांहीं तऱ्ही घडे विक्षेप ।काळ साहे तें आपेंआप । होत जातें ॥१ ॥

(काळ साहे - काळाचे सहाय्य असले म्हणजे)

(कोणतेही कार्य आंगावर घेऊन मनुष्य उद्योग करू लागला म्हणजे काहीतरी त्याच्या आड ( विक्षेप- विमनस्कता) विघ्न येतेच.तथापि काळ अनुकूल (साह्य) असला की ते कार्य अनायासे होऊन जाते.) कोणत्याही कार्याचा उद्योग करू लागले म्हणजे काहीतरी विघ्न आड येते,तथापि काळ साह्य असला म्हणजे ते सहजच पार पडते.

कार्यभाग होत चालिला । तेणें प्राणी शोक जाला । विचारहि सुचों लागला । दिवसेंदेवस ॥ २ ॥

(शोक जाला - षौकीन सुखी झाला.)

कार्यभाग होऊ लागला म्हणजे प्राण्याला हुरूप (शोक) येतो व दिवसेंदिवस विचारही सुचू लागतो.(कार्य यशस्वी होत चालले की मनुष्य शोक (विशोक-शोकरहित,सुखी,अथवा शोक म्ह.उल्हास,उत्साह) म्ह. सुखी- उत्साहभरित होतो व तेणेकरून त्याची विचारशक्तिही वाढते.)

कोणीयेक प्राणी जन्मासी येतो ।कांहीं तऱ्ही काळ साहे होतो । दुःखाउपरी सुख देतो ।देव कृपाळुपणें ॥३॥

कोणताही प्राणी जो जन्माला येतो,त्याला काहीतरी काळ अनुकूल असतोच,कृपाळूपणाने देव त्याला दुःखामागून सुख देतोच.

अवघाचि काळ जरी सजे । तरी अवघेचि होती राजे । कांहीं सजे कांहीं न सजे । ऐसें आहे ॥ ४ ॥

(काळ जरी सजे - काळ जरी अनुकूल होईल)

साराच काळ अनुकूल असेल (रुजे) तर सगळेच राजे होतील म्हणून काही अनुकूल काही प्रतिकूल काळ असतो.

येकलोक अथवा परलोक । साधतां कोणीयेक विवेक । अद्भूत होये स्वाभाविक । देणें ईश्वराचें ॥ ५ ॥

(स्वाभाविक - निसर्गतः)

इहलोक किवा परलोक ह्यापैकी कोणताही,विवेकाने साध्य करून घेताना सहजगत्या काहीतरी अद्भुत होते.पण ती ईश्वरी कृपा होय (ती एखाद्यालाच व्हावयाची) (मुख्य विवेक जर प्रपंचात आणि परमार्थात जागृत राहील तर ईश्वरी कृपेने काहीतरी अद्भुत होऊन जाते.)

ऐकल्याविण कळलें । शिकल्याविण शहाणपण आलें । देखिलें ना ऐकिलें । भूमंडळीं ॥ ६ ॥

(बाकी सर्वांचे असे आहे की) ह्या जगामध्ये कोणाला ऐक्ल्यावाचून कळले व शिकविल्यावाचून शाहाणपण आले असे कधी पाहिले नाही व ऐकलेही नाही.

सकळ कांहीं ऐकतां कळे । कळतां कळतां वृत्ति निवळे । नेमस्त मनामधें आकळे । सारासार ॥ ७ ॥

ऐकता ऐकता सर्व काही कळत जाते कळात कळता वृत्ति निवळत (शुद्ध होत) जाते. आणि वृत्ति निवळता निवळता मनाचे संयमन होऊन त्याला सारासार विचार आकलन करता येऊ लागतो.

श्रवण म्हणिजे ऐकावें । मनन म्हणिजे मनीं धरावें । येणें उपायें स्वभावें । त्रैलोक्य चाले ॥ ८ ॥

श्रवण म्हणजे ऐकणे व मनन म्ह.ध्यानात (ठेवणे) धरणे-विचार करणे ह्या उपायांच्या योगाने त्रैलोक्याचा व्यवहार-कारभार-सहजगत्या चालला आहे.

श्रवणाआड विक्षेप येती । नाना जिनस सांगो किती । सावध असतां प्रत्यय येती । सकळ कांहीं ॥ ९ ॥

आता श्रवणाच्या आड विक्षेप करणाऱ्या अनेक गोष्टी आहेत त्या किती सांगाव्या?(त्यांचा विचार सांगतो तो सावधपणे पाहता कळून येईल) सावध असले म्हणजे सर्व अनुभव येतात.

श्रवणीं लोक बैसले । बोलतां बोलतां येकाग्र जाले । त्याउपरी जे नूतन आले । ते येकाग्र नव्हेती ॥ १० ॥

आरंभापासून ऐकावयास बसलेले लोक (श्रवणाला आरंभापासून जे श्रोते येतात ते निरुपणी एकाग्र होतात.) भाषण ऐकता ऐकता एकाग्र होऊन जातात पण त्यांच्या मागून नवीन येतात ते एकाग्र होत नाहीत.

मनुष्य बाहेर हिंडोनि आलें । नाना प्रकारीचें ऐकिलें । उदंड गलबलूं लागलें । उगें असेना ॥ ११ ॥

अनेक प्रकारचे (अनेक गोष्टी) ऐकून मनुष्य,बाहेर हिंडून आलेले असते.(त्याच्या मनात त्या घोळत असतात.) ते गप्प बसत नाही,फार फार बडबड करू लागते.

प्रसंग पाहोन चालती । ऐसे लोक थोडे असती । श्रवणीं नाना विक्षेप होती । ते हे ऐका ॥ १२ ॥

प्रसंग पाहून वागणारे लोक फार थोडे असतात श्रवणामध्ये अनेक (विक्षेप) विघ्ने येतात.तीही ऐका.

श्रवणीं बैसले ऐकाया । अडों लागलीसें काया । येती कडकडां जांभया । निद्राभरें ॥ १३ ॥

ऐकण्यासाठी म्हणून कोणी आलेले असतात त्यांच्या ऐकण्यात त्यांचे शरीर अडचण करू लागते.(श्रवणी ऐकायला बसले तर निट बसायला जागा न मिळाल्याने कित्येकांना अडचणीच्या जागी बसावे लागते.निद्रेचा अम्मल होऊन जांभया येतात.) कोणाला झोपेमुळे कडकडा जांभया येऊ लागतात.

बैसले सुचित करूनि मना । परी तें मनचि ऐकेना । मागें होतें ऐकिलें नाना । तेंचि धरुन बैसलें ॥ १४ ॥

कोणी मनाला स्थिर करून ऐकावयास बसतात पण ते मनच ऐकत नाही,पूर्वी त्याने जे अनेक प्रकारचे ऐकलेले असते.तेच ते मन धरून बसते.(व अनंत कल्पना करून राहते.)

तत्पर केलें शरीर । परी मनामधें आणीक विचार । कल्पना कल्पी तो विस्तार । किती म्हणौनि सांगावा ॥ १५ ॥

कोणी ऐकण्यासाठी शरीर तत्पर ठेवतो पण मनात दुसराच विचार चालतो कल्पना जो पसारा मांडते तो किती म्हणून सांगावा?

जें जें कांहीं श्रवणीं पडिलें । तितुकें समजोन विवरलें । तरीच कांहीं सार्थक जालें । निरूपणीं ॥ १६ ॥

जे जे काही कानावर पडते ते ते समजून घेऊन त्याचे विवरण केले (त्याचे मनन झाले) तरच निरुपणात बसल्याचे काही सार्थक होईल (तरच त्याचा उपयोग होतो)

मन दिसतें मां धरावें । ज्याचें त्यानें आवरावें । आवरून विवेकें धरावें । अर्थांतरीं ॥ १७ ॥

बरे,मग ही काही दृश्य वस्तु नाही की ती धरून ठेवता येईल ! म्हणून मन हे ज्याचे त्यानेच आवरले पाहिजे आणि मन आवरून धरून विवेकाच्या योगाने त्याला विवेकाच्या आंत (विवेकाच्या अंतरी) शिरकवावे.

निरूपणीं येऊन बैसला । परी तो उदंड जेऊन आला । बैसतांच कासाविस जाला । त्रुषाकांत ॥ १८ ॥

निरुपण ऐकावयास बसला पण यथेच्छ जेवून आला असल्यामुळे बसताक्षणीच तहानेने घाबरा झाला.

आधीं उदक आणविलें । घळघळां उदंड घेतलें । तेणें मळमळूं लागलें । उठोनि गेला ॥ १९ ॥

म्हणून अगोदर पाणी आणविले व घटाघटा रगड पिऊन घेतले,त्यामुळे मळमळू लागले म्हणून उठून गेला.

कर्पट ढेंकर उचक्या देती । वारा सरतां मोठी फजिती । क्षणक्षणा उठोनी जाती । लघुशंकेसी ॥ २० ॥

कोणी कर्पट ढेकरा देतात, कोणी उचक्या देतात,वायू सरल्याने कोणाची मोठी फजिती होते,कोणी क्षणोक्षणी लघवीला उठून जातात.

दिशेनें कासावीस केला । आवघेंचि सांडून धांविला । निरूपणप्रसंगीं निघोन गेला । अखंड ऐसा ॥ २१ ॥

कोणाला शोच्याची घाई लागल्याने (दिशेने) सगळे टाकून पळावे लागते.(परसाकडे धावतात.) अशाप्रकारे (अतिआहार केल्याने दुष्परिणाम प्रकट होऊन) निरूपणाचा रंग भरत असतानाही त्याला उठून जावे लागते.

दृष्टांती कांहीं अपूर्व आलें । अंतःकर्ण तेथेंचि राहिलें । कोठवरी काये वाचिलें । कांहीं कळेना ॥ २२ ॥

दृष्टांतामध्ये काही चमत्कारिक गोष्ट आली तर एखाद्याचे मन तेथेच लागून राहते,त्यामुळे कोठपर्यंत काय वाचले (कोठवर निरुपण आले) ते कळत नाही (-तेही तो विसरून जातो.)

निरूपणीं येऊन बैसला । तो विंचुवें फणकाविला । कैचें निरूपण जाला । कासावीस ॥ २३ ॥

एखाद्या निरुपणात येऊन बसतो तो त्याला विंचू फणका मारतो,मग कसचे निरुपण? तो तळमळू लागतो. (तो गेला मंत्रौषधि पाहायला)

पोटामधें तिडिक उठिली । पाठीमधें करक भरली । चालक चिखल्या पुळी जाली । बैसवेना ॥ २४ ॥

(करक - उसण)

कोणाच्या पोटात तिडीक उठते,कोणाच्या पाठीत लचक (करक) भरते,कोणाला फोड,कोणाला चिखल्या,कोणाला पुळ्या झाल्यामुळे बसवत नाही.

पिसोळा चाऊन पळाला । तेणें प्राणी दुश्चित जाला । कोणें नेटें गल्बला केला । तेथेंचि धावें ॥ २५ ॥

एखाद्याला पिसोळाच चावून पळतो,त्यामुळे कोणी व्यग्र (चंचलचित्त) होतो किंवा आसपास जोराने मोठ्याने काही गलबला झाला (ऐकू आला) तर तिकडेच एखादा धावून जातो.

विषई लोक श्रवणीं येती । ते बायेकांकडेच पाहाती । चोरटे लोक चोरून जाती । पादरक्षा ॥ २६ ॥

(विषई - विषयासक्त)

विषयी लोक श्रवणाला येतात ते बायकांकडेच पाहात बसतात.चोरटे येतात ते जोडे चोरून घेऊन जातात.(चोरट्यां लोकांची नजर कोऱ्या जोडयांवर असते)

होये नव्हे वादवेवाद । तेणें उदंड जाला खेद । सिव्या गाळी अप्रमाद । होतां चुकला ॥ २७ ॥

(कोठे कोठे हा अर्थ, नव्हे हा अर्थ,असे नव्हे तसे इ.बोलचाली श्रोत्यात होऊन शिवीगाळी-मारामारीपर्यंत प्रकरण चिडीस जाते.) एखाद्या वेळी आहे असे नाही असा वादविवाद माजवून शिव्या-गाळीपर्यंत पाळी येते.अप्रमाद म्हणजे अतिप्रसंग किवा मारामारी व्हावयाची पण थोडक्यात निभावते त्यामुळे मनाला फार खिन्नता येते.

कोणी निरूपणीं बैसती । सावकस गोष्टी लाविती । हरिदास ते रें रें करिती । पोटासाठीं ॥ २८ ॥

कोणी श्रोते निरुपण ऐकावयास येऊन बसतात व स्वतःच खुशाल गोष्टी बोलत बसतात (पांचट गोष्टी सांगत बसतात व) एकीकडे पोटभरू हरिदासाचे रे रे चाललेलेच असते.

बहुत जाणते मिळाले । येकापुढें येक बोले । लोकांचे आशये राहिले । कोण जाणे ॥ २९ ॥

बरे,जाणते(शाहाणे) श्रोते पुष्कळ मिळाले तर एकाला मागे सारून दुसरा अशा रीतीने अनेक पुढे होऊन बोलू लागतात.(आपापली मते बोलत राहतात.) पण त्यामुळे लोकांचे हेतु (शंका) तसेच राहून जातात,ह्याचा विचार कोण करतो?

माझें होये तुझें नव्हे । ऐसी अखंड जयास सवे । न्याये नीति सांडून धावे । अन्यायाकडे ॥ ३० ॥

माझेच खरे,तुझे खोटे असेच दुराग्रहाने म्हणण्याची एखाद्यास सवय असते. तो न्यायनिती सोडून अन्यायाकडे धावतो.

आपल्या थोरपणासाठीं । अच्यावाच्या तोंड पिटी । न्याये नाहीं ते सेवटीं । परम अन्याई ॥ ३१ ॥

(अच्यावाच्या - बडबड)

कोणी स्वतःच्या थोरपणासाठी (मोठेपणाच्या तोऱ्यात) अच्यावच्या तोंड सोडतो.(बडबडत सुटतो) त्याच्या ठिकाणी न्याय नसतो,तो सरते शेवटी अन्यायी ठरतो.

येकेकडे अभिमान उठे । दूसरेकडे उदंड पेटे । ऐसे श्रोते खरे खोटे । कोण जाणे ॥ ३२ ॥

एखाद्याचा अभिमान खवळतो तर दुसरा क्रोधाने बेभान होतो,अशा श्रोत्यांमध्ये खरा कोण व खोटा कोण ह्याचा निर्णय कसा करावा?(असले श्रोते खरे खोटे काय जाणणार?)( एक अहंकार मदाने बडबडतो,दुसरा क्रोधाने उन्मत्त होतो,असे अनेक प्रकारचे लोक श्रोत्यात असतात,खऱ्या खोट्याचा निवाडा कोणी करावा?)

म्हणोन जाणते विचक्षण । तें आधींच धरिती नेणेपण । मूर्ख टोणपा आपण । कांहींच नाहीं ॥ ३३ ॥

म्हणून विचक्षण म्ह.दूरदर्शी शाहाणे असतात ते अगोदरच स्वतःकडे नेणतेपणा-मूर्खपणा घेतात मीच मूर्ख टोणपा मला काहीच येत (कळत) नाही असे समजतात.

आपणाहून देव थोर । ऐसा जयास कळला विचार । सकळ कांहीं जगदांतर । तेहिं राखावें ॥ ३४ ॥

आपल्यापेक्षा देव (अंतरात्मा) थोर जाणता आहे हा विचार ज्याला समजला,त्याने सर्व जगदंतर (लोकांचे चित्त) सुप्रसन्न ठेविले पाहिजे.

सभेमधें कळहो जाला । शब्द येतो जाणत्याला । अंतरें राखों नाहीं सिकला । कैसा योगी । ३५ ॥

सभेत भांडण झाले तर त्याचा ठपका येतो जाणत्यावर अंतःकरणे राजी राखण्यास शिकला नाही तर तो योगी कसला?( लोकांची मने राखता आली नाहीत तर तो जाणता कसला?)

वैर करितां वैरचि वाढे । आपणास दुःख भोग्णें घडे । म्हणोनि शाहाण्याचे कुकडे । कळों आलें ॥ ३६ ॥

(कुकडे - गूढ विचार)

वैर केल्याने वैरभाव वाढतो व परिणामी आपल्यालाच दुःख भोगावे लागते.मग शहाण्या पुरुषाचे वर्म (कुवाडे) कळून (हे रहस्य शाहाण्याला कळून) चुकलेले असते.

अखंड आपणा सांभळिती । क्षुल्लकपण येऊं नेदिती । थोर लोकांस क्षमा शांति । अगत्य करणें ॥ ३७ ॥

म्हणून ते स्वतःच्या मनोवृत्ति नेहमी कह्यात ठेवतात व हलकेपणा आपल्यावर येऊ देत नाहीत.थोर लोकांनी तर क्षमा-शांति अवश्य धरिली पाहिजे.

अवगुणापासीं बैसला गुणी । आवगुण कळतो तत्क्षणीं । विवेकी पुरुषाची करणी । विवेकें होते ॥ ३८ ॥

अवगुणी माणसापाशी सद्गुणी माणूस बसला तर त्याचा अवगुण चटकन समजतो (लक्षात येतो) विवेकी पुरुषाची वागणूक विवेकपूर्वच होत असते.

उपाये परियाये दीर्घ प्रेत्न । विवेकबळें नाना येत्न । करील तयाचें महिमान । तोचि जाणे ॥ ३९ ॥

(परियाये - पर्याय, महिमान - मोठेपण)

उपायाचे पर्याय (नाना प्रकार) विवेकबळाने अनेक प्रकारचे दीर्घ प्रयत्न करून जो योजतो,त्या पुरुषाचा महिमा तोच (किवा तत्सम) जाणू शकतो.

दुर्जनीं वेवदरून घेतला । बाश्कळ लोकीं घसरिला । विवेकापासून चेवला । विवेकी कैसा ॥ ४० ॥

(वेवदरून - विचार करून बेजार झाला)

दुर्जनांनी वादविवाद करून बेजार केले बाष्कळ लोकांमुळे आपल्या मार्गावरून घसरला आणि विवेकापासून च्युत झाला तर तो विवेकी कसा?(दुर्जनांनी वाद करून बेजार केले किवा बाष्कळ लोकांनी तोंडसुख घेतले अशाही प्रसंगी विवेकापासून च्युत होईल तर तो विवेकी कसला?)

न्याये परियाये उपाये । मूर्खास हें कळे काये । मूर्खाकरितां चिवडा होये । मज्यालसीचा ॥ ४१ ॥

(चिवडा - विचका, मज्यालसी - सभा)

न्याय व अनेक प्रकारचे उपाय हे मूर्खास कसे समजावावेत? मुर्खामुळे तर सभेचा चिवडा होतो.

मग ते शाहाणे नीट करिती । स्वयें साहोन साहविती । स्वयें करून करविती । लोकांकरवीं ॥ ४२ ॥

(साहोन - सहन)

तेव्हा शाहाणे पुरुष सुधारून घेतात व ते स्वतः सहन करतात व सहन करायला लावतात (शिकवितात),स्वतः(थोर) सत्कृत्ये करून लोकांकडून महत्कार्ये करवितात.

पृथ्वीमधें उदंड जन । जनामधें असती सज्जन । जयांकरितां समाधान । प्राणीमात्रासी ॥ ४३ ॥

पृथ्वीमध्ये माणसे पुष्कळ आहेत पण ज्याच्या योगाने प्रणिमात्रांना समाधान होईल असे सज्जन त्यात (थोडे) असतात.

तो मनोगतांचीं आंगें जाणे । मान प्रसंग समये जाणे । संतप्तालागीं निवऊ जाणे । नाना प्रकारें ॥ ४४ ॥

(मनोगतांचीं आंगें - विचारांची दिशा)

सज्जनाला लोकांचे मनोगत राजी राखण्याचे सर्व प्रकार माहीत असतात त्याला काळ-वेळ प्रसंग समजतो (कळतो) आणि रागावलेल्या लोकांस अनेक प्रकारे कसे शांत करावे हे त्याला माहीत असते.( व तापलेल्या लोकांना शांत करायचे अनेक प्रकार त्याला अवगत असतात.)

ऐसा तो जाणता लोक । समर्थ तयाचा विवेक । त्याचें करणें कांहिं येक । जनास कळेना ॥ ४५ ॥

असा जो जाणता पुरुष,त्याचा विवेक श्रेष्ठ (सामर्थ्यवंत) होय,सामान्य लोकांस त्याचे करणे काही एक कळवायचे नाही.

बहुत जनस चलवी । नाना मंडळें हालवी । ऐसी हे समर्थपदवी । विवेकें होते ॥ ४६ ॥

अनेक लोकांस प्रेरणा देऊन अनेक समुदाय (मंडळे) जो हलवितो त्याला ही समर्थ पदवी (महत्पद) विवेकाच्या योगाने (विवेकश्रेष्ठतेमुळे) प्राप्त होते.

विवेक येकांती करावा । जगदीश धारणेनें धरावा । लोक आपला आणी परावा । म्हणोंचि नये ॥ ४७ ॥

म्हणून एकांतात बसून विवेक करावा,ध्यानधारणेने परमेश्र्वर आपलासा (वश) करावा (सर्वत्र परमात्मा नटला आहे अशी बुद्धि असावी) व हा मनुष्य आपला व हा परका असे मानूच नये (समतेने वागावे)(स्व-परभेद न ठेवता समतेने वागावे)

येकांती विवेक ठाईं पडे । येकांतीं येत्न सांपडे । येकांतीं तर्क वावडे । ब्रह्मांडगोळीं ॥ ४८ ॥

(येकांतीं तर्क वावडे  ब्रह्मांडगोळीं - एकांतात सर्व ब्रह्मांडाचा धांडोळा घेता येतो.)

एकांतातच विवेक उमजतो,प्रयत्नाचा मार्ग सापडतो आणि तर्काने सर्व ब्रह्मांडाचे आकलन करता येते.( तर्काने ब्रह्मांडगोळ आकळता येतो)

येकांती स्मरण करावें । चुकलें निधान पडे ठावें । अंतरात्म्यासरिसें फिरावें । कांहीं तरी ॥ ४९ ॥

(चुकलें निधान - चुकलेले निधान म्हणजे परब्रह्माचा ठेवा)

एकांतात बसून स्मरण करावे आणि अंतरात्म्या बरोबर (अंतरात्म्यासारखे विशाल होऊन) काही फिरावे.(ब्रह्मांडभर फिरावे) म्हणजे चुकलेला (स्वस्वरूपाचा) ठेवा सापडतो.

जयास येकांत मानला । अवघ्या आधीं कळे त्याला । त्यावेगळें वडिलपणाला । ठावचि नाहीं ॥ ५० ॥

(वडिलपणाला ठावचि नाहीं - ब्रह्माएव्हढे व्यापक होण्याला अन्य उपाय नाही)

ज्याला एकांत आवडला,त्याला सर्वांच्या अगोदर कळते,ह्याशिवाय वडीलपणा (थोरपणा,श्रेष्ठपणा) मिळवण्याचा दुसरा मार्गच नाही.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे श्रोताअवलक्षणनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक अठरावा समाप्त ॥**

# सार्थ श्रीदासबोध दशक एकोणिसावा - शिकवणनाम



**॥ श्रीरामसमर्थ ॥ ॥ श्रीमत् दासबोध ॥ दशक एकोणविसावा : शिकवण समास पहिला : लेखनक्रियानिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

ब्राह्मणें बाळबोध अक्षर । घडसूनी करावें सुंदर । जें देखतांचि चतुर । समाधान पावती ॥ १ ॥

( घडसुनी - भरपूर घोटून )

ब्राह्मणाने बाळबोध अक्षर वळवून असे सुंदर करावे, की जे पाहताच चतुरांना आनंद वाटावा,

वाटोळें सरळें मोकळें । वोतलें मसीचें काळें । कुळकुळीत वळी चालिल्या ढाळें । मुक्तमाळा जैशा ॥ २ ॥

( मसीचें काळें - काजळाची शाई , ढाळें - एकसारखे )

काळीभोर शाई (मसी) करून अक्षर वाटोळे,सरळ व मोकळे लिहावे,काळ्याकुळकुळीत ओळी एकसारख्या (ढाळ) लिहाव्या,जणू काय मोत्यांच्या माळा.

अक्षरमात्र तितुकें नीट । नेमस्त पैस काने नीट । आडव्या मात्रा त्या हि नीट । आर्कुलीं वेलांड्या ॥ ३ ॥

( आर्कुलीं वेलांड्या - रफार वेलांट्या )

प्रत्येक अक्षर नीट लिहावे,मधले अंतर एकसारखे असावे व काने,आडव्या मात्रा,वेलांट्या,आकुर्ली (रेफ ,अनुस्वार) इत्यादी सर्व काही नीट असावे.

पहिलें अक्षर जें काढिलें । ग्रंथ संपेतों पाहात गेलें । येका टांकेंचि लिहिलें । ऐसें वाटे ॥ ४ ॥

पहिल्या अक्षरापासून ग्रंथ संपेपर्यंत पाहात गेले तर एका टाकाने सर्व ग्रंथ लिहिला आहे असे वाटावे.

अक्षराचें काळेपण । टांकाचें ठोसरपण । तैसेंचि वळण वांकाण । सारिखेंचि ॥ ५ ॥

( वळण वांकाण - वळण आणि बाक )

अक्षराचा काळेपणा,वळण,वांकण,तशीच टाकाची जाडी सर्व काही सर्वत्र एकसारखे असावे (अक्षरे काळीभोर ,टाक ठोसर-ठसठशीत,वळण -वाकण सर्व सारखे असावे.)

वोळीस वोळी लागेना । आर्कुली मात्रा भेदीना । खालिले वोळीस स्पर्शेना । अथवा लंबाकार ॥ ६ ॥

ओळीला ओळ लागू नये (खालच्या वरच्या ओळी एकमेंकास लागू नयेत) व अति लांबट अक्षर काढू नये,(अक्षर अति लांबट असू नये)

पान शिषानें रेखाटावें । त्यावरी नेमकचि ल्याहावें । दुरी जवळी न व्हावें । अंतर वोळींचे ॥ ७ ॥

अगोदर पान शिशाने रेखाटून त्यावर व्यवस्थित लिहावे.ओळीचे अक्षर कमीजास्त नसावे.(ग्रंथाची पाने आधी शिशाने रेखाटावी व नेमके रेघेवर लिहावे.)

कोठें शोधासी आडेना । चुकी पाहातां सांपडेना । गरज केली हें घडेना । लेखकापासुनी ॥ ८ ॥

कचित् शोध घालावा लागला तर अडचण होऊ नये.लिहिण्यात चूक सापडू नये,ज्याने लिहिले त्याचीच चूक सापडू नये,ज्याने लिहिले त्याचीच वाचून पाहण्यास गरज पडेल असे लिहू नये.(लेखकाने कसर-गरज किवा कुचराई केली असा आक्षेप न यावा)

ज्याचें वय आहे नूतन । त्यानें ल्याहावें जपोन । जनासी पडे मोहन । ऐसें करावें ॥ ९ ॥

( मोहन - मोह )

ज्याचे वय लहान त्याने (अल्पवयी मुलांनी) तर फार जपून लिहावे की जे पाहाताच लोकांना मोह पडेल.

बहु बारिक तरुणपणीं । कामा नये म्हातारपणीं । मध्यस्त लिहिण्याची करणी । केली पाहिजे ॥ १०॥

तरुण वयात फार बारीक लिहिलेले अक्षर म्हातारपणी उपयोगी पडत नाही.(वाचता येणार नाही.) म्हणून फार बारीक नाही व फार मोठे नाही असे मध्यम अक्षर लिहावे.

भोंवतें स्थळ सोडून द्यावें । मधेंचि चमचमित ल्याहावें । कागद झडतांहि झडावें । नलगेचि अक्षर ॥११॥

( भोंवतें स्थळ सोडून - सभोवती भरपूर जागा सोडून मध्यभागी लिहावे )

सभोवार जागा सोडून देऊन मध्ये छानदार ठसठशीत लिहावे,कागद झडला तरी अक्षर झडू नये.

ऐसा ग्रंथ जपोनी ल्याहावा । प्राणीमात्रास उपजे हेवा । ऐसा पुरुष तो पाहावा । म्हणती लोक ॥ १२ ॥

असा ग्रंथ (आद्यंत) जपून लिहावा की तो पहाताच प्राणिमात्राला त्याचा हेवा वाटावा (आपण संग्रहावा असे वाटावे.) आणि असा पुरुष डोळ्यांनी पाहू या असे लोकांनी म्हणावे (लोकांना अशी इच्छा व्हावी.)

काया बहुत कष्टवावी । उत्कट कीर्ति उरवावी । चटक लाउनी सोडावी । कांहीं येक ॥ १३ ॥

देह अनेक प्रकारे झिजवून मोठी कीर्ति जोडावी.आपल्या सद्गुणांच्या योगाने लोकांना चटक लावून सोडावी.(काहीतरी लोकांस चटक लागेल असे गुण संपादावेत)

घट्य कागद आणावे । जपोन नेमस्त खळावे । लिहिण्याचे सामे असावे । नानापरी ॥ १४ ॥

( घट्य - घोटीव )

घट्ट (साफ,चिवट व जाड) कागद आणूंन ते तुरटीच्या पाण्याने जपून व व्यवस्थित घोटावे. लिहिण्याचे अनेक प्रकारचे सामान (सामे) तयार असावे.

सु-या कात-या जागाईत । खळी घोंटाळें तागाईत । नाना सुरंग मिश्रित । जाणोनि घ्यावें ॥ १५ ॥

( जागाईत घोंटाळें तागाईत - समास फळी, कागद घोटण्याचा घोटा,कागद चिवट करण्यासाठीचे सामान )

सु-या,कात्र्या,समासफळ्या(जागाईत),खळी म्हणजे कागदाची खळ,तुरटीचे पाणी घोटाळे म्हणजे कागद घोटण्याचा घोंटा-कवटा,तागाईत म्हणजे कागद चिवट करण्यास लागणारे जिन्नस (वगैरे नानाविध रंगाचे असावेत.),अनेक प्रकारचे रंग व त्यांची मिश्रणे ही सर्व नीट पाहून घ्यावी.

नाना देसीचे बरु आणावे । घटी बारिक सरळे घ्यावे । नाना रंगाचे आणावे । नाना जिनसी ॥ १६ ॥

अनेक देशातले (ठिकाणचे) बोरू आणूंन त्यातून,घट्ट,बारीक व सरळ असतील ते (लेखणीसाठी)घ्यावेत. व ते अनेक रंगाचे व अनेक प्रकारचे असावेत.

नाना जिनसी टांकतोडणी । नाना प्रकारें रेखाटणी । चित्रविचित्र करणी । सिसेंलोळ्या ॥ १७ ॥

अनेक प्रकारची टांकतोडणी अनेक प्रकारची रेखाटणी (रूळ वगैरे) तऱ्हेतऱ्हेच्या रंगांच्या शिसाच्या गोळ्या ही सर्व जवळ असावी.

हिंगुळ संग्रहीं असावे । वाळले आळिते पाहोन घ्यावे । सोपें भिजौनी वाळवावे । संग्रह मसीचे ॥ १८ ॥

हिंगुळ संग्रहाला असावा,वाळलेले आळते पाहून घ्यावे,सोपे भिजवून वळवावी आणि काजळाचे संग्रह ठेवावे.(शाईच्या गोळ्या किंवा वड्या भिजवून वळवून ठेवाव्यात)

तगटी इतिश्र्या कराव्या । बंदरी फळ्या घोटाव्या । नाना चित्रीं चिताराव्या । उंच चित्रें ॥ १९ ॥

( तगटी - शेवटी )

तगटीं (ग्रंथाच्या शेवटच्या पत्रावर) इतिश्र्या मोठ्या घन कराव्या (ग्रंथाच्या शेवटी इतिश्री लिहावे) बंदरातून आलेल्या (मलबारी,सागवानी) फळ्या घोटून त्यावर अनेक चांगली चांगली चित्रे काढावी. अनेक सुंदर चित्रांनी ग्रंथ चित्रित व सुंदर करावा)

नाना गोप नाना बासनें । मेणकापडें सिंदुरवणें । पेट्या कुलुपें जपणें । पुस्तकाकारणें ॥ २० ॥

( सिंदुरवणें - केशरी मेणकापड )

गोफ,बासने (ग्रंथांची वेष्टने),शेंदरी रंगांची मेणकापडे,पेट्या,कुलपे इत्यादी सर्व व्यवस्थितपणे मिळवून ग्रंथाला अतिशय व्यवस्थित जपावे.

**(दुसऱ्यास सुख दिल्यास त्यामुळे फलस्वरूप आपल्याला ही सुखच मिळते पण दुसऱ्याला दु:ख होईल असे वर्तन केल्यास त्यापासून आपल्यालासुद्धा आधी कष्ट,दु:ख सहन करावे लागते.दुसऱ्याचे अंतरंग जाणून त्याच्या सदभावनेला हात घातल्यास आनंददायी असं सुयश लाभते.)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे लेखनक्रियानिरूपणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : विवरणनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

मागां बोलिले लेखनभेद । आतां ऐका अर्थभेद । नाना प्रकारीचे संवाद । समजोन घ्यावे ॥ १ ॥

(वर लेखन भेद सांगितले,आता अर्थ भेद सांगतो,सर्व प्रकारचे संवाद आधी समजुन घ्यावेत) मागील समासात लिहिण्याचे प्रकार सांगितले आता अर्थांचे प्रकार ऐका.नाना प्रकारची संभाषणे समजून घ्यावी.

शब्दभेद अर्थभेद । मुद्राभेद प्रबंधभेद । नाना शब्दाचे शब्दभेद । जाणोनी पाहावे ॥ २ ॥

वेगवेगळे शब्द,भिन्न भिन्न अर्थ,निरनिराळ्या मुद्रा,अनेक प्रकारचे प्रबंध ह्यातील अनेक शब्दांचे भिन्नभिन्न अर्थ समजून घ्यावे.

नाना आशंका प्रत्योत्तरें । नाना प्रचित साक्षात्कारें । जेणें करितां जगदांतरें । चमत्कारती ॥ ३ ॥

अनेक प्रकारच्या शंका व त्यांची समाधाने,अनेक अनुभवाच्या व साक्षात्काराच्या गोष्टी इत्यादी श्रोत्यांना अशा रीतीने सांगाव्या (पटवून द्याव्या) की जेणेकरून त्यांच्या मनास (आश्चर्य) चमत्कार वाटावा.

नाना पूर्वपक्ष सिद्धांत । प्रत्ययो पाहावा नेमस्त । अनुमानाचे स्वस्तवेस्त । बोलोंचि नये ॥ ४ ॥

(स्वस्तवेस्त - असंबद्ध)

अनेक प्रकारचे पूर्वपक्ष व सिद्धांत दोन्ही स्पष्ट सांगावेत, (अनुभव पाहावा,अनुभवाचे ज्ञान सांगावे.बाष्कळपणाचे शाब्दिक ज्ञान सांगू नये.) सांगताना निश्चित अनुभवावर दृष्टी असावी.अनुमानिक व बाष्कळ कधीही बोलू नये.

प्रवृत्ति अथवा निवृत्ती । प्रचितीविण अवघी भ्रांती । गलंग्यांमधील जगज्जोति । चेतेल कोठें ॥ ५ ॥

( गलंग्यां - केरकचरा )

प्रपंचात काय किवा परमार्थात काय प्रचितीवांचून सारा भ्रम होय.कचरा किवा गळाठा-गळंगा उकिरड्यावर पडलेला असतो.त्यात अग्नी पेट घेत नाही त्या प्रमाणे अनुमानिक ज्ञानाने ज्ञानाग्नी चेतणार नाही.) प्रवृत्ती असो निवृत्ती असो अनुभवावाचून सारा भ्रम होय,गल्याठ्यामध्ये अग्नी जसा पेटत नाही तद्वत अनुमानिक ज्ञानाने जगज्योती (ज्ञानाग्नि) पेटणार नाही.

हेत समजोन उत्तर देणें । दुसर्याचे जीवीचें समजणें । मुख्य चातुर्याचीं लक्षणें । तें हें ऐसीं ॥ ६ ॥

दुसऱ्याचा हेतु समजून (बोलावे) उत्तर द्यावे. दुसऱ्याच्या अंतःकरणातील जाणावे,ही चातुर्याची मुख्य लक्षणे होत.

चातुर्येंविण खटपट । ते विद्याचि फलकट । सभेमधें अटघाट । समाधान कैचें ॥ ७ ॥

( आटघाट - व्यर्थ श्रम खटपट )

चातुर्यावाचून इतर खटपट करावयास लागणारी विद्या फोल होय.सभेमध्ये नुसती (चातुर्याखेरीज) आटपीट किंवा श्रम-आटघाट केल्याने समाधान कसे होईल.?

बहुत बोलणें ऐकावें । तेथें मोन्यचि धरावें । अल्पचिन्हें समजावें । जगदांतर ॥ ८ ॥

पुष्कळ बोलणे चालू असेल तर ते मुकाट्याने ऐकून घ्यावे,थोड्या चिन्हावरून लोकांच्या मनातील भाव ओळखावा (पुष्कळ बोलणे ऐकावे,त्यात बोलू नये.थोडक्यावरून लोकांचे मनोगत जाणावे.)

बाष्कळामधें बैसो नये । उद्धटासी तंडों नये । आपणाकरितां खंडों नये । समाधान जनाचें ॥ ९ ॥

( बाष्कळ - निरर्थक,बडबड्या )

बाष्कळ लोकांत बसू नये.उद्धटा बरोबर हुज्जत घालू नये (शब्दवाद करू नये.) आपल्या एकट्यासाठी लोकांचे समाधान मोडू नये.

नेणतपण सोडूं नये । जाणपणें फुगो नये । नाना जनाचें हृदये । मृद शब्दें उकलावें ॥ १० ॥

आपल्याकडे नेणतेपणा घेण्यास चुकू नये. जाणतेपणाचा गर्व धरू नये.मृदू शब्दांनी लोकांचे हृदय उकलावे.(हाती घ्यावे.)

प्रसंग जाणावा नेटका । बहुतांसी जाझु घेऊ नका । खरें असतांचि नासका । फड होतो ॥ ११ ॥

( जाझु - झगडा, नासका फड - सभेचा बेरंग )

प्रसंग काय आहे हे नीट समजून घ्यावे. आणि आपले खरे असले तरी (आग्रहाचे तेच ते प्रतिपादून) अनेक लोकांशी तंटू नये (जाजु घेऊ नका),त्यामुळे समुदाय बिघडतो. (योग्य प्रसंग जाणावा बहुत जन विरुद्ध असता त्यांशी कलह करू नये.आपले खरे असले तरी आग्रहाने तेच ते प्रतिपादून सभा मोडू नये.)

शोध घेतां आळसों नये । भ्रष्ट लोकीं बैसों नये । बैसलें तरी टाकूं नये । मिथ्या दोष ॥ १२ ॥

( मिथ्या दोष - निंद्य दोष )

शोध घेण्यात (विचार करण्यात) कसूर (आळस) करू नये. भ्रष्ट लोकांत बसू नये व बसले तरी कोणावर ही मिथ्या दोषारोप करू नयेत.

अंतर आर्ताचें शोधावें । प्रसंगीं थोडेंचि वाचावें । चटक लाउनी सोडावें । भल्या मनुष्यासी ॥ १३ ॥

( आर्ताचें - दु:खिताचे )

आर्त (दु:खपीडित,उत्सुक) मनुष्याचे अंतःकरण (चित्त) शोधावे.( त्याचे समाधान करण्यासाठी-त्याला शमवायासाठी-वाचून दाखवावे.) पण प्रसंगी थोडेच वाचावे.(त्याला विचार करण्यास सवड द्यावी.) आपल्या गुणांच्या योगाने सज्जनांना चटक लावावी,

मज्यालसींत बैसों नये । समाराधनेसी जाऊं नये । जातां येळीलवाणें होये । जिणें आपुलें ॥ १४ ॥

( समाराधनेसी - अन्न संतर्पणाचे ठिकाणी, येळील - ओशाळ )

सभेमध्ये (प्रमुखजागी,) मध्यभागी बसू नये,सभाराधना (मुक्तद्वार,भंडारा) असेल तेथे जाऊ नये.(मुक्त द्वारी भोजन करू नये,का की केल्यास आपले जिणे तृच्छ होते.) गेल्यावर आपले महत्व जाऊन हलकेपणा येतो.

उत्तम गुण प्रगटवावे । मग भलत्यासी बोलतां फावे । भले पाहोन करावे । शोधून मित्र ॥ १५ ॥

उत्तमगुण आंगी असतील ते प्रकट करावे. म्हणजे हवे त्याच्याशी बोलता येते. आणि मैत्री करणे ती मात्र सज्जन शोधून त्यांच्याशीच करावी.

उपासनेसारिखें बोलावें । सर्व जनासि तोषवावें । सगट बरेंपण राखावें । कोण्हीयेकासी ॥ १६ ॥

उपासनेसारखे,उपासनेच्या शिकवणीसारखे अथवा दुसऱ्याची उपासना असेल.(दुसऱ्याची उपासना प्रीति पाहून तद्नुरूप) त्याप्रमाणे बोलावे. आणि सर्व लोकास संतोष द्यावा. कोणीही असो सर्वांशी सारखा भलेपणा राखावा.

ठाईं ठाईं शोध घ्यावा । मग ग्रामीं प्रवेश करावा । प्राणीमात्र बोलवावा । आप्तपणें ॥ १७ ॥

ठिकठिकाणी शोध घेऊन मगच गावात प्रवेश करावा. प्राणीमात्रांशी आप्तेष्टांप्रमाणेच आपलेपणानेच बोलावे,(प्राणिमात्रांना आपलेपणा वाटेल असे त्यांशी बोलावे.)

उंच नीच म्हणों नये । सकळांचें निववावें हृदये । अस्तमानीं जाऊं नये । कोठें तऱ्ही ॥ १८ ॥

लहानमोठा (श्रेष्ठ-कनिष्ठ) किवा श्रीमंत-गरीब हा भेदभाव मनात न आणता सर्वांच्या अंतःकरणाचे समाधान करावे (सर्वांचा आत्मा सुखवावा)(अस्तमानी नवीन गांवात शिरू नये) संध्याकाळी कोठेही भलतीकडे जाऊ नये.

जगामधें जगमित्र । जिव्हेपासीं आहे सूत्र । कोठें तऱ्ही सत्पात्र । शोधून काढावें ॥ १९ ॥

जगामध्ये जगमित्र होण्याचे मुख्य सूत्र (साधन) आपल्या जिव्हेपाशी आहे. (गोड बोलून किंवा मनोगत जाणून सर्वांचा स्नेह संपादावा.) पण सज्जन मात्र शोधून काढावेत.

कथा होती तेथें जावें । दुरी दीनासारिखें बैसावें । तेथील सकळ हरद्र घ्यावें । अंतर्यामीं ॥ २० ॥

( सकळ हरद्र - सर्व वर्म गुपित )

कथा होत असेल तेथे जावे.पण (दिन) गरीबासारखे मागे लांब बसावे. व तेथे बसून सारे हृद्‍गत किंवा सारी परिस्थिती समजून घ्यावी,

तेथें भले आडळती । व्यापा ते हि कळों येती । हळुहळु मंदगती । रीग करावा ॥ २१ ॥

( रीग करावा - शिरकाव करावा )

त्याठिकाणी भले लोक सापडतात,व्यापक म्हणजे कार्यकर्ते कोण आहेत ते समजते,मग त्यांचेमध्ये हलके हलके मंदगतीने प्रवेश करावा.( तेथे भले कोण आहेत,व्यापक म्ह. कार्यकर्ते कोण आहेत हे समजून येते मग त्यात हळुहळू प्रवेश करावा.)

सकळामधें विशेष श्रवण । श्रवणाहुनी थोर मनन । मननें होये समाधान । बहुत जनाचें ॥ २२ ॥

सर्व साधनांमध्ये श्रवण हे विशेष थोर,श्रवणापेक्षा मनन थोर,मननाच्या योगाने अनेकांचे समाधान होते.

धूर्तपणें सकळ जाणावें । अंतरीं अंतर बाणावें । समजल्याविण सिणावें । कासयासी ॥ २३ ॥

(म्हणून ह्या दोन साधनांची गोडी लोकांस लावावी व बहुतांचा संतोष राखावा) धूर्तपणाने सर्व जाणून घ्यावे. अंतःकरणात अंतःकरण बिंबवावे.(मनाला मनाची ओळख पटवावी.) समजल्यावाचून उगीच का शीण त्रास करावा? (समजले नाही तर सारे श्रम व्यर्थ होत.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विवरणनिरूपणनाम समास दुसरा ॥**

**समास तिसरा : करंटलक्षणनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥**

सुचित करूनी अंतःकर्ण । ऐका करंटलक्षण ।हें त्यागितां सदेवलक्षण । आंगीं बाणें ॥१॥

( सुचित - एकाग्रचित्त )

अंतःकरण स्थिर करून आता करंट्य़ाची लक्षणे ऐका, ह्याचा त्याग केला की भाग्यवतांची लक्षणे अनायसे आंगी बाणतात.

पापाकरितां दरिद्र प्राप्त । दरिद्रें होये पापसंचित । ऐसेंचि होत जात । क्षणक्षणा ॥ २ ॥

पापामुळे दारिद्र्य येते. आणि दारिद्रयामुळे पाप वाढत जाते असे निरंतर घडत असते.

याकारणें करंटलक्षणें । ऐकोनी त्यागचि करणें । म्हणिजे कांहीं येक बाणें । सदेवलक्षण ॥ ३ ॥

म्हणून ही करंटपणाची लक्षणे ऐकून त्यांचा लगेच त्याग करावा म्हणजे भाग्यवतांची लक्षणे काहीतरी आंगी बाणतात.

करंट्यास आळस आवडे । यत्न कदापि नावडे । त्याची वासना वावडे । अधर्मीं सदा ॥ ४ ॥

करंट्याला नेहमी आळस आवडतो,प्रयत्न करणे कधीही आवडत नाही,त्याची वासना नेहमी अधर्मात वावरत असते (अधर्माकडे धावत असते)

सदा भ्रमिष्ट निदसुरा । उगेंचि बोले सैरावैरा । कोणीयेकाच्या अंतरा । मानेचिना ॥ ५ ॥

तो सदा भ्रमिष्ट व झोपाळू असतो.उगीच काहीतरी बाष्कळपणाने (अव्वा-सव्वा) भकत असतो.तो कोणालाच मनापासून आवडत नाही.

लेहों नेणे वाचूं नेणे । सवदासुत घेऊं नेणे । हिशेब कितेब राखों नेणे । धारणा नाहीं ॥ ६ ॥

( सवदासुत - बाजारहाट )

त्याला लिहिता वाचता येत नाही,बाजारहाट (सवदासुत) करता येत नाही.हिशेबठिशेब ठेवता येत नाही व धारणाशक्ति मुळीच नाही.

हारवी सांडी पाडी फोडी । विसरे चुके नाना खोडी । भल्याचे संगतीची आवडी । कदापी नाहीं ॥ ७ ॥

तो हरवतो,सांडतो,पडतो,फोडतो,विसरतो,चुकतो अशा अनेक खोड्या त्याच्या ठिकाणी असतात.(हा त्याचा स्वभाव) शहाण्याच्या संगतीची (सत्संगतीची) गोडी त्याला मुळीच नसते.

चाट गडी मेळविले । कुकर्मी मित्र केले । खट नट येकवटिले । चोरटे पापी ॥ ८ ॥

(चाट) चावट,दुराचारी,खट,नट,चोरटे,पापी असली माणसे एकत्र करून त्यांच्याशी मैत्री करतो.

ज्यासीं त्यासीं कळकटा । स्वयें सदाचा चोरटा । परघातकी धाटामोटा । वाटा पाडी ॥ ९ ॥

( कळकटा - कलह करणारा , धाटामोटा - दांडगट, वाटा पाडी - वाटमारी करतो)

ज्याच्या त्यांच्याशी (कळकटा,कलहकर्ता) भांडणारा,स्वतः नित्याचा चोरटा,दुसऱ्याचा घात करणारा (परघातावर लक्ष),धष्टपुष्ट (धाटामोटा) वाटमा-याचा धंदा करणारा.(वाटा पाडी) असा असतो.

दीर्घ सूचना सुचेचिना । न्याय नीति हे रुचेना । पराभिळासीं वासना । निरंतर ॥ १० ॥

( पराभिळासीं - पराभिलाषी )

त्याला दूरदर्शीपणाचा विचार सुचत नाही.न्यायनीति आवडत नाही.दुसऱ्याला विचारण्याची वासना निरंतर असते.

आळसें शरीर पाळिलें । परंतु पोटेंविण गेलें । सुडकें मिळेनासें जालें । पांघराया ॥ ११ ॥

( सुडकें - कपडेलत्ते )

आळसामुळे शरीराला कष्ट देत नाही पण पोटाला नसल्यामुळे ते कष्ट देणे व्यर्थ ठरते,(अधिक त्रास होतो) पांघरायला फाटके वस्त्रही-सुडके-कधीही मिळत नाहीसे होते.

आळसे शरीर पाळी । अखंड कुंसी कांडोळी । निद्रेचे पाडी सुकाळीं । आपणासी ॥ १२ ॥

( कुंसी कांडोळी - कुसा खाजवितो )

आळसाने शरीराला कष्ट दिले नाहीत पण अखंड कुशी खाजवत बसतो. आणि त्याच्या जवळ झोपेचा सुकाळ असतो.(कुशी खाजवत स्वतः झोप घेतो)

जनासीं मीत्री करीना । कठिण शब्द बोले नाना । मूर्खपणें आवरेना । कोणीयेकासी ॥ १३ ॥

लोकांशी स्नेह करत नाही,अनेक प्रकारे कठोर बोलतो.(कठोर शब्दांनी दुसऱ्यास ताडन करतो) आणि मूर्खत्वामुळे कोणालाच जुमानत नाही.(कोणालाच आवरत नाही.)

पवित्र लोकांमधें भिडावे । वोंगळामधें निशंक धांवे । सदा मनापासून भावे । जननिंद्य क्रिया ॥ १४ ॥

सज्जनांच्या समुदायात जायला त्यास भीड वाटते,पण घाणेरड्या लोकात तो नि:शंकपणे धावत जातो.(वाईट लोकांच्या टोळीत बेडर मिसळतो.) आणि सदासर्वदा जगात निंद्य अशा गोष्टी करण्याची त्याला मनापासून आवड असते.

तेथें कैचा परोपकार । केला बहुतांचा संव्हार । पापी अनर्थी अपस्मार । सर्वाबद्धी ॥ १५ ॥

पापी,अनर्थ करणारा,विसराळू, किवा भ्रांतिष्ट आणि सर्व त-हेचे अनन्वित वागणारा अश्याच्या ठिकाणी परोपकार कसला? अनेकांचा संहार मात्र करतो.(बहुतांच्या नाशावर पोसणारा हा ह्याला परोपकार माहीतच नाही,पापी अनर्थ करणारा,विसराळू किवा भ्रांतिष्ट)

शब्द सांभळून बोलेना । आवरितां आवरेना । कोणीयेकासी मानेना । बोलणें त्याचें ॥ १६ ॥

(शब्द सांभाळून बोलता येत नाही व ह्याचे म्हणणे कोणालाच मानवत नाही.) शब्द सांभाळून बोलता येत नाही,त्याचे निवारण करावे म्हंटले तर ऐकत नाही. आणि कोणालाच त्याचे म्हणणे पटत नाही.

कोणीयेकास विश्वास नाहीं । कोणीयेकासीं सख्य नाहीं । विद्या वैभव कांहींच नाहीं । उगाचि ताठा ॥१७॥

कोणाला त्याचा विश्वास नसतो,कोणाशी त्याचे सख्य नसते.विद्या वैभव ह्यापैकी काहीच नसतांना रिकामा ताठामात्र पुष्कळ (विश्र्वास,सख्य,विद्या-वैभव इ.काही नसून उगीच ताठा)

राखावीं बहुतांची अंतरें । भाग्य येतें तदनंतरें । ऐसीं हें विवेकाचीं उत्तरें । ऐकणार नाहीं ॥ १८ ॥

अनेक लोकांची अंतःकरणे राजी राखावी तेव्हा भाग्य प्राप्त होते.असा शहाणपणाचा विचार कोणी सांगितला तर तो ऐकावयाचा नाही.(लोकांना राजी राखल्याचे भाग्य येते. इ.सद्बोध मनावर घेतच नाही.)

स्वयें आपणास कळेना । शिकविलें तें ऐकेना । तयासी उपाय नाना । काये करिती ॥ १९ ॥

स्वतः आपणाला कळत नाही व शिकवले तर ऐकत नाही त्याला कितीही उपाय केले तरी उपयोग काय?(तो कोणत्या उपायांनी सुधारणार)

कल्पना करी उदंड कांहीं । प्राप्तव्य तों कांहींच नहीं । अखंड पडिला संदेहीं । अनुमानाचे ॥२०॥

कल्पनांच्या भरा-या पुष्कळ मारतो पण प्रत्यक्ष लाभ हा काहीच नाही.(कल्पनांच्या भरा-या फार,लाभ्यांश काहीच नाही.) मात्र कल्पनेच्या घोटाळ्यात नेहमी पडलेला असतो.(सदा संशयग्रस्त)

पुण्य मार्ग संडिला मनें । पाप झडावें काशानें । निश्चय नाहीं अनुमानें । नास केला ॥ २१ ॥

काही पुण्य करण्याचा विचार मनातच येत नाही.तर पापाचा क्षय कशाने होणार.?(कदाचित पुण्य करण्याचा विचारमनात आला तर) निश्र्चय नसल्याने नुसत्या कल्पनेनेच नाश करून घेतो.(पुण्यमार्ग मनात नाही तर पाप झडावे कसे?)

कांहींयेक पुर्तें कळेना । सभेमधें बोलों राहेना । बाष्कळ लाबाड ऐसें जना । कळों आलें ॥ २२ ॥

धड काही एक कळत नाही पण सभेमध्ये बोलल्याशिवाय राहात नाही. त्यामुळे हा बाष्कळ व लबाड आहे,असे मात्र लोकांना समजून येते.(हा बाष्कळ व खोटा म्हणून लोकांना माहीत झाला)

कांहीं नेमकपण आपुलें । बहुत जनासी कळों आलें । तेंचि मनुष्य मान्य जालें । भूमंडळीं ॥ २३॥

हा मनुष्य नियमितपणाने वागतो असे लोकांना ज्याच्या विषयी कळून येते तोच मनुष्य जगामध्ये मान्यतेला चढतो,(हा मनुष्य काही नियमाने चालणारा आहे असे बहुतांस कळले तरच तो लोकमान्य होतो नाही तर नाही.)

झिजल्यावांचून कीर्ति कैंची । मान्यता नव्हे कीं फुकाची । जिकडे तिकडे होते ची ची । अवलक्षणें ॥ २४॥

मान्यता फुकटची नाही,(शरीर द्रव्य इत्यादिकांची) झिज सोसल्यावाचून किर्ती कशी होणार? दुर्गुणामुळे जिकडे तिकडे दैन्यावस्था किंवा फजिती होते.(झिजल्यावाचून किर्ती होत नाही.मान्यता फुकाची मिळत नसते,अवलक्षणांनी जनांत छी:थू मात्र होते.)

भल्याची संगती धरीना । आपणासी शाहाणे करीना । तो आपला आपण वैरी जाणा । स्वहित नेणे ॥२५॥

शहाण्याची (भल्याची) संगति धरीत नाही,स्वतःस शाहाणा करीत नाही.व ज्याला आपले हित कशात (स्वहित) आहे हे कळत नाही तो आपला आपणच वैरी होय असे समजावे, (तो आत्मघातक होय)

लोकांसी बरें करवें । तें उसिणें सवेंचि घ्यावें । ऐसें जयाच्या जीवें । जाणिजेना ॥ २६ ॥

लोकांचे कल्याण केले म्हणजे त्याचा मोबदला लगेच आपणाला मिळतो (ते उलट आपल्या कल्याणाला कारण होतात) हे त्याच्या जीवाला कळत नाही.

जेथें नाहीं उत्तम गुण । तें करंट्याचें लक्षण । बहुतांसीं न मने तें अवलक्षण । सहजचि जालें ॥ २७॥

तात्पर्य (ज्यापाशी काही उत्कट गुण नाही.तो करंटा जाणावा,करंटेपणाचे गुण बहुतांश मान्य होत नाहीत म्हणूनच त्यांना अवलक्षणे म्हणतात.) उत्तम गुण नसणे हे करंटेपणाचे लक्षण होय.पुष्कळाना ते पटत (पसंत पडत) नाही.म्हणून सहजच ते अवलक्षण झाले.

कार्याकारण सकळ कांहीं । कार्येंविण तो कांहींच नाहीं । निकामी तो दुःखप्रवाहीं । वाहातचि गेला ॥ २८॥

हे सर्व जग कार्यकारणाचे म्ह. देऊन घेऊन चालणारे (दिल्याघेतल्याचे) आहे तेथे कोणाचे तरी काम केल्यावाचून कोणीहि उपयोगी पडावयाचा नाही.किवा जरूर असल्याशिवाय कोणी काम करावयाचा नाही.म्हणून निकामी (निरुपयोगी) असतो.तो दु:ख प्रवाहात वाहात जातो.

बहुतांसीं मान्य थोडा । त्याच्या पापासी नाहीं जोडा । निराश्रई पडे उघडा । जेथें तेथें ॥ २९ ॥

जो अनेकांना फारसा आवडत नाही (मान्य होत नाही.) त्याच्या इतका पातकी कोणी नाही.तो जेथे तेथे निराश्रित होऊन उघडा पडतो.

याकारणें अवगुण त्यागावे । उत्तम गुण समजोन घ्यावें । तेणें मनासारिखें फावे । सकळ कांहीं ॥ ३०॥

म्हणून दुर्गुणांचा त्याग करून उत्तम गुण समजून घ्यावे म्हणजे सर्व काही मनासारखे होते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे करंटलक्षणनिरूपणनाम समास तिसरा ॥**

**समास चौथा : सदेवलक्षणनिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥**

मागां बोलिले करंटलक्षण । तें विवेकें सांडावें संपूर्ण । आतां ऐका सदेवलक्षण । परम सौख्यदायेक ॥ १ ॥

मागील समासात सांगितलेली सारी करंटपणाची लक्षणे विवेकाच्या योगाने संपूर्ण टाकून द्यावी. आता परमसौख्यदायक अशी सुदैव लक्षणे ऐका.(सौख्यदायक अशी भाग्यवंताची पुढे येणारी सुलक्षणे आंगी आणावी)

उपजतगुण शरीरीं । परोपकारी नानापरी । आवडे सर्वांचे अंतरीं । सर्वकाळ ॥ २ ॥

सुदैव लक्षणे ज्याच्या आंगी आहेत अशा माणसाच्या आंगी अनेक प्रकारचे परोपकार करण्याचे उपजत गुण असतात.असा मनुष्य सर्वांना सर्वकाळ आवडतो.(ज्याच्या अंगी परोपकाराचा गुण उपजत आहे तो सर्वास अंतरापासून आवडतो.)

सुंदर अक्षर लेहो जाणे । चपळ शुद्ध वाचूं जाणे । अर्थांतर सांगों जाणे । सकळ कांहीं ॥ ३ ॥

सुंदर अक्षर लिहिणे,जलद व शुद्ध वाचणे,अर्थ उत्तम प्रकारे सांगता येणे. हे सर्व काही त्याला येते.

कोणाचें मनोगत तोडिना । भल्यांची संगती सोडिना । सदेवलक्षण अनुमाना । आणून ठेवी ॥ ४ ॥

कोणाचेही मन दुखवीत नाही.(कोणाचे मनोगत तोडीत नाही) शहाण्याची (भल्याची) संगति सोडत नाही,भाग्यवतांची (देव) लक्षणे कोणती ते मनात आणूंन ठेवतो.

तो सकळ जनासी व्हावा । जेथें तेथें नित्य नवा । मूर्खपणें अनुमानगोवा । कांहींच नाहीं ॥ ५ ॥

सर्व लोकांना तो हवाहवासा वाटतो (-ह्वांवा) तो जेथे जेथे जातो तेथे तेथे ( पूर्वी अनेक वेळा येऊन गेला असला तरी प्रत्येक वेळी) नवीनच आल्याप्रमाणे त्याचा सत्कार होतो, मूर्खपणाने होणारा संशयाचा घोटाळा त्याच्या जवळ मुळीच नसतो.(तो नित्यनूतन सर्वास हवासा वाटतो,तो मुर्खत्वांच्या गुंत्यात पडत नाही.)

नाना उत्तम गुण सत्पात्र । तेचि मनुष्य जगमित्र । प्रगट कीर्ती स्वतंत्र । पराधेन नाहीं ॥ ६ ॥

ज्याच्या ठिकाणी असे अनेक गुण आहेत. व जो सत्पात्र आहेत तोच मनुष्य जगन्मित्र होतो.त्याची कीर्ती त्याच्या गुणांमुळे प्रकटपणाने व स्वतंत्रपणाने पसरत असते.ती पसरण्याला दुसऱ्याच्या आश्रयाची जरूर नसते.(तो उत्तम गुणांनी उक्त असल्यामुळे सहजच जगन्मित्र होतो.त्याची कीर्ति त्याच्या गुणांवर स्वतंत्रपणे पसरते.तिला कोणाचा टेकू लागत नाही.)

राखे सकळांचें अंतर । उदंड करी पाठांतर । नेमस्तपणाचा विसर । पडणार नाहीं ॥ ७ ॥

तो सर्वांचे अंत:करण राजी राखतो.पाठांतर पुष्कळ करतो व्यवस्थितपणाचा विसर त्याला कधीही पडत नाही.(तो सर्वांचे मान सांभाळतो) त्याचे पाठांतर जबर असते.(तो नेमस्तपणे वागण्यात कधी चुकत नाही)

नम्रपणें पुसों जाणे । नेमस्त अर्थ सांगों जाणे । बोलाऐसें वर्तों जाणे । उत्तम क्रिया ॥ ८ ॥

(कोणाला विचारावयाचे तर) नम्रपणे कसे विचारावे,व्यवस्थित अर्थ (कोणी विचारल्यास) कसा सांगावा. आणि बोलण्याप्रमाणे उत्तम क्रिया कशी करावी (उत्तम आचार कसा पाळावा) हे त्यास माहित असते.

तो मानला बहुतांसी । कोणी बोलों न शके त्यासी । धगधगीत पुण्यरासी । माहांपुरुष ॥ ९ ॥

तो अनेकास मान्य (लोकप्रिय) झालेला असल्यामुळे त्याला कोणी दोष लाऊ शकत नाही असा तो महात्मा धगधगीत पुण्यराशी असतो,

तो परोपकार करितांचि गेला । पाहिजे तो ज्याला त्याला । मग काय उणें तयाला । भूमंडळीं ॥१०॥

तो नित्य परोपकार करीत असल्याने ज्याला त्याला हवासा वाटतो.अशाला जगात काय कमी पडणार आहे? (धगधगीत पुण्यराशि महापुरुष,लोकप्रिय,परोपकारी-अशा पुरुषाला भूमंडळात काय कमी पडायचे आहे?)

बहुत जन वास पाहे । वेळेसी तत्काळ उभा राहे । उणें कोणाचें न साहे । तया पुरुषासी ॥ ११ ॥

अनेक लोक त्याच्या सहाय्याची वाट पहात असतात. व प्रत्येक ठिकाणी तो वेळेवर मदतीला येऊन पोहोचतो,(वेळेवर उभा राहतो) त्या पुरुषाला कोणाचेही उणे सहन होत नाही (उणे पाहावत नाही)

चौदा विद्या चौसष्टी कळा । जाणे संगीत गायेनकळा । आत्मविद्येचा जिव्हाळा । उदंड तेथें ॥ १२ ॥

चौदा विद्या,चौसष्टकला (त्यापाशी उभ्या आहेत.),संगीत,गायनकला,इत्यादी,सर्व तो जाणतो. शिवाय अध्यात्मविद्येविषयीही त्याला विशेष प्रेम असते.(त्याला अध्यात्माचा जिव्हाळा मोठा आहे.)

सकळांसी नम्र बोलणें । मनोगत राखोन चालणें । अखंड कोणीयेकाचे उणें । पडोंचि नेदी ॥ १३ ॥

सर्वांशी नम्रतेने बोलतो मनोगत राखून वागतो.कोणाचे कधीही उणे पडून देत नाही.

न्याय नीति भजन मर्याद । काळ सार्थक करी सदा । दरिद्रपणाची आपदा । तेथें कैची ॥ १४ ॥

न्यायनीतीने व मर्यादेने वागून व भजनपुजानादि करून आपला सर्वकाळ नित्य सार्थकी लावतो.त्याला दारिद्र्यादि आपदा कोठून भोगाव्या लागतील? (अशा भाग्यवंताला दारिद्र्यादि आपदा काय म्हणून सतावतील?)

उत्तम गुणें श्रृंघारला । तो बहुतांमधें शोभला । प्रगट प्रतापें उगवला । मार्तंड जैसा ॥ १५ ॥

उत्तम गुणांनी जो भूषित झाला,त्याचे तेज अनेक लोकांमध्ये पडते. जणू काय आपल्या प्रतापी किरणांसह प्रत्यक्ष सूर्यच उगवला आहे.! (उत्तमगुणालंकृत असा पुरुष बहुजनांत प्रतापसूर्या सारखा प्रकाशणार!)

जाणता पुरुष असेल जेथें । कळहो कैचा उठेल तेथें । उत्तम गुणाविषीं रितें । तें प्राणी करंटे ॥ १६॥

असा जाणता पुरुष जेथे असतो तेथे (त्या समाजांत) भांडण कोठून उत्पन्न होणार? (-कलह उठत नाहीत.) असे उत्तम गुण ज्यापाशी नाहीत तो माणूस करंटा समजावा.

प्रपंची जाणे राजकारण । परमार्थी साकल्य विवरण । सर्वांमधें उत्तम गुण । त्याचा भोक्ता ॥ १७ ॥

प्रपंचात राजकारण उत्तम जाणतो व परमार्थात अध्यात्माचे उत्तम विवरण करतो आणि सर्वामध्ये उत्तम उत्तम जे गुण असतील त्यांचा जो भोक्ता असतो तोच भाग्यवंत होय.

मागें येक पुढें येक । ऐसा कदापी नाहीं दंडक । सर्वत्रांसीं अलोलिक । तया पुरुषाची ॥ १८ ॥

( अलोलिक - अपूर्वता )

मागे एक व पुढे एक असा दुटप्पीपणा त्याचे जवळ कधीही नसतो,सर्वच लोकांना सांगत असतो. सर्वच लोकांना त्याची धन्यता वाटते.

अंतरासी लागेल ढका । ऐसी वर्तणूक करूं नका । जेथें तेथें विवेका । प्रगट करी ॥ १९ ॥

( ढका - धक्का )

कोणाच्याही अंतःकरणाला धक्का बसेल असे वागू नका. अश्या प्रकारच्या विवेकाच्या गोष्टी तो लोकांना सांगत असतो (तो कोणाचेही अंतर दुखावीत नाही,जेथे तेथे विवेकच प्रकट करितो.)

कर्मविधी उपासनाविधी । ज्ञानविधी वैराग्यविधी । विशाळ ज्ञात्रुत्वाची बुद्धी । चळेल कैसी ॥ २० ॥

कर्म,उपासना,ज्ञान,वैराग्य हे सर्व विधिपूर्वक कसे करावे हे माहित असून जाणतेपणाने व्यापक झालेली त्याची बुद्धि कधीही चळत नाही.( कर्म,उपासना,ज्ञान,वैराग्य ज्ञातेपणाची विशाल स्थिर बुद्धि सर्व त्यापाशी उत्तम असते.

पाहातां अवघे उत्तम गुण । तयास वाईट म्हणेल कोण । जैसा आत्मा संपूर्ण । सर्वां घटीं ॥ २१ ॥

( सर्वां घटीं - सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी )

(त्याला वाईट कोण म्हणेल? सर्वाघटी आत्माराम नांदतो तसाच तो सर्वान्तर्यामी प्रिय होऊन राहातो,) जो जो त्याचा गुण पाहावा तो तो उत्तमच असतो,अश्या त्याला वाईट कोण म्हणणार? जसा अंतरात्मा सर्व घटामध्ये नांदतो (तसाच सर्वांच्या अंतर्यामी प्रिय होऊन राहतो)

आपल्या कार्यास तत्पर । लोक असती लाहानथोर । तैसाचि करी परोपकार । मनापासुनी ॥ २२ ॥

लहान थोर सर्वजण आपापल्या स्वतःच्या कार्यास तत्पर असतात तसाच हाही मनापासुन परोपकारासाठी (परकार्यात) झटत असतो.

दुसर्याच्या दुःखें दुखवे । दुसर्याच्या सुखें सुखावे । आवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ॥ २३ ॥

दुसऱ्याला दु:ख झाले कि ह्याला दु:ख होते.दुसरे सुखी झाले म्हणजे ह्याला सुख वाटते.(परदु:खाने दु:खी व परसुखाने सुखी होतो) सारेच जण सुखी असावेत (सारे सुखी असावेत) अशी त्याची शुद्ध वासना असते.

उदंड मुलें नानापरी । वडिलांचें मन अवघ्यांवरी । तैसी अवघ्यांची चिंता करी । माहांपुरुष ॥ २४ ॥

अनेक गुणांची अनेक मुले असली तरी त्या सर्वांवरच वडिलांचे लक्ष असते,त्याप्रमाणे महापुरुष सर्वांच्या कल्याणाची चिंता वाहतो.

जयास कोणाचें सोसेना । तयाची निःकांचन वासना । धीकारिल्या धीकारेना । तोचि महापुरुष ॥ २५ ॥

( धीकारिल्या धीकारेना - कोणी कितीही नावे ठेवली तरी तो कोणाचा धिक्कार करत नाही )

ज्याला कोणाचेही उणे सहन होत नाही (पाहवत नाही) ज्याची वासना निर्लोभ (निष्कांचन) असते आणि कोणी कितीही धिक्कार केला तरी अंतःकरणात निश्र्चल असतो.तोच महापुरुष होय.

मिथ्या शरीर निंदलें । तरी याचें काये गेलें । ज्ञात्यासी आणि जिंतिलें । देहेबुद्धीनें ॥ २६ ॥

लटक्या शरीराची कोणी निंदा केली तर त्यामुळे त्याचे काय नुकसान झाले? ज्ञात्याला आणखी देह्बुद्धीने जिंकले. असे कधीही होणार नाही.(नाशवंत व मिथ्या देहाची कोणी निंदा केली तरी ह्याचे काही जात नाही.ज्ञाता असून देहाबुद्धीने जिंकला गेला असे कधीही होत नाही.)

हें अवघें अवलक्षण । ज्ञाता देहीं विलक्षण । कांहीं तऱ्ही उत्तम गुण । जनीं दाखवावे ॥ २७ ॥

देहबुद्धी हे अवलक्षण (करंट्याची खुण) आहे,ज्ञाता देहातीत असतो,(ज्ञाता जो असतो तो आपण देहाहून वेगळे (विलक्षण) आहोत हे पूर्ण जाणतो.) काहीतरी उत्तम गुण मनुष्याने जगात दाखवावेत (प्रकट करावेत)

उत्तम गुणास मनुष्य वेधे । वाईट गुणासी प्राणी खेदे । तीक्षण बुद्धि लोक साधें । काये जाणती ॥ २८ ॥

( वेधे - आकर्षित करतो )

(उत्तम गुणांनी मनुष्यमात्र वेधतो) वाईट गुण लोकांस खेदकारक होतात.साध्या लोकांना ज्ञात्याच्या तीक्ष्ण बुद्धीची खोली काय कळणार?) उत्तम गुणांनी काय समजणार ?

लोकीं अत्यंत क्षमा करिती । आलियां लोकांचे प्रचिती । मग ते लोक पाठी राखती । नाना प्रकारीं ॥२९॥

जाणता मनुष्य जगात अत्यंत क्षमाशीलतेने वागतो,असा लोकांना अनुभव आला म्हणजे ते लोक अनेक प्रकारे त्याचा पाठराखेपणा करतात.(म्हणून ज्ञाता चिडचिड न करता क्षमा करतो,लोकांचे अवगुण शांतपणे पोटात घालतो व ही ह्याची क्षमाशीलता अनेक प्रसंगी लोकांच्या प्रत्ययास आली म्हणजे लोक उत्तम प्रकारे त्याची पाठ राखतात त्याचे अनुयायित्व पत्करतात)

बहुतांसी वाटे मी थोर । सर्वमान्य पाहिजे विचार । धीर उदार गंभीर । माहांपुरुष ॥ ३० ॥

बहुतेक लोक स्वतःलाच थोर समजतात,परंतु हा थोरपणा सर्वांनाच पसंत पडला पाहिजे,(पण तो सर्वमान्य आहे म्ह.ज्याला सर्व लोक थोर समजतात तोच खरा थोर होय.) महापुरुष हा धीर.उदार व गंभीर असतो.

जितुके कांहीं उत्तम गुण । तें समर्थाचें लक्षण । अवगुण तें करंटलक्षण । सहजचि जालें ॥ ३१ ॥

तात्पर्य,जेवढे काही उत्तम गुण ते तेवढे सगळे मिळून समर्थाचे (भाग्यवंतांचे) लक्षण होय,अर्थात अवगुण हे करंटपणाचे लक्षण होय.हे सहजच सिद्ध झाले (जितके गुण आहेत ते सर्व समर्थाचे (भाग्यवंताचे आहेत  व त्याच्या उलट म्ह.अवलक्षणे-जे दोष आहेत ते सर्व करंट्याचे आहेत)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सदेवलक्षणनिरूपणनाम समास चौथा ॥**

## समास पांचवा : देहमान्यणनिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥

मातीचे देव धोंड्याचे देव । सोन्याचे देव रुप्याचे देव ।काशाचे देव पितळेचे देव ।तांब्याचे देव चित्रलेपे॥१॥

मातीचे देव धोंडे (पाषाणाचे देव) ,सोने,रूपे,(सोन्यारुप्याचे देव),कासे,पितळ,(कश्यापितळ्याचे देव),तांबे,(तांब्याचे देव),चित्रलेप (गोपीचंदन किवा गंधगोळ्या ह्यांच्या मूर्ति),तसबिरी (भिंतीवरिल चित्रे)

रुविच्या लांकडाचे देव पोंवळ्य्यांचे देव । बाण तांदळे नर्मदे देव । शालिग्राम काश्मिरी देव । सूर्यकांत सोमकांत ॥ २ ॥

( रुविच्या - रुईच्या )

रुईचीं लांकडे,पोवळी,(रुईच्या लाकडाचे किवा पोवळ्यांचे देव),बाण तांदळे नर्मदे (नर्मदेच्या पत्रातून आलेले पाषाणदेव) शाळीग्राम,काश्मिरी दगड (काश्मिरी दगडाचे देव),सूर्यकांत व सोमकांतमणि.

तांब्रनाणीं हेमनाणी । कोणी पूजिती देवार्चनीं । चक्रांगीत चक्रतीर्थाहुनी । घेऊन येती ॥ ३ ॥

तांब्याची किवा सोन्याची नाणी इत्यादि अनेक प्रकारच्या प्रतिमा करून लोक त्याची देव म्हणून पूजा करतात,कोणी पूजेसाठी चक्रतीर्थातून चक्रांकित देव घेऊन येतात.(अशा अनेक देवांची लोक देवार्चनात पूजा करितात)

उदंड उपासनेचे भेद । किती करावे विशद । आपलाले आवडीचा वेध । लागला जनीं ॥ ४ ॥

असे उपासनेचे अनेक भेद (प्रकार) आहेत ते किती म्हणून सांगावे ?(ते कोठवर विशद करून दाखवायचे?) लोकांना आपापल्या आवडीचा छंद लागलेला असतो (जो तो आपल्या आवडीच्या छंदाप्रमाणे पूजा करीत असतो)

परी त्या सकळांचें हि कारण । मुळीं पाहावें स्मरण । तया स्मरणाचे अंश जाण । नाना देवतें ॥ ५ ॥

पण त्या सर्व देवांचे मुख्य कारण परब्रह्माच्या ठिकाणचे स्मरण (स्पुरण,मूळमाया) होय.अनेक देवतेही त्या स्मरणाचे अंश होत,

मुळीं द्रष्टा देव तो येक । त्याचे जाहाले अनेक । समजोन पाहातां विवेक । उमजों लागे ॥ ६ ॥

मूळचा द्रष्टा देव (मूळपुरुष किवा अंतरात्मा) एक आहे. त्याचेच हे अनेक झाले आहेत हे विवेकाने निट समजून घेतले म्हणजे उमजू लागते.

देह्यावेगळी भक्ति फावेना । देह्यावेगळा देव पावेना । याकारणें मूळ भजना । देहेचि आहे ॥ ७ ॥

देहावाचून भक्ति करता येत नाही,देहावाचून देवाची प्राप्ति होत नाही.म्हणुन भजनाला मूळकारण देह आहे.

देहे मुळींच केला वाव । तरी भजनासी कैंचा ठाव । म्हणोनी भजनाचा उपाव । देह्यात्मयोगें ॥ ८ ॥

देह मुळीच मिथ्या केला तर भजनाला थारा कोठचा ?(-म्हणजे भजन सरले,म्हणून देहावीण भाजनोपाय नाही) ह्यास्तव देह व आत्मा ह्यांच्या संयोगानेच भजन करता येंणार आहे.

देहेंविण देव कैसा भजावा ।देहेंविण देव कैसा पुजावा ।देह्याविण मोहछाव कैसा करावा ।कोण्या प्रकारें॥९॥

देहावाचून भजन पूजन कसे करावे? आणि देवाचा महोत्सव तरी देहावाचून कसा व कोणत्या प्रकारे करावा?

अत्र गंध पत्र पुष्प । फल तांबोल धूप दीप । नाना भजनाचा साक्षेप । कोठें करावा ॥ १० ॥

(अत्र-येथे) गंध,पत्र,पुष्प,फल,तांबूल,धूप,दिप इत्यादी पूजासाहित्य तरी (देवाचा व भक्तांचा) देह नसेल तर कोठे करता येते?(-सर्व देहाधारेंच होते.)

देवाचें तीर्थ कैसें घ्यावें । देवासी गंध कोठें लावावें । मंत्रपुष्प तरी वावें । कोणें ठाईं ॥ ११ ॥

( वावें - वाहावे )

देवाचे तीर्थ कसे घ्यावयाचे? देवाला गंध तरी कोठे लावायचे? आणि मंत्रपुष्प तरी वाहावयाचे ते कोणत्या ठिकाणी?

म्हणोनी देह्याविण आडतें । अवघें सांकडेंचि पडतें । देह्याकरितां घडतें । भजन कांहीं ॥ १२ ॥

म्हणून देहावाचून सर्वकाही अडते,सगळीच अडचण पडते देहामुळेच (-देह आहे म्हणून) काही भजन घडते,

देव देवता भूतें देवतें । मुळींचे सामर्थ्ये आहे तेथें । अधिकारें नाना देवतें । भजत जावीं ॥ १३ ॥

देव,देवता,भुते,देवते इत्यादिकांच्या ठिकाणी मूळपुरुषाचेच सामर्थ्य आहे.म्हणून त्यांचे अधिकारानुसार भजन करीत जावे.

नाना देवीं भजन केलें । तें मूळ पुरुषासी पावलें । याकारणें सन्मानिलें । पाहिजे सकळ कांहीं ॥ १४ ॥

अनेक देवांचे भजन केले तरी ते एका मूळ पुरुषासच पोहोचते,म्हणून सर्वांचा आदर केला पाहिजे.( म्हणून ते भजन अवश्य करून सर्व सर्व देवांचा संतोष ठेवला पाहिजे.)

मायावल्ली फांपावली । नाना देहेफळीं लगडली । मुळींची जाणीव कळों आली । फळामधें ॥ १५ ॥

मायावल्ली फोफावून तिला अनेक देहरूपी फळे लटकली आहेत आणि मूळमायेत असलेली जाणीव ह्या फळांमधून ही दिसून येते.(मूळमायेपासून सृष्टि वाढता वाढता नाना देहापर्यंत वाढली आहे. म्ह. देह हे मूळमायावल्लींचे फळ आहे. म्हणून मूळमायेतली जाणीव सर्व देहात प्रकटली आहे.)

म्हणोनी येळील न करावें । पाहाणें तें येथेंचि पाहावें । ताळा पडतां राहावें । समाधानें ॥ १६ ॥

( येळील न करावें - येळील = कंटाळा,ओशाळ,मिध )

ह्यासाठी भजन पूजनाचा आळस करू नये.(नाना देवांच्या पूजनाचा कंटाळा-येळील करू नये.) जे काय पाहणे असेल ते ह्या उपासनेतच पाहावे.(मूळपुरुष येथेच पहावा) व ताळा पटला म्हणजे समाधानाने राहावे.(अनेक देव देवतांत मूळपुरुषाचा तंतू आहे, हे जाणून त्याच्या स्मरणाने समाधान पावावे)

प्राणी संसार टाकिती । देवास धुंडीत फिरती । नाना अनुमानीं पडती । जेथ तेथें ॥ १७ ॥

संसार टाकून (सोडून) प्राणी देवाला धुंडीत फिरतात,परंतु प्रत्येक ठिकाणी (व जेथे तेथे) अनेक प्रकारच्या संशयात (अनुमानात) मात्र अधिक अधिक पडतात.

लोकांची पाहातां रिती । लोक देवार्चनें करिती । अथवा क्षत्रदेव पाहाती । ठाईं ठाईं ॥ १८ ॥

लोकरूढि पाहिली तर ती अशी आहे,कोणी घरच्या देवाचे पूजन करतात.(लोक देवार्चने करतात) किंवा कोणी ठिकठिकाणच्या क्षेत्रातील देवांची दर्शने घेतात (किवा अनेक क्षेत्रात जाऊन क्षेत्रदेव पाहतात)

अथवा नाना अवतार । ऐकोनी धरिती निर्धार । परी तें अवघें सविस्तर । होऊन गेलें ॥ १९ ॥ येक ब्रह्माविष्णुमहेश । ऐकोन म्हणतीं हे विशेष । गुणातीत जो जगदीश । तो पाहिला पाहिजे ॥ २० ॥

किवा अनेक अवतार चरित्रे ऐकून त्यापैकी एखाद्या अवतारावर विश्वास ठेवतात किंवा हे होऊन गेलेले अवतार ज्यांचे आहेत त्या ब्रह्मा विष्णू महेश्वर यांचे महात्म्य ऐकून ( त्यांना भजतात) हेच श्रेष्ठ असे कोणी म्हणतात (हे सर्व ठिक आहे पण हे सर्व देव गुणातले होत.) गुणातीत जो जगदीश त्याला पाहिले पाहिजे.

देवासी नाहीं थानमान । कोठें करावें भजन । हा विचार पाहातां अनुमान । होत जातो ॥ २१ ॥

त्या देवाचा ठावठिकाणा (थान-मान) सापडत नाही तर भजन कोठे करावे?(असे म्हणाल तर संशयाच्या गोत्यात पडाल) प्रश्नाचा विचार करू लागले म्हणजे अनेक उपासंना कश्या आल्या ह्याचा अंदाज (तर्क) करता येतो.

नसतां देवाचें दर्शन । कैसेन होईजे पावन । धन्य धन्य ते साधुजन । सकळ जाणती ॥ २२ ॥

परंतु मुख्य देवाचे दर्शन न झाले तर पावन कसे होता येईल? (हा प्रश्न राहतोच) ह्या सर्व गोष्टींचा निर्णय जाणणारे (उपासनेचा पूर्ण विचार करणारे व मुख्य देवाला जाणणारे) साधुसंत धन्य होत!

भूमंडळी देव नाना । त्यांची भीड उलंघेना । मुख्य देव तो कळेना । कांहीं केल्यां ॥ २३ ॥

जगात (पृथ्वीवर) अनेक देव आहेत त्या देवांची भीड तुटत नाही (त्यांना नाशिवंत म्हणवत नाही) आणि मुख्य देव तर काही केल्या कळत नाही

कर्तुत्व वेगळें करावें । मग त्या देवासी पाहावें । तरीच कांहींयेक पडे ठावें । गौप्यगुह्य ॥ २४ ॥

कर्तुत्व (सर्व सृष्टीतील पदार्थ) बाजूला (परत) सारून मग त्या निर्गुण निश्चल देवाला पाहावे म्हणजे देवाचे गुप्त रहस्य काहीतरी माहीत होते (तरच ह्या अध्यात्मातले काही रहस्य उलगडेल.)

तें दिसेना ना भासेना । कल्पांतीं हि नासेना । सुकृतावेगळें विश्वासेना । तेथें मन ॥ २५ ॥

ते निर्गुण ब्रह्म (तो मुख्य देव) दिसत नाही,भासत नाही, कल्पांतीही त्याचा नाश होत नाही (ते अविनाशी आहे.) व अत्यंत पुण्य पदरी असल्यावाचून त्याच्या ठिकाणी विश्वास बसत नाही,(तेथे मन विसंबत नाही.)

उदंड कल्पिते कल्पना । उदंड इछिते वासना । अभ्यांतरीं तरंग नाना । उदयातें पावती ॥ २६ ॥

(मनुष देहबुद्धीवर आहे तोपर्यंत) अनंत कल्पना व वासना ह्यांचे अनंत तरंग अंतःकरणांत उत्पन होत असतात (अंतरी उठत असतात) (व नाश पावतात) .

म्हणोनी कल्पनारहित । तेचि वस्तु शाश्वत । अंत नाहीं म्हणोनी अनंत । बोलिजे तया ॥ २७ ॥

म्हणुन कल्पनारहित असणारी ती परब्रह्म वस्तूच शाश्र्वत आहे.त्याला अंत नाही म्हणून त्याला अनंत म्हणतात.

हें ज्ञानदृष्टीनें पाहावें । पाहोनी तेथेंचि राहावें । निजध्यासें तद्रूप व्हावें । संगत्यागें ॥ २८ ॥

(म्हणून देहातीत होऊन निर्वीकल्प शाश्र्वत अनंत परब्रह्म वस्तू मिळते हे ज्ञानदृष्टींने पाहावे व तेथेच तन्मय होऊन राहावे व त्या निजात्म-वस्तूच्या निदिध्यासाने संगत्याग करून तद्रूप व्हावे.) ते ज्ञानदृष्टीने पहावयाचे व पाहून तेथेच राहावयाचे ते संगत्याग करून त्याच्या निदिध्यासाने तद्रूप होऊन राहावयाचे.

नाना लीळा नाना लघवें । तें काये जाणिजे बापुड्या जीवें । संतसंगें स्वानुभवें । स्थिति बाणे ॥ २९ ॥

त्या तद्रूपतेचे अनेक प्रकारचे लीलालाघव (काय वानवे?) (तो आनंद बापड्या जीवास देहबुद्धिमंतास काय ठाऊक?(क्षुद्र जीवाला ते काय कळणार? संतसंगतीने व स्वानुभवानेच ती स्थिति बाणते.)

ऐसी सूक्ष्म स्थिति गती । कळतां चुके अधोगती । सद्गुरुचेनि सद्गती । तत्काळ होते ॥ ३० ॥

त्या सूक्ष्म स्थिति गतीचे सद्गुरूकृपेने प्रत्यक्ष ज्ञान झाले की अधोगति चुकते सद्गुरू प्रसादाने ही स्थिति तात्काळ लाभते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहमान्यणनिरूपणनाम समास पांचवा ॥**

**(संत तुकाराम महाराजांनी ब्रह्मप्राप्तीसाठी सो:ह साधना सांगितली. ऊर्ध्वमुखे अलाविला । सो:हं शब्दाचा नाद अरूप जागविला दाता । घेउनिया छंद । सो:हं हंस: ऐसे म्हणसी । तत त्वम असि । ते ब्रह्म आहेसी तुचि स्वये ।)**

## समास सहावा : बुद्धिवादनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

परमार्थी आणि विवेकी । त्याचें करणें माने लोकीं । कां जे विवरविवरों चुकी । पडोंचि नेदी ॥ १ ॥

जो परमार्थी व विवेकी असतो त्याचे करणे लोकांना पटते (लोकात मान्य होते) कारण तो पूर्ण विचार करून आपल्या कामात चूक होऊ देत नाही,

जो जो संदेह वाटे जना । तो तो कदापी करीना । आदिअंत अनुमाना । आणून सोडी ॥ २ ॥

लोकांच्या मनात ज्याच्यामुळे संशय उठतील असे तो काहीच करीत नाही,प्रत्येक कार्याचा आरंभ व शेवट (पर्यवसान) ह्याचा तो अगोदरच विचार करतो.

स्वतां निस्पृह असेना । त्याचें बोलणेंचि मानेना । कठिण आहे जनार्दना । राजी राखणें ॥ ३ ॥

जो स्वतः निस्पृह (निरपेक्ष) असतो, त्याचे बोलणे कोणी मानत नाही,(जनीजनार्दनाला-लोकांना) लोकांच्या अंतरात्म्याला राजी राखणे कठीण आहे.

कोणी दटून उपदेश देती । कोणी मध्यावर्ती घालिती । ते सहजचि हळु पडती । लालचीनें ॥ ४ ॥

( मध्यावर्ती - मध्यस्ती , हळु पडती - फिके पडती )

कोणी जबरदस्तीने (बलात्काराने) उपदेश देतात,कोणी त्यासाठी मधस्थ उभे करतात,असले लोक त्यांच्या लोभी स्वभावामुळे (लालचीने) सहजच मागे पडत जातात.(पण त्यांचा लोभिष्टपणा मागे पुढे कळून येऊन त्यांचे वजन नाहीसे होते)

जयास सांगावा विवेक । तोचि जाणावा प्रतिकुंचक । पुढें पुढें नासक । कारबार होतो ॥ ५ ॥

( प्रतिकुंचक - प्रतिकुल,विरोधक )

ज्याला त्यांनी विवेकाच्या गोष्टी सांगाव्या तोच त्यांना प्रतिकुल होऊन बसतो आणि पुढे पुढे तर त्याचा सगळा कारभार नासून जातो.

भावास भाऊ उपदेश देती । पुढें पुढें होते फजिती । वोळकीच्या लोकांत महंती । मांडूंचि नये ॥ ६ ॥

कोठे भाऊ भावाला उपदेश देतात,त्यांची पुढे फजिती होऊ लागते (फजीतवाडा होतो) त्यासाठी महंतीच्या लोकांत महंती मांडूच नये.

पहिलें दिसे परी नासे । विवेकी मान्य करिती कैसे । अविवेकी ते जैसे तैसें । मिळती तेथें ॥ ७ ॥

(आरंभी थाटमाट वाढतो पण पुढे टिकत नाही -तो विवेकी शिष्यांना मान्य होत नाही) पहिल्याने थाटमाट दिसतो पण विवेकी लोकांना त्याची वागणूंक पसंत न पडल्यामुळे तो थाट टिकत नाही,अविचारी लोक मात्र कसेबसे टिकून राहतात.

भ्रतार शिष्य स्त्री गुरु । हाहि फटकाळ विचारु । नाना भ्रष्टाकारी प्रकारु । तैसाचि आहे ॥ ८ ॥

(नवऱ्याला शिष्य करून बायकोने त्याचे गुरुत्व घ्यायचे) नवरा शिष्य व त्याचा गुरु स्त्री (त्याची बायको) हाही फाजीलपणाचा प्रकार आहे.अनेक (भ्रष्टपणाचे) भ्रष्टाकारचे मार्ग (प्रकार) जगात आहेत त्यातलाच हा एक.

प्रगट विवेक बोलेना । झांकातापा करी जना । मुख्य निश्चय अनुमाना । आणूंच नेदी ॥ ९ ॥

( झांकातापा - थापा )

लोकांना उघड रीतीने विवेक सांगत नाही (विचाराचा मार्ग दाखवत नाही) गुप्तपणाने काहीतरी थापाथापी करतो (झाकून उपदेश देतो) मुख्य निश्र्चयाचा (आत्मनिश्र्चयाचा) विचार शिष्याच्या मनात येऊच देत नाही (मुख्य निश्र्चय आत्मनिश्र्चय करून देत नाही)

हुकीसरिसा भरीं भरे । विवेक सांगतां न धरे । दुरीदृष्टीचे पुरे । साधु नव्हेती ॥ १० ॥

( हुकीसरिसा - लहरीप्रमाणे )

लहरीसारखा एखादा छंद घेऊन बसतो (एखादा प्रकार करितो) कोणी विचार सांगितला तर मनावर घेत नाही असले लोक दूरदर्शी व पक्के साधू नव्हेत,

कोण्हास कांहींच न मागावें । भगवद्भजन वाढवावें । विवेकबळें जन लावावे । भजनाकडे ॥ ११ ॥

कोणाजवळ काहीही न मांगता (निरपेक्षपणाने) जगात भगवतभजन वाढवावे (लोक भक्तिपंथाला लावावे.त्याचा विवेक चेतवून त्यांना भजनाला लावावे)

परांतर रक्षायाचीं कामें । बहुत कठीण विवेकवर्में । स्वैछेनें स्वधर्में । लोकराहाटी ॥ १२ ॥

(परांतर रक्षावयाची विवेकवर्मे कळणे कठीण आहे, स्वेच्छेने व स्वधर्माने लोकरहाटी चालू करावी) दुसऱ्याचे अंतःकरण विवेकाच्या योगाने राजी राखण्याचे वर्म कळणे फार कठिण आहे. लोक स्वेछेने आपापल्या धर्माप्रमाणे वागतील असे करावे (कारण लोक आपल्या इच्छेने व स्वभावाप्रमाणे वागत असतात.)

आपण तुरुक गुरु केला । शिष्य चांभार मेळविला । नीच यातीनें नासला । समुदाव ॥ १३ ॥

आपण श्रेष्ठ वर्णाचा गुरु केला तो म्लेच्छ (तुरक,तुर्क) आणि शिष्य गोळा केले ते चांभार -अशा नीच जातीच्या संगतीमुळे लोकसमुदाय भ्रष्ट होतो.

ब्रह्मणमंडळ्या मेळवाव्या । भक्तमंडळ्या मानाव्या । संतमंडळ्या शोधाव्या । भूमंडळीं ॥ १४ ॥

म्हणून जगामध्ये ब्राह्मणांच्या मंडळ्या मिळवाव्या भक्तसमुदायाचा मान द्यावा (भक्तमंडळ्या मानाव्या) आणि संतांचे मेळे कोठे आहेत त्याचा शोध घ्यावा (आणि संत मंडळ्या सर्वत्र शोधाव्या)

उत्कट भव्य तेंचि घ्यावें । मळमळीत अवघेंचि टाकावें । निस्पृहपणें विख्यात व्हावें । भूमंडळीं ॥ १५ ॥

ह्या सर्व समुदायामधून उत्कृष्ट व भव्य असेल तेवढेच घ्यावे आणि मळमळीत असेल त्या सगळ्याचा त्याग करावा आणि नि:स्पृहपणाच्या बाण्यानें जगामध्ये कीर्ति गाजवावी (त्रैलोक्यात विख्यात व्हावे.)

अक्षर बरें वाचणें बरें । अर्थांतर सांगणें बरें । गाणें नाचणें अवघेंचि बरें । पाठांतर ॥ १६ ॥

अक्षर सुंदर वाचणे स्पष्ट,अर्थ सांगणे प्रांजळ (कीर्तनप्रसंगी) गाणे नाचणे व पाठांतर हे सर्वच चांगले.

दीक्षा बरी मित्री बरी । तीक्षण बुधी राजकारणी बरी । आपणास राखे नानापरी । अलिप्तपणें ॥ १७ ॥

दीक्षा उत्तम मैत्रही चांगली,राजकारणात प्रविष्ट होणारी बुद्धि तीक्ष्ण व तीव्र (असे अनेक गुण अंगी असून व लोककार्यात त्यांचा उपयोग करून) आपले स्वतःचे अलिप्तपण पुरे सांभाळतो.

अखंड हरिकथेचा छंदु । सकळांस लागे नामवेदु । प्रगट जयाचा प्रबोधु । सूर्य जैसा ॥ १८ ॥

( प्रबोधु - वेदांत शास्त्राचे प्रबोधन )

हरिकथेचा निरंतर हव्यास असून.सर्व लोकांस नामस्मरणाचा छंद (वेध) लावतो व त्याचा उपदेश (ज्ञानबोध) सूर्यप्रकाशासारखा उघड व तेजस्वी असतो.

दुर्जनासी राखों जाणे । सज्जनासी निवऊं जाणे । सकळांचे मनीचें जाणे । ज्याचें त्यापरीं ॥ १९ ॥

दुर्जनाला कसे मिळवून घ्यावे व सज्जनांचे समाधान कसे करावे हे त्याला माहीत असते (सज्जनांना शांतिसुख देतो) ज्याच्या त्याच्या परी तो सगळ्यांच्याच मनातला हेतु (सगळ्यांचे मनोगत) जाणून असतो.

संगतीचें मनुष्य पालटे । उत्तम गुण तत्काळ उठे । अखंड अभ्यासीं लगटे । समुदाव ॥ २० ॥

त्याच्या संगतीने मनुष्याचा स्वभाव बदलून त्याच्या अंगी असलेले उत्तम गुण तात्काळ प्रकट होतात आणि अनेक लोक निरंतर अभ्यासाला लागतात. ( त्याच्या संगतीने मनुष्याचा स्वभाव पालटून त्यांच्यातल्या उत्तम गुणांचा उत्तम गुणांचा उठाव होतो व अनेक लोक अभ्यासयोगाला लागतात.)

जेथें तेथें नित्य नवा । जनासी वाटे हा असावा । परंतु लालचीचा गोवा । पडोंचि नेदी ॥ २१ ॥

हा जाईल तेथे नित्य नवा वाटून लोकांस हवाहवासा वाटतो (होतो) पण तो स्वतः कोणत्याही लोभाच्या गुंताड्यात ( लालचीत) सापडत नाही.

उत्कट भक्ति उत्कट ज्ञान । उत्कट च्यातुर्य उत्कट भजन । उत्कट योग अनुष्ठान । ठाईं ठाईं ॥ २२ ॥

भक्ति,ज्ञान,चातुर्य,भजन,योग,अनुष्ठान, हे सर्व काही त्याचे प्रत्येक ठिकाणी उत्कृष्ट चालत असते.

उत्कट निस्पृहता धरिली । त्याची कीर्ति दिगांतीं फांकली । उत्कट भक्तीनें निवाली । जनमंडळी ॥ २३ ॥

( दिगांतीं - सर्वत्र दिग - दिशा )

त्याच्या उत्कट भक्तीने सर्व लोक समाधान पावतात (-प्राणिमात्र सुखी होतात ) त्यांची नि:स्पृहता उत्कट असल्यामुळे त्याची कीर्ति जगात दशदिशा फाकते.

कांहीं येक उत्कटेविण । कीर्ति कदापि नव्हे जाण । उगेंच वणवण हिंडोन । काये होतें ॥ २४ ॥

परंतु कोणता तरी एखादा गुण उत्कृष्ट (उत्कृष्ट) असल्याशिवाय कीर्ति जगात केव्हाही होणार नाही उगीच वणवण हिंडल्याने काय होणार?

नाहीं देहयाचा भरंवसा । केव्हां सरेल वयसा । प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ॥ २५ ॥

देहाचा भरवसा नाही आयुष्य केव्हा सरेल व कोणत्या वेळी काय प्रसंग (वर्तेल) बेतेल.हे कोणी सांगावे?

याकारणें सावधान असावें । जितुकें होईल तितुकें करावें । भगवत्कीर्तीनें करावें । भूमंडळ ॥ २६ ॥

म्हणून सावधान असावे,जेवढे सत्कर्म जमेल तेवढे करावे आणि भगवत्कीर्तीच्या योगाने सारे जग भरून सोडावे (भगवतकीर्तीने भूमंडळ भरावे)

आपणास जें जें अनुकूळ । तें तें करावें तत्काळ । होईना त्यास निवळ । विवेक उमजावा ॥ २७ ॥

जेवढे आपणाला होण्यासारखे (अनुकूल) असेल ते ताबडतोब करीत जावे आणि होण्यासारखे नसेल. (होण्यास दुर्घट असेल) त्याचा नीट (पुरा) विचार करावा.

विवेकामधें सापडेना । ऐसें तो कांहींच असेना । येकांतीं विवेक अनुमाना । आणून सोडी ॥ २८ ॥

विवेकाच्या योगाने कळणार नाही अशी गोष्ट एकही नाही,एकांतामध्ये विवेक करीत बसले म्हणजे योग्य तर्क उत्पन्न होतो,(विवेकाने काय होत नाही असे काहीच नाही म्हणून एकांतात विवेकाने पुरा विचार करावा)

अखंड तजवीजा चाळणा जेथें । पाहातं काय उणें तेथें । येकांतेंविण प्राणीयांतें । बुद्धि कैसी ॥ २९ ॥

जेथे निरंतर तजविजा (उपाययोजना) व चालना (विचार) चालत असतात तेथे काय कमी पडणार? (तेथे उणे काय आहे?अशक्य काय आहे?) एकांतावाचून प्राण्याला शहाणपणाची बुद्धी कोठून सुचणार? (एकांतावाचून मनुष्याला बुद्धि सुचावी कशी ?)

येकांती विवेक करावा । आत्माराम वोळखावा । येथून तेथवरी गोवा । कांहींच नाहीं ॥ ३० ॥

म्हणुन एकांतात बसून विवेक (विचार) करावा आणि आत्माराम ओळखावा म्हणजे आरंभापासून शेवटपर्यंत कोठेही घोटाळा राहणार नाही.(गुंता उरणार नाही)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे बुद्धिवादनिरूपणनाम समास सहावा ॥**

**(सोsहं साधनेने "मी" या शरीराशी असलेला संबंध सुटतो आणि साधक आत्मलीन होतो.संत एकनाथांनी स्वरूपानुसंधनाचा ब्रह्मरुपाकडे घेऊन जाणारा हा मार्ग सांगितला - एका जनार्दनी । सोsहं नव्हे पवन । पवनाचे वर्तन । सोsहं सत्ता । या सत्तेकडे लक्ष देणे हेच स्वरूपानुसंधान होय.)**

## समास सातवा : यत्‍ननिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

कथेचें घमंड भरून द्यावें । आणी निरूपणीं विवरावें । उणें पडोंचि नेदावें । कोणीयेकविषीं ॥ १ ॥

हरिकथेच्या प्रसंगी (हरिकीर्तनप्रसंगी) सगुण प्रेमाची लयलूट (घमंड) करून घ्यावी आणि निरुपणप्रसंगी अध्यात्माचे विवरण करावे,कोणत्याही बाबतीत कमतरता राहु देऊ नये.

भेजणार खालें पडिला । तो भेजणारी जाणितला । नेणता लोक उगाच राहिला । टकमकां पाहात ॥ २ ॥

( भेजणार - डोंबारी )

भेजणार (भजन करणारा,ज्ञान सांगणारा,कीर्तन करणारा) कोठे घसरला किंवा चुकला तर ते जाणत्यालाच (तज्ञालाच) कळते,अडाणी (सामान्य) श्रोते नुसते टकामका पहात राहतात.

उत्तर विलंबीं पडिलें । श्रोतयांस कळों आलें । म्हणिजे महत्व उडालें । वक्तयाचें ॥ ३ ॥

उत्तर देण्यास विलंब लागला की (ह्याची तयारी कच्ची आहे) हे श्रोत्यांना समजून येते आणि त्यामुळे त्या वक्त्याचे महत्व (उरत नाही) नाहीसे होते.

थोडें बोलोनि समाधान करणें । रागेजोन तरी मन धरणें । मनुष्य वेधींच लावणें । कोणीयेक ॥ ४ ॥

थोडे बोलून शंकासमाधान करावे जरी स्वतःला राग आला तरी तो दाबून लोकांच्या मनाप्रमाणे वागावे. (१) आपल्याला राग आला तरी आपले मन आवरून धरावे (२) कोणा श्रोत्याला राग आला तरी त्याची मर्जी सांभाळावी (३) रागावून का होईना पण दुसऱ्याचे मन आपलेसे करावे कोणत्याही माणसाला आपलाच वेध लागेल असे करावे (सर्व प्रकारच्या लोकांना चटक लावावी)

सोसवेना चिणचिण केली । तेथें तामसवृत्ती दिसोन आली । आवघी आवडी उडाली । श्रोतयाची ॥ ५ ॥

कोणाचे बोलणे सोसवेनासे झाल्यामुळे वक्त्याने चिरचिर केली (हरिदास चिणचिण करू लागला) म्हणजे त्याचा तामसीपणा (रागीटपणा) श्रोत्यांना दिसून येतो व त्यामुळे श्रोत्यांचे त्याच्याबद्दल असलेले प्रेम नाहीसे होते (व श्रोत्यांची आवड नाहीशी होते)

कोण कोण राजी राखिले । कोण कोण मनी भंगिले । क्षणक्षणा परीक्षिले । पाहिजे लोक ॥ ६ ॥

कोण कोण संतुष्ट झाले (कोणाचे मन सुप्रसन्न झाले) व कोणाचे मन दुखावले गेले हे वक्त्याने वरचेवर पारखून पाहिले पाहिजे.(क्षणक्षणा पाहिले पाहिजे)

शिष्य विकल्पें रान घेत । गुरु मागें मागें धांवतो । विचार पाहों जातां तो । विकल्पचि अवघा ॥ ७ ॥

शिष्याच्या मनात गुरुसंबधाने विकल्प येऊन तो अरण्यात निघून जातो आणि गुरु त्याच्या मनधरणीसाठी त्याच्या मागे मागे धावतो,ह्याचा विचार पाहिला तर दोघे विकल्पीच ठरतात.

आशाबद्धी क्रियाहीन । नाहीं च्यातुर्याचें लक्षण । ते महंतीची भणभण । बंद नाहीं ॥ ८ ॥

( आशाबद्धी - आशाअपेक्ष्यानी दिन )

आशाळभूत,आचारभ्रष्ट,चातुर्यहीन व जिला काही मर्यादा नाही अशा महंतीची (गुरुपणाची) फजिती उडते.(अशा महंतीची-गुरुपणाची-फजिती उडते.तिला काही बंध-मर्यादा-राहात नाही)

ऐसे गोसावी हळु पडती । ठाईं ठाईं कष्टी होती । तेथें संगतीचे लोक पावती । सुख कैचें ॥ ९ ॥

( हळु पडती - महत्व उणावते )

असे गोसावी (गुरु,हरिदास) मागे पडत जातात (म्ह.त्यांचे महत्व नाहीसे होते) ते जागोजाग कष्टी होतात (स्वतः तेच कष्टी) तेथे जवळच्या लोकांना सुख कोठून मिळणार?

जिकडे तिकडे कीर्ति माजे । सगट लोकांस हव्यास उपजे । लोक राजी राखोन कीजे । सकळ कांहीं ॥१०॥

सर्वत्र कीर्ति पसरावी,सर्वांना आवड-हव्यास वाटावा,लोक राजी राखून सर्व करावे.) जिकडे तिकडे कीर्ति पसरेल सर्व लोकांना आपल्या संबंधी आवड उत्पन्न होईल ह्यासाठी जे काही करणे ते सर्व लोक संतुष्ट राखून करावे.

परलोकीं वास करावा । समुदाव उगाच पाहावा । मागण्याचा तगादा न लवावा । कांहीं येक ॥ ११ ॥

दूरदेशी जाऊन राहावे व तेथून आपला शिष्यसमुदाय कसा वागतो (आपले सांप्रदायिक कसे वागतात) ते उगीच पाहात असावे,मागण्याचा सपाटा मुळीच लावू नये.

जिकडे जग तिकडे जगन्नायेक । कळला पाहिजे विवेक । रात्रीदिवस विवेकी लोक ।सांभाळीत जाती॥१२॥

जिकडे जग तिकडे जगन्नायक असतो हे तत्व कळले पाहिजे.विवेकी (विचारी) लोक रात्रंदिवस हेच सांभाळीत असतात.

जो जो लोक दृष्टीस पडिला । तो तो नष्ट ऐसा कळला । अवघेच नष्ट येकला भला । काशावरुनी ॥१३॥

जो जो मनुष्य दृष्टीस पडला तो तो नष्ट(वाईट)असा वाटला तर मग सारेच नष्ट(वाईट)आणि तूच एकटा चांगला-भला-कशावरून?(तसे ह्याला कोणीही विचारील)

वोस मुलकीं काये पाहावें । लोकांवेगळें कोठें राहावें । तऱ्हे खोटी सांडतें घ्यावें । कांहीं येक ॥ १४ ॥

सगळेच नष्ट हे खरे व त्यासाठी हा अरण्यात जाऊन बसला तर (त्या ओसाड प्रदेशात हा काय करणार,काय पहाणार,? लोकांना सोडून कोठे राहणार?तऱ्हेवाईकपणा वाईट म्हणून काही तरी पड घेत असावी.

तस्मात लोकिकीं वर्ततां नये ।त्यास महंती कामा नये ।परत्र साधनाचा उपाये । श्रवण करून असावें॥१५॥

ज्याला लौकिकात वागता येत नाही,त्याने महंती करू (मांडू) नये त्याने परलोक साधनाचा मार्ग (उपाय) जे श्रवण तेवढे करून असावे.

आपणासी बरें पोहतां नये ।लोक बुडवावयाचें कोण कार्य ।गोडी आवडी वायां जाये ।विकल्पचि अवघा॥१६॥

आपणाला जर नीट पोहोता येत नाही तर आपल्या कासेला लाऊन लोकांना तरी बुडवू नये,तशाने परस्परांमधील गोडी व प्रेम नाहीसे होऊन सगळा विकल्पच माजतो.(प्रेमभावाची त्याने हानि होऊन विकल्प वाढतो)

अभ्यासें प्रगट व्हावें । नाहीं तरी झांकोन असावें । प्रगट होऊन नासावें । हें बरें नव्हे ॥ १७ ॥

अभ्यासाने पुरी तयारी झाली असेल तेव्हा प्रकट व्हावे,नाहीतर गुप्तपणे असावे हे बरे प्रकट होऊन अपकीर्ति होणार हे बरे नाही.(अपकीर्ति करून घ्यावी हे ठीक नाही.)

मंद हळु हळु चालतो । चपळ कैसा अटोपतो । अरबी फिरवणार तो । कैसा असावा ॥ १८ ॥

मंद असतो तो रेंगाळत चालतो त्याच्याने जलद चालणारा कसा गाठला जाणार? (त्याला चपळाच्या बरोबर कसे धाववणारा?) अरबी घोड्याला (तो चपळ असल्यामुळे) तो फिरविणारा कसा असावा? तर तो चपळच असावयास पाहिजे .

हे धकाधकीचीं कामें । तिक्षण बुद्धीचीं वर्में । भोळ्या भावार्थें संभ्रमें । कैसें घडे ॥ १९ ॥

(टक्केटोपणे खाण्याची कामे तीक्ष्ण बुद्धीशिवाय व्हायची नाहीत) ही धकाधकीची कामे तीक्ष्ण बुद्धीने उरकणारी आहेत,भोळ्या भावार्थाने व धांदलपट्टीने ती कशी पार पाडतील? (ही रेटता येण्यासारखी नाहीत)

सेत केलें परी वाहेना । जवार केलें परी फिरेना । जन मेळविलें परी धरेना । अंतर्यामीं ॥ २० ॥

( वाहेना - निगा राखेना , जवार - जवहि-याचा )

शेत केले पण त्याची मशागत करीत नाही,(जवाही-याचा धंदा काढून घरकोंबडेपणामुळे चौमुलखी फिरायचे नाही) पण चहूकडे हिंडत नाही (शिष्य) समुदाय पुष्कळ जमविला पण त्यांची अंतःकरणे हाती घेता येत नाहीत (जनसमुदाय मिळवला पण त्याला राजी राखता आले नाही मग ते कसे व्हावे ?

जरी चढती वाढती आवडी उठे । तरी परमार्थ प्रगटे । घसघस करितां विटे । सगट लोकु ॥ २१ ॥

जर ह्याच्या संबंधाने अधिकाधिक प्रेम वाढत जाईल तरच हा सांगत असलेल्या परमार्थाचा प्रसार होईल (परमार्थ फैलावेल) लोकांशी घासाघीस झाली तर सर्वांची मने त्याच्याविषयी विटतील.

आपलें लोकांस मानेना । लोकांचें आपणांस मानेना । अवघा विकल्पचि मना । समाधान कैचें ॥ २२ ॥

आपले म्हणणे लोकांना पटत नाही,लोकांचे म्हणणे आपल्याला पटत (मानवत) नाही,दोन्हीकडून मनाचा विकल्प वाढत जातो तेथे मनाचे समाधान कोठून होणार?(तर मग समाधान कुठले?)

नासक दीक्षा सिंतरु लोक । तेथें कैचा असेल विवेक । जेथें बळावला अविवेक । तेथें राहणें खोटें ॥ २३ ॥

(विध्वंसक दीक्षा) बिघडलेला (भ्रष्ट) सांप्रदाय आणि लबाड फसवे लोक एकत्र मिळाले म्हणजे तेथे विचार कोठून राहणार? (विचार कोठून दिसावा) आणि जेथे अविचार माजला(अविचाराचे प्राबल्य झाले) तेथे राहणे खोटे (अनुचित होय)

बहुत दिवस श्रम केला । सेवटीं अवघाचि वेर्थ गेला । आपणास ठाकेना गल्बला । कोणें करावा ॥ २४ ॥

( गल्बला - उपाधी )

पुष्कळ दिवस कष्ट करून शेवटी फुकटच गेले,आपल्याला उपाधी होत (पेलत) नाही तर करावयाची कशाला?

संगीत चालिला तरी तो व्याप ।नाहीं तरी अवघाचि संताप । क्षणक्षणा विक्षेप।किती म्हणौनि संगावा॥२५॥

( संगीत चालिला - सुरळीत चालले )

सुरळीत (संगीत) चालला तर तो व्याप,नाही तर सारा संताप क्षणाक्षणाला (विक्षेप आणि कोप) विघ्ने होतात ती किती म्हणूंन सांगावी?

मूर्ख मूर्खपणें भरंगळती । ज्ञातेपणें कळो करिती । होते दोहींकडे फजिती । लोकांमधें ॥ २६ ॥

( मूर्ख मूर्खपणें भरंगळती - मूर्ख (अज्ञानी) अज्ञानामुळे घसरतात.)

मूर्ख मूर्खपणाने घसरतात आणि शहाणे शहाणपणाच्या गर्वाने भांडत बसतात,जगात दोघांचीही फजिती होते.

कारबार आटोपेना करवेना । आणि उगेंहि राहेना । याकारणें सकळ जना । काये म्हणावें ॥ २७ ॥

कार्याचा आटोप नाही,स्वतःला करवत नाही (कर्तुत्व नाही) आणि स्वस्थही(गप्पही) बसवत नाही असल्या लोकांना काय म्हणावे?

नासक उपाधीस सोडावें । वय सार्थकीं घालावें । परिभ्रमणें कंठावें । कोठें तरी ॥ २८ ॥

बिघडलेली (नासक,नाशक,भ्रष्ट) उपाधी सोडून (टाकून) द्यावी,सत्कृत्याच्या किवा हरीभजनाच्या योगाने आयुष्य सार्थकी लावावे व कोठे तरी फिरत राहून (देशपर्यटन करीत) काळक्रमण करावे (कोठेतरी परीभ्रमण करीत असावे)

परिभ्रमण करीना । दुसर्याचें कांहींच सोसीना । तरी मग उदंड यतना । विकल्पाची ॥ २९ ॥

हिंडत नाही (फिरणेही होत नाही ) व दुसऱ्याचे काहीच सोसणे होत नाही तर मग विकल्पच्या अनेक यातना सोशीत पडावे (मग विकल्प दु:खात पडावे)

आतां हें आपणाचिपासीं । बरें विचारावें आपणासी । अनुकुळ पडेल तैसी । वर्तणूक करावी ॥ ३० ॥

आता हे सर्व बरे वाईट होणे आपल्यापाशीच आहे आपल्या मनाशीच ह्याचा नीट विचार करावा आणि अनुकूल (हितकर) दिसेल (वाटेल) त्याप्रमाणे वागावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे येत्नानिरूपणनाम समास सातवा ॥**

**समास आठवा : उपाधिलक्षणनिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥**

सृष्टीमधें बहू लोक । परिभ्रमणें कळे कौतुक । नाना प्रकारीचे विवेक । आडळों लागती ॥ १ ॥

सृष्टीमध्ये अनेक लोक आहेत,त्यांच्या विविधतेचे कौतुक फिरल्याने चांगले समजते; अनेक प्रकारचे विवेकी लोक आढळतात,

किती प्रपंची जन । अखंड वृत्ति उदासीन । सुखदुःखें समाधान । दंडळेना ॥ २ ॥

कित्येक लोक प्रपंचात असूनही त्यांची वृत्ती सदासर्वकाळ उदासीन असते,सुखादुःखाच्या प्रसंगाने त्यांचे समाधान बिघडत नाही (भंग पावत नाही)

स्वभावेंचि नेमक बोलती । सहजचि नेमक चालती । अपूर्व बोलण्याची स्थिती । सकळांसी माने ॥ ३ ॥

त्याच्या बोलण्यात स्वाभविकच नियमितपणा (नेमस्तपणा) असतो.व त्यांचे बोलणे असे अपूर्व असते की ते सर्वांना पसंत पडते (मानवते)

सहजचि ताळज्ञान येतें । स्वभावेंचि रागज्ञान उमटतें । सहजचि कळत जातें । न्यायेनीतिलक्षण ॥ ४ ॥

ताल व राग ह्यांचे ज्ञान त्यांच्या ठिकाणी सहजच होत जाते, तसेच त्यांचे न्याय नीतीचे लक्षण त्यांना (किवा त्यांचे बघून आपणाला ) सहजच कळत जाते.

येखादा आडळे गाजी । सकळ लोक अखंड राजी । सदा सर्वदा आवडी ताजी । प्राणीमात्राची ॥ ५ ॥

( गाजी - पराक्रम गाजविणारा , ताजी - नित्य नवी )

एकदा असा पराक्रमी (गाजी) पुरुष आढळतो की त्याला सर्व लोक सर्वकाळ अनुकूल असतात,प्राणीमात्रांना तो नित्य नवा व प्रिय वाटत असतो.

चुकोन उदंड आढळतें । भारी मनुष्य दृष्टीस पडतें । महंताचें लक्षणसें वाटतें । अकस्मात ॥ ६ ॥

चुकून (सहजगत्या) पुष्कळ गोष्टी दृष्टीस पडतात,एखादा उच्च कोटीचा किवा वजनदार मनुष्य अस्कस्मात आढळतो,व त्याच्या ठिकाणी मंहताची लक्षणे असल्याचे दिसून येते.(त्याच्या ठिकाणी महंताची लक्षणे अनासाये सिद्ध असलेली दिसून येतात).

ऐसा आडळतां लोक । चमत्कारें गुणग्राहिक । क्रिया बोलणें नेमक । प्रत्ययाचें ॥ ७ ॥

असे लोक आढळतात की त्याच्या ठिकाणी विलक्षण गुणग्राहकता असते (दिसून येते.)(असे लोक आढळले म्हणजे गुणग्राहक असतो त्याला चमत्कार वाटतो) त्यांचे बोलणेचालणे व्यवस्थित अनुभवाचे (अनुभवसिद्ध) असते.

सकळ अवगुणामधें अवगुण । आपले अवगुण वाटती गुण । मोठें पाप करंटपण । चुकेना कीं ॥ ८ ॥

आपले दुर्गुण (दोष) गुणच आहेत असे वाटणे हा दुर्गुण सगळ्या दुर्गुणात मोठा आहे (हा सर्व दोषात महादोष आहे) (पूर्वजन्मीचे पापच ते उदयास आले) हे महापाप व त्यापासून येणारे करंटेपण कधीही टळावयाचे नाही (त्याचे पूर्वपाप व तज्जन्य दारिद्र्य कधीच टळावयाचे नाही.)

ढाळेंचि काम होतें सदा । जें जपल्यानें नव्हे सर्वदा । तेथें पीळपेंचाची आपदा । आडळेचिना ॥ ९ ॥

( ढाळेंचि - सरळपणाने सहज )

(एखाद्याचा प्रभावच-ढाल-असा असतो,की दुसऱ्याला जपून जे काम सिद्ध करता येत नाही ते तो सहज करून टाकतो व पीळपेच वगैरे आडरानात शिरण्याचे त्याला कारणच पडत नाही.) जे काम पुष्कळ दिवस जपल्याने होणार नाही ते काम अगदी सहज (ढाळे) होऊन जाते. त्यात पीळपेंचाचा त्रास मुळीच होत नाही.

येकासी अभ्यासितां न ये । येकासी स्वभावेंचि ये । ऐसा भगवंताचा महिमा काये । कैसा कळेना ॥ १० ॥

एकाला अभ्यास करूनही (सायासाने) येत नाही व एकाला सहजच येते ( ते दुसऱ्याला अनायसे येते) असा हा भगवंताचा महिमा अतर्क्य आहे.

मोठीं राजकारणें चुकती । राजकारणा वेढा लागती । नाना चुकीची फजिती । चहुंकडे ॥ ११ ॥

( वेढा लागती - गुंतागुंत )

मोठमोठाली राजकारणे चुकतात राजकरणात कित्येक वेळा डाव आंगावर येतात (वेढा लागतो) आणि चुकीमुळे लोकांत फजिती होते (लोकात छी: थू: होते)

याकारणें चुकों नये । म्हणिजे उदंड उपाये । उपायाचा अपाये । चुकतां होये ॥ १२ ॥

म्हणून चुकीच होऊ देऊ नये म्हणजे अनेक उपाय योजल्याचा उपयोग होतो.(अचूक राजकारण करिता आल्यास पुष्कळ नवीन नवीन उपाय सुचतात.) चूक झाल्यास उपायाचाच अपाय होऊन बाजू आंगावर येते.

काये चुकलें तें कळेना । मनुष्याचें मनचि वळेना । खवळला अभिमान गळेना । दोहिंकडे ॥ १३ ॥

काय चुकते (कोठे चूक होते) ते कळत नाही,मनुष्याचे मनच वळत नाही (शुद्धीवर येत नाही) उभयपक्षी वाढलेला दुराग्रह सुटत नाही.

आवघे फडचि नासती । लोकांचीं मनें भंगती । कोठें चुकते युक्ती । कांहीं कळेना ॥ १४ ॥

लोकांची मने बिथरून जाऊन सगळे समुदायच फुटून जातात आणि युक्ति योजण्यात कोठे चुकते ते काही केल्या समजत नाही (सभा मोडून जातात,लोकांची मने बिथरतात व चूक कोठे होते ह्याची युक्ति काही ध्यानात येत नाही.)

व्यापेंविण आटोप केला । तो अवघा घसरतचि गेला । अकलेचा बंद नाहीं घातला । दुरीदृष्टीनें ॥ १५ ॥

(कर्तुत्वशक्ति,आवरशक्ति) व्याप आंगात नसताना पसारा मांडला (खटाटोप केला) तर तो सगळा घसरतच,फसतच जातो.कारण काही दूरवर विचार करून त्याला अकलेचा बंद (नियमन) घातलेला नसतो,

येखादें मनुष्य तें सिळें । त्याचें करणेंचि बावळें नाना विकल्पाचें जाळें । करून टाकी ॥ १६ ॥

( मनुष्य तें सिळें - जुन्या कल्पना उराशी बाळगून )

एखादा मनुष्यच (शिळे,सिळे) शेळपट असतो.त्याची सर्व कामे बावळटपणाने होतात आणि त्यामुळे अनेक विकल्पाचे जाळे तो उभारतो (तो सर्व कामे बावळटपणाने करितो व संशयाची जाळी उभी करतो,

तें आपणासी उकलेना । दुसर्यास कांहींच कळेना । नाचे विकल्पें कल्पना । ठाईं ठाईं ॥ १७ ॥

(ती त्याची त्यालाच उकलता येत नाहीत. दुसऱ्यास त्यातलं काहीच कळत नाही.) त्या जाळ्यातले त्याला स्वतःला उकलता येत नाही. दुसऱ्यास त्यातलं काहीच कळत नाही.आणि जिकडे तिकडे विकल्पाच्या कल्पनाच नाचत असतात.

त्या गुप्त कल्पना कोणास कळाव्या।कोणें येऊन आटोपाव्या ।ज्याच्या त्यानें कराव्या ।बळकट बुद्धि ॥१८॥

(त्याच्या मनातल्या गुप्त कल्पना कोणाला कळायच्या आहेत? कोणी त्यांना बंद घालावा?ज्याची त्यानेच बुद्धि दृढ करून त्या आवरल्या पाहिजेत) त्या मनातील गुप्त कल्पना कोणाला कळणार व त्या कोणी आवरावयाच्या? त्या ज्याच्या त्यानेच बुद्धि दृढ करून आवरल्या पाहिजेत.

ज्यासी उपाधी आवरेना । तेणें उपाधी वाढवावीना । सावचित करूनियां मना । समाधानें असावें ॥ १९ ॥

ज्याला उपाधि आवरता येत नाही त्याने ती वाढवू नये मन सावध ठेऊन (स्थिर करून ) समाधानाने (समाधान राखून) असावे.

धांवधावों उपाधी वेष्टी । आपण कष्टी लोक हि कष्टी । हे कामा नये गोष्टी । कुसमुसेची ॥ २० ॥

हावरेपणाने (धावाधाव करून) उपाधी लाऊन घ्यावयाची व त्यामुळे स्वतःला व दुसऱ्याला त्रास करून घ्यावयाचा असले धुसफुशीचे काम उपयोगाचे नाही,(हया मन:क्षोभाच्या गोष्टी उपयोगाच्या नाहीत)

लोक बहुत कष्टी जाला । आपणहि अत्यंत त्रासला । वेर्थचि केला गल्बला । काअसयासी ॥ २१ ॥

अनेक लोकांना त्रास झाला व स्वतःलाही अत्यंत कष्ट झाले,असली उठाठेव काय म्हणून करावी?

असो उपाधीचें काम ऐसें । कांहीं बरें कांहीं काणोंसें । सकळ समजोन ऐसें । वर्ततां बरें ॥ २२ ॥

( काणोंसें - त्रासदायक )

असो उपाधीचे कामच असे आहे की काही काम सरळ व्हावे व काही वाकडे (काणोसे) व्हावे हे सर्व समजून वागले म्हणजे बरे.

लोकांपासीं भावार्थ कैचा । आपण जगवावा तयांचा । सेवट उपंढर कोणाचा । पडोंचि नये ॥ २३ ॥

( उपंढर - फजिती )

लोकांजवळ भावार्थ कसचा? आपणच त्यांच्या ठिकाणी भावार्थ उत्पन्न करून जागविला पाहिजे,शेवटी कोणाची फजिती होऊ नये (शेवटी घोटाळा-उपंढर-उडाला न पाहिजे)

अंतरात्म्याकडे सकळ लागे । निर्गुणीं हें कांहींच न लगे । नाना प्रकारीचे दगे । चंचळामधें ॥ २४ ॥

अंतरात्म्याला हे सर्व काही करावे लागते ,त्या चंचळामध्येच अनेक प्रकारचे दगे आहेत,निर्गुण ब्रह्माच्या ठिकाणी हे काहीच नसते, (सर्व काही चंचळता अंतरात्म्याकडे लागते,सारे दगे फटके त्याजकडे निर्गुण ब्रह्माकडे काहीच नाही)

शुद्ध विश्रांतीचें स्थळ । तें एक निर्मळ निश्चळ । तेथें विकारचि सकळ । निर्विकार होती ॥ २५ ॥

ते ब्रह्म एकटे निर्मळ व निश्र्चळ असून शुद्ध विश्रांतीचे स्थान आहे.(ब्रह्म हे सर्वांच्या विश्रांतीचे स्थान आहे) तेथे सर्व विकारच निर्विकार होतात (लय पावतात)

उद्वेग अवघे तुटोनि जाती ।मनासी वाटे विश्रांती ।ऐसी दुल्लभ परब्रह्मस्थिती ।विवेकें सांभाळावी ॥ २६ ॥

सगळे उव्देग (चंचळपणा) तुटून जातात (मनाचे संताप तेथे राहात नाहीत) मनाला विश्रांती मिळते अशी ही दुर्लभ परब्रह्मस्थिति विवेकाच्या योगानेच पूर्ण सांभाळली पाहिजे.

आपणास उपाधी मुळींच नाहीं । रुणानुबंधें मिळाले सर्वहि । आल्यागेल्याची क्षिती नाहीं । ऐसें जालें पाहिजे ॥ २७ ॥

आपणाला मुळचीच काही उपाधि नाही (आपण मुळीच निरुपाधिक आहोत) ऋणानुबंधाने (सखे सोयरे सारे जमा होतात) सर्वजण एकत्र मिळालेले असतात त्यात कोणी आला व गेला ह्याची खंत मनाला वाटू नये (अशी खंबीरता पाहिजे)

जो उपाधीस कंटाळला । तो निवांत होऊन बैसला । आटोपेना तो गल्बला । कासयासी ॥ २८ ॥

ज्याला उपाधीचा कंटाळा येतो त्याने निवांत होऊन बसावे जी उपाधि (गल्बला) आवरता येत नाही ती पाहिजे कशाला ?

कांहीं गल्बला कांहीं निवळ । ऐसा कंठीत जावा काळ । जेणेंकरितां विश्रांती वेळ । आपणासी फावे ॥२९॥

काहीकाळ उपाधीच्या गलबल्यांत व काही काळ एकांतात अशारीतीने काळक्रमणा करावी (असा आयुष्यक्रम ठेवावा) म्हणजे आपल्याला विश्रांती घ्यावयास वेळ मिळतो,

उपाधी कांहीं राहात नाहीं । समाधानायेवढें थोर नाहीं । नरदेहे प्राप्त होत नाहीं । क्षणक्षणा ॥ ३० ॥

उपाधि कांही चिरकाल टिकणारी नाहीं (उपाधि काही कोणावाचून अडून राहात नाही) (पण हे लक्षात ठेवावे की) आत्मसमाधानाएवढे थोर काहीच नाही (ते नरदेहाखेरीज मिळत नाही) आणि नरदेह काही वरचेवर (घटकेघटकेला) मिळत (प्राप्त होत) नाही.

**विषय:अलिप्तपणा सांभाळून उपाधी कशी वाढवावी ह्याचे निरुपण**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे उपाधिलक्षणनिरूपणनाम समास आठवा ॥**

## समास नवावा : राजकारणनिरूपण ॥ श्रीरामसमर्थ ॥

ज्ञानी आणी उदास । समुदायाचा हव्यास । तेणें अखंड सावकाश । येकांत सेवावा ॥१॥

ज्ञानी असून जो उदास असेल आणि समुदायही वाढविण्याची हौस त्याला असेल त्याने स्वस्थ चित्ताने एकांताचे अखंड सेवन करावे.

जेथें तजवीजा कळती । अखंड चाळणा निघती । प्राणीमात्राची स्थिती गती । कळों येते ॥ २ ॥

एकांतामध्ये अनेक उपाय व युक्त्या सुचतात अनेक गोष्टींचे अखंड मनन चालू राहाते.आणि प्राणिमात्रांची स्थिति व गति (चालू परिस्थिती व पुढे होणारी गति) कळून येतात.

जरी हा चाळणाचि करीना । तरी कांहींच उमजेना । हिसेबझाडाचि पाहीना । दिवाळखोर ॥ ३ ॥

जर हा विचार (ही चाळणा) कळणार नाही तर त्याला काहीच कळायचे नाही हिशेब करून बाकी शून्य न करणाऱ्या दिवाळखोराप्रमाणे त्याची स्थिति होईल,(दिवाळखोर बाकी पूज्य न करता मुद्दल व व्याज वाढून देऊन गोत्यांत येतो) तसे हा अनेक गोष्टींचे (पक्षांचे) उलगडे न करता बसेल तर विक्लापांचा गोंधळ (अनेक संशय-कुतर्कांचा कल्होळ) ह्याच्या चित्तांत माजून राहील. (ह्याचे समाधान सिद्ध राहणार नाही)

येक मिरासी साधिती । येक सीध्या गवाविती । व्यापकपणाची स्थिती । ऐसी आहे ॥ ४ ॥

( सीध्या गवाविती - आजरोजी (सरळ) गमवून बसतात )

कोणी मिराशी हक्क (जमिनीचे हक्क) नवीन मिळवतात तर कोणी असलेलेच (सिद्ध) हक्क गमावतात,व्यापकपणाने कार्य करण्याची स्थिति पुढीलप्रमाणे आहे. (उद्योग करणा-यात दोन्ही प्रकार दिसतात)

जेणें जें जें मनीं धरिलें । तें तें आधींच समजलें । कृत्रिम अवघेंचि खुंटलें । सहजचि येणें ॥ ५ ॥

( कृत्रिम - अंदाजे )

दुसऱ्याच्या मनांतील विचार अगोदरच ओळखून असले म्हणजे कृत्रिम (कपट) करण्याचा मार्ग सहजच खुंटतो.(म्हणजे कृत्रिम कपट करून त्याला आपल्याला चकवता येणार नाही,कृत्रिम खोटे प्रकार सहजच खुंटतील.

अखंड राहतां सलगी होते । अतिपरिचयें अवज्ञा घडते । याकारणें विश्रांती ते । घेतां नये ॥ ६ ॥

लोकांच्या संगतीत एके ठिकाणी निरंतर राहिल्याने सलगी वाढते व अतिपरिचयामुळे अवज्ञा होऊ लागते. त्यासाठी एकाच ठिकाणी विश्रांती घेत स्वस्थ पडू नये.(परिभ्रमण करावे)

आळसें आळस केला । तरी मग कारबारचि बुडाला । अंतरहेत चुकत गेला । समुदायाचा ॥ ७ ॥

आळसने आळस वाढत जाऊन सगळ्या कामाचा बिघाड होतो (कामे होत नाहीत) आणि समुदाय (सम्प्रदायिक लोक,शिष्य किवा अनुयायी) वाढविण्याचा मनातला हेतु तसाच राहून जातो.(जनसमुदायाचे मनोगत हाती घेता येत नाही,बाजूला राहाते)

उदंड उपासनेचीं कामें । लावीत जावीं नित्यनेमें । अवकाश कैंचा कृत्रिमें । करावयासी ॥ ८ ॥

उपासनेची नित्यनेमाची कामे समुदायाच्या लोकांच्या मागे इतकी लावून द्यावीत की कृत्रिमे (डोंगधुत्तरे किवा कपटाचे उद्योग) करावयाला त्यांना फुरसतच (मिळणार) नाही.

चोर भांडारी करावा । घसरतांच सांभाळावा । गोवा मूर्खपणाचा काढावा । हळु हळु ॥ ९ ॥

चोराला खजीनदार करावा (चोराच्या हातात भांडारगृहाच्या किल्ल्या देऊन त्याला भांडारी करावे) आणि तो घसरला तर त्याला सांभाळून घ्यावा व त्याच्या मनातील मूर्खपणाचे विचार हळूहळू काढून टाकावेत.

या अवघ्या पहिल्याच गोष्टी । प्राणी कोणी नव्हता कष्टी । राजकारणें मंडळ वेष्टी । चहुंकडे ॥ १० ॥

( मंडळ वेष्टी - सर्वांना गुंतविणे )

ह्या सर्व गोष्टी मुख्य आहेत (काही नवीन आहेत असे नाही) कोणाही प्राण्याला दु:ख न देता सर्वांना राजकारणात युक्तीने गोवून घ्यावे.(गुंतवावे)

नष्टासी नष्ट योजावे । वाचळासी वाचाळ आणावे । आपणावरी विकल्पाचे गोवे । पडोंच नेदी ॥ ११ ॥

नष्टाचा प्रतिकार करण्यास किंवा त्याच्यावर देखरेख ठेवण्यास नष्टाचीच योजना करावी वाचकांना गप्प करण्यासाठी (वाचकांची तोंडे बंद करण्यासाठी) त्यांना वाचाळच आणूंन भिडवावे व आपल्या स्वतः संबंधाने विकल्पाचे घोटाळे लोकांच्या मनात होऊ देऊ नयेत (इतके आपण अलिप्त असावे).

कांटीनें कांटी झाडावी । झाडावी परी ते कळों नेदावी । कळकटेपणाची पदवी । असों द्यावी ॥ १२ ॥

( कळकटेपणाची - अज्ञानाचा / बावळटपणाचा आव )

काट्याने काटा काढावा पण काढताना तो कळू देऊ नये (कार्य करूनही ते कोण करते हे कळू न देता) आपण आपल्याकडे अजागळपणा घ्यावा (कळकटेपणाची म्ह.भाडखोरपणाची पदवी जेथल्या तेथेच असू द्यावी,भांडखोरपणा करू नये)

न कळतां करी कार्य जें तें । तें काम तत्काळचि होतें । गचगचेंत पडतां तें । चमत्कारें नव्हे ॥ १३ ॥

कोणाला कळू न देता जे काम होते ते तात्काळ सिद्धीस जाते (ते सर्वांना आगाऊच कळते) ते गचगचर्येत (चव्हाट्यावर) गेले तर त्यात नवीनपणाची मौज राहात नाही.

ऐकोनी आवडी लागावी । देखोनी बळकटचि व्हावी । सलगीनें आपली पदवी । सेवकामधें ॥ १४ ॥

ह्याची कीर्ति परस्पर ऐकूनच लोकांस ह्याच्याबद्दल प्रेम वाटावे (आवड उत्पन्न व्हावी) प्रत्यक्ष आपल्या दर्शनाने ते प्रेम दृढ होत जावे (ती आवड दृढतर व्हावी) आणि त्याची संपत्ती करता करता (संगत वाढतां वाढतां) ह्याच्या सेवकांत आपला समावेश करून घेण्याची त्यांना ऊत्सुकता वाटावी (अशा रीतीने वागून समुदाय वाढवीत जावा.)

कोणीयेक काम करितां होतें । न करितां तें मागें पडतें । या कारणें ढिलेपण तें । असोंचि नये ॥ १५ ॥

कोणतेही काम करू लागल्यास होते,न केल्यास मागे पडत जाते ह्यासाठी ढिलेपणा (चालढकल दिरंगाई ) मुळीच करू नये.

जो दुसर्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला । जो आपणचि कष्टत गेला । तोचि भला ॥ १६ ॥

जो स्वतःच्या कार्यासाठी दुसऱ्यावर अवलंबून (विसंबून) राहतो त्याच्या कार्याचा नाश होतो (त्याचे कार्य बिनसते) जो स्वतःच कष्ट करून कार्य तडीस नेतो तोच शहाणा समजावा.

अवघ्यास अवघें कळलें । तेव्हां तें रितें पडिलें । याकारणें ऐसें घडलें । न पाहिजे कीं ॥ १७ ॥

जे कार्य करावयाचे असते ते सगळेच सर्वांना कळले तर त्यात काही तथ्य राहात नाही -(ते पडून राहाते ) म्हणून असे करू नये (ज्याच्याकडून जेवढे काम करून घ्यायचे त्यापुरतीच त्याला माहिती द्यावी)

मुख्य सूत्र हातीं घ्यावें । करणें तें लोकांकरवीं करवावें । कित्तेक खलक उगवावे । राजकारणामधें ॥ १८ ॥

( खलक - धूर्त,राजकारण चतुर )

सर्व कारभाराचे मुख्यसूत्र आपल्याकडे ठेऊन,इतर कामे असतील ती लोकांकडून करवून घ्यावी, राजकरणामध्ये अनेक धूर्त (खलक) लोकाना गोवून घ्यावे (उगवावे)

बोलके पहिलवान कळकटे । तयासीच घ्यावे झटे । दुर्जनें राजकारण दाटे । ऐसें न करावें ॥ १९ ॥

भांडखोरात जे बोलके पुढारी (पहिलवान) असतील त्यांच्याशीच दोन हात करावेत.(अनुयायांच्या तोंडी लागू नये.अनुयायांशी भांडत बसू नये) दुर्जनांच्या योगाने राजकारण अडून पडेल असे करू नये.

ग्रामण्य वर्मी सांपडावें । रगडून पीठचि करावें । करूनि मागुती सांवरावें । बुडऊं नये ॥ २० ॥

( ग्रामण्य वर्म - गावगुंडाचे रहस्य )

ग्रामण्य (भांडणाचे तट,ग्रामकंटक,कुटाळातले अग्रणी) वर्मात पकडून त्यांचे पीठ करावे,पण (ह्याप्रमाणे त्यांना निस्तेज केल्यावर) पुन्हा सावरून घ्यावे (पुन्हा गोडवाणीने मिळवून घ्यावे) अगदी (पार रसातळाला नेऊन) त्यांचा नष्टांश करू नये.

खळदुर्जनासी भ्यालें । राजकारण नाहीं राखिलें । तेणें अवघें प्रगट जालें । बरें वाईट ॥ २१ ॥

दुष्ट दुर्जनांच्या भीतीने राजकारण सांभाळले नाही तर बरेवाईट सगळे प्रकट होऊन सर्व कार्यनाश होईल.

समुदाव पाहिजे मोठा । तरी तनावा असाव्या बळकटा । मठ करुनी ताठा । धरूं नये ॥ २२ ॥

( तनावा असाव्या बळकटा - स्नेह / नियमबंध बळकट असावेत,एकमेकांची समजूत घेण्याची कुवत )

मोठा समुदाय करावयाची हौस असेल तर (तणावा),क्रमशक्ति दांडगी असायला पाहिजे,मठ करून त्याच्या (ताठ्यात) राहु नये.

दुर्जन प्राणी समजावे । परी ते प्रगट न करावे । सज्जनापरीस आळवावे । महत्व देउनी ॥ २३ ॥

दुर्जन लोक असतील ते ओळखून ठेवावे पण त्याचा दुर्जनपणा (आपणास कळल्याचे) प्रकट करू नये,इतकेच नव्हे तर त्यांना सज्जनापेक्षाही अधिक मोठेपणा देऊन प्रसन्न ठेवावे.

जनामधें दुर्जन प्रगट । तरी मग अखंड खटखट । याकारणें ते वाट । बुझूनि टाकावी ॥ २४ ॥

लोकांमध्ये दुर्जनांचा दुर्जनपणा प्रकट झाला की सर्वकाळ कटकट उभी राहिली म्हणून समजावे,ह्यासाठी ती वाटच मोडून टाकावी.

गनीमाच्या देखतां फौजा । रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा । ऐसा पाहिजे किं राजा । कैपक्षी परमार्थी ॥ २५ ॥

कावेबाज शत्रूच्या फोजा पहाताच शुरवीरांचे बाहू स्पुरण पांवू लागतात,राजाही असा स्वाभविकच शूर पाहिजे व त्याप्रमाणे परमार्थाचा कैपक्षी (महंत) असाच शूर पाहिजे,(असा लोककैवारी व परमार्थी राजा असावा.)

तयास देखतां दुर्जन धाके । बैसवी प्रचितीचे तडाखे । बंडपाषांडाचे वाखे । सहजचि होती ॥ २६ ॥

( वाखे - नष्ट होते )

त्याला पहाताच दुष्टांना धडक भरावी (धाक सुटावा) त्याच्या प्रतापच्या तडाख्यांचा त्यांना अनुभव यावा अर्थात बंडे व पाखांडे सहजच पर मोडून जावीत.

हे धूर्तपणाचीं कामें । राजकारण करावें नेमें । ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊं नये ॥ २७ ॥

ही धूर्तपणाची कामे आहेत राजकारण व्यवस्थितपणाने निर्धाराने करावे,सामर्थ्याच्या भ्रमाने ढीलेपणा करू नये,(ढिलेपणाच्या डौलावर जाऊ नये.)

कोठेंच पडेना दृष्टीं । ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी । वाग्विळासें सकळ सृष्टी । वेधिली तेणें ॥ २८ ॥

तो तर कोठे दृष्टीस पडत नाही (तो सहसा लोकांच्या दृष्टीस पडत नाही) पण जागोजाग लोक त्याच्या गोष्टी मात्र बोलत असतात (पण त्याच्या गोष्टी घरोघर सांगतात) तो आपल्या सरळ वाणीने सर्व जग आपल्याकडे वेधून घेतो (वाग्विलासाने तो जनमन वेधून घेतो)

हुंब्यासीं हुंबा लाऊन द्यावा । टोणप्यास टोणपा आणावा । लौंदास पुढें उभा करावा । दुसरा लौंद ॥ २९ ॥

हुंब्याला (रडक्याला) हुंबा (घुम्या,ठोम्ब्या) व टोणप्याला टोणपा लाऊन द्यावा,लबाडा पुढे दुसरा लबाड (लौंद) उभा करावा,

धटासी आणावा धट । उत्धटासी पाहिजे उत्धट । खटनटासी खटनट । अगत्य करी ॥ ३० ॥

तसेच दांडग्याला दांडगा,उद्धटाला,उद्धट,खटनटाला खटनट असे भेटले म्हणजे परस्परांचें योग्य ते स्वागत होते.

जैशास तैसा जेव्हां भेटे । तेव्हां मज्यालसी थाटे । इतुकें होतें परी धनी कोठें । दृष्टीस न पडे ॥ ३१ ॥

तात्पर्य,जशास तसा भेटला की सभेला रंग चढतो,हे सर्व परभारे होत असते.पण धनी मात्र कोठे दिसत नाही.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे राजकारणनिरूपणनाम समास नववा ॥**

**समास दहावा : विवेकलक्षणनिरूपण॥ श्रीरामसमर्थ ॥**

जेथें अखंड नाना चाळणा । जेथें अखंड नाना धारणा । जेथें अखंड राजकारणा । मनासी आणिती ॥ १ ॥

ज्या ठिकाणी अनेक प्रकारच्या चर्चा,विचार,धारणा,राजकारण हयांचा उहापोह नित्य चालू असतो.

सृष्टीमधें उत्तम गुण । तितुकें चाले निरूपण । निरूपणाविण क्षण । रिकामा नाहीं ॥ २ ॥

सृष्टीत जे जे उत्तम गुण आहेत तितक्याचे निरुपण चालू असते,निरुपणावाचून एक क्षणही रिकामा-व्यर्थ जात नाही.

चर्चा आशंका प्रत्योत्तरें । कोण खोटें कोण खरें । नाना वगत्रुत्वें शास्त्राधारें । नाना चर्चा ॥ ३ ॥

अनेक प्रकारच्या चर्चा,शंका समाधाने,(खऱ्या खोट्यांचे,निर्णय करण्यासंबंधी शास्त्राधारासह अनेक संभाषणे (खऱ्याखोट्याचे निर्णय शास्त्राधारासह उत्तम वक्ते करीत आहेत.)

भक्तिमार्ग विशद कळे । उपासनामार्ग आकळे । ज्ञानविचार निवळे । अंतर्यामीं ॥ ४ ॥

भक्तिमार्ग स्पष्ट कळेल,उपसनामार्गाचे आकलन होईल आणि ज्ञानविचार अंतःकारणात स्थिर होईल.

वैराग्याची बहु आवडी । उदास वृत्तीची गोडी । उदंड उपाधी तरी सोडी । लागोंच नेदी ॥ ५ ॥

वैराग्याचे पुष्कळ प्रेम लागेल,उदासवृत्तीची गोडी लागेल असे निरुपण चालते पुष्कळ उपाधि असली तरी (अलिप्तपणाने) टाकून देतो,अंगाला लागू देत नाही.

प्रबंदाचीं पाठांतरें । उत्तरासी संगीत उत्तरें । नेमक बोलतां अंतरें । निववी सकळांचीं ॥ ६ ॥

अनेक काव्याचे पाठांतर चालते (सुंदर काव्यांची पाठांतरे) कोणी शंका विचारल्यास त्याला (संगीत) समर्पक उत्तर मिळते (समर्पक उत्तरे-प्रत्युतरे),व्यवस्थित भाषणाने सगळ्यांच्या अंतःकरणाचे समाधान केले जाते.(सर्वांची अंतरे निवतात अशी सशास्त्र व्यवस्थित भाषणे ऐकू येत आहेत.)

आवडी लागली बहु जना । तेथें कोणाचें कांहीं चालेना । दळवट पडिला अनुमाना । येईल कैसा ॥ ७ ॥

( दळवट - वर्दळ )

अशा महापुरुषाची आवड एकदा उत्पन्न झाली म्हणजे त्याच्यापुढे कोणाचे काही चालत नाही व त्याच्याकडे दलवट (समुदाय) येत असतो,पण त्याच्या अंतःकरणाचे अनुमान सर्वांनाच कसे करता येईल?

उपासना करूनियां पुढें । पुरवलें पाहिजे चहुंकडे । भूमंडळीं जिकडे तिकडे । जाणती तया ॥ ८ ॥

उपासना पुढे करून वाढविण्यासाठी चोहोकडे हिंडले पाहिजे-चोहोकडे हिंडले म्हणजे जगात सर्वत्र त्याची ह्याची ओळख (माहिती) होते.(उपासना वाढवण्यासाठी तो सर्वत्र संचार करतो.व म्हणून भूमंडळी तो जाईल तिकडे लोक त्याला ओळखतात.)

जाणती परी आडळेना । काये करितो तें कळेना । नाना देसीचे लोक नाना। येऊन जाती ॥ ९ ॥

(ओळखतात पण त्याच्या अंतराचा त्याला ठाव लागत नाही) लोकांना माहिती झाली तरी तो कोठे सापडत नाही,काय करीत असतो हे कळत नाही,अनेक प्रांतातले अनेक हजारो लोक मात्र त्याच्याकडे (त्याच्या भेटीला) येऊन जात असतात.

तितुक्यांचीं अंतरें धरावीं । विवेकें विचारें भरावीं । कडोविकडीचीं विवरावीं । अंतःकर्णे ॥ १० ॥

( कडोविकडीचीं - दु:खीकष्टी लोकांची )

(तितक्यांचा तो वेध लावतो,विवेकविचाराने त्यांची अंतःकरणे भरितो,त्यांची अर्धवट धर-सोडीची मने विवरणाकडे वळवितो.) तितक्यांची अंतःकरणे वळवून घेऊन,ती विवेक-विचाराने भरावी, आणि खुबीने त्यांची अंतःकरणे मोकळी करावी.

किती लोक तें कळेना । किती समुदाव आकळेना । सकळ लोक श्रवणमनना । मध्यें घाली ॥ ११ ॥

त्याचे लोक किती आहेत,समुदाय केवढा आहे,हे काही कळत नाही,मात्र तो सर्व लोकांना श्रवणामननाच्या मार्गाला लावतो.

फड समजाविसी करणें । गद्यपद्य सांगणें । परांतरासी राखणें । सर्वकाळ ॥ १२ ॥

गद्यपद्य वगैरे सांगून (फड-समाजाविशी) लोकसमुदायाची समजूत घालतो व नेहमी दुसऱ्यांना राजी राखत असतो.(नाना लोकांना गद्यपद्य सांगून त्यांची मने राखून ज्याच्या त्याच्यापरी समजूत पाडतो)

ऐसा ज्याचा दंडक । अखंड पाहाणें विवेक । सावधापुढें अविवेक । येईल कैचा ॥ १३ ॥

नेहमी विवेकाने चालणे हाच ह्याचा दंडक (वागण्याची रीत) असतो,अशा सर्व सावध पुरुषांपुढे अविवेकी येईल कशाला?(-अविवेक उभा कसा राहील?)

जितुकें कांहीं आपणासी ठावें । तितुकें हळुहळु सिकवावें । शाहाणें करूनी सोडावे । बहुत जन ॥ १४ ॥

जितके काही स्वतःस-आपणास कळते,तितके हळूहळू दुसऱ्याला शिकवून अनेक लोकांना शहाणे करतो.

परोपरीं सिकवणें । आडणुका सांगत जाणें । निवळ करुनी सोडणें । निस्पृहासी ॥ १५ ॥

अनेक प्रकारे (परोपरीने) शिकवावे, दुसऱ्याने घातलेल्या अडचणीला कसे तोंड द्यावे (अडचणीच्या जागा समजून घ्याव्या) किंवा आपण दुसऱ्याला कसे आवडावे हे सांगत जावे,निःस्पृहाला निःसंदेह करून सोडावे.

होईल तें आपण करावें । न होतां जनाकरवीं करवावें । भगवद्भजन राहावें । हा धर्म नव्हे ॥ १६ ॥

जे काम आपल्या हातून होईल तितके आपण करावे व (न होईल ते) झाल्यास लोकांकडून करवावे,परंतु (भक्तिमार्ग) भगवतभजन अडून राहावे किंवा थांबावे हा धर्म नव्हे.(अखंड भगवतभजन चालवावे हाच प्राणिमात्रांचा धर्म आहे.)

आपण करावें करवावें । आपण विवरावें विवरवावें । आपण धरावें धरवावें । भजनमार्गासी ॥ १७ ॥

भगवतभजन आपण करावे व इतरांकडून करवावे,परमार्थाचे मनन,विवरण आपण करावे व दुसऱ्याकडून आपण करवावे (आपण निरुपण सांगावे व इतरांना सांगावयास लावावे.) भजनाचा मार्ग (भक्तिमार्ग) आपण धरावा व इतरांना लावावा.

जुन्या लोकांचा कंटाळा आला । तरी नूतन प्रांत पाहिजे धरिला । जितुकें होईल तितुक्याला । आळस करूं नये ॥ १८ ॥

जुन्या लोकांचा कंटाळा आला तर दुसरा प्रांत काबीज करावा-घ्यावा (तरुण पिढी-नवीन लोक हाती धरावे.) जेवढे होण्यासारखे असेल तेवढे करण्यास आळस करू नये (कोठून तरी आळस झाडून शक्य तितक्याना शिकवून शाहाणे करावे.)

देह्याचा अभ्यास बुडाला । म्हणिजे महंत बुडाला । लागवेगें नूतन लोकांला । शाहाणे करावें ॥ १९ ॥

देहाला भगवद्भजनात राबविण्याचा अभ्यास सुटला की महंती संपली म्हणून समजावी,ह्यासाठी नव्या नव्या लोकांना लवकर शहाणे करण्याचा उद्योग हाती घेत असावा.

उपाधींत सांपडों नये । उपाधीस कंटाळों नये । निसुगपण कामा नये । कोणीयेकविषीं ॥ २० ॥

( निसुगपण - कामचुकारपण )

उपाधि वाढवावी पण तिच्यात सापडू नये-अलिप्तपणा राखावा,उपाधीला कंटाळू नये.कोणत्याही कामात (निसुगपण) आळस उपयोगाचा नाही.

काम नासणार नासतें । आपण वेडें उगें च पाहातें । आळसी हृदयसुन्य तें । काये करूं जाणें ॥ २१ ॥

काम नासणारे नासत असते आणि वेडा उगाच पहात राहतो,आळशी व निरुत्साही (हृदयशून्य) माणसाला (नसणारे काम कसे सावरून घ्यावे) हे काय कळणार?

धकाधकीचा मामला । कैसा घडे अशक्ताला । नाना बुद्धि शक्ताला । म्हणोनी शिकवाव्या ॥ २२ ॥

धकाधकीचे प्रसंग अशक्ताचे हातून कसे निभणार? ह्यासाठी शक्त म्हणजे सशक्त किंवा तयार होण्यासारखा मनुष्य पाहून त्याला अनेक युक्ति शिकवाव्या.

व्याप होईल तों राहावें । व्याप राहातां उठोन जावें । आनंदरूप फिरावें । कोठें तऱ्ही ॥ २३ ॥

कार्य असेल (आपल्या हातून होईल) तोपर्यंत राहावे,कार्य संपले की (उद्योग होईनासा झाल्यास) निघून जावे.व कोठेही आनंदवृतीने फिरावे राहावे (व्याप आटोप आपल्या हातून होईल तोंवर करावा,होईनासा झाल्यास निघून जावे व कोठेतरी स्वानंदाने फिरावे.)

उपाधीपासून सुटला । तो निस्पृहपणें बळावला । जिकडे सानुकूळ तिकडे चालिला । सावकास ॥ २४ ॥

अशा रीतीने तो उपाधीपासून मोकळा झाला की त्याचा निस्पृहपणा वाढत जातो,आणि जिकडे अनुकूल दिसेल तिकडे तो खुशाल जातो.

कीर्ति पाहातं सुख नाहीं । सुख पाहातां कीर्ति नाहीं । केल्याविण कांहींच नाहीं । कोठें तऱ्ही ॥ २५ ॥

कीर्ति पाहिजे असेल तर देहाचे सुख मिळणार नाही व देहाचे सुख हवे असेल तर कीर्ति व्हावयाची नाही कोठेही केल्यावाचून काहीच होत नाही.

येरवीं काय राहातें । होणार तितुकें होऊन जातें । प्राणी मात्र अशक्त तें । पुढें आहे ॥ २६ ॥

बाकी कोणावाचून काय अडून राहणार आहे,व्हायचे असते ते होऊन जातच असते.पण हा मनुष्यमात्र विनाकारण दुबळेपणा,नाकर्तेपणा ओढून घेतो.

अधींच तकवा सोडिला । मधेंचि धीवसा सांडिला । तरी संसार हा सेवटाला । कैसा पावे ॥ २७ ॥

( तकवा धीवसा - ताकद,धीर,धैर्य )

अगोदरच हिंम्मत सोडली (उत्साह,तकवा सोडला) किवा मधेच (धिंवसा) धैर्य सोडले तर चालू संसाराचा (पसा-याचा) गाडा शेवटच्या मुक्कामाला कसा जावा?

संसार मुळींच नासका । विवेकें करावा नेटका । नेटका करितां फिका । होत जातो ॥ २८ ॥

संसार हा मूळचाच नासका (नाश पावणारा,फाटका) आहे,विवेकाने तो व्यवस्थित नेटका करावा (विवेकाच्या योगाने त्यातील दु:खद प्रसंग हितकारक आहेत असे मानावे),व्यवस्थितपणाने करत असूनही तो बिघडत जातो.(नेटका केला की तो फिका पडत जातो,हा संसारातून सुटतो.) अश्या प्रकारे विचार करण्याचा अभ्यास केला म्हणजे संसाराविषयीची आसक्ति कमी होते.)

ऐसा याचा जिनसाना । पाहातां कळों येतें मना । परंतु धीर सांडावाना । कोणीयेकें ॥ २९ ॥

( जिनसाना - स्वभाव )

फिके पडणे-विरंग होणे हा संसाराचा स्वभावच,प्रकार जिनसाना आहे (विवेकाने) विचार केला म्हणजे सर्व कळून येते.पण कोणीही धीर सोडू नये.

धीर सांडितां कये होतें । अवघें सोसावें लागतें । नाना बुद्धि नाना मतें । शाहाणा जाणे ॥ ३० ॥

धीर सोडला तरी फायदा काय? सोसावयाचे ते काही टळत नाही,सगळे सोसावे लागतेच असो,अनेक प्रकारच्या युक्त्या व मते शहाण्यालाच माहीत असतात.(अनेक मते व अनेक प्रकारच्या बुद्धि ह्यांचे वर्म शहाणा जाणतो)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विवेकलक्षणनिरूपणनाम समास दहावा ॥ दशक एकोणविसावा समाप्त ॥**

## सार्थ श्रीदासबोध दशक विसावा - पूर्णदशक



**॥श्रीरामसमर्थ॥॥श्रीमत् दासबोध॥दशक विसावा : पूर्णनामदशक समास पहिला : पूर्णापूर्णनिरूपण॥श्रीराम॥**

प्राणीव्यापक मन व्यापक । पृथ्वी व्यापक तेज व्यापक । वायो आकाश त्रिगुण व्यापक । अंतरात्मा मूळमाया ॥ १ ॥

निर्गुण ब्रह्म तें व्यापक । ऐसें अवघेंच व्यापक । तरी हें सगट किं काये येक । भेद आहे ॥ २ ॥

१व२ प्रश्न- प्राणी व्यापक,मन व्यापक,पृथ्वी,आप,तेज,वायू,आकाश (ही पंचभूतेही) व्यापक,त्रिगुण ही व्यापक,अंतरात्मा मुळमाया व्यापक आणि निर्गुण ब्रह्म तेही व्यापक अशी ही सगळीच व्यापक आहेत म्हणतात,तरी ही सारी सारखीच आहेत की त्यांच्यात काही भेद आहे (असा संशय मला येतो)

आत्मा आणि निरंजन । येणेंहि वाटतो अनुमान । आत्मा सगुण किं निर्गुण । आणि निरंजन ॥ ३ ॥

आत्म्याला निरंजन म्हणतात पण ह्याबद्दल शंका वाटते,आत्मा सगुण आहे की निर्गुण आहे की निरंजन आहे?

श्रोता संदेहीं पदिला । तेणें संदेह वाढला । अनुमान धरून बैसला । कोण तो कैसा ॥ ४ ॥

असा श्रोता संशयात पडला व संशय वाढत चालला तरी ह्या संशयाचे स्वरूप काय व कसे आहे ह्याचा ही निवडा झाला पाहिजे.

ऐका पहिली आशंका । अवघा गल्बला करूं नका । प्रगट करून विवेका । प्रत्यये पाहावा ॥ ५ ॥

( गल्बला - गोंधळ )

उत्तर- प्रथम पहिल्या शंकेचे समाधान शांतपणे ऐका सगळा गोंधळ करू नका,विवेकाला जागृत करून (प्रत्ययाने पाहून घ्या) अनुभव पहा.

शरीपाडें सामर्थ्यपाडें । प्राणी व्याप करी निवाडें । परी पाहतां मनायेवढें । चपळ नाहीं ॥ ६ ॥

( पाडें - आकार,कुवत )

आपल्या शरीराच्या व सामर्थ्याच्या मानानेच प्राणी लहान मोठा व्याप उघडच करीत असतो. तरीपण विचार पाहता मनाएवढा चपळ (व्यापक) कोणीच नाही.

चपळपण येकदेसी । पूर्ण व्यापकता नव्हे त्यासी । पाहातां पृथ्वीच्या व्यापासी । सीमा आहे ॥ ७ ॥

(मनाचे) चपळपण हे एकदेशी आहे (मन चपळ व एकदेशी आहे) म्हणुन पूर्ण व्यापकपणा त्याला येत नाही (मनापेक्षा पृथ्वी मोठी पण) पृथ्वीच्या व्यापकपणाला मर्यादा आहेत,

तैसेंचि आप आणि तेज । अपूर्ण दिसती सहज । वायो चपळ समज । येकदेसी ॥ ८ ॥

(तसेच पृथ्वी,आप,तेज व वायु ही चार भुते अपूर्ण व एकदेशी आहेत,पूर्ण व्यापक नव्हेत) तसेच आप तेज ही ही सहजच अपूर्ण दिसतात,वायू चंचल असल्यामुळे तो ही एकदेशीच समजावा.

गगन आणि निरंजन । तें पूर्ण व्यापक सघन । कोणीयेक अनुमान । तेथें असेचिना ॥ ९ ॥

आता आकाश व निरंजन (निर्गुण ब्रह्म) ही दोघेही पूर्ण व्यापक व घनदाट भरलेली आहेत ह्याविषयी काहीही शंका नाही.

त्रिगुण गुणक्षोभिणी माया । माईक जाईल विलया । अपूर्ण येकदेसी तया । पूर्ण व्यापकता न घडे ॥ १०॥

(त्रिगुण,गुणमाया,मूळमाया ह्यांना विलय आहे.ही ही अपूर्ण व एकदेशी आहेत ह्याविषयी काहीही शंका नाही.त्रिगुण व गुणक्षोभिणी माया ही (खोटी) माईक असल्यामुळे नाश पावणारी आहेत,तशीच अपूर्ण व एकदेशी आहेत.

आत्मा आणि निरंजन । हें दोहिकडे नामाभिधान । अर्थान्वये समजोन । बोलणें करावें ॥ ११ ॥

आत्मा (जीवात्मा) आणि निरंजन (निर्गुण) ही नावे दोन्हीकडे म्हणजे अंतरात्मा(जीव) व मुळमाया (शिव) ह्यांना लावण्यात येतात पण कोणत्या ठिकाणी कोणत्या अर्थाने त्यांचा उपयोग केला जातो हे संदर्भावरून ओळखले पाहिजे.

आत्मा मन अत्यंत चपळ । तरी हें व्यापक नव्हेचि केवळ ।सुचित अंतःकर्ण निवळ ।करून पाहावें ॥१२ ॥

आत्मा व मन ही दोन्ही अत्यंत चपळ आहेत,तथापि पूर्ण व्यापक नाहीत,अंतःकरण सावध व निश्चल करून ह्याचा विचार करावा (आत्मा म्हणजे मन हे अत्यंत चपळ आहे)(जीवात्मा म्ह.मन म्ह.अतिचपळ अर्थात पूर्ण व्यापक नव्हे.अंतःकरणी सूक्ष्मपणे हे पाहावे.)

अंतराळीं पाहातां पाताळी नाहीं । पाताळीं पाहातां अंतराळीं नाहीं । पूर्णपणें वसत नाहीं । चहुंकडे ॥ १३ ॥

त्याला आकाशात पाहावे तेव्हा ते पाताळात नसते व पाताळात पाहावे तेव्हा आकाशात नसते.,पूर्ण व्यापकपणे ते चोहोकडे असत नाही.

पुढें पाहातां मागें नाहीं । मागें पाहातां पुढें नाहीं । वाम सव्य व्याप नाहीं । दशदिशा ॥ १४ ॥

( व्याप - व्यापकता )

पुढे पाहावे तर मागे नसते आणि मागे पाहावे तर पुढे नसते (वाम) डावीकडे पाहावे तर (सव्य) उजवीकडे नसते एवंच ते दाही दिशांना सर्वत्र म्हणजे सर्वत्र एकाचवेळी व्यापून नसते. (ते दाहीदिशांना एकसमयावच्छेदेकरून नसते म्हणून ते पूर्ण व्यापक नाही)

चहुंकडे निशाणें मांडावीं । येकसरीं कैसीं सिवावीं । याकारणें समजोन उगवी । प्रत्ययें आपणासी ॥ १५ ॥

चहूकडे निशाणे एकदम पसरून मांडली तर त्यांना एकदम कसे शिवता येईल? (हात लावता येईल?) म्हणून निट विचार करून अनुभवाने ह्या गुंतागुंतीतून स्वतःला काढावे.(म्हणून प्रत्ययाने पाहावे. म्हणजे आत्मा किंवा मन सर्वत्र सर्व काळी नसल्याने पूर्ण व्यापक नाही.हेच ठरते.

सूर्य आला प्रतिबिंबला । हाहि दृष्टांत न घडे वस्तुला । वस्तुरूप निर्गुणाला । म्हणिजेत आहे ॥ १६ ॥

सूर्य उगवला व त्यांचे प्रतिबिंब जलादिकांच्या ठिकाणी (जलाशयात) पडले (पण प्रतिबिंब काही सूर्य नव्हे तसे ब्रह्माचे प्रतिबिंब जीव आहे असे म्हणून सूर्याचा दृष्टांत ब्रह्माला द्यावा तर) हाही दृष्टांत परब्रह्मवस्तूला शोभत नाही. (तसे निर्गुण ब्रह्म मनबुध्यादि उपाधीमुळे जीवात्मा किंवा शिवात्मा ह्या विशिष्ट नावाला पात्र झाले तरी जीव-आत्मा किंवा शिव-मूळमाया काही निर्गुण ब्रह्म होत नाही,तथापि सूर्याला उदयास्त आहेत व निर्गुण ब्रह्म सदोदित पूर्ण आहे,म्हणून सूर्यदृष्टांतानेही निर्गुण ब्रह्माची पूर्णता व्यक्त करून दाखविता येत नाही) निर्गुण ब्रह्मालाच वस्तू असे म्हणत असतात.(सूर्याचे प्रतिबिंब पाण्यात पडले तरी प्रतिबिंब काही सूर्य होत नाही,त्याप्रमाणे निर्गुणब्रह्म पिंडब्रह्मांडादि उपाधीमुळे जीवात्मा किंवा शिवात्मा ह्या विशिष्ट नामाला पात्र झाले तरी जीव किवा शिव निर्गुणब्रह्म होत नाही. तथापि सूर्याला उदय-अस्त आहेत आणि निर्गुण ब्रह्म सदोदित पूर्ण आहे म्हणुन सूर्यदृष्टांतानेही निर्गुण ब्रह्माची पूर्णता व्यक्त करून दाखविता येत नाही.)

घटाकाश मठकाश । हाहि दृष्टांत विशेष । तुळूं जातां निर्गुणास । साम्यता येते ॥ १७ ॥

( तुळूं - तुलना )

सूर्याच्या दृष्टांतापेक्षा आकाशाचा दृष्टांत,आकाशाचा दृष्टांत विशेष चांगला आकाश व निर्गुण ह्यांची तुलना केली तर त्यांच्यात साम्यता दिसते.(घटकाशाप्रमाणे देहपारिमित जीवात्मा व मठाकाशाप्रमाणे ब्रह्मांडपरिमित शिवात्मा हे आहेत असे कल्पिले तरी घट-मठ आले व गेले तरी आकाश व्यापकच आहे,त्याप्रमाणे जीवाशिवांच्या कल्पना टाकून निर्गुण ब्रह्माचा विचार होऊ शकतो,(घटाने मर्यादित जो ब्रह्मांश त्याला जीवात्मा म्हणतात आणि मठाने मर्यादित असलेल्या आकाशाला मठांकाश म्हणतात त्याप्रमाणे ब्रह्मांडाने मर्यादित असलेल्या ब्रह्मांशाला शिवात्मा म्हणतात,घट व मठ आले आणि गेले तरी आकाश व्यापकच आहे.त्याप्रमाणे जीवशिवांच्या कल्पना टाकून,त्या निर्गुण ब्रह्माचा विचार होऊ शकतो.)

ब्रह्मींचा अंश आकाश । आणी आत्म्याचा अंश मानस । दोहींचा अनुभव प्रत्ययास । येथें घ्यावा ॥ १८ ॥

( आकाश ब्रह्माचा अंश मन आत्म्याचा अंश , अंश = दृष्टांत )

ब्रह्माचा अंश आकाश (अंतरात्मा,आत्मा) आणि आकाशाचा (शिवात्म्याचा) अंश मन (जीवात्मा) आहे त्यात आकाश व मन ह्या दोहींचा विचार अनुभवाने घ्यावा (मनापेक्षा आकाश किती पटींने व्यापक आहे हे पाहावे व असेच पुढे जाऊन पाहावे म्हणजे आकाशपेक्षा निर्गुणही अनंतपटीने व्यापक आहे हे कळते.)

गगन आणि हें मन । कैसे होती समान । मननसीळ महाजन । सकळहि जाणती ॥ १९ ॥

आकाश व मन दोन्ही सारखी कशी होतील? मननशील थोर पुरुषांना सर्व काही ठाऊक आहे.(मन आकाशाची बरोबरी करू शकत नाही तर मग ते निर्गुणाची कशी करील? मनाला वडील आकाश,आकाशाला वडील ब्रह्म,ब्रह्माला मात्र वडील कोणीच नाही.)

मन हें पुढें वावडे । मागें आवघेंचि रितें पडे । पूर्ण गगनास साम्यता घडे । कोण्या प्रकारें ॥ २० ॥

( मन एका विषयाचे मनन करते ते इतरत्र नसते )

मन पुढे गेले की मागे सर्व रिकामे पडते (मागचे त्याला धरवत नाही) असे आकाशाचे नाही.आकाश मागे पुढे असते व म्हणून ते मनाहून व्यापक आहे.) पूर्ण किंवा व्यापक अशा आकाशाची बरोबरी कशी होईल?

परब्रह्मचि अचळ । आणि पर्वतासहि म्हणती अचळ । दिनीही येक केवळ । हें कैसें म्हणावें ॥ २१ ॥

परब्रह्म अचळ म्हणतात व पर्वतालाही अचळ म्हणतात,पण दोन्हीही अगदी एकच असे कसे म्हणावे? (असे म्हटले म्हणून पर्वत काही ब्रह्माची बरोबरी करत नाही तसे निरंजन हे पद जीव-शिवांना लावले तरी जीव-शिव निर्गुण ब्रह्माची बरोबरी करू शकत नाहीत.)

ज्ञान विज्ञान विपरितज्ञान । तिनी कैसीं होती समान । याचा प्रत्ययो मनन । करून पाहावा ॥ २२ ॥

ज्ञान,अज्ञान आणि विपरीत ज्ञान ही तिन्ही सारखी कशी होतील?(ह्या तिहीतही ज्ञान शब्द असल्याने काही तिहींची साम्यता होत नाही.) नीट मनन करून ह्याचा अनुभव घ्यावा.

ज्ञान म्हणिजे जाणणें । अज्ञान म्हणिजे नेणणें । विपरितज्ञान म्हणिजे देखणें । येकाचें येक ॥ २३ ॥

( विपरितज्ञान - वस्तू जशी आहे तशी न कळता भलतेच दिसणे उदा. मृगजळ )

ज्ञान म्ह.जाणणे अज्ञान म्ह.नेणणे-न जाणणे आणि विपरीत ज्ञान म्ह.एक असून भलते पाहाणे (ब्रह्म सत्य जाणणे हे ज्ञान, ते न जाणणे हे अज्ञान आणि ब्रह्म सत्य असून ते न जाणता जग सत्य आहे असे समजणे हे विपरीत ज्ञान होय.)

जाणणें नेणणें वेगळें केलें । ढोबळें पंचभूतिक उरलें । विपरीतज्ञान समजलें । पाहिजे जीवीं ॥ २४ ॥

ज्ञान व अज्ञान ह्यांचा म्ह.जाणण्या-नेणण्याचा विचार बाजूला ठेऊन स्थूळ (ढोबळे) पांचभौतिक पसारा दिसतो तो सत्य मानणे हे विपरीत ज्ञान होय, हे नीट अंतःकरणात समजले पाहिजे.

द्रष्टा साक्षी अंतरात्मा । जीवात्माची होये शिवात्मा । पुढें शिवात्मा तोचि जीवात्मा । जन्म घेतो ॥ २५ ॥

(दृष्टा,साक्षी व अंतरात्मा असा जीवात्मा हाच ज्ञानाने शिवात्मा होतो.व शिवात्मा तोच जन्म घेऊन जीवात्मा होतो.) जीवात्मा आहे तोच शिवात्मा द्रष्टा साक्षी असा अंतरात्मा होतो,पुढे शिवात्मा असतो तोच जन्म घेऊन जीवात्मा होतो.

आत्मत्वीं जन्ममरण लागे । आत्मत्वीं जन्ममरण न भंगे । संभवामि युगे युगे । ऐसे हें वचन ॥ २६ ॥

आत्म्याला जन्ममरण आहे,त्याचे जन्ममरण सुटत नाही म्हणूनच संभवामि युगे युगे असे शिवात्म्याच्या भूमिकेचे बोलणे भगवान बोलले आहेत.

जीव येकदेसी नर । विचारें जाला विश्वंभर । विश्वंभरास संसार । चुकेना कीं ॥ २७ ॥

जीव हा बोलून चालून एकदेशी (पिंडोपाधी) आहे तो विचाराने विश्र्वंभर (शिवात्मा) झाला तरी त्याला (विश्र्वंभरालाही) संसार चुकत नाही,सुटत नाही.

ज्ञान आणि अज्ञान । वृत्तिरूपें हें समान । निवृत्तिरूपें विज्ञान । जालें पाहिजे ॥ २८ ॥

अज्ञान ही वृत्ति आहे,तशीच ज्ञान हीही वृत्तिच आहे.वृत्तिरूपाने दोन्ही सारख्याच आहेत,ह्या दोन्ही वृत्ति टाकून देऊन ज्ञानाचे निवृत्तिरूपाने विज्ञान झाले पाहिजे (जीवाची पिंडोपाधि व शिवाची ब्रह्मांडोपाधि ह्या दोन्ही उपाधि जीवाला व शिवाला संसारात फिरवितात,दोन्ही उपाधि सुटल्या की निरंजन निर्गुणपद सिद्ध आहे.ज्ञान हे वस्तुतः अज्ञानच आहे,हे सविकार आहे,पिंडाचे चार देह,तसेस ब्रह्मांडाचे चार देह, दोन्ही समान असल्यामुळे ज्ञान म्ह. मूळमाया त्या मूळमायेपासूनच हे ब्रह्मांड झाले आहे,त्यानेच हे वाढविले आहे.

ज्ञानें येवढें ब्रह्मांड केलें । ज्ञानें येवढें वाढविलें । नाना विकाराचें वळलें । तें हें ज्ञान ॥ २९ ॥

ज्ञान म्हणजेच मूळमाया त्या मूळमायेनेच हे ब्रह्मांड उत्पन्न करून एवढे वाढवून ठेवले आहे,हे ज्ञान अनेक विकारांनी युक्त आहे (तात्पर्य ज्ञान हे विकारमय आहे.)

आठवें देह ब्रह्मांडीचें । तें हें ज्ञान साचें । विज्ञानरूप विदेहाचें । पद पाविजे ॥ ३० ॥

ब्रह्मांडातला आठवा देह मुळमाया तेच ज्ञान होय,त्या ज्ञानाचे विज्ञान झाले पाहिजे म्हणजे देहातीत अशा निर्गुण ब्रह्माची प्राप्ति (निरंजनपदप्राप्ति) होते.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे पूर्णापूर्णनिरूपणनाम समास पहिला ॥**

**समास दुसरा : सृष्टीत्रिविधलक्षणनिरूपण॥ श्रीराम ॥**

मूळमाया नस्तां चंचळ । निर्गुण ब्रह्म तें निश्चळ । जैसें गगन अंतराळ । चहुंकडे ॥ १ ॥

चंचळ मूळमाया नसती तर आकाशाप्रमाणेच निर्गुण,निश्र्चळ परब्रह्मच सर्वत्र संचलेले असते.

दृश्य आलें आणि गेलें । परी तें ब्रह्म संचलें । जैसें गगन कोंदाटलें । चहुंकडे ॥ २ ॥

(अभ्रे आली व गेली तरी आकाश जसे घनदाट भरलेले असते त्याचप्रमाणे) दृश्य आले व गेले तरीही परब्रह्म जसेच्या तसेच भरलेले असते (चंहूकडे संचले आहे.)

जिकडे पाहावें तिकडे अपार । कोणेकडे नाहीं पार । येकजिनसी स्वतंत्र । दुसरें नाहीं ॥ ३ ॥

जिकडे पाहावे तिकडे अपार आहे.कोणीकडे त्याचा शेवट सापडत नाही.एकजिनसी म्हणजे सर्वत्र व सर्वकाल एकसारखे एकीकडे असून स्वतंत्र आहे (त्याला परतंत्र करावयाला) दुसरा जिन्नसच नाही.

ब्रह्मांडावरतें बैसावें । अवकाश भकास अवलोकावें । तेथें चंचळ व्यापकाच्या नांवें । सुन्याकार ॥ ४ ॥

विवेकाच्या योगाने ब्रह्मांडाच्या पलीकडे (वरुते) जाऊन बसावे आणि (तेथून ब्रह्मांड नाही अशी कल्पना करून) भकास-ओस-ओसाड अशा अवकाशाकडे म्हणजे पोकळीकडे पाहावे म्हणजे त्या ठिकाणी चंचळ व व्यापक अशी मूळमाया म्हणून काहीच नाही असे आढळून येईल (ब्रह्मांडाच्या पलीकडे जाऊन पाहावे व ते नाही अशी कल्पना करून पाहावे म्हणजे चंचल व्यापक मूळमाया आढळणार नाही)

दृश्य विवेकें काढिलें । मग परब्रह्म कोंदाटलें । कोणासीच अनुमानलें । नाहीं कदा ॥ ५ ॥

विवेकाने दृश्य दूर सारून पाहावे,म्हणजे परब्रह्मच कोंदाटलेले आहे, कोणालाच त्याचे अनुमान करता येत नाही.(त्याचा पुरा पत्ता कोणालाच लागला नाही,(कारण अनुमान मनाने होणार,ते मन एकदेशी व ब्रह्म पूर्णव्यापक)

अधोर्ध पाहातां चहुंकडे । निर्गुण ब्रह्म जिकडे तिकडे । मन धांवेल कोणेकडे । अंत पाहावया ॥ ६ ॥

खाली,वर (अध व ऊर्ध्व म्ह. मुळमायेच्या खाली किंवा मूळमायेच्या पलीकडे) जिकडे तिकडे निर्गुण ब्रह्मच भरलेले (कोंदाटले) आहे. त्याचा अंत पहावयाला एकदेशी मन कोठे कोठे जाणार?(त्याचा अंत चंचल मन काय लावील?)

दृश्य चळे ब्रह्म चळेना । दृश्य कळे ब्रह्म कळेना । दृश्य आकळे ब्रह्म आकळेना । कल्पनेसी ॥ ७ ॥

दृश्य चळते,कळते,कल्पनेने आकलन करता येते (आकळते) आणि ब्रह्म चळत नाही,कळत नाही,कल्पनेला आकलन होत नाही (कल्पनाच तेथे पोचत नाही)

कल्पना म्हणिजे कांहींच नाहीं । ब्रह्म दाटले ठाईंचा ठाईं । वाक्यार्थ विवरत जाई । म्हणिजे बरें ॥ ८ ॥

कल्पना म्हणजे काहीच नाही (शून्य) आणि ब्रह्म तर सर्वत्र भरलेले (एकमेव असे) आहे.महावाक्याच्या अर्थाचे विवरण करीत जावे म्हणजे बरे.

परब्रह्मायेवढें थोर नाहीं । श्रवणापरतें साधन नाहीं । कळल्याविण कांहींच नाहीं । समाधान ॥ ९ ॥

परब्रह्मा एवढे थोर काहीच नाही,श्रवणाहून दुसरे श्रेष्ठ साधन नाही पण ते कळल्यावाचून समाधान कधीही होत नाही.

पिप्लीकामार्गें हळु हळु घडे । विहंगमें फळासी गांठी पडे । साधक मननीं पवाडे । म्हणिजे बरें ॥ १० ॥

(मुंगीच्या) पिपीलिका मार्गाने म्ह.मुंगीच्या पावलाने कर्म,उपासना,ज्ञान अशा साधनक्रमाने हळुहळू चढत जाऊन ब्रह्मपद गाठता येते.पण विहंगमार्गाने (पक्षाप्रमाणे विवेकाची उडी मारल्याने) एकदम ब्रह्मपदरुपी फळाशीच पोहोचता येते.(ते त्वरित हस्तगत होते) साधकाने मननात मग्न असावे हे बरे.

परब्रह्मासारिखें दुसरें । कांहींच नाहीं खरें । निंदा आणि स्तुतिउत्तरें । परब्रह्मीं नाहीं ॥ ११ ॥

परब्रह्मासारखे दुसरे सत्य काहीच नाही,तेथे निंदा व स्तुति ही दोन्ही परब्रह्माच्या ठिकाणी पोहचत नाहीत.

ऐसे परब्रह्म येकजिनसी । कांहीं तुळेना तयासी । मानुभव पुण्यरासी । तेथें पवाडती ॥ १२ ॥

( मानुभव - महाअनुभवी , पुण्यरासी - पवित्र संत ,सज्जन )

असे हे परब्रह्म एकजिनसी असून त्याला कशाचीच उपमा देता येत नाही अत्यंत पुण्यशील महात्मेच तेथे पोहोचतात.

चंचळें होते दुःखप्राप्ती । निश्चळायेवडी नाहीं विश्रांती । निश्चळ प्रत्ययें पाहाती । माहानुभाव ॥ १३ ॥

चंचळाच्या योगाने (संगतीने) दु:ख प्राप्त होते,निश्र्चल परब्रह्मासारखी विश्रांति दुसऱ्या कोठेही मिळत नाही,महात्मे पुरुष स्वानुभवाने ते निश्र्चल परब्रह्म पाहातात (निश्र्चळाच्या-नि:संगाच्या संगतीने सुख होते. महानुभाव प्रत्यक्ष ते भोगतातच.

मुळापासून शेवटवरी । विचारणा केलीच करी । प्रत्ययाचा निश्चयो अंतरीं । तयासीच फावे ॥ १४ ॥

मुळमायेपासून शेवटच्या स्थूळदेहापर्यंत सर्वपिंडब्रह्मांडाचा जे पुनः पुन्हा विचार करतात त्यांच्याच अंतःकरणात स्वानुभवाचा निश्र्चय बाणतो,(मूळमायेपासून शेवट देहापर्यंत विचार करून,सर्व चंचळाचा त्याग करून ते अंतरी स्वानुभवाचा निश्र्चय करून निश्र्चळी राहतात.

कल्पनेचि सृष्टी जाली । त्रिविध प्रकारें भासली । तिक्षण बुद्धीनें आणिली । पाहिजे मना ॥ १५ ॥

( त्रिविध प्रकारें - मुळमाया ते त्रिगुण ते पृथ्वी ते चार खाणी नि चार वाणी असे तीन प्रकार )

सारी सृष्टि कल्पनेची झाली आहे (व ब्रह्म निर्विकल्प आहे) तिचे तीन प्रकार भासतात,सूक्ष्म बुद्धीने तिचा मनाशी विचार केला पाहिजे.

मूळमायेपासून त्रिगुण । अवघें येकदेसी लक्षण । पांचा भूतांचा ढोबळा गुण । दिसत आहे ॥ १६ ॥

(१: मूळमायेपासून गुंणमायेपर्यंत म्ह.त्रिगुणापर्यंत,२: त्रिगुणापासून ते पृथ्वीपर्यंत ३: पृथ्वीपासून तो चारवाणी चारखाणी पर्यंत,पहिल्यात एकदेशी लक्षण, दुसऱ्यात स्थूळपंचभूते व तिसऱ्या प्रकारात नाना जीवजंतु निर्माण होऊन सृष्टिरचना पूर्ण झाली आहे. (१:मुळमायेपासून त्रिगुणापर्यंत सर्व एकदेशी (अव्यक्त) स्वरुपाची आहेत हा एक प्रकार,दुसरा प्रकार २:स्पष्ट दशेला पावलेली पंचभूते ही तर दिसतच आहेत)

पृथ्वीपासून च्यारी खाणी । चत्वार वेगळाली करणी । सकळ सृष्टीचि चाली येथुनी । पुढें नाहीं ॥ १७ ॥

तिसरा प्रकार ३: पृथ्वीपासून चारखाणीपर्यंत त्या चार खाणींचे व्यवहार (व्यापार) वेगवेगळे आहेत.सगळ्या सृष्टीचा व्यवहार ह्याच्यापुढे नाही.

सृष्टीचें विविध लक्षण । विशद करूं निरूपण । श्रोतीं सुचित अंतःकर्ण । केलें पाहिजे ॥ १८ ॥

सृष्टीचे विविध लक्षण आता स्पष्ट करून सांगतो,श्रोत्यांनी अन्तःकरण स्थिर करून ऐकावे.

मूळमाया जाणीवेची । मुळीं सूक्ष्म कल्पनेची । जैसी स्थिती परे वाचेची । तद्रूपचि ते ॥ १९ ॥

जाणीवरूप मुळमाया ही परब्रह्माच्या सूक्ष्म स्फूरणाची (एको ऽ हं बहुस्याम) आहे नाभिस्थानी परावाणीचे जसे स्पुरण होते.तसे ब्रह्माच्या ठिकाणी मूळमायेचे सूक्ष्मस्फूरण प्रथम होते,दोन्ही एकरूपच.

अष्टधा प्रकृतीचें मूळ । ते हे मूळमायाच केवळ । सूक्ष्मरूप बीज सकळ । मुळींच आहे ॥ २० ॥

अष्टधा प्रकृतीचे मुळीही मूळमायाच होय,त्या मूळ मायेमध्येच (त्रिगुण व पंचभूते ह्या) अष्टधा प्रकृतीची सर्व बीजे प्रथम सूक्ष्मरूपाने झाली.

जड पदार्थ चेतवितें तें । म्हणौन चैतन्य बोलिजेतें । सूक्ष्म रूपें संकेतें । समजोन घ्यावीं ॥ २१ ॥

ती जड पदार्थांना चेतविते म्हणून तिला चैतन्य म्हणतात.तिची सूक्ष्मरूपे संकेतांने म्हणजे थोडक्यात समजून घ्यावी,(तिचे सूक्ष्मरूप समजण्यासाठी अनेक नावाचे संकेत केले आहेत ते समजून घ्यावे.

प्रकृती पुरुषाचा विचार । अर्धनारीनटेश्वर । अष्टधा प्रकृतीचा विचार । सकळ कांहीं ॥ २२ ॥

प्रकृतिपुरुष,अर्धनारीनटेश्र्वर,अष्टधा प्रकृति हे ते सर्व तिचेच संकेत (सांकेतिक नावे आहेत.)

गुप्त त्रिगुणाचें गूढत्व । म्हणौन संकेत महत्ततत्त्व । गुप्तरूपें शुद्धसत्व । तेथेंचि वसे ॥ २३ ॥

त्यामूळमायेत त्रिगुण अति (सूक्ष्मपणाने) गुप्तपणाने असतात म्हणून तिला महतत्व म्हणतात,शुद्ध सत्वगुणही ह्याच मूळमायेमध्ये सूक्ष्मपणाने असतो.(शुद्ध सत्व हे तसेच नामरूप)

जेथून गुण प्रगटती । तीस गुणक्षोभिणी म्हणती । त्रिगुणाचीं रूपें समजती । धन्य ते साधु ॥ २४ ॥

(तेथून क्षोम पावून गुणमाया निघते) तिच्याच ठिकाणी गुण प्रकट होऊ लागले. म्हणजे तिला गुणक्षोभिणी म्हणतात.,त्रिगुणांची स्वरूपे यथार्थ जाणतात ते साधु धन्य होत.

गुप्तरूपें गुणसौम्य । म्हणौनि बोलिजे गुणसाम्य । सूक्ष्म संकेत अगम्य । बहुतांस कैंचा ॥ २५ ॥

त्रिगुण हे गुप्तरूपाने आपल्या सौम्य (सूक्ष्म) स्वरुपाने तेथे असतात म्हणुन तिला गुणसाम्य म्हणतात. असे हे सूक्ष्म संकेत कळण्यास फार कठिण असतात,ते सर्वांना कसे समजणार? (नावांचे हे विविध सूक्ष्म संकेत बहुतांस समजणे कठिण.)

मूळमायेपासून त्रिगुण । चंचळ येकदेसी लक्षण । प्रत्ययें पाहातां खूण । अंतरीं येते ॥ २६ ॥

मूळमायेपासून त्रिगुणापर्यंत (सृष्टीचा एक प्रकार झाला तो) चंचळ व एकदेशी स्वरूपाचा आहे अनुभव पहिला म्हणजे मनाला खूण पडते (मुळमायेपासून त्रिगुण सूक्ष्मरूपाने होतात.तेथे ते चंचल एकदेशी असतात,हे प्रत्ययाने पाहून घ्यावे.)

पुढें पंचभूतांचीं बंडें । वाढलीं विशाळें उदंडें । सप्तद्वीपें नवखंडें । वसुंधरा हे ॥ २७ ॥

( सप्तद्वीपें - जंबू,प्लक्ष,श्यामली,कुश,क्रौच,शाक व पुष्कर हि बेटे , नवखंडें - इंद्र,कुशेरु,ताम्र,गभस्ती,नाग,वारुण,सौम्य,ब्रह्म व भरत हे नऊ खंड)

(त्रिगुणापासून पृथ्वीपर्यंत सृष्टीचा दुसरा प्रकार होतो) पुढे पुढे पंचभूतांची बंडे वाढून (पंचभूते स्थूळ स्वरुपात आली व अनंत ब्रह्मांडे) सप्तव्दिप व नवखंड पृथ्वी निर्माण झाली.

त्रिगुणापासून पृथ्वीवरी । दुसर्या जिनसान्याची परी । दोनी जिनस याउपरी । तिसरा ऐका ॥ २८ ॥

त्रिगुणापासून पृथ्वीपर्यंत सृष्टीचा दुसरा प्रकार झाला.येथपर्यंत दोन प्रकार सांगितले,आता तिसरा प्रकार ऐका.

पृथ्वी नाना जिनसाचें बीज । अंडज जारज श्वेतज उद्भिज । च्यारी खाणी च्यारी वाणी सहज । निर्माण जाल्या ॥ २९ ॥

( नाना जिनसाचें बीज - अनेक गोष्टींचे मूळ )

पृथ्वी म्हणजे अनेक प्रकारांचे बीज आहे.अंडज,जारज,स्वेदज आणि उद्भीज ह्या चार खाणी व परा,पश्यंती,मध्यमा आणि वैखरी ह्या चार वाणी ओघानेच तिच्यापासून उत्पन्न झाल्या.

खाणी वाणी होती जाती । परंतु तैसीच आहे जगती । ऐसे होती आणी जाती । उदंड प्राणी ॥ ३० ॥

खाणी व वाणी होतात व जातात पण पृथ्वी (जगती) आहे तशीच आहे.हिच्यावर असे असंख्य प्राणी होतात व जातात.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सृष्टीत्रिविधलक्षणनिरूपणनाम समास दुसरा ॥**

## समास तिसरा : सूक्ष्मनामाभिधाननिरूपण॥ श्रीराम ॥

मुळींहून सेवटवरी । विस्तार बोलिला नानापरी । पुन्हा विवरत विरत माघारी । वृत्ति न्यावी ॥ १ ॥

( विवरत - वेध घेत , विरत - लीन )

मूळमायेपासून शेवटपर्यंत अनेक (तीन) प्रकारांनी विस्तार झाला हे सांगितले,ह्याचा विचार करीत व अहंभाव नाहीसा करीत करीत (लीन होत होत) वृत्ति परत मूळमायेपर्यंत न्यावी.

च्यारी खाणी च्यारी वाणी । चौर्यासी लक्ष जीवयोनी । नाना प्रकारीचे प्राणी । जन्मास येती ॥ २ ॥

चार खाणी व चार वाणी ह्यातील अनेक प्राणी चौ-यांशी लक्ष योनींमध्ये जन्मास येतात.

अवघे होती पृथ्वीपासूनी । पृथ्वीमधें जाती नासोनी । अनेक येती जाती परी अवनी । तैसीच आहे ॥ ३ ॥

ते सर्व पृथ्वीपासून होतात (जन्म पावतात) व पृथ्वीमध्येच लय पावतात (पृथ्वी तत्वातच लीन होतात.) असे अनेक प्राणी येतात व जातात पण पृथ्वी आहे तशीच आहे.

ऐसें हें सेंड्याकडिल खांड । दुसरें भूतांचें बंड । तिसरें नामाभिधानें उदंड । सूक्ष्मरूपें ॥ ४ ॥

पूर्वी जे सृष्टीचे तीन प्रकार सांगितले त्यातील हा शेवटचा व तिसरा भाग आहे, दुसरा भाग पंचभूतांचा आहे. आणि पहिला (आरंभीचा) मूळमायेपासून त्रिगुणापर्यंतचा जो सूक्ष्म भाग त्याला अनेक नावे आहेत.

स्थूळ अवघें सांडून द्यावें । सूक्ष्मरूपें वोळखावें । गुणापासून पाहिलेच पाहावें । सूक्ष्मदृष्टीं ॥ ५ ॥

स्थूळ सर्व सोडुन देऊन सूक्ष्मरूपांची ओळख करून घ्यावी व गुंणापासून मागे सूक्ष्म मूळमायेपर्यंत सूक्ष्मदृष्टीने पुन्हा पाहात जावे.

गुणाचीं रूपें जाणिव नेणीव । पाहिलाच पाहावा अभिप्राव । सूक्ष्मदृष्टीचें लाघव । येथून पुढें ॥ ६ ॥

जाणीव व नेणीव ही गुणांची रूपे आहेत,हा विचार वरचेवर करावा सूक्ष्मदृष्टीने पाहण्याची मौज ती येथून पुढे आहे.

शुद्ध नेणीव तमोगुण । शुद्ध जाणीव सत्वगुण । जाणीवनेणीव रजोगुण । मिश्रित चालिला ॥ ७ ॥

शुद्ध नेणीव हा तमोगुण,शुद्ध जाणीव हा सत्वगुण व जाणीव-नेणीव मिश्रित हा रजोगुण होतो.

त्रिगुणाचीं रूपें ऐसीं । कळों लागलीं अपैसीं । गुणापुढील कर्दमासी । गुणक्षोभिणी बोलिजे ॥ ८ ॥

अशी ही त्रिगुणांची रूपे आपोआप (अपैसी) कळतात.ह्यागुणांच्या पलीकडे जो कर्दम म्ह.चिखल,मिश्रण आहे त्याला गुणक्षोभिणी (गुणमाया) म्हणतात.

रज तम आणि सत्व । तिहींचें जेथें गूढत्व । तें जाणिजे महत्तत्त्व । कर्दमरूप ॥ ९ ॥

रज,तम,सत्व हे तीन गुण जेथे अतिगुप्तरूपाने असतात त्याला महतत्व म्हणतात. ते कर्दमरूप आहे.

प्रकृती पुरुष शिवशक्ति । अर्धनारीनटेश्वर म्हणती । परी याची स्वरूपस्थिती । कर्दमरूप ॥ १० ॥

(त्रिगुणांचे अत्यंत गूढपण त्याला महतत्व) प्रकृति-पुरुष,शिवशक्ती मूळमाया,अर्धनारी-नटेश्वर म्हणतात,पण हे महतत्व- मूळमाया- कर्दमरूप आहे.

सूक्ष्मरूपें गुणसौम्य । त्यास बोलिजे गुणसाम्य । तैसेंचि चैतन्य अगम्य । सूक्ष्मरूपी ॥ ११ ॥

सूक्ष्मरूपाने व सौम्य स्थितीत गुण वास करितात म्हणून त्याला गुणसाम्य म्हणतात,तसेच चैतन्य हे नांव आहे,हे महतत्व सूक्ष्मरूपाने असल्यामुळे कळण्यास कठिण आहे.

बहुजिनसी मूळमाया । माहांकारण ब्रह्मांडीची काया । ऐसिया सूक्ष्म अन्वया । पाहिलेंचि पाहावें ॥ १२ ॥

ब्रह्मांडातील चौथा जी मूळमाया ती अनेक पदार्थमय (बहुजिनसी) आहे. तिच्या ह्या सूक्ष्म धाग्याचा विचार पुनः पुन्हा करीत जावा.

च्यारी खाणी पांच भूतें । चौदा सूक्ष्म संकेतें । काये पाहणें तें येथें । शोधून पाहावें ॥ १३ ॥

चार खाणी,पाच भूते,पहिल्या सूक्ष्म भागांची (मूळमायेची) चौदा नावे (म्हणजे सृष्टीचे तीनही प्रकार) ह्यामध्येच काय ते शोधून पाहावयाचे असेल ते पाहावे.(सर्व सूक्ष्मरूपाने त्या कर्दमरूप मुळमायेतच शोधून पाहावे.)

आहाच पाहातां कळेना । गरज केल्यां समजेना । नाना प्रकारीं जनाच्या मना । संदेह पडती ॥ १४ ॥

वरवर पाहता हे कळणार नाही, तात्पुरते सांगून समजणार नाही,सामान्य लोकांच्या मनाला अनेक संशय उत्पन्न होतात.

चौदा पांच येकोणीस । येकोणीस च्यारी तेविस । यांमधें मूळ चतुर्दश । पाहिलेंचि पाहावें ॥ १५ ॥

अव्यक्ताची (मुळमायेची) चौदा(१४) नावे व पाच (५) महाभूते मिळुन एकोणीस (१९) आणि त्यात चार खाणी (४) मिळवल्या म्हणजे तेवीस (२३) होतात. ह्या (२३) तेविसांमध्ये अव्यक्तांच्या चौदा (१४) नावांचा वरचेवर विचार करावा.

जो विवरोन समजला । तेथें संदेह नाहीं उरला । समजल्याविण जो गल्बला । तो निरर्थक ॥ १६ ॥

ह्या चौदा (१४) नावांचे विवरण करून जो पाहील त्याला संशय राहणार नाही,समजल्यावाचून केलेली बडबड व्यर्थ होय.

सकळ सृष्टीचें बीज । मूळमायेंत असे सहज । अवघें समजतां सज्ज । परमार्थ होतो ॥ १७ ॥

सर्व सृष्टीचे बीज मूळमायेत मूळचेच आहे.ते यथार्थ (सज्ज,सार्थ) समजल्याने परमार्थ परिपूर्ण होतो.

समजलें माणूस चावळेना । निश्चै अनुमान धरीना । सावळगोंदा करीना । परमार्थ कदा ॥ १८ ॥

( चावळेना - बावचळत नाही,संशय रहित , गोंदा - गोंधळ )

ज्या मनुष्याला निट समजले तो (भ्रमांत पडत नाही.) वाटेल ते बरळत नाही.ज्याचा निश्र्चय झाला आहे,(तो संशय धरीत नाही.) त्याला संशय उत्पन्न होत नाही.आणि तो परमार्थात कधी सावळा गोंधळ करीत नाही.

शब्दातीत बोलतां आलें । त्यास वाच्यांश बोलिलें । शुद्ध लक्ष्यांश लक्षिलें । पाहिजे विवेकें ॥ १९ ॥

शब्दातीत (नि:शब्द) परब्रह्माविषयी जे शब्दांनी सांगता येते तो वाच्यांश होय.शुद्ध लक्षांश जो आहे तो (वाच्यांशाचा त्याग करून.) विवेकानेच जाणला (लक्षिला) पाहिजे.

पूर्वपक्ष म्हणिजे माया । सिद्धांतें जाये विलया । माया नस्तां मग तया । काये म्हणावें ॥ २० ॥

पूर्वपक्ष म्हणजे माया,तिचे निरसन (खंडण) सिद्धांतामुळे (ब्रह्मामुळे) होते.मायेचा निरास झाल्यावर जे राहते त्यास काय म्हणावे-काय नाव द्यावे?

अन्वये आणी वीतरेक । हा पूर्वपक्षाचा विवेक । सिद्धांत म्हणिजे शुद्ध येक । दुसरें नाहीं ॥ २१ ॥

अन्वय आणि व्यतिरेक हा विचारही पूर्वपक्षातलाच विचार आहे.सिद्धांत म्हणजे एक शुद्ध परब्रह्म आहे.त्यावाचून दुसरे काही नाही हा होय.

अधोमुखें भेद वाढतो । ऊर्धमुखें भेद तुटतो । निःसंगपणें निर्गुणी तो । माहांयोगी ॥ २२ ॥

अधोमुखाने म्ह. मायेकडे पहात गेल्याने भेद वाढतो.(व्देत वाढते)आणि ऊर्ध्वमुखाने (ब्रह्माकडे पहिल्याने) ब्रह्माचा विचार करीत गेल्यास भेद नाहीसा होतो.नि:संग होऊन निर्गुणाच्या ठिकाणी जो विश्रांती पावतो,तो महायोगी ( सर्व संग सोडून निर्गुणी आराम पावला तो महायोगी जाणावा)

माया मिथ्या ऐसी कळली । तरी मग भीड कां लागली । मायेचें भिडेनें घसरली । स्वरूपस्थिती ॥ २३ ॥

माया लटकी (मिथ्या) आहे हे कळल्यावर मग तिची (मायेची) पर्वा-भीड-काय म्हणून धरावी? मायेची भीड धरली की स्वरूपस्थिति सुटली (राहात नाही) (मिथ्या मायेने भेडसवावे व सत्य परब्रह्म सांडावे आणि सत्य परब्रह्माचा निश्र्चय झाल्यावर पृथ्वीतलावर मायिक पदार्थांच्या मागे हिंडावे हे केवढे नवल होय!)

लटके मायेनें दपटावें । सत्य परब्रह्म सांडावें । मुख्य निश्चयें हिंडावें । कासयासी ॥ २४ ॥

लटक्या मायेच्या भिडेने दबून जाऊन सत्य परब्रह्म टाकावे. आणि स्वरूपस्थितीचा निश्र्चय सोडून देऊन उगीच वणवण करीत का हिंडावे?

पृथ्वीमधें बहुत जन । त्यामधें असती सज्जन । परी साधूस वोळखतो कोण । साधुवेगळा ॥ २५ ॥

पृथ्वीवर अनेक लोक आहेत त्यात सज्जनही आहेत,पण त्या सज्जानांस म्ह. साधूस साधूशिवाय दुसरा कोण ओळखतो!

म्हणौन संसार सांडावा । मग साधूचा शोध घ्यावा । फिरफिरों ठाइं पाडावा । साधुजन ॥ २६ ॥

म्हणून आपण स्वतः संसार सोडून मग साधूचा शोध घ्यावा,( फिरून फिरून साधु धुंडावे) खूप हिंडून साधूंच्या भेटी घ्याव्यात.

उदंड हुडकावे संत । सांपडे प्रचितीचा महंत । प्रचितीविण स्वहित । होणार नाहीं ॥ २७ ॥

पुष्कळ साधुसंत पाहावे म्हणजे त्यांतच एखादा स्वानुभवी महंत सापडतो.(प्रचीतीवांचून) अनुभवावाचून आत्महित कधीही होत नाही.

प्रपंच अथवा परमार्थ । प्रचितीविण अवघें वेर्थ । प्रत्ययेज्ञानी तो समर्थ । सकळांमध्यें ॥ २८ ॥

प्रपंच असो का परमार्थ असो,अनुभवावाचून सगळे व्यर्थ होय.(प्रत्यय) स्वानुभव असणारा पुरुष सर्वात श्रेष्ठ होय.

रात्रंदिवस पाहावा अर्थ । अर्थ पाहेल तो समर्थ । परलोकींच निजस्वार्थ । तेथेंचि घडे ॥ २९ ॥

रात्रंदिवस महावाक्यादिकांच्या अर्थाचे मनन करावे,हा अर्थ पाहील तो समर्थ होय.परलोकाचे खरे स्वहित त्यांतच आहे.

म्हणौन पाहिलेंचि पाहावें । आणि शोधिलेंचि शोधावें । अवघें कळतां स्वभावें । संदेह तुटती ॥ ३० ॥

म्हणून पुनः पुन्हा तेच अवलोकन करावे, पुनः पुन्हा विचार करावा,सर्व यथार्थपणे कळले की संशय आपोआप नाहीसे होतात.(यथार्थ बोध झाला की नि:संदेहता बाणते.)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मनामाभिधाननिरूपणनाम समास तिसरा ॥**

## समास चौथा : आत्मानिरूपण

॥ श्रीराम ॥ सकळ जनास प्रार्थना । उगेंच उदास करावेंना । निरूपण आणावें मना । प्रत्ययाचें ॥ १ ॥

सर्व लोकांना प्रार्थना आहे की व्यर्थ उदास होऊ नका अनुभवाचे निरुपण चित्तात धरा.

प्रत्यये राहिला येकेकडे । आपण धांवतो भलतेकडे । तरी सारासाराचे निवाडे । कैसे होती ॥ २ ॥

अनुभव राहिला एकीकडे व आपण धावतो दुसरीकडे असे झाल्यास सार काय व असार काय ह्याचा निर्णय कसा होईल?(असे झाले तर मग असार माया टाकून सार-ब्रह्म घेणे कसे घडेल?)

उगिच पाहातां सृष्टी । गल्बला दिसतो दृष्टीं । परी ते राजसत्तेची गोष्टी । वेगळीच ॥ ३ ॥

सृष्टीकडे नुसते पाहिले तर दृष्टीला नुसता गलबलाच दिसतो,पण ज्या मुख्य (परमेश्र्वरी) सत्येच्या योगाने हे व्यवहार चालले आहेत,ती सत्ता (दिसत नसली तरी ) निराळी आहे (पण ज्या मुख्य सत्तेच्या म्ह परमेश्र्वरी सत्तेच्या-राजसत्तेच्या योगाने हा व्यवहार चालला आहे त्या सत्तेची गोष्ट काही और आहे.!

पृथ्वीमधें जितुकीं शरीरें । तितुकीं भगवंताचीं घरें । नाना सुखें येणें द्वारें । प्राप्त होती ॥ ४ ॥

पृथ्वीवर जेवढी शरीरे आहेत तेवढी भगवंताची घरे आहेत,अनेक सुखे ह्या शरीराच्या व्दाराने प्राप्त होतात.

त्याचा महिमा कळेल कोणाला । माता वांटून कृपाळु जाला । प्रत्यक्ष जगदीश जगाला । रक्षितसे ॥ ५ ॥

त्या भगवंताचा महिमा कोणाला समजणार आहे? प्राणिमात्रांना आता वाटून देऊन (प्रत्येक प्राण्याचे संगोपन करण्यास वेगवेगळी आई निर्माण करून) तिच्या व्दारे प्रत्यक्ष परमेश्वरच कृपाळूपणाने त्याचे रक्षण करीत आहे.(तो कृपाळू जगदीश जगाचे रक्षण करीत असतो.)

सत्त पृथ्वीमधें वांटली । जेथें तेथें विभागली । कळेनें सृष्टि चालिली । भगवंताचे ॥ ६ ॥

परमेश्वराची सत्ताच पृथ्वीवर सर्वत्र (सर्वात) ह्याप्रमाणे वाटली (विभागली) गेली आहे आणि परमेश्वराच्याच एका अंशाने हे जग चालले आहे (भगवंताच्या कळेने सृष्टीचे कारभार चालले आहेत) (आई

प्रमाणेच बाप,बंधु,भगिनी.स्त्री-पुरुष सुहृन्मित्र,राजा व शेजारी पाजारी इ. सर्वांच्या ठिकाणी परमेश्र्वरी सत्ता असून परमेश्र्वरच त्या त्या व्दाराने आपले रक्षण करीत असतो.)

मूळ जाणत्या पुरुषाची सत्ता । शरीरीं विभागली तत्वता । सकळ कळा चातुर्यता । तेथें वसे ॥ ७ ॥

मूळ सत्ता जाणत्या पुरुषाची म्ह. जगदीश्वराची,तीच अनेक शरीरांत खरोखरी विभागली गेली असून त्या सत्तेतच सर्व कला व चातुर्य भरले आहे..

सकळ पुराचा ईश । जगामध्यें तो जगदीश । नाना शरीरीं सावकास । करूं लागे ॥ ८ ॥

सर्व देहरूपी पुरांचा ईश म्ह.स्वामी तो जगदीश होय.तो जगामध्ये अनेक (नाना) शरीरात वास्तव्य करून जगाचे-सृष्टीचे व्यवहार चालवीत आहे.

पाहातां सृष्टिची रचना । ते येकाचेन चालेना । येकचि चालवी नाना । देह धरुनी ॥ ९ ॥

सृष्टिरचनेकडे पाहिले तर ती कोणा एकट्या (प्राण्या-) च्याने चालत नाही, (पण तसे म्हणावे तर) अनेक देह धारण करून एकटाच (अंतरात्मा) सर्व सृष्टि चालवत आहे (असे आढळून येते)

नाहीं उंच नीच विचारिलें । नाहीं बरें वाईट पाहिलें । कार्य चालों ऐसें जालें । भगवंतासी ॥ १० ॥

त्या कामी त्याने हा देह उंच व हा नीच असा विचार केला नाही किंवा हा बरा हा वाईट असेही पहिले नाही जणू काय कोणीकडून सृष्टीचे कार्य चालावे म्हणजे झाले,असे त्या भगवंताला होऊन गेले,(कोणीकडून तरी सृष्टीचे कार्य चालो अशा हेतूने नानाविध देह निर्माण केले आहेत व सर्व योनीत त्यांचे वास्तव्य आहेच)

किंवा नेणणें आडवें केलें । किंवा अभ्यासीं घातलें । हें कैसें कैसें केलें । त्याचा तोचि जाणे ॥ ११ ॥

(ही सृष्टि त्याने कशी चालविली आहे- का अज्ञानातून-शून्यातून त्याने जग निर्माण केले आहे,का की सृष्टि उत्पन्न करण्याचा त्याला अनादिकालापासून अभ्यास आहे हे त्याचे त्यालाच ठाऊक!) अथवा अज्ञाना पासूनच त्याने हे जग निर्माण केले! का की त्याला सृष्टि करण्याचे अंगवळणीच पडले आहे! हे एकंदर त्याने कसे केले हे त्याचे त्यालाच माहीत!

जगदांतरीं अनुसंधान । बरें पाहाणें हेंचि ध्यान । ध्यान आणी तें ज्ञान । येकरूप ॥ १२ ॥

ह्यास्तव जगदंतरामध्ये व्यापकपणाने राहणाऱ्या ईश्वराचे अनुसंधान नीट ठेवणे (नामरूपादि मिथ्या असून जगातील सर्व व्यवहार अंतरात्माच करतो आहे असे विचार दृढ ठेवणे.) हेच त्याचे ध्यान व ज्ञान होय, हे ध्यान व ते आत्मज्ञान ही दोन्ही एकरूपच होत.

प्राणी संसारास आला । कांहीं येक शाहाणा जाला । मग तो विवरों लागला । भूमंडळीं ॥ १३ ॥

प्राणी जन्माला आला,काही थोडा बहुत शहाणा झाला म्हणजे मग तो जगातील सर्व गोष्टींचा (आपल्या जाणीवेप्रमाणे) विचार करू लागतो.

प्रगट रामाचें निशाण । आत्माराम ज्ञानघन । विश्वंभर विद्यमान । भाग्यें कळे ॥ १४ ॥

परंतु रामाचे जाणीवरूप निशाण गुप्त नसून साऱ्या जगावर उघड उघड फडकत आहे (फडकून राहिले आहे) हे कळत नाही,तो अंतरात्मा (आत्माराम) ज्ञानस्वरूप आहे तो विश्वंभर आहे,तो सर्वत्र विद्यमान म्हणजे भरलेला-संचरला आहे.मात्र त्याची प्राप्ती महद्भाग्यानेच होते.

उपासना धुंडुन वासना धरिली । तरी ते लांबतचि गेली । महिमा न कळे बोलिली । येथार्थ आहे ॥ १५ ॥

उपासना धुंडून म्हणजे शोधून काढीन अशी वासना धरिली तर ती मूळमायेपर्यंत लांबतच जाते.(मूळमायेपर्यंत पाहावे लागते.) त्या अंतरात्म्याचा महिमा कळत नाही असे म्हणतात ते यथार्थ आहे खचितच,त्या अंतरात्म्याचा महिमा अगाध आहे असे म्हणतात,ते योग्य आहे (उपासनेचा शोध घेतल्यावरही वासना शिल्लक राहील तर ती लांबत जाऊन जन्ममृत्यूला कारण होते.)

द्रष्टा म्हणिजे पाहाता । साक्षी म्हणिजे जाणता । अनंतरूपी अनंता । वोळखावें ॥ १६ ॥

द्रष्टा म्ह. पहाणारा व साक्षी म्ह. जाणणारा,अशा त्या अनंतरुपी अनंताला ओळखावे ,

संगती असावी भल्यांची । धाटी कथा निरूपणाची । कांहीं येक मनाची । विश्रांती आहे ॥ १७ ॥

सज्जनांची संगति धरावी,हरिकथा निरुपणाच्या मार्गाने जावे म्हणजे मनाला काही विश्रांती मिळते.(मनाला विश्रांतिसुख मिळते,म्हणून सत्संग व सच्छ्रवण अवश्य ठेवावे.)

त्याहिमधें प्रत्ययेज्ञान । जाळून टाकिला अनुमान । प्रचितीविण समाधान । पाविजेल कैंचें ॥ १८ ॥

त्यातही अनुभवाचे ज्ञान असेल तर संशय जळून खाक होतील अनुभवावाचून खरे समाधान कसे होईल?(त्यातही संशय नाहीसे करणारे प्रत्ययज्ञान असले म्हणजे उत्कृष्ट प्रत्यायावाचून समाधान नाही)

मूळसंकल्प तो हरिसंकल्प । मूळमायेमधील साक्षेप । जगदांतरीं तेंचि रूप । देखिजेतें ॥ १९ ॥

एकोऽहं) हाच जो मूळाचा संकल्प तोच हरिसंकल्प आहे आणि त्या संकल्पातील बहुस्याम अशी जी स्फूर्ती ती मूळमायेतील साक्षेप (पसा-याचें बीज) होय.तोच संकल्प (मूळमाया ईश्र्वर) जगदांतरामध्ये पाहावा.(मूळसंकल्प तो हरिसंकल्प,तोच मूळमाया,ईश्वर,जगदंतरी तेच पाहावे.)(सर्वाभूतीं भगवद्भाव ठेवावा भूतमात्रीं हरि पाहावा.)

उपासना ज्ञानस्वरूप । ज्ञानीं चौथा देह आरोप । याकारणें सर्व संकल्प । सोडून द्यावा ॥ २० ॥

(मूळमाया म्ह.ईश्वर,ब्रह्मांडाचा चौथा महाकारण देह तो,तेथून सकळ सृष्टि झाली.तेथचा विचार ती उपासना,उपासना अर्थातच ज्ञानस्वरूप झाली म्हणून सर्व संकल्प सोडून द्यावा मूळमायेचाही विवेकाने त्याग करावा व सार जो हरि निर्गुण ब्रह्म तेथे मिठी घालावी.मूळमायेच्या म्ह.उपासनेच्या म्ह.ज्ञानाच्या पलिकडे गगनसदृश घन-पातळ (सूक्ष्म) व कोमळ असे परब्रह्म आहे),हरिसंकल्प तीच मुळमाया म्ह.ईश्वर किंवा मूळप्रकृति,मूळप्रकृति ब्रह्मांडातला चौथा देह मानतात.देह हा नुसता आरोप आहे वास्तविक देह नाही हा ब्रह्मांडातला चौथा देह पिंडातील चौथा देह-ज्ञान किंवा महाकारण ह्यांच्याशी अनुरूप आहे अर्थात दोन्ही देह ज्ञानस्वरूप-संकल्परूप आहेत.त्या संकल्पाचा किंवा ज्ञानाचा विचार करणे हीच अर्थात उपासना,ज्ञानरूप (आहे) झाली म्हणुन सर्व संकल्प सोडून द्यावा-मूळंमायेचा (ज्ञानाचा) विवेकाने त्याग करावा व केवळ ब्रह्मरूप व्हावे.

पुढें परब्रह्म विशाळ । गगनासारिखें पोकळ । घन पातळ कोमळ । काये म्हणावें ॥ २१ ॥

( उपासना म्ह.ज्ञान म्ह. मुळमाया हिच्या) पुढे विस्तीर्ण परब्रह्म आहे. ते आकाशासारखे पोकळ आहे. ते घन-पोकळ,कोमळ,किंवा कसे हे काय सांगावे?

उपासना म्हणिजे ज्ञान । ज्ञानें पाविजे निरंजन । योगियांचें समाधान । येणें रितीं ॥ २२ ॥

उपासना म्हणजेच ज्ञान,त्या ज्ञानाने निरंजन निर्गुण परब्रह्म प्राप्त होते. योग्यांचे समाधान होते.(योगी तेथेच विश्राम पावतात)

विचार नेहटूनसा पाहे । तरी उपासना आपणचि आहे । येक जाये एक आहे । देह धरुनी ॥ २३ ॥

(जीव शिवस्वरूप आहे हे कळते व एक जातो व एक देव धरून (राहातो) म्ह.जीव जीवपणाने मावळतो.व शिवच केवळ राहतो.) (नेहटून म्ह.) चिकाटीने खोल विचार करून पाहावा म्ह.उपासना-उपास्य म्हटल्याची उपासना करावयाची तो आपणच आहोत (जीव शिवरूप आहे) हे कळते.एक गेला तर दुसरा देहाच्या ठिकाणी राहतो.(शिवस्वरुपाचा विसर पडला की देहभाव वाढतो,देहभावाचा विसर पडला की शिवरूप होतो.)

अखंड ऐसी घालमेली । पूर्वापार होत गेली । आतां हि तैसीच चालिली । उत्पत्ति स्थिती ॥ २४ ॥

(अशीच व्दैताची घालमेल नित्य चालली आहे,पूर्वापार चालली आहे.) अशी घडामोड पूर्वीपासून (अनादिकालापासून) होत आली आहे.आणि सध्याही उत्पत्ति स्थिति त्याच योगाने तशीच चालू आहे.

बनावरी बनचरांची सत्ता । जळावरी जळचरांची सत्ता । भूमंडळीं भूपाळां समस्तां । येणेंचि न्यायें ॥२५ ॥

असो (पूर्वी सांगितल्याप्रमाणे जगदीशाची सत्ता जशी जगावर चालू आहे) त्याचप्रमाणे अरण्यांवर (वनांवर) वन्य पशूंची सत्ता पाण्यावर (जळावर) जलचरांची (मत्स्यांची) सत्ता व पृथ्वीवर सर्व राजांची (मानवाची) सत्ता चालत आहे.

सामर्थ्य आहे चळवळेचें । जो जो करील तयाचें । परंतु येथें भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ २६ ॥

(वरच्या ओवीत सांगितल्याप्रमाणे पश्वादिकांना जसे आपापल्या ठिकाणी सत्ता गाजविण्याचे सामर्थ्य आहे त्याचप्रमाणे) जो जो उद्योग करील त्याला त्याला प्रत्येकाला सत्ता चालवण्याचे सामर्थ्य मिळविता येईल पण त्याने आपल्या ठिकाणी भगवंताचे अधिष्ठान मानले पाहिजे,(भावनेने विचाराने भगवंताशी एकरूप, झाले पाहिजे.) (चळवळीपासून सामर्थ्य प्राप्त होते जो जो चळवळ करील त्याला ते प्राप्त होईल पण त्याने आपल्या ठिकाणी भगवंताच्या सत्तेचे अधिष्ठान ठेवले पाहिजे.)

कर्ता जगदीश हें तों खरें । परी विभाग आला पृथकाकारें । तेथें अहंतेचें काविरें । बाधिजेना ॥ २७ ॥

( काविरें - वेड , बाधिजेना - बाधत नाही )

(मानले पाहिजे कशाचे?आहेच मुळी ते?) सर्वकर्ता जगदीश आहे पण अहंभावाने त्यांच्यापासून वेगळे झाल्याने कर्तुत्वाची वेगळी वांटणी प्रत्येक जिवाकडे आली तेव्हा ब-या किंवा वाईट कोणत्याही कामात अहंकाराची (काविरे,भूताटकीची) बाधा होऊ नये.(जगंनाथच कर्ता आहे हे खरे आहे पण त्याची सत्ता जीवमात्रांच्या ठिकाणी विभागली असून परमेश्वर त्यांच्याकडून कार्ये करवितो.)

हरिर्दाता हरिर्भोक्ता । ऐसें चालतें तत्वता । ये गोष्टीचा आतां । विचार पाहावा ॥ २८ ॥

म्हणुन वास्तविक हरीर्दाता,हरिर्भोक्ता म्हणजे दाता भोक्ता हरीच ह्या स्वरूपानेच सगळा व्यवहार चालला आहे हाच विचार नीट करावा. (हरीर्दाता,हरिर्भोक्ता म्हटल्याने अहंकाराची भूतबाधा होत नाही.)

सकळ कर्ता परमेश्वरु । आपला माइक विचारु । जैसें कळेल तैसें करूं । जगदांतरें ॥ २९ ॥

सर्वकर्ता परमेश्वरच आहे,आपण लटके आहोत (मी कोण करणार?) तो जगदांतरी नांदणारा परमात्मा जसे सुचवील (करवील) तसेच करू असा विचार करावा.

देवायेवढें चपळ नाहीं । ब्रह्मायेवढें निश्चळ नाहीं । पाइरी चढोन पाहीं । मूळपरियंत ॥ ३० ॥

देव म्हणजे अंतरात्मा,त्याच्याप्रमाणे चपळ कोणी नाही.तसेच परब्रह्मासारखे निश्र्चळ कोणी नाही.पायरीने पायरी चढत मूळापर्यंत पाहावे. (देवासारखे-अंतरात्म्यासारखे चपळ कार्यकर्ते कोण आहेत? ब्रह्मासारखे निश्र्चळ दुसरे कोण आहे? पायरीने पायरी चढत मूळापर्यंत जावे?)

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मानिरूपणनाम समास चौथा ॥**

## समास पांचवा : चत्वारजिन्नसनिरूपण

॥ श्रीराम ॥ येथून पाहातां तेथवरी । चत्वार जीनस अवधारीं । येक चौदा पांच च्यारी । ऐसें आहे ॥ १ ॥

( येक चौदा - मुळमायेची चौदा नावे - चैतन्य,गुणसाम्य,अर्धनारीनटेश्वर,षडगुणेश्वर,प्रकृतिपुरुष,शिवशक्ती ,शुद्धसत्व,गुणक्षोभिणी,सातवा,राज,तम,मन,माया,अंतरात्मा)

निश्र्चल परब्रह्मापासून पिंडापर्यंत पाहिले तर “एक चौदा पांच चारी” असे चार जिन्नस आहेत.एक म्ह.परब्रह्म (निश्र्चळ ब्रह्म) अव्यक्ताची चौदा नावे,पंचमहाभूते आणि चार खाणी असे चार जिन्नस (विभाग) आहेत.(चौदा म्ह. मूळमायेची चौदा रूपे किंवा नावे,चैतन्य,गुणसाम्य,अर्धनारीनटेश्वर, प्रकृतिपुरुष,शिवशक्ति,षडगुणेश्वर,महतत्व,गुणक्षोभिणी,सत्व-रज-तम हे त्रिगुण,मन,माया,जीव म्ह.अंतरात्मा पांच म्ह.पंचमहाभूते चार म्ह. चार खाणींचे जीव-असे हे चार जिन्नस आहेत.

परब्रह्म सकळांहून वेगळें । परब्रह्म सकळांहून आगळें । नाना कल्पनेनिराळें । परब्रह्म तें ॥ २ ॥

परब्रह्म सर्वाहून वेगळे (निराळे) सर्वात श्रेष्ठ आणि सर्व कल्पनातीत म्ह. निर्विकल्प एकीएक असे आहे.

परब्रह्माचा विचार । नाना कल्पनेहून पर । निर्मळ निश्चळ निर्विकार । अखंड आहे ॥ ३ ॥

परब्रह्माचा विचार अनेक कल्पनांच्या पलिकडला आहे,ते निर्मळ,निश्र्चल,नित्य,निर्विकार व अखंड आहे.

परब्रह्मास कांहींच तुळेना । हा येक मुख्य जिनसाना । दुसरा जिनस नाना कल्पना । मूळमाया ॥ ४ ॥

परब्रह्माला कोणतीच साम्यता (उपमा) देता येत नाही. हा एक मुख्य (जिन्नस) विभाग व अनंत कल्पनारूप माया हा दुसरा (जिन्नस) विभाग.

नाना सूक्ष्मरूप । सूक्ष्म आणी कर्दमरूप । मुळींच्या संकल्पाचा आरोप । मूळमाया ॥ ५ ॥

ती मुळमाया अनेक सूक्ष्मरूपात्मक व कर्दमरूप अशी आहे,मूळ परब्रह्माच्या ठिकाणी एकोऽहं बहुस्याम। हा संकल्परूप आरोप करण्यात येतो तीच मूळमाया (एकोऽहं बहुस्याम। हा जो,आदि संकल्प उठला ती मूळमाया)

हरिसंकल्प मुळींचा । आत्माराम सकळांचा । संकेत नामाभिधानाचा । येणें प्रकारें ॥ ६ ॥

मूळातील (मूळमाया म्ह.) हरिसंकल्प तोच सर्वांचा अंतरात्मा आहे.(सकलांचा अंतरात्मा तो.) त्याची ओळख पटण्यासाठी त्याला चौदा सांकेतिक नावे दिली आहेत. ती येणेप्रमाणे.

निश्चळीं चंचळ चेतलें । म्हणौनि चैतन्य बोलिलें । गुणसामानत्वें जालें । गुणसाम्य ऐसें ॥ ७ ॥

निश्र्चळाच्या ठिकाणी चंचळ घेतले ( जागृत झाले, स्फूरले.) म्हणुन त्याला (१) चैतन्य म्हणतात.त्याच्या ठिकाणी गुणांचे समानत्व आहे म्हणून त्याला (२) गुणसाम्य म्हणतात.

अर्धनारीनटेश्वर । तोचि शड्गुणैश्वर । प्रकृतिपुरुषाचा विचार । शिवशक्ती ॥ ८ ॥

(३) अर्धनारीनटेश्वर (४) षडगुणेश्वर (५) प्रकृतिपुरुष (६) शिवशक्ति तोच होय.

सुद्धसत्वगुणाची मांडणी । अर्धमात्रा गुणक्षोभिणी । पुढें तिही गुणांची करणी । प्रगट जाली ॥ ९ ॥

(७)शुद्ध सत्वरूप अर्धमात्रा (८) गुणक्षोभिणी पुढे (९) सत्व (१०) रज (११) तम हे तीन गुण प्रकट झाले (हे ही त्याचेच रूप)

मन माया अंतरात्मा । चौदा जिनसांची सीमा । विद्यमान ज्ञानात्मा । इतुके ठाइं ॥ १० ॥

(१२) मन (१३) माया (१४) अंतरात्मा (शिव) येथपर्यंत १४ नावे झाली.इतक्या म्हणजे चौदा ठिकाणी ज्ञानात्मा असतो.

ऐसा दुसरा जिनस । अभिधानें चतुर्दश । आतां तिसरा जिनस । पंचमाहाभूतें ॥ ११ ॥

हा चौदा नावांचा दुसरा विभाग झाला,ह्याच्या पुढे पंचमहाभूते हा तिसरा विभाग आहे.

येथें पाहातां जाणीव थोडी । आदिअंत हे रोकडी । खाणी निरोपिल्या तांतडी । तो चौथा जिनस ॥ १२ ॥

ह्या पंचमहाभूतांत आरंभापासून अखेरपर्यंत पाहिल्यास जाणीव थोडी आहे हे उघड आहे.(पंचभूतांमध्ये जाणीव थोडी असून त्यांना आद्यंत-उत्पत्ती व नाश आहे.) चार खाणी ज्या सांगितल्या तो चौथा विभाग,

च्यारी खाणी अनंत प्राणी । जाणीवेची जाली दाटणी । च्यारी जिनस येथूनी । संपूर्ण जाले ॥ १३ ॥

चार खाणीचे असंख्य प्राणी असून त्यांच्या ठिकाणी जाणीव भरलेली आहे येथे चार विभागांचे वर्णन समाप्त झाले.

बीज थोडें पेरिजेतें । पुढें त्याचें उदंड होतें । तैसें जालें आत्मयातें । खाणी वाणी प्रगटतां ॥ १४ ॥

थोडे बीज पेरले तरी त्याचे पुढे पुष्कळ फार मोठे पीक भरभरून येते त्याप्रमाणे एका (अंतरातम्यापासून) अंतरातम्यापासून चार खाणी,चार वाणीमधील (८४ लक्ष जीवयोनींचा अद्भुत विस्तार झाला) अनंत जीव प्रकट झाले.

ऐसी सत्ता प्रबळली । थोडे सत्तेचि उदंड जाली । मनुष्यवेषें सृष्टी भोगिली । नान प्रकारें ॥ १५ ॥

ह्याप्रमाणे आत्मारामाची (ईश्वरी) सत्ता बळावली मुळची थोडी सत्ता असता ती पुष्कळ वाढून मनुष्यवेषाने सृष्टीचा उपभोगही नानाप्रकारे घेत आहे.(ह्याप्रमाणे ईश्वरी सत्ता उगमापाशी थोडी असून तिचा विस्तार विश्र्वभर झाला आहे. व मनुष्यवेषाने तिने सृष्टीचा उपभोगही नाना प्रकारे घेतला आहे.)

प्राणी मारून स्वापद पळे । वरकड त्यास काये कळे । नाना भोग तो निवळे । मनुष्यदेहीं ॥ १६ ॥

सावजाला (हरिणीला) मारून (वाघ) श्र्वापद पाळून जाते,बाकीचे त्याला काय कळणार? अनेक भोग मनुष्य देहातच व्यवस्थितपणे घेता येतात.

नाना शब्द नाना स्पर्श । नाना रूप नाना रस । नाना गंध ते विशेष । नरदेह जाणे ॥ १७ ॥

अनेक शब्द,स्पर्श,रूप,रस,गंध ह्या पंच विषयातील अनेक प्रकार व त्यांचे विशेष नरदेहालाच कळतात.(पंच विषयांचा भोग नरदेहींच घडतो.)

अमोल्य रत्नें नाना वस्त्रें । नाना यानें नाना शस्त्रें । नाना विद्या कळा शास्त्रें । नरदेह जाणे ॥ १८ ॥

अमूल्य रत्ने,अनेक वस्त्रे (अमूल्य वस्त्रालंकार) अनेक वाहने व शस्त्रे,अनेक विद्या,कला,शास्त्रे ही सर्व नरदेहच जाणतो (नरदेहालाच कळतात)

पृथ्वी सत्तेनें व्यापिली । स्थळोस्थळीं आटोपिली । नाना विद्या कळा केली । नाना धारणा ॥ १९ ॥

अशा रीतीने ईश्र्वरी सत्तेने पृथ्वी व्यापलेली असून प्रत्येक स्थळी तीच (सत्ता) (आटोपिली) भरून राहिली आहे,अनेक विद्या,कला,धारणा त्या सत्तेवरच अवलंबून आहेत.
दृश्य अवघेंचि पाहावें । स्थानमान सा।म्भाळावें । सारासार विचारावें । नरदेहे जालियां ॥ २० ॥

नरदेह प्राप्त झाल्यावर सर्व दृश्य शोधून पाहावे.स्थान व मान (देशकालपरिस्थिती) सांभाळावे व सारासार विचार करावा.

येहलोक आणी परलोक । नाना प्रकारींचा विवेक । विवेक आणी अविवेक । मनुष्य जाणे ॥ २१ ॥

इहलोक व परलोक ह्या संबंधाचा अनेक प्रकारचा विचार,विवेक व अविवेक मनुष्यच जाणतो.

नाना पिंडीं ब्रह्मांडरचना । नाना मुळींची कल्पना । नाना प्रकारीं धारणा । मनुष्य जाणे ॥ २२ ॥

अनेक पिंडब्रह्मांडाची रचना,मूळमायेपासून झालेल्या अनेक (अनंत) कल्पना,अनेक प्रकारच्या धारणा.

अष्टभोग नवरस । नाना प्रकारींचा विळास । वाच्यांश लक्ष्यांश सारांश । मनुष्य जाणे ॥ २३ ॥

(अन्न-उदक,तांबूल,पुष्प,चंदन,बसन,वस्त्र,शय्या व अलंकार) हे अष्ट भोग (शृंगार,वीर,करण, रौद्र,बीभत्स, भयानक,अद्भुत,हास्य व शांत) हे नऊ रस,नानाविध विलास,वाच्यांश.लक्ष्यांश किंवा त्याचे तात्पर्य (सारांश) सर्व काही मनुष्य देहातच समजते.

मनुष्यें सकळांस आळिलें । त्या मनुष्यास देवें पाळिलें । ऐसें हें अवघें कळलें । नरदेहयोगें ॥ २४ ॥

मनुष्याने सर्व (आळिले) आकलन केले आहे.(सर्वांस आपल्या ताब्यात ठेवले आहे) अशा मनुष्याचे पालन देव करतो,असे हे सर्व नरदेहाच्या योगानेच होते.

नरदेह परम दुल्लभ । येणें घडे अलभ्य लाभ । दुल्लभ तें सुल्लभ । होत आहे ॥ २५ ॥

असा हा नरदेह अत्यंत दुर्लभ आहे.ह्याच्या योगाने अलभ्य लाभ होतात.दुर्लभ परब्रह्मसुद्धा सुलभ होऊन जाते.(दुर्लभ तेच सुलभ होते.)

बरकड देहे हें काबाड । नरदेह मोठें घबाड । परंतु पाहिजे जाड । विवेकरचना ॥ २६ ॥

बाकीचे देह फोल आहेत.(इतर देह काबाडकष्ट करणारे आहेत.) नरदेह हे मोठे घबाड (महालाभ,अपूर्व ठेवा.) आहे. पण (त्याचे सार्थक करण्याला) मोठा सूक्ष्म (व्यापक) विचार पाहिजे.

येथें जेणें आळस केला । तो सर्वस्वें बुडाला । देव नाहीं वोळखिला । विवेकबळें ॥ २७ ॥

ह्या नरदेहात येऊन ज्याने आळस केला व विवेकाच्या योगाने देवाची ओळख करून घेतली नाही तो सर्वस्वी नाश पावला म्हणून समजावे(येथे आळस केला व विवेकबळानें देव ओळखिला नाही तर सर्वस्वी नाश आहे.)

नर तोचि नारायेण । जरी प्रत्ययें करी श्रवण । मननशीळ अंतःकर्ण । सर्वकाळ ॥ २८ ॥

जर अनुभवपूर्वक (अनुभवाचे) श्रवण करील व सर्वकाळ अंतःकरणात त्याचे मनन करील तर तोच नारायण होतो.(सर्वकाळ प्रत्ययाचे श्रवण करील तर नर तोच नारायण होतो.)

जेणें स्वयेंचि पोहावें । त्यास कासेस नलगे लागावें । स्वतंत्रपणें शोधावें । सकळ कांहीं ॥ २९ ॥

( कासेस - परावलंबी )

ज्याला स्वतःच पोहोता येते त्याला दुसऱ्याच्या कासेस लागण्याचे कारण नाही,त्याने स्वतंत्रपणे सगळ्याचा शोध करावा (त्याने स्वतंत्र बुद्धीने स्वये शोध घ्यावा )

सकळ शोधून राहिला । संदेह कैचा तयाला । पुढें विचार कैसा जाला । त्याचा तोचि जाणे ‖ ३० ‖

सगळ्याचा शोध घेऊन स्वस्वरुपी जाऊन राहिला (स्वरूपी जागेवर ठरला) मग त्याला संदेह कोठून उरणार? पुढे प्रकार काय होतो ते ज्याचे त्यालाच माहीत.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे चत्वारजिनसनाम समास पांचवा ‖**

**समास सहावा : आत्मागुणनिरूपण‖ श्रीराम ‖**

पाहों जातां भूमंडळ । ठाईं ठाईं आहे जळ । कित्तेक तें निर्मळ माळ । जळेंविण पृथ्वी ‖ १ ‖

पृथ्वीवर पहिले तर जागोगाग पाणी आहे (ह्या भूमंडळाचा विचार मनात आणता ठिकठिकाणी जल-वापी-कूप-तडागादिकातून भरलेले आढळते.) पण कित्येक माळराने अशी कोरडी ठणठणीत आहेत की तेथे पाण्याचा थेंब दिसत नाही.

तैसें दृश्य विस्तारलें । कांहींयेक जाणिवेनें शोभलें । जाणीवरहित उरलें । कीतीयेक दृश्य ‖ २ ‖

त्याप्रमाणेच ह्या दृश्याचा (बाह्यसृष्टीचा विचार करता) जो विस्तार झाला आहे,त्यात कित्येकांना जाणीवेचा अभाव दिसतो.

च्यारी खाणी च्यारी वाणी । चौर्यासी लक्ष जीवयोनी । शास्त्रीं अवघें नेमुनी । बोलिलें असे ‖ ३ ‖

चार खाणी,चारवाणी व चौ-यांशीलक्ष जीवयोनि (मिळून अनंत प्राणी कमीजास्त जाणीवेने वर्तत आहेत.) ह्या सा-यांची गणना शास्त्रात सांगितली आहे.

**श्लोक ‖ जलजा नवलक्षाश्च दशलक्षाश्च पक्षिणः । कृमयो रुद्रलक्षाश्च विंशल्लक्षा गवादयः ‖ स्थावरा स्त्रिंशल्लक्षाश्च चतुर्लक्षाश्च मानवाः । पापपुण्यं समं कृत्वा नरयोनिषु जायते ‖**

मनुष्यें च्यारी लक्ष । पशु वीस लक्ष । क्रिम आक्रा लक्ष । बोलिलें शास्त्रीं ‖ ४ ‖ दाहा लक्ष ते खेचर । नव लक्ष जळचर । तीस लक्ष स्थावर । बोलिलें शास्त्रीं ‖ ५ ‖

चारलक्ष मानव,वीस लक्ष पशु, अकरा लक्ष किडे (कृमीकीटक),खेचरे,(पक्षी) दहा लक्ष,नऊ लक्ष जलचर व तीस लक्ष स्थावर आहेत अशी संख्या शास्त्रात सांगितली आहे.

ऐसी चौर्यासी लक्ष योनी । जितुका तितुका जाणता प्राणी । अनंत देहयाची मांडणी ।मर्यादा कैंची‖६‖

अशा चौ-यांशी लक्ष योनि आहेत. तेवढा म्हणून प्राणी आहे त्याच्या ठिकाणी जाणीव आहे. देहरचनेचे अनंत प्रकार आहेत त्यांना मर्यादाच नाही.(ह्या चौ-यांशीलक्ष जीवयोनीतील प्राणी जाणीवेने वर्तत आहेत.त्यांचे देहही विविध प्रकारचे आहेत.)

अनंत प्राणी होत जाती । त्यांचें अधिष्ठान जगती । जगतीवेगळी स्थिती । त्यास कैंची ॥ ७ ॥

असंख्य प्राणी होतात व जातात पण त्यांना आधार म्हणजे केवळ पृथ्वीच आहे.पृथ्वीवाचून त्यांचे अस्तित्व कसे राहील? (पृथ्वीवाचून त्यांना आधार नाही.)

पुढें पाहातां पंचभूतें । पावलीं पष्टदशेतें । कोणी विद्यमान कोणी तें । उगीच असती ॥ ८ ॥

( उगीच - गुप्त )

पुढे विचार केला तर पंचभूते व्यक्त झालेली दिसतात (व्यक्त दशेला आली आहेत) त्यात कोणी (पृथ्वी,आप,तेज) प्रकट (व्यक्त) असतात.व कोणी (वायु आणि आकाश) गुप्त (अव्यक्त) असतात.

अंतरात्म्याची वोळखण । तेचि जेथें चपळपण । जाणीवेचें अधिष्ठान । सावध ऐका ॥ ९ ॥

चपळपण जेथे आहे तेथे अंतरात्मा आहे ही त्याची खूण समजावी.अधिष्ठानरूप जाणीवेचे लक्षण सावधपणे ऐका.

सुखदुख जाणता जीव । तैसाचि जाणावा सद शिव । अंतःकर्णपंचक अपूर्व । अंश आत्मयाचा ॥ १० ॥

(आत्माराम ज्या अनेक रूपांनी नटला आहे ते सर्व त्याचे गुण आहेत. कसे ते पुढे सविस्तर सांगितले आहे.) सुख,दु:ख असे जीव जाणतो. त्याप्रमाणे शिवही नित्य जाणतो ह्या दोन्ही ठिकाणी जाणीवरूप जे अपूर्व अंतःकरणपंचक आहे तो आत्म्याचा (जाणीवेचा) अंश होय. (सुख दु:ख जाणणे हा जीवाचा व शिवाचा गुण आहे.)

स्थुळीं आकाशाचे गुण । अंश आत्मयाचे जाण । सत्व रज तमोगुण । गुण आत्मयाचे ॥ ११ ॥ नाना चाळणा नाना धृती । नवविधा भक्ति चतुर्विधा मुक्ती । अलिप्तपण सहजस्थिती । गुण आत्मयाचे ॥ १२ ॥ द्रष्टा साक्षी ज्ञानघन । सत्ता चैतन्य पुरातन । श्रवण मनन विवरण । गुण आत्मयाचे ॥ १३ ॥

( धृती -  धैर्य )

(अंतःकरणपंचक) स्थूल देहाच्या ठिकाणचे आकाशचे गुण (अंश) आहेत.तसेच सत्व,रज व तम हे तीन गुण,अनेक चाळणा व धृति,नवविधा भक्ति व चर्तुविधा (चार प्रकारच्या) मुक्ति,अलिप्तपणा,

सहजस्थिती, दृष्टा,साक्षी,ज्ञानघन,सत्ता (सद्रूप) ,चैतन्य,चिद्रूप,पुरातन,श्रवणमनन-विवरण हे सर्व आत्म्याचे गुण आहेत.

दृश्य द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता ध्यान । ज्ञेय ज्ञाता ज्ञान । गुण आत्मयाचे ॥ १४ ॥

दृश्य,द्रष्टा,दर्शन,ध्येय,ध्याता,ध्यान,ज्ञेय,ज्ञाता,ज्ञान,हे आत्म्याचे गुण होत.

वेदशास्त्रपुराणार्थ । गुप्त चालिला परमार्थ । सर्वज्ञपणें समर्थ । गुण आत्मयाचे ॥ १५ ॥

वेद-शास्त्र,पुराणचर्चा किवा गुप्तपणे चाललेला परमार्थ,सर्वज्ञपणाचे सर्व सामर्थ्य (आत्मारामाचे आहे) हे आत्म्याचे गुण आहेत.

बद्ध मुमुक्षु साधक सिद्ध । विचार पाहाणें शुद्ध । बोध आणी प्रबोध । गुण आत्मयाचे ॥ १६ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति तुर्या । प्रकृतिपुरुष मूळमाया । पिंड ब्रह्मांड अष्टकाया । गुण आत्मयाचे ॥ १७ ॥

बद्ध,मुमुक्षु,साधक व सिद्ध हे चार प्रकारचे जींव,शुद्ध विचार करणे,बोध व प्रबोध,जागृति,स्वप्न,सुषुप्ति व तुर्या हया चार अवस्था,प्रकृति-पुरुष,,मूळमाया,पिंड-ब्रह्मांड व त्याचे आठ  देह हे आत्म्याचे गुण आहेत.

परमात्मा आणि परमेश्वरी । जगदात्मा आणीई जगदेश्वरी ।महेश आणी माहेश्वरी ।गुण आत्मयाचे ॥१८॥

परमात्मा,जगदात्मा व महेश आणि परमेश्र्वरी,जगदेश्र्वरी व माहेश्र्वरी (मूळमाया) हे सर्व आत्म्याचे गुण होत.

सूक्ष्म जितुकें नामरूप । तितुकें आत्मयाचें स्वरूप । संकेतनामाभिधानें अमूप । सीमा नाहीं ॥ १९ ॥

जे जे म्हणून सूक्ष्मनामधारक आहे ते ते आत्म्याचे स्वरूप होय. त्याची सांकेतिक नावे इतकी आहेत की त्याला मर्यादा नाही.

आदिशक्ती शिवशक्ती । मुख्य मूळमाया सर्वशक्ती । नाना जीनस उत्पती स्थिती । तितुके गुण आत्मयाचे ॥२०॥ पूर्वपक्ष आणी सिद्धांत ।गाणें वाजवणें संगीत ।नाना विद्या अद्भुत ।गुण आत्मयाचे ॥२१॥ज्ञान अज्ञान विपरीतज्ञान ।असद्वृति सद्वृति जाण ।ज्ञेप्तिमात्र अलिप्तपण । गुण आत्मयाचे॥२२॥

आदिशक्ति,शिवशक्ति,मुख्य मूळमाया सर्वशक्ती, उत्पत्ति-स्थित्यादि तिचे अनेक प्रकार,पूर्वपक्ष व सिद्धांत, गाणे,वाजविणे व संगीतशास्त्र,अनेक विद्या,ज्ञान,अज्ञान,विपरीत,ज्ञान,असद्वृत्ति,सदवृत्ति,ज्ञप्तिमात्र व अलिप्तपणा हे सर्व आत्म्याचे गुण आहेत.

पिंड ब्रह्मांड तत्वझाडा । नाना तत्वांचा निवाडा । विचार पाहाणें उघडा । गुण आत्मयाचे ॥ २३ ॥ नाना ध्यानें अनुसंधानें । नाना स्थिति नाना ज्ञानें । अनन्य आत्मनिवेदनें । गुण आत्मयाचे ॥ २४ ॥ तेतीस

कोटी सुरवर । आठ्यासी सहश्र ऋषेश्वर । भूत खेचर अपार । गुण आत्मयाचे ॥ २५ ॥ भूतावळी औट कोटी । च्यामुंडा छपन्न कोटी । कात्यायेणी नव कोटी । गुण आत्मयाचे ॥ २६ ॥

पिंड-ब्रह्मांडातील तत्वांचा शोध करणे,अनेक तत्वांचा निर्णय करणे,उघडा (सरळ) विचार करणे.अनेक प्रकारची ध्याने,अनुसंधाने,अनेक अवस्था,अनेक ज्ञाने, आत्मनिवेदनाने अनन्य (अन्वय) होणे. तेहतीस कोटि देव, अठ्यैशीहजार ऋषि,प्राणी,असंख्य खेचर (आकाशात फिरणारे पक्षी) साडेतीन कोटि भूतावळी,छप्पन कोटि,चामुंडा,नंऊकोटि कात्यायनी हे सर्व आत्म्याचे गुण होत.

चंद्र सूर्य तारामंडळें । नाना नक्षत्रें ग्रहमंडळें । शेष कूर्म मेघमंडळें । गुण आत्मयाचे ॥ २७ ॥ देव दानव मानव । नाना प्रकारीचे जीव । पाहातां सकळ भावाभाव । गुण आत्मयाचे ॥ २८ ॥

चंद्र,सूर्य,अनेक तारे,नक्षत्रे व ग्रह ह्यांची मंडळे,शेष,कूर्म,मेघमंडळे,देव,दानव,मानव,अनेक प्रकारचे जीव,सर्व प्रकारचे भाव व अभाव हे सर्व आत्म्याचे (आत्मारामाचे) गुण होत.

आत्मयाचे नाना गुण । ब्रह्म निर्विकार निर्गुण । जाणणें येकदेसी पूर्ण । गुण आत्मयाचे ॥ २९ ॥

ब्रह्म निराकार व निर्गुण असून आत्मा बहुगुणी (बहुरूपी) आहे.एकदेशी किवा पूर्णपणे जाणणे हा ही आत्म्याचा गुण आहे, (एकदेशी व पूर्ण आत्माच आहे.)

आत्मरामौपासना । तेणें पावले निरंजना । निसंदेहे अनुष्ठना । ठावचि नाहीं ॥ ३० ॥

(हे जाणणे ही आत्मारामाची उपासना आहे, तेणेकरून निर्गुणपद मिळते.) ह्यात आत्मारामाची उपासना करून निरंजन परब्रह्माच्या ठिकाणी नि:संदेहपणे अनेक लोक पोहोचले आहेत,ह्यात शंका घेण्याला मुळीच जागा नाही.

**(जलजा नवलक्षाश्र्च दशलक्षाश्र्च पक्षिन:। कृमयो रुद्रलक्षाश्र्च विशल्लक्षा गावदय:। स्थावराखिशल्लक्षाश्र्च चातुर्लक्षाश्र्च मानवा: । पापपुण्यं समं कृत्वा नारयोनिषु जायते ।।)**

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मागुणनिरूपणनाम समास सहावा ॥**

## समास सातवा : आत्मानिरूपण॥ श्रीराम ॥

अनुर्वाच्य समाधान जालें । तें पाहिजे बोलिलें । बोलिल्यासाठीं समाधान गेलें । हें तों घडेना ॥ १ ॥

अनिर्वाच्य समाधान झाले तरी शब्दाने सांगितले पाहिजे,नि:षब्दाचे समाधान शब्दांनी सांगितले म्हणून समाधान काही ढळत नाही (ते नाहीसे होते असे नाही) (मग सांगण्याने काय बिघडणार?)

कांहीं सांडावें लागत नाहीं । कांहीं मांडावें लागत नाहीं । येक विचार शोधून पाहीं । म्हणिजे कळे ॥ २ ॥

काही टाकावे (मोडावे) लागत नाही,काही घ्यावे (जोडावे) लागत नाही,एक विचार शोधून पहिला म्हणजे सर्व कळते.

मुख्य कासीविश्वेश्वर । श्वेतबंद रामेश्वर । मलकार्जुन भीमाशंकर । गुण आत्मयाचे ॥ ३ ॥जैसीं मुख्य बारा लिंगें । यावेगळीं अनंत लिंगें । प्रचित जाणिजेत जगें । गुण आत्मयाचे ॥ ४ ॥भूमंडळीं अनंत शक्ति । नाना साक्षात्कार चमत्कार होती । नाना देवांच्या सामर्थ्यमूर्ती । गुण आत्मयाचे ॥ ५ ॥ नाना सिद्धांचीं सामर्थ्यें । नाना मंत्रांचीं सामर्थ्यें । नानामोहरेवल्लींत सामर्थ्यें । गुण आत्मयाचे ॥ ६ ॥ नाना तीर्थांचीं सामर्थ्यें । नाना क्षेत्रांचीं सामर्थ्यें । नाना भूमंडळीं सामर्थ्यें । गुण आत्मयाचे ॥ ७ ॥

( श्वेतबंद - सेतुबंद , नानामोहरेवल्लींत - ओषधी वनस्पतींचा मणी )

मुख्य काशीविश्वेश्वर, (श्वेत) सेतुबंध रामेश्वर,मल्लिकार्जुन,भीमाशंकर इ.अशी मुख्य बारा ज्योतिर्लिंगे ,ह्याशिवाय ज्याची प्रचीती (लोकांना) जगाला माहीत आहे,अशी असंख्य लिंगे,त्यांचे अनेक साक्षात्कार-चमत्कार होतात.अशा पृथ्वीवरील असंख्य शक्ति,अनेक देवतांच्या सामर्थ्यवान मूर्ति आणि अनेक सिद्धपुरुष,अनेक मंत्र,अनेक मोहरे व वनस्पति अनेक तीर्थक्षेत्रे ह्यांच्या ठिकाणची सामर्थ्ये,तसेच जगामधील अनेक प्रकारची सामर्थ्ये हे सर्व आत्म्याचे (आत्मारामाचेच) गुण होत.

जितुके कांहीं उत्तम गुण । तितुकें आत्मयाचें लक्षण । बरें वाईट तितुकें जाण । आत्म्याचकरितां ॥ ८ ॥

जेवढे म्हणून उत्तम गुण आहेत ते सर्व आत्म्याचे स्वरूप होय,(उत्तम गुण सर्व आत्मारामाचे) बरे वाईट जे काही होते (व जाते) ते सर्व आत्म्यामुळेच होय.

शुद्ध आत्मा उत्तम गुणी । सबळ आत्मा अवलक्षणी । बरी वाईट आवघी करणी । आत्मयाची ॥ ९ ॥

( शुद्ध -संतसज्जन, सबळ - दुष्टांचा )

(साधुसंतांच्या ठिकाणचा)शुद्ध आत्मा सद्गुणी (उत्तम गुणी)असतो व (पामराच्या ठिकाणचा आत्मा) शबल (विकारयुक्त मिश्र),दुर्गुणी (अवलक्षणी) जाणावा,बरी वाईट सर्व करणी आत्म्याची होय.

नाना साभिमान धरणें । नाना प्रतिसृष्टी करणें । नाना श्रापौश्रापलक्षणें आत्मयाचेनी ॥ १० ॥

अनेक प्रकारचे अभिमान धरणे अथवा प्रतिसृष्टि निर्माण करणे किवा शाप-उ:श्याप देणे ते आत्म्यामुळेच होते.(हे आत्म्याचे गुण होत)

पिंडाचा बरा शोध घ्यावा । तत्वांचा पिंड शोधावा । तत्वें शोधितां पिंड आघवा । कळों येतो ॥ ११ ॥

पिंडाचा शोध (पंचीकरण समजून) घ्यावा,पिंडातील तत्वे शोधावीत तत्वांचा शोध घेतला म्हणजे पिंडाचे सर्व ज्ञान होते.

जड देह भूतांचा । चंचळ गुण आत्मयाचा । निश्चळ ब्रह्मावेगळा ठाव कैचा । जेथें तेथें ॥ १२ ॥

जड देह पंचभूतांचा आहे व चंचळपणा हा आत्म्याचा गुण आहे पण कोठेही पाहिले तरी निश्र्चळ ब्रह्माशिवाय ठिकाण नाही (निश्र्चळ ब्रह्माचा व्यापकपणा अबाधित आहे.)

निश्चळ चंचळ आणी जड । पिंडीं करावा निवाड । प्रत्ययवेगळें जाड । बोलणें नाहीं ॥ १३ ॥

निश्र्चल ब्रह्म, चंचल आत्मा व जड देह ह्यांचा निर्णय (निवाडा) पिंडात म्ह.ह्या नरदेहात असतानाच करावा.अनुभवावाचून भाषणाला महत्व येत नाही (अनुभवाच्या भाषणाइतके वजनदारीचे भाषण दुसरे नाही.)

पिंडामधून आत्मा जातो । तेव्हां निवाडा कळों येतो । देहे जड हा पडतो । देखतदेखतां ॥ १४ ॥

पिंडातून आत्मा निघून जातो तेव्हा (पिंडाहून आत्मा वेगळा आहे हा निर्णय कळून येतो.देह जड असल्यामुळे तो पाहता पाहता (प्रेतरुप) पडतो.

जड तितुकें पडिलें । चंचळ तितुकें निघोनी गेलें । जडचंचळाचें रूप आलें । प्रत्ययासी ॥ १५ ॥

जड ते पडले,चंचळ होते ते निघून गेले (जड राहते,चंचल निघून जाते) ह्यात जड चंचळाच्या स्वरुपाचा अनुभव आला.

निश्चळ आहे सकळां ठाईं । हें तों पाहाणें नलगे कांहीं । गुणविकार तेथें नाहीं । निश्चळासी ॥ १६ ॥

आता निश्र्चळ परब्रह्म सर्व ठिकाणी आहेच हे काही शोधायला नको आहे.निश्र्चल परब्रह्माला चंचळ आत्म्यासारखे गुणविकार नाहीत.

जैसें पिंड तैसें ब्रह्मांड । विचार दिसतो उघड । जड चंचळ जातां जाड । परब्रह्मचि आहे ॥ १७ ॥

जो विचार पिंडाचा तोच ब्रह्मांडाचा त्यात जडचंचळ गेले (जडचंचळाचा निवाडा असाच झाला.) म्हणजे घनदाट एक परब्रह्म आहे.

माहांभूतांचा खंबीर केला । आत्मा घालून पुतळा जाला । चालिला सृष्टीचा गल्बला । येणें रितीं ॥ १८ ॥

पंचमहाभूतांचा पिंजरा (मूस) अशा (खंबीर) देहात आत्मा घालून,पुतळा (जीव) तयार झाला,अशा रीतीने सृष्टीची घडामोड-सृष्टीचा कारभार चालला आहे.

आत्मा माया विकार करी । आळ घालिती ब्रह्मावरी । प्रत्ययें सकळ कांहीं विवरी । तोचि भला ॥ १९ ॥

मायेचे सर्व विकार आत्मा करतो. (आत्म्यामुळे प्रकट दिसतात) पण त्यांचा (आत्म्याच्या विकारांचा आळ ब्रह्मावर घालतात.) अनुभवाने सर्व गोष्टींचे विवरण करील तोच शाहाणा (प्रत्ययाने सर्व विवरतो तोच भला)

ब्रह्म व्यापक अखंड । वरकड व्यापकता खंड । शोधून पाहातं जड । कांहींच नाहीं ॥ २० ॥

( शोधून पाहातं जड - शोध घेता दुर्बोध असे काही नाही )

ब्रह्माची व्यापकता अखंड आहे व इतरांची व्यापकता खंडित आहे.शोधून पाहिले म्हणजे न समजण्यासारखे त्यात कठिण काहींच नाही.

गगनासी खंडता नये । गगनाचें नासेल काये । जरी जाला माहांप्रळये । सृष्टीसंव्हार ॥ २१ ॥

तसेच आकाशाला खंडितपणा येत नाही, महाप्रलयाने जरी सर्वसृष्टीचा प्रळय (सृष्टी संहार) झाला तरी आकाशाचे काय नाश पावणार आहे.?

जें संव्हारामध्यें सापडले । तें सहजचि नासिवंत जालें । जाणते लोकीं उगविलें । पाहिजे कोडें ॥ २२ ॥

जे संहारात सापडून नाश पावते ते उघडच नाशवंत आहे. जाणत्या लोकांनी हे कोडे उकलले (उमगले) पाहिजे.

न कळतां वाटे कोडें । कळतां आवघें दिसें उघडें । म्हणोनी येकांतीं निवाडे । विचार पाहावा ॥ २३ ॥

कळत नाही म्हणून अवघड (कोडे) वाटते,कळल्यावर सगळे उघड दिसू लागते.म्हणून एकांतात विचार करून निर्णय पाहावा,निश्र्चय करावा,म्हणजे सर्व काही उकलते.

मिळता प्रत्ययाचे संत । येकांपरीस येकांत । केली पाहिजे सावचित । नाना चर्चा ॥ २४ ॥

स्वानुभवी संत मिळाले म्हणजे त्यांचा जो संवाद होतो तोच एकांतापुरता एकांत म्हणजे खरा एकांत प्रसंग होय.त्यांच्यापाशी सावधपणाने अनेक प्रकारची चर्चा करून निवाडा करावा.

पाहिल्यावेगळें कळत नाहीं । कळतां कळतां संदेह नाहीं । विवेक पाहातां कोठेंचि नाहीं । मायाजाळ॥२५ ॥

विचार केल्याशिवाय काही कळत नाही व जसजसे कळत जाते तसतसा संदेह नाहीसा होतो.विवेकाने पहिले म्हणजे मायाजाळ कोठेच दिसत नाही (-दृष्टीसमोर ठरत नाही)

गगनीं आभाळ आलें । मागुती सर्वेचि उडालें । आत्म्याकरितां दृश्य जालें । उडेल तैसें ॥ २६ ॥

आकाशात आभाळ येते ते लगेच पुन्हा उडून जाते,नाहीसे होते,त्याप्रमाणे आत्मसत्तेमुळे नामारुपाला आलेले दृश्य (निश्चलाच्या निश्चयापुढे ) उडून जाते -टिकत नाही.

मुळापासून सेवटवरी । विवेकी विवेकें विवरी । तोचि निश्चय थावरी । चळेना ऐसा ॥ २७ ॥

मूळमायेपासून शेवटपर्यंत विवेकपूर्वक विवरण करून पाहील त्याच विवेकी पुरुषाचा निश्चय स्थिर होईल कधीही ढळणार नाही.

वरकड निश्चय अनुमानाचे । अनुमानें बोलतां काये वेंचे । जाणते पुरुष प्रचितीचे । ते तों मानीतना॥२८॥

(ह्या निश्चळ परब्रह्माच्या निश्चयावाचून) इतर निश्चय अनुमानिक होत.अनुमानाने वाटेल ते बोलायला काय खर्च होते? (ते बोलणारे बोलत राहतात) पण स्वानुभवी जाणत्या पुरुषांना ते मान्य होत नाही.

उगेंच बोलणें अनुमानाचें । अनुमानाचें कोण्या कामाचें । येथें सगट विचाराचें । काम नाहीं ॥ २९ ॥

अनुमानाचे बोलणे फुकट होय त्याचा उपयोग काय? भरमसाठ विचारांचे येथे काम नाही.

सगट विचार तो अविचार । कित्येक म्हणती येकंकार । येकंकार भ्रष्टाकार । करूं नये ॥ ३० ॥

असला विचार तो अविचार होय.त्याला काही लोक एकंकार (सर्वत्र एकरूप) असे म्हणतात,पण असला एकंकार हा भ्रष्टाचार होय. तो कधीही करू नये.

कृत्रिम अवघें सांडावें । कांहीं येक शुद्ध घ्यावें । जाणजाणों निवडावें । सारासार ॥ ३१ ॥

सर्व कृत्रिम (खोटे) टाकून एक शुद्ध निश्चळ (परब्रह्म) सारासाराचा पुनः पुन्हा विचार करून घ्यावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे आत्मानिरूपणनाम समास सतवा ॥**

**समास आठवा : देहेक्षेत्रनिरूपण॥ श्रीराम ॥**

विधीप्रपंचतरु वाढला । वाढतां वाढतां विस्तीर्ण जाला । फळें येतां विश्रांती पावला । बहुत गुणी ॥ १ ॥

( विधीप्रपंचतरु - ब्रह्मदेवाचा सकाळ प्राणीमात्रयुक्त प्रपंचवृक्ष ,विश्र्व जगत )

ब्रह्मदेवाचा हा प्रपंच (संसार) वृक्ष (विश्र्व) वाढू लागला,वाढता वाढता खूप पसरला,नंतर त्यास फळे आली (ती चाखून बहुत प्राणी विश्रांति पावले),तेव्हा त्यामुळे अनेक प्राण्यांना विश्रांति मिळाली.

नाना फळें रसाळें लागलीं । नाना जिनसी गोडीस आलीं । गोडी पाहावया निर्माण केलीं ।नाना शरीरें ॥२॥

अनेक रसाळ फळे (विषय व इंद्रिये ह्यांच्या संयोगापासून होणारी सुखे) त्या वृक्षाला लागली.त्या फळात अनेक प्रकारची गोडी उत्पन्न झाली व ति गोडी पाहण्यासाठी ब्रह्मदेवाने शरीरे उत्पन्न केली.

निर्माण जाले उत्तम विषये । शरीरेंविण भोगितां नये । म्हणोनी निर्मिला उपाये । नाना शरीरें ॥ ३ ॥

उत्तम विषय उत्पन्न झाले तरी त्यांचा उपभोग शरीरावाचून घेता येत नाही,त्यासाठी ब्रह्मदेवाने ही युक्ति योजली म्हणजे अनेक शरीरे उत्पन्न केली.

ज्ञानेंद्रियें निर्माण केलीं । भिन्न भिन्न गुणांचीं निर्मिलीं । येका शरीरासी लागलीं । परी वेगळालीं ॥ ४ ॥

त्याने पांच ज्ञान-इंद्रिये उत्पन्न करून त्यात निरनिराळे गुण घातले ती एकच शरीरात आहेत पण वेगवेगळी आहेत.

श्रोत्रैंद्रिंई शब्द पडिला । त्याचा भेद पाहिजे कळला । ऐसा उपाये निर्माण केला । इंद्रियांमधें ॥ ५ ॥

कर्णेद्रियात जो शब्द पडेल त्याचा भेद कळावा अशा प्रकारची युक्ति त्या इन्द्रियात करून ठेविली आहे.

त्वचेइंद्रियें सीतोष्ण भासे । चक्षुइंद्रियें सकळ दिसे । इंद्रियांमधें गुण ऐसे । वेगळाले ॥ ६ ॥

त्वचेच्या इंद्रियाला शीत व उष्ण भासते.चक्षु-इंद्रियाला (डोळ्याला) सर्व दिसते.असे त्या इंद्रियामध्ये वेगवेगळे भेद आहेत.

जिव्हेमधें रस चाखणें । घ्राणामधें परिमळ घेणें । इंद्रियांमधें वेगळाल्या गुणें । भेद केले ॥ ७ ॥

जिव्हेला रस चाखणे व नाकाला (सु) वास घेणे असे विषय देऊन ह्या विषयाच्या योगाने इंद्रीयामध्ये वेगवेगळे भेद केले.(ह्याप्रमाणे वेगवेगळ्या विषयांना वेगवेगळे विषय देऊन पंचज्ञानेद्रिये भिन्न केली.)

वायोपंचकीं अंतःकर्णपंचक । मिसळोनि फिरे निशंक । ज्ञानैंद्रियें कर्मैंद्रियें सकळिक । सावकास पाहे ॥ ८ ॥

वायूपंचक म्हणजे प्राणादि (प्राण,अपान,उदान,समान आणि व्यान हे ) पंचप्राण ह्यांच्याशी अंतःकरणे (आकाश),पंचक (म्ह.चित्त अहंकार,बुद्धि,मन आणि अंतःकरण) मिसळून ते नि:शंक फिरत ठेवले व त्याला ज्ञानेद्रिये व कर्मेंद्रिये सर्व खुशाल पाहता येतील असे केले.

कर्मैंद्रियें लागवेगीं । जीव भोगीं विषयांलागीं । ऐसा हा उपाये जगीं । ईश्वरें केला ॥ ९ ॥

कर्मेंद्रियांच्या योगाने जीव हा विषयांचा उपभोग तत्काळ घेऊ शकतो असा उपाय ब्रह्मदेवाने जगामध्ये करून ठेवला आहे.

निषय निर्माण जाले बरवे । शरीरेंविण कैसें भोगावे । नाना शरीराचे गोवे । याकारणें ॥ १० ॥

विषय जरी चांगले उत्पन्न झाले तरी ते शरीरावाचून कसे उपभोगता येतील? म्हणून अनेक शरीरांचा खटाटोप केला.(नाना शरीरे निर्माण केली)

अस्तीमांशाचे शरीर । त्यामधें गुणप्रकार । शरीरासारिखें यंत्र । आणीक नाहीं ॥ ११ ॥

हाडामासांचे हे शरीर पण त्यात ह्या त्रिगुणाचे निरनिराळे प्रकार केले आहेत.(पण त्यात सत्व,रज,तम हे तीन गुण घातले.) खरोखर शरीरासारखे दुसरे यंत्र नाही.

ऐसीं शरीरें निर्माण केलीं । विषयभोगें वाढविलीं । लाहानथोर निर्माण जालीं । येणें प्रकारें ॥ १२ ॥

अशी शरीरे निर्माण करून ती विषयभोगाने वाढविली,लहानथोर शरीरे ह्याचप्रमाणे उत्पन्न केली आहेत.(शरीरे लहान मोठी अनंत आहेत.)

अस्तीमांशांचीं शरीरें । निर्माण केली जगदेश्वरें । विवेकें गुणविचारें । करूनियां ॥ १३ ॥

जगदीश्र्वराने त्रिगुणादिकांचा निट मोठ्या विवेकाने विचार करून ही हाडामासाची शरीरे निर्माण केली.

अस्तिमौंशाचा पुतळा । जेणें ज्ञानें सकळ कळा । शरीरभेद वेगळा । ठाईं ठाईं ॥ १४ ॥

हाडामासाचा हा पुतळा पण ज्ञानाच्या योगाने सकलकलाप्रवीण झाला आहे. तथापि जागोजाग शरीराचे भेद निरनिराळे आहेतच,(ठिकठिकाणी निरनिराळ्या प्रकारची शरीरे झाली आहेत.)

तो भेद कार्याकारण । त्याचा उदंड आहे गुण । सकळ तीक्ष्ण बुद्धीविण । काये कळे ॥ १५ ॥

तो भेदही कार्यापुरताच जरूर तेवढा आहे,तरी त्याचे गुण (कार्य,परिणाम) अनेक आहेत, सूक्ष्मबुद्धीवाचून हे सर्व कसे कळेल?

सकळ करणें ईश्वराला । म्हणोनी भेद निर्माण जाला । ऊर्धमुख होतां भेदाला । ठाव कैंचा ॥ १६ ॥

ईश्वरालाच (मूळमायेलाच) सर्व करावे लागते म्हणून त्याने (विविधता) हा भेद उत्पन्न केला आहे. परंतु ब्रह्माकडे दृष्टि वळल्यास मग भेदाला जागा कोठे आहे? (बाकी ऊर्ध्वमुख होता-ब्रह्माकडे पाहता-भेदाला जागाच कोठे आहे?( बाकी ऊर्ध्वमुख होता-ब्रह्माकडे पाहता-भेदाला जागाच कोठे आहे?भेद-मायेत आहेत ब्रह्मांत नाहीत.)

सृष्टिकर्णीं आगत्य भेद । संव्हारें सहजचि अभेद । भेद अभेद हा संवाद । मायागुणें ॥ १७ ॥

सृष्टि उत्पन्न करण्यासाठी ही विविधता जरूर लागते,पण तिचा संहार होतेवेळी सर्व भेद आपोआपच लयास जातात,भेद व अभेद हे बोलणेसुद्धा मायेमुळेच होते.(सृष्टीच्या उत्पत्ती कार्यात सर्व भेद होतात,पण संहारात सर्व सपाट होऊन जाते.भेद व अभेद ह्या कल्पना मायेतल्या आहेत.)

मायेमधें अंतरात्मा । नकळे तयाचा महिमा । जाला चतुर्मुख ब्रह्मा । तोहि संदेहीं पडे ॥ १८ ॥

चर्तुर्मुख ब्रह्मदेवसुद्धा अंतराम्याचा महिमा जाणतांना संदेहात पडतो. व तो महिमा कोणालाच कळत नाही पण तो (अंतरात्मा) मायेमधलाच.

पीळ पेंच कडोविकडीं । तर्क तीक्षण घडीनें घडी । मनासी होये तांतडी । विवरण करितां ॥ १९ ॥

( कडोविकडीं - निकरावर,हातघाईवर येणे )

अंतरात्म्याचे विवरण करताना हरघडीला पीळ,पेच,युक्तिप्रयुक्ति व तीक्ष्ण तर्क लढवितां लढवितां मनाची अगदी तिरपीट उडून ते अगदी निकरावर येते.

आत्मत्वें लागतें सकळ कांहीं । निरंजनीं हे कांहींच नाहीं ।येकांतकाळीं समजोन पाहीं ।म्हणिजे बरें ॥२०॥

ही सर्व खटपट आत्म्यासाठीच करावी लागते.परब्रह्माविषयी विचार करताना ही यातायात काही करावी लागत नाही.एकांतामध्ये विचार करून पाहावे म्हणजे ठीक.

देहे सामर्थ्यानुसार । सकळ करी जगदेश्वर । थोर सामर्थ्यें अवतार । बोलिजेती ॥ २१ ॥

लहानमोठ्या देहाच्या सामर्थ्याप्रमाणे सर्व काही (मूळमाया) ईश्वरच करितो.मोठे सामर्थ्य प्रकट होते.त्याला अवतार म्हणतात.

शेष कूर्म वऱ्हाव जाले । येवढे देहे विशाळ धरिले । तेणें करितां रचना चाले । सकळ सृष्टीची ॥ २२ ॥

शेष,कूर्म,वराह असे अवतार होऊन त्यांनी एव्हढाले प्रचंड देह धारण केले (की ज्यांच्या योगाने त्यांनी सा-या पृथ्वीचा भार उचलला.) म्हणून हा सर्व सृष्टीचा कारभार चालला आहे.

ईश्वरें केवढें सूत्र केलें । सूर्यबिंब धावाया लाविलें । धुकटाकरवीं धरविलें । अगाध पाणी ॥ २३ ॥

ईश्र्वराने केव्हढी अदभुत व्यवस्था केली आहे बरे! (ईश्र्वराने सृष्टि हे केव्हढे यंत्र उभे केले आहे पाहा ! की त्याने) एव्हढ्या मोठ्या सूर्यबिंबला धावावयास लावेले आहे.आणि धुक्यामध्ये अपरंपार पाणी साठवले आहे.(ढग,धुकट,धूर,ह्यांना पाणी धरायला लावले आहे.)

पर्वताऐसे ढग उचलिती । सूर्यबिंबासी अछयादिति । तेथें सवेंचि वायोची गती । प्रगट होये ॥ २४ ॥

पर्वताकार ढग उठतात.(उभे राहतात.) काय आणि ते सूर्यबिंबाला अच्छादून टाकतात काय? लगेच तेथे वायूचा प्रवाह (झंझावात) उत्पन्न होतो.

झिडकझिडकुं धांवे वारा । जैसा काळाचा म्हणियारा । ढग मारुनी दिनकरा । मोकळे करी ॥ २५ ॥

( झिडकझिडकुं - जोरजोरात,वेगाने, म्हणियारा - सांगकाम्या,सेवक )

तो वायु सोसाट्याने घो घो वाहतो आणि काळाच्या सेवकांप्रमाणे (यमदुताप्रमाणे) तो वायु ढगांना मारून (ढगांची वाताहात करून) सूर्यनारायणाला मोकळे करतो.

बैसती विजांचे तडाखे । प्राणीमात्र अवचिता धाके । गगन कडकडून तडके । स्थळांवरी ॥ २६ ॥

विजांचे तडाखे बसतात,त्यामुळे प्राणिमात्र अकस्मात दचकून घाबरतात.आकाशात कडकडाट होतात. आणि जमिनीवर विजा पडतात व जमीन फाटून जाते.

येहलोकासी येक वर्म केलें । महद्भूतें महद्भूत आळिलें । सकळां समभागें चालिलें । सृष्टिरचनेसी ॥ २७ ॥

आणि ह्या सृष्टीत ईश्वराने एक मोठे वर्म (गूढ) करून ठेवले आहे ते हे की एक महद्भूत दुसऱ्या महद्भूताला ग्रासून टाकते.(हटवते) (आप पृथ्वीला,तेज आपाला-पाण्याला ह्याप्रमाणे) आणि त्यामुळे सर्व भुते सारख्या प्रमाणात राहून सृष्टीरचना सुरळीत (सुयंत्र,समभागे) चालली आहे.

ऐसे अनंत भेद आत्मयाचे । सकळ जाणती ऐसे कैंचें । विवरतां विवरतां मनाचे । फडके होती ॥ २८ ॥

आत्म्याचे असे असंख्य खेळ चालू आहेत,ते सर्व ज्यांना ठाऊक आहेत असे कोण पुरुष आहेत? (कोणी नाही)(ते सारे मनुष्याला काय करायचे आहेत?) त्याचे विवरण करता करता मनाचे फडके (चिंध्या) उडून जातात.(मनाची दुर्दशा उडून जाते.)

ऐसी माझी उपासना । उपासकीं आणावी मना । अगाध महिमा चतुराननां । काये कळे ॥ २९ ॥

माझी उपासना अशी आहे की ती ब्रह्मदेवाला ही कळत नाही.उपासकांनी तिचे मनन करावे.

आवाहन विसर्जन । हें चि भजनाचें लक्षण । सकळ जाणती सज्जन । मी काय सांगों ॥ ३० ॥

विवेकाने मूळमायेपासून सृष्टीची मांडणी (उभारणी,आवाहन) करणे व पुन्हा त्या मांडणीचा संहार (मोडणी,विसर्जन) करणे हे आमच्या भजनाचे म्हणजे उपासनेचे स्वरूप आहे सर्व सज्जन हे जाणणात,मी काय सांगावे?

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे देहेक्षेत्रनिरूपणनाम समास आठवा ॥**

## समास नववा : देहसूक्ष्मनिरूपण

॥ श्रीराम ॥ मृतिकापूजन करावें । आणी सवेंचि विसर्जावें । हें मानेना स्वभावें । अंतःकर्णासी ॥ १ ॥

हरीहरादिकांच्या मृत्तिकेच्या मूर्तीचे पूजन करावे आणि त्याचे (मूर्तीचे) लगेच विसर्जन करावे हे मनाला स्वाभाविकच रुचत नाही.

देव पूजावा आणी टाकावा । हें प्रशस्त न वटे जीवा । याचा विचार पाहावा । अंतर्यामीं ॥ २ ॥

देवाची पूजा करावयाची व तो लगेच फेकून द्यावयाचा (देव पुजावा व पुजून टाकावा) हे जिवाला प्रशस्त वाटत नाही पण ह्याचा विचार अंतःकरणात (मनांतच) करून पाहावा.

देव करिजे ऐसा नाहीं । देव टाकिजे ऐसा नाहीं । म्हणोनि याचा कांहीं । विचार पाहावा ॥ ३ ॥

देव करावा (म्ह.बनवावा व घडवावा) असा नाही व टाकावा असाही नाही म्हणून आवाहन व विसर्जन ह्यांच्या अर्थाबद्दल खोल विचार करून पाहावा.

देव नाना शरीरें धरितो । धरुनी मागुती सोडितो । तरी तो देव कैसा आहे तो । विवेकें वोळखावा ॥ ४ ॥

देव (अंतरात्मा) अनेक प्रकारची शरीरे धारण करितो आणि धारण करून परत टाकून देतो.तर असा तो देव कशा प्रकारचा आहे हे विचाराने ओळखावे.

नाना साधनें निरूपणें । देव शोधायाकारणें । सकळ आपुले अंतःकर्णे । समजलें पाहिजे ॥ ५ ॥

देवाचा शोध करण्यासाठीच अनेक (श्रवण-मननांदि) साधने व निरुपणे सांगितली आहेत (सारी देवाचा शोध लागावा ह्यासाठी करायची असतात हे निट मनी धरावे.) पण ती आपल्या अंतःकरणात नीट समजून घ्यावी.

ब्रह्मज्ञाचा उपाये । समजल्याविण देतां नये । पदार्थ आहे मा घे जाये । ऐसें म्हणावें ॥ ६ ॥

ब्रह्मज्ञान होण्याचे साधन हाती देण्यासारखे नाही,समजणे हेच ते साधन,दुसरा उपाय नाही ब्रह्मज्ञान म्हणून काही असा पदार्थ दृश्य थोडाच आहे. तर त्यासंबंधाने ये व हा घेऊन जा असे म्हणता येईल?

सगट लोकांचे अंतरींचा भाव । मज प्रतक्ष भेटवावा देव । परंतु विवेकाचा उपाव । वेगळाचि आहे ॥ ७ ॥

मला देवाची प्रत्यक्ष भेट करून द्यावी असे सर्वांचे मनोगत असते.परंतु विवेकाने देव प्राप्त करून घेण्याचा मार्ग वेगळाच आहे.(पण विवेकाने देव ठायी पाडायचा मार्ग काही और आहे)

विचार पाहातां तगेना । त्यास देव ऐसें म्हणावेना । परंतु जन राहेना । काये करावें ॥ ८ ॥

विचार केला असता जो टिकत नाही व शाश्र्वत नाही असे दिसून येते त्याला देव (देव असे) म्हणवत नाही,पण काय करावे? लोकांची समजूत लवकर होत नाही (लोक धीर धरत नाहीत ह्याला काय करावे.)

थोर लोक मरोनि जाती । त्यांच्या सुरता करुनी पाहाती । तैसीच आहे हेहि गती । उपासनेची ॥ ९ ॥

थोर पुरुष (मोठमोठे लोक) मरण पावल्यावर त्यांच्या (सुरता) मूर्ति,तसबिरी,पुतळे वगैरे करून पाहायची तशासारखाच हा उपासनेचा प्रकार आहे.

थोर व्यापार ठाकेना जनीं । म्हणोनि केली रखतवानी । राजसंपदा तयाचेनी । प्राप्त कैची ॥ १० ॥

( रखतवानी - शाईचा किरकोळ व्यापार )

मोठ्या प्रमाणावर व्यापार करण्याची धमक नसली म्हणजे मजुरी (किंवा शाईचा व्यापार केला) तरी त्याने राजाचे ऐश्र्वर्य कसे प्राप्त होणार? (राजैश्र्वर्य त्याला कोठून भोगायला मिळणार?)

म्हणोनि जितुका भोळा भाव । तितुका अज्ञानाचा स्वभाव । अज्ञानें तरी देवाधिदेव ।पाविजेल कैचा ॥११॥

म्हणून भोळा भाव हा अज्ञानाचा स्वभाव होय.अज्ञानाने ज्ञानस्वरूप देवधिदेव कसा ओळखता यावा?

अज्ञासी ज्ञान न माने । ज्ञात्यास अनुमान न माने । म्हणोनि सिद्धांचिये खुणें । पावलें पाहिजे ॥ १२ ॥

अज्ञानी माणसाला ज्ञानाचे विचार मान्य होत नाहीत (मानवत नाहीत) व ज्ञात्याला अनुमानित गोष्टी पटत नाहीत,म्हणून ज्यांना देव प्राप्त झाला आहे अशा सिद्धपुरूषांच्या मार्गाने गेले पाहिजे.

माया सांडून मुळास जावें । तरीच समाधान पावावें । ऐसें न होतां भरंगळावें । भलतीकडे ॥ १३ ॥

विवेकाने मायेचा त्याग करून मूळ (निर्गुण परब्रहम) गाठावे तरच देवप्राप्तीचे समाधान मिळते नाहीतर भलतीकडे वाहवत जावे लागेल.(असे न केले तर मन मानेल तेथे खुशाल भटकावे.)

माया उलंघायाकारणें । देवासी नाना उपाय करणें । अध्यात्मश्रवणपंथेंचि जाणें । प्रत्ययानें ॥ १४ ॥

मायेचे उल्लंघन करून (मायानदीचा परपार पावून) देवाचा लाभ व्हावा ह्यासाठी अनेक उपाय करावे लागतात,तथापि निश्र्चयाचा मुख्य उपाय हा की अध्यात्मश्रवण करून त्या मार्गानेच अनुभव घेत देव पावावा.

ऐसें न करितां लोकिकीं । अवघीच होते चुकामुकी । स्थिति खरी आणि लटकी । ऐसी वोळखावी ॥ १५ ॥

असे न करितां लौकिकांत जे जे उपाय केले जातात त्यामुळे देव एकीकडे व आपण एकीकडे (शोध दुसरीकडे अशी) सगळीच चुकामुक होऊन जाते. अमुक स्थिति खरी व अमुक खोटी असे नीट ओळखावे (खरे आणि खोटे स्वच्छ ओळखिले पाहिजे)

खोट्याचे वाटे जाऊं नये । खोट्याची संगती धरूं नये । खोटें संग्रहीं करूं नये । कांहींयेक ॥ १६ ॥

खोट्याच्या मार्गाने जाऊ नये,खोट्याची संगत धरू नये. खोटे किंचितही संग्रही ठेऊ नये.(खोट्याचा संग्रह करू नये.)

खोटें तें खोटेंचि खोटें । खर्यासी तगेनात बालटें । मन अधोमुख उफराटें । केलें पाहिजे ॥ १७ ॥

(ब्रह्म सत्य हे खरे व त्यावेगळे मायिक सर्व खोटे) खोटे हे सर्व खोटेच आहे,ते खोटे (बालटे) खऱ्यापुढे टिकत नाही ते खरे जाणण्यासाठी (सत्य-ब्रह्म खरा देव पाहिजे तर) मन जे अधोमुख म्हणजे मायेकडे व मायेच्या (मायिक जगाच्या) पसा-याकडे पाहात (धांवत) आहे ते विवेकाने थोपवून-उफराटे (उलट-ऊर्ध्वमुख) करून ब्रह्माकडे (उगमाकडे) लावले पाहिजे.

अध्यात्मश्रवण करीत जावें । म्हणिजे सकळ कांहीं फावे । नाना प्रकारीचे गोवे । तुटोनी जाती ॥ १८ ॥

अध्यात्मग्रंथ ऐकत जावे म्हणजे सर्व काही प्राप्त होते.( अध्यात्मश्रवण करावे म्हणजे सर्व काही कळते.) अनेक प्रकारचे घोटाळे व संशय नाहीसे होऊन जातात.

सूत गुंतलें तें उकलावें । तैसे मन उगवावें । मानत मानत घालावें । मुळाकडे ॥ १९ ॥

सुताची झालेली गुंतागुंत जशी युक्तीने सोडवावी लागते.तसेच हे मनही विषयासक्तीतून विवेकाने मोकळे करावे.(सोडवावे) आणि जसजसा त्याला विवेक पटत जाईल तसतसे त्याला मूळाकडे म्हणजे परब्रह्माकडे वळवावे.

सकळ कांहीं कालवलें । त्या सकळाचें सकळ जालें । शरीरीं विभागले । सकळ कांहीं ॥ २० ॥

सर्व जडाचा-चंचळाचा काला होऊन त्याचीच सर्व सृष्टीरचना (सर्वकाही पिंडब्रह्मांडरचना) झाली आहे आणि तो कालाच सर्व शरीरांतून विभागश: पसरला आहे.

काये तें येथेंचि पाहावें । कैसें तें येथेंचि शोधावें । सूक्ष्माचीं चौदा नांवें । येथेंचि समजावी ॥ २१ ॥

ह्यासाठी जे काय पहावयाचे असेल व शोधावयाचे असेल त्याचा शोध ह्या शरीरांत (नरदेहांतच) पाहून घ्यावा.अव्यक्तांच्या चौदा नावांचा विचार ह्या शरीरांतच पाहावा,(सूक्ष्माची म्ह.मूळमायेची चौदा नावे येथेच विवरुन पाहावी)

निर्गुण निर्विकारी येक । तें सर्वां ठाईं व्यापक । देहयामधें तें निष्कळंक । आहे कीं नाहीं ॥ २२ ॥

सर्वांवर निर्गुण व निराकार असे जे एक परब्रह्म आहे,तेच सर्व ठिकाणी व्यापलेले आहे. ते आपल्या देहातच निष्कलंक म्हणजे जसेच्या तसे आहे किंवा नाही हे पाहावे (म्ह.आहे हेच समजून येईल.) तेच सर्व ठिकाणी व्यापलेले आहे.

मूळमाया संकल्परूप । तें अंतःकर्णाचें स्वरूप । जड चेतवी चैतन्यरूप । तें हि शरीरीं आहे ॥ २३ ॥

मूळमाया संकल्परूप आहे आपल्या देहात अंतःकरण हे तिचे स्वरूप आहे.चैतन्य जडाला चेतवितें तेही शरीरांतच आहे.

समानगुण गुणसाम्य । सूक्ष्म विचार तो अगम्य । सूक्ष्म साधु जाणते प्रणम्य । तया समस्तांसी ॥ २४ ॥

समान गुण ज्यात आहेत ते गुणसाम्य (शरीरातच आहे) कळण्याला कठिण (शब्दाला अगम्य) असा तो सूक्ष्म विचार आहे असे सूक्ष्म विचार ज्या साधूंना समजतात त्या सर्वांना (प्रणम्य) नम्रवाचे वंदन केले पाहिजे.

द्विधा भासतें शरीर । वामांग दक्षिणांग विचार । तोंचि अर्धनारीनटेश्वर । पिंडीं वोळखावा ॥ २५ ॥

( वामांग दक्षिणांग - डावा - उजवा विचार हाच देहातील अर्धनारीनटेश्वर होय.)

शरीरांत डावा (वायू,प्रकृति) व उजवा (जाणीव,पुरुष) असे दोन भाग (एक वायुरूप व एक जाणीवरूप) आहेत.तोच पिंडातला अर्धनारीनटेश्वर असे समजावे.(ओळखावे)

तोचि प्रकृतिपुरुष जाणिजे । शिवशक्ती वोळखिजे । शडगुणईश्वर बोलिजे । तया कर्दमासी ॥ २६ ॥

प्रकृतिपुरुष व शिवशक्ति त्या कर्दमालाच म्हणतात.त्या कर्दमालाच षडगुणेश्वर म्हणतात.

तयासीच म्हणिजे महत्ततत्व । जेथें त्रिगुणाचें गूढत्व । अर्धमात्रा शुद्धसत्व । गुणक्षोभिणा ॥ २७ ॥

ज्या ठिकाणी त्रिगुण अव्यक्त अथवा सूक्ष्मरूपाने असतात असे जे महतत्व ते ह्याचेच नांव अर्धमात्रा ,शुद्धसत्व व गुणक्षोभिणी हीही ह्याचीच नावे आहेत.

त्रिगुणें चालतें शरीर । प्रतक्ष दिसतो विचार । मुळींच्या कर्दमाचें शरीर । ऐसें जाणावें ॥ २८ ॥

सत्व,रज,तम ह्या तीन गुणांच्या योगाने शरीर चालत असते ही गोष्ट प्रत्यक्ष दिसत आहे ह्यावरून मूळमायेत जो कर्दम (चिखल,मिश्रण) आहे.त्याचेच हे शरीर बनलेले आहे.असे जाणावे.

मन माया आणि जीव । हाहि दिसतो स्वभाव । चौदा नामांचा अभिप्राव । पिंडीं पाहावा ॥ २९ ॥

मन,माया,जीव (अंतरात्मा) ही शरीरात स्वाभाविकपणे आहेतच अशाप्रकारे ही चौदा नावे पिंडात आहेत का नाहीत ते पाहावे (तात्पर्य चैतन्य,गुणसाम्य, अर्धनारीनटेश्वर, षडगुणेश्वर, प्रकृतिपुरुष, शिवशक्ति,शुद्ध सत्व,गुणमाया,सत्व,रज,तम,माया,अंतरात्मा ही चौदा नावे त्या सूक्ष्म मूळमायेचीच आहेत.

पिंड पडतां अवघेंचि जातें । परंतु परब्रह्म राहातें । शाश्वत समजोन मग तें । दृढ धरावें ॥ ३० ॥

पिंड पडला तर सारेच जाते परंतु परब्रह्म तेवढे एकटे शिल्लक राहाते.म्हणून तेच शाश्र्वत आहे असे समजून (असा निश्र्चय करून) त्या सा-या देवाला हृदयी दृढ धरावे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे सूक्ष्मनिरूपणनाम समास नववा ॥**

## समास दहावा : विमलब्रह्मनिरूपण॥ श्रीराम ॥

धरूं जातां धरितां न ये । टाकूं जातां टाकितां न ये । जेथें तेथें आहेच आहे । परब्रह्म तें ॥ १ ॥

ते परब्रह्म धरायला जावे तर धरवत नाही.टाकायला जावे तर टाकवत नाही,ते सर्वच आहेच आहे.

जिकडे तिकडे जेथें तेथें । विन्मुख होतां सन्मुख होतें । सन्मुखपण चुकेना तें । कांहीं केल्या। ॥ २ ॥

जिकडे तिकडे व जेथे तेथे ते आहे, त्याच्याकडे पाठ फिरवली तरी ते समोरच (पुढेच) आहे.काही केले कोठेही तरी ते संमुखच असलेले समोर यावयाचे चुकत नाही.

बैसलें माणूस उठोन गेलें । तेथें आकाशचि राहिलें । आकाश चहुंकडे पाहिलें । तरी सन्मुखचि आहे ॥ ३ ॥

बसलेले माणूस उठून दुसरीकडे गेले तरी आकाश तेथे आहेच,ते काही उठून जात नाही (तरी दुसरीकडे जात नाही) आकाश कोठूनही पहिले तरी ते संमुखच आहे.

जिकडेतिकडे प्राणी पळोन जातें । तिकडे आकाशचि भोवतें । बळें आकाशाबाहेर । कैसें जावें ॥ ४ ॥

जिकडे प्राणी पळून जातात,तिकडे सभोवार आकाशच असते.मुद्दाम (हट्टाने) आकाशाबाहेर जावे म्हंटले तरी कसे जाता येईल? (हट्टाने कोणाला आकाशाबाहेर कसे जाववेल?)

जिकडेतिकडे प्राणी पाहे । तिकडे तें सन्मुखचि आहे ।समस्तांचें मस्तकीं राहे ।माध्यानीं मार्तंड जैसा ॥५॥

जिकडे जिकडे प्राणी पाहिल तिकडे तिकडे,भरदोनप्रहरी सूर्य जसा सर्वांच्या मस्तकावर असतो त्याप्रमाणे,आकाश सर्वत्र संमुखच आहे.

परी तो आहे येकदेसी । दृष्टांत न घडे वस्तुसी । कांहीं येक चमत्कारासी । देउनी पाहिलें ॥ ६ ॥

पण सूर्य एकदेशी असल्याने तो दृष्टांत परमात्मवस्तूला लागत नाही,मौजेसाठी (काही साद्रुश्यासाठी) किंवा समजुतीसाठी तो दृष्टांत देऊन पहिला इतकेच.

नाना तीर्थे नाना देसीं । कष्टत जावें पाहाव्यासी । तैसें न लगे परब्रह्मासी । बैसलें ठाईं ॥ ७ ॥

अनेक देशातील अनेक तीर्थे पाहण्यासाठी प्रवासाचे कष्ट सोशीत हिंडावे लागते.परब्रह्म पाहण्यासाठी असे कष्ट घेण्याचे घेण्याचे कारण नाही.आपण बसू त्या ठिकाणी ते आहेच.

प्राणी बैसोनीच राहातां । अथवा बहुत पळोन जातां । परब्रह्म तें तत्वतां । समागमें ॥ ८ ॥

प्राणी एकेठिकाणी बसून राहिला किंवा खूप पळत चालला तरी खरोखरी ब्रह्म त्याच्या बरोबर आहेच.

पक्षी अंतराळीं गेलां । भोवतें आकाशचि तयाला । तैसे ब्रह्म प्राणीयाला । व्यापून आहे ॥ ९ ॥

पक्षी वर आकाशात उडून गेला तरी त्याच्या सभोवार आकाशच असते.तसे ब्रह्म प्राणिमात्रांना व्यापून आहे.

परब्रह्म पोकळ घनदाट । ब्रह्म सेवटाचा सेवट । ज्यासी त्यासी ब्रह्म नीट । सर्वकाळ ॥ १० ॥

परब्रह्म पोकळ असून घनदाट आहे व शेवटाचाही शेवट आहे.ब्रह्म प्रत्येक पदार्थाला सर्वकाळ समोर (समुख) आहे.

दृश्या सबाहे अंतरीं । ब्रह्म दाटलें ब्रह्मांडोदरीं । आरे त्या विमळाची सरी । कोणास द्यावी ॥ ११॥

ब्रह्म ब्रह्मांडाच्या उदरामध्ये किंबहुना सर्व दृश्याच्या आतबाहेर घनदाट भरलेले आहे.अरे ह्या विमल ब्रह्माची सरी (बरोबरी) कोण करू शकेल?

वैकुंठकैळासस्वर्गलोकीं । इंद्रलोकीं चौदा लोकीं । पन्नगादिकपाताळलोकीं । तेथेंचि आहे ॥ १२ ॥

वैकुंठ,कैलास,स्वर्गलोक,इंद्रलोक आदिकरून चतुर्दश भुवने पन्नगादिक पातळ ह्या सर्व ठिकाणी परब्रह्म आहे.

कासीपासून रामेश्वर । आवघें दाटलें अपार । परता परता पारावार । त्यास नाहीं ॥ १३ ॥

( परता - त्यापलीकडे )

काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्वत्र अपरंपार गच्च घनदाट ब्रह्म भरून राहिले आहे त्याच्या पलीकडे,त्याच्याही पलीकडे गेले तरी त्याचा पारावर (विस्तृतपणाचा अंत) लागत नाही.थांग लागत नाही.

परब्रह्म तें येकलें । येकदांचि सकळांसी व्यापिले । सकळांस स्पर्शोन राहिलें । सकळां ठाईं ॥ १४॥

परब्रह्म हे एकटेच आहे पण त्याने एकचवेळी सर्वांना व्यापून टाकले आहे.सर्वांना सर्वत्र स्पर्श करून ते सर्वत्र व्यापले आहे.

परब्रह्म पाउसें भिजेना । अथवा चिखलानें भरेना । पुरामधें परी वाहेना । पुरासमागमें ॥ १५ ॥

परब्रह्म पावसाने भिजत नाही, चिखलाने (कर्दमाने,मायेच्या कर्दमानेही) माखत नाही.मरत नाही आणि पाण्याच्या महापुरात असून पुराबरोबर वाहवत नाही.

येकसरें सन्मुक विमुख । वाम सव्य दोहिंकडे येक । आर्धऊर्ध प्राणी सकळीक । व्यापून आहे ॥ १६ ॥

( आर्धऊर्ध - अधोर्ध )

ते निरंतर संमुखच,विन्मुख(पाठमोरे) डावे,उजवे,खाली,वर सर्व प्राण्यांना ते एकटे एकच वेळी व्यापून (ओतप्रोत भरलेले) आहे.

आकाशाचा डोहो भरला । कदापी नाहीं उचंबळला । असंभाव्य पसरला । जिकडे तिकडे ॥ १७ ॥

आकाशाचा डोह भरलेला आहे.तो कधीही उचंबळत नाही,तर जिकडे तिकडे (चहूकडे) कल्पनातीत पसरला आहे.

येकजिनसि गगन उदास । जेथें नाहीं दृश्यभास । भासेंविण निराभास । परब्रह्म जाणावें ॥ १८ ॥

( उदास - शून्याभास )

आकाश उदास (अलिप्त) व एकजिनसी (एकमेवाद्वितीय,ज्याला दुसरे नाही असे) व दृश्यभासरहित,पूर्ण निराभास आहे असे कल्पिले म्हणजे तेच परब्रह्म होय.

संतसाधुमहानुभावां । देवदानवमानवां । ब्रह्म सकळांसी विसांवा । विश्रांतिठाव ॥ १९ ॥

मोठमोठे साधुसंत महात्मे देव,दानव,मानव इत्यादि सर्वांना विसाव्याचे विश्रांतिस्थान एक परब्रह्मच आहे.

कोणेकडे सेवटा जावें । कोणेकडे काये पाहावें । असंभाव्य तें नेमावें । काये म्हणोनी ॥ २० ॥

त्याचा शेवट पाहण्याला कोणीकडे जावे कोणी काय म्हणून पाहावे? कल्पनातीत अमर्याद ते,त्याला मर्यादा कोणती घालावी !

स्थूळ नव्हे सूक्ष्म नव्हे । कांहीं येकासारिखें नव्हे । ज्ञानदृष्टीविण नव्हे समधान ॥ २१ ॥

ते स्थूल नाही,सूक्ष्म नाही,अमुक एकासारखे आहे असे नाही,ज्ञान दृष्टीवाचून समाधान नाही.

पिंडब्रह्मांडनिरास । मग तें ब्रह्म निराभास । येथून तेथवरी अवकास । भकासरूप ॥ २२ ॥

पिंड-ब्रह्मांडाचा म्ह.त्यातील अष्टदेहाचा निरास झाला की मग निराभास ब्रह्म येथून तेथवर भकास आकाशासारखे सर्वत्र व्यापून आहे.

ब्रह्म व्यापक हें तो खरें । दृश्य आहे तों हें उत्तरें । व्यापेंविण कोण्या प्रकारें । व्यापक म्हणावें ॥ २३ ॥

हे दृश्य (व्याप्य,जगत) आहे तो पर्यंत त्याच्या सापेक्षतेने ब्रह्म व्यापक आहे असे आपण म्हणतो.आणि तेवढ्यापुरते हे म्हणणे खरे आहे,परंतु हे व्याप्य म्हणजे दृश्यच जर नाही-मिथ्या आहे तर त्याच्यावाचून ब्रह्माला व्यापक कसे म्हणता येईल?

ब्रह्मासी शब्दचि लागेना । कल्पना कल्पूं शकेना । कल्पनेतीत निरंजना । विवेकें वोळखावें ॥ २४ ॥

ब्रह्माला शब्दच लागत (पोचत) नाही (ते नि:शब्द आहे) त्याला कल्पना कल्पू शकत नाही असे ते कल्पनातीत निर्विकल्पच निरंजन आहे त्याला विवेकानेच ओळखले पाहिजे.

शुद्ध सार श्रवण । शुद्ध प्रत्ययाचें मनन । विज्ञानी पावतां उन्मन । सहजचि होतें ॥ २५ ॥

शुद्ध (विमल) सार (ब्रह्म) त्याचे श्रवण केले व श्रवणाचे मनन करीत करीत त्याचा शुद्ध अनुभव (प्रत्यय) आला म्हणजे विज्ञानी (परब्रह्माच्या ठिकाणी)प्राप्त होतांच सहजच उन्मन होते (म्हणजे विज्ञान साक्षात्कार होऊन उन्मन सहजच होते.)

जालें साधनाचें फळ । संसार जाला सफळ । निर्गुण ब्रह्म तें निश्चळ । अंतरीं बिंबलें ॥ २६ ॥

(श्रवणापासून आत्मनिवेदनापर्यंत जे नवविधा भक्तिरूप) साधन केले,त्याचे फळ प्राप्त झाले संसार सुखी झाला म्ह.नरदेह मिळाल्याचे सार्थक झाले व जन्ममरणबंध (नरजन्म) सुटला.निश्चळ निर्गुण (पर) ब्रह्म अंतःकरणात (अंतरी) ठसावले.

हिसेब जाला मायेचा । जाला निवाडा तत्वांचा । साध्य होतां साधनाचा । ठाव नाहीं ॥ २७ ॥

मायेचा हिशेब झाला-पुरा केला (बाकी फेडली),तत्वविचाराने तत्वांचा निर्णय लागला (निवडा झाला-पंचीकरण व तत्वविचार झाला) साध्य (ब्रह्मरूप) होताच साधने मावळळी(साध्य मिळवून दिल्यावर साधने सफळ झाल्यामुळे आपोआप राहिली)

स्वप्नीं जें जें देखिलें । तें तें जागृतीस उडालें । सहजचि अनुर्वाच्य जालें । बोलतां न ये ॥ २८ ॥

अज्ञानरूप स्वप्नांत जे जे पहिले होते ते ते स्वरूपजागृतीने उडून गेले-नाहीसे झाले,त्यामुळे सहजच अनिर्वाच्य (ब्रह्मस्वरूप समाधान) झाले ते शब्दांनी सांगता येत नाही.

ऐसें हें विवेकें जाणावें । प्रत्ययें खुणेंसी बाणावें । जन्ममृत्याच्या नांवें । सुन्याकार ॥ २९ ॥

असे हे विवेकाने जाणावे व प्रत्ययाने (अनुभवावे) आत्मखुण बाणवून घ्यावी (निजखूणेस पावावे) म्हणजे जन्ममरण खुंटून जाईल (आता जन्ममरण खुंटले)

भक्तांचेनि साभिमानें । कृपा केली दाशरथीनें । समर्थकृपेचीं वचनें । तो हा दासबोध ॥ ३० ॥

भक्तांचा अभिमान धरून (भक्तांच्या उद्धाराची कळकळ बाळगून) श्रीसमर्थ दाशरथीरामाने कृपा केली म्हणून ती श्रीसमर्थरामाच्या कृपेची वचने एकत्र ग्रंथित होऊन हा श्रीदासबोधग्रंथ तयार झाला.

वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध । मनकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ ३१ ॥

या वीसदशकी दासबोधाचे श्रवण करून शोधपूर्वक मनन (केल्यास) करणाऱ्यास परमार्थ उघड होतो (स्पष्ट कळतो)

वीस दशक दोनीसें समास । साधकें पाहावें सावकास । विवरतं विशेषाविशेष । कळों लागे ॥ ३२ ॥

वीस दशकांचे मिळून दोनशे समास आहेत हे साधकाने सावकाश,सावधपणाने व संथपणाने वाचावेत,ह्याचे अवलोकन करावे जसजसे त्याचे विवरण करावे तसतसा हा ग्रंथ अधिकाधिक कळू लागेल (ह्याचे जसजसे मनन होईल तसतसा हा अधिकाधिक कळत जाईल)

ग्रंथाचें करावेंस्तवन । स्तवनाचें काये प्रयोजन । येथें प्रत्ययास कारण । प्रत्ययो पाहावा ॥ ३३ ॥

ग्रंथाचे स्तवन करावे,पण स्तवनाचे कारणच काय आहे? वाचकांना आत्मप्रत्यय येणे,त्यांनी पण अनुभव घेणे,हे मुख्य आहे ह्यासाठी अनुभव घ्यावा म्हणजे झाले (हेच त्याचे स्तवन होय)

देहे तंव पांचा भूतांचा । कर्ता आत्मा तेथींचा । आणी कवित्वप्रकार मनुशाचा । काशावरुनी ॥ ३४ ॥

हा देह तर पंचमहाभूतांचाच आहे व त्यात सर्व कर्तुत्व आत्मारामाचे आहे आणि हे कवित्व (ग्रंथकर्तुत्व) तेवढे मनुष्याचे हे कशावरून म्हणावे?

सकळ करणें जगदीशाचें । आणी कवित्वचि काय मानुशाचें । ऐशा अप्रमाण बोलण्याचें काये घावें ॥ ३५ ॥

सर्व करणे जगदीशाचे (अंतरात्म्याचे) आहे आणि कवित्वच तेवढे मनुष्याचे काय? हे कशावरून म्हणावे? हे बोलणे निराधार (खोटे) आहे त्यात तात्पर्य काय?

सकळ देहयाचा झाडा केला । तत्वसमुदाव उडाला । तेथें कोण्या पदार्थाला । आपुलें म्हणावें ॥ ३६ ॥

सर्व देहाचा (अष्टदेहांचा) झाडा झाला-शोध घेतला तेव्हा तत्वांच्या समुदायाचा निरास झाला-निवाडा झाला (काही राहिले नाही) तत्वे उडाली मग तेथे कोणत्या पदार्थाला आपले म्हणावे? (मग कोणत्या पदार्थाला मी व माझे म्हणावे?)

ऐसीं हें विचाराचीं कामें । उगेंच भ्रमों नये भ्रमें । जगदेश्वरें अनुक्रमें । सकळ केलें ॥ ३७ ॥

अशी ही विचाराचीं कामे आहेत. उगाच भलत्या भ्रमात पडू नये.जगदिश्वरानेच सर्व काही यथाक्रम केले आहे.

**इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे विमळब्रहमनिरूपणनाम समास दहावा ॥ ॥ दशक विसावा समाप्त ॥**

-----------------------------------------------समाप्त-----------------------------------